॥ श्रीराम समर्थ ॥

# दासबोध

## ( गद्य रूपांतरासह )

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

गीताप्रेस-गोरखपुर

॥ श्रीराम समर्थ ॥

# प्रकाशकीय निवेदन

आम्हां-तुम्हांसि भववारिधिमाजि तारूं
जें वाचितां परिसितां मन होय तारूं।
ते दासबोधरचना घडली जयाला
वंदूं निरंतर तया गुरुराजयाला ॥

महाराष्ट्रांत अनेक थोर-थोर संत होऊन गेले. पण त्या सर्वांमध्ये श्रीसमर्थ रामदासस्वामींचे आगळेपण लक्षणीय आहे. यासाठीच श्रीमेरुस्वामी म्हणतात,

कृत त्रेत द्वापारीं । जाले अद्‌भुत अवतारी।
परी या समर्थांची सरी । कोणी न पवे ॥

''प्रपंच करावा नेमक'' असे म्हणणाऱ्या श्रीसमर्थांनी जगाच्या उद्धारासाठी स्वत: मात्र भर लग्नमंडपातून पुरोहितांचे 'शुभमंगल सावधान' ऐकताच सावध होऊन माया आणि मायाकार्यापासून पळ काढून साधकांना सिद्ध करून दाखविले की, 'इच्छा असेल, तर या प्रपंचातून कसे बाहेर पडता येते ते.' या अलौकिक प्रसंगाचे वर्णन करताना श्रीगिरिधरस्वामी म्हणतात-

ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें । पूर्वी अवतारादिकासी न झालें।
माया मोहिनीनें ब्रह्मादिकां भुलविलें । नाना पुराणें ऐकिलीं ॥

श्रीरामदास स्वामींचा जन्म जालना जिल्ह्यातील 'जांब' या गावी इ.स. १६०८ मध्ये रामनवमीला माध्याह्न काळी झाला. त्यांची पहिली बारा वर्षे बालपणात गेल्यावर पुढची बारा वर्षे तप:साधनेत व त्यापुढील बारा वर्षे तीर्थाटनात गेली. ७३ वर्षांच्या जीवनकालापैकी उरलेली ३६-३७ वर्षे धर्मसंस्थापना, वाङ्मयरचना व राजकारण यांमध्ये व्यतीत झाली. तीर्थाटन करताना समाजाची भीषण स्थिती पाहून 'चिंतेने ऊर फाटतो' असे त्यांनी एका मित्राला लिहिले आहे. त्यांची ही चिंता आणि जनोद्धाराची तळमळ 'दासबोध' या असामान्य ग्रंथातही आढळून येते.

श्रीसमर्थांचे वाङ्मय विपुल आहे. त्यांपैकी 'दासबोध' या ग्रंथात व्यक्तिगत वाचन-लेखनासारख्या सामान्य विषयांपासून सृष्टिनिर्मिती, ब्रह्म, माया यांसारख्या आध्यात्मिक विषयांपर्यंत जगातील अनेक विषय आलेले आहेत. सुरवातीच्या श्लोकात 'दासबोधाला' भवसागरातून तारून नेणारी नाव, असे श्री. रघुनाथ पंडितांनी म्हटले, ते यासाठीच. दासबोधातील अध्यात्म पारंपरिक स्वरूपाचे नसून प्रचीतीवर आधारलेले आहे. शास्त्रप्रचीती व गुरुप्रचीती यांपेक्षा आत्मप्रचीतीला श्रीसमर्थांनी अधिक महत्त्व दिले आहे.

हा ग्रंथ मराठी असला तरी ओवीबद्ध असल्याने व त्यातील काही प्रमेये सूत्रबद्ध असल्यामुळे त्यांचे गद्य रूपांतर मराठीत करून द्यावे, अशी डॉ. कमलाताई वैद्य यांना विनंती केली. ती मान्य करून त्यांनी या ग्रंथाचे सुबोध व सुरस मराठी गद्य-रूपांतर करून दिले. त्यांची योग्यता व रूपांतराची श्रेष्ठता यांविषयी संत साहित्याचे व्यासंगी विद्वान परम पूज्य स्वामी गोविंददेव गिरि (आचार्य श्री किशोरजी व्यास) यांनी आपल्या बहुमोल प्रस्तावनेत उल्लेखिलेली आहेच.

सतत कार्यमग्न असतानाही प. पूज्य स्वामीजींनी या ग्रंथाला जी प्रदीर्घ प्रस्तावना लिहून दिली, त्यामुळे 'सुवर्णाला सुगंध यावा, तसे या ग्रंथाचे महत्त्व वाढले आहे.

या ग्रंथाच्या प्रकाशनात अनुवादक, प्रस्तावनाकार, संपादक, मुद्रित शोधक इत्यादी ज्या ज्या व्यक्तींनी साह्य केले, त्यांना धन्यवाद देऊन या ग्रंथाच्या वाचन-अभ्यास-पारायणाने साधक-भक्तांनी आत्मकल्याण साधावे, अशी अपेक्षा बाळगून हा ग्रंथ प्रभू श्रीरामांच्या चरणी समर्पण करतो.

विनीत—**प्रकाशक**

❑ ❑

# विषय-सूची

❑ ❑

॥ श्रीराम समर्थ ॥

# समर्थ रामदास स्वामी व त्यांचा दासबोध

भारतीय संस्कृतीचे यथार्थ प्रातिनिधिक दर्शन ज्यातून घडते, अशा ग्रंथराज महाभारतातील यक्षप्रश्नाच्या प्रकरणात यक्षाने धर्मराज युधिष्ठिराला एक आगळा प्रश्न विचारला आहे. 'धर्मराज, का दिक् ?' म्हणजे दिशा कोणती ?' या प्रश्नाला युधिष्ठिराने दिलेले उत्तर अत्यंत मननीय आहे. तो म्हणाला, 'सन्तो दिक्' संतांनी दाखविलेली दिशा हीच जीवनाची सर्वोत्तम दिशा होय. विविध संतचरित्रे आणि विपुल संतवाङ्मय यांच्या संदर्भात वरील उत्तराचे सखोल चिंतन करून जर असा प्रश्न उपस्थित केला की, ''वैयक्तिक व सामाजिक पातळीवर सर्वांना सर्वकाळी व्यवहार व परमार्थ या दोन्ही आघाड्यांवर यशस्वी होण्यासाठी अचूक दिशा कोणती ?'' तर त्याचे उत्तर निःशंकपणे असे द्यावे लागेल की, समर्थ रामदास स्वामींनी त्यांचे जीवन व वाङ्मय यांच्या माध्यमातून दाखविलेली दिशा हीच ती अचूक दिशा होय!

आपल्या सांस्कृतिक प्रवाहाचे मूळ अतिप्राचीन वैदिक वाङ्मय आहे, याबद्दल कुणाचेही दुमत असू शकत नाही. नंतर काळाच्या ओघात वैदिक आचार-विचारांत शिरलेल्या अपप्रवृत्तींमुळे त्यातील काही अंशांच्या विरुद्ध उठलेल्या बौद्ध, जैन इत्यादी प्रतिक्रियात्मक लाटांच्या सकारात्मक उपदेशात बऱ्याच मोठ्या अंशी वैदिक विचार व साधनप्रणालीच आहेत. या वैदिक वाङ्मयाचा सोप्या लौकिक संस्कृत भाषेत रामायण, महाभारत, भागवतादी ग्रंथांतून विस्तार केला गेला, तर दर्शनशास्त्रांच्या आधारे त्या विचारांची तर्कशुद्ध मांडणी करण्यात आली. विविध ऋषींनी वैदिक विचार दिले. विविध आचार्यांनी तर्कशुद्ध मांडणी करून त्यांचा प्रचार केला. तर मध्ययुगात विविध संतांनी तेच विचार लोकभाषेत रुजविले.

## महाराष्ट्राची संतपरंपरा

महाराष्ट्राच्या मध्ययुगीन संतपरंपरेत निर्माण झालेले विपुल साहित्य रामायण, महाभारत, गीता-भागवत यांना अनुसरणारे म्हणजेच पर्यायाने वैदिक विचारांना अनुसरणारे आहे. संतसम्राट श्री ज्ञानेश्वरमहाराजांची वेदनिष्ठा त्यांच्या साहित्यात पानोपानी दिसून येते व हाच सांस्कृतिक प्रवाह त्यांना अनुसरणाऱ्या परवर्ती सर्व संतांच्या वाङ्मयात दृग्गोचर व्हावा, हे स्वाभाविक आहे. प्रपंचाशी अविरोधी असा सरळ सोपा भक्तिमार्गाचा उपदेश व तो समजावून सांगण्यासाठी विविध प्रकारचे सोप्या लोकभाषेतील पारमार्थिक साहित्य यांच्या आधारे मध्ययुगीन परचक्राच्या राष्ट्रीय आपत्तीच्या काळात संतांनी समाजाला सावरून धरले. अत्यंत विपरीत परिस्थितीत त्यांचे मनोबल टिकविले व फार मोठ्या प्रमाणात त्यांनी स्वकीय समाजाला मूळ भारतीय संस्कृतीशी बांधून ठेवले. उत्तरेकडे संत तुलसीदास, गुरु नानकदेव, शंकरदेव, नरसी मेहता, चैतन्य महाप्रभू इत्यादी संतांनीसुद्धा अशाच प्रकारचे कार्य करून भारतीय परंपरेवर अत्यंत मोठे उपकार केले आहेत. भारताच्या सर्वच प्रदेशातून त्या काळी संत महात्म्यांच्याद्वारे लोकभाषेतील प्रबोधनातून असे महनीय कार्य घडले.

असे असले तरी महाराष्ट्रातील संतपरंपरेचे कार्य प्रकर्षाने नजरेत भरते ते तिच्या काही वैशिष्ट्यांमुळे. या भूमीतही अनेक पारमार्थिक संप्रदाय निर्माण झाले असले, तरी मराठी जनमानसावर सर्वांत मोठा प्रभाव पडला तो भागवतधर्मीय वारकरी संप्रदायाचा. संत श्री ज्ञानेश्वरमहाराजांनंतर शतकानुशतके अत्यंत श्रेष्ठ स्तराचे संत महाराष्ट्रातील लहानमोठ्या सर्व जातिजमातींतील स्त्री-पुरुषांमध्ये निर्माण होत राहिले व ही विशाल आणि अखंड संतपरंपरा मराठी लोकमनाला आपल्या सरळ, सोप्या भक्तिभावाने व मराठमोळ्या भाषेतील पारमार्थिक साहित्याने सदाचाराच्या मार्गावर सतत पुढे नेत राहिली. वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन करणाऱ्या जगद्गुरू आदिशंकराचार्यांचे अद्वैत तत्त्वज्ञान व गीता-भागवतांतील रसाळ भक्तिमार्ग या दोन तटांच्यामधून या थोर संतांची विचारधारा अखंडपणे वाहत राहिली. अन्य प्रदेशांतून अद्वैती महात्मे झाले, भक्तिमार्गी संतही झाले. पण या दोहोंचा पूर्ण समन्वय करून प्रतिपादन करणारे संत महाराष्ट्राबाहेर गोस्वामी तुलसीदासांचा अपवाद वगळता दिसत नाहीत. संत तुलसीदासांनाही

त्यांच्या तोलामोलाची परंपरा लाभली नाही. या उच्चस्तरीय संतांची अखंड मालिका हे महाराष्ट्रभूमीचे विलोभनीय सद्‌भाग्य ठरले.

महाराष्ट्राच्या या परंपरेतील प्रमुख संतांची ही स्वत:ची अशी वैशिष्ट्ये आहेत व प्रत्येक संत आपापल्या स्थानी आगळा ठरावा इतक्या प्रकर्षाने ती नजरेत भरतात. भागवतधर्माचा पाया रचणारे संतसम्राट श्री ज्ञानेश्वरमहाराज आपल्या प्रतिभासामर्थ्यात केवळ अजोड आहेत. भावार्थदीपिका अथवा ज्ञानेश्वरीच्या माध्यमाने त्यांनी साहित्यसोनियाच्या खाणी प्रकट केल्यात व खरोखरी अमृतातेही पैजा जिंकणारा असा साहित्यालंकाररस प्रवाहित केला की, ज्ञानेश्वरी केवळ मराठी भाषेतीलच नव्हे, तर जगाच्या सर्व भाषांतील साहित्याचा मुकुटमणी ठरेल. अशी प्रतिभा अन्यत्र दुर्लभच! श्री ज्ञानेश्वरमाउलींचे सांगाती लडिवाळ भक्त संत श्री नामदेवांचे प्रचारसामर्थ्य हे त्यांचे खास वैशिष्ट्य! सुमारे सात शतकांपूर्वी पंजाबसारख्या सुदूर प्रांती जाऊन तेथील जनमानसांत परमार्थ व भगवद्‌भक्ती रुजविण्याचे कार्य श्रीनामदेवमहाराजांनी इतक्या प्रकर्षाने केले की, शिखांचा पवित्र ग्रंथ गुरुग्रंथसाहेब यात त्यांचे सुमारे चौसष्ट अभंग समाविष्ट झाले आहेत. पंजाब, हरियाणा व राजस्थान प्रांतात खास संत नामदेवांची अशी शंभराहून अधिक मंदिरे आहेत. तिकडील भाविकांची संत नामदेवांवरील श्रद्धा बघून आपले मस्तक त्या श्रद्धेपुढे झुकावे असे स्थान त्या जनमानसांत निर्माण करण्यासाठी संत नामदेवरायांना किती कष्ट उपसावे लागले असतील! प्रपंच हे संत एकनाथमहाराजांचे खास वैशिष्ट्य आहे. अन्य संतांच्या कौटुंबिक जीवनाकडे बघताना जाणवते की, काहींनी प्रपंच केलाच नाही, तर काहींना तो नीट जमला नाही. ज्ञान, कर्म, भक्ती व योग या सर्वांगांनी परमार्थ पूर्ण साधून व समाजाच्या सर्व स्तरांसाठी विविध प्रकारचे लिखाण करूनही नाथांना अव्यंग प्रपंचही साधला, ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील फार मोठी जमेची बाजू आहे. प्रपत्ती म्हणजे तळमळीची शरणागती हे संत श्री तुकाराममहाराजांचे प्रमुख बळ होय! विस्कटलेला प्रपंच, शास्त्राध्ययनाचा अभाव, कोणी सदेह मार्गदर्शक सद्‌गुरूही नाही. अशा अवस्थेत भगवंताचा साक्षात्कार करून घेऊन, अभंगवाणीने वेदार्थ सांगून भागवत धर्ममंदिराचा कळस होण्याचा बहुमान या संतश्रेष्ठाने प्राप्त केला तो मुख्यत्वे प्रपत्तीच्या म्हणजे अखंड तळमळ व संपूर्ण समर्पणाच्या बळावर. ज्ञानेश्वरमाउलींची प्रतिभा, संत नामदेवांचा प्रचार, संत एकनाथ महाराजांचा प्रपंच व संत तुकोबारायांची प्रपत्ती याला संत रामदासस्वामींनी जोड दिली ती प्रतिकाराची! धर्म-संस्कृतीवर कोसळणाऱ्या अस्मानी-सुलतानी आपत्तींच्या प्रसंगी वैयक्तिक व सामुदायिक पातळीवर प्रतिकारक्षमतासंपन्न समाज कसा उभा करावा याचे दिग्दर्शन हे समर्थांचे आगळे वैशिष्ट्य आहे.

## समर्थकालीन देशस्थिती

श्री समर्थांच्या काळी असलेल्या आपल्या देशातील परिस्थितीचे अवलोकन केले तर हे लक्षात येते की, समाजात धैर्य व प्रतिकारक्षमता जागृत करू शकणाऱ्या महापुरुषांची तेव्हा नितांत आवश्यकता होती. प्राचीन काळापासून सुजला-सुफला नैसर्गिक संपन्नतेचे वरदान लाभलेला हा देश सर्वार्थाने समृद्ध व सुखी होता. येथील समाजजीवन अन्य सर्व देशांच्या तुलनेने उच्च व शांत होते. पण इ.स. ७१२ मधील महंमद बिन कासीमच्या आक्रमणानंतर सुरुवातीला धीरेधीरे व नंतर झपाट्याने हे दृश्य बदलू लागले. या संपन्न देशाला लुटण्यासाठी आक्रमकांच्या धाडीवर धाडी पडू लागल्या. या आक्रमणाचे स्वरूप केवळ संपत्ती लुटणे एवढेच नव्हते. येथील धर्म-संस्कृतीचा विनाश हेही त्यांचे तितकेच महत्त्वाचे उद्दिष्ट होते. यासाठी त्यांनी अत्यंत पवित्र आणि विशाल मंदिरांचा विध्वंस केला. अनेक मंदिरांचे मशिदीत रूपांतर केले. पवित्र देवमूर्तींची विटंबना करण्यासाठी त्यांचे धातू वितळवून त्याचा किंवा पाषाणमूर्तींचा मशिदीच्या भिंती बांधण्यासाठीच नव्हे, तर पायऱ्या म्हणूनही उपयोग केला. हिंदूंनी पूज्य मानलेल्या गाईंची क्रूर हत्या करण्यात धन्यता मानली. प्रतिकार करणाऱ्यांच्याच नव्हे तर प्रतिकार न करणाऱ्याही धार्मिक जनतेच्या कत्तलीवर कत्तली केल्या. स्त्रियांना बाटविणे, त्यांच्यावर क्रूर अत्याचार करणे व त्यांना पळवून नेणे हा तर त्यांना नित्याचा अधिकारच वाटू लागला. हालहाल करून असंख्य लोकांचे धर्मांतर करण्याचा सपाटा लावला गेला. उत्तरेमध्ये मोगलांचा धिंगाणा चालू होता व दक्षिणेकडे पोर्तुगीजांचा धुमाकूळ सुरू होता. बहामनी राज्यातून निर्माण झालेल्या पाचही शाह्यांनी आपापल्या प्रदेशात पुन्हा पुन्हा वरीलप्रमाणे अत्याचार

करीत हिंदूंचा सर्वप्रकारे अनन्वित छळ करणे व हरप्रकारे धर्मांतर करून मुसलमानांची संख्या वाढविण्याचे (अ) धर्मकार्य अखंडपणे चालू ठेवले होते. या सर्व शासकांचा आपसांत जरी सत्ता-संघर्ष चालू असला, तरी येथील हिंदू जनता त्या सर्वांनाच समान शत्रू वाटत होती व तिची लांडगेतोड करण्यात सर्वांनाच धन्यता वाटत होती. त्यामुळे सर्वत्र हा समाज आक्रमकांच्या भक्ष्यस्थानी पडत चालला होता.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे आलेल्या आक्रमकांची संख्या येथील जनतेसमोर नगण्य होती. पण जाति-जमाती, प्रदेश, भाषा, संप्रदाय व परस्परस्पर्धा यांनी दुभंगलेला हा समाज या आक्रमकांचा प्रतिकार करू शकला नाही. इतक्या क्रूर राक्षसी आक्रमणाची त्याला सवयच नसल्यामुळे तो भेदरला, हवालदिल झाला. त्यातच परस्पर वैर, हेवेदावे, क्षुद्र स्वार्थीवृत्ती आणि कमालीची फूट यांमुळे दुर्बल झालेला हा समाज किंकर्तव्यमूढ झाला, भांबावला. यातून बाहेर पडण्याचा मार्गच त्याला दिसेना. स्वत:वर संकट आल्यावर स्थानिक पातळीवर त्या त्या राजांनी याचा प्रतिकारही केला व तो काही काळपर्यंत काही प्रमाणात कुठेकुठे यशस्वीही झाला. पण सर्वसमावेशक राष्ट्रीय दृष्टीच्या अभावी इतरांवरील संकटात मदतीसाठी धावून जाण्याची वृत्ती कोणी दर्शविली नाही. म्हणून आक्रमकांनी एका-एकाचा सहज पाडावच केला नाही, तर येथील जिंकलेल्या राजांना येथीलच अन्य राजांना जिंकण्यासाठी कौशल्याने व क्रौर्याने वापरले. त्यांच्या सेवेत असलेल्या एतद्देशीय सरदार व सैनिकांनीच येथील अन्य लोकांना परकीय गुलाम बनविण्यासाठी पिढ्यान्‌पिढ्या आपले रक्त सांडले व प्राणही दिले. हा या देशाचा भीषण दैवदुर्विलास! या देशातील पुत्रवत असलेल्या हिंदू समाजातील नागरिकांना ते केवळ हिंदू आहेत, म्हणून जिझियासारखा कर भरावा लागण्याची नामुष्की पिढ्यान्‌पिढ्या सोसावी लागली.

हा भयाकुल करणारा घनांधकार कधी संपेल हे कळत नव्हते. संपेल किंवा नाही याचीही वानवा होती. तरीही भक्तिमार्गी संतांच्या उपदेशाने सोशिक-सहिष्णु बनलेला हा समाज मोठ्या प्रमाणात तग धरून स्वधर्मपालन करीत होता. अशा भ्रांतिग्रस्त काळी **'जय जय रघुवीर समर्थ'** चा महान मंत्र सर्वत्र घुमवून या सहिष्णू समाजास जयिष्णू बनविण्यासाठी दुर्दांत शत्रूच्या प्रतिकारार्थ सिद्ध करण्यासाठी, तशी अचूक दृष्टी देण्यासाठी व दिशा दाखविण्यासाठी अवतरलेल्या महान राष्ट्रगुरूंचे नाव समर्थ रामदास स्वामी.

## समर्थ चरित्राची रूपरेषा

मराठवाड्यातील जांब या गावी इ.स. १६०८ च्या चैत्र शु. ९ म्हणजे श्रीराम नवमीच्या दिवशी माध्याह्नकाळी समर्थ रामदास स्वामींचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव सूर्याजीपंत ठोसर व आईचे नाव राणूबाई. समर्थांचे बालपणीचे नाव नारायण असून, त्यांना गंगाधर नावाचे थोरले बंधू होते. त्यांच्या वडिलांकडे म्हणजे सूर्याजीपंतांकडे परंपरेने आलेले कुलकर्णीपद होते व या घराण्यात अनेक पिढ्या भगवान श्रीरामाची व सूर्यनारायणाची उपासना अखंडपणे चालू होती. घराण्यातील हे सर्व संस्कार बालनारायणाला स्वाभाविकपणे प्राप्त झाले. नारायण, स्वरूपाने सुंदर, देहयष्टीने सुदृढ, वृत्तीने चपळ व खोडकर आणि बुद्धीने सतेज होता.

वयाच्या अवघ्या आठव्या वर्षी नारायणाचे पितृछत्र हरपले. तत्पूर्वी यवन अधिकाऱ्याच्या जाचक दबावाने व्यथित होऊन सूर्याजीपंतांनी आपले कुलकर्णीपद सोडून दिले होते. परक्यांच्या या जाचाचा परिचय नारायणाला येथून होऊ लागला व जन्मजात चौकस बुद्धीने सभोवतालची अत्याचारग्रस्त समाजस्थिती पाहून या द्रष्ट्या बालकाने वयाच्या केवळ दहा-अकराव्या वर्षी **'आई! चिंता करितो विश्वाची'** ही मनोव्यथा ऐकविली. सभोवतालच्या स्वकीय समाजाचे खरोखर परित्राण करावयाचे असेल तर लौकिक बंधनात न अडकता परमेश्वरी कृपा प्राप्त करण्याची निकड लक्षात घेऊन वयाच्या बाराव्या वर्षी नारायणाने लग्नमंडपातून पलायन केले व नाशिकला प्रभू रामरायाच्या दर्शनाने शांती अनुभवून आपल्या पुढील साधनेसाठी गोदाकाठी टाकळीचा निवांत परिसर निवडला. **'देवाच्या सख्यत्वासाठी। पडाव्या जिवलगांच्या तुटी॥ सर्वस्व अर्पावे शेवटी। प्राण तोही वेचावा॥'** या निर्धाराने जणू त्याची पावले पडत होती.

टाकळी येथील बारा वर्षांच्या तपश्चर्येचा काळ हा समर्थांच्या सर्व कार्याच्या पायाभरणीचा काळ आहे. पहाटे उठणे, नित्यकर्म, सूर्यनमस्कार, आटोपून माध्याह्नापर्यंत गोदावरीच्या पात्रात उभे राहून जपसाधना करणे असे करीत

त्यांनी गायत्री व त्रयोदशाक्षरी राममंत्राची पुरश्चरणे पूर्ण केली. माध्याह्नोत्तर माधुकरी भिक्षा घेऊन अपराह्न व सायंकाळी विविध ग्रंथांचा अभ्यास आणि प्रसंगोपात्त कथा–कीर्तनांचे श्रवण अशाप्रकारे अखंड बारा वर्षे स्वयंशिस्तीत राहून एकेकाळी हूडपणा करणारा हा नारायण स्वत:चा शारीरिक, मानसिक, बौद्धिक व आत्मिक विकास योजनापूर्वक साधून घेतो, हे कुणाही विद्यार्थ्याला आदर्श ठरावे इतके स्पृहणीय आहे. श्री हनुमंताप्रमाणे श्रीरामसेवेकरिता स्वत:ची पूर्ण सिद्धता करून नारायण खरोखरी आता **'रामदास'** झाला.

यानंतरची स्वामी रामदासांची बारा वर्षे भारतवर्षाच्या तीर्थयात्रेत व्यतीत झाली. असंख्य पुण्यस्थळे या भारत देशाच्या सर्व प्रदेशातील कानाकोपऱ्यात विखुरलेली आहेत. आध्यात्मिक साधकांनी या पवित्र तीर्थांचे दर्शन घेणे, त्यांच्या आध्यात्मिक उन्नतीला पोषक असल्याने अशा प्रकारची तीर्थयात्रा कमी–अधिक प्रमाणात सामान्यत: सर्व साधक केव्हातरी करतातच. या धार्मिक दृष्टीने तर स्वामी रामदासांनी ही तीर्थयात्रा केलीच. पण या निमित्ताने घडलेल्या पायी प्रवासात अगदी सहजपणे जे समाजजीवन दिसले आणि सोद्देश्य बारकाईने त्यांनी जे लोकनिरीक्षण केले त्याने त्यांच्या भावी कार्याची दिशा स्पष्ट होत गेली. क्रूर परकीय आक्रमकांनी समाज भेदरलेला होता. मंदिरांचा विध्वंस, देवमूर्तींचे भंजन, संपत्तीची लूट, गाईंची हत्या, स्त्रियांचे अपहरण, छळाबळाने धर्मांतर व काफिरांचे शिरकाण हा सातसूत्री कार्यक्रम यवन शासकांकडून कमी–अधिक प्रमाणात पाशवी पद्धतीने सर्वत्र राबविला जात होता. त्यामुळे देशभर कोणालाही आपल्या संपत्तीची, घरादाराची, बायकामुलांची व प्राणांचीही शाश्वती नव्हती. या निरीक्षणाचे सार समर्थांनी एका वाक्यात सांगितले आहे 'सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला॥'

हिंदू समाज कर्मकांडात्मक धर्माचे आचरण श्रद्धेने करीत होता. उपासना, तीर्थयात्रा, देवदर्शन, सणवार हे सर्व चालू होते. पण समाज भयाक्रांत होता. मथुरेतील एका उत्सवातून मूठभर यवनांनी हिंदूंच्या निवडक मुली हजारो लोकांसमक्ष उचलून नेल्या तरी, कोणी काही करू धजावले नाही. या घटनेने समर्थांना काय वाटले असेल? हा हिंदू समाज बहुसंख्य आहे, संपन्न आहे, कष्टाळू आहे, बुद्धिमान व शूरही आहे. मग इतक्या विशाल समाजाला या आक्रमकांचा प्रतिकार का करता येत नाही? समर्थांनी हे हेरले की या समाजाकडे सर्व काही असले तरी, आत्मकेंद्रिततेमुळे स्वत:पुरते पाहण्याची वृत्ती फार प्रभावी आहे. स्वार्थामुळे संघटन नाही, संघटनेअभावी शक्ती नाही, शक्तिअभावी साहस नाही, साहस नसल्याने प्रतिकार नाही व प्रतिकाराअभावी मुकाट्याने अत्याचार सोसण्याखेरीज गत्यंतर नाही. या भीषण अंधकारमय परिस्थितीवर मात करण्याचा उपाय 'अखंड चाळणा' करणाऱ्या समर्थांना स्फुरला—तो म्हणजे प्रभू रामचंद्रांची डोळस उपासना.

डोळस उपासना याचा अर्थ असा की, परब्रह्मस्वरूप असलेल्या भगवान रामचंद्रांची आध्यात्मिक उन्नतीसाठी उपासना तर समर्थांना अभिप्रेत होतीच. पण त्याबरोबर सभोवतालच्या भीषण राक्षसी अत्याचारांनी गांजलेल्या समाजाचा आपल्या पुरुषार्थाने उद्धार करणाऱ्या, दुष्टांचा नि:शेष नि:पात करून सज्जनांचे परित्राण करणाऱ्या धर्मसंस्थापक श्रीरामाचा पराक्रमी आदर्शही समर्थांना लोकमनात रुजवावयाचा होता. देवांनाही बंदिवासातून सोडविणाऱ्या श्रीरामाची स्फूर्तिदायक कथाच या समाजाच्या मृतप्राय अंत:करणाला विजयाकांक्षेसाठी संजीवनी ठरू शकेल हा समर्थांचा होरा होता. म्हणून कृष्णातीरी चाफळ येथे श्रीरामस्थापना करून व मोठ्या प्रमाणात रामरायाचा उत्सव साजरा करून जेव्हा त्यांनी आपल्या कार्याची मुहूर्तमेढ रोवली, तेव्हा सहजपणे त्यांनी म्हटले 'रक्षिता देव देवांचा। त्याचा उत्साव मांडिला॥' खरे म्हणजे समर्थांनी भगवान श्रीरामचंद्रांनाच समर्थ म्हटलेले आहे. **'जय जय रघुवीर समर्थ'** हे नेहमी समर्थमुखाने ऐकता ऐकता भगवंताचे समर्थ हे विशेषण लोकांनी त्यांनाच लावून दिले व तेच रूढ झाले. समर्थ संप्रदाय हा श्रीरामोपासना संप्रदाय होय. कुटुंबाच्या घराण्याच्या प्रतिष्ठेसाठी व समाजाच्या उद्धारासाठी वैयक्तिक जीवनातील सुखांचा सहजपणे त्याग करणारे श्रीरामप्रभू आणि त्यांच्या दुष्टसंहार व साधुपरित्राण या धर्मसंस्थापनेच्या दोन्ही आघाड्यांवर स्वत:चे पूर्ण समर्पण करणारे बल–बुद्धि–शील–पराक्रमसंपन्न मारुतीराय ही समर्थांनी समाजाला पूजा करण्यासाठी प्रदान केलेली केवळ दैवतेच नाहीत तर, समाजाच्या सर्वतोमुख उत्कर्षासाठी जनमानसापुढे त्यांनी उभे केलेले महान अनुकरणीय आदर्शही आहेत.

या उपासना व आदर्शाच्या माध्यमातून त्यांना समाजात धर्मनिष्ठा, नि:स्वार्थता, चारित्र्य, बलोपासना,

समाजसंघटन, शौर्य, धैर्य, चातुर्य, परोपकार, ईश्वरभक्ती इत्यादी सद्‍गुणांचे संवर्धन करावयाचे होते. ठायी-ठायी सर्वत्र हे करण्यासाठी श्रीरामप्रभूंच्या व हनुमंतांच्या मंदिरांची स्थापना, मठांची उभारणी, शिष्यांचा व सज्जनांचा संग्रह, त्यातून महंतांची निवड, महंतांचा व्यक्तिमत्त्व विकास आणि या सर्व कार्यासाठी आवश्यक अशी ग्रंथरचना हे सर्व करणे क्रमप्राप्त होते. श्री समर्थांनी अत्यंत परिश्रमपूर्वक या सर्व गोष्टी सातत्याने व सर्वांना सोबत घेत केल्या. त्या इतक्या प्रकर्षाने की, त्यांना याचि देही 'आनंदवनभुवना'चे स्वप्न साकारता आले. अखंड कामाच्या लगबगीने व निरंतर दगदगीने श्रमलेला हा सार्थक देह त्यांनी वयाच्या ७४ व्या वर्षी सज्जनगडावर श्रीरामचरणी समर्पून चिरविश्रांती समाधी प्राप्त केली. तो दिवस होता माघ वद्य नवमी इ.स. १६८२. एका धगधगत्या जीवनयज्ञाची ती पूर्णाहुती होती.

# समर्थांचे कार्य

श्री समर्थांच्या या ७४ वर्षांच्या आयुष्यपटाकडे ओझरती नजर टाकली तरी एका अत्यंत कर्तृत्वसंपन्न महापुरुषाचे हिमालयासारखे भव्य व्यक्तिमत्त्व नजरेत भरते. सामान्यत: संतांचे मुख्य जीवितकार्य परमेश्वरी साक्षात्कारासाठी साधना; जमेल तेवढे जनतेचे पारमार्थिक मार्गदर्शन व या दोहोंच्या अनुषंगाने निर्माण झालेले भक्तिप्रधान आध्यात्मिक साहित्य असे दिसून येते. हे सर्व पूर्णांशाने समर्थांच्याही जीवनात घडलेले आढळते. त्यांनी केलेली साक्षात्कारपर्यवसायी साधना रेखीव व योजनाबद्ध आहे. त्यांनी केलेला पारमार्थिक उपदेश तत्त्वज्ञान व प्रत्यक्ष साधना या दोन्ही अंगांनी बावन्नकशी आहे, हे तर त्यांच्या वाङ्मयातून स्पष्ट आहेच. पण त्यांचे व्यक्तिमत्त्व व कार्य या सर्व गोष्टी केवळ अंतर्भूत करीत नाही, तर त्या ओलांडून आणखी फारच पुढे गेलेले दिसते.

निर्भय, विजिगीषु, सदाचारी व संघटित असा सामर्थ्यसंपन्न समाज घडविणे, हे त्यांच्या प्रयत्नांचे महत्त्वाचे लक्ष्य आहे आणि यासाठी जे जे करणे आवश्यक व शक्य आहे ते ते त्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा करून केलेले दिसते. मुळात त्यांच्या स्वत:च्या चिंतनाची, स्वभावाची व लोकव्यवहाराची बैठक त्यांनी जागरूकपणे या ध्येयासाठी अनुकूल ठेवलेली दिसते. त्यांच्या विचार, उच्चार व आचारामध्ये कुठेही विसंगती आढळत नाही. या व्यक्तिमत्त्वाच्या बैठकीवरून त्यांनी या दिशेने केलेले समाजप्रबोधन यशस्वी न होते तर नवल! पण केवळ वैयक्तिक आचरण व समाजप्रबोधन यावरच ते थांबले नाहीत. **'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे'** असे आवर्जून सांगणारा हा विरक्त महात्मा पराकोटीचा क्रियाशील भक्त होता. त्यांच्या या क्रियाशीलतेतून अनेक श्रीराममंदिरे, गावोगावी हनुमानमंदिरे व भारताच्या जवळपास सर्व प्रांतांतून सुमारे ११०० मठांची स्थापना झाली. मठांची ही संख्या आलंकारिक व थोड्याफार फरकाचीही असू शकली, तरी व सात-आठशे इतकीही धरली तरी ती थक्क करणारी आहे.

समर्थस्थापित हे मठ केवळ पूजापाठ व जपजाप्य करण्याची स्थाने नव्हती. ती तेजस्वी संस्कारकेंद्रे होती. सनातन धर्माचे ज्ञानदान, सदाचाराचा व भक्तिभावाचा संस्कार यांसह पुरुषार्थाची प्रेरणा व बलोपासना यासाठी प्रत्येक मठात मारुतिरायांच्या मंदिरांसह ग्रंथसंग्रह व व्यायामशाळा आवर्जून असत. परंपरागत तेजस्वी भिक्षा-पद्धतीच्या माध्यमाने समर्थांनी हे मठ स्वावलंबी व समाजाभिमुख ठेवले. महंतांची लक्षणे व मठपतींना दिलेल्या सूचना हे स्पष्ट करतात की, या मठांचे संचालक स्वत: त्यागी पण संसाराशी अविरोधी राहून सांस्कृतिक प्रवाह जनजीवनात प्रवाहित ठेवणारे लोकशिक्षक असावेत हे अभिप्रेत होते. या मठांची परस्पर-संपर्क शृंखलाही होती व याचा उपयोग छत्रपती शिवाजीमहाराज व शंभूराजे यांना आग्र्याहून रायगडी सुरक्षित पोहोचण्यासाठीच केवळ झाला नाही, तर एरवीही स्वराज्यस्थापनेच्या कार्यासाठी आवश्यक तेव्हा अनुकूल असा तो होत गेला. स्वराज्यासाठी अनुकूल व पोषक जनमानस तयार करण्यात समर्थकार्याचा त्यांच्या मठ-मंदिर-महंतांचा फार मोठा वाटा आहे. भक्तिप्रधान अध्यात्मोपदेशाने सहिष्णू बनलेल्या समाजाच्या अंत:करणात जयिष्णुतेचे स्फुल्लिंग चेतविणे व ते धगधगते ठेवणे हे समाजाचे मानसिक परिवर्तन व्यापक प्रमाणांत घडविणे हे महत्त्वाचे व अवघड कार्य समर्थांकडून पार पडले. विजयाची आकांक्षा निर्माण झाली, आशा पल्लवित

झाली व स्वराज्याचा उष:काल दृष्टिपथात आला. यासाठी आवश्यक ती समाजमनाची मशागत समर्थांनी रात्रंदिवस खपून केली.

## शिवसमर्थयोग

श्रीसमर्थांच्या सद्‌भाग्याची फार मोठी जमेची बाजू ही की, याचवेळी त्यांना अभिप्रेत असलेला प्रभू रामचंद्रांचा पराक्रमी धर्मनिष्ठ जीवनादर्श ज्यांच्या व्यक्तिमत्त्वात पूर्ण प्रतिबिंबित झालेला दिसावा असे छत्रपती शिवाजीमहाराज स्वराज्यसंस्थापनेच्या कार्यात स्वयंप्रेरणेने गढून गेलेले होते. महाराष्ट्राच्या पुण्यभूमीवर एकाचवेळी कार्यरत असलेल्या या दोन्ही महापुरुषांच्या प्रेरणा स्वयंभू पण परस्परपूरक होत्या. दोन समांतर रेषांप्रमाणे विभिन्न क्षेत्रांतून पण एकाच दिशेने एकाच ध्येयासाठी दोघांची वाटचाल होती. श्री समर्थ व श्री शिवछत्रपती यांचा गुरु-शिष्यसंबंध पारमार्थिक उपासनेसाठी मंत्रदीक्षा-अनुग्रहापुरताच केवळ नाही. दोघांची धर्मरक्षणाच्या ध्येयाबद्दलची एकरूपता, दोघांची अखंड कर्मशील प्रयत्नवादी प्रवृत्ती, दोघांची वैयक्तिक सुखाबद्दलची उदासीनता आणि कार्यांतील सावधानता व शिस्तप्रियता, दोघांचा परस्परांसंबंधी कमालीचा आदरभाव व विश्वास यांचा साकल्याने विचार केला तर जणू एकच चेतना दोन विभिन्न देहांच्या माध्यमाने परस्परपूरक कार्यात मग्न असलेली जाणवते. खरा गुरु-शिष्यसंबंध असा असतो. पारमार्थिक संतमहात्म्यांकडे दर्शनासाठी श्रद्धेने जाऊन त्यांचे आशीर्वाद घेणे वेगळे व दोघांच्या जीवनदृष्टीत इतकी एकरूपता-एकजीवता प्रतीत होणे वेगळे. श्री शिवछत्रपतींचा असा अद्वयत्वसंबंध श्री समर्थांशी असलेला दिसून येतो. महाभारतातील श्रीकृष्णार्जुनाप्रमाणे दोघे स्वयंभू असूनही परस्पर समरस होऊन स्वधर्मरक्षणार्थ स्वराज्यस्थापनेचे कार्य करीत होते. हा शिवसमर्थयोग म्हणजे क्षात्रतेज व ब्राह्मतेज या दोन्हींचा संगम! हाच महाराष्ट्र धर्माचा प्राण व यानेच समाजाचे खरे परित्राण!

## अद्वितीय धर्माचार्य

समर्थांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध अंगांचे दर्शन घेताना हे जाणवते की, त्यांना अलीकडच्या संत-महात्म्यांच्या व्यक्तित्वाच्या ठराविक चौकटीत बसविता येणे शक्य नाही. कारण इतक्या विविध पैलूंचे दर्शन अन्यत्र होत नाही. अन्य कोणाही संत-सत्पुरुषाने जे काही सांगितले, ते सर्व समर्थांच्या उपदेशात गवसतेच. पण असेही पुष्कळ आहे की, जे अन्य कोणी संतांनी सांगितलेले नाही, पण समर्थ वाङ्मयात आढळते. निखळ पारमार्थिक उपदेशाव्यतिरिक्त वैयक्तिक व सामाजिक हितासाठी समर्थांनी बराच व्यावहारिक उपदेश केला आहे. म्हणून जर कुणी त्यांना राजकारणी संत म्हणत असतील, तर ते त्यांचे दूषण नसून, भूषण आहे व टीकाकारांच्या अपरिपक्वतेचे द्योतक आहे.

धर्म ही संकल्पना केवळ पारमार्थिक नाही. अभ्युदय म्हणजे ऐहिक उन्नती व नि:श्रेयस म्हणजे पारमार्थिक सद्‌गती ही दोन्ही धर्माची अंगे परंपरागत शास्त्रकारांनी मानली आहेत. त्यामुळे खऱ्या परिपूर्ण धर्माचार्याकडून दोनही बाबतींत मार्गदर्शन अपेक्षित असले पाहिजे. भगवान वेदव्यास, देवर्षी नारद, महर्षी वसिष्ठ-विश्वामित्र, अगस्त्य ही अशी श्रेष्ठांची नामावली आहे की, जे मानव-जीवनाच्या या दोन्ही अंगांचे केवळ ज्ञातेच नव्हते, तर मानवाच्या सुख-शांतीसाठी राजकीय सत्ताही योग्य व्यक्तीच्या हाती असावी, यासाठी सक्रिय प्रयत्नशील राहिले होते. समाजजीवनाला राजनीती अत्यंत प्रभावित करते. म्हणून तर महाभारतकारांनी **'सर्वे धर्मा: राजधर्मप्रधाना:'** व **'राजा कालस्य कारणम्'** असे म्हटले आहे. श्री ज्ञानेश्वर महाराजांनी तर 'धर्मसंस्थापना' शब्दाचा अर्थच राजनीतीला धर्माची जोड देणे असा केला आहे. वर उल्लेखिलेल्या सर्व महापुरुषांनी यासाठी प्रयत्न केलेले दिसतात. समर्थांनीही तसे केले असल्याने ते या महापुरुषांच्या पंक्तीत बसून अधिक अभिनंदनीय ठरतात. सज्जन व गड हे दोन शब्द त्यांनी पहिल्यांदा एकत्र आणले असले तरी या दोन्हींच्या साहचर्यानेच समाजाचा उत्कर्ष आहे ही धारणा प्राचीन ऋषींची आहे. समर्थांना राजकारणी संत म्हणून कमी लेखण्यापेक्षा त्यांच्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे मोजमाप करण्यासाठी आपण लावत असलेला मानदंड अपुरा पडतो आहे, हे लक्षात घेऊन आपली दृष्टी प्रगल्भ करण्याची आवश्यकता आहे, हे ज्याला कळेल तो शहाणा. पूर्वग्रहदूषित संकीर्ण मानसिक चौकटीत या प्रभंजनाला कोंबण्याचा प्रयत्न विवेकी लेखकांना शोभनीय नाही.

समर्थांनी प्रयुक्त केलेल्या राजकारण शब्दाचाही नीट विचार होणे अगत्य आहे. आपल्याला अभिप्रेत असलेल्या अर्थांना समर्थांच्या माथी मारण्यापेक्षा त्यांनी विविध संदर्भात ज्या आशयाने तो शब्द योजिला तो आशय शोधला तर केवळ आधुनिक पॉलिटिक्स म्ह. सत्ताकारण किंवा चातुर्य या शब्दांच्या पलीकडे जावे लागते. दासबोधाचा अकरावा दशक मुख्यत: व्यक्तिमत्त्व-विकासावर प्रकाश टाकणारा आहे. त्यात राजकारण याचा अर्थ लोकव्यवस्थापकीय संघटनकौशल्य (Managerial Team-organising skill) असा घेणे अधिक इष्ट आहे. व्यवस्थितपणा हे समर्थांचे खास वैशिष्ट्य आहे. मुख्यत: या अर्थाने या शब्दाकडे बघितल्यास तो ज्याप्रमाणे जीवनाच्या अन्य क्षेत्रांतील लोकव्यवस्थापनास लागू पडेल, त्याप्रमाणे राजनीतीतील लोकव्यवस्थापनासही पडू शकेल. पण तो तेवढ्यापुरता मर्यादित असणार नाही.

लोकव्यवस्थापन हे कुठल्याही संस्थेचे वा संघटनेचे महत्त्वाचे अंग आहे व समर्थांनी सांगितलेले '**तिसरे ते सावधपण। सर्व विषयी॥**' हे तर धर्माचे मर्मच आहे. महाभारतात यक्षाने विचारले, 'धर्मराज, एका शब्दात धर्माचे स्वरूप काय?', (**किंस्विदेकपदं धर्म्यम्**) याचे उत्तर धर्मराजाने दिले आहे, '**दक्षता**' म्हणजेच सावधानता हे एका शब्दात सांगितलेले धर्माचे स्वरूप आहे. (**दाक्ष्यम् एकपदं धर्म्यम्**) सावधानतेचे धर्मदृष्ट्या इतके महत्त्व आहे. वस्तुत: समर्थ केवळ धर्मकारणी आहेत. त्यांच्या प्रसिद्ध चतु:सूत्रीतील हरिकथा-निरूपण, राजकारण, सावधपण, व स्वकर्म उद्योगशीलता ही सर्व खऱ्या धर्मपालनाची अंगे आहेत. या संपूर्ण धर्मकारणाविषयी समर्थांनी केलेले मार्गदर्शन एका महाभारताखेरीज अन्यत्र कुठेही नाही.

समर्थांनी अंधश्रद्धा, आळस व गबाळेपणा यांचे वाभाडे काढले आहेत. दैववादाला कुठेही स्थान न देता सर्वदा उत्कट प्रयत्नवाद मांडला. पारमार्थिक परंपरेचे अंध गतानुगतिक होऊन स्त्रीदेहाची निंदा त्यांनी आपल्या वाङ्मयात एका शब्दानेही केली नाही. महिलांना प्रबुद्ध करून अनुग्रह देण्याचा अधिकारच केवळ दिला नाही, तर मठपतीही बनविले. साडेतीनशे वर्षांपूर्वी विधवा वेणाबाईंना कीर्तनासाठी उभे केले. धर्मशास्त्र, भक्तिशास्त्र, योगशास्त्र यांच्यासह समाजशास्त्र, व्यवहारशास्त्र, व्यवस्थापन-संघटन-शास्त्र, राजनीतिशास्त्र इत्यादी अनेक लौकिक विद्यांच्या उपदेशाने समाजजीवन प्रगल्भ केले. बौद्ध, शंकराचार्य व महानुभावपंथीय यांच्या पश्चात् फक्त समर्थांनीच प्रचारक-योजना राबविली व त्यासाठी महाराष्ट्राला केंद्रस्थानी ठेवून भारतभर मठस्थापना केली.

महर्षी वेदव्यासांनी विपुल लेखन केले, पण त्यांना माणसे घडविण्याचे कार्य करावे लागले नाही. देवर्षी नारदांनी लोकजागृतीचे कार्य केले, पण असे विपुल लेखन त्यांच्याकडून झाले नाही. आदिशंकराचार्यांनी धर्माची पुन: संस्थापना केली. पण त्यांना राजनीतीकडे लक्ष द्यावे लागले नाही. आर्य चाणक्यांनी राजनीती केली, अर्थशास्त्रही लिहिले. पण आध्यात्मिक मार्गदर्शनाची अपेक्षा त्यांच्यापासून ठेवता येत नाही. पारतंत्र्याच्या काळातही स्वा. विवेकानंदांनी राजधर्माचा विचार प्रतिपादन केला नाही. योगी अरविंदांनी योगाभ्यास साधला व विपुल लेखन केले. पण समर्थांसारखा सर्वत्र संचार त्यांच्या जीवनकार्याचे अंग नव्हते. मला तर इतिहासात समर्थांसारखे अन्य व्यक्तिमत्त्व दिसत नाही. कुणी दाखवून दिल्यास मान्य करावयास माझी हरकत नाही.

महाराष्ट्रीय भागवत धर्ममंदिराचा पाया, संतसम्राट श्री ज्ञानेश्वर महाराजांनी रचला. संत तुकाराममहाराज हे त्या मंदिराचा कळस म्हणून शोभायमान झाले तर, समर्थ रामदासस्वामी त्या मंदिरावर फडकणारा प्रेरणादायी पवित्र ध्वज ठरले आहेत. '**तुका झालासे कळस। ध्वज होई रामदास॥**' हे एकजिनसी अभंग भव्य भागवतधर्म-मंदिर महाराष्ट्र संस्कृतीचा प्राण व वैदिक संस्कृतीची शान आहे.

## ग्रंथराज दासबोध

विविधांगी धर्मकार्य करीत असताना वेळोवेळी समर्थ रामदास स्वामींकडून विपुल लेखन होत गेले. त्यांच्या या अफाट ग्रंथरचनेमध्ये दासबोध, मनाचे श्लोक, रामायण, आत्माराम, करुणाष्टके, जुना दासबोध (एकवीस समासी), स्फुट प्रकरणे, स्फुट श्लोक, अष्टाक्षरी पाच लघुकाव्ये, चौदा ओवीशते, स्फुट ओव्या, अवांतर व प्रासंगिक प्रकरणे, विविध आरत्या, सवाया, अभंग, पदे, ललिते, मानसपूजा इत्यादींचा समावेश होतो. या सर्व वाङ्मयात दासबोध हा समर्थांचा प्रमुख ग्रंथ मानला जातो. त्याचे महत्त्व तसे आहेही. श्री समर्थांनी हा ग्रंथ स्वमुखे

सांगितला आणि त्यांचे शिष्योत्तम श्री कल्याणस्वामी यांनी तो लिहून घेतला असे म्हटले जाते. अर्थात हा एकटाकी सलगपणे लिहून पूर्ण झालेला ग्रंथ नाही. वेळ मिळेल त्याप्रमाणे त्याचे लेखन व अनेकवार संपादन झाले आहे. अनेक वर्षांच्या परिश्रमाने उपलब्ध रूपात पूर्णत्व पावलेल्या या ग्रंथात एकूण वीस दशक असून, प्रत्येक दशकात दहा समास म्हणजे एकूण सर्व मिळून दोनशे समासांचा हा ग्रंथराज आहे.

त्यावेळच्या प्रचलित प्रथेप्रमाणे दासबोध ग्रंथ ओवी या गेयछंदात निबद्ध असला तरी याकडे काव्यग्रंथ म्हणून बघता येत नाही. माझ्या दृष्टीने श्री समर्थांचे विविध विषयांवरील ओघवत्या भाषेतील हे निबंध होत. चतुर्दश ब्रह्म, विमल ब्रह्म, माया, शुद्ध ज्ञान, सृष्टिविचार, द्वैत कल्पना निरसन, त्रिविध ताप, सत्त्व, रज, तमोगुण-विचार, नवधा भक्ती, वैराग्य, गुरुलक्षण, शिष्यलक्षण, विरक्तलक्षण, मूर्खलक्षण, पढतमूर्खलक्षण, चातुर्यलक्षण, बद्ध-मुमुक्षु-साधक-सिद्ध लक्षणे, प्रकृति-पुरुषविचार, चत्वार देव निरूपण, विवेक निरूपण, महंतलक्षण, राजकारण, नि:स्पृहता, कथा-कीर्तन, उपासना, आत्माराम, उत्तम पुरुष, जनस्वभाव, बुद्धिवाद, प्रयत्नवाद , लेखनकला इत्यादी विविध विषयांचा सखोल ऊहापोह या ग्रंथात झालेला दिसतो.

तत्त्वज्ञानानुसार जगद्गुरू आदिशंकराचार्य, संतसम्राट श्री ज्ञानेश्वर महाराजादी भागवतधर्मीय सर्व संत व श्री समर्थ रामदास स्वामी या सर्वांचा अद्वैत सिद्धांतच आहे व मांडणीतील तपशीलाचा फरक वगळता सर्वांची सैद्धांतिक एकरूपता आहे. हे अद्वैत तत्त्वज्ञान व भक्तिमार्गी साधनापद्धती याखेरीजही कितीतरी विषयांचा दासबोधात समावेश झालेला वरील सूचीवरून दिसून येतो आणि व्यवहाराच्या पहिल्या पायरीपासून परमार्थाच्या शेवटच्या स्थितीपर्यंत सर्व काही यात समाविष्ट झाले आहे, असे म्हटल्यावाचून राहवत नाही. एकूणच समर्थांनी जितक्या विविध विषयांवर लेखन केले आहे, तितक्या विषयांवर महर्षी वेदव्यासांखेरीज अन्य कोणीही लिहिलेले नाही, असे जाणकारांचे मत आहे.

**'येथे बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥'** असे समर्थांनीच ग्रंथाच्या आरंभी म्हटलेले असल्यामुळे या ग्रंथाचा मुख्य विषय भगवद्भक्ती हा आहे हे स्पष्टच आहे. समर्थांचा स्थायीभाव प्रामुख्याने दास्यभक्ती हा असल्यामुळे प्रभू रामचंद्रांच्या दासाने आपल्या शिष्यांना केलेला बोध म्हणजे उपदेश हा तर दासबोध शब्दाचा अर्थ आहेच, पण श्रीरामाचे दास्य करणाऱ्या भक्तांना केलेला उपदेश असाही याचा अर्थ आहे. या ग्रंथातील व संप्रदायातील भक्ती ही शंकराचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानावर उभी आहे आणि भागवतातील भक्तिप्रक्रियांनी ती अलंकृत आहे. या भक्तीचा प्रपंचाशी केवळ अविरोधच नाही तर प्रपंच नेटका करण्याचा आग्रह आहे. उत्कट भक्तीने परमार्थ कसा करावा याचे जसे मार्गदर्शन यात आहे तसे दक्षतेने प्रपंच कसा यशस्वी करावा याचीही सर्व सूत्रे या ग्रंथात उपलब्ध आहेत. प्रपंच असो वा परमार्थ, दोन्ही आघाड्यांवर समर्थ प्रयत्नवादाचे प्रखर पुरस्कर्ते व दैववादाचे खंडनकर्ते आहेत. 'यत्न तो देव जाणावा' असे म्हणून त्यांनी प्रयत्नवादाला परमेश्वरी स्तरावर मान्यता दिली व 'अचूक यत्न करावा' असे म्हणून प्रयत्नवादाचे मर्मही सांगितले. विवेक व वैराग्य हे समर्थ-विचारांचे प्रिय सांगाती असून, प्रयत्न, प्रचीती व प्रबोध या त्रिसूत्रीने या ग्रंथात समग्र मानव जीवनाचे विज्ञानच साकार केले आहे.

## अभिनंदन

या ग्रंथराज दासबोधाचा आदरणीया डॉ. श्रीमती कमलताई बा. वैद्य यांनी केलेला प्रस्तुत अर्थ मला फार महत्त्वाचा वाटतो. ब्र. प. प. पूज्य स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती महाराज यांच्याकडून त्यांना श्रीरामोपासनेचा अनुग्रह प्राप्त झाला. पू. स्वामीजींनी गोस्वामी तुलसीदासांच्या 'रामचरितमानस' म्हणजे तुलसीरामायण या प्रसिद्ध ग्रंथावर लिहिलेली सुमारे सहा हजार पृष्ठांची टीका हिंदी भाषी विद्वानांनी आदराने गौरविली व गीताप्रेसने प्रकाशित केली आहे. एका मराठी भाषिक साहित्यिकाने हिंदी भाषेत इतके मौलिक कार्य करावे, हे अपूर्व व महाराष्ट्र सारस्वतास गौरवास्पद आहे. या थोर सत्पुरुषाच्या अंतेवासी राहून त्यांची सेवा करण्याचे सद्भाग्य श्रीमती कमलताईंना अनेक वर्षे मिळाले व श्रीरामभक्ति-साहित्याकडे बघण्याची विमल दृष्टी लाभली.

स्वत: कमलताईंनी एकनाथी भागवताचे संशोधन करून पीएच.डी. पदवी संपादन केलेली असल्यामुळे संत साहित्याकडे बघण्याचा विद्यापीठीय चिकित्सक दृष्टिकोन व भाषासमृद्धी यांनीही प्रस्तुत गद्यानुवाद अलंकृत

आहे. प्रभू रामरायाची भगिनीभावाने उत्कट भक्ती दीर्घकाळ करता करता त्यांना गुरुकृपेने प्राप्त झालेली भावावस्था हे तर त्यांचे अत्यंत मौल्यवान लेणे आहे. अशा प्रकारे वाङ्मयीन बौद्धिक तयारी, उत्कट साधना व पूर्ण गुरुकृपा यांचा हा त्रिवेणी संगम दासबोध-गद्यार्थाचा त्यांचा श्रेष्ठ अधिकार सिद्ध करतो. हा अर्थ सुबोध, सुरस व संदेहनिवारक झाला आहे याची वाचकांना प्रचीती येईल. वृद्धापकाळात व विकलांग अवस्थेत त्यांच्याकडून ही इतकी मोठी लेखनसेवा घडली, ही खरोखरी श्रीसमर्थांचीच कृपा. डॉ. कमलताईंचे मन:पूर्वक अभिनंदन.

गीताप्रेस, गोरखपूर या प्रकाशन संस्थेचे अभिनंदन करण्यासाठी पुरेसे योग्य शब्दच नाहीत. भौतिक झगमगाटाच्या या काळात आध्यात्मिक, धार्मिक व सांस्कृतिक साहित्याचे प्रचंड प्रमाणात प्रकाशन करून व अत्यंत स्वल्प मूल्यात ती वितरित करून सुमारे पाउण शतक या संस्थेने आपल्या संस्कृतीची अजोड सेवा केली आहे. गेल्या दशकापासून राष्ट्रभाषा हिंदीसह विभिन्न प्रादेशिक भाषेतील संत वाङ्मयाचे प्रकाशन सुरू करून तर त्यांनी अखिल भारतीय भाविकांना उपकृत केले आहे. व्यावसायिक दृष्टिकोण न ठेवता केलेल्या त्यांच्या या सांस्कृतिक सेवेला संपूर्ण देशाच्या वाङ्मय-प्रकाशकीय इतिहासात तोड नाही.

श्रीमत्दासबोधाची ही आवृत्ती सुबक, सुंदर व दर्जेदार ठरणार याबद्दल मला शंका नाही. महाराष्ट्रीय संतवाङ्मय प्रकाशनाच्या या महत्कार्याबद्दल मराठी जनतेच्या वतीने मी गीताप्रेसचे मन:पूर्वक आभार मानतो व हार्दिक अभिनंदन करतो. त्यांच्या या परिश्रमाचे चीज होण्यासाठी प्रत्येक मराठी वाचकाने हा ग्रंथराज आपापल्या घरी आदराने विराजमान करावा. प्रत्येक सुबुद्ध भाविकाने याचे पारायण-वाचन-चिंतन करून आपले व आपल्या कुटुंबाचे कल्याण साधावे. प्रत्येक जागरूक संस्कृतिप्रेमी नागरिकाने आपल्या समाजाची पुढील पिढी तेजस्वी करण्यासाठी या ग्रंथाचा सर्वत्र प्रचार करावा, ही विज्ञापना इति.

न्यूयॉर्क (अमेरिका)
संत नामदेव पुण्यतिथी
दि. २३ जुलै, २००६

**श्री ज्ञानेश्वरपदाश्रित,**
**स्वा. गोविंददेव गिरि**
**(आचार्य किशोर व्यास)**

❑ ❑

भगवान् श्रीमत् प. प. श्रीधरस्वामिविरचित

## ॥ श्रीमद्दासबोधतत्त्वस्तवः ॥

**'दासस्त्वं भव रामस्य भवपारं स नेष्यति'**
**भवसेतुरिवाभाति दासबोधः प्रबोधयन्॥ १ ॥**

'तू श्रीरामांचा दास हो, म्हणजे ते तुला संसारसागरातून पैलतीराला (मोक्षाला) नेतील,' असा उपदेश करणारा दासबोध जणू संसारसागरावरील पूल असल्यासारखा वाटतो. (१)

**'सर्वं हि पूरयत्येष श्रीरामो दासवांछितम्'**
**चिन्तामणिरिवाभाति दासबोधः प्रबोधयन्॥ २ ॥**

'हे श्रीराम भक्तांच्या सर्व कामना पूर्ण करतात' असा उपदेश करणारा दासबोध चिंतामणीसारखाच आहे. (२)

**'सर्वप्रकारकं दास्यं रामदास्येन नश्यति।'**
**स्वातन्त्र्यभाः प्रभातीत्थं दासबोधः प्रबोधयन्॥ ३ ॥**

'श्रीरामांची सेवा केल्याने सर्व प्रकारची (प्रपंचाची) गुलामगिरी नष्ट होते,' असा उपदेश करणारा दासबोध स्वातंत्र्याचा जणू प्रकाश असल्यासारखा वाटतो. (३)

**'पापं तापं च दैन्यं च रामदास्येन नश्यति'**
**इत्येवं बोधयन् भाति दासबोधः सतां गतिः॥ ४ ॥**

'श्रीरामांच्या भक्तीने पाप, ताप आणि दैन्य नाहीसे होते,' असे सांगणारा दासबोध सज्जनांचा परम आश्रय आहे, असे आढळते. (४)

**'प्रपंचः परमार्थश्च रामदास्येन सिध्यति'**
**देहलीदीपवद्भाति दासबोधः प्रबोधयन्॥ ५ ॥**

'प्रपंच आणि परमार्थ श्रीरामभक्तीने साध्य होतो,' असा उपदेश करणारा दासबोध उंबरठ्यावरील दिव्यासारखा भासतो. (५)

**'वासनाजालनिर्मोकः रामदास्येन सम्भवेत्'**
**भवाब्धिनौरिवाभाति दासबोधः प्रबोधयन्॥ ६ ॥**

'श्रीरामांच्या सेवेने सर्व वासना नष्ट होतात,' असे सांगणारा दासबोध भवसागरातील नावेसारखा शोभतो. (६)

**'स्वाराज्यं च स्वराज्यं च रामदास्येन लभ्यते'**
**भातीत्थं बोधयन् नित्यं दासबोधः सुरद्रुमः॥ ७ ॥**

'श्रीरामांच्या सेवेने आत्मराज्य व स्वराज्य दोन्हीही मिळते,' असे आश्वासन देणारा दासबोध नेहमी कल्पवृक्षासारखा भासतो. (७)

**'श्रीसमर्थसमस्त्वं स्या रामदास्येन पावनः'**
**स्पर्शोपल इवाभाति दासबोधः प्रबोधयन्॥ ८ ॥**

'श्रीरामांच्या भक्तीने तूही श्रीरामदास स्वामींसारखा पावन हो,' असे सांगणारा दासबोध परिसासारखा आहे. (८)

**'तवात्मा ब्रह्मरामोऽयं स त्वमेव त्वमेव सः'**
**महावाक्यमिवाभाति दासबोधः प्रबोधयन्॥ ९ ॥**

'तुझा आत्मा ब्रह्मरूप रामच आहे, तो तूच आहेस व तूच तो आहे,' असा उपदेश करणारा दासबोध 'महावाक्यांसारखा' शोभतो. (९)

**'दासोपि रामदास्येन रामस्त्वं त्वमृतो भवेः'**
**इति प्रबोधयन् भाति दासबोधामृतं महत्॥ १० ॥**

'श्रीरामभक्तीने तू दास असलास तरी अमृतरूप रामच होशील,' असा उपदेश करणारा दासबोध श्रेष्ठ अमृत असल्यासारखा वाटतो. (१०)

**दासबोधश्चिदादित्यो यत्र कुत्रापि वा स्थितः**
**अज्ञानतिमिरं शीघ्रं नाशयन् काशतेऽनिशम्॥ ११ ॥**

चैतन्यसूर्यासारखा असणारा दासबोध कोणाकडेही असला, तरी त्याचा अज्ञानांधकार तत्काळ नाहीसा करीत अखंड प्रकाशत राहील. (११)

**—श्रीधरस्वामी**

❑❑

## श्रीदासबोध-पठन-पारायण-पद्धती

सकाळी स्नान करून धुतलेले वस्त्र नेसून आसनावर बसावे. समोर व्यासपीठ ठेवून त्यावर ग्रंथ ठेवावा. आचमन, प्राणायाम करून पठनाचा किंवा पारायणाचा संकल्प करावा. नंतर ग्रंथाची अष्टगंध, फुले वाहून उदबत्ती, नीरांजन ओवाळून व प्रदक्षिणा-नमस्कार करून पूजा करावी. नंतर पुढील श्लोक म्हणावे.

**गणेशः शारदा चैव सद्गुरुः सज्जनस्तथा।**
**आराध्यदैवतं गुह्यं सर्वं मे रघुनंदनः॥ १॥**

**गणेश शारदा सद्गुरू। संत सज्जन कुळेश्वरू।**
**सर्वहि माझा रघुवीरू। सद्गुरुरूपें ॥ २॥**
**माझें आराध्यदैवत। परम गुह्य गुह्यातीत।**
**गुह्यपणाची मात। न चले जेथें॥ ३॥**

यो जातो मरुदंशजः क्षितितले संबोधयन् सज्जनान्
ग्रंथं यो रचयन् सुपुण्यजनकं श्रीदासबोधाभिधम्।
यः कीर्त्या पठनेन सर्वविदुषां स्वांतापहारी सदा
सोऽयं मुक्तिकरः क्षितौ विजयते श्रीरामदासो गुरुः॥ ४॥

मला वाटते अंतरीं त्वां वसावें। तुझ्या दासबोधासि त्वां बोधवावें।
अपत्यापरी पाववी प्रेमग्रासा। महाराजया सद्गुरु रामदासा॥ ५॥

ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि॥ ६॥

गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः।
गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ७॥
अनेन प्रीयतां देवो भगवान् जानकीपतिः।
श्रीरामचंद्रः पूर्वेषामस्माकं कुलदैवतम्॥ ८॥

*॥ श्रोता वक्ता श्रीराम समर्थ। जय जय रघुवीर समर्थ॥*

यानंतर श्रीमनाचे श्लोक नित्य व क्रमाने १३ म्हणून श्रीमद्दासबोधाचे वाचन करावे.

श्रीमत् दासबोधाचे नित्याचे/पारायणाचे वाचन झाल्यावर त्यापुढील समासाची पहिली ओवी वाचावी.

त्यानंतर दासबोधाच्या शेवटच्या १२ ओव्या वाचाव्या. संपूर्ण पारायणानंतर ग्रंथातील पहिली ओवी वाचावी. त्यानंतर श्रीमत् दासबोधाची आरती म्हणावी. आरतीनंतर पुढील श्लोक म्हणावे.

सदा सर्वदा योग तूझा घडावा। तुझे कारणीं देह माझा पडावा।
उपेक्षूं नको गुणवंता अनंता। रघूनायका मागणें हेंचि आतां॥
सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा। उडी घालितो संकटीं स्वामि तैसा।
हरीभक्तिचा घाव गाजे निशाणीं। नुपेक्षी कदा रामदासाभिमानी॥
मुखीं राम त्या काम बाधूं शकेना। गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना।
हरीभक्त तो शक्त कामासि मारी। जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी॥

हनुमंत आमुची कुळवल्ली। राममंडपा वेली गेली।
श्रीरामभक्तीनें फळली। रामदास बोले या नांवें॥ १॥
आमुचे कुळीं हनुमंत। हनुमंत आमुचें मुख्य दैवत।
तयावीण आमुचा परमार्थ। सिद्धितें न पवे सर्वथा॥ २॥
साह्य आम्हांसी हनुमंत। आराध्यदैवत श्रीरघुनाथ।
श्रीगुरु श्रीरामसमर्थ। काय उणें दासासी॥ ३॥
दाता येक श्रीरघुनंदन। वरकड लंडी देईल कोण।
तया सोडोन आम्ही जन। कोणाप्रति मागावें॥ ४॥
म्हणोनि आम्ही रामदास। श्रीरामचरणीं आमुचा विश्वास।
कोसळोनि पडो हें आकाश। आणिकाची वास न पाहूं॥ ५॥

स्वरूपसांप्रदाय अयोध्यामठ । जानकीदेवी श्रीरघुनाथदैवत ।
मारुती उपासना नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासीं ॥ ६ ॥
स्वधामासि जातां महारामराजा । हनूमंत तो ठेविला याचि काजा ।
सदासर्वदा रामदासांसि पावे । खळीं गांजितां ध्यान सांडोनि धावे ॥ ७ ॥

आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् । लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ॥

नमो आदि बोधात्मरूपा परेशा । नमो हंस नारायणा निर्जरेशा ।
नमो ब्रह्मदेवा वसिष्ठा श्रीरामा । नमो मारुती रामदासाभिरामा ॥

ध्यान करूं जातां मन हारपलें । सगुणीं जाहलें गुणातीत ॥ १ ॥
जेथें पाहे तेथें राघवाचें ठाण । करीं चापबाण शोभतसे ॥ २ ॥
राम माझे मनीं राम माझे ध्यानीं । शोभे सिंहासनीं राम माझ्या ॥ ३ ॥
रामदास म्हणे विश्रांति मागणें । जीवीचें सांगणें हितगुज ॥ ४ ॥
शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें । वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ॥
कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा । नमस्कार माझा सद्गुरु रामदासा ॥

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥
॥ सद्गुरु समर्थ रामदास स्वामीमहाराज की जय ॥
॥ महारुद्र हनुमान की जय ॥
॥ श्रेष्ठ गंगाधर स्वामी महाराज की जय ॥
॥ भगवान सद्गुरु श्रीधरस्वामी महाराज की जय ॥
॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

यानंतर आचमन करून ग्रंथाला साष्टांग नमस्कार घालून उठावे.

दररोज वाचनाचा नियम असल्यास किमान दोन समास वाचावे. कमी जास्त न करता समासवाचनसंख्या नियमित ठेवावी. प्रत्येक ओवी वाचून झाल्यावर 'श्रीराम' म्हणावे.

साप्ताहिक पारायण पद्धतीत पहिल्या दिवशी तीन दशक, दुसऱ्या दिवशी चार ते सहा दशक, तिसऱ्या दिवशी सात व आठ दशक, चौथ्यापासून सातव्या दिवसापर्यंत दररोज तीन दशक वाचावे. तसेच दररोज दासबोध वाचनानंतर मनाचे १३ श्लोक क्रमाने वाचून सातव्या दिवशी उरलेले पूर्ण वाचावेत. संपूर्ण पारायणानंतर दासबोधाची पहिली ओवी व पहिला मनाचा श्लोक वाचावा.

❑ ❑

## ॥ आरती मनोबोधाची ॥

वेदांचें जें गुह्य शास्त्रांचें जें सार । प्राकृत शब्दांमाजी केला विस्तार।
कर्म उपासना ज्ञान गंभीर । ज्याच्या मननमात्रें आत्मा गोचर॥ १ ॥
जयदेव जयदेव जय मनोबोधा ।
पंचप्राणें आरती तुज स्वात्मशुद्धा॥ धृ॥
दोन शतें पांच श्लोक हें जाण । श्रवणें अर्थें साधक पावति हे खूण।
परमार्थासी सुलभ मार्ग हा पूर्ण । यशवंत सद्गुरु दासाचा प्राण॥ २ ॥

❑ ❑

## ॥ आरती दासबोधाची ॥

वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला । श्रुति शास्त्रग्रन्थ गीता साक्ष संगम केला।
महानुभाव संतजनीं अनुभव चाखीला । अज्ञान जड जीवा मार्ग सुगम जाला॥ १ ॥
जय जया दासबोधा ग्रन्थराज प्रसिद्धा ।
आरति वोवाळीन विमळज्ञान बाळबोध॥ धृ॥
नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी । चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी।
हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी । बद्धचि सिद्ध जाले असंख्यात मानवी॥ २ ॥
वीसहि दशकींचा अनुभव जो पाहे । नित्यनेम विवरितां स्वयें ब्रह्मचि होये।
अपार पुण्य गांठी तरी श्रवण लाहे । 'कल्याण' लेखकाचें भावगर्भ हृदईं॥ ३ ॥

❑ ❑

## ॥ आरती श्री समर्थांची ॥

आरती रामदासा । सदगुरू सर्वेशा । कायावाचा मनोभावें । वोवाळूं परेशा॥ १ ॥
रामदास मूर्तिमंत। रामचंद्र अवतार। कलियुगीं अवतरोनी। केला भक्तांचा उद्धार॥ २ ॥
वैराग्य भक्ति ज्ञान। शांति क्षमा विरक्ती। विवेक सालंकृत। क्षमा दया सर्वभूतीं॥ ३ ॥
सच्चिदानंदघन। रामदास केवळ। दिनकरकृपायोगें। 'रामचंद्र' निर्मळ॥ ४ ॥

॥ श्री रामचंद्रार्पणमस्तु ॥
॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

❑ ❑

॥ श्रीराम समर्थ ॥

॥ श्रीमत् दासबोध ॥

# दशक पहिला : स्तवनाचा

## दशक १ : समास १

### ग्रंथारंभलक्षण

॥ श्रीराम ॥

**श्रोते पुसती कोण ग्रंथ। काय बोलिलें जी येथ।**
**श्रवण केलियानें प्राप्त। काय आहे ॥ १ ॥**

ग्रंथाच्या सुरुवातीलाच श्रोते श्री सद्‌गुरू समर्थ रामदास स्वामींना विचारत आहेत की, आपण जो ग्रंथ सांगणार आहात त्याचे नाव काय आहे, यात काय सांगितले आहे आणि हा ग्रंथ श्रवण केल्याने काय लाभ होणार आहे? (१)

**ग्रंथा नाम दासबोध। गुरुशिष्यांचा संवाद।**
**येथ बोलिला विशद। भक्तिमार्ग ॥ २ ॥**

या प्रश्नावर समर्थ सांगतात की, या ग्रंथाचे नाव दासबोध असून यात गुरुशिष्यांच्या संवादातून भक्तिमार्गाचे स्पष्ट वर्णन करण्यात आले आहे. (२)

**नवविधाभक्ति आणि ज्ञान।**
**बोलिलें वैराग्याचें लक्षण।**
**बहुधा अध्यात्मनिरोपण। निरोपिलें ॥ ३ ॥**

नवविधा भक्तीचे स्वरूप, ज्ञानाची आणि वैराग्याची लक्षणे सांगून, विशेषत: अध्यात्मविद्येचे निरूपण यात केले आहे. (३)

**भक्तिचेन योगें देव। निश्चयें पावती मानव।**
**ऐसा आहे अभिप्राव। इये ग्रंथीं ॥ ४ ॥**

भक्तीच्या योगानेच मनुष्यास निश्चितपणे ईश्वराची प्राप्ती होते, हाच या ग्रंथाचा मुख्य सिद्धांत आहे. (४)

**मुख्य भक्तीचा निश्चयो। शुद्धज्ञानाचा निश्चयो।**
**आत्मस्थितीचा निश्चयो। बोलिला असे ॥ ५ ॥**

मुख्यत: भक्तीचे स्वरूप काय, शुद्ध ज्ञान कशास म्हणावे, आत्मस्थितीची लक्षणे कोणती, याविषयीचे नि:संदेह प्रतिपादन या ग्रंथात केले आहे. (५)

**शुद्ध उपदेशाचा निश्चयो। सायोज्यमुक्तीचा निश्चयो।**
**मोक्षप्राप्तीचा निश्चयो। बोलिला असे ॥ ६ ॥**

या ग्रंथात उत्कृष्ट उपदेश कसा असतो, सायुज्यमुक्ती म्हणजे काय, मोक्षप्राप्ती कशी करून घ्यावी, यांविषयी ठाम मते मांडली गेली आहेत. (६)

**शुद्ध स्वरूपाचा निश्चयो। विदेहस्थितीचा निश्चयो।**
**अलिप्तपणाचा निश्चयो। बोलिला असे ॥ ७ ॥**

शुद्ध स्वरूपस्थिती कशी असते, विदेहावस्था म्हणजे काय, अलिप्तपणा म्हणजेच नि:संगता कशा प्रकारे मिळवावी हे सांगितले आहे. (७)

**मुख्य देवाचा निश्चयो। मुख्य भक्ताचा निश्चयो।**
**जीवशिवाचा निश्चयो। बोलिला असे ॥ ८ ॥**

मुख्य देव कोणता, त्यास कसे जाणावे, जाणता भक्त कसा असतो, जीवशिव यांचे स्वरूप कसे आहे, त्यांच्यात काय भेद आहे, याचे नि:संशय प्रतिपादन करण्यात आले आहे. (८)

**मुख्य ब्रह्माचा निश्चयो। नाना मतांचा निश्चयो।**
**आपण कोण हा निश्चयो। बोलिला असे ॥ ९ ॥**

मुख्य देव म्हणजे परब्रह्म कशास म्हणावे, आपले खरे स्वरूप काय याविषयीची मते ठामपणे सांगून नाना मतांच्या गुंतागुंतीमुळे मनुष्य कसा चक्रावून जातो, हे त्या मतांचे स्वरूप सांगून स्पष्ट केले आहे. (९)

**मुख्य उपासनालक्षण। नाना कवित्वलक्षण।**
**नाना चातुर्यलक्षण। बोलिलें असे ॥ १० ॥**

या ग्रंथात मुख्यत: उपासना कशी करावी, कवित्वाची नाना लक्षणे कोणती आहेत, तसेच चातुर्याची विविध लक्षणे कोणती याचे वर्णन आले आहे. (१०)

मायोद्भवाचें लक्षण। पंचभूतांचें लक्षण।
कर्ता कोण हें लक्षण। बोलिलें असे ॥ ११ ॥

नाना किंत निवारिले। नाना संशयो छेदिले।
नाना आशंका फेडिले। नाना प्रश्न ॥ १२ ॥

ऐसें बहुधा निरोपिलें। ग्रंथगर्भी जें बोलिलें।
तें अवघेंचि अनुवादलें। न वचे किं कदा ॥ १३ ॥

तथापि अवघा दासबोध। दशक फोडून केला विशद।
जे जे दशकींचा अनुवाद। ते ते दशकीं बोलिला ॥ १४॥

नाना ग्रंथांच्या संमती। उपनिषदें वेदांतश्रुती।
आणि मुख्य आत्मप्रचीती। शास्त्रेंसहित ॥ १५ ॥

नाना संमतीअन्वये।
म्हणौनी मिथ्या म्हणतां न ये।
तथापि हें अनुभवासि ये। प्रत्यक्ष आतां ॥ १६ ॥

मत्सरें यासी मिथ्या म्हणती।
तरी अवघेचि ग्रंथ उछेदती।
नाना ग्रंथांच्या संमती। भगवद्वाक्यें ॥ १७ ॥

शिवगीता रामगीता। गुरुगीता गर्भगीता।
उत्तरगीता अवधूतगीता। वेद आणी वेदांत ॥ १८ ॥

भगवद्गीता ब्रह्मगीता। हंसगीता पांडवगीता।
गणेशगीता येमगीता। उपनिषदें भागवत ॥ १९ ॥

इत्यादिक नाना ग्रंथ। संमतीस बोलिले येथ।
भगवद्वाक्यें येथार्थ। निश्चयेंसीं ॥ २० ॥

भगवद्वचनीं अविस्वासे। ऐसा कोण पतित असे।
भगवद्वाक्याविरहित नसे। बोलणें येथींचें ॥ २१ ॥

पूर्ण ग्रंथ पाहिल्याविण। उगाच ठेवी जो दूषण।
तो दुरात्मा दुराभिमान। मत्सरें करी ॥ २२ ॥

अभिमानें उठे मत्सर। मत्सरें ये तिरस्कार।
पुढें क्रोधाचा विकार। प्रबळे बळें ॥ २३ ॥

ऐसा अंतरीं नासला। कामक्रोधें खवळला।
अहंभावें पालटला। प्रत्यक्ष दिसे ॥ २४ ॥

मायेची उत्पत्ती कशी झाली, तिचे लक्षण कोणते, पंचमहाभूतांची लक्षणे कोणती आणि या सर्वांचा कर्ता कोण याविषयीचे विवेचन येथे केले आहे. (११)

नाना कुशंका, नाना संशय, विविध आशंका आणि विविध प्रश्न यांचे समाधानकारक निरसन या ग्रंथात करण्यात आले आहे. (१२)

या प्रकारे यात अनेक विषयांचे निरूपण केले गेले आहे. पण ग्रंथारंभीच त्या सर्वांसंबंधी कसे काय सांगता येईल ?(१३)

तथापि एवढे म्हणता येईल की, हा ग्रंथ वीस दशकांत विभागला गेला आहे व प्रत्येक दशकात दहा समास आहेत. ज्या दशकात जो विषय सांगितला गेला आहे, त्याचे विवरण त्या त्या दशकात केले आहे. (१४)

हा ग्रंथ उपनिषदे, वेदांत, श्रुती तसेच इतरही अनेक ग्रंथांच्या आधारे व मुख्यत: शास्त्रप्रचीती व आत्मप्रचीतीच्या आधारे लिहिला गेला आहे. (१५)

खरे तर अनेक ग्रंथांच्या आधारे हा लिहिला आहे म्हणून यास मिथ्या म्हणता येत नाही. हे तुमच्या प्रत्यक्ष अनुभवाला येणारच आहे. (१६)

जे लोक मत्सराने यास मिथ्या ठरवितात, त्यांच्या हे लक्षातच येत नाही की, असे केल्याने ज्या नाना ग्रंथांच्या व भगवद्वचनांच्या आधारे हा ग्रंथ लिहिला गेला आहे, त्यांनाही ते मिथ्या ठरवीत असतात. (१७)

शिवगीता, रामगीता, गुरुगीता, गर्भगीता, उत्तरगीता, अवधूतगीता तसेच वेद आणि वेदांत, भगवद्गीता, ब्रह्मगीता, हंसगीता, पांडवगीता, गणेशगीता, यमगीता, उपनिषदे, भागवत, तसेच यांसारखेच अनेक ग्रंथ व मुख्यत: भगवद्वचनांच्या आधारेच यातील विषय मांडले गेले आहेत. (१८—२०)

भगवद्वचनास अनुसरूनच येथे विषयप्रतिपादन केले आहे आणि भगवद्वाक्याविषयी अविश्वास ज्यास वाटेल, असा क्षुद्र व हीन कोण बरे असणार आहे ? (२१)

संपूर्ण ग्रंथाचा अभ्यास न करता जो कोणी या ग्रंथात दोष आहेत, असे मानून त्यास नावे ठेवतो, तो केवळ दुरभिमान व हीन मनोवृत्तीमुळे मत्सराधीन होऊनच असे करीत असतो. (२२)

वृथा अभिमानामुळे मत्सर वाटू लागतो व मत्सरामुळे तिरस्कार उत्पन्न होऊन अत्यंत प्रबळ असा क्रोधाचा विकार त्याचे ठिकाणी प्रभाव गाजवू लागतो. (२३)

अशा रीतीने कामक्रोध बळावले, म्हणजे त्यांचे अंतरंग दूषित बनते व अहंकाराने त्याचा स्वभाव बदलल्याचे प्रत्यक्ष दिसून येते. (२४)

**कामक्रोधें लिथाडिला। तो कैसा म्हणावा भला।**
**अमृत सेवितांच पावला। मृत्य राहो ॥ २५ ॥**

**आतां असो हें बोलणें। अधिकारासारिखें घेणें।**
**परंतु अभिमान त्यागणें। हे उत्तमोत्तम ॥ २६ ॥**

**मागां श्रोतीं आक्षेपिलें। जी ये ग्रंथीं काय बोलिलें।**
**नें सकळहि निरोपिलें। संकळीत मार्गे ॥ २७ ॥**

**आतां श्रवण केलियाचें फळ।**
**क्रिया पालटे तत्काळ।**
**तुटे संशयाचें मूळ। येकसरां ॥ २८ ॥**

**मार्ग सांपडे सुगम। न लगे साधन दुर्गम।**
**सायोज्यमुक्तीचें वर्म। ठाईं पडे ॥ २९ ॥**

**नासे अज्ञान दुःख भ्रांती। शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती।**
**ऐसी आहे फळश्रुती। ईये ग्रंथीं ॥ ३० ॥**

**योगियांचें परम भाग्य। आंगीं बाणे तें वैराग्य।**
**चातुर्य कळे यथायोग्य। विवेकेंसहित ॥ ३१ ॥**

**भ्रांत अवगुणी अवलक्षण। तेचि होती सुलक्षण।**
**धूर्त तार्किक विचक्षण। समयो जाणती ॥ ३२ ॥**

**आळसी तेचि साक्षपी होती। पापी तेचि प्रस्तावती।**
**निंदक तेचि वँदूं लागती। भक्तिमार्गासी ॥ ३३ ॥**

**बद्धचि होती मुमुक्ष। मूर्ख होती अतिदक्ष।**
**अभक्तचि पावती मोक्ष। भक्तिमार्गें ॥ ३४ ॥**

**नाना दोष ते नासती। पतित तेचि पावन होती।**
**प्राणी पावे उत्तमगती। श्रवणमात्रें ॥ ३५ ॥**

**नाना धोके देहबुद्धीचे। नाना किंत संदेहाचे।**
**नाना उद्वेग संसाराचे। नासती श्रवणें ॥ ३६ ॥**

**ऐसी याची फलश्रुती। श्रवणें चुके अधोगती।**
**मनास होय विश्रांति। समाधान ॥ ३७ ॥**

जो कामक्रोधाच्या अधीन झालेला असतो, त्यास भला कसे बरे म्हणावे? अमृत पिण्याने वास्तविक अमरत्व प्राप्त व्हावयास हवे; पण कामक्रोधास वश झाल्यानेच अमृत पिऊनही राहूचे मरण ओढवलेच नाही का? (२५)

बरे आता हा विषय राहू दे. या ग्रंथातून ज्याने-त्याने आपापल्या कुवतीनुसार जे सार ते ग्रहण करावे. मुख्य म्हणजे अभिमानाचा त्याग करून याचा रसास्वाद घ्यावा हीच गोष्ट उत्तमोत्तम आहे. (२६)

ग्रंथारंभी श्रोत्यांनी 'या ग्रंथात काय आहे?' असा जो प्रश्न केला होता, त्यासंबंधीचे सर्व विवेचन येथे थोडक्यात केले आहे. (२७)

आता 'हा ग्रंथ श्रवण केल्याने काय फळ मिळते?' या प्रश्नाचे उत्तर असे की, हा श्रवण केल्याने श्रोत्यांच्या मनातील सर्व संशय समूळ नष्ट होऊन त्यांच्या आचरणात तत्काळ फरक पडतो. (२८)

कुठलेही अवघड साधन करावे न लागता आत्मोन्नतीचा सोपा मार्ग कोणता हे कळून सायुज्यमुक्तीचे रहस्य बसल्या ठिकाणीच अनायासे हाती येते. (२९)

अज्ञान, दुःख, विपरीत ज्ञान नष्ट होऊन तत्काळ ज्ञानप्राप्ती होते. हीच याची फलश्रुती होय. (३०)

योगी ज्याला परमभाग्य मानतात, ते वैराग्य अंगी बाणते व अंतर्यामी विवेक उत्पन्न होऊन यथायोग्य चातुर्याची प्राप्ती होते. (३१)

जे श्रवणापूर्वी अस्थिर अंतःकरणाचे अवगुणी व अवलक्षणी असतात, ते सुलक्षणी, चतुर, तार्किक व कुशाग्र बुद्धीचे तसेच वेळप्रसंग पाहून योग्य आचरण करणारे होतात. (३२)

जे श्रवणापूर्वी आळशी होते ते उद्योगी बनतात, जे कुणी पापी होते, त्यांना कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन त्यांची चित्तशुद्धी होऊ लागते. जे कुणी श्रवणापूर्वी भक्तिमार्गाची निंदा करीत असतात, ते आता श्रवणामुळे भक्तीचे महत्त्व कळल्याने तिची प्रशंसा करू लागतात. (३३)

बद्ध असतात, ते ग्रंथश्रवणाने मुमुक्षू बनतात. मूर्ख असणारे अतिदक्ष बनतात व भक्तिमार्गाचे अवलंबन केल्याने पूर्वी अभक्त असणारेही मोक्षप्राप्ती करून घेतात. (३४)

केवळ श्रवणाच्या योगे नाना दोष नष्ट होऊन पतितही पावन होतात व त्या त्या व्यक्तींना उत्तम गती प्राप्त होते. (३५)

श्रवणाने दृढ देहबुद्धीमुळे होणारे नुकसान (दुःख, शोकादि) तसेच कुतर्क व संशय आणि नाना प्रकारचे सांसारिक उद्वेग (अर्थात त्रिताप, पंचक्लेशादी) नष्ट होतात. (३६)

या ग्रंथाची फलप्राप्ती अशी आहे की, केवळ श्रवणाने अधोगती तर चुकतेच; शिवाय मनास सहज संतोषरूपी समाधान लाभून परम विश्रांतीही प्राप्त होते. (३७)

जयाचा भावार्थ जैसा। तयास लाभ तैसा।
मत्सर धरी जो पुंसा। तयास तेंचि प्राप्त ॥ ३८ ॥

ज्याचा जसा भावार्थ असेल त्याप्रमाणे त्यास तसा लाभ होतो. एखाद्याच्या मनात मत्सरादी, वाईट भाव असेल तर त्याच्या भावास अनुसरूनच त्यास फलप्राप्ती होते. (३८)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'ग्रंथारंभलक्षणनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक १ : समास २
### गणेशस्तवन

॥ श्रीराम ॥

ॐ नमोजि गणनायेका। सर्वसिद्धिफळदायेका।
अज्ञानभ्रांतिछेदका। बोधरूपा ॥ १ ॥

सर्वसिद्धींचा फळदाता, अज्ञान व विपरीत ज्ञान नष्ट करणाऱ्या बोधरूप अशा गणनायकास मी वंदन करतो. (१)

माझिये अंतरीं भरावें। सर्वकाळ वास्तव्य करावें।
मज वाग्सूंन्यास वदवावें। कृपाकटाक्षेंकरूनी ॥ २ ॥

आपण माझे अंत:करणास व्यापून सर्वकाळ तेथे वास्तव्य करावे आणि आपल्या कृपाकटाक्षाने माझे अज्ञान दूर करून माझ्या मुखाने ग्रंथ वदवून घ्यावा. (२)

तुझिये कृपेचेनि बळें। वितुळती भ्रांतीचीं पडळें।
आणी विश्वभक्षक काळें। दास्यत्व कीजे ॥ ३ ॥

तुझ्या कृपेच्या योगे भ्रांतीची पटले वितळून जातात. एवढेच नव्हे तर विश्वभक्षक काळही तुझ्या कृपेने दास बनतो. (३)

येतां कृपेची निज उडी। विघ्नें कांपती बापुडीं।
होऊनि जाती देशधडी। नाममात्रें ॥ ४ ॥

गणेशाची कृपा झाली की विघ्ने चळचळा कापू लागतात. त्याच्या केवळ नामस्मरणानेही ती देशोधडीला लागतात. (४)

म्हणौन नामें विघ्नहर। आम्हा अनाथांचें माहेर।
आदि करूनी हरीहर। अमर वंदिती ॥ ५ ॥

म्हणूनच गजाननाला 'विघ्नहर' नावाने संबोधले जाते. आमच्यासारख्या अनाथांना त्याचा मोठाच आधार वाटतो. हरिहरादी देवही त्याच्या चरणी वंदन करीत असतात. (५)

वंदूनियां मंगळनिधी। कार्य करितां सर्वसिद्धी।
आघात अडथाळे उपाधी। बाधूं सकेना ॥ ६ ॥

सर्व मंगलाचे निधान अशा गणेशाला वंदन करून कार्यारंभ केला असता त्या कार्यांत सर्वप्रकारे यश प्राप्त होते. ते करीत असताना संकटे, अडथळे इत्यादी उपाधींची बाधा होऊ शकत नाही. (६)

जयाचें आठवितां ध्यान। वाटे परम समाधान।
नेत्रीं रिघोनियां मन। पांगुळे सर्वांगीं ॥ ७ ॥

मनात त्याच्या रूपाचे चिंतन करू लागले, तरीही मनाला परम समाधान वाटते. चंचल मन स्थिर होऊन नेत्रांच्या ठिकाणी एकाग्र होते. (७)

सगुण रूपाची टेव। माहा लावण्य लाघव।
नृत्य करितां सकळ देव। तटस्त होती ॥ ८ ॥

गणेशाच्या सगुण रूपाचे लावण्य व कौशल्य अत्यंत चित्ताकर्षक असून तो जेव्हा नृत्य करू लागतो, तेव्हा सर्व देव देहभान विसरून तटस्थ होऊन त्याच्याकडे पाहातच राहातात. (८)

सर्वकाळ मदोन्मत। सदा आनंदें डुल्लत।
हरुषें निर्भर उद्दित। सुप्रसन्नवदनु ॥ ९ ॥

त्याच्या गंडस्थळातून सतत मद गळत असतो, तो सदा आनंदाने डुलत असतो व अत्यंत आनंदाने उल्लसित झालेले त्याचे सुप्रसन्न वदन आपले चित्त आकर्षित करून घेते. (९)

भव्यरूप वितंड। भीममूर्ति माहा प्रचंड।
विस्तीर्ण मस्तकीं उदंड। सिंधूर चर्चिला ॥ १० ॥

त्याचे रूप भव्य, दिव्य असून, देह अत्यंत विशाल व महाप्रचंड आहे. त्याचा भालप्रदेश विस्तीर्ण असून, त्यावर सिंदूर लावलेला आहे. (१०)

नाना सुगंध परिमळें। थबथबां गळती गंडस्थळें।
तेथें आलीं षट्पदकुळें। झुंकारशब्दें ॥ ११ ॥

त्याच्या गंडस्थळातून थबथबा मदस्राव होत असतो व त्या मदस्रावातून दरवळणाऱ्या सुगंधांच्या परिमळामुळे आकर्षिले जाऊन भुंग्यांचे थवे मधुर गुंजारव करीत त्या गंडस्थळाभोवती रुंजी घालू लागतात. (११)

मुर्डीव शुंडादंड सरळे। शोभे अभिनव आवाळें।
लंबित अधर तिक्षण गळे। क्षणक्ष्णा मंदसत्वी ॥ १२ ॥

गणेशाची सोंड सोटासारखी सरळ पण टोकास मुरडलेली आहे. कपाळावर दोन सुंदर आवाळे शोभत असतात. खालचा ओठ जरा लोंबत असतो आणि उग्र गंध असलेला मद क्षणक्षणाला गळत असतो. (१२)

चौदा विद्यांचा गोसावी। हरस्व लोचन ते हिलावी।
लवलवित फडकावी। फडै फडै कर्णथापा ॥ १३ ॥

गणेश हा चौदा विद्यांचा स्वामी असून, त्याचे डोळे फार लहान आहेत. त्या सूक्ष्म दृष्टीने तो सर्वत्र न्याहाळून पाहात असतो. त्याचे कान खूप मोठे व लवलवित असून, त्यांना तो सुपासारखे सतत फडफडा हलवीत असतो, तेव्हा त्यांचा फडफड आवाज येतो. (१३)

रत्नखचित मुगुटीं झळाळ। नाना सुरंग फांकती कीळ।
कुंडलें तळपती नीळ। वरी जडिले झमकती ॥ १४ ॥

त्याच्या मस्तकावर नाना रत्ने ज्यांत जडविलेली आहेत, असा रत्नजडित मुकुट आहे व त्यातून नाना रंगांच्या प्रकाशाचे किरण सर्वत्र फाकले जाऊन अपूर्व झळाळीने आपले डोळे जणू दिपतात. कानात नीलमण्यांनी जडलेली कुंडले झगमगत असतात. (१४)

दंत शुभ्र सद्दट। रत्नखचित हेमकट्ट।
तया तळवटीं पत्रें नीट। तळपती लघु लघु ॥ १५ ॥

त्याचे दात पांढरे शुभ्र व ठसठशीत आहेत आणि त्यांच्या टोकाला सुवर्णाची रत्नजडित कडी बसवलेली असून, त्यांच्या खालच्या बाजूला छोटी छोटी सोन्याची पाने तळपत असतात. (१५)

लवथवित मलपे दोंद। वेष्टित कट्ट नागबंद।
क्षुद्र घंटिका मंदमंद। वाजती झणत्कारें ॥ १६ ॥

त्याचे पोट लवलवीत असून सारखे हालत असते व त्याला सर्पाचा कडदोरा वेढलेला असतो. कमरेच्या साखळीच्या छोट्या छोट्या घुंगुरांचा मंद मंद मधुर ध्वनी ऐकू येतो. (१६)

चतुर्भुज लंबोदर। कासे कासिला पीतांबर।
फडके दोंदिचा फणीवर। धुधूकार टाकी ॥ १७ ॥

त्याला चार हात असून लंबोदरावर सोनसळी पीतांबर नेसलेला आहे, तर पोटावरील मोठा नाग सारखे फूत्कार टाकतो. (१७)

डोलवी मस्तक जिव्हा लाळी।
घालून बैसला वेंटाळी।
उभारोनि नाभिकमळीं। टकमकां पाहे ॥ १८ ॥

तो नाग कमरेला वेढा घालून बसलेला असून गणेशाच्या नाभिकमळाजवळ फणा उभारून मस्तक डोलवत जिभल्या चाटत सर्वत्र टकमका पाहतो. (१८)

नाना याति कुशममाळा। व्याळपरियंत रुळती गळां।
रत्नजडित हृदयकमळा-। वरी पदक शोभे ॥ १९ ॥

त्याच्या गळ्यात विविध जातीच्या फुलांच्या माळा कमरेतील सापापर्यंत पोहोचतील अशा लांबलचक रुळत असतात व हृदयावर रत्नजडित हारांतील पदक अत्यंत शोभून दिसते. (१९)

शोभे फरश आणी कमळ। अंकुश तिक्षण तेजाळ।
येके करीं मोदकगोळ। तयावरी अति प्रीति ॥ २० ॥

चारी हातांपैकी एका हातात परशू, एका हातात कमळ, एका हातात अत्यंत तीक्ष्ण व तेजस्वी अंकुश तर एका हातात त्याला अत्यंत प्रिय असणाऱ्या मोदकाचा गोळा शोभून दिसतो. (२०)

नट नाट्य कळा कुसरी। नाना छंदें नृत्य करी।
टाळ मृदांग भरोवरी। उपांग हुंकारे ॥ २१ ॥

गणेश हा नृत्य, नाट्य इत्यादी कलांमध्ये अत्यंत कुशल असून टाळ, मृदुंगाच्या तालावर नृत्याचे उपांग जे हुंकार ते करीत नानाप्रकारे नृत्य करतो. (२१)

स्थिरता नाहीं येक क्षण । चपळविशईं अग्रगण ।
साजिरी मूर्ति सुलक्षण । लावण्यखाणी ॥ २२ ॥

इतका विशाल व थुलथुलीत देह असूनही चपलतेमध्ये गणेश अग्रगण्य असून क्षणभरही स्वस्थ राहात नाही. त्याची साजिरी मूर्ती सुलक्षण व लावण्याची जणू खाणच आहे. (२२)

रुणझुणां वाजती नेपुरें । वांकी बोभाटती गजरें ।
घागरियांसहित मनोहरें । पाउलें दोनी ॥ २३ ॥

पायांत नूपुरे रुणझुणत असतात, दंडांतील वाक्यांचा मधुर ध्वनी होत असतो, तर मधुर झंकारणाऱ्या घागऱ्यांमुळे दोन्ही पाउले भक्तांचे मन हरण करीत असतात.(२३)

ईश्वरसभेसी आली शोभा । दिव्यांबरांची फांकली प्रभा ।
साहित्यविशईं सुल्लभा । अष्ट नायका होती ॥ २४ ॥

गणपतीमुळे देवांच्या सभेला शोभा येते. त्याच्या दिव्य वस्त्रांची प्रभा सर्वत्र पसरलेली असते. त्याच्या कृपेमुळेच साहित्य निर्मितीच्यावेळी अष्टनायिका साह्य करू लागतात. (२४)

ऐसा सर्वांगे सुंदरु । सकळ विद्यांचा आगरू ।
त्यासी माझा नमस्कारु । साष्टांग भावें ॥ २५ ॥

श्री समर्थ म्हणतात, असा जो सर्वांगाने सुंदर असणारा, सकळ विद्यांचे वसतिस्थान असा श्रीगणेश त्यास मी साष्टांग भावाने नमस्कार करतो. (२५)

ध्यान गणेशांचें वर्णितां । मतिप्रकाश होये भ्रांता ।
गुणानुवाद श्रवण करितां । वोळे सरस्वती ॥ २६ ॥

त्या गणेशाच्या रूपाचे वर्णन केले असता भ्रमित-चित्त माणसाच्या बुद्धीतही ज्ञानाचा प्रकाश पडतो. त्याच्या गुणांचे श्रवण केल्याने प्रत्यक्ष सरस्वती प्रसन्न होते. (२६)

जयासि ब्रह्मादिक वंदिती । तेथें मानव बापुडे किती ।
असो प्राणी मंदमती । तेहीं गणेश चिंतावा ॥ २७ ॥

ज्यास ब्रह्मादी देवही वंदन करतात, त्यापुढे बिचारे मानव ते काय म्हणावेत? म्हणून मंदमती असणारांनीही श्रीगणेशाचे चिंतन करावे. (२७)

जे मूर्ख अवलक्षण । जे कां हीणाहूनि हीण ।
तेचि होती दक्ष प्रविण । सर्वविशईं ॥ २८ ॥

कारण जे कुणी मूर्ख अवलक्षणी, अथवा हीनांहूनही हीन असतील, तेही श्रीगणेशाच्या कृपेने अत्यंत चतुर व सर्व विषयांत पारंगत होऊ शकतात. (२८)

ऐसा जो परम समर्थ । पूर्ण करी मनोरथ ।
सप्रचीत भजनस्वार्थ । कल्लौ चंडीविनायेकौ ॥ २९ ॥

असे गणेशाचे अपार सामर्थ्य आहे. त्याची कृपा झाली असता भक्तांचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्यांना अनुभवयुक्त परमार्थाची प्राप्ती होते. कलियुगात देवी (चंडी) व गणेशाची उपासना करावी, असे शास्त्र सांगते. (२९)

ऐसा गणेश मंगळमूर्ती । तो म्यां स्तविला येथामती ।
वांछ्या धरूनि चित्तीं । परमार्थाची ॥ ३० ॥

म्हणून अशा मंगलमूर्ती गणेशाची स्तुती मी मनात परमार्थाची इच्छा धरून यथामती केली आहे. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'गणेशस्तवननाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक १ : समास ३

## शारदास्तवन

॥ श्रीराम ॥

आतां वंदीन वेदमाता । श्रीशारदा ब्रह्मसुता ।
शब्दमूळ वाग्देवता । माहं माया ॥ १ ॥

मी आता वेदांची जननी, ब्रह्मदेवांची कन्या, शब्दब्रह्माची उत्पत्ती जिच्यापासून झाली त्या वाग्देवतारूपी महामायेला, श्रीशारदेला वंदन करतो. (१)

जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार ।
जे शब्दाचें अभ्यांतर । उकलून दावी ॥ २ ॥

तिच्यापासूनच शब्द स्फुरतात व वैखरी वाणीच्या रूपाने तिचाच अपार विस्तार होतो. तीच शब्दांचे विविध अर्थ उकलून दाखवते. (२)

जे योगियांची समाधी। जे धारिष्टांची कृतबुद्धी।
जे विद्या अविद्या उपाधी। तोडून टाकी ॥ ३ ॥

योग्यांच्या ठिकाणी समाधिरूपाने तर धैर्यवान पुरुषांच्या ठिकाणी निश्चयी बुद्धीच्या रूपाने राहून तीच विद्या व अविद्या या दोन्ही उपाधी तोडून टाकून स्वस्वरूपी लीन करते. (३)

जे माहापुरुषाची भार्या। अति सलग्न अवस्था तुर्या।
जयेकरितां महत्कार्या। प्रवर्तले साधु ॥ ४ ॥

ती ईश्वराची भार्या असून प्रत्यगात्मा ब्रह्माच्या अत्यंत निकट असणारी तुर्यावस्थाही तीच आहे. तिच्या आधारानेच साधुपुरुष महान कार्ये करण्यास प्रवृत्त होतात. (४)

जे महंतांची शांती। जे ईश्वराची निज शक्ती।
जे ज्ञानियांची विरक्ती। नैराशशोभा ॥ ५ ॥

ती महंताची शांती असून ईश्वराची निजशक्ती आहे, तर ज्ञानी लोकांच्या ठिकाणी ती विरक्तिरूपाने प्रगटून नैराश्य रूपाने शोभत असते. (५)

जे अनंत ब्रह्मांडें घडी। लीळाविनोदेचि मोडी।
आपण आदिपुरुषीं दडी। मारून राहे ॥ ६ ॥

ती सहज लीलाविनोदरूपाने अनंत ब्रह्मांडांची उत्पत्ती व लयही करीत असते; पण आपण स्वत: मात्र आदिपुरुषाच्या ठिकाणी लपून राहते. (६)

जे प्रत्यक्ष पाहातां आडळे। विचार घेतां तरी नाडळे।
जयेचा पार न कळे। ब्रह्मादिकांसी ॥ ७ ॥

हे प्रत्यक्ष दिसणारे विश्व हे तिचेच रूप आहे असे भासते, पण तिचा शोध घेऊ गेले असता ती कोठेच सापडत नाही. अशी ती विलक्षण असल्याने ब्रह्मादी देवांनाही तिचा अंत लागत नाही. (७)

जे सर्व नाटकअंतर्कळा। जाणीव स्फूर्ति निर्मळा।
जयेचेनि स्वानंदसोहळा। ज्ञानशक्ती ॥ ८ ॥

या सर्व विश्वरूपी नाटकाची तीच मुख्य सूत्रधार असून ईश्वराच्या ठिकाणी प्रथम स्फुरलेली निर्मल 'एकोऽहं' ही जाणीव हे तिचेच स्वरूप आहे. तीच साधकांच्या ठिकाणी ज्ञानशक्तिरूपाने प्रगट होऊन त्यांना स्वानंदाची अनुभूती करून देते. (८)

जे लावण्यस्वरूपाची शोभा। जे परब्रह्मसूर्याची प्रभा।
जे शब्दीं वदोनि उभा। संसार नासी ॥ ९ ॥

जगातील सर्व लावण्याचे, सौंदर्याचे, शोभेचे ती उत्पत्ति-स्थान असून, परब्रह्मरूपी सूर्याची प्रभा म्हणजे अभिन्न तेजही तीच आहे. आपल्या अचिंत्य अशा शब्दशक्तीच्या साहाय्याने ही विश्वाभासरूपी संसार नाहीसा करून टाकते. (९)

जे मोक्षश्रिया माहामंगळा। जे सत्रावी जीवनकळा।
जे सत्वलीळा सुसीतळा। लावण्यखाणी ॥ १० ॥

तीच साक्षात मोक्षरूपी लक्ष्मी असून अत्यंत मंगलमय अशी सत्रावी जीवनकळा आहे. लावण्याची खाण अशी ही शारदा परम सुशीतल व सत्त्वशील असून जीवास सुख देणारी आहे. (१०)

जे अवेक्त पुरुषाची वेक्ती। विस्तारें वाढली इच्छाशक्ती।
जे कळीकाळाची नियंती। सद्गुरुकृपा ॥ ११ ॥

अव्यक्त अशा परब्रह्माची व्यक्त झालेली शक्ती त्याच्या इच्छाशक्तीच्या साहाय्याने अत्यंत विस्तार पावली आहे. कळिकाळावरही सत्ता गाजविणाऱ्या सद्गुरुकृपेच्या रूपाने ती कार्यान्वित होते. (११)

जे परमार्थमार्गीं चा विचार। निवडून दावी सारासार।
भवसिंधूचा पैलपार। पाववी शब्दबळें ॥ १२ ॥

तीच सारासार विवेकरूपाने परमार्थमार्गात मार्गदर्शन करून शब्दांच्या आधारे भवसिंधूतून पैलतीरास पोहोचविते. (१२)

ऐसी बहुवेषें नटली। माया शारदा येकली।
सिद्धचि अंतरीं संचली। चतुर्विधा प्रकारें ॥ १३ ॥

अशाप्रकारे विविध वेषांनी ती नटलेली दिसली, तरी ती शारदा मायारूपाने एकच असून सिद्धपुरुषांच्या ठिकाणी ती परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चार वाणींच्या रूपाने वास्तव्य करून असते. (१३)

तींहीं वाचा अंतरीं आलें। तें वैखरिया प्रगट केलें।
म्हणौन कर्तुत्व जितुकें जालें। तें शारदागुणें ॥ १४ ॥

परा, पश्यंती, मध्यमा यांच्यात जे स्फुरते, तेच वैखरी वाणीने प्रगट केले जाते. म्हणून हे सर्व कर्तृत्व शारदेच्या योगेच प्रगट होत असते, हे जाणून घ्यावे. (१४)

**जे ब्रह्मादिकांची जननी। हरीहर जयेपासुनी।**
**सृष्टिरचना लोक तिनी। विस्तार जयेचा ॥ १५ ॥**

अशी ही मूळमाया ब्रह्मादिकांची जननी असून तिच्यापासूनच विष्णू शंकरादी देव व तिन्ही लोकांची सृष्टिरचना होत असते. हा सर्व तिचाच विस्तार आहे. (१५)

**जे परमार्थाचें मूळ। नांतरी सद्विद्याचि केवळ।**
**निवांत निर्मळ निश्चळ। स्वरूपस्थिती ॥ १६ ॥**

जिला सद्विद्या असे म्हणतात, जी निर्मळ, निश्चळ, निवांत (शांतिरूप) परमार्थाचे मूळच अशी स्वरूपस्थिती, ती म्हणजे शारदाच होय. (१६)

**जे योगियांचे ध्यानीं। जे साधकांचे चिंतनीं।**
**जे सिद्धांचे अंत:कर्णीं। समाधिरूपें ॥ १७ ॥**

योग्यांच्या ठिकाणी ध्यानमग्नतेच्या रूपाने, साधकांच्या ठिकाणी आत्मस्वरूपचिंतनाच्या रूपाने तर सिद्धांच्या अंत:करणात समाधिरूपाने तीच राहते. (१७)

**जे निर्गुणाची वोळखण। जे अनुभवाची खूण।**
**जे व्यापकपणें संपूर्ण। सर्वां घटीं ॥ १८ ॥**

ती चराचरांत संपूर्णपणे व्यापक असून साधकांना स्वरूपाच्या अनुभवाच्या योगे तीच निर्गुणाचा परिचय करून देते. (१८)

**शास्त्रें पुराणें वेद श्रुति। अखंड जयेचें स्तवन करिती।**
**नाना रूपीं जयेसी स्तविती। प्राणीमात्र ॥ १९ ॥**

शास्त्रे, पुराणे, वेद, श्रुती अखंड तिचीच स्तुती करत असतात व सर्व प्राणिमात्रही नाना रूपाने तिचेच गुणगान करतात. (१९)

**जे वेदशास्त्रांची महिमा। जे निरोपमाची उपमा।**
**जयेकरितां परमात्मा। ऐसें बोलिजे ॥ २० ॥**

वेदशास्त्रांना मोठेपणा शारदेमुळेच प्राप्त झाला असून ज्या परमात्म्याचे शब्दांत वर्णन होऊच शकत नाही, त्याचे उपमा-दृष्टांताच्या सहाय्याने वर्णन करून त्यास 'परमात्मा' हे नाव देणारी ही शारदाच आहे. (२०)

**नाना विद्या कळा सिद्धी। नाना निश्चयाची बुद्धी।**
**जे सूक्ष्म वस्तूची शुद्धी। ज्ञप्तीमात्र ॥ २१ ॥**

परमात्मस्वरूपाच्या ठिकाणी केवळ जाणीवरूपाने स्फुरणारी सूक्ष्म शुद्ध जाणीव हेच शारदेचे मूळरूप असून तीच नंतर नाना विद्या, नाना कला, नाना सिद्धी व नाना मतांसंबंधीच्या निश्चयात्मक बुद्धीच्या रूपाने प्रगट होत असते. (२१)

**जे हरिभक्तांची निजभक्ती। अंतर्निष्ठांची अंतरस्थिती।**
**जे जीवन्मुक्तांची मुक्ती। सायोज्यता ते ॥ २२ ॥**

तीच हरिभक्तांच्या ठिकाणी निजभक्तीच्या रूपाने, अंतर्निष्ठांच्या ठिकाणी अंतर्यामी ज्ञाननिष्ठेच्या रूपाने तर जीवन्मुक्तांच्या ठिकाणी मुक्तिरूपाने वास करते व सायुज्यमुक्ती हेही तिचेच रूप आहे. (२२)

**जे अनंत माया वैष्णवी। न कळे नाटक लाघवी।**
**जे थोरथोरासी गोवी। जाणपणें ॥ २३ ॥**

शारदा म्हणजे भगवंताची अनंत अशी मायाशक्ती असून ती अत्यंत लाघवी व नाट्यकलेत निपुण आहे. मोठमोठ्यांना 'मी ज्ञाता' या अभिमानाच्या जाणिवेत, मोहात ती गुंतविते. (२३)

**जें जें दृष्टीनें देखिलें। जें जें शब्दें वोळखिलें।**
**जें जें मनास भासलें। तितुकें रूप जयेचें ॥ २४ ॥**

जे जे काही दृष्टीस दिसते, नादरूपाने ऐकू येते वा जे जे मनाने कल्पिले जाते अर्थात जेथपर्यंत इंद्रियांची, मनाची धाव पोहोचते, ते सर्व मायेचे रूप समजावे. (२४)

**स्तवन भजन भक्ति भाव। मायेवांचून नाहीं ठाव।**
**या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती ॥ २५ ॥**

अर्थात आपण जे जे काही स्तवन, भजन, साधन, भक्तिभाव इत्यादी करतो, तेही मायेचेच स्वरूप असून मायेखेरीज तेथे इतर काही नाही. या बोलण्यातील गूढार्थ जे स्वस्वरूपाचे अनुभवी लोक असतील तेच जाणू शकतील. (२५)

**म्हणौनि थोराहूनि थोर। जे ईश्वराचा ईश्वर।**
**तयेसी माझा नमस्कार। तदांशेंचि आतां ॥ २६ ॥**

म्हणून शेवटी थोराहूनही थोर व ईश्वराचाही ईश्वर असणाऱ्या त्या शारदेला तिच्या अंशरूपानेच मी आता नमस्कार करतो. (२६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'शारदास्तवननाम' समास तिसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक १ : समास ४

# सद्‌गुरुस्तवन

॥ श्रीराम ॥

आतां सद्‌गुरु वर्णवेना। जेथें माया स्पर्शों सकेना।
तें स्वरूप मज अज्ञाना। काये कळे ॥ १ ॥

मला सद्‌गुरूंचे स्तवन करावे अशी इच्छा तर आहे, पण ज्यांच्यापर्यंत माया पोहोचू शकत नाही, अशा त्या स्वरूपाचे आकलन माझ्यासारख्या अज्ञानी जीवास कसे होणार? म्हणून सद्‌गुरूंचे वर्णन करताच येत नाही, असे म्हणावे लागत आहे. (१)

न कळे न कळे नेति नेति। ऐसें बोलतसे श्रुती।
तेथें मज मूर्खाची मती। पवाडेल कोठें ॥ २ ॥

श्रुती ही आत्मविद्येची जननी असून ती सुद्धा 'नेति नेति' मला कळत नाही, कळत नाही असे ज्याच्याविषयी म्हणते, त्या स्वरूपाचे वर्णन करण्यास माझ्यासारख्या मूर्खाची बुद्धी कशी समर्थ असेल? (२)

मज न कळे हा विचारु। दुरूनि माझा नमस्कारु।
गुरुदेवा पैलपारू। पाववीं मज ॥ ३ ॥

तुमचे वर्णन कसे करावे हेच मला कळत नसल्याने मी तुम्हांला दुरूनच नमस्कार करून प्रार्थना करतो की, हे गुरुदेवा, मला पैलतीरास न्या. (३)

होती स्तवनाची दुराशा। तुटला मायेचा भर्वसा।
आतां असाल तैसे असा। सद्‌गुरु स्वामी ॥ ४ ॥

मायेच्या आधारे तुमचे स्तवन करता येईल अशी अयोग्य आशा मी मनाशी बाळगली होती, पण माया आपणास स्पर्शच करू शकत नसल्याने आता मायेचा आधारही नाहीसा झाला आहे. म्हणून 'हे सद्‌गुरू स्वामी, तुम्ही असाल तसे असा' एवढेच मी म्हणतो. (४)

मायेच्या बळें करीन स्तवन। ऐसें वांछित होतें मन।
माया जाली लज्यायमान। काय करूं ॥ ५ ॥

मायेच्या साहाय्याने आपले स्तवन करावे अशी इच्छा माझ्या मनात होती. पण मायाच लाजून बाजूस सरल्यावर मी तरी काय करू? (५)

नातुडे मुख्य परमात्मा। म्हणौनि करावी लागे प्रतिमा।
तैसा मायायोगें महिमा। वर्णीन सद्‌गुरूचा ॥ ६ ॥

मुख्य परमात्मा इंद्रियगोचर नसल्याने तो हाती गवसत नाही, म्हणून त्याची प्रतिमा करून तिचा आधार घ्यावा लागतो. म्हणून आता त्या मायेचा आधार घेऊनच मी सद्‌गुरूंचा महिमा वर्णन करीन. (६)

आपल्या भावासारिखा मनीं। देव आठवावा ध्यानीं।
तैसा सद्‌गुरु हा स्तवनीं। स्तऊं आतां ॥ ७ ॥

आपल्या मनात जसा भाव असेल त्यास अनुसरूनच ध्यानात मनाने आपल्या इष्ट देवाचे स्मरण करावे लागते. तशी माझ्या मनात जशी सद्‌गुरूंची मूर्ती स्थिरावली आहे, तशीच ती आठवून त्या श्रीसद्‌गुरूंचे मी स्तवन करतो. (७)

जय जयाजि सद्‌गुरुराजा। विश्वंभरा विश्वबीजा।
परमपुरुषा मोक्षध्वजा। दीनबंधु ॥ ८ ॥

हे सद्‌गुरुराजा, तुझा जयजयकार असो! तूच सर्व विश्वास व्यापले आहेस, तूच विश्वाचे मूळ कारण आहेस व तूच परमपुरुष आहेस; तसेच मोक्ष देणारा व दीनांचा बंधू तूच आहेस. (८)

तुझीयेन अभयंकरें। अनावर माया हे वोसरे।
जैसें सूर्यप्रकाशें अंधारें। पळोन जाये ॥ ९ ॥

जसा सूर्यप्रकाशाने अंधार पळून जातो, तशी तुझी कृपा झाली की अनावर अशी मायाही ओसरू लागते. (९)

आदित्यें अंधकार निवारे। परंतु मागुतें ब्रह्मांड भरे।
नीसी जालियां नंतरें। पुन्हा काळोखें ॥ १० ॥

सूर्याच्या योगे अंधकार नाहीसा झाला, तरी रात्र झाली की परत काळोखाने ब्रह्मांड भरून जाते. (१०)

तैसा नव्हे स्वामीराव। करी जन्ममृत्य वाव।
समूळ अज्ञानाचा ठाव। पुसून टाकी ॥ ११ ॥

पण सद्‌गुरू स्वामीराज तसे नाहीत. ते अज्ञानाचा समूळ नाश करतात व त्यामुळे परत जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडावे लागत नाही. (११)

**सुवर्णाचें लोहो कांहीं। सर्वथा होणार नाहीं।**
**तैसा गुरुदास संदेहीं। पडोंचि नेणे सर्वथा॥ १२॥**

परीसस्पर्शाने लोखंडाचे एकदा सोने झाले की, ते परत लोखंड कधीच होत नाही. त्याप्रमाणे गुरूंनी आपल्या दासाचे अज्ञान एकदा समूळ नष्ट केले की, तो परत कधीही संशयात पडत नाही. (१२)

**कां सरिता गंगेसी मिळाली। मिळणी होतां गंगा जाली।**
**मग जरी वेगळी केली। तरी होणार नाहीं सर्वथा॥ १३॥**

किंवा नदी एकदा गंगेस मिळाली की त्यासरशी ती गंगाच बनते. मग कितीही प्रयत्न केले तरी ती कधीही वेगळी केली जाऊ शकतच नाही. (१३)

**परी ते सरिता मिळणीमागें। वाहाळ मानिजेत जगें।**
**तैसा नव्हे शिष्य वेगें। स्वामीच होये ॥ १४॥**

एखाद्या ओहोळाला नदीला मिळण्यापूर्वी जग लहान ओढाच म्हणते. पण नदीला मिळाल्यावर तो नदी होतो. तसा सामान्य साधक सद्‌गुरुकृपा होण्यापूर्वी कसाही असला तरी सद्‌गुरुकृपा झाली की तो तत्काळ गुरूच होतो. (१४)

**परीस आपणाऐसें करीना। सुवर्णे लोहो पालटेना।**
**उपदेश करी बहुत जना। अंकित सद्‌गुरूचा॥ १५॥**

परीस लोखंडाचे सोने करतो पण त्या सुवर्णास तो आपले परिसत्व देत नाही म्हणजे त्या सोन्याच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होऊ शकत नाही. पण जो साधक सद्‌गुरूचा कृपांकित होतो, तोही अनेक लोकांचा उद्धार करू शकतो. (१५)

**शिष्यास गुरुत्व प्राप्त होये। सुवर्णे सुवर्ण करितां न ये।**
**म्हणौनि उपमा न साहे। सद्‌गुरूसी परिसाची॥ १६॥**

परिसामुळे सुवर्ण झालेल्या सुवर्णाच्या स्पर्शाने दुसऱ्या लोखंडाचे सोने होऊ शकत नाही, पण सद्‌गुरुकृपेने शिष्यास मात्र गुरुत्वच प्राप्त होते; म्हणून सद्‌गुरूंना परिसाची उपमा देणेही योग्य नाही. (१६)

**उपमे द्यावा सागर। तरी तो अत्यंतचि क्षार।**
**अथवा म्हणों क्षीरसागर। तरी तो नासेल कल्पांतीं॥ १७॥**

बरे त्यांना सागराची उपमा द्यावी तर तो तर अत्यंत खारट असतो म्हणून तीही उपमा योग्य नव्हे. अथवा क्षीरसागराची उपमा द्यावी तर कल्पांती क्षीरसागरही नष्ट होतो. म्हणून तीही उपमा देता येत नाही. (१७)

**उपमे द्यावा जरी मेरु। तरी तो जड पाषाण कठोरु।**
**तैसा नव्हे कीं सद्‌गुरु। कोमळ दिनाचा ॥ १८॥**

सद्‌गुरूंना मेरू पर्वताची उपमा द्यावी तर मेरुपर्वत जड पाषाणाचा व कठोर आणि सद्‌गुरू तर दीन शरणागताविषयी अत्यंत कोमल अंत:करणाचे असतात, म्हणून तीही उपमा देता येत नाही. (१८)

**उपमे म्हणों गगन। तरी गगनापरीस तें निर्गुण।**
**या कारणें दृष्टांत हीण। सद्‌गुरूस गगनाचा ॥ १९॥**

बरे! सद्‌गुरूंना गगनाची उपमा द्यावी, तर त्यांचे रूप गगनाच्याही पलीकडचे निर्गुण आहे. म्हणून गगनाची उपमासुद्धा हीन ठरते. (१९)

**धीरपणें उपमूं जगती। तरी हेहि खचेल कल्पांतीं।**
**म्हणौन धीरत्वास दृष्टांतीं। हीण वसुंधरा ॥ २०॥**

धैर्यशील म्हणून पृथ्वीची उपमा द्यावी तर कल्पांती पृथ्वीही खचून जाईल. म्हणून तिची उपमाही अयोग्य ठरते. (२०)

**आता उपमावा गभस्ती। तरी गभस्तीचा प्रकाश किती।**
**शास्त्रें मर्यादा बोलती। सद्‌गुरू अमर्याद ॥ २१॥**

सद्‌गुरू परम प्रकाशरूप म्हणून सूर्याची उपमा द्यावी तर त्यालाही मर्यादा आहे. पण सद्‌गुरूंचे सामर्थ्य अमर्याद आहे. ते नित्य परम प्रकाशरूपच आहेत. (२१)

**म्हणौनि उपमें उणा दिनकर। सद्‌गुरु ज्ञानप्रकाश थोर।**
**आतां उपमावा फणीवर। तरी तोही भारवाही ॥ २२॥**

सदगुरूंचा प्रकाश चिरंतन टिकणारा असल्याने त्याला सूर्याची उपमा देताच येत नाही. बरे शेषाची उपमा द्यावी तर त्याने स्वत:च पृथ्वीचा भार आपल्या मस्तकावर वाहिला आहे. परंतु श्रीगुरु शिष्याचा संसारभार दूर करतात. म्हणून तीही उपमा देता येत नाही. (२२)

आतां उपमा द्यावें जळ।
तरी तें काळांतरीं आटेल सकळ।
सद्गुरुरूप तें निश्चळ। जाणार नाहीं ॥ २३ ॥

आता जीवनदायी व कोमल म्हणून जलाची उपमा द्यावी, तर कालांतराने पाणीही आटून जाते. शिवाय ते चंचल असते, पण सद्गुरु-स्वरूप निश्चल असून त्याचा नाश कधीच होत नाही. (२३)

सद्गुरूसी उपमावें अमृत। तरी अमर धरिती मृत्यपंथ।
सद्गुरुकृपा यथार्थ। अमर करी ॥ २४ ॥

त्यांना अमृताची उपमा द्यावी तर सदैव अमृतपान करणारे देवही मृत्यूच्या कचाट्यातून सुटत नाहीत. पण एकदा सद्गुरूंची कृपा झाली की, शिष्य मात्र अमर होतो. म्हणून ही उपमाही देता येत नाही. (२४)

सद्गुरूसी म्हणावें कल्पतरु।
तरी ह्मा कल्पनेतीत विचारु।
कल्पवृक्षाचा अंगिकारु। कोण करी ॥ २५ ॥

सद्गुरूला कल्पतरूची उपमाही देता येत नाही. कारण तो जे मागावे तेवढेच व तेही कल्पनेतील पदार्थच देतो. पण सद्गुरू कल्पनेच्या पलीकडील मोक्ष देतात. मग कल्पतरूचा अंगीकार कोण करील बरे! (२५)

चिंता मात्र नाहीं मनीं। कोण पुसे चिंतामणी।
कामधेनूचीं दुभणीं। निःकामासी न लगती ॥ २६ ॥

सद्गुरूंना चिंतामणीची उपमाही देता येत नाही. कारण ते शिष्याच्या मनात कुठलीही चिंताच उरू देत नाहीत. त्यांच्या कृपेने शिष्य निष्काम झालेला असतो. मग निष्काम झालेल्या पुरुषास कामधेनूची प्रसन्नता वा पान्हा यांची आवश्यकताच उरत नाही. म्हणून चिंतामणी वा कामधेनू यांच्याही उपमा सद्गुरूंना देता येत नाहीत. (२६)

सद्गुरू म्हणों लक्ष्मीवंत। तरी ते लक्ष्मी नाशिवंत।
ज्याचे द्वारीं असे तिष्ठत। मोक्षलक्ष्मी ॥ २७ ॥

सद्गुरूंना लक्ष्मीवंत म्हणावे, तर तेही योग्य नव्हे. कारण लक्ष्मी चंचल असते, नाशिवंत असते, पण सद्गुरूंच्या दारी तर साक्षात मोक्षलक्ष्मी त्यांच्या कृपाकटाक्षाची आशा धरून तिष्ठत असते. म्हणून ही उपमाही देता येत नाही. (२७)

स्वर्गलोक इंद्र संपती। हे काळांतरीं विटंबती।
सद्गुरूकृपेची प्राप्ती। काळांतरीं चळेना ॥ २८ ॥

स्वर्गलोक, इंद्रपद या सर्व गोष्टी नश्वर असून कालांतराने नाश पावतात. पण सद्गुरूची कृपा एकदा झाली की ती कधीही नाश पावत नाही. (२८)

हरीहर ब्रह्मादिक। नाश पावती सकळिक।
सर्वदा अविनाश येक। सद्गुरूपद ॥ २९ ॥

ब्रह्मा, विष्णू, शिवादी सर्व देव हे कालांतराने नाश पावतात. एक सद्गुरुपदच असे आहे की ते अविनाशी आहे. (२९)

तयासी उपमा काय द्यावी। नाशिवंत सृष्टी आघवी।
पंचभूतिक उठाठेवी। न चले तेथें ॥ ३० ॥

फार काय सांगावे, ही सर्व सृष्टीच पंचमहाभूतांची असून नाशिवंत आहे. फक्त सद्गुरूंचे स्वरूपच शाश्वत अविनाशी आहे. तेव्हा त्याची उठाठेव करण्यातही काही अर्थ नाही. (३०)

म्हणौनि सद्गुरू वर्णवेना। हे गे हेचि माझी वर्णना।
अंतरस्थितीचिया खुणा। अंतर्निष्ठ जाणती ॥ ३१ ॥

तेव्हा सद्गुरूंच्या रूपाचे वर्णन करता येण्यासारखे नाही, हेच माझे वर्णन आहे. जे अंतरीच्या खुणा जाणणारे असतात, त्यांनाच त्यांचे खरे स्वरूप कळते. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सद्गुरुस्तवननाम' समास चौथा समाप्त.**



## दशक १ : समास ५
# संतस्तवन

॥ श्रीराम ॥

**आतां वंदीन सज्जन। जे परमार्थाचें अधिष्ठान।**
**जयांचेनि गुह्यज्ञान। प्रगटे जनीं ॥ १ ॥**

आता परमार्थाचे जे मुख्य आश्रयस्थान, की ज्यांच्यामुळेच अत्यंत गुह्य असे आत्मज्ञान या जगात प्रकट होते, त्या सज्जनांना मी वंदन करतो. (१)

**जे वस्तु परम दुल्लभ। जयेचा अलभ्य लाभ।**
**तेंचि होये सुल्लभ। संतसंगेंकरूनी ॥ २ ॥**

परब्रह्मप्राप्ती अत्यंत श्रेष्ठ प्रतीची लाभदायक गोष्ट आहे. पण तिची प्राप्ती होणे मात्र अत्यंत दुर्लभ आहे. हा अलभ्य लाभ प्राप्त करून घेण्याचा सर्वांत सोपा उपाय म्हणजे संतसंगती. (२)

**वस्तु प्रगटचि असे। पाहातां कोणासीच न दिसे।**
**नाना साधनीं सायासें। न पडे ठाईं ॥ ३ ॥**

परब्रह्म वास्तविक प्रगटच आहे. पण अनेक साधनांचे कष्ट करूनही त्याची प्राप्ती सहसा होऊ शकत नाही. कारण त्याचा शोध घेऊ गेले असता ते कुठे आढळूनच येत नाही. (३)

**जेथें परीक्षवंत ठकले।**
**नांतरी डोळसचि अंध जाले।**
**पाहात असतांचि चुकले। निजवस्तूसी ॥ ४ ॥**

अनेक वस्तूंची यथायोग्य पारख करणारे परीक्षावंत येथे मात्र फसतात. डोळसांनाही आत्मवस्तू दिसत नाही. तेही चुकतात, म्हणजेच डोळे असूनही आंधळे ठरतात. (४)

**जें दीपाचेनि दिसेना। नाना प्रकाशें गवसेना।**
**नेत्रांजनेंहि वसेना। दृष्टीपुढें ॥ ५ ॥**

दिव्याच्या प्रकाशाने किंवा इतरही नाना प्रकारच्या प्रकाशाने आत्मवस्तू दिसत नाही. एवढेच नव्हे तर डोळ्यांत नेत्रांजन घालून ती पाहण्याचा प्रयत्न केला तरीसुद्धा ती दृष्टीपुढे येत नाही. (५)

**सोळां कळी पूर्ण शशी। दाखऊं शकेना वस्तूसी।**
**तीव्र आदित्य कळारासी। तोहि दाखवीना ॥ ६ ॥**

सोळा कलांनी परिपूर्ण असा पौर्णिमेचा चंद्रसुद्धा ती दाखविण्यास समर्थ नाही. एवढेच नव्हे तर अत्यंत तीव्र प्रकाशाने तळपणारा तेजोनिधी असा सूर्यही आत्मवस्तूस दाखवू शकत नाही. (६)

**जया सूर्याचेनि प्रकाशें। ऊर्णतंतु तोहि दिसे।**
**नाना सूक्ष्म पदार्थ भासे। अणुरेणादिक ॥ ७ ॥**

कोळ्याच्या अंगांतून बाहेर पडणारा अति सूक्ष्म तंतू सूर्यप्रकाशामुळे दिसू शकतो, तसेच अणुरेणू इत्यादी सूक्ष्म असे पदार्थही सूर्यप्रकाशाच्या योगे आपण पाहू शकतो. (७)

**चिरलें वाळाग्र तेंहि प्रकासी।**
**परी तो दाखवीना वस्तूसी।**
**तें जयाचेनि साधकांसी। प्राप्त होये ॥ ८ ॥**

एवढेच कशाला, केसाच्या अग्राचे चिरलेले टोकही सूर्यप्रकाशाने दिसू शकते, पण असा सूर्यही आत्मवस्तूस प्रकाशित करू शकत नाही, पण अशा दुर्लभ आत्मवस्तूची प्राप्ती साधकांना संतांच्या कृपेने मात्र होऊ शकते. (८)

**जेथें आक्षेप आटले। जेथें प्रेत्न प्रस्तावले।**
**जेथें तर्क मंदावले। तर्कितां निजवस्तूसी ॥ ९ ॥**

आत्मवस्तूचे स्वरूप असे विलक्षण आहे की, तेथे सर्व आक्षेप निरुपयोगी होतात. प्रयत्न उपयोगी पडत नाहीत, तर्काने ती जाणण्याचा प्रयत्न केल्यास तेथे तर्कही मंदावतात. (९)

**वळे विवेकाची वेंगडी। पडे शब्दाची बोबडी।**
**जेथें मनाची तांतडी। कामा नये ॥ १० ॥**

विवेकाने तिचा शोध घेण्याचा प्रयत्न केल्यास विवेक पांगुळतो, शब्दांनी जाणण्याचा प्रयत्न करू जावे तर शब्दांचीच बोबडी वळते व मनाने जाणू जावे, तर तेथे मनाची धडपड उपयोगी पडत नाही. (१०)

जो बोलकेपणें विशेष। सहस्त्र मुखांचा जो शेष।
तोहि सिणला निःशेष। वस्तु न संगवे ॥ ११ ॥

शेषास सहस्त्र मुखे असल्यामुळे वक्त्यांमध्ये तो विशेष प्रसिद्ध आहे, पण तोही वर्णन करून थकला, तरी त्याला निजवस्तूचे वर्णन करता आले नाही. (११)

वेदें प्रकाशिलें सर्वही। वेदविरहित कांहीं नाहीं।
नो वेद कोणासही। दाखऊं सकेना ॥ १२ ॥

वेदांत सर्व वस्तूंचे वर्णन आढळते. त्यांत ज्या वस्तूचे वर्णन नाही अशी वस्तूच नाही असे म्हटले जाते; पण तो वेदही कुणालाही आत्मवस्तू दाखवू शकत नाही. (१२)

तेचि वस्तु संतसंगें। स्वानुभवें कळों लागे।
त्याचा महिमा वचनीं सांगे। ऐसा कवणु ॥ १३ ॥

अशी सर्वप्रकारे अत्यंत दुर्लभ जी आत्मवस्तू ती ज्या संतांच्या संगतीने स्वानुभवाच्या योगे जाणली जाऊ शकते, त्या संतांचा महिमा कुणालाही शब्दांत कसा बरे वर्णन करता येईल? (१३)

विचित्र कळा ये मायेची। परी वोळखी न संगवे वस्तूची।
मायातीता अनंताची। संत सोये सांगती ॥ १४ ॥

मायेचे अंगी अनेक विचित्र कळा असल्या, तरी तीही त्या आत्मवस्तूचा परिचय करून देण्यास असमर्थ आहे. अशा त्या मायातीत परब्रह्माची प्राप्ती कशी होईल, त्याचा सोपा उपाय केवळ संतच सांगू शकतात. (१४)

वस्तूसी वर्णिलें नवचे। तेंचि स्वरूप संतांचें।
या कारणें वचनांचें। कार्य नाहीं ॥ १५ ॥

ज्याप्रमाणे आत्मवस्तूचे वर्णन करता येत नाही, त्याप्रमाणेच संतांच्या स्वरूपाचेही वर्णन करता येत नाही. कारण ते शब्दातीत असल्याने ते शब्दांच्या आटोक्यात येत नाही. (१५)

संत आनंदाचें स्थळ। संत सुखचि केवळ।
नाना संतोषाचें मूळ। ते हे संत ॥ १६ ॥

संत हे परमानंदरूप असतात, सुखरूप असतात. एवढेच नव्हे, तर नाना संतोषाची उत्पत्ती त्यांच्यापासूनच होते. (१६)

संत विश्रांतीची विश्रांती। संत तृप्तीची निजतृप्ती।
नांतरी भक्तीची फळश्रुती। ते हे संत ॥ १७ ॥

संत हे विश्रांतीची विश्रांती, तृप्तीची निजतृप्ती अथवा भक्तीची फलश्रुती असतात. (१७)

संत धर्माचें धर्मक्षेत्र। संत स्वरूपाचें सत्पात्र।
नातरी पुण्याची पवित्र। पुण्यभूमी ॥ १८ ॥

संत हे धर्माचे निवासस्थान असतात. स्वस्वरूपाची साठवण करण्यास योग्य असे सत्पात्र असतात; अथवा जेथे पुण्यच उदयास येते, अशी पवित्र पुण्यभूमी म्हणजे संतच होय. (१८)

संत समाधीचें मंदिर। संत विवेकाचें भांडार।
नांतरी बोलिजे माहेर। सायोज्यमुक्तीचें ॥ १९ ॥

संत म्हणजे समाधीचे मंदिरच, विवेकाचे भांडारच आणि सायुज्य मुक्तीचे माहेरघरच असतात. (१९)

संत सत्याचा निश्चयो। संत सार्थकाचा जयो।
संत प्राप्तीचा समयो। सिद्धरूप ॥ २० ॥

संत सत्याचा कधीही त्याग करीत नाहीत. संतांचे जीवन म्हणजे कृतार्थ जीवनाचा आदर्शच असतो ज्यावेळी आत्मवस्तुप्राप्तीची वेळ येते, त्या सिद्ध समयीच संतांची भेट होते. (२०)

मोक्षश्रिया आळंकृत। ऐसे हे संत श्रीमंत।
जीव दरिद्री असंख्यात। नृपती केले ॥ २१ ॥

संतांजवळ मोक्षलक्ष्मी तिष्ठत उभी असते. या शाश्वत संपत्तीने ते वैभवसंपन्न असतात. एवढेच नव्हे, तर असंख्य दरिद्री जीवांना मोक्षलक्ष्मी देऊन त्यांना ते राजाप्रमाणे वैभवसंपन्न करून सोडतात. (२१)

जे समर्थपणें उदार। जे कां अत्यंत दानशूर।
तयांचेनि हा ज्ञानविचार। दिधला न वचे ॥ २२ ॥

संत अत्यंत सामर्थ्यसंपन्न व उदारवृत्तीचे असतात. ते दानशूर असल्याने लोकांचे दु:ख पाहून त्यांना ज्ञानाचा विचार सांगितल्याशिवाय ते कसे राहू शकतील? (२२)

माहांराजे चक्रवर्ती। जाले आहेत पुढें होती।
परंतु कोणी सायोज्यमुक्ती। देणार नाहीं ॥ २३ ॥

जगात आजपर्यंत पुष्कळ चक्रवर्ती सम्राट झाले आहेत. सध्या आहेत व पुढेही होतील, पण त्यातील कोणीही सायुज्यमुक्ती देऊ शकत नाहीत. (२३)

जें त्रैलोकीं नाहीं दान। तें करिती संतसज्जन।
तयां संतांचे महिमान। काय म्हणौनि वर्णावें॥ २४॥

हे सायुज्यमुक्तीचे दान त्रैलोक्यात संतसज्जनांशिवाय कुणी देऊच शकत नाही. ते सहज देणाऱ्या संतांची थोरवी कोणत्या बरे शब्दांनी वर्णन करावी? (२४)

जें त्रैलोक्याहून वेगळें। जें वेदश्रुतीसी नाकळे।
तेंचि जयांचेनि वोळे। परब्रह्म अंतरीं ॥ २५ ॥

जे परब्रह्म या त्रैलोक्याहून वेगळे आहे, जे वेद व श्रुतींनाही जाणता येत नाही, असे परब्रह्म संतांच्या कृपेनेच साधकाच्या अंत:करणात प्रगट होते. (२५)

ऐसी संतांची महिमा। बोलिजे तितुकी उणी उपमा।
जयांचेनि मुख्य परमात्मा। प्रगट होये ॥ २६ ॥

असा हा संतांचा महिमा अगाध असल्याने तो वर्णन करण्यास कितीही उपमा दिल्या, तरी त्या अपुऱ्याच पडतात. संतांच्या मुळेच मुख्य परमात्मा प्रगट होतो. (२६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'संतस्तवननाम' समास पाचवा समाप्त.**

❑❑

## दशक १ : समास ६
## श्रोतेजनस्तवन

॥ श्रीराम ॥

आतां वंदूं श्रोते जन। भक्त ज्ञानी संत सज्जन।
विरक्त योगी गुणसंपन्न। सत्यवादी ॥ १ ॥

येथे जे श्रोतेजन बसले आहेत त्यांना मी वंदन करतो. भक्त, ज्ञानी, संतसज्जन, विरक्त, योगी, गुणसंपन्न व सत्यवादी असे हे श्रोते आहेत. (१)

येक सत्वाचे सागर। येक बुद्धीचे आगर।
येक श्रोते वैरागर। नाना शब्दरत्नांचे ॥ २ ॥

यांतील काही सत्वगुणांचा समुद्रच आहेत, तर कुणी बुद्धिमान आहेत. काही श्रोते नाना शब्दरत्नांची जणू खाणच आहेत. (२)

जे नानाअर्थांबृताचे भोक्ते।
जे प्रसंगी वक्तयाचे वक्ते।
नाना संशयाते छेदिते। निश्चई पुरुष ॥ ३ ॥

कुणी असे रसिक आहेत, की वक्त्याच्या प्रत्येक शब्दातील अर्थामृताचा रसास्वाद ते घेतात. तर काही असे विद्वान आहेत की वेळ पडल्यास कुठल्याही विषयावर उत्तम वक्तृत्व करू शकतात. काही असे निश्चयी पंडित आहेत की ते कुठल्याही शंकेचे निरसन करतात. (३)

ज्यांची धारणा अपार। जे ईश्वराचे अवतार।
नातरी प्रत्यक्ष सुरवर। बैसले जैसे ॥ ४ ॥

काहींची धारणाशक्ती अशी अपार आहे की, हे ईश्वराचेच अवतार आहेत. ते जेव्हा सभेत बसतात तेव्हा जणू प्रत्यक्ष देवच त्यांच्या रूपाने सभेत उपस्थित आहेत, असे वाटते. (४)

किं हे ऋषेश्वरांची मंडळी। शांतस्वरूप सत्वागळी।
जयांचेनि सभामंडळीं। परम शोभा ॥ ५ ॥

असे अत्यंत सात्त्विक व मूर्तिमंत शांतिस्वरूप श्रोते पाहिल्यावर वाटते की, जणू हे सर्व महान ऋषीश्वरच या सभेत येऊन बसले आहेत व त्यामुळे या सभेला अत्यंत शोभा आली आहे. (५)

ह्रदईं वेदगर्भ विलसे। मुखीं सरस्वती विळासे।
साहित्य बोलतां जैसे। भासती देवगुरु ॥ ६ ॥

वेदांचा खरा अर्थ तेच जाणत असतात, त्यांच्या जिह्वेवर जणू सरस्वती खेळत असते व ते काव्य, नाट्यादी साहित्यप्रकारांवर बोलू लागले म्हणजे वाटते की जणू देवगुरू बृहस्पतीच बोलत आहेत. (६)

जे पवित्रपणें वैश्वानर। जे स्फूर्तिकिरणाचे दिनकर।
ज्ञातेपणें दृष्टीसमोर। ब्रह्मांड नयें ॥ ७॥

काही श्रोते अग्नीप्रमाणे पवित्र आहेत, तर काही जणू सूर्यासारखे तेजस्वी असून स्फूर्तिरूपी किरण त्यांच्यातून सतत सर्वत्र फाकत आहेत. काही असे ज्ञाननिष्ठ की आत्मरूपी निमग्न असल्याने दृष्टीसमोर असणाऱ्या सृष्टीचेही त्यांना भान नाही. (७)

जे अखंड सावधान। जयांस त्रिकाळाचें ज्ञान।
सर्वकाळ निराभिमान। आत्मज्ञानी ॥ ८॥

काही अखंड सावधान आहेत, तर काही त्रिकाळज्ञानी आहेत, तर काही आत्मज्ञानी असून सर्वकाळ निरभिमानी आहेत. (८)

ज्यांचे दृष्टीखालून गेलें। ऐसें कांहींच नाहीं उरलें।
पदार्थमात्रांसी लक्षिलें। मनें जयांच्या ॥ ९॥

ज्यांच्या दृष्टीखालून गेली नाही अशी वस्तूच जगात नाही, असे काही सर्वज्ञ आहेत. त्यांच्या मनाने पदार्थमात्रांस जाणून घेतलेले असते. (९)

जें जें कांहीं आठवावें। तें तें तयांस पूर्वींच ठावें।
तेथें काये अनुवादावें। ज्ञातेपणेंकरूनी ॥ १०॥

बोलण्यासाठी म्हणून जे जे काही आठवावे, ते त्यांना पूर्वीच ज्ञात असते. तेव्हा शहाणपणाचा आव आणून त्यांच्यासमोर बोलावे तरी काय, हेच कळत नाही. (१०)

परंतु हे गुणग्राहिक। म्हणौन बोलतों नि:शंक।
भाग्यपुरुष काये येक। सेवीत नाहीं ॥ ११॥

परंतु काही भाग्यवान पुरुष गुणग्राही असतात. ते जे समोर येईल त्यातील उत्तमाचे ग्रहण करतात. म्हणून मी अगदी मोकळेपणाने हा ग्रंथ सांगत आहे. (११)

सदा सेविती दिव्यान्नें। पालटाकरणें आवेट अन्नें।
तैसींच माझीं वचनें। पराकृतें ॥ १२॥

जे सर्वदा दिव्यान्ने सेवन करतात, तेही रुचिपालट्यकरिता कधी कधी वीट न येणारे पदार्थ सेवन करतात, तशीच ते माझी प्राकृत वचने गोड मानून घेतील. (१२)

आपुले शक्तिनुसार। भावें पुजावा परमेश्वर।
परंतु पुजूं नये हा विचार। कोठेंचि नाहीं ॥ १३॥

प्रत्येकाने आपापल्या कुवतीनुसार श्रद्धेने परमेश्वरपूजन करावे असे सांगितले जाते, पण परमेश्वरपूजनच करू नये, हा विचार कुठेही सांगितलेला नाही. (१३)

तैसा मी येक वाग्दुर्बळ। श्रोते परमेश्वरचि केवळ।
यांची पूजा वाचाबरळ। करूं पाहे ॥ १४॥

त्याप्रमाणेच माझे श्रोते हे केवळ परमेश्वरस्वरूपच असल्याने मी वाचेने दुर्बळ असलो, तरी मला जमेल तशा ओबडधोबड शब्दांनी मी त्यांची पूजा करणार आहे. (१४)

वित्पत्ती नाहीं कळा नाहीं। चातुर्य नाहीं प्रबंद नाहीं।
भक्ति ज्ञान वैराग्य नाहीं। गौल्यता नाहीं वचनाची ॥ १५॥

माझ्याजवळ शास्त्रज्ञान नाही, कुठलीही कला नाही, चातुर्य नाही, प्रबंध लिहिण्याची योग्यता अथवा भक्ती, ज्ञान, वैराग्यादी गुण नाहीत, तसेच शब्दमाधुर्यही नाही. (१५)

ऐसा माझा वाग्विळास। म्हणौन बोलतों सावकाश।
भावाचा भोक्ता जगदीश। म्हणौनियां ॥ १६॥

माझा वाग्विलास हा असा आहे, पण जगदीश हा भावाचा भोक्ता असतो. हे जाणून मी स्वस्थ मनाने या ग्रंथरचनेस प्रवृत्त झालो आहे. (१६)

तुम्ही श्रोते जगदीशमूर्ति। तेथें माझी वित्पत्ती किती।
बुद्धिहीण अल्पमती। सलगी करितों ॥ १७॥

आपण सर्व श्रोते म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराच्या मूर्तीच आहात. माझी व्युत्पत्ती ती किती ? मी मंदबुद्धीचा, मूढ असा आहे आणि तरी आपल्याशी सलगी करीत आहे. (१७)

समर्थाचा पुत्र मूर्ख जगीं।
परी सामर्थ्य असे त्यांचे आंगीं।
तुम्हां संतांचा सलगी। म्हणौनि करितों ॥ १८॥

एखाद्या समर्थाचा पुत्र मूर्ख असला, तरी तो बापाची सलगी करू शकतो. तेवढे सामर्थ्य त्याच्या अंगी नक्कीच असते. तसाच मी तुमचा संतांचाच असल्याने तुमच्याशी सलगी करीत आहे. (१८)

व्याघ्र सिंह भयानक। देखोनि भयचकित लोक।
परि त्यांची पिलीं नि:शंक। तयांपुढें खेळती ॥ १९॥

व्याघ्र-सिंहादी हिंस्र पशूंना पाहून लोक भयचकित होतात. पण त्यांची पिल्ले नि:शंक मनाने त्यांच्यापुढे खेळत असतात. (१९)

तैसा मी संतांचा अंकित। तुम्हां संतांपासीं बोलत।
तरी माझी चिंता तुमचें चित्त। वाहेलच कीं ॥ २०॥

त्याप्रमाणे मी तुम्हा संतांचा अंकित असल्यानेच तुम्हांपाशी बोलत आहे. तुम्ही माझी निश्चितच काळजी वाहाल, अशी मला खात्री आहे. (२०)

आपलेंचि बोले वाउगें। त्याची संपादणी करणें लागे।
परंतु कांहीं सांगणें नलगे। न्यून तें पूर्ण करावें ॥ २१॥

आपलेच लेकरू काही चुकीचे बोलले, तर आई-बापांना त्यास सांभाळून घ्यावेच लागते. सांभाळून घ्या अशी विनवणी त्यांना करावी लागत नाही. (२१)

हें तों प्रीतीचें लक्षण। स्वभावेंचि करी मन।
तैसे तुम्ही संतसज्जन। मायेबाप विश्वाचे॥ २२॥

ते सांभाळून घेतात हे तर प्रेमाचे लक्षणच असते. ते स्वाभाविकपणेच तसे करीत असतात. तसेच तुम्ही संतसज्जन म्हणजे अवघ्या विश्वाचे मायबापच आहात. (२२)

माझा आशय जाणोनि जीवें। आतां उचित तें करावें।
पुढें कथेसि अवधान द्यावें। म्हणे दासानुदास ॥ २३॥

म्हणून माझा आशय जाणून जे उचित असेल ते करावे व आता पुढे जी कथा सांगेन तिकडे लक्ष द्यावे, अशी आपल्या दासांचाही दास असलेल्या माझी प्रार्थना आहे. (२३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रोतेजनस्तवननाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक १ : समास ७
## कवेश्वरस्तवन

॥ श्रीराम॥

आतां वंदूं कवेश्वर। शब्दसृष्टीचे ईश्वर।
नातरी हे परमेश्वर। वेदावतारी ॥ १॥

आता जे अत्यंत श्रेष्ठ असे कवी आहेत त्यांना मी वंदन करतो. ईश्वर सृष्टी उत्पन्न करतो त्याप्रमाणे हे शब्दांच्या साहाय्याने नवी सृष्टीच उत्पन्न करतात किंवा कवी म्हणजे जणू वेदरूपाने अवतरलेला परमेश्वरच होय. (१)

कीं हे सरस्वतीचें निजस्थान।
कीं हे नाना कळांचें जीवन।
नाना शब्दांचें भुवन। येथार्थ होये ॥ २॥

कवीश्वर म्हणजे जणू सरस्वतीचे स्वत:चे हक्काचे निवासस्थानच होय. नाना कलांचा विकास कवींच्यामुळेच होतो. अनेक शब्दांचे घर म्हणजे कवी, असे म्हटले तरी ते योग्य ठरेल. (२)

कीं हे पुरुषार्थाचें वैभव। कीं हे जगदेश्वराचें महत्त्व।
नाना लाघवें सत्कीर्तीस्तव। निर्माण कवी ॥ ३॥

जगात पुरुषार्थाचे वैभव निर्माण करण्याचे, जगदीश्वराचे महत्त्व वाढविण्याचे कार्य नाना युक्त्या योजून, संतांची कीर्ती वर्णन करून कवी करतात. (३)

कीं हे शब्दरत्नाचे सागर।
कीं हे मुक्तांचें मुक्त सरोवर।
नाना बुद्धीचे वैरागर। निर्माण जाले ॥ ४॥

कवी हे शब्दरत्नांचे सागर असतात. मुक्तांच्या मुक्तावस्थेचे वर्णन आपल्या प्रतिभेच्या जोरावर कवीच करू शकतात. बुद्धीच्या विविध विलासांचे उत्पत्तिस्थान कवीच असतात. या सर्व अलौकिक गोष्टी करून दाखविण्यासाठीच जणू ते जन्मास येतात. (४)

अध्यात्मग्रंथांची खाणी। कीं हे बोलके चिंतामणी।
नाना कामधेनूचीं दुभणीं। वोळलीं श्रोतयांसी ॥ ५॥

कवी हे अध्यात्मग्रंथांची खाण असतात, चिंतामणीमुळे इच्छिलेल्या वस्तूची प्राप्ती होते; पण तो अचेतन असतो. कवीही इच्छिलेल्या वस्तूची प्राप्ती आपल्या शब्दरत्नांच्या साहाय्याने करून देतात. ते चेतन असतात, म्हणून त्यांना बोलके चिंतामणी असे म्हटले आहे किंवा कवीचे काव्य म्हणजे अनेक कामधेनूंनी स्रवलेल्या अमृतधारा असे समजावे. (५)

कीं हे कल्पनेचे कल्पतरु ।
कीं हे मोक्षाचे मुख्य पडीभरु ।
नाना सायोज्यतेचे विस्तारु । विस्तारले ॥ ६ ॥

किंवा कवी म्हणजे कल्पिलेले तत्काळ देणारे कल्पवृक्षच आहेत किंवा मोक्षप्राप्तीचे मार्गदर्शक नावाडीच आहेत किंवा सायुज्य मुक्तीचा खूप मोठा विस्तारच आहेत. (६)

कीं हा परलोकींचा निजस्वार्थु ।
कीं हा योगियांचा गुप्त पंथु ।
नाना ज्ञानियांचा परमार्थु । रूपासि आला ॥ ७ ॥

किंवा परलोकी उत्तम गती मिळवून देणारा आपला निजस्वार्थ म्हणजे कवी आहेत किंवा योगी लोकांचा अत्यंत गुप्त योगमार्ग अथवा ज्ञानी लोकांचा परमार्थच या कवींच्या रूपाने प्रगट झाला आहे. (७)

कीं हे निरंजनाची खूण । कीं हे निर्गुणाची वोळखण ।
मायाविलक्षणाचें लक्षण । ते हे कवी ॥ ८ ॥

निर्गुण निराकार असे परब्रह्म मायातीत स्वरूपाचे असल्याने त्याची खूण पटणे अशक्य कोटीतलेच असते. कारण जेथे इंद्रिये, मन, बुद्धी आदींचाही प्रवेश होत नाही ती वस्तू शब्दांत कशी वर्णन करणार? पण कवी हे आत्मानुभवी असल्याने आपल्या प्रतिभेच्या जोरावर ते त्या मायातीत परब्रह्माची लक्षणेही वर्णन करतात. (८)

कीं हा श्रुतीचा भावगर्भ । कीं हा परमेश्वराचा अलभ्य लाभ ।
नातरी होये सुल्लभ । निजबोध कविरूपें ॥ ९ ॥

कवी हे श्रुतींचा भावार्थ जाणतात आणि शब्दांच्या साहाय्याने सामान्य लोकांसाठी निजबोधरूपाने तो प्रकट करून परमार्थ सुलभ करीत असल्याने कवींची भेट होणे म्हणजे जणू साक्षात परमेश्वराचीच अलभ्य भेट होण्यासारखे आहे. (९)

कवि मुमुक्षाचें अंजन । कवि साधकांचें साधन ।
कवि सिद्धांचें समाधान । निश्चयात्मक ॥ १० ॥

कवी हे मुमुक्षूंना विवेकरूपी दृष्टी देणारे जणू नेत्रांजनच होय किंवा साधकांना साधनास प्रवृत्त करणारे ते साधनरूपच आहेत किंवा सिद्ध पुरुषांचे निश्चयात्मक समाधान म्हणजेच कवी. (१०)

कवि स्वधर्माचा आश्रयो । कवि मनाचा मनोजयो ।
कवि धार्मिकाचा विनयो । विनयकर्ते ॥ ११ ॥

कवी आपल्या काव्यातून लोकांना त्यांच्या स्वधर्मासंबंधी मार्गदर्शन करीत असतात म्हणून त्यांना स्वधर्माचा आधार म्हटले आहे, तर मनोजय कसा करावा यांचेही मार्गदर्शन ते करतात म्हणून त्यांनाच येथे मनोजय म्हटले आहे; तसेच धर्मनिष्ठांच्या ठिकाणी जो विनय आढळतो, तोही एकप्रकारे कवींच्या काव्याचाच परिणाम असतो म्हणून त्यांना येथे विनयकर्ते असे समर्थ म्हणत आहेत. (११)

कवि वैराग्याचें संरक्षण । कवि भक्तांचें भूषण ।
नाना स्वधर्मरक्षण । ते हे कवी ॥ १२ ॥

कवींच्या काव्यामुळेच लोकांना वैराग्याचे महत्त्व कळून ते अंगी बाणावे म्हणून प्रयत्न करावेसे वाटतात म्हणजे याप्रकारे कवीच वैराग्याचे संरक्षण करणारे ठरतात. तर भक्तांच्या थोरवीचे वर्णन करून ते त्यांची कीर्ती वाढवितात म्हणून त्यांना भक्तांचे भूषण असे म्हटले आहे. कवींमुळे लोकांना आपापल्या वर्णाश्रमादी धर्माचे ज्ञान होते व ते स्वधर्माचरण करण्यास प्रवृत्त होतात. म्हणून त्यांना स्वधर्मसंरक्षण असे म्हटले आहे. (१२)

कवि प्रेमळांची प्रेमळ स्थिती ।
कवि ध्यानस्थांची ध्यानमूर्ती ।
कवि उपासकांची वाढ कीर्ती । विस्तारली ॥ १३ ॥

प्रेमी भक्तांच्या शब्दातीत प्रेमावस्थेचे वर्णन कवीच करतात, तर ध्यान कसे करावे यांचे सांगोपांग वर्णन करून ध्याननिष्ठ भक्तांना इष्ट देवतेच्या ध्यानात निमग्न होण्यास साहाय्य करतात. भक्तांची, उपासकांची श्रेष्ठ कीर्तीही कवींच्यामुळेच सर्वदूर पसरते. (१३)

नाना साधनाचें मूळ। कवि नाना प्रेत्नाचें फळ।
नाना कार्यसिद्धी केवळ। कविचेनि प्रसादें ॥ १४॥

कवींच्यामुळेच लोकांना नाना साधनांची माहिती मिळते, काय प्रयत्न केले असता काय फळ मिळते हे कळते, एवढेच नव्हे, तर कवींच्या रचनेमुळेच विविध कार्यांत सिद्धी प्राप्त होते. (१४)

आधीं कवीचा वाग्विळास। तरी मग श्रवणीं तुंबळे रस।
कवीचेनि मतिप्रकाश। कवित्वास होये ॥ १५॥

कवींचा वाग्विलास सुरू झाला की विविध रसांची उत्पत्ती ऐकणाऱ्या श्रोत्यांच्या ठिकाणी होऊन त्यांना रसास्वाद घडतो, तर त्यांच्या श्रेष्ठ प्रतीच्या काव्यामुळे लोकांच्या ठिकाणी बुद्धीचा प्रकाश पडून तेही कवी बनू लागतात. (१५)

कवि वित्पन्नाची योग्यता। कवि सामर्थ्यवंतांची सत्ता।
कवि विचक्षणाची कुशळता। नाना प्रकारें ॥ १६॥

कवीश्वरांच्या काव्यामुळेच विद्वानांची योग्यता समजते. सत्ताधारी पुरुषांचे सामर्थ्य वाढीस लागते, तर हुषार पुरुषांचे चातुर्य कवी अनेक प्रकारे वर्णन करतात. (१६)

कवि कवित्वाचा प्रबंद। कवि नाना धाटी मुद्रा छंद।
कवि गद्यपद्यें भेदाभेद। पदत्रासकर्ते ॥ १७॥

कवी नाना प्रकारचे प्रबंध रचतात. काव्याचे नाना प्रकार धाटी, मुद्रा, छंद, प्रास उपयोगात आणतात, गद्यपद्यात सुंदर अलंकारयुक्त अनेक प्रकारची रचना करतात. कित्येक नवीन प्रकारही सुरू करतात. (१७)

कवि सृष्टीचा आळंकार। कवि लक्ष्मीचा शृंगार।
सकळ सिद्धींचा निर्धार। ते हे कवी ॥ १८॥

या संपूर्ण सृष्टीत कवी अलंकारासारखे शोभून दिसतात, त्यांच्यामुळेच नाना आविष्कार प्रगट होतात; कवी म्हणजे मोक्षलक्ष्मीचा जणू मूर्तिमंत शृंगारच होत आणि सर्व प्रकारच्या सिद्धींचा निर्धारही कवीश्वरच असतात. (१८)

कवि सभेचें मंडण। कवि भाग्याचें भूषण।
नाना सुखाचें संरक्षण। ते हे कवी ॥ १९॥

कवींमुळे सभा शोभून दिसते. ते भाग्याचे भूषण आणि नाना प्रकारचे सुख देणारे म्हणून सुखाचे संरक्षणरूपच असतात. (१९)

कवि देवांचे रूपकर्ते। कवि ऋषींचें महत्त्ववर्णिते।
नाना शास्त्रांचे सामर्थ्या ते। कवि वाखाणिती ॥ २०॥

कवींमुळे निराकार परमेश्वरास रूप प्राप्त होते. ऋषीश्वरांची कीर्ती गाऊन तेच त्यांचे महत्त्व वाढवितात व कवींमुळेच नाना शास्त्रांचा विकास होऊन ते त्यांचे सामर्थ्य वाढवतात. (२०)

नस्ता कवीचा व्यापार। तरी कैंचा अस्ता जगोद्धार।
म्हणौनि कवि हे आधार। सकळ सृष्टीसी ॥ २१॥

कवीश्वरांनी उत्कृष्ट काव्यरचना केली नसती, तर जगाचा उद्धार कसा बरे झाला असता? म्हणून या सकल सृष्टीचा कवीच मुख्य आधार आहेत. (२१)

नाना विद्या ज्ञातृत्व कांहीं। कवेश्वरेंविण तों नाहीं।
कविपासून सर्वहि। सर्वज्ञता ॥ २२॥

कवी नसते तर चौदा विद्या, विविध प्रकारचे ज्ञान यांचा प्रचार व प्रसार कसा झाला असता? म्हणून सर्व प्रकारच्या ज्ञानप्रसारास कवीच कारणीभूत आहेत. (२२)

मागां वाल्मीक व्यासादिक। जाले कवेश्वर अनेक ।
तयांपासून विवेक। सकळ जनासी ॥ २३॥

पूर्वी वाल्मीकी, व्यास आदी अनेक श्रेष्ठ कवी होऊन गेले. त्यांनीच लोकांना विवेक शिकवला. (२३)

पूर्वीं काव्यें होतीं केलीं। तरीच वित्पत्ती प्राप्त जाली।
तेणें पंडिताआंगीं बाणली। परम योग्यता ॥ २४॥

त्यांच्यासारख्यांनी केलेली उत्कृष्ट काव्ये अभ्यासल्यामुळेच पंडितांच्या ठिकाणी विद्वत्ता बाणून त्यांना परम योग्यता प्राप्त झाली. (२४)

ऐसें पूर्वीं थोर थोर। जाले कवेश्वर अपार।
आतां आहेत पुढें होणार। नमन त्यांसी ॥ २५॥

असे पूर्वी जे थोर कवीश्वर होऊन गेले, सांप्रतही जे आहेत व पुढेही जे होतील, त्या सर्वांना मी नमन करतो. (२५)

नाना चातुर्याच्या मूर्ती। कीं हे साक्षात् बृहस्पती।
वेद श्रुती बोलों म्हणती। ज्यांच्या मुखें ॥ २६॥

हे कवीश्वर म्हणजे नाना प्रकारचे मूर्तिमंत चातुर्यच होय. अथवा वेद व श्रुती ज्यांच्या मुखाने प्रगट होण्याची इच्छा करतात, असे हे साक्षात जणू बृहस्पतीच आहेत. (२६)

परोपकाराकारणें । नाना निश्चय अनुवादणें।
सेखीं बोलिले पूर्णपणें । संशयातीत ॥ २७॥

केवळ परोपकारासाठीच संशयातीत असे नाना प्रकारचे सिद्धान्त विस्तारपूर्वक कवी आपल्या काव्यांतून सांगतात. (२७)

कीं हे अमृताचे मेघ वोळले ।
कीं हे नवरसाचे वोघ लोटले ।
नाना सुखाचें उचंबळलें । सरोवर हे ॥ २८॥

हे कवी म्हणजे जणू श्रोत्यांवर कृपावृष्टी करण्यासाठी आलेले अमृताचे मेघ आहेत. किंवा कवी म्हणजे नवरसांचे मोठमोठे प्रवाहच आहेत किंवा नाना प्रकारच्या सुखांनी उचंबळून येणारी ही सरोवरे आहेत. (२८)

कीं हे विवेकनिधीचीं भांडरें । प्रगट जालीं मनुष्याकारें।
नाना वस्तूचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ २९॥

कवींचे अंतरंग निरनिराळ्या वस्तूंच्या विचाराने भरलेले असते. म्हणून त्यांना मनुष्यरूपांनी प्रगटलेली विवेकरूपी रत्नांची भांडारे असल्याचे समर्थ म्हणतात. (२९)

कीं हे आदिशक्तीचें ठेवणें ।
नाना पदार्थास आणी उणें ।
लाधलें पूर्व संचिताच्या गुणें । विश्वजनासी ॥ ३०॥

किंवा हे कवीश्वर म्हणजे साक्षात आदिशक्तीच्या मर्मबंधातील ठेवीप्रमाणे असून, जगातील इतर पदार्थांना तुच्छ ठरविणारी ही ठेव, लोकांना त्यांच्या पूर्वपुण्यसंचयानेच प्राप्त झालेली असते. (३०)

कीं हे सुखाचीं तारुवें लोटलीं ।
आक्षै आनंदें उतटलीं ।
विश्वजनास उपेगा आलीं । नाना प्रयोगाकारणें ॥ ३१॥

कवीश्वर म्हणजे अक्षय आनंदाने काठोकाठ भरलेली सुखाची 'जहाजेच' असून ती या जगात नाना प्रकारच्या प्रयोगांसाठी लोकांच्या उपयोगी पडत आहेत. (३१)

कीं हे निरंजनाची संपत्ती । कीं हे विराटाची योगस्थिती।
नातरी भक्तीची फळश्रुती । फळास आली ॥ ३२॥

कवी म्हणजे अत्यंत विशुद्ध अशा परमात्म्याची संपत्ती आहे किंवा विश्वास व्यापून असणाऱ्या विराट पुरुषाची ती जणू योगस्थितीच आहे किंवा त्यांच्या रूपाने जणू भक्तीची फलश्रुतीच फळास आली आहे. (३२)

कीं हा ईश्वराचा पवाड । पाहातां गगनाहून वाड।
ब्रह्मांडरचनेहून जाड । कविप्रबंदरचना ॥ ३३॥

किंवा आकाशाहूनही विशाल व व्यापक अशी ही परमेश्वराची कीर्ती आहे. किंवा या विशाल ब्रह्मांडरचनेहूनही थोर अशी कवींची प्रबंधरचना आहे. (३३)

आतां असो हा विचार । जगास आधार कवेश्वर।
तयांसी माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३४॥

असे म्हणावेसे वाटते की असे हे कवीश्वर सर्व जगाचाच आधार आहेत, म्हणून आता हे वर्णन मी येथेच थांबवितो आणि साष्टांग भावे त्यांना नमस्कार करतो. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कवेश्वरस्तवननाम' समास सातवा समाप्त.**

❑ ❑

**दशक १ : समास ८**

## सभास्तवन

॥ श्रीराम ॥

आतां वंदूं सकळ सभा । जये सभेसी मुक्ती सुल्लभा।
जेथें स्वयें जगदीश उभा । तिष्ठतु भरें ॥ १॥

श्री समर्थ म्हणतात की, आता संपूर्ण सभेला मी वंदन करतो, जेथे मुक्ती अत्यंत सुलभ असते व जेथे स्वतः जगदीश प्रेमभराने तिष्ठत उभा असतो. (१)

**श्लोक**

नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ।
मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद॥

नाहीं वैकुंठीचा ठाईं । नाहीं योगियांचा हृदईं।
माझे भक्त गाती ठाईंठाईं । तेथें मी तिष्ठतु नारदा ॥ २॥

भगवान म्हणतात की, 'नारदा, मी वैकुंठात, योग्यांच्या हृदयात (अथवा सूर्यबिंबामध्ये) राहात नाही, तर माझे भक्त ज्या ज्या ठिकाणी माझी कीर्ती गातात, तेथे मी उभा असतो. (२)

याकारणें सभा श्रेष्ठ। भक्त गाती तें वैकुंठ।
नामघोषें घडघडाट। जयजयकारें गर्जती ॥ ३॥

असे स्वत: भगवंतांनी सांगितले असल्याने ज्या ठिकाणी भक्त मोठ्या प्रेमाने भगवंताच्या नामाचा घोष करून जयजयकार करून त्याची कीर्ती गात असतात, ती सभा श्रेष्ठ असून ती म्हणजेच खरे वैकुंठ होय. (३)

प्रेमळ भक्तांचीं गायनें। भगवत्कथा हरिकीर्तनें।
वेदव्याख्यान पुराणश्रवणें। जेथें निरंतर ॥ ४॥

अशा सभेमध्ये प्रेमळ भक्तांचे गायन, भगवत्-कथा, हरिकीर्तन, वेदांवरील व्याख्यान, तसेच पुराण-श्रवण इत्यादी कार्यक्रम निरंतर चालू असतात. (४)

परमेश्वराचे गुणानुवाद। नाना निरूपणाचे संवाद।
अध्यात्मविद्या भेदाभेद। मथन जेथें ॥ ५॥

तेथे परमेश्वराचे गुणानुवाद गायले जातात विविध विषयांवर सुंदर निरूपण केले जाते. तसेच अध्यात्मविद्येतील अनेक भेदांवर चर्चा केली जाते. (५)

नाना समाधानें तृप्ती। नाना आशंकानिवृत्ती।
चित्तीं बैसे ध्यानमूर्ति। वाग्विळासें ॥ ६॥

अशा सभेमध्ये नाना प्रकारच्या शंका-कुशंका तसेच तर्क-कुतर्कांचे समाधानकारक निरसन केले जाते. त्यामुळे श्रोत्यांना समाधान लाभते. अशाप्रकारे व्याख्यान-प्रवचनादिकांमुळे श्रोत्यांच्या अंत:करणात त्यांच्या इष्टदेवतेची मूर्ती स्थिर होण्यास मदत होते. (६)

भक्त प्रेमळ भाविक। सभ्य सखोल सात्विक।
रम्य रसाळ गायक। निष्ठावंत ॥ ७॥

अशा सभेत प्रेमळ भाविक भक्त, गंभीर वृत्तीचे सभ्य सात्त्विक लोक, तसेच रम्य रसयुक्त गायन करणारे निष्ठावंत गायक एकत्रित येतात. (७)

कर्मसीळ आचारसीळ। दानसीळ धर्मसीळ।
सुचिस्मंत पुण्यसीळ। अंतरशुद्ध कृपाळु ॥ ८॥

या सभेत कर्मनिष्ठ, आचारनिष्ठ, दानशील, धर्मनिष्ठ, पवित्र आचरणाचे पुण्यशील व ज्यांचे अंत:करण अत्यंत शुद्ध आहे व जे कृपाळू आहेत असे लोक संमिलित होतात.(८)

योगी वीतरागी उदास। नेमक निग्रह तापस।
विरक्त निस्पृह बहुवस। आरण्यवासी ॥ ९॥

दंडधारी जटाधारी। नाथपंथी मुद्राधारी।
येक बाळब्रह्मच्यारी। योगेश्वर ॥ १०॥

तेथे योगी, वैराग्ययुक्त, उदासीन, नियमनिष्ठ, निग्रही, तापसी, विरक्त, नि:स्पृह, बराच काळ अरण्यात राहाणारे दंडधारी, जटाधारी, नाथपंथी, मुद्रा धारण करणारे वैष्णव, तर कुणी बालब्रह्मचारी वा योगी असे नाना प्रकारचे लोक येतात. (९-१०)

पुरश्चरणी आणि तपस्वी। तीर्थवासी आणि मनस्वी।
महायोगी आणि जनस्वी। जनासारखे ॥ ११॥

कुणी पुरश्चरण करणारे तर कुणी तपस्वी, कुणी तीर्थक्षेत्रात राहाणारे, तर कुणी मनाचा निग्रह करणारे, कुणी महायोगी तर जनात राहून जनांवर स्वामित्व गाजविणारे, लोकांचे श्रद्धास्थान असणारे असतात. (११)

सिद्ध साधु आणी साधक। मंत्रयंत्रशोधक।
येकनिष्ठ उपासक। गुणग्राही ॥ १२॥

सिद्ध, साधू, साधक, मंत्र-यंत्र करून देणारे, कुणी एकनिष्ठ उपासक, तर कुणी गुणग्राही असतात. (१२)

संत सज्जन विद्वज्जन। वेदज्ञ शास्त्रज्ञ माहाजन।
प्रबुद्ध सर्वज्ञ समाधान। विमळकर्ते ॥ १३॥

येथे संत, सज्जन, विद्वान, वेदज्ञ, शास्त्रज्ञ, महाजन, ज्ञानी, सर्वज्ञ, तर कुणी शुद्ध समाधान करणारे असतात. (१३)

योगी वित्पन्न ऋषेश्वर। धूर्त तार्किक कवेश्वर।
मनोजयाचे मुनेश्वर। आणी दिग्वल्की ॥ १४॥

योगी, विद्वान, ऋषीश्वर, तर कुणी धूर्त, तार्किक, कवीश्वर, मनोनिग्रही मुनिश्रेष्ठ, तर काही दिगंबरही असतात. (१४)

ब्रह्मज्ञानी आत्मज्ञानी। तत्त्वज्ञानी पिंडज्ञानी।
योगाभ्यासी योगज्ञानी। उदासीन ॥ १५॥

ब्रह्मज्ञानी, आत्मज्ञानी, तत्त्वज्ञानी, पिंडज्ञानी, योगाभ्यासी, योगज्ञानी, उदासीन असे नाना प्रकारचे लोक असतात.(१५)

पंडित आणी पुराणिक। विद्वांस आणी वैदिक।
भट आणी पाठक। येजुर्वेदी ॥ १६॥

कुणी पंडित तर कुणी पुराणिक तर कुणी विद्वान तर कुणी वैदिक, भट, पाठक, यजुर्वेदी इत्यादी नाना लोक एकत्र येतात. (१६)

**माहाभले माहाश्रोत्री। याज्ञिक आणी आग्नहोत्री।**
**वैद्य आणी पंचाक्षरी। परोपकारकर्ते ॥ १७॥**

अती चांगले, महाश्रोत्री, याज्ञिक, अग्निहोत्री, वैद्य व पंचाक्षरी यांच्यासारखे परोपकारी लोकही असतात. (१७)

**भूत भविष्य वर्तमान। जयांस त्रिकाळाचें ज्ञान।**
**बहुश्रुत निराभिमान। निरापेक्षी ॥ १८॥**

काही भूत, भविष्य, वर्तमानकाळाचे ज्ञान असणारे त्रिकालज्ञ असतात, तर काही बहुश्रुत, काही निरभिमानी व काही अगदी निरपेक्ष असतात. (१८)

**शांती क्षमा दयासीळ। पवित्र आणी सत्वसीळ।**
**अंतरशुद्ध ज्ञानसीळ। ईश्वरी पुरुष ॥ १९॥**

शांती, क्षमा, दयाशील, पवित्र, सत्त्वशील, शुद्ध अंत:करणाचे, ज्ञाननिष्ठ जणू ईश्वरी अवतार असेही काही असतात. (१९)

**ऐसे जे कां सभानायेक। जेथे नित्यानित्यविवेक।**
**त्यांचा महिमा अलोलिक। काय म्हणोनि वर्णावा॥ २०॥**

अशा प्रकारचे जे सभानायक असतात, जेथे नित्यानित्य विवेक असतो, त्यांचा अलौकिक महिमा कसा बरे वर्णन करता येईल? (२०)

**जेथें श्रवणाचा उपाये। आणी परमार्थसमुदाये।**
**तेथें जनासी तरणोपाये। सहजचि होये ॥ २१॥**

जेथे असा परमार्थसमुदाय असतो त्या सभेत श्रवणाचा लाभ घडला, तर सामान्य लोकांनाही भवसागर तरून जाण्याचा उपाय अगदी सहज प्राप्त होतो. (२१)

**उत्तम गुणांची मंडळी। सत्त्वधीर सत्त्वागळी।**
**नित्य सुखाची नव्हाळी। जेथें वसे ॥ २२॥**

अशा सभेत सर्व उत्तम गुणांची मंडळी, सत्त्वशील, सत्त्वनिष्ठ एकत्र जमतात, त्यामुळे तेथे नित्य सुखप्राप्तीच होते. (२२)

**विद्यापात्रें कळापात्रें। विशेष गुणांची सत्पात्रें।**
**भगवंताचीं प्रीतिपात्रें। मिळालीं जेथें ॥ २३॥**

तेथे विद्यासंपन्न, कलासंपन्न, विशेष गुणसंपन्न व भगवंतास अत्यंत प्रिय असणारे लोक एकत्रित येतात. (२३)

**प्रवृत्ती आणी निवृत्ती। प्रपंची आणी परमार्थी।**
**गृहस्ताश्रमी वानप्रहस्ती। संन्यासादिक ॥ २४॥**

प्रवृत्त, निवृत्त, प्रपंची, परमार्थी, गृहस्थाश्रमी, वानप्रस्थी आणि संन्यासी तेथे असतात. (२४)

**वृद्ध तरुण आणी बाळ। पुरुष स्त्रियादिक सकळ।**
**अखंड ध्याती तमाळनीळ। अंतर्यामीं ॥ २५॥**

तेथे वृद्ध, तरुण, बाल, स्त्रिया, पुरुष आदी सर्वच श्याम-वर्ण भगवान विष्णूचे हृदयात अखंड ध्यान करतात. (२५)

**ऐसे परमेश्वराचे जन। त्यांसी माझे अभिवंदन।**
**ज्यांचेनि समाधान। अकस्मात बाणे ॥ २६॥**

असे जे परमेश्वराला प्रिय असणारे लोक आहेत, त्यांना मी अभिवंदन करतो. त्यांच्या सहवासाने तत्काळ समाधान मिळून ते स्थिर होते. (२६)

**ऐसिये सभेचा गजर। तेथें माझा नमस्कार।**
**जेथें नित्य निरंतर। कीर्तन भगवंताचें ॥ २७॥**

जेथे नित्य निरंतर भगवंताच्या कीर्तनाचा गजर होत असतो, अशा सभेस माझा नमस्कार असो. (२७)

**जेथे भगवंताच्या मूर्ती। तेथें पाविजे उत्तम गती।**
**ऐसा निश्चय बहुतां ग्रंथीं। महंत बोलिले ॥ २८॥**

जेथे अशा प्रकारे भगवंताच्या मूर्तिस्वरूप सत्पुरुष असतात, तेथे गेले असता सहजच उत्तम गती प्राप्त होते, असे अनेक संत-महंतांनी अनेक ग्रंथांतून ठामपणे सांगितले आहे. (२८)

**कल्लौ कीर्तन वरिष्ठ। जेथें होय ते सभा श्रेष्ठ।**
**कथाश्रवणें नाना नष्ट। संदेह मावळती ॥ २९॥**

कलियुगात हरिकीर्तन हेच सर्वोत्कृष्ट साधन असून जेथे हरिकीर्तन होते, तीच सभा श्रेष्ठ होय. तेथील श्रवणाने नाना प्रकारचे वाईट संदेह नाहीसे होतात. (२९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सभास्तवननाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १ : समास ९

# परमार्थस्तवन

॥ श्रीराम ॥

**आतां स्तऊं हा परमार्थ। जो साधकांचा निजस्वार्थ।**
**नांतरी समर्थामध्यें समर्थ। योग हा ॥ १ ॥**

आता परमार्थाचे गुणवर्णन करून सांगतो. कारण परमार्थ हेच साधकांचे मुख्य ध्येय असून मानवी जीवनात सर्वोत्तम समर्थ योग परमार्थच आहे. (१)

**आहे तरी परम सुगम। परी जनासी जाला दुर्गम।**
**कां जयाचें चुकलें वर्म। सत्समागमाकडे ॥ २ ॥**

खरे पाहिले तर परमार्थ अत्यंत सोपा आहे. संत-समागम केला तर त्याची सहज प्राप्ती होते; पण लोकांना हे मर्म कळत नाही. त्यामुळे त्यांना तो अति दुर्गम वाटतो. (२)

**नाना साधनांचे उधार। हा रोकडा ब्रह्मसाक्षात्कार।**
**वेदशास्त्रीं जें सार। तें अनुभवास ये ॥ ३ ॥**

परब्रह्मप्राप्तीची अनेक साधने आहेत, पण त्यांचे फल कालांतराने मिळते; पण संतसमागम हा रोकडा व्यवहार आहे. म्हणजे त्याने ब्रह्मसाक्षात्कार हे फळ तत्काळ मिळते. वेदशास्त्रांचे जे सार, तो ब्रह्मसाक्षात्कार तत्काळ अनुभवास येतो. (३)

**आहे तरी चहूंकडे। परी अणुमात्र दृष्टी न पडे।**
**उदास परी येकीकडे। पाहातां दिसेना ॥ ४ ॥**

तसे पाहिले तर परमार्थ म्हणजे परब्रह्म हे सर्वत्र व्यापून राहिलेले आहे, पण पाहावयास गेले तर अणुमात्रही दृष्टीस पडत नाही. सर्वसंगपरित्याग करून एकांतात राहून प्रयत्न केला तरी ते दिसत नाही. (४)

**आकाशमार्गी गुप्त पंथ। जाणती योगिये समर्थ।**
**इतरांस हा गुह्यार्थ। सहसा न कळे ॥ ५ ॥**

जे योगी असतात, तेच सुषुम्ना नाडीद्वारे षट्चक्रे भेदून हृदयाकाशमार्गाने गुप्तपणे स्वस्वरूपदर्शन करू शकतात. त्यांच्या ठिकाणीच या मार्गाचे ज्ञान व तो आक्रमण्याची क्षमता असते. सामान्य लोकांना हे सहसा कळत नाही. (५)

**साराचेंहि निजसार। अखंड अक्षै अपार।**
**नेऊं न सकती तश्कर। कांहीं केल्या ॥ ६ ॥**

परमार्थ हा सर्व सारांचेही निजसार असून तो अखंड, अक्षय व अपार असा परब्रह्मस्वरूपच असतो. त्यास कुणी चोरू शकत नाही. (६)

**तयास नाही राजभये। अथवा नाहीं अग्निभये।**
**अथवा स्वापदभये। बोलोंच नये ॥ ७ ॥**

त्यास राजभय नाही, अग्निभय नाही अथवा श्वापदभय नाही. असल्या भयाची गोष्टच कुणी बोलू नये. (७)

**परब्रह्म तें हालवेना। अथवा ठावहि चुकेना।**
**काळांतरीं चळेना। जेथीचा तेथें ॥ ८ ॥**

परब्रह्म आपल्या जागेवरून हलत नाही, तसेच दुसरे कुणीही त्याला हलवू शकत नाही, कितीही काळ गेला तरी ते आपले स्थान सोडत नाही. जिथल्या तिथे स्थिर असते. (८)

**ऐसें तें निज ठेवणें। कदापि पालटों नेणें।**
**अथवा नव्हे आदिक उणें। बहुतां काळें ॥ ९ ॥**

अशी ती अगदी स्वत:ची खास ठेव आहे. त्यात कधीही परिवर्तन होत नाही, अथवा कितीही काळ लोटला तरी त्यात अधिक-उणे होत नाही. (९)

**अथवा तें घसवटेना। अथवा अदृश्य होयेना।**
**नातरी पाहातां दिसेना। गुरुअंजनेंविण ॥ १० ॥**

त्याचप्रमाणे ते झिजतही नाही वा अदृश्यही होत नाही. पण असे असून गुरुकृपेच्या अंजनाशिवाय पाहू गेले तर ते दिसतही नाही. (१०)

**मागां योगिये समर्थ। त्यांचाहि निजस्वार्थ।**
**यासी बोलिजे परमार्थ। परमगुह्य म्हणौनि ॥ ११ ॥**

पूर्वीही जे सामर्थ्यसंपन्न योगी होऊन गेले, त्यांचाही निजस्वार्थ परमार्थ हाच होता. परमार्थ परम गुप्त असतो, म्हणूनच त्यास परमार्थ म्हणतात. (११)

जेंहीं शोधून पाहिला। त्यासी अर्थ सांपडला।
येरां असोनि अलभ्य जाला। जन्मोजन्मीं ॥ १२ ॥

ज्यांनी त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला, त्यांना त्याची प्राप्ती झाली. जे असा प्रयत्नच करीत नाहीत त्यांना तो जवळ असूनही कित्येक जन्म गेले तरी त्याची प्राप्ती होत नाही. (१२)

अपूर्वता या परमार्थाची। वार्ता नाहीं जन्ममृत्याची।
आणि पदवी सायोज्यतेची। सन्निधचि लाभे ॥ १३ ॥

हा परमार्थ फार अपूर्व आहे. त्याच्यापाशी जन्ममृत्यूची वार्ताही नसते. उलट बसल्या ठिकाणी अगदी सहज सायुज्यतेची योग्यता परमार्थामुळे प्राप्त होते. (१३)

माया विवेकें मावळे। सारासार विचार कळे।
परब्रह्म तेंहि निवळे। अंतर्यामीं ॥ १४ ॥

सारासार विवेकामुळे मायेचे पटल नाहीसे होते व अंतर्यामी परब्रह्माचा साक्षात्कार होतो. (१४)

ब्रह्म भासलें उदंड। ब्रह्मीं बुडालें ब्रह्मांड।
पंचभूतांचें थोतांड। तुछ्य वाटे ॥ १५ ॥

सर्वत्र ते ब्रह्मच व्यापून आहे अशी अनुभूती येऊन त्या ब्रह्मात जणू ब्रह्मांड बुडून जाते. आणि पंचमहाभूतांचा हा अफाट पसारा तुच्छ वाटू लागतो. (१५)

प्रपंच वाटे लटिका। माया वाटे लापणिका।
शुद्ध आत्मा विवेका-। अंतरीं आला ॥ १६ ॥

प्रपंच खोटा वाटतो, माया मिथ्या वाटते व विवेकामुळे शुद्ध आत्मस्वरूप अंतरी प्रगट होते. (१६)

ब्रह्मस्थित बाणतां अंतरीं। संदेह गेला ब्रह्मांडाबाहेरी।
दृश्याची जुनी जर्जरी। कुहिट जाली ॥ १७ ॥

अंतरंगात स्वस्वरूपानुभव आला म्हणजे संशय कुठल्याकुठे नाहीसा होतो. हे सर्व दृश्य विश्व जुनाट, फाटलेले, विटलेले वाटू लागते. (१७)

ऐसा हा परमार्थ। जो करी त्याचा निजस्वार्थ।
आतां या समर्थास समर्थ। किती म्हणौनि म्हणावें ॥ १८ ॥

परमार्थ हा असा आहे. जो करील त्याच्या जन्माचे सार्थक होते. हा इतका श्रेष्ठ, थोर व उत्तमोत्तम आहे की, याची प्रशंसा तरी किती करावी? (१८)

या परमार्थाकरितां। ब्रह्मादिकांसि विश्रामता।
योगी पावती तन्मयता। परब्रह्मीं ॥ १९ ॥

या परमार्थामुळेच ब्रह्मादी देवांना विश्रांती लाभते. त्याच्या योगानेच योगी परब्रह्माशी तादात्म्याचा अनुभव घेतात. (१९)

परमार्थ सकळांस विसांवा। सिद्ध साधु माहानुभावां।
सेखीं सात्विक जड जीवां। सत्संगेंकरूनी ॥ २० ॥

सिद्ध, साधू, महानुभाव इत्यादी सर्वांना परमार्थामुळेच विसावा प्राप्त होतो. एवढेच नव्हे तर सामान्य जड पण सात्त्विक जीवांनाही संतसंगतीने हा लाभ मिळू शकतो. (२०)

परमार्थ जन्माचें सार्थक। परमार्थ संसारीं तारक।
परमार्थ दाखवी परलोक। धार्मिकासी ॥ २१ ॥

परमार्थामुळेच मनुष्यजन्माचे सार्थक होते. जीव परमार्थामुळेच संसारातून तरून जातो. धार्मिकांना परमार्थामुळेच परलोकात उत्तम गती प्राप्त होते. (२१)

परमार्थ तापसांसी थार। परमार्थ साधकांसी आधार।
परमार्थ दाखवी पार। भवसागराचा ॥ २२ ॥

तपस्वी लोकांचा परमार्थच आश्रयदाता आहे. साधकांना परमार्थच आधार असून त्याच्या योगेच या भवसागरातून पैलतीरास जाता येते. (२२)

परमार्थी तो राज्यधारी। परमार्थ नाहीं तो भिकारी।
या परमार्थाची सरी। कोणास द्यावी ॥ २३ ॥

जो परमार्थ करतो तोच खरा श्रीमंत होय व जो परमार्थ करीत नाही तोच खरा भिकारी! अशा या परमार्थाची तुलना तरी कुणाबरोबर करावी? (२३)

अनंत जन्मींचें पुण्य जोडे। तरीच परमार्थ घडे।
मुख्य परमात्मा आतुडे। अनुभवासी ॥ २४ ॥

अनंत जन्मांची पुण्याई गाठी असेल, तरच मनुष्याकडून परमार्थ घडतो. परमार्थामुळे आपल्या अंतरातच आपणास मुख्य परमात्मा अनुभवास येतो. (२४)

जेणें परमार्थ वोळखिला। तेणें जन्म सार्थक केला।
येर तो पापी जन्मला। कुलक्षयाकारणें ॥ २५ ॥

ज्याने कुणी परमार्थाचे हे श्रेष्ठत्व जाणले असेल त्याचाच जन्म खरोखरी सार्थकी लागतो. इतर जे त्याचे महत्त्व जाणत नाहीत, ते लोक पापी असून केवळ कुलक्षयाकरिताच जन्मास येतात. (२५)

जेंहीं शोधून पाहिला। त्यासी अर्थ सांपडला।
येरां असोनिअलभ्य जाला। जन्मोजन्मीं ॥ १२ ॥

अपूर्वता या परमार्थाची। वार्ता नाहीं जन्ममृत्याची।
आणि पदवी सायोज्यतेची। सन्निधचि लाभे ॥ १३ ॥

माया विवेकें मावळे। सारासार विचार कळे।
परब्रह्म तेंहि निवळे। अंतर्यामीं ॥ १४ ॥

ब्रह्म भासलें उदंड। ब्रह्मीं बुडालें ब्रह्मांड।
पंचभूतांचें थोतांड। तुछ्य वाटे ॥ १५ ॥

प्रपंच वाटे लटिका। माया वाटे लापणिका।
शुद्ध आत्मा विवेका-। अंतरीं आला ॥ १६ ॥

ब्रह्मस्थित बाणतां अंतरीं। संदेह गेला ब्रह्मांडाबाहेरी।
दृश्याची जुनी जर्जरी। कुहिट जाली ॥ १७ ॥

ऐसा हा परमार्थ। जो करी त्याचा निजस्वार्थ।
आतां या समर्थास समर्थ। किती म्हणौनि म्हणावें ॥ १८ ॥

या परमार्थाकरितां। ब्रह्मादिकांसि विश्रामता।
योगी पावती तन्मयता। परब्रह्मीं ॥ १९ ॥

परमार्थ सकळांस विसांवा। सिद्ध साधु माहानुभावां।
सेखीं सात्विक जड जीवां। सत्संगेंकरूनी ॥ २० ॥

परमार्थ जन्माचें सार्थक। परमार्थ संसारीं तारक।
परमार्थ दाखवी परलोक। धार्मिकासी ॥ २१ ॥

परमार्थ तापसांसी थार। परमार्थ साधकांसी आधार।
परमार्थ दाखवी पार। भवसागराचा ॥ २२ ॥

परमार्थी तो राज्यधारी। परमार्थ नाहीं तो भिकारी।
या परमार्थाची सरी। कोणास द्यावी ॥ २३ ॥

अनंत जन्मींचें पुण्य जोडे। तरीच परमार्थ घडे।
मुख्य परमात्मा आतुडे। अनुभवासी ॥ २४ ॥

जेणें परमार्थ वोळखिला। तेणें जन्म सार्थक केला।
येर तो पापी जन्मला। कुलक्षयाकारणें ॥ २५ ॥

ज्यांनी त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला, त्यांना त्याची प्राप्ती झाली. जे असा प्रयत्नच करीत नाहीत त्यांना तो जवळ असूनही कित्येक जन्म गेले तरी त्याची प्राप्ती होत नाही. (१२)

हा परमार्थ फार अपूर्व आहे. त्याच्यापाशी जन्ममृत्यूची वार्ताही नसते. उलट बसल्या ठिकाणी अगदी सहज सायुज्यतेची योग्यता परमार्थामुळे प्राप्त होते. (१३)

सारासार विवेकामुळे मायेचे पटल नाहीसे होते व अंतर्यामी परब्रह्माचा साक्षात्कार होतो. (१४)

सर्वत्र ते ब्रह्मच व्यापून आहे अशी अनुभूती येऊन त्या ब्रह्मात जणू ब्रह्मांड बुडून जाते. आणि पंचमहाभूतांचा हा अफाट पसारा तुच्छ वाटू लागतो. (१५)

प्रपंच खोटा वाटतो, माया मिथ्या वाटते व विवेकामुळे शुद्ध आत्मस्वरूप अंतरी प्रगट होते. (१६)

अंतरंगात स्वस्वरूपानुभव आला म्हणजे संशय कुठल्याकुठे नाहीसा होतो. हे सर्व दृश्य विश्व जुनाट, फाटलेले, विटलेले वाटू लागते. (१७)

परमार्थ हा असा आहे. जो करील त्याच्या जन्माचे सार्थक होते. हा इतका श्रेष्ठ, थोर व उत्तमोत्तम आहे की, याची प्रशंसा तरी किती करावी? (१८)

या परमार्थामुळेच ब्रह्मादी देवांना विश्रांती लाभते. त्याच्या योगानेच योगी परब्रह्माशी तादात्म्याचा अनुभव घेतात. (१९)

सिद्ध, साधू, महानुभाव इत्यादी सर्वांना परमार्थामुळेच विसावा प्राप्त होतो. एवढेच नव्हे तर सामान्य जड पण सात्त्विक जीवांनाही संतसंगतीने हा लाभ मिळू शकतो. (२०)

परमार्थामुळेच मनुष्यजन्माचे सार्थक होते. जीव परमार्थामुळेच संसारातून तरून जातो. धार्मिकांना परमार्थामुळेच परलोकात उत्तम गती प्राप्त होते. (२१)

तपस्वी लोकांचा परमार्थच आश्रयदाता आहे. साधकांना परमार्थच आधार असून त्याच्या योगेच या भवसागरातून पैलतीरास जाता येते. (२२)

जो परमार्थ करतो तोच खरा श्रीमंत होय व जो परमार्थ करीत नाही तोच खरा भिकारी! अशा या परमार्थाची तुलना तरी कुणाबरोबर करावी? (२३)

अनंत जन्मांची पुण्याई गाठी असेल, तरच मनुष्याकडून परमार्थ घडतो. परमार्थामुळे आपल्या अंतरातच आपणास मुख्य परमात्मा अनुभवास येतो. (२४)

ज्याने कुणी परमार्थाचे हे श्रेष्ठत्व जाणले असेल त्याचाच जन्म खरोखरी सार्थकी लागतो. इतर जे त्याचे महत्त्व जाणत नाहीत, ते लोक पापी असून केवळ कुलक्षयाकरिताच जन्मास येतात. (२५)

असो भगवत्प्राप्तीविण । करी संसाराचा सीण ।
त्या मूर्खांचें मुखावलोकन । करूंच नयें ॥ २६ ॥

असो. भगवत्प्राप्तीसाठी प्रयत्न न करता जो केवळ संसारासाठी कष्ट उपसतो, अशा मूर्ख माणसाचे तोंडही पाहू नये. (२६)

भल्यानें परमार्थी भरावें । शरीर सार्थक करावें ।
पूर्वजांस उद्धरावें । हरिभक्ती करूनी ॥ २७ ॥

चांगल्या माणसाने हा मनुष्यदेह परमार्थी लावावा व या नरदेहाचे सार्थक करून घ्यावे. त्याने भगवद्भक्ती करून स्वत:चा व पूर्वजांचाही उद्धार करून घ्यावा. (२७)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'परमार्थस्तवननाम' समास नववा समाप्त.

❑❑

## दशक १ : समास १०

## नरदेहस्तवन

॥ श्रीराम ॥

धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहो ।
जो जो कीजे परमार्थलाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १ ॥

खरोखरच हा नरदेह अत्यंत धन्य आहे. कारण याची अपूर्वता अशी आहे की, या देहात परमार्थाचा जो जो छंद लागेल तो तो सिद्धीस जातो. (१)

या नरदेहाचेनि लागवेगें । येक लागले भक्तिसंगें ।
येकीं परम वीतरागें । गिरिकंदरें सेविलीं ॥ २ ॥

या नरदेहाच्या योगे कुणी परमेश्वराची भक्ती करू लागतात, तर कुणी अत्यंत वैराग्यशील असतील ते डोंगरकपारीत एकांतात जाऊन राहातात. (२)

येक फिरती तीर्थाटणें । येक करिती पुरश्चरणें ।
येक अखंड नामस्मरणें । निष्ठावंत राहिले ॥ ३ ॥

कुणी तीर्थयात्रा करतात, तर कुणी पुरश्चरणे करतात. काही अत्यंत निष्ठेने अखंड नामस्मरण करण्यात दंग होतात. (३)

येक तपें करू लागले । येक योगाभ्यासी माहाभले ।
येक अभ्यासयोगें जाले । वेदशास्त्रीं वित्पन्न ॥ ४ ॥

कुणी तपाचरण करतात, तर कुणी फार श्रेष्ठ योगाभ्यासी बनतात. कुणी अभ्यास करून वेदशास्त्रांत पारंगत होतात. (४)

येकीं हटनिग्रह केला । देह अत्यंत पीडिला ।
येकीं देव ठाईं पाडिला । भावार्थबळें ॥ ५ ॥

कुणी हठयोगाचा अभ्यास करून देह कष्टवितात, तर कुणी भावभक्तीच्या योगे बसल्या जागीच देवाचा साक्षात्कार करून घेतात. (५)

येक माहानुभाव विख्यात । येक भक्त जाले ख्यात ।
येक सिद्ध अकस्मात । गगन वोळगती ॥ ६ ॥

कुणी प्रसिद्ध महानुभाव असतात, तर कुणी भक्त म्हणून कीर्ती मिळवितात. कुणी योगाभ्यासाने सिद्धी प्राप्त करून आकाशात संचार करू लागतात. (६)

येक तेजीं तेजचि जाले । येक जळीं मिळोन गेले ।
येक ते दिसतचि अदृश्य जाले । वायोस्वरूपीं ॥ ७ ॥

कुणी तेजोरूप होऊन तेजात विलीन होतात, तर कुणी जळात विरघळून जातात. कुणी पवनजय करून वायुरूप होऊन एकाएकी अदृश्य होतात. (७)

येक येकचि बहुधा होती ।
येक देखतचि निघोनि जाती ।
येक बैसले असतांची भ्रमती । नाना स्थानीं समुद्रीं ॥ ८ ॥

कुणी एक असून अनेक रूपे धारण करतात, तर कुणी पाहता पाहता गुप्त होतात. कुणी एका जागी बसलेले असूनही नाना स्थळी, समुद्रादी ठिकाणीही फिरून येतात. (८)

येक भयानकावरी बैसती । येक अचेतनें चालविती ।
येक प्रेतें उठविती । तपोबळेंकरूनी ॥ ९ ॥

कुणी व्याघ्रादी हिंस्र पशूंवर स्वार होतात, तर कुणी जड भिंती इत्यादीही चालवितात. कुणी आपल्या तपोबलाने मेलेल्या माणसासही जिवंत करतात. (९)

**येक तेजें मंद करिती। येक जळें आटविती।**
**येक वायो निरोधिती। विश्वजनाचा ॥ १० ॥**

कुणी तेजाला मंद करतात, तर कुणी जलाशय कोरडे करतात, तर कुणी जगातील सर्व प्राण्यांचा श्वास कोंडून धरतात. (१०)

**ऐसे हटनिग्रही कृतबुद्धी। जयांस वोळल्या नाना सिद्धि।**
**ऐसे सिद्ध लक्षावधी। होऊन गेले ॥ ११ ॥**

कोणी अत्यंत दृढ निश्चयाने सातत्याने योगाभ्यास करून अनेक प्रकारच्या सिद्धी मिळवितात. असे लक्षावधी सिद्ध होऊन गेले आहेत. (११)

**येक मनोसिद्ध येक वाचासिद्ध।**
**येक अल्पसिद्ध येक सर्वसिद्ध।**
**ऐसे नाना प्रकारीचे सिद्ध। विख्यात जाले ॥ १२ ॥**

कुणी मनोसिद्ध असतात म्हणजे ते जो संकल्प करतील तो सिद्धीस जातो, तर कुणी वाचासिद्ध असतात म्हणजे ते जे बोलतात ते तत्काळ खरे होते. कुणी अल्पसिद्ध म्हणजे लहानसहान सिद्धी प्राप्त केलेले असतात, तर कुणी सर्वसिद्ध म्हणजे अष्टमहासिद्धी प्राप्त झालेले असतात. असे नाना प्रकारचे सिद्धपुरुष कीर्ती मिळवून गेले आहेत. (१२)

**येक नवविधाभक्तिराजपंथें।**
**गेले तरले परलोकींच्या निजस्वार्थें।**
**येक योगी गुप्तपंथे। ब्रह्मभुवना पावले ॥ १३ ॥**

कुणी नवविधाभक्तीच्या राजमार्गाने जाऊन भवसागर तरून गेले व स्वस्वरूपाचा अनुभव घेऊन त्यांनी जन्म सार्थकी लावला. कुणी योगी सुषुम्नेच्या गुप्तमार्गाने ब्रह्मलोकास गेले. (१३)

**येक वैकुंठास गेले। येक सत्यलोकीं राहिले।**
**येक कैळासीं बैसले। शिवरूप होउनी ॥ १४ ॥**

कुणी वैकुंठास गेले, कुणी सत्यलोकात राहिले, तर कुणी शिवरूप होऊन कैलासात जाऊन राहिले. (१४)

**येक इंद्रलोकीं इंद्र जाले। येक पितृलोकीं मिळाले।**
**येक ते उडगणीं बैसले। येक ते क्षीरसागरीं ॥ १५ ॥**

कुणी इंद्रलोकी इंद्र झाले, तर कुणाला पितृलोक प्राप्त झाला. कुणी नक्षत्रमंडळात जाऊन बसले, तर कुणी क्षीरसागरात जाऊन राहिले. (१५)

**सलोकता समीपता। स्वरूपता सायोज्यता।**
**या चत्वार मुक्ती तत्वतां। इच्छा सेऊन राहिले॥ १६ ॥**

सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता या चार मुक्तींपैकी ज्याला ज्या मुक्तीची इच्छा होती, त्याप्रमाणे ती ती मुक्ती त्यांनी मिळविली. (१६)

**ऐसे सिद्ध साधु संत। स्वहिता प्रवर्तले अनंत।**
**ऐसा हा नरदेह विख्यात। काय म्हणौनि वर्णावा ॥ १७ ॥**

याप्रमाणे या नरदेहाच्या साह्याने अनेकांनी स्वहितासाठी प्रयत्न केले. सिद्ध, साधू, संत यांची अशी अनंत उदाहरणे आहेत. म्हणून अशा या अपूर्व नरदेहाचे किती म्हणून वर्णन करावे? (१७)

**या नरदेहाचेनि आधारें। नाना साधनांचेनि द्वारें।**
**मुख्य सारासारविचारें। बहुत सुटले ॥ १८ ॥**

या नरदेहायोगे नाना प्रकारची साधने करून आणि मुख्यत: सारासारविचार करून अनेक जीव मुक्त झाले आहेत. (१८)

**या नरदेहाचेनि संमंधें। बहुत पावले उत्तम पदें।**
**अहंता सांडून स्वानंदें। सुखी जाले ॥ १९ ॥**

या नरदेहाच्या योगे अनेकांनी उत्तम पदे मिळविली. देहाची अहंता सोडून स्वस्वरूपानुभव घेऊन ते स्वानंदाने सुखी झाले. (१९)

**नरदेहीं येऊन सकळ। उधरागती पावले केवळ।**
**येथें संशयाचें मूळ। खंडोन गेलें ॥ २० ॥**

या नरदेहात आल्यावर विवेकाच्या साहाय्याने सर्व संशयांचे निरसन झाल्याने अनेकांना सद्‌गतीचा लाभ झाला आहे. (२०)

**पशुदेहीं नाहीं गती। ऐसें सर्वत्र बोलती।**
**म्हणौन नरदेहींच प्राप्ती। परलोकाची ॥ २१ ॥**

पशुदेहात विवेक नसल्याने उत्तम गती प्राप्त करून घेता येत नाही असे सर्व सांगतात, म्हणून हा नरदेह प्राप्त झाला असतानाच उत्तम अशा परलोकाची प्राप्ती करून घ्यावी. (२१)

**संत महंत ऋषी मुनी। सिद्ध साधु समाधानी।**
**भक्त मुक्त ब्रह्मज्ञानी। विरक्त योगी तपस्वी॥ २२॥**

**तत्त्वज्ञानी योगाभ्यासी। ब्रह्मचरी दिगंबर संन्यासी।**
**शड्दर्शनी तापसी। नरदेहींच जाले ॥ २३॥**

संत, महंत, ऋषी, मुनी, सिद्ध, साधू, समाधानी, भक्त, मुक्त, ब्रह्मज्ञानी, विरक्त, योगी, तपस्वी, तत्त्वज्ञानी, योगाभ्यासी, ब्रह्मचारी, दिगंबर, संन्यासी, षड्दर्शनी, तापसी यांनी नरदेहातच अशी योग्यता प्राप्त केली. (२२-२३)

**म्हणौनि नरदेह श्रेष्ठ। नाना देहांमधें वरिष्ठ।**
**जयाचेनि चुके आरिष्ट। येमयातनेचें ॥ २४॥**

म्हणूनच सर्व देहांमध्ये नरदेहच सर्वांत श्रेष्ठ आहे, कारण या देहातच यमयातनारूपी अरिष्ट चुकविण्याची संधी प्राप्त होते. (२४)

**नरदेह हा स्वाधेन। सहसा नव्हे पराधेन।**
**परंतु हा परोपकारीं झिजऊन। कीर्तिरूपें उरवावा ॥ २५॥**

नरदेह सहसा पराधीन असत नाही, स्वाधीनच असतो. म्हणून याला परोपकारात झिजवून कीर्तिरूपे उरवावा. (२५)

**अश्व वृषभ गाई म्हैसी। नाना पशु स्त्रिया दासी।**
**कृपाळूपणें सोडितां त्यांसी। कोणी तरी धरील ॥ २६॥**

घोडा, बैल, गाई, म्हशी, इतर नाना पशू व स्त्रिया, विशेषत: दासी यांना जर कृपाळूपणे मोकळे सोडले, तर त्यांना कुणीही धरून नेईल. (२६)

**तैसा नव्हे नरदेहो। इच्छा जाव अथवा राहो।**
**परी यास कोणी पाहो। बंधन करूं सकेना ॥ २७॥**

पण पुरुषदेहाची स्थिती तशी नाही. त्याची इच्छा असेल, तर त्याने घरात राहावे वा बाहेर जावे, पण त्याला कुणी पारतंत्र्यात ठेवू शकत नाही. (२७)

**नरदेह पांगुळ असता। तरी तो कार्यास न येता।**
**अथवा थोंटा जरी असता। तरी परोपकारास न ये ॥ २८॥**

नरदेह पांगळा असेल तर त्याने काम करता येत नाही. अथवा तो थोटा असेल तरी त्याने परोपकार करता येत नाही. (२८)

**नरदेह अंध असिला।**
**तरी तो निपटचि वायां गेला।**
**अथवा बधिर जरी असिला। तरी निरूपण नाहीं ॥ २९॥**

नरदेह आंधळा असेल तर तो पूर्णपणे वायाच जातो. अथवा बहिरा असेल तर श्रवण-निरूपणाच्या उपयोगी पडत नाही. (२९)

**नरदेह असिला मुका। तरी घेतां न ये आशंका।**
**अशक्त रोगी नासका। तरी तो निःकारण ॥ ३०॥**

नरदेह मुका असेल तर मनातील शंका बोलून दाखवता येत नाहीत, त्यामुळे त्यांचे निरसन होत नाही किंवा तो अशक्त, रोगी, किंवा सडलेला असेल तरी तो कुचकामाचा ठरतो. (३०)

**नरदेह असिला मूर्ख। अथवा फेंपऱ्या समंधाचें दुःख।**
**तरी तो जाणावा निरार्थक। निश्चयेंसी ॥ ३१॥**

नरदेह लाभला असूनही तो प्राणी मूर्ख असेल अथवा त्याला फेफरे अथवा समंधाची बाधा वगैरे असेल तरी तो निश्चितपणे निरर्थकच जाणावा. (३१)

**इतुकें हें नस्तां वेंग। नरदेह आणी सकळ सांग।**
**तेणें धरावा परमार्थमार्ग। लागवेगें ॥ ३२॥**

इतकी ही व्यंगे नसून चांगला आरोग्यसंपन्न, धडधाकट नरदेह ज्याला लाभला असेल, त्याने तत्काळ परमार्थमार्ग धरून या नरदेहाचे सार्थक करून घ्यावे. (३२)

**सांग नरदेह जोडले। आणि परमार्थबुद्धि विसरलें।**
**तें मूर्ख कैसें भ्रमलें। मायाजाळीं ॥ ३३॥**

उत्तम निर्व्यंग नरदेह प्राप्त झाला असताही जे परमार्थबुद्धी विसरतात, ते मूर्ख लोक मायेच्या जाळ्यात सापडून भ्रमतात अर्थात फिरून जन्ममरणाच्या चक्रात सापडतात. (३३)

**मृत्तिका खाणोन घर केलें। तें माझें ऐसें दृढ कल्पिलें।**
**परी तें बहुतांचें हें कळलें। नाहींच तयासी ॥ ३४॥**

जमीन खणून लोक घर बांधतात व हे आपले घर अशी दृढ समजूत करून घेतात, पण वास्तविक ते अनेकांचे असते, हे त्यांना कळत नाही. (३४)

**मुष्यक म्हणती घर आमुचें। पाली म्हणती घर आमुचें।**
**मक्षिका म्हणती घर आमुचें। निश्चयेंसीं ॥ ३५ ॥**

**कांतण्या म्हणती घर आमुचें।**
**मुंगळे म्हणती घर आमुचें।**
**मुंग्या म्हणती घर आमुचें। निश्चयेंसीं ॥ ३६ ॥**

**विंचू म्हणती आमुचें घर। सर्प म्हणती आमुचें घर।**
**झुरळें म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ३७ ॥**

**भ्रमर म्हणती आमुचें घर।**
**भिंगोऱ्या म्हणती आमुचें घर।**
**आळिका म्हणती आमुचें घर। काष्ठामध्यें ॥ ३८ ॥**

**मार्जरें म्हणती आमुचें घर। श्वानें म्हणती आमुचें घर।**
**मुंगसें म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ३९ ॥**

**पुंगळ म्हणती आमुचें घर।**
**वाळव्या म्हणती आमुचें घर।**
**पिसुवा म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ४० ॥**

**ढेंकुण म्हणती आमुचें घर। चांचण्या म्हणती आमुचें घर।**
**घुंगर्डी म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ४१ ॥**

**पिसोळे म्हणती आमुचें घर। गांधेले म्हणती आमुचें घर।**
**सोट म्हणती आमुचें घर। आणी गोंबी ॥ ४२ ॥**

**बहुत किड्यांचा जोजार। किती सांगावा विस्तार।**
**समस्त म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ४३ ॥**

**पशु म्हणती आमुचें घर। दासी म्हणती आमुचें घर।**
**घरीचीं म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ४४ ॥**

**पाहुणे म्हणती आमुचें घर। मित्र म्हणती आमुचें घर।**
**ग्रामस्थ म्हणती आमुचें घर। निश्चयेंसीं ॥ ४५ ॥**

**तश्कर म्हणती आमुचें घर। राजकी म्हणती आमुचें घर।**
**आग्न म्हणे आमुचें घर। भस्म करूं ॥ ४६ ॥**

**समस्त म्हणती घर माझें। हें मूर्खही म्हणे माझें माझें।**
**सेवट जड जालें वोझें। टाकिला देश ॥ ४७ ॥**

**अवघीं घरें भंगलीं। गांवांची पांढरी पडिली।**
**मग ते गृहीं राहिलीं। अरण्यश्वापदें ॥ ४८ ॥**

**किडा मुंगी वाळवी मूषक। त्यांचेंच घर हें निश्चयात्मक।**
**हें प्राणी बापुडें मूर्ख। निघोन गेलें ॥ ४९ ॥**

उंदीर म्हणतात हे घर आमचे आहे, पाली म्हणतात हे घर आमचे आहे, माशा ठामपणे म्हणतात की हे घर आमचे आहे. (३५)

याप्रमाणेच कांतण्या, मुंगळे, मुंग्या घर आमचे आहे असे म्हणतात. (३६)

विंचू, सर्प, झुरळे घर आमचेच म्हणतात. (३७)

भुंगे, भ्रमरीची अळी व किडे म्हणतात की, लाकडात आमचेच घर आहे. (३८)

मांजरे, कुत्री, मुंगसे इत्यादी प्राणी घर आपले आहे, असे म्हणतात. (३९)

पुंगळ, वाळव्या, पिसवा घर आमचे आहे असे म्हणतात. (४०)

ढेकूण, लाल मुंगळे, घुंगुर्डी देखील घर आमचे आहे असे म्हणतात. (४१)

पिसोळे, गांधील माश्या, सोट आणि गोमा हे सुद्धा घर आमचेच आहे असे म्हणतात. (४२)

अशा प्रकारचे खूपसे किडे, त्यांचे किती म्हणून वर्णन करावे? सर्वच म्हणतात की, निश्चित हे घर आमचेच आहे. (४३)

पशू, दासी, घरातील माणसे सर्वच म्हणतात की घर आमचे आहे. (४४)

एवढेच नव्हे तर पाहुणे, मित्र, ग्रामस्थ हे घर आमचेच आहे असे म्हणतात. (४५)

चोर, राजकीय अधिकारी, एवढेच नव्हे तर अग्नीही म्हणतो की घर माझे आहे. याला मी जाळून खाक करतो. (४६)

याप्रमाणे सर्वच म्हणतात की, घर माझे आहे. तसेच हा मूर्खही म्हणतो की घर माझे आहे. शेवटी त्या घराचे ओझे होते व ते सोडून, किंबहुना देशही सोडून त्याला जावे लागते. (४७)

याप्रकारे कधी कधी गावातील सर्वच घरे कालांतराने पडतात व सर्व गावच ओस पडतो. अखेर त्या घरांतून अरण्यातील हिंस्र श्वापदे येऊन राहतात. (४८)

वास्तविक ते घर किडा, मुंगी, वाळवी, उंदीर यांचेच असते. 'माझे-माझे' म्हणणाऱ्या मूर्खाला मात्र ते सोडून निघून जावे लागते. (४९)

ऐसी गृहांची स्थिती। मिथ्या आली आत्मप्रचीती।
जन्म दों दिसांची वस्ती। कोठे तरी करावी॥ ५०॥

घराची स्थिती अखेर अशी होते व आपण यास 'माझे-माझे' म्हणतो ते खरे नसते, असा अनुभवही येतो; म्हणून जन्म म्हणजे या जगातील दोन दिवसांची वस्ती आहे, हे जाणून ती कुठे तरी करावी. (अर्थात कुठल्याही जागेची आसक्ती धरू नये). (५०)

देह म्हणावें आपुलें।
तरी हें बहुतांकारणें निर्मिलें।
प्राणीयांच्या माथां घर केलें। वा मस्तकीं भक्षिती॥ ५१॥

आता देहासंबंधी विचार करू लागलो तर कळून येते की, हा देह आपण आपला म्हणतो पण तेही खरे नाही. हा देहही अनेकांसाठी निर्माण झालेला असतो. उदाहरणार्थ, उवा माणसाच्या डोक्यात घर करतात आणि त्याचे डोके खातात. (५१)

रोमेमुळीं किडे भक्षिती। खांडुक जाल्यां किडे पडती।
पोटामध्यें जंत होती। प्रत्यक्ष प्राणियांच्या॥ ५२॥

रोमरंध्राच्या मुळाशी राहून किडे मांस खातात, कुठे खांडुक झाले तर त्यातही किडे पडतात. पोटात जंत होतात. हे तर आपण पाहतोच. (५२)

कीड लागे दांतांसी। कीड लागे डोळ्यांसी।
कीड लागे कर्णासी। आणी गोमाशा भरती॥ ५३॥

दातांना कीड लागते, डोळ्यांना कीड लागते, कानांना कीड लागली की तेथे गोमाशा गर्दी करतात. (५३)

गोंचिड अशुद्ध सेविती। चामवा मांसांत घुसती।
पिसोळे चाऊन पळती। अकस्मात ॥ ५४॥

गोचिडी रक्त पितात, चामवा मांसात घुसतात, तर पिसवा अकस्मात दंश करून पळून जातात. (५४)

भोंगें गांधेलें चाविती। गोंबी जळवा अशुद्ध घेती।
विंचू सर्प दंश करिती। कानटें फुर्सी ॥ ५५॥

भुंगे व गांधीलमाशा चावतात. तर गोमा आणि जळवा रक्त पितात. विंचू, साप, कानटे व फुरशी दंश करतात. (५५)

जन्मून देह पाळिलें। तें अकस्मात व्याघ्रें नेलें।
कां तें लांडगींच भक्षिलें। बळात्कारें ॥ ५६॥

जन्माला आल्यापासून देहाचा सांभाळ करावा, तर अकस्मात वाघ त्यास उचलून नेतो किंवा बळजबरीने मारून लांडगाच त्यास खाऊन टाकतो. (५६)

मूषकें मार्जरें दंश करिती। स्वानें अश्वें लोले तोडिती।
रीसें मर्कटें मारिती। कासावीस करूनी॥ ५७॥

उंदीर, मांजर त्याला दंश करतात. कुत्री, घोडे वगैरे त्याचे लचके तोडतात, तर अस्वले, माकडे कासावीस करून मारतात. (५७)

उष्टरें डसोन उचलिती। हस्थी चिर्डून टाकिती।
वृषभ टोचून मारिती। अकस्मात ॥ ५८॥

उंट चावून उचलून फेकून देतात तर हत्ती पायाखाली चिरडून टाकतात. बैल शिंगाने टोचून अकस्मात मारून टाकतात. (५८)

तस्कर तडतडां तोडिती। भूतें झडपोन मारिती।
असो या देहाची स्थिती। ऐसी असे ॥ ५९॥

चोर तडतडा शरीराचे तुकडे करतात, तर भुते अंगात संचार करून मारतात. असो. या देहाची स्थिती अशी आहे. (५९)

ऐसें शरीर बहुतांचें। मूर्ख म्हणे आमुचें।
परंतु खाजें जिवांचें। तापत्रैं बोलिलें ॥ ६०॥

या दृष्टीने विचार केला, तर हा देह पुष्कळांचा आहे; पण मूर्ख माणूस त्यास 'माझा' असे समजतो. वास्तविक ते अनेक जीवांचे भक्ष्य आहे. तापत्रय वर्णनात ही गोष्ट पुढे सांगितली आहे. (६०)

देह परमार्थीं लाविलें। तरीच याचें सार्थक जालें।
नाहीं तरी हें वेर्थचि गेलें। नाना आघातें मृत्यपंथें॥ ६१॥

नरदेह परमार्थासाठी लावला तरच त्याचे सार्थक होते; नाहीतर नाना प्रकारच्या आघातांनी तो मृत्यू पावतो. (६१)

असो जे प्रापंचिक मूर्ख।
ते काये जाणती परमार्थसुख।
त्या मूर्खांचें लक्षण कांहीं येक। पुढें बोलिलें असे॥ ६२॥

असो. जे प्रापंचिक सुखात गढलेले मूर्ख लोक असतात, ते परमार्थाचे सुख काय जाणणार? अशा मूर्खांची काही लक्षणे पुढे सांगितली आहेत. (६२)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'नरदेहस्तवननिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

दशक पहिला समाप्त.

❑ ❑

# दशक दुसरा : मूर्खलक्षणांचा

## दशक २ : समास १

## मूर्खलक्षण

॥ श्रीराम ॥

ॐ नमोजि गजानना। येकदंता त्रिनयना।
कृपादृष्टी भक्तजना। अवलोकावें ॥ १ ॥

श्री समर्थ म्हणतात की ओंकारस्वरूप, एकदंत व त्रिनयन अशा गजाननाला मी नमन करतो. "हे गजानना, तुम्ही तुमच्या या भक्ताकडे कृपादृष्टीने पाहावे" अशी विनंती आहे. (१)

तुज नमूं वेदमाते। श्रीशारदे ब्रह्मसुते।
अंतरीं वसे कृपावंते। स्फूर्तिरूपें ॥ २ ॥

वेदांची माता व ब्रह्मदेवाची कन्या जी श्री शारदा तिला वंदन करून तिने आपल्या अंतरी स्फूर्तिरूपाने राहावे, अशी मी तिला प्रार्थना करतो. (२)

वंदून सद्गुरुचरण। करून रघुनाथस्मरण।
त्यागार्थ मूर्खलक्षण। बोलिजेल ॥ ३ ॥

नंतर सद्गुरुचरणांना वंदन करून व श्रीरामस्मरण करून समर्थ म्हणतात की, लोकांनी सोडून द्यावीत, म्हणून मी आता मूर्खांची लक्षणे वर्णन करतो. (३)

येक मूर्ख येक पढतमूर्ख। उभय लक्षणीं कौतुक।
श्रोतीं सादर विवेक। केला पाहिजे ॥ ४ ॥

मूर्खांचे दोन प्रकार असतात. काही मूर्ख तर काही पढतमूर्ख असतात. कौतुक म्हणून मी दोन्हींचे वर्णन करीत आहे. श्रोत्यांनी नीट ऐकून त्यावर विचार केला पाहिजे. (४)

पढतमूर्खांचें लक्षण। पुढिले समासीं निरूपण।
सावध होऊनि विचक्षण। परिसोत पुढें ॥ ५ ॥

पढतमूर्खाची लक्षणे पुढे एका समासात सांगितली आहेत. ती त्यावेळी सुज्ञ श्रोत्यांनी सावधपणे ऐकावी. (५)

आतां प्रस्तुत विचार। लक्षणें सांगतां अपार।
परि कांहीं येक तत्पर। होऊन ऐका ॥ ६ ॥

मूर्खाची लक्षणे सांगावयाची म्हटली, तर ती अपार आहेत. आता या समासात काही लक्षणे सांगितली आहेत. श्रोत्यांनी तत्पर होऊन ऐकावी. (६)

जे प्रापंचिक जन। जयांस नाहीं आत्मज्ञान।
जे केवळ अज्ञान। त्यांचीं लक्षणें ॥ ७ ॥

जे केवळ प्रापंचिक लोक आहेत, ज्यांना आत्मज्ञान नाही अशा केवळ अज्ञानी लोकांची लक्षणे ऐका. (७)

जन्मला जयांचे उदरीं। तयांसी जो विरोध करी।
सखी मानिली अंतुरी। तो येक मूर्ख ॥ ८ ॥

ज्या आईबापांच्या पोटी आपण जन्मलो, त्यांच्याशी जो विरोध करतो व केवळ पत्नीलाच मैत्रीण समजतो तो एक मूर्ख समजावा. (८)

सांडून सर्वहि गोत। स्त्रीआधेन जीवित।
सांगे अंतरींची मात। तो येक मूर्ख ॥ ९ ॥

सर्व नातेवाइकांना सोडून जो केवळ स्त्रीच्या अधीन होऊन तिलाच आपले गुपित सांगतो, तो एक मूर्खच. (९)

परस्त्रीसी प्रेमा धरी। श्वशुरगृहीं वास करी।
कुळेंविण कन्या वरी। तो येक मूर्ख ॥ १० ॥

जो परस्त्रीवर प्रेम करतो, सासुरवाडीस जाऊन राहातो किंवा कुळशीलाचा विचार न करता कोणत्याही मुलीशी विवाह करतो, तो एक मूर्खच. (१०)

समर्थावरी अहंता। अंतरीं मानी समता।
सामर्थ्येंविण करी सत्ता। तो येक मूर्ख ॥ ११ ॥

जो आपल्यापेक्षा श्रेष्ठ असणाऱ्या माणसासमोर अहंकाराने वागतो, मनात स्वत:ला त्यांच्या बरोबरीचे मानतो, अंगी सामर्थ्य नसता लोकांवर सत्ता गाजविण्याचा प्रयत्न करतो, तोही एक मूर्खच. (११)

आपली आपण करी स्तुती। स्वदेशीं भोगी विपत्ती।
सांगे वडिलांची कीर्ती। तो येक मूर्ख ॥ १२ ॥

जो स्वत:च आपली स्तुती करतो, आपल्या देशात असूनही विपत्ती भोगतो आणि पूर्वजांची कीर्ती सांगतो, तोही मूर्खच जाणावा. (१२)

अकारण हास्य करी। विवेक सांगतां न धरी।
जो बहुतांचा वैरी। तो येक मूर्ख ॥ १३॥

कारण नसताना जो उगीचच हसतो, विवेक शिकवू गेले असता जो त्याचे ग्रहण करीत नाही व जो अनेकांशी वैर करतो, तो एक मूर्खच. (१३)

आपुलीं धरूनियां दुरी। पराव्यासीं करी मीत्री।
परन्यून बोले रात्रीं। तो येक मूर्ख ॥ १४॥

स्वकीयांना दूर लोटून जो परकीयांशी मैत्री करतो, उठता बसता जो दुसऱ्याची निंदा करतो, तोही मूर्खच होय. (१४)

बहुत जागते जन। तयांमध्यें करी शयन।
परस्थळीं बहुभोजन। करी, तो येक मूर्ख॥ १५॥

अनेक लोक जागत बसले असता त्यांच्यामध्ये एकट्याच खुशाल झोपतो, किंवा जो दुसऱ्याच्या घरी खादाडासारखे खूप जेवतो, तो एक मूर्खच. (१५)

मान अथवा अपमान। स्वयें करी परिच्छिन्न।
सप्त वेसनीं जयाचें मन। तो येक मूर्ख ॥ १६॥

आपला मान अथवा अपमान स्वत:च जो उघड करून सांगतो, किंवा ज्याचे मन सात प्रकारच्या व्यसनांत रमते, तो एक मूर्खच समजावा. (सात व्यसने म्हणजे द्यूत, वेश्यागमन, चोरी, चहाडी, परदारारमण, लघुपक्षीक्रीडा व नायकिणीचे गायन.) (१६)

धरून परावी आस। प्रेत्न सांडी सावकास।
निसुगाईचा संतोष। मानी, तो येक मूर्ख॥ १७॥

जो दुसऱ्याचा भरवसा धरून स्वत: प्रयत्न करणे हळूहळू सोडतो व आळसातच संतोष मानतो, तो एक मूर्ख.(१७)

घरीं विवेक उमजे। आणि सभेमध्यें लाजे।
शब्द बोलतां निर्बुजे। तो येक मूर्ख ॥ १८॥

घरी ज्ञान सांगतो आणि सभेत बोलताना लाजतो, शब्द बोलताना घाबरतो, तो एक मूर्खच. (१८)

आपणाहून जो श्रेष्ठ। तयासीं अत्यंत निकट।
सिकवणेचा मानी वीट। तो येक मूर्ख ॥ १९॥

आपल्यापेक्षा जे श्रेष्ठ आहेत, त्यांच्याशी फाजील सलगी करतो आणि कुणी काही चांगले शिकवू लागले तर त्यांच्या सांगण्याचा वीट मानतो, तोही मूर्खच होय.(१९)

नायेके त्यांसी सिकवी। वडिलांसीं जाणीव दावी।
जो आरजास गोवी। तो येक मूर्ख ॥ २०॥

जो आपले ऐकत नाही त्यास जो शिकवतो, मोठ्या माणसांच्या पुढे शहाणपणा दाखवतो, वडिलांना कमीपणा आणतो, तो एक मूर्ख. (२०)

येकायेकीं येकसरा। जाला विषईं निलाजिरा।
मर्यादा सांडून सैरा। वर्ते, तो येक मूर्ख॥ २१॥

जो अचानक कामवासनेपायी निर्लज्ज बनतो व मर्यादा सोडून वागू लागतो, तोही मूर्खच. (२१)

औषध ने घे असोनवेथा। पथ्य न करी सर्वथा।
न मिळे आलिया पदार्थां। तो येक मूर्ख ॥ २२॥

जो रोग असूनही औषध घेत नाही व अजिबात पथ्य पाळत नाही व प्राप्त पदार्थांत संतोष मानीत नाही, तो एक मूर्खच होय. (२२)

संगेंविण विदेश करी। वोळखीविण संग धरी।
उडी घाली माहापुरीं। तो येक मूर्ख ॥ २३॥

सोबतीशिवाय जो विदेशात जातो, अनोळखी माणसाची संगत करतो किंवा जो महापुरात उडी घालतो, तो मूर्ख समजावा. (२३)

आपणास जेथें मान। तेथें अखंड करी गमन।
रक्षूं नेणें मानाभिमान। तो येक मूर्ख ॥ २४॥

जो जेथे आपल्याला मान मिळतो तेथे वारंवार जातो, आपला मान कसा राखावा हे ज्याला कळत नाही, तो एक मूर्खच. (२४)

सेवक जाला लक्ष्मीवंत। तयाचा होय अंकित।
सर्वकाळ जो दुश्चित। तो येक मूर्ख ॥ २५॥

आपला नोकर श्रीमंत झाला असता जो त्याच्या अंकित होऊन राहातो; अथवा ज्याचे चित्त सर्वकाळ अस्थिर असते, तोही मूर्खच जाणावा. (२५)

विचार न करितां कारण। दंड करी अपराधेंविण।
स्वल्पासाठीं जो कृपण। तो येक मूर्ख ॥ २६॥

कारणाचा विचार न करता जो अपराध केला नसताही विनाकारण दंड करतो, किंवा जो थोडक्यासाठी कंजूष बनतो, तो मूर्ख जाणावा. (२६)

देवलंड पितृलंड। शक्तिवीण करी तोंड।
ज्याचे मुखीं भंडउभंड। तो येक मूर्ख ॥ २७॥

जो देवाची अगर वडील माणसांची पर्वा करीत नाही. स्वत: अशक्त असून शिवीगाळ करतो, कुणावरही तोंड सोडून अर्वाच्य शब्द बोलतो, तो मूर्खच जाणावा. (२७)

घरीच्यावरी खाय दाढा। बाहेरी दीन बापुडा।
ऐसा जो कां वेडमूढा। तो येक मूर्ख ॥ २८॥

घरच्या लोकांशी रागाने वागतो, त्यांना टाकून बोलतो व बाहेरच्या लोकांसमोर जो दीनपणे नमून वागतो असा जो कोणी वेडा, अज्ञानी असेल तो मूर्खच समजावा. (२८)

नीच यातीसीं सांगात। परांगनेसीं येकांत।
मार्गे जाय खात खात। तो येक मूर्ख ॥ २९॥

जो नीच जातींच्या लोकांत राहतो, परस्त्रीशी एकांत करतो, वाटेने जाताना खात खात जातो, तो एक मूर्खच (२९)

स्वयें नेणें परोपकार। उपकाराचा अनोपकार।
करी थोडें बोले फार। तो येक मूर्ख ॥ ३०॥

स्वत: तर परोपकार करीतच नाही, कुणी उपकार केला तर त्याची फेड अपकाराने करतो. करतो थोडे पण बोलतो फार, असा माणूस मूर्खच होय. (३०)

तपीळ खादाड आळसी। कुश्चीळ कुटीळ मानसीं।
धारिष्ट नाहीं जयापासीं। तो येक मूर्ख ॥ ३१॥

जो तापट, खादाड, आळशी आहे, दुराचारी असून तसेच मनातून अत्यंत दुष्ट कुटिल आहे व ज्याच्यापाशी जराही धैर्य नाही, तो मूर्खच होय. (३१)

विद्या वैभव ना धन। पुरुषार्थ सामर्थ्य ना मान।
कोरडाच वाहे अभिमान। तो येक मूर्ख ॥ ३२॥

स्वत:जवळ विद्या, वैभव, धन किंवा कुठलाही पुरुषार्थ, सामर्थ्य व मान वगैरे नसता जो कोरडाच अभिमान बाळगतो, तो एक मूर्खच (३२)

लंडी लटिका लाबाड। कुकर्मी कुटीळ निचाड।
निद्रा जयाची वाड। तो येक मूर्ख ॥ ३३॥

उर्मट, खोटा, लबाड, वाईट कृत्ये करणारा, कुटिल, नामर्द व जो फार झोपतो, तो एक मूर्खच होय. (३३)

उंचीं जाऊन वस्त्र नेसे। चौबारां बाहेरी बैसे।
सर्व काळ नग्न दिसे। तो येक मूर्ख ॥ ३४॥

उंच ठिकाणी जाऊन जो वस्त्र नेसतो. शौचादी क्रिया जो चव्हाट्यावर करतो व सर्वकाळ जवळ जवळ वस्त्रहीन असतो, तोही मूर्खच जाणावा. (३४)

दंत चक्षु आणि घ्राण। पाणी वसन आणि चरण।
सर्वकाळ जयाचे मळिण। तो येक मूर्ख ॥ ३५॥

ज्याचे दात, डोळे, नाक, हात, पाय, कपडे इत्यादी सर्वकाळ अत्यंत मलिन असतात, तोही मूर्खच.(३५)

वैधृति आणि वितिपात। नाना कुमुहूर्तें जात।
अपशकुनें करी घात। तो येक मूर्ख ॥ ३६॥

जो गावाला जाताना वैधृती, व्यतिपात इत्यादी विविध कुमुहूर्तांवर प्रयाण करतो, एवढेच नव्हे तर दुसऱ्याला अपशकुन करून त्यांचाही घात करतो, तो मूर्ख जाणावा. (३६)

क्रोधें अपमानें कुबुद्धि। आपणास आपण वधी।
जयास नाहीं दृढ बुद्धि। तो येक मूर्ख ॥ ३७॥

जो कुणी अपमान केला असता संतापून आत्महत्या करतो, तसेच ज्यास दृढ बुद्धी नाही, तो मूर्खच जाणावा. (३७)

जिवलगांस परम खेदी। सुखाचा शब्द तोहि नेदी।
नीच जनास वंदी। तो येक मूर्ख ॥ ३८॥

आपल्या जिवलग माणसांना जो दु:ख देतो, कधी सुखाचा शब्दही ऐकवत नाही आणि नीच माणसांना मात्र वंदन करतो, तो एक मूर्खच. (३८)

आपणास राखे परोपरी। शरणागतांस अव्हेरी।
लक्ष्मीचा भर्वसा धरी। तो येक मूर्ख ॥ ३९॥

स्वत:स नानापरीने जपतो, पण शरण आलेल्यांचे रक्षण करीत नाही व संपत्तीचा भरवसा धरतो, तो मूर्खच जाणावा. (३९)

पुत्र कळत्र आणी दारा। इतुकाची मानुनिया थारा।
विसरोन गेला ईश्वरा। तो येक मूर्ख ॥ ४०॥

आपला मुलगा, कुटुंब, पत्नी हाच आपला आधार आहे, असे समजून जो देवाला विसरून जातो, तोही मूर्खच होय. (४०)

जैसें जैसें करावें। तैसें तैसें पावावें।
हें जयास नेणवें। तो येक मूर्ख ॥ ४१॥

जसे करावे तसे फळ मिळते, हे ज्याला कळत नाही, तोही मूर्खच समजावा. (४१)

**पुरुषाचेनि अष्टगुणें। स्त्रियांस ईश्वरी देणें।**
**ऐशा केल्या बहुत जेणें। तो येक मूर्ख ॥ ४२॥**

पुरुषांपेक्षा स्त्रियांच्या ठिकाणी आठपट अधिक कामवासना असते. अशा अनेक स्त्रियांशी जो विवाह करतो, तो मूर्खच जाणावा. (४२)

**दुर्जनाचेनि बोलें। मर्यादा सांडून चाले।**
**दिवसा झांकिले डोळे। तो येक मूर्ख ॥ ४३॥**

दुर्जनाच्या संगतीने जो मर्यादा सोडून वागतो व दिवसाही डोळे झाकून घेतो, ज्ञान असून मुद्दाम अज्ञान्यासारखा वागतो, तोही मूर्खच. (४३)

**देवद्रोही गुरुद्रोही। मातृद्रोही पितृद्रोही।**
**ब्रह्मद्रोही स्वामीद्रोही। तो येक मूर्ख ॥ ४४॥**

जो देवद्रोही, गुरुद्रोही, मातृद्रोही, पितृद्रोही, ब्रह्मद्रोही, स्वामीद्रोही असतो, तो मूर्खच जाणावा. (४४)

**परपीडेचें मानी सुख। परसंतोषाचें मानी दुःख।**
**गेले वस्तूचा करी शोक। तो येक मूर्ख ॥ ४५॥**

लोकांना दुःख झालेले पाहून ज्याला सुख होते व लोकांना आनंद झाला असता जो दुःखी होतो व हरवलेल्या वस्तूसाठी जो शोक करतो, तो मूर्खच होय. (४५)

**आदरेंविण बोलणें। न पुसतां साक्ष देणें।**
**निंद्य वस्तु आंगिकारणें। तो येक मूर्ख ॥ ४६॥**

कोणाशी बोलताना आदराने बोलत नाही, कुणी न विचारताच साक्ष देतो व निंद्य वस्तूचा स्वीकार करतो तो मूर्खच जाणावा. (४६)

**तुक तोडून बोले। मार्ग सांडून चाले।**
**कुकर्मी मित्र केले। तो येक मूर्ख ॥ ४७॥**

महत्त्व सोडून जो वायफळ बडबडतो, उत्तम मार्ग सोडून जो आडमार्गाने जातो व नीच कर्मे करणारांशी जो मैत्री करतो, तो मूर्खच होय. (४७)

**पत्य राखों नेणे कदा। विनोद करी सर्वदा।**
**हासतां खिजे पेटे द्वंदा। तो येक मूर्ख ॥ ४८॥**

जो आपली पत कशी राखावी हे जाणत नाही, सदासर्वदा चेष्टामस्करी करतो, त्याला कुणी हसले तर मात्र चिडतो आणि भांडायला लागतो, तोही मूर्खच होय. (४८)

**होड घाली अवघड। काजेंविण करी बडबड।**
**बोलोंचि नेणे मुखजड। तो येक मूर्ख ॥ ४९॥**

जो अवघड पैज मारतो, किंवा जो कामाशिवाय उगीच बडबड करतो अथवा जो आवश्यकता असूनही बोलत नाही, तो मूर्ख जाणावा. (४९)

**वस्त्र शास्त्र दोनी नसे। उंचे स्थळीं जाऊन बैसे।**
**जो गोत्रजांस विस्वासे। तो येक मूर्ख ॥ ५०॥**

स्वतःजवळ चांगली वस्त्रे किंवा उत्तम विद्या वगैरे काहीच योग्यता नसताना जो उच्चासनावर जाऊन बसतो तो व जो भाऊबंदांवर विश्वास ठेवतो, ते दोघेही मूर्खच! (५०)

**तश्करासी वोळखी सांगे। देखिली वस्तु तेचि मागे।**
**आपलें आन्हीत करी रागें। तो येक मूर्ख ॥ ५१॥**

जो चोराला आपली माहिती देतो, जी वस्तू दिसेल ती मागतो अथवा रागारागाने आपलेच अनहित करतो, तो मूर्खच असतो. (५१)

**हीन जनासीं बरोबरी। बोल बोले सरोत्तरीं।**
**वामहस्तें प्राशन करी। तो येक मूर्ख ॥ ५२॥**

हीन लोकांशी जो बरोबरी करतो, उत्तरास प्रत्युत्तर या रीतीने जो बोलतो आणि डाव्या हाताने जो पाणी पितो, तो मूर्ख जाणावा. (५२)

**समर्थासीं मत्सर धरी। अलभ्य वस्तूचा हेवा करी।**
**घरीचा घरीं करी चोरी। तो येक मूर्ख ॥ ५३॥**

श्रेष्ठ लोकांचा मत्सर करणारा, अलभ्य वस्तूचा हेवा करणारा व आपल्याच घरात चोरी करणारा मूर्ख होय. (५३)

**सांडूनियां जगदीशा। मनुष्याचा मानी भर्वसा।**
**सार्थकेंविण वेंची वयसा। तो येक मूर्ख ॥ ५४॥**

ईश्वरास सोडून जो मनुष्याचा भरवसा धरतो आणि मनुष्यजीवनाचे सार्थक न करता आयुष्य वाया घालवितो, तो एक मूर्खच होय. (५४)

**संसारदुःखाचेनि गुणें। देवास गाळी देणें।**
**मैत्राचें बोले उणें। तो येक मूर्ख ॥ ५५॥**

संसारात भोगाव्या लागणाऱ्या दुःखामुळे जो देवाला शिव्या देतो, आपल्या मित्रांचे दोष जो लोकांत उघड करून सांगतो, तो एक मूर्खच. (५५)

अल्प अन्याय क्षमा न करी। सर्व काळ धारकीं धरी।
जो विस्वासघात करी। तो येक मूर्ख ॥ ५६॥

कुणी लहानसहान अपराध केला तरी जो क्षमा करीत नाही व त्या व्यक्तीस सारखे धारेवर धरतो, तसेच जो विश्वासघात करतो, तो एक मूर्खच जाणावा. (५६)

समर्थाचे मनींचे तुटे। जयाचेनि सभा विटे।
क्षणा बरा क्षणा पालटे। तो येक मूर्ख ॥ ५७॥

जो श्रेष्ठ व्यक्तींच्या मनातून उतरतो, सभा ज्याला विटते, कंटाळते, जो क्षणात चांगला तर क्षणात वाईट असा वागण्यात अस्थिर असतो, तो मूर्खच असतो. (५७)

बहुतां दिवसांचे सेवक। त्यागून ठेवी आणिक।
ज्याची सभा निर्नायेक। तो येक मूर्ख ॥ ५८॥

कित्येक दिवसांचे जुने सेवक काढून टाकून जो नवीन ठेवतो व ज्याच्या सभेला कुणी योग्य नेता नसतो, तो मूर्खच जाणावा. (५८)

अनीतीनें द्रव्य जोडी। धर्म नीति न्याय सोडी।
संगतीचें मनुष्य तोडी। तो येक मूर्ख ॥ ५९॥

जो अनीतीने द्रव्य मिळवितो, धर्म, नीती, न्याय यांची पर्वा करत नाही, आपल्या सहकाऱ्यांना दुखावतो, तो एक मूर्खच होय. (५९)

घरीं असोन सुंदरी। जो सदांचा परद्वारी।
बहुतांचें उचिष्ट अंगीकारी। तो येक मूर्ख ॥ ६०॥

घरी स्वत:ची सुंदर पत्नी असतानाही जो नेहमी परस्त्रीच्या नादी लागतो, अनेक लोकांचे उष्टे जो स्वीकारतो तोही मूर्खच. (६०)

आपुलें अर्थ दुसऱ्यापासीं। आणी दुसऱ्याचें अभिळासी।
पर्वत करी हीनासी। तो येक मूर्ख ॥ ६१॥

आपले द्रव्य दुसऱ्यापाशी ठेवतो व दुसऱ्याच्या द्रव्याची अभिलाषा धरतो, हलक्या लोकांच्या बरोबर देण्याघेण्याचा व्यवहार करतो, तो मूर्ख जाणावा. (६१)

अतिताचा अंत पाहे। कुग्रामामधें राहे।
सर्वकाळ चिंता वाहे। तो येक मूर्ख ॥ ६२॥

जो अतिथीला त्रास देतो, कुग्रामात राहातो व सदा सर्वदा चिंता करीत असतो, तो मूर्ख समजावा.(६२)

दोघे बोलत असती जेथें। तिसरा जाऊन बैसे तेथें।
डोई खाजवी दोहीं हातें। तो येक मूर्ख ॥ ६३॥

दोन व्यक्ती काही खाजगी बोलत असता हा तिसरा विनाकारणच तेथे जाऊन बसतो व दोन्ही हातांनी डोके खाजवितो, त्यास मूर्खच म्हणावे लागेल. (६३)

उदकामधें सांडी गुरळी। पायें पाये कांडोळी।
सेवा करी हीन कुळीं। तो येक मूर्ख ॥ ६४॥

स्वच्छ पाण्यात चूळ टाकतो, पायाने पाय खाजवतो, हीनकुळाची सेवा करतो, तो एक मूर्खच. (६४)

स्त्री बाळका सलगी देणें। पिशाच्यासन्निध बैसणें।
मर्यादेविण पाळी सुणें। तो येक मूर्ख ॥ ६५॥

स्त्रिया व मुले यांच्यात उगीचच मिसळतो, पिशाच्चाजवळ जाऊन बसतो, कुत्रे पाळतो, पण त्यास शिस्त लावत नाही, तो एक मूर्खच. (६५)

परस्त्रीसीं कळह करी। मुकी वस्तु निघातें मारी।
मूर्खाची संगती धरी। तो येक मूर्ख ॥६६॥

जो परस्त्रीशी भांडतो, मुक्या जनावरांना शस्त्राने मारतो, मूर्ख माणसाची संगत करतो, तो मूर्ख जाणावा. (६६)

कळह पाहात उभा राहे। तोडविना कौतुक पाहे।
खरें अस्तां खोटें साहे। तो येक मूर्ख ॥ ६७॥

जो भांडणतंटा पाहात उभा असतो, तो सोडविण्याचा प्रयत्न करीत नाही. उलट कौतुकाने बघतो, जे खरे असते ते सोडून खोटे सहन करतो, तो एक मूर्खच होय. (६७)

लक्ष्मी आलियावरी। जो मागील वोळखी न धरी।
देवीं ब्राह्मणीं सत्ता करी। तो येक मूर्ख ॥ ६८॥

संपत्ती प्राप्त झाली असता जो जुनी ओळख ठेवत नाही व देवाब्राह्मणांवर सत्ता गाजवतो, तो मूर्ख जाणावा.(६८)

आपलें काज होये तंवरी। बहुसाल नम्रता धरी।
पुढिलांचें कार्य न करी। तो येक मूर्ख ॥ ६९॥

जोपर्यंत स्वत:ची गरज असते तोपर्यंत, जो इतरांशी नम्रतेने वागतो. मात्र कुणाच्या उपयोगी पडत नाही, तोही मूर्खच. (६९)

अक्षरें गाळून वाची। कां तें घालीं पदरिचीं।
नीघा न करी पुस्तकाची। तो येक मूर्ख ॥ ७० ॥

जो वाचताना अक्षरे गाळतो किंवा पदरची घालून वाचतो व पुस्तकाची निगा राखत नाही, तो मूर्खच होय. (७०)

आपण वाचीना कधीं। कोणास वाचावया नेदी।
बांधोन ठेवी बंदीं। तो येक मूर्ख ॥ ७१ ॥

जो आपण कधी ग्रंथ वाचत नाही किंवा दुसऱ्या कुणालाही वाचायला देत नाही, बासनात बांधून ठेवून देतो, तोही मूर्खच जाणावा. (७१)

ऐसीं हें मूर्खलक्षणें। श्रवणें चातुर्य बाणे।
चित्त देउनियां शहाणे। ऐकती सदा ॥ ७२ ॥

अशी ही मूर्खलक्षणे अपार आहेत. यांचे लक्षपूर्वक श्रवण केल्याने अंगी चातुर्य बाणते. म्हणून शहाणे लोक नेहमी एकाग्र मनाने यांचे श्रवण करतात. (७२)

लक्षणें अपार असती। परी कांहीं येक येथामती।
त्यागार्थ बोलिलें श्रोतीं। क्षमा केलें पाहिजे॥ ७३ ॥

मूर्खांची लक्षणे अपार आहेत. पण त्यातील काही त्यांचा त्याग घडावा म्हणून यथामती वर्णन केली आहेत. तरी श्रोत्यांनी क्षमा करावी. (७३)

उत्तम लक्षणें घ्यावीं। मूर्ख लक्षणें त्यागावीं।
पुढिले समासीं आघवीं। निरोपिलीं ॥ ७४ ॥

मूर्ख लक्षणांचा त्याग करून उत्तम लक्षणे घ्यावीत, यासाठी आता पुढील समासात त्या सर्व उत्तम लक्षणांचे वर्णन केले आहे. (७४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मूर्खलक्षणनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक २ : समास २

## उत्तमलक्षण

॥ श्रीराम ॥

श्रोतां व्हावें सावधान। आतां सांगतों उत्तम गुण।
जेणें करितां बाणे खुण। सर्वज्ञपणाची ॥ १ ॥

आता मी उत्तम गुणांची लक्षणे वर्णन करून सांगतो. श्रोत्यांनी ती लक्ष देऊन ऐकावीत. ही लक्षणे जर ग्रहण केली, तर अंगी सर्वज्ञता बाणते. (१)

वाट पुसल्याविण जाऊं नये।
फळ वोळखिल्याविण खाऊं नये।
पडिली वस्तु घेऊं नये। येकायेकीं ॥ २ ॥

कुठेही जाताना योग्य प्रकारे मार्गाची चौकशी केल्याशिवाय जाऊ नये. फळ खाण्यापूर्वी त्यासंबंधी व्यवस्थित माहिती घेऊन मग ते खावे. वाटेत एखादी वस्तू पडलेली दिसली, तर ती एकाएकी उचलून घेऊ नये. (२)

अति वाद करूं नये। पोटीं कपट धरूं नये।
शोधिल्याविण करूं नये। कुळहीन कांता ॥ ३ ॥

फार वादविवाद करू नये. कुणाशीही कपटाने वागू नये, कुलशीलाची चौकशी केल्याखेरीज कुणाही मुलीशी विवाह करू नये. (३)

विचारेंविण बोलों नये। विवंचनेविण चालों नये।
मर्यादेविण हालों नये। कांहीं येक ॥ ४ ॥

विचार केल्याखेरीज बोलू नये. पूर्वचर्चेशिवाय कुठल्याही कामाला सुरुवात करू नये. लोकात वागताना मर्यादेचे पालन जरूर करावे. (४)

प्रीतीविण रुसों नये। चोरास वोळखी पुसों नये।
रात्रीं पंथ क्रमूं नये। येकायेकीं ॥ ५ ॥

प्रेम नसेल तर तेथे रुसू नये. चोरास परिचय विचारू नये. रात्री एकट्याने प्रवास करू नये. (५)

जनीं आर्जव तोडूं नये। पापद्रव्य जोडूं नये।
पुण्यमार्ग सोडूं नये। कदाकाळीं ॥ ६ ॥

लोकांत सरळपणा कधी सोडू नये, पापमार्गाने द्रव्य मिळवू नये. कुठल्याही बिकट प्रसंगीही सन्मार्ग सोडू नये. (६)

निंदा द्वेष करूं नये। असत्संग धरूं नये।
द्रव्यदारा हरूं नये। बळात्कारें ॥ ७॥

कुणाचीही निंदा करू नये, कुणाचा द्वेष करू नये, वाईट संगत धरू नये आणि बळजबरीने लोकांचे द्रव्य अथवा स्त्री यांचे अपहरण करू नये. (७)

वक्तयास खोदूं नये। ऐक्यतेसी फोडूं नये।
विद्याभ्यास सोडूं नये। कांहीं केल्या ॥ ८॥

वक्ता बोलत असता मध्येच त्याचे खंडण करू नये. लोकांची एकी असेल, तर त्यात भांडण लावून देऊन फूट पाडू नये. विद्याभ्यास करणे कधीही सोडू नये. (८)

तोंडाळासीं भांडों नयें। वाचाळासीं तंडों नये।
संतसंग खंडूं नये। अंतर्यामीं ॥ ९॥

तोंडाळ माणसाशी भांडायला जाऊ नये. वाचाळाशी वाद घालू नये आणि अंतर्यामी संतांची संगती कधीही सोडू नये. (९)

अतिक्रोध करूं नये। जिवलगांस खेदूं नये।
मनीं वीट मानूं नये। सिकवणेचा ॥ १०॥

अति क्रोध करू नये. आपल्या प्रिय व्यक्तीला कधी दुखवू नये. कुणी आपल्या चांगल्यासाठी आपणास चार गोष्टी शिकवत असेल, तर त्याचा कंटाळा मानू नये. (१०)

क्षणक्षणां रुसों नये। लटिका पुरुषार्थ बोलों नये।
केल्याविण सांगों नये। आपला पराक्रमु ॥ ११॥

वरचेवर रुसू नये. उगीच खोट्या फुशारक्या मारू नयेत. पराक्रम न करताच उगीच बढाया मारू नयेत. (११)

बोलिला बोल विसरों नये। प्रसंगीं सामर्थ्य चुकों नये।
केल्याविण निखंदूं नये। पुढिलांसि कदा ॥ १२॥

आपण कुणाला शब्द दिला तर तो कधी विसरू नये. योग्य वेळी बळाचा उपयोग केल्याखेरीज राहू नये. आपण करून दाखविल्याखेरीज दुसऱ्याचा कधी तिरस्कार करू नये. (१२)

आळसें सुख मानूं नये। चाहाडी मनास आणूं नये।
शोधल्याविण करूं नये। कार्य कांहीं ॥ १३॥

आळसात कधीही सुख मानू नये. कुणाची चहाडी करण्याचे कधी मनातही आणू नये. सर्व प्रकारे उलटसुलट विचार करूनच कोणतेही कार्य करावे. (१३)

सुखा आंग देऊं नये। प्रेत्न पुरुषें सांडूं नये।
कष्ट करितां त्रासों नये। निरंतर ॥ १४॥

देहाचे फार चोचले करू नयेत. पुरुषाने प्रयत्न करणे कधीही सोडू नये. निरंतर कष्ट करावे लागले तरी त्रासू नये. (१४)

सभेमध्ये लाजों नये। बाष्कळपणें बोलों नये।
पैज होड घालूं नये। कांहीं केल्यां ॥ १५॥

सभेमध्ये लाजू नये किंवा बाष्कळपणे वटवट करू नये, कुठल्याही परिस्थितीत पैजा मारू नये. (१५)

बहुत चिंता करूं नये। निसुगपणें राहों नये।
परस्त्रीतें पाहों नये। पापबुद्धी ॥ १६॥

फार चिंता करू नये. निष्काळजीपणे राहू नये. परस्त्रीकडे कधीही पापबुद्धीने पाहू नये. (१६)

कोणाचा उपकार घेऊं नये। घेतला तरी राखों नये।
परपीडा करूं नये। विस्वासघात ॥ १७॥

शक्यतो कुणाकडून उपकार घेऊ नये. काही कारणाने घ्यावा लागला तर तो फेडल्याशिवाय राहू नये. परपीडा अथवा विश्वासघात कधीही करू नये. (१७)

शोच्येंविण असों नये। मळिण वस्त्र नेसों नये।
जाणारास पुसों नये। कोठें जातोस म्हणौनी ॥ १८॥

कधी अस्वच्छ, अशुद्ध राहू नये. मलिन वस्त्रे नेसू नयेत किंवा कुणी बाहेर जाण्यास निघाला असेल, तर 'कोठे जातोस' असेही कधी विचारू नये. (१८)

व्यापकपण सांडूं नये। पराधेन होऊं नये।
आपलें वोझें घालूं नये। कोणीयेकासी ॥ १९॥

आपल्या अंत:करणाची विशालता, औदार्य कधी सोडू नये. दुसऱ्याच्या आधीन होऊन राहू नये व आपला भारही दुसऱ्या कुणावर कधी घालू नये. (१९)

पत्रेंविण पर्वत करूं नये। हीनाचें रुण घेऊं नये।
गोहीविण जाऊं नये। राजद्वारा ॥ २०॥

लेखी कागदपत्राशिवाय कधी देण्याघेण्याचा व्यवहार करू नये. नीच माणसांकडून कधी कर्ज घेऊ नये. साक्षी-पुराव्याशिवाय राजदरबारी-कोर्टकचेरीत कधी जाऊ नये. (२०)

लटिकी जाजू घेऊं नये। सभेस लटिकें करूं नये।
आदर नस्तां बोलों नये। स्वभाविक ॥ २१॥

कुणावरही खोटा आरोप करू नये. सभेस खोटे ठरवू नये. जेथे आपल्याविषयी आदर नसेल तेथे स्वाभाविकपणे बोलायला जाऊ नये. (२१)

आदखणेपण करूं नये। अन्यायेंविण गांजूं नये।
अवनीतीनें वर्तों नये। आंगबळें ॥ २२॥

कुणाचाही मत्सर करू नये, उगीच अन्यायाने कुणालाही छळू नये. शरीरबळाच्या जोरावर कधीही अन्यायाने वागू नये. (२२)

बहुत अन्न खाऊं नये। बहुत निद्रा करूं नये।
बहुत दिवस राहों नये। पिसुणाचेथें ॥ २३॥

अती आहार घेऊ नये. फार झोपही काढू नये. दुष्ट माणसाच्या घरी कधी फार दिवस राहू नये. (२३)

आपल्याची गोही देऊं नये। आपली कीर्ती वर्णूं नये।
आपलें आपण हासों नये। गोष्टी सांगोनी ॥ २४॥

केवळ आपला माणूस असे समजून त्याच्यासाठी साक्ष देऊ नये. आपली कीर्ती आपणच वर्णन करून सांगू नये. गोष्टी सांगताना आपणच हसू नये. (२४)

धूम्रपान घेऊं नये। उन्मत्त द्रव्य सेऊं नये।
बहुचकासीं करूं नये। मैत्री कदा ॥ २५॥

धूम्रपान करू नये. मादक पदार्थाचे सेवन करू नये. वाचाळाशी मैत्री करू नये. (२५)

कामेंविण राहों नये। नीच उत्तर साहों नये।
आसुदें अन्न सेऊं नये। वडिलांचेंहि ॥ २६॥

कामाशिवाय कधी मोकळे बसू नये. नीच उत्तर सहन करू नये. वडिलांचे असले तरी आयते अन्न कधी खाऊ नये. (२६)

तोंडीं सीवी असों नये। दुसऱ्यास देखोन हांसों नये।
उणें अंगीं संचारों नये। कुळवंताचे ॥ २७॥

तोंडात शिवी नसावी. दुसऱ्याला पाहून त्याचा उपहास करून हसू नये. चांगल्या कुळातील माणसांचे अंगी उगीच कमीपणा चिकटवू नये. (२७)

देखिली वस्तु चोरूं नये। बहुत कृपण होऊं नये।
जिवलगांसी करूं नये। कळह कदा ॥ २८॥

जी वस्तू दिसेल ती चोरू नये, अत्यंत कृपण होऊ नये. आपल्या जिवलगांशी कधी भांडण करू नये. (२८)

येकाचा घात करूं नये। लटिकी गोही देऊं नये।
अप्रमाण वर्तों नये। कदाकाळीं ॥ २९॥

कोणाचाही घात करू नये. खोटी साक्ष देऊ नये. अमर्याद वर्तन कधीही करू नये. (२९)

चाहाडी चोरी धरूं नये। परद्वार करूं नये।
मागें उणें बोलों नये। कोणीयेकाचें ॥ ३०॥

कुणाची चहाडी करू नये, कुठलीही चोरी करू नये. परस्त्रीशी संबंध ठेवू नये व कुणाचेही पाठीमागे त्याची निंदा करू नये. (३०)

समई यावा चुकों नये। सत्वगुण सांडूं नये।
वैरियांस दंडूं नये। शरण आलियां ॥ ३१॥

प्रसंगी धैर्य दाखविण्यास चुकू नये. सत्त्वगुण कधी सोडू नये. शत्रू जर शरण आला तर त्यास कधी दंड देऊ नये. (३१)

अल्पधनें माजों नये। हरिभक्तीस लाजों नये।
मर्यादेविण चालों नये। पवित्र जनीं ॥ ३२॥

थोड्याशा ऐश्वर्याने उन्मत्त होऊ नये. हरिभक्ती करण्यास कधी लाजू नये. पवित्र लोकांत वाटेल तसे अमर्याद वागू नये. (३२)

मूर्खासी संमंध पडो नयें। अंधारीं हात घालू नये।
दुश्चितपणें विसरों नये। वस्तु आपुली ॥ ३३॥

मूर्खाशी मैत्री करण्यास जाऊ नये. अंधारात कधी हात घालू नये. वेंधळेपणाने आपली वस्तू कुठेही विसरू नये. (३३)

स्नानसंध्या सांडूं नये। कुळाचार खंडूं नये।
अनाचार मांडूं नये। चुकुरपणें ॥ ३४॥

स्नानसंध्या (नित्यकर्म) सोडू नये. कुळाचारात खंड पडू देऊ नये. कष्टास घाबरून आळसाने अनाचार करू नये. (३४)

हरिकथा सांडूं नये। निरूपण तोडूं नये।
परमार्थास मोडूं नये। प्रपंचबळें ॥ ३५॥

हरिकथेचे श्रवण, कीर्तन सोडू नये. अध्यात्मनिरूपण टाळू नये. प्रपंचांत दंग होऊन परमार्थाचा त्याग करू नये. (३५)

देवाचा नवस बुडऊं नये। आपला धर्म उडऊं नये।
भलतें भरीं भरों नये। विचारेंविण ॥ ३६॥

देवाचा नवस फेडण्यास चुकू नये. आपल्या धर्माचा त्याग करू नये. विचार न करता भिडेस बळी पडून भलतेसलते करू नये. (३६)

**निष्ठुरपण धरूं नये। जीवहत्या करूं नये।**
**पाऊस देखोन जाऊं नये। अथवा अवकाळीं॥ ३७॥**

निष्ठुरपणा करू नये, कुणाही जीवाची हत्या करू नये. फार पाऊस पडत असता किंवा अयोग्य वेळी कुठे जाऊ नये. (३७)

**सभा देखोन गळों नये। समईं उत्तर टळों नये।**
**धि:कारितां चळों नये। धारिष्ट आपुलें॥ ३८॥**

सभा पाहून गडबडून जाऊ नये. वेळप्रसंगी उत्तर देण्याचे टाळू नये. कुणी धिक्कार केला तरी आपले धैर्य चळू देऊ नये. (३८)

**गुरुविरहित असों नये। नीच यातीचा गुरु करूं नये।**
**जिणें शाश्वत मानूं नये। वैभवेंसीं॥ ३९॥**

गुरूवाचून राहू नये पण हलक्या जातीचा गुरू करू नये. वैभवाच्या योगे आयुष्य ही शाश्वत टिकणारी वस्तू आहे असे समजू नये. (३९)

**सत्य मार्ग सांडूं नये। असत्य पंथें जाऊं नये।**
**कदा अभिमान घेऊं नये। असत्याचा॥ ४०॥**

सत्यमार्ग कधीही सोडू नये. खोट्या मार्गाने कधी जाऊ नये व खोट्याचा अभिमानही बाळगू नये. (४०)

**अपकीर्ति ते सांडावी। सदकीर्ति वाढवावी।**
**विवेकें दृढ धरावी। वाट सत्याची॥ ४१॥**

अपकीर्ती कधीही होऊ देऊ नये. सत्कीर्ती वाढवावी. विचारपूर्वक नेहमी सत्याचीच वाट दृढ धरावी. (४१)

**नेघतां हे उत्तम गुण। तें मनुष्य अवलक्षण।**
**ऐक तयांचें लक्षण। पुढिलीये समासीं॥ ४२॥**

हे उत्तम गुण जो घेत नाही, तो मनुष्य अवलक्षणी समजावा. पुढील समासात अशा अवलक्षणी माणसाचे वर्णन ऐका. (४२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उत्तमलक्षणनाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक २ : समास ३

# कुविद्यालक्षण

॥ श्रीराम ॥

**ऐका कुविद्येचीं लक्षणें। अति हीनें कुलक्षणें।**
**त्यागार्थ बोलिलीं ते श्रवणें। त्याग घडे॥ १॥**

आता कुविद्येची अति हीन अशी कुलक्षणे, त्यांचा त्याग करावा म्हणून वर्णन करून सांगतो, ती ऐकावी. (१)

**ऐका कुविद्येचा प्राणी। जन्मा येऊन केली हानी।**
**सांगिजेल येहीं लक्षणीं। वोळखावा॥ २॥**

आता कुविद्येचा प्राणी कसा ओळखावा ते त्याची जी लक्षणे वर्णन करतो त्यावरून कळेल. त्याने जन्मास येऊन स्वत:चे अत्यंत नुकसान करून घेतलेले असते. (२)

**कुविद्येचा प्राणी असे। तो कठिण निरूपणें त्रासे।**
**अवगुणाची समृद्धि असे। म्हणौनियां॥ ३॥**

कुविद्येचा जो मनुष्य असतो, त्याच्या ठिकाणी अवगुणाची खाण असल्याने अवघड निरूपणाने तो त्रासून जातो. (३)

**श्लोक**

दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोध: पारुष्यमेव च।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम्॥

**अर्थ**—दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, कठोरपणा ही आसुरी संपत्तीची लक्षणे आहेत. काम, क्रोध, मद, मत्सर, लोभ, दंभ, तिरस्कार, गर्व, ताठा, अहंकार, द्वेष, विषाद, विकल्प, आशा, ममता, तृष्णा, कल्पना, चिंता, अहंता, कामना, भावना, असूया, अविद्या, (लोकेषणा, वित्तेषणा, दारेषणा किंवा कुणी म्हणतात पुत्रेषणा या) तीन ईषणा, वासना, अतृप्ती, आसक्ती, इच्छा, वांछा,

**काम क्रोध मद मत्सर। लोभ दंभ तिरस्कार।**
**गर्व ताठा अहंकार। द्वेष विषाद विकल्पी॥ ४॥**

**आशा ममता तृष्णा कल्पना ।**
**चिंता अहंता कामना भावना ।**
**असूया अविद्या ईषणा वासना । अतृप्ती लोलंगता ॥ ५ ॥**

**इछ्या वांछ्या चिकिछ्या निंदा ।**
**आनित्य ग्रामणी मस्ती सदा ।**
**जाणीव अवज्ञा विपत्तीआपदा । दुर्वृत्ती दुर्वासना ॥ ६ ॥**

**स्पर्धा खटपट आणी चटपट ।**
**तऱ्हे झटपट आणी वटवट ।**
**सदा खटखट आणी लटपट । परम वेथा कुविद्या ॥ ७ ॥**

**कुरूप आणी कुलक्षण । अशक्त आणी दुर्जन ।**
**दरिद्री आणी कृपण । आतिशयेंसीं ॥ ८ ॥**

**आळसी आणि खादाड । दुर्बळ आणी लताड ।**
**तुटक आणी लबाड । आतिशयेंसीं ॥ ९ ॥**

**मूर्ख आणी तपीळ । वेडें आणी वाचाळ ।**
**लटिकें आणी तोंडाळ । आतिशयेंसीं ॥ १० ॥**

**नेणे आणी नायके । न ये आणी न सीके ।**
**न करी आणी न देखे । अभ्यासदृष्टी ॥ ११ ॥**

**अज्ञान आणी अविस्वासी । छळवादी आणी दोषी ।**
**अभक्त आणी भक्तांसी । देखों सकेना ॥ १२ ॥**

**पापी आणी निंदक । कष्टी आणी घातक ।**
**दुःखी आणी हिंसक । आतिशयेंसीं ॥ १३ ॥**

**हीन आणी कृत्रिमी । रोगी आणी कुकर्मी ।**
**आचंगुल आणी अधर्मी । वासना रमे ॥ १४ ॥**

**हीन देह आणी ताठा । अप्रमाण आणी फांटा ।**
**बाष्कळ आणी करंटा । विवेक सांगे ॥ १५ ॥**

**लंडी आणी उन्मत्त । निकामी आणी डुल्लत ।**
**भ्याड आणी बोलत । पराक्रमु ॥ १६ ॥**

**कनिष्ठ आणी गर्विष्ठ । नुपरतें आणी नष्ट ।**
**द्वेषी आणी भ्रष्ट । आतिशयेंसीं ॥ १७ ॥**

**अभिमानी आणी निसंगळ । वोडगस्त आणी खळ ।**
**दंभिक आणी अनर्गळ । आतिशयेंसीं ॥ १८ ॥**

**वोखटे आणी विकारी । खोटें आणी अनोपकारी ।**
**अवलक्षण आणी धिःकारी । प्राणिमात्रांसी ॥ १९ ॥**

चिकित्सा, निंदा, अनीती, गावगुंडपणा करणे, सदा मस्तीत राहणे, जाणीव, अवज्ञा, विपत्ती, आपदा, दुर्वृत्ती, दुर्वासना, स्पर्धा, खटपट आणि लटपट, तऱ्हेवाईकपणा, झटपट काम उरकण्याची घाई, वटवट करणे, सदा तक्रार करण्याचा स्वभाव, कसे तरी काम उरकणे, ही सर्व कुविद्येची लक्षणे असून कुविद्या हा एक भयंकर रोगच आहे. (४—७)

कुविद्येचा माणूस कुरूप आणि कुलक्षणी, अशक्त आणि दुर्जन, दरिद्री असून अतिशय कंजूष असतो. (८)

तो आळशी आणि खादाड असतो व दुर्बळ असूनही उर्मट व अत्यंत लबाड आणि फटकून वागणारा असतो. (९)

तो मूर्ख असून तापट, वेडा असून वाचाळ, खोटा असूनही अतिशय तोंडाळ असतो. (१०)

स्वतःला काही कळत नाही, तरी दुसऱ्याचे ऐकत नाही. स्वतःस काही येत नाही आणि कुणी शिकवू लागले तर शिकतही नाही. स्वतः काही करत नाही आणि कुणी करत असेल तर त्याकडे अभ्यासाच्या दृष्टीने पाहातही नाही. (११)

अज्ञानी असून अविश्वासी, लोकांना छळणारा, दोषी, अभक्त असून भक्तांचा द्वेष करणारा असतो. (१२)

पापी, निंदा करणारा, स्वतः दुःखी-कष्टी असून लोकांचा घात करणारा आणि हिंसक, अतिशय क्रूर असा असतो. हीन बुद्धीचा असून दुसऱ्याची नक्कल करणारा, रोगी असून कुकर्म करणारा, कृपण असूनही अधर्मात जो रमतो असा असतो. (१३-१४)

देह हीन असूनही त्याच्या अंगी गर्व असतो, स्वतः अप्रमाण म्हणजे अमर्यादशील असून फाटे फोडणारा असतो. अर्थहीन बडबड करणारा, अभागी असून दुसऱ्याला विवेकाच्या गोष्टी सांगत असतो. (१५)

तो भित्रा असून उन्मत्त असतो, कुचकामाचा असून ऐट मिरविणारा आणि भ्याड असून पराक्रमाच्या बढाया मारणारा असतो. (१६)

तो कमी दर्जाचा असून गर्विष्ठ असतो, विषयासक्त असून नष्ट असतो व अत्यंत द्वेषी आणि भ्रष्ट असतो. (१७)

अभिमानी असून निर्लज्ज, संकटात सापडलेला असूनही दुष्ट, अत्यंत दांभिक आणि मिथ्या बोलणारा असतो. (१८)

अती लंपट व विकारी, खोटा आणि अपकार करणारा, अवलक्षणी असूनही प्राणिमात्रांचा धिक्कार करणारा असतो. (१९)

अल्पमती आणी वादक। दीनरूप आणी भेदक।
सूक्ष्म आणी त्रासक। कुशब्दे करूनि ॥ २० ॥

मंदबुद्धीचा असून वाद घालतो, दीनवाणा असूनही मर्मभेदक बोलतो, धूर्त कपटी असून वाईट शब्दाने लोकांना त्रास देणारा असतो. (२०)

कठिणवचनी कर्कशवचनी। कापट्यवचनी संदेहवचनी।
दुःखवचनी तीव्रवचनी। क्रूर निष्ठुर दुरात्मा॥ २१ ॥

तो कठोर वचने बोलणारा, कर्कश आवाजात ओरडून बोलणारा, कपटी वचने बोलणारा व संशययुक्त बोलणारा, मर्मभेदक, लोकांना दुःख होईल असे टोचून बोलणारा, अत्यंत क्रूर, निष्ठुर दुरात्माच असतो. (२१)

न्यूनवचनी पैशून्यवचनी। अशुभवचनी अनित्यवचनी।
द्वेषवचनी अनृत्यवचनी। बाष्कळवचनी धिःकारु ॥ २२ ॥

तो दुसऱ्याचे न्यून उघड करणारा, लावालावी करणारा, चहाडखोर, अशुभ शब्द बोलणारा, बोलणे फिरविणारा, द्वेषयुक्त, असत्य भाषण करणारा व बाष्कळपणे लोकांचा धिक्कार करणारा असतो. (२२)

कपटी कुटिळ गाठ्याळ। कुर्टे कुचर नट्याळ।
कोपी कुधन टवाळ। आतिशयेंसीं ॥२३ ॥

तो कपटी, कुटिल, आतल्या गाठीचा, मनातल्या मनात कुढणारा, कामचुकार, नष्ट, तापट, वाईट मार्गाने द्रव्य मिळविणारा व अत्यंत टवाळखोर असतो.(२३)

तपीळ तामस अविचार। पापी अनर्थी अपस्मार।
भूत समंधी संचार। आंगीं वसे ॥ २४ ॥

तो तापट, तामसी, अविचारी, पापी, अनर्थ करणारा, अपस्मारांनी पीडित व ज्याच्या अंगात भूत, समंधादी संचारतात असा असतो. (२४)

आत्महत्यारा स्त्रीहत्यारा। गोहत्यारा ब्रह्महत्यारा।
मातृहत्यारा पितृहत्यारा। महापापी पतित ॥ २५ ॥

तो आत्महत्या, स्त्रीहत्या, गोहत्या, ब्रह्महत्या, मातृहत्या, पितृहत्या करणारा अत्यंत पतित आणि महापातकी असतो. (२५)

उणें कुपात्र कुतर्की। मित्रद्रोही विस्वासघातकी।
कृतघ्न तल्पकी नारकी। आतित्याई जल्पक॥ २६ ॥

तो सर्वच बाबतीत उणा म्हणजे कमी दर्जाचा असून नालायक, कुतर्की, मित्रद्रोही, विश्वासघातकी, कृतघ्न, मात्रागमनी, नरकात जाण्यास योग्य, अघोरी व बडबड्या असतो. (२६)

किंत भांडण झगडा कळ्हो।
अधर्म अनराहाटी शोकसंग्रहो।
चाहाड वेसनी विग्रहो। निग्रहकर्ता ॥ २७ ॥

संशय बाळगणारा, भांडण, झगडा, कलह करणारा, अधर्माने, रूढीविरुद्ध वागणारा, सदैव शोक करणारा, चहाडखोर, व्यसनी, फूट पाडणारा व लोकांना धाकात ठेवणारा असतो. (२७)

द्वाड आपेसी वोंगळ। चाळक चुंबक लच्याळ।
स्वार्थी अभिळासी वोढाळ। आदत्त झोड आदखणा॥ २८ ॥

तो द्वाड, अपयशी, अस्वच्छ, चाळविणारा, कंजूष, लोचट, स्वार्थी, अभिलाषी, आसक्त, कवडीचुंबक, कोडगा, द्वेष करणारा असतो. (२८)

शठ शुंभ कातरु। लंड तर्मुंड सिंतरु।
बंड पाषांड तश्करु। अपहारकर्ता ॥ २९ ॥

तो लबाड, बेअकली, भ्याड, नाही तेथे डोके खुपसणारा, ठक, उन्मत्त, पाखंडी, चोर आणि दुसऱ्याच्या वस्तू पळविणारा असतो. (२९)

धीट सैराट मोकाट। चाट चावट वाजट।
थोट उद्धट लंपट। बटवाल कुबुद्धी ॥ ३० ॥

तो साहसी, स्वैराचारी, मोकाट वागणारा, बडबड्या, चावट, वात्रट, कुभांड रचणारा, उद्धट, लंपट, भ्रष्ट व कुबुद्धी असतो. (३०)

मारेकरी वरपेकरी। दरवडेकरी खाणोरी।
मैंद भोंदु परद्वारी। भुरेकरी चेटकी ॥ ३१ ॥

तो मारेकरी, लुटारू, दरोडेखोर, काळीजखाऊ, मैंद, भोंदू, बाहेरख्याली, मोहिनीविद्येने भुलविणारा, चेटूक करणारा असतो. (३१)

निशंक निलाजिरा कळभंट। टोणपा लैंद धट उद्धट।
ठस ठोंबस खट नट। जगभांड विकारी ॥ ३२ ॥

तो निःशंक, निलाजरा, भांडकुदळ, टोणपा, गलेलठ्ठ, धटिंगण व उद्धट असून नफ्फट, अक्षरशत्रू, शठ, नष्ट, साऱ्या जगाशी भांडणारा व विकारी असतो. (३२)

अधीर आळिका अनाचारी। अंध पंगु खोंकलेकरी।
थोंटा बधिर दमेकरी। तऱ्ही ताठा न संडी॥ ३३॥

तो उतावळ्या स्वभावाचा, हावरा, अनाचारी, आंधळा, पांगळा, खोकलेकरी, थोटा, बहिरा, दमेकरी असा रोगजर्जर असूनही ताठा न सोडणारा असतो. (३३)

विद्याहीन वैभवहीन। कुळहीन लक्ष्मीहीन।
शक्तिहीन सामर्थ्यहीन। अदृष्टहीन भिकारी॥ ३४॥

तो विद्याहीन, वैभवहीन, कुळहीन, लक्ष्मीहीन, शक्तिहीन, सामर्थ्यहीन, अदृष्टहीन भिकारीच असतो. (३४)

बळहीन कळाहीन। मुद्राहीन दीक्षाहीन।
लक्षणहीन लावण्यहीन। आंगहीन विपारा॥ ३५॥

तो बलहीन, कळाहीन, मुद्राहीन, दीक्षाहीन, लक्षणहीन, लावण्यहीन, अंगहीन कुरूप असा असतो. (३५)

युक्तिहीन बुद्धिहीन। आचारहीन विचारहीन।
क्रियाहीन सत्वहीन। विवेकहीन संशई॥३६॥

तो युक्तिहीन, बुद्धिहीन, आचारहीन, विचारहीन, क्रियाहीन, सत्त्वहीन, विवेकहीन, संशयी असतो. (३६)

भक्तिहीन भावहीन। ज्ञानहीन वैराग्यहीन।
शांतिहीन क्ष्माहीन। सर्वहीन क्षुल्लकु॥ ३७॥

तो भक्तिहीन, भावहीन, ज्ञानहीन, वैराग्यहीन, शांतिहीन, क्षमाहीन सर्वच प्रकारे हीन, अगदी क्षुद्र, असा असतो. (३७)

समयो नेणे प्रसंग नेणे। प्रेत्न नेणे अभ्यास नेणे।
आर्जव नेणे मैत्री नेणे। कांहींच नेणे अभागी॥ ३८॥

त्यास वेळप्रसंग कळत नाही, प्रयत्न करणे जमत नाही, अभ्यास जमत नाही, आर्जवाने वागता येत नाही, कुणाशी मैत्री करता येत नाही, त्या अभाग्यास काहीच करणे जमत नाही. (३८)

असो ऐसे नाना विकार। कुलक्षणाचें कोठार।
ऐसा कुविद्येचा नर। श्रोतीं वोळखावा॥३९॥

असो, याप्रमाणे नाना विकार ज्याच्या ठिकाणी आहेत, जो कुलक्षणाचे जणू कोठारच आहे, तो कुविद्येचा नर आहे, असे श्रोत्यांनी ओळखावे. (३९)

ऐसीं कुविद्येचीं लक्षणें। ऐकोनि त्यागचि करणें।
अभिमानें तऱ्हें भरणें। हें विहित नव्हे॥ ४०॥

याप्रमाणे येथे कुविद्येची जी लक्षणे सांगितली आहेत, त्यांचा त्याग करावा हेच बरे! अभिमानाने हट्टास पेटून ही वाईट लक्षणे न सोडण्याच्या भरीस पडणे योग्य नाही. (४०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कुविद्यालक्षणनाम' समास तिसरा समाप्त.**



## दशक २ : समास ४

# भक्तिनिरूपण

॥ श्रीराम ॥

नाना सुकृताचें फळ। तो हा नरदेह केवळ।
त्याहिमधें भाग्य सफळ। तरीच सन्मार्ग लागे॥ १॥

अनेक जन्मांच्या पुण्याईचे फळ म्हणूनच केवळ नरदेहाची प्राप्ती होते. त्यातही फार मोठे भाग्य उदयास आले, तरच मनुष्य सन्मार्गास लागतो. (१)

नरदेहीं विशेष ब्राह्मण। त्याहीवरी संध्यास्नान।
सद्वासना भगवद्भजन। घडे पूर्वपुण्यें॥ २॥

नरदेहातही विशेषेकरून ब्राह्मण कुळात जन्म लाभणे, संध्यास्नान इत्यादी नित्यकर्मे व्यवस्थित करण्याची बुद्धी होणे व उत्तम वासना राहून हातून भगवद्भजन घडणे, हे सर्व पूर्वपुण्याईनेच होऊ शकते. (२)

भगवद्भक्ति हे उत्तम। त्याहीवरी सत्समागम।
काळ सार्थक हाचि परम। लाभ जाणावा॥ ३॥

भगवद्भक्ती करणे हे उत्तम आहेच. त्यांतही संतांचा सहवास लाभून काळ सार्थकी लागत असेल, तर हा फारच मोठा लाभ जाणावा. (३)

प्रेमप्रीतीचा सद्भाव। आणि भक्तांचा समुदाव।
हरिकथा मोहोत्साव। तेणें प्रेमा दुणावे॥ ४॥

हृदयात भगवंताबद्दल विशुद्ध प्रेमभावना असेल व त्यात भगवद्भक्तांचा समुदाय जमून त्या महोत्सवात हरिकथाश्रवण घडले तर त्यायोगे भगवत्प्रेम दुणावते. (४)

नरदेहीं आलियां येक। कांहीं करावें सार्थक।
जेणें पाविजे परलोक। परम दुल्लभ जो ॥ ५॥

नरदेह प्राप्त झाला असता त्याचे सार्थक करण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे परम दुर्लभ जो परलोक त्याची प्राप्ती होते. (५)

विधियुक्त ब्रह्मकर्म। अथवा दया दान धर्म।
अथवा करणें सुगम। भजन भगवंताचें ॥ ६॥

त्यासाठी ब्रह्मकर्म विधियुक्त करावे अथवा दुसऱ्यावर दया करावी, दानधर्मादी करावे व सर्वांत सोपे साधन म्हणजे भगवंताचे भजन करावे. (६)

अनुतापें करावा त्याग। अथवा करणें भक्तियोग।
नाहीं तरी धरणें संग। साधुजनाचा ॥ ७॥

पश्चात्तापाने संसाराचा त्याग करावा अथवा भक्तियोगाचे आचरण करावे. नाही तर निदान साधुपुरुषाच्या संगतीत राहावे. (७)

नाना शास्त्रें धांडोळावीं। अथवा तीर्थें तरी करावीं।
अथवा पुरश्चरणें बरवीं। पापक्षयाकारणें ॥ ८॥

अनेक शास्त्रांचा सखोल अभ्यास करावा किंवा तीर्थयात्रा कराव्या किंवा निदान पापक्षय व्हावा म्हणून उत्तम मंत्रांची पुरश्चरणे तरी करावीत. (८)

अथवा कीजे परोपकार। अथवा ज्ञानाचा विचार।
निरूपणीं सारासार। विवेक करणें ॥ ९॥

अथवा परोपकार करावा किंवा ज्ञानासंबंधी विचार करावा किंवा ऐकलेल्या निरूपणातून सारासार विवेक ग्रहण करावा. (९)

पाळावी वेदांची आज्ञा। कर्मकांड उपासना।
जेणें होईजे ज्ञाना। अधिकारपात्र ॥ १०॥

वेदांची आज्ञा पाळावी व ज्ञानाच्या अधिकारास पात्र होण्यासाठी कर्ममार्ग, उपासना यांचे व्यवस्थित आचरण करावे. (१०)

काया वाचा आणि मनें। पत्रें पुष्पें फळें जीवनें।
कांही तरी येका भजनें। सार्थक करावें ॥ ११॥

काया, वाचा आणि मनाने, जी सामग्री प्राप्त होईल त्याने पाने, फुले, फळे अथवा जल यांनी भगवंताचे पूजन, भजन करून आपल्या जीवनाचे सार्थक करावे. (११)

जन्मा आलियाचें फळ। कांहीं करावें सफळ।
ऐसें न करितां निर्फळ। भूमिभार होये ॥ १२॥

नरजन्मास आल्यासारखे काही ना काही साधन करून तो जन्म सार्थकी लावावा. असे जर केले नाही, तर जन्म वाया जाऊन आपण केवळ पृथ्वीला भारभूत होऊन राहतो. (१२)

नरदेहाचें उचित। कांहीं करावें आत्महित।
यथानुशक्त्या चित्तवित्त। सर्वोत्तमीं लावावें॥ १३॥

नरदेहाचा यथोचित उपयोग करून आत्महित साधावे. आपापल्या कुवतीस अनुसरून आपले चित्त व वित्त त्या सर्वोत्तमाचे-भगवंताचे चरणी समर्पित करावे. (१३)

हें कांहींच न धरी जो मनीं। तो मृत्यप्राय वर्ते जनीं।
जन्मा येऊन तेणें जननी। वायांच कष्टविली॥ १४॥

यापैकी जो काहीच करीत नाही, तो जगात जिवंत असूनही मेल्यासारखाच जाणावा. जन्मास येऊन त्याने आपल्या मातेला उगीचच कष्ट दिले असे म्हणावे लागते. (१४)

नाहीं संध्या नाहीं स्नान। नाहीं भजन देवतार्चन।
नाहीं मंत्र जप ध्यान। मानसपूजा ॥ १५॥

अशी माणसे, स्नान, संध्या, भजन, देवतार्चन, मंत्रजप, ध्यान वा मानसपूजा काहीच करीत नाहीत. (१५)

नाहीं भक्ति नाहीं प्रेम। नाहीं निष्ठा नाहीं नेम।
नाहीं देव नाहीं धर्म। अतीत अभ्यागत ॥ १६॥

ती भक्ती करीत नाहीत, भगवंतावर प्रेम करीत नाहीत, त्यांची कुठेही निष्ठा नसते. ती कुठलाही नेम पाळीत नाहीत, देव नाही, धर्म नाही, भोजनसमयी आलेल्या अतिथीचा सत्कार, अन्नदान करीत नाहीत. (१६)

नाहीं सद्बुद्धि नाहीं गुण। नाहीं कथा नाहीं श्रवण।
नाहीं अध्यात्मनिरूपण। ऐकिलें कदा ॥ १७॥

त्यांच्या ठिकाणी सद्बुद्धी नसते, उत्तम गुण नसतात, ते कीर्तन, श्रवण, किंवा अध्यात्मनिरूपण यांपैकी काहीही करत नाहीत. (१७)

**नाहीं भल्यांची संगती। नाहीं शुद्ध चित्तवृत्ती।**
**नाहीं कैवल्याची प्राप्ती। मिथ्यामदें ॥ १८॥**

ती सज्जनांची संगत करीत नाहीत, त्यांची चित्तशुद्धी होत नाही व मिथ्या मदामुळे त्यांना मोक्षाची प्राप्तीही होत नाही. (१८)

**नाहीं नीति नाहीं न्याये। नाहीं पुण्याचा उपाये।**
**नाहीं परत्रीची सोये। युक्तायुक्त क्रिया॥ १९॥**

ती न्यायाची चाड बाळगत नाहीत. पुण्यप्राप्तीसाठी प्रयत्न करीत नाहीत, युक्तायुक्त क्रियेसंबंधी विचारही करीत नाहीत व परलोकात उत्तम गती मिळावी, यासाठीही काही उपाय करीत नाहीत. (१९)

**नाहीं विद्या नाहीं वैभव। नाहीं चातुर्याचा भाव।**
**नाहीं कळा नाहीं लाघव। रम्यसरस्वतीचें ॥ २०॥**

विद्या, वैभव, चातुर्य, कला, किंवा सुंदर सरस्वतीचा वाग्विलास इत्यादी त्यांच्याजवळ काहीच नसते.(२०)

**शांती नाहीं क्ष्मा नाहीं। दीक्षा नाहीं मीत्री नाहीं।**
**शुभाशुभ कांहींच नाहीं। साधनादिक ॥ २१॥**

शांती, क्षमा, दीक्षा म्हणजे एखादे व्रत, नेम पाळणे, सज्जनांशी मैत्री, इत्यादी शुभाशुभ साधनादिक त्यांच्यापाशी नसते. (२१)

**सुचि नाहीं स्वधर्म नाहीं। आचार नाहीं विचार नाहीं।**
**आरत्र नाहीं परत्र नाहीं। मुक्त क्रिया मनाची॥ २२॥**

पवित्रता, स्वधर्मविचार, उत्तम आचार व विचार, इहलोकीचे सार्थक करण्यासंबंधी किंवा परलोकातील गतिसंबंधी विचार ते करीत नाहीत. आपल्या मनास वाटेल त्याप्रमाणे ते अनिर्बंध रीतीने वागतात. (२२)

**कर्म नाहीं उपासना नाहीं। ज्ञान नाहीं वैराग्य नाहीं।**
**योग नाहीं धारिष्ट नाहीं। कांहींच नाहीं पाह्यतां॥ २३॥**

त्यांच्या ठिकाणी कर्म नाही, उपासना नाही, ज्ञान नाही, वैराग्य नाही, योग नाही, धैर्य नाही; याप्रमाणे पाहू गेल्यास काहीच चांगले आढळून येत नाही. (२३)

**उपरती नाहीं त्याग नाहीं। समता नाहीं लक्ष्मण नाहीं।**
**आदर नाहीं प्रीति नाहीं। परमेश्वराची ॥ २४॥**

त्यांच्या ठिकाणी विरक्ती, त्याग, समता, उत्तम लक्षणे, भगवंताविषयी आदर वा प्रीती या सर्वच गोष्टींचा अभाव असतो. (२४)

**परगुणाचा संतोष नाहीं। परोपकारें सुख नाहीं।**
**हरिभक्तीचा लेश नाहीं। अंतर्यामीं ॥ २५॥**

लोकांचे गुण पाहून त्यांना संतोष वाटत नाही. परोपकाराचे सुख त्यांना माहीत नसते व अंतर्यामी हरिभक्तीचा लेशही नसतो. (२५)

**ऐसे प्रकारीचे पाहातां जन। ते जीतचि प्रेतासमान।**
**त्यांसीं न करावे भाषण। पवित्र जनीं ॥ २६॥**

अशा प्रकारचे लोक म्हणजे जिवंत असून प्रेतासमान अपवित्र समजावेत व पवित्र लोकांनी त्यांच्याशी भाषणही करू नये. (२६)

**पुण्यसामग्री पुरती। तयासीच घडे भगवद्भक्ती।**
**जे जे जैसें करिती। ते पावती तैसेंचि ॥ २७॥**

जर पूर्वपुण्याचा संग्रह असेल, तर त्या पुण्यवान मनुष्याकडूनच भगवद्भक्ती घडते. ज्याचे पूर्व कर्म जसे असते, त्याप्रमाणेच त्यांना तसे फळ प्राप्त होत असते. (२७)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'भक्तिनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.**



## दशक २ : समास ५

# रजोगुणलक्षण

॥ श्रीराम ॥

**मुळीं देह त्रिगुणाचा। सत्त्वरजतमाचा।**
**त्यामध्यें सत्त्वाचा। उत्तम गुण ॥ १॥**

हा देह मुळात त्रिगुणांचा आहे. ते तीन गुण म्हणजे सत्त्व, रज व तमोगुण. त्यामध्ये उत्तम गुण म्हणजे सत्त्वगुण होय. (१)

**सत्त्वगुणें भगवद्भक्ती। रजोगुणें पुनरावृत्ती।**
**तमोगुणें अधोगती। पावति प्राणी ॥ २॥**

सत्त्वगुणाने भगवद्‌भक्तीची प्राप्ती होते. रजोगुणामुळे पुनरावृत्ती होते, तर तमोगुणामुळे प्राण्यांना अधोगती प्राप्त होते. (२)

श्लोक

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः॥

**अर्थ**– सत्त्वगुणप्रधान माणसे श्रेष्ठ अशा वरच्या गतीला जातात. रजोगुणप्रधान माणसे मध्ये राहतात, तर तमोगुणप्रधान हीन वृत्तीची माणसे अधोगतीला जातात.

**त्यांतहि शुद्ध आणी सबळ। तेहि बोलिजेति सकळ।**
**शुद्ध तेंचि जें निर्मळ। सबळ बाधक जाणावें॥ ३॥**

गुणांमध्ये शुद्ध व शबल दोन प्रकारचा भेद आहे. शुद्ध ते निर्मळ असते तर शबल, अशुद्ध असून बाधक असते. ते सर्व आता वर्णन करून सांगतो. (३)

**शुद्धसबळाचें लक्षण। सावध परिसा विचक्षण।**
**शुद्ध तो परमार्थी जाण। सबळ तो संसारिक॥ ४॥**

शुद्ध आणि शबल यांची वर्णने आता सांगतो ती सुज्ञांनी सावधपणे ऐकावी. शुद्ध गुण पारमार्थिक असतो तर शबल प्रापंचिक असतो. (४)

**तया संसारिकाची स्थिती। देहीं त्रिगुण वर्तती।**
**येक येतां दोनी जाती। निघोनियां ॥ ५॥**

त्या प्रापंचिक माणसाची स्थिती कशी असते ते ऐका. त्याच्या देहात तिन्ही गुणांचे कार्य चालते. एकाचा जोर होतो, तेव्हा दुसरे दोन्ही क्षीण होतात. (५)

**रज तम आणी सत्त्व। येणेंचि चाले जीवित्व।**
**रजोगुणाचें कर्तुत्व। दाखऊं आतां ॥ ६॥**

रज, तम आणि सत्त्व या तीन गुणांच्या योगानेच जीवननिर्वाह होतो. त्यातील रजोगुणाचे कर्तृत्व येथे आता दाखवू या. (६)

**रजोगुण येतां शरीरीं। वर्तणुक कैसी करी।**
**सावध होऊनी चतुरीं। परिसावें ॥ ७॥**

शरीरात रजोगुण प्रबळ होतो, तेव्हा वर्तणूक कशी होते, ते चतुर लोकांनी सावध होऊन ऐकावे. (७)

**माझें घर माझा संसार। देव कैंचा आणिला थोर।**
**ऐसा करी जो निर्धार। तो रजोगुण ॥ ८॥**

रजोगुण प्रबळ झाला की तो माणूस ''माझे घर, माझा संसार. येथे देव थोर म्हणून कुठला आणला'' असे निर्धारपूर्वक म्हणू लागतो. (८)

**माता पिता आणि कांता। पुत्र सुना आणि दुहिता।**
**इतुकियांची वाहे चिंता। तो रजोगुण ॥ ९॥**

तो आईवडील, बायको, मुले, सुना, मुली इतक्यांचीच चिंता वाहतो. (९)

**बरें खावें बरें जेवावें। बरें ल्यावें बरें नेसावें।**
**दुसऱ्याचें अभिळाषावें। तो रजोगुण ॥ १०॥**

रजोगुणी माणसाची वृत्ती बरे खावे, बरे जेवावे, बरे ल्यावे, बरे नेसावे एवढेच नव्हे, तर दुसऱ्याच्या वस्तूंचीही अभिलाषा बाळगावी, अशा प्रकारची असते. (१०)

**कैंचा धर्म कैंचें दान। कैंचा जप कैंचें ध्यान।**
**विचारीना पापपुण्य। तो रजोगुण ॥ ११॥**

कसला आला आहे धर्म, कसले दान, कसला जप आणि कसले ध्यान, असे म्हणून जो पापपुण्याचा विचार करीत नाही, तो रजोगुण होय. (११)

**नेणे तीर्थ नेणे व्रत। नेणे अतीत अभ्यागत।**
**अनाचारी मनोगत। तो रजोगुण ॥ १२॥**

रजोगुण तीर्थ, व्रत, अतिथि-अभ्यागत तर जाणतच नाही उलट त्याची मनोवृत्ती अनाचाराकडे झुकणारी असते. (१२)

**धनधान्यांचे संचित। मन होये द्रव्यासक्त।**
**अत्यंत कृपण जीवित्व। तो रजोगुण ॥ १३॥**

ज्याच्या घरी धनधान्याचा भरपूर साठा असूनही ज्याचे मन द्रव्यासक्त असते व जो अत्यंत कंजूष असतो, तो रजोगुण होय. (१३)

**मी तरुण मी सुंदर। मी बळाढ्य मी चतुर।**
**मी सकळांमध्ये थोर। म्हणे तो रजोगुण॥ १४॥**

मी तरुण आहे, मी सुंदर आहे, मी बलाढ्य आहे, मी चतुर आहे. एवढेच नव्हे तर मीच सर्वांमध्ये श्रेष्ठ आहे असे म्हणतो, तो रजोगुण होय. (१४)

**माझा देश माझा गांव। माझा वाडा माझा ठाव।**
**ऐसी मनीं धरी हांव। तो रजोगुण ॥ १५॥**

हा माझा देश आहे, हा माझा गाव आहे, हा वाडा माझा आहे, हे माझे राहाण्याचे ठिकाण आहे, अशी मनात अत्यंत हाव जो बाळगतो, तो रजोगुण होय. (१५)

**दुसऱ्याचे सर्व जावें। माझेंचि बरें असावें।**
**ऐसें आठवे स्वभावें। तो रजोगुण ॥ १६॥**

दुसऱ्याचे सर्व जावे, पण माझे मात्र सर्व बरे असावे, असे स्वाभाविकपणे ज्याच्या मनास वाटते, तो रजोगुणच होय. (१६)

**कपट आणी मत्सर। उठे देहीं तिरस्कार।**
**अथवा कामाचा विकार। तो रजोगुण ॥ १७॥**

जो कपटी आणि मत्सरी असून दुसऱ्याचा तिरस्कार करतो व ज्याच्या ठिकाणी कामविकार प्रबळ असतो, तो रजोगुण जाणावा. (१७)

**बाळकावरी ममता। प्रीतीनें आवडे कांता।**
**लोभ वाटे समस्तां। तो रजोगुण ॥ १८॥**

ज्याची मुलांवर ममता असते, बायकोवर ज्याचे फार प्रेम असते व सर्वांविषयी ज्यास लोभ असतो, तो रजोगुण होय. (१८)

**जिवलगांची खंती। जेणें काळें वाटे चित्तीं।**
**तेणें काळें सीघ्रगती। रजोगुण आला ॥ १९॥**

ज्या वेळी निकटच्या आप्तस्वकीयांविषयी अत्यंत काळजी वाटू लागते, त्या वेळी रजोगुण प्रबळ झाला आहे, असे समजावे. (१९)

**संसाराचे बहुत कष्ट। कैसा होईल सेवट।**
**मनास आठवे संकट। तो रजोगुण ॥ २०॥**

संसारात इतके कष्ट आहेत, आता शेवट कसा होतो कुणास ठाऊक, असे ज्याच्या मनास संकट वाटते, तो रजोगुणच होय. (२०)

**कां मागें जें जें भोगिलें। तें तें मनीं आठवलें।**
**दुःख अत्यंत वाटलें। तो रजोगुण ॥ २१॥**

किंवा पूर्वी जे जे काही भोगावे लागले, त्याची मनात आठवण येऊन ज्याला अत्यंत दुःख होते, तो रजोगुणच होय. (२१)

**वैभव देखोनी दृष्टी। आवडी उपजली पोटीं।**
**आशागुणें हिंपुटी। करी, तो रजोगुण॥ २२॥**

दुसऱ्याचे वैभव दृष्टीस पडल्यावर ज्याला आपल्यालाही तसे प्राप्त व्हावे अशी आवड उत्पन्न होते आणि त्या आशेच्या योगाने जो कष्टी होतो, तो रजोगुण जाणावा. (२२)

**जें जें दृष्टी पडिलें। तें तें मनें मागितलें।**
**लभ्य नस्तां दुःख जालें। तो रजोगुण ॥ २३॥**

जे जे दृष्टीस पडते, ते ते लगेच मनाला हवेसे वाटते, पण ते मिळण्यासारखे नसेल तर ज्यायोगे दुःख होते, तो रजोगुण जाणावा. (२३)

**विनोदार्थी भरे मन। शृंघारिक करी गायेन।**
**राग रंग तान मान। तो रजोगुण ॥ २४॥**

ज्याचे मन हास्यविनोदाच्या योगे प्रसन्न होते, जो शृंगारिक गाणी गातो, ज्याला राग, रंग, तान, मान यात रस असतो, तो रजोगुण. (२४)

**टवाळी ढवाळी निंदा। सांगणे घडे वेवादा।**
**हास्य विनोद करी सर्वदा। तो रजोगुण ॥ २५॥**

व्यंगोक्ती, थट्टामस्करी, निंदा करणे व वादविवाद करणे ज्याला आवडते, जो सर्वदा हास्यविनोद करीत असतो, तो रजोगुणच. (२५)

**आळस उठे प्रबळ। कर्मणुकेचा नाना खेळ।**
**कां उपभोगाचे गोंधळ। तो रजोगुण ॥ २६॥**

ज्याच्या ठिकाणी अत्यंत आळस असतो, जो करमणुकीसाठी नाना प्रकारचे खेळ खेळतो व जेथे व्यसनांचा गोंधळ चालू असतो, तो रजोगुण जाणावा. (२६)

कळावंत बहुरूपी । नटावलोकी साक्षेपी ।
नाना खेळीं दान अर्पी । तो रजोगुण ॥ २७ ॥

जो कलावंत असतो, बहुरूप्याप्रमाणे नाना सोंगे घेतो, नाटकाचा जो शौकीन असतो, नाना प्रकारच्या खेळांवर जो पैसे घालवतो, तो रजोगुण जाणावा. (२७)

उन्मत्त द्रव्यावरी अति प्रीती । ग्रामज्य आठवे चित्तीं ।
आवडे नीचाची संगती । तो रजोगुण ॥ २८ ॥

मादक किंवा धुंदी, नशा आणणाऱ्या द्रव्याची ज्यास अत्यंत आवड असते, विषयासक्ती व गुंडपणा याचेच जो चिंतन करतो व ज्याला नीच लोकांची संगती आवडते, तो रजोगुण जाणावा. (२८)

तश्करविद्या जीवीं उठे । परन्यून बोलावें वाटे ।
नित्यनेमास मन विटे । तो रजोगुण ॥ २९ ॥

ज्याला चोरीची विद्या शिकावी असे वाटते, लोकांचे दोष, कमीपणा बोलून दाखवणे आवडते, नित्यनेमाला ज्याचे मन विटते, तो रजोगुण होय. (२९)

देवकारणीं लाजाळु । उदरालागीं कष्टाळु ।
प्रपंचीं जो स्नेहाळु । तो रजोगुण ॥ ३० ॥

देवाचे कार्य करण्याची ज्याला लाज वाटते, जो पोटासाठी वाटेल तितके कष्ट उपसण्यास तयार असतो आणि प्रपंचा-विषयी ज्याच्या मनात अत्यंत प्रेम असते, तो रजोगुण. (३०)

गोडग्रासी आळकेपण । अत्यादरें पिंडपोषण ।
रजोगुणें उपोषण । केलें न वचे ॥ ३१ ॥

ज्याला गोडधोड पदार्थांची आसक्ती असते, अत्यंत आदराने जो देहाचे पोषण करतो आणि ज्यास उपास करणे आवडत नाही, तो माणूस रजोगुणी जाणावा. (३१)

शृंगारिक तें आवडे । भक्ती वैराग्य नावडे ।
कळालाघवीं पवाडे । तो रजोगुण ॥ ३२ ॥

ज्यास शृंगारिक गोष्टींची आवड असते, भक्ती, वैराग्य वगैरे मुळीच आवडत नाही व जो रसिकतेने कलागुणांचे कौतुक करण्यात प्रवीण असतो, तो रजोगुण. (३२)

नेणोनियां परमात्मा । सकळ पदार्थीं प्रेमा ।
बळात्कारें घाली जन्मा । तो रजोगुण ॥ ३३ ॥

परमात्म्यास जो जाणत नाही आणि त्यामुळे जो सर्व दृश्य पदार्थावरच खरे प्रेम करीत असतो, त्यामुळे ज्यास पुन्हा पुन्हा जन्म घ्यावा लागतो, तो रजोगुण. (३३)

असो ऐसा रजोगुण । लोभें दावी जन्ममरण ।
प्रपंचीं तो सबळ जाण । दारुण दुःख भोगवी ॥ ३४ ॥

याप्रमाणे हा रजोगुण आसक्तीमुळे वारंवार जन्ममरण भोगायला लावतो व प्रपंचांतही त्याच्या प्राबल्यामुळे दारुण दुःख भोगावे लागते. (३४)

आतां रजोगुण हा सुटेना । संसारिक हें तुटेना ।
प्रपंचीं गुंतली वासना । यास उपाय कोण ॥ ३५ ॥

आता हा रजोगुण तर सुटता सुटत नाही, त्यामुळे या संसारचक्रातून सुटका होत नाही. वासना प्रपंचातच गुंतून राहते, तरी यावर उपाय काय? (३५)

उपाये येक भगवद्भक्ती । जरी ठाकेना विरक्ती ।
तरी येथानुशक्ती । भजन करावें ॥ ३६ ॥

त्यावर श्री समर्थ म्हणतात की, यावर भगवद्भक्ती हा एकच उपाय आहे. आपल्या ठिकाणी जरी वैराग्य नसले तरी यथाशक्ती भगवद्भजन करावे. (३६)

काया वाचा आणि मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें ।
ईश्वरीं अर्पूनियां मनें । सार्थक करावें ॥ ३७ ॥

काया, वाचा आणि मनाने, पत्र, पुष्प, फळ अथवा पाणी जे काही उपलब्ध असेल, ते मनाने ईश्वरास अर्पण करून जीवनाचे सार्थक करावे. (३७)

येथानुशक्ती दानपुण्य । परी भगवंतीं अनन्य ।
सुखदुःखें परी चिंतन । देवाचेंचि करावें ॥ ३८ ॥

यथाशक्ती दान, पुण्य करीत जावे व कुठल्याही परिस्थितीत, सुखात अथवा दुःखात चिंतन देवाचेच करावे. भगवंतालाच सदैव अनन्य शरण असावे. (३८)

आदिअंती येक देव । मध्येंचि लाविली माव ।
म्हणोनियां पूर्ण भाव । भगवंतीं असावा ॥ ३९ ॥

या विश्वाच्या आदी व अंती एक देवच आहे. मध्ये उगीचच ही माया भुलवते. म्हणून पूर्ण भाव एका भगवंताच्या ठिकाणीच असावा. (३९)

ऐसा सबळ रजोगुण । संक्षेपें केलें कथन ।
आतां शुद्ध तो तूं जाण । परमार्थिक ॥ ४० ॥

शबल रजोगुण हा असा आहे. त्याचे येथे थोडक्यात वर्णन केले आहे. आता शुद्ध रजोगुण जो पारमार्थिक असतो, तोही तू जाणून घे. (४०)

त्याचे वोळखीचें चिन्ह। सत्त्वगुणीं असे जाण।
तो रजोगुण परिपूर्ण। भजनमूळ ॥ ४१ ॥

सत्त्वगुणाच्या वर्णनातच त्याच्या ओळखीची चिन्हे सापडतात. तो शुद्ध रजोगुणच भजनाचे मूळ आहे. म्हणून तो पूर्णत: जाणून घ्यावा. (४१)

ऐसा रजोगुण बोलिला। श्रोतीं मनें अनुमानिला।
आतां पुढें परिसला। पाहिजे तमोगुण ॥ ४२ ॥

याप्रमाणे येथे रजोगुणाचे वर्णन केले आहे, ते श्रोत्यांनी अनुमानाने जाणून घेतले असेलच. आता पुढे तमोगुणाचे वर्णन केले आहे. तेही श्रवण करावे. (४२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'रजोगुणलक्षणनाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक २ : समास ६

# तमोगुणलक्षण

॥ श्रीराम ॥

मागां बोलिला रजोगुण। क्रियेसहित लक्षण।
आतां ऐका तमोगुण। तोहि सांगिजेल ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात क्रियेसहित रजोगुणाचे लक्षण सांगितले आहे. आता तमोगुणाचे वर्णन करतो, तेही ऐका. (१)

संसारी दु:खसंमंध। प्राप्त होतां उठे खेद।
कां अद्भुत आला क्रोध। तो तमोगुण ॥ २ ॥

प्रपंचात दु:खाचा प्रसंग आला असता जो अत्यंत खेद वाटतो किंवा अत्यंत क्रोध जो अंगात संचारतो, तो तमोगुण समजावा. (२)

शेरीरीं क्रोध भरतां। नोळखे माता पिता।
बंधु बहिण कांता। ताडी, तो तमोगुण ॥ ३ ॥

जेव्हा शरीरात क्रोधाचा संचार होतो, तेव्हा तो आईवडिलांनाही ओळखत नाही. एवढेच नव्हे तर भाऊ, बहीण, बायको यांनाही मारू लागतो, तो तमोगुण होय. (३)

दुसऱ्याचा प्राण घ्यावा। आपला आपण स्वयें द्यावा।
विसरवी जीवभावा। तो तमोगुण ॥ ४ ॥

दुसऱ्याचा प्राण घ्यावा, किंवा आपला स्वत:चा जीव घ्यावा असे वाटून जेव्हा माणुसकीचाही विसर पडतो, तेव्हा तो तमोगुण. (४)

भरलें क्रोधाचें काविरें। पिश्याच्यापरी वावरे।
नाना उपायें नावरे। तो तमोगुण ॥ ५ ॥

ज्या वेळी क्रोधाचा आवेग येतो, तेव्हा जणू शरीरात पिशाच्याचा संचार झाल्यासारखा जो वागतो व नाना उपाय करूनही जो आवरत नाही तो तमोगुण. (५)

आपला आपण शस्त्रपात। पराचा करी घात।
ऐसा समय वर्तत। तो तमोगुण ॥ ६ ॥

प्रसंगी आपण आपल्यालाच शस्त्राने जखम करून घ्यावी असे वाटणे किंवा दुसऱ्याचा घात करावा असे वाटणे, हा तमोगुणच होय. (६)

डोळां युध्यचि पाहावें। रण पडिलें तेथें जावें।
ऐसें घेतलें जीवें। तो तमोगुण ॥ ७ ॥

जेव्हा डोळ्यांनी युद्धच पाहावे असे वाटते, जेथे युद्ध सुरू असेल तेथे जावे असे मनापासून वाटते, तो तमोगुणच असतो. (७)

अखंड भ्रांती पडे। केला निश्चय विघडे।
अत्यंत निद्रा आवडे। तो तमोगुण ॥ ८ ॥

ज्याच्या मनात नेहमी गोंधळ माजलेला असतो, एखादा निश्चय केला तर तो टिकत नाही व ज्याला झोप अत्यंत आवडते तो तमोगुण होय. (८)

क्षुधा जयाची वाड। नेणे कडु अथवा गोड।
अत्यंत जो कां मूढ। तो तमोगुण ॥ ९ ॥

ज्याची भूक अनावर असल्याने जो कडू, गोड इत्यादी जाणतच नाही, असा जो अत्यंत मूढ असतो, तो तमोगुण. (९)

प्रीतिपात्र गेलें मरणें। तयालागीं जीव देणें।
स्वयें आत्महत्या करणें। तो तमोगुण ॥ १० ॥

आपल्या अत्यंत प्रेमाचे माणूस मरण पावले असता त्या दु:खाने जो स्वत: जीव देण्यास, प्रवृत्त होतो, तो तमोगुण होय. (१०)

किडा मुंगी आणी स्वापद। यांचा करूं आवडे वध।
अत्यंत जो कृपामंद। तो तमोगुण ॥ ११ ॥

ज्याला किडा, मुंगी, श्वापदे यांचा वध करणे अत्यंत आवडते, ज्याच्याजवळ कृपेचा अभाव असतो तो तमोगुण होय. (११)

स्त्रीहत्या बाळहत्या। द्रव्यालागीं ब्रह्महत्या।
करूं आवडे गोहत्या। तो तमोगुण ॥ १२ ॥

ज्याला स्त्रीहत्या, बालहत्या, एवढेच नव्हे तर द्रव्याच्या लोभाने ब्रह्महत्या, गोहत्यादी करणे आवडते तो तमोगुण जाणावा. (१२)

विसाळाचेनि नेटें। वीष घ्यावेंसें वाटे।
परवध मनीं उठे। तो तमोगुण ॥ १३ ॥

नेहमी विष घेणाऱ्या माणसाच्या संगतीने ज्याला स्वत:ही विष घ्यावेसे वाटते व जो दुसऱ्याचा वध करण्याची इच्छा करतो, तो तमोगुण होय. (१३)

अंतरीं धरूनि कपट। पराचें करी तळपट।
सदा मस्त सदा उद्धट। तो तमोगुण ॥ १४ ॥

जो मनात कपट धरून दुसऱ्याचा सत्यानाश करण्याची इच्छा धरतो, जो सदा मस्त आणि उद्धट असतो, तो तमोगुण समजावा. (१४)

कळहो व्हावा ऐसें वाटे। झोंबी घ्यावी ऐसें उठे।
अंतरीं द्वेष प्रगटे। तो तमोगुण ॥ १५ ॥

कुणाशी तरी भांडावे, कुणाशी तरी झोंबी घ्यावी असे वाटणे व अंतरात दुसऱ्याबद्दल द्वेष प्रगट होणे, हे तमोगुणाचे कार्य होय. (१५)

युध्य देखावें ऐकावें। स्वयें युध्यचि करावें।
मारावें कीं मरावें। तो तमोगुण ॥ १६ ॥

युद्ध डोळ्यांनी पाहावे, कानांनी युद्धाच्या वार्ता ऐकाव्या, एवढेच नव्हे, तर स्वत:ही युद्ध करून लोकांना मारावे किंवा स्वत: मरावे असे वाटणे हा तमोगुणच. (१६)

मत्सरें भक्ति मोडावी। देवाळयें विघडावीं।
फळतीं झाडें तोडावीं। तो तमोगुण ॥ १७ ॥

जो कुणी भक्ती करीत असेल त्याच्या भक्तीत मत्सराने बाधा आणून ती नष्ट करावी, देवालये पाडावी, फळे येणारी झाडे तोडून टाकावी, असे ज्यास वाटते तो तमोगुण होय. (१७)

सत्कर्में ते नावडती। नाना दोष ते आवडती।
पापभय नाहीं चित्तीं। तो तमोगुण ॥ १८ ॥

ज्याला सत्कर्मे आवडत नाहीत तर नाना दोषच आवडतात व ज्याच्या चित्तात पापाचे भय जराही नसते, तो तमोगुण होय. (१८)

ब्रह्मवृत्तीचा उछेद। जीवमात्रांस देणें खेद।
करूं आवडे अप्रमाद। तो तमोगुण ॥ १९ ॥

ब्राह्मणाचा उदरनिर्वाह ज्यावर चालत असेल ती वृत्ती नष्ट करणे ज्यास आवडते, जीवमात्रास दु:ख देणे व अती पाप करणेच ज्याला आवडते, तो तमोगुण जाणावा. (१९)

आग्नप्रळये शस्त्रप्रळये। भूतप्रळये वीषप्रळये।
मत्सरें करी जीवक्षये। तो तमोगुण ॥ २० ॥

जो आगी लावतो, शस्त्रांनी लोकांचा घात करतो, जो भूतप्रेतबाधा करून लोकांना छळतो, लोकांना विष घालतो, मत्सराने लोकांचा जीवही घेतो, तो तमोगुण होय. (२०)

परपीडेचा संतोष। निष्ठुरपणाचा हव्यास।
संसाराचा नये त्रास। तो तमोगुण ॥ २१ ॥

लोकांना पीडा देण्यात ज्याला संतोष वाटतो, निष्ठुरपणाचा जो हव्यास धरतो आणि संसारासाठी कष्ट करण्यास जो त्रासत नाही, तो तमोगुणच जाणावा. (२१)

भांडण लाऊन द्यावें। स्वयें कौतुक पाहावें।
कुबुद्धि घेतली जीवें। तो तमोगुण ॥ २२ ॥

लोकांमध्ये भांडण लावून द्यावे व स्वत: ती मौज पाहावी अशी कुबुद्धी ज्याच्या ठिकाणी असते, तो तमोगुणच होय. (२२)

प्राप्त जालियां संपत्ति। जीवांस करी यातायाती।
कळवळा नये चित्तीं। तो तमोगुण ॥ २३ ॥

स्वत:स संपत्ती प्राप्त झाली असताही जो अन्य याचक जीवांना कष्ट देतो, ज्याला अंत:करणात थोडाही कळवळा येत नाही तो तमोगुणच. (२३)

**नावडे भक्ति नावडे भाव। नावडे तीर्थ नावडे देव।**
**वेदशास्त्र नलगे सर्व। तो तमोगुण ॥ २४॥**

ज्यास भक्ती आवडत नाही, भाव आवडत नाही, तीर्थयात्रा व देवही आवडत नाही व वेदशास्त्रादी ज्यास नकोसे वाटते, तो तमोगुणच होय. (२४)

**स्नानसंध्या नेम नसे। स्वधर्मीं भ्रष्टला दिसे।**
**अकर्तव्य करीतसे। तो तमोगुण ॥ २५॥**

जो स्नानसंध्यादी कुठलाही नेम करीत नाही; स्वधर्मापासून जो भ्रष्ट झालेला दिसतो आणि जे करू नये तेच जो करतो, तो तमोगुण समजावा. (२५)

**जेष्ठ बंधु बाप माये। त्यांचीं वचनें न साहे।**
**सीघ्रकोपी निघोन जाये। तो तमोगुण ॥ २६॥**

मोठा भाऊ, आईवडील यांचे बोलणे ज्यास सहन होत नाही आणि त्यामुळे जो शीघ्रकोपी घरच सोडून निघून जातो, तो तमोगुण होय. (२६)

**उगेंचि खावें उगेंचि असावें। स्तब्ध होऊन बैसावें।**
**कांहींच स्मरेना स्वभावें। तो तमोगुण ॥ २७॥**

उगीचच खावे, काहीच न करता बसून राहावे, ज्याला स्वाभाविकरीत्याच काहीच स्मरत नाही, तो तमोगुण जाणावा. (२७)

**चेटकविद्येचा अभ्यास। शस्त्रविद्येचा हव्यास।**
**मल्लविद्या व्हावी ज्यास। तो तमोगुण ॥ २८॥**

जारणमारणादी चेटकविद्येचा जो अभ्यास करतो, शस्त्रविद्येचा ज्याला हव्यास असतो आणि मल्लविद्या यावी अशी जो इच्छा धरतो, तो तमोगुण होय. (२८)

**केले गळाचे नवस। राडिबेडीचे सायास।**
**काष्ठयंत्र छेदी जिव्हेस। तो तमोगुण ॥ २९॥**

जो मानेला गळफास लावून घेण्याचे, निखाऱ्याच्या खाईतून चालत जाण्याचे, किंवा देवाच्या नावाने हातात बेडी घालण्याचे अथवा काष्ठयंत्राने जीभ कापून घेण्याचे नवस करतो, तो तमोगुण. (२९)

**मस्तकीं भदें जाळावें। पोतें आंग हुरपळावें।**
**स्वयें शस्त्र टोंचून घ्यावें। तो तमोगुण ॥ ३०॥**

मस्तकावर सरक्यांच्या निखाऱ्याचे तप्त खापर जाळावे, पेटलेल्या काकड्याने स्वतःचे अंग होरपळून घ्यावे, स्वतःस शस्त्र टोचून घ्यावे, हा तमोगुणच जाणावा. (३०)

**देवास सिर वाहावें। कां तें आंग समर्पावें।**
**पडणीवरून घालून घ्यावें। तो तमोगुण ॥ ३१॥**

आपले मस्तक देवास वाहावे, किंवा एखादा अवयव देवास अर्पण करावा अथवा उतरणीवरून शरीर लोटून द्यावे, हे सर्व तमोगुणाचे कार्य होय. (३१)

**निग्रह करून धरणें। कां तें टांगून घेणें।**
**देवद्वारी जीव देणें। तो तमोगुण ॥ ३२॥**

जो देवाच्या दारी निग्रहाने, हट्टाने धरणे धरतो, किंवा स्वतःस टांगून घेतो, किंवा देवद्वारी जीव देतो, तो तमोगुण जाणावा. (३२)

**निराहार उपोषण। पंचाग्नी धूम्रपान।**
**आपणास घ्यावें पुरून। तो तमोगुण ॥ ३३॥**

जो केवळ पाणी पिऊन राहतो, उपोषण करतो, अथवा पंचाग्निसाधन म्हणजे चारी बाजूस अग्निकुंडे पेटत ठेवून व डोक्यावर तळपणारा सूर्य यांच्यामध्ये बसून अनुष्ठान करतो, अथवा धूम्रपानाचे साधन करतो, किंवा स्वतःस पुरून घेतो, तो तमोगुणच होय. (३३)

**सकाम जें कां अनुष्ठान। कां तें वायोनिरोधन।**
**अथवा राहावें पडोन। तो तमोगुण ॥ ३४॥**

काही कामना धरून जो अनुष्ठान करतो, किंवा प्राणायामाने जो वायूचा निरोध करतो अथवा जो अहोरात्र नुसता जमिनीवर पडून राहतो, तो तमोगुण जाणावा. (३४)

**नखें केश वाढवावे। हस्तचि वर्ते करावे।**
**अथवा वाग्सुंन्य व्हावें। तो तमोगुण ॥ ३५॥**

जो नखे, केस वाढवतो, हात वर करून उभा राहातो किंवा जो एकदम मौनच राहातो, तो तमोगुणच होय. (३५)

**नाना निग्रहें पिडावें। देहदुःखें चर्फडावें।**
**क्रोधें देवास फोडावें। तो तमोगुण ॥ ३६॥**

नाना प्रकारे निग्रह करून देहाला पीडा द्यावयाची आणि देहास दुःख झाले की चरफडायचे व रागारागाने देवालाच फोडायचे, हे तमोगुणाचे कार्य असते. (३६)

देवाची जो निंदा करी। तो आशाबद्धि अघोरी।
जो संतसंग न धरी। तो तमोगुण ॥३७॥

जो आशेने बद्ध झालेला अघोरी माणूस असतो, जो देवाची निंदा करतो आणि संतांची संगत कधीही करीत नाही, तो तमोगुण होय. (३७)

ऐसा हा तमोगुण। सांगतां तो असाधारण।
परी त्यागार्थ निरूपण। कांहीं येक ॥३८॥

तमोगुण हा असा असाधारण आहे, त्याचे वर्णन करणे तसे कठीण आहे, पण त्यागार्थ त्याचे थोडेसे वर्णन येथे केले आहे. (३८)

ऐसें वर्ते तो तमोगुण। परी हा पतनास कारण।
मोक्षप्राप्तीचें लक्षण। नव्हे येणें ॥३९॥

वर सांगितल्याप्रमाणे जे वर्तन असते, तो तमोगुण होय; पण हा अधोगतीसच कारण होतो. याच्यायोगे मोक्षप्राप्ती कधीच होऊ शकत नाही. (३९)

केल्या कर्माचें फळ। प्राप्त होईल सकळ।
जन्म दुःखाचें मूळ। तुटेना कीं ॥४०॥

माणूस जसे कर्म करतो, त्या कर्माचे यथायोग्य फळ संपूर्णपणे त्याला भोगावे लागते. तमोगुण असेल तर दुःखाचे मूळ जो जन्म त्यातून सुटका होत नाही. (४०)

व्हावया जन्माचें खंडण। पाहिजे तो सत्त्वगुण।
तेंचि असे निरूपण। पुढिलिये समासीं ॥४१॥

जन्मच नको असेल तर त्याचे खंडण होण्याकरिता सत्त्वगुण आवश्यक आहे. म्हणून पुढील समासात त्या सत्त्वगुणाचेच निरूपण केले आहे. (४१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'तमोगुणलक्षणनाम' समास सहावा समाप्त.**

❑ ❑

## दशक २ : समास ७

## सत्त्वगुणलक्षण

॥ श्रीराम ॥

मागां बोलिला तमोगुण। जो दुःखदायक दारुण।
आतां ऐका सत्त्वगुण। परम दुल्लभ ॥१॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात अत्यंत दारुण दुःख देणारा जो तमोगुण त्याचे वर्णन केले. आता परम दुर्लभ अशा सत्त्वगुणाचे वर्णन ऐकावे. (१)

जो भजनाचा आधार। जो योगियांची थार।
जो निरसी संसार। दुःखमूळ जो ॥२॥

भजनाला म्हणजेच भगवद्भक्तीला सत्त्वगुणाचा आधार असतो. योगी याचा आश्रय करूनच सिद्धी मिळवतात आणि सत्त्वगुणामुळे दुःखमूळ जो संसार त्याचे निरसन होते. (२)

जेणें होये उत्तम गती। मार्ग फुटे भगवंतीं।
जेणें पाविजे मुक्ती। सायोज्यता ते ॥३॥

उत्तम गती सत्त्वगुणामुळेच प्राप्त होते व भगवद्भक्तीचा मार्ग सापडून सायुज्यता मुक्तीही प्राप्त होते. (३)

जो भक्तांचा कोंवसा। जो भवार्णवींचा भर्वसा।
मोक्षलक्ष्मीची दशा। तो सत्त्वगुण ॥४॥

सत्त्वगुण हा भक्तांची कणव करणारा त्यांचा सखा आहे. तो भवसागरातून पार करण्यासाठी भरवशाचा मदतनीस आहे. मोक्षरूपी लक्ष्मीची स्थिती म्हणजे सत्त्वगुणच होय. (४)

जो परमार्थाचें मंडण। जो महंतांचें भूषण।
रजतमाचें निर्शन। जयाचेनि ॥५॥

सत्त्वगुण परमार्थाची शोभा आहे, संत-महंतांचे ते भूषण आहे आणि रजोगुण व तमोगुणांचे निरसन सत्त्वगुणामुळेच होतो. (५)

जो परम सुखकारी। जो आनंदाची लहरी।
देऊनियां, निवारी-। जन्ममृत्य ॥६॥

सत्त्वगुण परम सुख देणारा असून तो स्वात्मसुखाचा अनुभव देऊन जन्ममृत्यूचे निवारण करतो. (६)

जो अज्ञानाचा सेवट। जो पुण्याचें मूळपीठ।
जयाचेनि सांपडे वाट। परलोकाची ॥७॥

सत्त्वगुणामुळेच अज्ञानाचा नाश होतो. पुण्याचा मूळ आधार सत्त्वगुणच आहे व त्यामुळे परलोकाची वाट सापडते. (७)

**ऐसा हा सत्त्वगुण। देहीं उमटतां आपण।**
**तये क्रियेचें लक्षण। ऐसें असे ॥ ८॥**

असा हा सत्त्वगुण देहाच्या ठिकाणी जेव्हा प्रगट होतो, तेव्हा आचरणात जो बदल घडून येतो, त्या क्रियेचे लक्षण असे असते. (८)

**ईश्वरीं प्रेमा अधिक। प्रपंच संपादणें लोकिक।**
**सदा सन्निध विवेक। तो सत्त्वगुण ॥ ९॥**

परमेश्वराविषयी अधिक प्रेम उत्पन्न होते, प्रपंच चारचौघांसारखा लौकिकरीत्या केला जातो आणि सदा सर्वकाळ अंत:करणात विवेक जागृत राहतो, हे सत्त्वगुणाचे लक्षण होय. (९)

**संसारदु:ख विसरवी। भक्तिमार्ग विमळ दावी।**
**भजनक्रिया उपजवी। तो सत्त्वगुण ॥ १०॥**

सत्त्वगुणामुळे संसारदु:खाचा विसर पडतो, निर्मळ अशा भक्तिमार्गाचे ज्ञान होते व भजनाची आवड उत्पन्न होते. (१०)

**परमार्थाची आवडी। उठे भावार्थाची गोडी।**
**परोपकारीं तांतडी। तो सत्त्वगुण ॥ ११॥**

परमार्थाची आवड उत्पन्न होऊन परमात्म्याविषयी भावभक्ती वाढू लागते व परोपकार करण्याविषयी उत्सुकता वाटू लागते. (११)

**स्नानसंध्या पुण्यसीळ। अभ्यांतरींचा निर्मळ।**
**शरीर वस्त्रें सोज्वळ। तो सत्त्वगुण ॥ १२॥**

स्नानसंध्यादी आचार आवडणे, शरीर व वस्त्रे यांची निर्मलता ही सत्त्वगुणाची लक्षणे आहेत. (१२)

**येजन आणी याजन। अध्ययन आणी अध्यापन।**
**स्वयें करी दानपुण्य। तो सत्त्वगुण ॥ १३॥**

यज्ञयाग करणे आणि करविणे, अध्ययन आणि अध्यापन करणे व दान व पुण्यकर्मे करणे हे सत्त्वगुणच करवितो. (१३)

**निरूपणाची आवडी। जया हरिकथेची गोडी।**
**क्रिया पालटे रोकडी। तो सत्त्वगुण ॥ १४॥**

जेथे वेदान्त- निरूपणाची आवड असते, हरिकथेत गोडी वाटते व आचरणात तत्काळ चांगला बदल होतो तो सत्त्वगुण जाणावा. (१४)

**अश्वदानें गजदानें। गोदानें भूमिदानें।**
**नाना रत्नांचीं दानें। करी, तो सत्त्वगुण॥ १५॥**

अश्वदाने, गजदाने, गोदाने, भूमिदाने, नाना रत्नांची दाने दिली जातात, तो सत्त्वगुण होय. (१५)

**धनदान वस्त्रदान। अन्नदान उदकदान।**
**करी ब्राह्मणसंतर्पण। तो सत्त्वगुण ॥ १६॥**

संपत्तीचे दान, वस्त्राचे दान, अन्नदान, उदकदान, ब्राह्मणसंतर्पण ही कार्ये सत्त्वगुणाची आहेत. (१६)

**कार्तिकस्नानें माघस्नानें। व्रतें उद्यापनें दानें।**
**नि:काम तीर्थें उपोषणें। तो सत्त्वगुण ॥ १७॥**

कार्तिकस्नाने, माघस्नाने, निरनिराळी व्रते, त्यांची उद्यापने, दाने, निष्काम तीर्थयात्रा व उपोषणे असतील, तेथे सत्त्वगुण जाणावा. (१७)

**सहस्त्रभोजनें लक्षभोजनें। विविध प्रकारींचीं दानें।**
**नि:काम करी सत्त्वगुणें। कामना रजोगुण ॥ १८॥**

सहस्त्रभोजने, लक्षभोजने, विविध प्रकारची दाने इत्यादी जेथे निष्काम बुद्धीने घडते, तो सत्त्वगुण होय. सकामता ही रजोगुणामुळे उत्पन्न होते. (१८)

**तीर्थीं अर्पी जो अग्रारें। बांधे वापी सरोवरें।**
**बांधे देवाळयें सिखरें। तो सत्त्वगुण ॥ १९॥**

तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी अग्रहार देणे, सरोवरे, विहिरी बांधणे, देवळे व देवळाची शिखरे बांधणे हा सत्त्वगुण होय. (१९)

**देवद्वारीं पडशाळा। पाईरीया दीपमाळा।**
**वृंदावनें पार पिंपळा। बांधे, तो सत्त्वगुण॥ २०॥**

देवद्वारी धर्मशाळा बांधणे, पायऱ्या व दीपमाळा बांधणे, तुळशी वृंदावने किंवा पिंपळाला पार बांधणे हा सत्त्वगुणच आहे. (२०)

**लावी वनें उपवनें। पुष्पवाटिका जीवनें।**
**निववी तापस्यांचीं मनें। तो सत्त्वगुण ॥ २१॥**

वने, उपवने, पुष्पवाटिका निर्माण करून त्यांना पाणी देणे, तपस्वी लोकांना संतोष होईल अशी त्यांची सेवा करणे, हे सत्त्वगुणाचे कार्य आहे. (२१)

**संध्यामठ आणि भुयेरीं। पाईरीया नदीतीरीं।**
**भांडारगृहें देवद्वारीं। बांधे, तो सत्त्वगुण॥ २२॥**

संध्यामठ व ध्यानासाठी गुहा बांधणे, नदीतीरी घाट बांधणे अथवा देवद्वारी भांडारगृह बांधणे हे असेल, तेथे सत्त्वगुण जाणावा. (२२)

नाना देवांची जी स्थानें। तेथें नंदादीप घालणें।
वाहे अळंकार भूषणें। तो सत्त्वगुण ॥ २३ ॥

निरनिराळ्या देवस्थानांच्या ठिकाणी नंदादीपाची व्यवस्था करणे, देवाला अलंकार, भूषणे अर्पण करणे, हा सत्त्वगुण होय. (२३)

जेंगट मृदांग टाळ। दमामे नगारे काहळ।
नाना वाद्यांचे कल्लोळ। सुस्वरादिक ॥ २४ ॥

झेंगट, मृदुंग, टाळ, दमामा, नगारे, काहळ वगैरे सुस्वर वाद्यादिकांचा कल्लोळ जेथे असेल तो सत्त्वगुण होय. (२४)

नाना सामग्री सुंदर। देवाळईं घाली नर।
हरिभजनीं जो तत्पर। तो सत्त्वगुण ॥ २५ ॥

अनेक प्रकारची सुंदर सामग्री जो देवालयाला अर्पण करतो, आणि जो हरिभजनी तत्पर असतो, तो सत्त्वगुण होय. (२५)

छेत्रें आणि सुखासनें। दिंड्या पताका निशाणें।
वाहे चामरें सूर्यापानें। तो सत्त्वगुण ॥ २६ ॥

छत्रे, पालख्या, दिंड्या, पताका, ध्वज (निशाणे), चामर, अबदागिरी वगैरे जो देवास वाहतो, तो सत्त्वगुण होय. (२६)

वृंदावनें तुळसीवने। रंगमाळा संमार्जनें।
ऐसी प्रीती घेतली मनें। तो सत्त्वगुण ॥ २७ ॥

वृंदावने, तुळसीवने, सडासंमार्जन, रांगोळ्या यांची अंत:करणात आवड उत्पन्न होते, तो सत्त्वगुण होय. (२७)

सुंदरें नाना उपकर्णे। मंडप चांदवे आसनें।
देवाळईं समर्पणें। ह्य सत्त्वगुण ॥ २८ ॥

नाना सुंदर उपकरणी, मंडप, चांदवे, आसने देवालयाला समर्पण करणे हा सत्त्वगुणच आहे. (२८)

देवाकारणें खाद्य। नाना प्रकारीं नैवेद्य।
अपूर्व फळें अर्पी सद्य। तो सत्त्वगुण ॥ २९ ॥

देवासाठी नाना प्रकारचे खाद्यपदार्थ, नाना प्रकारचे नैवेद्य, उत्तमोत्तम फळे जो अर्पण करतो, तो सत्त्वगुण होय. (२९)

ऐसी भक्तीची आवडी। नीच दास्यत्वाची गोडी।
स्वयें देवद्वार झाडी। तो सत्त्वगुण ॥ ३० ॥

अशी भक्तीची अत्यंत आवड जेथे असते, देवाचे हलक्यातील हलके काम करण्यातही जिथे गोडी वाटते व स्वत: देवद्वार झाडतो, तेथे सत्त्वगुण जाणावा. (३०)

तिथी पर्व मोहोत्साव। तेथें ज्याचा अंतर्भाव।
काया वाचा मनें सर्व। अर्पी, तो सत्त्वगुण॥ ३१ ॥

निरनिराळ्या तिथींना, पर्वकाळी व महोत्सवात जो सहभागी होतो व काया-वाचा-मनाने जो सर्व ईश्वरास अर्पण करतो, तो सत्त्वगुणच होय. (३१)

हरिकथेसी तत्पर। गंधें माळा आणी धुशर।
घेऊन उभीं निरंतर। तो सत्त्वगुण ॥ ३२ ॥

जे लोक हरिकथेस तत्पर असतात व गंध, माळ, बुक्का इत्यादी घेऊन देवद्वारी उभे असतात, तेथे सत्त्वगुण जाणावा. (३२)

नर अथवा नारी। येथानुशक्ति सामग्री।
घेऊन उभीं देवद्वारीं। तो सत्त्वगुण ॥ ३३ ॥

स्त्रिया अथवा पुरुष शक्तीस अनुसरून देवपूजेची सामग्री घेऊन प्रेमाने देवद्वारी उभी असतात, तो सत्त्वगुणच होय. (३३)

महत्कृत्य सांडून मागें। देवास ये लगवेगें।
भक्ति निकट आंतरंगें। तो सत्त्वगुण ॥ ३४ ॥

जो महत्त्वाचे काम मागे सारून तत्काळ देवाकडे धाव घेतो व ज्याच्या अंतरंगात परमेश्वराविषयी जवळीक असून भक्तिभाव असतो, तेथे सत्त्वगुण जाणावा. (३४)

थोरपणा सांडून दुरी। नीच कृत्य आंगीकारी।
तिष्ठत उभीं देवद्वारीं। तो सत्त्वगुण ॥ ३५ ॥

जो अभिमान सोडून देऊन हलक्यात हलकी सेवाही स्वीकारतो व सदा देवद्वारात तिष्ठत उभा असतो तो सत्त्वगुण होय. (३५)

देवालगीं उपोषण। वर्जी तांबोल भोजन।
नित्य नेम जप ध्यान। करी, तो सत्त्वगुण॥ ३६ ॥

जो भगवंताच्या कृपेसाठी उपोषण करतो व भोजन, तांबूल इत्यादी भोगसामग्रीचा त्याग करून नित्यनेमाने जपध्यानादी करतो, तो सत्त्वगुणच असतो. (३६)

शब्द कठीण न बोले। अतिनेमेंसी चाले।
योगी जेणें तोषविले। तो सत्त्वगुण ॥ ३७ ॥

जो कधीही कठोर शब्द बोलत नाही, अत्यंत नेमाने वागतो व जो योगी लोकांना संतोष देतो, तो सत्त्वगुणच जाणावा. (३७)

सांडूनिया अभिमान। निःकाम करी कीर्तन।
श्वेद रोमांच स्फुरण। तो सत्त्वगुण ॥ ३८॥

जो अभिमान सोडून निष्काम भावनेने कीर्तन करतो व त्या प्रसंगी स्वेद, रोमांच, स्फुरण इत्यादी अष्ट सात्त्विकभाव जेथे प्रगट होतात, तो सत्वगुण होय. (३८)

अंतरीं देवाचें ध्यान। तेणें निडारले नयन।
पडे देहाचें विस्मरण। तो सत्त्वगुण ॥ ३९॥

ज्याच्या अंतरी सदा देवाचे ध्यान लागलेले असते व भक्तिभावामुळे ज्याचे डोळे पाण्याने भरून येतात व जो देहाचे भानही विसरतो, तो सत्त्वगुणच जाणावा. (३९)

हरिकथेची अति प्रीती। सर्वथा नये विकृती।
आदिक प्रेमा आदिअंती। तो सत्त्वगुण ॥ ४०॥

ज्यास हरिकथेची अत्यंत प्रीती असते व कधी चुकूनही कंटाळा येत नाही, उलट सुरुवातीस व शेवटीही अधिकच प्रेम दिसून येते, तो सत्त्वगुणच असतो. (४०)

मुखीं नाम हातीं टाळी। नाचत बोले ब्रीदावळी।
घेऊन लावी पायधुळी। तो सत्त्वगुण ॥ ४१॥

जो मुखाने भगवंताचे नाव उच्चारत, हाताने टाळ्या वाजवत, आनंदाने नाचत नाचत भगवंताचे गुणानुवाद व ब्रीदावळी गातो, तसेच भगवद्भक्तांची पायधूळ आपल्या मस्तकी धारण करतो, तो सत्त्वगुण होय. (४१)

देहाभिमान गळे। विषईं वैराग्य प्रबळे।
मिथ्या माया ऐसें कळे। तो सत्त्वगुण ॥ ४२॥

ज्यायोगे देहाभिमान नष्ट होतो, विषयासंबंधी वैराग्य वाढू लागते आणि माया मिथ्या हे कळू लागते, तो सत्त्वगुण जाणावा. (४२)

कांहीं करावा उपाये। संसारीं गुंतोन काये।
उकलवी ऐसें हृदये। तो सत्त्वगुण ॥ ४३॥

या भवसागरातून तरून जाण्याचा काही तरी उपाय करावा, या संसारात गुंतून काय होणार आहे, असे अंतरंगात तीव्रपणे जेव्हा वाटू लागते, तेव्हा तो सत्त्वगुण समजावा. (४३)

संसारासी त्रासे मन। कांहीं करावें भजन।
ऐसें मनीं उठे ज्ञान। तो सत्त्वगुण ॥ ४४॥

प्रपंचाच्या योगे मन त्रासून जाते व काहीतरी भगवद्भजन करावे असे ज्ञान अंतःकरणात स्फुरण पावू लागते, तो सत्त्वगुण. (४४)

असतां आपुले आश्रमीं। अत्यादरें नित्यनेमीं।
सदा प्रीती लगे रामीं। तो सत्त्वगुण ॥ ४५॥

आपापल्या आश्रमात असता जो अत्यंत आदराने नित्यनेम पाळतो व ज्याचे चित्त अत्यंत प्रेमाने सदा भगवंताचे चरणी जडलेले असते, तो सत्त्वगुण जाणावा. (४५)

सकळांचा आला वीट। परमार्थी जो निकट।
आधातीं उपजे धारिष्ट। तो सत्त्वगुण ॥ ४६॥

ज्याला प्रपंचाचा अत्यंत वीट येतो व जो सदा परमार्थाच्या निकट असतो व संकटकाळी जो धैर्य धारण करतो, तो सत्त्वगुण. (४६)

सर्वकाळ उदासीन। नाना भोगीं विटे मन।
आठवे भगवद्भजन। तो सत्त्वगुण ॥ ४७॥

जो सदासर्वकाळ विषयभोगाविषयी उदासीन असतो, विविध भोगांविषयी ज्याचे मन विटलेले असते व ज्यास भगवद्भजनच सर्वकाळ आठवते, तो सत्त्वगुण जाणावा. (४७)

पदार्थी न बैसे चित्त। मनीं आठवे भगवंत।
ऐसा दृढ भावार्थ। तो सत्त्वगुण ॥ ४८॥

ज्याचे मन कोणत्याही दृश्य वस्तूवर आसक्त होत नाही, मनात जो अखंड भगवंताचे स्मरण करीत असतो, असा ज्याचा भक्तिभाव दृढ असतो, तो सत्त्वगुण होय. (४८)

लोक बोलती विकारी। तरी आदिक प्रेमा धरी।
निश्चय बाणे अंतरी। तो सत्त्वगुण ॥४९॥

त्याचे भगवत्प्रेम पाहून लोक त्याला वेडा समजतात पण त्याचे भगवत्प्रेम अधिकाधिक वाढतच असते. भगवद्भक्तीचा निश्चय ज्याच्या अंतरी दृढ ठसलेला असतो, तो सत्त्वगुण जाणावा. (४९)

अंतरी स्फूर्ती स्फुरे। सस्वरूपीं तर्क भरे।
नष्ट संदेह निवारे। तो सत्त्वगुण ॥ ५०॥

ज्या वेळी अंतर्यामी स्फूर्तीचे स्फुरण होऊ लागते, स्वस्वरूपासंबंधीच्या विचारांनी मन भरून जाते व वाईट संशय आपोआप नाहीसे होऊ लागतात, तो सत्त्वगुण होय. (५०)

शरीर लावावें कारणीं। साक्षेप उठे अंत:कर्णीं।
सत्त्वगुणाची करणी। ऐसी असे ॥ ५१ ॥

हे मनुष्यशरीर कारणी लावावे असा प्रयत्न करण्याविषयी जेव्हा मनाचा दृढ निश्चय होतो, तेव्हा तो सत्त्वगुण जाणावा. (५१)

शांति क्षमा आणि दया। निश्चय उपजे जया।
सत्त्वगुण जाणावा तया। अंतरीं आला ॥ ५२ ॥

ज्याच्या अंत:करणात शांती, क्षमा, दया असतात व भगवद्भक्तीसंबंधी दृढ निश्चय झालेला असतो, त्याच्या अंत:करणात सत्त्वगुण येऊन राहिला आहे असे जाणावे. (५२)

आले अतीत अभ्यागत। जाऊं नेदी जो भुकिस्त।
येथानशक्ती दान देत। तो सत्त्वगुण ॥ ५३ ॥

अतिथि-अभ्यागत आले असता जो त्यांना विन्मुख, भुकेले धाडीत नाही व जो यथाशक्ती दान देतो, तो सत्त्वगुण जाणावा. (५३)

तडितापडी दैन्यवाणें। आलें आश्रमाचेनि गुणें।
तयालागीं स्थळ देणें। तो सत्त्वगुण ॥ ५४ ॥

तपस्वी, बैरागी अथवा कुणी दु:खी दैन्यवाणा आश्रयास आला असता गृहस्थाश्रमाचे कर्तव्य जाणून जो त्यांना राहाण्यास जागा देतो, तो सत्त्वगुण होय. (५४)

आश्रमीं अन्नाची आपदा। परी विमुख नव्हे कदा।
शक्तिनुसार दे सर्वदा। तो सत्त्वगुण ॥ ५५ ॥

आपल्या घरात पुरेसे अन्न नसले तरी जो कुणाला विन्मुख पाठवीत नाही आणि नेहमी आपल्या शक्तीनुसार देत असतो, तो सत्त्वगुण. (५५)

जेणें जिंकिली रसना। तृप्त जयाची वासना।
जयास नाहीं कामना। तो सत्त्वगुण ॥ ५६ ॥

ज्याने जिव्हेवर विजय मिळविलेला असतो, ज्याच्या वासना तृप्त झालेल्या असतात व मनात कोणतीही कामना नसते, तो सत्त्वगुण होय. (५६)

होणार तैसें होत जात। प्रपंचीं जाला आघात।
डळमळिना ज्याचें चित्त। तो सत्त्वगुण ॥ ५७ ॥

जे होणार ते होतच असते हे जाणून प्रपंचात एखादा मोठा आघात झाला तरी ज्याचे चित्त डळमळत नाही, तेथे सत्त्वगुण जाणावा. (५७)

येका भगवंताकारणें। सर्व सुख सोडिलें जेणें।
केलें देहाचें सांडणें। तो सत्त्वगुण ॥ ५८ ॥

केवळ एका भगवंताकरिताच ज्याने सर्व सुखांचा त्याग केलेला असतो, एवढेच नव्हे, तर आपला देहही भगवत्चरणी समर्पण केलेला असतो, तो सत्त्वगुण. (५८)

विषईं धांवे वासना। परी तो कदा डळमळिना।
ज्याचे धारिष्ट चळेना। तो सत्त्वगुण ॥ ५९ ॥

मनात विषयवासना आली तरी जो कधी डळमळत नाही व ज्याचे मनोधैर्य कधी ढळत नाही, तो सत्त्वगुण समजावा. (५९)

देह आपदेनें पीडला। क्षुधे तृषेनें वोसावला।
तरी निश्चयो राहिला। तो सत्त्वगुण ॥ ६० ॥

शरीर दारिद्र्याने अथवा रोगाने पीडलेले असले, तहान-भुकेने व्याकूळ झालेले असले, तरी ज्याचा परमार्थाचा निश्चय टिकून राहातो तो सत्त्वगुण होय. (६०)

श्रवण आणी मनन। निजध्यासें समाधान।
शुद्ध जालें आत्मज्ञान। तो सत्त्वगुण ॥ ६१ ॥

जो श्रवण, मनन, निदिध्यास जाणीवपूर्वक सातत्याने करतो त्यास शुद्ध आत्मज्ञान होऊन समाधान लाभते. हे सर्व सत्त्वगुणाचे कार्य होय (६१)

जयास अहंकार नसे। नैराशता विलसे।
जयापासीं कृपा वसे। तो सत्त्वगुण ॥ ६२ ॥

ज्याच्या ठिकाणी अहंकार मुळीच नसतो, अनासक्ती सदा विलसत असते व जो अत्यंत कृपाळू असतो, तो सत्त्वगुण होय. (६२)

सकळांसी नम्र बोले। मर्यादा धरून चाले।
सर्व जन तोषविले। तो सत्त्वगुण ॥ ६३ ॥

जो सर्वांशी नम्रपणे बोलतो, ज्याचे वागणे मर्यादशील असते व जो सर्व लोकांना संतोष देतो, तो सत्त्वगुण जाणावा. (६३)

सकळ जनासी आर्जव। नाहीं विरोधास ठाव।
परोपकारीं वेची जीव। तो सत्त्वगुण ॥ ६४ ॥

जो सर्व लोकांशी अत्यंत सरळपणे व प्रेमाने वागतो, त्यामुळे विरोधास जागाच उरत नाही व जो परोपकारासाठी आपले सर्व आयुष्य खर्ची घालतो, तो सत्त्वगुण समजावा. (६४)

**आपकार्याहून जीवीं। परकार्यसिद्धी करावी।**
**मरोन कीर्ती उरवावी। तो सत्त्वगुण ॥ ६५॥**

जो स्वत:च्या कार्याहून लोकांचे कार्य सिद्धीस जावे म्हणून प्रयत्नशील असतो, मेल्यावरही कीर्तिरूपाने जो अमर होतो, तो सत्त्वगुण होय. (६५)

**पराव्याचे दोषगुण। दृष्टीस देखे आपण।**
**समुद्राऐसी सांठवण। तो सत्त्वगुण ॥ ६६॥**

दुसऱ्याचे दोष, गुण दिसले तरी जो त्यांची चर्चा न करता ते समुद्राप्रमाणे आपल्या अंत:करणात साठवून ठेवतो, जगात प्रगट करीत नाही, तो सत्त्वगुण जाणावा. (६६)

**नीच उत्तर साहाणें। प्रत्योत्तर न देणें।**
**आला क्रोध सावरणें। तो सत्त्वगुण ॥ ६७॥**

कोणी टाकून बोलले तरी जो सहन करतो व जशास तसे प्रत्युत्तर देत नाही, कधी चुकून राग आला तरी जो आवरून धरतो, तो सत्त्वगुण होय. (६७)

**अन्यायेंवीण गांजिती। नानापरी पीडा करिती।**
**तितुकेंहि साठवी चित्तीं। तो सत्त्वगुण ॥ ६८॥**

जरी कुणी काहीही कारण नसताना अन्यायाने छळत असून, नाना प्रकारे पीडा देत असतील तर त्यांचे ते अपराधही जो मोठ्या मनाने चित्तात साठवतो, (त्यांच्यासंबंधी विरुद्ध भावना ज्याच्या मनातही येत नाही,) तो सत्त्वगुण समजावा. (६८)

**शरीरें घीस साहाणें। दुर्जनासीं मिळोन जाणें।**
**निंदकास उपकार करणें। हा सत्त्वगुण ॥ ६९॥**

देहाने दुसऱ्यासाठी झीज सोसतो, दुर्जनांशीही मिळूनमिसळून वागतो व निंदा करणाऱ्यावरही जो उपकारच करतो, तो सत्त्वगुण असतो. (६९)

**मन भलतीकडे धावें। तें विवेकें आवरावें।**
**इंद्रियें दमन करावें। तो सत्त्वगुण ॥७०॥**

मन भलतीकडे धावू लागले तरी जो विवेकाने त्यास आवरतो व इंद्रिये आपल्या ताब्यात ठेवतो, तो सत्त्वगुण होय. (७०)

**सत्क्रिया आचरावी। असत्क्रिया त्यागावी।**
**वाट भक्तीची धरावी। तो सत्त्वगुण ॥ ७१॥**

सत्कर्मेच करावी, दुष्कर्मांचा त्याग करावा आणि भक्तिमार्गाचेच अनुसरण करावे असे वाटणे, हा सत्त्वगुण. (७१)

**जया आवडे प्रात:स्नान। आवडे पुराणश्रवण।**
**नाना मंत्रीं देवतार्चन। करी, तो सत्त्वगुण॥ ७२॥**

ज्याला प्रात:स्नान करणे आवडते, पुराणश्रवणात व नाना मंत्रांनी देवतार्चन करण्यात ज्याला गोडी वाटते, तो सत्त्वगुण होय. (७२)

**पर्वकाळीं अतिसादर। वसंतपूजेस तत्पर।**
**जयंत्याची प्रीती थोर। तो सत्त्वगुण ॥ ७३॥**

ज्याला पर्वकाळाबद्दल फार आदर असतो, जो वसंतपूजा करण्याविषयी तत्पर असतो व देवतांच्या जयंत्यादी उत्सव करण्याची ज्याला गोडी असते, तो सत्त्वगुण. (७३)

**विदेशीं मेलें मरणें। तयास संस्कार देणें।**
**अथवा सादर होणें। तो सत्त्वगुण ॥ ७४॥**

कुणी परदेशी माणूस बेवारसाप्रमाणे मेला, तर त्याचा अंत्यसंस्कार करणे किंवा त्यास हजर राहणे, हे सत्त्वगुणाचे कार्य होय. (७४)

**कोणी येकास मारी। तयास जाऊन वारी।**
**जीव बंधनमुक्त करी। तो सत्त्वगुण ॥ ७५॥**

कोणी कुणास मारत असेल तर मध्ये पडून त्याचे निवारण जो करतो किंवा बंधनात पडलेल्या लोकांना जो सोडवतो, तो सत्त्वगुण होय. (७५)

**लिंगें लाखोलीं अभिशेष। नामस्मरणीं विस्वास।**
**देवदर्शनीं अवकाश। तो सत्त्वगुण ॥ ७६॥**

लिंगार्चन करणे, पत्रपुष्पांची लाखोली वाहाणे, नामस्मरणावर दृढ विश्वास असणे आणि देवदर्शनासाठी वेळ काढणे, हा सत्त्वगुण होय. (७६)

**संत देखोनि धावें। परम सुख हेलावे।**
**नमस्कारी सर्वभावें। तो सत्त्वगुण ॥ ७७॥**

संतांना पाहून जो त्यांचे दर्शनासाठी धाव घेतो व त्यांच्या दर्शनाने परमसुखाने ज्याचे अंत:करण उचंबळून येते आणि भावभक्तीने जो त्यांना साष्टांग दंडवत घालतो, तो सत्त्वगुण जाणावा. (७७)

**संतकृपा होय जयास। तेणें उद्धरिला वंश।**
**तो ईश्वराचा अंश। सत्त्वगुणें ॥ ७८ ॥**

संतांची कृपा ज्याच्यावर होते, त्याने आपल्या वंशाचा उद्धार केला असे समजावे. सत्त्वगुणामुळेच त्याच्या ठिकाणीचा ईश्वरांश प्रगट होतो. (७८)

**सन्मार्ग दाखवी जनां। जो लावी हरिभजना।**
**ज्ञान सिकवी अज्ञाना। तो सत्त्वगुण ॥ ७९ ॥**

जो लोकांना सन्मार्ग दाखवतो, त्यांना भगवद्‌भक्तीच्या मार्गास लावतो व अज्ञानी लोकांना जो ज्ञानाचा उपदेश देतो, तो सत्त्वगुण समजावा. (७९)

**आवडे पुण्य संस्कार। प्रदक्षणा नमस्कार।**
**जया राहे पाठांतर। तो सत्त्वगुण ॥ ८० ॥**

ज्यास पुण्य, संस्कार आवडतात, देवास प्रदक्षिणा, नमस्कार करणे आवडते व ज्याचे पाठांतर उत्तम असते, तो सत्त्वगुण होय. (८०)

**भक्तीचा हव्यास भारी। ग्रंथसामग्री जो करी।**
**धातुमूर्ति नानापरी। पूजी तो सत्त्वगुण ॥ ८१ ॥**

ज्याला भक्तीचा अंत:करणपूर्वक हव्यास असतो. जो ग्रंथ जवळ बाळगतो व धातुमूर्तीचीही नानाप्रकारे पूजा करतो, तो सत्त्वगुण असतो. (८१)

**झळफळित उपकर्णे। माळा गवाळी आसनें।**
**पवित्रें सोज्वळें वसनें। तो सत्त्वगुण ॥ ८२ ॥**

देवपूजेची स्वच्छ चकचकीत उपकरणे, जपमाळा, उपासनामूर्ती ठेवण्याचे साहित्य, आसने, गोमुखी व पवित्र व स्वच्छ, सोज्वळ वस्त्रे हे सर्व ज्यास आवडते तो सत्त्वगुण होय. (८२)

**परपीडेचें वाहे दु:ख। परसंतोषाचें सुख।**
**वैराग्य देखोन हरिख। मानी, तो सत्त्वगुण ॥ ८३ ॥**

जो लोकांचे दु:ख, पीडा, कष्ट पाहून दु:खी होतो, लोकांचा संतोष पाहून ज्यास सुख होते आणि वैराग्य पाहून ज्याला आनंद होतो, तो सत्त्वगुण असतो. (८३)

**परभूषणें भूषण। परदूषणें दूषण।**
**परदु:खे सिणे जाण। तो सत्त्वगुण ॥ ८४ ॥**

जो लोकांचे भूषण ते आपले भूषण मानतो, लोकांचे दूषण ते आपले दूषण समजतो, परदु:खाने जो कष्टी होतो, तो सत्त्वगुण जाणावा. (८४)

**आतां असो हें बहुत। देवीं धर्मीं ज्याचें चित्त।**
**भजे कामनारहित। तो सत्त्वगुण ॥ ८५ ॥**

आता हे वर्णन पुरे झाले, थोडक्यात असे म्हणता येईल की, ज्याचे चित्त देवा-धर्माचे ठिकाणी जडलेले असते आणि जो निष्काम भावनेने भगवद्‌भजन करतो तो सत्त्वगुण होय. (८५)

**ऐसा हा सत्त्वगुण सात्त्विक। संसारसागरीं तारक।**
**येणें उपजे विवेक। ज्ञानमार्गाचा ॥ ८६ ॥**

असा हा सत्त्वगुण अत्यंत सात्त्विक असून तो संसारसागरातून तारून नेणारा आहे. त्याच्या योगानेच ज्ञानमार्गाचा विवेक उत्पन्न होतो. (८६)

**सत्त्वगुणें भगवद्भक्ती। सत्त्वगुणें ज्ञानप्राप्ती।**
**सत्त्वगुणें सायोज्यमुक्ती। पाविजेते ॥ ८७ ॥**

सत्त्वगुणानेच भगवद्‌भक्ती प्राप्त होते, सत्त्वगुणानेच ज्ञानप्राप्ती होऊन त्यानेच सायुज्यमुक्तीही मिळते. (८७)

**ऐसी सत्त्वगुणाची स्थिती। स्वल्प बोलिलें येथामती।**
**सावध होऊन श्रोतीं। पुढें अवधान द्यावें ॥ ८८ ॥**

याप्रमाणे सत्त्वगुणाची स्थिती येथे थोडक्यात यथामती वर्णन केली आहे. आता श्रोत्यांनी सावध होऊन पुढे जे काय सांगतो ते ऐकावे. (८८)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सत्त्वगुणलक्षणनाम' समास सातवा समाप्त.**

❑❑

## दशक २ : समास ८

# सद्विद्यानिरूपण

॥ श्रीराम ॥

**ऐका सद्विद्येचीं लक्षणें। परम शुद्ध सुलक्षणें।**
**विचार घेतां बळेंचि बाणें। सद्विद्या आंगी ॥ १॥**

आता परम शुद्ध व अती उत्तम अशी सद्विद्येची लक्षणे वर्णन करून सांगतो, ती श्रोत्यांनी ऐकावी. त्यांच्यासंबंधी विचार केला असता आपोआपच ती अंगी बाणतात. (१)

**सद्विद्येचा जो पुरुष। तो उत्तमलक्षणीं विशेष।**
**त्याचे गुण ऐकतां संतोष। परम वाटे ॥ २॥**

जो सद्विद्यायुक्त पुरुष असतो, तो विशेष उत्तमगुणांनी युक्त असतो. त्याचे गुण ऐकूनसुद्धा परम संतोष वाटतो. (२)

**भाविक सात्त्विक प्रेमळ। शांती क्ष्मा दयासीळ।**
**लीन तत्पर केवळ। अमृतवचनी ॥ ३॥**

तो भाविक, सात्त्विक, प्रेमळ, शांती, क्षमा व दया यांनी युक्त, लीन, कार्य करण्यात तत्पर, आणि केवळ अमृतासारखी मधुरवचने बोलणारा असतो. (३)

**परम सुंदर आणि चतुर। परम सबळ आणि धीर।**
**परम संपन्न आणि उदार। आतिशयेंसीं ॥ ४॥**

तो परम सुंदर, परम चतुर, परम बलवान आणि परम धैर्यशील असून परमसंपन्न असून अत्यंत उदार असतो. (४)

**परम ज्ञाता आणी भक्त। महापंडित आणी विरक्त।**
**महातपस्वी आणी शांत। आतिशयेंसीं ॥ ५॥**

तो परम ज्ञानी, परम भक्त, महापंडित असून विरक्त आणि महातपस्वी असून अत्यंत शांत असतो. (५)

**वक्ता आणी नैराशता। सर्वज्ञ आणी सादरता।**
**श्रेष्ठ आणी नम्रता। सर्वत्रांसीं ॥ ६॥**

तो उत्तम वक्ता असून अनासक्त असतो. सर्वज्ञ असून लोकांना आदर देणारा असतो आणि श्रेष्ठ असूनही अत्यंत नम्रपणे सर्वांशी वागणारा असतो. (६)

**राजा आणी धार्मिक। शूर आणी विवेक।**
**तारुण्य आणी नेमक। आतिशयेंसीं ॥ ७॥**

तो राजा असूनही धार्मिक असतो. शूर असूनही विवेकी असतो. तरुण असूनही अत्यंत नीतिनियमाने वागणारा असतो. (७)

**वृद्धाचारी कुळाचारी। युक्ताहारी निर्विकारी।**
**धन्वंतरी परोपकारी। पद्महस्ती ॥ ८॥**

तो वडीलधाऱ्यांना मानणारा, कुळधर्म, कुळाचार पाळणारा, युक्त आहार घेणारा व कुठल्याही विकाराच्या आधीन न होणारा, वैद्यक विद्या जाणणारा, परोपकारी व ज्याच्या हातावर यशाचे प्रतीक असे कमलाचे चिन्ह आहे, असा असतो. (८)

**कार्यकर्ता निराभिमानी। गायक आणी वैष्णव जनी।**
**वैभव आणी भगवद्भजनी। अत्यादरें ॥ ९॥**

उत्तम कार्यकर्ता असून तो निरभिमानी असतो, उत्तम गाणारा असून भगवद्भक्त असतो, वैभवसंपन्न असून अतिआदराने भगवद्भजन करणारा असतो. (९)

**तत्त्वज्ञ आणी उदासीन। बहुश्रुत आणी सज्जन।**
**मंत्री आणी सगुण। नीतिवंत ॥ १०॥**

तो तत्त्वज्ञानी असून उदासीन म्हणजे विरक्त असतो; बहुश्रुत असूनही सज्जन असतो आणि राजाचा मंत्री असूनही सद्गुणसंपन्न व नीतिमान असतो. (१०)

**साधु पवित्र पुण्यसीळ। अंतरशुद्ध धर्मात्मा कृपाळ।**
**कर्मनिष्ठ स्वधर्में निर्मळ। निर्लोभ अनुतापी ॥ ११॥**

तो पवित्र पुण्यशील साधू असून शुद्ध अंत:करणाचा, कृपाळू व धर्मात्मा असतो. स्वधर्मनिष्ठ, निर्मळ कर्मनिष्ठ (निष्काम कर्मयोगी) व निर्लोभी असून तो अनुतापाने विशुद्ध अंत:करणाचा झालेला असतो. (११)

गोडी आवडी परमार्थप्रीती । सन्मार्ग सत्क्रिया धारणा धृती ।
श्रुति स्मृती लीळा युक्ति । स्तुती मती परीक्षा ॥ १२ ॥

त्याला परमार्थाची गोडी असते, आवड असते व प्रेमही असते. तो सन्मार्गाचे आचरण करणारा, सत्क्रिया करणारा, उत्तम धारणाशक्ती असणारा व धैर्यशील असतो. श्रुती, स्मृती यांचे त्याला उत्तम ज्ञान असते. आनंदाने जीवन जगण्याची युक्ती त्याला अवगत असते, भगवंताच्या लीलांविषयी त्यास प्रेम असून भगवंताची स्तुती कशी करावी हेही तो जाणतो. तो बुद्धिमान असून व्यक्ती व वस्तूंची उत्तम पारख त्यास असते. (१२)

दक्ष धूर्त योग्य तार्किक । सत्य साहित्य नेमक भेदक ।
कुशळ चपळ चमत्कारिक । नाना प्रकारें ॥ १३ ॥

तो नेहमी सावध असून वेळप्रसंग पाहून वागणारा रीतीने व प्रमाणात तर्क जाणणारा, सत्साहित्याची आवड असणारा, नेमनिष्ठ व पारदर्शी, कुशल, चपळ व नाना प्रकारच्या उत्तम गुणांनी संपन्न असतो. (१३)

आदर सन्मान तार्तम्य जाणे । प्रयोग समयो प्रसंग जाणे ।
कार्याकारण चिन्हें जाणे । विचक्षण बोलिका ॥ १४ ॥

कोणाचा किती आदर करावा, कोणाचा कसा सन्मान करावा, यातील तारतम्य तो जाणतो. कुठल्या वेळी कशाप्रकारे वागायचे, हे वेळप्रसंग पाहून तो अचूक जाणतो, कार्यकारणसंबंधाची त्याला उत्तम जाण असते. तो चतुर असून बोलका असतो. (१४)

सावध साक्षेपी साधक । आगमनिगमशोधक ।
ज्ञानविज्ञानबोधक । निश्चयात्मक ॥ १५ ॥

तो सदा सावध, कार्यरत असून साधक वृत्तीनेच राहतो. वेदादी शास्त्रांचा उत्तम व्यासंगी असून शब्दज्ञान व आत्मानुभव दोन्ही असल्याने दुसऱ्यास ज्ञानविज्ञानाचा निश्चयात्मक बोध तो करून देऊ शकतो. (१५)

पुरश्चरणी तीर्थवासी । दृढव्रती कायाक्लेसी ।
उपासक निग्रहासी । करूं जाणे ॥ १६ ॥

तो तीर्थक्षेत्रात वास करणारा व नाना मंत्रांची पुरश्चरणे करणारा, दृढव्रती, शरीरकष्टाची तमा बाळगणारा व इंद्रियनिग्रह करून उपासना करणारा असतो. (१६)

सत्यवचनी शुभवचनी । कोमळवचनी येकवचनी ।
निश्चयवचनी सौख्यवचनी । सर्वकाळ ॥ १७ ॥

तो नेहमी सत्यभाषण करणारा, शुभ बोलणारा, आपले वचन एकनिष्ठेने पाळणारा व कोमल शब्द उच्चारणारा असतो. सदासर्वकाळ तो निश्चयात्मक व दुसऱ्यास सौख्य होईल, असेच बोलतो. (१७)

वासनातृप्त सखोल योगी । भव्य सुप्रसन्न वीतरागी ।
सौम्य सात्विक शुद्धमार्गी । निःकपट निर्वेसनी ॥ १८ ॥

त्याच्या सर्व वासना तृप्त झालेल्या असतात. योगाचे सखोल ज्ञान त्याला असते आणि त्याचे व्यक्तिमत्त्व भव्य आणि सुप्रसन्न असते. तो वैराग्यसंपन्न असूनही सौम्य व सात्त्विक असतो. तसेच निष्कपटी, निर्व्यसनी असून नेहमी शुद्ध मार्गाचे अनुसरण करणारा असतो. (१८)

सुगड संगीत गुणग्राही । अनापेक्षी लोकसंग्रही ।
आर्जव सख्य सर्वेहि । प्राणीमात्रांसी ॥ १९ ॥

तो चतुर असून संगीताचा उत्तम जाणकार व गुणग्राही असतो. तो निरपेक्ष असून लोकसंग्रही असतो व सर्व प्राणिमात्रांशी मित्रत्वाने व सरलतेने वागणारा असतो. (१९)

द्रव्यसुची दारासुची । न्यायसुची अंतरसुची ।
प्रवृत्तिसुची निवृत्ति सुची । सर्वसुची निःसंगपणें ॥ २० ॥

द्रव्याचे, पति-पत्नी संबंधाचे, न्याय-अन्यायाचे, अंतःकरणाचे, तसेच प्रवृत्ती व निवृत्ती म्हणजे प्रपंच व परमार्थातील पावित्र्य अशी सर्व प्रकारची शुचिता त्याच्या ठिकाणी निःसंग वृत्तीमुळे दिसून येते. (२०)

मित्रपणें परहितकारी । वाग्माधुर्य परशोकहारी ।
सामर्थ्यपणें वेत्रधारी । पुरुषार्थे जगमित्र ॥ २१ ॥

तो मित्रत्वाच्या भावनेने नेहमी परहिततत्पर असतो, मधुर वाणीने लोकांच्या दुःखाचे तो हरण करतो, सामर्थ्यसंपन्न असल्याने दुसऱ्यांचे संरक्षण करतो आणि पौरुषसंपन्न असल्याने सर्व जगाचा मित्र बनतो. (२१)

संशयछेदक विशाळवक्ता ।
सकळ क्लृप्त असोनि श्रोता ।
कथानिरूपणीं शब्दार्था । जाऊंच नेदी ॥ २२ ॥

सर्वसमावेशक विशाल बुद्धीमुळे तो उत्तम वक्ता असतो व म्हणून सर्व संशयांचे तो निरसन करू शकतो. स्वत: अत्यंत विद्वान व ज्ञाता असूनही तो उत्तम श्रोताही असतो म्हणजे दुसऱ्याचे म्हणणे तो आदराने ऐकूनही घेतो. कथा- निरूपणाच्या प्रसंगी प्रत्येक शब्दाच्या अर्थाकडे त्याचे बारीक लक्ष असते. (२२)

वेवादरहित संवादी । संगरहित निरोपाधी ।
दुराशारहित अक्रोधी । निर्दोष निर्मत्सरी ॥ २३ ॥

वादविवाद टाळून संवाद करणे त्याला जमते. तो नि:संग वृत्तीचा असल्याने कुठलीही उपाधी आपल्यामागे लावून घेत नाही. तो भलती आशा कधी बाळगत नाही व कुणावर कधी क्रोधही करीत नाही. असा तो सदा निर्मत्सरी व निर्दोष असतो. (२३)

विमळज्ञानी निश्चयात्मक । समाधानी आणि भजक ।
सिद्ध असोनी साधक । साधन रक्षी ॥ २४ ॥

तो संदेहरहित विमलज्ञानाने युक्त असतो. अत्यंत समाधानी वृत्ती असून भगवंताचे भजन करतो. सिद्ध झाला असूनही तो अत्यंत सावधपणे साधनाचे रक्षण करीत एखाद्या साधकाप्रमाणेच राहतो. (२४)

सुखरूप संतोषरूप । आनंदरूप हास्यरूप ।
ऐक्यरूप आत्मरूप । सर्वत्रांसी ॥ २५ ॥

तो आत्मरूपाने सर्वांशी एकरूप झालेला असल्याने त्याच्याकडे पाहिले असता मूर्तिमंत सुख वा संतोषच त्याच्या रूपाने प्रगट झाले आहेत असे वाटते. तो नेहमी आनंदी, सुप्रसन्न, स्मितहास्य ज्याच्या चेहऱ्यावर शोभत आहे असा दिसतो. (२५)

भाग्यवंत जयवंत । रूपवंत गुणवंत ।
आचारवंत क्रियावंत । विचारवंत स्थिती ॥ २६ ॥

तो भाग्यवंत असतो, जयवंत असतो, रूपवंत असतो, गुणवंत असतो, आचारसंपन्न असून क्रियाशील व सुविचारी असतो. (२६)

येशवंत कीर्तिवंत । शक्तिवंत सामर्थ्यवंत ।
वीर्यवंत वरदवंत । सत्यवंत सुकृती ॥ २७ ॥

तो यशवंत, कीर्तिवंत, शक्तिसंपन्न, सामर्थ्यवान, वीर्यवंत व ज्याचे आशीर्वाद सुफल होतात, असा सत्यवंत व पुण्यकर्मे करणाराही असतो. (२७)

विद्यावंत कळावंत । लक्ष्मीवंत लक्षणवंत ।
कुळवंत सुचिष्मंत । बळवंत दयाळु ॥ २८ ॥

तो विद्यावंत, कलावंत असतो. ऐश्वर्यसंपन्न असून उत्तम लक्षणांनी युक्त असतो. कुलीन असून पवित्र आचरणाचा असतो व बलशाली असूनही दयाळू असतो (२८)

युक्तिवंत गुणवंत वरिष्ठ । बुद्धिवंत बहुधारिष्ट ।
दीक्षावंत सदासंतुष्ट । निस्पृह वीतरागी ॥ २९ ॥

तो युक्तिप्रयुक्ती जाणणारा, गुणसंपन्न, वरिष्ठ व बुद्धिमान असून धैर्यशीलही असतो. त्याने गुरूकडून दीक्षा घेतलेली असते व तो सदा संतुष्ट असतो. त्याच्या ठिकाणी कुठलीही वासना, इच्छा, कामना उरलेली नसते व तो अत्यंत वैराग्यसंपन्न असतो. (२९)

असो ऐसे उत्तम गुण । हें सद्विद्येचें लक्षण ।
अभ्यासाया निरूपण । अल्पमात्र बोलिलें ॥ ३० ॥

असो. याप्रमाणे येथे जे उत्तम गुण सांगितले आहेत, ते सद्विद्येचे लक्षण असून त्यांचा अभ्यास करता यावा म्हणूनच त्यांचे थोडेसे वर्णन केले आहे. (३०)

रूप लावण्य अभ्यासितां न ये ।
सहज गुणास न चले उपाये ।
कांहीं तरी धरावी सोये । अगांतुक गुणाची ॥ ३१ ॥

रूपाचे सौंदर्य हे काही अभ्यासाने प्राप्त होत नाही. जे उपजत गुण असतात, त्यांत परिवर्तन घडवून आणता येत नाही. तेथे काही उपायच नसतो. म्हणून आगंतुक गुण म्हणजे अभ्यासाने ज्यांना आपण प्राप्त करून घेऊ शकतो, त्यांसाठी तरी काही प्रयत्न करावा. (३१)

**ऐसी हे सद्विद्या बरवी। सर्वत्रांपासी असावी।**
**परी विरक्तपुरुषें अभ्यासावी। अगत्यरूप ॥ ३२॥**

यप्रमाणे ही उत्तम अशी विद्या सर्वांपाशीच असावी असे समर्थ सांगतात. निदान विरक्त पुरुषांनी तरी अगत्याने तिचा अभ्यास करावा. (३२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सद्विद्यानिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑❑

## दशक २ : समास ९
## विरक्तलक्षण

॥ श्रीराम ॥

**ऐका विरक्तांची लक्षणें।**
**विरक्तें असावें कोण्या गुणें।**
**जेणें आंगीं सामर्थ्य बाणे। योगियाचें ॥ १॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, आता विरक्त पुरुषाची लक्षणे सांगतो ती ऐका. विरक्त पुरुषाच्या अंगी कोणते गुण हवेत ते प्रथम सांगतो. कारण वैराग्यामुळे योग्याचे अंगी सामर्थ्य बाणते व योग सिद्धीस जातो. (१)

**जेणें सदकीर्ति वाढे। जेणें सार्थकता घडे।**
**जेणेंकरिता महिमा चढे। विरक्तांसी ॥ २॥**

विरक्तीमुळेच उत्तम कीर्ती मिळते, मनुष्यजन्माचे सार्थक होते व वैराग्यसंपन्न मनुष्यास थोरवी प्राप्त होते. (२)

**जेणें परमार्थ फावे। जेणें आनंद हेलावे।**
**जेणें विरक्ति दुणावे। विवेकेंसहित ॥ ३॥**

या गुणामुळे स्वस्वरूपसाक्षात्कार होतो, त्यामुळे आनंद उचंबळून येतो आणि विवेकासहित वैराग्यही दुपटीने वाढू लागते. (३)

**जेणें सुख उचंबळे। जेणें सद्विद्या वोळे।**
**जेणें भाग्यश्री प्रबळे। मोक्षेंसहित ॥ ४॥**

त्या गुणांनीच सुख उचंबळून येते, सद्विद्येची प्राप्ती होते आणि मोक्षासहित सर्व भाग्य व ऐश्वर्य यांनी जीवन संपन्न बनते. (४)

**मनोरथ पूर्ण होती। सकळ कामना पुरती।**
**मुखीं राहे सरस्वती। मधुर बोलावया ॥ ५॥**

सर्व मनोरथ पूर्ण होतात, सर्व कामनांची पूर्तता होते आणि मधुर बोलण्याकरिता जणू सरस्वतीच जिभेवर येऊन राहते. (५)

**हे लक्षणें श्रवण कीजे। आणि सदृढ जीवीं धरिजे।**
**तरी मग विख्यात होईजे। भूमंडळीं ॥ ६॥**

आता जी लक्षणे सांगतो, ती ऐकून हृदयात अत्यंत दृढपणे धारण करा, म्हणजे मग तो मनुष्य या जगात प्रसिद्धी मिळवतो. (६)

**विरक्तें विवेकें असावें। विरक्तें अध्यात्म वाढवावें।**
**विरक्तें धारिष्ट धरावें। दमनविषईं ॥ ७॥**

विरक्त माणसाने विवेकाने वागावे. त्याने जगात अध्यात्माचा प्रचार करावा व इंद्रियांवर ताबा ठेवण्यासंबंधी धैर्य धारण करावे. (७)

**विरक्तें राखावें साधन। विरक्तें लावावें भजन।**
**विरक्तें विशेष ब्रह्मज्ञान। प्रगटवावें ॥ ८॥**

विरक्त पुरुषाने साधनाचा कधीही त्याग करू नये. त्याने लोकांमध्ये भगवद्भजनाची आवड उत्पन्न करावी आणि विशेषेकरून आपल्या वाणीने आणि आचरणाने जगात ब्रह्मज्ञान लोकांना स्पष्ट करून सांगावे. (८)

**विरक्तें भक्ति वाढवावी। विरक्तें शांती दाखवावी।**
**विरक्तें येत्नें करावी। विरक्ती आपुली ॥ ९॥**

विरक्ताने लोकांत भक्तिमार्गाचा प्रचार करावा, त्याने आपल्या वागण्याने शांती कशी असते, हे लोकांना दाखवून द्यावे आणि आपले वैराग्य प्रयत्नपूर्वक जतन करावे. (९)

विरक्तें सदक्रिया प्रतिष्ठावी ।
विरक्तें निवृत्ति विस्तारावी ।
विरक्तें नैराशता धरावी । सदृढ जिवेंसी ॥ १० ॥

विरक्तें धर्मस्थापना करावी ।
विरक्तें नीति आवलंबावी ।
विरक्तें क्ष्मा सांभाळावी । अत्यादरेंसी ॥ ११ ॥

विरक्तें परमार्थ उजळावा । विरक्तें विचार शोधावा ।
विरक्तें सन्निध ठेवावा । सन्मार्ग सत्वगुण ॥ १२ ॥

विरक्तें भाविकें सांभाळावीं । विरक्तें प्रेमळें निववावीं ।
विरक्तें साबडीं नुपेक्षावीं । शरणागतें ॥ १३ ॥

विरक्तें असावें परम दक्ष । विरक्तें असावें अंतरसाक्ष ।
विरक्तें वोढावा कैपक्ष । परमार्थाचा ॥ १४ ॥

विरक्तें अभ्यास करावा । विरक्तें साक्षेप धरावा ।
विरक्तें वगत्रृत्वें उभारावा । मोडला परमार्थ ॥ १५ ॥

विरक्तें विमळज्ञान बोलावें ।
विरक्तें वैराग्य स्तवीत जावें ।
विरक्तें निश्चयाचें करावें । समाधान ॥ १६ ॥

पर्वें करावी अचाटें । चालवावीं भक्तांची थाटे ।
नाना वैभवें कचाटें । उपासनामार्ग ॥ १७ ॥

हरिकीर्तनें करावीं । निरूपणें माजवावीं ।
भक्तिमार्गें लाजवावीं । निंदक दुर्जनें ॥ १८ ॥

बहुतांस करावे परोपकार । भलेपणाचा जीर्णोद्धार ।
पुण्यमार्गाचा विस्तार । बळेंचि करावा ॥ १९ ॥

स्नानसंध्या जप ध्यान । तीर्थयात्रा भगवद्भजन ।
नित्यनेम पवित्रपण । अंतरशुद्ध असावें ॥ २० ॥

दृढनिश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा ।
विश्व जन उद्धरावा । संसर्गमात्रें ॥ २१ ॥

विरक्तें असावें धीर । विरक्तें असावें उदार ।
विरक्तें असावें तत्पर । निरूपणविषईं ॥ २२ ॥

विरक्ताने सत्क्रियेचा आदर करून समाजात तिची प्रतिष्ठापना करावी. त्याने विरक्तीचा, अनासक्तीचा प्रचार करावा आणि स्वत:ही प्रयत्नपूर्वक नि:संगता दृढपणे हृदयी धारण करावी. (१०)

विरक्ताने धर्मस्थापना करावी. स्वत: नेहमी नीतीस धरून वागावे आणि अत्यंत आदराने क्षमाशील वृत्ती जतन करावी. (११)

विरक्ताने परमार्थाचे पुनरुज्जीवन करावे. त्याने नित्यानित्य-विवेक करावा व नेहमी सत्त्वगुणाचे रक्षण करून त्याच्या साह्याने सन्मार्गाचे आचरण करावे. (१२)

विरक्ताने भाविकांना आधार द्यावा, भगवद्भक्तांची अंत:करणे निववावी आणि जे भोळेभाबडे लोक भगवंतास शरण आले असतील, त्यांची कधीही उपेक्षा करू नये. (१३)

विरक्ताने नेहमी सावध असावे, दुसऱ्याचे अंतरंग जाणून घ्यावे आणि परमार्थ वाढेल असा प्रयत्न करावा. (१४)

विरक्ताने नेहमी (शास्त्राभ्यास, योगाभ्यास, ध्यानाभ्यास इत्यादी) अभ्यास करावा. त्याने नेहमी प्रयत्नशील असावे आणि परमार्थ मार्गासंबंधी लोकांची उदासीनता, आपल्या उत्तम वक्तृत्वाच्या बळावर दूर करून परत अज्ञ लोकांना परमार्थाकडे वळवावे. (१५)

विरक्ताने शुद्ध आत्मज्ञानाचा उपदेश करावा, त्याने वैराग्याची स्तुती करावी व लोकांच्या शंकांचे निरसन करून त्यांना नि:संदेह असे समाधान मिळवून द्यावे. (१६)

विरक्ताने अत्यंत उत्साहाने निरनिराळे पर्वकाळ व महोत्सव साजरे करावे. त्यानिमित्ताने मोठ्या आदराने, थाटाने भक्तांचे समुदाय एकत्रित करावेत आणि प्रयत्नपूर्वक अत्यंत वैभवाने थाटामाटात त्या महोत्सवात भजन, कीर्तन, प्रवचनादी उपासनामार्गांचे अवलंबन करावे. (१७)

त्याने हरिकीर्तने करावी. प्रवचने, निरूपणे यांची एकच गर्दी करून सोडावी आणि भक्तिमार्गाचा आवेशाने प्रचार करावा की, त्यायोगे निंदक, दुर्जन यांना लाज वाटावी. (१८)

अनेकांवर परोपकार करावा, उत्तम आचाराचा जीर्णोद्धार करावा आणि प्रयत्नपूर्वक पुण्यमार्गाचा प्रचार, प्रसार करावा. (१९)

स्नान, संध्या, जप, ध्यान, तीर्थयात्रा, भगवद्भजन, तसेच नित्यनेम व पवित्रपणा यांचा त्याने स्वत: अवलंब करून लोकांनाही त्यासाठी प्रवृत्त करावे व हे सर्व करीत असता अंत:करणही अत्यंत शुद्ध असावे. (२०)

विरक्ताने दृढ निश्चयाने वागावे, सर्व लोकांना सुख देण्याचा प्रयत्न करावा आणि असे वागावे की केवळ संगतीनेही जगातील लोकांचा उद्धार होईल. (२१)

विरक्ताने धीरगंभीर व अत्यंत उदार असावे. तसेच त्याने अध्यात्मनिरूपण करण्यातही नेहमी तत्पर असावे. (२२)

विरक्तें सावध असावें। विरक्तें शुद्ध मार्गें जावे।
विरक्तें झिजोन उरवावें। सद्कीर्तीसी ॥ २३॥

विरक्ताने नेहमी सावध असावे आणि नेहमी सन्मार्गानेच चालावे. लोकांसाठी शरीर झिजवून त्याने उत्तम कीर्तिरूपाने अमर व्हावे. (२३)

विरक्तें विरक्त धुंडावें। विरक्तें साधु वोळखावें।
विरक्तें मित्र करावें। संत योगी सज्जन॥ २४॥

विरक्ताने स्वत:सारख्या विरक्त पुरुषांचा शोध घ्यावा, समाजातील साधुपुरुषांना ओळखून, संत, योगी, सज्जन इत्यादींचे बरोबर त्याने मित्रत्वाचे संबंध जोडावे. त्या सर्वांना आपलेसे करावे. (२४)

विरक्तें करावीं पुरश्चरणें। विरक्तें फिरावीं तीर्थाटणें।
विरक्तें करावीं नानास्थानें। परम रमणीय ॥ २५॥

विरक्ताने स्वत: नाना पुरश्चरणे करावीत, निरनिराळ्या तीर्थक्षेत्रांचे दर्शन घ्यावे, तीर्थयात्रा कराव्यात आणि उपासनेस योग्य अशी परम रमणीय नाना स्थाने त्याने निर्माण करावी. (२५)

विरक्तें उपाधी करावीं। आणी उदासवृत्ति न संडावी।
दुराशा जडों नेदावी। कोणयेकविषईं ॥ २६॥

विरक्ताने लोकसंग्रह करावा पण स्वत: कोठेही आसक्त होऊ नये. कशाविषयीही भलती आशा कधीही बाळगू नये. (२६)

विरक्तें असावें अंतरनिष्ठ। विरक्तें नसावें क्रियाभ्रष्ट।
विरक्तें न व्हावें कनिष्ठ। पराधेनपणें ॥ २७॥

विरक्ताने आपले स्वरूपाचे अनुसंधान कधी सुटू देऊ नये. आचारभ्रष्ट कधी होऊ नये आणि पराधीनपणे कुणाचे अंकितही होऊ नये. (२७)

विरक्तें समय जाणावा। विरक्तें प्रसंग वोळखावा।
विरक्त चतुर असावा। सर्वप्रकारें ॥ २८॥

विरक्तास वेळप्रसंगाचे भान नेहमी असावे व त्यास योग्य असे त्याने वागावे. यासाठी तो सर्व दृष्टीने चतुर असणे जरूर आहे. (२८)

विरक्तें येकदेसी नसावें। विरक्तें सर्व अभ्यासावें।
विरक्तें अवघें जाणावें। ज्याचें त्यापरी ॥ २९॥

विरक्ताने एकांगी कधी असू नये. त्याने प्रत्येक विषयाचा सर्व बाजूने अभ्यास करावा आणि जाणण्यायोग्य जे जे असेल, ते त्याने सर्व जाणून घ्यावे. (२९)

हरिकथा निरूपण। सगुण भजन ब्रह्मज्ञान।
पिंडज्ञान तत्त्वज्ञान। सर्व जाणावें ॥ ३०॥

त्याने भगवंताची सगुण चरित्रे जाणून घ्यावीत, वेदान्ताचे निरूपणही त्यास साध्य असावे. सगुणभजन व ब्रह्मज्ञान तसेच पिंडज्ञान, तत्त्वज्ञान इत्यादी उपासनेतील निर्गुण, सगुण भेद वगैरेसंबंधी सर्व त्यास ज्ञात असावे. (३०)

कर्ममार्ग उपासनामार्ग। ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग।
प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग। सकळ जाणावें ॥ ३१॥

परमात्मप्राप्तीचा कर्ममार्ग, उपासनामार्ग, ज्ञानमार्ग, सिद्धान्तमार्ग, प्रवृत्तिमार्ग, निवृत्तिमार्ग या सर्वांचे सखोल ज्ञान विरक्तास असावे. (३१)

प्रेमळ स्थिती उदास स्थिती। योगस्थिती ध्यानस्थिती।
विदेह स्थिती सहज स्थिती। सकळ जाणावें ॥ ३२॥

भगवद्भक्तांची प्रेममय स्थिती किंवा ज्ञानी लोकांची उदासस्थिती, योग्यांची योगस्थिती व ध्यानी लोकांची ध्यानस्थिती तसेच जीवन्मुक्तांची विदेहावस्था व सहजावस्था यांचे अचूक व स्वानुभवजन्य ज्ञान विरक्त पुरुषास असावे. (३२)

ध्वनी लक्ष मुद्रा आसनें। मंत्र यंत्र विधी विधानें।
नाना मतांचें देखणें। पाहोन सांडावें ॥ ३३॥

याशिवाय नाना प्रकारचे नाद, नाना प्रकारचे प्रकाश व त्यांचे दर्शन, विविध प्रकारच्या मुद्रा, योगासने, विविध मंत्र आणि विविध प्रकारची यंत्रे, तसेच अनेक प्रकारची विधिविधाने व परमार्थ मार्गातील विविध प्रचलित मते या सर्वांचे ज्ञानही विरक्त पुरुषाने करून घेऊन नंतर वाटल्यास सोडून द्यावे. (३३)

विरक्तें असावें जगमित्र। विरक्तें असावें स्वतंत्र।
विरक्तें असावें विचित्र। बहुगुणी ॥ ३४॥

विरक्त पुरुषाची सर्वांशी मैत्री असावी, तो जगमित्र असला, तरी त्याने पूर्ण स्वतंत्र असावे. विचित्र वाटतील असे अनेक गुणही त्याच्या ठिकाणी असावेत. थोडक्यात तो अनेक गुणांनी संपन्न असावा. (३४)

विरक्तें असावें विरक्त। विरक्तें असावें हरिभक्त।
विरक्तें असावें नित्यमुक्त। अलिप्तपणें ॥ ३५ ॥

विरक्ताने नेहमी वैराग्यसंपन्न असणे जरूर आहे. तो हरिभक्त असावा. तसेच जीवन्मुक्त असून नि:संग असावा. (३५)

विरक्तें शास्त्रें धांडोळावीं। विरक्तें मतें विभांडावीं।
विरक्तें मुमुक्षें लावावीं। शुद्धमार्गे ॥ ३६ ॥

विरक्ताने अनेक शास्त्रांचा सखोल अभ्यास करावा, परमार्थास प्रतिकूल मतांचे त्याने खंडण करावे आणि मुमुक्षूंना शुद्ध परमार्थमार्ग कळावा म्हणून मार्गदर्शनही त्याने करावे. (३६)

विरक्तें शुद्धमार्ग सांगावा। विरक्तें संशय छेदावा।
विरक्तें आपला म्हणावा। विश्वजन ॥ ३७ ॥

विरक्ताने शुद्ध परमार्थ मार्गासंबंधी अचूक मार्गदर्शन करावे, लोकांच्या मनातील शंका, संशय यांचे निरसन त्याने करावे व सर्व विश्वातील लोकांवर प्रेम करावे. (३७)

विरक्तें निंदक वंदावें। विरक्तें साधक बोधावे।
विरक्तें बद्ध चेववावे। मुमुक्षनिरूपणें ॥ ३८ ॥

विरक्ताने आपल्या निंदकांनाही वंदन करावे. जे साधक असतील त्यांना आत्मज्ञानाचा उपदेश करावा व जे बद्ध असतील त्यांना अध्यात्मनिरूपणाच्या योगे चेतवावे, स्वहिताचा विचार करण्यासाठी जागृत करावे. (३८)

विरक्तें उत्तम गुण घ्यावे। विरक्तें अवगुण त्यागावे।
नाना अपाय भंगावे। विवेकबळें ॥ ३९ ॥

विरक्त पुरुषाने उत्तम गुण घ्यावेत, अवगुणांचा त्याग करावा व आपल्या विकासाच्या आड येणाऱ्या सर्व अपायांचा विवेकाच्या बळावर नाश करावा. (३९)

ऐसीं हें उत्तम लक्षणें। ऐकावीं येकाग्र मनें।
याचा अव्हेर न करणें। विरक्तपुरुषें ॥ ४० ॥

अशी ही विरक्त पुरुषाची उत्तम लक्षणे येथे सांगितली आहेत, विरक्त पुरुषाने ती एकाग्र मनाने श्रवण करावीत, त्यांचा अव्हेर करू नये. (४०)

इतुकें बोलिलें स्वभावें। त्यात मानेल तितुकें घ्यावें।
श्रोतीं उदास न करावें। बहु बोलिलें म्हणौनी ॥ ४१ ॥

स्वाभाविकरीत्या मला जी पटली, ती मी येथे सहजपणे सांगितली आहेत, त्यांतील पटतील तितकी श्रोत्यांनी घ्यावी. मी फार बोललो म्हणून त्यांनी खिन्न होऊ नये. (४१)

परंतु लक्षणें न घेतां। अवलक्षणें बाष्कळता।
तेणें त्यास पढतमूर्खता। येवों पाहे ॥ ४२ ॥

परंतु ही उत्तम लक्षणे न घेता बाष्कळपणे जो अवलक्षणे घेतो, त्याच्या ठिकाणी पढतमूर्खता मात्र येते. (४२)

त्या पढतमूर्खाचें लक्षण। पुढिलिये समासीं निरूपण।
बोलिलें असे सावधान। होऊन, ऐका ॥ ४३ ॥

त्या पढतमूर्खांची लक्षणे पुढील समासात वर्णन केली आहेत. तरी श्रोत्यांनी ती सावध होऊन ऐकावी. (४३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विरक्तलक्षणनाम' समास नववा समाप्त.

❑❑

## दशक २ : समास १०

## पढतमूर्खलक्षण

॥ श्रीराम ॥

मागां सांगितलीं लक्षणें। मूर्खाआंगीं चातुर्य बाणे।
आतां ऐका शाहाणे। असोनि मूर्ख ॥ १ ॥

यापूर्वी ज्यायोगे मूर्ख माणूसही चतुर बनेल ती लक्षणे सांगितली. आता जे लोक शहाणे असून मूर्खासारखे वागतात, त्यांची लक्षणे ऐका. (१)

तया नाव पढतमूर्ख। श्रोतीं न मनावें दुःख।
अवगुण त्यागितां सुख। प्राप्त होये ॥ २ ॥

अशा लोकांना पढतमूर्ख म्हणतात. यातील काही लक्षणे आपल्या ठिकाणी आहेत असे वाटले, तरी श्रोत्यांनी दुःख मानू नये. त्या अवगुणांचा प्रयत्नपूर्वक त्याग करावा, म्हणजे सुख लाभेल. (२)

**बहुश्रुत आणी वित्पन्न। प्रांजळ बोले ब्रह्मज्ञान।**
**दुराशा आणी अभिमान। धरी तो येक पढतमूर्ख॥ ३॥**

जो बहुश्रुत, थोर, व्यासंगी आणि विद्वान आहे, ब्रह्मज्ञानही सुंदर रीतीने सांगतो, पण मनात दुराशा आणि अभिमान बाळगतो, तो एक पढतमूर्खच जाणावा. (३)

**मुक्त क्रिया प्रतिपादी। सगुण भक्ति उछेदी।**
**स्वधर्म आणी साधन निंदी। तो येक पढतमूर्ख॥ ४॥**

जो स्वेच्छाचाराचे प्रतिपादन करतो, सगुण भक्तीचे खंडण करतो, स्वधर्माची आणि साधनाची निंदा करतो, तो पढतमूर्ख असतो. (४)

**आपलेन ज्ञातेपणें। सकळांस शब्द ठेवणें।**
**प्राणीमात्रांचें पाहे उणें। तो येक पढतमूर्ख॥ ५॥**

जो स्वत:स फार विद्वान समजून इतर सर्वांना नावे ठेवतो, प्राणिमात्राचे ठिकाणी दोषच पाहतो, तोही पढतमूर्खच असतो. (५)

**शिष्यास अवज्ञा घडे। कां तो संकटी पडे।**
**जयाचेनि शब्दें मन मोडे। तो येक पढतमूर्ख ॥ ६॥**

जो शिष्यास अवज्ञा घडेल किंवा तो संकटात पडेल अशी आज्ञा करतो व ज्याच्या बोलण्याने इतरांच्या मनाला दु:ख होते, असे मर्मभेदक शब्द बोलणाराही पढतमूर्खच असतो. (६)

**रजोगुणी तमोगुणी। कपटी कुटिळ अंत:कर्णी।**
**वैभव देखोन वाखाणी। तो येक पढतमूर्ख ॥ ७॥**

जो रजोगुणी, तमोगुणी असतो, कपटी, कुटिल अंत:करणाचा असतो आणि वैभवास भुलून श्रीमंत माणसाची स्तुती करू लागतो, तो पढतमूर्खच होय. (७)

**समूळ ग्रंथ पाहिल्याविण। उगाच ठेवि जो दूषण।**
**गुण सांगतां अवगुण। पाहे तो येक पढतमूर्ख॥ ८॥**

जो एखादा ग्रंथ संपूर्ण न पाहता उगीचच त्यातील दोष काढून नावे ठेवतो, त्यांचे गुण सांगू लागले असता ते ऐकूनही न घेता दोषच पाहातो, तो पढतमूर्ख जाणावा. (८)

**लक्षणें ऐकोन मानी वीट। मत्सरें करी खटपट।**
**नीतिन्याय उद्धट। तो येक पढतमूर्ख ॥ ९॥**

चांगली लक्षणे सांगायला गेले की ज्याला कंटाळा येतो, जो मत्सरग्रस्त होऊन नाना खटपटी, लटपटी करतो व ज्याला नीतिन्यायाची जराही चाड नसून जो उद्धट असतो, तोही पढतमूर्खच होय. (९)

**जाणपणें भरीं भरे। आला क्रोध नावरे।**
**क्रिया शब्दास अंतरे। तो येक पढतमूर्ख॥ १०॥**

स्वत: आपण मोठे ज्ञानी आहोत, असे समजून जो हट्टास पेटतो, ज्याला राग आला तर आवरता येत नाही आणि जो बोलतो एक आणि करतो मात्र दुसरेच, तो पढतमूर्ख असतो. (१०)

**वक्ता अधिकारेंवीण। वगत्रृत्वाचा करी सीण।**
**वचन जयाचें कठीण। तो येक पढतमूर्ख॥ ११॥**

योग्यता नसताना जो वक्ता बनतो आणि उगीचच बोलण्याचे कष्ट घेतो, ज्याचे बोलणे अत्यंत कठोर असते, तो पढतमूर्ख जाणावा. (११)

**श्रोता बहुश्रुतपणें। वक्तयास आणी उणें।**
**वाचाळपणाचेनि गुणें। तो येक पढतमूर्ख॥ १२॥**

एखादा श्रोता मोठा बहुश्रुत असतो, पण वाचाळपणा करून वक्त्याचा अपमान करतो, तो पढतमूर्खच समजावा. (१२)

**दोष ठेवी पुढिलांसी। तेंचि स्वयें आपणापासी।**
**ऐसें कळेना जयासी। तो येक पढतमूर्ख॥ १३॥**

जो ज्या गोष्टीसाठी लोकाला दोष देतो; पण स्वत: मात्र तीच गोष्ट करतो, असा स्वत:चे दोष न जाणणारा माणूस पढतमूर्खच असतो. (१३)

**अभ्यासाचेनि गुणें। सकळ विद्या जाणे।**
**जनास निवऊं नेणें। तो येक पढतमूर्ख ॥ १४॥**

जो अभ्यासाच्या योगाने सर्व विद्यांचे ज्ञान करून घेतो, पण लोकांच्या अंत:करणास सुख-समाधान देऊन त्यांचे मन शांत करू शकत नाही, तो पढतमूर्खच समजावा. (१४)

**हस्त बांधीजे ऊर्णतंतें। लोभें मृत्य भ्रमरातें।**
**ऐसा जो प्रपंचीं गुंते। तो येक पढतमूर्ख॥ १५॥**

कोळिष्टकांच्या नाजूक धाग्याने हत्ती बंधनात सापडावा किंवा सुगंधाच्या लोभाने भुंगा कमळात अडकून मरून जावा, त्याप्रमाणे मोक्षप्राप्ती करून घेण्यास समर्थ असूनही जो मायेच्या कोमल धाग्यांमुळे प्रपंचातच गुंतून पडतो, तो पढतमूर्खच होय. (१५)

स्त्रियांचा संग धरी। स्त्रियांसी निरूपण करी।
निंद्य वस्तु आंगिकारी। तो येक पढतमूर्ख॥ १६॥

जो स्त्रियांच्या संगतीत राहातो, स्त्रियांपुढेच ब्रह्मनिरूपण करतो आणि निंद्य वस्तूंचे सेवन करतो, तो पढतमूर्ख जाणावा. (१६)

जेणें उणीव ये आंगासी। तेंचि दृढ धरी मानसीं।
देहबुद्धि जयापासीं। तो येक पढतमूर्ख॥ १७॥

ज्यायोगे आपल्याला कमीपणा येईल तेच जो अंतःकरणात दृढ धरतो व देहबुद्धी ज्याची दृढ असते, तो पढतमूर्ख जाणावा. (१७)

सांडूनियां श्रीपती। जो करी नरस्तुती।
कां दृष्टीं पडिल्यांची कीर्ती। वर्णी तो येक पढतमूर्ख॥ १८॥

लक्ष्मीपती भगवंताची स्तुती करण्याचे सोडून जो नरस्तुती करतो किंवा जो दृष्टीस पडेल त्याची कीर्ती वर्णन करू लागतो, तो पढतमूर्खच असतो. (१८)

वर्णी स्त्रियांचे आवेव। नाना नाटकें हावभाव।
देवा विसरे जो मानव। तो येक पढतमूर्ख॥ १९॥

जो स्त्रियांच्या अवयवांचे वर्णन करतो, नाना नाटके, हावभाव, नकला करण्यात प्रवीण असतो, पण जो मनुष्य देवाला मात्र विसरतो तो पढतमूर्खच होय. (१९)

भरोन वैभवाचे भरीं। जीवमात्रास तुच्छ करी।
पाषांडमत थावरी। तो येक पढतमूर्ख॥ २०॥

ऐश्वर्य प्राप्त झाले असता घमेंडीने जो जीवमात्रास तुच्छ समजतो, तसेच शास्त्रविरुद्ध मताचे प्रतिपादन करतो तोही पढतमूर्खच असतो. (२०)

वित्पन्न आणी वीतरागी। ब्रह्मज्ञानी माहायोगी।
भविष्य सांगों लगे जगीं। तो येक पढतमूर्ख॥ २१॥

जो बहुश्रुत विद्वान असतो, विरक्तही असतो एवढेच नव्हे तर ब्रह्मज्ञानी असून महायोगीही असतो; पण जो लोकांमध्ये भविष्य सांगू लागतो, तोसुद्धा पढतमूर्खच जाणावा.(२१)

श्रवण होतां अभ्यांतरी। गुणदोषाची चाळणा करी।
परभूषणें मत्सरी। तो येक पढतमूर्ख॥ २२॥

काही श्रवण करीत असताना जो मनामध्ये त्यातील गुण-दोषांसंबंधी चिंतन करू लागतो व दुसऱ्याचे चांगले पाहून जो त्याचा मत्सर करू लागतो, तोही पढतमूर्खच असतो. (२२)

नाहीं भक्तीचें साधन। नाहीं वैराग्य ना भजन।
क्रियेविण ब्रह्मज्ञान। बोले तो येक पढतमूर्ख॥ २३॥

जो भक्तीचे काही साधन करीत नाही, जो वैराग्यसंपन्न नसतो व काही भजन, पूजन इत्यादी क्रिया न करताच लोकांना ब्रह्मज्ञान सांगू लागतो, तो पढतमूर्ख होय. (२३)

न मनी तीर्थ न मनी क्षेत्र। न मनी वेद न मनी शास्त्र।
पवित्र कुळीं जो अपवित्र। तो येक पढतमूर्ख॥ २४॥

जो तीर्थक्षेत्र, वेद अथवा शास्त्र इत्यादी काहीच मानत नाही व पवित्रकुळी जन्मला असून ज्याचे आचरण अपवित्र असते, तो पढतमूर्ख समजावा. (२४)

आदर देखोनि मन धरी। कीर्तीविण स्तुती करी।
सवेंचि निंदी अनादरी। तो येक पढतमूर्ख॥ २५॥

जो आदर देतो, त्याची जो मनधरणी करतो, ज्याची योग्यता नाही त्याची जो स्तुती करतो आणि नंतर स्वतः त्याची निंदा करतो, त्याचा अनादर करतो, तो एक पढतमूर्खच असतो. (२५)

मागें येक पुढें येक। ऐसा जयाचा दंडक।
बोले येक करी येक। तो येक पढतमूर्ख॥ २६॥

माणसाच्या तोंडावर एक बोलायचे व त्याच्या पाठीमागे दुसरेच बोलायचे अशी ज्याची वागण्याची रीत असते; जो बोलतो एक तर करतो दुसरेच, तो पढतमूर्खच समजावा. (२६)

प्रपंचविशीं सादर। परमार्थी ज्याचा अनादर।
जाणपणें घे अधार। तो येक पढतमूर्ख॥ २७॥

जो प्रपंचाविषयी आदर बाळगतो व परमार्थाचा अनादर करतो आणि आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ शास्त्रवचनांचा वाटेल तसा आधार घेतो, तो पढतमूर्ख जाणावा.(२७)

येथार्थ सांडून वचन। जो रक्षून बोले मन।
ज्याचें जिणें पराधेन। तो येक पढतमूर्ख॥ २८॥

जो योग्य ते सांगायचे सोडून ऐकणाराचे मन राखण्यासाठी अयोग्यही बोलतो व ज्याचे जगणे परस्वाधीन लोकांवर अवलंबून असते, तोही पढतमूर्खच असतो. (२८)

सोंग संपाधी वरीवरी। करूं नये तेंचि करी।
मार्ग चुकोन भरे भरीं। तो येक पढतमूर्ख॥ २९॥

जो वर वर चांगले वागत असल्याचे सोंग आणतो; पण (चोरून) जे करू नये तेच करतो, चांगला मार्ग सोडून हट्टाने आडमार्गास लागतो, तो पढतमूर्खच होय. (२९)

रात्रंदिवस करी श्रवण। न संडी आपले अवगुण।
स्वहित आपलें आपण। नेणे तो येक पढतमूर्ख॥ ३०॥

जो रात्रंदिवस चांगल्या उपदेशांचे श्रवण करीत असूनही आपले अवगुण सोडत नाही, आपले स्वतःचे हित कशात आहे हे जो जाणत नाही, तो पढतमूर्ख असतो. (३०)

निरूपणीं भले भले। श्रोते येऊन बैसले।
क्षुद्रें लक्षुनी बोले। तो येक पढतमूर्ख॥३१॥

जो निरूपण करीत असताना मोठे अधिकारी श्रोते ऐकायला येऊन बसले असता जो त्यांची क्षुद्र न्यूने काढून बोलतो, तो पढतमूर्खच जाणावा. (३१)

शिष्य जाला अनाधिकारी। आपली अवज्ञा करी।
पुन्हा त्याची आशा धरी। तो येक पढतमूर्ख॥ ३२॥

ज्याचा शिष्य अनधिकारी झाल्याने गुरूची अवज्ञा करीत असतानाही जो तिकडे दुर्लक्ष करून परत त्या शिष्याची आशा धरतो, तो पढतमूर्खच असतो. (३२)

होत असतां श्रवण। देहास आले उणेपण।
क्रोधें करी चिणचिण। तो येक पढतमूर्ख॥ ३३॥

श्रवण करीत असता जर देहधर्मामुळे त्यात अडथळा आला, उणीव भासू लागली, तर जो रागाने चिडचिड करतो, तो पढतमूर्खच होय. (३३)

भरोन वैभवाचे भरीं। सद्गुरुची उपेक्षा करी।
गुरुपरंपरा चोरी। तो येक पढतमूर्ख॥ ३४॥

आपल्या ऐश्वर्याच्या मदाने जो सद्गुरूंची उपेक्षा करतो आणि गुरुपरंपरा कोणासही सांगत नाही, तो पढतमूर्ख जाणावा. (३४)

ज्ञान बोलोन करी स्वार्थ। कृपणा ऐसा सांची अर्थ।
अर्थासाठी लावी परमार्थ। तो येक पढतमूर्ख॥ ३५॥

ज्ञानाच्या गोष्टी सांगून जो आपला स्वार्थ साधतो आणि एखाद्या कंजूष माणसासारखा द्रव्यसंचय करतो, संपत्ती मिळविण्यासाठी जो परमार्थाचा उपयोग करतो, तो पढतमूर्ख समजावा. (३५)

वर्तल्यावीण सिकवी। ब्रह्मज्ञान लावणी लावी।
पराधेन गोसावी। तो येक पढतमूर्ख॥ ३६॥

जो स्वतः तसे आचरण न करता लोकांना ब्रह्मज्ञान शिकवतो. वास्तविक कुणी विचारल्याखेरीज सांगू नये अशी ब्रह्मज्ञानाविषयीची शास्त्राज्ञा पण ती मोडून जो पोटासाठी सर्रास सर्वांना ब्रह्मज्ञान सांगत सुटतो व महंत असून पराधीन होऊन राहतो, तो पढतमूर्खच असतो. (३६)

भक्तिमार्ग अवघा मोडे। आपणामध्यें उपंढर पडे।
ऐसिये कर्मी पवाडे। तो येक पढतमूर्ख॥ ३७॥

जी कर्मे केली असता भक्तिमार्गात विघ्न येते आणि स्वतःचे जीवनही अस्ताव्यस्त होऊन जाते अशी कर्मे करण्यास जो मागेपुढे पाहात नाही, तो पढतमूर्ख जाणावा. (३७)

प्रपंच गेला हातीचा। लेश नाहीं परमार्थाचा।
द्वेषी देवां ब्राह्मणांचा। तो येक पढतमूर्ख॥ ३८॥

हातचा प्रपंचही गेला व अंतःकरणात परमार्थाचा लेशही नाही, असा जो देवा-ब्राह्मणांचा द्वेष करतो, तो पढतमूर्ख होय. (३८)

त्यागावया अवगुण। बोलिलें पढतमूर्खाचें लक्षण।
विचक्षणें नीउन पूर्ण। क्षमा केलें पाहिजे॥ ३९॥

लोकांनी अवगुणांचा त्याग करावा म्हणून पढतमूर्खाची लक्षणे वर्णन केली आहेत. विचारवंतांनी त्यातील न्यून असेल ते पूर्ण करून घ्यावे व मला क्षमा करावी. (३९)

परममूर्खामाजी मूर्ख। जो संसारीं मानी सुख।
या संसारदुःखाऐसें दुःख। आणीक नाहीं॥ ४०॥

या संसारात जो सुख मानतो तो परम मूर्खामध्येही मूर्ख असतो. या संसारदुःखाएवढे दुःख आणखी कुठलेही नाही. (४०)

तेंचि पुढें निरूपण। जन्मदुःखाचें लक्षण।
गर्भवास हा दारुण। पुढें निरोपिला॥ ४१॥

येथून पुढे त्याचेच वर्णन केले आहे. जन्म घेतल्यावर सोसावे लागणारे दुःख व गर्भवासाचे दारुण दुःख पुढे वर्णिले आहे (४१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पढतमूर्खलक्षणनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

दशक दुसरा समाप्त.

❑ ❑

# दशक तिसरा : स्वगुणपरीक्षा

## दशक ३ : समास १

## जन्मदु:खनिरूपण

॥ श्रीराम ॥

**जन्म दु:खाचा अंकुर। जन्म शोकाचा सागर।**
**जन्म भयाचा डोंगर। चळेना ऐसा ॥ १॥**

श्री समर्थ म्हणतात की, जन्म हा दु:खरूपी वृक्षाचा अंकुर म्हणजे आरंभ. जन्म झाला की दु:खाला सुरुवातच होते. जन्म शोकाचा समुद्र असून भयाचा कधीही न हलणारा असा डोंगर आहे. (१)

**जन्म कर्माची आटणी। जन्म पातकाची खाणी।**
**जन्म काळाची जाचणी। निच नवी ॥ २॥**

जन्म म्हणजे कर्माची मूस आहे. कारण जन्मापासूनच कर्म पाठीस लागते. जन्म ही पातकाची खाण आहे. जन्म ही नित्यनूतन काळाची जाचणी आहे. कारण जन्माला आल्यापासून काळाचे भय सदा मागे लागलेलेच असते. (२)

**जन्म कुविद्येचें फळ। जन्म लोभाचें कमळ।**
**जन्म भ्रांतीचें पडळ। ज्ञानहीन ॥ ३॥**

जन्म हे कुविद्येचे फळ आहे असे म्हणण्याचे कारण वासनेमुळेच जन्म घ्यावा लागतो. जन्मास लोभाचे कमळ म्हटले आहे. लोभ म्हणजे आसक्ती. आसक्तिरूपी कमळातच जीवरूपी भ्रमर गुंतून पडतो. जन्म हे भ्रांतीचे पडळ आहे.कारण जन्म होताच स्वस्वरूपाचे विस्मरणरूपी अज्ञान उत्पन्न होते. (३)

**जन्म जिवासी बंधन। जन्म मृत्यासी कारण।**
**जन्म हेंचि अकारण। गथागोवी ॥ ४॥**

जन्म होताच मी देह हे विपरीत ज्ञान बुद्धीस व्यापते व वास्तविक मुक्त असून जीव आपल्याला बद्ध समजू लागतो. तसा देहाचा जन्म म्हणजे अकारणच मायेत गुरफटणे होय. (४)

**जन्म सुखाचा विसर। जन्म चिंतेचा आगर।**
**जन्म वासनाविस्तार। विस्तारला ॥ ५॥**

जन्म होताच स्वस्वरूपाचा विसर पडतो. तोच सुखाचा विसर होय. मी देह ही भावना दृढ होताच एकामागोमाग एक चिंता त्या जीवास व्यापून टाकतात, म्हणून जन्म म्हणजे चिंतेचे आगर म्हटले असून जन्मच मुळी वासनेमुळे होतो आणि त्यानंतर वासनांची सतत वृद्धीच होत जाते. (५)

**जन्म जिवाची आवदसा। जन्म कल्पनेचा ठसा।**
**जन्म लंवेचा वळसा। ममतारूप ॥ ६॥**

जन्म होताच जीवाचे स्वस्वरूपज्ञान लोपते हे एक प्रकारे त्याचे अध:पतनच असते. जन्म होताच मी देह या कल्पनेचा ठसा बुद्धीवर उमटतो आणि मग ममतारूप डाकीण त्याला झपाटून टाकते. (६)

**जन्म मायेचें मैंदावें। जन्म क्रोधाचें विरावें।**
**जन्म मोक्षास आडवें। विघ्न आहे ॥ ७॥**

जन्म म्हणजे मायेचे कपट होय. जन्म म्हणजे क्रोधाचे वीरपण होय. जन्म मोक्षाच्या मार्गात आडवे येणारे विघ्नच आहे. (७)

**जन्म जिवाचें मीपण। जन्म अहंतेचा गुण।**
**जन्म हेंचि विस्मरण। ईश्वराचें ॥ ८॥**

देहाचा जन्म होताच मी देह हा अहंकार उत्पन्न होतो, म्हणजे अहंता तेव्हापासून आपला प्रभाव गाजवू लागते आणि गर्भात असताना ज्या जीवास ईश्वराचे स्मरण असते, त्यास जन्मताक्षणी त्याचा पूर्ण विसर पडतो. (८)

जन्म विषयांची आवडी। जन्म दुराशेची बेडी।
जन्म काळाची कांकडी। भक्षिताहे ॥ ९॥

जन्म होताच विषयांची आवड उत्पन्न होते, इंद्रियांनी विषयोपभोग घेतले असता सुख लाभेल अशी दुराशेची बेडी हातापायांत पडते. काळ म्हणजे मृत्यू. काकडी खावी तसा काळ या शरीरास कधी नष्ट करील, हे सांगता येत नाही. (९)

जन्म हाचि विषमकाळ। जन्म हेंचि वोखटी वेळ।
जन्म हा अति कुश्चीळ। नर्कपतन ॥ १०॥

जन्मकाळ हाच वाईट काळ असून ती वेळ फार कठीण, प्राणसंकटाची असते. जन्म फार घाणेरडा असून ते नरकात पडणेच समजावे. (१०)

पाहातां शरीराचें मूळ। या ऐसें नाहीं अमंगळ।
रजस्वलेचा जो विटाळ। त्यामध्यें जन्म यासी॥ ११॥

या देहाची उत्पत्ती कशी होते, याचा विचार करू लागल्यास या देहासारखे अमंगळ काही नाही अशी खात्री पटते. रजस्वलेच्या विटाळामध्ये याचा जन्म होतो. (११)

अत्यंत दोष ज्या विटाळा।
त्या विटाळाचाचि पुतळा।
तेथें निर्मळपणाचा सोहळा। केवीं घडे ॥ १२॥

ज्या विटाळास अत्यंत अमंगळ, दोषास्पद मानतात, त्या विटाळाचाच पुतळा म्हणजे हा देह होय. असा मुळातच जो अमंगळ, त्याला निर्मळ करण्याचा खटाटोप केला, तरी तो कसा सफल होणार? (१२)

रजस्वलेचा जो विटाळ।
त्याचा आळोन जाला गाळ।
त्या गाळाचेंच केवळ। शरीर हें ॥ १३॥

रजस्वलेचा विटाळ आटून त्याचा जो गाळ बनतो, त्या गाळाचेच हे शरीर बनते. (१३)

वरि वरि दिसे वैभवाचें। अंतरीं पोतडें नर्काचें।
जैसें झांकणें चर्मकुंडाचे। उघडितांच नये ॥ १४॥

ते वरवर सुरेख दिसते, पण वास्तविक ते आतमध्ये घाणीचे पोतडेच आहे. चांभाराच्या चर्मकुंडाचे झाकण काढायची ज्याप्रमाणे सोयच नसते, तशीच या शरीराची स्थिती आहे. (१४)

कुंड धुतां शुद्ध होतें। यास प्रत्यईं धुईजेतें।
तरी दुर्गंधी देहातें। शुद्धता न ये ॥ १५॥

ते चर्मकुंड धुऊन काढले असता स्वच्छ होऊ शकते पण या देहाला दररोज कितीही धुऊन काढले तरी दुर्गंधीने भरलेला हा देह निर्मळ होतच नाही. (१५)

अस्तीपंजर उभविला। सीरानाडीं गुंडाळिला।
मेदमांसें सरसाविला। सांदोसांदीं भरूनी॥ १६॥

हाडांचा सापळा उभा केला, तो शिरा नाड्या यांनी गुंडाळला आणि प्रत्येक सांध्यामध्ये चरबी व मांस भरून त्याला चांगला फुगवला. असा हा देह तयार होतो. (१६)

अशुद्ध शब्दें शुद्ध नाहीं। तेंहि भरलें असे देहीं।
नाना व्याधी दुःखें तेंहि। अभ्यांतरीं वसती ॥ १७॥

रक्त म्हणजे 'अशुद्ध' अर्थात जे शुद्ध नाही, तेही या शरीरात भरलेले असते. शिवाय या शरीरात नाना व्याधी दुःखे भरलेली असतात. (१७)

नर्काचें कोठार भरलें। आंतबाहेरी लिडीबिडिलें।
मूत्रपोतडें जमलें। दुर्गंधीचें ॥ १८॥

शरीर म्हणजे आतबाहेर घाणीने लडबडलेले व नर्काचे कोठार आहे. शरीर म्हणजे दुर्गंधीने भरलेली मूत्राची पिशवीच आहे. (१८)

जंत किडे आणी आंतडी। नाना दुर्गंधीची पोतडी।
अमुप ल्वथविती कातडी। कांटाळवाणी ॥ १९॥

शरीरात जंत, किडे वळवळत असतात आणि नाना प्रकारच्या दुर्गंधीची पोतडी म्हणजे यातील आतडी होत. शरीरात अनेक कंटाळवाणी गलिच्छ कातडी लोंबत असतात.(१९)

सर्वांगास सिर प्रमाण। तेथें बळसें वाहे घ्राण।
उठे घाणी फुटतां श्रवण। ते दुर्गंधी नेघवे ॥ २०॥

शरीरात शिर म्हणजे मस्तक हे श्रेष्ठ म्हणतात. त्याला उत्तमांग म्हणतात, पण तेथे नाकांतून शेंबूड वाहात असतो आणि कान फुटला असता जी दुर्गंधी त्या घाणीमुळे सुटते ती तर सहनच होत नाही. (२०)

डोळां निघती चिपडें। नाकीं दाटतीं मेकडें।
प्रातःकाळीं घाणी पडे। मुखीं मळसारिखी॥ २१॥

डोळ्यांत चिपडे येतात, नाकांत मेकडे गर्दी करतात, रोज प्रातःकाळी तोंडातून मळासारखी घाण बाहेर पडते.(२१)

**लाळ थुंका आणी मळ। पीत श्लेष्मा प्रबळ।**
**तयास म्हणती मुखकमळ। चंद्रासारिखें ॥ २२ ॥**

ज्या तोंडामध्ये लाळ, थुंकी आणि इतर घाण, तसेच पित्त, कफ यासारखी प्रबळ घाण भरलेली असते, त्याला मुखकमळ चंद्रासारखे आहे, असे म्हणतात. (२२)

**मुख ऐसें कुश्चीळ दिसे। पोटीं विष्ठा भरली असे।**
**प्रत्यक्षास प्रमाण नसे। भूमंडळीं ॥ २३ ॥**

तोंड असे घाणेरडे असते, तर पोटात विष्ठा भरलेली असते. या गोष्टी जगात प्रत्यक्षच आहेत. त्यांना दुसरे प्रमाण देण्याची जरुरी नाही. (२३)

**पोटीं घालितां दिव्यान्न। कांहीं विष्ठा कांहीं वमन।**
**भागीरथीचें घेतां जीवन। त्याची होये लघुशंका ॥ २४ ॥**

पोटात जरी काही मिष्टान्न, दिव्यान्न घातले, तरी त्यातील काहीची विष्ठा होते, तर कधी कधी काही ओकूनही पडते. जरी अगदी गंगाजल प्राशन केले, तरी त्याचे मूत्रच बनते. (२४)

**एवं मळ मूत्र आणी वमन। हेंचि देहाचें जीवन।**
**येणेंचि देह वाढे जाण। यदर्थीं संशय नाहीं ॥ २५ ॥**

थोडक्यात, मल, मूत्र आणि ओक हे देहाचे जीवन असून त्यांनीच देहाचे पोषण होते, याबद्दल संशय नाही. (२५)

**पोटीं नस्तां मळ मूत्रवोक। मरोन जाती सकळ लोक।**
**जाला राव अथवा रंक। पोटीं विष्ठा चुकेना ॥ २६ ॥**

जर पोटात याप्रमाणे मल, मूत्र, ओक नसतील, तर सर्व लोक मरून जातील. राव असो वा रंक असो, त्याच्या पोटात विष्ठा असतेच असते. ती चुकत नाही. (२६)

**निर्मळपणें काढूं जातां। तरी देह पडेल तत्वता।**
**एवं देहाची वेवस्ता। ऐसी असे ॥ २७ ॥**

स्वच्छ करण्यासाठी ती काढून टाकण्याचा प्रयत्न केला तर देह मरून जाईल. या देहाची अवस्था ही अशी असते. (२७)

**ऐसा हा धड असतां। येथाभूत पाहों जातां।**
**मग ते दुर्दशा सांगतां। शंका बाधी ॥ २८ ॥**

जो पर्यंत देह धडधाकट असतो तोपर्यंत देहाची कशी अवस्था असते, हे इत्थंभूत सांगितले तरी खरे वाटत नाही व देह खरेच असा घाणेरडा आहे का, अशी शंका मनात येते. (२८)

**ऐसिये कारागृहीं वस्ती। नवमास बहु विपत्ती।**
**नवहि द्वारें निरोधती। वायो कैंचा तेथें ॥ २९ ॥**

अशा या देहरूपी कारागृहात वस्तीला आल्यामुळे जीवाला नऊ महिने फार यातना भोगाव्या लागतात. गर्भाशयात वायू नसतो. त्यामुळे देहातील नऊ द्वारे (दोन डोळे, दोन कान, नाकाची दोन भोके, तोंड, गुद आणि उपस्थ) रोधली जातात. (२९)

**वोका नरकाचे रस झिरपती। ते जठराग्नीस्तव तापती।**
**तेणें सर्वहि उकडती। अस्तिमांस ॥ ३० ॥**

आईच्या पोटातील ओक आणि विष्ठा यातून पाणी झिरपते, रस झिरपतात, ते जठराग्नीमुळे तापतात, त्यामुळे गर्भाच्या अस्थी व मांस उकडून निघतात. (३०)

**त्वचेविण गर्भ खोळे। तंव मातेसी होती डोहळे।**
**कटवतिक्षणें सर्वांग पोळे। तया बाळकाचें ॥ ३१ ॥**

गर्भाला त्वचा नसते, तो नुसता मांसपिंड खोळीत असतो. तो हालचाल करू लागतो, तेव्हा मातेला डोहाळे लागतात. ती कडू व तिखट पदार्थ खाऊ लागते, त्यामुळे त्या गर्भातील बालकाचे सर्वांग होरपळते. (३१)

**बांधलें चर्माचें मोटाळें। तेथें विष्ठेचें पेटाळें।**
**रसउपाय वंकनाळें। होत असे ॥ ३२ ॥**

गर्भ म्हणजे चामड्याचे बांधलेले गाठोडे व आत विष्ठेचे पोतडे असते. नाभीपासून निघणाऱ्या नाळेच्याद्वारे जगण्यास आवश्यक असणारे रस त्याला मिळतात. (३२)

**विष्ठा मूत्र वांती पीत। नाकीं तोंडीं निघती जंत।**
**तेणे निर्बुजलें चित्त। आतिशयेंसीं ॥ ३३ ॥**

मल, मूत्र, ओक आणि पित्त यांच्यामुळे नाकातोंडातून जंतू बाहेर पडतात. त्यामुळे त्या गर्भातील जीव अतिशय घाबरतो. (३३)

**ऐसिये कारागृहीं प्राणी। पडिला अत्यंत दाटणीं।**
**कळवळोन म्हणे चक्रपाणी । सोडवीं येथून आतां ॥ ३४ ॥**

अशा या कैदखान्यात तो जीव अत्यंत अडचणीत सापडतो. त्यावेळी तो जीव कळवळून म्हणू लागतो की, 'हे चक्रपाणी, मला आता येथून सोडव.' (३४)

**देवा सोडविसी येथून। तरी मी स्वहित करीन।**
**गर्भवास हा चुकवीन। पुन्हा न यें येथें ॥ ३५ ॥**

हे देवा, जर तू आत्ता मला येथून सोडवशील, तर मी स्वत:चे हित करून घेईन आणि गर्भवास चुकवीन. पुन्हा येथे येणार नाही. (३५)

ऐसी दुखवोनप्रतिज्ञा केली। तंव जन्मवेळ पुढें आली।
माता आक्रंदों लागली। प्रसूतकाळीं ॥ ३६ ॥

दु:खाने कासावीस होऊन जीव अशी प्रतिज्ञा करतो, तोच जन्मवेळ जवळ आलेली असते आणि प्रसूतीची वेळ आल्याने त्या वेदनांनी आई आरडाओरडा करू लागते. (३६)

नाकीं तोंडीं बैसलें मांस। मस्तकद्वारें सांडी स्वास।
तेंहि बुजलें निशेष। जन्मकाळीं ॥ ३७ ॥

पोराच्या नाकातोंडात मांस घट्ट बसल्याने ते मस्तकावरील टाळूच्या छिद्राद्वारे श्वासोच्छ्वास करू लागते. पण ते छिद्रही जन्मकाळी बुजून जाते. (३७)

मस्तकद्वार तें बुजलें। तेणें चित्त निर्बुजलें।
प्राणी तळमळूं लागलें। चहूंकडे ॥ ३८ ॥

टाळूचे छिद्र बंद झाल्याने त्या पोराचा जीव घाबरा होऊन तो तळमळून चहूकडे हलू लागतो. (३८)

स्वास उस्वास कोंडला। तेणें प्राणी जाजावला।
मार्ग दिसेनासा जाला। कासावीस ॥ ३९ ॥

श्वासोच्छ्वास कोंडला गेल्यामुळे तो जीव त्रासतो, पण मार्गच नसल्यामुळे तो कासावीस होतो. (३९)

चित्त बहु निर्बुजलें। तेणें आडभरीं भरलें।
लोक म्हणती आडवें आलें। खांडून काढा ॥ ४० ॥

अतिशय घाबरून मूल बाहेर येण्यासाठी धडपडू लागले, पण ते भलत्याच जागी अडकून आडवे झाले. तेव्हा लोक म्हणू लागले की, 'अरे मूल आडवे आले आहे, तर आता त्याला कापून त्याचे तुकडे करूनच काढा.' (४०)

मग ते खांडून काढिती। हस्तपाद छेदून घेती।
हातां पडिलें तेंचि कापिती। मुख नासिक उदर ॥ ४१ ॥

मग त्या मुलाचे हात, पाय, किंवा तोंड, नाक, पोट वगैरे जे अवयव हाताला सापडतील, ते कापून काढले जातात. (४१)

ऐसे टवके तोडिले। बाळकें प्राण सोडिले।
मातेनेंहि सांडिलें। कळिवर ॥ ४२ ॥

अशा प्रकारे त्या बालकाचे टवके तोडून काढताक्षणी ते बालक प्राण सोडते. एवढेच नव्हे तर या सगळ्या खटपटीत माताही देहाचा त्याग करते. (४२)

मृत्य पावला आपण। मातेचा घेतला प्राण।
दु:ख भोगिलें दारुण। गर्भवासीं ॥ ४३ ॥

याप्रमाणे ते बालक स्वत: मृत्यू पावते व आईचाही प्राण जातो. गर्भवासात त्या जीवाला भयंकर दु:ख भोगावे लागते. (४३)

तथापी सुकृतेंकरूनी। मार्ग सांपडला योनी।
तऱ्हीं आडकला जाउनी। कंठ स्कंदी मागुता ॥ ४४ ॥

तथापि जर पूर्वपुण्याईच्या योगे त्याला योनीतून बाहेर येण्याचा सरळ मार्ग सापडला, तरी त्याची मान, खांदा वगैरे एखादा अवयव त्या संकुचित मार्गात अडकून बसतो. (४४)

तये संकोचित पंथीं। बळेंचि वोढून काढिती।
तेणें गुणें प्राण जाती। बाळकाचे ॥ ४५ ॥

मग त्या संकुचित मार्गातून त्याला बळेच ओढून बाहेर काढतात. त्यायोगेही त्या बालकाचे प्राण कधी कधी जातात. (४५)

बाळकाचे जातां प्राण। अंतीं होये विस्मरण।
तेणें पूर्वील स्मरण। विसरोन गेला ॥ ४६ ॥

बालकाचे प्राण जाऊ लागले की, त्या अंतसमयी परमेश्वराचे विस्मरण होऊन पूर्वीच्या सर्व गोष्टी तो विसरून जातो. (४६)

गर्भीं म्हणे सोहं सोहं। बाहेरी पडतां म्हणे कोहं।
ऐसा कष्टी जाला बहु। गर्भवासीं ॥ ४७ ॥

गर्भात असताना स्वस्वरूपाचे ज्ञान असल्याने तो जीव 'सोहं सोहं' म्हणजे मी तोच आहे, म्हणजे मी ब्रह्मच आहे, असे म्हणत असतो, पण बाहेर पडला की 'कोहं' म्हणजे मी कोण आहे असे म्हणू लागतो. अर्थात त्याला स्वस्वरूपाचे विस्मरण होते. (४७)

दु:खा वरपडा होता जाला। थोरा कष्टीं बाहेरी आला।
सवेंच कष्ट विसरला। गर्भवासाचे ॥ ४८ ॥

गर्भात असताना दु:खी असलेला तो जीव तेथून मोठ्या कष्टाने बाहेर येतो. पण बाहेर येताच गर्भवासातील सर्व कष्ट तो पार विसरून जातो. (४८)

सुंन्याकार जाली वृत्ती। कांहीं आठवेना चित्तीं।
अज्ञानें पडिली भ्रांती। तेणें सुखचि मानिलें ॥ ४९ ॥

त्याची वृत्ती शून्याकार होऊन त्याला चित्तात काहीच आठवेनासे होते आणि अज्ञानाने भ्रांती उत्पन्न होऊन जन्मलेल्या बालकाला सुखच वाटू लागते. (४९)

देह विकार पावलें। सुखदुःखें झळंबलें।
असो ऐसें गुंडाळलें। मायाजाळीं ॥ ५० ॥

त्याचा देह विकार पावू लागतो. त्याची वाढ होऊ लागली की, तो जीव सुख-दुःखाने व्याप्त होतो. असो. या-प्रमाणे तो जीव मायेच्या जाळ्यात सापडून बद्ध होतो.(५०)

ऐसें दुःख गर्भवासीं। होतें प्राणीमात्रांसीं।
म्हणोनियां भगवंतासी। शरण जावें ॥ ५१ ॥

प्रत्येक प्राणिमात्राला गर्भवासात असे दारुण दुःख भोगावे लागते. म्हणून त्याने भगवंतास शरण जावे.(५१)

जो भगवंताचा भक्त। तो जन्मापासून मुक्त।
ज्ञानबळें विरक्त। सर्वकाळ ॥ ५२ ॥

जो भगवंताचा भक्त असतो, तो या जन्ममरणाच्या चक्रातून आपल्या विरक्तीच्या आणि ज्ञानाच्या बळावर कायमचा मुक्त होतो. त्याला पुनर्जन्म नसतो. (५२)

ऐशा गर्भवासीं विपत्ती। निरोपिल्या येथामती।
सावध होऊन श्रोतीं। पुढें अवधान द्यावें॥ ५३ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, याप्रमाणे गर्भवासातील दुःखाचे मी यथामती वर्णन येथे केले आहे. आता पुढे जे काही सांगणार आहे, त्याकडे श्रोत्यांनी सावध होऊन लक्ष द्यावे. (५३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'जन्मदुःखनिरूपणनाम' समास पहिला समाप्त.

❑ ❑

## दशक ३ : समास २

## स्वगुणपरीक्षा (अ)

॥ श्रीराम ॥

संसार हाचि दुःखमूळ। लागती दुःखाचे इंगळ।
मागां बोलिली तळमळ। गर्भवासाची ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, हा संसारच मुळी दुःखाचे मूळ आहे. यात दुःखाची इंगळी लागते, तेव्हा तिच्या डंखाने प्राणांतिक वेदना होतात. मागील समासात गर्भवासात ज्या यातना सोसाव्या लागतात, त्याचे वर्णन केले होते. (१)

गर्भवासीं दुःख जालें। तें बाळक विसरलें।
पुढें वाढों लागलें। दिवसेंदिवस ॥ २ ॥

पण गर्भवासात जे दुःख भोगलेले असते त्याचा त्या बालकास विसर पडतो आणि पुढे ते दिवसेंदिवस वाढू लागते. (२)

बाळपणीं त्वचा कोंवळी। दुःख होतांचि तळमळी।
वाचा नाहीं तये काळीं। सुखदुःख सांगावया॥ ३ ॥

बाळपणी त्याची त्वचा फार कोवळी असते. त्यामुळे जरा काही दुःख झाले की ते तळमळू लागते आणि सुखदुःख सांगावे म्हटले तर त्यावेळी त्याला बोलताही येत नसते.(३)

देहास कांहीं दुःख जालें। अथवा क्षुधेनें पीडलें।
तरी तें परम अक्रंदलें। परी अंतर नेणवे ॥ ४ ॥

देहाला काही दुःख झाले अथवा भुकेने व्याकूळ झाले, तरी ते बालक मोठमोठ्याने रडू लागते, पण आपली आतली व्यथा त्याला सांगता येत नाही. (४)

माता कुरवाळी वरी। परी जे पीडा जाली अंतरीं।
ते मायेसी न कळे अभ्यांतरीं। दुःख होये बाळकासीं॥ ५ ॥

माता त्याला जवळ घेते, कुरवाळते, पण त्याच्या अंतरांत काय दुःख आहे, ते तीही जाणू शकत नाही. त्यामुळे त्या बालकाचे दुःख दूर होऊ शकत नाही. (५)

मागुतें मागुतें फुंजे रडे। माता बुझावी घेऊन कडे।
वेथा नेणती बापुडें। तळमळी जीवीं ॥ ६ ॥

ते मूल हुंदके देऊन परत परत रडते, आई त्याला कडेवर घेऊन समजावण्याचा प्रयत्न करते, पण त्याला काय व्यथा आहे हे कुणीच जाणू शकत नाही; त्यामुळे ते मूल बिचारे तळमळत राहाते. (६)

नाना व्याधीचे उमाळे। तेणें दुःखें आंदोळे।
रडे पडे कां पोळे। अग्निसंगें ॥ ७ ॥

नाना व्याधींच्या जोरामुळे ते दुःखाने भयकंपित होते. कधी ते रडते, कधी पडते, तर कधी विस्तवामुळे ते पोळतेही. (७)

शरीर रक्षितां नये। घडती नाना अपाये।
खोडी अधांतरीं होये। आवेवहीन बाळक ॥ ८॥

त्याला स्वत:च्या शरीराचे रक्षण करता येत नाही. त्यामुळे नाना अपाय घडत असतात. खोड्या करताना अकस्मात अपाय होऊन त्याला एखादा अवयवही गमवावा लागतो. (८)

अथवा अपाय चुकले। पूर्व पुण्य पुढें ठाकलें।
मातेस वोळखों लागलें। दिवसेंदिवस ॥ ९॥

अथवा पूर्णपुण्याईमुळे असे काही अपाय झाले नाहीत की ते मोठे होऊन हळूहळू आपल्या आईला अधिकाधिक ओळखू लागते. (९)

क्षणभरी मातेस न देखे। तरी आक्रंदे रुदन करी दु:खें।
ते समईं मातेसारिखें। आणीक कांहींच नाहीं॥ १०॥

मग एक क्षणभर जरी आई दिसली नाही, तरी ते दु:खाने मोठमोठ्याने रडू लागते. त्यावेळी त्याला आईसारखे दुसरे आणखी काहीच आवडत नाही. (१०)

आस करून वास पाहे। मातेविण कदा न राहे।
वियोग पळमात्र न साहे। स्मरण जालियां नंतरें॥ ११॥

मोठ्या आशेने ते आईची वाट पाहात असते, आईशिवाय ते जराही राहत नाही. आईची आठवण झाली की, तिचा वियोग त्याला पळभरही सहन होत नाही. (११)

जरी ब्रह्मादिक देव आले। अथवा लक्ष्मीनें अवलोकिलें।
तरी नवचे बुझाविलें। आपले मातेवांचूनी॥ १२॥

ब्रह्मादिक देव जरी आले किंवा प्रत्यक्ष लक्ष्मीने जरी प्रेमाने त्याच्याकडे पाहिले, कितीही समजाविण्याचा प्रयत्न केला, तरी आपल्या आईला सोडून ते थोडा वेळही राहात नाही. (१२)

कुरूप अथवा कुलक्षण। सकळांहूनि करंटेपण।
तरी नाहीं तीसमान। भूमंडळीं कोणी ॥ १३॥

आई कुरूप असो कुलक्षणी असो अथवा सगळ्यांच्यापेक्षा अभागी असो, त्या बाळाला सर्व जगात तिच्यासारखे कोणीही नसते. (१३)

ऐसें तें केविलवाणें। मातेविण दिसे उणें।
रागें परतें केलें तिनें। तरी आक्रंदोनी मिठी घाली॥ १४॥

आई नसेल तर ते मूल केविलवाणे, दीन दिसते. तिने रागावून त्याला दूर सारले तरी ते मोठमोठ्याने रडू लागते व धावत येऊन तिलाच मिठी मारते. (१४)

सुख पावे मातेजवळी। दुरी करितांचि तळमळी।
अति प्रीति तयेकाळीं। मातेवरी लागली ॥ १५॥

आईच्या जवळ ते आनंदात असते. तिने दूर सारले तर ते तळमळू लागते. त्यावेळी आईवर त्याचे अतिशय प्रेम जडलेले असते. (१५)

तंव ते मातेस मरण आलें। प्राणी पोरटें जालें।
दु:खें झुर्णीं लागलें। आई आई म्हणोनी॥ १६॥

अशा स्थितीत आई मरण पावली तर ते मूल अगदी पोरके होते आणि 'आई, आई' म्हणून दु:खाने झुरणीला लागते. (१६)

आई पाहातां दिसेना। दीनरूप पाहे जना।
आस लागलिसे मना। आई येईल म्हणोनी॥ १७॥

आई कुठे दिसत नाही. त्यामुळे ते केविलवाणे होऊन लोकांच्या तोंडाकडे पाहू लागते. त्याला अजून आशा वाटत असते की आपली आई जरूर परत येईल. (१७)

माता म्हणौन मुख पाहे। तंव ते आपुली माता नव्हे।
मग हिंवासलें राहे। दैन्यवाणें ॥ १८॥

एखाद्या स्त्रीला पाहून ही आपली आई तर नाही ना, या विचाराने ते तिच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पाहू लागते, तेव्हा त्याला कळते की, ही आपली आई नाही. त्यामुळे ते मूल हिरमुसले होते आणि केविलवाणे दिसू लागते. (१८)

मातावियोगें कष्टलें। तेणें मानसीं दु:ख जालें।
देहहि क्षीणत्व पावलें। आतिशयेंसीं ॥ १९॥

आईच्या वियोगाने ते फार कष्टी होते. त्याला मनात अत्यंत दु:ख वाटते. त्यामुळे त्याचे शरीरही अत्यंत रोडावते. (१९)

अथवा माताही वांचली। मायलेंकुरा भेटी जाली।
बाळदशा ते राहिली। दिवसेंदिवस ॥ २०॥

मातेलाही मरण न येता ती वाचली, तर मायलेकरांची भेट होते. मग दिवसेंदिवस त्या मुलाचे बालपणही संपत येते. (२०)

बाळपण जालें उणें। दिवसेंदिवस होये शाहाणें।
मग ते मायेचें अत्यंत पेखणें। होतें तें राहिलें ॥ २१॥

बालपण संपून ते मूल दिवसेंदिवस शहाणे होऊ लागते. मग त्याला जो आईचा अत्यंत लळा लागलेला असतो, तो तितका राहात नाही. (२१)

पुढें लो लागला खेळाचा। कळप मेळविला पोरांचा।
आल्यागेल्या डावाचा। आनंद शोक वाहे ॥ २२ ॥

पुढे त्याला खेळाचा नाद लागतो आणि तो मुलांचा मेळा जमवून खेळण्यात दंग होतो. डाव जिंकला तर त्याला आनंद होतो आणि डाव हरला तर दु:ख वाटते. (२२)

मायबापें सिकविती पोटें। तयाचें परम दु:ख वाटे।
चट लागली न सुटे। संगती लेंकुरांची ॥ २३ ॥

आईवडील अत्यंत ममतेने मन:पूर्वक त्याला शिकविण्याचा प्रयत्न करतात, पण त्याला त्यामुळे फार दु:ख होते. मुलांच्या संगतीची चटक लागलेली असते, ती सुटता सुटत नाही. (२३)

लेंकुरांमध्यें खेळतां। नाठवे माता आणि पिता।
तंव तेथेंहि अवचिता। दु:ख पावला ॥ २४ ॥

मुलांमध्ये खेळत असताना त्याला आईवडिलांची आठवणही होत नाही, परंतु त्या खेळण्यात अकस्मात दु:ख ओढवते. (२४)

पडिले दांत फुटला डोळा। मोडले पाय जाला खुळा।
गेला माज अवकळा। ठाकून आली ॥ २५ ॥

खेळताना दात पडतात, डोळा फुटतो किंवा पाय मोडून तो लंगडा होतो, अगदी वेड्यासारखी त्याची अवस्था होते. त्याची सर्व मस्ती उतरते, जिरते व व्यंग आल्याने अवकळा येते. (२५)

निघाल्या देवी आणी गोवर।
उठलें कपाळ लागला ज्वर।
पोटसुळीं निरंतर। वायगोळा ॥ २६ ॥

त्यात त्याला देवी येतात किंवा गोवर येतो, कपाळ दुखू लागते किंवा अंगात ताप भरतो, नाही तर निरंतर वायगोळा उठून पोटशूळ लागतो. (२६)

लागलीं भूतें जाली झडपणी। जळीच्या मेसको मायेराणी।
मुंज्या झोटिंग करणी। म्हैसोबाची ॥ २७ ॥

त्याची अवस्था पाहून लोक नाना तर्ककुतर्क करू लागतात. कुणी म्हणते की, याला भुतांनी (झपाटले) आहे, तर कुणी म्हणतात की, याला मेसको, मायेराणी या जलदेवतांनी पकडले आहे. कुणी म्हणतात की मुंज्या, झोटिंग किंवा म्हसोबाची करणी बाधली आहे. (२७)

वेताळ खंकाळ लागला। ब्रह्मगिऱ्हो संचरला।
नेणों चेडा वोलांडिला। कांहीं कळेना ॥ २८ ॥

कुणी म्हणतो की, याला दुष्ट वेताळ लागला आहे, तर कुणी म्हणते की, ब्रह्मराक्षसांनी याला धरले आहे, तर कुणी म्हणते की, कुणीतरी चेटूक केले असावे किंवा याने उतारा ओलांडला असावा. खरे काय झाले आहे, ते कळतच नाही. (२८)

येक म्हणती बीरेदेव। येक म्हणती खंडेराव।
येक म्हणती सकळ वाव। हा ब्राह्मणसमंध ॥ २९ ॥

कोणी म्हणतो बिरदेव लागला, तर कुणी म्हणतो खंडेराव लागला, तर दुसरा कोणी म्हणतो की हे सगळेच खोटे आहे. याला ब्रह्मसमंधच लागला आहे. (२९)

येक म्हणती कोणें केलें। आंगीं देवत घातलें।
येक म्हणती चुकलें। सटवाईचें ॥ ३० ॥

एक म्हणतो की, कुणी करणी केली आहे, तर कुणी म्हणतो की, मंत्र म्हणून एखादी देवता याच्या अंगात सोडली आहे, तर कोणी म्हणतो की सटवाईचे काही देणे चुकले असावे. (३०)

येक म्हणती कर्मभोग। आंगीं जडले नाना रोग।
वैद्य पंचाक्षरी चांग। बोलाऊन आणिले ॥ ३१ ॥

कुणी म्हणतात की, पूर्वजन्मीच्या कर्मांचे फळ म्हणून याच्या अंगी नाना रोग जडले आहेत. असे म्हणून कुणी चांगले वैद्य किंवा चांगले मांत्रिक यांना बोलावून आणते. (३१)

येक म्हणती हा वांचेना। येक म्हणती हा मरेना।
भोग भोगितो यातना। पापास्तव ॥ ३२ ॥

कोणी म्हणतात की, आता काही हा वाचत नाही. तर दुसरे कुणी म्हणतात की हा मरत नाही. पूर्वजन्मीच्या पापांचे फळ म्हणून याला या यातना भोगाव्या लागत आहेत. (३२)

**गर्भदु:ख विसरला। तो त्रिविधतापें पोळला।**
**प्राणी बहुत कष्टी जाला। संसारदु:खें ॥ ३३ ॥**

माणूस गर्भवासाचे दु:ख जरी विसरला तरी तो त्रिविध तापाने पोळून निघतो. या नाना प्रकारच्या संसारदु:खाने तो अत्यंत कष्टी होतो. (३३)

**इतुकेंहि चुकोन वांचला। तरी मारमारूं शहाणा केला।**
**लोकिकीं नेटका जाला। नांव राखे ऐसा ॥ ३४ ॥**

या इतक्या सगळ्या कटकटीतून माणूस जर वाचला तर त्याला विद्या यावी, म्हणून आईवडील मारमारून शहाणा करतात. लोकांत नाव राखील असा तो चांगला होतो. (३४)

**पुढें मायेबापीं लोभास्तव। संभ्रमें मांडिला विव्हाव।**
**दाऊनियां सकळ वैभव। नोवरी पाहिली ॥ ३५ ॥**

नंतर आईवडिलांनी संसाराच्या लोभाने त्याच्या विवाहाचा विचार केला आणि आपल्या सर्व वैभवाचे प्रदर्शन करून त्याच्यासाठी नवरी पाहिली. (३५)

**वऱ्हाडीवैभव दाटलें। देखोन परमसुख वाटलें।**
**मन हें रंगोन गेलें। सासुरवाडीकडे ॥ ३६ ॥**

आपापले वैभव घेऊन सर्व वऱ्हाड्यांनी दाटी केली. ते पाहून त्या नवरदेवास फार सुख वाटले व त्याचे मन सासुरवाडीकडे अगदी रंगून गेले. (३६)

**मायबापीं भलतैसें असावें। परी सासुरवाडीस नेटकें जावें।**
**द्रव्य नसेल तरी घ्यावें। रुण कळांतरें ॥ ३७ ॥**

आपले आईवडील कशाही हीनदीन अवस्थेत असले, तरी सासुरवाडीस आपण नीटनेटके गेले पाहिजे. त्यासाठी द्रव्य नसले तरी ऋण काढून व्याजाने द्रव्य घेऊन तो थाटात सासुरवाडीस जातो. (३७)

**आंतर्भाव ते सासुरवाडीं। मायेबापें राहिलीं बापुडीं।**
**होताती सर्वस्वें कुडकुडीं। तितुकेंच कार्य त्यांचें॥ ३८ ॥**

त्याचे अंत:करण आतून सर्व सासुरवाडीकडे गुंतलेले असते. आईबाप बिचारे दीन होऊन घरात राहातात. ते सर्वस्वी असहाय्य झालेले असतात. जणू तेवढ्यासाठीच जिवंत होते आणि त्यांचे कार्य आता झाले आहे. (३८)

**नोवरी आलियां घरा। अती हव्यास वाटे वरा।**
**म्हणे मजसारिखा दुसरा। कोणीच नाहीं ॥ ३९ ॥**

नवरी घरी आली की, त्या नवरदेवाला तिच्याविषयी अत्यंत आसक्ती वाटू लागते व आपल्यासारखा सुखी दुसरा कोणीच नाही, असे त्याला वाटू लागते. (३९)

**मायबाप बंधु बहिणी। नोवरी न दिसतां वाटे काणी।**
**अत्यंत लोधला पापिणीं। अविद्येनें भुलविला॥ ४० ॥**

घरात आई-वडील, भाऊ-बहिणी सर्व असली तरी नवरी दिसली नाही तर बाकीची सर्व त्याला तुच्छ वाटू लागतात. आपल्या बायकोमध्ये तो अधिकच गुंतून जातो. पापी अविद्येने त्याला पार भुलवून टाकलेले असते.(४०)

**संभोग नस्तां इतुका प्रेमा। योग्य जालिया उलंघी सीमा।**
**प्रीती वाढविती कामा। करितां प्राणी गुंतला॥ ४१ ॥**

स्त्री वयात आली नसताही त्यास तिच्याविषयी इतके प्रेम वाटते. मग ती वयात येऊन तिच्यापासून स्त्रीसौख्य मिळू लागले म्हणजे तर त्याच्या वागण्याला मर्यादाच राहात नाही. त्यांचे एकमेकांवरील प्रेम वाढू लागते आणि कामवासनेमुळे माणूस पुरता प्रपंचात गुरफटून जातो. (४१)

**जरी न देखे क्षण येक डोळां। तरी जीव होय उताविळा।**
**प्रीतीपात्र अंतर्कळा। घेऊन गेली ॥ ४२ ॥**

बायको क्षणभर जरी दृष्टीआड झाली, तरी तो तिला पाहावयास अत्यंत उतावळा होतो. त्याची प्रीतिपात्र बनलेली ती पत्नी त्याचे अंत:करणच जणू घेऊन जाते. (४२)

**कोवळे कोवळे शब्द मंजुळ। मर्यादा लज्या मुखकमळ।**
**वक्त्रलोकनें केवळ। ग्रामज्याचे मैंदावें ॥ ४३ ॥**

तिचे ते कोमल, मंजुळ शब्द, ती मर्यादा, तो लाजरेपणा, तो कमलासारखा सुंदर चेहरा पाहिला तरी संभोगाच्या विचाराने मन भरून जाते. (४३)

**कळवळा येतां सांवरेना। शरीर विकळ आवरेना।**
**अनेत्र वेवसाई क्रमेना। हुरहुर वाटे ॥ ४४॥**

तिच्याबद्दलची आसक्ती अनावर होते. विषयसेवनासाठी शरीर व्याकूळ बनते, ते आवरत नाही. अन्यत्र दुसऱ्या व्यवसायात मन रमत नाही, सारखी तिची हुरहुर वाटत राहते. (४४)

**वेवसाय करितां बाहेरी। मन लागलेंसे घरीं।**
**क्षणाक्षणां अभ्यांतरीं। स्मरण होये कामिनीचें॥ ४५॥**

बाहेर काही व्यवसाय करीत असला तरी त्याचे मन सर्वस्वी घरी लागलेले असते. क्षणोक्षणी मनामध्ये आपल्या कामिनीचे स्मरण त्याला होत असते. (४५)

**तुम्हीं माझिया जिवांतील जीव। म्हणौनि अत्यंत लाघव।**
**दाऊनियां चित्त सर्व। हिरोन घेतलें ॥ ४६॥**

'तुम्ही माझ्या जीवापेक्षाही मला प्रिय आहात' असे त्याची स्त्री अत्यंत लाघवीपणाने म्हणते आणि अशा गोड वागण्याने त्याचे सर्व चित्त हिरावून घेते. (४६)

**मैंद सोइरीक काढिती। फांसे घालून प्राण घेती।**
**तैसें आयुष्य गेलियां अंतीं। प्राणीयांस होये ॥ ४७॥**

ठग किंवा पेंढारी लोक आधी ओळख काढतात आणि नंतर रुमालाचा गळफास लावून प्राण घेतात, तशी आयुष्य संपत आल्यावर माणसाची स्थिती होते. (४७)

**प्रीति कामिनीसीं लागली। जरी तयेसी कोणी रागेजली।**
**तरी परम क्षिती वाटली। मानसीं गुप्तरूपें ॥४८॥**

आपल्या स्त्रीवर त्यांचे फार प्रेम जडते. तिला जरा कुणी रागाने बोलले की, मनातल्या मनात त्याला अत्यंत दु:ख होते. (४८)

**तये भार्येचेनि कैवारें। मायेबापासीं नीच उत्तरें।**
**बोलोनियां तिरस्कारें। वेगळा निघे ॥ ४९॥**

आपल्या बायकोचा कैवार घेऊन तो आईवडिलांना शिवीगाळ करतो, वाईट शब्दांत प्रत्युत्तर देतो, तिरस्काराने त्यांचा अपमान करून तो वेगळा निघतो. (४९)

**स्त्रीकारणें लाज सांडिली। स्त्रीकारणें सखीं सोडिलीं।**
**स्त्रीकारणें विघडिलीं। सकळहि जिवलगें॥ ५०॥**

स्त्रीसाठी तो लाजलज्जा सोडतो. तिच्याकरता मित्रांना सोडतो. एवढेच नव्हे तर तिच्याखातर सर्व जिवलगांशी असलेले चांगले संबंध तो बिघडवून टाकतो. (५०)

**स्त्रीकारणें देह विकिला। स्त्रीकारणें सेवक जाला।**
**स्त्रीकारणें सांडवला। विवेकासी ॥ ५१॥**

स्त्रीकरिता जणू तो आपला देहही विकतो. तिचा सेवक होऊन राहतो. स्त्रीकरिता तो विवेकालाही मुकतो. (५१)

**स्त्रीकारणें लोलंगता। स्त्रीकारणें अतिनम्रता।**
**स्त्रीकारणें पराधेनता। अंगिकारिली ॥ ५२॥**

स्त्रीसाठी तो लंपट बनतो. तिच्यासाठीच अति नम्रता धारण करतो आणि पराधीन होऊन राहतो. (५२)

**स्त्रीकारणें लोभी जाला। स्त्रीकारणें धर्म सांडिला।**
**स्त्रीकारणें अंतरला। तीर्थयात्रा स्वधर्म ॥ ५३॥**

स्त्रीच्या योगे तो लोभी होतो, धर्माचा त्याग करतो. तीर्थयात्रा, स्वधर्म इत्यादी गोष्टी तो करू शकत नाही. (५३)

**स्त्रीकारणें सर्वथा कांहीं। शुभाशुभ विचारिलें नाहीं।**
**तनु मनु धनु सर्वही। अनन्यभावें अर्पिलें॥ ५४॥**

स्त्रीच्या आसक्तीमुळे तो शुभ-अशुभ याचा विचारही करीत नाही. आपले तन, मन, धन किंबहुना सर्वस्वच अनन्यभावाने तिला अर्पण करतो. (५४)

**स्त्रीकारणें परमार्थ बुडविला। प्राणी स्वहितास नाडला।**
**ईश्वरीं कानकोंडा जाला। स्त्रीकारणें कामबुद्धी॥ ५५॥**

स्त्रीसाठी त्याने परमार्थ बुडवला, स्वहितास मुकला, ईश्वराविषयी उदासीन झाला आणि कामासक्ती मात्र वाढली. (५५)

**स्त्रीकारणें सोडिली भक्ती। स्त्रीकारणें सोडिली विरक्ती।**
**स्त्रीकारणें सायोज्यमुक्ती। तेहि तुछ्य मानिली॥ ५६॥**

स्त्रीला वश होऊन त्याने भक्तीचा त्याग केला, विरक्ती सोडून दिली. एवढेच नव्हे तर जी स्वीकारण्यास योग्य ती सायुज्य मुक्तीही त्याने तुच्छ मानली. (५६)

**येके स्त्रियेचेनि गुणें। ब्रह्मांड मानिलें ठेंगणें।**
**जिवलगें तीं पिसुणें। ऐसें वाटलीं ॥ ५७॥**

एका स्त्रीच्या नादाने त्याने सर्व ब्रह्मांड तुच्छ मानले. प्रेमाची माणसे त्यास शत्रूसारखी वाटू लागली. (५७)

**ऐसी अंतरप्रीति जडली। सर्वस्वाची सांडी केली।**
**तंव ते मरोन गेली। अकस्मात भार्या ॥ ५८॥**

अशा प्रकारे आपल्या पत्नीवर त्याचे अत्यंत अंत:करणपूर्वक प्रेम जडल्याने त्याने तिच्यापायी सर्वस्वाचा त्याग केला. तो अकस्मात ती बायको मरूनच गेली. (५८)

तेणें मनीं शोक वाढला। म्हणे थोर घात जाला।
आतां कैंचा बुडाला। संसार माझा ॥ ५९॥

तिच्या मृत्यूने त्याच्या मनास अत्यंत शोक झाला. तो म्हणू लागला की, 'माझा फार मोठा घात झाला. आता कसला संसार! माझा संसार पार बुडाला'. (५९)

जिवलगांचा सोडिला संग। अवचिता जाला घरभंग।
आतां करूं मायात्याग। म्हणे दुःखें ॥ ६०॥

जिवलग माणसांशी संबंध सोडून टाकला आणि आता अवचित माझे घरच मोडले! मग तो दुःखाने म्हणू लागला की, मी आता या मायेचा त्याग करतो. (६०)

स्त्री घेऊन आडवी। ऊर बडवी पोट बडवी।
लाज सांडून गौरवी। लोकांदेखतां ॥ ६१॥

स्त्रीचे प्रेत मांडीवर घेऊन तो ऊर व पोट बडवून घेऊ लागला आणि लाज सोडून लोकांच्यासमोर तिची थोरवी वर्णन करू लागला. (६१)

म्हणे माझें बुडालें घर। आतां न करी हा संसार।
दुःखें आक्रंदला थोर। घोर घोषें ॥ ६२॥

तो मोठमोठ्याने दुःखाने आक्रंदू लागला आणि म्हणू लागला की, 'माझे घर बुडाले। आता मी यापुढे संसार करणार नाही!' (६२)

तेणें जीव वारयावेघला। सर्वस्वाचा उबग आला।
तेणें दुःखें जाला। जोगी कां महात्मा॥ ६३॥

भ्रमिष्ट झालेल्या माणसासारखी त्याची स्थिती झाली. त्याला सर्वस्वाचा उबग आला. त्या दुःखामुळे तो अंगाला राख फासून साधू-बैरागी बनला. (६३)

कां तें निघोन जाणें चुकलें। पुन्हां मागुतें लग्न केलें।
तेणें अत्यंतचि मग्न जालें। मन द्वितीय संमंधीं॥ ६४॥

पण काही कारणाने घरातून निघून जाणे जमले नाही आणि शेवटी त्याने पुन्हा लग्न केले. त्यानंतर त्या दुसऱ्या बायकोमध्ये त्याचे मन अत्यंत आसक्त झाले. (६४)

जाला द्वितीय संमंध। सर्वेंचि मांडिला आनंद।
श्रोतीं व्हावें सावध। पुढिले समासीं ॥ ६५॥

दुसरे लग्न झाल्यावर लगेच त्याच्या आनंदाला भरती आली. श्रीसमर्थ म्हणतात की, आता पुढला समास ऐकण्यासाठी श्रोत्यांनी सावध व्हावे. (६५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'स्वगुणपरीक्षा (अ) नाम' समास दुसरा समाप्त.

❑❑

## दशक ३ : समास ३

## स्वगुणपरीक्षा (ब)

॥ श्रीराम ॥

द्वितीय संमंध जाला। दुःख मागील विसरला।
सुख मानून राहिला। संसाराचें ॥ १॥

दुसरा विवाह होताच मागील दुःख तो विसरून गेला आणि संसारात सुख आहे असे मानून दिवस घालवू लागला. (१)

जाला अत्यंत कृपण। पोटें न खाय अन्न।
रुक्याकारणें सांडी प्राण। येकसरा ॥ २॥

आता तो अत्यंत कंजूष झाला. पोटभर अन्न देखील खाईना. पै-पैशासाठी एकाएकी प्राण टाकू लागला. (२)

कदा कल्पांतीं न वेची। सांचिलेंचि पुन्हा सांची।
अंतरीं असेल कैंची। सद्वासना ॥ ३॥

प्रलय ओढवला तरी पैसे खर्च करीनासा झाला. साठविलेल्या पैशात सारखी भर घालू लागला. अशी वृत्ती झाल्यामुळे त्याच्या अंतरात सद्वासना राहील तरी कशी? (३)

स्वयें धर्म न करी। धर्मकर्त्यासहि वारी।
सर्वकाळ निंदा करी। साधुजनाची ॥ ४॥

स्वतः धर्म करीना व इतर कुणी धर्म करू लागले, तर त्याचे निवारण करू लागला. साधु-सज्जनांची सर्वकाळ निंदा करू लागला. (४)

**नेणे तीर्थ नेणे व्रत। नेणे अतित अभ्यागत।**
**मुंगीमुखींचें जें सीत। तेंहि वेंचून सांची॥ ५॥**

तीर्थयात्रा नाही, व्रत नाही की अतिथी अभ्यागत नाही, अशी त्याची वृत्ती झाली. मुंगीच्या तोंडातील अन्नाचा कणही तो वेचून साठवू लागला. (५)

**स्वयें पुण्य करवेना। केलें तरी देखवेना।**
**उपहास्य करी मना। नये म्हणौनी ॥ ६॥**

स्वत:च्या हातून पुण्य करवत नाही. दुसऱ्या कुणी केले तर ते पाहवत नाही. आपल्याला आवडत नाही म्हणून जो कुणी करीत असेल त्याचा उपहास करू लागला.(६)

**देवां भक्तांस उछेदी। आंगबळें सकळांस खेदी।**
**निष्ठुर शब्दें अंतर भेदी। प्राणीमात्रांचें ॥ ७॥**

देवाला, भक्तांना त्रास देऊ लागला. आपल्या शक्तीच्या बळावर सगळ्यांना दु:ख देऊ लागला. प्राणिमात्रास निष्ठुर शब्द बोलून त्याचे अंत:करण दुखवू लागला. (७)

**नीति सांडून मागें। अनीतीनें वर्तों लागे।**
**गर्व धरून फुगे। सर्वकाळ ॥ ८॥**

नीतीचा त्याग करून तो अनीतीने वागू लागला आणि सदासर्वदा अभिमान धरून ताठ्याने वागू लागला. (८)

**पूर्वजांस सिंतरिलें। पक्षश्राद्धहि नाहीं केलें।**
**कुळदैवत ठकिलें। कोणेपरी ॥ ९॥**

तो पक्ष-श्राद्धही करीना. याप्रकारे त्याने आपल्या पूर्वजांनाही फसविले. काही तरी सबब शोधून तो कुळधर्म, कुळाचारही करीना. याप्रकारे त्याने कुळदेवतेलाही ठकविले. (९)

**आक्षत भरिली भाणा। दुजा ब्राह्मण मेहुणा।**
**आला होता पाहुणा। स्त्रियेस मूळ ॥ १०॥**

तो बहिणीलाच सवाष्ण म्हणून आमंत्रण देई आणि बायकोला बोलवायला आलेल्या मेहुण्यासच ब्राह्मण सांगून पाहुण्यांच्यावरच भागवू लागला आणि त्यामुळे इतर दोघांचा भोजनखर्च वाचवू लागला. (१०)

**कदा नावडे हरिकथा। देव नलगे सर्वथा।**
**स्नानसंध्या म्हणे वृथा। कासया करावी ॥ ११॥**

त्याला हरिकथा कधीच आवडत नसे. देवाची काय आवश्यकता आहे, असे त्याला वाटे. उगीचच स्नानसंध्या तरी का म्हणून करावी ? असे तो म्हणू लागला. (११)

**अभिळाषें सांची वित्त। स्वयें करी विस्वासघात।**
**मदें मातला उन्मत्त। तारुण्यपणें ॥ १२॥**

अभिलाषा धरून तो द्रव्यसंचय करू लागला. स्वत: दुसऱ्याचा विश्वासघात करू लागला आणि तारुण्याच्या मदाने माजून अत्यंत उन्मत्तपणे वागू लागला. (१२)

**तारुण्य आंगीं भरलें। धारिष्ट नवचे धरिलें।**
**करूं नये तेंचि केलें। माहापाप ॥ १३॥**

तारुण्याच्या जोरामुळे कामवासना उत्पन्न झाली. मनोधैर्य टिकणे अशक्य झाले आणि जे करू नये ते महापाप त्याने केले. (१३)

**स्त्री केली परी धाकुटी। धीर न धरवेचि पोटीं।**
**विषयलोभें सेवटीं। वोळखी सांडिली ॥ १४॥**

स्त्री केली होती पण वयात आलेली नव्हती आणि याला तर धीर धरवेना. शेवटी विषयसुखाच्या लोभाने कुणाला ओळखेनासा झाला. (१४)

**माये बहिण न विचारी। जाला पापी परद्वारी।**
**दंड पावला राजद्वारीं। तऱ्हीं पालटेना ॥ १५॥**

आई-बहिणीप्रमाणे परस्त्रीशी वागावे, हा विचार राहिला नाही आणि परस्त्रीशी संबंध ठेवल्याने पातकी ठरला. त्यामुळे न्यायालयात त्याला शिक्षा झाली, तरी त्याचे वागणे पालटले नाही. (१५)

**परस्त्री देखोनि दृष्टीं। अभिळाष उठे पोटीं।**
**अकर्तव्यें हिंपुटी। पुन्हा होये ॥ १६॥**

परस्त्री दृष्टीस पडताच त्याच्या मनात तिच्याविषयी अभिलाषा उत्पन्न होऊ लागली. पण तिची प्राप्ती होत नाही, असे पाहून तो पुन्हा कष्टी होऊ लागला. (१६)

**ऐसें पाप उदंड केलें। शुभाशुभ नाहीं उरलें।**
**तेणें दोषें दु:ख भरलें। अकस्मात आंगीं ॥ १७॥**

अशा रीतीने त्याने उदंड पाप केले. शुभाशुभाचा विचारही त्याच्या ठिकाणी राहिला नाही. त्या दोषामुळे अकस्मात त्याच्या अंगी दु:ख भरले. (१७)

व्याधी भरली सर्वांगीं। प्राणी जाला क्षयरोगी।
केले दोष आपुले भोगी। सीघ्र काळें ॥ १८॥

त्याच्या सर्व शरीरात रोग पसरला. त्याला क्षयरोग लागला. त्याने केलेल्या दोषांची फळे भोगण्याची पाळी लवकरच त्याच्यावर आली. (१८)

दुःखें सर्वांग फुटलें। नासिक अवघेंचि बैसलें।
लक्षण जाऊन जालें। कुलक्षण ॥ १९॥

रोगाने त्याच्या सर्वांगावर फोड उठले, नाक झडून गेले आणि सर्व सौंदर्य जाऊन कुरूपता आली. (१९)

देहास क्षीणता आली। नाना वेथा उद्भवली।
तारुण्यशक्ती राहिली। खंगला प्राणी ॥ २०॥

देह अगदी कृश झाला. नाना व्यथा उत्पन्न झाल्या आणि तारुण्यातील शक्ती सगळी नष्ट होऊन तो अगदी खंगून गेला. (२०)

सर्वांगीं लागल्या कळा। देहास आली अवकळा।
प्राणी कांपे चळचळां। शक्ति नाहीं ॥ २१॥

त्याच्या सर्वांगाला कळा लागल्या, देहाला अवकळा आली आणि अंगात शक्ती न राहिल्याने तो थरथर कापू लागला. (२१)

हस्तपादादिक झडले। सर्वांगीं किडे पडिले।
देखोन थुंकों लागले। लाहानथोर ॥ २२॥

हात-पाय वगैरे रोगाने झडले, सर्वांगात किडे पडले. त्याच्याकडे पाहून सर्व लहान-थोर (तिरस्काराने) थुंकू लागले. (२२)

जाली विष्टेची सारणी। भोवती उठली वर्ढाणी।
अत्यंत खंगला प्राणी। जीव न वचे ॥ २३॥

त्यात त्याला जुलाब होऊ लागले. त्यामुळे आसपास दुर्गंधी सुटली. तो अत्यंत खंगून गेला. पण जीव जाता जाईना. (२३)

आतां मरण देगा देवा। बहुत कष्ट जाले जीवा।
जाला नाहीं नेणों ठेवा। पातकाचा ॥ २४॥

मग तो म्हणू लागला की, देवा, आता मला मरण दे. माझ्या जीवाला अत्यंत यातना झाल्या आहेत. अजून माझ्या पापांचा घडा भरला नाही का? (२४)

दुःखें घळघळां रडे। जों जों पाहे आंगाकडे।
तों तों दैन्यवाणें बापुडें। तळमळी जीवीं ॥ २५॥

तो दुःखाने घळघळा रडू लागला. जो जो स्वतःच्या अंगाकडे पाहावे, तो तो ते अधिकच दैन्यवाणे दिसू लागले. त्यामुळे तो बिचारा मनात तळमळू लागला. (२५)

ऐसे कष्ट जाले बहुत। सकळ जालें वाताहात।
दरवडा घालून वित्त। चोरटीं नेलें ॥ २६॥

अशा प्रकारे त्याला खूप कष्ट झाले. सर्व वाताहात झाली. त्यात दरोडेखोरांनी दरोडा घालून सर्व द्रव्य चोरून नेले. (२६)

जालें आरत्र ना परत्र। प्रारब्ध ठाकलें विचित्र।
आपला आपण मळमूत्र। सेविला दुःखें ॥ २७॥

याप्रमाणे ना धड इहलोक ना परलोक अशी विचित्र अवस्था झाली. प्रारब्धाचा असा विचित्र भोग भोगावा लागला की, स्वतःचे मळमूत्रच दुःखाने त्याला सेवावे लागले. (२७)

पापसामग्री सरली। दिवसेंदिवस वेथा हरली।
वैद्यें औषधें दिधलीं। उपचार जाला ॥ २८॥

पुढे त्याच्या पापकर्माचा भोग सरला आणि दिवसेंदिवस त्याची व्यथा कमी होऊ लागली. वैद्याने औषधे दिली आणि त्याचा उपयोग झाला. (२८)

मरत मरत वांचला। यास पुन्हां जन्म जाला।
लोक म्हणती पडिला। माणसांमधें ॥ २९॥

लोक म्हणू लागले की, हा मरता मरता वाचला आहे. याचा जणू पुनर्जन्मच झाला आहे. आता हा जरा माणसात आला आहे. (२९)

येरें स्त्री आणिली। बरवी घरवात मांडिली।
अति स्वार्थबुद्धी धरिली। पुन्हां मागुती ॥ ३०॥

मग त्याने आपल्या स्त्रीला घरी आणली आणि परत घरात दिवा लागू लागला. पण परत त्याने पूर्वीप्रमाणेच अति स्वार्थबुद्धीच धरली. (३०)

कांहीं वैभव मेळविलें। पुन्हा सर्वहि संचिलें।
परंतु गृह बुडालें। संतान नाहीं ॥ ३१॥

काही वैभव मिळविले. परत सर्व साठवले. पण संतान नसल्याने घर बुडाल्यासारखेच त्याला वाटू लागले. (३१)

पुत्रसंतान नस्तां दु:खी। वांज नांव पडिलें लोकिकीं।
तें न फिटे म्हणौनी लेंकी। तरी हो आतां ॥ ३२ ॥

पुत्रसंतान झाले नाही, त्यामुळे तो दु:खी झाला. लोकांत 'वांझ' म्हणून नाव पडले. ते नाव जावे म्हणून 'आता मुलगी तरी होऊ दे' असे तो म्हणू लागला. (३२)

म्हणोन नाना सायास। बहुत देवास केले नवस।
तीर्थें व्रतें उपवास। धरणें पारणें मांडिलें॥ ३३ ॥

म्हणून त्याने नाना सायास केले. अनेक देवांना नवस केले. तीर्थयात्रा, व्रते, उपवास, धरणे, पारणे यांचा सपाटा लावला. (३३)

विषयसुख तें राहिलें। वांजपणें दु:खी केलें।
तंव तें कुळदैवत पावलें। जाली वृद्धी ॥ ३४ ॥

विषयसुख राहिले बाजूला, पण वांझपणाने दोघांना दु:खी केले. तेवढ्यात कुलदैवत प्रसन्न झाले आणि एकदाचे मूल झाले. (३४)

त्या लेंकुरावरी अति प्रीति। दोघेहि क्षण येक न विशंभती।
कांहीं जाल्या आक्रंदती। दीर्घस्वरें ॥ ३५ ॥

त्या मुलावर दोघांचे अत्यंत प्रेम जडले. दोघेही त्याला एक क्षणभरही विसंबत नसत. त्याला काही झाले तर ती जोरजोराने रडू लागत. (३५)

ऐसी ते दु:खिस्ते। पूजीत होती नाना दैवतें।
तंव तेंहि मेलें अवचितें। पूर्वपापेंकरूनी ॥ ३६ ॥

अशी ती दु:खित दोघे नाना दैवतांची पूजा करीत होती, तोच पूर्वपापाच्या प्रभावाने ते मूलही अकस्मात मरण पावले. (३६)

तेणें बहुत दु:ख जालें। घरीं आरंधें पडिलें।
म्हणती आम्हांस कां ठेविलें। देवें वांज करूनी॥ ३७ ॥

त्यामुळे त्यांना अत्यंत दु:ख झाले. परत घरी निपुत्रिकत्व आले. ती दोघे म्हणू लागली की, देवाने वांझ करून आम्हांला तरी कशाला ठेवले आहे? (३७)

आम्हांस द्रव्य काये करावें। तें जावें परी अपत्य व्हावें।
अपत्यालागीं त्यजावें। लागेल सर्व ॥ ३८ ॥

आम्हांला हे द्रव्य काय करायचे आहे? हे सर्व गेले तरी चालेल, पण मूल- बाळ होऊ दे. मुलासाठी सर्व सोडावे लागले तरी चालेल. (३८)

वांजपण संदिसें गेलें। तों मरतवांज नांव पडिलें।
तें न फिटे कांहीं केलें। तेणें दु:खें आक्रंदती॥ ३९ ॥

एक मूल झाल्याने वांझपण गेले होते; पण आता ते मूल गेल्याने 'मरत वांझ' (म्हणजे जिची मुले जगत नाहीत अशी स्त्री) नाव पडले आहे. ते नाव आता काही केल्या जात नाही, म्हणून त्या दु:खाने दोघे पुन्हा रडू लागली. (३९)

आमुची वेली कां खुंटिली। हा हा देवा वृत्ती बुडाली।
कुळस्वामीण कां क्षोभली। विझाला कुळदीप॥ ४० ॥

आमची वंशवेली का बरे खुंटली? हाय रे देवा, आमची वृत्ती का बरे बुडाली? कुलस्वामिनी आमच्यावर कोपली तर नाही ना? आमचा कुलदीप का बरे विझला? (४०)

आतां लेंकुराचें मुख देखेन। तरी आनंदें राडी चालेन।
आणी गळहि टोंचीन। कुळस्वामिणीपासीं॥ ४१ ॥

आता परत जर आम्हांला पुत्राचे मुख पाहावयास मिळाले, तर आनंदाने धगधगीत निखाऱ्याच्या खाईतून चालत जाईन किंवा कुलस्वामिनीपुढे गळही टोचून घेईन. (४१)

आई भुता करीन तुझा। नांव ठेवीन केरपुंजा।
वेसणी घालीन माझा। मनोरथ पुरवी ॥ ४२ ॥

आई, त्या मुलाला तुझा 'भुता' सेवेकरी करीन. त्याचे नाव 'केरपुंजा' ठेवीन. त्याच्या नाकात नथणी घालीन. पण माझा एवढा मनोरथ पुरा कर. (४२)

बहुत देवांस नवस केले। बहुत गोसावी धुंडिले।
गटगटां गिळिले। सगळे विंचु ॥ ४३ ॥

याप्रमाणे अनेक देवांना त्यांनी नवस केले. पुष्कळ गोसावी धुंडले. सबंध विंचू गटागटा गिळले. (४३)

केले समंधाचे सायास। राहाणें घातलें बहुवस।
केळें नारिकेळें ब्राह्मणास। अंब्रदानें दिधलीं ॥ ४४ ॥

समंधांना प्रसन्न करण्यासाठी प्रयत्न केले. अंगात दैवत घालण्याचे नाना तऱ्हेने प्रयत्न केले. ब्राह्मणांना केळी, नारळ, आंबे इत्यादींची दाने दिली. (४४)

केलीं नाना कवटालें । पुत्रलोभें केलीं ढालें ।
तरी अदृष्ट फिरलें । पुत्र नाहीं ॥ ४५ ॥

नाना प्रकारचे तंत्रप्रयोग केले. पुत्रलोभाने क्षुद्र मंत्रप्रयोगही केले. तरीही नशीब फिरले आणि आणि पुत्र काही होईना. (४५)

वृक्षाखालें जाऊन नाहाती । फळतीं झाडें करपती ।
ऐसे नाना दोष करिती । पुत्रलोभाकारणें ॥ ४६ ॥

पुत्र व्हावा म्हणून अस्पर्श असता वृक्षाखाली जाऊन न्हाणे, फळती झाडे जाळणे इत्यादी नाना पातके त्यांनी केली. (४६)

सोडून सकळ वैभव । त्यांचा वारयावेघला जीव ।
तंव तो पावला खंडेराव । आणी कुळस्वामिणी ॥ ४७ ॥

दोघांनी आपले सर्व वैभव सोडून दिले आणि त्यांची अवस्था भ्रमिष्टासारखी झाली. इतक्यात त्यांना खंडेराव आणि कुलस्वामिनी प्रसन्न झाली. (४७)

आतां मनोरथ पुरती । स्त्रीपुरुषें आनंदती ।
सावध होऊन श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ४८ ॥

आता आपले मनोरथ पूर्ण होतील, या विचाराने नवरा-बायको आनंदून गेली. श्री समर्थ म्हणतात की, आता श्रोत्यांनी सावध होऊन पुढे जे सांगेन ते लक्षपूर्वक ऐकावे. (४८)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'स्वगुणपरीक्षा ( ब ) नाम' समास तीसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक ३ : समास ४

# स्वगुणपरीक्षा ( क )

॥ श्रीराम ॥

लेंकुरें उदंड जालीं । तों ते लक्ष्मी निघोन गेली ।
बापडीं भिकेसी लागलीं । कांहीं खाया मिळेना ॥ १ ॥

पुष्कळ मुले झाली, पण घरात साठवून ठेवलेला पैसा संपून गेला. त्यामुळे त्यांना पोटभर खायला मिळेना. त्या बिचाऱ्यांवर भीक मागण्याची पाळी आली. (१)

लेंकुरें खेळती धाकुटीं । येकें रांगती येकें पोटीं ।
ऐसी घरभरी जाली दाटी । कन्या आणी पुत्रांची ॥ २ ॥

धाकटी काही मुले खेळत आहेत, कुणी रांगत आहेत तर कुणी गर्भात आहे. अशी घरभर पुत्र आणि कन्या यांची गर्दीच झाली. (२)

दिवसेंदिवस खर्च वाढला । यावा होता तो खुंटोन गेला ।
कन्या उपवरी जाल्या त्यांला । उजवावया द्रव्य नाहीं ॥ ३ ॥

दिवसेंदिवस खर्च वाढू लागला आणि आवक होती ती थांबून गेली. कन्या उपवर झाल्या पण त्यांचे विवाह करून द्यायला जवळ द्रव्य नाही, अशी स्थिती झाली. (३)

मायेबापें होतीं संपन्न । त्यांचें उदंड होतें धन ।
तेणेंकरितां प्रतिष्ठा मान । जनीं जाला होता ॥ ४ ॥

आईवडील श्रीमंत होते, त्यांच्याजवळ भरपूर धन होते. म्हणून लोकांत त्यांना चांगली प्रतिष्ठा, मान प्राप्त झाला होता. (४)

भरम आहे लोकाचारीं । पहिली नांदणूक नाहीं घरीं ।
दिवसेंदिवस अभ्यांतरीं । दरिद्र आलें ॥ ५ ॥

लोकांत अजून त्यांच्या श्रीमंतीबद्दल भ्रम होता, पण पहिली सुबत्ता घरात राहिली नव्हती. दिवसेंदिवस घरात दारिद्र्यच येत होते. (५)

ऐसी घरवात वाढली । खातीं तोंडें मिळालीं ।
तेणें प्राणीयांस लागली । काळजी उद्वेगाची ॥ ६ ॥

अशा रीतीने घरसंसार वाढला. खाणारी माणसे वाढली. त्यामुळे त्याला उद्वेग व काळजी वाटू लागली. (६)

कन्या उपवरी जाल्या । पुत्रांस नोवऱ्या आल्या ।
आतां उजवणी केल्या । पाहिजेत कीं ॥ ७ ॥

कन्या उपवर झाल्या, पुत्रांना मुली सांगून येऊ लागल्या. आता मुलामुलींची लग्ने करायलाच हवीत, अशी परिस्थिती येऊन ठेपली. (७)

जरी मुलें तैसींच राहिलीं। तरी पुन्हां लोकलाज जाली।
म्हणती कासया व्यालीं। जन्मदारिद्र्यें ॥ ८ ॥

मुले मुली लग्नाशिवाय तशीच राहिली तरी लोक नावे ठेवणारच. ते म्हणतील की, 'हे जन्मदरिद्री होते, तर त्यांनी इतक्या मुलांना जन्म तरी कशाला दिला?' (८)

ऐसी लोकलाज होईल। वडिलांचें नांव जाईल।
आतां रुण कोण देईल। लग्नापुरतें ॥ ९ ॥

अशा रीतीने लोकात कमीपणा येईल, वडिलांचे नाव जाईल. पण लग्ने करावीत तर लग्नापुरते कर्ज तरी कोणी देईल का, अशी काळजी उत्पन्न झाली. (९)

मागें रुण ज्याचें घेतलें। त्याचें परतोन नाहीं दिल्हें।
ऐसे आभाळ कोंसळलें। उद्वेगाचें ॥ १० ॥

मागे ज्यांच्याकडून कर्ज घेतले होते, ते अद्याप परत केलेले नाही. असे निराशेचे आभाळच त्यांच्यावर कोसळले. (१०)

आपण खातों अन्नासी। अन्न खातें आपणासीं।
सर्वकाळ मानसीं। आतां चिंतातुर ॥ ११ ॥

आपण अन्न खातो खरे, पण खरे तर अन्नच आपल्याला खात असते. याप्रकारे खाल्लेले अन्नही अंगी लागेना. असा तो मनात अत्यंत चिंतातुर झाला. (११)

पती अवधीच मोडली। वस्तभाव गाहाण पडिली।
अहा देवा वेळ आली। आतां डिवाळ्याची ॥ १२ ॥

लोकांत जराही पत राहिली नाही. घरातील चीजवस्तू गहाण पडल्या. तो म्हणू लागला की, 'अरे देवा, आता दिवाळखोरीची वेळ आली आहे.' (१२)

कांहीं केला ताडामोडा। विकिला घरींचा पाडारेडा।
कांहीं पैका रोकडा। कळांतरें कर्तला ॥ १३ ॥

काही मोडतोड केली. घरची जनावरे विकली आणि व्याजाने काही रोकड पैसा उभा केला. (१३)

ऐसें रुण घेतलें। लोकिकीं दंभ केलें।
सकळ म्हणती नांव राखिलें। वडिलांचें ॥ १४ ॥

याप्रकारे ऋण काढून लोकात खोटा मोठेपणा मिरवला. सगळे लोक म्हणू लागले की, 'वडिलांचे नाव राखले बरं का!' (१४)

ऐसें रुण उदंड जालें। रिणाइतीं वेढून घेतलें।
मग प्रयाण आरंभिलें। विदेशाप्रती ॥ १५ ॥

अशा रीतीने खूप कर्ज झाले, तेव्हा सावकारांनी वेढून टाकले. तेव्हा त्याने विदेशी जाण्याचा विचार केला. (१५)

दोनी वरुषें बुडी मारिली। नीच सेवा अंगीकारिली।
शरीरें आपदा भोगिली। आतिशयेंसीं ॥ १६ ॥

दोन वर्षे तो बेपत्ता झाला. तेथे नीच सेवा अंगीकारली आणि शरीराने अत्यंत कष्ट सोसले. (१६)

कांहीं मेळविलें विदेशीं। जीव लागला मनुष्यांपासीं।
मग पुसोनिया स्वामीसी। मुरडता जाला ॥ १७ ॥

विदेशात काही द्रव्य मिळविले, पण जीव घरच्या माणसांत गुंतला होता. म्हणून मालकाची परवानगी घेऊन घराकडे परत फिरला. (१७)

तंव तें अत्यंत पीडावलीं। वाट पाहात बैसलीं।
म्हणती दिवसगती कां लागली। काये कारणें देवा ॥ १८ ॥

घरी आल्यावर बघतो तर घरातील माणसे अत्यंत कष्ट भोगत असलेली आणि त्याची आतुरतेने वाट पाहात असलेली दिसली. ती म्हणत होती की, 'देवा, त्यांना कोणत्या कारणाने घरी परतायला इतके दिवस लागले आहेत? (१८)

आतां आम्ही काये खावें। किती उपवासीं मरावें।
ऐसियाचे संगतीस देवें। कां पां घातलें आम्हांसी ॥ १९ ॥

आता आम्ही काय खावे, किती दिवस उपवास काढून मरावे! देवाने आम्हांला अशा माणसाच्या संगतीत का बरे घातले आहे?' (१९)

ऐसें आपुलें सुख पाहाती। परी त्याचें दुःख नेणती।
आणी शक्ति गेलियां अंतीं। कोणीच कामा न येती ॥ २० ॥

याप्रमाणे सर्वजण आपल्या सुखाचा विचार करीत होते, पण त्याचे दुःख कुणीच जाणून घेत नव्हते आणि अंगातील शक्ती नाहीशी झाल्यावर तर शेवटी कोणीच उपयोगी पडत नाही. (२०)

असो ऐसी वाट पाहतां। दृष्टीं देखिला अवचिता।
मुलें धांवती ताता। भागलास म्हणौनी ॥ २१ ॥

असो. याप्रमाणे त्याची वाट पाहात असता तो अचानक दृष्टीस पडला, तेव्हा 'बाबा, तुम्ही किती भागलात?' असे म्हणत मुले त्याच्याजवळ धावत आली. (२१)

**स्त्री देखोन आनंदली। म्हणे आमुची दैन्यें फिटलीं।**
**तंव येरें दिधली। गांठोडी हातीं ॥ २२॥**

बायकोने त्याला पाहिले, तेव्हा तिला आनंद झाला. ती म्हणाली की, 'आता आमचे दैन्य फिटले!' तेव्हा त्याने आपली पैशाची गाठोडी तिच्या हाती दिली. (२२)

**सकळांस आनंद जाला। म्हणती आमुचा वडील आला।**
**तेणें तरी आम्हांला। आंग्या टोप्या आणिल्या॥ २३॥**

सगळ्यांना आनंद झाला. आमचे वडील आले. त्यांनी आमच्यासाठी अंगरखे आणि टोप्या आणल्या आहेत, असे मुले म्हणू लागली. (२३)

**ऐसा आनंद च्यारी दिवस। सवेंच मांडिली कुसमुस।**
**म्हणती हें गेलियां आम्हांस। पुन्हा आपदा लागती॥ २४॥**

पण हा आनंद चारच दिवस टिकला. मग लगेच सर्वांची कुरबुर सुरू झाली. सर्व म्हणू लागले की, आणलेला पैसा खर्च झाला की, आमचे हाल परत सुरू होतील. (२४)

**म्हणौनी आणिलें तें असावें। येणें मागुतें विदेशास जावें।**
**आम्ही हें खाऊं न तों यावें। द्रव्य मेळऊन ॥ २५॥**

म्हणून त्यांनी जे द्रव्य वगैरे आणले आहे, ते येथेच ठेवावे व त्यांनी परत विदेशास जावे. आणि आम्ही हे खाऊन संपण्याचे आत द्रव्य मिळवून परत यावे. (२५)

**ऐसी वासना सकळांची। अवघीं सोइरीं सुखाचीं।**
**स्त्री अत्यंत प्रीतीची। तेहि सुखाच लागली॥ २६॥**

सगळ्यांची इच्छा या प्रकारची होती. प्रपंचात सर्व नाती केवळ त्यांच्या त्यांच्या सुखापुरतीच असतात. बायको अत्यंत प्रेम करीत असली तरी ती तिच्या स्वत:च्या सुखासाठीच करीत असते. (२६)

**विदेसीं बहु दगदला। विश्रांती घ्यावया आला।**
**स्वासहि नाहीं टाकिला। तों जाणें वोढवलें॥ २७॥**

परदेशात त्याला खूप परिश्रम झाले होते, म्हणून खरे तर तो विश्रांती घेण्यासाठी घरी आला होता. पण घरी येऊन श्वास टाकतो न टाकतो तोपर्यंत परत जाण्याची पाळी आली. (२७)

**पुढें अपेक्षा जोसियांची। केली विवंचना मुहूर्ताची।**
**वृत्ति गुंतली तयाची। जातां प्रशस्त न वाटे॥ २८॥**

नंतर ज्योतिष्याला विचारून जाण्यासाठी मुहूर्त शोधला, पण त्याची वृत्ती घरात गुंतली असल्याने जाणे त्याला प्रशस्त वाटेना. (२८)

**माया मात्रा सिद्ध केली। कांहीं सामग्री बांधली।**
**लेंकुरें दृष्टीस पाहिलीं। मार्गस्त जाला ॥ २९॥**

जावयाचे म्हणून काही द्रव्य व फराळाचे साहित्य तयार केले. इतर काही सामग्रीही एकत्र बांधून घेतली, मुलांबाळांकडे डोळे भरून पाहिले आणि मार्गाला लागला. (२९)

**स्त्रियेस अवलोकिलें। वियोगें दु:ख बहुत वाटलें।**
**प्रारब्धसूत्र तुकलें। रुणानबंधाचें ॥ ३०॥**

इतक्यात बायकोकडे नजर गेली, तेव्हा वियोगाचे फार दु:ख झाले. वियोगाच्या ऋणानुबंधाचे प्रारब्ध बळावल्याने इच्छेविरुद्ध जाणे भाग पडले. (३०)

**कंठ सद्गदित जाला। न संवरेच गहिवरला।**
**लेंकुरा आणि पित्याला। तडातोडी जाली ॥ ३१॥**

दु:खाने कंठ सद्गदित झाला. गहिवर आवरेनासा झाला. मुलांची आणि बापाची तातूट झाली. (३१)

**जरी रुणानबंध असेल। तरी मागुती भेटी होईल।**
**नाहीं तरी संगती पुरेल। येचि भेटीनें तुमची ॥ ३२॥**

जर ऋणानुबंध असेल, तर आपली परत भेट होईल. नाहीतर हीच आपली शेवटची भेट समजावी. (३२)

**ऐसें बोलोन स्वार होये। मागुता फीरफिरों पाहे।**
**वियोगदु:ख न साहे। परंतु कांहीं न चले ॥ ३३॥**

असे म्हणून तो घोड्यावर स्वार झाला, पण वारंवार मागे वळून पाहू लागला. वियोगदु:ख सहन होईना, परंतु जाणे भागच पडले. दुसरा काही उपायच उरला नाही. (३३)

**आपुला गांव राहिला मागें। चित्त भ्रमलें संसारउद्वेगें।**
**दु:खवला प्रपंचसंगें। अभिमानास्तव ॥ ३४॥**

पाहता पाहता आपला गाव मागे राहिला, संसाराच्या उद्वेगाने चित्त भ्रमले. देहाभिमान धरून प्रपंचाची संगत केल्याने त्याला दु:ख भोगावे लागले. (३४)

**ते समईं माता आठवली। म्हणे धन्य धन्य ते माउली।**
**मजकारणें बहुत कष्टली। परी मी नेणेंचि मूर्ख॥ ३५॥**

त्यावेळी त्याला आईची आठवण झाली. तो म्हणू लागला की खरोखर ती माउली धन्य. माझ्यासाठी तिने फार कष्ट

आजी जरी ते असती । तरी मजला कदा न विशंभती ।
वियोग होतां आक्रंदती । ते पोटागि वेगळीच ॥३६ ॥

पुत्र वैभवहीन भिकारी । माता तैसाचि अंगिकारी ।
दगदला देखोनि अंतरीं । त्याच्या दुःखें दुःखवे ॥३७॥

प्रपंच विचारें पाहातां । हें सकळ जोडे न जोडे माता ।
हें शरीर जयेकरितां । निर्माण जालें ॥३८॥

लंव तरी ते माया । काय कराविया सहस्त्र जाया ।
परी भुलोन गेलों वायां । मकरध्वजाचेनी ॥३९॥

या येका कामाकारणें । जिवलगांसिं द्वंद्व घेणें ।
सखीं तींच पिसुणें । ऐसीं वाटतीं ॥४०॥

म्हणौन धन्य धन्य ते प्रपंची जन । जे मायेबापाचें भजन ।
करिती न करिती मन । निष्ठुर जिवलगांसीं ॥४१॥

संगती स्त्रीबाळकाची । आहे साठी जन्माची ।
परी मायेबापें कैंचीं । मिळतील पुढें ॥४२॥

ऐसें पूर्वीं होतें ऐकिलें । परी ते समई नाहीं कळलें ।
मन हें बुडोन गेलें । रतिसुखाचा डोहीं ॥४३॥

हे सखीं वाटती परी पिसुणें । मिळालीं वैभवाकारणें ।
रितें जातां लाजिरवाणें । अत्यंत वाटे ॥४४॥

आतां भलतैसें करावें । परि द्रव्य मेळऊन न्यावें ।
रितें जातां स्वभावें । दुःख आहे ॥४५॥

ऐसी वेवर्धना करी । दुःख वाटलें अंतरीं ।
चिंतेचिये माहापुरीं । बुडोन गेला ॥४६॥

ऐसा हा देह आपुला । असतांच पराधेन केला ।
ईश्वरीं कानकोंडा जाला । कुटुंबकाबाडी ॥४७॥

या येका कामासाठीं । जन्म गेला आटाटी ।
वय वेचल्या सेवटीं । येकलेंचि जावें ॥४८॥

सोसले, पण त्यावेळी मला मूर्खाला हे कळले नाही. (३५)

आज जर ती जिवंत असती तर तिने मला कधीही दूर परदेशात जाऊ दिले नसते. माझा वियोग होताच तिला अत्यंत दुःख झाले असते व ती आक्रोश करू लागली असती. आईचा कळवळा वेगळाच असतो. (३६)

पुत्र वैभवहीन अगदी भिकारी जरी असला, तरी माता त्याचा जसा असेल तसा स्वीकार करते. त्याला कष्ट झालेले दिसले तर त्याच्या दुःखाने ती दुःखी होते. (३७)

प्रपंचाबद्दल विचार करून पाहिला तर असे दिसते की बाकी सर्व गोष्टी मिळू शकतात, पण जिच्यामुळे हे शरीर निर्माण झाले, ती आई मात्र परत मिळत नाही. (३८)

आई स्वभावाने कर्कश असली तरी आईची माया खरी असते. हजार स्त्रिया असल्या तरी ते प्रेम त्यांच्याजवळ नसते. पण कामवासनेच्या बळाने मी हे सर्व अगदी विसरून गेलो. (३९)

या एका कामवासनेच्या नादाने जिवलगांशी मी कलह केला. हितकर्ते मित्र मला शत्रूप्रमाणे वाटले. (४०)

म्हणून जे लोक आईवडिलांची भक्ती करतात आणि जिवलग माणसांविषयी मन निष्ठुर करीत नाहीत, ते धन्य होत. (४१)

बायको व मुलांची सोबत आपल्याला जन्मभर लाभते, पण आईवडिलांचा सहवास फार थोडा मिळतो. त्यांची संगत पुढे कशी बरे मिळेल? (४२)

मी पूर्वी हे सगळे ऐकले होते, पण त्यावेळी ते कळले नाही. माझे मन रतिसुखाचे डोहात अगदी बुडून गेले होते. (४३)

ज्यांना मी मित्र समजत होतो, ते लबाड होते. माझ्याजवळील पैशाच्या लोभाने ते माझ्याभोवती जमले होते. आता मोकळ्या हाताने परत जायची मला अत्यंत लाज वाटत आहे. (४४)

आता काय वाटेल ते करावे, परंतु द्रव्य मिळवूनच परत फिरले पाहिजे. मोकळ्या हाताने परत गेलो, तर स्वाभाविकच दुःख होणार. (४५)

अशी विवंचना करीत असता त्याला मनात अत्यंत दुःख झाले. चिंतेच्या महापुरात जणू काही तो बुडून गेला. (४६)

तो मनात म्हणू लागला की, हा देह माझा असता मी पराधीन झालो आणि ईश्वरविषयक कर्तव्याकडे दुर्लक्ष करून केवळ कुटुंबासाठी काबाडकष्ट करीत राहिलो. (४७)

या एका कामवासनेपायी जन्मभर आटापिटा केला. आता म्हातारपण आले आहे. आयुष्याच्या शेवटी एकट्यालाच जावे लागणार आहे. (४८)

ऐसा मनीं प्रस्तावला। क्षण येक उदास जाला।
सर्वेचि प्राणी झळंबला। मायाजाळें ॥ ४९ ॥

अशा प्रकारे विचार करीत असता त्याला मनात फार पश्चात्ताप झाला व एक क्षणभर तो खिन्न झाला. पण लगेचच तो मुलालेकरांच्या ममतेने मोहित होऊन मायेच्या जाळ्यात अडकला. (४९)

कन्यापुत्रें आठवलीं। मनींहुनि क्षिती वाटली।
म्हणे लेंकुरें अंतरलीं। माझीं मज ॥ ५० ॥

मुलामुलींची आठवण होऊन मनात फार दु:ख झाले आणि म्हणू लागला की, 'माझी लेकरे मला दुरावली.' (५०)

मागील दु:ख आठवलें। जें जें होतें प्राप्त जालें।
मग रुदन आरंभिलें। दीर्घ स्वरें ॥ ५१ ॥

मागे जे जे काही दु:ख भोगले होते, त्याची आठवण होऊन तो दु:खी झाला आणि मोठमोठ्याने रडू लागला. (५१)

आरण्यरुदन करितां। कोणी नाहीं बुझाविता।
मग होये विचारिता। आपुले मनीं ॥ ५२ ॥

पण अरण्यात त्याचे रडणे ऐकून त्याला समजाविणारे कुणीच नसल्याने त्याने धैर्य धरले व तो आपल्याच मनाशी विचार करू लागला. (५२)

आतां कासया रडावें। प्राप्त होतें तें भोगावें।
ऐसें बोलोनिया जीवें। धारिष्ट केलें ॥ ५३ ॥

आता रडून काय उपयोग आहे ? जे प्रारब्धाने प्राप्त होते, ते भोगावेच लागते. असे म्हणून त्याने मनास धीर दिला. (५३)

ऐसा दु:खें दगदला। मग विदेशाप्रती गेला।
पुढें प्रसंग वर्तला। तो सावध ऐका ॥ ५४ ॥

याप्रमाणे दु:खाने थकलाभागलेला तो मग विदेशी गेला. श्री समर्थ म्हणतात की, पुढे काय प्रसंग घडला, तो श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावा. (५४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'स्वगुणपरीक्षा ( क ) नाम' समास चौथा समाप्त.**

❑ ❑

## दशक ३ : समास ५
## स्वगुणपरीक्षा ( ड )

॥ श्रीराम ॥

पुढें गेला विदेशासी। प्राणी लागला व्यासंगासी।
आपल्या जिवेसीं सोसी। नाना श्रम ॥ १ ॥

श्रीसमर्थ सांगतात की, याप्रमाणे पुढे विदेशात जाऊन व्यवसाय करायला सुरुवात केली व त्यासाठी तो जिवापाड नाना प्रकारचे कष्ट सोसू लागला. (१)

ऐसा दुस्तर संसार। करितां कष्टला थोर।
पुढें दोनी च्यारी संवत्सर। द्रव्य मेळविलें ॥ २ ॥

याप्रमाणे प्रपंच करीत असता त्याला अत्यंत कष्ट झाले. पुढे दोन चार वर्षे कष्ट करून त्याने द्रव्य मिळविले. (२)

सर्वेचि आला देशासी। तों आवर्षण पडिलें देसीं।
तेणें गुणें मनुष्यांसी। बहुत कष्ट जाले ॥ ३ ॥

मग लगेच तो स्वदेशास परत आला. तो तेथे दुष्काळ पडला होता व त्यामुळे सर्व माणसांना अत्यंत कष्ट भोगावे लागत होते. (३)

येकांच्या बैसल्या अमृतकळा। येकांस चंद्री लागली डोळां।
येकें कांपती चळचळां। दैन्यवाणीं ॥ ४ ॥

कुणाची गालफडे बसली होती तर कुणाचे डोळे निस्तेज झाले होते, कोणी अत्यंत दीन होऊन थरथरा कापत होते. (४)

येकें दीनरूप बैसलीं। येकें सुजलीं येकें मेलीं।
ऐसीं कन्यापुत्रें देखिलीं। अकस्मात डोळां ॥ ५ ॥

कोणी भिकाऱ्यासारखी बसलेली, तर कुणाच्या अंगावर सूज आलेली, तर कोणी मरून गेलेली, अशी आपल्या मुलामुलींची अवस्था झालेली त्याने बघितली. (५)

तेणें बहुत दुःखी जाला। देखोनियां उभड आला।
प्राणी आक्रंदों लागला। दैन्यवाणा ॥ ६ ॥

ते सर्व पाहून तो अत्यंत दुःखी झाला. त्याला गहिवरून आले व तो दीन होऊन आक्रोश करू लागला. (६)

तंव तीं अवघीं सावध जालीं। म्हणती बाबा बाबा जेऊं घालीं।
अन्नालागीं मिडकलीं। झडा घालिती ॥ ७ ॥

तेव्हा ती सर्व मुले सावध झाली आणि 'बाबा, बाबा, आम्हांला जेवू घाला' असे म्हणू लागली. अन्नासाठी आशाळभूत झालेली असल्याने त्याच्या अंगावर त्यांनी झडपच घातली. (७)

गांठेडें सोडून पाहाती। हातां पडिलें तेंचि खाती।
कांहीं तोंडीं कांही हातीं। प्राण जाती निघोनी॥ ८॥

पोरांनी बापाचे गाठोडे सोडून पाहिले व जे हाताला येईल ते ती खाऊ लागली. आणि काही अन्न तोंडात तर काही हातात असतानाच काही जणांचे प्राण निघून गेले.(८)

तांतडी तांतडी जेऊं घाली। तों तें जेवितां जेवितां कांहीं मेलीं।
कांहीं होतीं धादावलीं। तेंहि मेलीं अजीर्णे ॥ ९॥

तो घाईघाईने त्यांना जेवू घालू लागला, तर जेवता जेवताच काही मेली. काही अत्यंत भुकेली होती, त्यांनी जास्त खाल्ल्याने ती अजीर्ण होऊन मेली. (९)

ऐसीं बहुतेकें मेलीं। येक दोनी मुलें उरलीं।
तेंहि दैन्यवाणी जालीं। आपले मातेवांचुनी॥ १०॥

अशा प्रकारे बहुतेक मुले मेली. एक-दोन उरली, पण तीही आपल्या आईवाचून अत्यंत दीनवाणी झाली. (१०)

ऐसें आवर्षण आलें। तेणें घरचि बुडालें।
पुढें देसीं सुभिक्ष जालें। आतिशयेंसी ॥ ११॥

अशा रीतीने दुष्काळ पडल्याने त्याचे सर्व घरच बसले. काही दिवसांनंतर देशात अन्नधान्याची अतिशय समृद्धी झाली. (११)

लेकुरां नाही वाढविते। अन्न करावें लागे आपुलेन हातें।
बहु त्रास घेतला चित्तें। स्वयंपाकाचा ॥ १२॥

घरात मुलांना वाढविणारे कुणी राहिले नव्हते. स्वतःच्या हाताने अन्न शिजवावे लागे. स्वयंपाक करण्याचा त्याच्या मनाला फार त्रास वाटू लागला. (१२)

लोकीं भरीस घातलें। पुन्हां मागुतें लग्न केलें।
द्रव्य होतें तें वेचलें। लग्नाकारणें ॥ १३॥

लोकांनी भरीला घातले म्हणून त्याने पुन्हा लग्न केले. जे द्रव्य मिळविले होते, ते लग्नासाठी खर्च झाले. (१३)

पुन्हा विदेशासी गेला। द्रव्य मेळऊन आला।
तंव घरीं कळहो लागला। सावत्र पुत्रांसी ॥ १४॥

म्हणून तो परत विदेशी गेला व पुन्हा द्रव्य मिळवून परत आला. तो घरी बायको आणि सावत्र मुलांच्यात भांडणास सुरुवात झाली होती. (१४)

स्त्री जाली न्हातीधुती। पुत्र देखों न सकती।
भ्रताराची गेली शक्ति। वृद्ध जाला ॥ १५॥

त्याची बायको वयात येऊन शहाणी झाली होती, ते मुलांना बघवेना. नवरा वृद्ध झाल्याने त्याच्या अंगी काहीच शक्ती उरली नव्हती. (१५)

सदा भांडण पुत्रांचें। कोणी नायकती कोणाचें।
वनिता अति प्रीतीचें। प्रीतिपात्र ॥ १६ ॥

मुलांमध्ये आपसांत सारखी भांडणे सुरू झाली. कोणी कोणाचे ऐकेना. त्याचे मन मात्र बायकोवर अत्यंत आसक्त झाले. (१६)

किंत बैसला मना। येके ठाईं पडेना।
म्हणोनियां पांचा जणा। मेळविलें ॥ १७॥

एकमेकांबद्दल त्यांच्या मनांत संशय उत्पन्न झाला. काही केल्या एकमत होईना, म्हणून त्याने पंचांना बोलावून आणले. (१७)

पांच जण वांटे करिती। तों ते पुत्र नायेकती।
निवाडा नव्हेचि अंतीं। भांडण लागलें ॥ १८ ॥

पंचांनी वाटण्या करून दिल्या, पण मुलांना ते पटेना व ती ऐकेनात. काहीच निवाडा झाला नाही आणि शेवटी परत भांडणे सुरू झाली. (१८)

**बापलेकां भांडण जालें। लेकीं बापास मारिलें।**
**तंव ते मातेनें घेतलें। शंखतीर्थ ॥ १९ ॥**

बापाचे व मुलांचे भांडण जुंपले आणि मुलांनी बापाला मारले. ते पाहून आईने शंखध्वनी करायला सुरुवात केली. (१९)

**ऐकोनि मिळाले लोक। उभे पाहती कौतुक।**
**म्हणती बापास लेक। कामा आले ॥ २० ॥**

तिने बोंब मारलेली ऐकून तेथे लोक गोळा झाले आणि उभे राहून गंमत पाहू लागले. ते म्हणू लागले की 'वा, मुले बापाच्या चांगली उपयोगी पडली!' (२०)

**ज्या कारणें केले नवस। ज्या कारणें केले सायास।**
**ते पुत्र पितीयास। मारिती पहा ॥ २१ ॥**

ज्या मुलांसाठी बापाने नवस केले, अनेक कष्ट उपसले, तीच मुले आता बापाला मारीत आहेत, पाहा! (२१)

**ऐसी आली पापकळी। आश्चिर्य मानिलें सकळीं।**
**उभे तोडिती कळी। नगरलोक ॥ २२ ॥**

असा हा पापमय कलह पाहून सर्वांना फार आश्चर्य वाटले. मग तेथे गावातील जमलेल्या लोकांनी ते भांडण मिटविले. (२२)

**पुढें बैसोन पांच जण। वांटे केले तत्समान।**
**बापलेकांचें भांडण। तोडिलें तेहीं ॥ २३ ॥**

पुढे पाच जणांनी बसून समसमान वाटे केले आणि त्यांनी ते बाप-लेकांचे भांडण एकदाचे मिटवले. (२३)

**बापास वेगळें घातलें। कोंपट बांधोन दिधलें।**
**मन कांतेचें लागलें। स्वार्थबुद्धी ॥ २४ ॥**

त्या मुलांनी बापाला वेगळे काढले आणि एक खोपटे बांधून दिले. बायकोच्या मनातही स्वार्थबुद्धी उत्पन्न झाली. (२४)

**कांता तरुण पुरुष वृद्ध। दोघांस पडिला संमंध।**
**खेद सांडून आनंद। मानिला तेहीं ॥ २५ ॥**

बायको तरुण आणि नवरा म्हातारा असा घरात या दोघांचाच संबंध उरला. तेव्हा खेद न करता दोघांनी त्यातच आनंद मानला. (२५)

**स्त्री सांपडली सुंदर। गुणवंत आणी चतुर।**
**म्हणे माझें भाग्य थोर। वृद्धपणीं ॥ २६ ॥**

'मला म्हातारपणी सुंदर, गुणवंत आणि चतुर बायको मिळाली, हे माझे केवढे थोर भाग्य!' असे तो म्हणू लागला. (२६)

**ऐसा आनंद मानिला। दुःख सर्वहि विसरला।**
**तंव तो गल्बला जाला। परचक्र आलें ॥ २७ ॥**

याप्रमाणे मागील सर्व दुःख विसरून त्याने आनंद मानला. इतक्यात चहूकडे आरडाओरडा झाला की शत्रूची धाड आली आहे. (२७)

**अकस्मात धाडी आली। कांता बंदी धरून नेली।**
**वस्तभावहि गेली। प्राणीयाची ॥ २८ ॥**

अकस्मात धाड आली आणि शत्रूने त्याच्या बायकोला कैद करून धरून नेली. एवढेच नव्हे तर त्याची सर्व चीजवस्तूही गेली. (२८)

**तेणें दुःख जालें भारी। दीर्घ स्वरें रुदन करी।**
**मनीं आठवे सुंदरी। गुणवंत ॥ २९ ॥**

त्यामुळे त्याला अत्यंत दुःख झाले व तो मोठमोठ्याने रडू लागला. आपल्या सुंदर गुणसंपन्न बायकोची मनात त्याला आठवण येऊ लागली. (२९)

**तंव तिची वार्ता आली। तुमची कांता भ्रष्टली।**
**ऐकोनियां आंग घाली। पृथ्वीवरी ॥ ३० ॥**

तोपर्यंत बातमी आली की, 'तुमच्या बायकोला भ्रष्ट केले आहे!' हे ऐकताच तो दुःखाने धाडकन जमिनीवर कोसळला. (३०)

**सव्य अपसव्य लोळे। जळें पाझरती डोळे।**
**आठवितां चित्त पोळे। दुःखानळें ॥ ३१ ॥**

डाव्या, उजव्या कुशीवर तो गडबडा लोळू लागला. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. बायकोची आठवण येऊन त्या दुःखाने त्याचे चित्त पोळू लागले. (३१)

**द्रव्य होतें मेळविलें। तेंहि लग्नास वेचलें।**
**कांतेसिहि धरून नेलें। दुराचारीं ॥ ३२ ॥**

'मी काही द्रव्य मिळविले होते, तेही लग्नासाठी खर्च केले आणि आता दुराचारी लोकांनी माझ्या बायकोलाही धरून नेली.' (३२)

मजहि वृद्धाप्य आलें। लेकीं वेगळें घातलें।
अहा देवा वोढवलें। अदृष्ट माझें ॥ ३३ ॥

'मलाही आता म्हातारपण आले आहे आणि त्यात मुलांनी मला वेगळे काढले आहे. देवा, हे केवढे दुर्दैव माझ्यावर ओढवले आहे! (३३)

द्रव्य नाहीं कांता नाहीं। ठाव नाहीं शक्ति नाहीं।
देवा मज कोणीच नाहीं। तुजवेगळें ॥ ३४ ॥

माझ्याजवळ आता पैसा-अडका नाही, बायकोही नाही! घरही गेले, शक्तीही उरली नाही! देवा, आता तुझ्याशिवाय मला दुसरे कोणीच उरलेले नाही!' (३४)

पूर्वी देव नाहीं पुजिला। वैभव देखोन भुलला।
सेखीं प्राणी प्रस्तावला। वृद्धपणीं ॥ ३५ ॥

पूर्वी देवाची पूजा कधी केली नाही, वैभवाला भुलला आणि शेवटी म्हातारपणी त्याला पश्चात्ताप होऊ लागला. (३५)

देह अत्यंत खंगलें। सर्वांग वाळोन गेलें।
वातपीत उसळलें। कंठ दाटला कफें॥ ३६ ॥

देह अत्यंत खंगला. सर्वांग वाळून गेले. वात, पित्त उसळले. कंठ कफाने दाटून आला. (३६)

वळे जिव्हेचि बोबडी। कफें कंठ घडघडी।
दुर्गंधी सुटली तोंडीं। नाकीं स्लेष्मा वाहे॥ ३७ ॥

जिभेची बोबडी वळली, कफाने घसा घरघरू लागला, तोंडातून दुर्गंधी सुटली, नाकातून शेंबूड वाहू लागला. (३७)

मान कांपे चळचळां। डोळे गळती भळभळां।
वृद्धपणीं अवकळा। ठाकून आली ॥ ३८ ॥

मान चळचळा कापू लागली, डोळ्यांतून घळाघळा अश्रू वाहू लागले, वृद्धपणात अशी ही अवकळा प्राप्त झाली. (३८)

दंतपाटी उखळली। तेणें बोचरखिंडी पडिली।
मुखीं लाळ गळों लागली। दुर्गंधीची ॥ ३९ ॥

दातांची कवळी उखडल्यामुळे बोळके झाले. तोंडातून अति दुर्गंध असलेली लाळ गळू लागली. (३९)

डोळां पाहतां दिसेना। कानीं शब्द ऐकेना।
दीर्घ स्वरें बोलवेना। दमा दाटे ॥ ४० ॥

डोळ्यांनी नीट दिसेना, कानांनी शब्द ऐकू येईना, मोठ्याने बोलताही येईना, कारण दमा वाढू लागला. (४०)

शक्ती पायांची राहिली। बैसवेना मुरुकुंडी घाली।
बृहती वाजों लागली। तोंडाच ऐसी ॥ ४१ ॥

पायांतील शक्ती नाहीशी झाली. बसता येईनासे झाले. म्हणून मुरकुंडी घालून पडून राहू लागला. तोंडाप्रमाणे गुदद्वारही वाजू लागले. (४१)

क्षुधा लागतां आवरेना। अन्न समईं मिळेना।
मिळालें तरी चावेना। दांत गेले ॥ ४२ ॥

भूक आवरेनाशी झाली. भुकेच्या वेळी अन्न मिळेना आणि मिळाले तरी दात पडून गेल्याने ते चावता येईना. (४२)

पित्तें जिरेना अन्न। भक्षीतांच होये वमन।
तैसेंचि जाये निघोन। अपानद्वारें ॥ ४३ ॥

पित्तामुळे अन्न पचेना, खाताक्षणीच ते ओकून पडू लागले किंवा खालच्या वाटेने जसेच्या तसे निघून जाऊ लागले. (४३)

विष्टा मूत्र आणी बळस। भोवता वमनें केला नास।
दुरून जातां कोंडे स्वास। विश्वजनाचा ॥ ४४ ॥

विष्ठा, मूत्र आणि नाकातोंडातील मळ व ओकारी यामुळे त्याच्या आजूबाजूला सर्वत्र दुर्गंधी पसरू लागली. या घाणीमुळे दुरून जाऊ लागले, तरी सुद्धा लोकांचा श्वास कोंडू लागला. (४४)

नाना दुःखें नाना व्याधी। वृद्धपणीं चळे बुद्धी।
तऱ्हीं पुरेना आवधी। आयुष्याची ॥ ४५ ॥

याप्रमाणे नाना दुःखे व नाना रोग यामुळे म्हातारपणी त्याची बुद्धी भ्रमिष्ट झाली. तरी आयुष्याची मर्यादा काही संपेना. (४५)

पापण्या भवयाचे केश। पिकोन झडले निःशेष।
सर्वांगीं लोंबलें मांस। चिरकुटासारिखें ॥ ४६ ॥

पापण्यांचे, भुवयांचे केस पिकून पूर्णपणे गळून गेले. सर्वांगावरील मांस एखाद्या जुन्या कापडासारखे लोंबू लागले. (४६)

देह सर्व पारिखें जालें। सवंगडे निःशेष राहिले।
सकळ प्राणीमात्र बोले। मरेना कां ॥ ४७ ॥

देह पूर्णपणे पराधीन झाला. कोणी सवंगडीही उरले नाहीत. सर्व लोक म्हणू लागले की, 'हा एकदाचा मरत का नाही?' (४७)

जें जन्मून पोसलीं। तेंचि फिरोन पडिलीं।
अंतीं विषम वेळ आली। प्राणीयांसी ॥ ४८ ॥

ज्यांना जन्म देऊन त्यांचे पालन–पोषण केले ती मुले विरुद्ध झाली. शेवटी त्याला फार कठीण काळ आला.(४८)

गेलें तारुण्य गेलें बळ। गेलें संसारीचें सळ।
वाताहात जालें सकळ। शरीर आणि संपत्ती॥ ४९ ॥

तारुण्य गेले, अंगातली शक्ती गेली, संसाराची मस्तीही गेली. अशा प्रकारे शक्ती आणि संपत्ती जाऊन सर्व वाताहात झाली. (४९)

जन्मवरी स्वार्थ केला। तितुकाहि वेर्थ गेला।
कैसा विषम काळ आला। अंतकाळीं ॥ ५० ॥

जन्मभर स्वार्थ साधण्यासाठी प्रयत्न केला, पण तो व्यर्थ गेला आणि शेवटी अंतकाळी अशी विषम परिस्थिती प्राप्त झाली. (५०)

सुखाकारणें झुरला। सेखीं दुःखें कष्टी जाला।
पुढें मागुता धोका आला। येमयातनेचा ॥ ५१ ॥

सुखासाठी झुरला, पण शेवटी दुःखीकष्टी झाला आणि पुढे यमयातनेचा धोका तर आहेच. (५१)

जन्म अवघा दुःखमूळ। लागती दुःखाचे इंगळ।
म्हणोनियां तत्काळ। स्वहित करावें ॥ ५२ ॥

सारांश, जन्म हेच सर्व दुःखाचे मूळ असून त्याला दुःखाची इंगळी सारखी डसतच असते, म्हणून माणसाने तत्काळ स्वहित साधावे. (५२)

असो ऐसें वृद्धपण। सकळांस आहे दारुण।
म्हणोनियां शरण। भगवंतास जावें ॥ ५३ ॥

श्री समर्थ म्हणतात, की असो. याप्रमाणे सर्वांना असे दारुण वृद्धपण येणारच आहे, म्हणून प्रत्येकाने भगवंतास शरण जावे. (५३)

पुढें वृद्धीस तत्वतां। गर्भी प्रस्तावा होता।
तोचि आला मागुता। अंतकाळीं ॥ ५४ ॥

गर्भावस्थेत जीवाला जसा पश्चात्ताप झाला होता, तसाच तो तत्त्वतः त्याला वृद्धपणी होतो आणि तोच पुन्हा अंतकाळीही होतो. (५४)

म्हणौनि मागुतें जन्मांतर। प्राप्त मातेचें उदर।
संसार हा अति दुस्तर। तोचि ठाकून आला॥ ५५ ॥

म्हणून त्याला पुन्हा जन्म घ्यावा लागतो. मातेच्या उदरात काही काळ राहावे लागते आणि तरून जाण्यास कठीण असा हा संसार परत त्याच्यापुढे उभा राहतो.(५५)

भगवद्भजनावांचुनी । चुकेना हे जन्मयोनी।
तापत्रयाची जाचणी। सांगिजेल पुढें ॥ ५६ ॥

या प्रकारे गर्भवास व जन्म यांतून भगवद्भजनावाचून सुटका होत नाही. आता पुढील समासात तीन तापांचा जाच कसा असतो ते सांगितले जाईल. (५६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'स्वगुण परीक्षा ( ड ) नाम' समास पाचवा समाप्त.**



## दशक ३ : समास ६

# आध्यात्मिकताप

॥ श्रीराम ॥

तापत्रयाचें लक्षण। आतां सांगिजेल निरूपण।
श्रोतीं करावें श्रवण। येकाग्र होऊनी ॥ १ ॥

श्री समर्थ म्हणतात की, मी आता तापत्रयाच्या लक्षणांचे नीट वर्णन करतो. ते श्रोत्यांनी एकाग्र होऊन श्रवण करावे. (१)

जो तापत्रैं पोळला। तो संतसंगें निवाला।
आर्तभूत तोषला। पदार्थ जेवी ॥ २ ॥

तापलेला पदार्थ जसा पाण्याने निवतो, तसा तापत्रयाने जो पोळतो, तो संतसमागमाने निवतो, शांत होतो. (२)

क्षुधाक्रांतास मिळे अन्न। तृषाक्रांतास जीवन।
बंदी पडिल्याचें बंधन। तोडितां सुख ॥ ३ ॥

भुकेलेल्यास अन्न मिळावे किंवा तहानलेल्यास पाणी मिळावे किंवा बंधनात पडलेल्याची बंधनातून सुटका व्हावी, त्याप्रमाणे त्याला सुख प्राप्त होते. (३)

**माहापुरें जाजावला। तो पैलतीरास नेला।**
**कां तो स्वप्नींचा चेइला। स्वप्नदुःखी ॥ ४॥**

**कोणी येकासी मरण। येतां दिलें जीवदान।**
**संकटास निवारण। तोडितां सुख ॥ ५॥**

**रोगियास औषध। सप्रचित आणी शुद्ध।**
**तयासी होये आनंद। आरोग्य होतां ॥ ६॥**

**तैसा संसारें दुःखवला। त्रिविधतापें पोळला।**
**तोचि येक अधिकारी जाला। परमार्थासी ॥ ७॥**

**ते त्रिविध ताप ते कैसे। आतां बोलिजेत तैसे।**
**येविषईं येक असे। वाक्याधार ॥ ८॥**

श्लोक

देहेंद्रियप्राणेन सुखं दुःखं च प्राप्यते।
इममाध्यात्मिकं तापं जायते दुःखं देहिनाम्॥ १ ॥

सर्वभूतेन संयोगात् सुखं दुःखं च जायते।
द्वितीयतापसंतापः सत्यं चैवाधिभौतिकः॥ २ ॥

शुभाशुभेन कर्मणा देहान्ते यमयातना।
स्वर्गनरकादि भोक्तव्यमिदं चैवाधिदैविकम्॥ ३ ॥

**येक ताप आध्यात्मिक। दुजा तो आदिभूतिक।**
**तिसरा आदिदैविक। ताप जाणावा ॥ ९॥**

**आध्यात्मिक तो कोण। कैसी त्याची वोळखण।**
**आदिभूतिकांचें लक्षण। जाणिजे कैसें ॥ १०॥**

**आदिदैविक तो कैसा। कवण तयाची दशा।**
**हेंहि विशद कळे ऐसा। विस्तार कीजे ॥ ११॥**

**हां जी म्हणोनि वक्ता। जाला कथा विस्तारिता।**
**आध्यात्मिक ताप आतां। सावध ऐका ॥ १२॥**

**देह इंद्रिय आणी प्राण। यांचेनि योगें आपण।**
**सुखदुःखें सिणे जाण। या नांव आध्यात्मिक॥ १३॥**

किंवा महापुरात घाबरलेल्यास पैलतीरास नेला असता तो जसा सुखी होतो किंवा स्वप्नदुःखाने दुःखी झालेल्यास जागे करावे किंवा कुणाचे मरण ओढवले असता त्याला जीवनदान द्यावे किंवा एखादा संकटात सापडला असता युक्तिप्रयुक्तीने त्याचे संकट निवारण केल्यावर त्यास जसे सुख होते. (४-५)

किंवा रोग्याला अनुभवसिद्ध असे खात्रीचे आणि उत्तम औषध मिळून आरोग्य प्राप्त झाले असता त्याला जसा आनंद होतो. (६)

त्याप्रमाणे संसारातील दुःखाने जो गांजलेला असतो, त्रिविध तापाने जो पोळलेला असतो, तोच एक परमार्थ मिळवण्यास अधिकारी ठरतो. (७)

ते त्रिविध ताप कसे असतात, ते आता मी सांगतो. याविषयी एक वाक्याधार आहे. (८)

**अर्थ**—देह, इंद्रिये आणि प्राण यांच्यामुळे जे सुखदुःख भोगावे लागते, त्याला आध्यात्मिक ताप असे म्हणतात. (१)

सर्व भूतांच्या संयोगाने जे सुख-दुःख उत्पन्न होते, तो दुसरा ताप असून तो मोठा क्लेशदायक आहे. तो खरोखर आधिभौतिक ताप होय. (२)

माणसाच्या चांगल्या-वाईट कर्माप्रमाणे मेल्यावर यमयातना, स्वर्ग, नरक वगैरे जे भोग भोगावे लागतात, त्यांना आधिदैविक ताप असे म्हणतात. (३)

एका तापास आध्यात्मिक ताप म्हणतात. दुसरा जो ताप त्यास आधिभौतिक म्हणतात आणि तिसरा ताप तो आधिदैविक जाणावा. (९)

आध्यात्मिक ताप म्हणजे काय, तो कसा ओळखावा, तसेच आधिभौतिक तापाचे लक्षण ते कसे जाणावे? (१०)

आधिदैविक ताप कसा असतो, त्याची अवस्था कोणती, हे सर्व स्पष्टपणे कळेल अशा प्रकारे विस्तार करून सांगा. (११)

त्यावर वक्ता 'हां जी' असे म्हणून विस्तारपूर्वक सांगता झाला. तरी आता आध्यात्मिक तापासंबंधीचे निरूपण सावध होऊन ऐका. (१२)

देह, इंद्रिये आणि प्राण यांच्या योगाने आपणास सुख-दुःख होऊन जो त्रास होतो, त्या तापाला आध्यात्मिक ताप असे नाव आहे. (१३)

देहामधून जें आलें। इंद्रियें प्राणें दुःख जालें।
तें आध्यात्मिक बोलिलें। तापत्रईं ॥ १४॥

जे दुःख देहामधून येते आणि इंद्रिये व प्राण यांच्याद्वारे भोगावे लागते, त्याला तापत्रयात आध्यात्मिक असे म्हणतात. (१४)

देहामधून काये आलें। प्राणें कोण दुःख जालें।
आतां हें विशद केलें। पाहिजे कीं ॥ १५॥

देहामधून कोणती दुःखे येतात आणि प्राणांमुळे ती कशी सोसावी लागतात, हे आता स्पष्ट करून सांगितले पाहिजे. (१५)

खरुज खवडे पुळियानारु।
नखरुडें मांजऱ्या देवि गोवरु।
देहामधील विकारु। या नांव आध्यात्मिक॥ १६॥

देहामधील विकारांना आध्यात्मिक ताप म्हणतात. ते असे- खरूज, खवडे, पुळ्या, नारु, नखुर्डे, मांजऱ्या, देवी, गोवर (१६)

काखमांजरी केशतोड। वोखटें वर्ण काळफोड।
व्याधी मूळव्याधी माहाजड। या नांव आध्यात्मिक॥ १७॥

काखमांजरी, केस्तुड, सडके व्रण, काळपुळी, व्याधी, दुःसह अशी मूळव्याध. (१७)

अंगुळवेडे गालफुगी। कंड लागे जे वाउगी।
हिरडी सुजे भरे बलंगी। या नांव आध्यात्मिक॥ १८॥

बोटाचे दुखणे, गालफुगी, उगीच कंड सुटणे, हिरडी सुजणे, दातांत भरणारे कस्पट. (१८)

वाउगे फोड उठती। कां ते सुजे आंगकांती।
वात आणि तिडका लागती। या नांव आध्यात्मिक॥ १९॥

अंगावर उगीच फोड उठणे किंवा अंगाला सूज येणे, वात होणे, तिडका लागणे. (१९)

नाइटे अंदु गजकर्ण। पेहाचें पोट विस्तीर्ण।
बैसलें टाळें फुटती कर्ण। या नांव आध्यात्मिक॥ २०॥

नायटे, हाड्याव्रण, गजकर्ण, जलोदराने वाढलेले पोट, कानठळ्या बसून कान फुटणे. (२०)

कुष्ट आणी वोला कुष्ट। पंड्यारोग अतिश्रेष्ठ।
क्षयरोगाचे कष्ट। या नांव आध्यात्मिक॥ २१॥

पांढरे कोड, महारोग, अतिश्रेष्ठ असा रक्तक्षय व क्षयरोगाचे कष्ट. (२१)

वाटी वटक वायेगोळा। हातीं पाईं लागती कळा।
भोवंडी लागे वेळोवेळां। या नांव आध्यात्मिक॥ २२॥

गाठ सरकणे, अर्भक दूध प्यायल्यावर दुधाच्या गोळ्या होऊन ते ओकते ते दुखणे किंवा वायुगोळा अथवा हातापायाला कळा लागणे, वरचेवर चक्कर येणे. (२२)

वोलांडा आणि वळ। पोटसुळाची तळमळ।
आर्धशिसी उठे कपाळ। या नांव आध्यात्मिक॥ २३॥

वोलांडा, वळ, पोटशूळाच्या वेदना, अर्धशिशीने कपाळ उठणे. (२३)

दुःखे माज आणि मान। पुष्ठी ग्रीवा आणि वदन।
अस्तिसांदे दुःखती जाण। या नांव आध्यात्मिक॥ २४॥

मान आणि कंबर दुखणे, पाठ, गळा आणि तोंड दुखणे, हाडांचे सांधे दुखणे. (२४)

कुळिक तरळ कामिणी। मुरमा सुंठरें माळिणी।
विदेसीं लागलें पाणी। या नांव आध्यात्मिक॥ २५॥

मोडशी, अजीर्णाची हागओक, कावीळ, पुरळ, गळवे, गंडमाळा, विदेशांतील पाणी लागणे. (२५)

जळसोस आणि हिवारें। गिरीविरी आणि अंधारे।
ज्वर पाचाव आणि शारें। या नांव आध्यात्मिक॥ २६॥

कोरड पडणे, हिवताप, गरगरणे आणि अंधारी येणे. उलटलेला ज्वर, ज्वर आणि शहारे येणे. (२६)

शैत्य उष्ण आणि तृष्णा। क्षुधा निद्रा आणी दिशा।
विषयतृष्णेची दुर्दशा। या नांव आध्यात्मिक॥ २७॥

शैत्य, उष्ण, तहान, भूक, निद्रा आणि हगवण, विषयवासनेच्या अतिरेकाने होणारी दुर्दशा. (२७)

**आळसी मूर्ख आणी अपेसी। भय उद्भवे मानसीं।**
**विसराळु दुश्चित्त आहिर्निशी। या नांव आध्यात्मिक॥ २८॥**

आळशी, मूर्ख, अपयश, मनात भय उत्पन्न होणे, विसराळू असणे आणि रात्रंदिवस उद्विग्न असणे. (२८)

**मूत्रकोड आणी परमें। रक्तपिती रक्तपरमें।**
**खडाचढाचेनि श्रमे। या नांव आध्यात्मिक॥ २९॥**

लघवी अडणे, परमा, गरमी, रक्तपिती आणि रक्तपरमे, मूतखड्याचा त्रास होणे. (२९)

**मुरडा हागवण उन्हाळे। दिशा कोंडतां आंदोळे।**
**येक वेथा असोन न कळे। या नांव आध्यात्मिक॥ ३०॥**

मुरडा, हागवण, उन्हाळे लागणे, अवरोध झाला असता त्रासणे किंवाा रोग असून तो कोणता हे न कळणे. (३०)

**गांठी ढळली जाले जंत। पडे आंव आणी रक्त।**
**अन्न तैसेंचि पडत। या नांव आध्यात्मिक॥ ३१॥**

गाठ सरकणे, जंत होणे, आव आणि रक्त पडणे किंवा अन्न न पचता तसेच पडणे. (३१)

**पोटफुगी आणि तडस। भरला हिर लागला घांस।**
**फोडी लागतां कासावीस। या नांव आध्यात्मिक॥ ३२॥**

पोटफुगी, तडस लागणे, ठसका लागणे, घास लागणे, मुखातील लहान फोडामुळे जीव कासावीस होणे. (३२)

**उचकी लागली उसित गेला। पीत उसळलें उलाट जाला।**
**खरे पडसा आणि खोंकला। या नांव आध्यात्मिक॥ ३३॥**

उचकी लागणे, घास अडकणे, पित्त उसळून उलटी होणे, जीभकाटे, पडसे, खोकला होणे. (३३)

**उसळला दमा आणी धाप। पडजिभ ढासि आणी कफ।**
**मोवाज्वर आणी संताप। या नांव आध्यात्मिक॥ ३४॥**

दमा उसळून धाप लागणे, पडजिभेमुळे ढास लागणे, कफ होणे, मोवाज्वर आणि संताप येणे. (३४)

**कोणी सेंदुर घातला। तेणें प्राणी निर्बुजला।**
**घशामध्यें फोड जाला। या नांव आध्यात्मिक॥ ३५॥**

कोणी शेंदूर खायला घातल्याने मनावर परिणाम होणे. घशामध्ये फोड येणे. (३५)

**गळसोट्या आणी जीभ झडे। सदा मुखीं दुर्गंधी पडे।**
**दंतहीन लागती किडे। या नांव आध्यात्मिक॥ ३६॥**

घटसर्प आणि जीभ झडणे, तोंडाला सदा दुर्गंधी येणे, दात पडून हिरड्यांना कीड लागणे. (३६)

**जरंडी घोलाणा गंडमाळा। अवचिता स्वयें फुटे डोळा।**
**आपणचि कापी अंगुळा। या नांव आध्यात्मिक॥ ३७॥**

पांथरी वाढणे, घोळणा फुटणे, गंडमाळा, अकस्मात डोळा फुटणे, आपलेच बोट आपण कापून घेणे. (३७)

**कळा तिडका लागती। कां तें दंत उन्मळती।**
**अधर जिव्हा रगडती। या नांव आध्यात्मिक॥ ३८॥**

कळा व तिडका लागणे, दात उपटले जाणे, दातांनी ओठ किंवा जीभ चावली जाणे. (३८)

**कर्णदुःख नेत्रदुःख। नाना दुःखें घडे शोक।**
**गर्भांध आणि नपुश्यक। या नांव आध्यात्मिक॥ ३९॥**

कान ठणकणे, डोळे दुखणे, नाना प्रकारच्या दुःखामुळे शोक होणे, गर्भांध किंवा नपुंसक असणे. (३९)

**फुलें वडस आणी पडळें। कीड गर्ता रातांधळें।**
**दुश्चित्त भ्रमिष्ट आणी खुळें। या नांव आध्यात्मिक॥ ४०॥**

डोळ्यात फूल पडणे, वडस वाढणे, मोतीबिंदू, काचबिंदू होणे, पापण्यांना कीड पडणे, डोळे असून न दिसणे, रातांधळेपणा, दुश्चित्तपणा, भ्रमिष्टपणा आणि खुळेपणा. (४०)

**मुकें बधीर राखोंडें। थोटें चळलें आणी वेडें।**
**पांगुळ कुऱ्हें आणी पावडें। या नांव आध्यात्मिक॥ ४१॥**

मुकेपणा, बधिरपणा, ओठ तुटणे, हात तुटणे, वृत्ती चळणे, वेडेपणा, पांगळेपणा, आखूड पाय असणे, कुबड असणे. (४१)

**तारसें घुलें काणें कैरें। गारोळें जामुन टाफरें।**
**शडांगुळें गेंगाणें विदरें। या नांव आध्यात्मिक॥ ४२॥**

तारवटलेले डोळे असणे, वाकडी मान असणे, तिरळेपणा, घारे डोळे असणे, अति ठेंगणेपणा, सारखे ठेचकाळणे, हाताला सहा बोटे असणे, गेंगणेपणा, कुरूपता. (४२)

दांतिरें बोचिरें घानाळ। घ्राणहीन श्रोत्रहीन बरळ।
अतिकृश अतिस्थूळ। या नांव आध्यात्मिक ॥ ४३॥
तोंतरें बोंबडें निर्बळ। रोगी कुरूप कुटीळ।
मत्सरी खादाड तपीळ। या नांव आध्यात्मिक ॥ ४४॥
संतापी अनुतापी मत्सरी। कामिक हेवा तिरस्कारी।
पापी अवगुणी विकारी। या नांव आध्यात्मिक ॥ ४५॥
उठवणें ताठा करक। आवटळे आणी लचक।
सुजी आणी चालक। या नांव आध्यात्मिक ॥ ४६॥
सल आडवें गर्भपात। स्तनगुंते सनपात।
संसारकोंडे आपमृत्य। या नांव आध्यात्मिक ॥ ४७॥
नखविख आणी हिंगुर्डे। बाष्ट आणि वावडें।
उगीच दांतखिळ पडे। या नांव आध्यात्मिक ॥ ४८॥
झडती पातीं सुजती भवया। नेत्रीं होती राझणवडीया।
चाळसी लागे प्राणियां। या नांव आध्यात्मिक ॥ ४९॥
वांग तिळ सुरमें लांसे। चामखिळ गलंडें मसें।
चुकुर होईजे मानसें। या नांव आध्यात्मिक ॥ ५०॥
नाना फुग आणी आवाळें। आंगीं दुर्गंधी प्रबळे।
चाईचाटी लाळ गळे। या नांव आध्यात्मिक ॥ ५१॥
नाना चिंतेची काजळी। नाना दुःखें चित्त पोळी।
व्याधीवांचून तळमळी। या नांव आध्यात्मिक ॥ ५२॥
वृद्धपणीच्या आपदा। नाना रोग होती सदा।
देह क्षीण सर्वदा। या नांव आध्यात्मिक ॥ ५३॥
नाना व्याधी नाना दुःखें। नाना भोग नाना खांडकें।
प्राणी तळमळी शोकें। या नांव आध्यात्मिक ॥ ५४॥
ऐसा आध्यात्मिक ताप। पूर्वपापाचा संताप।
सांगतां सरेना अमूप। दुःखसागर ॥ ५५॥
बहुत काय बोलावें। श्रोतीं संकेतें जाणावें।
पुढें बोलिजे स्वभावें। आदिभूतिक ॥ ५६॥

दांतरेपणा, बोचरेपणा, लांब नाक असणे, नाकच नसणे, कान नसणे, बडबड करणे, अतिकृशता, अतिस्थूलता. (४३)

तोतरेपणा, बोबडेपणा, अशक्तपणा, रोगटपणा, कुरूपता, कुटिलता, मत्सरी स्वभाव, खादाडपणा, तापटपणा. (४४)

संतापणे, पश्चात्ताप करणे, मत्सर करणे, कामना असणे, हेवा अथवा तिरस्कार करणे, पाप करणे, अवगुण असणे, विकारवशता. (४५)

उठता न येणे, अंग ताठणे, अवघडणे, लचकणे, सूज येणे आणि संधिवात. (४६)

न वाढणारा गर्भ, मूल आडवे येणे, गर्भपात होणे, स्तनात गाठी होणे, सन्निपात, संसारातील अडचणी, अपमृत्यू. (४७)

नखविष आणि नखुर्डे, शिळे व वातुळ खाण्याने होणारे रोग, वावडे खाण्याने होणारा त्रास, उगीच दातखीळ बसणे. (४८)

डोळ्यांच्या पापण्या झडणे, भुवया सुजणे, डोळ्याला रांजणवाड्या होणे, डोळ्यांना चष्मा लागणे. (४९)

काळसर पुळ्या, तीळ, पांढरे चट्टे, काळे चट्टे, चामखीळ, गालगुंड, केसाळ काळे चट्टे, मनाने भ्रमिष्ट होणे. (५०)

अंगावर येणारे फुगवटे, आवाळे, अंगाला अत्यंत दुर्गंधी येणे, डोक्यावरील केस गळून चट्टे पडणे, तोंडातून लाळ गळणे. (५१)

नाना प्रकारच्या चिंतेने काळवंडणे, नाना दुःखांनी चित्त पोळून निघणे, काही आजार नसून जीवाची तगमग होणे. (५२)

वृद्धपणाच्या यातना, सदा काही ना काही रोग होणे, देह नेहमी क्षीण असणे. (५३)

नाना रोग व नाना प्रकारचे दुःख, नाना भोग, अनेक जखमा, यांमुळे माणसाला दुःख होऊन तळमळणे. (५४)

अशा प्रकारचे आध्यात्मिक ताप हे पूर्वजन्मातील पातकांचे फळ असते. त्यांचे कितीही वर्णन केले तरी पुरे पडत नाही, असा हा न संपणारा दुःखाचा समुद्र आहे. (५५)

श्रीसमर्थ म्हणतात की, आणखी किती वर्णन करावे? श्रोत्यांनी वरील उदाहरणांवरून समजून घ्यावे. आता पुढील समासात स्वाभाविकच आधिभौतिक तापाचे निरूपण केले जाईल. (५६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आध्यात्मिकतापनाम' समास सहावा समाप्त.**

❑ ❑

## दशक ३ : समास ७

# आदिभूतिकताप

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। आध्यात्मिकाचें लक्षण।
आतां आदिभूतिक तो कोण। सांगिजेल ॥ १ ॥

श्लोक

सर्वभूतेन संयोगात् सुखं दु:खं च जायते।
द्वितीयतापसंताप: सत्यं चैवाधिभौतिक: ॥ १ ॥

सर्व भूतांचेनि संयोगें। सुख दु:ख उपजों लागे।
ताप होतां मन भंगे। या नांव आदिभूतिक ॥ २ ॥

तरी या आदिभूतिकाचें लक्षण। प्रांजळ करूं निरूपण।
जेणें अनुभवास ये पूर्ण। वोळखी तापत्रयाची ॥ ३ ॥

ठेंचा लागती मोडती कांटे। विझती शस्त्रांचे घायटे।
सल सिल्का आणी सरांटे। या नांव आदिभूतिक ॥ ४ ॥

अंग्या आणि काचकुहिरी। आवचटा लागे शरीरीं।
गांधील येऊन दंश करी। या नांव आदिभूतिक ॥ ५ ॥

मासी गोमासी मोहळमासी। मुंगी तेलमुंगी डांस दसी।
सोट जळु लाग यासी। आदिभूतिक बोलिजे ॥ ६ ॥

पिसा पिसोळे चांचण। कुसळें मुंगळे ढेंकुण।
विसीफ भोवर गोंचिड जाण। या नांव आदिभूतिक ॥ ७ ॥

गोंबी विंचु आणी विखार। व्याघ्र लांडिगे आणी शूकर।
गौसायळ सामर। या नांव आदिभूतिक ॥ ८ ॥

रानगाई रानम्हैसे। रानशकट्ट आणी रींसें।
रानहाती लावपिसें। या नांव आदिभूतिक ॥ ९ ॥

सुसरीनें वोढून नेलें। कां तें आवचितें बुडालें।
अथवा खळाळीं पडिलें। या नांव आदिभूतिक ॥ १० ॥

नाना विखारें आजगर। नाना मगरें जळचर।
नाना वनचरें अपार। या नांव आदिभूतिक ॥ ११ ॥

अश्व वृषभ आणी खर। स्वान शूकर जंबुक मार्जर।
ऐसीं बहुविध क्रूर। या नांव आदिभूतिक ॥ १२ ॥

श्री समर्थ म्हणतात की, मागील समासात आध्यात्मिक तापाचे लक्षण वर्णन केले. आता आधिभौतिक ताप कोणता ते सांगितले जाईल. (१)

**अर्थ**– सर्व भूतमात्रांच्या संयोगाने जे सुख-दु:ख उत्पन्न होते, त्या दुसऱ्या दु:खाला यथार्थ रीतीने आधिभौतिक असे म्हणतात. (१)

सर्व भूतांच्या संयोगाने जे सुख-दु:ख उत्पन्न होते, त्याने ताप होऊन मन दु:खी होते, त्याला आधिभौतिक असे म्हणतात. (२)

तरी आता या आधिभौतिक तापाची लक्षणे स्पष्टपणे वर्णन करू या, म्हणजे त्यायोगे तापत्रयाची चांगली ओळख होऊन अनुभवही येईल. (आधिभौतिक दु:खे पुढीलप्रमाणे) (३)

ठेच लागणे, पायात काटे मोडणे, शस्त्रांचे घाव लागून जखमा होणे, लाकडाचे बारीक काट्यासारखे कुसळ, चुया आणि सराटे इत्यादी घुसणे. (४)

आग्या वनस्पती शरीरास अकस्मात लागून आग होणे किंवा खाजकुहिरी लागून अंगास खाज सुटणे, गांधीलमाशी येऊन चावणे. (५)

माशी, गोमाशी, मोहोळमाशी, मुंगी, तेलमुंगी, डास यांनी दंश करणे किंवा सोट म्हणजे रक्त पिणारा किडा किंवा जळू अंगास चिकटणे. (६)

पिसवा, पिसोळे, चांचड, कुसळे, मुंगळे, ढेकूण, इसब उत्पन्न करणारे किडे, भुंगे, गोचीड यांचा दंश. (७)

गोम, विंचू आणि साप, वाघ, लांडगे आणि डुक्कर, साळू, सांबर यांचे दंश. (८)

रानगाई, रानम्हशी, रानबैल, अस्वले, रानहत्ती इत्यादी जनावरांचा मार आणि डाकिणीमुळे लागणारे वेड. (९)

सुसरीने ओढून नेणे किंवा अवचित बुडून मरणे अथवा पाय घसरून प्रवाहात पडणे. (१०)

नाना विषारी साप, अथवा अजगर, मगरी वगैरे नाना जलचर प्राणी यांनी ओढून नेणे. अनेक जंगली प्राण्यांपासून दु:ख होणे. (११)

घोडा, बैल, गाढव, कुत्री, डुक्कर, कोल्हे, मांजर अशा अनेक क्रूर पशूंमुळे दु:ख होणे. (१२)

ऐसीं कर्कशें भयानकें । बहुविध दुःखदायकें ।
दुःखें दारुणें अनेकें । या नांव आदिभूतिक ॥ १३ ॥

भिंती माळवदें पडती । कडे भुयेरीं कोंसळती ।
वृक्ष आंगावरी मोडती । या नांव आदिभूतिक ॥ १४ ॥

कोणी येकाचा श्राप जडे । कोणी येकें केलें चेडें ।
आधांतरी होती वेडे । या नांव आदिभूतिक ॥ १५ ॥

कोणी येकें चाळविलें । कोणी येकें भ्रष्टविलें ।
कोणी येकें धरून नेलें । या नांव आदिभूतिक ॥ १६ ॥

कोणी येकें दिलें वीष । कोणी येकें लाविले दोष ।
कोणी येकें घातले पाश । या नांव आदिभूतिक ॥ १७ ॥

अवचिता सेर लागला । नेणों बिबवा चिडला ।
प्राणी धुरें जाजावला । या नांव आदिभूतिक ॥ १८ ॥

इंगळावरी पाय पडे । शिळेखालें हात सांपडे ।
धावतां आडखुळे पडे । या नांव आदिभूतिक ॥ १९ ॥

वापी कूप सरोवर । गर्ता कडा नदीतीर ।
आवचितें पडे शरीर । या नांव आदिभूतिक ॥ २० ॥

दुर्गाखाले कोंसळती । झाडावरून पडती ।
तेणें दुःखें आक्रंदती । या नांव आदिभूतिक ॥ २१ ॥

सीतें वोठ तरकती । हात पाव टांका फुटती ।
चिखल्या जिव्हाळ्या लागती । या नांव आदिभूतिक ॥ २२ ॥

अशनपानाचिये वेळे । उष्ण रसें जिव्हा पोळे ।
दांत कस्करे आणि हरळे । या नांव आदिभूतिक ॥ २३ ॥

पराधेन बाळपणीं । कुशब्दमारजाचणी ।
अन्नवस्त्रेंवीण आळणी । या नांव आदिभूतिक ॥ २४ ॥

सासुरवास गालोरे । ठुणके लासणें चिमोरे ।
आलें रुदन न धरे । या नांव आदिभूतिक ॥ २५ ॥

चुकतां कान पिळिती । कां तो डोळां हिंग घालिती ।
सर्वकाळ धारकीं धरिती । या नांव आदिभूतिक ॥ २६ ॥

नाना प्रकारीचे मार । दुर्जन मारिती अपार ।
दुरी अंतरे माहेर । या नांव आदिभूतिक ॥ २७ ॥

अशी कर्कश, भयानक, नाना प्रकारे दुःख देणारी अनेक दारुण दुःखे. (१३)

भिंती आणि गच्च्या कोसळणे, कडे, भुयारे कोसळून अंगावर पडणे किंवा झाडे मोडून अंगावर पडणे. (१४)

कुणा एकाचा शाप बाधणे, कोणी तरी जादूटोणा करणे, कारण नसताना वेड लागणे. (१५)

कुणीतरी फसविणे, कोणी तरी भ्रष्टविणे, कोणीतरी धरून नेणे. (१६)

कुणी तरी विष देणे, कुणी तरी दोषारोप करणे, कुणीतरी फास घालणे. (१७)

कल्पना नसताना शेराच्या झाडाचा चीक अंगाला लागणे, बिब्बा उतणे किंवा धुराने जीव घाबरा होणे. (१८)

मोठ्या विंचवावर, इंगळीवर पाय पडणे, दगडाखाली हात सापडणे, धावताना अडखळून पडणे. (१९)

विहिरी, कूप, सरोवर, मोठा खड्डा, कडा किंवा नदीतीर या ठिकाणी एकाएकी शरीर पडणे. (२०)

किल्ल्यावरून खाली कोसळणे, झाडावरून पडणे आणि त्या दुःखाने आक्रोश करणे. (२१)

थंडीने ओठ फुटणे, हात, पाय, टाचा यांना भेगा पडणे, चिखल्या होणे, जिव्हाळी लागणे. (२२)

खातापिताना उष्ण पदार्थाने जीभ पोळणे, दात करकरणे आणि दातात फटी पडणे. (२३)

बालपणी पराधीनतेमुळे शिव्यांचा, वाईट शब्दांचा मार सोसावा लागणे, अन्नवस्त्रांची कमतरता असणे. (२४)

मुलींना सासुरवासापायी गालगुच्चे, ठोसे, चिमटे, डागणे, इत्यादी जाच सोसताना रडू न आवरणे. (२५)

चूक झाली असता कान पिळला जाणे, डोळ्यांत हिंग घालणे, सतत धारेवर धरणे. (२६)

दुष्टांनी नाना तऱ्हेने मारहाण करणे, मुलींना माहेर दुरावणे. (२७)

**कर्ण नासिक विंधिलें। बळेंचि धरून गोंधिले।**
**खोडी जालिया पोळविलें। या नांव आदिभूतिक॥ २८॥**

कानाला, नाकाला भोके पडणे, बळेच धरून गोंदणे, जरा चूक झाली असता आगीचे चटके देणे. (२८)

**परचक्रीं धरून नेलें। नीच यातीस दिधलें।**
**दुर्दशा होऊन मेलें। या नांव आदिभूतिक॥ २९॥**

शत्रूचा हल्ला आला असता त्यांनी धरून नेणे, नीच जातीच्या लोकांना विकून टाकणे आणि त्यामुळे दुर्दशा होऊन मरण पावणे. (२९)

**नाना रोग उद्भवले। जे आध्यात्मिकीं बोलिले।**
**वैद्य पंचाक्षरी आणिले। या नांव आदिभूतिक॥ ३०॥**

पूर्वी जे आध्यात्मिक रोग वर्णन केले आहेत, त्यातील अनेक रोग होणे. त्यांच्या उपचारांकरिता वैद्य अथवा मांत्रिक आणणे. (३०)

**नाना वेथेचें निर्शन। व्हावया औषध दारुण।**
**बळात्कारें देती जाण। या नांव आदिभूतिक॥ ३१॥**

अनेक रोगांचे निरसन करण्यासाठी बळजबरीने दारुण औषधे देणे. (३१)

**नाना वल्लीचे रस। काडे गर्गोड कर्कश।**
**घेतां होये कासावीस। या नांव आदिभूतिक॥ ३२॥**

नाना वनस्पतींचे रस, काढे, व कडवट चाटणे वगैरे घेताना जीव कासावीस होणे. हे सर्व आधिभौतिक तापच आहेत. (३२)

**ढाळ आणी उखाळ देती। पथ्य कठीण सांगती।**
**अनुपान चुकतां विपत्ती। या नांव आदिभूतिक॥ ३३॥**

जुलाब आणि वांतीचे औषध घ्यावे लागणे, कडक पथ्य करावे लागणे, अनुपानात चूक झाल्याने कष्ट होणे. (३३)

**फाड रक्त फांसणी। गुल्लडागांची जाचणी।**
**तेणें दुःखें दुःखवे प्राणी। या नांव आदिभूतिक॥ ३४॥**

शरीराची चिरफाड करणे, गाठीवर शस्त्राने चिरा पाडणे व त्यामुळे रक्तस्राव होणे, तप्त सळईचे डाग घेणे व त्यायोगे दुःखाने व्याकूळ होणे. (३४)

**रुचिक बिबवे घालिती। नाना दुःखें दडपे देती।**
**सिरा तोडिती जळवा लाविती। या नांव आदिभूतिक॥ ३५॥**

रुईचा चीक अथवा बिब्बा घालणे, नाना दुःखाचे आघात होणे, शिरा तोडणे, जळवा लावणे. (३५)

**बहु रोग बहु औषधें। सांगतां अपारें अगाधें।**
**प्राणी दुखवे तेणें खेदें। या नांव आदिभूतिक॥ ३६॥**

नाना रोग व त्यावर नाना प्रकारची औषधे आणि उपचार आहेत. ते वर्णन करावयाचे ठरवले तर अपार, अगाध असल्याने पुरे पडणार नाही. या दुःखांनी अत्यंत दुःख होणे. (३६)

**बोलाविला पंचाक्षरी। धूरमार पीडा करी।**
**नाना यातना चतुरीं। आदिभूतिक जाणिजे॥ ३७॥**

पंचाक्षरी म्हणजे मांत्रिक बोलावला असता त्याने धुराचा मारा करणे अशा नाना प्रकारच्या यातना आहेत त्या शहाण्यांनी आधिभौतिक म्हणून जाणाव्या. (३७)

**दरवडे घालूनियां जना। तश्कर करिती यातना।**
**तेणें दुःख होये मना। या नांव आदिभूतिक॥ ३८॥**

चोर दरोडे घालून लोकांना छळतात, त्यामुळे मनाला फार दुःख होणे. (३८)

**अग्नीचेनि ज्वाळें पोळे। तेणे दुःखें प्राणी हरंबळे।**
**हानी जालियां विवळे। या नांव आदिभूतिक॥ ३९॥**

अग्नीच्या ज्वाळांनी होरपळल्यामुळे व्याकूळ होणे, अन्य नुकसान झाले तरी विव्हळणे. (३९)

**नाना मंदिरें सुंदरें। नाना रत्नांचीं भांडारें।**
**दिव्यांबरें मनोहरें। दग्ध होती॥ ४०॥**

नाना सुंदर मंदिरे, अनेक रत्नांचे साठे, अनेक मनोहर दिव्य वस्त्रे इत्यादी जळणे. (४०)

**नाना धान्यें नाना पदार्थ। नाना पशु नाना स्वार्थ।**
**नाना पात्रें नाना अर्थ। मनुष्यें भस्म होती॥ ४१॥**

नाना धान्ये, नाना पदार्थ, नाना पशू, घरात साठविलेले द्रव्य, भांडी- कुंडी, नाना वस्तू आणि माणसे जळून जाणे. (४१)

**आग्न लागला सेती। धान्यें बणव्या आणि खडकुती।**
**युक्षदंड जळोन जाती। अकस्मात॥ ४२॥**

शेते, धान्ये, गवताच्या गंजी आणि मळणीनंतर उरलेले कुठार, ऊस वगैरे अकस्मात जळून जाणे. (४२)

ऐसा आग्न लागला। अथवा कोणीं लाविला।
हानी जाली कां पोळला। या नांव आदिभूतिक॥ ४३॥

अशी आग कोणी लावली किंवा आपोआप लागली तरी त्यामुळे नुकसान होणे किंवा भाजणे. (४३)

ऐसे सांगतां बहुत। होती वन्हीचे आघात।
तेणें दुःखें दुःखवें चित्त। या नांव आदिभूतिक॥ ४४॥

अशा अनेक प्रकाराने आगीपासून नुकसान होतच असते, त्या दुःखाने जीव व्याकूळ होणे. (४४)

हारपे विसरे आणि सांडे। नासे गाहाळे फुटे पडे।
असाध्य होये कोणीकडे। या नांव आदिभूतिक॥ ४५॥

वस्तू हरवणे, विसरणे किंवा सांडून जाणे, नासून जाणे, गहाळ होणे किंवा पडून फुटणे, परत मिळणे अशक्य होणे. (४५)

प्राणी स्थानभ्रष्ट जालें। नाना पशूतें चुकलें।
कन्यापुत्र गाहाळले। या नांव आदिभूतिक॥ ४६॥

माणूस स्थानभ्रष्ट होणे, जनावरे चुकणे, मुली, मुले बेपत्ता होणे. (४६)

तश्कर अथवा दावेदार। आवचिता करिती संव्हार।
लुटिती घरें नेती खिल्लार। या नांव आदिभूतिक॥ ४७॥

चोर किंवा शत्रू यांनी अवचित धाड घालून संहार करणे, घरे लुटणे, दुभती जनावरे पळवून नेणे. (४७)

नाना धान्यें केळी कापिती। पानमळां मीठ घालिती।
ऐसे नाना आघात करिती। या नांव आदिभूतिक॥ ४८॥

शेतातील उभी पिके, केळी वगैरे कापून नेणे, पानमळ्याचे नुकसान व्हावे म्हणून त्यात मीठ घालणे असे नाना प्रकारचे आघात. (४८)

मैंद उचले खाणोरी। सुवर्णपंथी भुरेकरी।
ठकु सिंतरु वरपेकरी। वरपा घालिती॥ ४९॥

गठीछोडे द्रव्य सोडिती। नाना आळंकार काढिती।
नाना वस्तू मूषक नेती। या नांव आदिभूतिक॥ ५०॥

पेंढारी, उचलेगिरी करणारे भुरटे चोर, काळीज खाणारे, किमयागार, भुलविणारे ठग, लुच्चे, लबाड लोक, लुटारू, दरोडेखोर इत्यादींची पीडा. वाटमाऱ्यांनी गाठोडी सोडून द्रव्य व नाना अलंकार पळविणे, उंदरांनी अनेक वस्तू नेणे. (४९-५०)

वीज पडे हिंव पडे। प्राणी प्रजनीं सांपडे।
कां तो माहापुरीं बुडे। या नांव आदिभूतिक॥ ५१॥

अंगावर वीज पडणे, अत्यंत थंडी पडणे, मुसळधार पावसात सापडणे, महापुरात वाहून जाणे, बुडणे. (५१)

भोंवरे वळणें आणी धार। वोसाणें लाटा अपार।
वृश्चिक गोंबी आजगर। वाहोन जाती॥ ५२॥

भोवऱ्यात, वळणात किंवा धारेत सापडणे, पुरात वाहून येणारी लाकडे, अपार लाटा आणि महापुराबरोबर वाहून येणारे अजगर विंचू, गोमा इत्यादी प्राण्यांचा त्रास. (५२)

तयांमधें प्राणी सांपडला। खडकीं बेटीं आडकला।
बुडत बुडत वांचला। या नांव आदिभूतिक॥ ५३॥

या सर्वांमध्ये माणूस सापडणे किंवा एखाद्या खडकावर अथवा बेटावर अडकणे, बुडता बुडता वाचणे. (५३)

मनासारिखा नसे संसार। कुरूप कर्कश स्त्री क्रूर।
विधवा कन्या मूर्ख पुत्र। या नांव आदिभूतिक॥ ५४॥

कुरूप, कर्कश आणि निर्दय बायको मिळणे, कन्या विधवा होणे आणि पुत्र मूर्ख निपजणे, यांसारख्या कारणांनी प्रपंच मनासारखा न होणे. (५४)

भूत पिशाच्च लागलें। आंगावरून वारें गेलें।
अबद्ध मंत्रें प्राणी चळलें। या नांव आदिभूतिक॥ ५५॥

भूतपिशाच्च लागणे, अंगावरून वारे जाणे, चुकलेल्या मंत्रामुळे मनुष्य भ्रमिष्ट होणे. (५५)

**ब्राह्मणसमंध शरीरीं । बहुसाल पीडा करी ।**
**शनेश्वराचा धोका धरी । या नांव आदिभूतिक ॥ ५६ ॥**

ब्राह्मणसमंधाने देह झपाटून अनेक वर्षे छळणे. शनीची वाईट दशा, साडेसाती वगैरे येणे. (५६)

**नाना ग्रहे काळवार । काळतिथी घातचंद्र ।**
**काळवेळ घातनक्षत्र । या नांव आदिभूतिक ॥ ५७ ॥**

इतर ग्रहांची वाईट दशा येणे. काळवार, काळतिथी, चंद्राचे घातक योग, काळवेळ आणि घातनक्षत्र यांपासून त्रास. (५७)

**सिंक पिंगळा आणी पाली । वोखटें होला काक कलाली ।**
**चिंता काजळी लागली । या नांव आदिभूतिक ॥ ५८ ॥**

शिंकेचा अपशकुन होणे, पाल चुकचुकणे, पिंगळा होला, कावळा, कलाली इत्यादींनी अपशकुन केल्याने चिंता, काळजी लागणे. (५८)

**दिवटा सरवदा भाकून गेला । अंतरीं धोका लागला ।**
**दुःस्वप्नें जाजावला । या नांव आदिभूतिक ॥ ५९ ॥**

कुडमुड्या जोशी, भविष्य सांगणारा ज्योतिषी यांनी सांगितल्यामुळे काळजी लागणे, वाईट स्वप्ने पडून त्यामुळे भय वाटणे. (५९)

**भालु भुंके स्वान रडे । पाली आंगावरी पडे ।**
**नाना चिन्हें चिंता पवाडे । या नांव आदिभूतिक ॥ ६० ॥**

कोल्हेकुई, कुत्र्याचे रडणे, पाल अंगावर पडणे, इत्यादी अनेक अपशकुनांच्या योगे मनात चिंता उत्पन्न होणे. (६०)

**बाहेरी निघतां अपशकुन । नाना प्रकारें विच्छिन्न ।**
**तेणें गुणें भंगे मन । या नांव आदिभूतिक ॥ ६१ ॥**

घराबाहेर पडताना नाना प्रकारे अपशकुन होऊन त्यामुळे मन खिन्न, उदास होणे. (६१)

**प्राणी बंदीं सांपडला । यातने वरपडा जाला ।**
**नाना दुःखें दुःखवला । या नांव आदिभूतिक ॥ ६२ ॥**

कैदेत सापडून तेथे अनेक प्रकारच्या यातना भोगाव्या लागणे आणि त्यायोगे नाना प्रकारचे दुःख सोसावे लागणे. (६२)

**प्राणी राजदंड पावत । जेरबंद चाबुक वेत ।**
**दरेमार तळवेमार होत । या नांव आदिभूतिक ॥ ६३ ॥**

राजाकडून दंड किंवा शिक्षा होणे, घोड्याच्या काढण्या, चाबूक, वेताची छडी यांनी मारणे, दरीत लोटून मारणे किंवा तापलेल्या तव्यावर उभे करून मारणे. (६३)

**कोरडे पारंब्या फोक । बहुप्रकारें अनेक ।**
**बहु ताडिती आदिभूतिक । या नांव बोलिजे ॥ ६४ ॥**

चामड्याचा चाबूक, झाडाच्या पारंब्या आणि फोक म्हणजे झाडाची सालपटे अशी मारण्याची अनेक साधने वापरून दिलेला खूप मार सोसणे. (६४)

**मोघरीमार बुधलेमार । चौखुरून डंगारणेमार ।**
**बुक्या गचांड्या गुडघेमार । या नांव आदिभूतिक ॥ ६५ ॥**

गुदद्वारी मेख मारणे, दारूच्या बुधल्यास बांधून आग लावून देणे. चारी बाजूंनी ताणून धरून बडग्यांनी मारणे, बुक्क्या मारणे, गचांड्या मारणे, गुडघ्यावर मारणे. (६५)

**लाता चतराखा सेणमार । कानखडे दगडमार ।**
**नाना प्रकारींचे मार । या नांव आदिभूतिक ॥ ६६ ॥**

लाथा मारणे, चपराका मारणे, शेणमारा करणे, कानात खडे खुपसणे, दगडांनी मारणे, अशा नाना प्रकारांनी मारणे. (६६)

**टांगणें टिपऱ्या पिछोडे । बेडी बुधनाल कोलदंडे ।**
**रक्षणनिग्रह चहूंकडे । या नांव आदिभूतिक ॥ ६७ ॥**

टांगणे, चाप लावणे, दोन्ही हात खेचून मागे बांधणे, बेड्या घालणे, झाडाच्या बुंध्याशी नालाकृती बांधून मारणे, कोलदांडे घालणे, इकडे तिकडे जराही हलू न देणे. (६७)

**नाकवणी चुनवणी । मीठवणी रायवणी ।**
**गुळवण्याची जाचणी । या नांव आदिभूतिक ॥ ६८ ॥**

नाकात तीक्ष्ण पदार्थ ओतणे किंवा चुन्याचे पाणी, मिठाचे पाणी, मोहरीचे पाणी, गुळाचे पाणी नाकात, कानात वा घशात ओतल्याने यातना होणे. (६८)

**जळामध्यें बुचकुळिती । हस्तीपुढें बांधोन टाकिती ।**
**हाकिती छळिती यातायाती । या नांव आदिभूतिक ॥ ६९ ॥**

पाण्यात बुचकळणे, हात पाय बांधून हत्तीपुढे टाकणे, गुरांप्रमाणे हाकणे, छळणे, उगाच कष्ट देणे.(६९)

**कर्णछेद घ्राणछेद । हस्तछेद पादछेद ।**
**जिव्हाछेद अधरछेद । या नांव आदिभूतिक ॥ ७० ॥**

कान कापणे, नाक कापणे, हात, पाय तोडणे, जीभ कापणे, ओठ कापणे. (७०)

**तीरमार सुळीं देती । नेत्र वृषण काढिती ।**
**नखोनखीं सुया मारिती । या नांव आदिभूतिक ॥ ७१ ॥**

बाणांनी मारणे, सुळी देणे, डोळे काढणे, वृषण कापणे, नखांत सुया मारणे. (७१)

**पारड्यामध्यें घालणें । कां कडेलोट करणें ।**
**कां भांड्यामुखें उडवणें । या नांव आदिभूतिक ॥ ७२ ॥**

पारड्यामध्ये घालणे, कडेलोट करणे किंवा तोफेच्या तोंडी उडविणे. (७२)

**कानीं खुंट्या आदळिती । अपानीं मेखा मारिती ।**
**खाल काढून टाकिती । या नांव आदिभूतिक ॥ ७३ ॥**

कानात खुंट्या ठोकणे, गुदद्वारी मेख मारणे, नखशिखांत अंगाचे कातडे सोलणे. (७३)

**भोत आणी बोटबोटी । अथवा गळ घालणें कंठीं ।**
**सांडस लावून आटाटी । या नांव आदिभूतिक ॥ ७४ ॥**

पोत्यात भरून मारणे, बोटे ठेचून मारणे, अथवा गळ्याला गळ टोचणे, तापलेल्या चिमट्याने वृषण किंवा स्तन दाबणे. (७४)

**सिसें पाजणें वीष देणें । अथवा सिरछेद करणें ।**
**कां पायातळीं घालणें । या नांव आदिभूतिक ॥ ७५ ॥**

उकळत्या शिशाचा रस पाजणे, विष देणे, शिरच्छेद करणे किंवा अंगावर माणसे नाचवून पायदळी तुडवून मारणे हे सर्व शिक्षेचे प्रकार. (७५)

**सरडे मांजरें भरिती । अथवा फांशी नेऊन देती ।**
**नानापरी पीडा करिती । या नांव आदिभूतिक ॥ ७६ ॥**

अंगावरील कपड्यात सरडे इत्यादी भरणे, बंद खोलीत पिसाळलेले मांजर अंगावर सोडणे, अथवा फाशी देणे, अशा नाना प्रकारांनी पीडा करणे. (७६)

**स्वानप्रळये व्याघ्रप्रळये । भूतप्रळये सुसरीप्रळये ।**
**शस्त्रप्रळये विझप्रळये । या नांव आदिभूतिक ॥ ७७ ॥**

कुत्री, वाघ, भुतेखेते, सुसरी, नाना शस्त्रे, अंगावर वीज पडणे वगैरेंचा अतिरेक होणे व त्यामुळे मरण ओढवणे. (७७)

**सीरा वोढून घेती । टेंभें लाऊन भाजिती ।**
**ऐशा नाना विपत्ती । या नांव आदिभूतिक ॥ ७८ ॥**

अंगातील शिरा तोडणे, टेंभे लावून त्यांनी अंगाला चटके देणे. अशा नाना विपत्ती. (७८)

**मनुष्यहानी वित्तहानी । वैभवहानी महत्त्वहानी ।**
**पशुहानी पदार्थहानी । या नांव आदिभूतिक ॥ ७९ ॥**

जवळची माणसे मरणे, वित्तहानी, वैभव नाहीसे होणे, मानसन्मान यांची हानी, जनावरे मरणे, इतर चीजवस्तू नाहीशी होणे. (७९)

**बाळपणीं मरे माता । तारुण्यपणीं मरे कांता ।**
**वृद्धपणीं मृत्य सुता । या नांव आदिभूतिक ॥ ८० ॥**

बालपणात आई मरणे, तरुणपणी बायको मरणे, म्हातारपणी मुलगा मरणे. (८०)

**दुःख दारिद्र आणी रुण । विदेशपळणी नागवण ।**
**आपदा अनुपत्ति कदान्न । या नांव आदिभूतिक ॥ ८१ ॥**

दुःख, दारिद्र्य, कर्ज, परदेशी पळून जावे लागणे, लूट होऊन सर्वस्वास मुकणे, संकटे येणे, आवश्यक वस्तूंचा तुटवडा भासणे, कदन्न खायची वेळ येणे. (८१)

**आकांत वाखा प्रळ्ये । युध्य होतां पराजये ।**
**जिवलगांचा होये क्षये । या नांव आदिभूतिक ॥ ८२ ॥**

महामारीने हजारो माणसे मरणे व त्यामुळे हाहाकार माजणे, युद्धात पराजय होणे, जिवलग माणसे मृत्यू पावणे. (८२)

कठीण काळ आणी दुष्काळ। साशंक आणि वोखटी वेळ।
उद्वेग चिंतेचे हळाळ। या नांव आदिभूतिक॥ ८३॥

आधीच कठीण काळ असता त्यात दुष्काळ पडणे, मनात धास्तावलेला असता वाईट वेळ येणे, उद्वेग आणि चिंता यांमुळे हालहाल होणे. (८३)

घाणा चरखीं सिरकला। चाकाखालें सांपडला।
नाना वन्हींत पडिला। या नांव आदिभूतिक॥ ८४॥

घाण्यात किंवा चरकात सापडून चाकाखाली येणे, नाना प्रकारच्या आगीत सापडणे. (८४)

नाना शस्त्रें भेदिला। नाना स्वापदीं भक्षिला।
नाना बंदीं पडिला। या नांव आदिभूतिक॥ ८५॥

नाना शस्त्रांनी जखमा होणे. नाना श्वापदांनी खाणे, अनेक लोकांच्या कैदेत पडणे. (८५)

नाना कुवासें निर्बुजे। नाना अपमानें लाजे।
नाना शोकें प्राणी झिजे। या नांव आदिभूतिक॥ ८६॥

नाना प्रकारच्या वाईट स्थळी राहावे लागल्याने श्वास कोंडणे, नाना प्रकारे अपमान झाल्याने लाज वाटणे, नाना प्रकारच्या शोकांनी खंगून जाणे, या सर्वांस आधिभौतिक तापच म्हणतात. (८६)

ऐसें सांगतां अपार। आहेत दुःखाचे डोंगर।
श्रोतीं जाणावा विचार। आदिभूतिकाचा॥ ८७॥

याप्रकारे आधिभौतिक ताप म्हणजे दुःखाचे डोंगरच असून ते अपार आहेत. येथे जे सांगितले आहेत, त्यावरून श्रोत्यांनी आधिभौतिक तापाच्या स्वरूपासंबंधी विचार जाणून घ्यावा, असे समर्थ म्हणतात. (८७)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आदिभूतिकतापनाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक ३ : समास ८

# आदिदैविकताप

॥ श्रीराम ॥

मागां बोलिला आध्यात्मिक। त्याउपरी आदिभूतिक।
आतां बोलिजेल आदिदैविक। तो सावध ऐका॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, प्रथम आध्यात्मिक तापाचे निरूपण केले. त्यानंतर आधिभौतिक तापाचे वर्णन केले. आता आधिदैविक तापासंबंधी जे सांगतो, ते श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावे. (१)

श्लोक

शुभाशुभेन कर्मणा देहांते यमयातना।
स्वर्गनरकादि भोक्तव्यमिदं चैवाधिदैविकम्॥ १॥

**अर्थ**—आपल्या चांगल्या-वाईट कर्माप्रमाणे आपण मेल्यानंतर आपल्याला ज्या यमयातना किंवा स्वर्ग नरकादींचे भोग भोगावे लागतात त्यांना आधिदैविक म्हणतात. (१)

शुभाशुभ कर्मानें जना। देहांतीं येमयातना।
स्वर्ग नर्क भोग नाना। या नांव आदिदैविक॥ २॥

लोकांना त्यांच्या चांगल्या किंवा वाईट कर्माच्या योगे मरणानंतर यमयातना अथवा स्वर्ग किंवा नरकादी नाना भोग भोगावे लागतात, त्यांना आधिदैविक असे म्हणतात. (२)

नाना दोष नाना पातकें। मदांधपणें अविवेकें।
केलीं परी तें दुःखदायकें। येमयातना भोगविती॥ ३॥

माणूस जिवंत असता मदांधपणाने किंवा अविचाराने नाना दोष, नाना पातके करतो, त्या वेळी त्याला काही वाटत नाही. पण त्यामुळेच त्याला दुःखदायक अशा यमयातना भोगाव्या लागतात. (३)

आंगबळें द्रव्यबळें। मनुष्यबळें राजबळें।
नाना सामर्थ्याचेनि बळें। अकृत्य करिती॥ ४॥

शारीरिक बळाने, द्रव्यबळाने, मनुष्यबळाने, राजबळाने किंवा इतर नाना शक्तींच्या बळाने मनुष्य जे करू नये, तेच कुकर्म करतो. (४)

**नीती सांडूनियां तत्वतां। करूं नये तेंचि करितां।**
**येमयातना भोगितां। जीव जाये ॥ ५॥**

यािप्रमाणे नीती सोडून वास्तविक जे करू नये, ते कृत्य केल्याने नंतर जेव्हा यमयातना भोगाव्या लागतात, तेव्हा जीव कासावीस होतो. (५)

**डोळे झांकून स्वार्थबुद्धी। नाना अभिळाश कुबुद्धी।**
**वृत्ति भूमिसिमा सांधी। द्रव्य दारा पदार्थ ॥ ६॥**

मनुष्य अति स्वार्थबुद्धीने अंध बनून, कुबुद्धी व अतिलोभ यांमुळे अनेक दुष्कृत्ये करतो. आपल्या निर्वाहाचे साधन असलेली जी जमीन त्याला मिळालेली असते तिची हद्द वाढविणे, दुसऱ्याचे द्रव्य, बायको व इतर चीजवस्तू पळविणे. (६)

**मातलेपणें उन्मत्त। जीवघात कुटुंबघात।**
**अप्रमाण क्रिया करीत। म्हणौन येमयातना ॥ ७॥**

अत्यंत माज चढल्याप्रमाणे उन्मत्तपणे वागणे, जीवघात, कुटुंबघात करणे इत्यादी अनुचित कृत्ये केल्याने त्याला यमयातना भोगाव्या लागतात. (७)

**मर्यादा सांडूनि चालती। ग्रामा दंडी ग्रामाधिपती।**
**देशा दंडी देशाधिपती। नीतिन्याय सांडितां ॥ ८॥**

नीतिन्यायाची चाड न धरता मर्यादा सोडून वागले असता ग्रामाधिपती गावाला दंड करतो. देशाधिपती देशाला दंड करतो. (८)

**देशाधिपतीस दंडिता रावो। रायास दंडिता देवो।**
**राजा न करितां नीतिन्यावो। म्हणौन येमयातना ॥ ९॥**

देशाधिपती जर नीतिन्याय-मर्यादा सोडून वागू लागला, तर त्याला राजा दंड करतो. राजा अयोग्य वागला तर त्याला देव दंड करतो. राजाने जर नीतिन्याय सोडला तर त्यालाही यमयातना भोगाव्या लागतात. (९)

**अनीतीनें स्वार्थ पाहे। राजा पापी होऊन राहे।**
**राज्याअंतीं नर्क आहे। म्हणौनियां ॥ १०॥**

स्वार्थाने, अनीतीने वागल्यास राजालाही पाप लागते व राज्याअंती नरकात जावे लागते. (१०)

**राजा सांडितां राजनीति। तयास येम गांजिती।**
**येम नीति सांडितां धावती। देवगण ॥ ११॥**

राजाने राजनीति सोडली तर त्यास यम शासन करतो आणि यमाने नीती सोडली तर देवगण धावून येतो व त्याला शासन करतो. (११)

**ऐसी मर्यादा लाविली देवें। म्हणौनि नीतीनें वर्तावें।**
**नीति न्याय सांडितां भोगावें। येमयातनेसी ॥ १२॥**

भगवंताने अशी मर्यादा घालून दिलेली आहे, म्हणून सदैव नीतीने वागावे. नीतिन्याय सोडून वर्तन केल्यास यमयातना भोगाव्या लागतात. (१२)

**देवें प्रेरिले येम। म्हणौनि आदिदैविक नाम।**
**तृतीय ताप दुर्गम। येमयातनेचा ॥ १३॥**

देव यमास प्रेरणा देऊन त्याच्याद्वारे जीवाला हे भोग भोगायला लावतो, म्हणून त्यांना आधिदैविक म्हणतात. हा यमयातनेचा तृतीय ताप अत्यंत दुर्गम आहे. (१३)

**येमदंड येमयातना। शास्त्रीं बोलिले प्रकार नाना।**
**तो भोग कदापि चुकेना। या नांव आदिदैविक॥ १४॥**

शास्त्रांमध्ये यमदंड आणि यमयातना यांचे अनेक प्रकारे वर्णन केले आहे. तो भोग कधीही चुकवता येत नाही. त्याला आधिदैविक म्हणतात. (१४)

**येमयातनेचे खेद। शास्त्री बोलिले विशद।**
**शेरीरीं घालून अप्रमाद। नाना प्रकारें ॥ १५॥**

माणूस जी नाना प्रकारची पापे करतो, त्याचे दोष त्याच्या सूक्ष्म शरीरात साठवले जातात. त्या दोषास अनुसरून त्याचा स्थूल देह पडल्यावर त्याला नाना प्रकारच्या यमयातना सोसाव्या लागतात. त्यांचे अनेक प्रकार असून त्यांचे शास्त्रांत सविस्तर वर्णन करण्यात आले आहे. (१५)

**पापपुण्याचीं शरीरें। स्वर्गीं असती कळीवरें।**
**त्यांत घालून नाना प्रकारें। पापपुण्य भोगविती॥ १६॥**

मरणोत्तर लोकात ह्या स्थूल देहापेक्षा सर्वस्वी भिन्न अशी पाप-पुण्याची शरीरे असतात. त्याचा सूक्ष्म देह त्याच्या पापपुण्यानुसार ती शरीरे धारण करतो व त्या प्रमाणे नाना प्रकारचे भोग भोगतो. (१६)

**नाना पुण्यें नाना विळास। नाना दोषें यातना कर्कश।**
**शास्त्रीं बोलिलें अविश्वास। मानूंच नये ॥ १७॥**

त्याने पुष्कळ पुण्य केले असेल तर त्याला स्वर्गात नाना प्रकारचे विलासाचे सुख प्राप्त होते व नाना दोष, पातके केली असतील, तर कठोर यातना सोसाव्या लागतात, असे शास्त्र सांगते. त्या शास्त्रावर अविश्वास कधीही नसावा. (१७)

वेदाज्ञेनें न चालती । हरिभक्ती न करिती ।
त्यास येमयातना करिती । या नांव आदिदैविक ॥ १८ ॥

जे वेदाज्ञेचे पालन करीत नाहीत, हरिभक्तीही करीत नाहीत, त्यांना यमयातना भोगाव्या लागतात. (१८)

अक्षोभ नर्की उदंड जीव । जुनाट किडे करिती रवरव ।
बांधोन टाकिती हातपाव । या नांव आदिदैविक ॥ १९ ॥

अक्षोभ नावाचा नरक आहे, त्यात असंख्य जुने किडे वळवळ करीत असतात, पापी जीवास हातपाय बांधून त्या नरकात टाकून देतात. (१९)

उदंड पैस ल्हान मुख । कुंभाकार कुंड येक ।
दुर्गंधी उकाडा कुंभपाक । या नांव आदिदैविक ॥ २० ॥

काही पापी जीवांना कुंभपाक नावाच्या नरकात टाकतात. कुंभपाक म्हणजे लहान तोंडाचे आत उदंड जागा असलेले कुंभाच्या आकाराचे एक कुंड असते, त्यात अत्यंत दुर्गंधी व उकाडा असतो. (२०)

तप्त भूमिका ताविती । जळत स्थंभ पोटाळविती ।
नाना सांडस लाविती । या नाव आदिदैविक ॥ २१ ॥

काही पापी जीवांना तापलेल्या भूमीवर भाजतात, काहींच्या पोटावरून जळत असलेला खांब फिरवितात किंवा शरीरास अनेक प्रकारचे चाप लावतात. (२१)

येमदंडाचे उदंड मार । यातनेची सामग्री अपार ।
भोग भोगिती पापी नर । या नांव आदिदैविक ॥ २२ ॥

यमदंडाच्या माराचे अनेक प्रकार आहेत. यातनेची साधने अपार आहेत. पापी लोकांना त्याच्या यातना भोगाव्या लागतात. (२२)

पृथ्वीमध्यें मार नाना । त्याहून कठीण येमयातना ।
मारितां उसंतचि असेना । या नांव आदिदैविक ॥ २३ ॥

पृथ्वीवर माराचे नाना प्रकार असले तरी यमयातना त्याहून फारच कठीण असतात. तेथील यातना थांबतच नाहीत. (२३)

चौघे चौंकडे वोढिती । येक तें झोंकून पाडिती ।
ताणिती मारिती वोढूनि नेती । या नांव आदिदैविक ॥ २४ ॥

चारजण चहूंकडे ओढतात, कुणी झोके देऊन पाडतात, तर कुणी ताणून धरतात. कुणी मारतात तर कुणी ओढून फरफटत नेतात. (२४)

उठवेना बसवेना । रडवेना पडवेना ।
यातनेवरी यातना । या नांव आदिदैविक ॥ २५ ॥

त्या प्राण्याची उठवेना, बसवेना, रडता येईना, पडता येईना, यातनेवर यातना चालूच आहेत, अशी स्थिती होते. (२५)

आक्रंदे रडे आणी फुंजे । धकाधकीनें निर्बुजे ।
झुर्झुरों पंजर होऊन झिजे । या नांव आदिदैविक ॥ २६ ॥

जीव तेथे आक्रोश करतो, रडतो, गहिवरतो, फुसफुसतो, तेथील धक्काबुक्कीने कासावीस होतो, सारखी झुरणी लागल्याने झिजून केवळ हाडांचा सापळा शिल्लक राहतो. (२६)

कर्कश वचनें कर्कश मार । यातनेचे नाना प्रकार ।
त्रास पावती दोषी नर । या नांव आदिदैविक ॥ २७ ॥

कर्कश बोलणे ऐकून घ्यावे लागते, असह्य मार, अनेक प्रकारच्या यातना, यांमुळे दोषी लोकांना फार त्रास भोगावा लागतो. (२७)

मागां बोलिला राजदंड । त्याहून येमदंड उदंड ।
तेथील यातना प्रचंड । भीमरूप दारुण ॥ २८ ॥

पूर्वी राजदंडाचे वर्णन केले आहे, पण त्याहूनही हा यमदंड फार भयंकर असतो. तेथील यातना फार मोठ्या अत्यंत दारुण व प्रचंड असतात. (२८)

आध्यात्मिक आभिूतिक त्याहूनि विशेष आदिदैविक ।
अल्पसंकेतें कांहीं येक । कळावया बोलिलें ॥ २९ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, प्रथम आध्यात्मिक, आधिभौतिक तापाचे वर्णन केले. पण त्याहूनही आधिदैविक ताप फारच वेगळा व असह्य असतो. त्याची थोडी तरी कल्पना यावी म्हणून काही थोडीशी लक्षणे येथे सांगितली आहेत. (२९)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आदिदैविकतापनाम' समास आठवा समाप्त.

❑ ❑

## दशक ३ : समास ९

# मृत्युनिरूपण

॥ श्रीराम ॥

संसार म्हणजे सवेंच स्वार। नाहीं मरणास उधार।
मापीं लागलें शरीर। घडीनें घडी ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, संसार म्हणजे स्वत:च स्वार होणे, म्हणजे जीव स्वत: सच्चिदानंदस्वरूप असून त्याचे विस्मरण झाल्याने तो स्वत:ला देह मानून बळेच या जन्म-मरणाच्या चक्रात सापडतो. एकदा यात जन्म घेतला की, मरण चुकत नाही. मरणाची घटना उधार नाही. आजची उद्यावर कुणीच ढकलू शकत नाही. माणसाच्या शरीराला क्षणाक्षणाचे माप लागलेले आहे. क्षणाक्षणाने तो मृत्यूच्या निकट जात असतो. (१)

नित्य काळाची संगती। न कळे होणाराची गती।
कर्मासारिखे प्राणी पडती। नाना देसीं विदेसीं॥ २ ॥

जन्माला आल्यापासून काळ नेहमी बरोबरच असतो. पुढे काय होणार आहे, हे कुणीच सांगू शकत नाही, कुणालाच ते कळत नाही. ज्याचे जसे कर्म असेल, त्याप्रमाणे माणूस देशात अथवा परदेशात मृत्यू पावतो. (२)

सरतां संचिताचें शेष। नाहीं क्षणाचा अवकाश।
भरतां न भरतां निमिष्य। जाणें लागे ॥ ३ ॥

पूर्वसंचित पूर्णपणे संपताच एक क्षणभराचाही अवकाश मिळत नाही. अखेरची वेळ आली की निमिष भरते न भरते तोच देह सोडून जावेच लागते. (३)

अवचितें काळाचे म्हणियारे। मारित सुटती येकसरें।
नेऊन घालिती पुढारे। मृत्युपंथें ॥ ४ ॥

अचानक काळाचे दूत येऊन एकदम जीवाला मारत सुटतात आणि पुढे घालून मृत्युपंथाने घेऊन जातात. (४)

होतां मृत्याची आटाटी। कोणी घालूं न सकती पाठीं।
सर्वत्रांस कुटाकुटी। मागेंपुढें होतसे ॥ ५ ॥

एकदा मृत्यूची धाड पडली की, कोणी पाठीशी घालू शकत नाही. सर्वांनाच काळ कुटून टाकतो. त्यात कुणाला लवकर मरण येते तर कुणाला उशिरा. (५)

मृत्यकाळ काठी निकी। बैसे बळियाचे मस्तकीं।
माहाराजे बळिये लोकीं। राहों न सकती ॥ ६ ॥

मृत्युकाळ म्हणजे जणू भरभक्कम काठीच आहे. कितीही बलवान माणूस असला तरी त्याच्या मस्तकावरही तिचा प्रहार होतोच. अत्यंत बलाढ्य राजेरजवाडेही तिच्यापुढे टिकू शकत नाहीत. (६)

मृत्य न म्हणे किं हा क्रूर। मृत्य न म्हणे हा जुंझार।
मृत्य न म्हणे संग्रामशूर। समरंगणीं ॥ ७ ॥

मृत्यू असे म्हणत नाही की, हा क्रूर आहे, हा झुंजार आहे किंवा हा समरांगणी संग्रामशूर आहे, (७)

मृत्य न म्हणे किं हा कोपी। मृत्य न म्हणे हा प्रतापी।
मृत्य न म्हणे उग्ररूपी। माहांखळ ॥ ८ ॥

किंवा हा कोपी आहे, हा प्रतापी आहे, हा महादुष्ट असून अत्यंत उग्र स्वरूपाचा आहे, (८)

मृत्य न म्हणे बळाढ्य। मृत्य न म्हणे धनाढ्य।
मृत्य न म्हणे आढ्य। सर्वगुणें ॥ ९ ॥

किंवा हा बलाढ्य आहे, हा धनाढ्य आहे किंवा हा सर्वगुणसंपन्न आहे, (९)

मृत्य न म्हणे हा विख्यात। मृत्य न म्हणे हा श्रीमंत।
मृत्य न म्हणे हा अद्भुत। पराक्रमी ॥ १० ॥

हा प्रसिद्ध आहे, हा श्रीमंत आहे व हा अद्‌भुत पराक्रमी आहे, (१०)

मृत्य न म्हणे हा भूपती। मृत्य न म्हणे हा चक्रवर्ती।
मृत्य न म्हणे हा करामती। कैवाड जाणे ॥ ११ ॥

किंवा हा भूपती आहे, हा चक्रवर्ती आहे, हा तंत्रमंत्र प्रयोग जाणणारा करामती आहे, (११)

मृत्य न म्हणे हयपती। मृत्य न म्हणे गजपती।
मृत्य न म्हणे नरपती। विख्यात राजा ॥ १२ ॥

हा अश्वांचा धनी आहे, हा गजपती आहे किंवा हा अत्यंत विख्यात राजा आहे. (१२)

मृत्य न म्हणे वरिष्ठ जनीं। मृत्य न म्हणे राजकारणी।
मृत्य न म्हणे वेतनी। वेतनधर्ता ॥ १३ ॥

किंवा हा लोकांत श्रेष्ठ आहे किंवा हा राजकारणी आहे किंवा हा वेतन घेणारा किंवा अनेकांना वेतन देणारा मालक आहे. (१३)

मृत्य न म्हणे देसाई। मृत्य न म्हणे वेवसाई।
मृत्य न म्हणे ठाईं ठाईं। पुंड राजे ॥ १४ ॥

हा देसाई आहे किंवा हा व्यवसायी आहे किंवा हे ठिकठिकाणचे पुंड राजे आहेत, (१४)

मृत्य न म्हणे मुद्राधारी। मृत्य न म्हणे व्यापारी।
मृत्य न म्हणे परनारी। राजकन्या ॥ १५ ॥

हा राजमुद्रा धारण करणारा आहे, हा व्यापारी आहे, ही परदारा आहे किंवा ही राजकन्या आहे, (१५)

मृत्य न म्हणे कार्याकारण। मृत्य न म्हणे वर्णावर्ण।
मृत्य न म्हणे हा ब्राह्मण। कर्मनिष्ठ ॥ १६ ॥

हे कार्य आहे, हे कारण आहे, हा उच्चवर्णीय आहे किंवा हा नीचवर्णाचा आहे किंवा हा कर्मनिष्ठ ब्राह्मण आहे, (१६)

मृत्य न म्हणे वित्पन्न। मृत्य न म्हणे संपन्न।
मृत्य न म्हणे विद्वज्जन। समुदाई ॥ १७ ॥

हा व्युत्पन्न आहे, हा संपन्न आहे किंवा सभेतील हे मोठे विद्वान पंडित आहेत, (१७)

मृत्य न म्हणे हा धूर्त। मृत्य न म्हणे बहुश्रुत।
मृत्य न म्हणे हा पंडित। माहाभला ॥ १८ ॥

हा धूर्त आहे, हा बहुश्रुत आहे, हा मोठा सज्जन असून पंडित आहे, (१८)

मृत्य न म्हणे पुराणिक। मृत्य न म्हणे हा वैदिक।
मृत्य न म्हणे हा याज्ञिक। अथवा जोसी ॥ १९ ॥

हा पुराणिक आहे, हा वैदिक आहे, हा याज्ञिक आहे आणि हा जोशी किंवा ज्योतिषी आहे. (१९)

मृत्य न म्हणे अग्निहोत्री। मृत्य न म्हणे हा श्रोत्री।
मृत्य न म्हणे मंत्रयंत्री। पूर्णागमी ॥ २० ॥

हा अग्निहोत्री आहे, हा श्रौतशास्त्रवेत्ता याज्ञिक आहे किंवा हा पूर्णपणे तंत्रमंत्रशास्त्र जाणणारा आहे, (२०)

मृत्य न म्हणे शास्त्रज्ञ। मृत्य न म्हणे वेदज्ञ।
मृत्य न म्हणे सर्वज्ञ। सर्व जाणे ॥ २१ ॥

हा शास्त्रज्ञ आहे, हा वेदज्ञ आहे, हा सर्वज्ञ असून सर्व जाणतो, (२१)

मृत्य न म्हणे ब्रह्महत्या। मृत्य न म्हणे गोहत्या।
मृत्य न म्हणे नाना हत्या। स्त्रीबाळकादिक ॥ २२ ॥

हा ब्रह्महत्या करणारा आहे, हा गोहत्या करणारा आहे किंवा स्त्री, बाल इत्यादींची हत्या करणारा आहे. (२२)

मृत्य न म्हणे रागज्ञानी। मृत्य न म्हणे ताळज्ञानी।
मृत्य न म्हणे तत्वज्ञानी। तत्ववेत्ता ॥ २३ ॥

हा रागज्ञानी आहे, हा तालज्ञानी आहे किंवा हा तत्त्व जाणणारा तत्त्वज्ञानी आहे, (२३)

मृत्य न म्हणे योगाभ्यासी। मृत्य न म्हणे संन्यासी।
मृत्य न म्हणे काळासी। वंचूं जाणे ॥ २४ ॥

हा योगाभ्यासी आहे, हा संन्यासी आहे. हा काळाला फसवू शकेल असा योगी आहे, (२४)

मृत्य न म्हणे हा सावध। मृत्य न म्हणे हा सिद्ध।
मृत्य न म्हणे वैद्य प्रसिद्ध। पंचाक्षरी ॥ २५ ॥

हा सावध आहे, हा सिद्ध आहे, हा प्रसिद्ध वैद्य आहे किंवा हा पंचाक्षरी आहे, (२५)

मृत्य न म्हणे हा गोसावी। मृत्य न म्हणे हा तपस्वी।
मृत्य न म्हणे हा मनस्वी। उदासीन ॥ २६ ॥

हा गोसावी आहे, हा तपस्वी आहे किंवा हा मनोजयी असून विरक्त आहे, (२६)

मृत्य न म्हणे ऋषेश्वर। मृत्य न म्हणे कवेश्वर।
मृत्य न म्हणे दिगंबर। समाधिस्थ ॥ २७ ॥

हा ऋषीश्वर आहे, हा कवीश्वर आहे, हा दिगंबर आहे, हा समाधिस्थ आहे, (२७)

मृत्य न म्हणे हठयोगी। मृत्य न म्हणे राजयोगी।
मृत्य न म्हणे वीतरागी। निरंतर ॥ २८॥

मृत्य न म्हणे ब्रह्मच्यारी। मृत्य न म्हणे जटाधारी।
मृत्य न म्हणे निराहारी। योगेश्वर ॥ २९॥

मृत्य न म्हणे हा संत। मृत्य न म्हणे हा महंत।
मृत्य न म्हणे हा गुप्त। होत असे ॥ ३०॥

मृत्य न म्हणे स्वाधेन। मृत्य न म्हणे पराधेन।
सकळ जीवांस प्राशन। मृत्यचि करी ॥ ३१॥

येक मृत्यमार्गीं लागले। येकीं आर्ध पंथ क्रमिले।
येक ते सेवटास गेले। वृद्धपर्णीं ॥ ३२॥

मृत्य न म्हणे बाळ तारुण्य। मृत्य न म्हणे सुलक्षण।
मृत्य न म्हणे विचक्षण। बहु बोलिका ॥ ३३॥

मृत्य न म्हणे हा आधार। मृत्य न म्हणे उदार।
मृत्य न म्हणे हा सुंदर। चतुरांग जाणे ॥ ३४॥

मृत्य न म्हणे पुण्यपुरुष। मृत्य न म्हणे हरिदास।
मृत्य न म्हणे विशेष। सुकृती नर ॥ ३५॥

आतां असो हें बोलणें। मृत्यापासून सुटिजे कोणें।
मागें पुढें विश्वास जाणें। मृत्यपंथें ॥ ३६॥

च्यारी खाणी च्यारी वाणी। चौऱ्यांसी लक्ष जीवयोनी।
जन्मा आले तितुके प्राणी। मृत्य पावती ॥ ३७॥

मृत्याभेणें पळों जातां। तरी मृत्य सोडिना सर्वथा।
मृत्यास न ये चुकवितां। कांहीं केल्या ॥ ३८॥

मृत्य न म्हणे हा स्वदेसी। मृत्य न म्हणे हा विदेसी।
मृत्य न म्हणे हा उपवासी। निरंतर ॥ ३९॥

मृत्य न म्हणे थोर थोर। मृत्य न म्हणे हरिहर।
मृत्य न म्हणे अवतार। भगवंताचे ॥ ४०॥

श्रोतीं कोप न करावा। हा मृत्यलोक सकळांस ठावा।
उपजला प्राणी जाईल बरवा। मृत्यपंथें ॥ ४१॥

येथें न मानावा किंत। हा मृत्यलोक विख्यात।
प्रगट जाणती समस्त। लाहान थोर ॥ ४२॥

तथापि किंत मानिजेल। तरी हा मृत्यलोक नव्हेल।
याकारणें नासेल। उपजला प्राणी ॥ ४३॥

हा हठयोगी आहे, हा राजयोगी आहे किंवा हा निरंतर विरक्त आहे, (२८)

हा ब्रह्मचारी आहे, हा जटाधारी आहे, हा निराहारी योगेश्वर आहे, (२९)

हा संत आहे, हा महंत आहे, हा हवे तेव्हा गुप्त होणारा आहे, (३०)

हा स्वाधीन आहे, हा पराधीन आहे. अशा रीतीने सर्व जीवांना मृत्यूच खाऊन टाकतो. (३१)

काही जीव जन्मत:च मरतात, काही अर्धे आयुष्य जगून मरतात तर काही वृद्धपणी मरतात. (३२)

मृत्यू हा विचारच करीत नाही की, हा बाल आहे, हा तरुण आहे, हा सुलक्षण आहे किंवा हा खूप बोलका आहे की, हा चतुर शहाणा आहे. (३३)

हा अनेकांचा आधार आहे किंवा हा उदार आहे, हा सुंदर असून चतुरस्त्र आहे, (३४)

हा पुण्यपुरुष आहे, हा हरिदास आहे किंवा हा विशेष सत्कर्म करणारा आहे. (३५)

आता हे बोलणे पुरे झाले. मृत्यूपासून कोणीही सुटू शकत नाही. प्रत्येक जीवास लवकर अगर उशिरा पण निश्चितपणे मृत्युपंथानेच जावे लागते. (३६)

सृष्टीत असणाऱ्या जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या चार प्रकारच्या प्राण्यांना परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी या चार प्रकारच्या वाणींना, चौऱ्यांशी लक्ष जीवयोनींना म्हणजेच जे जे जन्मास येतात त्या सर्व प्राण्यांना मृत्यू चुकत नाही. (३७)

मृत्यूला भिऊन पळून जावे म्हटले तरी मृत्यू सर्वथा सोडतच नाही. काहीही केले तरी मृत्यूला चुकविता येतच नाही. (३८)

हा माणूस स्वदेशातील आहे की विदेशातील आहे किंवा हा निरंतर उपवास करणारा आहे, याचा विचार मृत्यू करीत नाही. (३९)

माणूस अत्यंत थोर असला, प्रत्यक्ष हरिहर असले किंवा भगवंताचे अवतार जरी असले तरी मृत्यू त्यांना जुमानीत नाही. (४०)

हे सर्व ऐकून श्रोत्यांनी राग मानू नये. हा मृत्युलोक आहे हे सर्वजण जाणतातच. जो जन्माला येतो, तो प्राणी मृत्यूच्या मार्गाने जातो हे ठरलेलेच आहे. (४१)

या बाबतीत संशय घेणे योग्य नव्हे. कारण लहान-थोर सर्वांनाच हे स्पष्ट माहीत आहे. (४२)

जरी संशय घेतला, तरी हा मृत्युलोक नाही, असे होणार आहे का? म्हणून येथे जन्मलेला प्रत्येकजण मरणारच. (४३)

ऐसे जाणोनियां जीवें। याचें सार्थकचि करावें।
जनीं मरोन उरवावें। कीर्तिरूपें ॥ ४४ ॥

तरी हे जाणून घेऊन प्रत्येक जीवाने आपल्या आयुष्याचे सार्थकच करावे. मृत्यूने देह नष्ट झाला तरी या लोकात त्याने कीर्तिरूपाने उरावे. (४४)

येरवीं प्राणी ल्हान थोर। मृत्य पावती हा निर्धार।
बोलिलें हें अन्यथा उत्तर। मानूंचि नये ॥ ४५ ॥

नाहीतर जे ल्हान-थोर प्राणी या जगात येतात, ते सर्व मृत्यू पावतात हे अगदी निश्चितच आहे. म्हणून आत्तापर्यंत जे काही सांगितले, ते खोटे मानूच नये. (४५)

गेले बहुत वैभवाचे। गेले बहुत आयुष्याचे।
गेले अगाध महिमेचे। मृत्यपंथें ॥ ४६ ॥

अत्यंत वैभवसंपन्न, दीर्घायुषी, ज्यांचा महिमा अगाध होता, असे सर्व शेवटी मृत्युपंथानेच गेले. (४६)

गेले बहुत पराक्रमी। गेले बहुत कपटकर्मी।
गेले बहुत संग्रामी। संग्रामसौरे ॥ ४७ ॥

अत्यंत पराक्रमी, अत्यंत कपटी, संग्रामशूर असे अनेक रणांगणांवर संग्राम करीत असतानाच गेले. (४७)

गेले बहुतां बळांचे। गेले बहुतां काळांचे।
गेले बहुतां कुळांचे। कुळवंत राजे ॥ ४८ ॥

अत्यंत बलवान असलेले अत्यंत दीर्घायुषी, अनेक कुलवंत अनेक कुळातील प्रसिद्ध राजे सगळे गेले. (४८)

गेले बहुतांचे पाळक। गेले बुद्धीचे चाळक।
गेले युक्तीचे तार्किक। तर्कवादी ॥ ४९ ॥

अनेक लोकांचे पालनपोषण करणारे, अनेकांच्या बुद्धीला प्रेरणा देणारे, मोठ्या युक्तीने तर्क करणारे तर्कवादी सगळे गेले. (४९)

गेले विद्येचे सागर। गेले बळाचे डोंगर।
गेले धनाचे कुबेर। मृत्यपंथें ॥ ५० ॥

विद्येचे सागर असणारे, बळाचे डोंगर असणारे, धनाचे कुबेर असणारे सगळे मृत्युपंथानेच गेले. (५०)

गेले बहुत पुरुषार्थाचे। गेले बहुत विक्रमाचे।
गेले बहुत आटोपाचे। कार्यकर्ते ॥ ५१ ॥

मोठ्या पुरुषार्थाचे, अत्यंत पराक्रम गाजवलेले, मोठा व्याप सांभाळणारे कार्यकर्ते सर्व गेले. (५१)

गेले बहुत शस्त्रधारी। गेले बहुत परोपकारी।
गेले बहुत नानापरी। धर्मरक्षक ॥ ५२ ॥

अनेक शस्त्रधारी, अनेक परोपकारी, नाना प्रकारे धर्माचे रक्षण करणारे सगळे गेले. (५२)

गेले बहुत प्रतापाचे। गेले बहुत सत्कीर्तीचे।
गेले बहुत नीतीचे। नीतिवंत राजे ॥ ५३ ॥

मोठे प्रतापवान, मोठे कीर्तिमान व अत्यंत नीतीने वागणारे नीतिवंत अनेक राजेही गेले. (५३)

गेले बहुत मतवादी। गेले बहुत कार्यवादी।
गेले बहुत वेवादी। बहुतांपरीचे ॥ ५४ ॥

मोठे मतवादी किंवा अनेक मतवादी, अनेक कार्यवादी, अनेक प्रकारचे वादविवाद करणारे सर्व गेले. (५४)

गेलीं पंडितांचीं थाटें। गेलीं शब्दांचीं कचाटें।
गेलीं वादकें अचाटें। नाना मतें ॥ ५५ ॥

पंडितांचे समुदाय गेले, शब्दाची खटपट, लटपट करणारे गेले, नाना मतांचे प्रतिपादन करून अचाट वाद करणारे गेले. (५५)

गेले तापषांचे भार। गेले संन्यासी अपार।
गेले विचारकर्ते सार। मृत्यपंथें ॥ ५६ ॥

तपस्वी लोकांचे समुदाय गेले, असंख्य संन्यासी गेले, सारासार विचार करणारे विचारवंतही मृत्युपंथानेच गेले. (५६)

गेले बहुत संसारी। गेले बहुत वेषधारी।
गेले बहुत नानापरी। नाना छंद करूनी ॥ ५७ ॥

अनेक संसारी गेले, अनेक वेषधारी गेले. नाना प्रकारचे छंद करणारे अनेक लोक आपला छंद करता करता गेले. (५७)

गेले ब्राह्मणसमुदाये। गेले बहुत आच्यार्ये।
गेले बहुत सांगों काये। किती म्हणौनि ॥ ५८ ॥

ब्राह्मणांचे समुदाय गेले, अनेक आचार्य गेले, असे अनेकानेक लोक गेले. किती म्हणून सांगावे? (५८)

असो ऐसे सकळहि गेले। परंतु येकचि राहिले।
जे स्वरूपाकार जाले। आत्मज्ञानी ॥ ५९ ॥

असो. याप्रमाणे सर्व मृत्युपंथानेच गेले, फक्त जे स्वरूपाकार झाले, ते आत्मज्ञानीच फक्त एकटे राहिले. (५९)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मृत्युनिरूपणनाम' समास नववा समाप्त.

❑ ❑

## दशक ३ : समास १०

# वैराग्यनिरूपण

॥ श्रीराम ॥

**संसार म्हणिजे माहापूर। माजीं जळचरें अपार।**
**डंखूं धावती विखार। काळसर्प ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, संसार म्हणजे महापूर आहे. त्यात असंख्य जलचर प्राणी आहेत. संसाराच्या महापुरात पडलेल्या जीवांना विषारी काळसर्प दंश करण्यासाठी धावत येत असतात. (१)

**आशा ममता देहीं बेडी। सुसरी करिताती तडातोडी।**
**नेऊन दुःखाचे सांकडी। माजीं घालिती ॥ २ ॥**

आशा आणि ममता या बेड्या सूक्ष्म देहाला बांधून ठेवतात. जलामधील सुसरी शरीराचे लचके तोडून दुःखाच्या कपारीत घालतात. (२)

**अहंकारनक्रें उडविलें। नेऊनि पाताळीं बुडविलें।**
**तेथुनियां सोडविलें। न वचे प्राणी ॥ ३ ॥**

अहंकाररूपी मगर जीवाला पाताळात उंच नेऊन बुडवितो. तेथून सुटणे जीवाला शक्य होत नाही. (३)

**काममगरमिठी सुटेना। तिरस्कार लागला तुटेना।**
**मद मत्सर वोहटेना। भूलि पडिली ॥ ४ ॥**

कामवासनेची मगरमिठी सुटत नाही. तिरस्कार मनात उत्पन्न होतो, तो सुटत नाही. मदमत्सर हे विकारही कमी होत नाहीत. अशा प्रकारे माणूस एक प्रकारे मोहित होतो. (४)

**वासनाधामिणी पडिली गळां। घालून वेंटाळें वमी गरळा।**
**जिव्हा लाळी वेळोवेळां। भयानक ॥ ५ ॥**

वासनारूपी धामीण गळ्यात पडते. ती गळ्याभोवती वेटोळे घालून विष ओकत असते आणि वारंवार भयंकर जीभ बाहेर काढून छळत राहते. म्हणजे वासनेच्या विळख्यात जीव जखडला जातो (५)

**माथां प्रपंचाचें वोझें। घेऊन म्हणे माझें माझें।**
**बुडतांहि न सोडी, फुंजे। कुळाभिमानें ॥ ६ ॥**

डोक्यावर प्रपंचाचे ओझे घेऊन जीव सतत 'माझे माझे' म्हणत राहतो. बुडायची पाळी आली तरी कुळाभिमानाने फुगतो आणि ते ओझे काही उतरवायला तयार होत नाही. (६)

**पडिलें भ्रांतीचें अंधारें। नागविलें अभिमानचोरें।**
**आलें अहंतेचें काविरें। भूतबाधा ॥ ७ ॥**

भ्रांतीचा अंधार पडतो. त्यात अभिमानरूपी चोर सर्वस्व हरण करतो म्हणजे अज्ञानामुळे विपरीत ज्ञान अर्थात देहबुद्धी उत्पन्न होते. त्यामुळे अहंकार उत्पन्न होतो. तो भूतबाधेप्रमाणे माणसाला झपाटून टाकतो. (७)

**बहुतेक आवर्तीं पडिले। प्राणी वाहातचि गेले।**
**जेंहिं भगवंतासी बोभाइलें। भावार्थबळें ॥ ८ ॥**

बहुतेक जन्ममरणाच्या भोवऱ्यात सापडून वाहातच जातात. पण काही माणसे भावार्थाच्या बळावर भगवंताचा धावा करतात. (८)

**देव आपण घालूनि उडी। तयांसी नेलें पैलथडी।**
**येर तें अभाविकें बापुडीं। वाहातचि गेलीं ॥ ९ ॥**

अशा लोकांना देव स्वतः धाव घेऊन उडी घालून वाचवतो व पैलतीरावर नेतो. बाकी जे श्रद्धाहीन लोक असतात, ते बिचारे त्या महापुरात वाहातच जातात. (९)

**भगवंत भावाचा भुकेला। भावार्थ देखोन भुलला।**
**संकटीं पावे भाविकाला। रक्षितसे ॥ १० ॥**

भगवंत हा प्रेमाचा भुकेला आहे. भाविक भक्तांचा भावार्थ पाहून तो भुलतो व संकटात धाव घेऊन भक्तांचे रक्षण करतो. (१०)

**जयास भगवंत आवडे। तयाचें देवासीं सांकडें।**
**संसारदुःख सकळ उडे। निज दासाचें ॥ ११ ॥**

ज्याला भगवंत मनापासून आवडतो, त्याच्या संकटाचे ओझे भगवंतावर पडते व त्यामुळे भगवंत आपल्या अंतरंग भक्ताचे संसारदुःख सगळे नाहीसे करतो. (११)

जे अंकित ईश्वराचे। तयांस सोहळे निजसुखाचे।
धन्य तेचि दैवाचे। भाविक जन ॥ १२ ॥

जे ईश्वराला सर्वस्वी शरण जातात, त्यांना स्वस्वरूपानुभवामुळे मिळणारा परमानंद प्राप्त होतो. असे भाविकजन खरोखर अत्यंत धन्य होत. (१२)

जैसा भाव जयापासीं। तैसा देव तयासी।
जाणे भाव अंतरसाक्षी। प्राणीमात्रांचा ॥ १३ ॥

ज्याचा जसा भाव असतो तसा देव त्याच्याशी वागतो. कारण प्राणिमात्रांच्या अंतर्यामीच भगवान असल्याने त्यांच्या हृदयातील भाव तो अचूक जाणतो. (१३)

जरी भाव असिला माईक। तरी देव होये माहा ठक।
नवल तयाचें कौतुक। जैशास तैसा ॥ १४ ॥

भाव जर दिखाऊ असेल, तर देवही महाठक होतो. देवाचे हे विशेष कौतुक आहे की, तो जशास तसा वागतो. (१४)

जैसें जयाचें भजन। तैसेंचि दे समाधान।
भाव होतां किंचित न्यून। आपणहि दुरावे ॥ १५ ॥

जशी ज्याची उपासना असेल तसे देव त्याला समाधान देतो. भावात जरा जरी उणीव आली तरी देव दुरावतो. (१५)

दर्पणीं प्रतिबिंब दिसे। जैस्यास तैसें भासे।
तयाचें सूत्र असे। आपणाच पासीं ॥ १६ ॥

आरशात आपले प्रतिबिंब दिसते, ते बघणारा जसा असेल तसेच हुबेहूब दिसते. प्रतिबिंब कसे दिसावे याचे मर्म आपल्यापाशीच असते. (१६)

जैसें आपण करावें। तैसेंचि तेणें व्हावें।
जरी डोळे पसरूनि पाहावें। तरी तेंहि टवकारे॥ १७ ॥

आपण जशी हालचाल करू, तशीच ते प्रतिबिंब करते. आपण जर डोळे वटारून पाहू लागलो, तर प्रतिबिंबही डोळे वटारून आपल्याकडे पाहाते. (१७)

भृकुटीस घालून मिठी। पाहाता क्रोधें तेंहि उठी।
आपण हास्य करितां पोटीं। तेंहि आनंदे ॥ १८ ॥

आपण जर रागाने कपाळाला आठ्या घालून भुवया चढवून पाहू लागलो, तर तेही क्रोधाने आपल्याकडे पाहू लागते. आपण जर हसून पाहिले तर तेही पोटी आनंदलेले दिसते. (१८)

जैसा भाव प्रतिबिंबला। तयाचाचि देव जाला।
जो जैसें भजे त्याला। तैसाचि वोळे ॥ १९ ॥

ज्याचा जसा भाव असतो, त्या भावाचे प्रतिबिंब असे त्याच्या देवाचे रूप होते. जो त्याला जसा भजतो त्याप्रमाणे तो तसाच प्रसन्न होतो. (१९)

भावें परमार्थाचिया वाटा। वाहाती भक्तीचिया पेठा।
भरला मोक्षाचा चोहाटा। सज्जनसंगें ॥ २० ॥

भावामुळेच परमार्थाच्या वाटा भक्तीच्या बाजारपेठेपर्यंत येऊन पोहोचतात. तेथे संतसज्जनांच्या संगतीत मोक्षाचा चव्हाट्यावर बाजार भरलेला असतो. (२०)

भावें भजनीं जे लागले। ते ईश्वरीं पावन जाले।
भावार्थबळें उद्धरिले। पूर्वज तेहीं ॥ २१ ॥

खऱ्या भक्तिभावनेने जे भगवद्भजन करतात, ते भगवंताशी एकरूप होऊन पावन होतात. त्यांनी भावार्थाच्या बळावर आपल्या पूर्वजांचाही उद्धार केलेला असतो. (२१)

आपण स्वयें तरले। जनासहि उपेगा आले।
कीर्तिश्रवणें जाले। अभक्त भावार्थी ॥ २२ ॥

असे भक्त स्वत:ही तरतात व लोकांच्याही उपयोगी पडतात, त्यांच्या तोंडून भगवंताची कीर्ती श्रवण करून जे अभक्त असतात, तेही भावार्थी बनतात. (२२)

धन्य तयांची जननी। जे लागले हरिभजनीं।
तेहिंच येक जन्म जनीं। सार्थक केला ॥ २३ ॥

जे हरिभजनी लागतात, देवाची भक्ती करू लागतात त्यांची जननी धन्य समजावी. त्यांनीच जगात जन्म घेऊन आपला जन्म सार्थकी लावलेला असतो. (२३)

तयांची वर्णूं काय थोरी। जयांचा भगवंत कैवारी।
कासे लाऊन उतरी। पार दुःखाचा ॥ २४ ॥

ज्यांचा कैवार प्रत्यक्ष भगवंत घेतो व स्वत: आपल्या कासेला लावून दु:खाच्या पलीकडे घेऊन जातो, त्यांची थोरवी काय वर्णावी बरे? (२४)

बहुतां जन्मांचे सेवटीं। जेणें चुके अटाटी।
तो हा नरदेह भेटी। करी भगवंतीं ॥ २५ ॥

अनेक जन्मांच्या शेवटी ह्या नरदेहाची प्राप्ती होते. त्यायोगे सर्व यातायात चुकते. एवढेच नव्हे तर या देहातच भगवद्दर्शन, होऊ शकते (२५)

म्हणौन धन्य ते भाविक जन। जेंहिं जोडिलें हरिनिधान।
अनंत जन्मांतरीचें पुण्य। फळासि आलें ॥ २६ ॥

म्हणून ज्यांनी हरिरूपी संपत्ती जोडली, ते भाविक जन धन्य आहेत. त्यांच्या अनंत जन्मांतरींचे पुण्य फळास आले असे समजावे. (२६)

आयुष्य हेचि रत्नपेटी। मार्जी भजनरत्नें गोमटीं।
ईश्वरीं अर्पूनिया लुटी। आनंदाची करावी॥ २७ ॥

मानवाचे आयुष्य ही ज्यात सुंदर अशी भजनरत्ने भरलेली आहेत, अशी रत्नपेटीच आहे. यातील भजनरूपी रत्ने ईश्वरास अर्पण करून मानवाने आनंदाची लयलूट करावी. (२७)

हरिभक्त वैभवें कनिष्ठ। परी तो ब्रह्मादिकां वरिष्ठ।
सदा सर्वदा संतुष्ट। नैराशबोधें ॥ २८ ॥

हरिभक्त हा लौकिक वैभवाच्या दृष्टीने कनिष्ठ असला तरी तो ब्रह्मादी देवांपेक्षा वरिष्ठ समजावा. कारण तो दुर्लभ अशा अनासक्तीने सदासर्वदा संतुष्ट असतो. (२८)

धरून ईश्वराची कास। केली संसाराची नैराश।
तयां भाविकां जगदीश। सबाह्य सांभाळी॥ २९ ॥

जो संसारातील कुणाचीही आणि कशाचीही आशा न बाळगता केवळ ईश्वरावर विसंबून त्यास सर्वभावे शरण जातो, त्या भाविकांचा जगदीश आत व बाहेर सांभाळ करतो.(२९)

जया संसाराचें दुःख। विवेकें वाटे परम सुख।
संसारसुखाचेनि पढतमूर्ख। लोधोन पडती ॥ ३० ॥

ज्याला संसारातील दुःखही विवेकाच्या योगे परम सुखच वाटते, जे पढतमूर्ख असतात, ते मात्र संसारसुखाच्या आशेने संसारातच आसक्त होतात. (३०)

जयांचा ईश्वरीं जिव्हाळा। ते भोगिती स्वानंदसोहळा।
जयांचा जनावेगळा। ठेवा आक्षै ॥ ३१ ॥

ज्यांना ईश्वराविषयी आत्यंतिक प्रेम असते ते भक्त स्वानंद-सोहळा भोगतात. त्यांच्या आनंदाचा ठेवा अक्षय असतो. पण तो सामान्य जनांच्या आनंदापेक्षा वेगळा असतो. (३१)

ते आक्षै सुखें सुखावले। संसारदुःखें विसरले।
विषयेरंगीं वोरंगले। श्रीरंगरंगीं ॥ ३२ ॥

ते अक्षय सुखाने सुखावून संसारदुःखे विसरून जातात. ते निरिच्छ होतात आणि श्रीभगवंताच्या प्रेमात रंगून जातात. (३२)

तयांस फावली नरदेह पेटी। केली ईश्वरेंसिं साटी।
येरें अभाविकें करंटी। नरदेह गेला ॥ ३३ ॥

ज्यांनी देहबुद्धी देऊन ईश्वर मिळविण्याची अदलाबदल केली, त्यांनी या नरदेहाचे सार्थक केले. ही नरदेहरूपी रत्नपेटी त्यांनाच लाभली असे म्हणावे लागते. इतर अभागी अभाविक आपला मनुष्यदेह वाया घालवितात (३३)

आवचटें निधान जोडलें। तें कवडिच्या बदल नेलें।
तैसें आयुष्य निघोनि गेलें। अभाविकाचें ॥ ३४ ॥

अकस्मात एखाद्यास रत्न सापडले असता त्याने ते कवडीच्या बदल्यात घालवावे तसे अश्रद्ध लोकांचे आयुष्य कवडीमोलाने निघून जाते. (३४)

बहुत तपाचा सांठा। तेणें लाधला परीस गोटा।
परी तो ठाईचा करंटा। भोगूंच नेणे ॥ ३५ ॥

एखाद्याने खूप तप करावे आणि त्याचे फळ म्हणून त्याला परिस मिळावा, पण मुळातच तो अत्यंत अभागी असल्याने त्याचा उपभोग कसा घ्यावा हेच त्याला कळत नाही.(३५)

तैसा संसारास आला। मायाजाळीं गुंडाळला।
अंतीं येकलाचि गेला। हात झाडुनी ॥ ३६ ॥

त्याप्रमाणे जो या संसारात मनुष्य म्हणून जन्मूनही मायेच्या पाशात गुंडाळला जातो आणि अखेर हात झाडून सर्व काही इथेच सोडून एकटाच निघून जातो (३६)

या नरदेहाचेनि संगतीं। बहुत पावले उत्तम गती।
येकें बापुडीं यातायाती। वरपडीं जालीं ॥ ३७ ॥

या नरदेहाच्या योगे अनेकांनी उत्तम गतीची प्राप्ती करून घेतली, पण काही बिचारे यातायातीतच गुंतले आणि दुःखी झाले. (३७)

या नरदेहाचेनि लागवेगें। सार्थक करावें संतसंगें।
नीचयोनीं दुःख मागें। बहुत भोगिलें ॥ ३८ ॥

या उत्तम नरदेहाचे संतसमागम करून शक्य तितक्या लवकर सार्थक करावे. मागे अनेक नीचयोनीत आपण खूप भोगलेले आहे, याचे स्मरण ठेवावे. (३८)

**कोण समयो येईल कैसा। याचा न कळे किं भर्वसा।**
**जैसे पक्षी दाही दिशा। उडोन जाती ॥ ३९॥**

केव्हा कशी वेळ येईल याचा भरवसा नसतो. आपण ते जाणूही शकत नाही. पक्षी जसे रात्री एखाद्या वृक्षावर एकत्र जमतात व प्रात:काळ होताच दाही दिशांना उडून जातात, त्याप्रमाणे मानवी जीवनही आहे. (३९)

**तैसें वैभव हें सकळ। कोण जाणें कैसी वेळ।**
**पुत्रकळत्रादि सकळ। विघडोन जाती ॥ ४०॥**

तसेच हे वैभवादी सर्व जाणावे. केव्हा कशी वेळ येईल, हे कोणीही जाणू शकत नाही. वाईट वेळ आली तर बायकोमुले वगैरे सर्व सोडून जातात अथवा एखादे वेळी नष्टही होतात. (४०)

**पाहिली घडी नव्हे आपुली। वयसा तरी निघोन गेली।**
**देह पडतांच ठेविली। आहे नीच योनी ॥ ४१॥**

जो क्षण येताना आपण पाहतो, तो लगेच आपल्या हातून निसटून जातो. अशा प्रकारे बघता बघता आयुष्य निघून जाते आणि हा स्थूल देह पडला की नीच योनी प्राप्त होते. (४१)

**स्वान शुकरादिक नीचयाती। भोगणें घडे विपत्ती।**
**तेथें कांहीं उत्तम गती। पाविजेत नाहीं ॥ ४२॥**

कुत्रा, डुक्कर इत्यादी नीच योनीत जन्म होतो आणि दु:ख भोगावे लागते. त्या योनीत गेल्यावर उत्तम गती मिळणे अशक्यच असते. (४२)

**मागां गर्भवासीं आटाटी। भोगितां जालासि रे हिंपुटी।**
**तेथुनियां थोरा कष्टीं। सुटलासि दैवें ॥ ४३॥**

मागे गर्भवासात यातना भोगताना जीव कष्टी झालेला असतो. त्यातून सुदैवाने अत्यंत कष्टाने एकदाची सुटका होते. (४३)

**दु:ख भोगिलें आपुल्या जीवें। तेथें कैंचिं होतीं सर्वें।**
**तैसेंचि पुढें येकलें जावें। लागेल बापा ॥ ४४॥**

गर्भवासात जेव्हा जीव दु:ख भोगतो, तेव्हा कुणी मदतीला येऊ शकत नाही. तसेच पुढे आयुष्याच्या शेवटीही जीवाला एकटेच जावे लागणार आहे! 'अरे बाबा, हे लक्षात घे.' (४४)

**कैंची माता कैंचा पिता। कैंची बहिण कैंचा भ्राता।**
**कैंचीं सुहृदें कैंची वनिता। पुत्रकळत्रादिक ॥ ४५॥**

कुठली आई आणि कुठला बाप, कुठली बहीण आणि कुठला भाऊ! कुठले मित्र आणि कुठली बायको! कुठली मुलेबाळे व इतर नातेवाईक! (४५)

**हे तूं जाण मावेचीं। आवघीं सोइरीं सुखाचीं।**
**हे तुझ्या सुखदु:खाचीं। सांगाती नव्हेती ॥ ४६॥**

ही सर्व मायिक आहेत, हे तू जाणून घे. सगळी त्यांच्या त्यांच्या सुखाच्या आशेने तुझ्याभोवती गोळा झालेली आहेत. ही तुझ्या सुख-दु:खात तुला साथ देऊ शकत नाहीत. (४६)

**कैंचा प्रपंच कैंचें कुळ। कासया होतोसी व्याकुळ।**
**धन कण लक्ष्मी सकळ। जाइजणें ॥ ४७॥**

कसला प्रपंच आणि कसले कुळ! त्यासाठी कशाला व्याकुळ होतोस? धनधान्य, ऐश्वर्य आदी सर्व अशाश्वत आहे. (४७)

**कैंचें घर कैंचा संसार। कासया करिसी जोजार।**
**जन्मवरी वाहोन भार। सेखीं सांडून जासी ॥ ४८॥**

कसले घर आणि कसला संसार! उगीच कशाला यातायात करतोस? जन्मभर त्यांचे ओझे वाहून अखेर ते सर्व सोडून जावेच लागते. (४८)

**कैंचें तारुण्य कैंचें वैभव। कैंचे सोहळे हावभाव।**
**हें सकळहि जाण माव। माईक माया ॥ ४९॥**

कसले तारुण्य, कसले वैभव! कसले सोहळे आणि कसले हावभाव! हे सर्व मायिक आहे आणि भुलवून मायेच्या पाशात अडकविणारे आहे, हे जाणून घे. (४९)

**येच क्षणीं मरोन जासी। तरी रघुनाथीं अंतरलासी।**
**माझें माझें म्हणतोसी। म्हणौनियां ॥ ५०॥**

याच क्षणी मरून गेलास, तर रघुनाथाला अंतरलास असे समज. कारण हा देह, संसार यांना तू माझे-माझे म्हणतोस, म्हणून मी तुला हे सांगतो. (५०)

**तुवां भोगिल्या पुनरावृत्ती। ऐसीं मायबापें किती।**
**स्त्री कन्या पुत्र होती। लक्षानलक्ष ॥ ५१॥**

तू आत्तापर्यंत किती जन्म घेतलेस! त्यावेळी असे आईवडील वगैरे किती झाले? स्त्री, पुत्र, कन्या वगैरेंची गणती करू लागल्यास लक्षावधी संख्या भरेल. (५१)

कर्मयोगें सकळ मिळालीं। येके स्थळीं जन्मास आलीं।
ते तुवां आपुलीं मानिलीं। कैसीं रे पढतमूर्खा॥ ५२॥

पूर्वकर्माच्या ऋणानुबंधाने सर्व एका स्थळी जमतात, एका स्थळी जन्म घेतात, ती तू आपली कशी रे मानलीस, पढतमूर्खा! (५२)

तुझें तुज नव्हे शरीर। तेथें इतरांचा कोण विचार।
आतां येक भगवंत साचार। धरीं भावार्थबळें ॥ ५३॥

तुझे म्हणून तुला वाटणारे हे शरीरही जर तुझे नाही, तर इतरांचा कसला विचार करायचा? आता खरोखर मन:पूर्वक एका भगवंतालाच भावार्थाच्या बळाने घट्ट धरून ठेव. (५३)

येका दुर्भराकारणें। नाना नीचांची सेवा करणें।
नाना स्तुती आणी स्तवनें। मर्यादा धरावी ॥ ५४॥

आपल्या कधीही न भरणाऱ्या पोटासाठी आपल्याला अनेक नीच लोकांची सेवा करावी लागते. त्यांची स्तुतिस्तोत्रे गाऊन त्यांच्यापुढे मर्यादेने वागावे लागते. (५४)

जो अन्न देतो उदरासी। शेरीर विकावें लागे त्यासी।
मां जेणें घातलें जन्मासी। त्यासी कैसें विसरावें॥ ५५॥

जो पोटाला अन्न देतो, त्याच्या सेवेत मानवी शरीर विकावे लागते. मग ज्याने हा दुर्लभ मनुष्य देह दिला, त्याला कसे काय विसरावे? (५५)

अहिर्निशीं ज्या भगवंता। सकळ जीवांची लागली चिंता।
मेघ वरुषे जयाची सत्ता। सिंधु मर्यादा धरी॥ ५६॥

ज्या भगवंताला रात्रंदिवस सर्व जीवांची चिंता लागलेली असते व ज्याच्या सत्तेने मेघ जलवृष्टी करतात, समुद्र आपली मर्यादा सांभाळतो, (५६)

भूमि धरिली धराधरें। प्रगट होईजे दिनकरें।
ऐसी सृष्टी सत्तामात्रें। चालवी जो कां ॥ ५७॥

ऐसा कृपाळू देवाधिदेव। नेणवे जयाचें लाघव।
जो सांभाळी सकळ जीव। कृपाळुपणें ॥ ५८॥

शेष पृथ्वी आपल्या मस्तकावर धारण करतो, सूर्य उदयास येतो, असा आपल्या सत्तामात्रेकरून जो सर्व सृष्टी चालवितो, असा परमेश्वर अत्यंत कृपाळू आहे. त्याची लीला जाणता येत नाही. कृपाळूपणे तोच सर्व जीवांचा सांभाळ करीत असतो. (५७-५८)

ऐसा सर्वात्मा श्रीराम। सांडून धरिती विषयकाम।
ते प्राणी दुरात्मे अद्धम। केलें पावती ॥ ५९॥

अशा सर्वांच्या अंतर्मायी आत्मरूपाने असलेल्या श्रीरामाला सोडून जे प्राणी विषयांची इच्छा करतात, ते अत्यंत अधम दुरात्मे स्वत:च्या केलेल्या कर्मांची फळेच भोगत असतात. (५९)

रामेविण जे जे आस। तितुकी जाणावी नैराश।
माझें माझें सावकाश। सीणचि उरे ॥ ६०॥

रामाशिवाय जी जी इच्छा करावी ती ती निरर्थकच जाणावी. 'माझे, माझे' करता करता शेवटी कष्टच उरतात. (६०)

जयास वाटे सीण व्हावा। तेणें विषयो चिंतीत जावा।
विषयो न मिळतां जीवा। तगबग सुटे ॥ ६१॥

ज्याला कष्टच व्हावे असे वाटत असेल, त्याने सतत विषयांचेच चिंतन करावे. विषयाची प्राप्ती झाली नाही की, जीवाची अगदी तगमग होते. (६१)

सांडून राम आनंदघन। ज्याचे मनीं विषयचिंतन।
त्यासी कैंचें समाधान। लोलंगतासी ॥ ६२॥

आनंदघन म्हणजे मूर्तिमंत आनंदच अशा रामाचे चिंतन करावयाचे सोडून जो मनात सतत विषयाचे चिंतन करतो, त्या विषयासक्त माणसाला समाधान कसे प्राप्त होणार? (६२)

जयास वाटे सुखचि असावें। तेणें रघुनाथभजनीं लागावें।
स्वजन सकळहि त्यागावे। दुःखमूळ जे ॥ ६३॥

ज्याला आपल्याला सदैव सुखच लाभावे असे वाटत असेल, त्याने रघुनाथभजनी लागावे आणि जे दु:खाचे मूळ आहेत, अशा सर्व स्वजनांचा त्याग करावा. (६३)

जेथें वासना झोंबोन पडे। तेणेंचि अपायें दुःख जडे।
म्हणौनि विषयवासना मोडे। तो येक सुखी ॥ ६४॥

ज्या वस्तू अथवा व्यक्तीच्या ठिकाणी वासना अगदी तुटून पडते, तेथे जीवाला अपाय होतो व दु:खच प्राप्त होते. म्हणून ज्याची विषयवासना नाहीशी होते, तोच माणूस सुखी होतो. (६४)

विषयजनित जें जें सुख। तेथेंचि होतें परमदुःख।
पूर्वी गोड अंतीं शोक। नेमस्त आहे ॥ ६५ ॥

विषयांपासून जे जे सुख मिळावे अशी माणूस इच्छा करतो, तेच त्याच्या परमदुःखास कारणीभूत होते. पहिल्याने ते गोड वाटते, पण परिणामी शोकदायकच ठरते, असे निश्चितपणे समजावे. (६५)

गळ गिळितां सुख वाटे। वोढून घेतां घसा फाटे।
कां तें बापुडें मृग आपटे। चारा घेऊन पळतां ॥ ६६ ॥

माशाला गळ गिळताना त्याला लावलेल्या आमिषाच्या लोभामुळे प्रथम सुख वाटते. नंतर तो गळ जेव्हा ओढून घेतला जातो, तेव्हा त्याचा घसा फाटून मृत्यू ओढवतो किंवा हरीण हिरवा चारा तोंडात घेऊन पळत असता बिचारे दगडावर आपटते व तोंड फोडून घेते (६६)

तैसी विषयेसुखाची गोडी। गोड वाटे परी ते कुडी।
म्हणौनियां आवडी। रघुनाथीं धरावी ॥ ६७ ॥

त्याप्रमाणेच विषयसुखाचे आहे. पहिल्याने ते गोड वाटते, पण अंती ते वाईट परिणाम करणारे ठरते. म्हणून रघुनाथभजनाचीच आवड धरावी. (६७)

ऐकोनि बोले भाविक। कैसेनि घडे जी सार्थक।
सांगा स्वामी येमलोक। चुके जेणें ॥ ६८ ॥

समर्थांनी केलेला हा उपदेश ऐकून भाविक त्यांना विनंती करू लागले की, स्वामी! या नरदेहाचे सार्थक कशाने होईल आणि यमलोकापासून सुटका कशी होईल, हे आपण कृपा करून सांगावे. (६८)

देवासी वास्तव्य कोठें। तो मज कैसेंनि भेटे।
दुःखमूळ संसार तुटे। कोणेपरी स्वामी ॥ ६९ ॥

देव कोठे राहतो, मला तो कसा भेटेल, दुःखमूळ असा हा संसार काय केल्याने नष्ट होईल, हे स्वामी! मला हे सर्व सांगा. (६९)

धडपुडी भगवत्प्राप्ती। होऊन चुके अधोगती।
ऐसा उपाये कृपामूर्ती। मज दीनास करावा ॥ ७० ॥

प्रत्यक्ष भगवत्प्राप्ती होऊन अधोगती चुकेल असा उपाय कृपामूर्ती अशा आपण मज दीनाला सांगावा. (७०)

वक्ता म्हणे हो येकभावें। भगवद्भजन करावें।
तेणें होईल स्वभावें। समाधान ॥ ७१ ॥

तेव्हा वक्त्याने उत्तर दिले की, एकनिष्ठ भावाने भगवद्भजन करावे म्हणजे त्यायोगे अगदी सहज समाधान प्राप्त होईल. (७१)

कैसें करावें भगवद्भजन। कोठे ठेवावें हें मन।
भगवद्भजनाचें लक्षण। मज निरोपावें ॥ ७२ ॥

तेव्हा श्रोता विचारतो की, भगवद्भजन कसे करावे? मन कुठे एकाग्र करावे? भगवद्भजनाचे लक्षण काय? हे सर्व आपण मला समजावून द्यावे. (७२)

ऐसा म्लानवदनें बोले। धरिले सदृढ पाऊलें।
कंठ सद्गदित गळाले। अश्रुपात दुःखें ॥ ७३ ॥

असे म्लान वदनाने म्हणून श्रोत्याने वक्त्याची पावले सुदृढपणे धरली. त्याचा कंठ सद्गदित होऊन, दुःखाने डोळ्यांतून अश्रू गळू लागले. (७३)

देखोन शिष्याची अनन्यता। भावें वोळला सद्गुरु दाता।
स्वानंद तुंबळेल आतां। पुढिले समासीं ॥ ७४ ॥

ही शिष्याची अनन्यता पाहून व त्याचा एकनिष्ठ भाव पाहून सद्गुरू प्रसन्न झाले व ज्ञान देण्यास उत्सुक झाले. आता पुढील समासात या गुरुशिष्यांच्या संवादात स्वानंद उचंबळून येईल. (७४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'वैराग्यनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

दशक तिसरा समाप्त.



# दशक चौथा : नवविधा भक्ती

## दशक ४ : समास १

## श्रवणभक्ती

॥ श्रीराम ॥

**जयजय जी गणनाथा। तू विद्यावैभवें समर्था।**
**अध्यात्मविद्येच्या परमार्था। मज बोलवावें ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, श्री गणनाथाचा जयजयकार असो. हे गणनाथा, तू विद्यावैभवाने संपन्न असून ती दुसऱ्यास देण्याचे सामर्थ्यही तुजपाशी आहे. अध्यात्मविद्येचे रहस्य असा जो परमार्थ तो माझ्याकडून आपणच वदवून घ्यावा. (१)

**नमूं शारदा वेदजननी। सकळ सिद्धि जयेचेनी।**
**मानस प्रवर्तलें मननीं। स्फूर्तिरूपे ॥ २ ॥**

वेदजननी जी शारदा तिला मी वंदन करतो. तिच्या कृपेने सर्व कार्ये सिद्धीला जातात. तिच्या कृपेनेच स्फूर्तिरूपाने माझे मन चिंतनात प्रवर्तले आहे. (२)

**आतां आठऊं सद्‌गुरु। जो पराचाहि परु।**
**जयाचेनि ज्ञानविचारु। कळों लागे ॥ ३ ॥**

नंतर श्रेष्ठाहूनही श्रेष्ठ, अशा श्रीसद्‌गुरूंचे स्मरण करू. कारण गुरुकृपेमुळेच ज्ञानविचार कळू लागतो.(३)

**श्रोतेन पुसिलें बरवें। भगवद्भजन कैसें करावें।**
**म्हणौनि बोलिलें स्वभावें। ग्रन्थान्तरीं ॥ ४ ॥**

श्रोत्यांनी चांगला प्रश्न केला आहे की, भगवद्‌भजन कसे करावे? म्हणून स्वाभाविकच निरनिराळ्या ग्रंथांतील भगवद्-भजनासंबंधीची वचने येथे सांगतो. (४)

**सावध होऊन श्रोतेजन। ऐका नवविधा भजन।**
**सत्शास्त्रीं बोलिलें पावन। होईजे येणें ॥ ५ ॥**

तरी श्रोत्यांनी सावध होऊन नवविधा भक्तीसंबंधी सत्‌शास्त्रात जे वर्णन आले आहे ते ऐकावे व त्यायोगे पावन व्हावे. (५)

श्लोक

श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥ १ ॥

**अर्थ**—श्रवण, कीर्तन, श्री विष्णूचे नामस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन असे भक्तीचे नऊ प्रकार आहेत. (१)

**नवविधा भजन बोलिलें। तेंचि पुढें प्रांजळ केलें।**
**श्रोतीं अवधान दिधलें। पाहिजे आतां ॥ ६ ॥**

याप्रमाणे शास्त्रात जे नऊ प्रकारचे भजन सांगितले आहे, त्याचेच सविस्तर वर्णन पुढे केले आहे. तरी श्रोत्यांनी आता नीट लक्ष द्यावे. (६)

**प्रथम भजन ऐसें जाण। हरिकथापुराणश्रवण।**
**नाना अध्यात्मनिरूपण। ऐकत जावें ॥ ७ ॥**

नऊ प्रकारांपैकी पहिले भजन कसे असते, ते ऐकावे. भगवंतांच्या कथा ऐकाव्यात, पुराण श्रवण करावे आणि नाना प्रकारे अध्यात्मनिरूपण केले जाते, तेही ऐकावे.(७)

**कर्ममार्ग उपासनामार्ग। ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग।**
**योगमार्ग वैराग्यमार्ग। ऐकत जावे ॥ ८ ॥**

कर्ममार्ग, उपासनामार्ग, ज्ञानमार्ग, सिद्धान्तमार्ग योगमार्ग, वैराग्यमार्ग इत्यादी सर्वांचे श्रवण करीत जावे.(८)

**नाना व्रतांचे महिमे। नाना तीर्थांचे महिमे।**
**नाना दानांचे महिमे। ऐकत जावे ॥ ९ ॥**

नाना व्रतांचे महत्त्व, नाना तीर्थांचे महत्त्व व नाना दानांचे माहात्म्य ऐकत जावे. (९)

**नाना माहात्में नाना स्थानें। नाना मंत्र नाना साधनें।**
**नाना तपें पुरश्चरणें। ऐकत जावीं ॥ १० ॥**

नाना माहात्म्ये, नाना स्थाने, नाना मंत्र, नाना साधने, नाना प्रकारचे तप व नाना पुरश्चरणे यासंबंधीचे वर्णन ऐकत जावे. (१०)

**दुग्धाहारी निराहारी। फळाहारी पर्णाहारी।**
**तृणाहारी नानाहारी। कैसे ते ऐकावे ॥ ११ ॥**

दुग्धाहारी, निराहारी, फळाहारी, पानाहारी, तृणाहारी असे नाना प्रकारचे आहार घेणारे लोक कसे असतात, ते ऐकावे. (११)

उष्णवास जळवास। सीतवास आरण्यवास।
भूगर्भ आणी आकाशवास। कैसे ते ऐकावे ॥ १२॥

कुणी उन्हात राहणारे, कुणी पाण्यात राहणारे, कुणी थंडीत राहणारे, कुणी अरण्यात राहणारे, तर कुणी जमिनीत खड्डा खणून त्यात राहणारे, तर कुणी आकाशात राहणारे कसे असतात, ते ऐकावे. (१२)

जपी तपी तामस योगी। नाना निग्रह हटयोगी।
शाक्तआगम आघोरयोगी। कैसे ते ऐकावे ॥ १३॥

जप करणारे, तप करणारे, अत्यंत तापट असणारे योगी, नाना प्रकारे निग्रह करणारे हठयोगी, शक्तिउपासक व कापालिक कसे असतात, ते सर्वही ऐकावे. (१३)

नाना मुद्रा नाना आसनें। नाना देखणीं लक्षस्थानें।
पिंडज्ञानें तत्त्वज्ञानें। कैसीं तें ऐकावीं ॥ १४॥

योगशास्त्रात वर्णिलेल्या नाना मुद्रा, नाना आसने, नाना प्रकाशाची रूपे, ज्यावर मन सुलभतेने स्थिर करता येते अशी लक्ष्य स्थाने तसेच पिंडज्ञाने तत्त्वज्ञाने कशी आहेत तेही ऐकावे. (१४)

नाना पिंडाची रचना। नाना भूगोळरचना।
नाना सृष्टीची रचना। कैसी ती ऐकावी॥ १५॥

नाना प्राण्यांच्या शरीराची रचना, पृथ्वीवरील निरनिराळ्या प्रदेशांची रचना, नाना सृष्टीची रचना कशी झाली आहे, तेही ऐकावे. (१५)

चंद्र, सूर्य तारामंडळें। ग्रहमंडळें मेघमंडळें।
येकवीस स्वर्गे सप्तपाताळें। कैसीं तें ऐकावीं॥ १६॥

चंद्र, सूर्य, तारांचे समूह, विविध ग्रहांचे समुदाय, मेघांचे समुदाय, एकवीस स्वर्ग आणि सप्तपाताळ यांचे विवरणही ऐकावे. (१६)

ब्रह्माविष्णुमहेशस्थानें। इन्द्रदेवऋषीस्थानें।
वायोवरुणकुबेरस्थानें। कैसीं ते ऐकावीं॥ १७॥

ब्रह्मा, विष्णू, महेश यांची स्थाने, तसेच इंद्र, देव, ऋषी यांची स्थाने, वायू, वरुण, कुबेर यांची स्थाने कशी आहेत तेही ऐकावे. (१७)

नव खंडें चौदा भुवनें। अष्ट दिग्पाळांचीं स्थानें।
नाना वनें उपवनें गहनें। कैसीं ते ऐकावीं॥ १८॥

नऊ खंडे, चौदा भुवने, अष्ट दिक्पालांची स्थाने, तसेच नाना वने, उपवने, गहन अरण्ये यांची माहितीही ऐकावी. (१८)

गण गंधर्व विद्याधर। येक्ष किन्नर नारद तुंबर।
अष्ट नायका संगीतविचार। कैसा तो ऐकावा॥ १९॥

शिवगण, देवगण, गंधर्व, विद्याधर, यक्ष, किन्नर, नारद, तुंबर इत्यादींची माहिती, तसेच अष्टनायिका आणि संगीतशास्त्र यांची माहितीही ऐकावी. (१९)

रागज्ञान ताळज्ञान। नृत्यज्ञान वाद्यज्ञान।
अमृतवेळ प्रसंगज्ञान। कैसें तें ऐकावें ॥ २०॥

रागज्ञान, तालज्ञान, नृत्यज्ञान, वाद्यज्ञान, मुहूर्तज्ञान, प्रसंगज्ञान कसे असते, तेही ऐकावे (२०)

चौदा विद्या चौसष्टीकळा। सामुद्रिक लक्षणें सकळ कळा।
बत्तीस लक्षणें नाना कळा। कैशा त्या ऐकाव्या॥ २१॥

चौदा विद्या, चौसष्ट कला, हातांवरील रेषांची लक्षणे, इतर कला, व माणसाच्या अंगी असणारी बत्तीस लक्षणे, वगैरे नाना कलांची माहिती ऐकावी. (२१)

मंत्र मोहरे तोटके सिद्धी। नाना वल्ली नाना औषधी।
धातु रसायण बुद्धी। नाडिज्ञानें ऐकावीं॥ २२॥

मंत्र, विविधतोडगे, सर्व सिद्धी, नाना औषधी, मणी, नाना वल्ली, विविध धातू, विविध रसायने तयार करण्याच्या क्रिया, नाडी परीक्षा इत्यादी गोष्टीही ऐकाव्यात. (२२)

कोण्या दोषें कोण रोग। कोणा रोगास कोण प्रयोग।
कोण्या प्रयोगास कोण योग। साधे तो ऐकावा ॥ २३॥

कुठल्या दोषामुळे कुठला रोग होतो, कुठल्या रोगावर कुठल्या औषधाचा प्रयोग करावा, कुठल्या प्रयोगात कुठल्या योगावर आरंभ केला असता तो सिद्धीस जातो, हे सर्व ऐकून घ्यावे. (२३)

रवरवादि कुंभपाक। नाना यातना येमलोक।
सुखदुःखादि स्वर्गनर्क। कैसा तो ऐकावा॥ २४॥

रौरव नरक, कुंभपाक नरक, इत्यादी नाना यातना ज्यात भोगाव्या लागतात ते सर्व नरक, तसेच यमलोक कसा आहे, स्वर्गातील सुख व नरकातील दुःख कसे असते, तेही सर्व ऐकावे. (२४)

कैशा नवविधा भक्ती। कैशा चतुर्विधा मुक्ती।
कैसी पाविजे उत्तम गती। ऐसें हें ऐकावें ॥ २५ ॥

नवविधा भक्ती कोणत्या आहेत, चार प्रकारच्या मुक्ती कोणत्या आहेत, उत्तम गती प्राप्त होण्यासाठी काय करावे, हे सर्व ऐकून घ्यावे. (२५)

पिंडब्रम्हांडाची रचना। नाना तत्त्वविवंचना।
सारासारविचारणा। कैसी ते ऐकावी ॥ २६ ॥

पिंडब्रह्मांडाची रचना, नाना तत्त्वविवंचना तसेच सारासार विचार म्हणजे काय हेही ऐकावे (२६)

सायोज्यता मुक्ती कैसी होते। कैसें पाविजे मोक्षातें।
याकारणें नाना मतें। शोधित जावीं ॥ २७ ॥

सायुज्यता मुक्ती कशी मिळते, मोक्षाची प्राप्ती कशी होते, हे जाणून घेण्यासाठी नाना मतांचा शोध घ्यावा. (२७)

वेदशास्त्रें आणि पुराणें। माहावाक्याचीं विवरणें।
तनुचतुष्टयनिर्शनें। कैसीं तें ऐकावीं ॥ २८ ॥

वेद, शास्त्रे, पुराणे, महावाक्यावरील विवरणे तसेच चार देहांचे निरसन कसे करावे हे सर्व ऐकावे. (२८)

ऐसें हें अवघेंचि ऐकावें। परंतु सार शोधून घ्यावें।
असार तें जाणोनि त्यागावें। या नांव श्रवणभक्ति ॥ २९ ॥

अशा रीतीने हे सर्व ऐकावे व विचार करून त्यातील सार शोधून काढावे व ते ग्रहण करावे. असार असेल ते जाणून घेऊन त्याचा त्याग करावा. यालाच श्रवणभक्ती असे नाव आहे. (२९)

सगुणाचीं चरित्रें ऐकावीं। कां तें निर्गुण अध्यात्में शोधावीं।
श्रवणभक्तीचीं जाणावीं। लक्षणें ऐसीं ॥ ३० ॥

भगवंताच्या सगुण चरित्राचे वर्णन ऐकावे तसेच त्याचे निर्गुण स्वरूपही तत्त्वमीमांसेने जाणून घ्यावे ही श्रवणभक्तीची लक्षणे होत. (३०)

सगुण देवांचीं चरित्रें। निर्गुणाचीं तत्त्वें यंत्रें।
हे दोनी परम पवित्रें। ऐकत जावीं ॥ ३१ ॥

भगवंताची सगुण चरित्रे व निर्गुणाची तत्त्वे, यंत्रे ही दोन्ही परम पवित्र असल्याने ती ऐकावीत.(३१)

जयंत्या उपोषणें नाना साधनें। मंत्र यंत्र जप ध्यानें।
कीर्ति स्तुती स्तवनें भजनें। नानाविधें ऐकावीं ॥ ३२ ॥

सगुण भक्तीसाठी जयंत्या, उपोषणे, नाना साधने, नाना मंत्र, यंत्र, जप व ध्याने तसेच भगवंताची कीर्ती, त्याची स्तुतिस्तोत्रे, भजने यांचे विविध प्रकार हे सर्व काही ऐकावे. (३२)

ऐसें श्रवण सगुणाचें। अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें।
विभक्ती सांडून भक्तीचें। मूळ शोधावें ॥ ३३ ॥

याप्रमाणे सगुणाचे श्रवण करावे आणि निर्गुणाचे अध्यात्मनिरूपणाच्या योगे ज्ञान करून घ्यावे थोडक्यात म्हणजे वेगळेपणाचा त्याग करून ऐक्यतेचे, भक्तीचे मूळ शोधावे, भगवंताशी एकरूपता कशी होईल हे जाणून घ्यावे. (३३)

श्रवणभक्तीचें निरूपण। निरोपिलें असे जाण।
पुढें कीर्तनभजनांचें लक्षण। बोलिलें असे ॥ ३४ ॥

आत्तापर्यंत श्रवणभक्तीचे निरूपण केले. आता पुढे कीर्तनभजनाचे लक्षण सांगितले जाईल. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रवणभक्तिनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक ४ : समास २

# कीर्तनभक्ती

॥ श्रीराम ॥

**श्रोतीं भगवद्भजन पुसिलें। तें नवविधा प्रकारें बोलिलें।**
**त्यांत प्रथम श्रवण निरोपिलें। दुसरें कीर्तन ऐका ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, श्रोत्यांनी भगवद्‌भजनासंबंधी प्रश्न केला. ते भगवद्‌भजन नऊ प्रकारचे आहे म्हणून सांगितले. प्रथम श्रवणाचे वर्णन केले. आता दुसरा प्रकार 'कीर्तन' त्याचे वर्णन ऐका. (१)

**सगुण हरिकथा करावी। भगवत्कीर्ती वाढवावी।**
**अखंड वैखरी वदवावी। येथायोग्य ॥ २ ॥**

भगवंताच्या सगुण चरित्राचे वर्णन करावे, नित्य हरिकथा करावी. भगवंताच्या कीर्तीचे वर्णन करावे, ती वाढवावी. आपल्या वैखरी वाणीचा अखंड यथायोग्य उपयोग करून भगवद्‌गुणवर्णन तिचेकडून अखंड करवावे. (२)

**बहुत करावें पाठांतर। कंठीं धरावें ग्रन्थांतर।**
**भगवत्कथा निरंतर। करीत जावी ॥ ३ ॥**

खूप पाठांतर करावे, खूप ग्रंथांचा अभ्यास करून त्यातील सारांश कंठस्थ करावा व निरंतर भगवंताची कथा सांगत जावी. (३)

**आपुलिया सुखस्वार्था। केलीच करावी हरिकथा।**
**हरिकथेविण सर्वथा। राहोंचि नये ॥ ४ ॥**

स्वत:चे हित साधण्यासाठी, म्हणजेच मनुष्यजन्म सार्थकी लावून भगवत्प्राप्ती करून घेण्यासाठी पुन्हा पुन्हा हरिकथा करावी. त्याशिवाय कधी राहूच नये. (४)

**नित्य नवा हव्यास धरावा। साक्षेप अत्यंतचि करावा।**
**हरिकीर्तनें भरावा। ब्रह्मगोळ अवघा ॥ ५ ॥**

हरिकथेत रोज नित्य नवा रस उत्पन्न होईल असा हव्यास धरावा. त्यासाठी खूपच प्रयत्न करावा. सर्व ब्रह्मांड हरिकीर्तनाने दुमदुमून सोडावे. (५)

**मनापासून आवडी। जीवापासून अत्यंत गोडी।**
**सदा सर्वदा तांतडी। हरिकीर्तनाची ॥ ६ ॥**

हरिकीर्तनाची अगदी मनापासून आवड असावी. त्याची गोडी अगदी जीवाभावापासून असावी आणि सदासर्वदा हरिकीर्तनाचीच उत्कंठा असावी. (६)

**भगवंतास कीर्तन प्रिये। कीर्तनें समाधान होये।**
**बहुत जनासी उपाये। हरिकीर्तनें कल्युगीं ॥ ७ ॥**

भगवंतास कीर्तन अत्यंत प्रिय आहे. कीर्तनानेच समाधान प्राप्त होते. श्रोता व वक्ता यांना समाधान देऊन बहुजनसमाजाचाही उद्धार होण्याकरिता कलियुगात हरिकीर्तन हाच उत्तम उपाय आहे. (७)

**विविध विचित्रें ध्यानें। वर्णावीं आळंकार भूषणें।**
**ध्यानमूर्ति अंत:करणें। लक्षून कथा करावी ॥ ८ ॥**

भगवंताच्या विविध आणि अद्‌भुत रूपांचे वर्णन करावे. त्याच्या वस्त्रालंकारांचे, भूषणांचे वर्णन अशा प्रकारे करावे की, अंत:करणात ते ध्यान ठसले पाहिजे, अशा रीतीने भगवंताचे ध्यान मनात धरून कथा करावी. (८)

**येश कीर्ति प्रताप महिमा। आवडीं वर्णावा परमात्मा।**
**जेणें भगवद्भक्तांचा आत्मा। संतुष्ट होये ॥ ९ ॥**

भगवंताचे यश, त्याची कीर्ती, त्याचा प्रताप व महिमा अत्यंत आवडीने अशा प्रकारे वर्णावा की, जेणेकरून तो ऐकत असता भगवद्‌भक्ताचा आत्मा संतुष्ट होईल. (९)

**कथा अन्वय लापणिका। नामघोष करताळिका।**
**प्रसंगें बोलाव्या अनेका। धात माता नेमस्त ॥ १० ॥**

भगवत् कथा सांगताना सुसंगती असावी. शब्दपांडित्य, वक्तृत्व असावे. अधूनमधून भगवंताच्या नामाचा घोष करावा. सर्वांनी टाळ्या वाजवाव्या. प्रसंगानुसार पुराणादी शास्त्रीय ग्रंथातून वर्णिलेले दृष्टान्तादी प्रसंग, तसेच प्रत्यक्ष घडलेल्या प्रसंगाचे दृष्टान्त यांचा उपयोग विवेचन नीट समजण्याकरिता करावा. (१०)

ताळ मृदांग हरिकीर्तन। संगीत नृत्य तान मान।
नाना कथानुसंधान। तुटोंचि नेदावें ॥ ११ ॥

हरिकीर्तनात रंग भरण्यासाठी टाळ, मृदुंग, संगीत, नृत्य, तानमान यांचा उपयोग करावा; पण या सगळ्यांमध्ये कथेचा मागचा, पुढचा संबंध तुटणार नाही, याची काळजी घ्यावी. (११)

करुणाकीर्तनाच्या लोटें। कथा करावी घडघडाटें।
श्रोतयांचीं श्रवणपुटें। आनंदें भरावीं ॥ १२ ॥

कथा सांगताना करुण रसाचा आविष्कार व्हावा. करुणरसाचे लोट वाहतील अशी घडघडाटाने कथा करावी आणि श्रोत्यांचे कान आनंदाने भरून टाकावेत. (१२)

कंप रोमांच स्फुराणें। प्रेमाश्रुसहित गाणें।
देवद्वारीं लोटांगणें। नमस्कार घालावे ॥ १३ ॥

कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रू इत्यादी अष्टसात्त्विक भाव प्रगट होतील, अशा प्रकारे कथा करावी. प्रेमाने भगवंताचे गुणगान करून देवद्वारी लोटांगणे, नमस्कार घालावेत. (१३)

पदें दोहडे श्लोक प्रबंद। धाटी मुद्रा अनेक छंद।
बीरभाटिंव विनोद। प्रसंगें करावे ॥ १४ ॥

प्रसंगानुसार पदे, दोहे, श्लोक, प्रबंध, धाटी, मुद्रा, अनेक छंद, वीरश्री निर्माण करणारे भाषण व विनोद यांचा उपयोग करावा. (१४)

नाना नवरसिक शृंघारिक। गद्यपद्याचें कौतुक।
नाना वचनें प्रस्ताविक। शास्त्राधारें बोलावीं॥ १५ ॥

कथेमध्ये शृंगारासकट नवरस असावेत. उत्तम गद्य-पद्य वाङ्मय बोलावे. शास्त्राधारे प्रसंगाला अनुसरून नाना वचने बोलावीत. (१५)

भक्तिज्ञान वैराग्यलक्षण। नीतिन्यायस्वधर्मरक्षण।
साधनमार्ग अध्यात्मनिरूपण। प्रांजळ बोलावें ॥ १६ ॥

कीर्तनात भक्ती, ज्ञान, वैराग्य यांची लक्षणे, तसेच नीती, न्याय व स्वधर्मरक्षण यासाठी काय करावे, विविध साधनमार्ग कोणते आहेत व परमात्मस्वरूप कसे आहे, यासंबंधीचे प्रांजळ निरूपण असावे. (१६)

प्रसंगें हरिकथा करावी। सगुणीं सगुणकीर्ति धरावी।
निर्गुणप्रसंगें वाढवावी। अध्यात्मविद्या ॥ १७ ॥

प्रसंग पाहून कीर्तनाचा विषय निवडावा. सगुणाचा प्रसंग असेल तर भगवंताच्या सगुण चरित्राचे, कीर्तीचे वर्णन करावे, निर्गुणाचा प्रसंग असेल तर अध्यात्माचे निरूपण करून अध्यात्मविद्या वाढवावी. (१७)

पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत। निरूपण करावें नेमस्त।
बहुधा बोलणें अव्यावेस्त। बोलोंचि नये ॥ १८ ॥

प्रथम पूर्वपक्ष त्यागून नंतर सिद्धान्त निरूपण नेमस्तपणे म्हणजे यथायोग्य रीतीने करावे. शक्य तो विषयाला सोडून अस्ताव्यस्त बोलूच नये. (१८)

करावें वेदपारायेण। सांगावें जनासी पुराण।
मायाब्रह्मीचें विवरण। साकल्य वदावें ॥ १९ ॥

वेदांचे पारायण करावे, लोकांना पुराण सांगावे, तसेच माया-ब्रह्म यासंबंधीचे सांगोपांग विवरण करावे. (१९)

ब्राह्मण्य रक्षावें आदरें। उपासनेचीं भजनद्वारें।
गुरुपरंपरा निर्धारें। चळोंच नेदावी ॥ २० ॥

ब्राह्मणधर्माचे आदराने रक्षण करावे, भगवंताची उपासना भजनाद्वारे रक्षण करावी आणि आपली गुरुपरंपरा निर्धाराने टिकवून धरावी. तीस बाधा येऊ देऊ नये. (२०)

करावें वैराग्यरक्षण। रक्षावें ज्ञानाचें लक्षण।
परम दक्ष विचक्षण। सर्वहि सांभाळी ॥ २१ ॥

वैराग्याचे रक्षण करावे, ज्ञानाचे लक्षण सांभाळावे, जो अत्यंत सावध व विचारवंत वक्ता असतो, त्याला हे सर्व जमते. (२१)

कीर्तन ऐकतां संदेह पडे। सत्य समाधान तें उडे।
नीतिन्यायसाधन मोडे। ऐसें न बोलावें ॥ २२ ॥

कीर्तन ऐकून श्रोत्यांच्या मनात संदेह उत्पन्न होईल आणि खरोखरच त्याचे समाधान नष्ट होईल तसेच नीतिन्याय व साधन यात बाधा येईल, असे वक्त्याने काहीही बोलू नये. (२२)

सगुणकथा या नांव कीर्तन। अद्वैत म्हणिजे निरूपण।
सगुण रक्षून निर्गुण। बोलत जावें ॥ २३ ॥

सगुण कथेलाच कीर्तन असे म्हणतात. अद्वैताचे प्रतिपादन किंवा स्पष्टीकरण याला निरूपण म्हणतात; कीर्तनकाराने सगुणाचे महत्त्व रक्षून निर्गुणाचे प्रतिपादन करावे. (२३)

असो वगृत्वाचा अधिकार। अल्पास न घडे सत्योत्तर।
वक्ता पाहिजे साचार। अनुभवाचा ॥ २४॥

जो अल्प बुद्धीचा आहे, ज्याला अनुभव नाही, वक्तृत्व नाही, सर्व प्रकारे जो उणा आहे त्याला वक्तृत्वाचा अधिकार नसतो. जो खरोखर अनुभवी असेल तोच वक्ता होऊ शकतो. (२४)

सकळ रक्षून ज्ञान सांगे। जेणे वेदज्ञा न भंगे।
उत्तम सन्मार्ग लागे। प्राणीमात्रांसी ॥ २५॥

असा अनुभवी वक्ता सर्वांचे रक्षण करून ज्ञानाचे निरूपण करतो. ते अशा प्रकारे करतो की, वेदाज्ञेचा भंग न होता प्राणिमात्रांनी सन्मार्गास प्रवृत्त व्हावे. (२५)

असो हें सकळ सांडून। करावें गुणानुवादकीर्तन।
या नाव भगवद्भजन। दुसरी भक्ती ॥ २६॥

असो. हे सर्व राहू द्यावे. भगवंताच्या गुणानुवादाचे वारंवार कथन, गायन करणे यालाच दुसरे भगवद्भजन किंवा कीर्तनभक्ती असे म्हणतात. (२६)

कीर्तनें माहा दोष जाती। कीर्तनें होये उत्तम गती।
कीर्तनें भगवत्प्राप्ती। येदर्थी संदेह नाही॥ २७॥

कीर्तनाने मोठे दोष नाहीसे होतात, कीर्तनाने उत्तम गती मिळते; एवढेच नव्हे तर कीर्तनाने भगवत्प्राप्ती होते, यात तिळमात्र संदेह नाही. (२७)

कीर्तनें वाचा पवित्र। कीर्तनें होय सत्पात्र।
हरिकीर्तनें प्राणीमात्र। सुसिळ होती ॥ २८॥

कीर्तनाने वाणी पवित्र होते. कीर्तनाने माणूस सत्पात्र बनतो, हरिकीर्तनाने सर्व भाविक श्रोते सदाचारी बनतात. (२८)

कीर्तनें अवेग्रता घडे। कीर्तनें निश्चये सांपडे।
कीर्तनें संदेह वुडे। श्रोतयांवक्तयांचा ॥ २९॥

कीर्तनाने एकाग्रता साधते, कीर्तनाने भगवत्प्राप्तीचा निश्चय दृढ होतो, कीर्तनाने श्रोत्यांचे व वक्त्यांचे सर्व संशय नष्ट होतात. (२९)

सदा सर्वदा हरिकीर्तन। ब्रह्मसुत करी आपण।
तेणें नारद तोचि नारायेण। बोलिजेत आहे ॥ ३०॥

ब्रह्मदेवाचे पुत्र देवर्षी नारद सदासर्वदा हरिकीर्तन करीत असतात, म्हणून लोक त्यांना नारायणरूप मानतात. (३०)

म्हणोनि कीर्तनाचा अगाध महिमा। कीर्तनें संतोषे परमात्मा।
सकळ तीर्थें आणी जगदात्मा। हरिकीर्तनीं वसे ॥ ३१॥

म्हणून कीर्तनाचा महिमा अवर्णनीय आहे. कारण कीर्तनाने परमात्म्याला आनंद होतो. किंबहुना सर्व तीर्थे आणि भगवंत हरिकीर्तनात प्रत्यक्ष राहातात. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कीर्तनभक्तिनाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक ४ : समास ३

# नामस्मरणभक्ती

॥ श्रीराम ॥

मागां निरोपिलें कीर्तन। जें सकळांस करी पावन।
आतां ऐका विष्णो:स्मरण। तिसरी भक्ती॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, यापूर्वी जी सकळांना पावन करते त्या कीर्तनभक्तीचे वर्णन केले. आता विष्णूचे स्मरण ही तिसरी भक्ती सांगतो, ती ऐका. (१)

स्मरण देवाचें करावें। अखंड नाम जपत जावें।
नामस्मरणें पावावें। समाधान ॥ २॥

भगवंताचे स्मरण करावे, त्याचे नाम अखंड जपावे. नामस्मरणानेच समाधान प्राप्त होते. (२)

नित्य नेम प्रात:काळीं। माध्यानकाळीं सायंकाळीं।
नामस्मरण सर्वकाळीं। करीत जावें ॥ ३॥

नित्य नेमाने प्रात:काळी, मध्याह्नकाळी, सायंकाळी एवढेच नव्हे तर सर्वकाळ नामस्मरण करीत असावे.(३)

सुख दु:ख उद्वेग चिंता। अथवा आनंदरूप असतां।
नामस्मरणेंविण सर्वथा। राहोंच नये ॥ ४॥

सुखाचा प्रसंग असो वा दु:खाचा प्रसंग असो, मनात उद्वेग, चिंता असो अथवा मन आनंदरूप असो. कुठल्याही प्रसंगी नामस्मरणाशिवाय राहूच नये. (४)

हरुषकाळीं विषमकाळीं। पर्वकाळीं प्रस्तावकाळीं।
विश्रांतिकाळीं निद्राकाळीं। नामस्मरण करावें॥ ५॥

आनंदाचा प्रसंग असो किंवा संकटाचा प्रसंग असो, पर्वकाळ असो वा प्रयाणकाळ असो, विश्रांतीची वेळ असो अथवा झोपेची वेळ असो, सर्वकाळ नामस्मरण करावे. (५)

कोडें साकडें संकट। नाना संसारखटपट।
आवस्ता लगतां चटपट। नामस्मरण करावें॥ ६॥

एखादी समस्या निर्माण झालेली असो, काही अडचण असो वा संकट असो किंवा संसारातील नाना खटपटी, लटपटी चाललेल्या असोत किंवा मनात कशाच्या तरी योगाने चिंता किंवा चुटपुट लागलेली असो, सर्व अवस्थांमध्ये नामस्मरण करीतच राहावे. (६)

चालतां बोलतां धंदा करितां।
खातां जेवितां सुखी होतां।
नाना उपभोग भोगितां। नाम विसरों नये ॥ ७॥

चालताना, बोलताना उद्योगधंदा करताना, खाताना, जेवताना, सुखी असताना किंवा नाना उपभोग घेतानाही नाम कधी विसरू नये. (७)

संपत्ती अथवा विपत्ती। जैसी पडेल काळगती।
नामस्मरणाची स्थिती। सांडूंच नये ॥ ८॥

काळगतीप्रमाणे कधी संपत्ती प्राप्त होईल तर कधी विपत्ती प्राप्त होईल, पण लौकिक स्थिती कशीही असली तरी त्यात खंड पडू देऊ नये. (८)

वैभव सामर्थ्य आणीं सत्ता। नाना पदार्थ चालता।
उत्कट भाग्यश्री भोगितां। नामस्मरण सांडूं नये॥ ९॥

एखादे वेळी वैभव, सामर्थ्य, सत्ता आदी सर्व तसेच इतर प्रापंचिक पदार्थ यांची सुबत्ता झाली तरी त्या उत्कट भाग्यश्रीचा उपभोग घेत असताही नामस्मरण कधी सोडू नये. (९)

आधीं आवदसा मग दसा। अथवा दसेउपरी आवदसा।
प्रसंग असो भलतैसा। परंतु नाम सोडूं नये॥ १०॥

आधी वाईट परिस्थिती होती, पण नंतर परिस्थिती सुधारली अथवा याचे उलट आधी चांगली परिस्थिती होती ती जाऊन वाईट परिस्थिती आली, यांपैकी कुठलाही प्रसंग असो, पण प्रसंगी नाम मात्र कधी सोडू नये. (१०)

नामें संकटें नासती। नामें विघ्नें निवारती।
नामस्मरणें पाविजेती। उत्तम पदें ॥ ११॥

नामाच्या योगे संकटे नाश पावतात, विघ्नांचे निवारण होते आणि नामस्मरणाने माणूस श्रेष्ठ पदास पोहोचतो. (११)

भूत पिशाच्य नाना छंद। ब्रह्मगिऱ्हो ब्राह्मणसमंध।
मंत्रचळ नाना खेद। नामनिष्ठें नासती ॥ १२॥

निष्ठेने नामस्मरण केले असता भूत, पिशाच्च इत्यादी नाना बाधा, नाना कपटे व ब्रह्मसमंध तसेच नाना मंत्रप्रयोग, व नाना प्रकारची करणी इत्यादींची पीडा टळते. (१२)

नामें विषबाधा हरती। नामें चेडे चेटकें नासती।
नामें होये उत्तम गती। अंतकाळीं ॥ १३॥

नामाने विष बाधत नाही, चेटूक, जादूटोणा इत्यादींचा प्रभाव पडत नाही. ती नाहीशी होतात आणि अंतकाळी नामाच्या योगे उत्तम गती प्राप्त होते. (१३)

बाळपणीं तारुण्यकाळीं। कठिणकाळीं वृधाप्यकाळीं।
सर्वकाळीं अंतकाळीं। नामस्मरण असावें॥ १४॥

बालपणी, तरुणपणी, संकटाच्याकाळी किंवा वृद्धपणी सदासर्वकाळ तसेच अंतकाल आला असताही नामस्मरण चालूच असावे. (१४)

नामाचा महिमा जाणे शंकर। जना उपदेसी विश्वेश्वर।
वाराणसी मुक्तिक्षेत्र। रामनामेंकरूनी ॥ १५॥

नामाचा यथार्थ महिमा शंकरच जाणतात. तो विश्वेश्वर काशीत मरणाऱ्या जीवांना रामनामाचा उपदेश देऊन मुक्ती प्राप्त करून देतो. रामनामाच्या प्रभावानेच वाराणसी हे मुक्तिक्षेत्र ठरले आहे. (१५)

उफराट्या नामासाठीं। वाल्मिक तरला उठाउठी।
भविष्य वदला शतकोटी। चरित्र रघुनाथाचें ॥ १६॥

उलट्या रामनामाच्या जपाने वाल्मीकीचा उद्धार झाला. एवढेच नव्हे तर भविष्यकाळी होणाऱ्या श्रीरामचरित्राचे वर्णन केले, त्याचाच शतकोटी विस्तार झालेला आहे. (१६)

**हरिनामें प्रल्हाद तरला। नाना आघातांपासून सुटला।**
**नारायणनामें पावन जाला। अजामेळ ॥ १७ ॥**

हरिनामाच्या योगेच नाना संकटांतून सुटका होऊन प्रह्लाद उद्धरून गेला आणि पापी अजामीळ नारायणाच्या नामस्मरणाने पावन झाला. (१७)

**नामें पाषाण तरले। असंख्यात भक्त उद्धरले।**
**माहापापी तेचि जाले। परम पवित्र ॥ १८ ॥**

नामाच्या प्रभावाने समुद्रात पाषाण तरले. असंख्य भक्त रामनामामुळे उद्धरून गेले. अत्यंत महापापी होते, ते परम पवित्र बनले. (१८)

**परमेश्वराची अनंत नामें। स्मरतां तरिजे नित्यनेमें।**
**नामस्मरण करितां येमें। बाधिजेना ॥ १९ ॥**

परमेश्वराची अनंत नामे आहेत. त्यातील एखाद्या नामाचे नित्यनेमाने प्रेमाने स्मरण केले असता माणूस उद्धरून जातो. नामस्मरणाच्या प्रभावाने यमयातना भोगाव्या लागत नाहीत. (१९)

**सहस्त्रा नामामध्यें कोणी येक। म्हणतां होतसे सार्थक।**
**नाम स्मरतां पुण्यश्लोक। होईजे स्वयें ॥ २० ॥**

भगवंताच्या हजारो नामांपैकी कोणतेही एक नाम निष्ठेने घेत राहिल्यास मनुष्यजन्माचे सार्थक होते. नामस्मरण केल्याने ते करणारा स्वत: पुण्यात्मा बनतो. (२०)

**कांहींच न करूनि प्राणी। रामनाम जपे वाणी।**
**तेणें संतुष्ट चक्रपाणी। भक्तांलागीं सांभाळी ॥ २१ ॥**

इतर काहीही साधना न करता स्वत: फक्त रामनामाचा अखंड जप जर कुणी करीत राहील, तर त्यामुळे भगवान चक्रपाणी अत्यंत संतुष्ट होतात आणि त्या भक्ताचा सर्व प्रकारे सांभाळ करतात. (२१)

**नाम स्मरे निरंतर। तें जाणावें पुण्यशरीर।**
**माहा दोषांचे गिरिवर। रामनामें नासती ॥ २२ ॥**

जो मनुष्य निरंतर नामस्मरण करतो, त्याचे शरीरही त्या नामाच्या प्रभावाने पुण्यमय होऊन जाते. रामनामामुळे महादोषांचे उत्तुंग पर्वतही नाश पावतात. (२२)

**अगाध महिमा न वचे वदला।**
**नामें बहुत जन उद्धरला।**
**हळहळापासून सुटला। प्रत्यक्ष चंद्रमौळी ॥ २३ ॥**

नामाचा महिमा अगाध आहे. त्याचे संपूर्ण वर्णन करताच येणार नाही. नामामुळे अनेक लोकांचा उद्धार झाला आहे. प्रत्यक्ष चंद्रमौळी शंकरांनादेखील हलाहल विषाची बाधा झाली नाही. (२३)

**चहुं वर्णां नामाधिकार। नामीं नाहीं ल्हानथोर।**
**जड मूढ पैल्पार। पावती नामें ॥ २४ ॥**

नामाचा अधिकार चारी वर्णाच्या लोकांना आहे. नामस्मरणाच्या बाबतीत लहान, थोर हा भेद नाही. अगदी जड, मूढ, अडाणी, मूर्ख माणसेही नामामुळे सुखाने पैलतीर गाठतात. (२४)

**म्हणौन नाम अखंड स्मरावे। रूप मनीं आठवावें।**
**तिसरी भक्ती स्वभावें। निरोपिली ॥ २५ ॥**

म्हणून अखंड नामस्मरण करीत राहावे व त्याचे रूप मनात आठवावे. ही तिसरी भक्ती होय. तिचे येथे यथार्थ वर्णन केले आहे, असे श्रीसमर्थ म्हणतात. (२५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'नामस्मरणभक्तिनाम' समास तिसरा समाप्त.**



## दशक ४ : समास ४

# पादसेवनभक्ती

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। नामस्मरणाचें लक्षण।
आतां ऐका पादसेवन। चौथी भक्ती ॥ १ ॥

पादसेवन तेंचि जाणावें। कायावाचामनोभावें।
सद्गुरूचे पाय सेवावे। सद्गतिकारणें ॥ २ ॥

या नांव पादसेवन। सद्गुरुपदीं अनन्यपण।
निरसावया जन्ममरण। यातायाती ॥ ३ ॥

सद्गुरुकृपेविण कांहीं। भवतरणोपाव तों नाहीं।
याकारणें ल्वलाहीं। सद्गुरुपाय सेवावे ॥ ४ ॥

सद्वस्तु दाखवी सद्गुरु। सकळ सारासारविचारु।
परब्रह्माचा निर्धारु। अंतरीं बाणे ॥ ५ ॥

जे वस्तु दृष्टीस दिसेना। आणी मनास तेहि भासेना।
संगत्यागेंविण ये ना। अनुभवासी ॥ ६ ॥

अनुभव घेतां संगत्याग नसे।
संगत्यागें अनुभव न दिसे।
हे अनुभवीयासीच भासे। येरां गथागोवी ॥ ७ ॥

संगत्याग आणी निवेदन। विदेहस्थिती अलिप्तपण।
सहजस्थिती उन्मनी विज्ञान। हे सप्तहि येकरूप ॥ ८ ॥

याहिवेगळीं नामाभिधानें। समाधानाचीं संकेतवचनें।
सकळ कांहीं पादसेवनें। उमजों लागे ॥ ९ ॥

वेद वेदगर्भ वेदांत।
सिद्ध सिद्धभावगर्भ सिद्धांत।
अनुभव अनुर्वाच्य धादांत। सत्य वस्तु ॥ १० ॥

बहुधा अनुभवाचीं आंगें। सकळ कळती संतसंगें।
चौथे भक्तीचे प्रसंगें। गौप्य तें प्रगटे ॥ ११ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात नामस्मरणभक्तीच्या लक्षणांचे निरूपण केले. आता चौथी भक्ती जी पादसेवन तिचे लक्षण ऐका. (१)

कायावाचामनोभावाने सद्गतिप्राप्तीसाठी श्रीसद्गुरूंच्या चरणकमलांची सेवा करणे, ही पादसेवनभक्ती जाणावी. (२)

जन्ममरणाची यातायात कायमची चुकावी, म्हणून सद्गुरुचरणी अनन्य होणे यालाच पादसेवन म्हणतात. (३)

सद्गुरुकृपेशिवाय दुसरा काहीही भवतरणोपाय नाही हे जाणून घेऊन शक्य तितक्या लवकर श्रीसद्गुरूंच्या चरणांची सेवा करू लागावे. (४)

श्री सद्गुरूच परमात्मवस्तू दाखवितात. सारासारविचार म्हणजे काय वगैरे सर्व कळून येते आणि परब्रह्माच्या स्वरूपासंबंधी निश्चय अंत:करणात ठसतो. (५)

जी वस्तू डोळ्यांस दिसत नाही आणि मनानेही जी अनुमानता येत नाही, ती आत्मवस्तू संगाचा त्याग केल्याशिवाय अनुभवास येत नाही. (६)

मी अनुभव घेतो, अशी वृत्ती जोपर्यंत असते, तोपर्यंत संगत्याग नसतो. ज्यावेळी संगत्याग घडतो तेव्हा अनुभव लक्षात येत नाही. द्वैत राहातच नाही. माझे हे बोलणे हे स्वानुभवीच जाणू शकतील. इतरांना त्यात गोंधळ आहे असे वाटते. (७)

संगत्याग आणि आत्मनिवेदन, विदेहस्थिती आणि अलिप्तपणा, सहजस्थिती आणि उन्मनी म्हणजे मनातीतता, विज्ञान म्हणजेच स्वरूपानुभव ही सातही एकरूपच आहेत. (८)

या स्थितीला आणखी नावेही आहेत. पण स्वरूपानुभवाचे समाधान व्यक्त करणारी ती खुणेची वचनेच असतात. हे सर्व काही केवळ श्री सद्गुरूंच्या चरणसेवनानेच समजू लागते. (९)

वेद, वेदांचे रहस्य, वेदान्त, सिद्धांचा मार्ग, त्यातील रहस्य व त्यांचे सिद्धान्त यांचा अनुभव हा अवर्णनीय असला तरी तो सत्यवस्तू असल्याने प्रत्यक्षच असतो. (१०)

आत्मानुभवाची अशी अनेक अंगे आहेत. ती संतसंगाने संतसमागमात कळू लागतात. चौथ्या भक्तीचे वर्णन करण्याच्या प्रसंगाने परमार्थातील अनेक गुप्त रहस्ये प्रगट होत आहेत. (११)

प्रगट वसोनि नसे। गोप्य असोनि भासे।
भासाअभासाहून अनारिसे। गुरुगम्य मार्ग ॥ १२ ॥

परमात्मवस्तू प्रगट असूनही नसल्यासारखी वाटते व अदृश्य असूनही मनाला जाणवते. भास आणि अभासाच्या अतीत अशी ही परमात्मवस्तू गुरुगम्य मार्गानेच जाणता येते. (१२)

मार्ग होये परी अंतरिक्ष। जेथें सर्वहि पूर्वपक्ष।
पाहों जातां अलक्ष। लक्षवेना ॥ १३ ॥

गुरुगम्य मार्ग हा आत्मारामाशी ऐक्य पावण्याचा मार्ग आहे. तेथे इतर तर्क इत्यादी पूर्वपक्षांप्रमाणे टिकू शकत नाहीत. कारण स्वस्वरूप मन, बुद्धी इंद्रियादींनी जाणता येण्यासारखे नाही. (१३)

लक्षें जयासी लक्षावें। ध्यानें जयासी ध्यावें।
तें गे तेंचि आपण व्हावें। त्रिविधा प्रचिती ॥ १४ ॥

त्या वस्तूस लक्ष देऊन आतमध्ये पाहाण्याचा प्रयत्न करावा, ध्यान धरून त्यास जाणावयाचा प्रयत्न करावा. मग तसे करताना ती वस्तूच स्वतः आपणच होतो. शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती आणि आत्मप्रचीती ही त्रिविधा प्रचीती आहे. (१४)

असो हीं अनुभवाचीं द्वारें। कळती सारासारविचारें।
सत्संगें करून सत्योत्तरें। प्रत्ययासि येतीं ॥ १५ ॥

असो. स्वस्वरूपानुभव प्राप्त करून घेण्याचे असे मार्ग आहेत. ते सारासारविचाराने कळतात व सत्संगाच्या योगे त्यांचा खरोखर अनुभव येतो. (१५)

सत्य पाहातां नाहीं असत्य।
असत्य पाहातां नाहीं सत्य।
सत्याअसत्याचें कृत्य। पाहाणारापासीं ॥ १६ ॥

परमात्मा सत्यस्वरूप आहे. त्याचा शोध घेऊ गेले की असत्याचा, मायिक सृष्टीचा लोप होतो. या उलट मायिक सृष्टीला खरे मानून त्यात गुरफटल्यावर सत्यस्वरूप परमात्मा दुरावतो. याप्रमाणे पाहणाऱ्याच्या दृष्टीवर सत्य, असत्याची प्रचीती अवलंबून असते. (१६)

पाहाणार पाहाणें जया लागलें।
तें तद्रूपत्वें प्राप्त जालें।
तरी मग जाणावें बाणलें। समाधान ॥ १७ ॥

पाहाणारा परमात्मवस्तू पाहाण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा तो वेगळा उरतच नाही, तद्रूप होऊन जातो. असा तो जेव्हा तद्रूप होतो, तेव्हाच त्याच्या अंगी समाधान बाणते. (१७)

नाना समाधानें पाहतां। बाणतीं सद्गुरुकरितां।
सद्गुरुविण सर्वथा। सन्मार्ग नसे ॥ १८ ॥

समाधान अनेक प्रकारे होत असले तरी सद्गुरूंच्या कृपेनेच अंगी बाणते. त्यांच्याशिवाय परमात्मप्राप्तीचा दुसरा मार्गच नाही. (१८)

प्रयोग साधनें सायास। नाना साक्षेपें विद्याअभ्यास।
अभ्यासें कांहीं गुरुगम्यास। पाविजेत नाहीं ॥ १९ ॥

नाना प्रयोग केले, ज्ञान, भक्ती, कर्मयोगादी अनेक साधने केली, निरनिराळ्या प्रकारे जप-तपादी सायास केले, मोठ्या प्रयत्नाने अनेक विद्यांचा अभ्यास केला, तरी गुरुकृपेमुळे जी प्राप्ती होते, ती दुसऱ्या कशानेही होऊ शकत नाही. (१९)

जें अभ्यासें अभ्यासितां न ये।
जें साधनें असाध्य होये।
तें हें सद्गुरुविण काये। उमजों जाणे ॥ २० ॥

जे अभ्यासाने प्राप्त होऊ शकत नाही, जे साधनांनी असाध्य आहे, त्याचे ज्ञान सद्गुरूशिवाय कसे काय होणार? (२०)

याकारणें ज्ञानमार्ग। कळाया धरावा सत्संग।
सत्संगेंविण प्रसंग। बोलोंचि नये ॥ २१ ॥

म्हणून ज्ञानमार्ग कळण्यासाठी सत्संग करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. सत्संगाखेरीज या गोष्टी बोलूसुद्धा नयेत. (२१)

सेवावे सद्गुरूचे चरण। या नांव पादसेवन।
चौथे भक्तीचें लक्षण। तें हें निरोपिलें ॥ २२ ॥

सद्गुरूंच्या चरणांची सेवा याचेच नाव पादसेवन. याप्रमाणे चौथ्या भक्तीचे लक्षण येथे वर्णन केले आहे. (२२)

देव ब्राह्मण माहानुभाव। सत्पात्र भजनाचें ठाव।
ऐसिये ठाईं सद्भाव। दृढ धरावा ॥ २३ ॥

देव, ब्राह्मण, आत्मज्ञानी संत व अत्यंत सात्त्विक सज्जन ही सेवेस योग्य स्थाने आहेत. त्यांच्या ठिकाणी दृढ सद्भाव धरावा. (२३)

हें प्रवृत्तीचें बोलणें। बोलिलें रक्षाया कारणें।
परंतु सद्‌गुरुपाय सेवणें। या नांव पादसेवन॥ २४॥

हे जे मी सांगितले ते प्रवृत्तीचे बोलणे असून व्यवहार व परंपरा यांचे रक्षण व्हावे म्हणून सांगितले. परंतु वास्तविक सद्‌गुरु–चरणांची सेवा हीच खरी पादसेवन भक्ती होय. (२४)

पादसेवन चौथी भक्ती। पावन करितसे त्रिजगतीं।
जयेकरितां सायोज्यमुक्ती। साधकास होये ॥ २५॥

ही पादसेवन नावाची चौथी भक्ती त्रैलोक्याला पावन करणारी असून या भक्तीच्या योगेच साधकाला सायुज्यमुक्ती प्राप्त होते. (२५)

म्हणौनि थोराहूनि थोर। चौथे भक्तीचा निर्धार।
जयेकरितां पैल्पार। बहुत प्राणी पावती॥ २६॥

म्हणून ही भक्ती श्रेष्ठांतही श्रेष्ठ आहे असे मी निर्धारपूर्वक सांगतो. तिच्या योगेच अनेक लोक या संसारसागराच्या पैलतीरास पोहोचले आहेत. (२६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पादसेवनभक्तिनाम' समास चौथा समाप्त.**



## दशक ४ : समास ५

# अर्चनभक्ती

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। चौथे भक्तीचें लक्षण।
आतां ऐका सावधान। पांचवी भक्ती ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागल्या समासात चौथ्या भक्तीचे लक्षण वर्णन करून सांगितले. आता सावध होऊन पाचवी भक्ती कशी असते ते ऐका. (१)

पांचवी भक्ती तें आर्चन। आर्चन म्हणिजे देवतार्चन।
शास्त्रोक्त पूजाविधान। केलें पाहिजे ॥ २ ॥

अर्चन ही पाचवी भक्ती असून अर्चन म्हणजे देवतार्चन करणे, पण ते शास्त्रोक्त विधीप्रमाणे यथासांग केले पाहिजे. (२)

नाना आसनें उपकर्णें। वस्त्रें आळंकार भूषणें।
मानसपूजा मूर्तिध्यानें। या नांव पांचवी भक्ती॥ ३॥

नाना प्रकारची आसने, पूजेची उपकरणी, वस्त्रे, अलंकार–भूषणे यांनी पूजा करावी. मनात मूर्तीचे ध्यान करावे आणि तिची मानसपूजा करावी. ही पाचवी भक्ती आहे. (३)

देवब्राह्मणअग्नीपूजन। साधुसंतअतीतपूजन।
इति महानुभावगाइत्रीपूजन। या नांव पांचवी भक्ती॥ ४॥

देव, ब्राह्मण, अग्नी, साधु–संत, अतिथिअभ्यागत यांचे पूजन तसेच यती, ब्रह्मज्ञानी, संत, गाय, यांचे पूजन ही पण पाचवी भक्ती जाणावी. (४)

धातुपाषाणमृत्तिकापूजन। चित्रलेप सत्पात्रपूजन।
आपले गृहींचें देवतार्चन। या नांव पांचवी भक्ती॥ ५॥

धातू, मृत्तिका, पाषाण यांच्या मूर्ती तसेच तसबिरी व गंधाच्या लेपाने भिंतीवर काढलेल्या उपासनामूर्ती किंवा संत यांची पूजा करावी. तसेच आपल्या घरातील देवांचीही पूजा करावी. याला पाचवी भक्ती म्हणतात. (५)

सीळा सप्तांकित नवांकित। शालिग्राम शकलें चक्रांकित।
लिंगें सूर्यकांत सोमकांत। बाण तांदळे नर्बदे॥ ६॥

सात किंवा नऊ शुभचिह्ने असलेले दगड, शाळिग्राम, चक्रांकित दगडाचे तुकडे, शिवलिंगे, सूर्यकांत, चंद्रकांत मणी, शंकराचे बाण, तांदळे व नर्मदेतील गोटे, (६)

भैरव भगवती मल्लारी। मुंज्या नृसिंह बनशंकरी।
नाग नाणी नानापरी। पंचायेतनपूजा ॥ ७॥

तसेच भैरव, भगवती (देवी), मल्हारी, मुंज्या, नृसिंह, बनशंकरी, नाग, निरनिराळ्या प्रकारची देवतांचा छाप असलेली नाणी, पंचायतनाची म्हणजे गणेश, सूर्य, शक्ती, शिव व विष्णू या मुख्य पाच देवतांची पूजा, ही अर्चनभक्ती होय. (७)

गणेशशारदाविठलमूर्ती । रंगनाथजगन्नाथतांडवमूर्ती ।
श्रीरंगहनुमंतगरुडमूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ८ ॥

मत्छकूर्मवऱ्हावमूर्ती । नृसिंहवामनभार्गवमूर्ती ।
रामकृष्णहयग्रीवमूर्तीं । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ९ ॥

केशवनारायणमाधवमूर्ती । गोविंदविष्णुमदसूदनमूर्ती ।
त्रिविक्रमवामनश्रीधरमूर्ती । रुषीकेश पद्मनाभि ॥ १० ॥

दामोदरसंकर्षणवासुदेवमूर्ती ।
प्रद्युम्नअनुरुधपुरुषोत्तम मूर्ती ।
अधोक्षजनारसिंहअच्युतमूर्ती । जनार्दन आणि उपेंद्र ॥ ११ ॥

हरिहरांच्या अनंत मूर्ती । भगवंत जगदात्मा जगदीशमूर्ती ।
शिवशक्तीच्या बहुधा मूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ १२ ॥

अश्वत्थनारायेणसूर्यनारायेण ।
लक्ष्मीनारायेणत्रिमल्ल्नारायेण ।
श्रीहरीनारायण आदिनारायण । शेषशाई परमात्मा ॥ १३ ॥

ऐश्या परमेश्वराच्या मूर्ती । पाहों जातां उदंड असती ।
त्यांचे आर्चन करावें भक्ती । पांचवी ऐसी ॥ १४ ॥

याहिवेगळे कुळधर्म । सोडूं नये अनुक्रम ।
उत्तम अथवा मध्यम । करीत जावें ॥ १५ ॥

जाखमाता मायराणी । बाळा बगुळा मानविणी ।
पूजा मांगिणी जोगिणी । कुळधर्मे करावीं ॥ १६ ॥

नाना तीर्थां क्षेत्रांस जावें । तेथें त्या देवांचें पूजन करावें ।
नाना उपचारीं आर्चावें । परमेश्वरासी ॥ १७ ॥

पंचामृतें गंधाक्षतें । पुष्पें परिमळद्रव्यें बहुतें ।
धूपदीप असंख्यातें । नीरांजनें कर्पुराचीं ॥ १८ ॥

नाना खाद्य नैवेद्य सुंदर । नाना फळें तांबोलप्रकार ।
दक्षणा नाना आळंकार । दिव्यांबरें वनमाळा ॥ १९ ॥

सिबिका छत्र सुखासनें । माहि मेघडंब्रें सूर्यापानें ।
दिंड्या पताका निशाणें । टाळ घोळ मृदांग ॥ २० ॥

नाना वाद्यें नाना उत्साव । नाना भक्तसमुदाव ।
गाती हरिदास सद्भाव । लागला भगवंतीं ॥ २१ ॥

वापी कूप सरोवरें । नाना देवाळयें सिखरें ।
राजांगणें मनोहरें । वृंदावनें भुयरीं ॥ २२ ॥

गणेश, शारदा, विठ्ठल यांच्या मूर्ती, तसेच रंगनाथ, जगन्नाथ, नटराज यांच्या मूर्ती, श्रीरंग, हनुमंत, गरुड यांच्या मूर्तींचे पूजन करावे. (८)

मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, भार्गव यांच्या मूर्ती, राम, कृष्ण, हयग्रीव यांच्या मूर्तींचीही पूजा करावी. (९)

केशव, नारायण, माधव, गोविंद, विष्णू, मधुसूदन, त्रिविक्रम, वामन, श्रीधर, हृषीकेश, पद्मनाभ, (१०)

दामोदर, संकर्षण, वासुदेव, प्रद्युम्न, अनिरुद्ध, पुरुषोत्तम, अधोक्षज, नरसिंह, अच्युत, जनार्दन व उपेंद्र यांच्या मूर्ती, (११)

तसेच हरिहरांच्या अनंत मूर्ती, भगवंत, जगदात्मा, जगदीश यांच्या मूर्ती आणि शिवशक्तीच्या बहुविध मूर्ती देवतार्चनी पूजाव्या. (१२)

अश्वत्थनारायण, सूर्यनारायण, लक्ष्मीनारायण, त्रिमल्लनारायण, श्रीहरिनारायण, आदिनारायण, शेषशायी, परमात्मा अशा परमेश्वराच्या मूर्ती दिसून येतात. त्यांचे अर्चन करणे ही पाचवी भक्तीच आहे. (१३-१४)

याशिवाय आपल्या घरी जे कुळधर्म जसे चालत आले असतील त्यांचे त्याप्रमाणेच पालन करावे. त्यांचा अनुक्रम सोडू नये. उत्तम अथवा मध्यम कसेही असोत आपण ते करीत जावे. (१५)

जाखमाता, मायराणी, बाळा, बगुळा, मानविणी, मांगिणी, जोगिणी यांची पूजा कुलधर्माप्रमाणे करावी. (१६)

नाना तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी जावे, तेथे त्या त्या देवतेचे पूजन करावे. नाना प्रकारच्या उपचारांनी परमेश्वराची अर्चना करावी. (१७)

पंचामृते, गंधाक्षता, नाना प्रकारची फुले, सुवासिक द्रव्ये, अनेक प्रकारचे धूप-दीप, असंख्य नीरांजने, कर्पूरार्ती, नाना खाद्ये, सुंदर नैवेद्य, नाना प्रकारची फळे व विड्याचे नाना प्रकार, दक्षिणा, नाना अलंकार, दिव्य अशी वस्त्रे, वनमाला, पालख्या, छत्रे, सुखासने, पालखीवर धरतात त्या उंच छत्र्या, अब्दागिरी, दिंड्या, पताका, निशाणे, टाळ, घोळ, मृदुंग, अनेक प्रकारची वाद्ये देवाला अर्पण करावी. अनेक प्रकारचे उत्सव, त्यात एकत्रित होणारे भक्तांचे समुदाय आणि हरिदास, भगवंताचे गुणानुवाद भगवंतांच्या भक्तीत रंगून गाऊ लागतात. त्यामुळे आनंद उचंबळून येतो. (१८-२१)

पाण्याचे आड, विहिरी, सरोवरे, नाना देवालये, त्यांची शिखरे, मोठी अंगणे, सुंदर वृंदावने व तळघरे. (२२)

मठ मंड्या धर्मशाळा । देवद्वारीं पडशाळा ।
नाना उपकर्णें नक्षत्रमाळा । नाना वस्त्र सामग्री ॥ २३ ॥

मठ, मोठमोठ्या माड्या, अथवा यात्रेच्या वेळी बाजारहाट मांडण्यासाठी केलेल्या मंडई, धर्मशाळा, तसेच देवद्वारी ओवऱ्या, नाना उपकरणी, नक्षत्रमाला, नाना वस्त्रे वगैरे सामग्री, (२३)

नाना पडदे मंडप चांदोवे । नाना रत्नघोष लेंबती बरवे ।
नाना देवाळईं समर्पावे । हस्थी घोडे शक्कटें ॥ २४ ॥

अनेक पडदे, चांदवे, मंडप, लोंबणारे मोत्यांचे रत्नांचे घोस, तसेच हत्ती, घोडे, रथ, गाड्या निरनिराळ्या देवालयांना अर्पण करावेत. (२४)

आळंकार आणी आळंकारपात्रें । द्रव्य आणी द्रव्यपात्रें ।
अन्नोदक आणी अन्नोदकपात्रे । नाना प्रकारीचीं ॥ २५ ॥

अलंकार आणि ते ठेवण्याच्या पेट्या, द्रव्य आणि ते ठेवण्याच्या पेट्या, अन्नोदक आणि त्यासाठी लागणारी ताटे, वाट्या, भांडी, पातेली, हंडे, कळशा वगैरे अनेक प्रकारची भांडी, देवाला अर्पण करावीत. (२५)

वनें उपवनें पुष्पवाटिका । तापस्यांच्या पर्णकुटिका ।
ऐसी पूजा जगन्नायका । येथासांग समर्पावी ॥ २६ ॥

वने-उपवने, पुष्पवाटिका, फुलबागा, फळबागा, तपस्वी लोकांना राहण्यासाठी झोपड्या असे सर्व समर्पण भावाने जगन्नायकाला यथासांग अर्पण करून याप्रकारे त्याची पूजा करावी. (२६)

शुक शारिका मयोरें । बदकें चक्रवाकें चकोरें ।
कोकिळा चितळें सामरें । देवाळईं समर्पावीं ॥ २७ ॥

पोपट, सारिका, मोर, बदके, चक्रवाक, चकोर, कोकिळा वगैरे पक्षी आणि चितळ, सांबर याप्रकारची हरणे देवालयाला अर्पण करावी. (२७)

सुगंधमृगें आणी मार्जरें । गाई म्हैसी वृषभ वानरें ।
नाना पदार्थ आणी लेंकुरें । देवाळईं समर्पावीं ॥ २८ ॥

त्याचप्रमाणे कस्तुरीमृग, मांजरे, गाई, म्हशी, बैल, वानरे ही जनावरे आणि इतर नाना पदार्थ आणि लेकरे देवालयाला अर्पण करावीत. (२८)

काया वाचा मनें । चित्तें वित्तें जीवें प्राणें ।
सद्भावें भगवंत आर्चनें । या नांव आर्चनभक्ती ॥ २९ ॥

काया, वाचा, मन, चित्त, वित्त म्हणजे पैसा अडका, जीव व प्राण थोडक्यात म्हणजे आपले सर्वस्व भगवंताच्या चरणी अर्पण करून अंत:करणापासून त्याची पूजा करणे, याचे नाव अर्चनभक्ती आहे. (२९)

ऐसेंचि सद्‌गुरूचें भजन । करून असावें अनन्य ।
या नांव भगवद्भजन । पांचवी भक्ती ॥ ३० ॥

अशाच प्रकारे श्री सद्‌गुरूंची पूजा करून त्यांना अनन्यभावाने शरण जाणे, याचेही नाव भगवद्‌भजन असून तीही पाचवी भक्तीच आहे. (३०)

ऐसी पूजा न घडे बरवी । तरी मानसपूजा करावी ।
मानसपूजा अगत्य व्हावी । परमेश्वरासी ॥ ३१ ॥

अशा रीतीने बाह्योपचारांनी चांगली पूजा घडू शकली नाही तरी मानसपूजा तरी अगत्य करावी. (३१)

मनें भगवंतास पूजावें । कल्पून सर्वही समर्पावें ।
मानसपूजेचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ ३२ ॥

मनाने भगवंताचे पूजन करावे. मनाने कल्पून विविध उपचार आदी सर्व काही त्यास प्रेमाने अर्पण करावे. मानसपूजेचे लक्षण हे असे आहे. (३२)

जें जें आपणांस पाहिजे । तें तें कल्पून वाहिजे ।
येणें प्रकारें कीजे । मानसपूजा ॥ ३३ ॥

आपल्याला देवाला जे जे अर्पण करावे अशी इच्छा असले, ते ते सर्व मनाने कल्पून त्यांच्या चरणी अर्पण करावे. या प्रकारे मानसपूजा अवश्य करावी. (३३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अर्चनभक्तिनाम' समास पाचवा समाप्त.

❑ ❑

## दशक ४ : समास ६

# वंदनभक्ती

॥ श्रीराम ॥

**मागां जालें निरूपण। पांचवे भक्तीचें लक्षण।**
**आतां ऐका सावधान। साहावी भक्ती ॥ १ ॥**

**साहावी भक्ती तें वंदन। करावें देवासी नमन।**
**संत साधु आणी सज्जन। नमस्कारीत जावे ॥ २ ॥**

**सूर्यासि करावे नमस्कार। देवासि करावे नमस्कार।**
**सद्‌गुरूस करावे नमस्कार। साष्टांग भावें ॥ ३ ॥**

**साष्टांग नमस्कारास अधिकारु। नाना प्रतिमा देवगुरु।**
**अन्यत्र नमनाचा विचारु। अधिकारें करावा ॥ ४ ॥**

**छपन्न कोटी वसुमती। मधें विष्णूमूर्ती असती।**
**तयांस नमस्कार प्रीती। साष्टांग घालावे ॥ ५ ॥**

**पशुपति श्रीपति आणी गभस्ती। यांच्या दर्शनें दोष जाती।**
**तैसाचि नमावा मारुती। नित्य नेमें विशेष ॥ ६ ॥**

श्लोक

शंकरः शेषशायी च मार्तंडो मारुतिस्तथा।
एतेषां दर्शनं पुण्यं नित्यनेमे विशेषतः॥ १ ॥

**भक्त ज्ञानी आणी वीतरागी। माहानुभाव तापसी योगी।**
**सत्पात्रें देखोनि वेगी। नमस्कार घालावे ॥ ७ ॥**

**वेदज्ञ शास्त्रज्ञ आणी सर्वज्ञ। पंडित पुराणिक आणी विद्वज्जन।**
**याज्ञिक वैदिक पवित्रजन। नमस्कारीत जावे ॥ ८ ॥**

**जेथे दिसती विशेष गुण। तें सद्‌गुरुचें अधिष्ठान।**
**याकारणें तयासी नमन। अत्यादरें करावें ॥ ९ ॥**

**गणेश शारदा नाना शक्ती। हरिहरांच्या अवतारमूर्ती।**
**नाना देव सांगों किती। पृथकाकारें ॥ १० ॥**

**सर्व देवांस नमस्कारिलें। तें येका भगवंतास पावलें।**
**येदर्थी येक वचन बोलिलें। आहे, तें ऐका॥ ११ ॥**

श्लोक

आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम्।
सर्वदेवनमस्कारः केशवं प्रति गच्छति॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात पाचव्या भक्तीचे लक्षण वर्णन करून सांगितले. आता सावध होऊन सहावी भक्ती कशी असते ते ऐका. (१)

वंदन करणे ही सहावी भक्ती आहे. म्हणून देवाला नमन करावे. संत, साधू आणि सज्जन यांना नमस्कार करीत जावे. (२)

सूर्याला, देवाला आणि सद्‌गुरूंना साष्टांगभावाने नमस्कार करावा. (३)

देवांच्या निरनिराळ्या प्रतिमा, देव आणि गुरू यांना साष्टांग नमस्कार घालावा, कारण ते त्या अधिकारास पात्र आहेत. इतरांना नमस्कार करताना त्यांचा अधिकार, योग्यता पाहून यथायोग्य रीतीने करावा. (४)

पृथ्वीचा विस्तार छप्पन्न कोटी योजने आहे. त्यात ठिकठिकाणी विष्णुमूर्ती आहेत. त्यांना अत्यंत प्रेमाने साष्टांग नमस्कार करावेत. (५)

शंकर, विष्णू , सूर्य त्याचप्रमाणे मारुती यांना विशेष करून नित्यनेमाने वंदन केले असता, त्यांच्या दर्शनाने सर्व दोष नाहीसे होतात. (६)

भक्त, ज्ञानी, वैराग्यसंपन्न पुरुष, स्वानुभवी ब्रह्मज्ञानी, तापसी, योगी आणि श्रेष्ठ व्यक्ती पाहून त्यांना तत्काळ नमस्कार करावा. (७)

वेद जाणणारा, शास्त्र जाणणारा, सर्व भूत, भविष्य, वर्तमान जाणणारा, विद्वान पंडित, पुराणिक आणि इतर विद्वज्जन, तसेच याज्ञिक, वैदिक आणि पवित्र लोक यांना नमस्कार करावा. (८)

जेथे जेथे काही विशेष गुण दिसून येतील, तेथे सद्‌गुरूंचे अधिष्ठान आहे, असे जाणून त्यांना अत्यंत आदराने नमस्कार करावा. (९)

गणेश, शारदा, नाना शक्ती, हरिहरांच्या अवतार मूर्ती अशा रीतीने वेगवेगळ्या रूपाने नटलेल्या देवदेवता किती आहेत ते सांगावे म्हटले तरी पुरे पडणार नाही. (१०)

सगळ्या देवांना केलेला नमस्कार एका भगवंतालाच पोहोचतो. या अर्थाचे एक वचन आहे, ते ऐका.(११)

**अर्थ**—आकाशातून पडलेले पाणी ज्याप्रमाणे समुद्राला जाऊन मिळते, त्याप्रमाणे सर्व देवांना केलेला नमस्कार केशवाला जाऊन पोहोचतो. (१)

याकारणें सर्व देवांसीं। नमस्कारावें अत्यादरेंसीं।
अधिष्ठान मानितां, देवांसी। परम सौख्य वाटे॥ १२॥

म्हणून सर्व देवांना अत्यंत आदराने नमस्कार करावेत. सर्वांच्या ठिकाणी एका भगवंताचेच अधिष्ठान आहे हे जाणून त्या भावाने देवांना नमस्कार केला असता, आपल्याला परम सौख्य वाटते. (१२)

देव देवाचीं अधिष्ठानें। सत्पात्रें सद्‌गुरूंचीं स्थानें।
याकारणें नमस्कार करणें। उभय मार्गी ॥ १३॥

सर्व देवांच्या ठिकाणी भगवंताचे अधिष्ठान आहे आणि सर्व संतसज्जनांच्या ठिकाणी सद्‌गुरूंचे वास्तव्य आहे, हे जाणून देवदेवतांना आणि सत्पात्र संतसज्जनांना नमस्कार करावा. (१३)

नमस्कारें लीनता घडे। नमस्कारें विकल्प मोडे।
नमस्कारें सख्य घडे। नाना सत्पात्रासीं ॥ १४॥

नमस्काराने अंगी नम्रता येते. नमस्काराने मनातील शंका नाहीशी होते, नमस्कारामुळे निरनिराळ्या संतसज्जनांशी मैत्री, सख्य होते. (१४)

नमस्कारें दोष जाती। नमस्कारें अन्याय क्षमती।
नमस्कारें मोडलीं जडतीं। समाधानें ॥ १५॥

नमस्कारामुळे दोष नाहीसे होतात. आपल्या हातून एखादा अन्याय घडला असला तरी ज्या व्यक्तीबाबत तो घडला असेल, त्या व्यक्तीस नमस्कार केला असता ती व्यक्ती क्षमा करते. नमस्कारामुळे दुभंगलेली मने परत जोडली जातात. बिघडलेले संबंध सुधारतात आणि समाधान लाभते. (१५)

सिसापरता नाहीं दंड। ऐसें बोलती उदंड।
याकारणें अखंड। देव भक्त वंदावे॥ १६॥

मस्तक नमविण्यासारखे दुसरे प्रायश्चित्त नाही, असे पुष्कळांनी म्हटले आहे. मस्तक नमवून देव व भक्तांना अखंड वंदन करावे. (१६)

नमस्कारें कृपा उचंबळे। नमस्कारें प्रसन्नता प्रबळे।
नमस्कारें गुरुदेव वोळे। साधकांवरी ॥ १७॥

वंदन केल्याने त्यांच्या अंत:करणातील कृपा उचंबळून येते. नमनाने ते अत्यंत प्रसन्न होतात आणि अशा नमस्कारामुळे साधकांवर सद्‌गुरू कृपा करतात. (१७)

निशेष करितां नमस्कार। नासती दोषांचे गिरिवर।
आणी मुख्य परमेश्वर। कृपा करी ॥ १८॥

निष्काम भावनेने नमस्कार केला असता पापांचे पर्वत नष्ट होतात आणि मुख्य म्हणजे परमेश्वर कृपा करतो. (१८)

नमस्कारें पतित पावन। नमस्कारें संतांसी शरण।
नमस्कारें जन्ममरण। दुरी दुऱ्हावे ॥ १९॥

नमस्कारामुळे पतित असेल तो पावन होतो. मन:पूर्वक नमस्कार करून संतांना शरण जावे म्हणजे त्यांच्या कृपेने जन्ममरणाच्या चक्रातून कायमची सुटका होते. (१९)

परम अन्याय करूनि आला। आणी साष्टांग नमस्कार घातला।
तरी तो अन्याये क्षमा केला। पाहिजे श्रेष्ठीं ॥ २०॥

फार मोठा अपराध करून जरी एखाद्याने येऊन साष्टांग नमस्कार घातला, तर श्रेष्ठ पुरुषाने त्या अपराध्यास त्याच्या अन्यायाची क्षमा केली पाहिजे. (२०)

याकारणें नमस्कारापरतें। आणीक नाहीं अनुसरतें।
नमस्कारें प्राणीयातें। सद्‌बुद्धि लागे ॥ २१॥

म्हणून नमस्कारासारखे अनुसरण्यास योग्य असे दुसरे साधन नाही. नमस्काराच्या योगे मनुष्याच्या ठिकाणी सद्‌बुद्धी उत्पन्न होते. (२१)

नमस्कारास वेचावें नलगे। नमस्कारास कष्टावें नलगे।
नमस्कारास कांहींच नलगे। उपकर्ण सामग्री ॥ २२॥

नमस्कारासाठी काही खर्च करावा लागत नाही. काही कष्ट करावे लागत नाहीत. इतर उपकरणे वा सामग्री असे काहीच लागत नाही. (२२)

नमस्काराऐसें नाहीं सोपें। नमस्कार करावा अनन्यरूपें।
नाना साधनीं साक्षपें। कासया सिणावें ॥ २३॥

नमस्कारासारखा सोपा दुसरा उपाय नाही. मात्र तो नमस्कार अनन्यभावाने केला पाहिजे. इतर नाना साधनांचे कष्ट करून कशाला शिणावे? (२३)

साधक भावें नमस्कार घाली।
त्याची चिंता साधूस लागली।
सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें ॥ २४॥

साधकाने अनन्यभावाने नमस्कार केला की त्याची काळजी त्या साधूस लागते आणि मग तो त्याला अगदी सोप्या मार्गाने थेट भगवंतापर्यंत पोहोचवितो. (२४)

याकारणें नमस्कार श्रेष्ठ। नमस्कारें वोळती वरिष्ठ।
येथे सांगितलें पष्ट। साहावी भक्ती ॥ २५॥

म्हणून नमस्कार श्रेष्ठ साधन आहे. त्यायोगे वरिष्ठ म्हणजे भगवंत आणि सद्गुरू आपल्याकडे आकर्षित होतात. याप्रकारे येथे सहावी वंदनभक्ती स्पष्ट करून सांगितली आहे. (२५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'वंदनभक्तिनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक ४ : समास ७

# दास्यभक्ती

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। साहवें भक्तीचें लक्षण।
आतां ऐका सावधान। सातवी भक्ती ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात सहाव्या वंदनभक्तीचे वर्णन झाले. आता सावध होऊन सातवी भक्ती कोणती ते ऐकावे. (१)

सातवें भजन तें दास्य जाणावें। पडिलें कार्य तितुकें करावें।
सदा सन्निधचि असावें। देवद्वारीं ॥ २॥

सातवे भजन ही दास्यभक्ती जाणावी. या भक्तीत जे पडेल ते देवाचे काम करावे लागते व सदासर्वदा जवळच देवद्वारी असावे लागते. (२)

देवांचे वैभव सांभाळवें। न्यूनपूर्ण पडोंचि नेदावें।
चढतें वाढतें वाढवावें। भजन देवाचें ॥ ३॥

देवाचे वैभव आपण सांभाळावे. त्यात काही उणे पडूच देऊ नये. तसेच ते दिवसेंदिवस वाढेल असा प्रयत्न जरूर करावा. (३)

भंगलीं देवाळयें करावीं। मोडलीं सरोवरें बांधावीं।
सोफे धर्मशाळा चालवावीं। नूतनचि कार्यें ॥ ४॥

जुन्या पडक्या देवालयांचा जीर्णोद्धार करावा, मोडलेली सरोवरे परत चांगली बांधावी. सोपे, ओसऱ्या, धर्मशाळा ही नवीनच कार्ये हाती घ्यावी. (४)

नाना रचना जीर्ण जर्जर। त्यांचे करावे जीर्णोद्धार।
पडिलें कार्य तें सत्वर। चालवित जावें ॥ ५॥

जी जुनी बांधकामे मोडकळीस आली असतील त्यांचे जीर्णोद्धार करावेत. जे काम पडेल ते ताबडतोब करीत जावे. (५)

गज रथ तुरंग सिंहासनें। चौकिया सिबिका सुखासनें।
मंचक डोल्हारे विमानें। नूतनचि करावीं ॥ ६॥

हत्ती, रथ, घोडे, सिंहासने, चौरंग, इतर सुखासने, मंचक, डोलारे, विमाने सर्व नवीनच करावीत. (६)

मेघडंब्रे छत्रें चामरें। सूर्यापानें निशाणें अपारें।
नित्य नूतन अत्यादरें। सांभाळित जावीं ॥ ७॥

मेघडंबऱ्या, छत्रे, चामरे, अबदागिऱ्या, अपार निशाणे, नित्य नूतन वाटतील अशी अत्यंत आदराने सांभाळीत जावे. (७)

नाना प्रकारीचीं यानें। बैसावयाचीं उत्तम स्थानें।
बहुविध सुवर्णासनें। येत्नें करीत जावीं ॥ ८॥

नाना प्रकारची वाहने, बसण्यासाठी उत्तम जागा, अनेक प्रकारची सोन्याची आसने वगैरे प्रयत्नपूर्वक करत जावी. (८)

भुवनें कोठड्या पेट्या मांदुसा।
रांझण कोहळीं घागरी बहुवसा।
संपूर्ण द्रव्यांश ऐसा। अति येत्नें करावा॥ ९॥

घरे, कोठड्या, पेट्या, पेटारे, रांजण, कोहळी (दुध्या भोपळा वगैरे कोरून त्यात द्रव्य भरण्याची केलेली भांडी) अनेक घागरी, अशा मूल्यवान वस्तू देवासाठी अत्यंत प्रयत्नपूर्वक कराव्यात. (९)

भुयेरीं तळघरें आणी विवरें। नाना स्थळें गुप्त द्वारें।
अनर्घ्ये वस्तूंचीं भांडारें। येत्नें करीत जावीं॥ १०॥

अनेक ठिकाणी भुयारे, तळघरे आणि बोगदे, नाना ठिकाणी गुप्तद्वारे यांची योजना करून मूल्यवान वस्तूंची भांडारे प्रयत्नपूर्वक करावी. (१०)

आळंकार भूषणें दिव्यांबरें। नाना रत्नें मनोहरें।
नाना धातु सुवर्णपात्रें। येत्नें करीत जावीं॥ ११॥

देवासाठी दागिने, भूषणे, अत्यंत दिव्य मौल्यवान वस्त्रे, नाना मनोहर रत्ने, नाना धातूंची आणि सोन्याचीही पात्रे भांडी खटपटीने मिळवावी. (११)

पुष्पवाटिका नाना वनें। नाना तरुवरांची बनें।
पावतीं करावीं जीवनें। तया वृक्षांसी॥ १२॥

देवासाठी पुष्पवाटिका, नाना वने, निरनिराळ्या वृक्षांच्या बागा वगैरे त्या त्या वृक्षांना पाणी देण्याची व्यवस्था करून फळतील, फुलतील असे पाहावे. (१२)

नाना पशूंचिया शाळा। नाना पक्षी चित्रशाळा।
नाना वाद्यें नाट्यशाळा। गुणी गायेक बहुसाल॥ १३॥

निरनिराळ्या पशूंसाठी तबेले, पागा, अनेक प्रकारचे पक्षी, अनेक चित्रांचा संग्रह (चित्रशाळा), नाना वाद्ये, नाट्यशाळा व पुष्कळ गुणी गायक, (१३)

स्वयंपाक गृहें भोजनशाळा। सामग्रीगृहें धर्मशाळा।
निद्रिस्तांकारणें पडशाळा। विशाळ स्थळें॥ १४॥

स्वयंपाकघरे, भोजनालये, कोठारे, धर्मशाळा, झोपण्यासाठी ओवऱ्या, प्रशस्त मोठमोठ्या बांधाव्यात. (१४)

नाना परिमळद्रव्यांची स्थळें। नाना खाद्यफळांचीं स्थळें।
नाना रसांचीं नाना स्थळें। येत्नें करीत जावीं॥ १५॥

अनेक प्रकारच्या सुवासिक वस्तू ठेवण्यासाठी जागा, नाना खाद्य पदार्थ साठवून ठेवण्यासाठी स्थळे, नाना पातळ पदार्थ साठवून ठेवण्याची व्यवस्था प्रयत्नपूर्वक करावी. (१५)

नाना वस्तांची नानास्थानें। भंगलीं करावीं नूतनें।
देवाचें वैभव वचनें। किती म्हणौनि बोलावें॥ १६॥

नाना वस्तूंचा संग्रह करण्यासाठी असलेली स्थळे, मोडकळीस आली असतील, तर ती नवीन करून घ्यावीत. देवाचे वैभव शब्दांनी किती वर्णन करावे? (१६)

सर्वां ठाईं अति सादर। आणी दास्यत्वासहि तत्पर।
कार्यभागाचा विसर। पडणार नाहीं॥ १७॥

सर्वांशी अतिआदरपूर्वक वागावे. पडेल ते काम करण्याविषयी तत्पर असावे. पण देवालयाच्या कार्याचा विसर पडू देऊ नये. (१७)

जयंत्या पर्वें मोहोत्साव। असंभाव्य चालवी वैभव।
जें देखतां स्वर्गींचे देव। तटस्त होती॥ १८॥

जयंत्या, पर्वकाल, महोत्सव अशा असंभाव्य थाटाने करावे की, ते पाहून स्वर्गातील देवांनीही तटस्थ व्हावे. (१८)

ऐसें वैभव चालवावें।
आणी नीच दास्यत्वहि करावें।
पडिले प्रसंगीं सावध असावें। सर्वकाळ॥ १९॥

असे देवांचे वैभव वाढवावे आणि हलक्यांत हलके कामही तत्परतेने करावे. वेळप्रसंगी जे काम पडेल ते करण्याविषयी सदासर्वकाळ तत्पर असावे. (१९)

जें जें कांहीं पाहिजे। तें तें तत्काळचि देजे।
अत्यंत आवडीं कीजे। सकळ सेवा॥ २०॥

देवाच्या सेवेसाठी ज्या ज्या गोष्टींची आवश्यकता असेल त्या त्या तत्काळ पुरवाव्यात. अत्यंत आवडीने सर्व सेवा करावी. (२०)

चरण क्षाळणें स्नानें आचमनें। गंधाक्षतें वसनें भूषणें।
आसनें जीवनें नाना सुमनें। धूप दीप नैवेद्य॥ २१॥

पाय धुणे, स्नान, आचमन, गंधाक्षता, वस्त्रे, भूषणे, आसने, प्यावयाचे पाणी, निरनिराळ्या प्रकारची फुले, धूप-दीप, नैवेद्य इत्यादींची व्यवस्था करावी. (२१)

शयेनाकारणें उत्तम स्थळें। जळें ठेवावीं सुसीतळें।
तांबोल गायनें रसाळें। रागरंगें करावीं॥ २२॥

शयन करण्यासाठी उत्तम शेजघरे, गार पिण्याचे पाणी, तांबूल यांची व्यवस्था करावी. रसाळ गायनाने उत्सवात रंग भरावा. (२२)

परिमळद्रव्यें आणी फुलेलें। नाना सुगंधेल तेलें।
खाद्य फळें बहुसालें। सन्निधचि असावीं॥ २३॥

सुवासिक द्रव्ये आणि अत्तरे, नाना सुगंधी तेले, खाद्यपदार्थ, नाना प्रकारची फळे, हाताशीच ठेवावीत. (२३)

सडे संमार्जनें करावीं। उदकपात्रें उदकें भरावीं।
वसनें प्रक्षालून आणावीं। उत्तमोत्तमें ॥ २४॥

सडासंमार्जन करावे, पाण्याची भांडी स्वच्छ पाण्याने भरून ठेवावी. उत्तमोत्तम वस्त्रे स्वच्छ धुऊन आणावी. (२४)

सकळांचें करावें पारपत्य। आल्याचें करावें आतित्य।
ऐसी हे जाणावी सत्य। सातवी भक्ती ॥ २५॥

सगळ्यांचा आदरसत्कार करावा, जे जे कुणी येईल त्याचा पाहुणचार करावा. अशा प्रकारे सेवा करणे ही सातवी भक्ती आहे. (२५)

वचनें बोलवीं करुणेचीं। नाना प्रकारें स्तुतीचीं।
अंतरें निवती सकळांचीं। ऐसें वदावें ॥ २६॥

सर्वांशी नम्रतेने बोलावे. सर्वांची गोड बोलून स्तुती करावी. सर्वांच्या अंत:करणास सुख होईल, असे बोलावे. (२६)

ऐसी हे सातवी भक्ती। निरोपिली येथामती।
प्रत्यक्ष न घडे तरी चित्तीं। मानसपूजा करावी॥ २७॥

या प्रकारे यथामती येथे सातव्या भक्तीचे वर्णन केले आहे. हे सर्व दास्य, ही सर्व सेवा प्रत्यक्ष घडत असेल तर उत्तमच; पण प्रत्यक्ष घडत नसेल तर मनात तरी करावी. (२७)

ऐसें दास्य करावें देवाचें।
येणेंचि प्रकारें सद्गुरूचें।
प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें। करित जावें ॥ २८॥

याप्रकारे देवाचे दास्य करावे व तसेच सद्गुरूंचेही करावे. प्रत्यक्ष घडत नसेल तर निदान मानसपूजेत तरी ते जरूर करावे. (२८)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'दास्यभक्तिनाम' समास सातवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ४ : समास ८

# सख्यभक्तिनिरूपण

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। सातवे भक्तीचें लक्षण।
आतां ऐका सावधान। आठवी भक्ती ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात सातव्या भक्तीचे लक्षण वर्णन केले. आता सावध होऊन आठवी भक्ती कशी असते ते ऐका. (१)

देवासी परम सख्य करावें। प्रेम प्रीतीनें बांधावें।
आठवें भक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें ॥ २॥

देवाशी परम सख्य करावे. त्याला प्रेमाने बांधून ठेवावे हे आठव्या भक्तीचे लक्षण आहे. (२)

देवास जयाची अत्यंत प्रीती। आपण वर्तावें तेणें रीतीं।
येणें करितां भगवंतीं। सख्य घडे नेमस्त॥ ३॥

देवाला ज्या गोष्टीबद्दल अत्यंत प्रीती असेल, त्याच गोष्टी आपण कराव्या, त्याला आवडेल असेच आपण वागावे; असे केल्याने निश्चितपणे भगवंताशी सख्य घडते. (३)

भक्ति भाव आणी भजन। निरूपण आणी कथाकीर्तन।
प्रेमळ भक्तांचें गायन। आवडे देवा ॥ ४॥

भक्ती, भाव आणि भजन तसेच अध्यात्माचे निरूपण व कथा-कीर्तन, प्रेमळ भक्तांचे गायन हे सर्व देवाला आवडते. (४)

आपण तैसेंचि वर्तावें। आपणासि तेंच आवडावें।
मनासारिखें होतां स्वभावें। सख्य घडे नेमस्त॥ ५॥

देवाला आवडेल असेच आपण वागावे. त्याला जे आवडते तेच आपल्यालाही आवडावे. असे आपण त्याच्या मनासारखे वागू लागलो म्हणजे साहाजिकच निश्चितपणे सख्य होते. (५)

देवाच्या सख्यत्वाकारणें। आपलें सौख्य सोडून देणें।
अनन्यभावें जीवें प्राणें। शरीर तेंहि वेंचावें॥ ६॥

देवाचे सख्य घडावे अशी मनापासून तळमळ असेल तर आपल्या सुखाचा विचार आपण सोडून दिला पाहिजे, अनन्यभावाने जीव, प्राण एवढेच नव्हे, तर हे शरीरही त्याच्या चरणी समर्पण करावे. (६)

सांडून आपली संसारवेथा। करित जावी देवाची चिंता।
निरूपण कीर्तन कथा वार्ता। देवाच्याचि सांगाव्या॥ ७॥

आपल्या प्रपंचाची काळजी करणे सोडून द्यावे व भगवंताचेच चिंतन करावे. देवांच्याच निर्गुण स्वरूपाचे निरूपण करावे, सगुणाच्या कथा, वार्ता सांगाव्या. (७)

देवाच्या सख्यत्वासाठी। पडाव्या जिवलगांसी तुटी।
सर्व अर्पावें सेवटीं। प्राण तोहि वेचावा॥ ८॥

देवाशी सख्य व्हावे अशी खरीच तळमळ असेल तर वेळप्रसंगी सर्व सुहृदांचा त्याग करावा लागला तरी त्याची तयारी असायला हवी. भगवंताच्या चरणी सर्वस्व अर्पावे; एवढेच नव्हे तर आपला प्राणही त्याच्या चरणी समर्पण करण्याची तयारी असावी. (८)

आपुले आवघेंचि जावें। परी देवासी सख्य रहावें।
ऐसी प्रीती जिवें भावें। भगवंतीं लागावी ॥ ९॥

आपले सर्व काही गेले तरी चालेल, पण भगवंताशी सख्य मात्र कायम टिकून राहिले पाहिजे, अशी जीवाभावाची प्रीती भगवंताविषयी उत्पन्न होणे आवश्यक आहे.(९)

देव म्हणिजे आपुला प्राण। प्राणासी न करावें निर्वाण।
परम प्रीतीचें लक्षण। तें हें ऐसें असें ॥ १०॥

देव म्हणजे जणू आपला प्राण! त्याच्या वियोगाची कल्पनाही आपणास सहन होता कामा नये, अशी अत्यंत उत्कट प्रीती त्याच्या ठिकाणी उत्पन्न व्हायला हवी. ह्यालाच परम प्रेम म्हणतात. (१०)

ऐसें परम सख्य धरितां। देवास लागे भक्ताची चिंता।
पांडव लाखाजोहरीं जळतां। विवरद्वारें काढिले॥ ११॥

असे परम सख्य जडले की त्या भक्ताची चिंता भगवंतास लागते. पांडवांचे असे परम सख्य होते, म्हणूनच ते लाक्षागृहात जळून जाण्याचा प्रसंग आला असता भगवंतांनी भुयाराच्या मार्गाने त्यांना सुखरूप बाहेर काढले. (११)

देव सख्यत्वें राहे आपणांसी।
तें तों वर्म आपणाचि पासीं।
आपण वचनें बोलावीं जैसीं। तैसीं येती पडसादें॥ १२॥

देवाने आपल्याशी सख्यत्वाने राहावे, अशी इच्छा असेल तर त्याचे रहस्य आपल्यापाशीच आहे. आपण जे शब्द ज्या प्रकारे बोलतो, त्याचा प्रतिध्वनी त्याच प्रकारे आपल्याला ऐकू येतो. (१२)

आपण असतां अनन्यभावें। देव तत्काळचि पावे।
आपण त्रास घेतां जीवें। देवहि त्रासे ॥ १३॥

आपला भाव जर अनन्य असेल तर देवही आपल्याला तो तत्काळ पावतो. पण आपल्याला त्याचा त्रास वाटत असेल, तर देवही त्रासतो. (१३)

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्॥ (गीता)

**अर्थ**—जे लोक ज्याप्रकारे मला भजतात. त्यांना मी त्याच प्रकारे भजतो.

जैसें जयाचें भजन। तैसाचि देवहि आपण।
म्हणौन हें आवघें जाण। आपणाचि पासीं॥ १४॥

ज्याचे भजन ज्या प्रकारचे असेल, त्याप्रमाणे देव त्याला तसाच प्रतिसाद देतो. म्हणून हे सर्व आपल्या भावनेवरच अवलंबून असते. (१४)

आपुल्या मनासारिखें न घडे। तेणें गुणें निष्ठा मोडे।
तरी गोष्टी आपणांकडे। सहजचि आली ॥ १५॥

आपल्या मनासारखी एखादी गोष्ट झाली नाही, तर त्यामुळे भगवंतावरील निष्ठा जर ढळत असेल तर सहजच दोष आपलाच आहे हे जाणून घ्यावे. (१५)

मेघ चातकावरी वोळेना। तरी चातक पालटेना।
चंद्र वेळेसि उगवेना। तऱ्ही चकोर अनन्य॥ १६॥

एखादे वेळी मेघाने कृपा करून वृष्टी केली नाही तरी चातकाचे मन पालटत नाही. चंद्र वेळेवर उगवला नाही, तरी चकोराचे त्याच्या ठिकाणी जे अनन्य प्रेम असते, ते रतिभरही कमी होत नाही. भगवंतावर आपले असे अनन्य प्रेम असणे आवश्यक आहे. (१६)

ऐसें असावें सख्यत्व। विवेकें धरावें सत्व।
भगवंतावरील ममत्व। सांडूंचि नये ॥ १७॥

सख्यत्व असावे तर असे असावे. कुठल्याही प्रसंगी विवेक करून धैर्य धारण करावे. भगवंतावरील प्रेम कुठल्याही प्रसंगांत ढळू देऊ नये. (१७)

सखा मानावा भगवंत। माता पिता गण गोत।
विद्या लक्ष्मी धन वित्त। सकळ परमात्मा ॥ १८ ॥

भगवंतास आपला सखा मानावा. एवढेच नव्हे तर आपले माता, पिता, आप्तस्वकीय, विद्या, लक्ष्मी, धन, वित्त इत्यादी सर्व काही भगवंतच आहे, अशी दृढ भावना असावी.(१८)

देवावेगळें कोणी नाहीं। ऐसें बोलती सर्वहि।
परंतु त्यांची निष्ठा कांहीं। तैसीच नसे ॥ १९ ॥

सर्व लोक तोंडाने बोलताना म्हणतात की, देवाशिवाय माझे कोणीच नाही, परंतु त्यांची तशी दृढ निष्ठा मात्र नसते.(१९)

म्हणौनि ऐसें न करावें। सख्य तरी खरेंचि करावें।
अंतरीं सुदृढ धरावें। परमेश्वरासी ॥ २० ॥

म्हणून आपण मात्र असे करू नये. देवाशी सख्य करावयाचे ते अंत:करणापासून करावे. आपण आपल्या अंत:करणात भगवंताला अगदी दृढपणे धरून ठेवावे.(२०)

आपुलिया मनोगताकारणें। देवावरी क्रोधास येणें।
ऐसीं नव्हेत किं लक्षणें। सख्यभक्तीचीं ॥ २१ ॥

जरा आपल्या मनासारखे काही घडले नाही की, देवावर क्रोध करायचा, हे काही सख्यभक्तीचे लक्षण नाही.(२१)

देवाचें जें मनोगत। तेंचि आपुलें उचित।
इच्छेसाठीं भगवंत। अंतरूं नये कीं ॥ २२ ॥

देवाच्या इच्छेने जे जे घडते, ते आपल्या हिताच्या दृष्टीने अगदी योग्यच असते अशी दृढ निष्ठा असावी. आपली इच्छा पूर्ण झाली नाही, या क्षुल्लक कारणावरून देवावरील प्रेमात अंतर पडू देऊ नये. (२२)

देवाचे इच्छेनें वर्तावें। देव करील तें मानावें।
मग सहजचि स्वभावें। कृपाळु देव ॥ २३ ॥

देवाच्या इच्छेप्रमाणे वागावे. देव जे जे करील ते मन:पूर्वक समाधानाने मान्य करावे. असे केले असता देव सहजच कृपाळू स्वभावाचा असल्याने प्रसन्न होऊन कृपेचा वर्षाव करतो. (२३)

पाहतां देवाचे कृपेसी। मातेची कृपा कायेसी।
माता वधी बाळकासी। विपत्तिकाळीं ॥ २४ ॥

देवाची कृपा पाहता मातेची कृपा अगदी क्षुल्लक आहे. संकटकाळ आला असता, आई स्वार्थासाठी स्वत:च्या बालकाचाही वध करते. (२४)

देवें भक्त कोण वधिला। कधीं देखिला ना ऐकिला।
शरणागतांस देव जाला। वज्रपंजरु ॥ २५ ॥

पण देवाने कुठल्या भक्ताचा कधी वध केला आहे, असे कधी ऐकण्यात किंवा पाहण्यातही नाही. उलट शरण आलेल्या भक्तांचे रक्षण करण्यासाठी देव वज्राच्या पिंजऱ्यासारखा बनतो. (२५)

देव भक्तांचा कैवारी। देव पतितांसी तारी।
देव होये साहाकारी। अनाथांचा ॥ २६ ॥

देव हा भक्तांचा कैवारी आहे. तो पतितांचा उद्धार करतो. दीन दुबळ्यांना, अनाथांना तो साहाय्य करतो.(२६)

देव अनाथांचा कैपक्षी। नाना संकटांपासून रक्षी।
धांविन्नला अंतरसाक्षी। गजेंद्राकारणें ॥ २७ ॥

देव अनाथांचा कैवारी असून त्यांचे नाना संकटांतून रक्षण करतो. तो अंतरसाक्षी असल्याने हृदयातील भाव तत्काळ जाणतो. म्हणूनच त्याने गजेंद्राचा धावा ऐकून तत्काळ तेथे धाव घेतली व त्याची मुक्तता केली. (२७)

देव कृपेचा सागरु। देव करुणेचा जळधरु।
देवासि भक्तांचा विसरु। पडणार नाहीं ॥ २८ ॥

देव हा कृपेचा सागर आहे. करुणेचा मेघ आहे. त्याला आपल्या भक्तांचा कधीच विसर पडत नाही.(२८)

देव प्रीती राखों जाणे। देवासी करावें साजणें।
जिवलगें आवघीं पिसुणें। कामा न येती ॥ २९ ॥

प्रीतीचे रक्षण कसे करावे, हे फक्त देवच जाणतो, म्हणून देवाशीच सख्य करावे. ज्यांना आपण जिवलग समजतो, ते सर्व देहाचे संबंधी आप्तस्वकीय स्वार्थी असतात. आपल्या संकटाचे वेळी ते कुणी उपयोगी पडू शकत नाहीत.(२९)

सख्य देवाचें तुटेना। प्रीति देवाची विटेना।
देव कदा पालटेना। शरणागतांसी ॥ ३० ॥

एकदा देवाशी सख्य जोडले की ते कधी तुटत नाही, कारण देवाचे प्रेम कमी होत नाही. जे देवास शरण जातात, त्यांचा देव कधीही त्याग करीत नाही. (३०)

म्हणौनि सख्य देवासी करावें। हितगुज तयासी सांगावें।
आठवे भक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें ॥ ३१ ॥

म्हणून सख्य देवाशीच करावे. आपल्या मनातील गुप्त गोष्टी देवापाशीच सांगाव्या. आठव्या भक्तीचे लक्षण हे असे आहे. (३१)

जैसा देव तैसा गुरु। शास्त्रीं बोलिला हा विचारु।
म्हणौनसख्यत्वाचा प्रकारु। सद्गुरुसीं असावा॥ ३२ ॥

जसा देव तसाच सद्गुरू असे शास्त्रांत सांगून ठेवले आहे. म्हणून ज्याप्रमाणे भगवंताशी सख्य जोडावे तसेच सद्गुरूशी सख्य जोडणे आवश्यक आहे. (३२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सख्यभक्तिनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ४ : समास ९

# आत्मनिवेदनभक्ती

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। आठवे भक्तीचें लक्षण।
आतां ऐका सावधान। भक्ति नवमी ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात आठव्या भक्तीचे निरूपण केले. आता सावध होऊन नववी भक्ती कोणती, ते ऐका. (१)

नवमी निवेदन जाणावें। आत्मनिवेदन करावें।
तेही सांगिजेल स्वभावें। प्रांजळ करूनि ॥ २ ॥

नवव्या भक्तीला निवेदनभक्ती म्हणतात. यात आत्मनिवेदन करावयाचे असते. तेही कसे करावे, हे स्वाभाविक रीतीने स्पष्ट करून सांगतो. (२)

ऐका निवेदनाचें लक्षण। देवासि वाहावें आपण।
करावें तत्वविवरण। म्हणिजे कळे ॥ ३ ॥

निवेदनाचे लक्षण असे आहे. यात आपण स्वत:ला देवास समर्पण करावे. ते कसे करावयाचे ते तत्त्वविवेचनाने कळते. (३)

मी भक्त ऐसें म्हणावें। आणी विभक्तपणेंचि भजावें।
हें आवघेंचि जाणावें। विलक्षण ॥ ४ ॥

मी भक्त असे म्हणायचे आणि विभक्तपणे देवाला भजायचे हे सर्वच अयोग्य आहे. (४)

लक्षण असोन विलक्षण। ज्ञान असोन अज्ञान।
भक्त असोन विभक्तपण। तें हें ऐसें ॥ ५ ॥

लक्षण असून लक्षणहीन म्हणावे. ज्ञान असून अज्ञान आहे असे म्हणणे आणि भक्त असून विभक्तपणे राहाणे हे सर्वच काही विलक्षण व विपरीत आहे. (५)

भक्त म्हणिजे विभक्त नव्हे।
आणि विभक्त म्हणिजे भक्त नव्हे।
विचारेंविण कांहींच नव्हे। समाधान ॥ ६ ॥

जो विभक्त नाही, त्यालाच भक्त म्हणता येईल. आणि जो विभक्त आहे तो भक्त असू शकत नाही. या विरोधाभासाचे समाधान विचाराशिवाय होणार नाही.(६)

तस्मात् विचार करावा। देव कोण तो वोळखावा।
आपला आपण शोध घ्यावा। अंतर्यामीं ॥ ७ ॥

म्हणून साधकाने विचार करावा, देव कोणाला म्हणायचे ते ओळखावे व 'मी कोण' असा आपला आपणही अंतर्मुख वृत्ती करून अंत:करणात शोध घ्यावा. (७)

मी कोण ऐसा निवाडा। पाहों जातां तत्वझाडा।
विचार करितां उघडा। आपण नाहीं ॥ ८ ॥

'मी कोण?' याचा निवाडा करू लागल्यावर एकेका तत्त्वाचा निरास करीत गेले की, शेवटी प्रकृतीचाही निरास होतो आणि मग 'मी' म्हणून कुणी उरतच नाही. ज्याला आपण 'मी म्हणतो' त्याचे अस्तित्वच नाही, हे विवेकाने कळून येते. (८)

तत्वें तत्व जेव्हां सरे। तेव्हां आपण कैंचा उरे।
आत्मनिवेदन येणें प्रकारें। सहजचि जालें ॥ ९॥

जे तत्त्व ज्यातून झाले त्यात त्याचा विवेकाने लय करीत गेले की सर्वच प्रकृतीचा निरास होतो म्हणजे मूळ मायाही उरत नाही. मग मी म्हणणाराही उरत नाही. केवळ एकमेव सच्चिदानंदस्वरूपच उरते. हे जेव्हा कळून येते तेव्हा सहजच 'आत्मनिवेदन' होते. (९)

तत्वरूप सकळ भासे। विवेक पाहातां निरसे।
प्रकृतिनिरासें आत्मा असे। आपण कैंचा ॥ १०॥

जे दृश्य विश्व आहे ते पांचभौतिक आहे, याचा विवेक करून एकेका तत्त्वाचा निरास करीत गेले की, शेवटी प्रकृतीचाही निरास होतो व फक्त आत्मा शिल्लक राहतो व मग आपण म्हणजे आत्मा हे कळून येते. (१०)

येक मुख्य परमेश्वरु। दुसरी प्रकृति जगदाकारु।
तिसरा आपण कैंचा चोरु। आणिला मधें ॥ ११॥

मुख्य तत्त्वे दोन मानली तर एक म्हणजे परमेश्वर म्हणजे शिव, दुसरी जगाच्या रूपाने भासणारी प्रकृती. ही दोनच मूल तत्त्वे असताना त्यात 'मी' हा तिसरा चोर कोठून आणला? (११)

ऐसें हें सिद्धचि असतां। नाथिली लागे देहअहंता।
परंतु विचारें पाहों जातां। कांहींच नसे ॥ १२॥

याप्रमाणे विचाराने हे सर्व सिद्ध झाले असता लटकी 'मी देह ही बुद्धी' उगीच मागे लागली आहे; पण तत्त्वविचार केल्यावर 'मी' चे अस्तित्वच राहात नाही. (१२)

पाहाता तत्वविवंचना। पिंडब्रह्मांडतत्वरचना।
विश्वाकारें वेक्ती नाना। तत्वें विस्तारलीं ॥ १३॥

तत्त्वविवेचन करू लागल्यावर एका तत्त्वातून दुसरे तत्त्व कसे झाले हे कळते व पिंड-ब्रह्मांड रचना कशी झाली व विश्वाकार, नाना व्यक्ती, यांच्या रूपाने नाना तत्त्वे म्हणजे पंचमहाभूतादीच कशी विस्तार पावली आहेत, हे कळून येते. (१३)

तत्वें साक्षत्वें वोसरतीं। साक्षत्व नुरे आत्मप्रचिती।
आत्मा असे आदिअंतीं। आपण कैंचा ॥ १४॥

याप्रमाणे विवेक करू लागल्यावर आपण तत्त्वांहून भिन्न साक्षी आहोत हे कळते. ही जाणीव झाली की तत्त्वे ओसरतात. पुढे जेव्हा आत्मानुभव, आत्मप्रचीती येते, तेव्हा एकमेव सच्चिदानंद स्वरूपाशिवाय दुसरे साक्षित्वही उरत नाही. आदि-अंती फक्त एक आत्माच आहे, हे कळल्यावर 'मी' शिल्लकच राहात नाही. (१४)

आत्मा एक स्वानंदघन। आणी अहमात्मा हे वचन।
तरी मग आपण कैंचा भिन्न। उरला तेथें ॥ १५॥

एक आत्माच स्वानंदघन असून 'अहमात्मा' म्हणजेच मी तो आत्माच आहे, असा अनुभव आल्यावर तेथे आपण म्हणून भिन्न कुणी कसा उरेल? (१५)

सोहं हंसा हें उत्तर। याचें पाहावें अर्थांतर।
पाहतां आत्मयाचा विचार। आपण कैंचा तेथें॥ १६॥

'सोहं हंसा' हे 'मी कोण' या प्रश्नाचे उत्तर आहे. याच्या अर्थाचा सखोल विचार केल्यावर आणि आत्म्यासंबंधी विचार केल्यावर कळून येते की जेथे आत्म्याशिवाय अन्य काही नाहीच, तेथे आपण, आपले अस्तित्वच कुठे शिल्लक राहते? (१६)

आत्मा निर्गुण निरंजन। तयासी असावें अनन्य।
अनन्य म्हणिजे नाहीं अन्य। आपण कैंचा तेथें ॥ १७॥

आत्मा निर्गुण निरंजन आहे. त्याच्याशी अनन्य असावे. याचा अर्थच असा होतो की तेथे अन्य म्हणजे दुसरा कुणी नाहीच. मग तेथे आपण म्हणजे 'मी' राहातोच कोठे?(१७)

आत्मा म्हणिजे तो अद्वैत। जेथें नाहीं द्वैताद्वैत।
तेथें मीपणाचा हेत। उरेल कैंचा ॥ १८॥

आत्मस्वरूपात द्वैत तर नाहीच पण अद्वैतही उरत नाही. जेथे द्वैताद्वैतही नाही, तेथे ज्याला एकत्व किंवा भिन्नत्व भासते, तो 'मी' च तेथे उरत नाही. (१८)

**आत्मा पूर्णत्वें परिपूर्ण। जेथें नाहीं गुणागुण।**
**निखळ निर्गुणीं आपण। कोण कैंचा ॥ १९ ॥**

आत्मा हा पूर्णत्वाने परिपूर्ण असतो. तेथे गुण, अगुण दोन्हींचा अभाव असतो. तो निखळ निर्गुण असतो. सर्वत्र एक आत्माच परिपूर्ण असून येथे दुसरे काही नसतेच, तर अशा परिस्थितीत आपण म्हणजे मी म्हणणारा तेथे असेलच कसा? (१९)

**त्वंपद तत्पद असिपद। निरसुनि सकळ भेदाभेद।**
**वस्तु ठाईंची अभेद। आपण कैंचा ॥ २० ॥**

'त्वंपद' म्हणजे तू, 'तत्पद' म्हणजे ते ब्रह्म आणि 'असि' पद म्हणजे आहेस. 'तू ते ब्रह्म आहेस' याप्रमाणे निदिध्यासन करता करता निदिध्यासन करणाराच जेव्हा ब्रह्मरूप होऊन जातो, तेव्हा सगळे भेद व अभेदाचेही निरसन होते व एक आत्मवस्तूच राहते. तेथे 'मी' चे अस्तित्वच कसे राहील? (२०)

**निरसितां जीवशिवउपाधी। जीवशिवचि कैंचे आधीं।**
**स्वरूपीं होतां दृढबुद्धी। आपण कैंचा ॥ २१ ॥**

एका परब्रह्माशिवाय अन्य वस्तूच नाही. विद्या या उपाधीमुळे त्यालाच 'शिव' संज्ञा प्राप्त होते, तर अविद्या उपाधीमुळे 'जीव' संज्ञा प्राप्त होते, दोन्ही उपाधींचे निरसन केल्यावर जीवशिवच राहात नाहीत. केवळ एकच एक ब्रह्मच राहते व तेच सर्वांचे स्वरूप आहे. याप्रमाणे आपल्या स्वरूपाविषयीचे ज्ञान दृढ झाले म्हणजे 'आपण' म्हणजे 'मी' म्हणून कुणी राहात नाही. (२१)

**आपण मिथ्या साच देव। देव भक्त अनन्यभाव।**
**या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती॥ २२ ॥**

म्हणून आपण ज्याला 'मी' म्हणतो, तो देहाभिमानी मिथ्या ठरतो आणि देव म्हणजे पूर्णत्वाने परिपूर्ण आत्माच केवळ सत्य आहे हे कळून येते. म्हणजे देव व भक्त म्हणजे शिव व जीव तत्त्वत: एकच परब्रह्मरूपी आहेत, असा अनुभव ज्यांना साक्षात होतो, तेच या वचनांचा अभिप्राय जाणतात. (२२)

**या नांव आत्मनिवेदन। ज्ञानियांचे समाधान।**
**नवमे भक्तीचें लक्षण। निरोपिलें ॥ २३ ॥**

या स्वात्मानुभवालाच आत्मनिवेदन म्हणतात. यायोगे ज्ञानी लोकांना समाधान प्राप्त होते. याप्रमाणे येथे नवव्या 'आत्मनिवेदन' भक्तीचे लक्षण सांगितले आहे. (२३)

**पंचभूतांमध्यें आकाश। सकळ देवांमध्यें जगदीश।**
**नवविधाभक्तीमध्यें विशेष। भक्ति नवमी॥ २४ ॥**

पंचमहाभूतांमध्ये आकाश श्रेष्ठ, सर्व देवांमध्ये जगदीश श्रेष्ठ, त्याप्रमाणे नवविधा भक्तींमध्ये ही नववी भक्ती श्रेष्ठ आहे. (२४)

**नवमी भक्ति आत्मनिवेदन। न होतां न चुके जन्ममरण।**
**हें वचन सत्य प्रमाण। अन्यथा नव्हे ॥ २५ ॥**

जोपर्यंत ही नववी आत्मनिवेदन भक्ती म्हणजेच स्वात्मानुभव प्राप्त होत नाही, तोपर्यंत जन्ममरणांतून सुटका होऊ शकत नाही. श्रीसमर्थ म्हणतात की, माझे हे वचन सत्य, प्रमाण मानावे. हे खोटे मानू नये. (२५)

**ऐसी हे नवविधा भक्ती। केल्यां पाविजे सायोज्यमुक्ती।**
**सायोज्यमुक्तीस कल्पांती। चळण नाहीं ॥ २६ ॥**

अशा प्रकारे नवविधाभक्ती केली असता सायुज्य मुक्ती प्राप्त होते. एकदा सायुज्यमुक्ती प्राप्त झाली की, ती कल्पांतीही नष्ट होत नाही. (२६)

**तिहीं मुक्तींस आहे चळण। सायोज्यमुक्ती अचळ जाण।**
**त्रैलोक्यास होतां निर्वाण। सायोज्यमुक्ती चळेना॥ २७ ॥**

एकंदर मुक्ती चार आहेत. त्यांतील पहिल्या तिन्ही मुक्तींचा नाश होतो. पण सायुज्यमुक्ती मात्र अविनाशी आहे. त्रैलोक्याचा नाश झाला तरी सायुज्यमुक्तीचा नाश होत नाही. (२७)

आवघीया चत्वार मुक्ती । वेदशास्त्रें बोलती ।
तयांमध्ये तीन नासती । चौथी ते अविनाश ॥ २८ ॥

वेदशास्त्रांनी एकूण चार मुक्ती वर्णन केल्या आहेत. त्यामध्ये पहिल्या तीन नाश पावतात. पण चौथी मुक्ती सायुज्यता ही अविनाशी आहे. (२८)

पहिली मुक्ती ते स्वलोकता । दुसरी ते समीपता ।
तिसरी ते स्वरूपता । चौथी सायोज्यमुक्ती ॥ २९ ॥

सलोकता ही पहिली मुक्ती होय. समीपता ही दुसरी मुक्ती असून स्वरूपता ही तिसरी मुक्ती आहे, तर सायुज्यमुक्ती ही चौथी मुक्ती होय. (२९)

ऐसिया चत्वार मुक्ती । भगवद्भजनें प्राणी पावती ।
हेंचि निरूपण प्रांजळ श्रोतीं । सावध पुढें परिसावें ॥ ३० ॥

भगवद्भजनाने या चार मुक्ती साधकांना प्राप्त होतात. या चारी मुक्तींचे प्रांजळ वर्णन पुढल्या समासात करीत आहे. ते श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावे. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मनिवेदनभक्तिनाम' समास नववा समाप्त.



## दशक ४ : समास १०

# मुक्तिचतुष्टय

॥ श्रीराम ॥

मुळीं ब्रह्म निराकार । तेथें स्फूर्तिरूप अहंकार ।
तो पंचभूतांचा विचार । ज्ञानदशकीं बोलिला ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात, मुळात ब्रह्म निराकार आहे. तेथे **'बहु स्याम्'** हे मूळ स्फुरण उत्पन्न झाले. हाच अहंकार होय. यातूनच पुढे पंचमहाभूते निर्माण झाली. यासंबंधीचा विचार ज्ञानदशकात सांगितला आहे. (१)

तो अहंकार वायोरूप । तयावरी तेजाचें स्वरूप ।
तया तेजाच्या आधारें आप । आवर्णोदक दाटलें ॥ २ ॥

तया आवर्णोदकाच्या आधारें । धरा धरिली फणिवरें ।
वरती छपन्न कोटी विस्तारें । वसुंधरा हे ॥ ३ ॥

तो अहंकार वायुरूप असतो. त्यातून तेजतत्त्वाचे स्वरूप प्रगटते. त्या तेजाच्या आधाराने आप म्हणजे जलतत्त्व व्यक्त होऊन ते पाण्याच्या, समुद्राच्या रूपाने सर्वत्र भरून राहाते. त्या समुद्राच्या आधाराने शेषाने पृथ्वी आपल्या मस्तकावर धारण केली आहे. पृथ्वीचा विस्तार छप्पन कोटी योजनेइतका आहे. (२-३)

इयेवरी परिघ सप्त सागर । मध्य मेरु माहां थोर ।
अष्ट दिग्पाळ तो परिवार । अंतरें वेष्टित राहिला ॥ ४ ॥

तिच्याभोवती सात सागरांचा वेढा असून मध्ये महाथोर असा मेरू पर्वत आहे. अष्ट दिक्पालांचा परिवार या अंतराला वेढून त्याचे रक्षण करतो. (४)

तो सुवर्णाचा माहां मेरु । पृथ्वीस तयाचा आधारु ।
चौऱ्यांसी सहस्त्र विस्तारु । रुंदी तयाची ॥ ५ ॥

महामेरू पर्वत सुवर्णाचा असून पृथ्वीला त्याचाच आधार आहे. त्याची रुंदी चौऱ्याऐंशी सहस्त्र योजने आहे. (५)

उंच तरी मर्यादेवेगळा । भूमीमधें सहस्त्र सोळा ।
तया भोवता वेष्टित पाळा । लोकालोक पर्वताचा ॥ ६ ॥

त्याच्या उंचीला तर मर्यादाच नाही. पृथ्वीच्या आत तो सोळा सहस्त्र योजने गेलेला आहे. त्याच्याभोवती लोकालोक पर्वताचा वेढा आहे. (६)

तया ऐलिकडे हिमाचळ । जेथें पांडव गळाले सकळ ।
धर्म आणि तमाळनीळ । पुढें गेले ॥ ७ ॥

त्याच्या अलीकडे जेथे सर्व पांडव मृत्युमुखी पडले, तो हिमाचल पर्वत आहे. फक्त धर्मराज आणि श्रीकृष्ण हे दोघेच फक्त पुढे गेले. (७)

जेथें जावया मार्ग नाहीं । मार्गी पसरले माहा अही ।
सितसुखें सुखावले तेहि । पर्वतरूप भासती ॥ ८ ॥

तेथे जायचा मार्ग नाही. मार्गात महाप्रचंड साप सर्वत्र पसरलेले आहेत. तेथील थंडीमुळे तेही सुखावले आहेत. ते पर्वतरूपच वाटतात. (८)

तया ऐलिकडे सेवटीं जाण। बद्रिकाश्रम बद्रिनारायण।
तेथें माहां तापसी निर्वाण। देहत्यागार्थ जाती ॥ ९॥

तया ऐलिकडे बद्रिकेदार। पाहोन येती ल्हानथोर।
ऐसा हा अवघा विस्तार। मेरुपर्वताचा ॥ १०॥

तया मेरुपर्वतापाठारीं। तीन श्रृंगें विषमहारी।
परिवारें राहिले तयावरी। ब्रह्मा विष्णु महेश॥ ११॥

ब्रह्मश्रृंग तो पर्वताचा। विष्णुश्रृंग तो मर्गजाचा।
शिवश्रृंग तो स्फटिकाचा। कैळास नाम त्याचें॥ १२॥

वैकुंठ नाम विष्णुश्रृंगाचें। सत्यलोक नाम ब्रह्मश्रृंगाचें।
अमरावती इंद्राचें। स्थळ खालतें ॥ १३॥

तेथें गण गंधर्व लोकपाळ। तेतिस कोटी देव सकळ।
चौदा लोक सुवर्णाचळ। वेष्टित राहिले ॥ १४॥

तेथें कामधेनूचीं खिलारें। कल्पतरूचीं बनें अपारें।
अमृताचीं सरोवरें। ठाईं ठाईं उचंबळतीं॥ १५॥

तेथें उदंड चिंतामणी। हिरे परिसांचिया खाणी।
तेथें सुवर्णमये धरणी। लखलखायमान ॥ १६॥

परम रमणीये फांकती किळा। नवरत्नाचिया पाषाणसिळा।
तेथे अखंड हरुषवेळा। आनंदमये ॥ १७॥

तेथें अमृताचीं भोजनें। दिव्य गंधें दिव्य सुमनें।
अष्ट नायका गंधर्वगायनें। निरंतर ॥ १८॥

तेथें तारुण्य वोसरेना। रोगव्याधीहि असेना।
वृधाप्य आणी मरण येना। कदाकाळीं ॥ १९॥

तेथें येकाहूनि येक सुंदर। तेथें येकाहूनि येक चतुर।
धीर उदार आणी शूर। मर्यादेवेगळे ॥ २०॥

तेथें दिव्यदेह ज्योतिरूपें। विद्युल्यतेसारिखीं स्वरूपें।
तेथें येश कीर्ति प्रतापें। सिमा सांडिली ॥ २१॥

ऐसें तें स्वर्गभुवन। सकळ देवांचें वस्तें स्थान।
तया स्थळाचें महिमान। बोलिजे तितुकें थोडें॥ २२॥

त्यांच्याही अलीकडे अगदी शेवटी बद्रिकाश्रम बद्रिनारायण ही स्थाने आहेत. तेथे महान तपस्वी लोक निर्वाणकाळी देहत्याग करण्यासाठी जातात. (९)

त्याच्याही अलीकडे बद्रिकेदार असून त्याच्या दर्शनासाठी लहानथोर सर्वच जातात. असा हा सर्व मेरुपर्वताचा विस्तार आहे. (१०)

त्या मेरुपर्वताच्या पठारावर वाकड्या रेषेत तीन पर्वतशिखरे आहेत. तेथे परिवारासह ब्रह्मा, विष्णू, महेश हे तीन देव राहतात. (११)

ब्रह्मशृंग हा साध्या दगडाचा आहे. विष्णुशृंग पर्वतशिखर पाचूचे आहे तर शिवशृंग हे पर्वतशिखर स्फटिकाचे असून त्याचे नाव कैलास आहे. (१२)

विष्णुशृंगाचे नाव वैकुंठ असून ब्रह्मशृंगाचे नाव सत्यलोक असे आहे. त्याच्या खालती इंद्राचे अमरावती हे स्थळ आहे. (१३)

तेथे गण, गंधर्व, लोकपाल, तेहतीस कोटी देव आणि सप्तस्वर्ग व सप्तपाताल हे चौदा लोक त्या सुवर्णाच्या पर्वतास वेढून राहिले आहेत. (१४)

तेथे कामधेनूंचे कळप आहेत. कल्पतरूंची अपार वने आणि अमृताची ठायी ठायी उचंबळणारी सरोवरे आहेत. (१५)

तेथे असंख्य चिंतामणी आहेत. हिऱ्यांच्या व परिसाच्या खाणी आहेत व तेथील जमीन सर्व लखलखणाऱ्या सोन्याची आहे (१६)

ज्याचे परम रमणीय तेज सर्वत्र फाकत आहे अशा नवरत्नांच्या पाषाणशिळा तेथे आहेत. तेथे अखंड आनंदमय वातावरण असते. (१७)

तेथे अमृताचे भोजन असते, दिव्य गंध, दिव्य फुले यांची लयलूट असते. तसेच अष्टनायिका व गंधर्व यांचे गायन निरंतर चालू असते. (१८)

तेथे तारुण्य कधी ओसरत नाही, व्याधी असत नाही आणि वृद्धपणा व मरणही कधी येतच नाही. (१९)

तेथे राहणारे लोक एकापेक्षा एक सुंदर, एकापेक्षा एक चतुर, धीर, उदार आणि अत्यंत शूर असतात.(२०)

तेथील रहिवाशांचे देह दिव्य ज्योतिरूप असतात. विजेप्रमाणे लखलखीत त्यांचे स्वरूप असते आणि त्यांचे यश आणि प्रताप हे असीम असतात. (२१)

ते स्वर्गभुवन, सर्व देवांचे वसतिस्थान असून त्या स्थळाची थोरवी वर्णन करावी तेवढी थोडीच आहे.(२२)

येथें ज्या देवाचें भजन करावें। तेथें ते देवलोकीं राहावें।
स्वलोकता मुक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें ॥ २३ ॥

या मृत्युलोकात असताना ज्या देवतेची उपासना माणूस करतो, त्या देवतेच्या लोकांत तो मृत्यूनंतर जाऊन राहतो. स्वलोकता मुक्तीचे लक्षण हे असे आहे. (२३)

लोकीं राहावें ते स्वलोकता। समीप असावें ते समीपता।
स्वरूपचि व्हावें ते स्वरूपता। तिसरी मुक्ती ॥ २४ ॥

त्या देवतेच्या लोकांत जाऊन राहणे याला स्वलोकता म्हणतात. समीप असावे यास समीपता मुक्ती म्हणतात. त्या देवतेचे स्वरूप प्राप्त होऊन राहाणे याला स्वरूपता मुक्ती म्हणतात. ही तिसरी मुक्ती आहे. (२४)

देवस्वरूप जाला देही। श्रीवत्स कौस्तुभ लक्ष्मी नाहीं।
स्वरूपतेचे लक्षण पाहीं। ऐसें असे ॥ २५ ॥

त्याला विष्णूचे रूप मिळाले तरी त्यास श्रीवत्स, कौस्तुभ मणी व लक्ष्मी यांची प्राप्ती होत नाही. स्वरूपता मुक्तीचे लक्षण हे अशा प्रकारचे आहे. (२५)

सुकृत आहे तों भोगिती। सुकृत सरतांच ढकलून देती।
आपण देव ते असती। जैसे तैसे ॥ २६ ॥

पुण्याचा साठा असेपर्यंत त्या त्या लोकांतील भोग भोगावयास मिळतात. पुण्याचा पूर्ण क्षय झाला की तेथून ढकलून देतात. मात्र त्या लोकांतील देव तेथे तसेच पूर्वीप्रमाणेच असतात. (२६)

म्हणोनि तिनी मुक्ति नासिवंत। सायोज्यमुक्ति ते शाश्वत।
तेंहि निरोपिजेल सावचित्त। ऐक आतां ॥ २७ ॥

म्हणून या तिन्ही मुक्ती नाशिवंत आहेत. सायुज्यमुक्ती ही अविनाशी आहे. ते कसे ते आता सांगतो. चित्त सावध ठेवून ऐकावे. (२७)

ब्रह्मांड नासेल कल्पांतीं। पर्वतासहित जळेल क्षिती।
तेव्हां अवघेच देव जाती। मां मुक्ति कैंच्या तेथें॥ २८ ॥

कल्पांती ब्रह्मांडाचा नाश होतो. पर्वतासहित भूमी जळून जाईल तेव्हा सगळे देवही जातात. तेव्हा मग तेथल्या मुक्ती कशा राहणार? (२८)

तेव्हां निर्गुण परमात्मा निश्चळ। निर्गुण भक्ति तेहि अचळ।
सायोज्यमुक्ती ते केवळ। जाणिजे ऐसी ॥ २९ ॥

याप्रमाणे कल्पांत जरी ओढवला तरी निर्गुण निश्चळ परमात्मा जशाच्या तसाच असतो. तो नाहीसा होत नाही. त्याचप्रमाणे निर्गुण भक्तीही अचलच असते. तिचाही नाश होत नाही. सायुज्यमुक्ती ही केवळ शाश्वत असते, हे जाणून घ्यावे. (२९)

निर्गुणीं अनन्य असतां। तेणें होये सायोज्यता।
सायोज्यता म्हणिजे स्वरूपता। निर्गुण भक्ती ॥ ३० ॥

निर्गुण परमात्म्याशी अनन्य असणे हीच सायुज्यता होय. सायुज्यता म्हणजे स्वस्वरूपता. तिलाच निर्गुण भक्ती म्हणतात. (३०)

सगुण भक्ति ते चळे। निर्गुण भक्ति ते न चळे।
हें अवघें प्रांजळ कळे। सद्गुरु केलियां ॥ ३१ ॥

सगुण भक्ती चळते, निर्गुणभक्ती कधीही चळत नाही. हे काय रहस्य आहे, हे सद्गुरू केल्यावर स्पष्टपणे कळून येते. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मुक्तिचतुष्टयनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक चौथा समाप्त.**



# दशक पाचवा : मंत्रांचा

## दशक ५ : समास १

## गुरुनिश्चय

॥ श्रीराम ॥

जय जय जी सद्‌गुरु पूर्णकामा ।
परमपुरुषा आत्मयारामा ।
अनुर्वाच्य तुमचा महिमा । वर्णिला नवचे ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात, 'हे सद्गुरुराया, तुमचा जयजयकार असो! तुम्ही पूर्णकाम आहात, तुम्हीच परमेश्वर आहात! व सर्वांच्या हृदयात असणारे आत्मस्वरूप आत्मारामही तुम्हीच आहात! तुमचा महिमा अनिर्वचनीय आहे, म्हणून त्याचे वर्णन करता येणे शक्य नाही. (१)

जें वेदांस सांकडें । जें शब्दांसि कानडें ।
तें सत्शिष्यास रोकडें । अलभ्य लाभे ॥ २ ॥

जे वेदांना कळण्यासही कठीण, ज्याचे वर्णन शब्दाने करता येत नसल्याने जे दुर्बोध आहे, अशा आत्मतत्त्वाचा अलभ्य लाभ तोही तुम्ही सत्‌शिष्याला साक्षात करून देता. (२)

जें योगियांचें निजवर्म । जें शंकराचें निजधाम ।
जें विश्रांतीचें निजविश्राम । परम गुह्य अगाध ॥ ३ ॥

तें ब्रह्म तुमचेनि योगें । स्वयें आपणचि होईजे आंगें ।
दुर्घट संसाराचेनि पांगें । पांगिजेना सर्वथा ॥ ४ ॥

जे योग्यांचे परम रहस्य आहे, जे शंकराचे राहण्याचे ठिकाण आहे, जेथे विश्रांतीला विश्राम मिळतो असे जे अगाध परम गुह्य असे ब्रह्म ते तुमच्या कृपेच्या योगाने सत्‌शिष्य स्वतःच होतो व अशा रीतीने तो ब्रह्मरूप झाला म्हणजे दुर्घट अशा संसाराच्या योगाने कधीही बद्ध होत नाही. (३-४)

आतां स्वामिचेनि लडिवाळपणें । गुरुशिष्यांचीं लक्षणें ।
सांगिजेती तेणें प्रमाणें । मुमुक्षें शरण जावें ॥ ५ ॥

वक्त्याचे हे वचन ऐकून श्रोते त्यांना विनंती करतात की, स्वामींनी आता लडिवाळपणाने गुरुशिष्यांची लक्षणे अशा प्रकारे वर्णन करावीत की, ती ऐकून मुमुक्षूंना तत्काळ सद्‌गुरूस शरण जाता यावे. (५)

गुरु तों सकळांसी ब्राह्मण । जर्‍हीं तो जाला क्रियाहीन ।
तरी तयासीच शरण । अनन्यभावें असावें ॥ ६ ॥

तेव्हा स्वामी सांगतात की, सर्व वर्णांना ब्राह्मणच गुरुस्थानी आहे. म्हणून तो जरी क्रियाहीन झाला तरी अनन्यभावाने त्यालाच सर्वांनी शरण जावे. (६)

अहो या ब्राह्मणाकारणें । आवतार घेतला नारायेणें ।
विष्णूने श्रीवत्स मिरवणें । तेथें इतर ते किती ॥ ७ ॥

अहो, या ब्राह्मणांसाठीच नारायणांनी अवतार घेतला! प्रत्यक्ष श्रीविष्णू ब्राह्मणाचे चरणचिह्न श्रीवत्स आपल्या वक्षःस्थलावर धारण करतात, तेथे इतरांची काय कथा? (७)

ब्राह्मणवचनें प्रमाण । होती शूद्रांचे ब्राह्मण ।
धातुपाषाणीं देवपण । ब्राह्मणाचेनि मंत्रें ॥ ८ ॥

ब्राह्मणाचे वचन प्रमाण मानले जाते. त्याच्या वचनाच्या योगे शूद्रही ब्राह्मणाच्या योग्यतेस चढतात. ब्राह्मणांनी मंत्रोच्चार केला की धातू अथवा पाषाण यांच्या ठिकाणीही देवत्व येते. (८)

मुंजीबंधनेंविरहित । तो शूद्रचि निभ्रांत ।
द्विजन्मी म्हणोनि सतंत । द्विज ऐसें नाम त्याचें ॥ ९ ॥

जो ब्राह्मण मौंजीबंधनाविरहित असतो, तो निःसंशय शूद्र समजावा. मौंजीबंधनामुळे ब्राह्मणाचा दुसऱ्यांदा जन्म होत असतो, म्हणूनच त्याला द्विज म्हणतात. (९)

सकळांसि पूज्य ब्राह्मण । हे मुख्य वेदाज्ञा प्रमाण ।
वेदविरहित तें अप्रमाण । अप्रिये भगवंता ॥ १० ॥

सर्व वर्णांना ब्राह्मण पूज्य आहे, अशी मुख्य वेदाज्ञा असून ती प्रमाण मानावी. जे वेदविरहित असते, ते अप्रमाण असते आणि ते भगवंतालाही अप्रिय असते. (१०)

ब्राह्मणीं योग याग व्रतें दानें। ब्राह्मणीं सकळ तीर्थाटणें।
कर्ममार्ग ब्राह्मणाविणें। होणार नाहीं ॥ ११ ॥

ब्राह्मणामुळेच योग, याग, व्रते, दाने, सर्व तीर्थयात्रा आदी सफळ होते. ब्राह्मणांशिवाय कर्ममार्ग टिकूच शकत नाही. (११)

ब्राह्मण वेद मूर्तिमंत। ब्राह्मण तोचि भगवंत।
पूर्ण होती मनोरथ। विप्रवाक्येंकरूनी ॥ १२ ॥

ब्राह्मण हे मूर्तिमंत वेदच जाणावेत. एवढेच नव्हे, तर ब्राह्मण म्हणजे साक्षात् भगवंत अशी भावना असावी. त्यांच्या वाक्यांमुळे सर्व मनोरथ पूर्ण होतात. (१२)

ब्राह्मणपूजनें शुद्ध वृत्ती। होऊन, जडे भगवंतीं।
ब्राह्मणतीर्थें उत्तम गती। पावती प्राणी ॥ १३ ॥

ब्राह्मणांचे पूजन केले असता चित्तवृत्ती शुद्ध होऊन ती भगवंतांच्या ठिकाणी जडते. ब्राह्मण हे तीर्थरूप असल्याने त्यांच्यायोगे प्राण्यांना उत्तम गती प्राप्त होते. (१३)

लक्षभोजनीं पूज्य ब्राह्मण। आन यातिसी पुसे कोण।
तरी भगवंतासि भाव प्रमाण। येरा चाड नाहीं ॥ १४ ॥

लक्षभोजनात जेवण्याचा अधिकार ब्राह्मणांनाच आहे. तेथे दुसऱ्यांना कोण विचारतो ? परंतु भगवंत भावाचे भुकेले असतात. त्यांना इतर गोष्टींची पर्वा नसते. (१४)

असो ब्राह्मणा सुरवर वंदिती। तेथें मानव बापुडें किती।
जरी ब्राह्मण मूढमती। तरी तो जगद्वंद्य ॥ १५ ॥

असो. श्रेष्ठ देवही ब्राह्मणांना वंदन करतात तेथे बिचाऱ्या मानवांची काय कथा ? ब्राह्मण मूढमती असला तरी तो जगद्वंद्य आहे. (१५)

अंत्येज शब्दज्ञाता बरवा। परी तो नेऊन काये करावा।
ब्राह्मणासन्निध पुजावा। हें तों न घडे कीं ॥ १६ ॥

एखादा अंत्यज उत्तम शब्दज्ञानी असला तरी तो उपयोगाचा नाही. ब्राह्मणाच्या बरोबरीने त्याची पूजा करता येणार नाही. (१६)

जें जनावेगळें केलें। तें वेदें अव्हेरिलें।
म्हणोनि तयासी नाम ठेविलें। पाषांड मत ॥ १७ ॥

लोकरीतीला सोडून काही केले, तर ते वेद मान्य करीत नाहीत. म्हणून त्याला पाखंड असे म्हणण्यात येते. (१७)

असो जे हरिहरदास। तयास ब्राह्मणीं विस्वास।
ब्राह्मणभजनें बहुतांस। पावन केलें ॥ १८ ॥

असो. जे हरीचे व हराचे भक्त असतात, त्यांचा ब्राह्मणांवर विश्वास असतो. ब्राह्मणांची सेवा केल्याने अनेकजण पावन झाले आहेत. (१८)

ब्राह्मणें पाविजे देवाधिदेवा।
तरी किमर्थ सद्गुरु करावा।
ऐसें म्हणाल तरी निजठेवा। सद्गुरुविण नाहीं ॥ १९ ॥

जर तुम्ही असे म्हणाल की, ब्राह्मणाची सेवा केल्याने देवाधिदेवाची प्राप्ती होते, तर सद्गुरू कशासाठी करावा ? तर याचे उत्तर असे की, आपले खरे धन जे स्वरूपसाक्षात्कार त्याची प्राप्ती सद्गुरूशिवाय होऊ शकत नाही. (१९)

स्वधर्मकर्मीं पूज्य ब्राह्मण। परी ज्ञान नव्हे सद्गुरुविण।
ब्रह्मज्ञान नस्तां सीण। जन्ममृत्य चुकेना ॥ २० ॥

स्वधर्मकर्मांत ब्राह्मण पूज्य असला तरी सद्गुरूशिवाय ज्ञानाची प्राप्ती होत नाही आणि ब्रह्मज्ञान झाल्याशिवाय जन्ममरणपरंपरेतून सुटका होत नाही. (२०)

सद्गुरुविण ज्ञान कांहीं। सर्वथा होणार नाहीं।
अज्ञान प्राणी प्रवाहीं। वाहातचि गेले ॥ २१ ॥

सद्गुरूशिवाय ज्ञानाची प्राप्ती कधीही होणार नाही. आणि ज्ञानप्राप्ती ज्यांना होत नाही, ते अज्ञानी प्राणी जन्ममृत्यूच्या प्रवाहात वाहतच जातात. (२१)

ज्ञानविरहित जें जें केलें। तें तें जन्मासि मूळ जालें।
म्हणौनि सद्गुरूचीं पाऊलें। सुदृढ धरावीं ॥ २२ ॥

मोक्षासाठी ज्ञानविरहित जे जे उपाय केले जातात, ते जन्मालाच कारण ठरतात. म्हणून ज्ञानप्राप्तीसाठी सद्गुरूंची पावले सुदृढ धरावीत. (२२)

जयास वाटे देव पाहावा। तेणें सत्संग धरावा।
सत्संगेंविण देवाधिदेवा। पाविजेत नाहीं ॥ २३ ॥

ज्याला भगवंताच्या दर्शनाची तीव्र इच्छा असेल, त्याने सत्संग धरावा. सत्संगाशिवाय देवाधिदेवाची प्राप्ती होतच नाही. (२३)

नाना साधनें बापुडीं। सद्गुरुविण करिती वेडीं।
गुरुकृपेविण कुडकुडीं। वेर्थचि होती ॥ २४ ॥

अज्ञानी माणसे बिचारी सद्गुरूशिवाय नाना साधने करतात, पण सद्गुरुकृपा न लाभल्यामुळे व्यर्थच दुःखी-कष्टी होतात. (२४)

कार्तिकस्त्रानें माघस्त्रानें। व्रतें उद्यापनें दानें।
गोरांजनें धूम्रपानें। साधिती पंचाग्नी ॥ २५॥

हरिकथा पुराणश्रवण। आदरें करिती निरूपण।
सर्व तीर्थे परम कठिण। फिरती प्राणी ॥ २६॥

झळफळित देवतार्चनें। स्त्रानें संध्या दर्भासनें।
टिळे माळा गोपीचंदनें। ठसे श्रीमुद्रांचे ॥ २७॥

अर्घ्यपात्रें संपुष्ट गोकर्णे। मंत्रयंत्रांची तांब्रपर्णे।
नाना प्रकारींचीं उपकर्णे। साहित्यशोभा ॥ २८॥

घंटा घणाघणा वाजती। स्तोत्रें स्तवनें आणि स्तुती।
आसनें मुद्रा ध्यानें करिती। प्रदक्षणा नमस्कार॥ २९॥

पंचायेतन पूजा केली। मृत्तिकेचीं लिंगें लाखोली।
बेलें नारिकेळें भरिली। संपूर्ण सांग पूजा ॥ ३०॥

उपोषणें निष्ठा नेम। परम सायासी केलें कर्म।
फळचि पावती, वर्म। चुकले प्राणी ॥ ३१॥

येज्ञादिकें कर्मे केलीं। हृदईं फळाशा कल्पिली।
आपले इछेनें घेतली। सूति जन्मांची ॥ ३२॥

करूनि नाना सायास। केला चौदा विद्यांचा अभ्यास।
रिद्धिसिद्धि सावकास। वोळल्या जरी ॥ ३३॥

तरी सद्‌गुरुकृपेविरहित। सर्वथा न घडे स्वहित।
येमपुरीचा अनर्थ। चुकेना येणें ॥ ३४॥

जंव नाहीं ज्ञानप्राप्ती। तंव चुकेना यातायाती।
गुरुकृपेविण अधोगती। गर्भवास चुकेना ॥ ३५॥

ध्यान धारणा मुद्रा आसन। भक्ती भाव आणी भजन।
सकळहि फोल, ब्रह्मज्ञान। जंव तें प्राप्त नाहीं ॥ ३६॥

कुणी कार्तिकस्नाने, माघस्नाने करतात अथवा नाना व्रते, उद्यापने, दाने करतात. कुणी स्वत:स जाळून घेतात, तर कुणी झाडास उलटे टांगून घेऊन खाली केलेला धूर पिऊन तप करतात. तर कुणी उन्हाळ्यात चारी बाजूस अग्नी पेटवून, मस्तकी सूर्याचा ताप सहन करून तप करतात. (२५)

कुणी हरिकथा, पुराणश्रवण करतात, तर कुणी आदराने अध्यात्माचे निरूपण करतात. तर कित्येक लोक अत्यंत कठीण अशा सर्व तीर्थांच्या यात्रा करीत हिंडत राहतात. (२६)

कुणी झळफळित देवतार्चने, स्नान-संध्या, दर्भासने, टिळे, माळा, गोपीचंदनाचे टिळे आणि श्रीमुद्रांचे (वैष्णवी मुद्रांचे) ठसे इत्यादी कर्मकांडात बुडून जातात. (२७)

काही लोक प्रयत्नपूर्वक अर्घ्यपात्रे, संपुष्ट, गोकर्णे, तांब्याच्या पत्र्यावर लिहिलेली देवतांची यंत्रे व त्यांचे मंत्र, नाना प्रकारची उपकरणी वगैरे पूजेचे साहित्य अत्यंत सुंदर, सुशोभित ठेवण्यात समाधान मानतात. (२८)

काही लोक देवळातील घंटा घणघण वाजवतात. स्तोत्रे, स्तवने, स्तुती घडघडा म्हणतात. निरनिराळी योगासने, मुद्रा, ध्यानधारणा, प्रदक्षिणा, नमस्कार इत्यादी आवडीने करत असतात. (२९)

कुणी पंचायतन-पूजा करतात, कुणी मृत्तिकेची लिंगे करून त्यास बेल, नारळ, फळे, फुले यांची लाखोली वाहून यथासांग संपूर्ण पूजा करतात. (३०)

काही लोक उपवास करतात, तर कुणी एखादा नेम निष्ठेने चालवतात. याप्रकारे या कर्मांसाठी ते अत्यंत कष्ट सोसतात व त्याचे फळही त्यांना मिळते. पण हे सर्व लोक भगवत्प्राप्तीचे मुख्य वर्म जाणत नाहीत; तेथे त्यांची फार मोठी चूक होते. (३१)

यज्ञादिक कर्मे केली आणि अंत:करणात जर फळाशा धरली तर आपल्या इच्छेनेच ते जणू पुढील जन्माचा विसार घेतला असे घडते. वासनेमुळे जन्म घ्यावा लागतो. सकाम कर्मामुळे त्यांची कर्मे हा पुढील जन्मांचा प्रारंभ ठरतो.(३२)

समजा, खूप कष्ट करून चौदा विद्यांचा अभ्यास केला आणि त्यामुळे त्यांना यथावकाश ऋद्धी-सिद्धी जरी प्राप्त झाल्या तरी सद्गुरुकृपेशिवाय सर्वथा स्वहित साधता येत नाही आणि यमपुरीचा अनर्थही त्यायोगे चुकत नाही.(३३-३४)

जोपर्यंत ज्ञानप्राप्ती होत नाही, तोपर्यंत मरण व जन्म चुकत नाही. गुरुकृपेशिवाय अधोगती अथवा गर्भवास चुकत नाही. (३५)

ध्यान, धारणा, मुद्रा, आसने, एवढेच नव्हे, तर भक्ती, भाव व भजन हे सर्व ब्रह्मज्ञान जोपर्यंत होत नाही, तोपर्यंत व्यर्थच समजावे. (३६)

सद्‌गुरुकृपा न जोडे। आणी भलतीच कडे वावडे।
जैसें आंधळें चाचरोन पडे। गारीं आणि गडधरा॥ ३७॥

सद्गुरूकृपा जर झाली नाही, तर साधक भलतीकडेच वावरतो. एखादा आंधळा चाचरून दलदलीत अथवा खाचखळग्यांत पडावा तशी त्या साधकाची स्थिती होते. (३७)

जैसें नेत्रीं घालितां अंजन। पडे दृष्टीस निधान।
तैसें सद्‌गुरु वचनें ज्ञान—। प्रकाश होये ॥ ३८॥

जसे नेत्रांत अंजन घातले की, जमिनीतील गुप्त द्रव्य दृष्टीस पडते, त्याप्रमाणे सद्गुरुवचन श्रवणी पडले की ज्ञानाचा प्रकाश पसरतो. (३८)

सद्‌गुरुविण जन्म निर्फळ। सद्‌गुरुविण दुःख सकळ।
सद्‌गुरुविण तळमळ। जाणार नाहीं ॥ ३९॥

सद्गुरूशिवाय जन्म निर्फळ होतो. सद्गुरूशिवाय सगळे दुःखच वाट्याला येते. सद्गुरूशिवाय तळमळ जात नाही. (३९)

सद्‌गुरुचेनि अभयंकरें। प्रगट होईजे ईश्वरें।
संसारदुःखें अपारें। नासोन जाती ॥ ४०॥

अभय देणारा सद्गुरूंचा कृपाहस्त लाभला की त्या कृपेमुळे साक्षात ईश्वर प्रकट होतो. अपार संसारदुःखे नाहीशी होतात. (४०)

मागें जाले थोर थोर। संत महंत मुनेश्वर।
तयांसहि ज्ञानविज्ञानविचार। सद्‌गुरुचेनी ॥ ४१॥

पूर्वीही जे अत्यंत श्रेष्ठ असे संत, महंत, मुनीश्वर वगैरे होऊन गेले; त्यांनाही सद्गुरूंच्या योगानेच आत्मज्ञानाची प्राप्ती झाली. (४१)

श्रीरामकृष्ण आदिकरूनी। अतितत्पर गुरुभजनीं।
सिद्ध साधु आणी संतजनीं। गुरुदास्य केलें ॥ ४२॥

श्रीराम, कृष्ण आदी भगवंताचे अवतारही गुरुभजनी तत्पर होते. तसेच इतर साधू, सिद्ध आणि संतांनीही गुरुसेवा केली. (४२)

सकळ सृष्टीचे चाळक। हरिहरब्रह्मादिक ।
तेहि सद्‌गुरुपदीं रंक। महत्वा न चढेती ॥ ४३॥

सर्व सृष्टीचे चालक जे हरि, हर, ब्रह्मा आदी मुख्य त्रिदेव तेही सद्गुरुचरणी अत्यंत लीन होतात. त्यामुळेच त्यांचे महत्त्व वाढते. (४३)

असो जयासि मोक्ष व्हावा। तेणें सद्‌गुरु करावा।
सद्‌गुरुविण मोक्ष पावावा। हें कल्पांतीं न घडे ॥ ४४॥

असो. ज्याला अंतःकरणापासून मोक्षाची तीव्र इच्छा असेल त्याने सद्गुरू करावा. सद्गुरूशिवाय कल्पांतीही मोक्षप्राप्ती होऊ शकत नाही. (४४)

आतां सद्‌गुरु ते कैसे। नव्हेति इतरां गुरु ऐसे।
जयांचे कृपेनें प्रकाशे। शुद्ध ज्ञान ॥ ४५॥

आता सद्गुरू कसे असतात ते सांगतो. ते इतर गुरूंच्यासारखे नसतात. ज्यांच्या कृपेने शुद्ध ज्ञान प्रकाशते, त्यांना सद्गुरू म्हणावे. (४५)

त्या सद्‌गुरुची वोळखण। पुढिले समासीं निरूपण।
बोलिलें असे श्रोतीं श्रवण। अनुक्रमें करावें ॥ ४६॥

त्या सद्गुरूंची ओळख पुढील समासात करून दिली जाईल. तरी यानंतर अनुक्रमाने श्रोत्यांनी पुढील समासांतील निरूपण श्रवण करावे, असे श्रीसमर्थ सांगतात. (४६)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'गुरुनिश्चयनाम' समास पहिला समाप्त.



## दशक ५ : समास २

# गुरुलक्षण

॥ श्रीराम ॥

जे करामती दाखविती। ते हि गुरु म्हणिजेती।
परंतु सद्गुरु नव्हेती। मोक्षदाते ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, जे चमत्कार करून दाखवितात, त्यांनाही गुरू म्हटले जाते. पण ते मोक्ष देणारे सद्गुरू नसतात. (१)

सभामोहन भुरीं चेटकें। साबरमंत्र कौटालें अनेकें।
नाना चमत्कार कौतुकें। असंभाव्य सांगती ॥ २ ॥

सभेचे वशीकरण करणे, चेडे, चेटके, शाबर मंत्र, अनेक कौटाळे करणे, नाना कौतुके, चमत्कार करणे, असंभाव्य गोष्टी शक्य करून दाखविणे, (२)

सांगती औषधीप्रयोग। कां सुवर्णधातूचा मार्ग।
दृष्टिबंधनें लागवेग। अभिळाषाचा ॥ ३ ॥

नाना औषधींच्या प्रयोगांची माहिती देणे, दुसऱ्या धातूंपासून सोने बनविण्याच्या पद्धती दाखवणे, नजरबंदीचा, तत्काळ इच्छित प्राप्तीचा प्रयोग करणारांनाही लोक गुरूच म्हणतात. (३)

साहित संगीत रागज्ञान। गीत नृत्य तान मान।
नाना वाद्यें सिकविती जन। तेहि येक गुरु ॥ ४ ॥

जे साहित्य, संगीत, रागज्ञान, गीत, नृत्य, तान, मान, नाना वाद्ये इत्यादी कला लोकांना शिकवितात, तेही गुरूच होत. (४)

विद्या सिकविती पंचाक्षरी। ताडेतोडे नानापरी।
कां पोट भरे जयावरी। ते विद्या सिकविती ॥ ५ ॥

काही मांत्रिक मंत्रविद्या शिकवितात, ताईत, गंडे-दोरे देण्याचे शिकवितात. तर काही पोट भरण्याची विद्या शिकवितात. (५)

यातीचा जो व्यापार। सिकविती भरावया उदर।
तेहि गुरु परी साचार। सद्गुरु नव्हेती ॥ ६ ॥

ज्या जातीचा जो व्यापार अथवा उद्योगधंदा असेल तो पोट भरण्यासाठी जे शिकवितात, तेही गुरूच; पण ते सद्गुरू मात्र नव्हेत. (६)

आपली माता आणी पिता। तेहि गुरुचि तत्वतां।
परी पैल्यार पावविता। तो सद्गुरु वेगळा ॥ ७ ॥

आपली आई, आपले वडील हेही एक प्रकारे आपले गुरूच असतात, पण जो संसारसागरातून पैलतीरास नेतो, तो सद्गुरू वेगळाच असतो. (७)

गाईत्रीमंत्राचा उचारु। सांगे तो साचार कुळगुरु।
परी ज्ञानेंविण पैल्यारु। पाविजेत नाहीं ॥ ८ ॥

जो गायत्री मंत्राचा उपदेश देतो, तोही खरोखर कुळगुरूच असतो. पण आत्मज्ञानाशिवाय पैलतीर गाठता येत नाही. (८)

जो ब्रह्मज्ञान उपदेसी। अज्ञानअंधारें निरसी।
जीवात्मयां परमात्मयांसी। ऐक्यता करी ॥ ९ ॥

जो ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून अज्ञानरूपी अंधकाराचे निरसन करून जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्य करून देतो, (९)

विघडले देव आणी भक्त। जीवशिवपणें द्वैत।
तया देवभक्तां येकांत। करी तो सद्गुरु ॥ १० ॥

भिन्न आहेत असे वाटणाऱ्या देव आणि भक्त यांचे जीव-शिवपणाने जे द्वैत भासत असते, त्या देवभक्तांना जो एकरूप करतो, तो सद्गुरू जाणावा. (१०)

भवव्याघ्रें घालूनि उडी। गोवत्सास तडातोडी।
केली देखोनि सीघ्र सोडी। तो सद्गुरु जाणावा ॥ ११ ॥

वाघाने उडी घेऊन गाय व वासराची तातातूट केली आहे असे पाहून जो कृपाळूपणाने तेथे उडी घालून वाघाच्या तावडीतून गायवासरांना सोडवितो, त्याप्रमाणे संसाररूप वाघाच्या तावडीतून जीवाला सोडवून त्याची ईश्वराशी भेट घडवितो, तो सद्गुरू जाणावा. (११)

प्राणी मायाजाळीं पडिलें। संसारदुःखें दुःखवलें।
ऐसें जेणें मुक्त केलें। तो सद्गुरु जाणावा॥ १२॥

मायारूपी जाळ्यात सापडून संसारदु:खाने व्याकूळ झालेल्यांना जो त्या जाळ्यातून मुक्त करतो, तो सद्गुरू जाणावा. (१२)

वासनानदीमाहांपुरीं। प्राणी बुडतां ग्लांती करी।
तेथें उडी घालूनि तारी। तो सद्गुरु जाणावा॥ १३॥

वासनारूपी नदीच्या महापुरात सापडून बुडत असता जेव्हा प्राणी गयावया करू लागतो, तेव्हा कृपाळूपणाने उडी घालून जो त्याला तारतो, तो सद्गुरू समजावा. (१३)

गर्भवास अति सांकडी। इछाबंधनाची बेडी।
ज्ञान देऊन सीघ्र सोडी। तो सद्गुरु स्वामी॥ १४॥

इच्छा म्हणजेच वासनारूपी बेडीत जीव अडकतो आणि त्यामुळे त्याला गर्भवासाच्या महा विपत्तीत सापडावे लागते. ज्ञान देऊन जो या बेडीतून शीघ्र सोडवितो, तोच सद्गुरू स्वामी होय. (१४)

फोडूनि शब्दाचें अंतर। वस्तु दाखवि निजसार।
तोचि गुरु माहेर। अनाथांचें॥ १५॥

सद्गुरू वेदातील शब्दाचे अंतरंग दाखवून देऊन स्वस्वरूपानुभव करून देतात, ते सद्गुरू हे अनाथांचे माहेर असते. (१५)

जीव येकदेसी बापुडें। तयास ब्रह्मचि करी रोकडें।
फेडी संसारसांकडें। वचनमात्रें॥ १६॥

जीव बापडा अल्पज्ञ असतो. त्याला ते साक्षात ब्रह्मच करतात आणि ज्ञानोपदेश करून त्याची जन्म-मरण-चक्रातून सुटका करतात. (१६)

जें वेदांचे अभ्यांतरीं। तें काढून अपत्यापरी।
शिष्य श्रवणीं कवळ भरी। उद्गारवचनें॥ १७॥

वेदांचे अभ्यंतरी असणारे गुह्य असे जे ब्रह्मज्ञान ते वेदांतून काढून आई ज्याप्रमाणे आपल्या अपत्याला छोटे छोटे घास भरवते, त्याप्रमाणे सद्गुरू माउली अत्यंत वात्सल्याने आपल्या शिष्याच्या कानांत आपल्या शब्दांनी हळूहळू आत्मज्ञानाची गूढ रहस्ये ऐकवते. (१७)

वेद शास्त्र माहानुभाव। पाहातां येकचि अनुभव।
तोचि येक गुरुराव। ऐक्यरूपें॥ १८॥

वेद, शास्त्रे, आणि ब्रह्मज्ञानी पुरुष या सर्वांचे अनुभव पाहता ते अगदी एकच आहेत असे कळून येते. सद्गुरूही परमात्म्याशी ऐक्यरूप होण्यासाठी तोच अनुभव शिष्यास देतात. (१८)

संदेह निःशेष जाळी। स्वधर्म आदरें प्रतिपाळी।
वेदविरहित टवाळी। करूंच नेणे॥ १९॥

सद्गुरू संशय पूर्णपणे नाहीसे करतात, स्वत: आदराने स्वधर्माचे प्रतिपालन करतात आणि वेदविरहित व्यर्थ बडबड तर कधीच करत नाहीत. (१९)

जें जें मन आंगिकारी। तें तें स्वयें मुक्त करी।
तो गुरु नव्हे भिकारी। झडे आला॥ २०॥

काही गुरू असे असतात की मनास जे जे वाटेल ते मनसोक्त आचरतात, ते गुरू नव्हेतच. ते बळेच शिष्याच्या गळ्यात पडणारे भिकारीच समजावेत. (२०)

शिष्यास न लविती साधन। न करविती इंद्रियेंदमन।
ऐसे गुरु आडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे॥ २१॥

जे शिष्याला साधना करायला लावत नाहीत, त्याला इंद्रियनिग्रह करायला लावीत नाहीत, असे गुरू दमडीला तीन इतके स्वस्तात मिळाले, तरी त्यांचा त्याग करावा. (२१)

जो कोणी ज्ञान बोधी। समूळ अविद्या छेदी।
इंद्रियेंदमन प्रतिपादी। तो सद्गुरु जाणावा॥ २२॥

जो कोणी ज्ञानाचा उपदेश करतो, अविद्येचा समूळ नाश करतो आणि इंद्रियनिग्रहाची शिकवण देतो, तोच सद्गुरू जाणावा. (२२)

येक द्रव्याचे विकिले। येक शिष्याचे आखिले।
अति दुराशेनें केले। दीनरूप॥ २३॥

काही गुरू द्रव्याने विकत घेता येतात, काही शिष्यांचे अंकित असतात आणि अति दुराशेने दीनवाणे झालेले असतात. (२३)

जें जें रुचे शिष्यामनीं। तैसीच करी मनधरणी।
ऐसी कामना पापिणी। पडली गळां॥ २४॥

ते शिष्याला जे आवडते तेच करतात, शिष्याची मनधरणी करतात. त्यांच्या गळ्यात कामनारूपी पापीण पडलेली असते. (२४)

जो गुरु भीडसारु । तो अद्धमाहून अद्धम थोरु ।
चोरटा मैंद पामरु । द्रव्यभोंदु ॥ २५ ॥

जो गुरू सत्य स्पष्टपणे न सांगणारा असतो तो अधमाहून अत्यंत अधम, चोरटा, मैंद आणि पामर असून द्रव्यासाठी भोंदूपणा करणारा असतो. (२५)

जैसा वैद्य दुराचारी । केली सर्वस्वें बोहरी ।
आणी सेखी भीड करी । घातघेणा ॥ २६ ॥

ज्याप्रमाणे एखादा दुराचारी वैद्य रोग्याच्या सर्वस्वाची राखरांगोळी तर करतोच पण शेवटी भिडेमुळे घातकी ठरतो. (२६)

तैसा गुरु नसावा । जेणें अंतर पडे देवा ।
भीड करूनियां गोवा । घाली बंधनाचा ॥ २७ ॥

येथे वर्णन केलेल्या वैद्यासारखा गुरू नसावा. असा गुरू असेल तर देव तर दुरावतोच, शिवाय भिडेला बळी पडून तो शिष्याला बंधनात गुंतवतो. (२७)

जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान । आणी स्थूळ क्रियेचें साधन ।
तोचि सद्गुरु निधान । दाखवी डोळां ॥ २८ ॥

ज्याचेजवळ ब्रह्मज्ञान आहे आणि स्थूल देहाने जो उत्तम प्रकारे साधनही करीत असतो, असा सद्गुरूच आपल्याला स्वस्वरूपानुभव प्राप्त करून देतो. (२८)

देखणें दाखविती आदरें । मंत्र फुंकती कर्णद्वारें ।
इतुकेंच ज्ञान तें पामरें । अंतरलीं भगवंता ॥ २९ ॥

काही गुरू प्रकाशदर्शनादी चमत्कार मोठ्या आदराने दाखवतात, मंत्रोपदेशही देतात. पण त्यांचे ज्ञान इतकेच मर्यादित असते, त्यामुळे त्यांच्याकडून मंत्रोपदेशादी घेणारे बिचारे जीव भगवंतास अंतरतात. (२९)

बाणे तिहींची खूण । तोचि गुरु सुलक्षण ।
तेथेंचि रिघावें शरण । अत्यादरें मुमुक्षें ॥ ३० ॥

ज्याला शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती व आत्मप्रचीती या तिन्ही प्राप्त झाल्या असतील, तोच उत्तम लक्षणांनी युक्त सद्गुरू होय. जो खरा मुमुक्षु असेल त्याने अत्यंत आदराने अशा सद्गुरूंनाच शरण जावे. (३०)

अद्वैतनिरूपणें अगाध वक्ता । परी विषईं लोलंगता ।
ऐसिया गुरूचेनि सार्थकता । होणार नाहीं ॥ ३१ ॥

एखादा गुरू म्हणवून घेणारा अद्वैत निरूपण करण्यात अत्यंत अगाध विद्वत्ता व वक्तृत्व दाखवितो, पण विषयाच्या ठिकाणी त्याची आसक्ती तशीच राहिलेली असते. अशा व्यक्तीला गुरू केल्याने आपल्या मानवी देहाची सार्थकता होणार नाही. (३१)

जैसा निरूपणसमयो । तैसेंचि मनहि करी वायो ।
कृतबुद्धीचा जयो । जालाच नाहीं ॥ ३२ ॥

निरूपणसमयी तो उत्तम रीतीने ब्रह्मज्ञान सांगत असला तरी त्याचे मन चंचल असते. स्वस्वरूपानुभव त्याला प्रत्यक्ष आलेला नसल्याने त्याचे ज्ञान निश्चयात्मक नसते. (३२)

निरूपणीं सामर्थ्य सिद्धी । श्रवण होतां दुराशा बाधी ।
नाना चमत्कारें बुद्धी । दंडळूं लागे ॥ ३३ ॥

काही वक्ते निरूपण करताना सिद्धीचे सामर्थ्य वगैरे वर्णन करून सांगतात. श्रोत्यांनी ते ऐकल्यावर त्यांच्या मनात दुराशा उत्पन्न होते. नाना चमत्कार पाहिले की त्यांची बुद्धी डळमळू लागते. (३३)

पूर्वीं ज्ञाते विरक्त भक्त । तयांसि सादृश्य भगवंत ।
आणि सामर्थ्यहि अद्भुत । सिद्धीचेनि योगें ॥ ३४ ॥

त्यांना वाटते की पूर्वीही अनेक ज्ञानी, विरक्त भक्त होऊन गेले की ज्यांना भगवंत प्रत्यक्ष दर्शन देत असे. त्यांच्या ठिकाणी सिद्धीच्या योगे अद्भुत सामर्थ्य दिसून येत असे. (३४)

ऐसें तयांचें सामर्थ्य । आमुचें ज्ञानचि नुसदें वेर्थ ।
ऐसा सामर्थ्याचा स्वार्थ । अंतरीं वसे ॥ ३५ ॥

त्यांचे सामर्थ्य असे अचाट होते की, त्यापुढे आमचे नुसते ज्ञान व्यर्थच म्हणावे लागेल. अशा प्रकारे सिद्धींच्या सामर्थ्याविषयी स्वार्थ त्यांच्या अंतरांत उत्पन्न होत असतो. (३५)

निशेष दुराशा तुटे । तरीच भगवंत भेटे ।
दुराशा धरिती ते वोखटे । शब्दज्ञाते कामिक ॥ ३६ ॥

सिद्धींची ही आशा दुराशाच आहे. जोपर्यंत दुराशा नष्ट होत नाहीत, तोपर्यंत भगवंत भेटत नाही. शब्दज्ञानी लोक कामनेच्या अधीन असल्याने चांगले नसतात. (३६)

बहुत ज्ञातीं नागवलीं। कामनेनें वेडीं केलीं।
कामना इच्छितांच मेलीं। बापुडीं मूर्खें ॥ ३७॥

अनेक ज्ञानी म्हणविणारे लोक कामनेने वेडे झाल्याने नागविले जातात. त्यांना आत्मज्ञान प्राप्त होत नाही. आपली कामना पूर्ण व्हावी म्हणून धडपडणारी बिचारी ही मूर्ख माणसे काही न कमावताच मरून जातात. (३७)

निशेष कामनारहित। ऐसा तो विरुळा संत।
अवघ्यां वेगळें मत। अक्षै ज्याचें ॥ ३८॥

ज्याच्या अंत:करणात यत्किंचितही कामना नाही, असा संत विरळाच असतो. त्याचे मत, त्याचे वागणे इतरांपेक्षा सर्वस्वी वेगळे असते. तो सदासर्वदा भगवंतासंबंधीच बोलत असतो. इतर वस्तूंविषयी विचारच त्याच्या मनात कधी येत नाहीत. (३८)

अक्षै ठेवा सकळांचा। परी पांगडा फिटेना शरीराचा।
तेणें मार्ग ईश्वराचा। चुकोनि जाती ॥ ३९॥

भगवंत हा वास्तविक सर्वांचाच कधी नष्ट न होणारा असा अक्षय ठेवा आहे. पण शरीराविषयीची आसक्ती काही केल्या सुटत नाही. त्यामुळे भगवत्प्राप्ती होत नाही. (३९)

सिद्धिआणि सामर्थ्य जालें।
सामर्थ्यें देहास महत्व आलें।
तेणें बेंचाड बळकावलें। देहबुद्धीचें ॥ ४०॥

योगाभ्यासाने सिद्धी आणि सामर्थ्य प्राप्त झाले की देहाला महत्त्व येते. तेथे देहबुद्धीचेच प्रस्थ खूप वाढते. (४०)

सांडूनि अक्षै सुख। सामर्थ्य इछिती ते मूर्ख।
कामनेसारिखें दु:ख। आणीक कांहींच नाहीं॥ ४१॥

ज्यायोगे अक्षय सुख प्राप्त होते, त्या भगवंताची प्राप्ती करून घेण्याऐवजी जे सिद्धींच्या सामर्थ्याची इच्छा करतात, ते मूर्ख असतात. कारण कामनेमुळे होणाऱ्या दु:खासारखे दुसरे दु:ख नाही. (४१)

ईश्वरेंविण जे कामना। तेणेंचि गुणें नाना यातना।
पावती होती पतना। वरपडे प्राणी ॥ ४२॥

एका ईश्वराशिवाय जी कामना करावी, तिच्यायोगे नाना यातना भोगाव्या लागतात. अखेर ते प्राणी पतन पावतात. (४२)

होतां शरीरासी अंत। सामर्थ्यहि निघोन जात।
सेखीं अंतरला भगवंत। कामनागुणें ॥ ४३॥

जेव्हा शरीराचा अंत होतो, तेव्हा सामर्थ्यही निघून जाते. अशा रीतीने कामनेच्या योगाने शेवटी भगवंत अंतरतो. (४३)

म्हणोनि नि:कामताविचारु। दृढबुद्धीचा निर्धारु।
तोचि सद्‌गुरु पैलपारु। पाववी भवाचा ॥ ४४॥

म्हणून जो अत्यंत निष्काम आहे आणि आत्मानुभवामुळे भगवंताविषयी ज्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झालेला असतो, असा सद्गुरूच भवसागराच्या पैलतीरावर घेऊन जाण्यास समर्थ असतो. (४४)

मुख्य सद्‌गुरूचें लक्षण। आधीं पाहिजे विमळ ज्ञान।
निश्चयाचें समाधान। स्वरूपस्थिती ॥ ४५॥

सद्गुरूचे मुख्य लक्षण हे आहे की, त्याच्या ठिकाणी सर्वप्रथम विमल ज्ञान पाहिजे. त्या ज्ञानामुळे त्याच्या ठिकाणी शाश्वत टिकून राहणारे समाधान पाहिजे व त्याची स्वरूपस्थितीही कायम टिकून राहिली पाहिजे. (४५)

याहिवरी वैराग्य प्रबळ। वृत्ति उदास केवळ।
विशेष आचारें निर्मळ। स्वधर्मविषईं ॥ ४६॥

याचबरोबर तो अत्यंत वैराग्यसंपन्न असावा व त्याची चित्तवृत्ती कोठेही गुंतलेली नसावी आणि त्याचे स्वधर्माचे आचरण अत्यंत निर्मळ असावे. (४६)

याहिवरी अध्यात्म श्रवण। हरिकथानिरूपण।
जेथें परमार्थविवरण। निरंतर ॥ ४७॥

याखेरीज तो जेथे असेल तेथे नित्य अध्यात्माचे श्रवण, हरिकथानिरूपण आणि परमार्थाचे विवरण हे चालू असावे. (४७)

जेथें सारासारविचार। तेथें होये जगोद्धार।
नवविधा भक्तीचा आधार। बहुत जनासी ॥ ४८॥

जेथे याप्रमाणे सारासारविचार सतत होत असतो, तेथेच अनेक लोकांचा उद्धार होतो. त्याच्यापाशीच नवविधा भक्ती कशी करावी हे अनेक लोकांना कळून येते व त्या भक्तीचा आधार त्यांना मिळतो. (४८)

म्हणोनि नवविधा भजन। जेथें प्रतिष्ठिलें साधन।
हें सद्‍गुरूचें लक्षण। श्रोतीं वोळखावें ॥ ४९॥

म्हणून जेथे नवविधा भक्ती केली जाते व जेथे साधनांना अत्यंत प्रतिष्ठा प्राप्त होते, ते सद्गुरूंचे लक्षण आहे असे श्रोत्यांनी ओळखावे. (४९)

अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान। बाह्य निष्ठेचें भजन।
तेथें बहु भक्त जन। विश्रांति पावती ॥ ५०॥

जेथे अंतरात शुद्ध ब्रह्मज्ञान आणि बाहेर अत्यंत निष्ठेने भगवद्‍भजन चालते, तेथे अनेक भक्त लोकांना समाधान मिळते. (५०)

नाहीं उपासनेचा आधार। तो परमार्थ निराधार।
कर्मेविण अनाचार। भ्रष्ट होती ॥ ५१॥

ज्या परमार्थाला उपासनेचा आधार नसेल तो परमार्थ निराधार होय. स्वधर्मकर्माचे निष्ठेने आचरण केले नाही, तर अनाचार माजून लोक धर्मभ्रष्ट होतात. (५१)

म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन। स्वधर्मकर्म आणि साधन।
कथा निरूपण श्रवण मनन। नीति न्याये मर्यादा॥ ५२॥

म्हणून आत्मज्ञान, वैराग्य, भगवद्-भजन (उपासना), स्वधर्मकर्माचे यथोचित आचरण आणि नित्यनेमाने व प्रेमाने साधन, तसेच हरिकथा, अध्यात्मनिरूपण, श्रवण, मनन, नीति-न्याय, मर्यादायुक्त आचरण, (५२)

यामधें येक उणें असे। तेणें तें विलक्षण दिसे।
म्हणौन सर्व हि विलसे। सद्‍गुरुपासीं ॥ ५३॥

यांपैकी एक जरी उणे असले तरी ते सर्व विपरीत दिसते. म्हणून जेथे सद्गुरू असतील तेथे वरील सर्व गोष्टी निश्चितपणे आढळतात. (५३)

तो बहुतांचें पाळणकर्ता। त्यास बहुतांची असे चिंता।
नाना साधनें समर्था। सद्‍गुरुपासीं ॥ ५४॥

सद्गुरू हे अनेकांचे पालन-पोषण करतात. त्यांना अनेक लोकांची काळजी असते. प्रत्येकास अधिकारानुरूप देता येईल, अशी अनेक साधने समर्थ सद्गुरूंपाशी असतात. (५४)

साधनेंविण परमार्थ प्रतिष्ठे। तो मागुतां सवेंच भ्रष्टे।
याकारणें दुरीद्रष्टे। माहानुभाव ॥ ५५॥

जो साधनाशिवाय परमार्थाची प्रतिष्ठा मानतो, तो लवकरच स्वत:ही भ्रष्ट होतो, म्हणून दूरदृष्टीच्या महानुभावांनी साधनास महत्त्व दिले आहे. (५५)

आचार उपासना सोडिती। ते भ्रष्ट अभक्त दिसती।
जळो तयांची महंती। कोण पुसे ॥ ५६॥

जे महंत आचार, उपासना सोडतात, ते भ्रष्ट, अभक्त होतात, असे दिसून येते. अशांच्या महंतीला आग लागो! त्यांना कोण विचारतो? (५६)

कर्म उपासनेचा अभाव। तेथें भकाधेसि जाला ठाव।
तो कानकोंडा समुदाव। प्रपंची हांसती ॥ ५७॥

ज्या समुदायात स्वधर्मकर्माचा, उपासनेचा अभाव असतो, तेथे बहकण्यास अवसर मिळतो. त्या तिरस्कृत समुदायाला प्रपंची लोक हसतात. (५७)

नीच यातीचा गुरु। तोहि कानकोंडा विचारु।
ब्रह्मसभेस जैसा चोरु। तैसा दडे ॥ ५८॥

खालच्या जातीचा गुरू केला तरी तेही अयोग्य ठरते. संतांच्या सभेत जेथे ब्रह्मस्वरूपाची चर्चा चालू आहे, तेथे एखादा चोर आला तर त्याची जशी अवस्था होते, तशी त्या शिष्याची अवस्था होते. (५८)

ब्रह्मसभे देखतां। त्याचे तीर्थ नये घेतां।
अथवा प्रसाद सेवितां। प्राश्चित पडे ॥ ५९॥

त्या ब्रह्मसभेत त्याला आपल्या गुरूचे तीर्थ घेता येत नाही, अथवा प्रसाद घेतला तर प्रायश्चित्त घ्यावे लागते. (५९)

तीर्थप्रसादाची सांडी केली। तेथें नीचता दिसोन आली।
गुरुभक्ति ते सटवली। येकायेकी ॥ ६०॥

गुरूचा तीर्थप्रसाद घेतला नाही, तरी कमीपणा दिसून येतो. त्यामुळे एकदम गुरुभक्ती एकाएकी क्षीण होते. (६०)

गुरूची मर्यादा राखतां। ब्राह्मण क्षोभती तत्वतां।
तेथें ब्राह्मण्य रक्षूं जाता। गुरुक्षोभ घडे ॥ ६१॥

गुरूची मर्यादा राखण्याचा प्रयत्न केला, तर ब्राह्मण रागावतात. आपले ब्राह्मण्य सांभाळायचा प्रयत्न केला तर गुरूंचा राग ओढवतो, ते क्षोभतात. (६१)

ऐसीं सांकडीं दोहींकडे। तेथें प्रस्तावा घडे।
नीच यातीस गुरुत्व न घडे। याकारणें ॥ ६२॥

खालच्या जातीचा गुरू केला, तर दोन्हीकडून अशी कोंडी होते, अडचण निर्माण होते आणि मग पश्चात्तापाची पाळी येते. म्हणूनच कनिष्ठ जातीला श्रेष्ठ जातीच्या शिष्याच्या गुरुत्वाचा अधिकार नाही. (६२)

तथापि आवडी घेतली जीवें। तरी आपणचि भ्रष्टावें।
बहुत जनांसी भ्रष्टवावें। हें तों दूषणचि कीं॥ ६३॥

तथापि एखाद्याला कनिष्ठ जातीतील गुरूची आवड उत्पन्न झाली, तरी त्याने एकट्याने फक्त भ्रष्ट व्हावे. अनेक लोकांना भ्रष्ट करणे हा फार मोठा दोष आहे. (६३)

आतां असो हा विचारु। स्वयातीचा पाहिजे गुरु।
नाहीं तरी भ्रष्टाकारु। नेमस्त घडे ॥ ६४॥

आता हे विवेचन पुरे झाले. मुख्य सांगायचे हे आहे की, आपल्या जातीचा गुरू करावा, नाहीतर निश्चितपणे भ्रष्टाचार घडतो. (६४)

जे जे कांहीं उत्तम गुण। तें तें सद्‌गुरूचें लक्षण।
तथापि सांगों वोळखण। होये जेणें ॥ ६५॥

जे जे काही उत्तम गुण आहेत, ते सद्गुरूचे लक्षण म्हणून समजावे, पण तरी सद्गुरूंची ओळख पटावी म्हणून येथे सांगितले आहेत. (६५)

येक गुरु येक मंत्रगुरु। येक यंत्रगुरु येक तांत्रगुरु।
येक वस्तादगुरु येक राजगुरु। म्हणती जनीं ॥ ६६॥

एक नुसता गुरू, तर एक मंत्रगुरू असतो. कुणी यंत्रगुरू तर कुणी तंत्रगुरू असतो. कुणी मल्लविद्या शिकविणारा गुरू असतो, तर कुणाला लोक राजगुरू म्हणून ओळखतात. (६६)

येक कुळगुरु येक मानिला गुरु। येक विद्यागुरु येक कुविद्यागुरु।
येक असद्‌गुरु येक यातिगुरु। दंडकर्ते ॥ ६७॥

एक कुलगुरू असतो, तर एक कुणी मानलेला गुरू असतो. एक विद्यागुरू, तर एक कुविद्यागुरू म्हणजे भलतीच शिकवण देणारा गुरू असतो. कुणी खोटा गुरू असतो, तर कुणी जातिप्रमुख म्हणून गुरू असतो, तो वेळप्रसंगी दंडही करतो. (६७)

येक मातागुरु येक पितागुरु। येक राजागुरु येक देवगुरु।
येक बोलिजे जगद्‌गुरु। सकळकळा ॥ ६८॥

एक माता गुरू, तर एक पिता गुरू असतो. कुणी राजा गुरू तर कुणी देव गुरू असतो, तर कुणी सकलकला-संपन्न जगद्गुरू म्हटला जातो. (६८)

ऐसे हे सत्रा गुरु। याहिवेगळे आणीक गुरु।
ऐक तयांचा विचारु। सांगिजेल ॥ ६९॥

हे असे सतरा गुरू आहेत. यांशिवायही काही गुरू आहेत. त्यांच्याविषयीही सांगतो. (६९)

येक स्वप्नगुरु येक दीक्षागुरु। येक म्हणती प्रतिमागुरु।
येक म्हणती स्वयें गुरु। आपला आपण ॥ ७०॥

एक स्वप्नात उपदेश करणारे स्वप्नगुरू असतात, तर कुणी विशिष्ट संप्रदायाची दीक्षा देणारे दीक्षागुरू असतात. एकाला प्रतिमा-गुरू म्हणतात, ते मूर्तिरूप गुरू होत. कुणी आपला गुरू आपणच असेही असतात. (७०)

जे जे यातीचा जो व्यापारु। ते ते त्याचे तितुके गुरु।
याचा पाहातां विचारु। उदंड आहे ॥ ७१॥

ज्या ज्या जातीचा जो जो व्यवसाय, उद्योगधंदा असेल, ते ते शिकविणारे त्या त्या जातीचे तितके गुरू असतात, असा विचार केला असता उदंड गुरू आहेत. (७१)

असो ऐसे उदंड गुरु। नाना मतांचा विचारु।
परी जो मोक्षदाता सद्‌गुरु। तो वेगळाचि असे॥ ७२॥

असो. या प्रमाणे नाना मतांचा विचार केला असता असे असंख्य गुरू आढळून येतात. पण मोक्षदाता सद्गुरू या सर्वांपेक्षा वेगळाच असतो. (७२)

नाना सद्‌विद्येचे गुण। याहिवरी कृपाळूपण।
हें सद्‌गुरूचें लक्षण। जाणिजे श्रोतीं ॥ ७३॥

ज्याच्या ठिकाणी सद्विद्येची लक्षणे, गुण असतात व त्यापेक्षाही महत्त्वाचे म्हणजे जो अत्यंत कृपाळू असतो, तोच सद्गुरू असतो. हे सद्गुरूचे लक्षण श्रोत्यांनी नीट जाणून घ्यावे, असे श्रीसमर्थ सांगतात. (७३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'गुरुलक्षणनाम' समास दुसरा समाप्त.



## दशक ५ : समास ३

# शिष्यलक्षण

॥ श्रीराम ॥

**मागां सद्गुरूचें लक्षण। विशद केलें निरूपण।**
**आतां सच्छिष्याची वोळखण। सावध ऐका ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात सद्गुरूचे लक्षण विस्तारपूर्वक सांगितले. आता सत्शिष्य कुणास म्हणावे, त्याची लक्षणे कोणती, हे सावधपणे ऐका. (१)

**सद्गुरुविण सच्छिष्य। तो वायां जाय निशेष।**
**कां सच्छिष्येंविण विशेष। सद्गुरु सिणे ॥ २ ॥**

सद्गुरूंची प्राप्ती झाली नाही, तर शिष्य चांगला असून तो संपूर्णपणे वाया जातो किंवा सतशिष्य जर भेटला नाही, तर सद्गुरू व्यर्थच शिणतात. (२)

**उत्तम भूमि शोधिली शुद्ध। तेथें बीज पेरिलें किडखाद।**
**कां तें उत्तम बीज परि संमंध। खडकेंसि पडिला ॥ ३ ॥**

उत्तम सुपीक शुद्ध जमीन आहे, ती शुद्धही केली, पण त्यात किडके बीज जर पेरले; किंवा उत्तम बीज आहे पण ते खडकाळ जमिनीत पेरले गेले, तर दोन्ही ठिकाणी चांगले पीक येणारच नाही. (३)

**तैसा सच्छिष्य तें सत्पात्र। परंतु गुरु सांगे मंत्र तंत्र।**
**तेथें अरत्र ना परत्र। कांहींच नाहीं ॥ ४ ॥**

त्याप्रमाणे सत्शिष्य हा ज्ञानोपदेशास सत्पात्र आहे पण गुरू त्याला ज्ञानोपदेश न करता मंत्र, तंत्र सांगू लागले, तर त्या शिष्याचे इहलोकीही सार्थक होत नाही व परलोकीही सार्थक होत नाही. (४)

**अथवा गुरु पूर्ण कृपा करी। परी शिष्य अनाधिकारी।**
**भाग्यपुरुषाचा भिकारी। पुत्र जैसा ॥ ५ ॥**

अथवा गुरू अत्यंत अधिकारसंपन्न आहे, तो पूर्ण कृपाही करतो, पण शिष्यच जर अनधिकारी असेल, तर एखाद्या भाग्यवान पुरुषाचा मुलगा भिकारी निपजावा, तशी स्थिती होते. (५)

**तैसें येकाविण येक। होत असे निरार्थक।**
**परलोकीचें सार्थक। तें दुऱ्हावे ॥ ६ ॥**

तसे एकाशिवाय दुसरे निरर्थक ठरते व परलोकीचे सार्थक दूरच राहते. (६)

**म्हणौनि सद्गुरु आणी सच्छिष्य। तेथें न लगती सायास।**
**त्या उभयतांचा हव्यास। पुरे येकसरा ॥ ७ ॥**

म्हणून सद्गुरू आणि सत्शिष्य ह्यांची एकाच वेळी गाठ पडली की काहीही सायास करावे न लागता दोघांची इच्छा एकदमच पुरी होते. (७)

**सुभूमि आणी उत्तम कण। उगवेना प्रजन्येंविण।**
**तैसें अध्यात्मनिरूपण। नस्तां होये ॥ ८ ॥**

पण याप्रमाणे जरी भूमी उत्तम आहे, बीज ही उत्तम आहे, पण पर्जन्याशिवाय उत्तम पीक उगवून हाती येत नाही, तसेच अध्यात्माचे निरूपण जर नसेल तर शिष्याला स्वानुभव येणार नाही. (८)

**सेत पेरिलें आणी उगवलें। परंतु निगेविण गेलें।**
**साधनेंविण तैसें जालें। साधकांसी ॥ ९ ॥**

शेतात बी पेरले, ते उगवूनही आले, पण त्याची जर नीट निगा राखली गेली नाही, तर ते फुकट जाते. त्याप्रमाणे साधकाने गुरूंनी सांगितल्याप्रमाणे साधन जर केले नाही, तर त्याच्या जीवनाचे सार्थक होत नाही. (९)

**जंवरी पीक आपणास भोगे। तंवरी अवघेंचि करणें लागे।**
**पीक आलियां हि उगें। राहोंचि नये ॥ १० ॥**

जोपर्यंत आपल्या हाती पीक येत नाही, तोपर्यंत सर्व तऱ्हेने त्याची काळजी घ्यावीच लागते. एवढेच नव्हे, तर पीक आल्यावरही स्वस्थ राहून चालत नाही. (१०)

**तैसें आत्मज्ञान जालें। परी साधन पाहिजे केलें।**
**येक वेळ उदंड जेविलें। तऱ्हीं सामग्री पाहिजे ॥ ११ ॥**

त्याप्रमाणेच साधकाला आत्मज्ञान झाले तरी त्याने साधना करीतच राहिले पाहिजे. कारण एकवेळ अगदी पोटभर जेवलो तरी तेवढ्याने भागत नाही, पुन्हा भूक लागते. म्हणून भोजनसामग्री जवळ असावीच लागते. (११)

म्हणौन साधन अभ्यास आणी सद्गुरु।
सच्छिष्य आणी सच्छास्त्रविचारु।
सत्कर्म सद्वासना पारु। पाववी भवाचा ॥ १२॥

म्हणून साधन, त्याचा अभ्यास, त्यात मार्गदर्शन करणारे सद्गुरू आणि त्यांच्या आदेशाचे कसोशीने पालन करणारा सतशिष्य, सत्शास्त्रविचार, सत्कर्म, सद्वासना या सर्व गोष्टी असतील, तरच भवसागरातून पार जाता येते. (१२)

सदुपासना सत्कर्म। सत्क्रिया आणी स्वधर्म।
सत्संग आणी नित्य नेम। निरंतर ॥ १३॥

ऐसें हें अवघेंचि मिळे। तरी च विमळ ज्ञान निवळे।
नाहीं तरी पाषांड संचरे बळें। समुदाईं ॥ १४॥

सदुपासना, सत्कर्म, सत्क्रिया, स्वधर्म, सत्संग आणि नित्यनेम, या सर्व गोष्टी निरंतर असतील तरच विमल ज्ञान स्थिर होते. नाहीतर लोकांत बळेच पाखंडाचा प्रचार होतो. (१३-१४)

येथें शब्द नाहीं शिष्यासी। हें अवघें सद्गुरुपासीं।
सद्गुरुपालटी अवगुणासी। नाना येत्नेंकरूनी ॥ १५॥

यात शिष्याचा दोष नसतो. हे सर्व सद्गुरूवर अवलंबून असते. कारण शिष्य अवगुणी असला तरी सद्गुरू नाना प्रयत्न करून त्याच्यात बदल घडवून आणतात. (१५)

सद्गुरुचेनि असच्छिष्य पालटे। परंतु सच्छिष्यें असद्गुरु न पालटे।
कां जें थोरपण तुटे। म्हणौनिया ॥ १६॥

असत् शिष्य असला तरी सद्गुरूंनी प्रयत्न केल्यावर त्याच्या ठिकाणचे अवगुण जाऊन त्याच्यात चांगला बदल घडून येतो. परंतु सत्‌शिष्याच्या योगे असद्गुरूंमध्ये कधीही सुधारणा होऊ शकत नाही. कारण गुरूंना आपल्या मोठेपणाचा अभिमान असतो, त्यामुळे ते सत्‌शिष्याचे ऐकत नाहीत. (१६)

याकारणें सद्गुरु पाहिजे। तरीच सन्मार्ग लाहिजे।
नाहीं तरी होईजे। पाषांडा वरपडे ॥ १७॥

या कारणामुळे सद्गुरूंची अत्यंत आवश्यकता आहे. तसे सद्गुरू भेटले तरच सन्मार्ग प्राप्त होतो. नाहीतर शिष्य पाखंड मताचे अनुकरण करू लागतो. (१७)

येथें सद्गुरुचि कारण। येर सर्व निःकारण।
तथापि सांगों वोळखण। सच्छिष्याची ॥ १८॥

म्हणून आत्मकल्याण साधण्याकरिता मुख्य सद्गुरूंची भेट व्हावी लागते. बाकी सर्व गोष्टी व्यर्थ आहेत. तथापि सत्-शिष्याची लक्षणे आता सांगतो. (१८)

मुख्य सच्छिष्याचें लक्षण। सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण।
अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य॥ १९॥

सत्‌शिष्याचे मुख्य लक्षण म्हणजे सद्गुरूंच्या वचनावर त्याचा संपूर्ण विश्वास असतो व तो अनन्यभावाने सद्गुरूंना शरण जातो. (१९)

शिष्य पाहिजे निर्मळ। शिष्य पाहिजे आचारसीळ।
शिष्य पाहिजे केवळ। विरक्त अनुतापी ॥ २०॥

शिष्य निर्मळ असावा. आचारशील असावा, विरक्त असावा आणि आपल्या दोषांची ज्याला जाणीव आहे व त्याबद्दल ज्याला पश्चात्ताप वाटतो, असा असावा. (२०)

शिष्य पाहिजे निष्ठावंत। शिष्य पाहिजे सुचिष्मंत।
शिष्य पाहिजे नेमस्त। सर्वप्रकारीं ॥ २१॥

शिष्य निष्ठावंत असावा, पवित्र आचरण करणारा असावा आणि सर्व प्रकारे नियमाने वागणारा असावा.(२१)

शिष्य पाहिजे साक्षपी विशेष। शिष्य पाहिजे परम दक्ष।
शिष्य पाहिजे अलक्ष। लक्षी ऐसा ॥ २२॥

शिष्य अत्यंत उद्योगी, परम दक्ष आणि अलक्ष्य अशा परमात्म्यावर लक्ष केंद्रित करू शकेल, असा असावा. (२२)

शिष्य पाहिजे अति धीर। शिष्य पाहिजे अति उदार।
शिष्य पाहिजे अति तत्पर। परमार्थविषईं ॥ २३॥

शिष्य अत्यंत धैर्यवान, अत्यंत उदार आणि परमार्थाविषयी अतितत्पर असावा. (२३)

शिष्य पाहिजे परोपकारी। शिष्य पाहिजे निर्मत्सरी।
शिष्य पाहिजे अर्थांतरीं। प्रवेशकर्ता ॥ २४॥

तो परोपकारी निर्मत्सरी आणि अध्यात्मनिरूपण श्रवण करताच त्यातील लक्ष्यार्थ जाणण्याची पात्रता असणारा असावा. (२४)

शिष्य पाहिजे परम शुद्ध। शिष्य पाहिजे परम सावध।
शिष्य पाहिजे अगाध। उत्तम गुणाचा ॥ २५॥

शिष्य अत्यंत शुद्ध अतिशय सावध आणि अनेक उत्तम गुणांनी संपन्न असावा. (२५)

शिष्य पाहिजे प्रज्ञावंत। शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त।
शिष्य पाहिजे नीतिवंत। मर्यादेचा ॥ २६॥

शिष्य पाहिजे युक्तिवंत। शिष्य पाहिजे बुद्धिवंत।
शिष्य पाहिजे संतासंत। विचार घेता ॥ २७॥

शिष्य पाहिजे धारिष्टाचा। शिष्य पाहिजे दृढ व्रताचा।
शिष्य पाहिजे उत्तम कुळीचा। पुण्यसीळ ॥ २८॥

शिष्य असावा सात्विक। शिष्य असावा भजक।
शिष्य असावा साधक। साधनकर्ता ॥ २९॥

शिष्य असावा विश्वासी। शिष्य असावा कायाक्लेशी।
शिष्य असावा परमार्थासी। वाढऊं जाणे ॥ ३०॥

शिष्य असावा स्वतंत्र। शिष्य असावा जगमित्र।
शिष्य असावा सत्पात्र। सर्व गुणें ॥ ३१॥

शिष्य असावा सद्विद्येचा। शिष्य असावा सद्भावाचा।
शिष्य असावा अंतरींचा। परम शुद्ध ॥ ३२॥

शिष्य नसावा अविवेकी। शिष्य नसावा गर्भसुखी।
शिष्य असावा संसारदुःखी। संतप्त देही ॥ ३३॥

जो संसारदुःखे दुःखावला। जो त्रिविधतापें पोळला।
तोचि अधिकारी जाला। परमार्थाविषीं ॥ ३४॥

बहु दुःख भोगिलें जेणें। तयासीच परमार्थ बाणे।
संसारदुःखाचेनि गुणें। वैराग्य उपजे ॥ ३५॥

जया संसाराचा त्रास। तयासीच उपजे विश्वास।
विस्वासबळें दृढ कास। धरिली सद्‌गुरुची॥ ३६॥

अविस्वासें कास सोडिली। ऐसीं बहुतेक भवीं बुडालीं।
नाना जळचरीं तोडिलीं। मध्येंचि सुखदुःखें॥ ३७॥

याकारणें दृढ विस्वास। तोचि जाणावा सच्छिष्य।
मोक्षाधिकारी विशेष। आग्रगण्यु ॥ ३८॥

जो सद्‌गुरुवचनें निवाला। तो सायोज्यतेचा आंखिला।
संसारपांगें पांगिला। न वचे कदा ॥ ३९॥

सद्‌गुरुहून देव मोठा। जयास वाटे तो करंटा।
सुटला वैभवाचा फांटा। सामर्थ्यपिसें ॥ ४०॥

शिष्य प्रज्ञावंत प्रेमळ भक्त आणि नीतिमान असून मर्यादशील असावा. (२६)

शिष्य युक्तिवंत, बुद्धिमान आणि नित्यानित्यविचार करून वागणारा असावा. (२७)

शिष्य धाडसी, दृढव्रती आणि उत्तम कुलांत जन्मलेला पुण्यशील असा असावा. (२८)

तो सात्त्विक, भजनतत्पर आणि नित्यनेमाने साधन करणारा साधकही असावा. (२९)

गुरूंच्या चरणी त्याचा दृढ विश्वास असावा. शारीरिक कष्ट करण्यास तो तत्पर असावा आणि परमार्थ वाढावा अशी तीव्र इच्छा त्याला असावी. (३०)

शिष्य स्वतंत्र जगमित्र, सर्वगुणसंपन्न आणि परमार्थास अत्यंत लायक असावा. (३१)

तो सद्विद्येच्या लक्षणांनी युक्त, सद्भावयुक्त आणि अत्यंत शुद्ध अंतःकरणाचा असावा. (३२)

शिष्य अविवेकी नसावा. तो गर्भश्रीमंत नसावा. तर तो त्रिविधतापाने संतप्त झालेला व संसारदुःखाने दुखावलेला असावा. (३३)

कारण जो संसारदुःखाने अत्यंत दुःखी झालेला असतो, त्रिविध तापाने पोळलेला असतो, तोच परमार्थप्राप्तीसाठी योग्य अधिकारी ठरतो. (३४)

ज्याने अत्यंत दुःख भोगलेले असते, त्याच्या अंतःकरणातच परमार्थ बाणतो. कारण संसारदुःखामुळे त्याच्या ठिकाणी वैराग्य उत्पन्न झालेले असते. (३५)

जो संसारामुळे अत्यंत त्रासलेला असतो, त्याचाच सद्गुरुचरणी दृढ विश्वास उत्पन्न होतो आणि त्या दृढ विश्वासाच्या बळावर तो सद्गुरूंची कास घट्ट पकडतो. (३६)

पण कित्येक साधक अविश्वासाने सद्गुरूंची कास सोडतात ते बहुतेक लोक भवसागरात बुडतात किंवा मध्येच नाना जलचर त्यांचे लचके तोडतात व ते सुख–दुःखाच्या अधीन होतात. (३७)

म्हणून जो दृढ विश्वास ठेवतो, तोच सत्‌शिष्य जाणावा. मोक्षाला पात्र असणाऱ्या साधकांमध्ये तो अग्रगण्य असतो. (३८)

जो शिष्य सद्गुरूंच्या वचनाने निवालेला असतो, तोच सायुज्य मुक्तीचा अधिकारी होतो. मग तो संसारातील संकटांनी कधीही गर्भगळित होत नाही. (३९)

सद्गुरूहून देव मोठा असे ज्या शिष्याला वाटते, तो शिष्य खरोखर अभागीच समजावा. वैभवाच्या लोभाने किंवा सामर्थ्याच्या वेडाने त्याच्या ठिकाणी असा भ्रम उत्पन्न झालेला असतो. (४०)

सद्‌गुरुस्वरूप तें संत।
आणी देवांस मांडेल कल्पान्त।
तेथें कैंचें उरेल सामर्थ्य। हरिहरांचें ॥ ४१ ॥

सद्गुरुस्वरूप हे नित्य असते. कल्पान्ताच्या समयी सर्व देवही लय पावतात. मग त्या वेळी हरिहरांचे सामर्थ्य कसे उरेल? (४१)

म्हणौन सद्‌गुरुसामर्थ्य आधीक। जेथें आटती ब्रह्मादिक।
अल्पबुद्धी मानवी रंक। तयांसि हें कळेना॥ ४२ ॥

जेथे ब्रह्मादिकही लय पावतात, तेथे सद्गुरुस्वरूप नित्य असल्याने त्याचे सामर्थ्य सर्व देवांपेक्षाही अधिक असते. पण मानव अल्पज्ञ असल्याने त्याच्या ठिकाणी बुद्धीचे दारिद्र्य असते, त्यामुळे हे मर्म त्याला कळत नाही. (४२)

गुरुदेवास बराबरी। करी तो शिष्य दुराचारी।
भ्रांति बैसली अभ्यांतरीं। सिद्धांत नेणवे ॥ ४३ ॥

गुरू आणि देव यांची जो बरोबरी करतो, तो शिष्य दुराचारी समजावा. तो सिद्धांत जाणत नसल्याने त्याच्या हृदयात विपरीत ज्ञान सुदृढ झालेले असते. (४३)

देव मनुषीं भाविला। मंत्रीं देवपणासी आला।
सद्‌गुरु न वचे कल्पिला। ईश्वराचेनि ॥ ४४ ॥

वास्तविक मनुष्य आपल्या कल्पनेने देव तयार करतो, मंत्रामुळे देवाला देवपण येते, परंतु ईश्वरालाही सद्गुरूची कल्पना करता येणार नाही. (४४)

म्हणोनि सद्‌गुरु पूर्णपणें। देवाहून आधीक कोटिगुणें।
जयासि वर्णितां भांडणें। वेदशास्त्रीं लागलीं॥ ४५ ॥

म्हणून सद्गुरू हे देवांपेक्षा कोटीगुणानेही अधिक श्रेष्ठ आहेत, कारण ते परिपूर्ण आहेत. त्यांचे वर्णन करताच येत नाही. त्यांचे पूर्ण ज्ञानच कुणाला होत नसल्याने त्यांचे यथार्थ वर्णन करण्याच्या प्रयत्नात वेद आणि शास्त्रे यांच्यात मतभेद आहेत. (४५)

असो सद्‌गुरुपदापुढें। दुजें कांहींच न चढे।
देवसामर्थ्य तें केवढें। मायाजनित ॥ ४६ ॥

असो. सद्गुरुपदाहून श्रेष्ठ असे दुसरे काहीच नाही, कारण ते मायातीत आहेत. त्याच्यापुढे मायाजनित देवांचे सामर्थ्य ते केवढे? (४६)

अहो सद्‌गुरुकृपा जयासी। सामर्थ्य न चले तयापासीं।
ज्ञानबळें वैभवासी। तृणतुछ केलें ॥ ४७ ॥

अहो, ज्याच्यावर सद्गुरूंची कृपा होते. त्याच्यावर कुणाचीही सत्ता चालू शकत नाही. कारण सद्गुरुकृपेने त्याला ज्ञान झालेले असते व त्या ज्ञानाच्या बळावर तो सर्व वैभवास कस्पटासमान तुच्छ मानतो. (४७)

सद्‌गुरुकृपेचेनि बळें। अपरोक्षज्ञानाचेनि उसाळें।
मायेसहित ब्रह्मांड सगळें। दृष्टीस न ये ॥ ४८ ॥

सद्गुरुकृपेच्या बळाने प्राप्त झालेल्या प्रत्यक्ष ज्ञानानुभवाच्या बळाने मायेसहित सर्व ब्रह्मांड त्याच्या दृष्टीसच पडत नाही. (४८)

ऐसें सच्छिष्याचें वैभव। सद्‌गुरुवचनीं दृढ भाव।
तेणें गुणें देवराव। स्वयेंचि होती ॥ ४९ ॥

सत्‌शिष्याचे वैभव हे असे असते. सद्गुरुवचनावर त्याचा दृढ विश्वास असतो. त्यायोगे तो स्वत:च ईश्वरस्वरूप बनून जातो. (४९)

अंतरीं अनुतापें तापले। तेणें अंतर शुद्ध जालें।
पुढें सद्‌गुरुवचनें निवाले। सच्छिष्य ऐसे ॥ ५० ॥

ज्या शिष्याचे अंत:करण पश्चात्तापाने पोळून शुद्ध झालेले असते व सद्गुरूवचनाने ज्यांना समाधान लाभते, तेच सत्‌शिष्य होत. (५०)

लागतां सद्‌गुरुवचनपंथें। जालें ब्रह्मांड पालथें।
तरी जयाच्या शुद्ध भावार्थे। पालट न धरिजे ॥ ५१ ॥

सद्गुरूच्या उपदेशाप्रमाणे साधन मार्ग आक्रमीत असता ब्रह्मांड पालथे होण्याचा प्रसंग आला तरी ज्याच्या सद्गुरूवरील निष्ठेत थोडासुद्धा पालट होत नाही. (५१)

शरण सद्‌गुरूस गेले। सच्छिष्य ऐसे निवडले।
क्रियापालटें जाले। पावन ईश्वरीं ॥ ५२ ॥

याप्रकारे अनन्यभावाने जे सद्गुरूस शरण जातात, त्यांनाच सत्‌शिष्य म्हणतात. त्याच्यांत आत बाहेर बदल होऊन ते ईश्वरस्वरूपी ऐक्य पावून पावन होतात. (५२)

ऐसा सद्भाव अंतरीं। तेचि मुक्तीचे वाटेकरी।
येर माईक वेषधारी। असच्छिष्य ॥ ५३ ॥

असा सद्गुरूविषयी दृढ सद्भाव ज्यांच्या अंतरात असतो, तेच मुक्तीचे वाटेकरी ठरतात. बाकीचे शिष्य नुसते वेषधारी असतात. ते असत् शिष्यच होत. (५३)

वाटे विषयांचें सुख । परमार्थ संपादणें लौकिक ।
देखोवेखीं पढतमूर्ख । शरण गेले ॥ ५४ ॥

असे जे वेषधारी असत् शिष्य असतात, ते खरे तर विषयांत सुख मानणारे असतात. लोकांत प्रतिष्ठा लाभावी म्हणून ते परमार्थ करतात व त्यासाठी सद्गुरूस शरण जाण्याचा देखावा करतात. वास्तविक ते पढतमूर्ख असतात. (५४)

जाली विषईं वृत्ति अनावर । दृढ धरिला संसार ।
परमार्थचर्चेचा विचार । मळिण जाला ॥ ५५ ॥

अशांना विषयांची अनावर ओढ असते. त्यांनी संसाराला दृढ धरलेले असते. त्यामुळे परमार्थ करण्याचा त्यांचा विचार मागे पडतो. (५५)

मोड घेतला परमार्थाचा । हव्यास धरिला प्रपंचाचा ।
भार वाहिला कुटुंबाचा । काबाडी जाला ॥ ५६ ॥

त्यांना हळूहळू परमार्थाचा कंटाळा येऊ लागतो. प्रपंचाचा त्यांना लोभ असतो, त्यामुळे कुटुंबाचा भार वाहता वाहता ते त्याचे सेवक बनून जातात. (५६)

मानिला प्रपंचीं आनंद । केला परमार्थें विनोद ।
भ्रांत मूढ मतिमंद । लोधला कामीं ॥ ५७ ॥

प्रपंच करण्यातच त्यांना आनंद वाटत असतो. परमार्थ ते करमणुकीकरता करतात. ते भ्रमात राहतात आणि मूढ व मतिमंद असून कामाने लुब्ध होतात. (५७)

सूकर पूजिलें विलेपनें । म्हैसा मर्दिला चंदनें ।
तैसा विषइ ब्रह्मज्ञानें । विवेकें बोधिला ॥ ५८ ॥

डुकराला सुगंधी लेप लावावा, रेड्याला चंदनाने मर्दन करावे, तसे विषयासक्ताला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करणे हे याप्रमाणेच व्यर्थ आहे. (५८)

रासभ उकरडां लोळे । तयासि परिमळसोहळे ।
उलूक अंधारीं पळे । तया केवी हंसपंगती ॥ ५९ ॥

गाढव उकिरड्यावर लोळत असते, त्याला सुगंधी द्रव्याने मर्दन करून काय उपयोग? घुबडाला अंधार प्रिय असतो, त्यामुळे ते अंधाराकडेच धाव घेते. त्याला सूर्यप्रकाशात विहार करणाऱ्या हंसाच्या पंगतीत कसे बसविता येईल? (५९)

तैसा विषयदारींचा बराडी । घाली अध:पतनीं उडी ।
तयास भगवंत आवडी । सत्संग कैंचा ॥ ६० ॥

त्याप्रमाणे आशाळभूतपणे विषयसुखाची अपेक्षा करणाऱ्याला भगवंताची आवड, सत्संगाची आवड कशी असणार? (६०)

वर्ती करून दांताळीं । स्वानपुत्र हाडें चगळी ।
तैसा विषई तळमळी । विषयसुखाकारणें ॥ ६१ ॥

ज्याप्रमाणे एखादे कुत्र्याचे पिल्लू दात काढून हाडे चघळण्यात आनंद मानते, त्याप्रमाणे विषयासक्त माणसालाही विषयोपभोगातच सुख वाटते. ते मिळाले नाही, तर तो त्यासाठी तळमळू लागतो. (६१)

तया स्वानमुखीं परमान्न । कीं मर्कटास सिंहासन ।
तैसें विषयशक्तां ज्ञान । जिरेल कैचें ॥ ६२ ॥

त्या हाड चघळण्यात सुख मानणाऱ्या श्वानाच्या मुखी परमान्न दिले, तर त्याला ते कसे गोड लागेल? किंवा माकडाला सिंहासन आवडत नाही, त्याप्रमाणे आत्मज्ञान विषयासक्त माणसाला कसे बरे पचनी पडेल? (६२)

रासभें राखतां जन्म गेला । तो पंडितांमध्ये प्रतिष्ठिला ।
न वचे तैसा आशक्ताला । परमार्थ नाहीं ॥ ६३ ॥

गाढवे राखता राखता ज्याचा जन्म गेला, अशा माणसाला जर पंडितांच्या सभेत नेऊन बसविले, तर त्याला ते मानवत नाही. तसा विषयासक्त माणसाला परमार्थ मानवत नाही. (६३)

मिळाला राजहंसांचा मेळा । तेथें आला डोंबकावळा ।
लक्षून विष्ठेचा गोळा । हंस म्हणवी ॥ ६४ ॥

राजहंसांच्या समुदायात एखादा डोंबकावळा चुकून आला तरी त्याचे लक्ष विष्ठेच्या गोळ्याकडे असते. मात्र तो स्वत:ला हंस म्हणवितो. (६४)

तैसे सज्जनांचे संगती । विषई सज्जन म्हणविती ।
विषय आमेद्य चित्तीं । गोळा लक्षिला ॥ ६५ ॥

तसेच सज्जनांच्या संगतीत आलेले विषयासक्त लोक स्वत:ला सज्जन म्हणवितात, पण त्या डोंबकावळ्याप्रमाणेच त्यांचे सर्व लक्ष विषयरूपी अपवित्र गोळ्याकडेच लागलेले असते. (६५)

काखे घेऊनियां दारा। म्हणे मज संन्यासी करा।
तैसा विषई सैरावैरा। ज्ञान बडबडी ॥ ६६ ॥

बायकोला काखेत घेऊन जर कुणी 'मला संन्यासी करा', असे म्हणू लागला, तर त्याचे ते बोलणे जसे असंबद्ध वाटते, त्याप्रमाणे विषयी माणसाची ज्ञानासंबंधीची बडबड असते. (६६)

असो ऐसे पढतमूर्ख। ते काय जाणती अद्वैतसुख।
नारकी प्राणी नर्क। भोगती स्वइच्छा ॥ ६७ ॥

असो. जे असे पढतमूर्ख असतात, ते अद्वैत सुख कसे काय जाणू शकतील? नरकयोग्य जे प्राणी असतात ते स्वत:च्या इच्छेनेच नरक भोगतात. (६७)

वैषेची करील सेवा। तो कैसा मंत्री म्हणावा।
तैसा विषयदास मानावा। भक्तराज केवीं ॥ ६८ ॥

वेश्येची जो सेवा करतो, तो राज्याचा मंत्री कसा काय होऊ शकेल? त्याप्रमाणे जो विषयांचा दास बनलेला आहे, त्याला भक्तराज कसे मानावे? (६८)

तैसे विषई बापुडे। त्यांस ज्ञान कोणीकडे।
वाचाळ शाब्दिक बडबडे। वरपडे जाले ॥ ६९ ॥

तसेच जे विषयी लोक आहेत, त्यांना बिचाऱ्यांना आत्मज्ञान कसे मिळणार? ते वाचाळ शाब्दिक ज्ञान बडबडून जगात मिरवतात. (६९)

ऐसे शिष्य परमनष्ट। कनिष्ठांमध्यें कनिष्ठ।
हीन अविवेकी आणी दुष्ट। खळ खोटे दुर्जन ॥ ७० ॥

असे जे शिष्य ते परमनष्ट, कनिष्ठांमध्येही कनिष्ठ, हीन, अविवेकी, दुष्ट, खळ, खोटे आणि दुर्जन असतात. (७०)

ऐसे जे पापरूप। दीर्घदोषी वज्रलेप।
तयांस प्राश्चीत अनुताप। उद्भवतां आहे ॥ ७१ ॥

असे जे पापरूप, दीर्घकाळ दोष केलेले व त्यामुळे ते दोष जणू वज्रलेपासारखे ज्यांचे झाले आहेत, त्यांना जर पश्चात्ताप अगदी मनापासून झाला, तर तेच त्यांच्या पापाचे प्रायश्चित्त ठरते. (७१)

तेहिं पुन्हां शरण जावें। सद्गुरूस संतोषवावें।
कृपादृष्टी जालियां व्हावें। पुन्हां शुद्ध ॥ ७२ ॥

त्यांनी परत सद्गुरूंना शरण जावे, त्यांना प्रसन्न करून घ्यावे, म्हणजे त्यांना सद्गुरूंची कृपादृष्टी लाभेल व ते परत शुद्ध होतील. (७२)

स्वामीद्रोह जया घडे। तो यावश्चंद्र नरकीं पडे।
तयास उपावचि न घडे। स्वामी तुष्टल्यावांचुनी ॥ ७३ ॥

जो गुरुद्रोह करतो, त्याला अनंतकाळपर्यंत नरकात खितपत पडावे लागते. गुरूंना प्रसन्न करण्यावाचून यातून सुटायला दुसरा उपायच नाही. (७३)

स्मशानवैराग्य आलें। म्हणोन लोटांगण घातलें।
तेणें गुणें उपतिष्ठलें। नाहीं ज्ञान ॥ ७४ ॥

स्मशानवैराग्य आले, म्हणून लोटांगण घालून गुरूंना जरी शरण आला, तरी ते वैराग्य क्षणिक असल्याने त्याला ज्ञान प्राप्त नाही. (७४)

भाव आणिला जायाचा। मंत्र घेतला गुरूचा।
शिष्य जाला दो दिसांचा। मंत्राकारणें ॥ ७५ ॥

अगदी क्षणिक टिकणाऱ्या भावनेच्या भरात सद्गुरूंकडून मंत्र घेतला, तर त्या मंत्रामुळे तो दोन दिवसांपुरता शिष्य झाला. (७५)

ऐसे केले गुरु उदंड। शब्द सिकला पाषांड।
जाला तोंडाळ तर्मुंड। माहापाषांडी ॥ ७६ ॥

अशा शिष्याने अनेक गुरू केले, तरी तो पाखंडीपणा शिकला, शब्दज्ञान बडबडू लागला, उच्छृंखल, महापाखंडी झाला, असे होईल. (७६)

घडी येक रडे आणी पडे। घडी येक वैराग्य चढे।
घडी येक अहंभाव जडे। ज्ञातेपणाचा ॥ ७७ ॥

घटकेत तो देवाविषयी प्रेम उत्पन्न झाल्याचे दाखवून रडतो, तर घटकेत गडबडा लोळतो, तर दुसऱ्या घडीला वैराग्य आल्याचे दाखवतो, तर परत काही वेळाने ज्ञातेपणाचा अहंभाव त्याच्या ठिकाणी दिसून येतो. (७७)

घडी येक विस्वास धरी। सवेंच घडी येक गुर्गुरी।
ऐसे नाना छंद करी। पिसाट जैसा ॥ ७८ ॥

घटकेत अत्यंत विश्वास असल्याचे दाखवतो, तर दुसऱ्या घडीला रागाने गुरगुरायला लागतो. असे एखाद्या वेड्यासारखे नाना छंद तो करतो. (७८)

**काम क्रोध मद मत्सर। लोभ मोह नाना विकार।**
**अभिमान कापट्य तिरस्कार। हृदईं नांदती ॥७९॥**

त्याच्या हृदयात काम, क्रोध, मद, मत्सर, लोभ, मोह, अभिमान, कपटीपणा, तिरस्कार इत्यादी नाना विकार असतात. (७९)

**अहंकार आणी देहपांग। अनाचार आणी विषयसंग।**
**संसार प्रपंच उद्वेग। अंतरीं वसे ॥८०॥**

अहंकार आणि देहासक्ती, अनाचार आणि विषयासक्ती, संसार, प्रपंच आणि उद्वेग अंतरात वास करतात. (८०)

**दीर्घसूत्री कृतघ्न पापी। कुकर्मी कुतर्की विकल्पी।**
**अभक्त अभाव सीघ्रकोपी। निष्ठुर परघातक ॥८१॥**

तो चेंगट, कृतघ्न, पापी, कुकर्म करणारा, कुतर्क करणारा, संशयी, अभक्त, भावहीन, आणि शीघ्रकोपी, तसेच निष्ठुर आणि लोकांचा घात करणारा असतो. (८१)

**हृदयेंसुन्य आणी आळसी।**
**अविवेकी आणी अविस्वासी।**
**अधीर अविचार संदेहासी। दृढ धर्ता ॥८२॥**

हृदयशून्य आणि आळशी, अविवेकी आणि अविश्वासी, अधीर, अविवेकाला आणि संशयाला दृढपणे धरून ठेवणारा असतो. (८२)

**आशा ममता तृष्णा कल्पना। कुबुद्धी दुर्वृत्ति दुर्वासना।**
**अल्पबुद्धि विषयकामना। हृदईं वसे ॥८३॥**

आशा, ममता, तृष्णा, कल्पना, कुबुद्धी, दुर्वृत्ती आणि दुर्वासना, अल्पबुद्धी आणि विषयकामना त्याच्या हृदयात वस्ती करतात. (८३)

**ईषणा असूया तिरस्कारें। निंदेस प्रवर्ते आदरें।**
**देहाभिमानें हुंबरे। जाणपणें ॥८४॥**

ईर्ष्या, मत्सर, तिरस्कार, यांना वश होऊन तो अति आदराने लोकांची निंदा करतो. देहाभिमानामुळे तो जाणीवपूर्वक गर्वाने, उन्मत्तपणे वागतो. (८४)

**क्षुधा तृष्णा आवरेना। निद्रा सहसा धरेना।**
**कुटुंबचिंता वोसरेना। भ्रांति पडिली ॥८५॥**

त्याला भूक, तहान आवरत नाही. बहुतेक वेळा झोपही आवरत नाही आणि सतत कुटुंबाची चिंता करीत असतो. त्याला भ्रांती पडलेली असते. (८५)

**शाब्दिक बोले उदंड वाचा। लेश नाहीं वैराग्याचा।**
**अनुताप धारिष्ट साधनाचा। मार्ग न धरी ॥८६॥**

तोंडाने तो सारखा शब्दज्ञान बडबडतो, पण त्याच्या अंगी वैराग्याचा लेशही नसतो. त्याचप्रमाणे त्याच्या ठिकाणी कृतकर्माचा पश्चात्तापही नसतो, धाडस नसते आणि तो साधनाचा मार्गही धरीत नाही. (८६)

**भक्ति विरक्ति ना शांती। सद्वृत्ति लीनता ना दांती।**
**कृपा दया ना तृप्ती। सुबुद्धि असेच ना॥८७॥**

त्याच्याजवळ भक्ती, विरक्ती, शांती, सद्वृत्ती, लीनता, इंद्रियदमन, कृपा, दया, तृप्ती अथवा सुबुद्धी यांपैकी काहीही असतच नाही. (८७)

**कायाक्लेसीं शेरीरहीन। धर्मविषईं परम कृपण।**
**क्रिया पालटेना कठिण। हृदय जयाचें ॥८८॥**

तो शारीरिक कष्ट चुकविणारा असतो. धर्माच्या संबंधात अत्यंत कृपण असून कठोर अंत:करणाचा असतो व त्याच्या आचरणात कधी सुधारणाही होत नाही. (८८)

**आर्जव नाहीं जनासी। जो अप्रिये सज्जनासी।**
**जयाचे जिवीं आहिर्णेसीं। परन्यून वसे ॥८९॥**

तो लोकांशी सरळ वागत नाही. सज्जनांना तो आवडत नाही. त्याच्या चित्तात रात्रंदिवस दुसऱ्याच्या दोषांचे चिंतन चालू असते. (८९)

**सदा सर्वकाळ लटिका। बोले माईक लापणिका।**
**क्रिया विचार पाहाता येका। वचनीं सत्य नाहीं॥९०॥**

सदासर्वकाळ तो खोटारडा असतो. तो तोंडदेखलेपणाने गोड गोड बोलतो. त्याच्या आचार-विचारांत मेळ नसतो आणि त्याचे कुठलेच बोलणे खरे नसते. (९०)

**परपीडेविषईं तत्पर। जैसें विंचु आणि विखार।**
**तैसा कुशब्दें जिव्हार। भेदी सकळांचें ॥९१॥**

विंचू आणि सर्पांच्याप्रमाणे तो परपीडेविषयी अत्यंत तत्पर असतो आणि लागट शब्द बोलून तो सर्वांचे अंत:करण दुखावतो. (९१)

**आपले झांकी अवगुण। पुढिलांस बोले कठिण।**
**मिथ्या गुणदोषेंविण। गुणदोष लावी ॥९२॥**

तो आपले अवगुण लपवून ठेवतो आणि दुसऱ्यांच्या दोषाबद्दल त्यांना कठोर शब्द बोलतो. गुणदोष नसताना उगीचच खोटेपणाने दुसऱ्यावर आरोप करतो. (९२)

स्वयें पापात्मा अंतरीं । पुढिलांचि कणव न करी।
जैसा हिंसक दुराचारी । परदु:खें शिणेना ॥ ९३ ॥

स्वत: अत्यंत पापी अंत:करणाचा असून दुसऱ्याची दयामाया ठेवत नाही. एखादा दुराचारी क्रूर मनुष्य ज्याप्रमाणे दुसऱ्याच्या दु:खाने कधी कष्टी होत नाही, तसेच याचे वागणे असते.(९३)

दु:ख पराव्याचे नेणती। दुर्जन गांजिलेची गांजिती।
श्रम पावतां आनंदती। आपुले मनीं ॥ ९४ ॥

दुर्जन लोक असतात ते दुसऱ्याचे दु:ख जाणू शकत नाहीत, दुसऱ्यांना सतत छळतच राहतात आणि त्यांना कष्ट झालेले पाहिले की ते मनोमन आनंदून जातात. (९४)

स्वदु:खें झुरे अंतरीं। आणी परदु:खें हास्य करी।
तयास प्राप्त येमपुरी। राजदूत ताडिती ॥ ९५ ॥

आपल्या दु:खाने जो अंतरात झुरतो आणि लोकांना दु:ख झालेले पाहून ज्याला आनंदाच्या उकळ्या फुटतात, त्याला यमलोक प्राप्त होतो व तेथे यमराजाचे दूत त्याला मारतात. (९५)

असो ऐसें मदांध बापडें। तयांसि भगवंत कैंचा जोडे।
जयांस सुबुद्धि नावडे। पूर्वपातकेंकरूनी ॥ ९६ ॥

असो. असे जे बिचारे मदांध लोक असतात, ज्यांना त्यांच्या पूर्वपातकांच्यामुळे सुबुद्धी आवडत नाही; त्यांना भगवंताची प्राप्ती कशी होणार? (९६)

तयास देहाचा अंतीं। गात्रें क्षीणता पावती।
जिवलगें वोसंडिती। जाणवेल तेव्हां ॥ ९७ ॥

त्यांना देहाचा अंतकाळ जवळ येऊन ज्या वेळी सर्व गात्रे क्षीण होतील आणि जिवलग म्हणविणारी माणसेही जेव्हा सोडून जातील त्या वेळी कृतकर्मांची जाणीव होईल. (९७)

असो ऐसे गुणावेगळे। ते सच्छिष्य आगळे।
दृढ भावार्थें सोहळे। भोगिती स्वानंदाचे ॥ ९८ ॥

असो. येथे वर्णन केलेले अवगुण ज्यांच्या ठिकाणी नसतात असे शिष्य आगळेच असतात. त्यांची श्रद्धा, त्यांचा भाव दृढ असतो. त्यामुळे त्यांना स्वस्वरूपानुभव येऊन ते स्वानंदाचा उपभोग घेतात. (९८)

जये स्थळीं विकल्प जागे। कुळाभिमान पाठीं लागे।
ते प्राणी प्रपंचसंगें। हिंपुटी होती ॥ ९९ ॥

ज्यांच्या ठिकाणी संशय असतो आणि जे अत्यंत कुळाभिमानी असतात, ते प्रपंचात आसक्त होऊन दु:खी-कष्टी होतात.(९९)

जेणेंकरितां दु:ख जालें। तेंचि मनीं दृढ धरिलें।
तेणें गुणें प्राप्त जालें। पुन्हां दु:ख ॥ १०० ॥

ज्यायोगे दु:ख झालेले असते ते अज्ञान ते मनात दृढ धरून ठेवतात. त्यामुळे त्यांना वारंवार दु:ख भोगावे लागते.(१००)

संसारसंगें सुख जालें। ऐसें देखिलें ना ऐकिलें।
ऐसें जाणोन अनहित केलें। ते दु:खी होती स्वयें ॥ १०१ ॥

संसारात ममत्व ठेवल्याने कुणाला सुख झाले आहे असे कधीही दिसून येत नाही किंवा ऐकूही येत नाही. हे जाणूनही जे आपले स्वत:चे अहित करतात, ते आपल्या स्वत:च्या करणीनेच स्वत: दु:ख भोगतात. (१०१)

संसारीं सुख मानिती। ते प्राणी मूढमती।
जाणोन डोळे झांकिती। पढतमूर्ख ॥ १०२ ॥

अत्यंत मूढ बुद्धीचे जे असतात, तेच लोक संसारात सुख मानतात आणि जे पढतमूर्ख असतात, त्यांना हे सर्व कळत असूनही ते तिकडे डोळेझाक करतात. (१०२)

प्रपंच सुखें करावा। परी कांहीं परमार्थ वाढवावा।
परमार्थ अवघाचि बुडवावा। हें विहित नव्हे ॥ १०३ ॥

श्रीसमर्थ शेवटी सांगतात की, प्रपंच करायला काहीच हरकत नाही, पण त्याचबरोबर आपला परमार्थही थोडा थोडा वाढवावा. परमार्थ सर्वस्वी बुडवावा, हे मनुष्यास केव्हाही योग्य नाही.(१०३)

मागां जालें निरूपण। गुरुशिष्यांची वोळखण।
आतां उपदेशाचें लक्षण। सांगिजेल ॥ १०४ ॥

मागील दोन समासांत गुरूची व शिष्याची लक्षणे वर्णन करून सांगितली. आता पुढील समासांत उपदेशाचे लक्षण सांगितले जाईल. (१०४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'शिष्यलक्षणनाम' समास तिसरा समाप्त.



## दशक ५ : समास ४
# उपदेशलक्षण

॥ श्रीराम ॥

ऐका उपदेशाचीं लक्षणें। बहुविधें कोण कोणें।
सांगतां तें असाधारणें। परी कांही येक सांगों॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आता उपदेशाची लक्षणे ऐका. ती असंख्य आहेत. ती सर्व सांगावयाची म्हटली तर ते शक्य होणार नाही, पण येथे त्यातील काही सांगतो. (१)

बहुत मंत्र उपदेशिती। कोणी नाम मात्र सांगती।
येक ते जप करविती। वोंकाराचा ॥ २॥

बरेचसे गुरू मंत्राचा उपदेश करतात, कोणी फक्त नामच सांगतात, तर कुणी ओंकाराचा जप करवितात.(२)

शिवमंत्र भवानीमंत्र। विष्णुमंत्र माहालक्ष्मीमंत्र।
अवधूतमंत्र गणेशमंत्र। मार्तंडमंत्र सांगती ॥ ३॥

कुणी शिवमंत्र, कुणी भवानीमंत्र, कुणी विष्णुमंत्र, कुणी महालक्ष्मीमंत्र, कुणी अवधूतमंत्र, कुणी गणेशमंत्र, तर कुणी मार्तंड मंत्र याप्रमाणे निरनिराळ्या मंत्रांचा उपदेश करतात. (३)

मछकूर्मवऱ्हावमंत्र। नृसिंहमंत्र वामनमंत्र।
भार्गवमंत्र रघुनाथमंत्र। कृष्णमंत्र सांगती ॥ ४॥

मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशराम, श्रीराम किंवा श्रीकृष्णमंत्रांचा उपदेश करतात. (४)

भैरवमंत्र मल्लारिमंत्र। हनुमंतमंत्र येक्षिणीमंत्र।
नारायेणमंत्र पांडुरंगमंत्र। अघोरमंत्र सांगती ॥ ५॥

कोणी भैरव मंत्र, मल्हारी मंत्र, हनुमंत मंत्र, यक्षिणींचा मंत्र, नारायण मंत्र, पांडुरंग मंत्र, किंवा अघोर मंत्रही कुणी कुणी सांगतात. (५)

शेषमंत्र गरुडमंत्र। वायोमंत्र वेताळमंत्र।
झोटिंगमंत्र बहुधा मंत्र। किती म्हणौनि सांगावे॥ ६॥

शेषमंत्र, गरुडमंत्र, वायुमंत्र, वेताळमंत्र, झोटिंगमंत्र असे अनेक मंत्र आहेत, ते किती म्हणून सांगावेत? (६)

बाळमंत्र बगुळमंत्र। कालिमंत्र कंकाळिमंत्र।
बटुकमंत्र नाना मंत्र। नाना शक्तींचे ॥ ७॥

बाळामंत्र, बगुळामंत्र, कालिमंत्र, कंकाळीमंत्र, बटुकमंत्र असे अनेक शक्तींचे अनेक मंत्र आहेत. (७)

पृथकाकारें स्वतंत्र। जितुके देव तितुके मंत्र।
सोपे अवघड विचित्र। खेचर दारुण बीजाचे॥ ८॥

जितके देव आहेत तितके मंत्र आहेत. ते सगळे वेगवेगळ्या प्रकारचे व स्वतंत्र आहेत. काही सोपे आहेत, काही अवघड आहेत, काही खेचर किंवा दारुण बीजाचे असे सर्व विचित्र विचित्र आहेत. (८)

पाहों जातां पृथ्वीवरी। देवांची गणना कोण करी।
तितुके मंत्र वैखरी। किती म्हणौन वदवावी॥ ९॥

पृथ्वीवर असंख्य देव आहेत. त्यांची गणना करणे शक्यच नाही. जितके देव तितके मंत्र असल्याने वाणीने किती म्हणून वर्णन करावे? (९)

असंख्यात मंत्रमाळा। येकाहूनि येक आगळा।
विचित्र मायेची कळा। कोण जाणे ॥ १०॥

मंत्रमाळा असंख्य आहेत. एकापेक्षा एक सामर्थ्यसंपन्न आहेत. हा सर्व मायेचा विचित्र खेळ आहे. तो कोण जाणू शकेल? (१०)

कित्येक मंत्रीं भूतें जाती। कित्येक मंत्रीं वेथा नासती।
कित्येक मंत्रीं उतरती। सितें विंचू विखार॥ ११॥

कित्येक मंत्रांनी भूतबाधा नाहीशी होते. कित्येक मंत्रांनी रोग बरे होतात. तर कित्येक मंत्रांनी थंडीताप किंवा विंचू व साप यांचे विष उतरते. (११)

ऐसे नाना परीचे मंत्री। उपदेशिती कर्णपात्रीं।
जप ध्यान पूजा यंत्री। विधानयुक्त सांगती॥ १२॥

अशा नाना प्रकारच्या मंत्रांचा कानात उपदेश देतात व त्यांचे जप, ध्यान, पूजा, यंत्र इत्यादीसंबंधीची विधानयुक्त सर्व माहिती सांगतात. (१२)

येक शिव शिव सांगती। येक हरि हरि म्हणविती।
येक उपदेशिती। विठल विठल म्हणोनि॥ १३॥

एक 'शिव, शिव' म्हणायला सांगतात, तर एक 'हरि, हरि' म्हणावयास सांगतात. कुणी 'विठ्ठल, विठ्ठल' म्हणा असा उपदेश करतात. (१३)

येक सांगती कृष्ण कृष्ण। येक सांगती विष्ण विष्ण।
येक नारायण नारायण। म्हणौन उपदेशिती॥ १४॥

कुणी 'कृष्ण, कृष्ण' म्हणायला सांगतात, तर कुणी 'विष्णू, विष्णू' म्हणायला सांगतात. तर कुणी 'नारायण, नारायण' म्हणायला सांगतात. (१४)

येक म्हणती अच्युत अच्युत। येक म्हणती अनंत अनंत।
येक सांगती दत्त दत्त। म्हणत जावें॥ १५॥

एक 'अच्युत, अच्युत' म्हणायला सांगतात, तर दुसरे कुणी 'अनंत, अनंत' किंवा 'दत्त, दत्त' म्हणत जावे असे सांगतात. (१५)

येक सांगती राम राम। येक सांगती ॐ ॐ म।
येक म्हणती मेघशाम। बहुतां नामीं स्मरावा॥ १६॥

एक 'राम, राम' म्हणायला सांगतात, तर एक 'ॐ, ॐ' म्हणायला सांगतात, तर कुणी म्हणतात, मेघश्याम श्रीकृष्णाचे स्मरण त्याच्या अनेक नामांनी करावे. (१६)

येक सांगती गुरु गुरु। येक म्हणती परमेश्वरु।
येक म्हणती विघ्नहरु। चिंतीत जावा॥ १७॥

एक 'गुरू, गुरू' असा जप करायला सांगतात, तर कुणी परमेश्वराचे, तर कुणी विघ्नहराचे चिंतन करावे, असे म्हणतात. (१७)

येक सांगती शामराज। येक सांगती गरुडध्वज।
येक सांगती अधोक्षज। म्हणत जावें॥ १८॥

एक 'शामराज' म्हणा म्हणतात, तर दुसरे 'गरुडध्वज' किंवा 'अधोक्षज' म्हणत जावे, असे सांगतात. (१८)

येक सांगती देव देव। येक म्हणती केशव केशव।
येक म्हणती भार्गव भार्गव। म्हणत जावें॥ १९॥

कुणी 'देव देव' म्हणायला सांगतात तर कुणी 'केशव केशव' तर कुणी 'भार्गव भार्गव' म्हणायला सांगतात. (१९)

येक विश्वनाथ म्हणविती। येक मल्लारि सांगती।
येक ते जप करविती। तुकाई तुकाई म्हणौनी॥ २०॥

एक विश्वनाथ म्हणवून घेतात, तर एक मल्हारी म्हणा असे म्हणतात. तर कुणी 'तुकाई, तुकाई' असा जप करवून घेतात. (२०)

हें किती म्हणौनि सांगावें। शिवशक्तीचीं अनंत नांवें।
इछेसारिखी स्वभावें। उपदेशिती॥ २१॥

हे सर्व किती म्हणून सांगावे? शिवशक्तीची अनंत नामे आहेत. प्रत्येक जण आपल्या स्वभावानुसार रुचेल त्या नामाचा उपदेश करतात. (२१)

येक सांगती मुद्रा च्यारी। खेचरी भूचरी चाचरी अगोचरी।
येक आसनें परोपरी। उपदेशिती॥ २२॥

कुणी खेचरी, भूचरी, चाचरी आणि अगोचरी या चार मुद्रांचा अभ्यास करावा असा, तर दुसरे कुणी परोपरीची आसने करावीत असा उपदेश करतात.(२२)

येक दाखविती देखणी। येक अनुहातध्वनी।
येक गुरु पिंडज्ञानी। पिंडज्ञान सांगती॥ २३॥

कुणी प्रकाशाची किंवा तेजाची विविध रूपे दाखवितात, तर कुणी अनाहत ध्वनीवर लक्ष केंद्रित करण्यास सांगतात. कुणी पिंडज्ञानी गुरू असतात, ते शरीरविज्ञानाचा उपदेश करतात. (२३)

येक सांगती कर्ममार्ग। येक उपासना मार्ग।
येक सांगती अष्टांग योग। नाना चक्रें॥ २४॥

कुणी कर्ममार्ग तर कुणी उपासनामार्ग याचा उपदेश करतात, तर कुणी अष्टांग योग शिकवितात, तर कुणी नाना चक्रे कशी भेदन करावी, ते सांगतात.(२४)

येक तपें सांगती। येक अजपा निरोपिती।
येक तत्वें विस्तारिती। तत्वज्ञानी॥ २५॥

कुणी तप करा म्हणतात, तर कुणी अजपाजप करा म्हणतात. तर तत्त्वज्ञानी लोक तत्त्वांचे सविस्तर वर्णन करतात. (२५)

येक सांगती सगुण। येक निरोपिती निर्गुण।
येक उपदेशिती तीर्थाटण। फिरावें म्हणूनी॥ २६॥

कुणी सगुणाची उपासना सांगतात, तर कुणी निर्गुण उपासना सांगतात. कुणी तीर्थयात्रा करीत फिरावे म्हणून सांगतात. (२६)

येक माहावाक्यें सांगती। त्यांचा जप करावा म्हणती।
येक उपदेश करिती। सर्व ब्रह्म म्हणोनी॥ २७॥

कुणी महावाक्ये सांगून त्यांचा जप करा म्हणतात, तर कुणी सर्व ब्रह्मच आहे असा उपदेश करतात. (२७)

**येक शाक्तमार्ग सांगती। येक मुक्तमार्ग प्रतिष्ठिती।**
**येक इंद्रियें पूजन करविती। येका भावें ॥ २८॥**

कोणी शाक्तमार्ग सांगतात, तर कुणी मुक्तमार्गाचे प्रतिष्ठापन करतात. कुणी इंद्रियांचे पूजन भावाने करवितात. (२८)

**येक सांगती वशीकर्ण। स्तंबन मोहन उच्चाटण।**
**नाना चेटकें आपण। स्वयें निरोपिती ॥ २९॥**

कुणी वशीकरण सांगतात, तर कुणी स्तंभन, मोहन, उच्चाटण, तसेच नाना चेटके यांचा उपदेश करतात. (२९)

**ऐसी उपदेशांची स्थिती। पुरे आतां सांगों किती।**
**ऐसे हे उपदेश असती। असंख्यात ॥ ३०॥**

उपदेशांची स्थिती ही अशी आहे. किती सांगणार? याप्रमाणे उपदेशाचे अनेक प्रकार आहेत. (३०)

**ऐसे उपदेश अनेक। परी ज्ञानेंविण निरार्थक।**
**येविषईं असे येक। भगवद्वचन ॥ ३१॥**

असे अनेक प्रकारचे उपदेश असले तरी ज्ञानोपदेशाशिवाय सर्व निरर्थक आहेत. याविषयी भगवंताचे एक वचन आहे. (३१)

श्लोक

नानाशास्त्रं पठेल्लोको नानादैवतपूजनम्।
आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम्।
शैवशाक्तागमाद्या ये अन्ये च बहवो मताः।
अपभ्रंशसमास्तेऽपि जीवानां भ्रांतचेतसाम्॥
न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिदमुत्तमम्।

**अर्थ**—नाना शास्त्रांचा अभ्यास लोक करतात व नाना देवतांचे पूजन करतात. पण अर्जुना, आत्मज्ञानावाचून ही सर्व कर्मे वाया जातात. शैवमत, शाक्तमत, आगमशास्त्र व आणखी अनेक मते आहेत. भ्रमात वावरणाऱ्या जीवांना झालेला तो बुद्धिभ्रंशच जाणावा. या जगात आत्मज्ञानासारखे पवित्र व उत्तम दुसरे काहीही नाही.

**याकारणें ज्ञानासमान। पवित्र उत्तम न दिसे अन्य।**
**म्हणौन आधीं आत्मज्ञान। साधिलें पाहिजे ॥ ३२॥**

याकारणाने ज्ञानासारखे पवित्र व उत्तम अन्य काहीही नाही. म्हणून मनुष्याने सर्वप्रथम आत्मज्ञान प्राप्त करून घेतले पाहिजे. (३२)

**सकळ उपदेशीं विशेष। आत्मज्ञानाचा उपदेश।**
**येविषईं जगदीश। बहुतां ठाईं बोलिला॥३३॥**

सकळ उपदेशामध्ये आत्मज्ञानाचा उपदेश विशेष महत्त्वाचा आहे, याविषयी भगवंतांनी अनेक ठिकाणी सांगितले आहे. (३३)

श्लोक

यस्य कस्य च वर्णस्य ज्ञानं देहे प्रतिष्ठितम्।
तस्य दासस्य दासोऽहं भवे जन्मनि जन्मनि॥

**अर्थ**—माणूस कोणत्याही वर्णाचा असो, त्याच्या अंगी जर आत्मज्ञान स्थिरावले असेल, तर या जगात मी जन्मोजन्मी त्याचा दास होतो.

**आत्मज्ञानाचा महिमा। नेणे चतुर्मुख ब्रह्मा।**
**प्राणी बापुडा जीवात्मा। काये जाणे ॥ ३४॥**

चतुर्मुख ब्रह्मदेवही आत्मज्ञानाचा महिमा जाणत नाही, तेथे बिचारा जीवात्मा काय जाणणार? (३४)

**सकळ तीर्थांची संगती। स्नानदानाची फळश्रुती।**
**त्याहूनि ज्ञानाची स्थिती। विशेष कोटिगुणें॥ ३५॥**

सगळ्या तीर्थयात्रांच्या ठिकाणी केलेल्या स्नानदानादींची फलश्रुती जी सांगितली आहे, त्याहून ज्ञानाची फलश्रुती अनंत पट आहे. (३५)

श्लोक

पृथिव्यां यानि तीर्थानि स्नानदानेषु यत्फलम्।
तत्फलं कोटिगुणितं ब्रह्मज्ञानसमोपमम्॥

**अर्थ**—पृथ्वीवर जेवढी तीर्थे आहेत, तेथे स्नान, दान इत्यादी केल्याचे जे फळ आहे, त्याच्या कोटिपट अधिक ब्रह्मज्ञानाचे फळ आहे.

**म्हणौनि जें आत्मज्ञान। तें गहनाहूनि गहन।**
**ऐक तयाचें लक्षण। सांगिजेल ॥ ३६॥**

म्हणून आत्मज्ञान हे गहनाहून गहन म्हणजे अत्यंत गूढ आहे. तरी त्याचे लक्षण आता सांगितले जाईल, असे श्रीसमर्थ म्हणतात. (३६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उपदेशलक्षणनाम' समास चौथा समाप्त.**

❑❑

## दशक ५ : समास ५

# बहुधा ज्ञान

॥ श्रीराम ॥

**जंव तें ज्ञान नाहीं प्रांजळ। तंव सर्व कांहीं निर्फळ।**
**ज्ञानरहित तळमळ। जाणार नाहीं ॥ १॥**

**ज्ञान म्हणतां वाटे भरम। काये रे बा असेल वर्म।**
**म्हणोनि हा अनुक्रम। सांगिजेल आतां ॥ २॥**

**भूत भविष्य वर्तमान। ठाउकें आहे परिछिन्न।**
**यासीहि म्हणिजेत ज्ञान। परी तें ज्ञान नव्हे ॥ ३॥**

**बहुत केलें विद्यापठण। संगीतशास्त्र रागज्ञान।**
**वैदिक शास्त्र वेदाधेन। हेंहि ज्ञान नव्हे ॥ ४॥**

**नाना वेवसायाचें ज्ञान। नाना दीक्षेचें ज्ञान।**
**नाना परीक्षेचे ज्ञान। हें ज्ञान नव्हे ॥ ५॥**

**नाना वनितांची परीक्षा। नाना मनुष्यांची परीक्षा।**
**नाना नरांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ६॥**

**नाना अश्वांची परीक्षा। नाना गजांची परीक्षा।**
**नाना स्वापदांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ७॥**

**नाना पशूंची परीक्षा। नाना पक्षांची परीक्षा।**
**नाना भूतांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ८॥**

**नाना यानांची परीक्षा। नाना वस्त्रांची परीक्षा।**
**नाना शस्त्रांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ९॥**

**नाना धातूंची परीक्षा। नाना नाण्यांची परीक्षा।**
**नाना रत्नांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १०॥**

**नाना पाषाण परीक्षा। नाना काष्ठांची परीक्षा।**
**नाना वाद्यांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ ११॥**

**नाना भूमींची परीक्षा। नाना जळांची परीक्षा।**
**नाना सतेज परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १२॥**

**नाना रसांची परीक्षा। नाना बीजांची परीक्षा।**
**नाना अंकुरपरीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १३॥**

**नाना पुष्पांची परीक्षा। नाना फळांची परीक्षा।**
**नाना वल्लींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १४॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, जोपर्यंत अत्यंत विशुद्ध असे आत्मज्ञान जीवाला होत नाही, तोपर्यंत सर्व काही निष्फळ आहे. आत्मज्ञानाशिवाय मनाची तळमळ जाणार नाही. (१)

ज्ञान असे नुसते म्हटले की सामान्य माणूस घोटाळ्यात पडतो, असे हे रहस्य काय असेल बरे? म्हणून आता अनुक्रमाने ज्ञान म्हणजे काय ते सांगितले जाईल. (२)

भूत, भविष्य व वर्तमानकाळाचे स्पष्ट ज्ञान असणे, यालाही ज्ञान असे म्हणतात. परंतु ते ज्ञान नाही. खरे ज्ञान म्हणजे केवळ आत्मज्ञान होय. (३)

खूप विद्यापठन केले. संगीत शास्त्र, रागज्ञान, वैदिक शास्त्र, वेदाध्ययन हेही खरे ज्ञान नव्हे. (४)

नाना व्यवसायांचे ज्ञान, नाना प्रकारच्या दीक्षांचे ज्ञान, नाना परीक्षांचे ज्ञान हेही ज्ञान नव्हे. (५)

स्त्रियांची, पुरुषांची, मनुष्यांची परीक्षा करता येणे हेही ज्ञान नव्हे. (६)

अनेक प्रकारच्या अश्वांची, हत्तींची परीक्षा करता येणे हे ज्ञान नव्हे. (७)

नाना पशूंची, नाना पक्ष्यांची किंवा नाना भूतांची परीक्षा करता येणे हे ज्ञान नव्हे. (८

नाना वाहनांची परीक्षा, नाना वस्त्रांची परीक्षा, ना- शस्त्रांची परीक्षा, (९

नाना धातूंची परीक्षा, नाना नाण्यांची परीक्षा, ना- रत्नांची परीक्षा, (१०

नाना पाषाणांची परीक्षा, काष्ठांची परीक्षा, वाद्यांची परीक्षा, (११)

नाना भूमींची परीक्षा, नाना जलांची परीक्षा, नाना तेजांची परीक्षा करता येणे हेही ज्ञान नव्हे. (१२)

रस, बीज, अंकुर, (१३

फुले, फळे, वेली, (१४

नाना दुःखांची परीक्षा। नाना रोगांची परीक्षा।
नाना चिन्हांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १५॥

दुखणी, रोग, या सर्वांची लक्षणे ओळखता येणे म्हणजे ज्ञान नव्हे. (१५)

नाना मंत्रांची परीक्षा। नाना यंत्रांची परीक्षा।
नाना मूर्तींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १६॥

मंत्रांची परीक्षा, यंत्रांची परीक्षा, गृहांची परीक्षा, मूर्तींची परीक्षा, (१६)

नाना क्षत्रांची परीक्षा। नाना गृहांची परीक्षा।
नाना पात्रांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १७॥

क्षत्रियांची परीक्षा, गृहांची परीक्षा, पात्रांची परीक्षा करता येणे हेही ज्ञान नव्हे. (१७)

नाना होणार परीक्षा। नाना समयांची परीक्षा।
नाना तर्कांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १८॥

होणाऱ्या गोष्टींची परीक्षा, काळवेळाची परीक्षा, नाना तर्कांची परीक्षा, (१८)

नाना अनुमान परीक्षा। नाना नेमस्त परीक्षा।
नाना प्रकार परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ १९॥

नाना अनुमानांची परीक्षा, नियमांची परीक्षा व इतरही अनेक प्रकारच्या परीक्षा करता येणे म्हणजेही ज्ञान नव्हे. (१९)

नाना विद्येची परीक्षा। नाना कळेची परीक्षा।
नाना चातुर्यपरीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ २०॥

नाना विद्या, कला, चातुर्य, यांची परीक्षा करता येणे हे ज्ञान नव्हे. (२०)

नाना शब्दांची परीक्षा। नाना अर्थांची परीक्षा।
नाना भाषांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ २१॥

शब्दांची, अर्थांची, भाषांची, (२१)

नाना स्वरांची परीक्षा। नाना वर्णांची परीक्षा।
नाना लेखनपरीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ २२॥

स्वरांची, वर्णांची, लेखनाची परीक्षा करता येणे हेही ज्ञान नव्हे. (२२)

नाना मतांची परीक्षा। नाना ज्ञानांची परीक्षा।
नाना वृत्तींची परीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ २३॥

विविध मते, अनेक प्रकारचे ज्ञान, अनेक प्रकारच्या वृत्ती यांची परीक्षा करता येणे हेही ज्ञान नव्हे. (२३)

नाना रूपांची परीक्षा। नाना रसनेची परीक्षा।
नाना सुगंधपरीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ २४॥

नाना रूपांची, रसांची, सुगंध यांची परीक्षा करता येणे हेही ज्ञान नव्हे. (२४)

नाना सृष्टींची परीक्षा। नाना विस्तारपरीक्षा।
नाना पदार्थपरीक्षा। हें ज्ञान नव्हे ॥ २५॥

सृष्टी, तिचा विस्तार व नाना पदार्थ यांच्या विषयीचे ज्ञानही खरे ज्ञान नव्हे. (२५)

नेमकचि बोलणें। तत्काळचि प्रतिवचन देणें।
सीघ्रचि कवित्व करणें। हें ज्ञान नव्हे ॥ २६॥

नेमकेच बोलणे, तत्काळ प्रतिवचन देणे, शीघ्रकवित्व करणे हेही ज्ञान नव्हे. (२६)

नेत्रपालवी नादकळा। करपालवी भेदकळा।
स्वरपालवी संकेतकळा। हें ज्ञान नव्हे ॥ २७॥

नेत्रपल्लवी, नादकळा, करपल्लवी, भेदकळा, स्वरपल्लवी, संकेतकळा यांचे ज्ञान हेही खरे ज्ञान नव्हे. (२७)

काव्यकुशळ संगीतकळा। गीत प्रबंद नृत्यकळा।
सभाच्यातुर्य शब्दकळा। हें ज्ञान नव्हे ॥ २८॥

काव्यकुशलता, संगीतकला, गीत, प्रबंध, नृत्यकला, सभाचातुर्य असणे, शब्दकळा अवगत असणे हेही खरे ज्ञान नव्हे. (२८)

वाग्विळास मोहनकळा। रम्य रसाळ गायनकळा।
हास्य विनोद कामकळा। हें ज्ञान नव्हे ॥ २९॥

वाग्विलासाने मोहून टाकणे, रम्य रसाळ गायन करणे, हास्यविनोद तसेच कामकला यांचे ज्ञान हेही खरे ज्ञान नव्हे. (२९)

नाना लाघवें चित्रकळा। नाना वाद्यें संगीतकळा।
नाना प्रकारें विचित्र कळा। हें ज्ञान नव्हे ॥ ३०॥

नाना लाघवे, चित्रकला, नाना वाद्ये आणि संगीतकला, इतर नाना विचित्र कला यांचे ज्ञान म्हणजेही खरे ज्ञान नव्हे. (३०)

आदिकरूनि चौसष्टि कळा। याहिवेगळ्या नाना कळा।
चौदा विद्या सिद्धि सकळा। हें ज्ञान नव्हे ॥ ३१॥

एकूण चौसष्ट कला आणि त्यांखेरीजही ज्या इतर नाना कला यांचे ज्ञान, तसेच चौदा विद्या व सर्व सिद्धींचे ज्ञान हेही खरे ज्ञान नव्हे. (३१)

असो सकळ कळाप्रवीण। विद्यामात्र परिपूर्ण।
तरी ते कौशल्यता, परी ज्ञान। म्हणों चि नये ॥ ३२॥

एखादा माणूस सर्व कलांमध्ये प्रवीण असला, सर्व विद्या त्याला परिपूर्ण रीतीने येत असल्या, तरी ते त्याचे कौशल्य आहे. पण या सर्वांस ज्ञान असे म्हणूच नये. (३२)

हें ज्ञान होयेसें भासे। परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसें।
जेथें प्रकृतीचें पिसें। समूळ वाव ॥ ३३॥

हे ज्ञान आहे असे भासते, पण मुख्य ज्ञान याहून वेगळेच आहे. खरे ज्ञान जेथे असते तेथे प्रकृतीने उत्पन्न केलेला भ्रम समूळ मिथ्या ठरतो. (३३)

जाणावें दुसऱ्याचें जीवीचें। हें ज्ञान वाटे साचें।
परंतु हें आत्मज्ञानाचें। लक्षण नव्हे ॥ ३४॥

दुसऱ्याच्या मनातील विचार जाणणे हे खरे ज्ञान आहे असे वाटते, परंतु हे काही आत्मज्ञानाचे लक्षण नव्हे. (३४)

माहानुभाव माहाभला। मानसपूजा करितां चुकला।
कोणी येकें पाचारिला। ऐसें नव्हे म्हणोनी ॥ ३५॥

कुणी एक अधिकारसंपन्न साधक मानसपूजा करीत असताना चुकला. तेव्हा तेथे असलेल्या दुसऱ्या कुणी त्याला हाक मारून 'हे असे करावयाचे नसते' म्हणून त्याची चूक दाखवून दिली. (३५)

ऐसी जाणे अंतरस्थिती। तयासि परम ज्ञाता म्हणती।
परंतु जेणें मोक्षप्राप्ती। तें हें ज्ञान नव्हे ॥ ३६॥

याप्रमाणे दुसऱ्याच्या मनात काय चालले आहे हे जाणणारास फार मोठा ज्ञानी म्हटले जाते. पण ज्या ज्ञानाने मोक्षप्राप्ती होते, ते ज्ञान हे नव्हे. (३६)

बहुत प्रकारींचीं ज्ञानें। सांगों जातां असाधारणें।
सायोज्यप्राप्ती होये जेणें। तें ज्ञान वेगळें ॥ ३७॥

याप्रमाणे अनेक प्रकारचे ज्ञान असते, पण त्याचे सर्व प्रकार सांगणे अशक्यच आहे. पण ज्या ज्ञानाने सायुज्यमुक्ती प्राप्त होते, ते ज्ञान वेगळेच असते. (३७)

तरी तें कैसें आहे ज्ञान। समाधानाचें लक्षण।
ऐसें हें विशद करून। मज निरोपावें ॥ ३८॥

हे ऐकून श्रोता म्हणतो की, ज्यायोगे सायुज्यमुक्ती प्राप्त होते ते ज्ञान कसे असते व त्याने समाधान कसे प्राप्त होते, ते मला आपण स्पष्ट करून सांगावे. (३८)

ऐसें शुद्ध ज्ञान पुसिलें। तें पुढिले समासीं निरोपिलें।
श्रोतां अवधान दिधलें। पाहिजे पुढें ॥ ३९॥

अशा प्रकारे शुद्ध ज्ञानासंबंधी श्रोत्याने प्रश्न केल्यावरून पुढल्या समासात त्यासंबंधी निरूपण केले जाईल. त्याकडे श्रोत्यांनी लक्ष द्यावे. (३९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'बहुधाज्ञाननाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ५ : समास ६

# शुद्धज्ञान

॥ श्रीराम ॥

ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।
पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, हे शिष्या, ज्ञानाचे लक्षण ऐक. ज्ञान म्हणजे आत्मज्ञान. आपण आपल्याला पाहावे, याचे नाव ज्ञान. (१)

मुख्य देवास जाणावें। सत्य स्वरूप वोळखावें।
नित्यानित्य विचारावें। या नांव ज्ञान ॥ २॥

मुख्य देव कोणता ते जाणावे. आपले सत्य स्वरूप काय ते ओळखावे आणि नित्य काय, अनित्य काय याचा विचार करावा, यास ज्ञान असे म्हणतात. (२)

जेथें दृश्य प्रकृति सरे। पंचभूतिक वोसरे।
समूळ द्वैत निवारे। या नांव ज्ञान ॥ ३ ॥

जेथे दृश्य असणारी प्रकृती संपते, पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेले पदार्थ नाहीसे होतात, द्वैत समूळ नष्ट होते त्याला ज्ञान म्हणावे. (३)

मनबुद्धि अगोचर। न चले तर्काचा विचार।
उल्लेख परेहूनि पर। या नांव ज्ञान ॥ ४ ॥

जे आत्मस्वरूप आहे, ते मन, बुद्धी, इंद्रिये यांनी जाणता येत नाही, तेथे तर्क चालू शकत नाही, ते परावाणीच्याही पलीकडे आहे. असे जे आहे त्यास जाणणे म्हणजे ज्ञान होय. (४)

जेथें नाही दृश्यभान। जेथें जाणीव हें अज्ञान।
विमळ शुद्ध स्वरूपज्ञान। यासि बोलिजे ॥ ५ ॥

जेथे दृश्याचे भान उरतच नाही, जाणीवही उरत नाही. कारण जाणीव असणे हेच अज्ञान होय. यालाच विमल शुद्ध स्वरूपाचे ज्ञान म्हणतात. (५)

सर्वसाक्षी अवस्ता तुर्या। ज्ञान ऐसें म्हणती तया।
परी तें जाणिजे वायां। पदार्थज्ञान ॥ ६ ॥

सर्वसाक्षी जी चौथी अवस्था तुर्या तिला ज्ञान असे म्हणतात. पण हे म्हणणेही बरोबर नाही. कारण त्या अवस्थेतही साक्षीत्वाने पदार्थज्ञान शिल्लक असतेच. (६)

दृश्य पदार्थ जाणिजे। त्यास पदार्थज्ञान बोलिजे।
शुद्ध स्वरूप जाणिजे। या नांव स्वरूपज्ञान॥ ७ ॥

दृश्य पदार्थाचे ज्ञान याला पदार्थज्ञान म्हणतात, तर शुद्ध स्वरूप जाणणे याला स्वरूपज्ञान म्हणतात. (७)

जेथें सर्वचि नाहीं ठाईंचें। तेथें सर्वसाक्षत्व कैंचें।
म्हणौनि शुद्ध ज्ञान तुर्येचें। मानूंचि नये ॥ ८ ॥

स्वरूपाच्या ठिकाणी शुद्ध स्वरूपाखेरीज 'सर्व' सुद्धा जर राहात नाही, तर त्या 'सर्व' चे साक्षित्व कसे राहणार? म्हणून तुर्यावस्थेचे ज्ञान हे शुद्ध ज्ञान मानूच नये. (८)

ज्ञान म्हणिजे अद्वैत। तुर्या प्रत्यक्ष द्वैत।
म्हणौनि शुद्ध ज्ञान ते सतंत। वेगळेंचि असे ॥ ९ ॥

ज्ञान म्हणजे अद्वैत आणि तुर्येत तर साक्षित्व म्हणजे प्रत्यक्ष द्वैतच असते. म्हणून तुर्येपेक्षा शुद्ध ज्ञान हे नेहमी वेगळेच असते, हे जाणून घ्यावे. (९)

ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण। शुद्ध स्वरूपचि आपण।
या नांव शुद्ध स्वरूपज्ञान। जाणिजे श्रोतीं ॥ १० ॥

आता शुद्ध ज्ञानाचे लक्षण ऐका. आपण शुद्ध स्वरूपच असतो हे जाणणे, याचा अनुभव येणे याला शुद्ध स्वरूपज्ञान म्हणतात, हे श्रोत्यांनी जाणून घ्यावे. (१०)

माहावाक्य उपदेश भला।
परी त्याचा जप नाहीं बोलिला।
तेथीचा तो विचारचि केला। पाहिजे साधकें ॥ ११ ॥

महावाक्याचा उपदेश उत्तम आहे, पण त्याचा जप करण्यास सांगितलेला नाही. त्या महावाक्यांच्या अर्थाचा साधकाने विचारच केला पाहिजे. (११)

माहावाक्यउपदेश सार। परी घेतला पाहिजे विचार।
त्याच्या जपें अंधकार। न फिटे भ्रांतीचा॥ १२ ॥

महावाक्यात परमार्थाच्या उपदेशाचे सार आहे, यात शंकाच नाही. पण त्यांच्या अर्थासंबंधी विचार, चिंतनच करणे जरूर आहे. नुसता त्याचा जप करून अज्ञानाचा अंधकार नाहीसा होणार नाही. (१२)

माहावाक्याचा अर्थ घेतां। आपण वस्तुचि तत्वतां।
त्याचा जप करितां वृथा। सीणचि होये ॥ १३ ॥

महावाक्यांचा अर्थ लक्षात घेतला की आपण तत्त्वत: आत्मस्वरूपच आहोत, हे कळून येते. नुसता त्याचा जप केल्याने व्यर्थ शीणच होतो. (१३)

माहावाक्याचें विवरण। हें मुख्य ज्ञानाचें लक्षण।
शुद्ध लक्ष्यांशें आपण। वस्तुच आहे ॥ १४ ॥

महावाक्याचे विवरण हेच ज्ञानाचे मुख्य लक्षण आहे. शुद्ध लक्ष्यांशावरून आपण आत्माच आहोत, याचा अनुभव येतो. (१४)

आपला आपणासि लाभ। हें ज्ञान परम दुल्लभ।
जें आदिअंतीं स्वयंभ। स्वरूपचि स्वयें ॥ १५ ॥

आपल्याला आपलाच लाभ होणे म्हणजेच स्वस्वरूपाचा अनुभव येणे हे ज्ञान अत्यंत दुर्लभ आहे. वास्तविक ते ज्ञान आदी व अंती स्वत: स्वत:स प्रकाशित करणारे स्वस्वरूपच असते. (१५)

**जेथून हें सर्वही प्रगटे। आणी सकळही जेथें आटे।**
**तें ज्ञान जालियां फिटे। भ्रांति बंधनाची ॥ १६ ॥**

जेथून हे सर्व विश्व प्रगट होते आणि शेवटी सर्व जेथे लय पावते, त्या आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले की बंधनाची भ्रांती नाहीशी होते. (१६)

**मतें आणी मतांतरें। जेथें होतीं निर्विकारें।**
**अतिसूक्ष्म विचारें। पाहातां ऐक्य ॥ १७ ॥**

मते आणि मतांतरे जेथे फोल ठरतात, त्याच्यासंबंधी अतिसूक्ष्म विचार केल्यावर त्याच्यात पूर्ण ऐक्य दिसून येते. (१७)

**जें या चराचराचें मूळ। शुद्ध स्वरूप निर्मळ।**
**या नांव ज्ञान केवळ। वेदांतमतें ॥ १८ ॥**

या चराचराचे मूळ असलेले शुद्ध निर्मळ आत्मस्वरूप त्याचा साक्षात अनुभव येणे, यालाच वेदांतामध्ये शुद्ध ज्ञान म्हणतात. (१८)

**शोधितां आपलें मूळस्थान। सहजचि उडे अज्ञान।**
**या नांव म्हणिजे ब्रह्मज्ञान। मोक्षदायेक ॥ १९ ॥**

आपल्या स्वस्वरूपाचा शोध घेऊ लागले की स्वाभाविकरीत्या अज्ञान नाहीसे होते. यालाच मोक्षदायक ब्रह्मज्ञान असे म्हणतात. (१९)

**आपणासि वोळखों जातां। आंगीं बाणे सर्वज्ञता।**
**तेणें येकदेसी वार्ता। निशेष उडे ॥ २० ॥**

आपण आपला शोध घेऊ लागलो की स्वस्वरूपाचा साक्षात् अनुभव येतो. ते स्वरूप सर्वव्यापी असल्याने मी म्हणजे देह हे एकदेशित्व नाहीसे होते व आत्मा हेच आपले स्वस्वरूप असल्याने सर्वज्ञता अंगी बाणते. (२०)

**मी कोण ऐसा हेत। धरून पाहातां देहातीत।**
**आवलोकितां नेमस्त। स्वरूपचि होये ॥ २१ ॥**

वृत्ती अंतर्मुख करून मी कोण हे जाणण्याच्या हेतूने आपण आपला शोध घेऊ लागलो की आपण देह नसून देहातीत आहोत हे कळून येते. नंतर नीट विचार केला असता स्वस्वरूपाचा साक्षात अनुभव येतो. (२१)

**असो पूर्वीं थोर थोर। जेणें ज्ञानें पैलपार।**
**पावले ते साचार। ऐक आतां ॥ २२ ॥**

असो. पूर्वीचे महाथोर पुरुष ज्या ज्ञानाच्या योगे भवसागराच्या पैलतीरास पोहोचले, त्यांची नावे आता ऐका. (२२)

**व्यास वसिष्ठ माहामुनी। शुक नारद समाधानी।**
**जनकादिक माहांज्ञानी। येणेंचि ज्ञानें ॥ २३ ॥**

या ज्ञानाच्या योगेच व्यास, वसिष्ठ महामुनी, शुक, नारद समाधानी झाले व जनकादिक महाज्ञानी झाले. (२३)

**वामदेवादिक योगेश्वर। वाल्मीक अत्रि ऋषेश्वर।**
**शोनिकादि अध्यात्मसार। वेदांतमतें ॥ २४ ॥**

वामदेव आदी योगेश्वर, वाल्मीकी, अत्री, यांच्यासारखे ऋषीश्वर, शौनकादी, वेदान्त मतांचे सार जे आत्मज्ञान त्याच्या योगानेच परम पदाला पोहोचले. (२४)

**सनकादिक मुख्यकरूनी। आदिनाथ मीन गोरक्षमुनी।**
**आणीक बोल्तां वचनी। अगाध असती ॥ २५ ॥**

मुख्यत्वे सनकादिक, तसेच आदिनाथ, मच्छिंद्रनाथ, गोरखनाथ, इत्यादींची गणती करू लागल्यास असंख्य आहेत. (२५)

**सिद्ध मुनी माहानुभाव। सकळांचा जो अंतर्भाव।**
**जेणें सुखें माहादेव। डुल्लत सदा ॥ २६ ॥**

सिद्ध, मुनी, श्रेष्ठ ब्रह्मज्ञानी पुरुष यांचा जो स्वानुभव आहे आणि ज्या सुखाच्या योगे महादेव सदा डुलत असतात, (२६)

**जें वेदशास्त्रांचे सार। सिद्धांत धादांत विचार।**
**ज्याची प्राप्ती भाग्यानुसार। भाविकांस होये ॥ २७ ॥**

जे वेदशास्त्रांचे सार आहे, त्याची गुरुप्रतीती, आत्मप्रतीती याची प्राप्ती भाविकांना त्यांच्या भाग्यानुसार होत असते. (२७)

**साधु संत आणी सज्जन। भूत भविष्य वर्तमान।**
**सर्वत्रांचें गुह्य ज्ञान। तें सांगिजेल आतां ॥ २८ ॥**

भूतकाळात होऊन गेलेले, वर्तमानकाळी हयात असलेले व पुढे भविष्यकाळात होणारे जसे जे सर्व साधू, संत आणि सज्जन ह्या सर्वांचे जे गुह्यज्ञान ते आता मी तुला सांगतो. (२८)

**तीर्थें व्रतें तपें दानें। जें न जोडे धूम्रपानें।**
**पंचाग्नी गोरांजनें। जें प्राप्त नव्हे ॥ २९ ॥**

ते गुह्यज्ञान तीर्थे, व्रते, तपे, दाने यांनी किंवा धूम्रपान, पंचाग्निसाधन, गोरांजने यांनी प्राप्त होत नाही. (२९)

**सकळ साधनाचें फळ। ज्ञानाची सिगचि केवळ।**
**जेणें संशयाचें मूळ। निशेष तुटे ॥ ३० ॥**

ते ज्ञान म्हणजे सर्व साधनांचे फळ, ज्ञानाचे केवळ शिखरच असून त्याच्या योगाने संशय पूर्णत: नष्ट होतो.(३०)

**छपन्न भाषा तितुके ग्रन्थ। आदिकरून वेदांत।**
**या इतुकियांचा गहनार्थ। येकचि आहे ॥ ३१ ॥**

जगात छप्पन्न म्हणजे अनेकानेक भाषा आहेत आणि त्यात तसेच अनेकानेक ग्रंथ आहेत. त्या सर्व ग्रंथांचा आणि मुख्यत्वे वेदान्ताचा गहन अर्थ एकच आहे, तो म्हणजे आत्मज्ञान. (३१)

**जें नेणवे पुराणीं। जेथे सिणल्या वेदवाणी।**
**तेंचि आतां येचि क्षणीं। बोधीन गुरुकृपें ॥ ३२ ॥**

ज्याचे ज्ञान पुराणांना नाही, ज्याचे वर्णन करताना वेदही शिणले, तेच ज्ञान आता या क्षणी मी गुरुकृपेने उपदेशितो. (३२)

**पाहिलें नस्तां संस्कृतीं। रीग नाहीं मऱ्हाष्ट ग्रन्थीं।**
**हृदईं वसल्या कृपामूर्ती। सद्गुरुस्वामी ॥ ३३ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, संस्कृत ग्रंथांत काय आहे हे मी पाहिलेले नाही, मराठी ग्रंथात माझा प्रवेश नाही, पण कृपामूर्ती सद्गुरू स्वामी माझ्या हृदयात बसलेले आहेत.(३३)

**आतां नलगे संस्कृत। अथवा ग्रंथ प्राकृत।**
**माझा स्वामी कृपेसहित। हृदईं वसे ॥ ३४ ॥**

त्यामुळे मला आता संस्कृत अथवा प्राकृत ग्रंथांची आवश्यकताच नाही. कारण माझा स्वामी कृपेसहित माझ्या हृदयात वसत आहे. (३४)

**न करितां वेदाभ्यास। अथवा श्रवणसायास।**
**प्रेत्नेंविण सौरस। सद्गुरुकृपा ॥ ३५ ॥**

वेदांचा अभ्यास न करता किंवा श्रवणाचे सायास न करता प्रयत्नाशिवाय सद्गुरुकृपारूपी अमृतमय प्रसाद मला लाभला आहे. (३५)

**ग्रन्थ मात्र मऱ्हाष्ट। त्याहून संस्कृत श्रेष्ठ।**
**त्या संस्कृतामधें पष्ट। थोर तो वेदांत ॥ ३६ ॥**

मराठी भाषेत ग्रंथ आहेत, पण त्याहूनही संस्कृत भाषेतील ग्रंथ श्रेष्ठ आहेत व संस्कृत ग्रंथांतही वेदान्त ग्रंथ फार श्रेष्ठ आहेत. (३६)

**त्या वेदांतापरतें कांहीं। सर्वथा श्रेष्ठ नाहीं।**
**जेथें वेदगर्भ सर्वही। प्रगट जाला ॥ ३७ ॥**

त्या वेदांतापेक्षा श्रेष्ठ दुसरे काहीही नाही, कारण त्यात सर्व वेदांचे सार प्रकट झाले आहे. (३७)

**असो ऐसा जो वेदांत। त्या वेदांचाहि मथितार्थ।**
**अतिगहन जो परमार्थ। तो तूं ऐक आतां ॥ ३८ ॥**

असो. असा जो अतिश्रेष्ठ वेदांत, त्या वेदांताचा मथितार्थ असा जो अतिगहन परमार्थ, तो तू आता ऐक. (३८)

**अरे गहनाचेंही गहन। तें तूं जाण सद्गुरुवचन।**
**सद्गुरुवचनें समाधान। नेमस्त आहे ॥ ३९ ॥**

अरे, त्या गहनाचेही गहन म्हणजे जे सद्गुरुवचन ते तू जाणून घे. त्या सद्गुरुवचनामुळे निश्चितपणे समाधान लाभेल. (३९)

**सद्गुरुवचन तोचि वेदांत। सद्गुरुवचन तोचि सिद्धांत।**
**सद्गुरुवचन तोचि धादांत। सप्रचीत आतां ॥ ४० ॥**

सद्गुरुवचन हाच वेदांत आहे. तोच सिद्धांत आहे व तोच प्रत्यक्ष अनुभवलेले ज्ञान आहे. (४०)

**जें अत्यंत गहन। माझ्या स्वामीचें वचन।**
**जेणें माझें समाधान। अत्यंत जालें ॥ ४१ ॥**

जे माझ्या स्वामीचे अत्यंत गहन वचन आहे आणि ज्याने माझे अत्यंत समाधान झाले, (४१)

**तें हें माझें जीवीचें गुज। मी सांगैन म्हणतों तुज।**
**जरी अवधान देसी मज। तरी आतां येच क्षणीं॥ ४२ ॥**

ते हे माझ्या जीवींचे गुज, मी तुला सांगावे म्हणतो. जर तू नीट लक्ष देऊन ऐकणार असशील तर आता या क्षणी सांगतो. (४२)

**शिष्य म्लानवदनें बोले। धरिले सदृढ पाउलें।**
**मग बोलों आरंभिलें। गुरुदेवें ॥ ४३ ॥**

हे ऐकताच शिष्याने गुरूची पावले सदृढ धरली आणि तो दीनपणे बोलू लागला. तेव्हा मग गुरुदेवांनी बोलण्यास आरंभ केला. (४३)

**अहं ब्रह्मास्मि माहांवाक्य। येथींचा अर्थ अतर्क्य।**
**तो ही सांगतो ऐक्य। गुरुशिष्य जेथें ॥ ४४ ॥**

'अहं ब्रह्मास्मि' हे महावाक्य आहे. त्याचा अर्थ तर्काने जाणता येत नाही. तो अर्थही मी तुला सांगतो. त्याच्या योगे गुरुशिष्य त्या अर्थाच्या ठिकाणी एकरूप होऊन जातात. (४४)

**ऐक शिष्या येथीचें वर्म। स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म।**
**ये विषईं संदेह भ्रम। धरूंचि नको ॥ ४५ ॥**

श्री गुरुदेव म्हणतात की, हे शिष्या, येथे जे रहस्य आहे ते तू ऐक. तू स्वतःच ते ब्रह्म आहेस, याविषयी संदेह अथवा भ्रम धरूच नकोस. (४५)

**नवविधा प्रकारें भजन। त्यांत मुख्य तें आत्मनिवेदन।**
**तें समग्र प्रकारें कथन। कीजेल आतां ॥ ४६ ॥**

नवविधा भक्तीमधील मुख्य जे भजन, आत्मनिवेदन ते तुला आता समग्र वर्णन करून सांगतो. (४६)

**निर्माण पंचभूतें यीयें। कल्पांतीं नासतीं येथान्वयें।**
**प्रकृति पुरुष जीयें। तेही ब्रह्म होती ॥ ४७ ॥**

विश्वोत्पत्ती होताना ही पंचमहाभूते ज्या क्रमाने निर्माण होतात, त्या क्रमानेच ती कल्पांतात लय पावत जातात. एवढेच नव्हे, तर प्रकृती आणि पुरुष यांचाही ब्रह्मात लय होऊन ती ब्रह्मरूपच होतात. (४७)

**दृश्य पदार्थ आटतां। आपणहि नुरे तत्वतां।**
**ऐक्यरूपें ऐक्यता। मुळींच आहे ॥ ४८ ॥**

सर्व दृश्य पदार्थ नाहीसे झाले की ज्याला आपण 'मी' म्हणतो, तोही राहत नाही. कारण मुळातच परमात्मा एकरूपच असल्याने एकरूपता स्वाभाविकच आहे. (४८)

**सृष्टीची नाहीं वार्ता। तेथें मुळींच ऐक्यता।**
**पिंड ब्रह्मांड पाहों जातां। दिसेल कोठें ॥ ४९ ॥**

जेथे सृष्टीचीच वार्ता नाही, ती पण मूळ स्वरूपात विलीन झाल्यावर एकटे एक परब्रह्म तेवढे उरते. मग पिंड, ब्रह्मांड पाहू गेल्यास तेथे कसे दिसणार? (४९)

**ज्ञानवन्ही प्रगटे। तेणें दृश्य केर आटे।**
**तदाकारें मूळ तुटे। भिन्नत्वाचें ॥ ५० ॥**

ज्ञानरूपी अग्नी प्रकट झाल्यावर त्यायोगे दृश्यरूपी केरकचरा जळून जातो. सर्व काही ब्रह्मरूप झाल्याने भिन्नत्वाचे मूळच नाहीसे होते. (५०)

**मिथ्यत्वें वृत्ति फिरे। तो दृश्य असतांच वोसरे।**
**सहजचि येणें प्रकारें। जालें आत्मनिवेदन ॥ ५१ ॥**

साक्षात्कारानंतर जरी वृत्ती उद्भवली, तरी ती जग सत्यत्वाने पाहातच नसल्याने दृश्य प्रपंच असून नसल्यासारखा होतो. याप्रकारे सहजच आत्मनिवेदन होते. (५१)

**असो गुरूचे ठाईं अनन्यता।**
**तरी तुज कायेसी रे चिंता।**
**वेगळेपणें अभक्ता। उरोंचि नको ॥ ५२ ॥**

असो. तुझी जर गुरूच्या ठायी अनन्यता असेल तर तुला चिंता करण्याचे कारणच नाही. अभक्त जसा स्वतःला भगवंतापासून वेगळा समजतो, तसे तू स्वतःला गुरूपासून वेगळा समजूच नकोस. (५२)

**आता हेंचि दृढीकर्ण। व्हावया करीं सद्गुरुभजन।**
**सद्गुरुभजनें समाधान। नेमस्त आहे ॥ ५३ ॥**

आता हे आत्मज्ञान दृढ करण्याकरिता तू सद्गुरुभजन कर. तू सद्गुरुभजन केलेस की तुला निश्चित समाधान लाभेल. (५३)

**या नांव शिष्या आत्मज्ञान। येणें पाविजे समाधान।**
**भवभयाचें बंधन। समूळ मिथ्या ॥ ५४ ॥**

शिष्या, यालाच आत्मज्ञान म्हणतात. त्यायोगेच पूर्ण समाधान प्राप्त होते. भवभयाचे बंधन हे वास्तविक समूळ मिथ्याच असते. (५४)

**देह मी वाटे ज्या नरा। तो जाणावा आत्महत्यारा।**
**देहाभिमानें येरझारा। भोगिल्याच भोगी ॥ ५५ ॥**

ज्या नराला मी म्हणजे देह असे वाटते, तो आत्महत्याराच जाणावा. देहाभिमानामुळे तो जन्ममृत्यूच्या येरझारा पुन्हा पुन्हा भोगत राहतो. (५५)

**असो चहूं देहावेगळा। जन्मकर्मासी निराळा।**
**सकळ आबाळगोबळा। सबाह्य तू ॥ ५६ ॥**

हे असू दे. हे लक्षात घ्यावे की, आत्मा हा स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चारी देहांहून वेगळा, भिन्न आहे. जन्ममरण व कुठलेही कर्म याचा त्याला स्पर्शही होऊ शकत नाही. (हे सर्व देहाशी संबंधित असते.) या आब्रह्मस्तंबपर्यंतच्या सर्व विश्वप्रपंचाला तू आत्मरूपाने सबाह्य व्यापलेले आहेस. (५६)

**कोणासीच नाहीं बंधन। भ्रांतिस्तव भुल्ले जन।**
**दृढ घेतला देहाभिमान। म्हणौनियां ॥ ५७॥**

वास्तविक पाहता येथे कुठल्याच जीवाला बंधन नाही. देहाभिमानामुळे म्हणजे मी देहच आहे अशी दृढ समजूत करून घेतल्यामुळे व स्वस्वरूपाचा विसर पडल्याने, त्यांना आपण बंधनात आहोत अशी भ्रांती झाली आहे व त्यामुळे सर्व लोक भुलले आहेत. (५७)

**शिष्या येकांतीं बैसावें। स्वरूपीं विश्रांतीस जावें।**
**तेणें गुणें दृढावे। परमार्थ हा ॥ ५८॥**

हे शिष्या, सांगतो ते ऐक. नित्यनियमाने एकांतात बसून स्वस्वरूपाचे चिंतन करीत जावे. त्यायोगे स्वस्वरूपानुभव येऊन स्वस्वरूपाच्या ठिकाणीच तुला विश्रांती, समाधान मिळेल. असे केल्यानेच परमार्थ म्हणजे आत्मज्ञान दृढ होईल. (५८)

**अखंड घडे श्रवण मनन। तरीच पाविजे समाधान।**
**पूर्ण जालियां ब्रह्मज्ञान। वैराग्य भरे आंगीं॥ ५९॥**

अखंड श्रवण, मनन घडले तरच पूर्ण समाधान प्राप्त होते. अशा रीतीने पूर्ण ब्रह्मज्ञान झाले की, अंगी तीव्र वैराग्य संचारते. (५९)

**शिष्या मुक्तपणें अनर्गळ। करिसी इंद्रियें बाष्कळ।**
**तेणें तुझी तळमळ। जाणार नाहीं ॥ ६०॥**

शिष्या, तू जर स्वच्छंदपणे इंद्रियांना मोकळे सोडलेस, मोकाट सोडलेस, तर ती उच्छृंखल होतील व मग तुझ्या मनातील तळमळही जाणार नाही. (६०)

**विषईं वैराग्य उपजलें। तयासीच पूर्ण ज्ञान जालें।**
**मणी टाकितांचि लाधलें। राज्य जेवीं ॥ ६१॥**

ज्याला विषयांच्या ठिकाणी तीव्र वैराग्य उपजते, त्यालाच पूर्ण ज्ञान झाले असे समजावे. जसे राजाने प्रथम मण्याच्या लोभाने राज्याचा त्याग केला, पण मणी कवडीमोलाचा आहे हे कळताच त्याने तो त्याच्या पूर्वीच्या मालकास देऊन टाकला व त्यामुळे त्याला स्वत:चे राज्य परत मिळाले. (६१)

**मणी होता सीगटाचा। लोभ धरूनिया तयाचा।**
**मूर्खपणें राज्याचा। अव्हेर केला ॥ ६२॥**

तो मणी क्षुद्र शिंगाचा होता, पण राजाने त्याचा लोभ धरून मूर्खपणाने राज्याचा अव्हेर केला होता. (६२)

**ऐक शिष्या सावधान। आतां भविष्य मी सांगेन।**
**जया पुरुषास जें ध्यान। तयासि तेंचि प्राप्त॥ ६३॥**

असो. हे शिष्या, मी तुला एक निश्चित भविष्य सांगतो ते तू लक्ष देऊन ऐक. ज्या पुरुषाला ज्या गोष्टीचे ध्यान लागलेले असते, त्याला तीच गोष्ट प्राप्त होते. (६३)

**म्हणोनी जे अविद्या-। सांडून, धरावी सुविद्या।**
**तेणें गुणें जगद्वंद्या। पाविजे सीघ्र ॥ ६४॥**

म्हणून माणसाने अविद्येचा त्याग करून सुविद्या दृढ धरावी म्हणजे त्यायोगे त्याला आत्मज्ञान व शाश्वत समाधान प्राप्त होऊन तो लवकरच जगद्वंद्य होतो. (६४)

**सन्यपाताचेनि दु:खें। भयानक दृष्टीस देखे।**
**औषध घेतांचि सुखें। आनंद पावे ॥ ६५॥**

ज्याप्रमाणे एखाद्या माणसाला सन्निपात झाला की भ्रम होऊन भयानक दृश्ये दिसू लागतात व तो दु:खी होतो, पण त्याने सन्निपातावर औषध घेतले की रोग बरा होऊन त्याला सुख होते व आनंद मिळतो. (६५)

**तैसें अज्ञानसन्यपातें। मिथ्या दृष्टीस दिसतें।**
**ज्ञानऔषध घेतां तें। मुळींच नाहीं ॥ ६६॥**

त्याप्रमाणेच अज्ञानरूपी सन्निपातामुळे मिथ्या दृश्य दृष्टीस दिसू लागते. यावर आत्मज्ञानरूपी औषध घेताच त्याचा भ्रम नाहीसा होऊन एका आत्मरूपाशिवाय दुसरे मुळी काही नाहीच, हे त्याला कळून येते. (६६)

**मिथ्या स्वप्ने वोसणाला। तो जागृतीस आणिला।**
**तेणें पूर्वदशा पावला। निर्भय जे ॥ ६७॥**

मिथ्या स्वप्नाने जो भिऊन ओरडतो, त्याला जागे केले की, त्याचे भय जाऊन पूर्वीची निर्भय स्थिती त्याला प्राप्त होते. (६७)

मिथ्याच परी सत्य वाटलें। तेणें गुणें दुःख जालें।
मिथ्या आणी निरसलें। हें तों घडेना ॥६८॥

स्वप्न मिथ्या असून स्वप्नावस्थेत ते खरे वाटले, त्यामुळे त्याला दुःख झाले. जे मिथ्या आहे म्हणजे अस्तित्वातच नाही, त्याचे निरसनही होणे शक्य नसते. (६८)

मिथ्या आहे जागृतासी। परी वेढा लाविलें निद्रिस्तांसी।
जागा जालियां तयासी। भयेंचि नाहीं ॥६९॥

जो जागा झालेला असतो त्याला ते मिथ्या आहे हे कळते, पण जो झोपलेला असतो त्याला ते खरे भासून भुलविते. झोपलेला जागा झाला की, त्याचेही भय नाहीसे होते. (६९)

परी अविद्याझोंप येत भरें। भरे सर्वांगीं काविरें।
पूर्ण जागृती श्रवणद्वारें। मननें करावी ॥७०॥

पण अविद्यारूपी झोप जबरीने येते आणि त्या वेळी वाईट स्वप्ने पडून तो जीव भयभीत होऊन त्याच्या सर्वांगाला कंप सुटतो. या अविद्यारूपी निद्रेतून पूर्ण जागृती येण्याकरिता सतत श्रवण-मननाची आवश्यकता आहे. (७०)

जागृतीची वोळखण। ऐक तयाचें लक्षण।
जो विषईं विरक्त पूर्ण। अंतरापासुनी ॥७१॥

या जागृतीची ओळख पटावी म्हणून एक लक्षण सांगतो, ते नीट ऐक. जो अंतःकरणापासून विषयांविषयी पूर्ण विरक्त होतो, तो जागा झाला असे जाणावे. (७१)

जेणें विरक्तीस न यावें। तो साधक ऐसें जाणावें।
तेणें साधन करावें। थोरीव सांडुनी ॥७२॥

जो पूर्ण विरक्त झाला नसेल, तो साधक आहे असे जाणावे. त्याने आपला मोठेपणा सोडून साधन करीत राहावे. (७२)

साधन न मने जयाला। तो सिद्धपणें बद्ध जाला।
त्याहूनि मुमुक्षु भला। ज्ञानाधिकारी ॥७३॥

ज्याला साधन करणे आवडत नाही, तो 'मी सिद्धच आहे, मला साधनाची काय आवश्यकता आहे' या घमेंडीत असतो. त्याच्यापेक्षा ज्ञानाचा अधिकारी असलेला मुमुक्षू बरा. (७३)

तंव शिष्यें केला प्रश्न। कैसें बद्धमुमुक्षाचें लक्षण।
साधक सिद्ध वोळखण। कैसी जाणावी ॥७४॥

हे सद्गुरूंचे बोलणे ऐकून शिष्याने प्रश्न केला की, बद्धाचे व मुमुक्षूचे लक्षण कोणते? कोण साधक व कोण सिद्ध हे कसे ओळखावे, ते आपण सांगा. (७४)

याचें उत्तर श्रोतयांसी। दिधलें पुढिलिये समासी।
सावध श्रोतीं कथेसी। अवधान द्यावें ॥७५॥

श्रीसमर्थ म्हणतात की, श्रोत्यांना याची उत्तरे पुढल्या समासातून मिळतील. त्यांनी सावध होऊन कथेकडे लक्ष द्यावे. (७५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'शुद्धज्ञाननाम' समास सहावा समाप्त.

❑❑

## दशक ५ : समास ७

## बद्धलक्षण

॥ श्रीराम ॥

सृष्टी जे का चराचर। जीव दाटले अपार।
परी ते अवघे चत्वार। बोलिजेती ॥१॥

श्रीसमर्थ म्हणतात की, ही जी चराचर सृष्टी आहे, त्यात अपार जीवांची गर्दी झालेली आहे. यातील मनुष्यांचे चार प्रकारांत वर्गीकरण केले आहे. (१)

ऐक तयांचें लक्षण। चत्वार ते कोण कोण।
बद्ध मुमुक्ष साधक जाण। चौथा सिद्ध ॥२॥

ते चार प्रकार कोणते, त्यांची लक्षणे काय ते तू ऐक. बद्ध, मुमुक्षू, साधक आणि सिद्ध हे चार प्रकार तू जाणून घे. (२)

या चौघांविरहित कांहीं। सचराचरीं पांचवा नाहीं।
आतां असो हें सर्वही। विशद करूं ॥ ३ ॥

सर्व चराचर सृष्टीत या चार प्रकारांहून पाचवा प्रकार नाही. असो. आता या सर्व प्रकारांचे वर्णन करू या. (३)

बद्ध म्हणिजे तो कोण। कैसें मुमुक्षाचें लक्षण।
साधक सिद्ध वोळखण। कैसी जाणावी ॥ ४ ॥

बद्ध म्हणजे कोण, मुमुक्षूचे लक्षण काय, साधक कोण व सिद्ध कोण, हे कसे ओळखावे ते ऐक. (४)

श्रोतीं व्हावें सावध। प्रस्तुत ऐका बद्ध।
मुमुक्ष साधक आणि सिद्ध। पुढें निरोपिलें ॥ ५ ॥

श्रोत्यांनी सावध व्हावे. येथे प्रथम बद्ध कोणते सांगून नंतर पुढे मुमुक्षू, साधक व सिद्ध यांचे वर्णन केले जाईल. (५)

आतां बद्ध तो जाणिजे ऐसा। अंधारींचा अंध जैसा।
चक्षुविण दाही दिशा। सुन्याकार ॥ ६ ॥

आता बद्ध कसा असतो ते ऐका. अंधारात चाचपडणाऱ्या आंधळ्या माणसासारखी बद्धाची अवस्था असते. तो अज्ञानरूपी अंधारात चाचपडत असतो. आंधळ्या माणसाला डोळे नसल्याने दहाही दिशा जसा शून्याकार भासतात, तशी बद्ध माणसाची स्थिती असते. (६)

भक्त ज्ञाते तापसी। योगी वीतरागी संन्यासी।
पुढें देखतां दृष्टीसी। येणार नाहीं ॥ ७ ॥

भक्त, ज्ञानी, तापसी, योगी, विरक्त व संन्यासी त्याच्यासमोर आले तरी त्याला ते दिसत नाहीत, म्हणजे तो त्यांना जाणू शकत नाही. (७)

न दिसे नेणे कर्माकर्म। न दिसे नेणे धर्माधर्म।
न दिसे नेणे सुगम। परमार्थपंथ ॥ ८ ॥

चांगले कर्म, वाईट कर्म, धर्म व अधर्म इत्यादी जणू काय त्याला दिसतच नाहीत, त्याप्रमाणे सोपा असा परमार्थ मार्ग तोही त्याला दिसत नाही. (८)

तयास न दिसे सच्छास्त्र। सत्संगति सत्पात्र।
सन्मार्ग जो कां पवित्र। तोही न दिसे ॥ ९ ॥

त्याला खरे शास्त्र, सत्संगती, सत्पात्र किंवा अत्यंत पवित्र असा सन्मार्ग यांपैकी काहीच दिसत नाही. (९)

न कळे सारासार विचार। न कळे स्वधर्म आचार।
न कळे कैसा परोपकार। दान पुण्य ॥ १० ॥

सारासारविचार म्हणजे काय, स्वधर्म म्हणजे काय, त्याचा आचार कसा असतो, परोपकार कसा करावा, दान कसे द्यावे, पुण्य कसे संपादन करावे वगैरे तो काहीच जाणत नाही. (१०)

नाहीं पोटीं भूतदया। नाहीं सुचिष्मंत काया।
नाहीं जनासि निववावया। वचन मृद ॥ ११ ॥

त्याच्या अंत:करणात भूतदया नसते, त्याचा देह पवित्र, स्वच्छ नसतो किंवा लोकांशी मृदू भाषण करून त्यांना निवविणेही त्याला जमत नाही. (११)

न कळे भक्ति न कळे ज्ञान।
न कळे वैराग्य न कळे ध्यान।
न कळे मोक्ष न कळे साधन। या नांव बद्ध ॥ १२ ॥

ज्याला भक्ती, ज्ञान, वैराग्य, ध्यान, मोक्ष किंवा साधन यांतील काहीच कळत नाही, त्याला बद्ध म्हणावे. (१२)

न कळे देव निश्चयात्मक। न कळे संतांचा विवेक।
न कळे मायेचें कौतुक। या नांव बद्ध ॥ १३ ॥

ज्याला देवासंबंधी निश्चयात्मक ज्ञान नसते, संतांचा विवेक किंवा मायेचे कौतुक याबद्दल काहीच माहीत नसते, त्याला बद्ध म्हणावे. (१३)

न कळे परमार्थाची खूण। न कळे अध्यात्मनिरूपण।
न कळे आपणासि आपण। या नांव बद्ध ॥ १४ ॥

ज्याला परमार्थाची खूण, किंवा अध्यात्मनिरूपण याचा गंधही नसतो, जो स्वत:सही जाणत नाही, त्यास बद्ध म्हणावे. (१४)

न कळे जीवाचें जन्ममूळ। न कळे साधनाचें फळ।
न कळे तत्वतां केवळ। या नांव बद्ध ॥ १५ ॥

जीवाचे जन्ममूळ कोणते, साधनाचे फळ काय हे ज्याला कळत नाही, (१५)

न कळे कैसें तें बंधन। न कळे मुक्तीचें लक्षण।
न कळे वस्तु विलक्षण। या नांव बद्ध ॥ १६ ॥

बंधन कसे असते, मुक्तीचे लक्षण कोणते, आत्मवस्तू कशी विलक्षण आहे, हे ज्याला कळत नाही, तो बद्ध. (१६)

न कळे शास्त्रार्थ बोलिला। न कळे निजस्वार्थ आपुला।
न कळे संकल्पें बांधला। या नाव बद्ध ॥ १७ ॥

शास्त्रार्थाचे श्रवण केले तरी तो ज्याला कळत नाही, ज्याला स्वत:चा स्वार्थ कोणता हे कळत नाही, अथवा संकल्पाने जीव कसा बद्ध होतो, हे कळत नाही, तो बद्ध जाणावा. (१७)

**जयासि नाहीं आत्मज्ञान। हें मुख्य बद्धाचें लक्षण।**
**तीर्थ व्रत दान पुण्य। कांहींच नाहीं ॥ १८॥**

बद्धाचे मुख्य लक्षण म्हणजे त्याला आत्मज्ञान नसते. याखेरीज तीर्थ, व्रत, दान, पुण्य इत्यादी काहीच त्याला माहीत नसते. (१८)

**दया नाहीं करुणा नाहीं। आर्जव नाहीं मित्रि नाहीं।**
**शांति नाहीं क्षमा नाहीं। या नांव बद्ध ॥ १९॥**

त्याच्या ठिकाणी दया, करुणा, आर्जव, मैत्री, शांती, क्षमा इत्यादींचा अभाव असतो. (१९)

**जे ज्ञानविशिं उणें। तेथें कैचीं ज्ञानाचीं लक्षणें।**
**बहुसाल कुलक्षणें। या नांव बद्ध ॥ २०॥**

ज्याला आत्मज्ञान नसते, त्याच्याजवळ ज्ञानाची लक्षणे कशी असणार? ज्याच्या अंगी अनेक कुलक्षणे असतात, तो बद्ध जाणावा. (२०)

**नाना प्रकारीचे दोष। करितां वाटे परम संतोष।**
**बाष्कळपणाचा हव्यास। या नांव बद्ध ॥ २१॥**

नाना प्रकारचे दोष करण्यातच ज्याला संतोष वाटतो व बाष्कळपणाची ज्याला हौस असते, तो बद्ध जाणावा.(२१)

**बहु काम बहु क्रोध। बहु गर्व बहु मद।**
**बहु द्वंद बहु खेद। या नांव बद्ध ॥ २२॥**

अति काम, अति क्रोध, अति गर्व, अति मद, अति भांडखोरपणा, अति खेद, (२२)

**बहु दर्प बहु दंभ। बहु विषये बहु लोभ।**
**बहु कर्कश बहु अशुभ। या नांव बद्ध ॥ २३॥**

अत्यंत दर्प, खूप दंभ, अति विषयासक्ती, अति लोभ, अत्यंत कर्कशपणा, अति अशुभ वृत्ती या सर्व अवगुणांनी जो युक्त असतो, तो बद्ध असतो. (२३)

**बहु ग्रामणी बहु मत्सर। बहु असूया तिरस्कार।**
**बहु पापी बहु विकार। या नांव बद्ध ॥ २४॥**

ज्याच्या ठिकाणी अति गावगुंडपणा असतो, जो अति मत्सरी असतो, लोकांचा अत्यंत तिरस्कार करतो, अशा अत्यंत पापी, अति विकारी माणसाला बद्ध म्हणावे.(२४)

**बहु अभिमान बहु ताठा। बहु अहंकार बहु फांटा।**
**बहु कुकर्माचा सांठा। या नांव बद्ध ॥ २५॥**

अत्यंत अभिमान, अति गर्व, अति अहंकार व अत्यंत वटवट व कुकर्मांचा मोठा साठा ज्याच्याजवळ असेल, तो बद्ध जाणावा. (२५)

**बहु कापट्य वादवेवाद। बहु कुतर्क भेदाभेद।**
**बहु क्रूर कृपामंद। या नांव बद्ध ॥ २६॥**

जो अत्यंत कपटी, वादविवाद करणारा, फार कुतर्क करणारा, भेदाभेद करणारा, अत्यंत क्रूर व कृपाशून्य असतो तो बद्ध असतो. (२६)

**बहु निंदा बहु द्वेष। बहु अधर्म बहु अभिळाष।**
**बहु प्रकारीचे दोष। या नांव बद्ध ॥ २७॥**

जो खूप निंदा, द्वेष करतो, अत्यंत अधर्मी आणि अभिलाषी असून ज्याच्यापाशी नाना प्रकारचे दोष असतात, तो बद्ध जाणावा. (२७)

**बहु भ्रष्ट अनाचार। बहु नष्ट येकंकार।**
**बहु आनित्य अविचार। या नांव बद्ध ॥ २८॥**

जो अतिभ्रष्ट, अनाचारी, नष्ट, सर्व गोलंकार समजणारा, अत्यंत अनीतिमान, अविचारी असतो, तो बद्ध.(२८)

**बहु निष्ठुर बहु घातकी। बहु हत्यारा बहु पातकी।**
**तपीळ कुविद्या अनेकी। या नांव बद्ध ॥ २९॥**

अत्यंत निष्ठुर, घातकी, हत्यारा, पातकी, तापट व ज्याच्याजवळ अनेक कुविद्या असतात, तो बद्ध जाणावा. (२९)

**बहु दुराशा बहु स्वार्थी। बहु कळह बहु अनर्थी।**
**बहु डाईक दुर्मती। या नांव बद्ध ॥ ३०॥**

अत्यंत दुराशा, स्वार्थीपणा, भांडखोरपणा, अनर्थ करण्याचा स्वभाव, दावेदारी, दुर्मती या अवगुणांनी युक्त असतो तो बद्ध समजावा. (३०)

**बहु कल्पना बहु कामना। बहु तृष्णा बहु वासना।**
**बहु ममता बहु भावना। या नांव बद्ध ॥ ३१॥**

कल्पना, कामना, तृष्णा, वासना, ममता व भावना यांचा अतिरेक ज्याच्यापाशी असतो तो बद्ध. (३१)

**बहु विकल्पी बहु विषादी। बहु मूर्ख बहु समंधी।**
**बहु प्रपंची बहु उपाधी। या नांव बद्ध ॥ ३२॥**

जो अत्यंत विकल्पी, विषादी, मूर्ख, नातलगांचा हव्यास असणारा, प्रपंचात रत असणारा, ज्याला अनेक उपाधी लावून घेण्याची हौस असते तो बद्ध होय. (३२)

बहु वाचाळ बहु पाषांडी। बहु दुर्जन बहु थोतांडी।
बहु पैशून्य बहु खोडी। या नांव बद्ध ॥ ३३॥

अति वाचाळ, पाखंडी, दुर्जन, थोतांड करणारा, निंदा, चहाडी, खोडसाळपणा करणारा असेल तो बद्ध जाणावा. (३३)

बहु अभाव बहु भ्रम। बहु भ्रांति बहु तम।
बहु विक्षेप बहु विराम। या नांव बद्ध ॥ ३४॥

नास्तिक्य, भ्रम, भ्रांती, तमोगुण, व्याप, पसाऱ्याची आवड, आळसाची अति आवड ज्याला असेल, तो बद्ध होय. (३४)

बहु कृपण बहु खंदस्ती। बहु आदखणा बहु मस्ती।
बहु असत्क्रिया व्यस्ती। या नांव बद्ध ॥ ३५॥

अति कृपण, अत्यंत दांडगा, अत्यंत मत्सरी, ज्याला अति मस्ती आहे व जो शास्त्रविरुद्ध असत् कर्मे करतो तो बद्ध समजावा. (३५)

परमार्थविषईं अज्ञान। प्रपंचाचें उदंड ज्ञान।
नेणे स्वयें समाधान। या नांव बद्ध ॥ ३६॥

ज्याला परमार्थाविषयी अज्ञान असते पण प्रपंचाचे उदंड ज्ञान असते व जो असमाधानी असतो, तो बद्ध होय. (३६)

परमार्थाचा अनादर। प्रपंचाचा अत्यादर।
संसारभार जोजार। या नांव बद्ध ॥ ३७॥

ज्याला परमार्थाविषयी अनादर असतो आणि प्रपंचाविषयी अत्यंत आदर असतो, जो संसाराचा भार वाहता वाहता बेजार झालेला असतो, तो बद्ध असतो. (३७)

सत्संगाची नाहीं गोडी। संतनिंदेची आवडी।
देहेबुद्धीची घातली बेडी। या नांव बद्ध ॥ ३८॥

सत्संगाची ज्याला गोडी नसते, संतांची निंदा करणे आवडते व देहबुद्धीच्या बेडीने जो जखडलेला असतो, तो बद्ध होय. (३८)

हातीं द्रव्याची जपमाळ। कांताध्यान सर्वकाळ।
सत्संगाचा दुष्काळ। या नांव बद्ध ॥ ३९॥

ज्याच्या हातात द्रव्याची जपमाळ असते, जो बायकोचे सर्वकाळ ध्यान करीत असतो व ज्याच्याजवळ सत्संगाचा दुष्काळ असतो, तो बद्ध जाणावा. (३९)

नेत्रीं द्रव्य दारा पहावी। श्रवणीं द्रव्य दारा ऐकावी।
चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी। या नांव बद्ध ॥ ४०॥

डोळ्यांनी द्रव्यदारा पाहावी, श्रवणाने त्यांच्याविषयी ऐकावे, द्रव्यदारेचेच चिंतन करावे ही बद्धाची लक्षणे आहेत. (४०)

काया वाचा आणि मन। चित्त वित्त जीव प्राण।
द्रव्यदारेचें करी भजन। या नांव बद्ध ॥ ४१॥

काया, वाचा, मन, चित्त, वित्त, जीव, प्राण यांनी जो द्रव्य आणि दारा यांचेच भजन करतो तो बद्ध. (४१)

इन्द्रियें करून निश्चळ। चंचळ होऊं नेदी पळ।
द्रव्यदारेसि लावी सकळ। या नांव बद्ध ॥ ४२॥

इंद्रिये एकाग्र करून त्यांना जराही इकडेतिकडे न जाऊ देता त्यांना जो द्रव्य व दारेकडेच लावतो, तो बद्ध होय. (४२)

द्रव्य दारा तेंचि तीर्थ। द्रव्य दारा तोचि परमार्थ।
द्रव्य दारा सकळ स्वार्थ। म्हणे तो बद्ध ॥ ४३॥

द्रव्य-दारा हेच ज्याचे तीर्थ असते, तोच ज्याचा परमार्थ व सर्व स्वार्थही असतो, त्याला बद्ध म्हणावे. (४३)

वेर्थ जाऊं नेदी काळ। संसारचिंता सर्वकाळ।
कथा वार्ता तेंचि सकळ। या नांव बद्ध ॥ ४४॥

जो आपला सर्व वेळ संसारचिंता करण्यात घालवतो, दुसऱ्या गोष्टीत वेळ गेला तर व्यर्थ गेला, असे ज्याला वाटते व जो सर्वकाळ प्रपंचाच्या कथा करीत असतो, तो बद्ध जाणावा. (४४)

नाना चिंता नाना उद्वेग। नाना दुःखाचे संसर्ग।
करी परमार्थाचा त्याग। या नांव बद्ध ॥ ४५॥

नाना चिंता, नाना उद्वेग, नाना दुःखाचे प्रसंग यांनी बेजार झाल्याने जो परमार्थाचा त्याग करतो, तो बद्ध होय. (४५)

घटिका पळ निमिष्यभरी। दुश्चीत नव्हतां अंतरीं।
सर्वकाळ ध्यान करी। द्रव्यदाराप्रपंचाचें ॥ ४६॥

जो घटिका, पळ, इतकेच नव्हे, तर निमिषभरही दुश्चित्त न होता अंतरात सर्वकाळ द्रव्यदारा व प्रपंच यांचे ध्यान करीत असतो, तो बद्ध होय. (४६)

तीर्थ यात्रा दान पुण्य। भक्ति कथा निरूपण।
मंत्र पूजा जप ध्यान। सर्वही द्रव्यदारा ॥ ४७॥

ज्याच्या दृष्टीने तीर्थ, यात्रा, दान, पुण्य, भक्ती, कथा, निरूपण, मंत्र, पूजा, जप, ध्यान सर्व काही द्रव्य-दाराच असते तो बद्ध. (४७)

जागृति स्वप्न रात्रि दिवस। ऐसा लागला विषयेध्यास।
नाहीं क्षणाचा अवकाश। या नांव बद्ध ॥ ४८॥

ज्याला जागृतावस्था, स्वप्नावस्था यांतही रात्रंदिवस विषयांचा ध्यास लागलेला असतो, ज्याला दुसऱ्या गोष्टीस क्षणाचाही अवसर नसतो तो बद्ध होय. (४८)

ऐसें बद्धाचें लक्षण। मुमुक्षपणीं पालटे जाण।
ऐक तेही वोळखण। पुढिलीये समासीं ॥ ४९॥

याप्रमाणे बद्धाची जी लक्षणे सांगितली आहेत ती मुमुक्षुत्व प्राप्त झाल्यावर पालटतात. त्यांची ओळख पुढल्या समासात ऐकावे, असे श्रीसमर्थ म्हणतात. (४९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'बद्धलक्षणनाम' समास सातवा समाप्त.**

❑❑

### दशक ५ : समास ८

## मुमुक्षुलक्षण

॥ श्रीराम ॥

संसारमदाचेनि गुणें। नाना हीनें कुलक्षणें।
जयाचेनि मुखावलोकनें। दोषचि लागे ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, जो संसाराच्या मदाने उन्मत्त होतो, त्याच्या ठिकाणी अनेक हीन कुलक्षणे उत्पन्न होतात, अशाचे मुखावलोकन केले तरी दोष लागतो. (१)

ऐसा प्राणी जो कां बद्ध। संसारीं वर्ततां अबद्ध।
तयास प्राप्त जाला खेद। काळांतरीं ॥ २॥

असा जो बद्ध प्राणी संसारात अति अनियमितपणे वागत असतो, त्याला कालांतराने दु:ख प्राप्त होते. (२)

संसारदु:खें दुखवला। त्रिविधतापें पोळला।
निरूपणें प्रस्तावला। अंतर्यामीं ॥ ३॥

असा संसाराच्या दु:खामुळे जो दुखावला जातो, त्रिविध तापाने जो पोळतो, त्याने संतांच्या मुखाने अध्यात्म-निरूपण ऐकले की, त्याला पश्चात्ताप वाटू लागतो. (३)

जाला प्रपंचीं उदास। मनें घेतला विषयत्रास।
म्हणे आतां पुरे सोस। संसारींचा ॥ ४॥

मग तो प्रपंचाविषयी उदास होतो, त्याच्या मनाला सर्व विषयोपभोग नकोसे वाटू लागतात व तो मनाशी म्हणू लागतो की आता या संसाराचा हव्यास पुरे झाला. (४)

प्रपंच जाईल सकळ। येथील श्रम तों निर्फळ।
आतां कांहीं आपुला काळ। सार्थक करूं ॥ ५॥

हा सर्व प्रपंच नष्ट होणार आहे. यासाठी जे श्रम केले ते व्यर्थ गेले आहेत. आता आपल्या आयुष्यातील उरलेला काळ तरी सार्थकी लावू या. (५)

ऐसी बुद्धि प्रस्तावली। पोटीं आवस्ता लागली।
म्हणे माझी वयेसा गेली। वेर्थचि आवघी ॥ ६॥

असा त्याला बुद्धिपूर्वक पश्चात्ताप होतो. त्यामुळे त्याच्या मनाला तळमळ लागते. तो म्हणू लागतो की, आतापर्यंतचे माझे आयुष्य सर्व व्यर्थच गेले! (६)

पूर्वी नाना दोष केले। ते अवघेचि आठवले।
पुढें येऊनि उभे ठेले। अंतर्यामीं ॥ ७॥

पूर्वी त्याने जी अनेक दुष्कर्मे केली, ती त्याला आठवू लागतात व त्याच्या मनापुढे उभी राहतात. (७)

आठवे येमाची यातना। तेणें भयेचि वाटे मना।
नाहीं पापासि गणना। म्हणौनियां ॥ ८॥

त्याला यमयातनांचे स्मरण होते आणि आपल्या अगणित पापांमुळे त्याच्या मनात भय उत्पन्न होते. आता तो असा विचार करू लागतो. (८)

नाहीं पुण्याचा विचार। जाले पापाचे डोंगर।
आतां दुस्तर हा संसार। कैसा तरों ॥ ९॥

आतापर्यंत आपण पुण्याचा विचारच केला नाही. आपल्या हातून डोंगरासारखी पातके झाली आहेत. आता हा दुस्तर असा संसार कशा रीतीने तरून जाता येईल? (९)

आपले दोष आछ्यादिले। भल्यास गुणदोष लाविले।
देवा म्यां वेर्थचि निंदिले। संत साधु सज्जन॥ १०॥

मी स्वत:चे दोष लपवले आणि चांगल्या माणसांवर वृथा दोषारोप केले. देवा, मी संत, साधू, सज्जन यांची अकारणच निंदा केली. (१०)

निंदेऐसे नाहीं दोष। ते मज घडले कीं विशेष।
माझे अवगुणीं आकाश। बुडों पाहे ॥ ११ ॥

निंदेसारखे पाप नाही. ते पाप माझ्याकडून विशेषत्वे घडले आहे. माझे अवगुण, दोष इतके आहेत की, त्यात आकाशही बुडून जाईल. (११)

नाहीं वोळखिले संत। नाहीं अर्चिला भगवंत।
नाहीं अतित अभ्यागत। संतुष्ट केले ॥ १२ ॥

मी संतांना ओळखले नाही, भगवंताची कधी पूजाअर्चा केली नाही की अतिथी–अभ्यागतांना कधी संतुष्ट केले नाही. (१२)

पूर्व पाप वोढवलें। मज कांहींच नाहीं घडलें।
मन अव्हाटीं पडिलें। सर्वकाळ ॥ १३ ॥

पूर्वपापामुळे यातील काहीच माझ्या हातून घडले नाही. माझे मन सदा कुमार्गाकडेच प्रवृत्त झाले. (१३)

नाहीं कष्टविलें शेरीर। नाहीं केला परोपकार।
नाहीं रक्षिला आचार। काममदें ॥ १४ ॥

सत्कर्मासाठी मी कधी शरीर झिजविले नाही, कधी परोपकार केला नाही. काममदामुळे कधी सदाचाराने वागलो नाही. (१४)

भक्तिमाता हे बुडविली। शांति विश्रांति मोडिली।
मूर्खपणें म्यां विघडिली। सद्बुद्धी सद्वासना ॥ १५ ॥

भक्तिरूपी माउलीला मी बुडविले, शांतीचे समाधान नष्ट केले, मूर्खपणाने मी सद्बुद्धी आणि सद्वासना यांना असमर्थ करून टाकले. (१५)

आतां कैसें घडे सार्थक। दोष केले निरार्थक।
पाहों जातां विवेक। उरला नाहीं ॥ १६ ॥

आतापर्यंत मी निरर्थक पापच करीत आलो. आता या आयुष्याचे सार्थक कसे होईल ? तसे पाहिले तर माझ्यापाशी आता विवेकच उरलेला नाही. (१६)

कोण उपाये करावा। कैसा परलोक पावावा।
कोण्या गुणें देवाधिदेवा। पाविजेल ॥ १७ ॥

आता काय उपाय करावा ? परमार्थाची प्राप्ती करून परलोक कसा मिळवावा ? काय केले असता मला देवाधिदेवाची प्राप्ती होईल ? (१७)

नाहीं सद्भाव उपजला। अवघा लोकिक संपादिला।
दंभ वरपंगें केला। खटाटोप कर्मांचा ॥ १८ ॥

भगवंताविषयी सद्भाव माझ्या मनात कधी उत्पन्नच झाला नाही. लौकिक संपादण्यातच सर्व आयुष्य खर्ची पडले. जो कर्माचा खटाटोप केला तो सर्व वरवर देखावा केला. तो दंभ होता. (१८)

कीर्तन केलें पोटासाठीं। देव मांडिले हाटवटीं।
आहा देवा बुद्धि खोटी। माझी मीच जाणें ॥ १९ ॥

देवांचा बाजार मांडला आणि पोटासाठी कीर्तन केले. देवा ! माझी बुद्धी किती खोटी आहे, हे फक्त माझे मीच जाणतो. (१९)

पोटीं धरूनि अभिमान। शब्दीं बोलें निराभिमान।
अंतरीं वांछूनियां धन। ध्यानस्त जाले ॥ २० ॥

अंत:करणात अभिमान धरून बाहेर लोकात मात्र निरभिमानाच्या गप्पा करीत राहिलो. मनात द्रव्याची इच्छा धरून बाहेर मात्र ध्यानस्थ असल्याचे नाटक केले. (२०)

वित्पत्तीनें लोक भोंदिले। पोटासाठीं संत निंदिले।
माझे पोटीं दोष भरले। नाना प्रकारीचें ॥ २१ ॥

विद्वत्तेने लोकांना फसविले, पोटासाठी संतांची निंदा केली. या प्रकारे माझ्या ठिकाणी नाना प्रकारचे दोष भरलेले आहेत. (२१)

सत्य तेंचि उछेदिलें। मिथ्य तेंचि प्रतिपादिलें।
ऐसें नाना कर्म केलें। उदरंभराकारणें ॥ २२ ॥

सत्याचा उच्छेद केला, खोट्याचे प्रतिपादन केले. अशी नाना (कु) कर्मे केवळ पोट भरण्यासाठी केली. (२२)

ऐसा पोटीं प्रस्तावला। निरूपणें पालटला।
तोचि मुमुक्ष बोलिला। ग्रन्थांतरीं ॥ २३ ॥

असा ज्याला मनापासून खराखरा पश्चात्ताप होतो व संतांचा उपदेश ऐकून ज्याच्या आचरणात, आचार–विचारांत बदल घडून येतो, त्याला ग्रंथांत मुमुक्षू असे संबोधले जाते. (२३)

पुण्यमार्ग पोटीं धरी। सत्संगाची वांछा करी।
विरक्त जाला संसारीं। या नांव मुमुक्ष ॥ २४ ॥

मनापासून जो पुण्यमार्गाची आवड धरतो, सत्संगाची इच्छा करतो आणि संसारात विरक्त होतो, त्याला मुमुक्षू म्हणतात. (२४)

**गेले राजे चक्रवर्ती। माझें वैभव तें किती।**
**म्हणे धरूं सत्संगती। या नांव मुमुक्ष ॥२५॥**

आतापर्यंत कितीतरी राजे-महाराजे नष्ट झाले, त्यांच्या तुलनेने माझे वैभव ते किती? असा विचार करून सत्संगाची इच्छा धरतो तो मुमुक्षू होय. (२५)

**आपुले अवगुण देखे। विरक्तिबळें वोळखे।**
**आपणासि निंदी दुःखें। या नांव मुमुक्ष ॥२६॥**

विरक्तीच्या बळावर जो आपले अवगुण पाहू लागतो व दुःखाने स्वतःचीच निंदा करू लागतो, त्यास मुमुक्षू म्हणावे. (२६)

**म्हणे मी काये अनोपकारी। म्हणे मी काय दंभधारी।**
**म्हणे मी काये अनाचारी। या नांव मुमुक्ष ॥२७॥**

तो म्हणू लागतो की, मी किती अनुपकारी आहे, मी किती दंभ करणारा आहे, अनाचारी आहे! (२७)

**म्हणे मी पतित चांडाळ। म्हणे मी दुराचारी खळ।**
**म्हणे मी पापी केवळ। या नांव मुमुक्ष ॥२८॥**

मी पतित चांडाळ आहे, दुराचारी खळ, केवळ पापी आहे. (२८)

**म्हणे मी अभक्त दुर्जन। म्हणे मी हीनाहूनि हीन।**
**म्हणे मी जन्मलों पाषाण। या नांव मुमुक्ष ॥२९॥**

मी अभक्त, दुर्जन असून हीनाहून हीन आहे. मी पाषाण जन्मलो आहे. (२९)

**म्हणे मी दुराभिमानी। म्हणे मी तपीळ जनीं।**
**म्हणे मी नाना वेसनी। या नांव मुमुक्ष ॥३०॥**

मी दुरभिमानी आहे, लोकांत मी अत्यंत तापट असून मला नाना व्यसने आहेत. (३०)

**म्हणे मी आळसी आंगचोर। म्हणे मी कपटी कातर।**
**म्हणे मी मूर्ख अविचार। या नांव मुमुक्ष ॥३१॥**

तो म्हणतो की, मी आळशी, अंगचोर म्हणजे कामचुकार आहे. मी कपटी, भ्याड, मूर्ख आणि अविचारी आहे. (३१)

**म्हणे मी निकामी वाचाळ। म्हणे मी पाषांडी तोंडाळ।**
**म्हणे मी कुबुद्धि कुटिळ। या नांव मुमुक्ष ॥३२॥**

तो म्हणतो, मी कुचकामाचा, वाचाळ, पाखंडी आणि तोंडाळ, कुबुद्धी, कुटील असा आहे. (३२)

**म्हणे मी कांहींच नेणे। म्हणे मी सकळहूनि उणें।**
**आपलीं वर्णी कुलक्षणें। या नांव मुमुक्ष ॥३३॥**

मला काहीच कळत नाही, मी सगळ्यांपेक्षा क्षुद्र आहे, याप्रमाणे जो आपली कुलक्षणे वर्णन करतो, तो मुमुक्षू असे जाणावे. (३३)

**म्हणे मी अनाधिकारी। म्हणे मी कुश्चिळ अघोरी।**
**म्हणे मी नीच नानापरी। या नांव मुमुक्ष ॥३४॥**

तो म्हणतो की मी अनधिकारी आहे, कठोर आहे, शीलभ्रष्ट व सर्व प्रकारे मी नीच आहे. (३४)

**म्हणे मी काये आपस्वार्थी। म्हणे मी काये अनर्थी।**
**म्हणे मी नव्हे परमार्थी। या नांव मुमुक्ष ॥३५॥**

मी अत्यंत स्वार्थी आहे, मी अनर्थ करणारा आहे, मी परमार्थी नव्हेच. (३५)

**म्हणे मी अवगुणाची रासी।**
**म्हणे मी वेर्थ आलों जन्मासी।**
**म्हणे मी भार जालों भूमीसी। या नांव मुमुक्ष ॥३६॥**

मी अवगुणांची रास आहे, मी व्यर्थ जन्माला आलो आणि भूमातेस भार झालो. (३६)

**आपणास निंदी सावकास। पोटीं संसाराचा त्रास।**
**धरी सत्संगाचा हव्यास। या नांव मुमुक्ष ॥३७॥**

अशी आपली वारंवार निंदा करतो, त्याला संसार त्रासदायक वाटू लागतो व सत्संगाची गोडी लागल्याने त्याचा हव्यास जो धरतो, तो मुमुक्षू होय. (३७)

**नाना तीर्थें धुंडाळिलीं। शमदमादि साधनें केलीं।**
**नाना ग्रंथांतरें पाहिलीं। शोधूनियां ॥३८॥**

तो मग अनेक तीर्थे धुंडाळतो, शमदमादी नाना साधने करतो, अनेक ग्रंथांचा सखोल अभ्यास करतो. (३८)

**तेणें नव्हे समाधान। वाटे अवघाच अनुमान।**
**म्हणे रिघों संतांस शरण। या नांव मुमुक्ष ॥३९॥**

पण त्याने त्याचे समाधान होत नाही. हे सर्व ज्ञान अनुमानाचे आहे, असे त्याला वाटते व मग तो म्हणतो की, आता संतांना शरण जाऊ या. (३९)

देहाभिमान कुळाभिमान। द्रव्याभिमान नानाभिमान।
सांडूनि संतचरणीं अनन्य। या नांव मुमुक्ष ॥ ४० ॥

मग देहाभिमान, कुळाभिमान, द्रव्याभिमान आदी अनेक प्रकारच्या अभिमानांचा त्याग करून मुमुक्षू संतचरणी अनन्यभावाने शरण जातो. (४०)

अहंता सांडूनि दूरी। आपणास निंदी नानापरी।
मोक्षाची अपेक्षा करी। या नांव मुमुक्ष ॥ ४१ ॥

जो अहंतेचा सर्वस्वी त्याग करतो, स्वत:ची नाना प्रकारे निंदा करतो, आणि मोक्षाची अपेक्षा करतो, त्याला मुमुक्षू म्हणावे. (४१)

ज्याचें थोरपण लाजे। जो परमार्थाकारणें झिजे।
संतापाईं विश्वास उपजे। या नांव मुमुक्ष ॥ ४२ ॥

ज्याला थोरपणाची लाज वाटू लागते, जो परमार्थासाठी देह झिजवतो आणि ज्याचा संतचरणी दृढ विश्वास असतो, तो मुमुक्षू होय. (४२)

स्वार्थ सांडून प्रपंचाचा। हव्यास धरिला परमार्थाचा।
अंकित होईन सज्जनाचा। म्हणे तो मुमुक्ष ॥ ४३ ॥

ज्याने संसाराचा स्वार्थ सोडलेला असतो आणि परमार्थाचा हव्यास धरलेला असतो व जो सज्जनांचा अंकित होण्याची इच्छा करतो, तो मुमुक्षू जाणावा. (४३)

ऐसा मुमुक्ष जाणिजे। संकेतचिन्हें वोळखिजे।
पुढें श्रोतीं अवधान दीजे। साधकलक्षणीं ॥ ४४ ॥

याप्रमाणे या संकेतचिह्नांवरून मुमुक्षूला ओळखावे. आता पुढे साधकाची लक्षणे सांगितली जातील, त्याकडे श्रोत्यांनी लक्ष द्यावे, असे समर्थ सांगतात. (४४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मुमुक्षुलक्षणनाम' समास आठवा समाप्त.**

❑❑

## दशक ५ : समास ९

# साधक लक्षण

॥ श्रीराम ॥

मागां मुमुक्षाचें लक्षण। संकेतें केलें कथन।
आतां परिसा सावधान। साधक तो कैसा ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागील समासात मुमुक्षूची लक्षणे थोडक्यात सांगितली. आता सावध होऊन साधक कसा असतो ते ऐका. (१)

अवगुणाचा करूनि त्याग। जेणें धरिला संतसंग।
तयासि बोलिजे मग। साधक ऐसा ॥ २ ॥

ज्याने अवगुणांचा त्याग करून संतसंग धरलेला असतो, त्याला साधक असे म्हणतात. (२)

जो संतांसि शरण गेला। संतजनीं आश्वासिला।
मग तो साधक बोलिला। ग्रंथांतरीं ॥ ३ ॥

जो संतांना शरण जातो आणि ज्याला संतांनी आपला म्हणून त्याचे हित करण्याचे आश्वासन दिले असेल त्याला साधक म्हणतात. (३)

उपदेशिलें आत्मज्ञान। तुटलें संसारबंधन।
दृढतेकारणें करी साधन। या नांव साधक ॥ ४ ॥

ज्याला संतांनी आत्मज्ञानाचा उपदेश केल्याने ज्याचे संसारबंधन तुटलेले असते व जो आत्मज्ञान दृढ होण्याकरिता साधन करतो, तो साधक होय. (४)

धरी श्रवणाची आवडी। अद्वैतनिरूपणाची गोडी।
मननें अर्थांतर काढी। या नांव साधक ॥ ५ ॥

जो श्रवणाची आवड धरतो, अद्वैतनिरूपणात ज्याला गोडी वाटते व त्यावर मनन करून जो गूढ व खरा अर्थ बरोबर जाणून घेतो तो साधक जाणावा. (५)

होता सारासारविचार। ऐके होऊनि तत्पर।
संदेह छेदूनि दृढोत्तर। आत्मज्ञान पाहे ॥ ६ ॥

संतांच्या समुदायात सारासारविचाराचे विवेचन होत असता जो ते तत्पर होऊन मन:पूर्वक श्रवण करतो व संदेह नाहीसे करून जो दृढ निष्ठेने आत्मज्ञानाकडे वळतो तो साधक होय. (६)

नाना संदेहनिवृत्ती। व्हावया धरी सत्संगती।
आत्मशास्त्रगुरुप्रचीती । ऐक्यतेसि आणी ॥ ७॥

आपल्या मनातील निरनिराळ्या प्रकारच्या संदेहांची निवृत्ती व्हावी, निरसन व्हावे, यासाठी जो संतांची संगती धरतो व शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती व आत्मप्रचीतीच्या ऐक्याचा अनुभव घेतो, तो साधक. (७)

देहबुद्धि विवेकें वारी। आत्मबुद्धि सदृढ धरी।
श्रवण मनन केलेंचि करी। या नांव साधक ॥ ८॥

विवेकाने देहबुद्धीचा त्याग करून जो आत्मबुद्धी सुदृढ होण्यासाठी नेहमी श्रवण-मनन करीतच राहतो, तो साधक जाणावा. (८)

विसंचूनि दृश्यभान। दृढ धरी आत्मज्ञान।
विचारें राखें समाधान। या नांव साधक ॥ ९॥

दृश्याचे भान दुर्लक्षून जो आत्मज्ञान दृढ धरतो आणि विचाराच्या योगाने आपले समाधान टिकवून धरतो, त्याला साधक म्हणावे. (९)

तोडूनि द्वैताची उपाधी। अद्वैत वस्तु साधनें साधी।
लावी ऐक्यतेची समाधी। या नांव साधक ॥ १०॥

द्वैताची उपाधी सोडून देऊन जो साधनाने अद्वैत वस्तू म्हणजे जे परब्रह्मस्वरूप त्याची प्राप्ती करून घेतो आणि स्वस्वरूपानुभवाने जो परमात्म्याशी एकरूप होऊन समाधान पावतो, तो साधक होय. (१०)

आत्मज्ञान जीर्ण जर्जर। त्याचा करी जीर्णोद्धार।
विवेकें पावे पैलपार। या नांव साधक ॥ ११॥

पूर्वी जीर्णजर्जर झालेल्या आत्मज्ञानाचा जीर्णोद्धार करतो, म्हणजेच ज्या आत्मज्ञानाचे त्याला विस्मरण झाले होते ते जो परत विवेकाने प्राप्त करून घेतो व अशा रीतीने भवसागरांतून जो पैलतीरास पोहोचतो, त्यास साधक म्हणावे. (११)

उत्तमें साधूचीं लक्षणें। आंगिकारी निरूपणें।
बळेंचि स्वरूपाकार होणें। या नांव साधक ॥ १२॥

अध्यात्मनिरूपणात श्रवण केलेली उत्तम साधूची लक्षणे जो अंगी बाणवतो व अभ्यासाने जो स्वस्वरूपाशी तदाकार होतो, तो साधक होय. (१२)

असत्क्रिया ते सोडिली। आणी सत्क्रिया ते वाढविली।
स्वरूपस्थिती बळावली। या नांव साधक ॥ १३॥

ज्याने असत् क्रियेचा त्याग केलेला असतो व जो प्रयत्नपूर्वक सतक्रिया वाढवतो व त्यायोगे ज्याची स्वरूपस्थिती अधिकाधिक दृढ होत जाते, त्यास साधक म्हणावे. (१३)

अवगुण त्यागी दिवसें दिवस।
करी उत्तम गुणाचा अभ्यास।
स्वरूपीं लावी निजध्यास। या नांव साधक ॥ १४॥

दिवसेंदिवस जो अवगुणांचा त्याग करून उत्तम गुणांचा अभ्यास करतो व स्वस्वरूपी निजध्यास लावतो तो साधक होय. (१४)

दृढ निश्चयाचेनि बळें। दृश्य असतांच नाडळे।
सदा स्वरूपीं मिसळे। या नांव साधक ॥ १५॥

दृढ निश्चयाच्या बळावर दृश्य विश्वाचे आकर्षण ज्याला उरत नाही आणि जो सदा स्वस्वरूपी ऐक्य पावलेला असतो, त्याला साधक म्हणतात. (१५)

प्रत्यक्ष माया अलक्ष करी। अलक्ष वस्तु लक्षी अंतरीं।
आत्मस्थितीचीधारणा धरी। या नांव साधक ॥ १६॥

प्रत्यक्ष दिसणारी जी मायामय सृष्टी तिच्याकडे जो लक्ष देत नाही आणि प्रत्यक्ष डोळ्यांना न दिसणारे जे स्वस्वरूप ते जो अंतर्यामी एकाग्र होऊन पाहतो, त्यास साधक म्हणून जाणावे. (१६)

जें या जनासि चोरलें। मनास न वचे अनुमानलें।
तेंचि जेणें दृढ केलें। या नांव साधक ॥ १७॥

जे लोकांना अज्ञात असते, मनाने ज्याचे अनुमानही करता येत नाही, तेच स्वरूप जो आपल्या अंतरात दृढ धरून ठेवतो, तो साधक होय. (१७)

जें बोलतांचि वाचा धरी। जें पाहातांचि अंध करी।
तें साधी नाना परी। या नांव साधक ॥ १८॥

ज्याचे वर्णन करू लागल्यास वाचा कुंठित होते, जे स्वरूप डोळ्यांना दिसू शकत नाही, त्याची नाना प्रयत्नाने जो प्राप्ती करून घेतो, त्यास साधक म्हणावे. (१८)

**जें साधूं जातां साधवेना । जें लक्षूं जातां लक्षवेना ।**
**तेंचि अनुभवें आणी मना । या नांव साधक ॥ १९ ॥**

जे आत्मस्वरूप अनुभवास यावे म्हणून अनेक लोक प्रयत्न करतात, पण ते साध्य करू शकत नाहीत व जे पाहण्याचा कितीही प्रयत्न केला तरी जे दिसू शकत नाही, त्याचा साधनाच्या बळावर जो प्रत्यक्ष अनुभव घेतो, त्यास साधक म्हणावे. (१९)

**जेथें मनचि मावळे । जेथें तर्कचि पांगुळे ।**
**तेंचि अनुभवा आणी बळें । या नांव साधक ॥ २० ॥**

ज्या स्वस्वरूपापर्यंत मन पोहोचू शकत नाही, जेथे तर्कही पोहोचू शकत नाही, त्याचा अभ्यासाच्या बळाने जो साक्षात अनुभव घेतो, त्यास साधक म्हणावे. (२०)

**स्वानुभवाचेनि योगें । वस्तु साधी लगवेगें ।**
**तेंचि वस्तु होये आंगें । या नांव साधक ॥ २१ ॥**

स्वानुभवाच्या योगे आत्मवस्तूची ज्याने त्वरित प्राप्ती करून घेतलेली असते, एवढेच नव्हे, तर जो स्वतः ती वस्तूच होतो, तो साधक होय. (२१)

**अनुभवाचीं आंगें जाणे । योगियांचे खुणे बाणे ।**
**कांहींच नहोन असणें । या नांव साधक ॥ २२ ॥**

जो अनुभवाची सर्व अंगे जाणतो, योग्यांच्या खुणा ज्याच्या अंगी बाणलेल्या असतात आणि मीपणविरहित सहजतेने देहप्रारब्धाचा क्षय होईपर्यंत असणे ज्यास सहजसाध्य असते, तो साधक म्हणून ओळखावा. (२२)

**परती सारून उपाधी । असाध्य वस्तु साधनें साधी ।**
**स्वरूपीं करी दृढ बुद्धी । या नांव साधक ॥ २३ ॥**

विद्या, अविद्या उपाधींना बाजूस सारून, जो साधनाने इंद्रियगोचर नसल्याने असाध्य भासणारी आत्मवस्तू प्राप्त करून घेतो आणि स्वस्वरूपी ज्याने दृढ बुद्धी केलेली असते, तो साधक होय. (२३)

**देवाभक्ताचें मूळ । शोधून पाहे सकळ ।**
**साध्यचि होये तत्काळ । या नांव साधक ॥ २४ ॥**

देव कोण, भक्त कोण यांचे मूळ जो पूर्णपणे शोधून पाहतो आणि त्या दोहोंचे मूळ जी परब्रह्मवस्तू त्या साध्याशी एकरूप होऊन जो तात्काळ साध्यच होतो, त्याला साधक म्हणतात. (२४)

**विवेकबळें गुप्त जाला । आपेंआप मावळला ।**
**दिसतो परी देखिला । नाहींच कोणी ॥ २५ ॥**

विवेकाच्या बळाने ज्याचा मीपणा नाहीसा होऊ लागतो आणि शेवटी ज्याचा मीपणा पूर्णपणे नाहीसाच होतो, तो देहाने दिसत असला तरी त्याचे खरे स्वरूप कोणालाच दिसत नाही. (२५)

**मीपण मागें सांडिलें । स्वयें आपणास धुंडिलें ।**
**तुर्येसहि वोलांडिलें । या नांव साधक ॥ २६ ॥**

मीपणा पूर्वीच ज्याने सोडून दिलेला असतो, ज्याने स्वत:च स्वत:चा शोध घेतलेला असतो आणि ज्याने तुर्येलाही ओलांडलेले असते, म्हणजे साक्षित्वाची जाणीवही ज्याची उरत नाही, तो साधक होय. (२६)

**पुढें उन्मनीचा सेवटीं ।**
**आपली आपण अखंड भेटी ।**
**अखंड अनुभवीं ज्याची दृष्टी । या नांव साधक ॥ २७ ॥**

पुढे पूर्ण मनोलय झाल्यावर आपल्याला स्वस्वरूपानुभव आला की आपली आपल्यालाच अखंड भेट होते. अशी अखंड स्वरूपस्थिती ज्याची टिकून राहते, त्यास साधक म्हणावे. (२७)

**द्वैताचा तटका तोडिला । भासाचा भास मोडिला ।**
**देहीं असोनि विदेह जाला । या नांव साधक ॥ २८ ॥**

ज्याने द्वैताचा संबंध कायमचा तोडून टाकलेला असतो, अज्ञानामुळे भासणारा विश्वाचा भास ज्याने नष्ट केलेला असतो, आणि जो देहात असून विदेही असतो, त्यास साधक म्हणतात. (२८)

**जयास अखंड स्वरूपस्थिती । नाहीं देहाची अहंकृती ।**
**सकळ संदेहनिवृत्ती । या नांव साधक ॥ २९ ॥**

ज्याची स्वरूपस्थिती अखंड असते, देहाहंकार ज्याचा नष्ट झालेला असतो आणि ज्याचे सर्व संदेह नष्ट झालेले असतात, त्यास साधक म्हणावे. (२९)

पंचभूतांचा विस्तार। जयासि वाटे स्वप्नाकार।
निर्गुणीं जयाचा निर्धार। या नांव साधक ॥ ३० ॥

हा पंचमहाभूतांचा विस्तार ज्याला स्वप्नाकार वाटतो आणि निर्गुण आत्मस्वरूपाविषयी स्वानुभवामुळे ज्याचा ठाम निर्धार झालेला असतो, तो साधक असे जाणावे. (३०)

स्वप्नीं भये जें वाटलें। तें जागृतीस नाहीं आलें।
सकळ मिथ्या निर्धारिलें। या नांव साधक ॥ ३१ ॥

एखाद्यास स्वप्नात भय वाटते, ते तो जागृत झाल्यावर राहात नाही. त्याप्रमाणे सर्व पांचभौतिक सृष्टी मिथ्या आहे, असा ज्याचा निर्धार होतो, त्याला साधक म्हणावे. (३१)

मायेचें जें प्रत्यक्षपण। जनास वाटे हें प्रमाण।
स्वानुभवें अप्रमाण। साधकें केलें ॥ ३२ ॥

मायेने निर्माण केलेले दृश्य जगत प्रत्यक्ष दिसते म्हणून सामान्य लोक त्याला प्रमाण मानतात, पण स्वानुभवाने ते मिथ्या आहे, असे जो जाणतो, तो साधक होय. (३२)

निद्रा सांडूनि चेइरा जाला। तो स्वप्नभयापासून सुटला।
माया सांडून तैसा गेला। साधक स्वरूपीं ॥ ३३ ॥

झोपेतून जो जागा होतो, तो स्वप्नभयातून मुक्त होतो, तसा अविद्यारूपी मायेचा त्याग करून साधक स्वस्वरूपाच्या ठिकाणी जागृत होतो. (३३)

ऐसी अंतरस्थिती बाणली। बाह्य निस्पृहता अवलंबिली।
संसारउपाधी त्यागिली। या नांव साधक ॥ ३४ ॥

अशी अंतरस्थिती आत्मस्वरूपी ज्याची स्थिर झालेली असते आणि बाह्यत: ज्याने नि:स्पृहता अवलंबलेली असते आणि ज्याने संसार—उपाधीचा त्याग केलेला असतो, त्याला साधक म्हणतात. (३४)

कामापासून सुटला। क्रोधापासूनि पळाला।
मद मत्सर सांडिला। येकीकडे ॥ ३५ ॥

साधक कामवासनेतून मुक्त झालेला असतो, क्रोधापासून तो दूर गेलेला असतो आणि मद, मत्सर यांना त्याने दूर लोटलेले असते. (३५)

कुळाभिमानासी सांडिलें। लोकलाजेस लाजविलें।
परमार्थास माजविलें। विरक्तिबळें ॥ ३६ ॥

त्याने कुळाभिमानाचा त्याग केलेला असतो, जो लोकांची भीड धरत नाही, आणि विरक्तीच्या जोरावर परमार्थास खूप वाढवतो. (३६)

अविद्येपासून फडकला। प्रपंचापासून निष्टला।
लोभाचे हातींचा गेला। अकस्मात ॥ ३७ ॥

साधक अविद्येशी जराही संबंध ठेवत नाही, प्रपंचातून तो निसटून जातो आणि एकाएकी लोभाच्या हातातूनही निसटून जातो. (३७)

थोरपणासि पाडिलें। वैभवासि लिथाडिलें।
महत्त्वासि झिंजाडिलें। विरक्तिबळें ॥ ३८ ॥

विरक्तीच्या बळावर लौकिकाची पर्वा करीत नाही, वैभवास लाथाडतो आणि महत्त्वास झिडकारून टाकतो. (३८)

भेदाचा मडघा मोडिला। अहंकार सोडून पाडिला।
पाईं धरून आपटिला। संदेहशत्रु ॥ ३९ ॥

साधक भेदाचे घर मोडून टाकतो. अहंकारास सोडून धुळीस मिळवतो आणि संदेहरूपी शत्रूचे पाय धरून त्याला आपटतो. (३९)

विकल्पाचा केला वधु। थापें मारिला भवसिंधू।
सकळ भूतांचा विरोधु। तोडून टाकिला ॥ ४० ॥

साधक विकल्पाचा वध करतो. थपडेने भवसिंधूला मारतो आणि सर्व भूतांचा विरोध तोडून टाकतो. (४०)

भवभयासी भडकाविलें। काळाचें टांगें मोडिलें।
मस्तक हाणोनि फोडिलें। जन्ममृत्याचें ॥ ४१ ॥

साधक भवभयाला नष्ट करतो. काळाची टांग मोडतो. आत्मज्ञान झाल्याने तो जन्ममृत्यूच्या मस्तकावर आघात करून ते फोडतो. (४१)

देहसमंधावरी लोटला। संकल्पावरी उठवला।
कल्पनेचा घात केला। अकस्मात ॥ ४२ ॥

देहबुद्धीचा नाश करतो, संकल्परहित होतो आणि कल्पनाच करणे बंद करतो. (४२)

अपधाकासि ताडिलें। लिंगदेहासि विभांडिलें।
पाषांडास पछ्याडिलें। विवेकबळें ॥ ४३ ॥

साधक दुष्ट भयाचे ताडण करतो. लिंगदेहाला जिंकतो, आणि विवेकाच्या बळावर पाखंडाचा नाश करतो. (४३)

गर्वावरी गर्व केला । स्वार्थ अनर्थी घातला ।
अनर्थ तोहि निर्दाळिला । नीतिन्यायें ॥ ४४ ॥

साधक गर्वावर गर्व करतो म्हणजे प्रथम मी देह हा अहंकार होता, तो जाऊन मी ब्रह्म आहे हा अभिमान तो धरतो. स्वार्थ अनर्थी घालतो म्हणजे तो नि:स्वार्थी बनतो. साधक शास्त्रशुद्ध मार्गाने अनर्थाला म्हणजे दुर्दैवाला ठार करतो. (४४)

मोहासी मधेंचि तोडिलें । दु:खासि दु:धडचि केलें ।
शोकास खंडून सांडिलें । येकिकडे ॥ ४५ ॥

मोहाला तो मध्येच तोडतो, दु:खाचे दोन भाग करून टाकतो व शोकाला खंडून टाकतो. (४५)

द्वेष केला देशधडी । अभावाची घेतली नरडी ।
धाकें उदर तडाडी । कुतर्काचें ॥ ४६ ॥

द्वेषाला तो हद्दपार करतो, नास्तिकपणाचे नरडे दाबतो, आणि कुतर्काच्या मनात धाक उत्पन्न करतो. (४६)

ज्ञानें विवेक माजला । तेणें निश्चयो बळावला ।
अवगुणाचा संव्हार केला । वैराग्यबळें ॥ ४७ ॥

आत्मज्ञानामुळे विवेक फारच बळावतो. त्यामुळे आत्मस्वरूपाविषयीचा निश्चयही सुदृढ होतो व वैराग्यबळाने अवगुणांचा संहार होतो. (४७)

अधर्मास स्वधर्में लुटिलें । कुकर्मासि सत्कर्में झुगटिलें ।
लंटून वाटा लाविलें । विचारें अविचारासी ॥ ४८ ॥

साधकाच्या ठिकाणचा स्वधर्म अधर्मास लुटतो, सत्कर्माने कुकर्माला झुगारून देतो आणि विचाराने अविचाराला नष्ट करतो. (४८)

तिरस्कार तो चिरडिला । द्वेष खिरडूनि सांडिला ।
विषाद अविषादें घातला । पायांतळीं ॥ ४९ ॥

साधक तिरस्काराला चिरडून टाकतो, द्वेषाला खरडून त्याचा त्याग करतो. अविषादाच्या मदतीने विषादाला पायदळी तुडवतो. (४९)

कोपावरी घालणें घातलें । कापट्य अंतरी कुटिलें ।
सख्य आपुलें मानिलें । विश्वजनीं ॥ ५० ॥

साधक कोपावर हल्ला चढवून त्याला मारतो, कपटीपणाला अंतरात कुटून नष्ट करतो व जगातील सर्व लोकांना आत्मवत मानू लागतो. (५०)

प्रवृत्तीचा केला त्याग । सुहृदाचा सोडिला संग ।
निवृत्तिपथें ज्ञानयोग । साधिता जाला ॥ ५१ ॥

तो प्रवृत्तीचा त्याग करतो, सुहृदांचा संग सोडतो आणि निवृत्तीच्या मार्गाने ज्ञानयोग साधतो. (५१)

विषयेमैंदास सिंतरिलें । कुविद्येसि वेढा लाविलें ।
आपणास सोडविलें । आप्ततश्करापासुनी ॥ ५२ ॥

तो विषयरूपी ठगाला ठकवितो, कुविद्येला वेढून नष्ट करतो आणि नातलग वगैरे चोरांपासून स्वत:ला सोडवतो. (५२)

पराधेनतेवरी कोपला । ममतेवरी संतापला ।
दुराशेचा त्याग केला । येकायेकी ॥ ५३ ॥

तो पराधीनतेवर रागावतो, ममतेवर चिडतो आणि अकस्मात दुराशेचा त्याग करतो. (५३)

स्वरूपीं घातलें मना । यातनेसि केली यातना ।
साक्षेप आणि प्रेत्ना । प्रतिष्ठिलें ॥ ५४ ॥

साधक स्वरूपाच्या ठिकाणी मन लावतो, त्यामुळे यातनेला यातना होतात. साधक दृढनिश्चय आणि प्रयत्न यांची प्रतिष्ठा वाढवतो. (५४)

अभ्यासाचा संग धरिला । साक्षपासरिसा निघाला ।
प्रेत्न सांगाती भला । साधनपंथें ॥ ५५ ॥

साधक अभ्यासाची संगत धरून निग्रहाने साधन मार्गास लागतो. या मार्गांत प्रयत्न हा त्याचा उत्तम सोबती असतो. (५५)

सावध दक्ष तो साधक । पाहे नित्यानित्यविवेक ।
संग त्यागूनि येक । सत्संग धरी ॥ ५६ ॥

जो सदैव दक्ष असतो त्याला साधक म्हणावे. तो नेहमी नित्यानित्यविवेक करतो आणि मीपणाचा संग सोडून सत्संग धरतो. (५६)

बळेंचि सारिला संसार । विवेकें टाकिला जोजार ।
शुद्धाचारें अनाचार । भ्रष्टविला ॥ ५७ ॥

साधक निर्धाराने संसाराला बाजूस सारतो, विवेकाने सर्व व्याप सोडून देतो आणि शुद्ध आचाराने अनाचाराला व्यवहारातून हाकलून देतो. (५७)

विसरास विसरला । आळसाचा आळस केला ।
सावध नाहीं दुश्चित्त जाला । दुश्चित्तपणासी ॥ ५८ ॥

साधक आत्मबुद्धीच्या विस्मरणाला विसरतो, सदा प्रयत्नशील राहतो आणि मनाच्या इतस्तत: भरकटण्याला न घाबरता सावध राहतो. (५८)

आतां असो हें बोलणें। अवगुण सांडी निरूपणें।
तो साधक ऐसा येणें प्रमाणें। बुझावा ॥ ५९॥

असो. आता हे बोलणे पुरे झाले. थोडक्यात म्हणजे अध्यात्म-निरूपणाच्या योगे जो आपल्या अवगुणांचा त्याग करतो, तो साधक असे जाणावे. (५९)

बळेंचि अवघा त्याग कीजे। म्हणौनि साधक बोलिजे।
आतां सिद्ध तो जाणिजे। पुढिले समासीं ॥ ६०॥

तो बळेच सर्व संगांचा त्याग करतो, म्हणून त्याला साधक म्हणतात. आता पुढील समासात सिद्ध कसा ओळखावा ते जाणून घ्यावे. (६०)

येथें संशय उठिला। निस्पृह तोचि साधक जाला।
त्याग न घडे संसारिकाला। तरी तो साधक नव्हे कीं॥ ६१॥

येथे असा संशय निर्माण झाला की, जो निःस्पृह असतो तोच साधक होतो, मग प्रापंचिक माणसाच्या हातून त्याग घडत नाही. मग तो साधक होऊ शकत नाही का? (६१)

ऐसें श्रोतयांचें उत्तर। याचें कैसें प्रत्योत्तर।
पुढिले समासीं तत्पर। होऊन ऐका ॥ ६२॥

अशी श्रोत्यांनी शंका व्यक्त केली, त्याचे उत्तर कसे दिले आहे, ते पुढल्या समासात तत्पर होऊन ऐका. असे श्रीसमर्थ म्हणतात. (६२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'साधकलक्षणनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक ५ : समास १०

# सिद्धलक्षण

॥ श्रीराम ॥

मागें बोलिला संसारिक। त्यागेंविण नव्हे कीं साधक।
ऐका हो याचा विवेक। ऐसा असे ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, गेल्या समासाच्या शेवटी श्रोत्यांनी एक प्रश्न विचारला होता की, प्रापंचिक माणूस त्याग केल्याशिवाय साधक होऊ शकत नाही का? यासंबंधीचा विचार असा आहे. (१)

सन्मार्ग तो जीवीं धरणें। अनमार्गाचा त्याग करणें।
संसारिकां त्याग येणें। प्रकारें ऐसा ॥ २॥

कुणाही साधकाला सन्मार्गाचा अंतःकरणापासून स्वीकार करावा लागतो आणि असत मार्गाचा त्याग करावा लागतो. या प्रकारचा त्याग करणे सांसारिक माणसाला सहज शक्य आहे. (२)

कुबुद्धित्यागेंविण कांहीं। सुबुद्धि लागणार नाहीं।
संसारिकां त्याग पाहीं। ऐसा असे ॥ ३॥

कुबुद्धीचा त्याग केल्याखेरीज सुबुद्धी उत्पन्न होत नाही. सांसारिक माणूस कुबुद्धीचा त्याग सहज करू शकतो. त्याने अशा प्रकारे त्याग करावा. (३)

प्रपंचीं वीट मानिला। मनें विषयेत्याग केला।
तरीच पुढें आवलंबिला। परमार्थमार्ग ॥ ४॥

मनाने प्रपंचाचा वीट आला पाहिजे आणि मनःपूर्वक विषयांचा त्याग केला पाहिजे, तरच पुढे परमार्थमार्गाचे अवलंबन करता येते. (४)

त्याग घडे अभावाचा। त्याग घडे संशयाचा।
त्याग घडे अज्ञानाचा। शनै शनै ॥ ५॥

साधकाने नास्तिकपणाचा त्याग करावा, संशयाचा त्याग करावा म्हणजे पुढे हळूहळू अज्ञानाचा त्याग घडू लागतो. (५)

ऐसा सूक्ष्म अंतर्त्याग। उभयांस घडे सांग।
निस्पृहास बाह्यत्याग। विशेष आहे ॥ ६॥

प्रापंचिक साधक असो किंवा निःस्पृह साधक असो, अशा प्रकारचा सूक्ष्म अंतःस्थ त्याग दोघांनाही करावाच लागतो. जो प्रापंचिक नसेल, त्या निःस्पृह साधकाला बाह्य त्यागही विशेषेकरून आवश्यक आहे. (६)

संसारिकां ठाईं ठाईं। बाह्यत्याग घडे कांहीं।
नित्यनेम श्रवण नाहीं। त्यागेंविण ॥ ७॥

प्रापंचिक माणसालाही ठायी ठायी थोडा तरी बाह्य त्याग करावाच लागतो. त्याशिवाय त्याला अध्यात्मश्रवण, नित्यनेम इत्यादी काहीच घडणार नाही. (७)

फिटली आशंका स्वभावें। त्यागेंविण साधक नव्हे।
पुढें कथेचा अन्वये। सावध ऐका ॥ ८॥

याप्रकारे शंकेचे समाधान झाले. त्यागाशिवाय कुणीही साधक बनू शकतच नाही, हे शंकेचे उत्तर आहे. आता पुढील विषयाचा संदर्भ लक्षपूर्वक ऐकावा. (८)

मागां जालें निरूपण। साधकाची वोळखण।
आतां सांगिजेल खूण। सिद्धलक्षणाची ॥ ९॥

मागील समासात साधक कसा ओळखावा, त्याची लक्षणे कोणती याविषयी निरूपण झाले. आता सिद्धलक्षणाची खूण सांगतो. (९)

साधु वस्तु होऊन ठेला। संशय ब्रह्मांडाबाहेरि गेला।
निश्चये चळेना ऐसा जाला। या नांव सिद्ध ॥ १०॥

जो साधक ब्रह्मरूप होतो, वस्तूच होऊन राहतो, ज्याचा संशय ब्रह्मांडाबाहेर गेलेला असतो आणि कुठल्याही परिस्थितीत आत्मस्वरूपाविषयी ज्याचा निश्चय ढळत नाही, त्याला सिद्ध म्हटले जाते. (१०)

बद्धपणाचें अवगुण। मुमुक्षपणीं नाहीं जाण।
मुमुक्षपणाचें लक्षण। साधकपणीं नाहीं॥ ११॥

बद्धपणात जे अवगुण असतात, ते मुमुक्षूपणात नसतात आणि मुमुक्षूपणाची लक्षणे साधकपणात दिसून येत नाहीत. (११)

साधकासि संदेहवृत्ती। पुढें होतसे निवृत्ती।
याकारणें निःसंदेह श्रोतीं। साधु वोळखावा ॥ १२॥

साधकाची संदेहवृत्ती पुढे पूर्ण नाहीशी होऊन तो जेव्हा निःसंदेह होतो, तेव्हा तो सिद्ध साधू म्हणून ओळखावा.(१२)

संशयरहित ज्ञान। तेंचि साधूचें लक्षण।
सिद्धाआंगीं संशय हीन। लागेल कैसा ॥ १३॥

संशयरहित ज्ञान हेच साधूचे मुख्य लक्षण असते. जो सिद्ध होतो, त्याच्या ठिकाणी हीन संशय उत्पन्न होईलच कसा? (१३)

कर्ममार्ग संशयें भरला। साधनीं संशयें कालवला।
सर्वांमधें संशयें भरला। साधु तो निःसंदेह॥ १४॥

कर्ममार्ग संशयाने भरलेला आहे. परमार्थाच्या साधनातही संशय कालवलेला आहे. याप्रकारे सर्वत्र संशय भरून राहिलेला असतो. फक्त एक साधुपुरुष मात्र निःसंदेह असतो.(१४)

संशयाचें ज्ञान खोटें। संशयाचें वैराग्य पोरटें।
संशयाचें भजन वोखटें। निर्फळ होये ॥ १५॥

संशयासहित असलेले ज्ञान खोटे असते. संशयासहित वैराग्यही आश्रयहीन असते. संशयासहचे भजनही वाईट असून ते निष्फळ होते. (१५)

वेर्थ संशयाचा देव। वेर्थ संशयाचा भाव।
वेर्थ संशयाचा स्वभाव। सर्व कांहीं ॥ १६॥

ज्या देवाविषयी संशय असेल, तो देव व्यर्थ होय. जेथे संशय आहे तो भावही व्यर्थ व ज्याचा स्वभाव संशयी असेल, तोही व्यर्थच. संशय असेल ते सर्व काही व्यर्थच ठरते. (१६)

वेर्थ संशयाचें व्रत। वेर्थ संशयाचें तीर्थ।
वेर्थ संशयाचा परमार्थ। निश्चयेंविण ॥ १७॥

संशयसहित व्रत, संशयसहित तीर्थयात्रा दोन्ही व्यर्थ आहेत. निश्चयाशिवाय संशयाने केलेला परमार्थही व्यर्थच ठरतो. (१७)

वेर्थ संशयाची भक्ती। वेर्थ संशयाची प्रीती।
वेर्थ संशयाची संगती। संशयो वाढवी ॥ १८॥

संशयाने केलेली भक्ती, संशययुक्त प्रीती आणि संशयाने केलेली संगत यांमुळे संशय मात्र वाढतो.(१८)

वेर्थ संशयाचें जिणें। वेर्थ संशयाचें धरणें।
वेर्थ संशयाचें करणें। सर्व कांहीं ॥ १९॥

संशयाने भरलेले जीवन, प्रत्येकाबद्दल संशय धरणे आणि जे काही करावयाचे ते संशय ठेवूनच करावयाचे असे झाले तर सर्व काही व्यर्थच होते. (१९)

वेर्थ संशयाची पोथी। वेर्थ संशयाची वित्पत्ती।
वेर्थ संशयाची गती। निश्चयेंविण ॥ २०॥

संशयाने भरलेला अध्यात्मग्रंथ, संशययुक्त व्युत्पत्ती, दोन्ही व्यर्थ आहेत. संशयामुळे माणसाला चांगली गतीही मिळत नाही. (२०)

वेर्थ संशयाचा दक्ष। वेर्थ संशयाचा पक्ष।
वेर्थ संशयाचा मोक्ष। होणार नाहीं ॥ २१ ॥

संशयाने भरलेली सावधानता, संशयाने एखाद्याची बाजू घेणे, पक्ष घेणे व्यर्थ आहे. जो संशयी असेल, त्याला मोक्षप्राप्ती होऊच शकत नाही. (२१)

वेर्थ संशयाचा संत। वेर्थ संशयाचा पंडित।
वेर्थ संशयाचा बहुश्रुत। निश्चयेंविण ॥ २२ ॥

संशयग्रस्त असलेला संत, पंडित अथवा बहुश्रुत विचारवंत, कुठल्याही बाबतीत निश्चय नसेल तर ते व्यर्थच ठरतात. (२२)

वेर्थ संशयाची श्रेष्ठता। वेर्थ संशयाची वित्पन्नता।
वेर्थ संशयाचा ज्ञाता। निश्चयेंविण ॥ २३ ॥

संशयावर उभारलेली श्रेष्ठता, व्युत्पन्नता, किंवा ज्ञान निश्चयाच्या अभावी व्यर्थच असते. (२३)

निश्चयेंविण सर्व काहीं। अणुमात्र तें प्रमाण नाहीं।
वेर्थचि पडिलें प्रवाहीं। संदेहाचे ॥ २४ ॥

या जगात कुठलीही गोष्ट निश्चित नसेल, तर ती अणुमात्र प्रमाण मानली जात नाही. संशयाच्या प्रवाहात जे सापडते, ते सर्व व्यर्थ वाहतच जाते. (२४)

निश्चयेंविण जें बोलणें। तें अवघेंचि कंटाळवाणें।
बाष्कळ बोलिजे वाचाळपणें। निरार्थक ॥ २५ ॥

वक्त्याचे बोलणे जर निश्चयात्मक नसेल तर ते कंटाळवाणे ठरते. बाष्कळपणाने तो उगीच बडबड करतो. त्यामुळे ती निरर्थक ठरते. (२५)

असो निश्चयेंविण जे वल्गना। ते अवघीच विटंबना।
संशयें कांहीं समाधाना। उरी नाहीं ॥ २६ ॥

निश्चयाशिवाय जी वल्गना केली जाते, ती खरोखर विटंबनाच असते. संशयामुळे समाधानाला ठावच उरत नाही. (२६)

म्हणोनि संदेहरहित ज्ञान। निश्चयाचें समाधान।
तेंचि सिद्धांचें लक्षण। निश्चयेंसीं ॥ २७ ॥

म्हणून संदेहरहित ज्ञान आणि आत्मज्ञानाच्या निश्चयामुळे त्याच्या ठिकाणी असणारे समाधान हेच सिद्धाचे लक्षण होय. (२७)

तंव श्रोता करी प्रश्न। निश्चय करावा कवण।
मुख्य निश्चयाचें लक्षण। मज निरोपावें ॥ २८ ॥

तेव्हा श्रोत्याने प्रश्न केला की, कोणता निश्चय करावा, निश्चयाचे मुख्य लक्षण काय, ते मला समजावून सांगावे.(२८)

ऐक निश्चय तो ऐसा। मुख्य देव आहे कैसा।
नाना देवाचा वळसा। करूंचि नये ॥ २९ ॥

श्रीगुरू म्हणतात की, मुख्य देव कसा आहे हे जाणणे म्हणजे निश्चय होय. नाना देवाच्या गलबल्यात आपण पडूच नये. (२९)

जेणें निर्मिलें सचराचर। त्याचा करावा विचार।
शुद्ध विवेकें परमेश्वर। वोळखावा ॥ ३० ॥

ज्याने हे चराचर विश्व निर्माण केले, त्याच्यासंबंधी विचार करावा. शुद्ध विवेकाच्या बळावर परमेश्वर म्हणजेच मुख्य देव कोणता हे ओळखावे. (३०)

मुख्य देव तो कवण। भक्ताचें कैसें लक्षण।
असत्य सांडून वोळखण। सत्याची धरावी ॥ ३१ ॥

मुख्य देव कोणता, भक्ताचे लक्षण काय हे सत्याची कास धरून व विवेकाने असत्य बाजूस सारून जाणून घ्यावे. (३१)

आपल्या देवास वोळखावें। मग मी कोण हें पाहावें।
संग त्यागून राहावें। वस्तुरूप ॥ ३२ ॥

आपल्या उपास्य देवतेला ओळखावे. मग आपल्या खऱ्या स्वरूपाचा शोध घ्यावा. आणि 'मी' पणाचा त्याग करून वस्तुरूप होऊन राहावे. (३२)

तोडावा बंधनाचा संशयो। करावा मोक्षाचा निश्चयो।
पाहावा भूतांचा अन्वयो। वितिरेकेंसीं ॥ ३३ ॥

'मी बद्ध आहे' हा विकल्प तोडून टाकावा व 'मी मुक्तच आहे' असा मोक्षाचा निश्चय करावा. पंचमहाभूतांचा अन्वय-व्यतिरेकासह म्हणजेच सृष्टीची उभारणी व संहारणी यांच्यासह विचार करावा. (३३)

पूर्वपक्षेंसिं सिद्धांत। पाहावा प्रकृतीचा अंत।
मग पावावा निवांत। निश्चय देवाचा ॥ ३४ ॥

पूर्वपक्ष म्हणजे 'मी देह आहे' आणि सिद्धांत म्हणजे मी म्हणजे देह नव्हे हे कळून येणे व अधिक सखोल निदिध्यासाने स्वस्वरूपानुभव येणे. त्या वेळी प्रकृतीचा अंत होतो व मग त्या अनुभवामुळे तो निश्चय कधी चळत नाही. (३४)

**देहाचेनि योगें संशयो। करी समाधानाचा क्षयो।**
**चळों नेदावा निश्चयो। आत्मत्वाचा ॥ ३५॥**

'मी देह' असे वाटते, त्यामुळेच संशय उत्पन्न होतात व ते समाधान क्षीण करतात. म्हणून मी आत्मा आहे हा निश्चय कधी ढळू देऊ नये. (३५)

**सिद्ध असतां आत्मज्ञान। संदेह वाढवी देहाभिमान।**
**याकारणें समाधान। आत्मनिश्चयें राखावें॥ ३६॥**

आत्मज्ञान स्वयंसिद्धच आहे, पण त्याचे विस्मरण झाल्याने 'मी देह' असा देहाभिमान उत्पन्न होतो व त्यामुळे संदेह होतो. म्हणून 'मी आत्मा आहे' असा दृढ निश्चय करावा, म्हणजे शाश्वत समाधान लाभते. (३६)

**आठवतां देहबुद्धी। उडे विवेकाची शुद्धी।**
**याकारणें आत्मबुद्धि। सदृढ करावी ॥ ३७॥**

'मी देह आहे' ही देहबुद्धी जर दृढ झाली, तर विवेकाची शुद्धी उडते म्हणजे विवेक लोपतो, म्हणून आत्मबुद्धी सुदृढ करावी. (३७)

**आत्मबुद्धि निश्चयाची। तेचि दशा मोक्षश्रीची।**
**अहमात्मा हें कधींचि। विसरों नये ॥ ३८॥**

आत्मबुद्धीचा निश्चय शब्दज्ञानाने दृढ होत नाही, तर स्वरूपानुभव आल्याने आत्मबुद्धी दृढ होते, हेच मोक्षरूपी लक्ष्मीचे ऐश्वर्य होय. म्हणून 'मी आत्मा आहे' हे कधीच विसरू नये. (३८)

**निरोपिलें निश्चयाचें लक्षण। परी हें न कळे सत्संगेंविण।**
**संतांसि गेलियां शरण। संशये तुटती ॥ ३९॥**

आतापर्यंत निश्चय म्हणजे कोणता त्याचे लक्षण सांगितले. पण सत्संगाशिवाय ते कळत नाही. संतांना शरण गेल्यानेच सर्व संशय नष्ट होतात. (३९)

**आतां असो हें बोलणें। ऐका सिद्धांचीं लक्षणें।**
**मुख्य निःसंदेहपणें। सिद्ध बोलिजे ॥ ४०॥**

आता हे बोलणे पुरे झाले. सिद्ध पुरुषाची लक्षणे आता ऐका. जो पूर्ण निःसंदेह होतो, त्यास सिद्ध म्हणावे. (४०)

**सिद्धस्वरूपीं नाहीं देहो। तेथें कैंचा हो संदेहो।**
**याकारणें सिद्ध पाहो। निःसंदेही ॥ ४१॥**

ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणी देहच नाही, तर मग संदेह कोठला? म्हणूनच सिद्ध हा नेहमी निःसंदेह असतो. (४१)

**देहसमंधाचेनि गुणें। लक्षणासि काये उणें।**
**देहातीताची लक्षणें। काये म्हणोनि सांगावीं॥ ४२॥**

देहाचा संबंध जेथे असतो, तेथे त्रिगुण असतात, म्हणून लक्षणांची उणीव नसते. देहातीत असतो तो गुणातीतही असतो, तर त्याची लक्षणे सांगणार तरी कशी? (४२)

**जें लक्षवेना चक्षूसी। त्याचीं लक्षणें सांगावीं कैसीं।**
**निर्मळ वस्तु सिद्ध त्यासी। लक्षणें कैसीं ॥ ४३॥**

जे डोळ्यांनी म्हणजे इंद्रियांनी जाणता येत नाही, जे इंद्रियातीत आहे, त्याची लक्षणे कशी सांगणार? सिद्ध हा निर्मळ आत्मवस्तूशी एकरूप होतो, तर त्याची लक्षणे कशी असणार? (४३)

**लक्षणें म्हणिजे केवळ गुण। वस्तु ठाईची निर्गुण।**
**तेंचि सिद्धांचें लक्षण। वस्तुरूप ॥ ४४॥**

लक्षणे त्रिगुणांच्या योगे भासतात आणि आत्मवस्तू तर गुणातीत असते. सिद्ध हा परमात्मस्वरूप असतो, म्हणून तोही गुणातीत असतो, हेच त्याचे लक्षण होय. (४४)

**तथापि ज्ञानदशकीं बोलिलें। म्हणौनि वग्तृत्व आटोपिलें।**
**न्यूनपूर्ण क्ष्मा केलें। पाहिजे श्रोतीं ॥ ४५॥**

तथापि हा विषय पुढे ज्ञानदशकात सांगितला असल्याने येथील बोलणे आता आटोपते घेतो. यात जे कमी-अधिक असेल त्याबद्दल श्रोत्यांनी क्षमा करावी, असे समर्थ म्हणतात. (४५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सिद्धलक्षणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक पाचवा समाप्त.**

❑ ❑

# दशक सहावा : देवशोधन

## दशक ६ : समास १

## देवशोधन

॥ श्रीराम ॥

चित्त सुचित करावें। बोलिलें तें जीवीं धरावें।
सावध होऊन बैसावें। निमिष्य येक ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आता चित्त एकाग्र करून मी जे सांगतो ते ऐकून ते हृदयात धरून ठेवा. एक क्षणभर सावध होऊन बसा व सांगतो ते ऐका. (१)

कोणी येके ग्रामीं अथवा देसीं। राहाणें आहे आपणासी।
न भेटतां तेथिल्या प्रभूसी। सौख्य कैंचें ॥ २॥

आपल्याला कुठल्या तरी एखाद्या गावात किंवा देशात राहावयाचे असेल आणि आपण त्या गावाच्या वा देशाच्या प्रभूला म्हणजे जो अधिपती किंवा वरिष्ठ अधिकारी असेल त्याला जर भेटलो नाही, तर आपल्याला सुख कसे लाभेल? (२)

म्हणोनि ज्यास जेथेंराहाणें।
तेणें त्या प्रभूची भेटीं घेणें।
म्हणिजे होये श्लाघ्यवाणें। सर्व कांहीं ॥ ३॥

म्हणून ज्याला जेथे राहावयाचे असेल, त्याने तेथल्या मुख्याधिकाऱ्याची भेट घ्यावी, म्हणजे सर्व काही सुरळीत होते. (३)

प्रभुची भेटी न घेतां। तेथें कैंची मान्यता।
आपुलें महत्व जाता। वेळ नाहीं ॥ ४॥

मुख्याधिकाऱ्याची भेट घेतली नाही, तर तेथे आपल्याला कोणी मानणार नाही आणि मग आपले महत्त्व नाहीसे व्हायला वेळ लागणार नाही. (४)

म्हणौनि रायापासूनि रंक। कोणी तरी येक नायेक।
त्यास भेटणें हा विवेक। विवेकी जाणती ॥ ५॥

म्हणून राजापासून रंकापर्यंत जो कोणी तेथील नायक असेल त्याला भेटावे यातच शहाणपणा असतो, असे विचारी लोक जाणतात. (५)

त्यास न भेटतां त्याचे नगरीं। राहतां धरितील बेगारी।
तेथें न करितां चोरी। आंगीं लागे ॥ ६॥

त्याला न भेटता त्याच्या नगरात राहिले तर धरून नेऊन वेठबिगारीला लावतील किंवा चोरी केली नसताही चोरीचा आरोप करतील. (६)

याकारणें जो शाहाणा। तेणें प्रभुसी भेटावें जाणा।
ऐसें न करितां दैन्यवाणा। संसार त्याचा ॥ ७॥

म्हणून जो शहाणा असेल त्याने मुख्याधिकाऱ्याला भेटावे. नाहीतर त्याला नाना संकटांना तोंड द्यावे लागेल. (७)

ग्रामीं थोर ग्रामाधिपती। त्याहूनि थोर देशाधिपती।
देशाधिपतीहूनि नृपती। थोर जाणावा ॥ ८॥

एखाद्या गावात ग्रामाधिकारी हा श्रेष्ठ असतो. त्याच्यापेक्षा देशाधिपती अधिक श्रेष्ठ असतो व त्याच्यापेक्षाही राजा हा वरिष्ठ असतो. (८)

राष्ट्राचा प्रभु तो राजा। बहुराष्ट्र तो माहाराजा।
माहाराजांचाहि राजा। तो चक्रवती ॥ ९॥

राष्ट्राचा जो प्रभू त्यास राजा म्हणतात. अनेक राष्ट्रांचा अधिपती असेल, त्याला महाराजा म्हणतात. महाराजांचाही जो राजा त्याला चक्रवर्ती म्हणतात. (९)

येक नरपति येक गजपती। येक हयपति येक भूपती।
सकळांमध्ये चक्रवती। थोर राजा ॥ १०॥

एक नरपती असतो, तर एक गजपती असतो, तर दुसरा कुणी हयपती असतो, तर कुणी भूपती असतो. या सगळ्यांपेक्षा चक्रवर्ती हा श्रेष्ठ राजा असतो. (१०)

असो ऐसियां समस्तां। येक ब्रह्मा निर्माणकर्ता।
त्या ब्रह्मयासहि निर्मिता। कोण आहे ॥ ११॥

असो. अशा सर्वांचा निर्माणकर्ता एक ब्रह्मदेव असतो. त्या ब्रह्म्याचाही निर्माता कोण आहे? (११)

ब्रह्मा विष्णु आणि हर। त्यांसी निर्मिता तोचि थोर।
तो वोळखावा परमेश्वर। नाना येत्नें ॥ १२॥

ब्रह्मा, विष्णू आणि शंकर यांना जो निर्माण करतो, तो त्यांच्यापेक्षा थोर असतो. त्या परमेश्वराची नाना प्रयत्नांनी ओळख करून घ्यावी. (१२)

तो देव ठाईं पडेना। तरी येमयातना चुकेना।
ब्रह्मांडनायेक चोजवेना। हें बरें नव्हे ॥ १३ ॥

त्याची प्राप्ती झाली नाही, तर यमयातना चुकत नाहीत. जर ब्रह्मांड-नायकाला ओळखता आले नाही, तर ते बरे नव्हे. (१३)

जेणें संसारीं घातलें। आवघें ब्रह्मांड निर्माण केलें।
त्यासी नाहीं वोळखिलें। तोचि पतित ॥ १४ ॥

ज्याने आपल्याला या संसारात घातले, ज्याने अवघे ब्रह्मांड निर्माण केले, त्या परमात्म्यास जो ओळखत नाही, तो पतित समजावा. (१४)

म्हणोनि देव वोळखावा। जन्म सार्थकचि करावा।
न कळे तरी सत्संग धरावा। म्हणिजे कळे ॥ १५ ॥

म्हणून देव कोणता ते ओळखून आपल्या नरदेहाचे सार्थक करावे. जर आपल्याला ते कळत नसेल तर सत्संग धरावा म्हणजे ते कळून येईल. (१५)

जो जाणेल भगवंत। तया नांव बोलिजे संत।
जो शाश्वत आणि अशाश्वत। निवाडा करी ॥ १६ ॥

जो भगवंताला जाणतो त्यालाच संत म्हणतात. संत हे शाश्वत आणि अशाश्वताचा निवाडा करतात. (१६)

चळेना ढळेना देव। ऐसा ज्याचा अंतर्भाव।
तोचि जाणिजे माहानुभाव। संत साधु ॥ १७ ॥

खरा देव कधी पालटत नाही, आपल्या स्थानावरून हलत नाही, असा ज्याचा अंत:करणापासून भाव असतो, तोच महानुभाव संत, साधू आहे असे जाणावे. (१७)

जो जनामधें वागे। परि जनांवेगळी गोष्ट सांगे।
ज्याचे अंतरीं ज्ञान जागे। तोचि साधु ॥ १८ ॥

जो लोकांत वावरतो, पण गोष्टी मात्र जगावेगळ्या सांगतो. ज्याच्या अंतरात आत्मज्ञान सदैव जागृत असते, तोच साधू होय. (१८)

जाणिजे परमात्मा निर्गुण। त्यासीच म्हणावें ज्ञान।
त्यावेगळें तें अज्ञान। सर्वकांहीं ॥ १९ ॥

निर्गुण परमात्म्यास तद्रूप होऊन जाणणे, त्याच्याशी ऐक्य होणे यालाच ज्ञान म्हणावे. याखेरीज जे सर्व काही आहे ते अज्ञानच होय. (१९)

पोट भराव्याकारणें।
नाना विद्या अभ्यास करणें।
त्यासीं ज्ञान म्हणती परी तेणें। सार्थक नव्हे ॥ २० ॥

पोट भरण्यासाठी नाना विद्यांचा अभ्यास करणे यालाही ज्ञान म्हणतात, पण त्याने मनुष्यजन्माचे सार्थक होत नाही. (२०)

देव वोळखावा येक। तेंचि ज्ञान तें सार्थक।
येर आवघेंचि निरार्थक। पोटविद्या ॥ २१ ॥

ज्यायोगे एका देवाचा साक्षात्कार होतो, तेच खरे ज्ञान असते व त्यानेच सार्थक होते. बाकीच्या सर्व पोट भरण्याच्या विद्या निरर्थकच असतात. (२१)

जन्मवरी पोट भरिलें। देहाचें संरक्षण केलें।
पुढें अवघेंचि वेर्थ गेलें। अंतकाळीं ॥ २२ ॥

जन्मभर पोट भरण्यासाठी कष्ट केले, देहाचे संरक्षण केले, पण अंतकाळी ते सर्व व्यर्थच गेले. (२२)

येवं पोट भराव्याची विद्या। तयेसी म्हणों नये सद्विद्या।
सर्वव्यापक वस्तु सद्या। पाविजे तें ज्ञान ॥ २३ ॥

म्हणून पोट भरावयाची जी विद्या तिला सद्‌विद्या म्हणू नये. ज्यायोगे सर्वव्यापक वस्तूची तत्काळ प्राप्ती होते, तेच खरे ज्ञान होय. (२३)

ऐसें जयापासीं ज्ञान। तोचि जाणावा सज्जन।
तयापासीं समाधान। पुसिलें पाहिजे ॥ २४ ॥

असे ज्ञान ज्याच्याजवळ असते तोच संत असे जाणावे व त्यालाच समाधान मिळविण्याचा मार्ग विचारावा. (२४)

अज्ञानास भेटतां अज्ञान। तेथें कैंचें सांपडेल ज्ञान।
करंट्यास करंट्याचें दर्शन। होतां भाग्य कैंचें ॥ २५ ॥

एक अज्ञानी माणूस दुसऱ्या अज्ञानी माणसाजवळ गेला, तर तेथे त्याला ज्ञानाची प्राप्ती कशी होणार? एका दैवहीन माणसाला दुसऱ्या करंट्याचे दर्शन झाले तर त्याचे भाग्य कसे उदयाला येणार? (२५)

रोग्यापासीं रोगी गेला। तेथें कैंचें आरोग्य त्याला।
निर्बळापासीं निर्बळाला। पाठी कैंची ॥ २६ ॥

एका रोग्यापाशी दुसरा रोगी गेला, तर त्याला आरोग्याची प्राप्ती कशी होईल? किंवा निर्बलाकडून निर्बलाला मदत कशी मिळणार? (२६)

पिशाच्यापासीं पिशाच्य गेलें। तेथें कोण सार्थक जालें।
उन्मत्तास उन्मत्त भेटलें। त्यास उमजवी कवणु॥ २७॥

पिशाच्चापाशी पिशाच्च गेले तर ते पिशाच्चयोनीतून मुक्त होऊन त्याचा उद्धार कसा होईल? दारू पिऊन उन्मत्त झालेल्याला तसाच उन्मत्त भेटला तर त्यांची समजूत कोण घालणार? (२७)

भिकाऱ्यापासीं मागतां भिक्षा। दीक्षाहीनापासीं दीक्षा।
उजेड पाहातां कृष्णपक्षा। पाविजे कैंचा ॥ २८॥

भिकाऱ्यापाशी भिक्षा मागितली तर काय लाभ होणार? दीक्षाहीनापाशी दीक्षा कशी प्राप्त होणार? आणि कृष्णपक्ष असता चांदण्याचा प्रकाश कसा मिळणार? (२८)

अबद्धापासीं गेला अबद्ध। तो कैसेनि होईल सुबद्ध।
बद्धास भेटतां बद्ध। सिद्ध नव्हे ॥ २९॥

एका गैरशिस्त माणसाकडे दुसरा गैरशिस्त माणूस गेला तर तो शिस्तबद्ध कसा होणार? बद्धाला बद्ध भेटून तो सिद्ध होऊ शकत नाही. (२९)

देहापासीं गेला देही। तो कैसेनि होईल विदेही।
म्हणौनि ज्ञात्यावांचून नाहीं। ज्ञानमार्ग ॥ ३०॥

एका देहबुद्धीच्या माणसाजवळ दुसरा देहबुद्धीचा माणूस गेला तर तो काही विदेही होऊ शकत नाही. म्हणून ज्ञानी पुरुषांवाचून ज्ञानमार्ग सापडत नाही. (३०)

याकारणें ज्ञाता पाहावा। त्याचा अनुग्रह घ्यावा।
सारासारविचारें जीवा। मोक्ष प्राप्त ॥ ३१॥

म्हणून आत्मज्ञानी पुरुषाचा शोध घ्यावा, त्याचा अनुग्रह घ्यावा, म्हणजे मग सारासारविचाराने मोक्ष प्राप्त होतो. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देवशोधननाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक ६ : समास २

# ब्रह्मपावन

॥ श्रीराम ॥

ऐका उपदेशाचीं लक्षणें। सायोज्यप्राप्ती होय जेणें।
नाना मतांचें पेखणें। कामा नये सर्वथा॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आता ज्या उपदेशाने सायुज्यप्राप्ती होते त्या उपदेशाची लक्षणे ऐका. नाना मतांचा काथ्याकूट उपयोगी पडणार नाही. (१)

ब्रह्मज्ञानेंविण उपदेश। तो म्हणों नये विशेष।
धान्येंविण जैसें भूंस। खातां नये ॥ २॥

ब्रह्मज्ञानाखेरीज केलेल्या उपदेशाने काही साध्य होत नाही. जसे धान्याशिवाय असलेले भूस खाता येत नाही. (२)

नाना कबाड बडविलें। नातरी तक्रचि गुसळिलें।
अथवा धुणचि सेविलें। सावकास ॥ ३॥

नाना साली भक्षिल्या। अथवा चोइट्या चोखिल्या।
खोबरें सांडून खादल्या। नरोट्या जैशा ॥ ४॥

तैसें ब्रह्मज्ञानेंविण। नाना उपदेशाचा सिण।
सार सांडून असार कोण। शाहाणा सेवी ॥ ५॥

रसरहित कडबा कुटला किंवा लोणी काढलेले ताक घुसळले, किंवा तांदळाचे धुवणच सावकाश प्राशन केले किंवा अनेक फळांच्या सालीच खाल्ल्या, अथवा रसहीन चोयट्या चोखल्या, किंवा खोबरे खायचे सोडून नरोट्याच खाल्ल्या, त्याप्रमाणे ब्रह्मज्ञानाशिवायचे नाना उपदेश म्हणजे केवळ श्रमच असतात. ब्रह्मज्ञान हेच सार आहे. ते सोडून कुठला शहाणा असाराचे सेवन करील? (३-५)

आतां ब्रह्म जें कां निर्गुण। तेंचि केलें निरूपण।
सुचित करावें अंत:कर्ण। श्रोतेजनीं ॥ ६॥

आता गुणातीत जे ब्रह्म त्याचे वर्णन करतो. श्रोत्यांनी एकाग्र मन करून ते ऐकावे. (६)

सकळ सृष्टीची रचना। ते हे पंचभूतिक जाणा।
परंतु हे तगेना। सर्वकाळ ॥ ७॥

ही सर्व सृष्टी पंचमहाभूतांपासून निर्माण झाली असून ती सर्वकाळ टिकणारी नाही, म्हणजेच अशाश्वत आहे. (७)

आदिअंतीं ब्रह्म निर्गुण। तेचि शाश्वताची खूण।
येर पंचभूतिक जाण। नासिवंत ॥ ८॥

या सृष्टीची रचना होण्याआधी व तिचा लय झाल्यावर म्हणजे अंती केवळ निर्गुण ब्रह्म असते, हीच खरी शाश्वताची खूण आहे. इतर जे जे पांचभौतिक असते, ते नाशिवंत असते. (८)

येऱ्हवीं हें पाहातां भूतें। देव कैसें म्हणावें त्यातें।
भूत म्हणतां मनुष्यातें। विषाद वाटे ॥ ९॥

एरवी ही सृष्टी पाहिली म्हणजे ती पंचमहाभूतांची आहे असे दिसून येते. भूतांना देव कसे म्हणावे? भूत म्हणून कुणी संबोधले तरी मनुष्याला भीती वाटते. (९)

मां तो जगज्जनक परमात्मा। त्यास आणि भूत उपमा।
ज्याची कळेना महिमां। ब्रह्मादिकांसी ॥ १०॥

मग ज्याने हे जग निर्माण केले त्या जगज्जनक परमात्म्यास भूताची उपमा कशी द्यावी? ज्याचा महिमा ब्रह्मादिकांनाही कळत नाही. (१०)

भूतां ऐसा जगदीश। म्हणतां उत्पन्न होतो दोष।
याकारणें माहापुरुष। सर्व जाणती ॥ ११॥

त्या जगदीशाला भूतासारखा म्हणावे तर दोष उत्पन्न होतो. आत्मज्ञानी महापुरुष हे सर्व बरोबर जाणतात. (११)

पृथ्वी आप तेज वायोआकाश। यां सबाह्य जगदीश।
पंचभूतांसी आहे नाश। आत्मा अविनाशरूपी ॥ १२॥

पृथ्वी, आप, तेज, वायू, आणि आकाश ही पंचमहाभूते आहेत. यांच्या अंतर्बाह्य जगदीश ओतप्रोत भरलेला आहे. पंचमहाभूतांचा नाश होतो, पण आत्मा अविनाशरूप आहे. (१२)

जें जें रूप आणी नाम। तो तो आवघाचि भ्रम।
नामरूपातीत वर्म। अनुभवें जाणावें ॥ १३॥

जे जे रूप आणि नाम आहे तो तो सर्व भ्रमच आहे. नामरूपातीत जे परमात्मतत्त्व त्याचे रहस्य अनुभवानेच जाणावे लागते. (१३)

पंचभूतें आणी त्रिगुण। ऐशी अष्टधा प्रकृति जाण।
अष्टधाप्रकृतीस नामाभिधान। दृश्य ऐसें ॥ १४॥

पंचमहाभूते आणि त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृती आहे. या अष्टधा प्रकृतीला 'दृश्य' असे नामाभिधान आहे. (१४)

तें हें दृश्य नासिवंत। ऐसें वेद श्रुति बोलत।
निर्गुण ब्रह्म शाश्वत। जाणती ज्ञानी ॥ १५॥

ते हे दृश्य नाशिवंत आहे असे वेद व श्रुती सांगतात. निर्गुण ब्रह्म मात्र शाश्वत आहे, हे ज्ञानी लोक जाणतात. (१५)

जें शस्त्रें तोडितां तुटेना। जें पावकें जाळितां जळेना।
कालवितां कालवेना। आपेंकरूनी ॥ १६॥

ते ब्रह्म शस्त्राने तोडू जाता तुटत नाही, अग्नीने जाळावे म्हटले तर जळत नाही, पाण्याने कालवावे तर ते कालवले जात नाही. (१६)

जें वायोचेनि उडेना। जें पडेना ना झडेना।
जें घडेना ना दडेना। परब्रह्म तें ॥ १७॥

ते परब्रह्म वाऱ्याने उडत नाही, ते पडत नाही, झडत नाही, ते घडविता येत नाही, दडवता म्हणजे लपवताही येत नाही. (१७)

ज्यासी वर्णचि नसे। जें सर्वांहूनि अनारिसें।
परंतु असतचि असे। सर्वकाळ ॥ १८॥

त्या परब्रह्माला कोणताही रंग नाही, ते सर्वांहून विलक्षण आहे, पण सर्वकाळ असते. (१८)

दिसेना तरी काये जालें। परंतु तें सर्वत्र संचलें।
सूक्ष्मचि कोंदाटलें। जेथें तेथें ॥ १९॥

ते जरी दिसत नसले तरी काय झाले, परंतु ते सर्वत्र सूक्ष्म रूपाने ओतप्रोत भरलेले आहे. जेथे तेथे सर्वत्र व्यापलेले आहे. (१९)

दृष्टीस लागली सवे। जें दिसेल तेंचि पाहावें।
परंतु गुज तें जाणावें। गोप्य आहे ॥ २०॥

आपल्या दृष्टीला सवय झालेली असते की जे दिसेल तेच पाहावे आणि खरे मानावे. परंतु जे रहस्य असते ते गुप्त असते हे जाणून घ्यावे. (२०)

प्रगट तें जाणावें असार। आणी गुप्त तें जाणावें सार।
गुरुमुखें हा विचार। उमजों लागे ॥ २१॥

जे प्रगट दिसते ते असार आहे हे जाणावे व जे गुप्त आहे ते सार जाणावे. गुरूच्या उपदेशाने हे रहस्य उमजू लागते. (२१)

जें उमजेना तें उमजावें। जें दिसेना तें पाहावें।
जें कळेना तें जाणावें। विवेकबळें ॥ २२॥

विवेकाच्या जोरावर जे समजत नसेल ते समजून घ्यावे, जे दिसत नसेल ते पाहावे, जे कळत नसेल ते जाणून घ्यावे. (२२)

गुप्त तेंचि प्रगटवावें। असाध्य तेंचि साधावें।
कानडेंचि अभ्यासावें। सावकास ॥ २३॥

जे गुप्त आहे ते स्वत:साठी प्रगट करून घ्यावे, जे असाध्य आहे ते साधावे. अवघड असेल त्याचा चिकाटीने अभ्यास करावा. (२३)

वेद विरंची आणि शेष। जेथें सिणले निशेष।
तेंचि साधावें विशेष। परब्रह्म तें ॥ २४॥

वेद, ब्रह्मदेव आणि शेष ज्याचे वर्णन करता करता पार थकून गेले, त्या परब्रह्माची विशेषे करून प्राप्ती करून घ्यावी. (२४)

तरीं तें कोणेपरी साधावें। तेंचि बोलिलें स्वभावें।
अध्यात्मश्रवणें पावावें। परब्रह्म तें ॥ २५॥

तरी ते कसे साधावे असा प्रश्न केला असता त्याचे स्वाभाविक साधन सांगतात की, अध्यात्माच्या श्रवणाने ते परब्रह्म प्राप्त करून घ्यावे. (२५)

पृथ्वी नव्हे आप नव्हे। तेज नव्हे वायु नव्हे।
वर्णवेक्त ऐसें नव्हे। अव्यक्त तें ॥ २६॥

ते परब्रह्म पृथ्वी नव्हे, आप नव्हे, तेज नव्हे, वायू नव्हे. कोणत्या एका रंगाचेही ते नाही. ते अव्यक्त आहे.(२६)

तयास म्हणावें देव। वरकड लोकांचा स्वभाव।
जितुके गांव तितुके देव। जनाकारणें ॥ २७॥

त्या परब्रह्मालाच देव म्हणावे. इतर सामान्य लोकांचा स्वभाव असा असतो की जे व्यक्त आहे त्याला देव म्हणावे. म्हणून त्यांना जितके गाव तितके देव असतात. (२७)

ऐसा देवाचा निश्चयो जाला। देव निर्गुण प्रत्यया आला।
आतां आपणचि आपला। शोध घ्यावा ॥ २८॥

याप्रमाणे निर्गुण परब्रह्म म्हणजेच देव असा निश्चय झाला आणि देव निर्गुण हेही प्रत्ययाला आले. आता आपण आपलाच शोध घ्यावा. (२८)

माझें शरीर ऐसें म्हणतो। तरी तो जाण देहावेगळाचि तो।
मन माझें ऐसें जाणतो। तरी तो मनहि नव्हे॥ २९॥

आपण 'माझे शरीर' असे जेव्हा म्हणतो तेव्हा आपण देहावेगळे आहोत हे कळते. माझे मन असे म्हणतो म्हणजे मी मनापेक्षा वेगळा आहे. मन म्हणजे मी नव्हे हे उघड होते. (२९)

पाहातां देहाचा विचार। अवघा तत्वांचा विस्तार।
तत्वें तत्व झाडितां सार। आत्माच उरे ॥ ३०॥

देहासंबंधी विचार केला की देह म्हणजे पंचमहाभूतांचा विस्तार आहे हे कळून येते. तत्त्वाने तत्त्व झाडले म्हणजेच एकाचा दुसऱ्यात लय केला की सर्व भूते नाहीशी होऊन सार म्हणजे आत्माच शिल्लक राहतो. (३०)

आपणासी ठवचि नाहीं। येथें पाहाणें नलगे कांहीं।
तत्वें ठाईंचा ठाईं। विभागून गेलीं ॥ ३१॥

ज्याला आपण मी म्हणत होतो, त्याला स्थानच नाही असे कळून येते, मग त्याला पाहण्याचे कारणच उरत नाही. ज्या पंचमहाभूतांचा देह बनलेला असतो, ती भूते ठायीच्या ठायी विभागून जातात. (३१)

बांधली आहे तों गांठोडी। जो कोणी विचारें सोडी।
विचार पाहातां ही गांठोडी। आडळेना ॥ ३२॥

देह म्हणजे पंचमहाभूतांचे गाठोडे आहे. ते जो कोणी विचाराने सोडतो, त्याला असे कळून येते की गाठोडेच नाही. (३२)

तत्वांचें गांठोडें शरीर। याचा पाहातां विचार।
येक आत्मा निरंतर। आपण नाहीं ॥ ३३॥

शरीर हे तत्त्वांचे गाठोडे आहे. त्यासंबंधी विचार केला असता कळून येते की, आपण नाहीच. फक्त एक आत्मा तेवढा निरंतर आहे. (३३)

आपणासी ठवचि नाहीं। जन्ममृत्यु कैंचें काई।
पाहातां वस्तुचा ठाईं। पापपुण्य नसे ॥ ३४॥

आपण असा आत्म्याहून वेगळा कुणी नाहीच हे कळले की मग जन्ममृत्यू कोठले? आत्मस्वरूपाच्या ठिकाणी पाप-पुण्य नसते. (३४)

पापपुण्य येमयातना। हे निर्गुणीं तों असेना।
आपण तोचि तरी जन्ममरणा। ठाव कैंचा ॥ ३५॥

निर्गुणाच्या ठिकाणी पाप-पुण्य, यमयातना इत्यादी काही नसते, आणि आपण म्हणजे तोच निर्गुण आत्मा आहोत, तर मग जन्म-मरणाला ठाव कोठे आहे? (३५)

देहेबुद्धीनें बांधला। तो विवेकें मोकळा केला।
देहातीत होतां पावला। मोक्षपद ॥ ३६॥

मी म्हणजे देह या देहबुद्धीने जो बांधला गेला होता, त्याला विवेकाने आपण देह नाही, हे कळले, म्हणजेच देहबुद्धीचे बंधन नष्ट झाले. याप्रमाणे देहातीत होताच त्याला मोक्षपदाची प्राप्ती झाली. (३६)

जालें जन्माचें सार्थक। निर्गुण आत्मा आपण येक।
परंतु हा विवेक। पाहिलाच पाहावा॥ ३७॥

त्याच्या जन्माचे सार्थक झाले. पण आपण निर्गुण आत्मा हा विवेक सतत करीत राहिले पाहिजे.(३७)

जागें होतां स्वप्न सरे। विवेक पाहातां दृश्य वोसरे।
स्वरूपानुसंधानें तरे। प्राणीमात्र ॥ ३८॥

जागे झाल्यावर स्वप्न नाहीसे होते, त्याप्रमाणे विवेक केल्याने दृश्य म्हणजे ही पंचभौतिक सृष्टी नष्ट होते व स्वस्वरूपानुसंधानाने मनुष्य तरतो. (३८)

आपणास निवेदावें। आपण विवेकें नुरावें।
आत्मनिवेदन जाणावें। याचें नांव ॥ ३९॥

आपणास निवेदावे, आपण विवेकाने उरूच नये, याचे नाव आत्मनिवेदन आहे. (३९)

आधीं अध्यात्मश्रवण। मग सद्गुरुपादसेवन।
पुढें आत्मनिवेदन। सद्गुरुप्रसादें ॥ ४०॥

आधी अध्यात्मश्रवण करावे, नंतर गुरुभक्ती करावी, म्हणजे सद्गुरूंच्या कृपेने-प्रसादाने आत्मनिवेदन घडते. (४०)

आत्मनिवेदना उपरी। निखळ वस्तु निरंतरी।
आपण आत्मा अंतरीं। बोध जाला ॥ ४१॥

आत्मनिवेदन झाले की नंतर आपण म्हणजेच परिपूर्ण वस्तू, आत्मवस्तूच निरंतर आहोत, असा बोध अंतरात होतो. (४१)

त्या ब्रह्मबोधें ब्रह्मचि जाला। संसारखेद तो उडाला।
देहो प्रारब्धीं टाकिला। सावकास ॥ ४२॥

त्या ब्रह्मबोधाच्या योगे तो जीव ब्रह्मरूपच होतो. असे झाल्यावर त्याचे संसारदुःख नाहीसे होते. मग तो देहाला प्रारब्धाच्या अधीन करून स्वतः स्वस्वरूपी स्वस्थ राहतो. (४२)

यासी म्हणिजे आत्मज्ञान। येणें पाविजे समाधान।
परब्रह्मीं अभिन्न। भक्तचि जाला ॥ ४३॥

यालाच आत्मज्ञान म्हणतात. याच्यायोगेच शाश्वत समाधान मिळते. तो जीव परब्रह्माशी अभिन्न होतो, म्हणजेच भक्त होतो. (४३)

आतां होणार तें होयेना कां।
आणि जाणार तें जायेना कां।
तुटली मनांतील आशंका। जन्ममृत्याची ॥ ४४॥

आता जे होणार असेल ते होईना का, जे जाणार असेल ते जाईना का, अशी त्याची वृत्ती बनते आणि मनातली जन्ममृत्यूसंबंधीची आशंका नष्ट होते.(४४)

संसारीं पुंडावें चुकलें। देवां भक्तां ऐक्य जालें।
मुख्य देवास वोळखिलें। सत्संगेंकरूनी ॥ ४५॥

संसारातील कष्ट, येरझारा चुकल्या, देवभक्तांचे ऐक्य झाले आणि सत्संगाच्या योगे मुख्य देव कोणता ही ओळखही पटली. (४५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'ब्रह्मपावननिरूपण नाम' समास दुसरा समाप्त.**

❑❑

## दशक ६ : समास ३

# मायोद्भव

॥ श्रीराम ॥

निर्गुण आत्मा तो निर्मळ। जैसें आकाश अंतराळ।
घनदाट निर्मळ निश्चळ। सदोदित ॥ १ ॥

आत्मा हा निर्गुण आणि निर्मळ असतो. तो आकाश वा अंतराळाप्रमाणे घनदाट आणि सदोदित निर्मळ आणि निश्चळ असतो. (१)

जें खंडलेंचि नाहीं अखंड। जें उदंडाहूनि उदंड।
जें गगनाहूनि वाड। आणि सूक्ष्म ॥ २ ॥

आत्मा हा अखंड, उदंडाहून उदंड, गगनाहूनही व्यापक आणि सूक्ष्म आहे. (२)

जें दिसेना ना भासेना। जें उपजेना ना नासेना।
जें येयना ना जायना। परब्रह्म तें ॥ ३ ॥

जो दिसत नाही, भासत नाही, उपजत नाही, नासत नाही, कुठे येत नाही, जात नाही, असे ते परब्रह्म असते. (३)

जें चळेना ना ढळेना। जें तुटेना ना फुटेना।
जें रचेना ना खचेना। परब्रह्म तें ॥ ४ ॥

परब्रह्म चळत नाही, ढळत नाही, तुटत नाही, फुटत नाही, रचले जात नाही अथवा खचतही नाही. (४)

जें सन्मुखचि सर्वकाळ। जें निःकळंक आणि निखळ।
सर्वांतर आकाशपाताळ। व्यापूनि असे ॥ ५ ॥

ते सर्वकाळ सन्मुखच असते. निष्कलंक आणि निश्चळ असून आकाश, पाताळादी सर्वांच्या अंतरी व्यापून असते. (५)

अविनाश तें ब्रह्म निर्गुण। नासे ते माया सगुण।
सगुण आणि निर्गुण। कालवलें ॥ ६ ॥

ते परब्रह्म निर्गुण असून अविनाशी असते, तर माया ही सगुण असून नाश पावते. मायेमध्ये सगुण आणि निर्गुण कालवलेले असते. (६)

या कर्दमाचा विचार। करूं जाणती योगेश्वर।
जैसें क्षीर आणि नीर। राजहंस निवडिती ॥ ७ ॥

पाणी मिसळलेले दूध असेल तर राजहंस जसे त्यांना निवडून दूध ग्रहण करू शकतो, त्याप्रमाणे सगुण-निर्गुणाच्या मिश्रणाचा विचार योगेश्वर करू शकतात. (७)

जड सबळ पंचभूतिक। त्यामध्यें आत्मा व्यापक।
तो नित्यानित्यविवेक। पाहातां कळे ॥ ८ ॥

अचेतन आणि शबल असलेल्या पांचभौतिक सृष्टीत आत्मा ओतप्रोत व्यापक असतो. तो नित्यानित्यविवेकाच्या योगे कळतो. (८)

उसांमध्यें घेईजे रस। येर तें सांडिजे बाकस।
तैसा जगामध्यें जगदीश। विवेकें वोळखावा ॥ ९ ॥

उसामधला रस ग्रहण करून उरलेल्या चोयट्याचा त्याग करावा, त्याप्रमाणे या पंचभौतिक जगामध्ये असलेला जगदीश विवेकाने ओळखावा. (९)

रस नासिवंत पातळ। आत्मा शाश्वत निश्चळ।
रस अपूर्ण आत्मा केवळ। परिपूर्ण जाणावा ॥ १० ॥

उसाचा रस पातळ असून नाशिवंत असतो, पण आत्मा शाश्वत व निश्चळ असतो. रस अपूर्ण असतो, तर आत्मा केवळ परिपूर्ण असतो. (१०)

आत्म्यासारिखें येकअसावें। मां तें दृष्टांतासि द्यावें।
दृष्टांतमिसें समजावें। कैसें तरी ॥ ११ ॥

आत्म्यासारखे दुसरे एखादे असेल तर त्याचा दृष्टांत देता आला असता, पण त्याच्यासारखे दुसरे काही नाहीच. तरीही दृष्टांतामुळे विषय जरा तरी समजतो, म्हणून दृष्टांत दिला आहे. (११)

ऐसी आत्मस्थिती संचली। तेथें माया कैसी जाली।
जैसी आकाशीं वाहिली। झुळुक वायोची ॥ १२ ॥

आकाशात वायूची झुळुक यावी तशी आत्मस्थितीच्या ठिकाणी माया आली. (१२)

वायोपासूनि तेज जालें। तेजापासूनि आप निपजलें।
आपापासूनि आकारलें। भूमंडळ ॥ १३ ॥

भूमंडळापासूनि उत्पत्ती। जीव नेणों जाले किती।
परंतु ब्रह्म आदिअंतीं। व्यापूनि आहे ॥ १४ ॥

जें जें कांहीं निर्माण जालें। तें तें अवघेंचि नासलें।
परी मुळीं ब्रह्म तें संचलें। जैसें तैसें ॥ १५ ॥

घटापूर्वी आकाश असे। घटामधें आकाश भासे।
घट फुटतां न नासे। आकाश जैसें ॥ १६ ॥

तैसें परब्रह्म केवळ। अचळ आणि अढळ।
मधें होत जात सकळ। सचराचर ॥ १७ ॥

जें जें कांहीं निर्माण जालें। तें तें आधींच ब्रह्में व्यापिलें।
सर्व नाशतां उरलें। अविनाश ब्रह्म ॥ १८ ॥

ऐसें ब्रह्म अविनाश। तेंचि सेविती ज्ञाते पुरुष।
तत्वनिर्शनें आपणास। आपण लाभे ॥ १९ ॥

तत्वें तत्व मेळविलें। त्यासी देह हें नाम ठेविलें।
तें जाणते पुरुषीं शोधिलें। तत्वें तत्व ॥ २० ॥

तत्वझाडा निशेष होतां। तेथें निमाली देहअहंता।
निर्गुण ब्रह्मीं ऐक्यता। विवेकें जाली ॥ २१ ॥

विवेकें देहाकडे पाहिलें। तों तत्वें तत्व वोसरलें।
आपण कांहीं नाहीं आलें। प्रत्ययासी ॥ २२ ॥

आपला आपण शोध घेतां। आपली तों माईक वार्ता।
तत्वांतीं उरलें तत्वता। निर्गुण ब्रह्म ॥ २३ ॥

आपणाविण निर्गुण ब्रह्म। हेंचि निवेदनाचें वर्म।
तत्वासरिसा गेला भ्रम। मीतूंपणाचा ॥ २४ ॥

मी पाहातां आडळेना। निर्गुण ब्रह्म तें चळेना।
आपण तेंचि परी कळेना। सद्गुरुविण ॥ २५ ॥

सारासार अवघें शोधिलें। तों असार तें निघोन गेलें।
पुढें सार तें उरलें। निर्गुण ब्रह्म ॥ २६ ॥

वायूपासून तेज झाले, तेजापासून जल उत्पन्न झाले, जलापासून पृथ्वी आकारास आली. (१३)

भूमंडळापासून किती जीव उत्पन्न झाले, हे सांगतासुद्धा येत नाही. परंतु त्या सर्वांच्या आदि-अंती ब्रह्म व्यापून आहे. (१४)

जे जे काही निर्माण होते, ते ते सर्व नाश पावते, पण मुळात ब्रह्म सर्वत्र संचलेले असते. ते जसेच्या तसेच असते. त्यात बदल होत नाही. (१५)

घट निर्माण होण्यापूर्वी आकाश असतेच. घट निर्माण झाल्यावर त्या घटामध्येही आकाश भासू लागते, पण नंतर घट फुटला तरी आकाश जसेच्या तसेच असते. त्याचा नाश होत नाही. (१६)

तसेच परब्रह्म केवळ अचळ आणि अढळ असते. सर्व चराचर त्यात होत-जात असते. (१७)

जे जे काही निर्माण होते, ते आधीच ब्रह्माने व्यापलेले असते. त्या निर्माण झालेल्या सर्वांचा नाश झाला तरी ब्रह्म अविनाशी असल्याने जसेच्या तसेच राहते. (१८)

असे अविनाशी जे ब्रह्म त्याचा ज्ञाते पुरुष आश्रय घेतात. विवेकाने सर्व तत्त्वांचे निरसन करीत गेले की, आपल्याला स्वस्वरूपानुभव प्राप्त होतो. (१९)

तत्त्वांत तत्त्व मिळून तत्त्वांचे गाठोडे असा देह निर्माण होतो. जाणते पुरुष असतात ते एका तत्त्वाचा दुसऱ्यात विवेकाने लय करून आत्मज्ञान प्राप्त करून घेतात. (२०)

देह हे तत्त्वांचे गाठोडे आहे आणि आपण त्याहून वेगळे आहोत हे कळून आल्यावर देहाची अहंता नष्ट होते आणि विवेकाच्या योगे निर्गुण ब्रह्म हेच आपले स्वरूप आहे हे कळले की, त्याच्याशी एकरूपता प्राप्त होते. (२१)

विवेकाने देहाकडे पाहिले की तत्त्वात तत्त्व लय पावते व आपण काही नाहीच याचा माणसाला प्रत्यय येतो. (२२)

आपला आपण शोध घेऊ लागल्यावर आपले अस्तित्व ही मायिक गोष्ट आहे हे कळते. सर्व तत्त्वांचे निरसन झाल्यावर फक्त निर्गुण ब्रह्म तेवढे राहते. आपण ज्याला मी म्हणतो, तो राहातच नाही. (२३)

मीपणाशिवाय निर्गुण ब्रह्म हेच आत्मनिवेदनाचे वर्म आहे. तत्त्वांचे संपूर्ण निरसन झाले की मी-तू पणाचा भ्रम नाहीसा होतो. (२४)

शोध घेऊ लागल्यावर मी कुठे आढळतच नाही. निर्गुण ब्रह्म चळत नाही. पण आपण म्हणजे ते निर्गुण ब्रह्मच आहोत, हे सद्गुरूशिवाय कळत नाही. (२५)

सारासारविचाराने मी कोण याचा शोध घेऊ लागल्यावर असार होते ते सर्व निघून गेले आणि सार उरले, ते म्हणजेच निर्गुण ब्रह्म. (२६)

| | |
|---|---|
| आधीं ब्रह्म निरोपिलें। तेंचि सकळांमध्यें व्यापलें।<br>सकळ आवघेंचि नासलें। उरलें तें केवळ ब्रह्म॥ २७॥ | आधी ब्रह्माचे जे वर्णन केले आहे, तेच सर्वांमध्ये व्यापून राहिले आहे आणि सर्व जे निर्माण झाले होते, ते नाश पावले आणि जे उरले ते केवळ ब्रह्मच होय. (२७) |
| होतां विवेकें संव्हार। तेथें निवडे सारासार।<br>आपला आपणासि विचार। ठाईं पडे ॥ २८॥ | विवेकाने पांचभौतिक सृष्टीसंबंधी सारासारविचार केला की आपण कोण याची जाणीव आपल्याला होऊ लागते. (२८) |
| आपण कल्पिलें मीपण। मीपण शोधितां नुरे जाण।<br>मीपण गेलियां निर्गुण। आत्मा स्वयें ॥ २९॥ | आपण देह म्हणजे मी अशी कल्पना केली होती. पण आपण आपला शोध घेऊ लागलो की आपण म्हणजे देह नव्हे हे कळते. याप्रमाणे शोध करता करता मी म्हणजे मन नव्हे, बुद्धी नव्हे, असे करता करता मी च शिल्लक राहत नाही, मी जाऊन फक्त निर्गुण आत्मा तेवढा उरतो व तोच आपण असा अनुभव येतो. (२९) |
| जालियां तत्वाचें निर्शन। निर्गुण आत्मा तोचि आपण।<br>कां दाखवावें मीपण। तत्वनिर्शनाउपरी ॥ ३०॥ | तत्त्वांचे निरसन झाले की निर्गुण आत्मा तोच आपण असा अनुभव येतो. म्हणून तत्त्वनिरसनानंतर मीपणा दाखविणार तरी कसा? (३०) |
| तत्वांमध्यें मीपण गेलें। तरी निर्गुण सहजचि उरलें।<br>सोहंभावें प्रत्यया आलें। आत्मनिवेदन ॥ ३१॥ | तत्त्वांमध्ये मी पण म्हणजे मी देह हे नाहीसे होऊन केवळ निर्गुण ब्रह्म तेवढेच साहजिक शिल्लक उरते. तोच मी म्हणजे सोहंभावाने तसा अनुभव आल्याने सहजच आत्मनिवेदन घडते. (३१) |
| आत्मनिवेदन होतां। देवाभक्तांसी ऐक्यता।<br>साचार भक्त विभक्तता। सांडूनि जाला ॥ ३२॥ | आत्मनिवेदन होताच देवाची-भक्ताची ऐक्यता झाली आणि विभक्तता जाऊन तो खराखुरा भक्त बनला. (३२) |
| निर्गुणासी नाहीं जन्ममरण। निर्गुणासी नाहीं पापपुण्य।<br>निर्गुणीं अनन्य होतां आपण। मुक्त जाला॥ ३३॥ | निर्गुणाला जन्ममरण नाही, निर्गुणाला पाप-पुण्य नाही. त्यामुळे निर्गुणाशी एकरूप होताच तो मुक्त होतो. (३३) |
| तत्वीं वेटाळून घेतला। प्राणी संशयें गुंडाळला।<br>आपणासी आपण भुलला। कोहं म्हणे ॥ ३४॥ | जीव विनाशी तत्त्वांनी वेढलेला असतो, त्यामुळे तो संशयात गुरफटून जातो आणि म्हणून त्याला आपल्या स्वरूपाचा विसर पडून तो कोऽहं म्हणजे मी कोण असे म्हणू लागतो. (३४) |
| तत्वीं गुंतला म्हणे कोहं। विवेक पाहातां म्हणे सोहं।<br>अनन्य होतां अहं सोहं। मावळली ॥ ३५॥ | तत्त्वांत ज्या वेळी गुंतलेला असतो तेव्हा 'कोऽहं' म्हणजे 'मी कोण' असे म्हणतो व विवेक उत्पन्न झाला की 'सोऽहं' म्हणजे 'मी तोच' असे म्हणू लागतो आणि स्वस्वरूपानुभवाने जीव-ब्रह्मैक्य झाले म्हणजे तो अनन्य झाला की 'अहम्' आणि 'सोऽहं' दोन्ही मावळतात. (३५) |
| याउपरी उर्वरित। तेंचि स्वरूप संत।<br>देहीं असोनि देहातीत। जाणिजे ऐसा ॥ ३६॥ | यानंतर जे शेष राहते तेच नित्य त्रिकाला-बाधित आत्म-स्वरूप होय. देही असून मग तो याप्रकारे देहातीत होतो. (३६) |
| संदेहवृत्ति ते न भंगे। म्हणोनि बोलिलेंचि बोलावें लागे।<br>आम्हासी हें घडलें प्रसंगें। श्रोतीं क्ष्मा करावें॥ ३७॥ | संदेह वृत्ती लवकर नष्ट होत नाही. म्हणून पूर्वी बोललेलेच परत बोलावे लागते, म्हणून श्रोत्यांनी क्षमा करावी. (३७) |

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मायोद्भवनाम' समास तिसरा समाप्त.



## दशक ६ : समास ४

# ब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

कृतायुग सत्रा लक्ष अठाविस सहस्त्र । त्रेतायुग बारा लक्ष शाहाणौ सहस्त्र ।
द्वापार आठ लक्ष चौसष्टी सहस्त्र । आतां कल्युग ऐका ॥ १ ॥

कृतयुग सतरा लक्ष अठ्ठावीस हजार वर्षांचे, त्रेतायुग बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षांचे, द्वापरयुग आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षांचे असते. आता कलियुगासंबंधी ऐका. (१)

कल्युग च्यारि लक्ष बतीस सहस्त्र ।
च्यतुर्युगें त्रेताळिस लक्ष वीस सहस्त्र ।
ऐसीं च्यतुर्युगें सहस्त्र । तो ब्रह्मयाचा येक दिवस ॥ २ ॥

कलियुग चार लक्ष बत्तीस हजार वर्षांचे असते. चारी युगे मिळून कालगणना त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षे होते. अशी चार युगे हजार वेळा झाली की, ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. (२)

ऐसे ब्रह्मे सहस्त्र देखा । तेव्हां विष्णूची येक घटिका ।
विष्णु सहस्त्र होतां ऐका । पळ येक ईश्वराचें ॥ ३ ॥

अशी ब्रह्मदेवाची हजार वर्षे म्हणजे विष्णूची एक घटका होते. विष्णूची हजार वर्षे म्हणजे ईश्वराचे एक पळ होते. (३)

ईश्वर जाये सहस्त्र वेळ । तें शक्तीचें अर्ध पळ ।
ऐसी संख्या बोलिली सकळ । शास्त्रांतरीं ॥ ४ ॥

ईश्वराची हजार वर्षे म्हणजे शक्तीचे अर्ध पळ होते. शास्त्रांमध्ये याप्रकारे कालगणना सांगितली आहे. (४)

श्लोक

चतुर्युगसहस्त्राणि दिनमेकं पितामहम् ।
पितामहसहस्त्राणि विष्णोर्घटिकमेव च ॥ १ ॥
विष्णोरेकसहस्त्राणि पलमेकं महेश्वरम् ।
महेश्वरसहस्त्राणि शक्तेरर्धं पलं भवेत् ॥ २ ॥

ऐशा अनंत शक्ती होती । अनंत रचना होति जाती ।
तरी अखंड खंडेना स्थिती । परब्रह्माची ॥ ५ ॥

अशा अनंत शक्ती असतात आणि अनंत ब्रह्मांडरचना होतात आणि जातात. पण परब्रह्माची अखंड स्थिती कधी खंडित होत नाही. (५)

परब्रह्मासी कैंची स्थिती । परी हे बोलावयाची रिती ।
वेदश्रुती नेति नेति । परब्रह्मीं ॥ ६ ॥

परब्रह्माची कसली आली आहे स्थिती? पण ही बोलण्याची एक रीत आहे. वेद आणि श्रुतीही नेति नेति म्हणून परब्रह्माचे वर्णन करतात. (६)

च्यारि सहस्त्र सातसें साठीं । इतुकी कल्युगाची राहाटी ।
उरल्या कल्युगाची गोष्टी । ऐसी असे ॥ ७ ॥

चार हजार सातशे साठ वर्षे इतका काळ चालू कलियुगातील गेला आहे. (म्हणजे शके १५८१ मध्ये श्रीदासबोधरचना झाली असावी.) उरलेल्या कलियुगाच्या काळासंबंधीचा विचार आता ऐका. (७)

च्यारि लक्ष सत्ताविस सहस्त्र । दोनिसें चाळीस संवछर ।
पुढें अन्योविण्य वर्णसंकर । होणार आहे ॥ ८ ॥

कलियुगाची चार लक्ष सत्तावीस हजार दोनशे चाळीस वर्षे अद्यापि शिल्लक आहेत. यापुढे येणाऱ्या काळात एकमेकांत वर्णसंकर होणार आहे. (८)

ऐसें रचलें सचराचर । येथें येकाहूनि येक थोर ।
पाहतां येथीचा विचार । अंत न लगे ॥ ९ ॥

याप्रमाणे सर्व चराचराची रचना झाली आहे. येथे एकाहून एक श्रेष्ठ आहेत. येथला विचार हा असा पाहू लागले असता त्याचा अंत लागत नाही. (९)

येक म्हणती विष्णु थोर । येक म्हणती रुद्र थोर ।
येक म्हणती शक्ति थोर । सकळांमध्यें ॥ १० ॥

एक म्हणतात, विष्णू थोर आहे. कुणी म्हणतात रुद्र थोर आहे, तर कुणी म्हणतात, सगळ्यांच्या मध्ये शक्ती थोर आहे. (१०)

ऐसें आपुलालेपरी बोलती । परंतु अवघेंचि नासेल कल्पांतीं ।
यदृष्टं तं नष्टं हे श्रुती । बोलतसे ॥ ११ ॥

असे आपापल्या परीने म्हणतात. परंतु कल्पान्ती सर्वच नाश पावते. यद् दृष्टं तन् नष्टम् असे श्रुती सांगते. (११)

आपुलाली उपासना । अभिमान लागला जना ।
याचा निश्चयो निवडेना । साधुविण ॥ १२ ॥

सर्व लोकांना आपापल्या उपासनेचा अभिमान असतो. साधूंशिवाय या विषयींचा निर्णय होऊ शकत नाही.(१२)

साधु निश्चय करिती येक । आत्मा सर्वत्र व्यापक ।
येर हें अवघेंचि माईक । सचराचर ॥ १३ ॥

अवघे चराचर हे मायिक आहे. आत्माच एक सर्वव्यापक आहे, असा निश्चय साधू करतात. (१३)

चित्रीं लिहिली सेना । त्यांत कोण थोर कोण साना ।
हें तुम्ही विचाराना । आपुले ठाईं ॥ १४ ॥

सैन्याचे चित्र रेखाटलेले आहे, तर त्यात कोण थोर आणि कोण लहान याचा तुम्ही आपल्याशीच विचार करावा. (१४)

स्वप्नीं उदंड देखिलें । ल्हानथोरहि कल्पिलें ।
परंतु जागें जालियां जालें । कैसें पाहा ॥ १५ ॥

स्वप्नात अनेक दृश्ये पाहिली. त्यात कुणी लहान, कुणी थोर अशी कल्पनाही केली. पण जागे झाल्यावर काय होते, याचा जरा विचार करा. (१५)

पाहातां जागृतीचा विचार । कोण ल्हान कोण थोर ।
जाला अवघाचि विस्तार । स्वप्नरचनेचा ॥ १६ ॥

जागृत झाल्यावर विचार केला की, कळून येते की, तेथे कुणी लहान नसतो किंवा कुणी थोरही नसतो. स्वतःच्या कल्पनेमुळे सगळा स्वप्नविस्तार दिसत असतो. (१६)

अवघाचि माईक विचार । कैंचें ल्हान कैंचें थोर ।
ल्हानथोराचा निर्धार । जाणती ज्ञानी ॥ १७ ॥

कुणाला थोर ठरवायचे किंवा लहान म्हणायचे हा सगळा मायेचा प्रभाव असतो. ज्ञानी लोक असतात तेच लहानथोराचा निर्णय करू शकतात. (१७)

जो जन्मासी येऊन गेला । तो मी थोर म्हणतांच मेला ।
परी याचा विचार पाहिला । पाहिजे श्रेष्ठीं ॥ १८ ॥

जो जन्मास येऊन स्वतःला थोर समजतो, तो जिवंत असून मेल्यासारखाच समजावा. श्रेष्ठ पुरुषांनी याचा विचार केला पाहिजे. (१८)

जयांसि जालें आत्मज्ञान । तेचि थोर माहाजन ।
वेद शास्त्रें पुराण । साधु संत बोलिले॥ १९ ॥

ज्याला आत्मज्ञान झाले असेल तोच खरा थोर महात्मा होय. वेद, शास्त्रे, पुराणे व साधू-संतांचे असे मत आहे. (१९)

एवं सकळांमध्यें थोर । तो येकची परमेश्वर ।
तयांमधें हरिहर । होति जाती ॥ २० ॥

थोडक्यात असे म्हणता येईल की, एक परमेश्वरच सर्वांत थोर आहे. हरिहर इत्यादी त्याच्याच ठिकाणी उत्पन्न होतात आणि लय पावतात. (२०)

तो निर्गुण निराकार । तेथें नाहीं उत्पत्ती विस्तार ।
स्थानमानाचा विचार । ऐलिकडे ॥ २१ ॥

तो परमेश्वर खरे तर निर्गुण-निराकार आहे. त्याचे ठिकाणी उत्पत्ती, विस्तार वगैरे काहीच नाही. स्थलकालाचा, आकाराचा विचार अगदी अलीकडचा आहे. (२१)

नांवरूप स्थानमान । हा तों आवघाचि अनुमान ।
तथापी होईल निदान । ब्रह्मप्रळईं ॥ २२ ॥

नाम, रूप, स्थल, आकार, काल ह्या सर्व अनुमानाच्या गोष्टी असतात. ब्रह्मप्रलयाच्या वेळी याचा निश्चित निर्णय होईल. (२२)

ब्रह्म प्रळयावेगळें । ब्रह्म नावरूपानिराळें ।
ब्रह्म कोणी येकाकाळें । जैसें तैसें ॥ २३ ॥

ब्रह्म हे नामरूपाहून निराळे, प्रलयावेगळे असते. कुठल्याही काळी ब्रह्म जसेच्या तसेच असते. (२३)

करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।
तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ २४ ॥

जे ब्रह्मनिरूपण करतात, संपूर्ण ब्रह्माला ऐक्यरूपे, अनुभवरूपाने जाणतात, त्या ब्रह्मज्ञानी पुरुषांनाच ब्राह्मण समजावे. (२४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'ब्रह्मनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.



## दशक ६ : समास ५

# मायाब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

श्रोते पुसती ऐसें। माया ब्रह्म तें कैसें।
श्रोत्यां वक्तयांच्या मिसें। निरूपण ऐका ॥ १॥

श्रोते विचारतात की, माया कशी असते? ब्रह्म कसे असते? श्रीसमर्थ म्हणतात की, श्रोते-वक्त्यांच्या संवादाच्या निमित्ताने निरूपण ऐकावे. (१)

ब्रह्म निर्गुण निराकार। माया सगुण साकार।
ब्रह्मासि नाहीं पारावार। मायेसि आहे ॥ २॥

ब्रह्म हे निर्गुण निराकार आहे, तर माया ही सगुण साकार आहे. ब्रह्माला मर्यादा, अंत नाही. मायेला अंत आहे. (२)

ब्रह्म निर्मळ निश्चळ। माया चंचळ चपळ।
ब्रह्म निरोपाधी केवळ। माया उपाधिरूपी॥ ३॥

ब्रह्म निर्मळ, निश्चळ आहे, तर माया चंचळ असून चपळ आहे. ब्रह्म केवळ निरुपाधिक आहे, तर माया उपाधिरूप आहे. (३)

माया दिसे ब्रह्म दिसेना। माया भासे ब्रह्म भासेना।
माया नासे ब्रह्म नासेना। कल्पांतकाळीं ॥ ४॥

माया दिसते, ब्रह्म दिसत नाही. माया भासते, ब्रह्म भासत नाही. माया नाश पावते, ब्रह्म कल्पान्ताचे वेळीही नाश पावत नाही. (४)

माया रचे ब्रह्म रचेना। माया खचे ब्रह्म खचेना।
माया रुचे ब्रह्म रुचेना। अज्ञानासी ॥ ५॥

माया रचली जाते, ब्रह्म रचले जाऊ शकत नाही. माया नष्ट होते. ब्रह्म नाश पावत नाही. अज्ञानी माणसाला माया गोड वाटते, त्याला ब्रह्म रुचत नाही. (५)

माया उपजे ब्रह्म उपजेना। माया मरे ब्रह्म मरेना।
माया धरे ब्रह्म धरेना। धारणेसी ॥ ६॥

माया उपजते, ब्रह्म उपजत नाही. माया मरते, ब्रह्म मरत नाही. मायेची धारणा करता येते, ब्रह्माची धारणा करता येत नाही. (६)

माया फुटे ब्रह्म फुटेना। माया तुटे ब्रह्म तुटेना।
माया विटे ब्रह्म विटेना। अविनाश तें ॥ ७॥

माया फुटते. ब्रह्म फुटत नाही. माया तुटते, ब्रह्म तुटत नाही. माया विटते, ब्रह्म अविनाशी असल्याने ते विटत नाही. (७)

माया विकारी ब्रह्म निर्विकारी। माया सर्व करी ब्रह्म कांहींच न करी।
माया नाना रूपें धरी। ब्रह्म तें अरूप ॥ ८॥

माया विकारी आहे, तर ब्रह्म निर्विकारी आहे. मायाच सर्व काही करते. ब्रह्म काहीच करत नाही. माया नाना रूपे धारण करते, तर ब्रह्म हे अरूप आहे. (८)

माया पंचभूतिक अनेक। ब्रह्म तें शाश्वत येक।
मायाब्रह्मांचा विवेक। विवेकी जाणती ॥ ९॥

माया पांचभौतिक असून अनेक रूपे धारण करते व अशाश्वत असते. तर ब्रह्म एकच असून ते शाश्वत असते. विवेकी लोकच मायाब्रह्माचा विवेक जाणतात. (९)

माया ल्हान ब्रह्म थोर। माया असार ब्रह्म सार।
माया अर्ति पार। ब्रह्मासी नाहीं ॥ १०॥

माया लहान आहे, तर ब्रह्म थोर आहे. माया असार तर ब्रह्म सार आहे. माया अलीकडे आहे, तर ब्रह्माला शेवटच नाही. (१०)

सकळ माया विस्तारली। ब्रह्मस्थिति अच्छ्यादिली।
परी ते निवडूनि घेतली। साधुजनीं ॥ ११॥

माया विस्तार पावल्यामुळे तिने ब्रह्माला झाकून टाकले आहे. संत असतात, ते त्या झाकल्या गेलेल्या ब्रह्मस्थितीला निवडून घेतात. (११)

गोंडाळ सांडून नीर घेइजे। नीर सांडूनि क्षीर सेविजे।
माया सांडूनि अनुभविजे। ब्रह्म तैसें ॥ १२॥

शेवाळ दूर सारून पाणी घ्यावे किंवा नीरक्षीरमिश्रणातून नीर सांडून दूध सेवन करावे. तसे माया सांडून ब्रह्म अनुभवावे लागते. (१२)

ब्रह्म आकाशाऐसें निवळ। माया वसुंधरा डहुळ।
ब्रह्म सूक्ष्म केवळ। माया स्थूळरूपी ॥ १३॥

ब्रह्म आकाशासारखे निर्मळ आहे. माया वसुंधरेसारखी गढूळ असते. ब्रह्म अत्यंत सूक्ष्म, तर माया स्थूलरूप असते. (१३)

ब्रह्म तें अप्रत्यक्ष असे। माया ते प्रत्यक्ष दिसे।
ब्रह्म तें समचि असे। माया ते विषमरूपी॥ १४॥

ब्रह्म अप्रत्यक्ष असते, माया प्रत्यक्ष दिसून येते. ब्रह्म समच असते, तर माया विषमरूपी असते.(१४)

माया लक्ष ब्रह्म अलक्ष। माया साक्ष ब्रह्म असाक्ष।
मायेमध्यें दोनि पक्ष। ब्रह्मीं पक्षचि नाहीं॥ १५॥

माया लक्ष्य आहे, तर ब्रह्म अलक्ष्य आहे. माया साक्ष्य आहे, तर ब्रह्म असाक्ष्य आहे. मायेमध्ये मी व तू असे दोन पक्ष आहेत, तर ब्रह्म हे अपक्ष आहे.(१५)

माया पूर्वपक्ष ब्रह्मसिद्धांत। माया असंत ब्रह्म संत।
ब्रह्मासि नाहीं करणें हेत। मायेसि आहे ॥ १६॥

माया पूर्वपक्ष म्हणजे मिथ्या आहे, तर ब्रह्म सिद्धांत आहे. माया अनित्य आहे, तर ब्रह्म नित्य आहे. ब्रह्माला हेतू नाही, कर्म नाही, तर माया हेतुयुक्त व कर्ममय आहे.(१६)

ब्रह्म अखंड घनदाट। माया पंचभूतिक पोचट।
ब्रह्म तें निरंतर निघोट। माया ते जुनी जर्जरी॥ १७॥

ब्रह्म अखंड ओतप्रोत आहे, तर माया पांचभौतिक आणि पोकळ आहे. ब्रह्म हे निरंतर परिपूर्ण आहे तर माया जुनी, जर्जर आहे. (१७)

माया घडे ब्रह्म घडेना। माया पडे ब्रह्म पडेना।
माया विघडे ब्रह्मविघडेना। जैसें तैसें ॥ १८॥

माया घडवली जाते, ते घडवले जात नाही. माया पडते, ब्रह्म पडत नाही. माया बाधित होते, ब्रह्म बाधित होत नाही. ते जसेच्या तसेच असते. (१८)

ब्रह्म असतचि असे। माया निरसितांच निरसे।
ब्रह्मास कल्पांत नसे। मायेसि आहे ॥ १९॥

ब्रह्म नेहमीच असते. मायेचे निरसन केले असता ती नाहीशी होते. ब्रह्माला कल्पान्त नाही, मायेला कल्पान्त आहे. (१९)

माया कठिण ब्रह्मकोमळ। माया अल्प ब्रह्म विशाळ।
माया नासे सर्वकाळ। ब्रह्मचि असे ॥ २०॥

माया कठीण तर ब्रह्म अत्यंत कोमल, माया अल्प तर ब्रह्म विशाल आहे. माया नाशिवंत आहे, तर ब्रह्म सर्वकाळ असते. (२०)

वस्तु नव्हे बोलिजे ऐसी। माया जैसी बोलिजे तैसी।
काळ पावेना वस्तुसी। मायेसी झडपी ॥ २१॥

ब्रह्म हे वाणीने वर्णन करता येण्याजोगे नाही, तर मायेचे जसे वर्णन करावे तशी ती असते. काळ मायेवर झडप घालतो, तर तो ब्रह्मास स्पर्शही करू शकत नाही.(२१)

नाना रूप नाना रंग। तितुका मायेचा प्रसंग।
माया भंगे ब्रह्म अभंग। जैसें तैसें ॥ २२॥

नाना रूपे, नाना रंग हा सर्व मायेचा विलास आहे. माया नष्ट होते, ब्रह्म हे जसेच्या तसे अभंग राहते.(२२)

आतां असो हा विस्तार। चालत जातें सचराचर।
तितुकी माया परमेश्वर। सबाह्यअभ्यंतरीं ॥ २३॥

असो. आता हा विस्तार पुरे झाला. या जगात जे काही चराचर निर्माण होते व नष्ट होते तितकी सर्व माया आहे. परमेश्वर हा सबाह्य अभ्यंतरी व्यापून असतो.(२३)

सकळ उपाधीवेगळा। तो परमात्मा निराळा।
जळीं असोनि नातळे जळा। आकाश जैसें ॥ २४॥

जळात असूनही आकाश जसे जळाला स्पर्शतही नाही, तसे सबाह्य अभ्यंतरी असूनही परमात्मा हा सर्व उपाधींपासून निराळा असतो. (२४)

मायाब्रह्माचें विवरण। करितां चुके जन्ममरण।
संतांस गेलियां शरण। मोक्ष लाभे ॥ २५॥

मायाब्रह्माचे विवरण केल्याने जन्ममरणाच्या चक्रातून सुटका होते. संतांना शरण गेले की, मोक्ष लाभतो.(२५)

अरे या संतांचा महिमा। बोलावया नाहीं सीमा।
जयांचेनि जगदात्मा। अंतरचि होये ॥ २६॥

ज्यांच्यामुळे प्रत्यक्ष जगदात्मा हृदयीच प्रकट होतो, त्या संतांचा महिमा अपार आणि अवर्णनीय आहे. (२६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मायाब्रह्मनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ६ : समास ६

# सृष्टिकथन

॥ श्रीराम ॥

**सृष्टीपूर्वीं ब्रह्म असे। तेथें सृष्टि मुळींच नसे।**
**आतां सृष्टि दिसत असे। तें सत्य किं मिथ्या॥ १॥**

सृष्टी निर्माण होण्यापूर्वी ब्रह्म असते. त्यावेळी सृष्टीचा मागमूसही नसतो. आता सृष्टी दिसते आहे, मग ती सत्य आहे की मिथ्या आहे. (१)

**तुम्ही सर्वज्ञ गोसांवी। माझी आशंका फेडावी।**
**ऐसा श्रोता विनवी। वक्तयासी ॥ २॥**

आपण सर्वज्ञ आहात, स्वामी आहात, तेव्हा माझ्या या शंकेचे निरसन करावे, अशी श्रोत्याने वक्त्याला विनंती केली. (२)

**आतां ऐका प्रत्योत्तर। कथेसि व्हावें तत्पर।**
**वक्ता सर्वज्ञ उदार। बोलता जाला ॥ ३॥**

त्यावर सर्वज्ञ आणि उदार वक्ता म्हणाला की, कथेला तत्पर होऊन, सावध होऊन या प्रश्नाचे उत्तर आता ऐका. (३)

**जीवभूत: सनातन। ऐसें गीतेचें वचन।**
**येणे वाक्यें सत्यपण। सृष्टीस आलें ॥ ४॥**

'जीवभूत: सनातन:' असे गीतेचे वचन आहे. या वाक्यामुळे सृष्टीला सत्यत्व प्राप्त झाले आहे. (४)

**यद्दृष्टं तन्नष्टं येणें। वाक्य सृष्टी मिथ्यापणें।**
**सत्य मिथ्या ऐसें कोणें। निवडावें ॥ ५॥**

'यद् दृष्टं तन्नष्टं' असेही शास्त्रवचन आहे. त्यायोगे सृष्टी मिथ्या आहे असे ठरते. तेव्हा सृष्टी सत्य आहे की मिथ्या आहे याचा निवाडा कोणी करावा? (५)

**सत्य म्हणों तरी नासे। मिथ्या म्हणों तरी दिसे।**
**आतां जैसें आहे तैसें। बोलिजेल ॥ ६॥**

सृष्टीला सत्य म्हणावे तर तिचा नाश होतो आणि मिथ्या आहे असे म्हणावे तर ती दिसते. म्हणून आता ती जशी आहे तशी सांगतो. (६)

**सृष्टीमध्यें बहुजन। अज्ञान आणी सज्ञान।**
**म्हणौनियां समाधान। होत नाहीं ॥ ७॥**

या सृष्टीमध्ये अनेक लोक आहेत. त्यांतील काही सज्ञान आहेत, तर काही अज्ञान आहेत. म्हणून त्यांच्या मतांमध्ये भेद असतो व त्यामुळे समाधान होत नाही. (७)

**ऐका अज्ञानाचें मत। सृष्टि आहे ते शाश्वत।**
**देव धर्म तीर्थ व्रत। सत्यचि आहे ॥ ८॥**

अज्ञानी लोकांचे काय मत आहे ते ऐका. ते म्हणतात की, सृष्टी शाश्वत आहे. देव, धर्म, तीर्थ, व्रत इत्यादी सर्व सत्यच आहे. (८)

**बोले सर्वज्ञाचा राजा। मूर्खस्य प्रतिमापूजा।**
**ब्रह्मप्रळयाच्या पैजा। घालूं पाहे ॥ ९॥**

त्यावर सर्वज्ञांचा राजा म्हणतो की, 'मूर्खस्य प्रतिमापूजा' म्हणजे मूर्ख आणि अज्ञानी असतात त्यांच्यासाठी मूर्तिपूजा असते. सृष्टीचा प्रलय झाला तरी जे उरते ते ब्रह्म होय, असे स्वानुभवाने तो पैजेवर म्हणू लागतो. (९)

**तंव बोले तो अज्ञान। तरी कां करिसी संध्यास्नान।**
**गुरुभजन तीर्थाटण। कासया फिरावें ॥ १०॥**

मग त्यावर अज्ञानी मनुष्य म्हणतो की, असे जर आहे, तर तू संध्यास्नान, गुरुभजन, तीर्थाटन करीत कशाला फिरतोस? (१०)

श्लोक

तीर्थे तीर्थे निर्मलं ब्रह्मवृंदं
वृंदे वृंदे तत्त्वचिंतानुवाद:।
वादे वादे जायते तत्त्वबोध:
बोधे बोधे भासते चंद्रचूड:॥

**अर्थ**—निरनिराळ्या तीर्थांमध्ये पवित्र ब्राह्मणांचे समुदाय असतात. त्यांत तत्त्वज्ञानाची चर्चा चालते. त्या चर्चेतून तत्त्वबोध होतो, ज्ञानाचा निश्चय होतो. त्या निश्चयातून शंकरांचे ज्ञान प्राप्त होते.

**चंद्रचूडाचें वचन। सद्गुरूचें उपासन।**
**गुरुगीतानिरूपण। बोलिलें हरें ॥ ११॥**

ज्ञानी उत्तर देत आहे की, गुरुगीतेच्या निरूपणात शंकराचे वचन आहे की, सद्गुरूची उपासना करावी. (११)

**गुरूसि कैसें भजावें। आधीं तयासि वोळखावें।**
**त्याचें समाधान घ्यावें। विवेकें स्वयें ॥ १२॥**

श्लोक

ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्‌गुरुं तं नमामि॥ १ ॥

**गुरुगीतेचें वचन। ऐसें सद्‌गुरूचें ध्यान।**
**तेथें सृष्टिमिथ्याभान। उरेल कैंचें ॥ १३॥**

**ऐसा सज्ञान बोलिला। सद्‌गुरु तो वोळखिला।**
**सृष्टि मिथ्या ऐसा केला। निश्चितार्थ ॥ १४॥**

**श्रोता ऐसें न मनी कदा। आधीक उठिला वेवादा।**
**म्हणे कैसा रे गोविंदा। अज्ञान म्हणतोसी ॥ १५॥**

**जीवभूत: सनातन:। ऐसें गीतेचें वचन।**
**तयासि तूं अज्ञान। म्हणतोसि कैसा ॥ १६॥**

**ऐसा श्रोता आक्षेप करी। विषाद मानिला अंतरीं।**
**याचें प्रत्योत्तर चतुरीं। सावध परिसावें ॥ १७॥**

**गीतेस बोलिला गोविंद। त्याचा न कळे तुज भेद।**
**म्हणौनियां वेर्थ खेद। वाहातोसी ॥ १८॥**

श्लोक

अश्वत्थ: सर्ववृक्षाणां

**माझी विभूति पिंपळ। म्हणौनि बोलिला गोपाळ।**
**वृक्ष तोडितां तत्काळ। तुटत आहे ॥ १९॥**

श्लोक

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावक:।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुत:॥ १ ॥

**शस्त्रांचेनि तुटेना। अग्निचेनि जळेना।**
**उदकामध्यें कालवेना। स्वरूप माझें ॥ २०॥**

**पिंपळ तुटे शस्त्रानें। पिंपळ जळे पावकानें।**
**पिंपळ कालवे उदकानें। नाशिवंत ॥ २१॥**

सद्गुरूची उपासना, भजन कसे करावे? तर प्रथम सद्गुरूला ओळखावे व मग त्यांनी स्वात्मानुभवाने जे समाधान प्राप्त केलेले असते ते आपण स्वत:ही विवेकाच्या योगे प्राप्त करून घ्यावे. (१२)

**अर्थ**—सद्गुरू ब्रह्मानंदस्वरूपच असतात. ते परम सुख देतात. ते केवळ ज्ञानमूर्तीच असतात. ते द्वंद्वातीत असतात. ते आकाशासारखे असतात. ते 'तत्त्वमसि' याचा साक्षात् अनुभव घेतलेले असतात. ते एकरूप, नित्य, निर्मल, पवित्र आणि अचल असतात. सर्वांच्या हृदयात साक्षीरूपाने राहतात व भावातीत, त्रिगुणरहित असतात. अशा सद्गुरूंना मी नमस्कार करतो.

हे गुरुगीतेतील वचन असून त्यात याप्रमाणे सद्गुरूंचे ध्यान वर्णिले आहे. अशा प्रकारे सद्गुरूंचे ध्यान केले असता सृष्टी मिथ्या आहे हे भान तरी कसे उरणार? (१३)

सज्ञानाने याप्रमाणे उत्तर दिले. त्याने सद्गुरूचे स्वरूप जाणले आणि सृष्टी मिथ्या आहे असा निश्चित अर्थ केला. (१४)

श्रोत्याला हे वचन मान्य होईना. तो वादविवादास अधिकच प्रवृत्त झाला आणि म्हणू लागला की, श्रीकृष्णाला तू अज्ञानी कसा रे म्हणतोस? (१५)

'जीवभूत: सनातन:' असे गीतेचे वचन आणि गीता भगवान् श्रीकृष्णांनी सांगितली आहे, त्यांना तू अज्ञानी कसा म्हणतोस? (१६)

श्रोत्याने असा आक्षेप घेतला व तो मनामध्ये दु:ख करू लागला. आता चतुर श्रोत्यांनी या आक्षेपाचे उत्तर सावध होऊन ऐकावे. (१७)

गीतेमध्ये श्रीकृष्णाने जे काही सांगितले, त्याचा अर्थ तुला कळला नाही, म्हणून तू उगीचच दु:ख करीत आहेस. (१८)

गीतेत श्रीकृष्णांनी म्हटले आहे की, 'सर्व वृक्षांत पिंपळ' ही माझी विभूती आहे. पण पिंपळ तोडला तर तो तत्काळ तुटतो. (१९)

**अर्थ**—याला शस्त्रे तोडू शकत नाहीत, अग्नी जाळीत नाही, पाणी भिजवू शकत नाही, आणि वायू याला सुकवू शकत नाही. (१)

श्रीकृष्ण सांगतात की, माझे स्वरूप असे आहे की, ते शस्त्राने तुटत नाही, अग्नी त्याला जाळू शकत नाही. पाण्याने ते कालवता येत नाही. (२०)

पिंपळ तर शस्त्राने तुटतो, अग्नीने जळतो, पिंपळ पाण्याने कालवता येतो, तो नाशिवंत असतो. (२१)

तुटे जळे बुडे उडे। आतां ऐक्य कैसें घडे।
म्हणोनि हें उजेडे। सद्‌गुरुमुखें ॥ २२ ॥

पिंपळ तुटतो, जळतो, बुडतो, उडतो. आता या दोन वाक्यांचा समन्वय कसा घालायचा? सद्गुरूंच्या मुखाने श्रवण घडले की, मगच यावर प्रकाश पडतो. (२२)

इंद्रियाणां मनश्चास्मि। कृष्ण म्हणे मन तो मी।
तरी कां आवरावी उर्मी। चंचळ मनाची ॥ २३ ॥

कृष्ण सांगतात की, 'इंद्रियाणां मनश्चास्मि' म्हणजे मन म्हणजे मी आहे, तर मग चंचळ मनाच्या ऊर्मीला आवर कशाला घालायचा? (२३)

ऐसें कृष्ण कां बोलिला। साधनमार्ग दाखविला।
खडे मांडूनि सिकविला। वोनामा जेवी ॥ २४ ॥

लोकांना साधनामार्ग दाखवावा म्हणून श्रीकृष्ण असे बोलले आहेत. जसे लहान मुलांना खडे मांडून ओनामा शिकवावा तसे हे आहे. (२४)

ऐसा आहे वाक्यभेद। सर्व जाणे तो गोविंद।
देहबुद्धीचा वेवाद। कामा नये ॥ २५ ॥

त्या वाक्याचा अर्थ असा आहे. श्रीकृष्ण सर्व काही जाणतात, तेथे देहबुद्धीचा विवाद उपयोगी पडत नाही.(२५)

वेद शास्त्र श्रुति स्मृती। तेथे वाक्यभेद पडती।
ते सर्वहि निवडती। सद्‌गुरूचेनि वचनें ॥ २६ ॥

वेद, शास्त्र, श्रुती, स्मृती यांतील वचनांमध्ये विरोधाभास वाटतो, पण श्रीसद्गुरूंच्या वचनाने सर्वांचा समन्वय कसा करावा हे कळते. (२६)

वेदशास्त्रांचें भांडण। शस्त्रें तोडी ऐसा कोण।
हें निवडेना साधुविण। कदा कल्पांती ॥ २७ ॥

वेद आणि शास्त्रे यांच्यातील भांडण, मतभेद शस्त्राने तोडता येत नाहीत. साधुपुरुषांशिवाय याचा निवाडा कधी कल्पांतापर्यंत होऊ शकत नाही. (२७)

पूर्वपक्ष आणि सिद्धांत। शास्त्रीं बोलिला संकेत।
याचा होये निश्चितार्थ। साधुमुखें ॥ २८ ॥

पूर्वपक्ष आणि सिद्धांत हे शास्त्राचे संकेत आहेत. त्यांचा निश्चित अर्थ साधुपुरुषांच्या वचनानेच कळतो.(२८)

येरवीं वादाचीं उत्तरें। येकाहूनि येक थोरें।
बोलों जातां अपारें। वेदशास्त्रीं ॥ २९ ॥

वादामध्ये एकाहून एक वरचढ अशा शंका निघत असतात आणि त्यांची एकापेक्षा एक वरचढ अशी उत्तरेही दिली जातात. वेदशास्त्रात असे पूर्वपक्ष व उत्तरपक्ष इतके भरलेले आहेत की सांगणे कठीण. (२९)

म्हणोनि वादवेवाद। सांडून कीजे संवाद।
तेणें होये ब्रह्मानंद। स्वानुभवें ॥ ३० ॥

म्हणून वादविवाद सोडून संवाद साधावा. म्हणजे त्यायोगे स्वानुभवाने ब्रह्मानंद प्राप्त होतो. (३०)

येके कल्पनेचे पोटीं। होति जाती अनंत सृष्टी।
तया सृष्टीची गोष्टी। साच केवी ॥ ३१ ॥

एका कल्पनेच्या योगाने अनंत सृष्टी उत्पन्न होतात व नाश पावतात. अशा सृष्टींना सत्य कसे म्हणावे? (३१)

कल्पनेचा केला देव। तेथें जाला दृढभाव।
देवालागीं येतां खेव। भक्त दुःखें दुःखवला ॥ ३२ ॥

कल्पनेने देव मानला आणि तेथे दृढभाव झाला की त्या देवाला अपाय होताच भक्त अत्यंत दुःखी होतो.(३२)

पाषाणाचा देव केला। येके दिवसीं भंगोन गेला।
तेणें भक्त दुखवला। रडे पडे आक्रंदे ॥ ३३ ॥

पाषाणाचा देव केला आणि एके दिवशी तो भंगला. त्यामुळे त्या भक्ताला दुःख झाले व तो रडू लागला. जमिनीवर पडून दुःखाने गडबडा लोळू लागला. मोठ्याने आक्रोश करू लागला. (३३)

देव हारपला घरीं। येक देव नेला चोरीं।
येक देव दुराचारीं। फोडिला बळें ॥ ३४ ॥

एक देव घरातच हरवला. एक देव कोणी चोरून नेला. एक देव कुणी दुराचारी माणसाने जबरदस्तीने फोडूनच टाकला. (३४)

येक देव जापाणिला। एक देव उदकीं टाकिला।
येक देव नेऊनि घातला। पायातळीं ॥ ३५ ॥

एक देव भ्रष्ट केला गेला, एक देव कुणी पाण्यात बुडवला तर एक देव कुणी पायदळी तुडवला.(३५)

काय सांगों तीर्थमहिमा। मोडूनि गेला दुरात्मा।
थोर सत्व होतें तें मा। काय जालें कळेना ॥ ३६ ॥

लोक म्हणू लागले की खरोखर या तीर्थाचा किती महिमा होता! दुरात्म्यांनी तो नाहीसा करून टाकला आहे! खरोखर स्थान किती जागृत होते, पण आता ते सत्त्व कोठे गेले कळत नाही! (३६)

देव घडिला सोनारीं। देव वोतिला वोतारीं।
येक देव घडिला पाथरीं। पाषाणाचा ॥ ३७॥

नर्बदागंडिकातीरीं। देव पडिले लक्षवरी।
त्यांची संख्या कोण करी। असंख्यात गोटे ॥ ३८॥

चक्रतीर्थी चक्रांकित। देव असती असंख्यात।
नाहीं मनीं निश्चितार्थ। येक देव ॥ ३९॥

बाण तांदळे तांब्रनाणें। स्फटिक देव्हारीं पूजणें।
ऐसे देव कोण जाणें। खरे किं खोटे ॥ ४०॥

देव रेसिमाचा केला। तोहि तुटोनियां गेला।
आतां नवा नेम धरिला। मृत्तिकेचा ॥ ४१॥

आमचा देव बहु सत्य। आम्हां आकांतीं पावत।
पूर्ण करी मनोरथ। सर्वकाळ ॥ ४२॥

आतां याचें सत्व गेलें। प्राप्त होतें तें जालें।
प्राप्त न वचे पालटिलें। ईश्वराचेनी ॥ ४३॥

धातु पाषाण मृत्तिका। चित्रलेप काष्ठ देखा।
तेथें देव कैंचा मूर्खा। भ्रांति पडिली ॥ ४४॥

हे आपुली कल्पना। प्राप्तांऐसीं फळें जाणा।
परी त्या देवाचिया खुणा। वेगळ्याचि ॥ ४५॥

म्हणौनि हें मायाभ्रमणें। सृष्टि मिथ्या कोटिगुणें।
वेद शास्त्रें पुराणें। ऐसींच बोलती ॥ ४६॥

साधुसंत मानुभाव। त्यांचा ऐसाचि अनुभव।
पंचभूतातीत देव। सृष्टि मिथ्या ॥ ४७॥

सृष्टीपूर्वी सृष्टि चालतां। सृष्टि अवघी संव्हारतां।
शाश्वत देव तत्वतां। आदिअंतीं ॥ ४८॥

ऐसा सर्वांचा निश्चयो। येदर्थी नाहीं संशयो।
वीतरेक आणि अन्वयो। कल्पनारूप ॥ ४९॥

येके कल्पनेचे पोटीं। बोलजेती अष्ट सृष्टि।
तया सृष्टीची गोष्टी। सावध ऐका ॥ ५०॥

येकी कल्पनेची सृष्टी। दुजी शाब्दिक सृष्टी।
तिजी प्रत्यक्ष सृष्टी। जाणती सर्व ॥ ५१॥

एक देव सोनाराने घडवला, एक देव ओतार्‍याने ओतला. पाषाणाचा पाथरवटाने घडविला. (३७)

नर्मदेच्या, गंडकीच्या तीरावर लक्षावधी देव पडलेले असतात. या प्रकारे अज्ञानी लोकांची स्थिती असते. देव एकच आहे, असा दृढ निश्चय त्यांच्या ठिकाणी नसतो.(३८-३९)

शंकराचे बाण, शेंदूर फासलेले दगड, तांब्याची नाणी, स्फटिक इत्यादी नाना प्रकारचे देव देव्हार्‍यात पूजिले जातात. ते खरे की खोटे हे कोण जाणणार? (४०)

रेशमाचा देव केला. तोही तुटून गेला, तेव्हा आता नवीन नेम धरला आणि मृत्तिकेच्या देवाची पूजा सुरू केली. (४१)

त्या त्या देवाचे भक्त म्हणतात की, आमचा देवच खरा आहे. आम्हांला संकटाच्या वेळी पावत असे. आणि सर्वकाळ आमचे मनोरथ तो पूर्ण करीत असे. (४२)

आता याचे सत्त्व गेले आहे. त्यामुळे जे प्रारब्धात होते ते भोग आता प्राप्त होत आहेत. प्रारब्ध चुकविता येत नाही. ईश्वरसुद्धा काही करू शकत नाही. (४३)

याप्रमाणे लोक धातू, पाषाण, मृत्तिका, चित्रे, लाकूड इत्यादींच्या मूर्ती करून त्यांची पूजा करतात. श्रीसमर्थ म्हणतात की, मूर्खा, तुला भूल पडली आहे. या सर्वांत देव कुठे आहे? (४४)

ही सगळी आपली कल्पना आहे. आपल्या प्रारब्धानुसार आपल्याला सुखदु:खे भोगावी लागतात. खर्‍या देवाच्या खुणा काही वेगळ्याच असतात. म्हणून ही सर्व मायेची करणी आहे. ही सृष्टी कोटिगुणांनी मिथ्या आहे असे वेद, शास्त्रे, पुराणे सर्व एकमताने सांगतात. (४५-४६)

साधुसंत, महानुभाव या सर्वांचा अनुभव असाच आहे की, पांचभौतिक सृष्टी ही मिथ्या आहे. खरा देव या सर्वांच्या अतीत आहे. (४७)

सृष्टी होण्यापूर्वी, सृष्टी असताना आणि सर्व सृष्टीचा संहार झाल्यावर आधी आणि अंती देव तत्त्वत: शाश्वत असल्याने जसाच्या तसाच असतो. (४८)

वरील सर्वांचा हा स्वानुभवाचा निश्चय आहे. येथे संशयाला जागा नाही. सृष्टीचा संहार आणि उभारणी सर्व कल्पनारूप आहे. (४९)

एका कल्पनेमुळे आठ प्रकारची सृष्टी निर्माण होते. ते सर्व सांगतो. सावधपणे ऐका. (५०)

एक कल्पनेची सृष्टी, दुसरी शाब्दिक सृष्टी, तिसरी आपल्या डोळ्यांना प्रत्यक्ष दिसणारी सृष्टी, हिला सर्वच जाणतात. (५१)

चौथी चित्रलेपसृष्टी। पांचवी स्वप्नसृष्टी।
साहावी गंधर्वसृष्टी। ज्वरसृष्टी सातवी ॥ ५२ ॥
आठवी दृष्टिबंधन। ऐशा अष्ट सृष्टि जाण।
यामधें श्रेष्ठ कोण। सत्य मानावी ॥ ५३ ॥

चौथी चित्रलेप सृष्टी, पाचवी स्वप्नसृष्टी, सहावी गंधर्वसृष्टी, सातवी ज्वरसृष्टी, आठवी सृष्टी दृष्टिबंधन, अशा एकूण आठ सृष्टींमध्ये श्रेष्ठ कोणती आणि सत्य कोणती मानावी? (५२-५३)

म्हणोनि सृष्टी नासिवंत। जाणती संत महंत।
सगुणीं भजावें निश्चित। निश्चयालागीं ॥ ५४ ॥

म्हणून सर्व सृष्टी नाशिवंत आहेत, हे सर्व संतमहंत जाणतात. पण हा सर्व निश्चय दृढ होण्यासाठी सगुणास भजावे लागते. (५४)

सगुणाचेनि आधारें। निर्गुण पाविजे निर्धारें।
सारासारविचारें। संतसंगें ॥ ५५ ॥

सगुणाच्या आधाराने निर्गुणाची प्राप्ती निर्धारपूर्वक करून घ्यावी. त्यासाठी संतसंगती व सारासारविचार यांची आवश्यकता असते. (५५)

आतां असो हें बहुत। संतसंगें कळे नेमस्त।
येऱ्हवीं चित्त दुश्चित। संशईं पडे ॥ ५६ ॥

असो. आता हे खूप झाले. संतसंगतीनेच हे सर्व निश्चितपणे कळून येते. संतसंग व सारासारविचार नसेल तर चित्त चलबिचल होऊन संशयात पडते. (५६)

तव शिष्यें आक्षेपिलें। सृष्टी मिथ्या ऐसें कळलें।
परी हें अवघें नाथिलें। तरी दिसतें कां ॥ ५७ ॥

तेव्हा शिष्यांनी आक्षेप घेतला की, सृष्टी मिथ्या हे कळले. परंतु हे अवघे जर मिथ्या आहे तर मग दृष्टीला कसे दिसते? (५७)

दृश्य प्रत्यक्ष दिसतें। म्हणोन सत्यचि वाटतें।
यासि काय करावें तें। सांगा स्वामी ॥ ५८ ॥

दृश्य प्रत्यक्ष दिसत असल्याने ते सत्यच वाटते. तरी हे स्वामी, याला काय करावे, ते कृपा करून सांगा. (५८)

याचें प्रत्योत्तर भलें। पुढिलें समासीं बोलिलें।
श्रोतां श्रवण केलें। पाहिजे पुढें ॥ ५९ ॥

याचे प्रत्युत्तर पुढील समासात सांगितले आहे. श्रोत्यांनी ते पुढे श्रवण केले पाहिजे. (५९)

एवं सृष्टी मिथ्या जाण। जाणोनि रक्षावें सगुण।
ऐसी हे अनुभवाची खूण। अनुभवी जाणती ॥ ६० ॥

म्हणून सृष्टी मिथ्या आहे, हे जाणूनच सगुणाचे रक्षण करावे. अशी ही अनुभवाची खूण अनुभवीच जाणतात. (६०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सृष्टिकथननाम' समास सहावा समाप्त.**

❑❑

## दशक ६ : समास ७

# सगुणभजन

॥ श्रीराम ॥

ज्ञानें दृश्य मिथ्या जालें। तरी कां पाहिजे भजन केलें।
तेणें काये प्राप्त जालें। हें मज निरोपावें ॥ १ ॥

श्रोता येथे प्रश्न विचारीत आहे की, ज्ञान झाले की दृश्य मिथ्या हे कळून येते, तर मग भजन कशासाठी करायचे? भजन केल्याने काय प्राप्त होते, हे आपण मला वर्णन करून सागा. (१)

ज्ञानाहूनि श्रेष्ठ असेना। तरी कां पाहिजे उपासना।
उपासनेनें जना। काये प्राप्त ॥ २ ॥

आपण म्हणता की, ज्ञानाहून श्रेष्ठ दुसरे काही नाही. मग उपासना कशाला करायला हवी? उपासना केल्याने लोकांना काय प्राप्त होते? (२)

मुख्य सार तें निर्गुण। तेथें दिसेचिना सगुण।
भजन केलियाचा गुण। मज निरोपावा ॥ ३ ॥

निर्गुण हे जर मुख्य सार आहे आणि तेथे सगुणाचा मागमूसही नसतो, तर मग भजन केल्याने काय विशेष गुण प्राप्त होतो हे मला समजावून सांगा. (३)

जें समस्त नासिवंत। त्यासि भजावें किंनिमित्य।
सत्य सांडून असत्य। कोणें भजावें ॥ ४॥

जर सर्व काही नाशिवंत आहे, तर त्याला कशासाठी भजायचे? सत्य असणाऱ्या निर्गुणाला सोडून असत्य सगुणाचे भजन कोणी करावे? (४)

असत्याचा प्रत्यये आला। तरी मग नेम कां लागला।
सत्य सांडून गल्बला। कासया करावा ॥ ५॥

सगुण असत्य आहे असा प्रत्यय आला असताही सगुण उपासनेचा नेम कशाला पाळायचा? सत्य सोडून गलबला कशाला करायचा? (५)

निर्गुणानें मोक्ष होतो। प्रत्यक्ष प्रत्यया येतो।
सगुण काये देऊं पाहातो। सांगा स्वामी ॥ ६॥

निर्गुणाने मोक्ष लाभतो हे प्रत्यक्ष अनुभवास येते. सगुणाने काय लाभ होतो हे स्वामी, आपण कृपा करून सांगावे. (६)

सगुण नासिवंत ऐसें सांगतां। पुन्हा भजन करावें म्हणतां।
तरी काशासाठीं आतां। भजन करूं ॥ ७॥

आपणच सगुण नाशिवंत आहे असे सांगता आणि सगुणाचे भजन करावे असेही म्हणता. तरी आता सगुणाचे भजन मी कशासाठी करू? (७)

स्वामीचे भिडेनें बोलवेना। येऱ्हवीं हें कांहींच मानेना।
साध्यचि जालियां साधना। कां प्रवर्तावें ॥ ८॥

स्वामींच्या भिडेमुळे बोलता येत नाही. पण मनाला हे काहीच पटत नाही. साध्याची प्राप्ती झाल्यावर साधन करण्याची आवश्यकताच काय? (८)

ऐसें श्रोतयाचें बोलणें। शब्द बोले निर्बुजलेपणें।
याचें उत्तर ऐकणें। म्हणे वक्ता ॥ ९॥

याप्रमाणे गोंधळून जाऊन श्रोत्याने स्वामींना प्रश्न केले. वक्ता म्हणतो की, या प्रश्नाचे उत्तर आता ऐका. (९)

गुरुचें वचन प्रतिपाळणे। हें मुख्य परमार्थाचें लक्षण।
वचनभंग करितां विलक्षण। सहजेंचि जालें ॥ १०॥

गुरूचे वचन प्रतिपाळणे, त्यांच्या आज्ञेप्रमाणे वागणे हे परमार्थाचे मुख्य लक्षण आहे. गुरूंच्या आज्ञेचा भंग केला तर सहजच विपरीत घडून येते. (१०)

म्हणोनि आज्ञेसी वंदावे। सगुणभजन मानावें।
श्रोता म्हणे हें देवें। कां प्रयोजिलें ॥ ११॥

म्हणून त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानावी आणि त्यास अनुसरून सगुण भजन करावे. श्रोता विचारतो आहे की, हे देवा, सगुण भजनाचे प्रयोजन काय? (११)

काय मानिला उपकार। कोण जाला साक्षात्कार।
किंवा प्रारब्धाचें अक्षर। पुसिलें देवें ॥ १२॥

सगुण भजनाने काही उपकार घडतो का? किंवा काही साक्षात्कार होतो का? किंवा प्रारब्धातील वाईट अक्षरे देव पुसून टाकतो का? (१२)

होणार हें तों पालटेना। भजनें काय करावें जना।
हें तों पाहातां अनुमाना। कांहींच नये ॥ १३॥

प्रारब्धात जसे लिहिलेले असते त्याप्रमाणे सर्व काही होत असते, त्यात बदल होऊ शकत नाही, असे म्हणतात. मग लोकांनी भजन कशासाठी करायचे? असा विचार करू लागले की, सगुण भजन कशासाठी करायचे याबद्दल काहीच अनुमान करता येत नाही. (१३)

स्वामीची आज्ञा प्रमाण। कोण करील अप्रमाण।
परंतु याचा काय गुण। मज निरोपावा ॥ १४॥

स्वामींची आज्ञा मला प्रमाण आहे. तिला अप्रमाण कोण म्हणेल? पण या सगुण भजनाचे काय वैशिष्ट्य आहे, ते आपण मला समजावून सांगावे. (१४)

वक्ता म्हणे सावधपणें। सांग ज्ञानाचीं लक्षणें।
तुज कांहीं लागे करणें। किंवा नाहीं ॥ १५॥

यावर वक्ता म्हणतो की, तुला ज्ञानाची लक्षणे माहीत असतील, तर मला असे सांग की, ज्ञान झाल्यावर तुला देहाने कर्म करावे लागते की नाही? (१५)

करणें लागे भोजन। करणें लागे उदकप्राशन।
मळमूत्रत्यागलक्षण। तेंहि सुटेना ॥ १६॥

तुला भोजन करावे लागते, पाणी प्यावे लागते, मळमूत्र त्याग करावा लागतो. यातील काहीसुद्धा सुटत नाही. (१६)

जनाचें समाधान राहावें। आपुलें पारिखें वोळखावें।
आणि भजनचि मोडावें। हें कोण ज्ञान ॥ १७॥

आपल्याशी संबंधित व्यक्तीचे समाधान टिकावे याप्रकारे तुला वागावे लागते, आपले व परके हे तुला ओळखावे लागते, मग हे सर्व जर सोडून चालत नाही, तर मग सगुण भजनाचा त्याग करणे हे कुठल्या प्रकारचे ज्ञान? (१७)

ज्ञानविवेकें मिथ्या जालें। परंतु अवघें नाहीं टाकिलें।
तरी मग भजनेंचि काय केलें। सांग बापा ॥ १८ ॥

ज्ञानाच्या विवेकामुळे सर्व दृश्य सृष्टी मिथ्या हे जाणले, तरी देह जोपर्यंत असतो, तोपर्यंत जीवननिर्वाहासाठी आवश्यक ते सर्व करावेच लागते. सर्वांचा त्याग करता येत नाही. मग सगुण भजनानेच काय पाप केले आहे? अरे बाबा, ते तरी सांग. (१८)

साहेबास लोटांगणीं जावें। नीचासारिखें व्हावें।
आणी देवास न मनावें। हें कोण ज्ञान ॥ १९ ॥

धन्याच्या पुढे लाचारीने लोटांगणे घालावीत, अत्यंत दीनवाणे व्हावे आणि सगुण देवास तेवढे मानू नये हे कुठले ज्ञान? (१९)

हरीहर ब्रह्मादिक। हे जयाचे आज्ञाधारक।
तूं येक मानवी रंक। भजेसिना तरी काय गेलें॥ २० ॥

प्रत्यक्ष ब्रह्मा, विष्णू, महेश ज्याची आज्ञा पाळतात, त्याला तुझ्यासारख्या क्षुल्लक मानवी प्राण्याने, रंकाने भजले नाही, तरी त्या परमेश्वराचे काय बिघडणार आहे? (२०)

आमुचे कुळीं रघुनाथ। रघुनाथें आमुचा परमार्थ।
जो समर्थाचाहि समर्थ। देवां सोडविता ॥ २१ ॥

आमच्या कुळात रघुनाथ हे आमचे कुलदैवत आहे. रघुनाथ हाच आमचा परमार्थ आहे. सर्व देवांना बंदीखान्यातून ज्याने सोडविले तो रघुनाथ समर्थांचाही समर्थ आहे.(२१)

त्याचे आम्ही सेवकजन। सेवेकरितां जालें ज्ञान।
तेथें अभाव धरितां पतन। पाविजेल कीं ॥ २२ ॥

आम्ही त्या रघुनाथाचे सेवक आहोत आणि त्याची सेवा केल्यामुळेच आम्हांला निर्गुणाचेही ज्ञान झाले आहे. त्या रघुनाथाच्या ठिकाणी श्रद्धा, भाव जर ठेवला नाही, तर निश्चितच अध:पतन होईल! (२२)

गुरु सांगती सारासार। त्यास कैसें म्हणावें असार।
तुज काय सांगणें विचार। शाहाणे जाणती ॥ २३ ॥

गुरू सारासारविचार करण्यास शिकवितात आणि तेच सगुणभजन करण्यास सांगतात, तर त्याला असार कसे म्हणावे? पण हा विचार शहाणे लोक जाणतात. तू अज्ञानी असल्याने तुला हा विचार सांगितला तरी कसा पटणार?(२३)

समर्थाचे मनीचें तुटे। तेंचि जाणावें अदृष्ट खोटें।
राज्यपदापासून करंटें। चेवलें जैसें ॥ २४ ॥

ज्ञानी समर्थ पुरुषांच्या मनातून उतरणे यालाच दुर्दैव जाणावे. राज्यापासून च्युत झालेल्या अभागी माणसासारखी त्याची स्थिती होते. (२४)

मी थोर वाटे मनीं। तो नव्हे ब्रह्मज्ञानी।
विचार पाहातां देहाभिमानी। प्रत्यक्ष दिसे ॥ २५ ॥

ज्याला मी फार मोठा ब्रह्मज्ञानी असे वाटू लागते, त्याच्यासंबंधी विचार केला असता तो तर देहाभिमानी आहे असेच प्रत्यक्ष दिसून येते. (२५)

वस्तुभजन करीना। ना न करीं ऐसेंही म्हणेना।
तरी हे जाणावी कल्पना। दडोन राहिली ॥ २६ ॥

एखादा माणूस आत्मस्वरूपाचे अनुसंधानही ठेवत नाही. मी ठेवत नाही असेही म्हणत नाही. अशा माणसाच्या मनात देहाभिमान दडून राहिलेला असतो, हे जाणून घ्यावे.(२६)

ना तें ज्ञान ना तें भजन। उगाचि आला देहाभिमान।
येथें नाहीं किं अनुमान। प्रत्यय तुझा ॥ २७ ॥

अशा माणसाच्या ठिकाणी आत्मज्ञानही नसते अथवा सगुणाचे भजनही नसते. व्यर्थ देहाभिमान मात्र असतो. येथे अनुमान करण्याची आवश्यकता नाही. हा तर तुझा प्रत्यक्ष अनुभवच आहे. (२७)

तरी आतां ऐसें न करावें। रघुनाथभजनीं लागावें।
तेणेंचि ज्ञान बोलावें। चळेना ऐसें ॥ २८ ॥

तरी आता यापुढे असे वागू नये. रघुनाथाचे भजन करण्यास आरंभ करावा. त्यायोगे जे कधी अधिक-उणे होत नाही, असे अत्यंत निश्चल असे आत्मज्ञान प्राप्त होते.(२८)

करी दुर्जनाचा संव्हार। भक्तजनासी आधार।
ऐसा हा तों चमत्कार। रोकडा चाले ॥ २९ ॥

रघुनाथ दुर्जनांचा संहार करतो, भक्तांना आधार देतो, त्यांचे सर्वप्रकारे रक्षण करीत असतो. हा चमत्कार तर प्रत्यक्ष दिसून येतो. (२९)

**मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासोन जातें।**
**कृपा केलियां रघुनाथें। प्रचित येते ॥ ३० ॥**

आपण मनात जो जो संकल्प करावा, तो तो पूर्ण होतो, त्यात येणारी सर्व विघ्ने नाहीशी होतात. रघुनाथाने कृपा केली म्हणजे असा अनुभव येतो. (३०)

**रघुनाथभजनें ज्ञान जालें। रघुनाथभजनें महत्त्व वाढलें।**
**म्हणौनियां तुवां केलें। पाहिजे आधीं ॥ ३१ ॥**

रघुनाथभजनामुळेच मला आत्मज्ञान झाले आहे. रघुनाथभजनामुळेच माझे महत्त्व वाढले आहे, असा माझा स्वत:चा अनुभव आहे. म्हणून तूसुद्धा प्रथम रघुनाथाचे-सगुणाचे भजन केले पाहिजेस. (३१)

**हें तों आहे सप्रचित। आणी तुज वाटेना प्रचित।**
**साक्षात्कारें नेमस्त। प्रत्ययो करावा ॥ ३२ ॥**

हे सर्व स्वानुभवावरून मी सांगत आहे. पण ते तुला खरे वाटत नाही असे वाटते. तरी तूही स्वत: रघुनाथभजनाने आत्मसाक्षात्कार करून घे. म्हणजे तुला माझे म्हणणे पटेल. (३२)

**रघुनाथ स्मरोनि कार्य करावें। तें तत्काळचि सिद्धि पावे।**
**कर्ता राम हें असावें। अभ्यांतरीं ॥ ३३ ॥**

रघुनाथस्मरण करून कुठलेली कार्य करावे म्हणजे ते तत्काळ सिद्धीस जाते. मनात नेहमी स्मरण ठेवावे की, रामच कर्ता आहे. (३३)

**कर्ता राम मी नव्हेआपण। ऐसें सगुणनिवेदन।**
**निर्गुणीं तें अनन्य। निर्गुणचि होईजे ॥ ३४ ॥**

राम कर्ता आहे, मी स्वत: कर्ता नाही, असा दृढ निश्चय करणे हेच सगुणनिवेदन होय. निर्गुणोपासनेत साधक निर्गुणाशी अनन्य होऊन जातो. (३४)

**मी कर्ता ऐसें म्हणतां। कांहींच घडेना सर्वथा।**
**प्रचित पाहासी तरी आतां। सीघ्रचि पाहें ॥ ३५ ॥**

मी कर्ता आहे अशा भावनेने कार्य करू लागल्यास ते सिद्धीस जात नाही. आपल्या मनासारखे काहीच घडत नाही, याचा अनुभव घ्यायचा असेल तर तो लगेचही येऊ शकतो. (३५)

**मी कर्ता ऐसें म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी।**
**राम कर्ता म्हणतां पावसी। येश कीर्ती प्रताप॥ ३६ ॥**

मी कर्ता असे म्हणू लागलास की, कार्यसिद्धी तर होत नाहीच, उलट असे म्हणणारा कार्य कसे होईल वगैरे चिंतेमुळे कष्टी मात्र होतो. याउलट राम कर्ता असा दृढ निश्चय केल्याने कार्य तर सिद्धीस जाते. शिवाय यश, कीर्ती, प्रताप यांची प्राप्ती होते. (३६)

**येके भावनेसाठीं। देवासीं पडे तुटी।**
**कां ते होये कृपादृष्टी। देव कर्ता भावितां॥ ३७ ॥**

'मी कर्ता' या एका भावनेमुळे देव दुरावतो. देवात व आपल्यात अंतर पडते. याउलट देव कर्ता अशी भावना केली की, देवाची कृपादृष्टी होते. (३७)

**आपण आहे दों दिसांचा। आणी देव बहुतां काळांचा।**
**आपण थोडे वोळखिचा। देवासि त्रैलोक्य जाणे॥ ३८ ॥**

आपण दोन दिवसांचे असतो, तर देव फार प्राचीन आहे. आपण अत्यंत क्षुद्र आहोत. आपल्याला फारच थोडे लोक ओळखतात. देवाला त्रैलोक्य जाणते. (३८)

**याकारणें रघुनाथभजन। त्यासी मानिती बहुत जन।**
**ब्रह्मादिक आदिकरून। रामभजनीं तत्पर ॥ ३९ ॥**

म्हणून ब्रह्मादी देवही ज्या रामाच्या भजनात तत्पर असतात, ज्याला अनेक लोक मानतात, त्या रघुनाथाचे भजन करावे. (३९)

**ज्ञानबळें उपासना। आम्ही भक्त जरी मानूं ना।**
**तरी या दोषाच्या पतना। पावों अभक्तपणें॥ ४० ॥**

श्रीसमर्थ सांगतात की, आम्ही भक्त आहोत. आम्हांला रघुनाथकृपेने आत्मज्ञान झालेले आहे. त्या ज्ञानाच्या बळावर जर आम्ही उपासनेचा अनादर करू लागलो, तर अभक्तपणामुळे आम्हांला दोष लागेल व आमचे पतन होईल. (४०)

**देव उपेक्षी थोरपणें। तरी मग त्याचें तो जाणे।**
**अप्रमाण तें श्लाघ्यवाणें। नव्हे किं श्रेष्ठा ॥ ४१ ॥**

ज्ञानाच्या अहंकाराने जर कुणी देवाची उपेक्षा करू लागले तर त्याचे परिणाम त्याला भोगावेच लागतील. ते ज्याचे त्याने पाहून घ्यावे. स्वानुभवाच्या उलट असल्याने जे अप्रमाण आहे, ते श्रेष्ठ पुरुषांना कधीही प्रशंसनीय वाटत नाही. (४१)

देहास लागली उपासना। आपण विवेकें उरेना।
ऐसी स्थिति सज्जना। अंतरींची ॥ ४२॥

देहाने सगुणाची उपासना करायची आणि विवेकाने देहाहंता त्यागून स्वानंदसुखात मग्न असायचे अशी संतांची अंतरातील स्थिती असते. (४२)

सकळ मिथ्या होऊन जातें। हे रामभजनें कळों येतें।
दृश्य ज्ञानियांचेनि मतें। स्वप्न जैसें ॥ ४३॥

रामभजनाने म्हणजे सगुणभजनानेच सर्व दृश्य सृष्टी मिथ्या आहे हे कळून येते. ज्ञानी पुरुषांच्या मते हे सर्व दृश्य जगत स्वप्नासारखेच आहे. (४३)

मिथ्या स्वप्नविवंचना। तैसी सृष्टीची रचना।
दृश्य मिथ्या साधुजना। कळों आलें ॥ ४४॥

स्वप्न मिथ्या असते म्हणून त्यातील काळजीही मिथ्याच असते. त्याप्रमाणे सृष्टीची रचना, सर्व दृश्य जग हे मिथ्या आहे हे साधुजनांना कळून येते. (४४)

आक्षेप जाला श्रोतयांसी। मिथ्या तरी कां दिसतें आम्हांसी।
याचें उत्तर पुढीले समासीं। बोलिलें असे ॥ ४५॥

हे सर्व ऐकल्यावर श्रोत्यांनी शंका उपस्थित केली की, हे सर्व मिथ्या आहे, तर ते आम्हांला का दिसते? याचे उत्तर पुढल्या समासात दिले आहे, असे समर्थ म्हणतात. (४५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सगुणभजननाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक ६ : समास ८

## दृश्यनिर्शन

॥ श्रीराम ॥

मागां श्रोतीं पुसिलें होतें। दृश्य मिथ्या तरी कां दिसतें।
याचें उत्तर बोलिजेल तें। सावध ऐका ॥ १॥

पूर्वी श्रोत्यांनी विचारले होते की, दृश्य जर मिथ्या आहे, तर ते का दिसते? याचे उत्तर आता सांगतो. ते सावध होऊन ऐका. (१)

देखिलें तें सत्यचि मानावें। हें ज्ञात्याचें देखणें नव्हे।
जड मूढ अज्ञान जीवें। हें सत्य मानिजे ॥ २॥

डोळ्यांना जे जे काही दिसते ते खरे मानायचे, हे ज्ञानी पुरुषांचे पाहणे नव्हे. जड, मूढ, अज्ञानी जीव त्याला सत्य मानतात. (२)

येक्या देखिल्यासाठीं। लटिक्या कराव्या ग्रंथकोटी।
संतांमहंतांच्या गोष्टी। त्याहि मिथ्या मानाव्या ॥ ३॥

केवळ डोळ्यांना जे दिसते तेच खरे असा आग्रह धरला, तर कोट्यवधी ग्रंथांना खोटे ठरवावे लागेल. एवढेच नव्हे, तर संतमहंत जे सांगतात त्या वचनांनाही मिथ्या मानावे लागेल. (३)

माझें दिसतें हेंचि खरें। येथें चालेना दुसरें।
ऐशिया संशयाच्या भरें। भरोंचि नये ॥ ४॥

मला जे दिसते तेच खरे, दुसरे सर्व खोटे, अशा संशयाच्या भरीस पडून दुराग्रह धरू नये. (४)

मृगें देखिलें मृगजळ। तेथें धावतें बरळ।
जळ नव्हे मिथ्या सकळ। त्या पशूस कोणें म्हणावें ॥ ५॥

एखाद्या हरिणाने मृगजळ पाहिले व त्या वेड्याला तेथे पाणीच आहे असे वाटून ते त्याकडे धावत सुटले तर तेथे पाणी नसून केवळ पाण्याचा मिथ्या भास आहे, हे त्या पशूला कोण समजावून सांगणार? (५)

रात्रौ स्वप्न देखिलें। बहुत द्रव्य सांपडलें।
बहुत जनांसी वेव्हारिलें। तें खरें कैसेनि मानावें ॥ ६॥

एका माणसाला रात्री स्वप्नात खूप द्रव्य सापडले. त्याने त्या द्रव्याने अनेकजणांशी व्यवहारही केले, तर ते खरे कसे मानावे? (६)

कुशळ चितारी विचित्र। तेणें निर्माण केलें चित्र।
देखतां उठे प्रीति मात्र। परंतु तेथें मृत्तिका ॥ ७॥

एखाद्या कुशल चितार्‍याने मोठे सुंदर चित्र निर्माण केले. ते इतके सुंदर होते की, पाहताच त्याच्याबद्दल प्रेम निर्माण व्हावे. परंतु अखेर ती मृत्तिकाच असते. (७)

नाना वनिता हस्ति घोडे। रात्रौ देखतां मन बुडे।
दिवसां पाहातां कातडें। कंटाळवाणें ॥ ८॥

रात्री त्या चित्रातील अनेक स्त्रिया, हत्ती, घोडे वगैरे पाहून मन अगदी लुब्ध होते. पण त्याच वस्तू दिवसा पाहिल्या की, कातडे दृष्टीस पडून तिटकारा येतो. (८)

काष्ठी पाषाणी पुतळ्या। नाना ठकारें निर्मिल्या।
परम सुंदर वाटल्या। परंतु तेथें पाषाण॥ ९॥

लाकडाच्या किंवा पाषाणाच्या निरनिराळ्या ठेवणीच्या मूर्ती किंवा पुतळे एखाद्याने बनविले, तर बघताना ते अत्यंत सुंदर वाटतात, परंतु तेथे असतो पाषाणच. (९)

नाना गोपुरीं पुतळ्या असती। वक्रांगें वक्रदृष्टीं पाहाती।
लाघव देखतां भरे वृत्ती। परंतु तेथें त्रिभाग॥ १०॥

मंदिराच्या द्वारावर अनेक मजले किंवा गोपुरे असतात. त्यावर अनेक मूर्ती कोरलेल्या असतात. त्या मूर्तींचे कमनीय अवयव, वक्रदृष्टी इत्यादी भाव पाहून कामुक वृत्ती उत्पन्न होते. परंतु तेथे चुना, वाळू, ताग यांचे मिश्रणच फक्त असते. (१०)

खेळतां नेटके दशावतारी। तेथें येती सुंदर नारी।
नेत्र मोडिती कळाकुंसरी। परंतु अवघे धटिंगण॥ ११॥

दशावतारी खेळ करून दाखविणारी पात्रे असतात, त्यांत काही सुंदर स्त्रियाही असतात. त्या पुरुषांकडे पाहून मोठ्या नखरेलपणाने डोळ्यांनी खुणाही करतात. पण त्या स्त्रिया वास्तविक स्त्रिया नसून सारे धटिंगण पुरुषच असतात. (११)

सृष्टी बहुरंगी असत्य। बहुरूपाचें हें कृत्य।
तुज वाटे दृश्य सत्य। परी हे जाण अविद्या॥ १२॥

बहुरूपी ज्याप्रमाणे एकटा एक असून नाना सोंगे घेतो, त्याप्रमाणे परब्रह्म एकले एक असून त्याच्या ठिकाणी ही बहुरंगी सृष्टी असत्य भासत असते. पण तुला हे सर्व दृश्य सत्य वाटते. हा सर्व अविद्येचा परिणाम आहे हे तू जाणून घे. (१२)

मिथ्या साचासारिखें देखिलें। परि तें पाहिजे विचारिलें।
दृष्टी तरळतां भासलें। तें साच कैसें मानावें॥ १३॥

मिथ्या असून ते खऱ्यासारखे दिसते, त्या वेळी ते खरे मानण्यापूर्वी विचार करणे आवश्यक आहे. दृष्टी भांबावली असताना, जे दिसते ते खरे कसे मानावे? (१३)

वरी पाहातां पालथें आकाश।
उदकीं पाहातां उताणें आकाश।
मध्यें चांदिण्याहि प्रकाश। परी तें अवघें मिथ्या॥ १४॥

आकाशाकडे वर मान करून पाहिले असता ते पालथे दिसते व तेच एखाद्या जलाशयात पाहिले तर उताणे दिसते. त्यात चांदण्याही दिसतात, प्रकाशही दिसतो, पण ते अवघे मिथ्याच असते. (१४)

नृपतीनें चितारी आणिले। ज्याचे त्या ऐसे पुतळे केले।
पाहातां तेचि ऐसे गमले। परी अवघे माईक॥ १५॥

एका राजाने चिताऱ्यांना बोलावून अनेक पुतळे केले. ते अगदी ज्या माणसांचे होते त्यांच्याप्रमाणे हुबेहूब दिसत होते. जणू ती माणसेच तेथे आहेत. पण ते सर्व शेवटी पुतळेच होते. (१५)

नेत्रीं कांहीं बाहोलि नसे। जेव्हां जें पाहावें तेव्हां तें भासे।
डोळां प्रतिबिंब दिसे। तें साच कैसेनी ॥ १६॥

डोळ्यात काही बाहुली नसते, पण आपण जेव्हा डोळ्यांनी पाहू लागतो तेव्हा ती डोळ्यात दिसते. आपण जे पाहतो त्याचे प्रतिबिंब डोळ्यात दिसते, ते खरे कसे म्हणावे? (१६)

जितुके बुडबुडे उठती। तितुक्यांमध्यें रूपें दिसती।
क्षणामध्यें फुटोन जाती। रूपें मिथ्या ॥ १७॥

पाण्यात जितके बुडबुडे उठतात तितकी रूपे दिसतात, क्षणात ते बुडबुडे फुटून जातात व ती रूपेही फुटून जातात. म्हणून ती मिथ्या जाणावीत. (१७)

लघुदर्पणें दोनि च्यारी हातीं। तितुकीं मुखें प्रतिबिंबती।
परी तें मिथ्या आदिअंतीं। येकचि मुख ॥ १८॥

हातात दोन चार छोटे छोटे आरसे घेतले तर जितके आरसे असतील तितकी तोंडे त्यांत प्रतिबिंबित होतात. पण आधी व अंती एकच मुख खरे असते. (१८)

नदीतीरें भार जातां। दुसरा भार दिसे पालथा।
कां पडसादाचा अवचिता। गजर उठे ॥ १९॥

नदीतीरावरून कुणी ओझे घेऊन जात असता त्याचे प्रतिबिंब पाण्यात पडते तेव्हा ते (प्रतिबिंबातील) ओझे पालथे दिसते. किंवा आपल्या आवाजाचा तितकाच मोठा प्रतिध्वनी उठतो. (१९)

वापीसरोवराचें तीर। तेथें पशु पक्षी नर वानर।
नाना पात्रें वृक्षविस्तार। दिसे दोहि सवा ॥ २०॥

विहिरी, सरोवरे यांच्या तीरावर पशुपक्षी, माणसे, वानरे, नाना वस्तू व मोठी झाडे असतात. पाण्यात त्यांचे प्रतिबिंब पडते व त्यामुळे त्या वस्तू पाण्यात व पाण्याबाहेर दोन्ही ठिकाणी दिसतात. (२०)

येक शस्त्र झाडूं जातां। दोनि दिसती तत्वतां।
नाना तंतु टणत्कारितां। द्विधा भासती ॥ २१॥

एक शस्त्र जोराने फिरवू लागले तर दोन शस्त्रे दिसतात. तंतू ताणून वाजवू लागले की, दोन भासू लागतात. (२१)

कां तें दर्पणाचे मंदिरीं। बैसली सभा दिसे दुसरी।
बहुत दीपांचिये हारीं। बहुत छाया दिसती॥ २२॥

किंवा एखाद्या आरसेमहालात एक सभा भरली असली तर तेथे आरशात आणखी एक सभा भरलेली दिसते. त्याचप्रमाणे अनेक दिवे पेटविले की एकाच वस्तूच्या अनेक छाया दिसतात. (२२)

ऐसें हें बहुविध असे। साचासारिखेंचि दिसे।
परि हें सत्य म्हणौनि कैसें। विश्वासावें ॥ २३॥

अशा रीतीने हे अनेक प्रकार खरे नसून खऱ्यासारखे दिसतात. पण त्यांच्यावर खरे समजून कसा विश्वास ठेवता येईल? (२३)

माया मिथ्या बाजीगरी। दिसे साचाचिये परी।
परी हे जाणत्यानें खरी। मानूंचि नये कीं ॥ २४॥

त्याप्रमाणे माया हीपण गारुडी विद्येप्रमाणेच मिथ्या आहे. म्हणून ती जरी खऱ्यासारखी दिसली तरी जाणत्याने तिला कधीही खरी मानू नये. (२४)

लटिकें साचाऐसें भावावें। तरी पारखी कासया असावें।
येवं ये अविद्येचे यावे। ऐसेचि असती ॥ २५॥

जे खरे नाही ते खरे असे मानले, तर मग खऱ्याखोट्याची परीक्षा करणाऱ्या पारखी माणसाची गरजच काय? परंतु अविद्येचे पराक्रम असेच असतात. (२५)

मनुष्यांची बाजीगरी। बहुत जनास वाटे खरी।
सेवट पाहातां निर्धारीं। मिथ्या होये ॥ २६॥

मनुष्याची गारुडी विद्यासुद्धा अनेक लोकांना खरी वाटते. पण शेवटी विचार केला असता ती निश्चितपणे मिथ्या ठरते. (२६)

तैसीच माव राक्षेसांची। देवांसहि वाटे साची।
पंचवटिकेसि मृगाची। पाठी घेतली रामें ॥ २७॥

त्याचप्रकारे राक्षसांची माया देवांनाही खरी वाटते. म्हणूनच पंचवटीमध्ये रामांनी कांचनमृगाचा पाठलाग केला. (२७)

पूर्वकाया पालटिती। येकाचेचि बहुत होती।
रक्तबिंदींच जन्मती। रजनीचर ॥ २८॥

राक्षस पूर्वीचे रूप बदलतात. एकाचेच अनेक होतात, किंवा सांडलेल्या रक्ताच्या प्रत्येक बिंदूतून नवीन राक्षस उत्पन्न होतात. (२८)

नाना पदार्थ फळेंचि जाले। द्वारकेमधें प्रवेशले।
कृष्णें दैत्य किती वधिले। कपटरूपी ॥ २९॥

अनेक पदार्थ व फळे यांची रूपे घेऊन राक्षसांनी द्वारकेत प्रवेश केला, तेव्हा कपटाने अशी विविध रूपे घेतलेल्या कितीतरी दैत्यांचा कृष्णाने वध केला. (२९)

कैसें कपट रावणाचें। सिर केलें मावेचें।
काळनेमीच्या आश्रमाचें। अपूर्व कैसें ॥ ३०॥

रावणाने कसे कपट केले पहा बरे! राक्षसी मायेने त्याने रामाचे शिर निर्माण करून ते सीतेला दाखविले! काळनेमीने मायेने अपूर्व असा आश्रम निर्माण करून द्रोणागिरी आणण्यास निघालेल्या मारुतीला फसविण्याचा प्रयत्न केला. (३०)

नाना दैत्य कपटमती। जे देवांसहि नाटोपती।
मग निर्माण होऊन शक्ती। संव्हार केला ॥ ३१॥

कपटविद्या जाणणारे मायावी राक्षस देवांनाही आवरत नसत. म्हणून शेवटी भगवंताच्या शक्तीने अवतार घेऊन त्यांचा संहार केला. (३१)

ऐसी राक्षेसांची माव। जाणों न सकती देव।
कपटविद्येचें लाघव। अघटित ज्यांचें ॥ ३२॥

अशी ही राक्षसांची माया देवसुद्धा जाणू शकत नसत. राक्षसांचे कपटविद्येतील लाघव अघटित होते. (३२)

मनुष्यांची बाजीगरी। राक्षसांची वोडंबरी।
भगवंताची नाना परी। विचित्र माया ॥ ३३॥

मनुष्यांची जी कपटविद्या ते इंद्रजाल, राक्षसांची कपटविद्या ती वोडंबरी तर भगवंताची जी विचित्र अद्‌भुत करणी, तिला माया असे म्हणतात. (३३)

हे साचासारिखीच दिसे। विचारितांच नसे।
मिथ्याचि आभासे। निरंतर पाहातां ॥ ३४॥

ही भगवंताची मायाही खऱ्यासारखीच दिसते. तिचा शोध घेऊ लागले, तिच्यासंबंधी विचार करू लागले की, ती नाहीशीच होते. पण ती सारखी दृश्यरूपाने भासमान होत असल्याने मिथ्या असून खरी वाटते. (३४)

साच म्हणावी तरी हे नासे। मिथ्या म्हणावी तरी हे दिसे।
दोहीं पदार्थीं अविश्वासे। सांगतां मन ॥ ३५॥

तिला खरी म्हणावे तर ती नाश पावते. मिथ्या म्हणावे तर ती दिसते, म्हणून मनाला निश्चय करता येत नाही की तिला खरी म्हणावे की मिथ्या म्हणावे, त्यामुळे ते गोंधळून जातात. (३५)

परंतु हें नव्हे साचार। मायेचा मिथ्या विचार।
दिसतें हें स्वप्नाकार। जाण बापा ॥ ३६॥

परंतु हे काही खरे नाही. मायेचा विचार करणे म्हणजे खोट्याचा विचार करण्यासारखे आहे. ही दृश्य सृष्टी स्वप्नासारखी आहे, हे तू जाणून घे. (३६)

तथापि असो तुजला। भासचि सत्य वाटला।
तरी येथें चुका पडिला। ऐक बापा ॥ ३७॥

एवढे सर्व सांगितल्यावरही जर तुला भासच सत्य वाटत असेल तर, अरे बाबा, तू चुकतो आहेस. ही चूक का होत आहे हे ऐक. (३७)

दृश्यभास अविद्यात्मक। तुझाहि देहो तदात्मक।
म्हणौनि हा अविवेक। तेथें संचरला ॥ ३८॥

दृश्याचा भास हा अविद्यात्मक पांचभौतिक पसारा आहे. त्याचप्रमाणे तुझा देहही पांचभौतिकच अविद्यात्मक आहे. म्हणूनच तेथे हा अविवेक उत्पन्न झाला आहे.(३८)

दृष्टीनें दृश्य देखिलें। मन भासावरी बैसलें।
तरी तें लिंगदेह जालें। अविद्यात्मक ॥ ३९॥

डोळ्यांनी दृश्य पाहिले आणि मन त्या भासात्मक दृश्याकडे आकर्षित झाले की सूक्ष्म देहात त्या दृश्याची प्रतिमा तयार होते. अविद्यात्मक दृश्याला धारण करणारा सूक्ष्मदेह, लिंगदेहही अविद्यात्मकच असतो. (३९)

अविद्येनें अविद्या देखिली। म्हणोनि गोष्टि विश्वासली।
तुझी काया अवघी संचली। अविद्येची ॥ ४०॥

अविद्येने अविद्येला पाहिले की दृश्य सत्यच आहे, असा विश्वास उत्पन्न होतो. तुझा देहही अवघा अविद्यामयच आहे. (४०)

तेचि काया मी आपण। हें देहबुद्धीचें लक्षण।
येणें करितां जालें प्रमाण। दृश्य आवघें ॥ ४१॥

ती अविद्यात्मक काया तोच मी स्वत: असे वाटणे हे देहबुद्धीचे लक्षण आहे. ही देहबुद्धी दृढ झाल्यामुळेच हे सर्व दृश्य जगत खरे वाटू लागते. (४१)

इकडे सत्य मानिला देहो। तिकडे दृश्य सत्य हा निर्वाहो।
दोहींमधें माहां संदेहो। पैसावला बळें ॥ ४२॥

इकडे आपण म्हणजे देह असून तो सत्य आहे, अशी दृढ बुद्धी झाली, तर तिकडे दृश्य जगत सत्यच आहे हाही दृढनिश्चय निवाडा झाला. म्हणजे आपण द्रष्टा व हे जग दृश्य असे द्वैत निर्माण झाले व मनात अत्यंत संशय निर्माण झाला व तो बळेच वाढू लागला. (४२)

देहबुद्धी केली बळकट। आणि ब्रह्म पाहों गेला धीट।
तों दृश्यानें रुधिली वाट। परब्रह्माची ॥ ४३॥

या प्रकारे देहबुद्धी अगदी बळकट करून धीटपणे ब्रह्माचा शोध घेण्याचा प्रयत्न करू लागला तेव्हा दृश्याने त्याची वाट अडविली. म्हणजे पांचभौतिक सर्वांचा त्याग केल्याखेरीज मन, बुद्धीला अगोचर परब्रह्मापर्यंत पोहोचताच येत नाही. (४३)

तेथें साच मानी दृश्याला। निश्चयचि बाणोनि गेला।
पाहा हो केवढा चुका पडिला। अकस्मात ॥ ४४॥

परब्रह्मप्राप्तीची इच्छा तर आहे, पण दृश्य सृष्टी हीच सत्य असा अंत:करणात ठाम निश्चय झालेला आहे. त्यामुळेच एकाएकी घोटाळा उत्पन्न झाला आहे. (४४)

आतां असो हें बोलणें। ब्रह्म न पविजे मीपणें।
देहबुद्धीचीं लक्षणें। दृश्य भाविती ॥ ४५॥

आता हे बोलणे राहू दे. मी म्हणजे देह ही देहाहंता, हा 'मीपणा' जोपर्यंत आहे, तोपर्यंत परब्रह्माची प्राप्ती होणे शक्य नाही. देहबुद्धीचे हे लक्षणच आहे की दृश्य जगत सत्यच वाटते. (४५)

अस्तिचा देहीं मांषाचा डोळा। पाहेन म्हणे ब्रह्माचा गोळा।
तो ज्ञाता नव्हे आंधळा। केवळ मूर्ख ॥ ४६॥

आपला देह म्हणजे हाडांचा सापळा असून त्यात डोळा म्हणजे मांसाचा गोळा आहे. या स्थूल डोळ्याने परब्रह्माचा गोल मी पाहीन असे म्हणतो, तो ज्ञाता तर नाहीच, पण तो डोळे असून आंधळा, केवळ मूर्ख समजावा. (४६)

दृष्टीसि दिसे मनासि भासे। तितुकें काळांतरीं नासे।
म्हणोनि दृश्यातीत असे। परब्रह्म तें ॥ ४७॥

जे काही दृष्टीस दिसते, जे जे मनाला भासते, ते सर्व कालांतराने नाश पावते. म्हणून अविनाशी परब्रह्म हे दृश्यापलीकडे असते. (४७)

परब्रह्म तें शाश्वत। माया तेचि अशाश्वत।
ऐसा बोलिला निश्चितार्थ। नाना शास्त्रीं ॥ ४८॥

परब्रह्म हे शाश्वत, तर माया ही अशाश्वत आहे असे निश्चित मत नाना शास्त्रग्रंथांत सांगितले गेले आहे. (४८)

आतां पुढें निरूपण। देहबुधीचें लक्षण।
चुका पडिला तो मी कोण। बोलिलें असे ॥ ४९॥

आता पुढील समासात देहबुद्धीचे लक्षण सांगितले असून ज्याच्याबद्दल भ्रम होऊन सर्व गोंधळ निर्माण झाला आहे, तो मी कोण हे सांगितले आहे. (४९)

मी कोण हें जाणावें। मीपण त्यागूनि अनन्य व्हावें।
मग समाधान तें स्वभावें। आंगीं बाणे ॥ ५०॥

श्रीसमर्थ म्हणतात की, म्हणून मी कोण हे नीट जाणून घ्यावे आणि मग देहाच्या मीपणाचा त्याग करून आत्मवस्तूशी अनन्य व्हावे. मग स्वाभाविकच शाश्वत समाधान अंगी बाणते. (५०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'दृश्यनिर्शननाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ६ : समास ९

# सारशोधन

॥ श्रीराम ॥

गुप्त आहे उदंड धन। काये जाणती सेवक जन।
तयांस आहे तें ज्ञान। बाह्याकाराचें ॥ १॥

श्रीसमर्थ सांगतात की, एखाद्या श्रीमंत माणसाकडे उदंड गुप्त धन असते, पण त्याच्या सेवकवर्गाला त्याची जाणीव नसते. त्यांना जे काही बाहेर ऐश्वर्य दिसते, तेवढ्याचेच ज्ञान असते. (१)

गुप्त ठेविलें उदंड अर्थ। आणी प्रगट दिसती पदार्थ।
शाहाणे शोधिती स्वार्थ। अंतरीं असे ॥ २॥

त्या माणसाने खूपच द्रव्य गुप्त लपवून ठेवलेले असते. त्या मानाने थोड्याच वस्तू प्रकट दिसतात. त्याचप्रमाणे या दृश्याच्या आत जो खरा अर्थ भरलेला आहे, त्याचा शोध फक्त शहाणे लोक घेतात. (२)

तैसें दृश्य हें माईक। पाहात असती सकळ लोक।
परी जयांस ठाउका विवेक। ते तदनंतर जाणती॥ ३॥

तसे दृश्य जगत हे मायिक असून ते सगळेच लोक पाहत असतात. पण जे विवेकी असतात, ते दृश्याच्या अंतरीचे गुप्त परब्रह्म जाणतात. (३)

द्रव्य ठेऊन जळ सोडिलें। लोक म्हणती सरोवर भरलें।
तयाचें अभ्यांतर कळलें। समर्थ जनासी ॥ ४॥

एका माणसाने मोठा खड्डा खणून त्यात द्रव्य ठेवून वर पाणी सोडून तो खड्डा भरला. लोक म्हणतात की सरोवर पाण्याने भरले आहे. पण चतुर आणि जाणत्या लोकांनाच बुडाशी द्रव्य ठेवलेले आहे, हे गुपित कळते. (४)

तैसे ज्ञाते ते समर्थ। तेंहिं वोळखिला परमार्थ।
इतर ते करिती स्वार्थ। दृश्य पदार्थाचा ॥ ५॥

तसे जे परमार्थ म्हणजे काय हे जाणतात तेच समर्थ ज्ञाते असतात. इतर सामान्य अज्ञानी लोक दृश्य पदार्थ गोळा करण्यात आपला स्वार्थ मानतात. (५)

काबाडी वाहाती काबाड। श्रेष्ठ भोगिती रत्नें जाड।
हें जयाचें तयास गोड। कर्मयोगें ॥ ६॥

गडी असतात ते ओझी वाहतात आणि श्रेष्ठ असतात ते उत्तमोत्तम रत्नांचा उपभोग घेतात. ज्याचे पूर्वकर्म जसे असेल, त्याप्रमाणे त्याला ती गोष्ट गोड वाटते. (६)

येक काष्ठस्वार्थ करिती। येक शुभा येकवाटिती।
तैसे नव्हेत कीं नृपति। सारभोक्ते ॥ ७॥

कुणी लाकडे गोळा करून विकतो. तर कुणी गोवऱ्या वेचीत असतो. पण किमती वस्तूंचे उपभोक्ते जे राजे ते असे नसतात. (७)

जयांस आहे विचार। ते सुकासनीं जाले स्वार।
इतर जवळील भार। वाहातचि मेले ॥ ८॥

जे विचारी असतात ते सुखासनी, पालखीत स्वार होतात म्हणजे आत्मसुख त्यांना प्राप्त होते. इतर सामान्य अज्ञानी लोक प्रपंचाचा भार वाहता वाहता मरून जातात.(८)

येक दिव्यान्नें भक्षिती। येक विष्ठा सावडिती।
आपण वर्तल्याचा घेती। साभिमान ॥ ९॥

आत्मज्ञानी पुरुष जणू काही दिव्यान्ने सेवन करतात, तर अज्ञानी लोक विषयरूपी विष्ठा चिवडत असतात. इतकेच नव्हे तर आपण जे काही करीत आहोत, त्याचा अभिमान बाळगतात. (९)

सार सेविजे श्रेष्ठीं। असार घेयिजे वृथापृष्ठीं।
साराअसाराची गोष्टी। सज्ञान जाणती ॥ १०॥

श्रेष्ठ लोक सार ग्रहण करतात, निरुद्योगी असार सेवन करतात. जे आत्मज्ञानी लोक असतात तेच सारासार यथार्थ जाणतात. (१०)

गुप्त परीस चिंतामणी। प्रगट खडे कांचमणी।
गुप्त हेमरत्नखाणी। प्रगट पाषाण मृत्तिका॥ ११॥

परीस अथवा चिंतामणी हे नेहमी गुप्तच असतात. खडे, काचमणी नेहमी प्रकट असतात. सोन्याच्या, रत्नाच्या खाणी गुप्त असतात. पण पाषाण मृत्तिका कुठेही रस्त्यावर पडलेले असतात. (११)

अव्हाशंख अव्हावेल। गुप्त वनस्पति अमोल।
येरंड धोत्रे बहुसाल। प्रगट सिंपी ॥ १२॥

उजवा शंख, उजव्या वळणाची वेल, किंवा दिव्य अमूल्य वनस्पती हे सर्व गुप्त असते. एरंड, धोत्रा व शिंपले ही हवी तेथे मुबलक सापडतात. (१२)

कोठे दिसेना कल्पतरु। उदंड सेरांचा विस्तारु।
पाहातां नाहीं मळियागरु। बोरि बाभळा उदंडी॥ १३॥

कल्पतरू कोठेच दिसत नाहीत, शेराची झाडे उदंड आढळतात. चंदनाचा वृक्ष सहसा आढळून येत नाही, पण बोरी-बाभळी उदंड असतात. (१३)

कामधेनु जाणिजे इंद्रें। सृष्टींत उदंड खिल्लारें।
महद्भाग्य भोगिजे नृपवरें। इतर कर्मानुसार ॥ १४॥

सृष्टीत हवी तेवढी गाईंची खिल्लारे दिसून येतात. कामधेनू फक्त इंद्राजवळच असते. राजा असतो तो थोर भाग्याचा उपभोग घेतो, इतर लोकांना त्यांच्या कर्मानुसार कमी-अधिक भाग्य लाभते. (१४)

नाना व्यापार करिती जन। आवघेचि म्हणती सकांचन।
परंतु कुबेराचें महिमान। कोणासीचि न ये॥ १५॥

लोक अनेक प्रकारचे उद्योगधंदे करतात आणि सर्वच म्हणतात की, आम्ही श्रीमंत आहोत, परंतु कुबेराची थोरवी कुणालाच प्राप्त होत नाही. (१५)

तैसा ज्ञानी योगेश्वर। गुप्तार्थलाभाचा ईश्वर।
इतर ते पोटाचे किंकर। नाना मतें धुंडिती॥ १६॥

त्याप्रमाणे जो खरोखर ज्ञानी आहे, योगेश्वर आहे, तोच गुप्त असलेले जे खरे धन, त्याच्या लाभाचा म्हणजेच स्वात्मानुभवप्राप्तीचा मालक असतो. इतर अज्ञानी लोक हे पोटाचे दास असतात आणि नाना मते धुंडाळत बसतात. (१६)

तस्मात सार तें दिसेना। आणी असार तें दिसे जना।
सारासारविवंचना। साधु जाणती॥ १७॥

थोडक्यात, जे सार असते ते लोकांना दिसत नाही आणि असार असते तेच तेवढे दिसते. असार सोडून सार कसे ग्रहण करावे हे साधूच जाणतात. (१७)

इतरांस हें काये सांगणें। खरें खोटें कोण जाणे।
साधुसंतांचिये खुणे। साधुसंत जाणती॥ १८॥

सामान्य लोकांना हे सांगून काय उपयोग? ते खरे-खोटे जाणूच शकत नाहीत. साधू-संतांच्या खुणा फक्त साधूसंतच जाणतात. (१८)

दिसेना जें गुप्त धन। तयासि करणें लागे अंजन।
गुप्त परमात्मा सज्जन-। संगतीं शोधावा॥ १९॥

जे गुप्त धन असते, ते साध्या डोळ्यांना दिसत नाही. त्यासाठी डोळ्यात अंजन घालावे लागते. त्या गुप्त धनाप्रमाणेच तो परमात्माही गुप्त आहे. त्याचा शोध घ्यावयाचा असेल तर संतसंगतीच्या योगे तो घ्यावा लागतो. (१९)

रायाचे सन्निध होतां। सहजचि लाभे श्रीमंतता।
तैसा हा सत्संग धरितां। सद्वस्तु लाभे॥ २०॥

राजाचे सान्निध्य प्राप्त झाले की श्रीमंती सहजच लाभते. त्याप्रमाणे सत्संग धरला की सहजच सद्‌वस्तू प्राप्त होते. (२०)

सद्वस्तूस लाभे सद्वस्तु। अव्यावेस्तास अव्यावेस्तु।
पाहातां प्रशस्तास प्रशस्तु। विचार लाभे॥ २१॥

सद्‌वस्तूची तळमळ ज्याला लागते, त्याला सद्‌वस्तूच प्राप्त होते. जो अत्यंत अव्यवस्थित असतो त्याचे जीवनही तसेच अस्ताव्यस्त असते. प्रशस्त असेल, थोर असेल, त्याचे विचारही तसेच थोर असतात. (२१)

म्हणौनि हें दृश्यजात। आवघेंचि आहे अशाश्वत।
परमात्मा अच्युत अनंत। तो या दृश्यावेगळा॥ २२॥

म्हणून ही सर्व दृश्य सृष्टी अशाश्वत आहे. परमात्मा या दृश्याहून वेगळाच आहे. तो अच्युत कधीही न ढळणारा व अनंत आहे. (२२)

दृश्यावेगळा दृश्याअंतरीं। सर्वात्मा तो सचराचरीं।
विचार पाहातां अंतरीं। निश्चये बाणे॥ २३॥

दृश्यावेगळा असूनही तो दृश्याच्या अंतरी ओतप्रोत भरून राहिला आहे. सर्व चराचरात तोच सर्वांचा आत्मा आहे. अंतरांत विचार करून पाहिला की यासंबंधीचा निश्चय अंतरात बाणतो. (२३)

संसारत्याग न करितां। प्रपंचउपाधी न सांडितां।
जनामध्यें सार्थकता। विचारेंचि होये॥ २४॥

संसाराचा त्याग न करता, प्रपंच उपाधी न सोडता या जगात विचारानेच जीवन सार्थक होते. (२४)

हें प्रचितीचें बोलणें। विवेकें प्रचित पाहाणें।
प्रचित पाहे तें शाहाणे। अन्यथा नव्हे॥ २५॥

हे माझे बोलणे प्रचीतीचे आहे. लोकांनीही सारासारविवेक करून याची प्रचीती घ्यावी. जे असा अनुभव घेतील तेच लोक शहाणे ठरतील. जो अनुभव घेणार नाही, तो शहाणा नव्हे. (२५)

सप्रचित आणि अनुमान। उधार आणी रोकडें धन।
मानसपूजा प्रत्यक्ष दर्शन। यांस महदांतर॥ २६॥

श्रीसमर्थ म्हणतात की, अनुभवाचे बोलणे आणि अनुमान यात रोकड आणि उधार धनासारखा फरक आहे. तसेच मानसपूजेतील दर्शन आणि ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन यांतही महद् अंतर आहे. (२६)

पुढें जन्मांतरी होणार। हा तों अवघाच उधार।
तैसा नव्हे सारासार। तत्काळ लाभे॥ २७॥

पुढे जन्मांतरी केव्हातरी आत्मानुभव होईल, हा उधारीचा विचार आहे. सारासारविचार असा उधारीचा नाही, तर त्याच्या योगे तात्काळ स्वस्वरूपानुभवाची प्राप्ती होते. (२७)

**तत्काळचि लाभ होतो। प्राणी संसारी सुटतो।**
**संशय अवघाचि तुटतो। जन्ममरणाचा ॥ २८॥**

तत्काळ आत्मज्ञान होऊन माणूस जन्ममरणपरंपरेतून सुटतो आणि जन्ममरण येईल की काय, असा संशयही समूळ नष्ट होतो. (२८)

**याचि जन्में येणेंचि काळें। संसारीं होइजे निराळें।**
**मोक्ष पाविजे निश्चळें। स्वरूपाकारें ॥ २९॥**

याच जन्मात याच काळी मनुष्य संसारातून मुक्त होतो आणि निश्चल स्वस्वरूपाशी ऐक्य पावून त्यास मोक्ष मिळतो. (२९)

**ये गोष्टीस करी अनुमान। तो सिद्धचि पावेल पतन।**
**मिथ्या वदे त्यास आण। उपासनेची ॥ ३०॥**

आता मी हे जे सांगत आहे त्याबद्दल जर कुणी संशय घेईल तर तो मुळात सिद्धच-आत्मारामच असूनही संशयामुळे वेगळा पडेल, पतन पावेल. हे जो कोणी मिथ्या म्हणेल, तर माझ्या उपासनेची त्याला शपथ आहे. (३०)

**हें येथार्थचि आहे बोलणें। विवेकें सीघ्रचि मुक्त होणें।**
**असोनी कांहींच नसणें। जनामधें ॥ ३१॥**

मी हे जे सांगत आहे ते माझे बोलणे अगदी यथार्थच आहे. सारासारविवेकाने मनुष्य अत्यंत लवकर मुक्त होतो व जनामध्ये वागत असताही अंतरी मीपणाविरहित असतो, म्हणजेच तो लोकांत असून नसल्यासारखा असतो. (३१)

**देवपद आहे निर्गुण। देवपदीं अनन्यपण।**
**हाचि अर्थ पाहातां पूर्ण। समाधान बाणे ॥ ३२॥**

देवपद हे निर्गुण आहे. देवपदी अनन्यपण म्हणजेच तद्रूपता किंवा ऐक्य याचा अनुभव घेणे होय. ह्याप्रकारे त्याच्या अर्थाशी पूर्ण एकरूप झाले की पूर्ण समाधान बाणते. (३२)

**देहींच विदेह होणें। करून कांहींच न करणें।**
**जीवनमुक्तांचीं लक्षणें। जीवन्मुक्त जाणे ॥ ३३॥**

देहात असून विदेही होणे म्हणजे देहबुद्धी पूर्ण नष्ट होऊन आत्मबुद्धी दृढ झालेल्या स्थितीत प्रारब्धाचा क्षय होईपर्यंत निर्लेप वृत्तीने जीवन कंठणे, करून काही न करणे म्हणजे मी कर्ता ही भावना समूळ नष्ट झाली तरी कर्म होत राहणे ही जीवन्मुक्तांची लक्षणे आहेत आणि जे जीवन्मुक्त असतील, तेच ती लक्षणे जाणू शकतात. (३३)

**येरवीं हें खरें न वटे। अनुमानेंचि संदेह वाटे।**
**संदेहाचें मूळ तुटे। सद्गुरुवचनें ॥ ३४॥**

एरवी हे खरेच वाटत नाही. अनुभव नसेल तर अनुमानाने त्या अवस्थेबद्दल संदेह उत्पन्न होतो, परंतु सद्गुरूंचे वचन श्रवण केले की संदेह समूळ नाहीसे होतात. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सारशोधननाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक ६ : समास १०

# अनुर्वाच्य

॥ श्रीराम ॥

**समाधान पुसतां कांहीं। म्हणती बोलिजे ऐसें नाहीं।**
**तरी तें कैसें आहे सर्वही। निरोपावें ॥ १॥**

श्रोत्याने प्रश्न केला की, आपण समाधानाबद्दल सांगितलेत ते समाधान असते तरी कसे, असे जर विचारले, तर सर्व सांगतात की, ते शब्दाने सांगता येण्यासारखे नाही. तरी स्वामी, ते आहे तरी कसे हे आपण मला सर्व काही समजावून सांगा. (१)

**मुक्यानें गूळ खादला। गोडी न ये सांगाव्याला।**
**याचा अभिप्राव मजला। निरोपण कीजे ॥ २॥**

सर्व म्हणतात की मुक्याने गूळ खाल्ला तरी तो त्याच्या गोडीचे वर्णन करू शकत नाही, तसेच हे आहे. तरी याचा अभिप्राय काय ते मला स्पष्ट करून सांगा. (२)

अनुभवहि पुसों जातां। म्हणती न ये किं सांगतां।
कोणापासीं पुसों आतां। समाधान ॥ ३ ॥

एखाद्याला त्याचा अनुभव सांग असे म्हटले, तरी तोही म्हणतो की, अनुभव शब्दात सांगता येत नाही. तर मग मी आता समाधानाविषयी कोणाला विचारावे? (३)

जे ते अगम्य सांगती। न ये माझिये प्रचिती।
विचार बैसे माझे चित्तीं। ऐसें करावें ॥ ४ ॥

प्रत्येक जण ते अगम्य आहे असेच म्हणतात, पण माझ्या मनाला ते पटत नाही. तरी समाधानाचे स्वरूप माझ्या चित्तात नीट ठसेल अशा प्रकारे आपण ते मला सांगावे. (४)

ऐसें श्रोत्यांचें उत्तर। याचें कैसें प्रत्योत्तर।
निरोपिजेल तत्पर। होऊन ऐका ॥ ५ ॥

श्रोत्याने असा प्रश्न केला, त्याचे उत्तर आता येथे दिले जाईल. तरी तत्पर होऊन ते ऐकावे. (५)

जें समाधानाचें स्थळ। किं तो अनुभवचि केवळ।
तें स्वरूप प्रांजळ। बोलोन दाऊं ॥ ६ ॥

स्वात्मानुभव म्हणजेच समाधान. त्याचेच स्वरूप आता शब्दात स्पष्ट करून दाखवू या. (६)

जें बोलास आकळेना। बोलिल्याविणहि कळेना।
जयासी कल्पितां कल्पना। हिंपुटी होये ॥ ७ ॥

तें जाणावें परब्रह्म। जें वेदांचें गुह्य परम।
धरितां संतसमागम। सर्वहि कळे ॥ ८ ॥

जे शब्दात गवसत नाही, पण शब्दात सांगितल्याखेरीज जे कळतही नाही आणि ज्याची कल्पना करू जाता कल्पनाच नष्ट होते, त्यालाच परब्रह्म म्हणून जाणावे. जे वेदांचेही परम रहस्य आहे, ते परब्रह्म संतसमागम केल्यानेच पूर्णपणे कळते. (७-८)

तेंचि आता सांगिजेल। जें समाधान सखोल।
ऐक अनुभवाचे बोल। अनुर्वाच्य वस्तु ॥ ९ ॥

खरे तर शाश्वत समाधानाचे शब्दांत वर्णन करणे शक्य नाही. पण तरी तू आता मी माझ्या अनुभवाचे बोल सांगतो, ते नीट ऐक. (९)

सांगतां न ये तें सांगणें। गोडी कळाया गूळ देणें।
ऐसें हें सद्‌गुरुविणें। होणार नाहीं ॥ १० ॥

जे सांगता येत नाही ते सांगायचे आहे. गुळाची गोडी कळावी म्हणून गूळच खायला द्यावा, तसे हे आहे. पण सद्गुरूशिवाय हे होऊ शकत नाही. (१०)

सद्‌गुरुकृपा कळे त्यासी। जो शोधील आपणासी।
पुढें कळे अनुभवासी। आपेंआप वस्तु ॥ ११ ॥

जो आपला आपण शोध घेण्याचा प्रयत्न करतो, त्याच्यावर सद्गुरुकृपा होते आणि पुढे त्याला आपोआप अनुभव येऊन आत्मवस्तूचा लाभ होतो. (११)

दृढ करूनियां बुद्धि। आधीं घ्यावी आपशुद्धी।
तेणें लागे समाधी। अकस्मात ॥ १२ ॥

बुद्धीचा दृढ निश्चय करून आपण कोण याचा शोध घ्यावा. असा शोध घेत असता अकस्मात समाधी लागते. (१२)

आपलें मूळ बरें शोधिता। आपली तों माईक वार्ता।
पुढें वस्तुच तत्वतां। समाधान ॥ १३ ॥

आपल्या मूळ स्वरूपाचा शोध घेऊ लागल्यावर ज्याला आपण पूर्वी मी असे मानत होतो, तो देह तर पांचभौतिक, मायिक आहे व आपण त्यापासून अलग आहोत. किंबहुना आपण तत्त्वत: आत्मवस्तूच आहोत, हा अनुभव साक्षात येतो. ही स्थिती व समाधान भिन्न नाही. (१३)

आत्मा आहे सर्वसाक्षी। हें बोलिजे पूर्वपक्षीं।
जो कोणी सिद्धांत लक्षी। तोचि सिद्ध ॥ १४ ॥

आत्मा हा सर्वसाक्षी आहे हा पूर्वपक्ष आहे. हे साक्षित्वही पुढे राहात नाही व जो सिद्धान्ताशी एकरूप होतो तोच सिद्ध होय. (१४)

सिद्धांतवस्तु लक्षूं जातां। सर्वसाक्षी ते अवस्ता।
आत्मा तीहून पर्ता। अवस्तातीत ॥ १५ ॥

आपल्या खऱ्या स्वरूपाचा शोध घेत असता प्रथम मी म्हणजे देह नव्हे, मी साक्षी आहे, असे या अवस्थेत वाटत असते. म्हणजे सूक्ष्मपणे द्वैतभाव शेष असतोच. पण आत्मा हा अवस्थातीत असल्याने ही अवस्थाही ज्या वेळी राहत नाही, त्या वेळी स्वानुभवरूपाने जीवब्रह्मैक्य होते. (१५)

पदार्थज्ञान जेव्हां सरे। द्रष्टा द्रष्टेपणें नुरे।
ते समईं उतरे। फुंज मीपणाचा ॥ १६ ॥

ज्या वेळी पदार्थज्ञान संपूर्ण नष्ट होते, एवढेच नव्हे, तर द्रष्ट्याचे द्रष्टेपणही उरत नाही, त्या वेळी मीपणाचा डौलही नष्ट होतो. (१६)

**जेथे मुरालें मीपण। तेंचि अनुभवाची खूण।**
**अनुर्वाच्य समाधान। या कारणें बोलिजे॥ १७॥**

मीपणा संपूर्णपणे विरणे हीच अनुभवाची खूण आहे, म्हणूनच समाधान हे अनिर्वाच्य आहे असे म्हटले जाते. (१७)

**अत्यंत विचाराचे बोल। तरी ते माईक फोल।**
**शब्द सबाह्य सखोल। अर्थचि अवघा ॥ १८॥**

अत्यंत विचारपूर्वक बोललेले शब्द जरी असले तरी ते दृश्याच्या अंतर्भूत असल्याने मायिकच असतात. म्हणून नाशिवंतच असतात. पण त्यात जो अंतर्बाह्य असा सखोल अर्थ असतो तो सूक्ष्म असतो, अदृश्य असतो. (१८)

**शब्दाकरितां कळे अर्थ। अर्थ पाहातां शब्द वेर्थ।**
**शब्द सांगे तें येथार्थ। परी आपण मिथ्या॥ १९॥**

शब्दाच्या माध्यमामुळेच अर्थ कळतो, पण अर्थ कळला की शब्दांची आवश्यकता राहत नाही. शब्द जे सांगतो ते यथार्थ असते, सत्य असते, पण शब्द हा स्वत: मिथ्या असतो. (१९)

**शब्दाकरितां वस्तु भासे। वस्तु पाहातां शब्द नासे।**
**शब्द फोल अर्थ असे। घनवटपणें ॥ २०॥**

शब्दाच्या योगेच आत्मवस्तूचे ज्ञान होते, पण एकदा आत्मवस्तूचा लाभ झाला की शब्दाची आवश्यकता उरत नाही, तो नाश पावतो. शब्द हे फोलकटासारखे असतात, पण अर्थ हे त्यातील भरीव सार असते. (२०)

**भुंसाकरितां धान्य निपजे। धान्ये घेऊन भूंस टाकिजे।**
**तैसें शब्द भूंस जाणिजे। अर्थ धान्य ॥ २१॥**

धान्य हे नेहमी भुसाचे आवरण घेऊनच उगवते. आपण धान्य घेऊन भूस टाकून देतो, त्याप्रमाणे शब्द हे भूस आहेत, तर त्यातील अर्थ हा धान्याप्रमाणे संग्राह्य असतो, हे जाणून घ्यावे. (२१)

**पोचटामधें घनवट। घनवटीं उडे पोचट।**
**तैसा शब्द हा फलगट। परब्रह्मीं ॥ २२॥**

फोलकटांत सारधान्य भरलेले असते. धान्य ग्रहण केल्यावर फोलकट उडून जाते. तसे परब्रह्म हे सार आहे आणि शब्द हे फोलकटासारखे त्याज्य आहेत. (२२)

**शब्द बोलोनि राहे। अर्थ शब्दापूर्वींच आहे।**
**या कारणें न साहे। उपमा तया अर्थासी॥ २३॥**

बोलल्याबरोबर शब्द नष्ट होतो, पण अर्थ हा शब्दापूर्वीही असतोच. शब्द उच्चारतानाही तो असतो व नंतरही तो असतोच, म्हणून अर्थाला कशाचीही उपमा देता येत नाही. (२३)

**भूंस सांडून कण घ्यावा। तैसा वाच्यांश त्यजावा।**
**कण लक्ष्यांश लक्षावा। शुद्ध स्वानुभवें ॥ २४॥**

भुसाचा त्याग करून कण म्हणजे धान्य घ्यावे, त्याप्रमाणे शब्दाचा वाच्यांश टाकून सारभूत असा लक्ष्यांश ग्रहण करावा. उदाहरणार्थ, ब्रह्म दृश्यावेगळे आहे या वाक्याचा आकलन होणारा जो शब्दार्थ तो वाच्यांश होय, आणि याचा जो प्रत्यक्ष अनुभव तो लक्ष्यांश होय. (२४)

**दृश्यावेगळें बोलिजे। त्यासी वाच्यांश म्हणिजे।**
**त्याचा अर्थ तो जाणिजे। शुद्ध लक्ष्यांश ॥ २५॥**

दृश्यावेगळा शब्दाचा जो साधा अर्थ त्याला वाच्यांश म्हणतात. तो ध्वनिरूप असतो, पण त्यात जो गूढ भाव असतो त्याला शुद्ध लक्ष्यांश म्हणतात. (२५)

**ऐसा जो शुद्ध लक्ष्यांश। तोचि जाणावा पूर्वपक्ष।**
**स्वानुभव तो अलक्ष। लक्षिला नवचे ॥ २६॥**

हा जो शुद्ध लक्ष्यांश तोच पूर्वपक्ष जाणावा. त्यालाही ओलांडले पाहिजे. स्वानुभव हा मनबुद्धीअगोचर असल्याने त्यास अलक्ष म्हटले आहे. वरीलपैकी कशानेही तो जाणता येत नाही. (२६)

**जेथें गाळून सांडिलें नभा। जो अनुभवाचा गाभा।**
**ऐसा तोहि उभा। कल्पित केला ॥ २७॥**

पंचमहाभूतांपैकी सर्वांत सूक्ष्म तत्त्व आकाश हे आहे. जेथे आकाश तत्त्वाचाही मागमूस उरत नाही अशी अतींद्रिय अवस्था असते, तेथेही अनुभव व तो घेणारा असे द्वैत जोपर्यंत असते, तोपर्यंत तेथे मायाजनित कल्पना आहेच असे म्हणावे लागते. (२७)

मिथ्याकल्पनेपासूनि जाला । खरेंपण कैंचें असेल त्याला ।
म्हणौनि तेथें अनुभवाला । ठावचि नाहीं ॥ २८ ॥

जो कल्पनेपासून आला तो अनुभव मिथ्याच होय. त्याला खरेपणा येईलच कसा? म्हणून आत्मस्वरूपाच्या ठिकाणी अनुभवाला जागाच नाही. (२८)

दुजेविण अनुभव । हें बोलणेंचि तों वाव ।
याकारणें नाहीं ठाव । अनुभवासी ॥ २९ ॥

जेथे अनुभव आणि अनुभव घेणारा असतो, तेथेच त्या अनुभवाची जाणीव होते. द्वैताशिवाय अनुभव आला असे बोलणेही व्यर्थच होय. म्हणून स्वरूपी अनुभवास जागाच नाही. (२९)

अनुभवें त्रिपुटी उपजे । अद्वैतीं द्वैतचि लाजे ।
म्हणौनि बोलणें साजे । अनुर्वाच्य ॥ ३० ॥

जेथे अनुभव असतो तेथे अनुभाव्य, अनुभविता व अनुभव अशी त्रिपुटी उत्पन्न होते. अद्वैतात द्वैत समूळ नष्ट झालेले असते. म्हणून तेथे भाषा उपयोगी पडत नाही. म्हणून त्यास अनिर्वाच्य म्हणणेच योग्य ठरते. (३०)

दिवसरजनीचें परमित्य । करावया मूळ आदित्य ।
तो आदित्य गेलियांउर्वरित । त्यासी काये म्हणावें ॥ ३१ ॥

दिवस आणि रात्रीची मर्यादा सूर्यावर अवलंबून असते. तो सूर्यच जर नाहीसा झाला, तर शिल्लक उरलेल्यास काय म्हणावे? कारण मग दिवस, रात्र हा भेदच राहणार नाही. (३१)

शब्दमौन्याचा विचार । व्हावया मूळ वोंकार ।
तो वोंकार गेलिया उच्चार । कैसा करावा ॥ ३२ ॥

शब्द आणि मौन ह्याचेसंबंधी विचार केला असता त्याचे मूळ ओंकार आहे हे कळून येते. ते मूळ स्फुरण असून नादाची, ध्वनीची उत्पत्ती त्यापासून होते. तो ओंकारच जर नष्ट झाला, तर ध्वनी, नाद उत्पन्न होऊच शकत नाही. मग शब्दांचा उच्चार होणार तरी कसा? (३२)

अनुभव आणि अनुभविता । सकळ ये मायेचि करितां ।
ते माया मुळीं नस्तां । त्यासीं काये म्हणावें ॥ ३३ ॥

अनुभव आणि अनुभविता हे सर्व मायेमुळेच प्रत्ययास येते. ती मायाच जर नष्ट झाली, तर हे द्वैतही राहत नाही. मग अनुभव कुठला, त्याला वावच राहत नाही. (३३)

वस्तु येक आपण येक । ऐसी अस्ती वेगळिक ।
तरि अनुभवाचा विवेक । बोलों येता सुखें ॥ ३४ ॥

आत्मवस्तू वेगळी आणि तिचा अनुभव घेणारे आपण वेगळे, अशी वेगळीक जर असती तर मग त्या अनुभवासंबंधीचा विचार सुखाने सांगता आला असता. (३४)

वेगळेपणाची माता । ते लटिके वंधेची सुता ।
म्हणोनियां अभिन्नता । मुळींच आहे ॥ ३५ ॥

माया हीच त्या वेगळेपणाची माता आहे. म्हणजे मुळात मायेचेच अस्तित्व जेथे नाही तेथे वेगळीक-भिन्नता आहे, असे म्हणणे म्हणजे वंध्येला मुलगी झाली म्हणण्या-सारखेच आहे. म्हणून आत्मवस्तूच्या ठिकाणी अभिन्नता, अद्वैत हे मूळचेच आहे हे जाणून घेतले पाहिजे. (३५)

अजन्मा होता निजेला । तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला ।
सद्गुरूस शरण गेला । संसारदुःखें ॥ ३६ ॥

अजन्मा म्हणजे अविनाशी आत्मा हा निजलेला होता, म्हणजेच त्याला आपल्या स्वस्वरूपाचा विसर पडला, त्या वेळी त्याला प्रथम स्वप्न पडले की मी म्हणजे देह आहे आणि ही दृढ समजूत झाल्यामुळे तो संसारदुःखाने दुःखी झाला होता. तोच त्याला त्या स्वप्नात स्वप्न पडले की तो त्या संसारदुःखामुळे त्रस्त होऊन तो सद्गुरूंना शरण गेला आहे. (३६)

सद्गुरुकृपेस्तव । जाला संसार वाव ।
ज्ञान जालियां ठाव । पुसे अज्ञानाचा ॥ ३७ ॥

सद्गुरुकृपेमुळे त्याला दृश्य जगत मिथ्या हे कळून चुकले व आपण देह आहोत हे अज्ञानही नष्ट होऊन आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले. (३७)

आहे तितुकें नाहीं जालें। नाहीं नाहींपणें निमालें।
आहे नाहीं जाऊन उरलें। नसोन कांहीं ॥ ३८ ॥

दृश्य सृष्टी आहे अशी वाटत होती ती विवेकाने मिथ्या ठरली, आणि नाही म्हणून जे वाटत होते तेही विरून गेले. याप्रमाणे जे आहे वाटत होते व जे नाही म्हणजे नव्हतेच, ती दोन्ही म्हणजे दृश्यभाव व शून्यत्व जाऊन, जे उरले ते परब्रह्म होय. (३८)

सुन्यत्वातीत शुद्धज्ञान। तेणें जालें समाधान।
ऐक्यरूपें अभिन्न। सहजस्थिती ॥ ३९ ॥

शून्यत्वाचेही ज्ञान ज्याला होते तो शुद्ध ज्ञानस्वरूप आत्मा तेवढा उरला. त्याच्याशी ऐक्य होताच शाश्वत समाधान प्राप्त झाले व भिन्नत्व जाऊन अभिन्न अशी सहजस्थिती ऐक्यरूपाने प्राप्त झाली. (३९)

अद्वैतनिरूपण होतां। निमाली द्वैताची वार्ता।
ज्ञानचर्चा बोलो जातां। जागृती आली ॥ ४० ॥

अद्वैतासंबंधीचे निरूपण ऐकले की, द्वैत हे मिथ्या आहे हे कळून येते. आत्मज्ञानासंबंधी चर्चा केली, की आपण देह नाही ह्याची जाणीव होते. मी म्हणजे देह ह्या अज्ञाननिद्रेतून स्वस्वरूप- ज्ञानरूपी जागृती येते. (४०)

श्रोता व्हावें सावधान। अर्थीं घालावें मन।
खुणे पावतां समाधान। अंतरीं कळे ॥ ४१ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, श्रोत्यांनी आता सावध व्हावे व जे बोलले जात आहे त्याच्या अर्थावर मन एकाग्र करावे म्हणजे त्यांना आत्मज्ञानाची खूण पटून समाधान कसे असते, हे अंतर्यामी कळेल. (४१)

तेणें जितुकें ज्ञान कथिलें। तितुकें स्वप्नावारीं गेलें।
अनुर्वाच्य सुख उरलें। शब्दातीत ॥ ४२ ॥

अद्वैताच्या निरूपणात शब्दाने जितके ज्ञान सांगितले जाते ते शब्द मिथ्या असतात, त्याप्रमाणे स्वप्नही मिथ्या असते म्हणून ते स्वप्नाप्रमाणे मिथ्या ठरतात. पण आपण जर अर्थावर मन एकाग्र केले असेल, तर मग शब्दातीत अशा अनिर्वाच्य आत्मसुखाशी तादात्म्य होऊन स्वस्वरूपानुभव येतो. (४२)

तेथें शब्देंविण ऐक्यता। अनुभव ना अनुभविता।
ऐसा निवांत तो मागुतां। जागृती आला ॥ ४३ ॥

त्या अवस्थेत शब्दाशिवाय ऐक्य होते, अनुभव व अनुभविता हे द्वैतही राहत नाही. तो निश्चल, निवांत आत्मरूपी ऐक्य पावतो. हीच खरी जागृती होय. (४३)

तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला। जागा होऊनि जागृती आला।
तेथें शब्द कुंठित जाला। अंत नलगे ॥ ४४ ॥

जीवाने स्वप्नात आणखी एक स्वप्न पाहिले होते. नंतर त्याच स्वप्नात संसारदु:खाने दु:खी होऊन सद्गुरूंना शरण गेल्याचे स्वप्न त्याने पाहिले. त्यामुळे त्याची अज्ञाननिद्रा सरून तो स्वस्वरूपाविषयी जागृत झाला, म्हणजे त्याला शब्दज्ञान झाले. पण जागा होऊन जागृतीला आला म्हणजे त्या शब्दांच्या अर्थाचे चिंतन करता करता तो अर्थाशी एकरूप झाला. त्या वेळी शब्दज्ञान कुंठित झाले व तो अनंताशी एकरूप झाला. (४४)

या निरूपणाचें मूळ। केलेंचि करूं प्रांजळ।
तेणें अंतरीं निवळ। समाधान कळे ॥ ४५ ॥

या निरूपणाचे मूळ सार जे आहे ते आता परत स्पष्ट करून सांगतो म्हणजे मग तुला समाधान म्हणजे काय ते अंतर्यामी कळेल. (४५)

तंव शिष्यें विनविलें। जी हें आतां निरोपिलें।
तें पाहिजे बोलिलें। मागुतें स्वामी ॥ ४६ ॥

तेव्हा शिष्याने विनंती केली की हे स्वामी, आता आपण जे निरूपण केलेत तेच सर्व परत मला समजावून सांगावे. (४६)

**मज कळाया कारण। केलेंचि करावें निरूपण।**
**येथील जे कां निजखूण। ते मज अनुभवावी॥ ४७॥**

हा विषय अवघड आहे तो मला नीट कळावा म्हणून सांगितलेलेच पुन्हा सांगावे. त्यातील आत्मानुभवाची जी निजखूण, रहस्य आहे, त्याचा मला साक्षात अनुभव येईल असे आपण करावे. (४७)

**अजन्मा तो सांग कवण। तेणें देखिला कैसा स्वप्न।**
**तेथें कैसें निरूपण। बोलिलें आहे ॥ ४८॥**

आपण अजन्मा म्हणून म्हणालात तो कोण आहे, त्याने कुठले स्वप्न पाहिले, त्या स्वप्नात कशाचे निरूपण केले गेले, ते सर्व आपण मला सांगा. (४८)

**जाणोनी शिष्याचा आदर। स्वामी देती प्रत्योत्तर।**
**तेंचि आतां अति तत्पर। श्रोतीं येथें परिसावें॥ ४९॥**

शिष्याची जिज्ञासा जाणून स्वामींनी त्याच्या प्रश्नांना जी प्रत्युत्तरे दिली, ती आता येथे श्रोत्यांनी अत्यंत तत्पर होऊन ऐकावी. (४९)

**ऐक शिष्या सावधान। अजन्मा तो तूंच जाण।**
**तुवां देखिला स्वप्नींस्वप्न। तोहि आतां सांगतों॥ ५०॥**

श्रीगुरू म्हणतात की, शिष्या, सावध होऊन ऐक. येथे मी जो अजन्मा म्हणून सांगितला तो तूच आहेस. आता तू स्वप्नात स्वप्न कुठले पाहिलेस तेही स्पष्ट करून सांगतो ते ऐक. (५०)

**स्वप्नीं स्वप्नाचा विचार। तो तूं जाण हा संसार।**
**येथें तुवां सारासार। विचार केला ॥ ५१॥**

हा संसार हेच तू पाहिलेले स्वप्न होय आणि स्वप्नातील विचार म्हणजे येथे तू जो सारासारविचार केलास तो होय. (५१)

**रिघोनी सद्‌गुरूस शरण। काढून शुद्ध निरूपण।**
**याची करिसी ऊणखूण। प्रत्यक्ष आतां ॥ ५२॥**

नंतर तू सद्गुरूंना शरण गेलास. त्यांच्या मुखाने अध्यात्माचे शुद्ध निरूपण ऐकलेस, तेव्हा तुला आपण स्वप्नात वावरत आहोत याची खरी खूण पटली. (५२)

**याचाचि घेतां अनुभव। बोलणें तितुकें होतें वाव।**
**निवांत विश्रांतीचा ठाव। ते तूं जाण जागृती॥ ५३॥**

आता तू त्याचा प्रत्यक्ष अनुभवच घेत आहेस. जेव्हा तुला स्वस्वरूपानुभव येईल तेव्हा शाब्दिक ज्ञान हेही मिथ्याच असते, हे तुला कळेल व तू आत्मस्वरूपाच्या ठिकाणी निश्चल होऊन तीच विश्रांतीची जागा होय हे तुला स्वानुभवाने कळेल. हीच मीपणरहित जी स्थिती तीच खरी जागृती होय, हे तू जाणून घे. (५३)

**ज्ञानगोष्टीचा गल्बला। सरोन अर्थ प्रगटला।**
**याचा विचार घेतां आला। अंतरीं अनुभव ॥ ५४॥**

प्रथम प्राप्त झालेल्या शाब्दिक ज्ञानाचा गोंधळ संपून ज्या वेळी त्यातील अर्थाकडे तुझे लक्ष केंद्रित होईल, त्या वेळी त्या अर्थाचा विचार करता करता तुला अंतर्यामी त्याचा अनुभव येईल. (५४)

**तुज वाटे हे जागृती। मज जाली अनुभवप्राप्ती।**
**या नांव केवळ भ्रांती। फिटलीच नाहीं ॥ ५५॥**

तुला त्या वेळी वाटेल की मला अनुभवाची प्राप्ती झाली हीच खरी जागृती असावी. पण हे बोलणे योग्य नाही. यावरून तुझी भ्रांती अद्याप फिटली नाही हेच कळून येते. (५५)

**अनुभव अनुभवीं विराला। अनुभवेंविण अनुभव आला।**
**हाहि स्वप्नींचा चेईला। नाहींस बापा ॥ ५६॥**

अनुभव अनुभवांत विरला, म्हणजे मी देह हे जाऊन मी आत्मा, मी द्रष्टा, साक्षी असा अनुभव आला, म्हणजे अनुभवाशिवाय अनुभव आला तरी हा तुझा अनुभवही स्वप्नमयच आहे. अरे बाबा, तू अजून खरा जागा झालेला नाहीस. (५६)

**जागा जालियां स्वप्नउर्मी। स्वप्नीं म्हणसी अजन्मा तो मी।**
**जागेपणें स्वप्नउर्मी। गेलीच नाहीं ॥ ५७॥**

तू जागा झालास असे तुला वाटते आहे, पण अजून तू स्वप्नातच आहेस. स्वप्नातच अजन्मा तो मीच असे तू म्हणत आहेस, जागेपणीही तुझी स्वप्नऊर्मी अद्याप गेलेली नाही. (५७)

स्वप्नीं वाटे जागेपण। तैसी अनुभवाची खूण।
आली परी तें सत्य स्वप्न। भ्रमरूप ॥५८॥

स्वप्नातच एखाद्याला वाटते की, तो जागा झाला आहे. तशा प्रकारे अनुभवप्राप्तीमुळे तुला वाटते आहे की आपण जागे झालो. पण तो अनुभव सत्य असला तरी भ्रमरूप स्वप्नातून तू अद्याप पूर्ण जागा झाला नाहीस. (५८)

जागृती या पैलिकडे। तें सांगणें केवि घडे।
जेथें धारणाचि मोडे। विवेकाची ॥५९॥

ज्या अनुभवाच्या पलीकडे जागृती असते, जेथे विवेकाची धारणाच मोडते. त्या स्थितीचे वर्णन कसे करता येईल? (५९)

म्हणोनि तें समाधान। बोलतांचि न ये ऐसें जाण।
निशब्दाची ऐसी खूण। वोळखावी ॥६०॥

म्हणूनच ते समाधान अनिर्वचनीय, बोलता न येण्यासारखेच आहे. शब्दांच्या पलीकडील अनिर्वाच्य आहे, हीच त्याची खूण ओळखावी. (६०)

ऐसें आहे समाधान। बोलतांच न ये जाण।
इतुकेन बाणली खूण। निशब्दाची ॥६१॥

ते समाधान शब्दात सांगताच येत नाही. यावरूनच ते नि:शब्द, अनुर्वाच्य आहे याचा अर्थ तुझ्या लक्षात यावा. (६१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अनुर्वाच्यनाम' समास दहावा समाप्त.

दशक सहावा समाप्त.



# दशक सातवा : चौदा ब्रह्मांचा

## दशक ७ : समास १

## मंगलाचरण

॥ श्रीराम ॥

**विद्यावंताचां पूर्वजु । मत्ताननु येकद्विजु ।**
**त्रिनयेन चतुर्भुजु । फरशपाणी ॥ १ ॥**

मदोन्मत्त हत्तीचे मस्तक ज्याचे तोंड आहे, जो एकदंत, तीन नेत्र असलेला आहे व जो चतुर्भुज आहे, ज्याने हातात परशू धारण केला आहे, तो प्रसन्नवदन गजमुख हा सर्व विद्यावंतांचा पूर्वज म्हणजेच मूळ पुरुष आहे. (१)

**कुबेरापासूनि अर्थ । वेदापासून परमार्थ ।**
**लक्ष्मीपासून समर्थ । भाग्यासि आले ॥ २ ॥**

कुबेरापासून धन प्राप्त होते, वेदापासून परमार्थ लाभतो, तर लक्ष्मीमुळे ऐश्वर्यसंपन्न झालेले लोक भाग्यवान होतात. (२)

**तैसी मंगळमूर्ती अद्या । पासूनि जाल्या सकळ विद्या ।**
**तेणें कवी लाघव गद्या । सत्पात्रें जाले ॥ ३ ॥**

त्याप्रमाणे मंगलमूर्ती हा सर्व विद्यांचा जनक असून त्याच्या-पासूनच सर्व विद्या झाल्या आहेत. त्याच्या कृपेने प्राप्त झालेल्या विद्येमुळे कवी गद्य-पद्य रचना निर्माण करून मान्यवंत ठरले. (३)

**जैसी समर्थाचीं लेंकुरें । नाना आळंकारीं सुंदरें ।**
**मूळ पुरुषाचेनि द्वारें । तैसे कवी ॥ ४ ॥**

जशी श्रीमंतांची मुले नाना सुंदर अलंकारांनी शोभतात, तसे मूळ पुरुषाच्या कृपेने कवी फार शोभून दिसतात. (४)

**नमूं ऐसिया गणेंद्रा । विद्याप्रकाशें पूर्णचंद्रा ।**
**जयाचेनि बोधसमुद्रा । भरितें दाटे बळें ॥ ५ ॥**

अशा त्या गणेंद्राला मी नमन करतो. पूर्णचंद्राला पाहून सागराला भरती यावी, त्याप्रमाणे विद्यारूपी प्रकाशाने परिपूर्ण अशा पूर्णचंद्ररूपी गणेशाला पाहून बोधरूपी समुद्रालाही अतिशय भरती येत आहे. (५)

**जो कर्तुत्वास आरंभ । मूळपुरुष मुळारंभ ।**
**जो परात्पर स्वयंभ । आदिअंतीं ॥ ६ ॥**

जो सर्व कर्तृत्वाचा आरंभ आहे, मूळ पुरुष, आदिपुरुष असून ज्याच्यापासून सर्व विश्वाची उत्पत्ती झाली आहे, पण जो या सर्वांच्या पलीकडील असून स्वयंभू आहे, जो आधीही आहे व अंतीही आहे; (६)

**तयापासून प्रमदा । इछा कुमारी शारदा ।**
**आदित्यापासून गोदा । मृगजळ वाहे ॥ ७ ॥**

त्याच्याचपासून **'बहु स्याम्'** ही इच्छा, ही स्फुरणरूपी शारदाकुमारी उत्पन्न झाली आहे. आदित्यापासून मृगजळाची गोदावरी वाहावी, तशी या मूळपुरुषापासून शारदा म्हणजे मूळमाया झाली आहे. (७)

**जे मिथ्या म्हणतांच गोवी । माईकपणें लाघवी ।**
**वक्तयास वेढा लावी । वेगळेपणें ॥ ८ ॥**

तिला मिथ्या म्हणावे तर ती लाघवी आहे, तसेच मायिक असे म्हणणाऱ्यालाच ती मोहात गुंतविते. मायेच्या नाटकीपणाने वक्ता निरूपण करीत असतानाच मीपणाच्या जाणिवेमुळे नकळत वेगळा पडतो. (८)

**जे द्वैताची जननी । किं ते अद्वैताची खाणी ।**
**मूळमाया गवसणी । अनंत ब्रह्मांडांची ॥ ९ ॥**

ती द्वैताची जननी आहे की अद्वैताची खाण आहे! माया दोन प्रकारची आहे असे म्हणतात. अविद्या माया द्वैताची जननी, त्यास उत्पन्न करणारी आहे, तर विद्या माया ही अद्वैताची खाण आहे, म्हणजे तिच्या योगेच अद्वैतानुभव येतो. ती मूळमाया अनंत ब्रह्मांडांना आच्छादून टाकते. (९)

**कीं ते अवदंबरी वल्ली । अनंत ब्रह्मांडीं लगडली ।**
**मूळपुरुषाची माउली । दुहितारूपें ॥ १० ॥**

ती मूळमाया म्हणजे विनासायास उगवणारी वेली आहे. ती अनंत ब्रह्मांडेरूपी फळांनी लगडलेली आहे. ती मूळपुरुषाची आई आणि कन्याही आहे. (परब्रह्मापासून मूळमाया व तिच्यापासून मूळपुरुष झाले.) (१०)

वंदूं ऐसी वेदमाता। आदिपुरुषाची जे सत्ता।
आतां आठवीन समर्था। सद्‌गुरूसी ॥ ११ ॥

अशी जी वेदमाता आहे आणि आदिपुरुषाची जी सत्ता आहे तिला मी वंदन करतो. आता यानंतर मी समर्थ अशा सद्गुरूंचे स्मरण करतो. (११)

जयाचेनि कृपादृष्टी। होये आनंदाची वृष्टी।
तेणें सुखें सर्व सृष्टी। आनंदमये ॥ १२ ॥

त्यांच्या कृपादृष्टीने आनंदाची वृष्टी होते, एवढेच नव्हे, तर त्या सुखाने सर्व सृष्टीच आनंदमय बनते.(१२)

किं तो आनंदाचा जनक। सायोज्यमुक्तीचा नायेक।
कैवल्यपददायक। अनाथबंधु ॥ १३ ॥

सद्गुरू हे आनंदाचे जनक असतात, सायुज्यमुक्तीचे नायक असतात, सायुज्यमुक्तीने त्यांना वरलेले असते. ते अनाथांचे बंधू म्हणजे आश्रयदाते असतात व कैवल्यपदाची प्राप्ती करून देतात. (१३)

मुमुक्ष चातकीं सुस्वर। करुणा पाहिजे अंबर।
वोळे कृपेचा जळधर। साधकांवरी ॥ १४ ॥

मुमुक्षू हे जणू चातकपक्षी असतात आणि ते सुस्वराने सद्गुरूरूपी जलधराची त्याने कृपावृष्टी करावी म्हणून आळवणी करीत असतात. तेव्हा सद्गुरूंच्या कृपारूपी आकाशात सद्गुरुरूपी कृपामेघ प्रगट होतात व कृपावृष्टी करून मुमुक्षुरूपी चातकाची तहान शमवतात. (१४)

किं तें भवार्णवींचें तारूं। बोधें पाववी पैलपारु।
माहां आवर्ती आधारु। भाविकांसी ॥ १५ ॥

किंवा सद्गुरू हे या भवसागरातील जहाजच आहेत व आत्मबोध करून भाविकांना या सागराच्या पैलतीरास पोहोचवितात. (१५)

किं तो काळाचा नियंता। नांतरी संकटीं सोडविता।
किं ते भाविकांची माता। परम स्नेहाळु ॥ १६ ॥

सद्गुरू हे काळावरही नियंत्रण ठेवतात, नाना संकटांतून भाविकांना सोडवतात आणि भाविकांची ते अति स्नेहाळू अशी माताच आहेत. (१६)

किं जो परत्रींचा आधार। किं ते विश्रांतीची थार।
नांतरी सुखाचें माहेर। सुखस्वरूप ॥ १७ ॥

सद्गुरू हे परमार्थात मार्गदर्शन करीत असल्याने मुमुक्षूंना त्यांचा मोठा आधार वाटतो. त्यांच्या सान्निध्यातच खरी विश्रांती भाविकांना मिळते, म्हणून ते म्हणजे साधकांचे जणू हक्काचे, विश्रांतीचे स्थळ असते. म्हणूनच सद्गुरूंना सुखाचे माहेर असे म्हटले जाते. त्यांच्याजवळ सुखालाही सुख प्राप्त होते. (१७)

ऐसा सद्‌गुरू पूर्णपणी। तुटे भेदाची कडसणी।
देहविण लोटांगणी। तया प्रभूसी ॥ १८ ॥

असे हे सद्गुरू साक्षात परब्रह्माप्रमाणेच सर्व प्रकारे परिपूर्ण असतात. त्यांच्या कृपेने भेदरूपी अडसर तुटतो. अशा त्या सद्गुरूंना माझ्या प्रभूंना, स्वामींना मी देहाशिवाय म्हणजे मीपणाविरहित लोटांगण घालतो. (१८)

साधु संत आणी सज्जन। वंदूनियां श्रोतेजन।
आतां कथानुसंधान। सावध ऐका ॥ १९ ॥

याप्रमाणे श्रीसद्गुरुवंदन केल्यानंतर इतर सर्व साधू, संत आणि सज्जन श्रोते यांनाही वंदन करून वक्ता म्हणतो आहे की, आता पुढील कथानुसंधानही आपण सावधपणे ऐका. (१९)

संसार हाचि दीर्घ स्वप्न। लोभें वोसणाती जन।
माझी कांता माझें धन। कन्या पुत्र माझे ॥ २० ॥

संसार हेच दीर्घ काळ चालणारे स्वप्न असून त्यात लोभामुळे माझी कांता, माझे धन, माझे कन्या-पुत्र असे लोक नाना प्रकारे बरळतात. (२०)

ज्ञानसूर्य मावळला। तेणें प्रकाश लोपला।
अंधकारें पूर्ण जाला। ब्रह्मगोळ आवघा ॥ २१ ॥

आत्मज्ञानरूपी सूर्य मावळल्याने आत्मज्ञानरूपी प्रकाश नाहीसा होतो आणि अवघा ब्रह्मांडगोल अंधाराने पूर्ण व्यापला जातो. (२१)

**नाहीं सत्वाचें चांदिणें। कांहीं मार्ग दिसे जेणें।**
**सर्व भ्रांतीचेनि गुणें। आपेंआप न दिसे ॥ २२॥**

ज्यायोगे मार्ग सापडला असता त्या सत्त्वगुणरूपी चांदण्याचाही अभाव असल्याने मार्ग दिसत नाही. सर्व प्रकारच्या भ्रांतीच्या योगाने म्हणजे विपरीत ज्ञानाने वेढून टाकल्याने आपण स्वत:लाही पाहू शकत नाही, अशी स्थिती होते. (२२)

**देहबुद्धिअहंकारें। निजेले घोरती घोरें।**
**दु:खें आक्रंदती थोरें। विषयसुखाकारणें ॥ २३॥**

अज्ञानरूपी निद्रेत झोपलेले असताना देहबुद्धीच्या अहंकारामुळे ते मोठमोठ्याने घोरत असतात आणि विषयसुख मिळावे म्हणून मोठ्याने आक्रोश करीत असतात. (२३)

**निजेले असतांच मेले। पुन्हा उपजतांच निजेले।**
**ऐसे आले आणी गेले। बहुत लोक ॥ २४॥**

अज्ञानरूपी निद्रेत असतानाच ते मरतात आणि परत जन्माला आले की, परत अज्ञानरूपी निद्रेत झोपी जातात. याप्रकारे अनेक लोक असेच आले आणि गेले. (२४)

**निदसुरेपणेंचि सैरा। बहुतीं केल्या येरझारा।**
**नेणोनियां परमेश्वरा। भोगिले कष्ट ॥ २५॥**

अज्ञानरूपी निद्रेच्या भराने असंख्य जीव स्वैरपणे जन्ममृत्यूच्या येरझारा करीत राहतात. परमेश्वराला न जाणल्याने त्यांना खूप कष्ट सोसावे लागतात. (२५)

**तया कष्टाचें निर्शन। व्हावया पाहिजे आत्मज्ञान।**
**म्हणोनि हें निरूपण। अध्यात्मग्रंथ ॥ २६॥**

हे कष्ट भोगावे लागू नयेत म्हणून आत्मज्ञान होणे अत्यंत आवश्यक आहे. त्यासाठीच ते ज्ञान करून देण्यासाठीच अध्यात्म ग्रंथाची आवश्यकता असते. (२६)

**सकळ विद्येमध्यें सार। अध्यात्मविद्येचा विचार।**
**दशमोध्याईं सारंगधर। भगवद्गीतेसि बोलिला ॥ २७॥**

श्लोक

अध्यात्मविद्या विद्यानां वाद: प्रवदतामहम्॥

जगातील सर्व विद्यांमध्ये अध्यात्मविद्या हीच सर्वश्रेष्ठ आहे, असे श्रीमद् भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायात भगवान श्रीकृष्णांनी म्हटले आहे. (२७)

**अर्थ**—सर्व विद्यांमध्ये अध्यात्मविद्या ती मीच होय. प्रवक्त्यांचा वाद तोही मीच होय. (असे भगवान श्रीकृष्ण म्हणतात.)

**याकारणें अद्वैतग्रंथ। अध्यात्मविद्येचा परमार्थ।**
**पाहावया तोचि समर्थ। जो सर्वांगें श्रोता ॥ २८॥**

या कारणानेच अध्यात्मविद्येचा परमार्थ ज्यांत प्रतिपादन केलेला असतो ते अद्वैत-ग्रंथ-श्रवण जो श्रोता जीवाचे कान करून ऐकतो, सर्व लक्ष श्रवणात एकाग्र करून ऐकतो, तोच त्यातील अर्थ ग्रहण करू शकतो. (२८)

**जयाचें चंचल हृदये। तेणें ग्रंथ सोडूंचि नये।**
**मोडितां अलभ्य होये। अर्थ येथीचा ॥ २९॥**

ज्याला चंचल हृदयामुळे असे श्रवण घडत नसेल त्यानेही काहीही झाले तरी ग्रंथ एकदा वाचून अथवा श्रवण करून सोडून देऊ नये, वारंवार वाचून अथवा श्रवण करून मनन करावे. जर असे केले नाही, तर त्या अध्यात्मग्रंथाच्या वाचनाने अथवा श्रवणाने जो अलभ्य लाभ होतो तो होणार नाही, तो अलभ्यच राहील. (२९)

**जयास जोडला परमार्थ। तेणें पाहावा हा ग्रंथ।**
**अर्थ शोधितां परमार्थ। निश्चयें बाणे ॥ ३०॥**

ज्याला परमार्थाची खरोखर तळमळ असेल, मनापासून आवड असेल त्याने हा अध्यात्मग्रंथ जरूर वाचावा. वारंवार वाचून अर्थासंबंधी शोध घेऊ लागल्यावर परमार्थ निश्चयाने त्याच्या अंगी बाणेल. (३०)

**जयासि नाहीं परमार्थ। तयासि न कळे येथीचा अर्थ।**
**नेत्रेंविण निधानस्वार्थ। अंधास कळेना ॥ ३१॥**

ज्या माणसाला परमार्थाची आवड नाही, त्याला या ग्रंथातील अर्थ कळणार नाही. आंधळ्या माणसाला डोळ्यांच्या अभावी द्रव्यसाठा दिसत नाही. (३१)

**येक म्हणती मऱ्हाटें काये। हें तों भल्यांसि ऐकों नये।**
**तें मूर्खें नेणती सोये। अर्थान्वयाची ॥ ३२॥**

कुणी एक म्हणतात की मराठीत काही अर्थ नाही. चांगल्या माणसांनी मराठीतील अध्यात्मग्रंथ ऐकू नये, असे म्हणणारी माणसे मूर्ख असतात. ग्रंथांतील शब्दांचा अन्वयार्थ लावून त्यांतील सार ग्रहण करण्याची त्यांची कुवत नसते. (३२)

**लोहाची मांदुस केली। नाना रत्नें साठविलीं।**
**ते अभाग्यानें त्यागिली। लोखंड म्हणौनी ॥ ३३॥**

लोखंडाची पेटी केली आणि त्यात नाना रत्नांचा साठा केला आणि अभागी माणसाने ती पेटी लोखंडाची म्हणून तिचा त्याग करावा, (३३)

**तैसी भाषा प्राकृत। अर्थ वेदांत आणि सिद्धांत।**
**नेणोनि त्यागी भ्रांत। मंदबुद्धिस्तव ॥ ३४॥**

त्याप्रमाणेच भाषा मराठी म्हणून ज्या ग्रंथांत वेदांत आणि सिद्धांताचा अर्थ, स्पष्टीकरण मराठीत केलेले असते, त्यांचा भ्रमिष्ट लोक त्यांची बुद्धी मंद असल्याने त्या ग्रंथाचे महत्त्व न जाणून त्याग करतात. (३४)

**आहाच सांपडतां धन। त्याग करणें मूर्खपण।**
**द्रव्य घ्यावें सांठवण। पाहोंचि नये ॥ ३५॥**

सहजगत्या, काही श्रम न पडता जर द्रव्य सापडले, तर त्याचा त्याग करणे हा मूर्खपणा आहे. द्रव्य कशात साठवले आहे ह्याचा विचार न करता द्रव्य घ्यावे.(३५)

**परिस देखिला आंगणीं। मार्गीं पडिला चिंतामणी।**
**आव्हावेल माहांगुणी। कूपांमधें ॥ ३६॥**

समजा, परीस अंगणात सापडला, वाटेने जात असता वाटेवर चिंतामणी पडलेला दिसला आणि अत्यंत श्रेष्ठ, उजव्या बाजूने वाढणारी वेल घराच्या विहिरीत आढळून आली तर परीस, चिंतामणी किंवा कल्पलता अयोग्य ठिकाणी आढळली, म्हणून त्याचा त्याग शहाण्या माणसाने करू नये. (३६)

**तैसें प्राकृतीं अद्वैत। सुगम आणी सप्रचित।**
**अध्यात्म लाभे अकस्मात। तरी अवश्य घ्यावें॥ ३७॥**

त्याप्रमाणे मराठीत जर सोप्या शब्दात अनुभवसिद्ध असे अद्वैत तत्त्वज्ञान प्राप्त होत असेल, तर अचानक लाभणाऱ्या त्या अध्यात्माचा लाभ जरूर घ्यावा.(३७)

**न करितां वित्पत्तीचा श्रम। सकळ शास्त्रार्थ होये सुगम।**
**सत्समागमाचें वर्म। तें हें ऐसें असे ॥ ३८॥**

विद्याप्राप्तीसाठी व्युत्पत्तीचे जराही श्रम करावे न लागता केवळ सत्समागमामुळे सर्व शास्त्रार्थ सुगम होतो. सत्समागमाचे हेच तर वर्म-रहस्य आहे. (३८)

**जें वित्पत्तीनें न कळे। तें सत्समागमें कळे।**
**सकळ शास्त्रार्थ आकळे। स्वानुभवासी ॥ ३९॥**

जो शास्त्रार्थ विद्वत्तेने कळत नाही, तो सर्व शास्त्रार्थ सत्समागमामुळे स्वानुभव येऊन कळतो. (३९)

**म्हणौनि कारण सत्समागम। तेथें नलगे वित्पत्तीश्रम।**
**जन्मसार्थकाचें वर्म। वेगळेंचि आहे ॥ ४०॥**

म्हणून शास्त्रार्थ कळण्यास विद्याप्राप्तीसाठी करावे लागतात तसे श्रम करण्याची आवश्यकता नाही, तर सत्समागमाची आवश्यकता आहे. कारण ज्यायोगे मनुष्यजन्माचे सार्थक होते, ते वर्म वेगळेच आहे.(४०)

श्लोक

भाषाभेदाश्च वर्तन्ते ह्यर्थ एको न संशयः।
पात्रद्वये यथा खाद्यं स्वादभेदो न विद्यते॥ १॥

भाषांमध्ये भेद असतो, पण त्यात अर्थ एकच असतो. खाण्याची वस्तू वेगवेगळ्या दोन भांड्यांत ठेवली, तरी त्यांच्या रुचीमध्ये फरक पडत नाही.

**भाषापालटें कांहीं। अर्थ वायां जात नाहीं।**
**कार्यसिद्धि ते सर्वही। अर्थाचपासीं ॥ ४१॥**

भाषा जरी बदलली तरी अर्थात काही फरक पडत नाही. सर्व कार्यसिद्धी अर्थावरच अवलंबून असते.(४१)

**तथापी प्राकृताकरितां। संस्कृताची सार्थकता।**
**येऱ्हवीं त्या गुप्तार्था। कोण जाणे ॥ ४२॥**

तथापि खरी गोष्ट अशी आहे, अध्यात्मग्रंथ प्राकृतात झाल्यामुळेच संस्कृतमधील ग्रंथांची थोरवी लोकांना कळून येत आहे. नाहीतर संस्कृत ग्रंथात जो गुप्त अर्थ भरलेला आहे, त्याला कोण जाणू शकले असते? (४२)

**आतां असो हें बोलणें। भाषा त्यागूनि अर्थ घेणें।**
**उत्तम घेऊन त्याग करणें। सालीटरफलांचा ॥ ४३॥**

आता हे बोलणे पुरे झाले. उत्तम सारभाग ग्रहण करून साली, टरफलांचा त्याग करावा, त्याप्रमाणे भाषा कुठलीही का असेना तिचा विचार न करता त्यातील अर्थावर लक्ष केंद्रित करावे. त्याचे ग्रहण करावे. (४३)

**अर्थ सार भाषा पोचट। अभिमानें करावी खटपट।**
**नाना अहंतेनें वाट। रुधिली मोक्षाची ॥ ४४ ॥**

अध्यात्मग्रंथातील अर्थ हे सार आहे त्याचे खरे महत्त्व आहे. भाषा पोचट आहे म्हणजे भाषेला महत्त्व नाही. पण लोक भाषाभिमान बाळगून व्यर्थच वाद घालीत बसतात त्या नाना प्रकारच्या अहंतेमुळे ते स्वत:च्या मोक्षाच्या मार्गांत अडथळे उत्पन्न करत असतात. (४४)

**शोध घेतां लक्ष्यांशाचा। तेथें आधीं वाच्यांश कैंचा।**
**अगाध महिमा भगवंताचा। कळला पाहिजे ॥ ४५ ॥**

वाच्यांश म्हणजे शब्द व लक्ष्यांश म्हणजे अर्थ. ज्या वेळी माणूस अर्थाचा शोध घेऊ लागतो तेव्हा शब्द मागे पडतो, अर्थावरच लक्ष केंद्रित करावे लागते. पण भगवंताचा महिमा तर इतका अगाध आहे की तो शब्द व अर्थ यांच्याही पलीकडे गेल्याशिवाय जाणता येत नाही हे आपल्याला कळायला हवे. (४५)

**मुकेपणाचें बोलणें। हें जयाचें तोचि जाणे।**
**स्वानुभवाचिये खुणे। स्वानुभवी पाहिजे॥ ४६ ॥**

मुक्या माणसांची एक भाषा असते. ती ज्याची त्यालाच कळते, म्हणजे दुसऱ्या मुक्याला कळते किंवा ती भाषा जो जाणत असेल त्यालाच ती कळते. त्याचप्रमाणे स्वानुभवाच्या ज्या खुणा, त्या स्वानुभवीच जाणू शकतो. (४६)

**अर्थ जाणे अध्यात्माचा। ऐसा श्रोता मिळेल कैंचा।**
**जयासि बोलतां वाचेचा। हव्यासचि पुरे ॥ ४७ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, ज्याला अध्यात्माचा अर्थ कळतो असा श्रोता भेटावा असे वक्त्याला वाटत असते. तसा श्रोता भेटला की वक्त्याला बोलण्यात हौस वाटते. (४७)

**परीक्षवंतांपुढें रत्न। ठेवितां होये समाधान।**
**तैसें ज्ञानियांपुढें ज्ञान। बोलावें वाटे ॥ ४८ ॥**

रत्नपारखी मनुष्य असेल तर त्याच्यापुढे रत्ने ठेवताना समाधान वाटते. कारण तो त्याचे मूल्य बरोबर जाणतो. त्याप्रमाणेच ब्रह्मनिष्ठ आत्मज्ञानी व्यक्तीपुढे ज्ञानाच्या गोष्टी बोलाव्याशा वाटतात. (४८)

**मायाजाळें दुश्चीत होये। तें निरूपणीं कामा न ये।**
**सांसारिकां कळे काये। अर्थ येथीचा ॥ ४९ ॥**

मायेच्या जाळ्यात सापडल्याने ज्याचे चित्त चंचल झालेले असते त्याला अध्यात्माचे निरूपणही उपयोगी पडत नाही. जो सांसारिक आहे, त्याला आध्यात्मिक ग्रंथांचा अर्थ कसा कळणार? (४९)

श्लोक

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्॥ १ ॥

**अर्थ**—हे कुरुनंदना स्वरूपनिश्चय करणारी बुद्धी एकच असते. ज्या लोकांच्या बुद्धीला अनेक फाटे फुटलेले असतात त्यांना स्वरूपनिश्चय करता येत नाही. (१)

**वेवसाईं जो मळिण। त्यासि न कळे निरूपण।**
**येथें पाहिजे सावधपण। अतिशयेंसीं ॥ ५० ॥**

जो अनेक धंदे करणारा असतो, ज्याचे अंत:करण शुद्ध झालेले नसते, त्याला अध्यात्मनिरूपणातील अर्थ ग्रहण करता येत नाही. तो अर्थ कळण्यास अत्यंत सावधानता, चित्ताची एकाग्रता यांची आवश्यकता असते. (५०)

**नाना रत्नें नाना नाणीं। दुश्चीतपणें घेतां हानी।**
**परीक्षा नेणतां प्राणी। ठकला तेथें ॥ ५१ ॥**

एखाद्या माणसापुढे नाना रत्ने, अनेक प्रकारची नाणी पडलेली आहेत किंवा कुणी आणून टाकली तरी त्याला रत्नांची अथवा नाण्यांची पारख करता येत नसेल आणि त्याने बेसावधपणे त्यातून काही उचलली तरी त्याची फसगत होते. (५१)

**तैसें निरूपणीं जाणा। आहाच पाहातां कळेना।**
**मराटेंचि उमजेना। कांहीं केल्यां ॥ ५२ ॥**

तसे अध्यात्माचे विवेचन अगदी मराठीत जरी असले तरी वरवर ऐकले, तर ते काही केल्या उमजत नाही.(५२)

**जेथें निरूपणाचे बोल। आणि अनुभवाची वोल।**
**तें संस्कृतापरीस खोल। अध्यात्मश्रवण ॥५३॥**

जे अध्यात्म-निरूपण वक्त्याच्या अनुभवाच्या बोलाने युक्त असते, ते जरी प्राकृतात असले तरी संस्कृतापेक्षा अधिक सखोल असते. (५३)

**मायाब्रह्म वोळखावें। तयास अध्यात्म म्हणावें।**
**तरी तें मायेचें जाणावें। स्वरूप आर्धी ॥५४॥**

ज्या निरूपणाने माया व ब्रह्म यांचे स्वरूप कळून येते, त्याला अध्यात्म म्हणतात. तरी आता प्रथम मायेचे स्वरूप जाणून घ्या. (५४)

**माया सगुण साकार। माया सर्वस्व विकार।**
**माया जाणिजे विस्तार। पंचभूतांचा ॥५५॥**

माया ही सगुण-साकार असते. सर्व विकार मायेच्या ठिकाणीच असतात. हा पंचमहाभूतांचा पसारा म्हणजेच माया. (५५)

**माया दृश्य दृष्टीस दिसे। माया भास मनासि भासे।**
**माया क्षणभंगुर नासे। विवेकें पाहातां ॥५६॥**

मायेच्या योगेच ही दृश्य सृष्टी आपल्या डोळ्यांना दिसत असते. मायेच्यामुळे मनाला नाना भास होतात. माया ही क्षणभंगुर असून सारासारविवेक केला की ती नाश पावते. (५६)

**माया अनेक विश्वरूप। माया विष्णूचें स्वरूप।**
**मायेची सीमा अमूप। बोलिजे तितुकी ॥५७॥**

अनेक ब्रह्मांडे, हे सर्व विश्व हे मायेचेच स्वरूप आहे. माया ही विष्णूचे स्वरूप आहे, म्हणजे निर्गुण ब्रह्म मायेच्या योगेच सगुण- साकार बनते. मायेची सीमा अमूप म्हणजे अवर्णनीय आहे; तिच्याबद्दल जितके बोलावे तेवढे थोडेच आहे. (५७)

**माया बहुरूपी बहुरंग। माया ईश्वराचा संग।**
**माया पाहातां अभंग। अखिळ वाटे ॥५८॥**

माया बहुरूप्याप्रमाणे वेगवेगळी सोंगे घेते. ती बहुरंगी म्हणजेच बहुढंगीही आहे. ईश्वराच्या ठिकाणीही मायेचे अस्तित्व असते. कारण मायेशिवाय सगुण, निराकार व साकार प्रगटू शकतच नाही. प्रथमदर्शनी असे वाटते की ती अखिल, अभंग आहे. (५८)

**माया सृष्टीची रचना। माया आपुली कल्पना।**
**माया तोडितां तुटेना। ज्ञानेंविण ॥५९॥**

मायेमुळे दृश्य सृष्टीची रचना झाली. आपली कल्पना हे मायेचेच रूप आहे. मात्र आत्मज्ञान झाल्याखेरीज अन्य उपायांनी ती नष्ट होत नाही. (५९)

**ऐसी माया निरोपिली। स्वल्प संकेतें बोलिली।**
**पुढें वृत्ति सावध केली। पाहिजे श्रोतीं ॥६०॥**

याप्रमाणे अगदी थोडक्यात केवळ संकेताने मायेचे वर्णन केले आहे. आता श्रोत्यांनी चित्तवृत्ती अत्यंत सावध करणे आवश्यक आहे. (६०)

**पुढें ब्रह्मनिरोपण। निरोपिलें ब्रह्मज्ञान।**
**जेणें तुटे मायाभान। येकसरें ॥६१॥**

कारण आता पुढील समासात परब्रह्माचे निरूपण करून ज्या ब्रह्मज्ञानाच्या योगे मायेचे भान पूर्णपणे तुटते, नष्ट होते, त्या ब्रह्मज्ञानाचे स्वरूप सांगितले जाईल, असे समर्थ म्हणतात. (६१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मंगलाचरणनाम' समास पहिला समाप्त.**



## दशक ७ : समास २

# ब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ब्रह्म निर्गुण निराकार। ब्रह्म निःसंग निर्विकार।**
**ब्रह्मासि नाहीं पारावार। बोलती साधु ॥ १ ॥**

श्रीसमर्थ सांगतात की, ब्रह्म हे गुणरहित, आकाररहित, संगरहित आणि विकाररहित असून त्याला पारावार नाही, असे साधू लोक म्हणतात. (१)

**ब्रह्म सर्वांस व्यापक। ब्रह्म अनेकीं येक।**
**ब्रह्म शाश्वत हा विवेक। बोलिल्रे शास्त्रीं ॥ २ ॥**

ब्रह्म हे सर्व चराचराला व्यापून आहे, अनेकांत असून एक आहे व ते शाश्वत आहे असे सर्व शास्त्रे सांगतात. (२)

**ब्रह्म अच्युत अनंत। ब्रह्म सदोदित संत।**
**ब्रह्म कल्पनेरहित। निर्विकल्प ॥ ३ ॥**

ब्रह्म अढळ आहे, त्याला अंत नाही, ते सदोदित असणारे असून कल्पनेरहित निर्विकल्प असे आहे. (३)

**ब्रह्म या दृश्यावेगळें। ब्रह्म सुन्यत्वास निराळें।**
**ब्रह्म इंद्रियांच्या मेळें। चोजवेना ॥ ४ ॥**

या दृश्य सृष्टीहून ते वेगळे आहे, शून्यत्वाहूनही निराळे आहे. ते मनबुद्धीअगोचर असल्याने इंद्रियांच्या योगे त्याला जाणता येत नाही. (४)

**ब्रह्म दृष्टीस दिसेना। ब्रह्म मूर्खासी असेना।**
**ब्रह्म साधुविण येना। अनुभवासी ॥ ५ ॥**

ब्रह्म डोळ्यांना दिसत नाही, त्यामुळे मूर्ख लोक ब्रह्म नाही असेच म्हणतात. साधूंची कृपा झाल्याखेरीज ब्रह्माचा अनुभव येत नाही. (५)

**ब्रह्म सकळांहूनि थोर। ब्रह्मा ऐसें नाहीं सार।**
**ब्रह्म सूक्ष्म अगोचर। ब्रह्मादिकांसी ॥ ६ ॥**

ब्रह्म सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहे. त्याच्यासारखे दुसरे सार नाही. ते अत्यंत सूक्ष्म असल्याने ब्रह्मादिकांनाही ते इंद्रियांनी जाणता येत नाही. (६)

**ब्रह्म शब्दीं ऐसें तैसें। बोलिजे त्याहूनि अनारिसें।**
**परी तें श्रवणअभ्यासें। पाविजे ब्रह्म ॥ ७ ॥**

ब्रह्माचे वर्णन शब्दांनी कशाही प्रकारे केले तरी ते त्या वर्णनाहून विलक्षण आहे. पण अध्यात्म-श्रवण, आणि ध्यानाभ्यास इत्यादींच्या योगे त्याची प्राप्ती होऊ शकते. (७)

**ब्रह्मास नामें अनंत। परी तें ब्रह्म नामातीत।**
**ब्रह्मास हेतदृष्टांत। देतां न शोभती ॥ ८ ॥**

ब्रह्माला अनंत नामे असली तरी वास्तविक ते नामातीत आहे. ब्रह्माला समजावून सांगण्याच्या दृष्टीने जो दृष्टांत दिला जातो, तो त्यास शोभतच नाही. (८)

**ब्रह्मासारिखें दुसरें। पाहातां काय आहे खरें।**
**ब्रह्म दृष्टांत उत्तरें। कदा न साहे ॥ ९ ॥**

ब्रह्मासारखे दुसरे काही नाहीच, हेच खरे असल्याने त्याला दृष्टान्त देऊन त्याचे वर्णन करण्यात काही अर्थ नसतो. (९)

श्लोक

यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह॥

**अर्थ**—वाणी व मन ते अप्राप्य आहे असे म्हणून तेथून परत येतात.

**जेथें वाचा निवर्तती। मनासी नाहीं ब्रह्मप्राप्ती।**
**ऐसी बोलिल्री श्रुती। सिद्धांतवचन ॥ १० ॥**

वाणी ब्रह्मापाशी जाऊ शकत नाही, ती माघारी फिरते. मनाच्या योगेही ब्रह्मप्राप्ती होऊ शकत नाही, असे सिद्धान्तवचन श्रुती- माउली सांगते. (१०)

**कल्पनारूप मन पाहीं। ब्रह्मीं कल्पनाचि नाहीं।**
**म्हणौनि वाक्य कांहीं। अन्यथा नव्हे ॥ ११ ॥**

मन हे कल्पनामय असते आणि ब्रह्माच्या ठिकाणी तर कल्पनाच नाही, म्हणून हे वाक्य काही खोटे नाही. (११)

**आतां मनासि जें अप्राप्त। तें कैसें होईल प्राप्त।**
**ऐसें म्हणाल तरी कृत्य। सद्गुरुविण नाहीं॥ १२ ॥**

आता जे मनाला प्राप्त होऊ शकत नाही त्याची प्राप्ती कशी होईल, असे जर म्हणाल, तर त्याचे उत्तर असे आहे की, सद्गुरूशिवाय हे कार्य होऊ शकत नाही. (१२)

भांडारगृहें भरलीं। परी असती आडकिलीं।
हातास न येतां किली। सर्वही अप्राप्त ॥ १३ ॥

भांडारगृहात सामान भरलेले असते पण आपल्या हातात जर किल्ली नसेल, तर ते कुलुपबंद खोलीत ठेवलेले असल्याने त्याची प्राप्ती होऊ शकत नाही. (१३)

तरी ते किली ते कवण। मज करावी निरूपण।
ऐसा श्रोता पुसे खूण। वक्तयासी ॥ १४ ॥

हे ऐकून श्रोता वक्त्याला विचारू लागला की, तर मग ती किल्ली कोणती, हे आपण मला सांगावे. (१४)

सद्गुरुकृपा तेचि किली। जेणें बुद्धि प्रकाशली।
द्वैतकपाटें उघडलीं। येकसरीं ॥ १५ ॥

सद्गुरुकृपा हीच ती किल्ली आहे. तिच्यामुळे बुद्धीत आत्मज्ञान प्रकाशते आणि त्यामुळे एकाएकी द्वैताची दारे उघडतात म्हणजेच द्वैत नाहीसे होऊन तो आत्मरूपाशी ऐक्य पावतो. (१५)

तेथें सुख असे वाड। नाहीं मनास पवाड।
मनेंविण कैवाड। साधनाचा ॥ १६ ॥

तेथे अमर्याद सुख असते, पण मनाला तेथे प्रवेश नसतो. मनाशिवायच साधन चालू राहते. (१६)

त्याची मनेंविण प्राप्ती। किं वासनेविण तृप्ती।
तेथें न चले वित्पत्ती। कल्पनेची ॥ १७ ॥

आत्म्याची प्राप्ती मनाशिवाय होते, कारण मन तेथे पोहोचूच शकत नाही. वासना नसतानाच तृप्ती लाभते, त्या सहजावस्थेत कल्पनेची शक्तीही कुंठित होते. (१७)

तें परेहूनि पर। मनबुद्धीअगोचर।
संग सोडितां सत्वर। पाविजेतें ॥ १८ ॥

परब्रह्म हे परावाणीच्या स्फुरणाच्याही पलीकडले असते. ते मन, बुद्धी, इंद्रिये इत्यादींनी जाणता येत नाही. आणि मीपणाचा संग सोडताच तात्काळ त्याची प्राप्ती होते. (१८)

संग सोडावा आपुला। मग पाहावें तयाला।
अनुभवी तो या बोला। सुखावेल गा ॥ १९ ॥

आपण आपला संग सोडावा आणि मग त्याला पाहावे असे मी म्हणताच अनुभवी जे असतील ते माझ्या बोलण्यातील रहस्य जाणून निश्चित सुखावतील. (१९)

आपण म्हणिजे मीपण। मीपण म्हणिजे जीवपण।
जीवपण म्हणिजे अज्ञान। संग जडला ॥ २० ॥

आपण म्हणजे देहाच्या ठिकाणी जे मीपण असते ते होय. मीपण म्हणजेच जीवपण, आणि जीवपण म्हणजे अज्ञान. अज्ञानामुळे स्वस्वरूपाचा विसर पडून मी म्हणजे देह असा मीपणाचा संग जडतो. (२०)

सोडितां तया संगासी। ऐक्य होये निःसंगासी।
कल्पनेविण प्राप्तीसी। अधिकार ऐसा ॥ २१ ॥

या संगाचा त्याग केला की निःसंगाशी ऐक्य होते म्हणजे जीव-ब्रह्मैक्य होते. कल्पनेचा त्याग केला की अशा प्रकारे तो जीव आत्मज्ञानाचा अधिकारी होतो. (२१)

मी कोण ऐसें नेणिजे। तया नांव अज्ञान बोलिजे।
अज्ञान गेलियां पाविजे। परब्रह्म तें ॥ २२ ॥

मी कोण हे माहीत नसणे यालाच अज्ञान म्हणतात. ते अज्ञान नाहीसे झाले की, सहजच परब्रह्माची प्राप्ती होते. (२२)

देहबुद्धीचें थोरपण। परब्रह्मीं न चले जाण।
तेथें होतसे निर्वाण। अहंभावासी ॥ २३ ॥

देहबुद्धीच्या मोठेपणाला परब्रह्माच्या ठिकाणी काही वाव नसतो. परब्रह्माच्या ठिकाणी अहंभावाचा पूर्णपणे नाश होतो. (२३)

उंचनीच नाहीं परी। राया रंका येकचि सरी।
जाला पुरुष अथवा नारी। येकचि पद ॥ २४ ॥

परब्रह्माच्या ठिकाणी उच्च-नीच अथवा रावरंक, किंवा पुरुष-स्त्री अशी विषमता नाही. ते एकच पद आहे. (२४)

ब्राह्मणाचें ब्रह्म तें सोंवळें। शूद्राचें ब्रह्म तें वोवळें।
ऐसें वेगळें आगळें। तेथें असेचिना ॥ २५ ॥

ब्राह्मणाचे ब्रह्म ते सोवळे व शूद्राचे ब्रह्म ते ओवळे असा भेद तेथे असतच नाही. (२५)

उंच ब्रह्म तें रायासी। नीच ब्रह्म तें परिवारासी।
ऐसा भेद तयापासीं। मुळींच नाहीं ॥ २६ ॥

राजाला श्रेष्ठ ब्रह्म आणि त्याच्या परिवाराला नीच म्हणजे कमी प्रतीचे ब्रह्म असा भेद ब्रह्मापाशी नसतो. (२६)

**सकळांसि मिळोन ब्रह्म येक। तेथें नाहीं हे अनेक।**
**रंक अथवा ब्रह्मादिक। तेथेंचि जाती ॥ २७॥**

सगळ्यांना मिळून एकच ब्रह्म आहे. त्या ठिकाणी अनेकता नाही. रंक असो वा ब्रह्मादिक असोत, त्या एका ब्रह्माच्या ठिकाणीच जातात. (२७)

**स्वर्ग मृत्य आणि पाताळ। तिहीं लोकींचे ज्ञातेसकळ।**
**सकळांसि मिळोन येकचि स्थळ। विश्रांतीचें ॥ २८॥**

स्वर्ग, मृत्यू व पाताळ या तिन्ही लोकांतील आत्मज्ञानी व्यक्तींचे सर्वांचे मिळून परब्रह्म हे एकच विश्रांतीचे स्थळ आहे. (२८)

**गुरुशिष्या येकचि पद। तेथें नाहीं भेदाभेद।**
**परी या देहाचा समंध। तोडिला पाहिजे ॥ २९॥**

गुरूला व शिष्याला एकाच ब्रह्मपदाची प्राप्ती होते. तेथे भेदभाव नाही. पण देहबुद्धी पूर्णपणे सोडावी लागते. (२९)

**देहबुद्धीचा अंतीं। सकळांसि येकचि प्राप्ती।**
**येक ब्रह्म द्वितीयं नास्ति। हें श्रुतिवचन ॥ ३०॥**

देहबुद्धीचा अंत होऊन आत्मबुद्धी दृढ झाली की, अशा सर्वांना एकाच ब्रह्माची प्राप्ती होते. 'एकं ब्रह्म द्वितीयं नास्ति' असे श्रुतिवचन आहे. (ब्रह्म एकच एक आहे, दुसरे नाही.) (३०)

**साधु दिसती वेगळाले। परी ते स्वरूपी मिळाले।**
**अवघे मिळोन येकचि जाले। देहातीत वस्तु ॥ ३१॥**

साधू-संत हे देहाने वेगवेगळे दिसतात, पण अंतर्यामी ते एकाच परब्रह्मस्वरूपाशी ऐक्य पावलेले असतात. सर्व मिळून एकच देहातीत वस्तू म्हणजे ब्रह्मरूप होऊन राहातात. (३१)

**ब्रह्म नाहीं नवें जुनें। ब्रह्म नाहीं अदिक उणें।**
**उणें भाविल तें सुणें। देहबुद्धीचें ॥ ३२॥**

ब्रह्म कधी नवे नसते किंवा कधी जुनेही होत नाही. ते कमी-अधिकही होत नाही. नेहमी एकसारखेच अक्षुण्ण असते. जो कोणी त्यास उणे ठरवील तो देहबुद्धीचा कुत्रा असतो. (३२)

**देहबुद्धीचा संशयो। करी समाधानाचा क्षयो।**
**चुके समाधानसमयो। देहबुद्धीयोगें ॥ ३३॥**

ज्यांची देहबुद्धी दृढ असते त्यांच्या मनात आत्म्याविषयी अनेक संशय असतात. त्यामुळे त्यांना समाधान लाभत नाही. या नरदेहात असतानाच शाश्वत समाधानाची प्राप्ती करून घेता येते, पण देहबुद्धी दृढ झाल्याने ही संधीही चुकते. (३३)

**देहाचें जें थोरपण। तेंचि देहबुद्धीचें लक्षण।**
**मिथ्या जाणोनि विचक्षण। निंदिती देहो ॥ ३४॥**

देहाला महत्त्व देणे हेच देहबुद्धीचे मुख्य लक्षण आहे. जे चतुर अथवा विवेकी लोक असतात ते देह मिथ्या आहे, हे जाणूनच देहाची निंदा करतात. (३४)

**देह पावे जंवरी मरण। तंवरी धरी देहाभिमान।**
**पुन्हा दाखवी पुनरागमन। देहबुद्धि मागुती ॥ ३५॥**

देहास मरण येईपर्यंत अज्ञानी जीव देहाभिमान बाळगत असतो. त्याची दृढ असलेली देहबुद्धी परत त्याला जन्म घेण्यास भाग पाडते. (३५)

**देहाचेनि थोरपणें। समाधानासी आलें उणें।**
**देहो पडेल कोण्या गुणें। हेंहि कळेना ॥ ३६॥**

देहास अवास्तव महत्त्व दिल्यामुळे समाधान घटते. शिवाय ज्याला इतके महत्त्व दिले जाते, तो देह कोठल्या कारणाने केव्हा, कुठे पडेल हेही कळत नाही. (३६)

**हित आहे देहातीत। म्हणौनि निरोपिती संत।**
**देहबुद्धीने अन्हित। होंचि लागे ॥ ३७॥**

सर्व संत असे सांगतात की, देहातीत होण्यातच जीवाचे कल्याण आहे. देहबुद्धी धारण केल्याने अहितच होत असते. (३७)

**सामर्थ्यबळें देहबुद्धी। योगियांसि तेहि बाधी।**
**देहबुद्धीची उपाधी। पैसावों लागे ॥ ३८॥**

सिद्धींच्या सामर्थ्याचा उपयोग केला की त्यायोगे योग्याच्या मनातही मी श्रेष्ठ, अशी मीपणाची जाणीव वाढू लागते (आणि ते त्याला कळतही नाही.) (३८)

म्हणौनि देहबुद्धि हे झडे। तरीच परमार्थ घडे।
देहबुद्धीनें विघडे। ऐक्यता ब्रह्मीची ॥ ३९॥

म्हणून देहबुद्धी संपूर्णपणे नाहीशी झाली तरच परमार्थाची प्राप्ती होऊ शकते. देहबुद्धी जोपर्यंत असते, तोपर्यंत जीवब्रह्मैक्य अनुभवास येत नाही. (३९)

विवेक वस्तूकडे ओढी। देहबुद्धि तेथूनि पाडी।
अहंता लाऊन निवडी। वेगळेपणें ॥ ४०॥

आत्मानात्मविवेकाच्या योगे आत्मवस्तूकडे मन ओढ घेऊ लागते, तिची प्राप्ती व्हावी अशी इच्छा उत्पन्न होते, पण देहबुद्धी दृढ असल्याने परत मन परावृत्त होते, आणि देहासंबंधी अहंता उत्पन्न झाली की, ती जीवाला आत्मवस्तूपासून वेगळे करते. (४०)

विचक्षणें याकारणें। देहबुद्धि त्यजावी श्रवणें।
सत्यब्रह्मीं साचारपणें। मिळोन जावें ॥ ४१॥

म्हणून या सर्व गोष्टींचा विचार करून अध्यात्माच्या श्रवणाच्या साहाय्याने शहाण्या माणसाने देहबुद्धीचा संपूर्ण त्याग करावा आणि खरोखर सत्य अशा परब्रह्मात मिसळून जावे. (४१)

सत्यब्रह्म तें कवण। ऐसा श्रोता करी प्रश्न।
प्रत्योत्तर दे आपण। वक्ता श्रोतयासी ॥ ४२॥

हे ऐकून श्रोत्याने 'सत्य ब्रह्म कोणते' असा प्रश्न केला. तेव्हा वक्त्याने श्रोत्यास जे प्रत्युत्तर दिले ते ऐका. (४२)

म्हणे ब्रह्म येकचि असे। परी तें बहुविध भासे।
अनुभव देहीं अनारिसें। नाना मतीं ॥ ४३॥

वास्तविक ब्रह्म एकच आहे, पण ते अनेक प्रकारे भासते. कारण लोकांची मनोवृत्ती भिन्न भिन्न प्रकारची असल्याने तेच ब्रह्म प्रत्येकास निरनिराळ्या प्रकारे अनुभवास येते. (४३)

जें जें जया अनुभवलें। तेंचि तयासि मानलें।
तेथेंचि त्याचें विस्वासलें। अंतःकर्ण ॥ ४४॥

ज्या ज्या व्यक्तीला जसा जसा अनुभव येतो, त्या व्यक्तीला तोच खरा वाटतो व त्याच्या अंतःकरणात त्याबद्दलच विश्वास उत्पन्न होतो. (४४)

ब्रह्म नामरूपातीत। असोनि नामें बहुत।
निर्मळ निश्चळ निवांत। निजानंद ॥ ४५॥

खरे तर ब्रह्म नामरूपाच्या पलीकडे आहे. तरी त्याला अनेक नावे दिली जातात. उदाहरणार्थ : निर्मळ, निश्चळ, निवांत, निजानंद, (४५)

अरूप अलक्ष अगोचर। अच्युत अनंत अपरांपर।
अदृश्य अतर्क्ये अपार। ऐसीं नामें ॥ ४६॥

अरूप, अलक्ष्य, अगोचर, अच्युत, अनंत, अपरांपर, अदृश्य, अतर्क्य, अपार अशी अनेक नावे आहेत. (४६)

नादरूप जोतिरूप। चैतन्यरूप सत्तारूप।
साक्षरूप सस्वरूप। ऐसीं नामें ॥ ४७॥

नादरूप, ज्योतिरूप, चैतन्यरूप, सत्तारूप, साक्षरूप, स्वस्वरूप अशीही अनेक नावे आहेत. (४७)

सुन्य आणी सनातन। सर्वेश्वर आणी सर्वज्ञ।
सर्वात्मा जगजीवन। ऐसीं नामें ॥ ४८॥

कुणी शून्य म्हणतात, तर कुणी सनातन, कुणी सर्वेश्वर तर कुणी सर्वज्ञ, सर्वात्मा, जगजीवन अशी विविध नामे देतात. (४८)

सहज आणी सदोदित। शुद्ध बुद्ध सर्वातीत।
शाश्वत आणी शब्दातीत। ऐसीं नामें ॥ ४९॥

सहज, सदोदित, शुद्ध, बुद्ध, सर्वातीत, शाश्वत, आणि शब्दातीत अशी अनेक नामे आहेत. (४९)

विशाळ विस्तीर्ण विश्वंभर। विमळ वस्तु व्योमाकार।
आत्मा परमात्मा परमेश्वर। ऐसीं नामें ॥ ५०॥

विशाल, विस्तीर्ण, विश्वंभर, विमल, वस्तू, व्योमाकार, आत्मा, परमात्मा, परमेश्वर अशीही नामे आहेत. (५०)

परमात्मा ज्ञानघन। येकरूप पुरातन।
चिद्रूप चिन्मात्र जाण। नामें अनाम्याचीं ॥ ५१॥

परमात्मा, ज्ञानघन, एकरूप, पुरातन, चिद्रूप, चिन्मात्र अशी अनाम्याची अनेक नामे आहेत. (५१)

ऐसीं नामें असंख्यात। परी तो परेश नामातीत।
त्याचा करावा निश्चितार्थ। ठेविलीं नामें ॥ ५२॥

अशी असंख्य नावे असली तरी तो परेश नामातीतच आहे. पण त्याच्या स्वरूपाची निश्चित कल्पना यावी म्हणून ही नामे ठेवली आहेत. (५२)

तो विश्रांतीचा विश्राम। आदिपुरुष आत्माराम।
तें येकचि परब्रह्म। दुसरें नाहीं ॥ ५३॥

ते परब्रह्म म्हणजे विश्रांतीचा विश्राम आहे. तेच आदिपुरुष असून आत्मारामही तेच आहे. ते एकच एक आहे, तेथे दुसरे काहीही नाही. (५३)

| | |
|---|---|
| तेंचि कळायाकारणें। चौदा ब्रह्मांचीं लक्षणें।<br>सांगिजेती तेणें श्रवणें। निश्चयो बाणे ॥ ५४॥ | ते एकले एकच आहे, हा निश्चय बाणावा म्हणून ते समजण्यासाठी येथे चौदा ब्रह्मांची लक्षणे सांगत आहे, ती श्रवण करावीत. (५४) |
| खोटें निवडितां येकसरें। उरलें तें जाणिजे खरें।<br>चौदा ब्रह्में शास्त्राधारें। बोलिजेती ॥ ५५॥ | जे खोटे असेल ते निवडून बाजूला काढल्यावर जे उरते ते खरे असे जाणावे. आता शास्त्रीय ग्रंथांच्या आधारे येथे चौदा ब्रह्मांचे वर्णन केले जाईल असे समर्थ म्हणतात. (५५) |

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'ब्रह्मनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक ७ : समास ३

# चतुर्दशब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

| | |
|---|---|
| श्रोतां व्हावें सावधान। आतां सांगतो ब्रह्मज्ञान।<br>जेणें होये समाधान। साधकाचें ॥ १॥ | श्रीसमर्थ म्हणतात की, आता ज्यायोगे साधकांचे समाधान होईल ते ब्रह्मज्ञान मी सांगतो. तरी श्रोत्यांनी सावध होऊन ते ऐकावे. (१) |
| रत्नें साधायाकारणें। मृत्तिका लागे येकवटणें।<br>चौदा ब्रह्मांची लक्षणें। जाणिजे तैसीं ॥ २॥ | रत्ने मिळविण्यासाठी खाणीतून खणून आधी माती गोळा करावी लागते. मग त्यातून रत्ने निवडावी लागतात. त्याप्रमाणे येथे प्रथम चौदा ब्रह्माची लक्षणे जाणावीत. (२) |
| पदार्थेंविण संकेत। द्वैतावेगळा दृष्टांत।<br>पूर्वपक्षेंविण सिद्धांत। बोलतांचि न ये ॥ ३॥ | एखादी गोष्ट संकेताने दाखवून द्यायची असली तर एखादा पदार्थ खूण म्हणून वापरला जातो. कुठलाही दृष्टांत द्वैताशिवाय देता येत नाही. त्याप्रमाणे आधी पूर्वपक्ष व्यवस्थित मांडून त्याचे खंडन केल्याशिवाय सिद्धांतासंबंधी बोलताच येत नाही. (३) |
| आधीं मिथ्या उभारावें। मग तें वोळखोन सांडावें।<br>पुढें सत्य तें स्वभावें। अंतरीं बाणे ॥ ४॥ | आधी जे मिथ्या आहे, ते डोळ्यांसमोर उभे राहील अशा प्रकारे त्याचे वर्णन करावे लागते व त्याचा खोटेपणा पटवून द्यावा लागतो. म्हणजे नंतर जे सत्य असेल ते अंत:करणात बाणते. (४) |
| म्हणौन चौदा ब्रह्मांचा संकेत। बोलिला कळाया सिद्धांत।<br>येथें श्रोतीं सावचित। क्षण येक असावें ॥ ५॥ | म्हणून प्रथम चौदा ब्रह्मांच्या खुणा सांगतो म्हणजेच पूर्वपक्ष मांडतो. तो श्रोत्यांनी क्षणभर चित्त अत्यंत एकाग्र करून सावधपणे श्रवण करावा, म्हणजे नंतर त्यांना सिद्धांत व्यवस्थित कळेल. (५) |
| पहिलें तें शब्दब्रह्म। दुजें मीतिकाक्षरब्रह्म।<br>तिसरें खंब्रह्म। बोलिली श्रुती ॥ ६॥ | पहिले शब्दब्रह्म, दुसरे ॐ हे एकाक्षर ब्रह्म, श्रुती ज्याचे वर्णन करते ते खं ब्रह्म हे तिसरे होय. (६) |
| चौथें जाण सर्वब्रह्म। पांचवें चैतन्यब्रह्म।<br>साह्वें सत्ताब्रह्म। साक्षब्रह्म सातवें ॥ ७॥ | चौथे सर्वब्रह्म, पाचवे चैतन्यब्रह्म, सहावे सत्ताब्रह्म, सातवे साक्षब्रह्म. (७) |
| आठवें सगुणब्रह्म। नवें निर्गुणब्रह्म।<br>दाह्मवें वाच्यब्रह्म। जाणावें पैं ॥ ८॥ | आठवे सगुण ब्रह्म, नववे निर्गुण ब्रह्म, वाच्यब्रह्म हे दहावे जाणावे. (८) |

**अनुभव तें अक्रावें। आनंदब्रह्म तें बारावें।**
**तदाकार तेरावें। चौदावें अनुर्वाच्य ॥ ९॥**

अनुभवब्रह्म हे अकरावे, आनंदब्रह्म हे बारावे, तदाकार ब्रह्म हे तेरावे आणि अनिर्वाच्य ब्रह्म हे चौदावे ब्रह्म आहे. (९)

**ऐसीं हे चौदा ब्रह्में। यांची निरोपिलीं नामें।**
**आतां स्वरूपाचीं वर्मे। संकेत दाऊं ॥ १०॥**

अशी ही चौदा ब्रह्मे आहेत. येथे प्रथम त्यांची नावे सांगितली. आता त्यांच्या स्वरूपाची वर्मे खुणेने थोडक्यात दाखवू. (१०)

**अनुभवेंविण भ्रम। या नांव शब्दब्रह्म।**
**आतां मीतिकाक्षरब्रह्म। तें येकाक्षर ॥ ११॥**

स्वस्वरूपाचा साक्षात् अनुभव नसताना अनुमानाने जे ब्रह्माचे वर्णन केले जाते, त्याला शब्दब्रह्म म्हणतात. श्रीसमर्थ म्हणतात, की, तो केवळ भ्रमच होय. यानंतर मीतिकाक्षर ब्रह्म म्हणजे ॐ हे एकाक्षर होय. (११)

**खंशब्दें आकाशब्रह्म। महदाकाश व्यापकधर्म।**
**आतां बोलिलें सूक्ष्म। सर्वब्रह्म ॥ १२॥**

खं ब्रह्म म्हणजे आकाशब्रह्म. महदाकाशाप्रमाणे ते सूक्ष्म रूपाने सर्वत्र व्यापून असते. यानंतर त्याहूनही सूक्ष्म असे सर्वब्रह्म हे चौथे आहे. (१२)

**पंचभूतांचें कुवाडें। जें जें तत्व दृष्टी पडे।**
**तें तें ब्रह्मचि चोखडें। बोलिजेत आहे ॥ १३॥**

पंचमहाभूतांच्या कोड्यात जे जे तत्त्व दृष्टीला पडते ते ते चोखडे म्हणजे निर्मल ब्रह्मच आहे असे म्हटले जाते. (१३)

**या नांव सर्वब्रह्म। श्रुतिआश्रयाचें वर्म।**
**आतां चैतन्यब्रह्म। बोलिजेल ॥ १४॥**

'सर्वं खल्विदं ब्रह्म' या श्रुतीच्या आधारे यालाच सर्वब्रह्म म्हटले जाते. आता चैतन्यब्रह्म म्हणजे काय ते सांगतो. (१४)

**पंचभूतादि मायेतें। चैतन्य चि चेतवितें।**
**म्हणौनि त्या चैतन्यातें। चैतन्यब्रह्म बोलिजे॥ १५॥**

पंचमहाभूतादी मायेला चैतन्यच चेतविते, नाहीतर ती तत्त्वे जडच आहेत. जे चैतन्य त्यांना चेतविते, ते चैतन्य ब्रह्म होय. (१५)

**चैतन्यास ज्याची सत्ता। ते सत्ताब्रह्म तत्वता।**
**तये सत्तेस जाणता। या नाव साक्षब्रह्म॥ १६॥**

ज्या सत्तेने हे चैतन्य पंचमहाभूतादिकांना चेतविते, ती सत्ता म्हणजेच सत्ताब्रह्म होय व त्या सत्तेला जे जाणते त्यास साक्षब्रह्म म्हणतात. (१६)

**साक्षत्व जयापासुनी। तें हि आकळिलें गुणीं।**
**सगुणब्रह्म हे वाणी। तयासि वदे ॥ १७॥**

साक्षित्व ज्यापासून प्राप्त होते, ते ब्रह्म गुणांनी युक्त असते म्हणून त्याला सगुण ब्रह्म म्हणतात. (१७)

**जेथें नाही गुणवार्ता। तें निर्गुणब्रह्म तत्वता।**
**वाच्यब्रह्म तें हि आतां। बोलिजेल ॥ १८॥**

जेथे गुणांचा मागमूसही नसतो त्याला निर्गुण ब्रह्म म्हणतात. आता वाच्यब्रह्म म्हणजे काय ते सांगतो.(१८)

**जें वाचें बोलतां आलें। तें वाच्यब्रह्म बोलिलें।**
**अनुभवासि कथिलें। न वचे सर्वथा ॥ १९॥**

वाणीने ज्याचे वर्णन करता येते, त्याला वाच्य ब्रह्म म्हणतात. पण अनुभव असतो त्याचे वर्णन कधीच करता येत नाही. (१९)

**या नांव अनुभव ब्रह्म। आनंदवृत्तीचा धर्म।**
**परंतु याचेंहि वर्म। बोलिजेल ॥ २०॥**

त्यालाच अनुभव ब्रह्म म्हणतात. आनंद हीही एक वृत्तीच असते. परंतु याचेही रहस्य सांगितले जाईल.(२०)

**ऐसें हें ब्रह्म आनंद। तदाकार तें अभेद।**
**अनुर्वाचीं संवाद। तुटोन गेला ॥ २१॥**

अशा ब्रह्माला आनंदब्रह्म म्हणतात. ब्रह्माशी तदाकारता होऊन अभेद होतो ते तदाकार ब्रह्म होय. अनिर्वाच्य म्हणजे वर्णनातीत. मग तेथे संवाद कसा होणार? त्याचे वर्णन होऊच शकत नाही. म्हणूनच त्याला अनिर्वाच्य ब्रह्म म्हणतात. (२१)

**ऐसीं हे चौदा ब्रह्में। निरोपिलीं अनुक्रमें।**
**साधकें पाहातां भ्रमें। बाधिजेना ॥ २२॥**

याप्रमाणे अनुक्रमाने ही चौदा ब्रह्मे येथे सांगितली आहेत. त्यासंबंधीचे निरूपण साधकाने नीट ध्यानात घेतले तर त्याला अज्ञानामुळे होणाऱ्या भ्रमाची बाधा होणार नाही. (२२)

ब्रह्म जाणावें शाश्वत। माया तेचि अशाश्वत।
चौदा ब्रह्मांचा सिद्धांत। होईल आतां ॥ २३॥

ब्रह्म हे शाश्वत आहे आणि माया अशाश्वत आहे, हे नीट ध्यानात धरून पुढे येणारे चौदा ब्रह्मांचे निरसन ऐकावे. (२३)

शब्दब्रह्म तें शाब्दिक। अनुभवेंविण माईक।
शाश्वताचा विवेक। तेथें नाहीं ॥ २४॥

शब्दब्रह्म हे केवळ शाब्दिक असते. तेथे साक्षात अनुभव नसल्याने ते मायिकच असते. आणि माया तर अशाश्वत. म्हणून त्यास शाश्वत म्हणता येत नाही.(२४)

जें क्षर ना अक्षर। तेथें कैंचें मीतिकाक्षर।
शाश्वताचा विचार। तेथेंहि न दिसे ॥ २५॥

ब्रह्म हे क्षर नाही आणि अक्षरही नाही. ते एकच एक नित्य असल्याने तेथे विनाशी (क्षर) आणि अविनाशी (अक्षर) या द्वैतमूलक कल्पनाच संभवत नाहीत. ॐकाराच्या ठिकाणीही शाश्वताचा विचार करता येत नाही.(२५)

खंब्रह्म ऐसें वचन। तरी सुन्यातें नासी ज्ञान।
शाश्वताचें अधिष्ठान। तेथेहि न दिसे ॥ २६॥

खं ब्रह्म असे वचन आहे. खं म्हणजे आकाश म्हणजेच अवकाश म्हणजेच शून्य. शून्याचा नाश ज्ञानाने होतो म्हणून तेही शाश्वत ठरत नाही. (२६)

सर्वत्रास आहे अंत। सर्वब्रह्म नासिवंत।
प्रळये बोलिला निश्चित। वेदांतशास्त्रीं ॥ २७॥

वेदांत शास्त्रात प्रलयकाळी सर्वांचा नाश होतो, असे सांगितले आहे. म्हणजे जे काही सर्व आहे ते नाशिवंत असल्याने सर्व-ब्रह्मासही शाश्वत म्हणता येत नाही.(२७)

ब्रह्मप्रळये मांडेल जेथें। भूतान्वय कैचा तेथें।
म्हणौनियां सर्वब्रह्मातें। नाश आहे ॥ २८॥

ब्रह्मदेवाची रात्र सुरू होऊन प्रलयाला आरंभ झाला की ब्रह्मलोकापासून सर्व सृष्टी नाश पावते. मग तेथे पंचमहाभूतांचा समुदाय तरी कसा टिकून राहणार! म्हणून सर्वब्रह्मालाही नाश आहे. (२८)

अचळासि आणी चळण। निर्गुणास लाविता गुण।
आकारास विचक्षण। मानीतना ॥ २९॥

ब्रह्म हे अचळ, निर्गुण, निराकार असताना चल, गुणसंभूत आणि विविध आकार असलेल्या सर्व दृश्य सृष्टीला ब्रह्म म्हणणे हे विचारवंत मान्य करीत नाहीत.(२९)

जें निर्माण पंचभूत। तें प्रत्यक्ष नासिवंत।
सर्वब्रह्म हे मात। घडे केवी ॥ ३०॥

पंचमहाभूतांपासून जे जे निर्माण होते, ते नाशिवंत आहे हे प्रत्यक्ष दिसून येते, तेथे सर्वब्रह्म ही गोष्ट मान्य कशी व्हावी? (३०)

असो आतां हें बहुत। सर्वब्रह्म नासिवंत।
वेगळेपणास अंत। पाहाणें कैचें ॥ ३१॥

असो. आता हे किती वर्णन करावे! थोडक्यात म्हणजे सर्वब्रह्म नाशिवंत आहे. 'सर्व' या शब्दात जी वेगळेपणाची भावना असते तिचा जीवब्रह्मैक्यात नाश होत असतो. मग पाहणे कुठले? (३१)

आतां जयास चेतवावें। तेंचि माईक स्वभावें।
तेथें चैतन्याच्या नावें। नास आला ॥ ३२॥

आता ज्याला चेतविले जाते तोच स्वाभाविकपणे मिथ्या आहे, तर त्याला चेतविणारे चैतन्य असे म्हणताच येत नाही. जे झालेच नाही, त्याला चेतविणार कसे आणि कोण? (३२)

परिवारेंविण सत्ता। ते सत्ता नव्हे तत्वता।
पदार्थेविण साक्षता। तेहि मिथ्या ॥ ३३॥

सत्ता ही परिवाराशिवाय असत नाही म्हणजे ज्यांच्यावर सत्ता गाजवायची ते व जो सत्ता गाजवतो तो दोघांची जरूर असते. परब्रह्म हे केवळ एकले एकच असते, म्हणून त्यास सत्ताब्रह्म म्हणता येत नाही. काही पदार्थ असेल तर त्याला साक्षित्वाने पाहिले जाते. जेथे पदार्थच मिथ्या असतो तेथे साक्षित्वही मिथ्याच असते, म्हणून परब्रह्माला साक्षब्रह्मही म्हणता येत नाही. (३३)

**सगुणास नाश आहे। प्रत्यक्षास प्रमाण काये।**
**सगुणब्रह्म निश्चयें। नासिवंत ॥ ३४॥**

सगुणाला नाश आहे, ही प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट असल्याने त्याला प्रमाण देण्याची जरुरी नाही. म्हणून सगुणब्रह्म हे निश्चितपणे नाशिवंत आहे. (३४)

**निर्गुण ऐसें जें नाव। त्या नांवास कैचा ठाव।**
**गुणेंविण गौरव। येईल कैंचें ॥ ३५॥**

निर्गुण असे जे म्हटले जाते त्या (नामाला) शब्दाला वावच नाही. काहीतरी वैशिष्ट्य असेल तर गौरव केला जातो. गुणच जिथे मिथ्या तेथे निर्गुणत्वाचे वैशिष्ट्य तरी कसे असणार? (३५)

**माया जैसें मृगजळ। ऐसें बोलती सकळ।**
**कां तें कल्पनेचें आभाळ। नाथिलेंचि ॥ ३६॥**

माया म्हणजे मृगजळ आहे किंवा कल्पनेचं नसलेलेच आभाळ आहे, असे सर्व म्हणतात. (३६)

**ग्रामो नास्ति कुतः सीमा। जन्मेंविण जीवात्मा।**
**अद्वैतासी उपमा। द्वैताची ॥ ३७॥**

जेथे गावच अस्तित्वात नसेल तेथे गावाची सीमा कशी दाखवणार? जन्म झाला की आपण जीवात्मा ही संज्ञा देतो, पण आत्मा हा अजन्मा आहे. तो अद्वैत आहे, तर त्याला द्वैताची उपमा कशी देणार? (३७)

**मायेविरहित सत्ता। पदार्थेविण जाणता।**
**अविद्येविण चैतन्यता। कोणास आली ॥ ३८॥**

मायाच मिथ्या आहे तर सत्तेला अस्तित्वच कुठे आहे? पदार्थ मिथ्या असल्याने त्यांना जाणणारा कोण असणार? अविद्याही मिथ्या म्हणून चैतन्यता ही मिथ्याच! (३८)

**सत्ता चैतन्यता साक्षी। सर्वहि गुणाचपासीं।**
**ठाईचें निर्गुण त्यासी। गुण कैंचे ॥ ३९॥**

सत्ता, चैतन्यता, साक्षित्व हे सर्व गुणांमुळे भासते. ब्रह्म गुणरहित असल्याने तेथे गुण कसे असणार? (३९)

**ऐसें जें गुणरहित। तेथें नामाचा संकेत।**
**तोचि जाणावा अशाश्वत। निश्चयेंसी ॥ ४०॥**

असे जे गुणरहित ब्रह्म त्याला निर्गुण हे नाव देणे हेच मुळी नामेरूपे अशाश्वत असल्याने निश्चयानेच अशाश्वत ठरते. (४०)

**निर्गुण ब्रह्मासि संकेतें। नामें ठेविलीं बहुतें।**
**तें वाच्यब्रह्म त्यातें। नाश आहे ॥ ४१॥**

गुणरहित ब्रह्माला ओळखता यावे म्हणून अनेक नावे ठेवली जातात, त्यास वाच्यब्रह्म म्हणतात. ते नाशिवंतच आहे. (४१)

**आनंदाचा अनुभव। ह्याहि वृत्तीचाचि भाव।**
**तदाकारीं ठाव। वृत्तीस नाहीं ॥ ४२॥**

आनंदाचा अनुभव ही पण एक वृत्तीच आहे. तो वृत्तीचाच भाव आहे. पण जीवब्रह्मैक्यात वृत्तीला वावच नसतो. म्हणून आनंदब्रह्म हेही खरे नाही. (४२)

**अनुर्वाच्य याकारणें। संकेत वृत्तीच्या गुणें।**
**तया संकेतास उणें। निवृत्तीनें आणिलें ॥ ४३॥**

अनिर्वाच्य असे जेव्हा म्हटले जाते ते केवळ संकेत, नामनिर्देश करण्यासाठी म्हटलेले असते. अनिर्वाच्य म्हणजे जे शब्दांत सांगता येत नाही ते. शब्द जेथे पोहोचू शकत नाही, त्या परब्रह्मास अनिर्वाच्य म्हणणे हे खरे म्हणजे योग्य नव्हे. कारण शब्दाचा संबंध गुणांशी वृत्तीशी असतो आणि शुद्ध ब्रह्माच्या ठिकाणी वृत्तीच नाही, निवृत्तीच असते. म्हणून अनिर्वाच्य म्हणण्यामुळे संकेतास उणेपणा येतो, असे म्हटले आहे. (४३)

**अनुर्वाच्य ते निवृत्ती। तेचि उन्मनीची स्थिती।**
**निरोपाधी विश्रांति। योगियांची ॥ ४४॥**

मनातच निरनिराळ्या वृत्ती उठत असतात, त्या मनाचा जेव्हा आत्मस्वरूपात लय होतो, तेव्हा त्या स्थितीला उन्मनी म्हटले जाते. मनच नाहीसे झाल्यावर वृत्ती उठतच नाहीत आणि निवृत्ती होते. ही स्थिती अनिर्वाच्य असते. सर्व योगी या निरुपाधिक स्थितीतच विश्रांती पावतात. (४४)

**वस्तु जे कां निरोपाधी। तेचि सहज समाधी।**
**जेणें तुटे आदिव्याधी। भवदुखाची ॥ ४५॥**

निरुपाधिक परब्रह्माशी एकरूपता हीच सहज समाधी होय. हिची प्राप्ती झाल्यावर संसारातील दुःखदायक आधी-व्याधी सर्व नाहीशा होतात. (४५)

**जो उपाधीचा अंत। तोचि जाणावा सिद्धांत।**
**सिद्धांत आणी वेदांत। धादांत आत्मा ॥ ४६॥**

विद्या व अविद्या या दोन उपाधी सांगितल्या जातात. या उपाधींचा अंत होतो तेव्हाच ब्रह्मसाक्षात्कार होतो. सर्व साधुसंत, वेदान्ताचे ग्रंथ यांचा हाच अभिप्राय आहे की आत्मा हा अपरोक्ष आहे. (४६)

**असो ऐसे जे शाश्वतब्रह्म। जेथें नाहीं मायाभ्रम।**
**अनुभवी जाणे वर्म। स्वानुभवें ॥ ४७॥**

असे जे शाश्वत ब्रह्म आहे, तेथे मायाभ्रम जराही नसतो. ते स्वसंवेद्य असल्याने त्याचे वर्म सांगता येत नाही, पण अनुभवी संत स्वानुभवाने ते वर्म जाणतात. (४७)

**आपुलेन अनुभवें। कल्पनेसि मोडावें।**
**मग सुकाळी पडावें। अनुभवाचे ॥ ४८॥**

आपल्या स्वस्वरूपानुभवाने 'मी देह' ही कल्पना मोडून टाकावी. मग आपोआपच सर्वत्र ब्रह्मसाक्षात्काराच्या अनुभवाचा सुकाळ होईल. (४८)

**निर्विकल्पास कल्पावें। कल्पना मोडे स्वभावें।**
**मग नसोनि असावें। कल्पकोटी ॥ ४९॥**

निर्विकल्प वस्तूची कल्पना करू लागले की आपोआप कल्पनाच नष्ट होते. मग कल्पकोटी वर्षे, मीपणाविरहित आत्मस्वरूपाने राहावे. (४९)

**कल्पनेचें येक बरें। मोहरितांच मोहरे।**
**स्वरूपीं घालितां भरे। निर्विकल्पीं ॥ ५०॥**

कल्पनेचा एक गुण चांगला आहे की जिकडे तिचा मोहरा वळवावा तिकडे ती वळते. म्हणून तिला आत्म-स्वरूपाकडे वळवले की ती निर्विकल्पाने व्यापून जाते. (५०)

**निर्विकल्पासि कल्पितां। कल्पनेचि नुरे वार्ता।**
**नि:संगास भेटों जातां। नि:संग होइजे ॥ ५१॥**

निर्विकल्पाची कल्पना करण्याचा अभ्यास केला की कल्पनेचा मागमूसही उरत नाही. ती पूर्णपणे नाहीशी होते. नि:संगाची भेट घ्यायला गेले की भेट घेणाराही नि:संग होतो. (५१)

**पदार्थाऐसें ब्रह्म नव्हे। मा तें हातीं धरून द्यावें।**
**असो हें अनुभवावें। सद्‌गुरुमुखें ॥ ५२॥**

ब्रह्म म्हणजे काही एखादा पदार्थ नाही की हातात घेऊन दाखवता येईल. सद्गुरुमुखाने त्याचा अनुभवच घ्यावा लागतो. (५२)

**पुढें कथेचा अन्वये। केलाचि करूं निश्चये।**
**जेणें अनुभवासि ये। केवळब्रह्म ॥ ५३॥**

पुढील समासात केवळ ब्रह्माचेच अधिक निश्चयपूर्वक निरूपण केले आहे. त्याचे श्रवण, मनन केल्याने केवळ ब्रह्माचा साक्षात अनुभव येईल असे श्रीसमर्थ सांगतात. (५३)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चतुर्दशब्रह्मनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.**



**दशक ७ : समास ४**

## विमलब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ब्रह्म नभाहून निर्मळ। पाहातां तैसेंचि पोकळ।**
**अरूप आणी विशाळ। मर्यादेवेगळें ॥ १॥**

श्रीसमर्थ सांगतात की, ब्रह्म हे नभाहूनही निर्मळ आहे आणि तसेच पोकळही आहे. त्याला रूप नाही आणि ते अमर्याद असे विशाल आहे. (१)

**येकविस स्वर्गें सप्तपाताळ। मिळोन एक ब्रह्मगोळ।**
**ऐसीं अनंत तें निर्मळ। व्यापून असे ॥ २॥**

एकवीस स्वर्ग आणि सप्त पाताळ मिळून एक ब्रह्मगोल होतो असे म्हणतात. अशा अनंत ब्रह्मांडांना त्या निर्मळ ब्रह्माने व्यापून टाकले आहे. (२)

**अनंत ब्रह्मांडांखालतें। अनंत ब्रह्मांडांवरुतें।**
**नेणोंविण स्थळ रितें। अणुमात्र नाहीं ॥ ३॥**

अनंत ब्रह्मांडांच्या खाली आणि अनंत ब्रह्मांडांच्या वरही ते ब्रह्म व्यापून आहे. त्याच्याशिवाय अणुमात्र जागा रिकामी नाही. (३)

**जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं। ऐसी वदे लोकवाणी।**
**तेणेंविण रिता प्राणी। येकहि नाहीं ॥ ४॥**

लोक म्हणतात, जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी सर्वत्र ब्रह्म व्यापून आहे. त्याच्याशिवाय एकही प्राणी रिता नाही. सर्वांना ब्रह्माने अंतर्बाह्य व्यापलेले आहे. (४)

**जळचरांस जैसें जळ। बाह्याभ्यांतरीं निखळ।**
**तैसें ब्रह्म हें केवळ। जीवमात्रासी ॥ ५॥**

जलचरांना जसे अंतर्बाह्य जलच असते, त्याप्रमाणे निखळ ब्रह्माने जीवमात्रास अंतर्बाह्य व्यापलेले आहे. (५)

**जळावेगळा ठाव आहे। ब्रह्माबाहेरी जातां नये।**
**म्हणौनि उपमा न साहे। जळाची तया ॥ ६॥**

जळाची उपमाही खरे तर योग्य नाही, कारण जेथे जल नाही अशी जागा असू शकते. पण ब्रह्माच्या बाहेर मुळी कुणी जाऊच शकत नाही. ते नाही अशी जागाच नाही. (६)

**आकाशाबाहेरी पळोंजातां। पुढें आकाशचि तत्वता।**
**तैसें तया अनंता। अंतचि नाहीं ॥ ७॥**

आकाशाच्या बाहेर पळून जावे असे कुणी म्हणेल तर ते शक्यच होणार नाही. कारण जेथे जावे तेथे आकाश आधीच आहे अशी स्थिती होते. तसाच त्या अनंत अशा परब्रह्माला अंतच नाही. (७)

**परी जे अखंड भेटलें। सर्वांगास लिगटलें।**
**अति निकट परी चोरलें। सकळांसि जें ॥ ८॥**

याप्रमाणे ज्या परब्रह्माची आणि आपली अखंड भेट झालेली आहे, जे आपल्या सर्वांगाला अगदी चिकटून राहत असते इतके ते आपल्या सतत अत्यंत जवळ असूनही ते सर्वांपासून लपून राहिलेले आहे. (८)

**तयामधेंचि असिजे। परी तयास नेणिजे।**
**उमजे भास नुमजे। परब्रह्म तें ॥ ९॥**

त्या ब्रह्मामध्येच आपण असतो, पण तरी आपणांस याची जाणीव नसते आणि त्या ब्रह्माच्या ठिकाणी जो दृश्य जगताचा भास होतो तो मात्र आपल्याला उमजतो, पण परब्रह्म उमजत नाही. (९)

**आकाशामधें आभाळ। तेणें आकाश वाटे डहुळ।**
**परी तें मिथ्या निवळ। आकाशचि असे॥ १०॥**

आकाशात ढग येऊन ते आकाश मलीन झाल्यासारखे वाटते, पण तो केवळ मिथ्या भासच असतो. अभ्र किंवा ढग आले किंवा गेले, त्याचा आकाशावर काहीच परिणाम होत नाही. ते जसेच्या तसे मलरहितच असते. (१०)

**नेहार देतां आकाशीं। चक्रें दिसती डोळ्यांसी।**
**तैसें दृश्य ज्ञानियांसी। मिथ्यारूप ॥ ११॥**

आकाशाकडे अगदी टक लावून पाहिले तर डोळ्यांना चक्रे दिसतात ती खरे तर मिथ्या असतात. तसेच ज्ञानी लोकांना हे दृश्य जगत् दिसते, पण ते मिथ्या आहे हे ते जाणतात. (११)

**मिथ्याचि परी आभासे। निद्रिस्तांस स्वप्न जैसें।**
**जागा जालियां अपैसें। बुझों लागे ॥ १२॥**

हे दृश्य जगत् मिथ्या असले, तरी आपल्याला ते जाणवतच असते. झोपी गेलेल्या माणसाला स्वप्न पडते व त्या वेळी त्याला त्या स्वप्नातील घटना, अगदी खऱ्याही वाटतात; तो जेव्हा जागा होतो, तेव्हा त्याला उमजू लागते की, ते सर्व स्वप्न होते. (१२)

**तैसें आपुलेन अनुभवें। ज्ञानें जागृतीसि यावें।**
**मग माईक स्वभावें। कळों लागे ॥ १३॥**

तसे आपल्या स्वस्वरूपाचा अनुभव आला की, जो ज्ञानी असतो, तो अज्ञानरूपी निद्रेतून ज्ञानाच्या योगे जागा होतो व मग त्याला स्वाभाविकच हे दृश्य जगत मायिक आहे, हे कळू लागते. (१३)

**आतां असो हें कुवाडें। जे ब्रह्मांडापैलिकडे।**
**तेंचि आता निवाडें। उमजोन दाऊं ॥ १४॥**

बरे, आता हे असू दे. ब्रह्मांडापलीकडे असणारे हे कोडे आता उलगडून दाखवू या. (१४)

**ब्रह्म ब्रह्मांडीं कालवलें। पदार्थासी व्यापून ठेलें।**
**सर्वांमधें विस्तारलें। अंशमात्रें ॥ १५॥**

ब्रह्म हे अनंत कोटी ब्रह्मांडांत कालवलेले असते. त्याने सर्व पदार्थांना व्यापून टाकले आहे. आणि सर्वांमध्ये ते पसरलेले आहे. पण तो त्याचा अंशमात्र आहे. (१५)

ब्रह्यामधें सृष्टी भासे। सृष्टीमध्यें ब्रह्य असे।
अनुभव घेतां आभासे। अंशमात्रें ॥ १६॥

ब्रह्याच्या ठिकाणीच सृष्टीचा भास होत असतो. सृष्टीमध्ये ते ओतप्रोत भरलेले असते. अनुभव घेऊ जाता कळून येते की, सर्व दृश्य जगत म्हणजे त्या अनंत ब्रह्याचा लहानसा अंश आहे. (१६)

अंशमात्रें सृष्टीभीतरीं। बाहेरी मर्यादा कोण करी।
सगळें ब्रह्य ब्रह्यांडोदरीं। माईल कैसें ॥ १७॥

त्याच्या अगदी लहानशा अंशात दृश्य सृष्टी भासते, तर बाहेर किती व्यापून उरलेले आहे, ही मर्यादा कोण करू शकणार? आपल्या या एका ब्रह्यांडाच्या उदरात सगळे ब्रह्य मावूच कसे शकेल? (१७)

अमृतीमधें आकाश। सगळें सांठवतां प्रयास।
म्हणौन तयाचा अंश। बोलिजेतो ॥ १८॥

छोटी तीर्थाची झारी असते, त्यात सगळे आकाश साठविण्याचा प्रयत्न करावा तसेच हे आहे. म्हणून त्याच्या एका अंशात सृष्टी आहे असे म्हणतात. (१८)

ब्रह्य तैसें कालवलें। परी तें नाहीं हालवलें।
सर्वांमधें परी संचलें। संचलेपणें ॥ १९॥

ब्रह्य ब्रह्यांडात कालवलेले जरी असले तरी ते वास्तविक जसेच्या तसे अचल, अढळच असते. ते सर्वांत व्याप्त असले तरी ते जसेच्या तसे घनदाटच असते. (१९)

पंचभूतीं असे मिश्रित। परंतु तें पंचभूतातीत।
पंकीं आकाश अलिप्त। असोनि जैसें ॥ २०॥

पंचमहाभूतांतही ते असते, पण तरीही ते पंचमहाभूतांपासून अलिप्त असते. जसे चिखलात आकाश दिसते, पण वास्तविक ते चिखलापासून अलिप्त असते. (२०)

ब्रह्यास दृष्टांत न घडे। बुझावया देणें घडे।
परी दृष्टांतीं साहित्य पडे। विचारितां आकाश ॥ २१॥

खरे तर ब्रह्याला दृष्टान्तच देता येत नाही. पण त्याचे स्वरूप समजावून देण्यासाठी दृष्टान्त देणे भाग पडते. ब्रह्याला जर दृष्टान्त द्यावयाचाच झाला, तर दृष्टान्त वस्तू म्हणजे आकाश होय. (२१)

खंब्रह्य ऐसी श्रुती। गगनसदृशं हे स्मृती।
म्हणौनि ब्रह्यास दृष्टांतीं। आकाश घडे ॥ २२॥

श्रुती खं ब्रह्य असे म्हणते. स्मृतीत त्याला गगनसदृशं म्हटले आहे. म्हणून ब्रह्याला आकाशाचाच दृष्टान्त द्यावा लागतो. (२२)

कालिमा नस्तां पितळ। मग तें सोनेंचि केवळ।
सुन्यत्व नस्तां निवळ। आकाश ब्रह्य ॥ २३॥

सोने व पितळ दोन्ही धातू पिवळेच असतात. पितळेत जरा काळसरपणा असतो. तो नसेल तर त्याला सोनेच म्हणावे लागेल. तसे आकाशाच्या ठिकाणी शून्यत्व आहे. ते नसेल तर त्यास ब्रह्य म्हणता येईल. (२३)

म्हणौनि ब्रह्य जैसें गगन। आणि माया जैसा पवन।
आडळे परी दर्शन। नव्हे त्याचें ॥ २४॥

म्हणून ब्रह्याला गगनासारखे म्हणतात आणि मायेला वायूसारखी म्हणतात. पण वायू काही डोळ्यांना दिसत नाही. (२४)

शब्दसृष्टीची रचना। होत जात क्षणक्षणा।
परंतु ते स्थिरावेना। वायुच ऐसी ॥ २५॥

आपण सारखे बोलत असतो, तेव्हा शब्दसृष्टीची रचना क्षणाक्षणाला होते आणि जाते. म्हणजेच ती क्षणभंगुर, अशाश्वत असते. वायूही तसाच अत्यंत चंचल असतो. जराही स्थिर राहात नाही. वायूसारखीच शब्दसृष्टीला स्थिरता नसते. (२५)

असो ऐसी माया माईक। शाश्वत तें ब्रह्य येक।
पाहों जातां अनेक। व्यापून आहे ॥ २६॥

असो. याप्रमाणे ही माया अशी मायिक, अशाश्वत आहे, तर अनेकांना व्यापून शिवाय शिल्लक असणारे ब्रह्य हे शाश्वत आहे. (२६)

पृथ्वीसी भेदून आहे। परी तें ब्रह्य कठीण नव्हे।
दुजी उपमा न साहे। तया मृदत्वासी ॥ २७॥

ते पृथ्वीला भेदूनही आहे, पण ते कठीण नाही. त्याच्या मृदुत्वाला म्हणजे कोमलपणाला द्यायला उपमाच नाही. (२७)

पृथ्वीहूनि मृद जळ। जळाहूनि तो अनळ।
अनळाहूनि कोमळ। वायो जाणावा ॥ २८॥

पृथ्वीहून जळ, मृदू, सूक्ष्म आहे. जळाहून अनल म्हणजे अग्नी कोमल, सूक्ष्म आहे. त्या अनलाहून वायू अधिक कोमल आहे. (२८)

वायोहून तें गगन। अत्यंतचि मृद जाण।
गगनाहून मृद पूर्ण। ब्रह्म जाणावें ॥ २९॥

वायूपेक्षा गगन म्हणजे आकाश हे तर अत्यंतच मृदू म्हणजे सूक्ष्म आहे. पण त्या गगनाहूनही मृदू, सूक्ष्म पूर्णब्रह्म आहे, हे जाणून घ्यावे. (२९)

वज्रास असे भेदिलें। परी मृदत्व नाहीं गेलें।
उपमेरहित संचलें। कठिण ना मृद ॥ ३०॥

ते ब्रह्म वज्रालाही भेदून जाणारे आहे आणि तरी त्याचे मृदुत्व नष्ट होत नाही, असे ते निरुपम आहे. त्याला कठीणही म्हणता येत नाही अथवा मृदूही म्हणता येत नाही, असे ते विलक्षण आहे. (३०)

पृथ्वीमधें व्यापून असे। पृथ्वी नासे तें न नासे।
जळ शोषे तें न शोषे। जळीं असोनी ॥ ३१॥

पृथ्वीमध्ये ते व्यापून आहे. परंतु पृथ्वी नाश पावली तरी ते नाश पावत नाही. ते जळातही असते, पण जळ शोषले जाते, ते शोषले जात नाही. (३१)

तेजीं असे परी जळेना। पवनीं असे परी चळेना।
गगनीं असे परी कळेना। परब्रह्म तें ॥ ३२॥

तेजाला व्यापून ब्रह्म असते, परंतु ते जळत नाही. वायूला व्यापून ते असते, पण ते वायू चळला तरी अचलच असते. गगनालाही ते ब्रह्म व्यापून असते, पण कळून येत नाही.(३२)

शेरीर अवघें व्यापलें। परी तें नाहीं आडळलें।
जवळिच दुरावलें। नवल कैसें ॥ ३३॥

सर्व शरीरास व्यापून ते असते, पण ते दिसत नाही. अत्यंत जवळ असून त्याचे ज्ञान नसल्याने ते दुरावल्यासारखे वाटते, हे खरोखरच मोठे नवल आहे. (३३)

सन्मुखचि चहुंकडे। तयामधें पाहाणें घडे।
बाह्याभ्यांतरी रोकडें। सिद्धचि आहे ॥ ३४॥

ते चहूकडे सन्मुखच असते, एवढेच नव्हे, तर त्याच्यामुळेच आपण पाहू शकतो, ते आपल्या सबाह्य अभ्यंतरी साक्षात सिद्धच आहे. (३४)

तयामधेंचि आपण। आपणा सबाह्य तें जाण।
दृश्यावेगळी खूण। गगनासारिखी ॥ ३५॥

त्याच्यामध्येच आपण आहोत आणि आपल्याला ते अंतर्बाह्य व्यापून आहे. कसे म्हणाल तर ते दिसत नाही पण आकाश जसे अत्यंत सूक्ष्म आणि व्यापक आहे, त्याप्रमाणेच ते आकाशाहून सूक्ष्म आणि व्यापकपणे सर्वत्र कोंदाटलेले आहे. (३५)

कांहीं नाहींसें वाटलें। तेथेंचि तें कोंदाटलें।
जैसें न दिसे आपलें। आपणासि धन ॥ ३६॥

जेथे काही नाही असे वाटते, तेथे सुद्धा ते ब्रह्म कोंदाटलेले असते. पण आपणच ठेवलेले आपले धन एकेक वेळा आपल्याला सापडत नाही. तशी अवस्था होते. (३६)

जो जो पदार्थ दृष्टी पडे। तें त्या पदार्था ऐलिकडे।
अनुभवें हें कुवाडें। उकलावें ॥ ३७॥

जो जो पदार्थ दृष्टीला पडतो, त्या पदार्थाच्या अलीकडे ते ब्रह्मच असते. हे काय कोडे आहे, हे अनुभवानेच उलगडेल. (३७)

मागें पुढें आकाश। पदार्थेंविण जो पैस।
पृथ्वीविण भकास। येकरूप ॥ ३८॥

सर्व पदार्थांच्या मागे-पुढे, खाली-वर सर्वत्र आकाश असते. पदार्थ नसतील तरी आकाशाची केवळ पोकळी सर्वत्र असतेच. समजा पृथ्वीही नाहीशी झाली तर आकाश सर्वत्र व्यापून जसेच्या तसेच एकरूप असते. (३८)

जें जें रूप आणी नाम। तो तो नाथिलाच भ्रम।
नामरूपातीत वर्म। अनुभवी जाणे ॥ ३९॥

जे जे रूप आणि नाम दिसून येते, ते सर्व मिथ्याच आहे. खरे तर नामरूपातीत परब्रह्माखेरीज दुसरी वस्तूच नाही, हे रहस्य आत्मानुभवीच जाणतात. (३९)

नभीं धूम्राचे डोंगर। उचलती थोर थोर।
तैसें दावी वोडंबर। मायादेवी ॥ ४०॥

आकाशात मोठमोठे धुराचे डोंगर दिसतात आणि नाहीसे होतात. तसेच अद्वितीय ब्रह्माच्या ठिकाणी मायादेवी जणू गारुडीविद्येच्या योगे ह्या दृश्य सृष्टीचा आभास उत्पन्न करते. (४०)

ऐसी माया अशाश्वत। ब्रह्म जाणावें शाश्वत।
सर्वां ठाईं सदोदित। भरलें असे ॥ ४१ ॥

अशी ही माया अशाश्वत, क्षणभंगुर, नाशिवंत आहे. आणि ब्रह्म हे शाश्वत असून ते सदोदित सर्व ठिकाणी भरलेले आहे, हे जाणून घ्यावे. (४१)

पोथी वाचूं जातां पाहे। मातृकांमधेंचि आहे।
नेत्रीं निघोनि राहे। मृदपणें ॥ ४२ ॥

आपण ज्या वेळी पोथी वाचू लागतो त्या वेळी त्या पोथीतील अक्षरांतही ते असतेच. तसेच ज्या डोळ्यांनी आपण पाहतो, त्यापेक्षाही ते अत्यंत सूक्ष्म असल्याने, मृदू असल्याने त्यातून ते ब्रह्मच निघाल्यासारखे वाटते. (४२)

श्रवणें शब्द ऐकतां। मनें विचार पाहतां।
मना सबाह्य तत्वतां। परब्रह्म तें ॥ ४३ ॥

कानाने ज्या वेळी आपण शब्द ऐकतो किंवा मनाने संकल्प- विकल्प करतो ते परब्रह्मच सर्व इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादींना अंतर्बाह्य व्यापून राहिलेले असते. (४३)

चरणें चालतां मार्गीं। जें आडळे सर्वांगीं।
करें घेतां वस्तुलगीं। आडवें ब्रह्म ॥ ४४ ॥

पायांनी मार्ग चालत असताना ते आपल्या सर्वांगी भरून आहे हे आपल्याला जाणवते. हातांनी वस्तू घेतानाही ते हातांना व्यापून आहे, हे आपल्याला कळते. (४४)

असो इंद्रियेंसमुदाव। तयामधें वर्ते सर्व।
जाणों जातां मोडे हांव। इंद्रियांची ॥ ४५ ॥

याप्रमाणे ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांच्यामध्ये ब्रह्मच आहे, हे लक्षात आले की, त्या इंद्रियांची विषयाकडील धाव, नाहीशी होते. (४५)

तें जवळिच असे। पाहों जातां न दिसे।
न दिसोन वसे। कांहीं येक ॥ ४६ ॥

ते ब्रह्म जवळच असून बाह्य दृष्टीला मात्र प्रयत्न केला तरीही दिसू शकत नाही. पण दिसले जरी नाही तरी त्याच्या अस्तित्वाची जाणीव मात्र होते. (४६)

जें अनुभवेंचि जाणावें। सृष्टीचेनि अभावें।
आपुलेन स्वानुभवें। पाविजे ब्रह्म ॥ ४७ ॥

त्याला जाणावयाचे असेल तर ही सर्व दृश्य सृष्टी मिथ्या आहे, हे अनुभवाने जाणून या सृष्टीत गुंतलेले आपले लक्ष काढून घेऊन आपले खरे स्वरूप काय याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला की, स्वानुभवाने ब्रह्माशी ऐक्य होते. (४७)

ज्ञानदृष्टीचें देखणें। चर्मदृष्टी पाहों नेणे।
अंतरवृत्तीचिये खुणे। अंतरवृत्ति साक्ष ॥ ४८ ॥

ज्ञानदृष्टीने ज्या गोष्टी जाणता येतात, त्या चर्मदृष्टीला दिसत नाहीत. अंतरवृत्तीच्या खुणांना अंतरवृत्तीच साक्ष असते. (४८)

जाणे ब्रह्म जाणे माया। जाणे अनुभवाच्या ठया।
ते येक जाणावी तुर्या। सर्वसाक्षिणी ॥ ४९ ॥

ही जी स्थिती असते तिला माया, ब्रह्म व आत्मानुभव या सर्वांना साक्षीरूपाने जाणणारी सर्वसाक्षिणी तुर्यावस्था असे म्हटले जाते. तिची ओळख पटवून घ्यावी. (४९)

साक्षत्व वृत्तीचें कारण। उन्मनी ते निवृत्ति जाण।
जेथें विरे जाणपण। विज्ञान तें ॥ ५० ॥

साक्षित्व ही पण एक वृत्तीच आहे. जेथे साक्षित्वाची जाणीवही पूर्णपणे विरून पूर्ण निवृत्ती होते, तिला उन्मनी म्हणतात. मनाचाही लय होऊन पूर्ण जीव-ब्रह्मैक्य होते, त्यास विज्ञान म्हणतात. (५०)

जेथें अज्ञान सरे। ज्ञान तेंहि नुरे।
विज्ञानवृत्ति मुरे। परब्रह्मीं ॥ ५१ ॥

जेथे अज्ञान व ज्ञान दोन्ही नसते तेथे परब्रह्माच्या ठिकाणी विज्ञानवृत्ती एकरूप होते. (५१)

ऐसें ब्रह्म शाश्वत। जेथें कल्पनेसी अंत।
योगी जना येकांत। अनुभवें जाणावा ॥ ५२ ॥

असे जे शाश्वत ब्रह्म, तेथे कल्पनेचा लवलेशही नसतो. त्या ठिकाणी योगी लोक स्वरूपानुभवाने परब्रह्माशी ऐक्य पावून एकांत प्राप्त करतात. (५२)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विमलब्रह्मनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.



## दशक ७ : समास ५

# द्वैतकल्पनानिर्शन

॥ श्रीराम ॥

**केवळ ब्रह्म जें बोलिलें। तें अनुभवास आलें।**
**आणी मायेचेंहि लागलें। अनुसंधान ॥ १ ॥**

श्रोता म्हणतो की, आपण जे केवळ ब्रह्म म्हणून सांगितलेत, त्याचा अनुभवही आला आणि त्याच वेळी मायेचेही अनुसंधान लागले. (१)

**ब्रह्म अंतरीं प्रकाशे। आणी मायाहि प्रत्यक्ष दिसे।**
**आतां हें द्वैत निरसे। कवणेपरी हो ॥ २ ॥**

अंतरंगात ब्रह्म प्रकाशत आहे आणि बाहेर मायाही प्रत्यक्ष दिसत आहे. तरी आता द्वैत कसे निरसन होईल, ते आपण सांगा. (२)

**तरी आतां सावधान। येकाग्र करूनियां मन।**
**माया ब्रह्म हें कवण। जाणताहे ॥ ३ ॥**

यावर वक्ता म्हणाला की, आता मन अत्यंत एकाग्र करून माया कोठली, ब्रह्म कोणते हे नीट जाणून घे. (३)

**सत्य ब्रह्माचा संकल्प। मिथ्या मायेचा विकल्प।**
**ऐसिया द्वैताचा जल्प। मनचि करी ॥ ४ ॥**

मनच ब्रह्म सत्य आहे असा सत्यसंकल्प करते आणि त्याच्या स्वभावानुसार मिथ्या मायेचा विकल्प निर्माण करून ते मनच द्वैताची बडबड करू लागते. (४)

**जाणे ब्रह्म जाणे माया। ते येक जाणावी तुर्या।**
**सर्व जाणे म्हणोनिया। सर्वसाक्षिणी ॥ ५ ॥**

जी ब्रह्मालाही जाणते व जी मायेलाही जाणते, तिला सर्व जाणणारी म्हणूनच सर्वसाक्षिणी अशी तुर्यावस्था म्हणतात. (५)

**ऐक तुर्येचें लक्षण। जेथें सर्व जाणपण।**
**सर्वचि नाहीं कवण। जाणेल गा ॥ ६ ॥**

आता तुर्येचे लक्षण सांगतो ते ऐक. जी सर्व जाणते ती तुर्यावस्था होय. पण जेथे 'सर्व' च नाही, म्हणजे जेथे सर्व हा केवळ आभासच आहे, तेथे त्याला कसे जाणावे ? (६)

**संकल्पविकल्पाची सृष्टी। जाली मनाचिये पोटीं।**
**तें मनचि मिथ्या सेवटीं। साक्षी कवणु ॥ ७ ॥**

ज्या मनाच्या योगे संकल्प-विकल्प उठतात, ते मनच मुळात मिथ्या आहे, तर मग वृत्ती कुठल्या आणि साक्षी तरी कोण ? (७)

**साक्षत्व चैतन्यत्व सत्ता। हे गुण ब्रह्माचिया माथां।**
**आरोपले जाण वृथा। मायागुणें ॥ ८ ॥**

मायेच्या योगे म्हणजे अज्ञानामुळे ब्रह्मावर साक्षित्व, चैतन्यत्व, सत्ता इत्यादी गुणांचा आरोप उगीचच केला जातो. (८)

**घटमठाचेनि गुणें। त्रिविधा आकाश बोलणें।**
**मायेचेनि खरेंपणें। गुण ब्रह्मीं ॥ ९ ॥**

घट आणि मठ यांना केवळ व्यावहारिक सत्ता असते, पण त्यांच्या गुणांमुळे आकाश जे निर्गुण-निराकार आहे, त्याची त्रिविध रूपे घटाकाश, मठाकाश व महदाकाश वर्णिली जातात, त्याप्रमाणेच मायेच्या खरेपणामुळे परब्रह्मावर या गुणांचा वृथा आरोप केला जातो. (९)

**जंव खरेंपण मायेसी। तंवचि साक्षत्व ब्रह्मासी।**
**मायेअविद्येचे निरासीं। द्वैत कैचें ॥ १० ॥**

जोपर्यंत माया खरी वाटते, तोपर्यंतच ब्रह्मास साक्षित्व बहाल केले जाते. ज्यावेळी अविद्येचा-मायेचा निरास होतो, तेव्हा द्वैत कसे राहणार ? (१०)

**म्हणोनि सर्वसाक्षी मन। तेंचि जालिया उन्मन।**
**मग तुर्यारूप ज्ञान। तें मावळोन गेलें ॥ ११ ॥**

म्हणूनच सर्वसाक्षी असणारे मन हे ज्या वेळी उन्मन होते, तेव्हा तुर्यारूपी ज्ञानही मावळून जाते. (११)

**जयास द्वैत भासलें। ते मन उन्मन जालें।**
**द्वैताअद्वैताचें तुटलें। अनुसंधान ॥ १२ ॥**

ज्याला द्वैत भासत होते ते मनच उन्मन झाले की द्वैताद्वैताचे अनुसंधानच तुटून जाते. (१२)

**येवं द्वैत आणी अद्वैत। होये वृत्तीचा संकेत।**
**वृत्ति जालिया निवृत्त। द्वैत कैंचें ॥ १३ ॥**

याप्रमाणे द्वैत आणि अद्वैत हे दोन्ही वृत्तीचेच संकेत असतात. वृत्तीच निवृत्त झाली की द्वैत कसे राहणार ? (१३)

वृत्तिरहित जें ज्ञान। तेंचि पूर्ण समाधान।
जेथें तुटे अनुसंधान। मायाब्रह्मीचें ॥ १४॥

वृत्तिरहित जे ज्ञान म्हणजेच आत्मानुभव, तेच पूर्ण समाधान होय. तेथे मायाब्रह्माचे अनुसंधान पूर्णपणे नष्ट होते. (१४)

मायाब्रह्म ऐसा हेत। मनें कल्पिला संकेत।
ब्रह्म कल्पनेरहित। जाणती ज्ञानी ॥ १५॥

साधक ज्यावेळी सारासारविचार करू लागतो, तेव्हा माया मिथ्या, ब्रह्म सत्य असा संकेत मनाने कल्पिलेला असतो. पण ज्ञानी लोक ब्रह्म हे कल्पनेरहित आहे, हे जाणतात. (१५)

जें मनबुद्धिअगोचर। जें कल्पनेहून पर।
तें अनुभवितां साचार। द्वैत कैंचें ॥ १६॥

जे मन, बुद्धी, इंद्रिये यांनी जाणता येत नसल्याने कल्पनेच्याही पलीकडले असते, त्याचा खरोखर जेव्हा ऐक्यरूपाने अनुभव येतो, तेव्हा द्वैत कसे उरणार? (१६)

द्वैत पाहातां ब्रह्म नसें। ब्रह्म पाहातां द्वैत नासे।
द्वैताद्वैत भासे। कल्पनेसी ॥ १७॥

जोपर्यंत द्वैत असते, तोपर्यंत ब्रह्मानुभव नसतो. तो येतो तेव्हा द्वैत राहात नाही. द्वैत-अद्वैत हे केवळ मनाच्या कल्पनेने भासते. (१७)

कल्पना माया निवारी। कल्पना ब्रह्म थावरी।
संशय धरी आणी वारी। तेहि कल्पना ॥ १८॥

कल्पना जर योग्य दिशेने केली गेली तर ती मायेचे निवारण करते व ब्रह्माची प्रतिष्ठापना करते. कल्पनाच संशय निर्माण करते आणि त्याचे निवारणही करते. (१८)

कल्पना करी बंधन। कल्पना दे समाधान।
ब्रह्मीं लावी अनुसंधान। तेहि कल्पना ॥ १९॥

कल्पनाच बंधन निर्माण करते. कल्पनाच समाधान मिळवून देते. कल्पनेच्या योगे ब्रह्माचे अनुसंधान लागते. (१९)

कल्पना द्वैताची माता। कल्पना ज्ञेमी तत्वता।
बद्धता आणी मुक्तता। कल्पनागुणें ॥ २०॥

द्वैताची माता कल्पनाच आहे, खरे पाहिले तर ज्ञान हेही कल्पनारूपच आहे. माणूस मी बद्ध आहे अथवा मी मुक्त आहे, हे कल्पनेच्या योगेच म्हणत असतो. (२०)

कल्पना अंतरीं सबळ। नस्ते दावी ब्रह्मगोळ।
क्षणा येकातें निर्मळ। स्वरूप कल्पी ॥ २१॥

आपल्या अंतरातील कल्पना अशुद्ध असेल तर ब्रह्म म्हणून गोलाकार तेजस्वी काहीतरी दृश्याचा भास निर्माण करते. तीच कल्पना निर्मल झाली, तर स्वस्वरूपाची कल्पना करू लागते. (२१)

क्षणा येका धोका वाहे। क्षणा येका स्थिर राहे।
क्षणा येका पाहे। विस्मित होउनी ॥ २२॥

कल्पना ही अशी विलक्षण आहे की, तिचे रूप क्षणोक्षणी पालटत असते. कधी ती माणसाला चिंतातुर करते, तर कधी एकदम शांतीचा अनुभव आणून देते, तर कधी आश्चर्यचकित करते. (२२)

क्षणा येकातें उमजे। क्षणा येकातें निर्बुजे।
नाना विकार करिजे। ते कल्पना जाणावी ॥ २३॥

कधी कल्पनेच्या योगे आत्मस्वरूपाचा उमज पडतो, तर क्षणात गोंधळ उडून काहीच समजेनासे होते. याप्रकारे नाना विकार जिच्यायोगे उत्पन्न होतात, ती कल्पना हे जाणून घ्यावे. (२३)

कल्पना जन्माचें मूळ। कल्पना भक्तीचें फळ।
कल्पना तेचि केवळ। मोक्षदाती ॥ २४॥

कल्पना हीच जन्माचे मूळ कारण ठरते. कल्पना भगवंताकडे वळवली गेली की भक्ती प्राप्त होऊन मुक्तीस कारण ठरते. अशा प्रकारे कल्पनाच मोक्ष देणारीही आहे. (२४)

असो ऐसी हे कल्पना। साधनें दे समाधाना।
येरवी हे पतना। मूळच कीं ॥ २५॥

असो. याप्रकारे या कल्पनेचा उपयोग जर ज्ञानप्राप्तीचे साधन म्हणून केला, तर तिच्यायोगे शाश्वत समाधानही लाभू शकते. पण तसे जर केले नाही, तर तीच जीवाच्या अध:पतनाचे मूळ ठरते. (२५)

| | |
|---|---|
| म्हणौन सर्वांचें मूळ। ते हे कल्पनाच केवळ।<br>इचें केलियां निर्मूळ। ब्रह्मप्राप्ती ॥ २६ ॥ | म्हणून सर्वांचे मूळ कारण केवळ कल्पनाच आहे. ह्या कल्पनेला समूळ नष्ट केले. म्हणजेच परब्रह्मप्राप्ती होते. (२६) |
| श्रवण आणी मनन। निजध्यासें समाधान।<br>मिथ्या कल्पनेचें भान। उडोन जाये ॥ २७ ॥ | यासाठी निरंतर श्रवण, मनन, निदिध्यासन करावे लागते. म्हणजे मिथ्या कल्पनेचे भान उडून जाते. (२७) |
| शुद्ध ब्रह्माचा निश्चयो। करी कल्पनेचा जयो।<br>निश्चितार्थें संशयो। तुटोन गेला ॥ २८ ॥ | स्वस्वरूपानुभवाने शुद्ध ब्रह्मस्वरूपासंबंधी दृढ निश्चय झाला की कल्पनेवर जय मिळविता येतो. आणि या निश्चयामुळे संशयही नष्ट होतो. (२८) |
| मिथ्या कल्पनेचें कोडें। कैसें राहे साचापुढें।<br>जैसें सूर्याचेनि उजेडें। नासे तम ॥ २९ ॥ | सूर्योदय झाल्यावर त्याच्या प्रकाशामुळे अंधार जसा नाहीसा होतो, त्याप्रमाणे सत्य अशा परब्रह्मवस्तूपुढे मिथ्या असलेले कल्पनेचे कोडे कसे शिल्लक राहणार? (२९) |
| तैसें ज्ञानाचेनि प्रकाशें। मिथ्या कल्पना हे नासे।<br>मग हें तुटे अपैसें। द्वैतानुसंधान ॥ ३० ॥ | तसे ज्ञानाच्या प्रकाशाने मिथ्या कल्पना नाश पावली की आपोआपच द्वैताचे अनुसंधान तुटून जाते, नष्ट होते. (३०) |
| कल्पनेनें कल्पना उडे। जैसा मृगें मृग सांपडे।<br>कां शरें शर आतुडे। आकाशमार्गीं ॥ ३१ ॥ | जसे जनावराच्या योगे जनावरास पकडता येते अथवा आकाशमार्गाने जाणाऱ्या एका बाणास दुसऱ्या बाणानेच नष्ट केले जाते, तसे कल्पनेच्या योगानेच कल्पनेचा नाश करता येतो. (३१) |
| शुद्ध कल्पनेचें बळ। जालियां नासे सबळ।<br>हेंचि वचन प्रांजळ। सावध ऐका ॥ ३२ ॥ | शुद्ध कल्पनेचे बळ वाढले की शबल कल्पना नाश पावते. ह्या वचनाचा जो अभिप्राय आहे तो सावध चित्त करून ऐकावा. (३२) |
| शुद्ध कल्पनेची खूण। स्वयें कल्पिजे निर्गुण।<br>सस्वरूपीं विस्मरण। पडोंचि नेदी ॥ ३३ ॥ | स्वत: निर्गुण ब्रह्माचे अनुसंधान करणे, सत् स्वरूपाचे जराही विस्मरण न होऊ देणे, ही शुद्ध कल्पनेची खूण आहे. (३३) |
| सदा स्वरूपानुसंधान। करी द्वैताचें निर्शन।<br>अद्वयनिश्चयाचें ज्ञान। तेचि शुद्ध कल्पना ॥ ३४ ॥ | द्वैताचे निरसन करून सदोदित स्वस्वरूपानुसंधानाने परब्रह्माच्या अद्वय स्वरूपासंबंधी दृढ निश्चय करणे हीच शुद्ध कल्पना जाणावी. (३४) |
| अद्वैत कल्पी ते शुद्ध। द्वैत कल्पी ते अशुद्ध।<br>अशुद्ध तेचि प्रसिद्ध। सबळ जाणावी ॥ ३५ ॥ | अद्वैताची कल्पना ही शुद्ध कल्पना होय. जी द्वैत कल्पिते ती अशुद्ध कल्पना जाणावी. या अशुद्ध कल्पनेलाच 'शबल' म्हटले जाते. (३५) |
| शुद्ध कल्पनेचा अर्थ। अद्वैताचा निश्चितार्थ।<br>आणी सबळ वेर्थ। द्वैत कल्पी ॥ ३६ ॥ | अद्वैतासंबंधी निश्चितार्थ हेच शुद्ध कल्पनेचे स्वरूप लक्षण आहे. उगीचच द्वैताची कल्पना करते तिला अशुद्ध कल्पना म्हणतात. (३६) |
| अद्वैतकल्पना प्रकाशे। तेचि क्षणीं द्वैत नासे।<br>द्वैतासरिसी निरसे। सबळ कल्पना ॥ ३७ ॥ | अद्वैत कल्पना जेव्हा प्रकाशते त्याच क्षणी द्वैत नाहीसे होते आणि त्याच क्षणी 'शबल' कल्पनाही नष्ट होते. (३७) |
| कल्पनेनें कल्पना सरे। ऐसी जाणावी चतुरें।<br>सबळ गेलियां नंतरें। शुद्ध उरली ॥ ३८ ॥ | याप्रमाणे अद्वैत कल्पनेने द्वैतकल्पना आपोआप नष्ट होते, हे चतुर लोकांनी जाणून घ्यावे. शबल कल्पना नष्ट झाली की केवळ शुद्ध कल्पनाच उरते. (३८) |
| शुद्ध कल्पनेचें रूप। तेंचि जें कल्पी स्वरूप।<br>स्वरूप कल्पितां तद्रूप। होये आपण ॥ ३९ ॥ | स्वस्वरूपाचे निरंतर अनुसंधान हेच शुद्ध कल्पनेचे रूप आहे. याप्रमाणे स्वस्वरूपास कल्पिता कल्पिता ती स्वत: तद्रूप होऊन जाते. (३९) |

कल्पनेसी मिथ्यत्व आलें। सहजचि तद्रूप जालें।
आत्मनिश्चयें नासिलें। कल्पनेसी ॥ ४० ॥

याप्रमाणे सहज ज्या वेळी तद्रूपता प्राप्त होते, तेव्हा शुद्ध कल्पनाही नाहीशीच होते. म्हणजे तिला मिथ्यात्व प्राप्त होते. आत्मानुभवाने कल्पना समूळ नष्ट होते. (४०)

जेचि क्षणीं निश्चये चळे। तेचि क्षणीं द्वैत उफाळे।
जैसा अस्तमानीं प्रबळे। अंधकार ॥ ४१ ॥

ज्या क्षणी तो निश्चय डळमळू लागतो, त्या क्षणी द्वैत उफाळून येते. ज्याप्रमाणे सूर्यास्तकाळी अंधकार प्रबळ होऊ लागतो. (४१)

तैसें ज्ञान होतां मळिण। अज्ञान प्रबळे जाण।
याकारणें श्रवण। अखंड असावें ॥ ४२ ॥

त्याप्रमाणे ज्ञान मलिन झाले की अज्ञानाचा जोर वाढू लागतो. असे होऊ नये याकरिता अध्यात्माचे श्रवण अखंड करीत असावे. (४२)

आतां असो हें बोलणें जालें। आशंका फेडूं येका बोलें।
जयास द्वैत भासलें। तें तूं नव्हेसी सर्वथा ॥ ४३ ॥

असो. आता हे बोलणे राहू दे. तुझी शंका एका वचनानेच नष्ट करतो. ज्याला द्वैत भासते, ते मन हे तुझे स्वरूप नव्हे, हे लक्षात ठेवावे. (४३)

मागील आशंका फिटली। इतुकेन हे कथा संपली।
पुढें वृत्ति सावध केली। पाहिजे श्रोतीं ॥ ४४ ॥

याप्रमाणे मागील शंका फिटली म्हणून ही कथा येथेच संपली आहे. आता पुढील निरूपण ऐकण्यासाठी श्रोत्यांनी वृत्ती सावध करावी. (४४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'द्वैतकल्पनानिरसननाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ७ : समास ६

# बद्धमुक्तनिरूपण

॥ श्रीराम ॥

अद्वैत ब्रह्म निरोपिलें। जें कल्पनेरहित संचलें।
क्षणयेक तदाकार केलें। मज या निरूपणें ॥ १ ॥

श्रोता म्हणू लागला की, आपण कल्पनेरहित सर्वत्र संचलेल्या अद्वैत ब्रह्माचे जे निरूपण केलेत, ते श्रवण करीत असता त्या निरूपणाने एक क्षणभर मला तदाकार केले. (१)

परी म्यां तदाकार व्हावें। ब्रह्मचि होऊन असावें।
पुन्हा संसारास न यावें। चंचळपणें सर्वथा ॥ २ ॥

परंतु त्यामुळे मला आता असे वाटू लागले आहे की, आपण ब्रह्माशी तदाकार ब्रह्मच होऊन राहावे. पुन्हा चंचलपणाने या संसारात सर्वथा येऊच नये. (२)

कल्पनारहित जें सुख। तेथें नाहीं संसारदु:ख।
म्हणोनि तेंचि येक। होऊन असावें ॥ ३ ॥

कल्पनारहित असे जे अद्वैत ब्रह्म त्याच्याशी तदाकार झाल्यावर संसारदु:खरहित अशा शाश्वत सुखाची प्राप्ती होते, म्हणून तेच एक होऊन राहावे, असे मला वाटत आहे. (३)

ब्रह्मचि होईजे श्रवणें। पुन्हा वृत्तीवरी लगे येणें।
ऐसें सदा येणें जाणें। चुकेना कीं ॥ ४ ॥

अध्यात्मनिरूपणाचे श्रवण होताच वृत्ती ब्रह्माकार होते, पण नंतर परत वृत्तीवर यावे लागते. हे वृत्तीचे येणे-जाणे तर कधी चुकत नाही. (४)

मनें अंतरिक्ष जावें। क्षणयेक ब्रह्मचि व्हावें।
पुन्हा तेथून कोंसळावें। वृत्तीवरी मागुतें ॥ ५ ॥

मनाने अंतर्मुख होऊन क्षणभर स्वरूपी तादात्म्य पावावे व लगेच वृत्तीवर येऊन बहिर्मुख होऊन ब्रह्मापासून खाली कोसळावे. (५)

प्रत्यावृत्ती सैरावैरा। किती करूं येरझारा।
पाईं लउनियां दोरा। कीटक जैसा ॥ ६॥

याप्रमाणे अशी वृत्तीची द्विधा परिस्थिती होत आहे. अशा येरझारा किती काळ चालणार? एखाद्या कीटकाच्या पायाला दोरा बांधून सारखे खाली-वर फिरवावे तशी माझी अवस्था होत आहे. (६)

उपदेशकाळीं तदाकार। होतां पडे हें शरीर।
अथवा नेणे आपपर। ऐसें जालें पाहिजे ॥ ७॥

उपदेशकाळी ब्रह्माशी तदाकार झाल्याबरोबर एकतर शरीर पडले तरी पाहिजे किंवा राहिली तरी द्वैत भावनाच उरलेली नाही, असे तरी झाले पाहिजे. (७)

ऐसें नस्तां जें बोलणें। तेंचि वाटे लाजिरवाणें।
ब्रह्म होऊन संसार करणें। हेंहि विपरीत दिसे ॥ ८॥

असे जर झाले नाही, तर मग ब्रह्मज्ञानासंबंधी बोलणेसुद्धा लाजिरवाणे वाटेल. ब्रह्माशी तादात्म्य अनुभवून परत संसार करणे हे सुद्धा विपरीतच वाटते आहे.(८)

जो स्वयें ब्रह्मचि जाला। तो मागुता कैसा आला।
ऐसें ज्ञान माझे मजला। प्रशस्त न वटे ॥ ९॥

जो स्वत: ब्रह्मच झाला, तो परत संसारात कसा आला? हे कसले माझे ज्ञान? मला तर हे योग्य वाटत नाही. (९)

ब्रह्मचि होऊन जावें। कां तें संसारींच असावें।
दोहींकडे भरंगळावें। किती म्हणूनी ॥ १०॥

एकतर ब्रह्मरूपच होऊन जावे किंवा संसारी तरी राहावे. पण दोन्हीकडे याप्रमाणे घरंगळत राहावे याला काही अर्थ नाही. (१०)

निरूपणीं ज्ञान प्रबळे। उठोन जातां तें मावळे।
मागुता कामक्रोध खवळे। ब्रह्मरूपासी ॥ ११॥

निरूपण श्रवण करताच ज्ञानाचा जोर होतो. तेथून उठून गेले की ते ज्ञान मावळते आणि त्या ब्रह्मरूप झालेल्या माझ्या ठिकाणी परत कामक्रोधादी विकार बळावतात. (११)

ऐसा कैसा ब्रह्म जाला। दोहींकडे अंतरला।
वोडगस्तपणेंचि गेला। संसार त्याचा ॥ १२॥

असा कसा हा ब्रह्म झाला आणि दोन्हीलाही दुरावला. धड ना ब्रह्मप्राप्ती, धड ना प्रपंच, अशा ओढाताणीने संसारही हातातून जायची वेळ आली. (१२)

घेतां ब्रह्मसुखाची गोडी। संसारिक मागें वोडी।
संसार करितां आवडी। ब्रह्मीं उपजे मागुती॥ १३॥

ब्रह्मसुखाची गोडी चाखावी म्हणून प्रयत्न करावा, तर सांसारिक सुखाची आवड मागे ओढते! म्हणून संसार करू या म्हणावे, तर परत ब्रह्मसुखाकडे मन ओढ घेते. (१३)

ब्रह्मसुख नेलें संसारें। संसार गेला ज्ञानद्वारें।
दोनी अपुरीं पुरें। येकहि नाहीं ॥ १४॥

संसाराच्या आसक्तीमुळे ब्रह्मसुख अंतरले आणि ज्ञानाच्या योगे संसारातही सुख वाटेना. त्यामुळे प्रपंच व परमार्थ दोन्हीही अपुरीच राहिली. एकही पूर्ण होईना.(१४)

याकारणें माझें चित्त। चंचळ जालें दुश्चीत।
काये करणें निश्चीत। येकहि नाहीं ॥ १५॥

असे माझे चित्त द्विधा होऊन चंचल झाले आहे. काय करावे? परमार्थ करावा की प्रपंच करावा, यांविषयी ठाम निश्चय होत नाहीसा झाला आहे. (१५)

ऐसा श्रोता करी विनती। आतां राहावें कोणे रीतीं।
म्हणे अखंड माझी मती। ब्रह्माकार नाहीं ॥ १६॥

असे म्हणून श्रोत्याने विनंती केली की, माझी बुद्धी अखंड ब्रह्माकार राहत नाही, तरी मी आता कोण्या प्रकारे राहावे हे सांगा. (१६)

आतां याचें प्रत्योत्तर। वक्ता देईल सुंदर।
श्रोतीं व्हावें निरोत्तर। क्षणयेक आतां ॥ १७॥

आता याला वक्ता जे सुंदर प्रत्युत्तर देईल ते ऐकून क्षणभर श्रोता निरुत्तरच होईल. (१७)

ब्रह्मचि होऊन जे पडिले। तेचि मुक्तपदास गेले।
येर ते काये बुडाले। व्यासादिक ॥ १८॥

वक्ता म्हणाला की, जे ब्रह्म होऊन निपचित पडले, तेच फक्त मुक्त झाले आणि बाकीचे व्यासादिक बुडाले की काय? (१८)

श्रोता विनती करी पुढती। शुको मुक्तो वामदेवो वा हे श्रुती।
दोघेचि मुक्त आदि अंतीं। बोलतसे ॥ १९॥

तेव्हा श्रोत्याने परत विनंती केली की, श्रुती सांगते की, 'शुको मुक्तो वामदेवो वा' म्हणजे आदी व अंती हे दोघेच मुक्त झाले. (१९)

**वेदें बद्ध केले सर्व । मुक्त शुक वामदेव ।**
**वेदवचनीं अभाव । कैसा धरावा ॥ २० ॥**

वेदांनी इतर सर्वांना बद्ध म्हटले आहे. फक्त शुक व वामदेवच मुक्त झाले, या वेदवचनांवर अश्रद्धा कशी ठेवावी? (२०)

**ऐसा श्रोता वेदाधारें । देता झाला प्रत्योत्तरें ।**
**दोघेचि मुक्त अत्यादरें । प्रतिपाद्य केलें ॥ २१ ॥**

असे श्रोत्याने वेदवचनाच्या आधारे प्रत्युत्तर दिले व दोघेच मुक्त असे प्रतिपादन केले. (२१)

**वक्ता बोले याउपरी । दोघेचि मुक्त सृष्टीवरी ।**
**ऐसें बोलतां उरी । कोणास आहे ॥ २२ ॥**

तेव्हा वक्ता म्हणाला की, या सृष्टीत हे दोघेच फक्त मुक्त असे म्हटले, तर इतरांची स्थिती काय आहे, म्हणून म्हणावे? (२२)

**बहु ऋषि बहु मुनी । सिद्ध योगी आत्मज्ञानी ।**
**जाले पुरुष समाधानी । असंख्यात ॥ २३ ॥**

अनेक ऋषी, अनेक मुनी, कित्येक सिद्ध, कित्येक योगी व आत्मज्ञानी पुरुष होऊन गेले. ज्यांना शाश्वत समाधान प्राप्त झाले होते, असे असंख्य लोक होऊन गेले आहेत. (२३)

श्लोक

प्रह्लादनारदपराशरपुंडरीक
व्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ।
रुक्मांगदार्जुनवसिष्ठबिभीषणादीन्
पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि ॥ १ ॥
कविर्हरिरंतरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः ।
आविर्होत्रोऽथ द्रुमिलश्चमसः करभाजनः ॥ २ ॥

**याहि वेगळे थोर थोर । ब्रह्माविष्णुमहेश्वर ।**
**आदिकरून दिगंबर । विदेहादिक ॥ २४ ॥**

वर जे वर्णन केले आहे त्यांच्याखेरीज ब्रह्मा, विष्णू, महेश्वर, दत्तात्रेय, विदेही जनकराज आदी अनेकजण मुक्त होऊन गेले आहेत. (२४)

**शुक वामदेव मुक्त जाले । येर हे अवघेचि बुडाले ।**
**या वचना विश्वासले । ते पढतमूर्ख ॥ २५ ॥**

फक्त शुक व वामदेव मुक्त झाले आणि हे इतर सर्वजण मुक्त झाले नाहीत, या वचनावर जे कुणी विश्वास ठेवतात, ते पढतमूर्ख जाणावेत. (२५)

**तरी वेद कैसें बोलिला । तो काये तुम्ही मिथ्या केला ।**
**ऐकोन वक्ता देता जाला । प्रत्योत्तर ॥ २६ ॥**

हे बोलणे ऐकून श्रोता म्हणाला की, मग वेदात असे कसे काय म्हटले आहे? तुम्ही वेदाला मिथ्या ठरवता काय? हे श्रोत्याचे बोलणे ऐकून वक्त्याने त्यास प्रत्युत्तर दिले. (२६)

**वेद बोलिला पूर्वपक्ष । मूर्ख तेथेंचि लावी लक्ष ।**
**साधु आणी वित्पन्न दक्ष । त्यांस हें न मने ॥ २७ ॥**

वेदांनी केवळ पूर्वपक्ष मांडला. मूर्ख लोक केवळ त्यावर लक्ष देतात, पण साधू, व्युत्पन्न आणि दक्ष माणसे त्यांना हे पटत नाही. (२७)

**तथापी हें जरी मानलें । तरी वेदसामर्थ्य बुडालें ।**
**वेदांचेनि उद्धरिलें । न वचे कोणा ॥ २८ ॥**

पण समजा, जर हे खरे मानले, तर मग वेदांमध्ये लोकांना उद्धरण्याचे सामर्थ्यच नाही, असा त्याचा अभिप्राय होईल व त्याची थोरवी नष्ट होईल. (२८)

**वेदाआंगी सामर्थ्य नसे । तरी या वेदास कोण पुसे ।**
**म्हणौनि वेदीं सामर्थ्यअसे । जन उधरावया ॥ २९ ॥**
**वेदाक्षर घडे ज्यासी । तो बोलिजे पुण्यरासी ।**
**म्हणौन वेदीं सामर्थ्यासी । काये उणें ॥ ३० ॥**

वेदांच्या अंगी जर सामर्थ्य नसते, तर वेदांना कुणी विचारले असते? म्हणून हे लक्षात घेतले पाहिजे की, लोकांचा उद्धार करण्याचे सामर्थ्य वेदांमध्ये निश्चितच आहे. जो वेदाभ्यास करतो तो अत्यंत पुण्यवान समजला जातो. म्हणून वेदांच्या ठिकाणी सामर्थ्याला काय तोटा आहे? (२९-३०)

**वेदशास्त्रपुराण । भाग्यें जालियां श्रवण ।**
**तेणें होईजे पावन । हें बोलती साधु ॥ ३१ ॥**

वेद, शास्त्रे, पुराणे यांचे श्रवण भाग्यानेच घडते. आणि ज्यांना घडते ते पवित्र होतात, असे साधू लोक सांगतात. (३१)

**श्लोक अथवा श्लोकार्ध । नाहीं तरी श्लोकपाद ।**
**श्रवण होतां येक शब्द । नाना दोष जाती ॥ ३२ ॥**

एक श्लोक अथवा अर्धा श्लोक एवढेच नव्हे, श्लोकाच्या एका चरणाचे श्रवण घडले, तरी अनेक दोष नाहीसे होतात. (३२)

**वेदशास्त्रीं पुराणीं। ऐशा वाक्याच्या आईणी।**
**अगाध महिमा व्यासवाणी। वदोन गेली ॥ ३३॥**

वेद, शास्त्रे व पुराणे यात अशा अर्थाच्या ओळीच्या ओळी आहेत. व्यासांनी आपल्या ग्रंथांतून वेदांचा अगाध महिमा वर्णन केला आहे. (३३)

**येकाक्षर होतां श्रवण। तत्काळचि होईजे पावन।**
**ऐसें ग्रंथाचें महिमान। ठाईं ठाईं बोलिलें॥ ३४॥**

वेदांच्या एका अक्षराचे श्रवण जरी घडले तरी तो श्रोता तत्काळ पावन होतो, असा त्यांचा महिमा अनेक ग्रंथांतून जागोजागी वर्णन केलेला आहे. (३४)

**दोहीवेगळा तिजा नुधरे। तरी महिमा कैंचा उरे।**
**असो हें जाणिजे चतुरें। येरां गथागोवी ॥ ३५॥**

शुक, वामदेव यांच्याशिवाय तिसरा कुणी उद्धरून गेला नाही, असे जर मानले, तर वेदांचा महिमा कसा उरेल? असो. आता हे बोलणे राहू दे. पण चतुर असतात तेच या वचनातील खरा अभिप्राय (मर्म) जाणतात. इतर लोक गोंधळून जातात. (३५)

**वेदशास्त्रें पुराणें। कैसीं होतीं अप्रमाणें।**
**दोघांवांचून तिसरा कोणें। उद्धरावा ॥ ३६॥**

त्यावर श्रोता म्हणतो की, वेदशास्त्रे, पुराणे अप्रमाण कशी मानावीत? पण शुक, वामदेवाखेरीज आणखी कुणाकुणाचा उद्धार झाला आहे? (३६)

**म्हणसी काष्ठीं लागोन पडला। तोचि येक मुक्त जाला।**
**शुक तोहि अनुवादला। नाना निरूपणें ॥ ३७॥**

यावर वक्ता म्हणतो की, तुला असे वाटत आहे का की, जो लाकडासारखा निश्चेष्टित होऊन पडला असेल तोच मुक्त होतो? पण हे वाटणे बरोबर नाही. कारण शुकदेवही काही तसे निपचित पडून राहिलेले नव्हते. त्यांनी अनेकदा अध्यात्मावर निरूपण केले होते. (३७)

**शुक मुक्त ऐसें वचन। वेद बोलिला हें प्रमाण।**
**परी तो नव्हता अचेतन। ब्रह्माकार ॥ ३८॥**

शुक मुक्त हे वेदवचन प्रमाणच आहे. पण शुकदेव काही ब्रह्माशी ऐक्य पावून अचेतनासारखे निपचित पडून राहिलेले नव्हते. (३८)

**अचेतन ब्रह्माकार। असता शुक योगेश्वर।**
**तरी सारासारविचार। बोलणें न घडे ॥ ३९॥**

शुकदेव जर अचेतनासारखे निपचित पडून राहिलेले असते, तर त्यांना सारासारविचार बोलून दाखविताच आला नसता. (३९)

**जो ब्रह्माकार जाला। तो काष्ठ होऊन पडिला।**
**शुक भागवत बोलिला। परीक्षितीपुढें ॥ ४०॥**

जो ब्रह्माकार होतो, तो लाकडासारखा अचेतन होऊन निपचित पडून राहतो, असे मानणे चूक आहे. शुकदेव मुक्त होते, तरी त्यांनी परीक्षितापुढे भागवत सांगितले. (४०)

**निरूपण हें सारासार। बोलिला पाहिजे विचार।**
**धांडोळावें सचराचर। दृष्टांताकारणें ॥ ४१॥**

अध्यात्माचे निरूपण करताना सारासारविचार लोकांना समजेल अशा रीतीने स्पष्ट करून समजावून द्यावा लागतो. त्यासाठी निरूपणात दृष्टान्त द्यावे लागतात. चराचर धुंडाळून योग्य दृष्टान्ताची निवड करावी लागते. (४१)

**क्षण येक ब्रह्मचि व्हावें। क्षण येक दृश्य धांडोळावें।**
**नाना दृष्टांतीं संपादावें। वगतृत्वासी ॥ ४२॥**

सर्वांचे सार असे जे ब्रह्म त्याचे निरूपण करताना कधी कधी एक क्षणभर वक्ता जणू ब्रह्मच होतो, तर असार अशा या दृश्य सृष्टीचे वर्णन करीत असता त्याला वक्तृत्वात अनेक दृष्टांतांचा उपयोग करून विषयप्रतिपादन करावे लागते. (४२)

**असो भागवतनिरूपण। शुक बोलिला आपण।**
**तया आंगीं बद्धपण। लाऊं नये कीं ॥ ४३॥**

असो. शुकदेवांनी स्वत: संपूर्ण भागवतावर निरूपण केले म्हणून त्यांना बद्ध समजू नये. (४३)

**म्हणोनी बोलतां चालतां। निचेष्टित पडिलें नस्तां।**
**मुक्ति लाभे सायोज्यता। सद्गुरुबोधें ॥ ४४॥**

थोडक्यात म्हणजे लाकडासारखे अचेतन होऊन न पडता, आणि चालणे, बोलणे इत्यादी अत्यावश्यक क्रिया करीत असताही सद्गुरूंनी केलेला बोध, हृदयात पूर्णपणे ठसला असेल, तर सायुज्य मुक्तीचा लाभ होऊ शकतो. (४४)

येक मुक्त येक नित्यमुक्त । येक जाणावे जीवन्मुक्त ।
येक योगी विदेहमुक्त । समाधानी ॥ ४५ ॥

काही मुक्त असतात, काही नित्यमुक्त असतात, काही जीवन्मुक्त असतात, तर काही योगी शाश्वत समाधान लाभलेले विदेहमुक्त असतात. असे प्रकार त्यात आहेत ते जाणून घ्यावे. (४५)

सचेतन ते जीवन्मुक्त । अचेतन ते विदेहमुक्त ।
दोहिवेगळे नित्यमुक्त । योगेश्वर जाणावे ॥ ४६ ॥

जे मुक्त होऊनही जिवंतपणी या जगात वावरतात, त्यांना जीवन्मुक्त म्हटले जाते. ज्यांनी मुक्ती लाभल्यावर देहत्याग केलेला असतो त्यांना विदेहमुक्त म्हणतात. या दोघांपेक्षाही जे वेगळे मुक्त पुरुष त्यांना नित्यमुक्त संबोधले जाते. ते योगेश्वर जाणावेत. (४६)

स्वरूपबोधें स्तब्धता । ते जाणावी ताटस्तता ।
ताटस्तता आणी स्तब्धता । हा देहसमंधु ॥ ४७ ॥

स्वरूपबोधाने जी स्तब्धता येते, तिला तटस्थता म्हणतात. स्तब्धता किंवा तटस्थता हे देहाच्या संबंधाने म्हटले जाते. (४७)

येथें अनुभवासी कारण । येर सर्व निःकारण ।
तृप्ती पावावी आपण । आपुल्या स्वानुभवें ॥ ४८ ॥

येथे या देहाच्या अवस्थांचे महत्त्व नाही. स्वस्वरूपानुभव महत्त्वाचा आहे. बाकी सर्व निरुपयोगी आहे. आपल्या स्वानुभवाने आपण शाश्वत समाधान मिळवावे. (४८)

कंठमर्याद जेविला । त्यास म्हणती भुकेला ।
तेणें शब्दें जाजावला । हें तों घडेना ॥ ४९ ॥

आकंठ भोजन करून आलेल्या माणसाला कुणी हा भुकेला आहे असे म्हटले तरी ते शब्द ऐकून तो त्रासला असे कधी घडत नाही. (४९)

स्वरूपीं नाहीं देहो । तेथें काइसा संदेहो ।
बद्ध मुक्त ऐसा भावो । देहाचकडे ॥ ५० ॥

स्वरूपी जीवब्रह्मैक्य होते, तेथे देहाचा काही संबंधच नसतो आणि बद्ध अथवा मुक्त यांचा संबंध देहाशीच असतो. म्हणून स्वरूपानुभव हा निःसंदेहच असतो. (५०)

देहबुद्धि धरून चिंती । मुक्त ब्रह्मादिक नव्हेती ।
तेथें शुकाची कोण गती । मुक्तपणाची ॥ ५१ ॥

मी देह हा अहंकार मनात बाळगून ब्रह्मचिंतन केले, तर ब्रह्मादी देवसुद्धा मुक्त होऊ शकणार नाहीत, तेथे शुकदेवांची कथा ती काय? (५१)

मुक्तपण हेंचि बद्ध । मुक्त बद्ध हें अबद्ध ।
सस्वरूप स्वतसिद्ध । बद्ध ना मुक्त ॥ ५२ ॥

मुक्तपण हेच बंधन आहे. स्वस्वरूप हे स्वयंसिद्ध आहे ते बद्धही नाही आणि मुक्तही नाही. म्हणून मुक्तबद्धाची चर्चा करणे हेच अयोग्य आहे. (५२)

मुक्तपणाची पोटीं शिळा । बांधतां जाईजे पाताळा ।
देहबुद्धीचा आगळा । स्वरूपीं न संटे ॥ ५३ ॥

जर कुणी म्हणेल की, 'मी' मुक्त आहे तर तेथे मीपणा येतोच. म्हणून अशी मुक्तपणाची शिळा पोटाशी बांधून कुणी भवसागर तरून जाण्याचा जर प्रयत्न करील, तर त्या शिळेमुळे तो बुडून पार पाताळात जाईल. जोपर्यंत देहबुद्धीचा अडसर दूर होत नाही, तोपर्यंत स्वस्वरूपापर्यंत पोहोचताच येत नाही. (५३)

मीपणापासून सुटला । तोचि येक मुक्त जाला ।
मुका अथवा बोलिला । तरी तो मुक्त ॥ ५४ ॥

मीपणापासून जो सुटतो तो माणूस मग मुका असो अथवा बोलका असो, तोच मुक्त झाला असे जाणावे. (५४)

जयास बाधावें तें वाव । तेथें कैंचा मुक्तभाव ।
पाहों जातां सकळ वाव । गुणवार्ता ॥ ५५ ॥

ज्यायोगे बंधन झाले असे वाटते तेच मुळी मिथ्या आहे. जर बंधनच मिथ्या, तर मुक्ती तरी खरी कशी असणार? म्हणून सखोल विचार केल्यावर कळून येते की, बंधन आणि मुक्ती त्रिगुणांमुळे भासत असतात, म्हणून सर्व काही मिथ्याच असते. (५५)

श्लोक

बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुतः ।
गुणस्य मायामूलत्वान्न मे मोक्षो न बंधनम् ॥

**अर्थ**—बद्ध, मुक्त हे वर्णन गुणांच्या क्षेत्रात येते, आत्मवस्तूच्या दृष्टीने ते योग्य नाही. गुणांचे मूळ माया आहे आणि ती तर खरी नाही. म्हणून आत्म्याला बंधनही नाही आणि मोक्षही नाही.

तत्वज्ञाता परमशुद्ध। तयासी नाहीं मुक्त बद्ध।
मुक्त बद्ध हा विनोद। मायागुणें ॥ ५६ ॥

परमशुद्ध असा आत्मज्ञानी असतो तो बद्धही नसतो आणि मुक्तही नसतो. माया आणि तिच्यापासून होणारे त्रिगुण यांचा बद्ध, मुक्त हा खेळ असतो. (५६)

जेथें नामरूप हें सरे। तेथें मुक्तपण कैंचें उरे।
मुक्त बद्ध हें विसरे। विसरलेपणेंसीं ॥ ५७ ॥

आत्मस्वरूपाच्या ठिकाणी नामरूपही उरत नाही, तर मुक्तपणा कसा उरेल? खरा शुद्ध आत्मज्ञानी मी बद्ध किंवा मुक्त हे तर विसरतोच, पण आपण ते विसरलो ही जाणीवही तो विसरतो. (५७)

बद्ध मुक्त जाला कोण। तो तरी नव्हे कीं आपण।
बधक जाणावें मीपण। धर्त्यास बाधी ॥ ५८ ॥

म्हणजे बद्ध कोण होता, मुक्त कोण झाला, तो कोणी का असेना, तो आपण नव्हे हे शुद्ध ज्ञानी जाणत असतो. ज्याला कुणाला मी मुक्त झालो असे वाटते, त्याला ते 'मीपण' च बंधनकारक ठरते व तो बंधनात पडतो. (५८)

एवं हा अवघा भ्रम। अहंतेचा जाला श्रम।
मायातीत जों विश्राम। सेविला नाहीं ॥ ५९ ॥

थोडक्यात म्हणजे मी बद्ध, मी मुक्त हा अवघा भ्रमच आहे. देहाहंतेमुळेच हे भ्रम होतात. कारण मायातीत असा जो स्वस्वरूपानुभवरूप विश्राम त्याचा अनुभवच अद्याप आलेला नसतो. (५९)

असो बद्धता आणी मुक्तता। आली कल्पनेच्या माथां।
ते कल्पना तरी तत्वतां। साच आहे ॥ ६० ॥

कल्पनेमुळे बद्धता आणि मुक्तता या अवस्था भासतात, पण ज्या कल्पनेमुळे त्या भासतात ती कल्पना तरी कोठे खरी आहे? (६०)

म्हणौनि हें मृगजळ। माया नाथिलें आभाळ।
स्वप्न मिथ्या तत्काळ। जागृतीसी होये ॥ ६१ ॥

म्हणून बद्धता आणि मुक्तता या मृगजळाप्रमाणे किंवा आकाशातील अभ्राप्रमाणे मिथ्या असून मायेमुळेच त्या खऱ्या वाटतात. स्वप्नात असताना स्वप्नदृश्य खरे वाटते, पण जागृती आली की स्वप्न व त्यातील दृश्य मिथ्या असल्याचे कळून येते. (६१)

स्वप्नीं बद्ध मुक्त जाला। तो जागृतीस नाहीं आला।
कैंचा कोण काये जाला। कांहीं कळेना ॥ ६२ ॥

स्वप्नात एखाद्याला प्रथम आपण बद्ध आहोत असे वाटावे व स्वप्नातच आपण आता मुक्त झालो असे खात्री-पूर्वक वाटावे. पण जागे होताच ते स्वप्न होते हे त्याला कळून येते. मग कोण बद्ध झाला आणि कोण आणि कसा मुक्त झाला म्हणावे, हे त्याला कळतच नाही. (६२)

म्हणोनि मुक्त विश्वजन। जयास जालें आत्मज्ञान।
शुद्धज्ञानें मुक्तपण। समूळ वाव ॥ ६३ ॥

म्हणून ज्यांना आत्मज्ञान होते, ते सर्व लोक मुक्त म्हणावेत. पण तेच आत्मज्ञान दृढ होऊन शुद्ध ज्ञान झाले की, मग मुक्तपणाही मायिकच ठरतो. (६३)

बद्ध मुक्त हा संदेहो। धरी कल्पनेचा देहो।
साधु सदा निःसंदेहो। देहातीत वस्तु ॥ ६४ ॥

देहाहंता जोपर्यंत सूक्ष्म का होईना शिल्लक असते, तोपर्यंत साधकाच्या मनात आपण बद्ध की मुक्त असा संदेह कल्पनेमुळे निर्माण होतो. आत्मवस्तू ही देहातीत असते. त्या आत्मवस्तूशी ऐक्य पावून जो देहातीत होतो, तो साधू कायमचा निःसंदेह होतो. (६४)

आतां असो हें पुढती। पुढें रहावें कोणे रिती।
तेंचि निरूपण श्रोतीं। सावध परिसावें ॥ ६५ ॥

आता हा विषय पुरे. आता पुढील समासात आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर साधकाने कशा प्रकारे राहावे याचे निरूपण केले जाईल ते श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावे, असे समर्थ म्हणतात. (६५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'बद्धमुक्तनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.**



## दशक ७ : समास ७

# साधनप्रतिष्ठा

॥ श्रीराम ॥

**वस्तूसि जरी कल्पावें। तरी ते निर्विकल्प स्वभावें।**
**तेथें कल्पनेच्या नांवें। सुन्याकार ॥ १ ॥**

श्रोते म्हणतात की, आत्मवस्तूची कल्पना करण्याचा प्रयत्न करावा तर ती मुळात निर्विकल्प आहे. कल्पना जे मन करते ते मनही जर त्या आत्मवस्तूपर्यंत पोहोचवू शकत नाही, तर मग तेथे कल्पनेचा शिरकाव कसा होणार? म्हणून कल्पनेच्या नावे शून्याकार होतो म्हणजे तिचे अस्तित्वच राहात नाही, असे श्रोता म्हणतो.(१)

**तथापि कल्पूं जातां। न ये कल्पनेच्या हातां।**
**वोळखी ठाईं न पडे चित्ता। भ्रंश पडे ॥ २ ॥**

तरी पण जर आत्मवस्तूची कल्पना करू लागलो, तर काहीच हाती लागत नाही. मनाला वस्तूची ओळखच होत नाही. उलट भ्रम मात्र उत्पन्न होतो. (२)

**कांहीं दृष्टीसचि न दिसे। मनास तेंहि न भासे।**
**न भासे न दिसे कैसें। वोळखावें ॥ ३ ॥**

जी वस्तू डोळ्यांना दिसत नाही, मनाला भासत नाही, अशा त्या न दिसणाऱ्या, न भासणाऱ्या परब्रह्माला ओळखावे तरी कसे? (३)

**पाहों जातां निराकार। मनासि पडे सुन्याकार।**
**कल्पूं जातां अंधकार। भरला वाटे ॥ ४ ॥**

त्याला पाहावयाचा प्रयत्न करावा तर, त्याला कुठलाही आकारच नाही. मनाने अनुमान करायला जावे तर मन शून्याकार होऊन जाते. तरीही अंतश्चक्षूंपुढे त्याची कल्पना करावी म्हटले तर सर्वत्र अंधकार भरला आहे, असेच वाटते. (४)

**कल्पूं जातां वाटे काळें। ब्रह्म काळें ना पिवळें।**
**आरक्त निळें ना धवळें। वर्णरहित ॥ ५ ॥**

तरीही कल्पना करू लागल्यास ते काळे आहे असे वाटते. पण संत सांगतात की परब्रह्म, काळे नाही, पिवळे नाही, लालही नाही, निळे वा पांढरेही नाही. त्याला कुठलाही रंगच नाही. (५)

**जया वर्णवेक्ती नसे। भासाहून अनारिसें।**
**रूपचि नाहीं कैसें। वोळखावें ॥ ६ ॥**

ज्याला वर्ण नाही, जे अव्यक्त आहे आणि ज्याला रूपही नाही, असे भासाहूनही विलक्षण असलेले ब्रह्म ओळखावे तरी कसे? (६)

**न दिसतां वोळखण। किती धरावी आपण।**
**हें तों श्रमासीच कारण। होतसे ॥ ७ ॥**

जे दिसतही नाही त्याची ओळख आपण कशी आणि किती धरावी? त्यामुळे श्रम मात्र होतात. (७)

**जो निर्गुण गुणातीत। जो अदृश्य अवेक्त।**
**जो अचिंत्य चिंतनातीत। परम पुरुष ॥ ८ ॥**

जो निर्गुण असून गुणातीत आहे, जो अदृश्य व अव्यक्त आहे आणि अचिंत्य असून चिंतनातीत आहे तोच परम पुरुष होय. (८)

श्लोक

अचिंत्याव्यक्तरूपाय निर्गुणाय गुणात्मने।
समस्तजगदाधारमूर्तये ब्रह्मणे नमः॥

**अर्थ**—अचिंत्य, अव्यक्तरूप, निर्गुण, गुणात्मा, सगळ्या जगताचा आधार अशा ब्रह्ममूर्तीला मी नमस्कार करतो.

**अचिंत्य तेंचि चिंतावें। अव्यक्तास आठवावें।**
**निर्गुणास वोळखावें। कोणेपरी ॥ ९ ॥**

जे अचिंत्य आहे त्याचे चिंतन कसे करावे, जे अव्यक्त आहे त्याचे रूप कसे आठवावे आणि जे गुणरहित आहे त्याला ओळखावे तरी कसे? (९)

**जें दृष्टीसचि न पडे। जें मनासहि नातुडे।**
**तया कैसें पाहाणें घडे। निर्गुणासी ॥ १० ॥**

जे डोळ्यांनी दिसत नाही, ज्याच्यापर्यंत मनाची धाव पोहोचू शकत नाही, त्या निर्गुणाला पाहणे कसे बरे शक्य होईल? (१०)

**असंगाचा संग धरणें। निरावलंबीं वास करणें।**
**निशब्दासी अनुवादणें। कोणेपरी ॥ ११ ॥**

असंगाशी संगती कशी करायची? आधाराशिवायच आकाशात अधांतरी कसे राहावे? ज्याच्यापर्यंत शब्द पोहोचू शकत नाही, त्याचे वर्णन कसे करावे?(११)

**अचिंत्यासी चिंतूं जातां। निर्विकल्पासी कल्पितां।**
**अद्वैताचें ध्यान करितां। द्वैतचि उठे ॥ १२ ॥**

अचिंत्याचे चिंतन करायचा प्रयत्न केला किंवा निर्विकल्पाची कल्पना करू लागलो आणि अद्वैताचे ध्यान धरावे म्हटले तर द्वैताचाच जोर होतो. (१२)

**आतां ध्यानचि सोडावें। अनुसंधान तें मोडावें।**
**तरी मागुतें पडावें। माहां संशईं ॥ १३ ॥**

आता असे होऊ लागल्यावर त्या परब्रह्माचे ध्यानच करणे सोडून द्यावे. अनुसंधानही सोडून द्यावे म्हटले तर परत महासंशय उत्पन्न होतात. (१३)

**द्वैताच्या भेणें अंतरी। वस्तु न पाहिजे तरी।**
**तेणें समाधाना उरी। कदा असेचिना ॥ १४ ॥**

ध्यान वा अनुसंधान करणे द्वैताच्या भीतीने जर सोडून दिले तर आत्मवस्तू कशी प्राप्त होणार? आणि अंत:करणात शाश्वत समाधान तरी कसे लाभणार?(१४)

**सवे लवितां सवे पडे। सवे पडतां वस्तु आतुडे।**
**नित्यानित्यविचारें घडे। समाधान ॥ १५ ॥**

आता येथून पुढे वक्ता उत्तर देत आहे की, आपण मनाला जशी सवय लावावी तशी लागते. ब्रह्मवस्तूचे ध्यान वा अनुसंधान करण्याची सवय लावली की कालांतराने त्या अभ्यासाच्या योगाने व नित्यानित्य विचाराच्या योगाने आत्मवस्तूची प्राप्ती होऊन समाधान लाभते. (१५)

**वस्तु चिंतितां द्वैत उपजे। सोडी करितां कांहींच नुमजे।**
**सुन्यत्वसंदेहीं पडिजे। विवेकेंविण ॥ १६ ॥**

आत्मवस्तूचे चिंतन करताना द्वैत उत्पन्न होते म्हणून ते चिंतन करणे जर सोडून दिले, तर मग काहीच कळणार नाही आणि विवेकाशिवाय मन शून्याकार होऊन संदेहात पडेल. (१६)

**म्हणोनि विवेक धरावा। ज्ञानें प्रपंच सारावा।**
**अहंभाव वोसरावा। परी तो वोसरेना ॥ १७ ॥**

म्हणून नित्यानित्य विवेक करून त्या ज्ञानाने असार प्रपंच बाजूस सारावा व अहंभावाचा त्याग करावा तर तो अहंभाव काही केल्या ओसरत नाही. (१७)

**परब्रह्म तें अद्वैत। कल्पितांच उठे द्वैत।**
**तेथें हेत आणी दृष्टांत। कांहींच न चले ॥ १८ ॥**

अद्वैत परब्रह्माचे चिंतन करू जावे, तर तेथे द्वैत उत्पन्न होते. तेथे स्वतंत्र विचार अथवा दुसऱ्या वस्तूच्या दृष्टान्ताने केलेले मनन काहीच कामास येत नाही. (१८)

**तें आठवितां विसरिजे। कां तें विसरोनि आठविजे।**
**जाणोनिया नेणिजे। परब्रह्म तें ॥ १९ ॥**

परब्रह्माच्या स्मरणात स्वत:चा विसर पडला पाहिजे अथवा स्वत:ला विसरून त्याचे स्मरण केले पाहिजे. थोडक्यात म्हणजे परब्रह्मास जाणले असता जाणणारा मी शिल्लक उरता कामा नये. (१९)

**त्यास न भेटतां होय भेटी। भेटों जातां पडे तुटी।**
**ऐसी हे नवल गोष्टी। मुकेपणाची ॥ २० ॥**

मीपणाने त्याची भेट घेऊ लागले तर भेटच होऊ शकत नाही आणि 'मी भेट घेतो' असा जो 'मी' पणा तो सोडून दिला की अचानक भेट घडते. अशी ही फार नवलाईची गोष्ट आहे! तिचे वर्णन शब्दात करताच येत नाही. तेथे मौनच पडते. (२०)

**तें साधूं जातां साधवेना। नांतरी सोडितां सुटेना।**
**लागला समंध तुटेना। निरंतर ॥ २१ ॥**

त्या परब्रह्माची प्राप्ती करून घ्यावी म्हणावे तर ते साध्य होत नाही, पण वास्तविक पाहता ते सदैव प्राप्तच आहे. त्यास सोडावे म्हटले तरी ते सुटत नाही. आपण सोडूही शकत नाही. एखादा संमंध पाठीस लागला की तो जसा सुटता सुटत नाही, तसे परब्रह्म निरंतर आपल्या बरोबरच राहते. (२१)

तें असतचि सदां असे। नांतरी पाहातां दुरासे।
न पाहातां प्रकाशे। जेथें तेथें ॥ २२॥

ते सदा आपल्या सन्निध असते, पण द्वैतभावाने त्याला पाहू जावे तर ते दुरावते. पण ते जरी दृष्टीस पडले नाही तरी सर्वत्र तेच प्रकाशत असते. (२२)

जेथें उपाये तोचि अपाये। आणी अपाये तोचि उपाये।
हें अनुभवेंविण काये। उमजों जाणें ॥ २३॥

त्याला पाहण्याचा उपाय करू जावे, तर कर्तेपणाच्या पडद्यामुळे ते दिसत नाही म्हणजेच अपाय होतो. हे अपाय करणारे कर्तेपण सुटले तर मात्र तोच खरा उपाय होऊन ते सर्वत्र प्रकाशू लागते. हे कोडे प्रत्यक्ष अनुभवाशिवाय कसे काय उलगडणार? (२३)

तें नुमजतांच उमजे। उमजोन कांहींच नुमजे।
तें वृत्तीविण पाविजे। निवृत्तिपद ॥ २४॥

ज्यावेळी आपणास वाटते की मला ते उमजले, मी त्याला जाणले त्यावेळी खरे तर आपण काहीच जाणलेले नसते आणि ज्यावेळी खरे ते उमजते तेव्हा जाणून घेणाराच कुणी वेगळा तेथे नसतो. त्याला जाणणे म्हणजे त्याच्याशी ऐक्य पावणे होय. जोपर्यंत वृत्ती असते तोपर्यंत द्वैत असते. वृत्ती ही ज्यावेळी लय पावते, तेव्हा निवृत्तिपदाची म्हणजे परब्रह्माची प्राप्ती होते. (२४)

तें ध्यानीं धरितां नये। चिंतनीं चिंतावें तें काये।
मनामधें न समाये। परब्रह्म तें ॥ २५॥

परब्रह्माचे ध्यान धरता येत नाही, त्याचे चिंतन करता येत नाही व ते मनात मावत नाही. (२५)

त्यास उपमे द्यावें जळ। तरी तें निर्मळ निश्चळ।
विश्व बुडालें सकळ। तरी तें कोरडेंचि असे॥ २६॥

त्याला जलाची उपमा देता येत नाही. कारण ते निर्मळ, निश्चल असते आणि प्रलयकाळी सर्व विश्व, दृश्यसृष्टी जलमय झाली, तरी ते जसेच्या तसे कोरडेच असते. (२६)

नव्हे प्रकाशासारिखें। अथवा नव्हे काळोखें।
आतां तें कासयासारिखें। सांगावें हो ॥ २७॥

ते उजेडासारखेही नाही अथवा ते काळोखासारखेही नाही तर आता ते कशासारखे म्हणून सांगावे हो! (२७)

ऐसें ब्रह्म निरंजन। कदा नव्हे दृश्यमान।
लावावें तें अनुसंधान। कोणेपरी ॥ २८॥

ते निरंजन (निर्मल) ब्रह्म गुणरहित असल्याने कधी दृश्यमान होतच नाही, मग जे दिसत नाही, तेथे अनुसंधान कशाप्रकारे लावावे? (२८)

अनुसंधान लाऊं जातां। कांहीं नाहीं वाटे आतां।
तेणें मनाचिया माथां। संदेह वाजे ॥ २९॥

अनुसंधान लावण्याचा प्रयत्न केला की नाहीच असे वाटून वृत्ती शून्याकार होते आणि मनामध्ये संदेह उत्पन्न होतो. (२९)

लटिकेंचि काये पाहावें। कोठें जाऊन राहावें।
अभाव घेतला जीवें। सत्य स्वरूपाचा ॥ ३०॥

जे नाही ते उगीच पाहण्याचा खोटा आव कशाला आणावा? ते निश्चित कोठे आहे हे माहीत नाही तर त्याला शोधण्यासाठी कोठे जाऊन राहावे? म्हणून परब्रह्म हे आपले सत्य स्वरूप नाहीच अशी अश्रद्धा जीवाच्या ठिकाणी उत्पन्न झाली. (३०)

अभावचि म्हणों सत्य। तरी वेदशास्त्र कैसें मिथ्य।
आणी व्यासादिकांचें कृत्य। वाउगें नव्हे ॥ ३१॥

परब्रह्म आपले सत्य स्वरूप नव्हे अशी अश्रद्धा जर उत्पन्न झाली तर वेदशास्त्रालाही मिथ्या म्हणावे लागेल आणि व्यासादिकांचे कार्य हेही व्यर्थच म्हणावे लागेल. (३१)

म्हणोनि मिथ्या म्हणतां नये। बहुत ज्ञानाचे उपाये।
बहुतीं निर्मिलें तें काये। मिथ्या म्हणावें ॥ ३२॥

म्हणून त्याला मिथ्या म्हणता येत नाही. अनेकांना त्याचे ज्ञान व्हावे म्हणून जे अनेक उपाय सांगितलेले आहेत त्यांनाही मिथ्या म्हणावे काय? (३२)

अद्वैतज्ञानाचा उपदेश। गुरुगीता तो महेश।
सांगता होये पार्वतीश। पार्वतीप्रती ॥ ३३॥

अद्वैत ज्ञानाचा उपदेश पार्वतीपती महेशांनी पार्वतीस केला, तीच गुरुगीता होय. (३३)

**अवधूतगीता केली। गोरक्षीस निरोपिली।**
**ते अवधूतगीता बोलिली। ज्ञानमार्ग ॥ ३४॥**

अवधूतांनी अवधूतगीता गोरखनाथास सांगितली व तिच्याद्वारे ज्ञानोपदेश केला. (३४)

**विष्णु होऊन राजहंस। विधीस केला उपदेश।**
**ते हंसगीता जगदीश। बोलिला स्वमुखें ॥ ३५ ॥**

विष्णूने जगदीश हंस होऊन स्वमुखाने ब्रह्मदेवास जो उपदेश केला तो हंसगीता नावाने प्रसिद्ध आहे. (३५)

**ब्रह्मा नारदा उपदेशित। चतुश्लोकी भागवत।**
**पुढें व्यासमुखें बहुत। विस्तारलें ॥ ३६ ॥**

ब्रह्मदेवाने नारदास चार श्लोकांत जो ज्ञानोपदेश केला, त्यास चतु:श्लोकी भागवत म्हणतात. त्याचाच व्यासांनी पुढे खूप विस्तार केला. (३६)

**वसिष्ठसार वसिष्ठऋषी। सांगता जाला रघुनाथासी।**
**कृष्ण सांगे अर्जुनासी। सप्तश्लोकी गीता ॥ ३७ ॥**

वसिष्ठ ऋषींनी रघुनाथास जो उपदेश केला, तो योगवासिष्ठ म्हणून ओळखला जातो, तर कृष्णांनी अर्जुनाला सातश्लोकी गीता सांगितली. (३७)

**ऐसें सांगावें तें किती। बहुत ऋषी बोलिले बहुतीं।**
**अद्वैत ज्ञान आदिअंतीं। सत्यचि असे ॥ ३८ ॥**

अशा किती ग्रंथांची नावे घ्यावीत? अनेक ऋषींनी अनेक ग्रंथांत ज्या अद्वैत ज्ञानाचा उपदेश केला, ते आदि-अंती सत्यच आहे. (३८)

**म्हणोनि मिथ्या आत्मज्ञान। म्हणतां पाविजे पतन।**
**प्रज्ञेरहित जे जन। तयांसी हें कळेना ॥ ३९ ॥**

म्हणून आत्मज्ञान हे मिथ्या आहे असे जे म्हणतात, ते पतन पावतात. पण मंद बुद्धीच्या लोकांना हे कळत नाही. (३९)

**जेंथे शेषाची प्रज्ञा मंदली। श्रुतीस मौन्यमुद्रा पडिली।**
**जाणपणें न वचे वदली। स्वरूपस्थिती ॥ ४० ॥**

स्वरूपस्थितीचे वर्णन करताना शेषाची बुद्धीही काम करीनाशी झाली. श्रुतींनाही ते जमले नाही, म्हणून त्यांनी मौन धारण केले. 'मी जाणतो' या अभिमानाने स्वरूपस्थिती सांगितली जाणे अशक्यच आहे. (४०)

**आपणास नुमजे बरवें। म्हणोनि मिथ्या कैसें करावें।**
**नातरी सदृढ धरावें। सद्गुरुमुखे ॥ ४१ ॥**

आपल्याला एखादी गोष्ट कळत नाही म्हणून तिला मिथ्या कसे म्हणावे? सद्गुरुमुखाने श्रवण करून मनन, निदिध्यासाने ते अंतरी ठसेल असा प्रयत्न करावा. (४१)

**मिथ्य तेंचि सत्य जालें। सत्य असोन मिथ्य केलें।**
**संदेहसागरी बुडालें। अकस्मात मन ॥ ४२ ॥**

ब्रह्म मिथ्या वाटत होते ते सत्य ठरले. ही पांचभौतिक सृष्टी प्रत्यक्ष डोळ्यांना दिसत असते, म्हणून ती सत्य वाटत होती, ती मिथ्या ठरली. त्यामुळे मनाचा गोंधळ उडाला व ते एकाएकी संशयसमुद्रात बुडाले. (४२)

**मनास कल्पायाची सवे। मनें कल्पिले तें नव्हे।**
**तेणे गुणें संदेह धावे। मीपणाचेनि पंथे ॥ ४३ ॥**

मनाला सदा कल्पना करीत राहण्याची सवय आहे आणि आत्मवस्तू तर मन जे जे कल्पिते त्याच्या पलीकडील आहे. त्यामुळे मग मीपणा बळावतो आणि मनात अनेक संशय उत्पन्न होतात. (४३)

**तरी तो पथचि मोडावा। मग परमात्मा जोडावा।**
**समूळ संदेह तोडावा। साधुचेनि संगती ॥ ४४ ॥**

म्हणून मीपणाचा मार्गच सोडून द्यावा व साधूंच्या समागमाने सर्व संशय समूळ नष्ट करून परमार्थप्राप्ती करून घ्यावी. (४४)

**मीपण शस्त्रें तुटेना। मीपण फोडितां फुटेना।**
**मीपण सोडितां सुटेना। कांहीं केल्यां ॥ ४५ ॥**

मीपण हे शस्त्राने तुटत नाही. त्याला फोडावे म्हटले तर ते फुटत नाही. त्याला सोडून झटकून टाकावे म्हटले तरी ते काही केल्या सुटत नाही. (४५)

**मीपणें वस्तु नाकळे। मीपणें भक्ति मावळे।**
**मीपणें शक्ति गळे। वैराग्याची ॥ ४६ ॥**

मीपण असते तोपर्यंत आत्मवस्तूची प्राप्ती होत नाही. मीपणाने भक्ती मावळते. मीपणामुळे वैराग्याचे बळ कमी होऊ लागते. (४६)

**मीपणें प्रपंच न घडे। मीपणें परमार्थ बुडे।**
**मीपणें सकळहि उडे। येशकीर्तिप्रताप ॥ ४७ ॥**

एवढेच काय, मीपणामुळे प्रपंचसुद्धा धड होत नाही आणि परमार्थ तर साफच बुडतो. मीपणामुळे माणसाचे यश, कीर्ती, प्रताप सर्व नष्ट होते. (४७)

मीपणें मीत्री तुटे। मीपणें प्रीति आटे।
मीपणें लिगटे। अभिमान आंगीं ॥ ४८ ॥

मीपणाने मैत्री तुटते. प्रीतीला ओहोटी लागते आणि अंगी अभिमान जणू काय चिकटून बसतो. (४८)

मीपणें विकल्प उठे। मीपणें कळह सुटे।
मीपणें संमोह फुटे। ऐक्यतेचा ॥ ४९ ॥

मीपणाने मनात संशय निर्माण होतो, मीपणाने कलह मोकळा सुटतो म्हणजे सर्वांशी भांडण होऊ लागते आणि देह-तादात्म्याचा भ्रम उत्पन्न होतो व ऐक्य भंग पावते. (४९)

मीपण कोणासिच न साहे। तें भगवंती कैसेनि साहे।
म्हणौनि मीपण सांडून राहे। तोचि समाधानी ॥ ५० ॥

मीपणा कुणालाच सहन होत नाही. मग भगवंताला कसा सहन होईल? म्हणून जो मीपणा सोडून निरभिमान वृत्तीने राहतो, तोच समाधानी असतो. (५०)

मीपण कैसें त्यागावें। ब्रह्म कैसें अनुभवावें।
समाधान कैंसे पावावें। कोणा प्रकारें ॥ ५१ ॥

यावर श्रोता प्रश्न करीत आहे की, मीपणाचा त्याग कसा करावा? ब्रह्माचा अनुभव कसा घ्यावा? व कोणत्या प्रकारे समाधान प्राप्त करून घ्यावे? (५१)

मीपण जाणोनि त्यागावें। ब्रह्म होऊन अनुभवावें।
समाधान तें पावावें। निःसंगपणे ॥ ५२ ॥

तो म्हणतो की, मीपण ओळखून त्याचा त्याग करावा आणि ब्रह्म होऊन ब्रह्माचा अनुभव घ्यावा. तसेच निःसंग होऊन समाधान मिळवावे. (५२)

आणीक येक समाधान। मीपणेंविण साधन।
करूं जाणे तोचि धन्य। समाधानी ॥ ५३ ॥

याखेरीजही एक प्रकारचे समाधान आहे. जो कर्तृत्वाहंकारावाचून साधन करण्याची कुशलता प्राप्त करतो, असा जो समाधानी तो खरोखरच धन्य जाणावा. (५३)

मी तों ब्रह्मचि जालों स्वता। साधन कोण करील आतां।
ऐसें मनीं कल्पूं जातां। कल्पनाचि उठे ॥ ५४ ॥

जर मी आता ब्रह्मच झालो आहे, तर आता साधना कोण करील? असे जो मनात आणतो त्याला कल्पनाच घेरून टाकते. (५४)

ब्रह्मीं कल्पना न साहे। तेचि तेथें उभी राहे।
तयेसि शोधून पाहे। तोचि साधु ॥ ५५ ॥

ब्रह्माच्या ठिकाणी कल्पना म्हणजेच द्वैत टिकू शकत नाही. असे असता तेथेच कल्पनेचा शिरकाव झाला तर जो खरोखरच साधू असतो, तो कल्पनेचे मूळ शोधून काढून तिचा समूळ नाश करतो. (५५)

निर्विकल्पासी कल्पावें। परी कल्पिते आपण न व्हावें।
मीपणासि त्यागावें। येणें रिती ॥ ५६ ॥

समर्थ सांगतात की, निर्विकल्पाची कल्पना आपण करावी पण कल्पना करणारा म्हणून आपण वेगळा उरू नये. याप्रमाणे वेगळे न राहता परब्रह्मवस्तूशी ऐक्य झाले की मीपणाचा त्याग आपोआपच घडतो. (५६)

या ब्रह्मविद्येच्या लपणी। कांहींच नसावें असोनी।
दक्ष आणी समाधानी। तोचि हें जाणे ॥ ५७ ॥

या ब्रह्मविद्येतील रहस्य हे आहे की, ज्यास तिची प्राप्ती होते, तो देहात असून नसल्यासारखाच होतो. हे कसे होते ते जो दक्ष म्हणजे सावधही असतो, तोच खरोखर जाणतो. (५७)

जयासी आपण कल्पावें। तेंचि आपण स्वभावें।
येथें कल्पनेच्या नांवें। सुन्य आलें ॥ ५८ ॥

निर्विकल्प अशा ब्रह्माची कल्पना करता करता त्या ब्रह्माशी स्वाभाविकपणे जेव्हा ऐक्य होते, तेव्हा कल्पनाच शिल्लक उरत नाही. (५८)

पदीहून चळों नये। करावें साधन उपाये।
तरीच सांपडे सोये। अलिप्तपणाची ॥ ५९ ॥

याप्रमाणे अद्वैत सिद्ध झाले की, आपल्या भूमिकेवरून खाली घसरू नये. साधन करीतच राहावे म्हणजे त्यायोगे ते करूनही त्यापासून अलिप्त कसे राहावे, ते कळून येते. (५९)

राजा राजपदीं असतां। उगीच चाले सर्व सत्ता।
साध्यचि होऊन तत्वतां। साधन करावें ॥ ६० ॥

राजा आपल्या राजपदी आरूढ झालेला असतो. तो स्वतः काहीच करीत नाही, पण त्याच्या सत्तेने आपोआप सर्व कारभार सुरळीत चालू असतो. तसे आपण ब्रह्मरूप होऊन राहावे आणि कर्तृत्वाहंकार न धरता साधन करीत राहावे. (६०)

**साधन आलें देहाच्यामाथां। आपण देह नव्हे सर्वथा।**
**ऐसा करूनि अकर्ता। सहजचि जाला ॥६१॥**

साधन ही क्रिया आहे. ती देहाच्या द्वारेच घडत असते आणि आपण तर सर्वथा देह नाहीच. त्यामुळेच साधन करूनही आत्मज्ञानी हा सहजच अकर्ताच राहतो. (६१)

**देह आपण ऐसें कल्पावें। तरीच साधन त्यागावें।**
**देहातीत अस्तां स्वभावें। देह कैचां ॥६२॥**

साधन त्यागावे, असा संकल्प देहबुद्धीशिवाय उठू शकत नाही. आपण देहातीत स्वाभाविकपणे आहोत तर मग देहाचा संबंध येतोच कुठे? (६२)

**ना तें साधन ना तें देह। आपला आपण निःसंदेह।**
**देहींच असोन विदेह। स्थिति ऐसी ॥६३॥**

देहाकडून होणारे साधन किंवा देह हे आपल्याशी संबंधित नाही असा निःसंदेह अनुभव आला की त्याच्या ठिकाणी कुठल्याही प्रकारचे संदेह निर्माण होत नाहीत. देहात असून विदेह स्थिती म्हणतात ती अशी असते. (६३)

**साधनेंविण ब्रह्म होतां। लागों पाहे देहममता।**
**आळस प्रबळे तत्वतां। ब्रह्मज्ञानमिसें ॥६४॥**

साधनाशिवाय ब्रह्म झाल्याने म्हणजेच केवळ शब्दज्ञान उत्तम झाल्याने देहाबद्दल आत्मीयता उत्पन्न होऊ लागते आणि आपणास ब्रह्मज्ञान झाले आहे, असे वाटून त्यानिमित्ताने आळस मात्र वाढू लागतो. (६४)

**परमार्थमिसें अर्थ जागे। ध्यानमिसें निद्रा लागे।**
**मुक्तिमिसें दोष भोगे। अनर्गळता ॥६५॥**

परमार्थाच्या निमित्ताने स्वार्थ जागृत होतो, ध्यानाच्या मिषाने झोप येऊ लागते आणि आपण मुक्त आहोत या कल्पनेमुळे स्वच्छंदपणाने तो विषयभोग सेवन करू लागतो व दोषी होतो. (६५)

**निरूपणमिसें निंदा घडे। संवादमिसें वेवाद पडे।**
**उपाधीमिसें येऊन जडे। अभिमान आंगीं ॥६६॥**

निरूपणाच्या निमित्ताने परनिंदा घडते, संवादाच्या मिषाने वितंडवाद घालू लागतो आणि उपाधीच्यायोगे अभिमान अंगी जडतो. (६६)

**तैसा ब्रह्मज्ञानमिसें। आळस अंतरीं प्रवेशे।**
**म्हणे साधनाचें पिसें। काये करावें ॥६७॥**

याप्रकारे ब्रह्मज्ञानाच्या मिषाने अंतरात आळस प्रवेशला की, मी ब्रह्मज्ञानी आहे, आता मी वेड्यासारखे साधन कशासाठी करू? असे तो म्हणू लागतो. (६७)

श्लोक

किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि त्यजामि किम्।
आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा॥

**अर्थ**—महाप्रलयाच्या वेळी जिकडे तिकडे पाणी भरून जाते, त्याचप्रमाणे आत्माही सर्व ठिकाणी भरलेला आहे. मग मी काय करू, कोठे जाऊ, काय घेऊ आणि कशाचा त्याग करू?

**वचन आधारीं लाविलें। जैसें शस्त्र फिराविलें।**
**स्वता हाणोन घेतलें। जयापरी ॥६८॥**

या वचनासारखी वचने तो आपले वागण्याचे समर्थन करण्यास आधार म्हणून देतो. जसे आपल्या शस्त्राने आपण स्वतःला जखमी करून घ्यावे त्याप्रमाणे तो आपला नाश आपणच करून घेत असतो. (६८)

**तैसा उपायाचा अपाये। विपरीतपणें स्वहित जाये।**
**साधन सोडितां होये। मुक्तपणें बद्ध ॥६९॥**

अशा उपायानेच जो स्वतःस अपाय करून घेतो, तो या विपरीत आचरणाने स्वहितास मुकतो. साधन सोडल्याने व तेही मुक्तपणाच्या अभिमानामुळे सोडल्याने तो वास्तविक बद्ध होतो. (६९)

**साधन करितांच सिद्धपण। हातींचें जाईल निघोन।**
**तेणें गुणें साधन। करूंच नावडे ॥७०॥**

त्याला वाटत असते की, आपण सिद्ध असून जर साधन केले तर सिद्धपण हातातून निघून जाईल या विचाराने त्याला साधन करावेसेच वाटत नाही; ते आवडत नाहीसे होते. (७०)

लोक म्हणती हा साधक। हेचि लज्या वाटे येक।
साधन करिती ब्रह्मादिक। हें ठाउकें नाहीं ॥ ७१ ॥

त्याला वाटते की आपण साधना करीत राहिलो, तर लोक आपल्याला साधकच समजतील. सिद्ध मानणार नाहीत. याचीच त्याला फार लाज वाटत असते; पण ब्रह्मादिकही साधन करीतच असतात हे त्याला कळत नाही. (७१)

आतां असो हे अविद्या। अभ्याससारणी विद्या।
अभ्यासें पाविजे अद्या। पूर्ण ब्रह्म ॥ ७२ ॥

हा सर्व अविद्येचा प्रभाव होय. सद्‌विद्या ही अभ्यासाला अनुसरणारी असते आणि आद्य असे जे पूर्ण ब्रह्म त्याची प्राप्ती अभ्यासानेच होते. (७२)

अभ्यास करावा कवण। ऐसा श्रोता करी प्रश्न।
परमार्थाचें साधन। बोलिलें पाहिजे ॥ ७३ ॥

यावर श्रोत्याने प्रश्न विचारला की, परमार्थ साधण्यासाठी कशाचा अभ्यास करावा ते आपण सांगावे. (७३)

याचें उत्तर श्रोतयांसी। दिधलें पुढिले समासीं।
निरोपिलें साधनासी। परमार्थाच्या ॥ ७४ ॥

याचे उत्तर पुढील समासात दिले जाईल. त्यात परमार्थाच्या साधनाचे निरूपण केले जाईल. (७४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'साधनप्रतिष्ठानाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक ७ : समास ८

## श्रवणनिरूपण

॥ श्रीराम ॥

ऐका परमार्थाचें साधन। जेणें होये समाधान।
तें तूं जाण गा श्रवण। निश्चयेंसीं ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आता परमार्थाचे साधन सांगतो, ते ऐका. ज्या साधनाच्या योगे निश्चितपणे समाधान प्राप्त होते ते साधन म्हणजे श्रवण होय, हे तू जाणून घे. (१)

श्रवणें आतुडे भक्ती। श्रवणें उद्भवे विरक्ती।
श्रवणें तुटे आसक्ती। विषयांची ॥ २ ॥

श्रवणाच्या योगे भक्तीची प्राप्ती होते. अंतरात वैराग्य उत्पन्न होते आणि विषयांची आसक्ती नष्ट होते. (२)

श्रवणें घडे चित्तशुद्धी। श्रवणें होये दृढबुद्धी।
श्रवणें तुटे उपाधी। अभिमानाची ॥ ३ ॥

श्रवणामुळे चित्तशुद्धी होते. निश्चयात्मक बुद्धी प्राप्त होते आणि अभिमानाची उपाधी तुटते. (३)

श्रवणें निश्चयो घडे। श्रवणें ममता मोडे।
श्रवणें अंतरीं जडे। समाधान ॥ ४ ॥

श्रवणाने अध्यात्माचा निश्चय होतो. देहासंबंधी ममता नाहीशी होते आणि अंतरांत समाधान टिकून राहाते. (४)

श्रवणें आशंका फिटे। श्रवणें संशय तुटे।
श्रवण होतां पालटे। पूर्वगुण आपुला ॥ ५ ॥

श्रवणाने शंकांचे निरसन होते, संशय नाहीसे होतात आणि मुख्य म्हणजे आपले पूर्वीचे गुण पालटतात.(५)

श्रवणें आवरे मन। श्रवणें घडे समाधान।
श्रवणें तुटे बंधन। देहबुद्धीचें ॥ ६ ॥

श्रवणाने मनोनिग्रह साधू लागतो, समाधान लाभते आणि देहबुद्धीचे बंधन तुटून जाते. (६)

श्रवणें मीपण जाये। श्रवणें धोका न ये।
श्रवणें नाना अपाये। भस्म होती ॥ ७ ॥

श्रवणाने मीपण नाश पावते, अहंकार नष्ट होतो, धोका टळतो व नाना प्रकारचे अपाय भस्मसात होतात. (७)

श्रवणें होये कार्यसिद्धी। श्रवणें लागे समाधी।
श्रवणें घडे सर्व सिद्धी। समाधानासी ॥ ८ ॥

श्रवणाने कार्यसिद्धी होते, समाधी लागते आणि शाश्वत समाधानरूपी सिद्धीची प्राप्ती होते. (८)

**सत्संगावरी श्रवण। तेणें कळे निरूपण।**
**श्रवणें होईजे आपण। तदाकार ॥ ९ ॥**

संतांच्या सान्निध्यात अध्यात्मनिरूपणाचे श्रवण घडले की आपण अर्थाशी एकरूप होतो. (९)

**श्रवणें प्रबोध वाढे। श्रवणें प्रज्ञा चढे।**
**श्रवणें विषयांचे वोढे। तुटोन जाती ॥ १० ॥**

श्रवणाने ज्ञान वाढते, प्रज्ञा जागृत होते आणि मनाची विषयाकडे जी ओढ असते, ती कमी होते. (१०)

**श्रवणें विचार कळे। श्रवणें ज्ञान हें प्रबळे।**
**श्रवणें वस्तु निवळे। साधकासी ॥ ११ ॥**

श्रवणाने सारासार विचार म्हणजे काय हे कळते, त्यामुळे ज्ञानाची वृद्धी होते व अखेर साधकाला आत्मवस्तूची प्राप्ती होते. (११)

**श्रवणें सद्बुद्धि लागे। श्रवणें विवेक जागे।**
**श्रवणें मन हे मागे। भगवंतासी ॥ १२ ॥**

श्रवणाने सद्बुद्धी उत्पन्न होते, विवेक जागृत होतो आणि मन भगवंताची मागणी करू लागते. (१२)

**श्रवणें कुसंग तुटे। श्रवणें काम वोहटे।**
**श्रवणें धोका आटे। येकसरां ॥ १३ ॥**

श्रवणाने कुसंगती सुटते, कामविकार कमी होऊ लागतो आणि त्याचबरोबर धोके कमी होऊ लागतात. (१३)

**श्रवणें मोह नासे। श्रवणें स्फूर्ति प्रकाशे।**
**श्रवणें सद्वस्तु भासे। निश्चयात्मक ॥ १४ ॥**

श्रवणाने मोहाचा नाश होतो, प्रतिभा किंवा काव्यस्फूर्ती प्रकाशू लागते आणि आत्मवस्तूचे निश्चयात्मक ज्ञान होते. (१४)

**श्रवणें होय उत्तम गती। श्रवणें आतुडे शांती।**
**श्रवणें पाविजे निवृत्ती। अचळ पद ॥ १५ ॥**

श्रवणाच्या योगे उत्तम गती मिळते, शांतीचा लाभ होतो आणि वृत्तिरहित परब्रह्माची प्राप्ती होते. (१५)

**श्रवणा ऐसें सार नाहीं। श्रवणें घडे सर्व कांहीं।**
**भवनदीचा प्रवाहीं। तरणोपाव श्रवणें॥ १६ ॥**

श्रवणासारखे सार नाही. श्रवणाने सर्व काही प्राप्त होते. या भवनदीच्या प्रवाहातून तरून जाण्यास श्रवण हाच उपाय आहे. (१६)

**श्रवण भजनाचा आरंभ। श्रवण सर्वीं सर्वारंभ।**
**श्रवणें होये स्वयंभ। सर्व कांहीं ॥ १७ ॥**

नवविधा भक्तीतील भजनाचा आरंभ श्रवणाने होतो. सर्व विद्या, कला आदींचा आरंभ श्रवणानेच होतो. श्रवणाने आपोआपच सर्व काही घडत असते. (१७)

**प्रवृत्ती अथवा निवृत्ती। श्रवणेंविण न घडे प्राप्ती।**
**हे तों सकळांस प्रचिती। प्रत्यक्ष आहे ॥ १८ ॥**

प्रपंच असो वा परमार्थ, श्रवणाशिवाय काहीच प्राप्त होत नाही, या गोष्टीचा अनुभव सर्व लोकांना प्रत्यक्ष येतच असतो. (१८)

**ऐकिल्याविण कळेना। हें ठाउकें आहे जना।**
**याकारणें मूळ प्रेत्ना। श्रवण आधीं ॥ १९ ॥**

कुठलीही गोष्ट ऐकल्याशिवाय कळत नाही, हे सर्व लोकांना माहीतच आहे. त्यामुळे कशासाठीही जे प्रयत्न केले जातात त्यांच्या मुळाशी श्रवण असते. आधी श्रवण घडते मग प्रयत्न केले जातात. (१९)

**जें जन्मीं ऐकिलेंचि नाहीं। तेथें पडिजे संदेहीं।**
**म्हणोनियां दुजें कांहीं। साम्यता न घडे ॥ २० ॥**

ज्याविषयी या जन्मात कधी काही ऐकलेलेच नसते, त्याविषयी मनात संदेह उत्पन्न होतो, म्हणून श्रवणासारखे त्याच्याशी साधर्म्य असणारे दुसरे काहीच नाही. (२०)

**बहुत साधनें पाहातां। श्रवणास न घडे साम्यता।**
**श्रवणेंविण तत्वतां। कार्य न चले ॥ २१ ॥**

अनेक साधनांसंबंधी विचार केला असता श्रवणासारखे सर्वोत्कृष्ट साधन दुसरे नाही हे कळून येते. खरोखरच श्रवणाशिवाय कुठलेही कार्य घडूच शकत नाही. (२१)

**न देखतां दिनकर। पडे अवघा अंधकार।**
**श्रवणेंविण प्रकार। तैसा होये ॥ २२ ॥**

जसा सूर्य उगवला नाही, तर सर्वत्र अंधाराचेच साम्राज्य असते. तसाच प्रकार श्रवणाचा जाणावा. (२२)

**कैसी नवविधा भक्ती। कैसी चतुर्विधा मुक्ती।**
**कैसी आहे सहजस्थिती। हें श्रवणेंविण न कळे॥ २३ ॥**

नवविधा भक्ती कशी करावी, चतुर्विध मुक्ती कुठल्या आहेत, सहजस्थिती कशाला म्हणतात, हे सर्व श्रवणाशिवाय कळत नाही. (२३)

न कळे शड्कर्माचरण। न कळे कैसें पुरश्चरण।
न कळे कैसें उपासन। विधियुक्त ॥ २४॥

षड्विध कर्माचरण म्हणजेच स्नान, संध्या, जप, होम, पठण-पाठण, देवतार्चन व वैश्वदेव कसे करावे, पुरश्चरण म्हणजे काय, तसेच विधियुक्त उपासना कशी करावी वगैरे सर्व गोष्टी श्रवणाशिवाय कळत नाहीत. (२४)

नाना व्रतें नाना दानें। नाना तपें नाना साधनें।
नाना योग तीर्थाटणें। श्रवणेंविण न कळती॥ २५॥

नाना व्रते, नाना दाने, नाना तपे, नाना साधने, नाना प्रकारचे योग, नाना तीर्थाटने यांचे ज्ञान श्रवणाशिवाय होत नाही. (२५)

नाना विद्या पिंडज्ञान। नाना तत्त्वांचे शोधन।
नाना कळा ब्रह्मज्ञान। श्रवणेंविण न कळे॥ २६॥

नाना विद्या, पिंडज्ञान, नाना तत्त्वांचे शोधन, नाना कला, ब्रह्मज्ञान यांपैकी काहीही श्रवणाशिवाय कळत नाही. (२६)

आठराभार वनस्पती। येका जळें प्रबळती।
येका रसें उत्पत्ती। सकळ जीवांची ॥ २७॥

ज्याप्रमाणे अठराभार वनस्पतींची वाढ एका जलामुळेच होते, सर्व जीवांची उत्पत्ती एका रसापासून होते. (२७)

सकळ जीवां येक पृथ्वी। सकळ जीवां येक रवी।
सकळ जीवां वर्तवी। येक वायो ॥ २८॥

सर्व जीवांना आश्रय एकाच पृथ्वीचा असतो, सर्वांना प्रकाश देणारा सूर्यही एकच असतो आणि सर्व प्राण्यांचे चलनवलन करविणारा वायूही एकच असतो. (२८)

सकळ जीवां येक पैस। जयास बोलिजे आकाश।
सकळ जीवांचा वास। येका परब्रह्मीं ॥ २९॥

सर्व जीवांना एकाच आकाशात अवकाश मिळतो व सर्व जीवांचा वास एकाच परब्रह्माच्या ठिकाणी असतो. (२९)

तैसें सकळ जीवांस मिळोन। सार येकचि साधन।
तें हें जाण श्रवण। प्राणीमात्रांसी ॥ ३०॥

त्याप्रमाणे सर्व जीवांना मिळून सारभूत असे एकच साधन म्हणजे श्रवण हेच सर्व प्राणिमात्रांचे कल्याण करणारे आहे. (३०)

नाना देश भाषा मतें। भूमंडळीं असंख्यातें।
सर्वांस श्रवणापरतें। साधनचि नाही ॥ ३१॥

पृथ्वीच्या पाठीवर नाना देश आहेत, अनेक भाषा आहेत, असंख्य मते आहेत पण सर्वोपयोगी असे श्रवणासारखे दुसरे साधनच नाही. (३१)

श्रवणें घडे उपरती। बद्धाचे मुमुक्ष होती।
मुमुक्षाचे साधक अती। नेमेंसिं चालती ॥ ३२॥

श्रवणाने उपरती होते व बद्ध असतात ते मुमुक्षू होतात. मुमुक्षू असतात ते अत्यंत नेमनिष्ठ साधक बनतात. (३२)

साधकाचे होती सिद्ध। आंगीं बाणतां प्रबोध।
हें तों आहे प्रसिद्ध। सकळांस ठाउकें ॥ ३३॥

जे साधक असतात, त्यांच्याठिकाणी प्रबोध बाणतो म्हणजे निश्चयात्मक ज्ञानाची त्यांना प्राप्ती होऊन ते सिद्ध होतात. हे तर सर्व लोकांत प्रसिद्धच आहे. (३३)

ठाईंचे खळ चांडाळ। तेचि होती पुण्यसिळ।
ऐसा गुण तत्काळ। श्रवणाचा ॥ ३४॥

अत्यंत दुष्ट दुर्जन चांडाळ जरी असले तरी श्रवणाच्या योगे ते पुण्यशील होतात, असा हा श्रवणाचा शीघ्र फलदायी गुण आहे. (३४)

जो दुर्बुद्धि दुरात्मा। तोचि होये पुण्यात्मा।
अगाध श्रवणाचा महिमा। बोलिला न वचे ॥ ३५॥

जो दुर्बुद्धी दुरात्मा असतो, तोच श्रवणाने पुण्यात्मा होतो. असा हा श्रवणाचा अगाध महिमा आहे. त्याचे यथार्थ वर्णन करताच येत नाही. (३५)

तीर्थांव्रतांची फळश्रुती। पुढें होणार सांगती।
तैसें नव्हे हातीचा हातीं। सप्रचित श्रवण ॥ ३६॥

तीर्थयात्रा, व्रते वगैरेंची फलश्रुती भविष्यकाळात फल देणारी असते पण श्रवणाचे तसे नाही, त्याचे फळ हातोहात मिळते. ही अनुभवाची गोष्ट आहे. (३६)

नाना रोग नाना व्याधी। तत्काळ तोडिजे औषधी।
तैसी आहे श्रवणसिद्धी। अनुभवी जाणती॥ ३७॥

नाना रोग, नाना व्याधी असल्या तरी काही रामबाण औषधे अशी असतात की त्या रोगांचा व्याधींचा तत्काळ नाश होतो. श्रवणाची कार्यसिद्धीसुद्धा अशीच तत्काळ फल देणारी आहे हे अनुभवी लोक जाणतात. (३७)

**श्रवणाचा विचार कळे। तरीच भाग्यश्री प्रगटे बळें।**
**मुख्य परमात्माच आकळे। स्वानुभवासी ॥ ३८ ॥**

श्रवणातील विचारांचे नीट आकलन झाले, तरच तत्काळ भाग्य उदयास येते आणि मुख्य परमात्माच स्वानुभवाच्या योगे प्राप्त होतो. (३८)

**या नाव जाणावें मनन। अर्थाल्रगीं सावधान।**
**निजध्यासें समाधान। होत असे ॥ ३९ ॥**

श्रवणाचा विचार कळणे, सावधपणे अर्थ समजून घेणे, त्याचे वारंवार चिंतन करणे यास मनन म्हणतात. त्याचेच सतत अनुसंधान ठेवणे यास निदिध्यास म्हणतात व त्यायोगेच समाधान लाभते. (३९)

**बोलिल्याचा अर्थ कळे। तरीच समाधान निवळे।**
**अकस्मात अंतरीं वोळे। निःसंदेहता ॥ ४० ॥**

वक्ता जे बोलतो, त्याचा अर्थ जर कळला तरच समाधान मिळते व सतत अनुसंधान करण्याने अकस्मात अंतरात निश्चयात्मक स्व-स्वरूपानुभव येऊन निःसंदेहता प्राप्त होते. (४०)

**संदेह जन्माचें मूळ। तें श्रवणें होये निर्मूळ।**
**पुढें सहजचि प्रांजळ। समाधान ॥ ४१ ॥**

संदेहामुळे वारंवार जन्म घ्यावा लागतो. तो संदेह श्रवणाने मुळासकट नष्ट होतो आणि त्यामुळे पुढे अगदी सहजच प्रांजळ समाधान लाभते. (४१)

**जेथें नाहीं श्रवण मनन। तेथें कैचें समाधान।**
**मुक्तपणाचें बंधन। जडलें पाईं ॥ ४२ ॥**

जेथे श्रवण, मनन नसते तेथे समाधान कसे टिकून राहणार? 'मी मुक्त झालो' या अभिमानामुळे श्रवण, मनन केले नाही, तर मुक्तपणाच्या अभिमानामुळे तो बद्ध होतो. (४२)

**मुमुक्ष साधक अथवा सिद्ध। श्रवणेंविण तो अबद्ध।**
**श्रवणमननें शुद्ध। चित्तवृत्ति होये ॥ ४३ ॥**

मुमुक्षू असो, साधक असो वा सिद्ध असो, श्रवण, मननाशिवाय तो अबद्धच जाणावा. श्रवण, मननानेच चित्तवृत्ती शुद्ध होते. (४३)

**जेथें नाहीं नित्य श्रवण। तें जाणावें विलक्षण।**
**तेथें साधकें येक क्षण। क्रमूं नये सर्वथा ॥ ४४ ॥**

ज्या ठिकाणी नित्य अध्यात्माचे श्रवण होत नसेल, ते विपरीत जाणून साधकाने तेथे खरोखर एक क्षणभरही थांबू नये. (४४)

**जेथें नाहीं श्रवणस्वार्थ। तेथें कैंचा हो परमार्थ।**
**मागें केलें तितुकें वेर्थ। श्रवणेंविण होये ॥ ४५ ॥**

जेथे श्रवणरूपी स्वार्थ साधला जात नाही तेथे परमार्थ तरी कुठला साध्य होणार? पूर्वी जे काही साधन केले असेल तेही श्रवणाशिवाय व्यर्थ होते. (४५)

**तस्मात् श्रवण करावें। साधन मनीं धरावें।**
**नित्यनेमें तरावें। संसारसागरीं ॥ ४६ ॥**

म्हणून नित्यनेमाने श्रवणरूपी साधन मनापासून करीत राहावे म्हणजे सहजपणे संसारसागरातून तरून जाता येते. (४६)

**सेविलेंच सेवावें अन्न। घेतलेंचि घ्यावें जीवन।**
**तैसें श्रवणमनन। केलेंचि करावें ॥ ४७ ॥**

ज्याप्रमाणे वारंवार अन्नसेवन करावेच लागते, किंवा पाणी वरचेवर प्यावेच लागते, त्याप्रमाणे श्रवण हे परमार्थास अत्यंत आवश्यक असल्याने श्रवण-मनन सोडूच नये. (४७)

**श्रवणाचा अनादर। आळसें करी जो नर।**
**त्याचा होय अपहार। स्वहितविषईं ॥ ४८ ॥**

जो कोणी मनुष्य आळसाने श्रवणाचा अनादर करतो तो स्वहितास मुकतो. (४८)

**आळसाचें संरक्षण। परमार्थाची बुडवण।**
**याकारणें श्रवण। केलेंचि पाहिजे ॥ ४९ ॥**

त्याच्या आळसाचे संरक्षण होते आणि परमार्थाची बुडवणूक होते. म्हणून असे होऊ नये, यासाठी श्रवण केलेच पाहिजे. (४९)

**आतां श्रवण कैसें करावें। कोणया पंथास पाहावें।**
**पुढिले समासीं आघवें। सांगिजेल ॥ ५० ॥**

आता पुढील समासात श्रवण कसे करावे, कोणते ग्रंथ पाहावेत, हे सर्व सांगितले जाईल. (५०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रवणनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ७ : समास ९

# श्रवणनिरूपण

॥ श्रीराम ॥

आतां श्रवण कैसें करावें। तेंहि सांगिजेल अघवें।
श्रोतां अवधान द्यावें। येकचित्तें ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आता श्रवण कसे करावे ते सर्व सांगतो. श्रोत्यांनी एकाग्र चित्त करून अवधान द्यावे. (१)

येक वगतृत्व श्रवणीं पडे। तेणें जालें समाधान मोडे।
केला निश्चय विघडे। अकस्मात ॥ २ ॥

एखाद्याचे वक्तृत्व असे असते की, ते कानावर पडताच मनाचे असलेले समाधान नष्ट होते. अध्यात्माविषयी केलेला निश्चय एकाएकी डळमळू लागतो. (२)

तें वगतृत्व त्यागावें। जें माईक स्वभावें।
जेथें निश्चयाचा नांवें। सुन्याकार ॥ ३ ॥

जे वक्तृत्व निश्चयाच्या नावाने शून्याकार असते व स्वाभाविकपणे मायिक असते ते ऐकूच नये. (३)

येक्या ग्रंथें निश्चय केला। तो दुजयानें उडविला।
तेणें संशयोचि वाढला। जन्मवरी ॥ ४ ॥

एका ग्रंथाच्या श्रवणाने अध्यात्मासंबंधी निश्चय झाला होता. तो दुसऱ्या ग्रंथाच्या श्रवणाने उडवून लावला. त्यामुळे जन्मभर संशयच वाढत राहिला. (४)

जेथें संशय तुटती। होये आशंकानिवृत्ती।
अद्वैत ग्रंथ परमार्थी। श्रवण करावे ॥ ५ ॥

जे श्रवण केले असता सर्व संशय नाहीसे होतात, मनातील शंकांचे निरसन होते ते परमार्थाचे ज्ञान करून देणारे अद्वैत ग्रंथ श्रवण करावेत. (५)

जो मोक्षाचा अधिकारी। तो परमार्थपंथ धरी।
प्रीति लागली अंतरीं। अद्वैतग्रंथाची ॥ ६ ॥

ज्याने परमार्थाची वाट धरली आहे, जो मोक्षाचा अधिकारी आहे, त्याने अद्वैत ग्रंथ ऐकावेत. तेच त्याला आवडतात. (६)

जेणें सांडिला इहलोक। जो परलोकींचा साधक।
तेणें पाहावा विवेक। अद्वैतशास्त्रीं ॥ ७ ॥

ज्याने इहलोकाची आसक्ती सोडली आहे, जो उत्तम गती प्राप्त व्हावी म्हणून साधक बनला आहे, त्याने अद्वैत शास्त्रातील विवेक जाणून घ्यावा. (७)

जयास पाहिजे अद्वैत। तयापुढें ठेवितां द्वैत।
तेणें क्षोभलें उठे चित्त। तया श्रोतयाचें ॥ ८ ॥

ज्याला अद्वैतमत रुचत असेल, त्या श्रोत्यापुढे द्वैताचे प्रतिपादन केले तरी त्यामुळे त्याचे चित्त क्षोभते. (८)

आवडीसारिखें मिळे। तेणें सुखचि उचंबळे।
नाहीं तरी कंटाळे। मानस ऐकतां ॥ ९ ॥

ज्याला ज्याची आवड असेल ते ऐकायला मिळाले की श्रोत्याच्या अंत:करणात सुख उचंबळून येते. नाहीतर जे आवडत नाही ते श्रवण करायची वेळ आली की, त्याचे मन कंटाळते. (९)

ज्याची उपासना जैसी। त्यासी प्रीति वाटे तैसी।
तेथें वर्णितां दुजयासी। प्रशस्त न वटे ॥ १० ॥

ज्याची जी उपासना असेल त्या देवतेबद्दल त्याला प्रेम वाटते. तेथे त्याला दुसऱ्या देवतेचे वर्णन ऐकायला लागले, तर त्याला ते प्रशस्त वाटत नाही. (१०)

प्रीतीचें लक्षण ऐसें। अंतरीं उठे अनायासें।
पाणी पाणवाटें जैसें। आपणचि धांवे ॥ ११ ॥

पाणी उताराकडे सहज धावते, तसे ज्याचे ज्याच्यावर स्वाभाविक प्रेम असते, त्याच्याबद्दल त्याच्या अंतर्यामी आपोआपच ओढ उत्पन्न होते. त्याचे मन तिकडे आपोआप धावते. (११)

तैसा जो आत्मज्ञानी नर। तयास नावडे इतर।
तेथें पाहिजे सारासार। विचारणा ते ॥ १२ ॥

त्याप्रमाणे जो आत्मज्ञानी पुरुष असेल त्यास ज्यात सारासार विवेकासंबंधी विवेचन असते तेच ग्रंथ आवडतात. दुसरे ग्रंथ त्याला आवडत नाहीत. (१२)

जेथें कुळदेव्या भगवती। तेथें पाहिजे सप्तशती।
इतर देवांची स्तुती। कामा न ये सर्वथा ॥ १३ ॥

ज्या घरी भगवती कुलदेवता असेल तेथे सप्तशतीच हवी. तेथे इतर देवांची स्तुती असलेले ग्रंथ कामास येत नाहीत. (१३)

घेतां अनंताच्या व्रता। तेथें नलगे भगवद्गीता।
साधुजनासी वार्ता। फळाशेची नाहीं ॥ १४॥

जेथे अनंताचे व्रत घेतलेले असेल तेथे निष्काम कर्मयोगाचे प्रतिपादन करणारी भगवद्गीता सांगून काय उपयोग? ज्यांना फलाशा नसते त्या साधूंनाच भगवद्गीतेचे महत्त्व कळणार. (१४)

वीरकंकण घालितां नाकीं। परीं तें शोभा पावेना कीं।
जेथील तेथें आणिकीं। कामा न ये सर्वथा॥ १५॥

वीरकंकण जर नाकात घातले तर ते कसे शोभून दिसणार? वीर पुरुषाच्या हातावरच ते शोभून दिसते. जी वस्तू जेथे योग्य असते, तेथेच ती शोभून दिसते.(१५)

नाना माहात्में बोलिलीं। जेथील तेथें वंद्य जालीं।
विपरीत करून वाचिलीं। तरी तें विलक्षण ॥ १६॥

अनेक देव-देवतांची स्तुतिस्तोत्रे गाणारी अनेक माहात्म्ये आहेत. ज्याची जी उपासना असेल तेथे तेथे त्या देवतेचे गुणवर्णन करणारा ग्रंथ वंद्य ठरतो. याउलट केले तर ते अयोग्य ठरते. (१६)

मल्लारमाहात्म द्वारकेसी। द्वारकामाहात्म नेलें कासीं।
कासीमाहात्म वेंकटसीं। शोभा न पवे ॥ १७॥

जसे मल्हारी माहात्म्य द्वारकेत वाचले आणि द्वारका माहात्म्य काशीला नेले आणि काशी माहात्म्य व्यंकटेशाच्या क्षेत्री वाचू लागल्यास शोभून दिसत नाही. (१७)

ऐसें सांगतां असे वाड। परी जेथील तेथेंचि गोड।
तैसी ज्ञानीयांस चाड। अद्वैत ग्रंथाची ॥ १८॥

असे वर्णन करून सांगायचे म्हटले तर पुष्कळच सांगता येईल, पण जेथले तेथेच गोड असते. त्याप्रमाणे आत्मज्ञानी लोकांना अद्वैत ग्रंथांचे महत्त्व वाटते.(१८)

योगीयांपुढें राहाण। परीक्षवंतांपुढें पाषाण।
पंडितांपुढें डफगाण। शोभा न पवे ॥ १९॥

समजा, एखाद्या योग्यापुढे एखाद्याच्या अंगात दैवत आणून त्याला बोलायला लावले किंवा जो रत्नपारखी आहे त्याच्यापुढे दगड आणून ठेवला किंवा एखाद्या पंडितापुढे पोवाडे कुणी गाऊ लागले, तर ते शोभून दिसत नाही.(१९)

वेदज्ञापुढें जती। निस्पृहापुढें फळश्रुती।
ज्ञानीयांपुढें पोथी। कोकशास्त्राची ॥ २०॥

वेदज्ञ माणसापुढे संन्यासी, निःस्पृहांपुढे सकाम ग्रंथांची फलश्रुती किंवा आत्मज्ञानी माणसापुढे कामशास्त्राची पोथी शोभत नाही. (२०)

ब्रह्मचर्यापुढें नाचणी। रासक्रीडा निरूपणीं।
राजहंसापुढें पाणी। ठेविलें जैसें ॥ २१॥

ब्रह्मचाऱ्यापुढे नर्तकी, अध्यात्मग्रंथांचे निरूपण चालले असता तेथे रासक्रीडेचे वर्णन अथवा राजहंसापुढे नुसतेच पाणी आणून ठेवले तर ते शोभून दिसत नाही.(२१)

तैसें अंतर्निष्ठांपुढें। ठेविलें शृंघारिक टिपडें।
तेणें त्याचें कैसें घडे। समाधान ॥ २२॥

तसे जो अंतर्निष्ठ आहे, त्याच्यापुढे शृंगारिक चोपडे कुणी आणून ठेवले, तर त्याने त्याचे समाधान कसे होईल? (२२)

रायास रंकाची आशा। तक्र सांगणें पीयूषा।
संन्याशासी वोवसा। उचिष्ट चांडाळी ॥ २३॥

एखाद्या रंकाला ज्या वस्तूची आशा असते, त्याच वस्तूची आशा एखाद्या राजाला दाखवावी तर ते योग्य नव्हे. तसेच अमृतासमोर ताकाची प्रशंसा करणे किंवा एखाद्या संन्याशापुढे उच्छिष्ट चांडाळीच्या मंत्राचे अनुष्ठान करणे अयोग्य ठरते. (२३)

कर्मनिष्ठां वशीकर्ण। पंचाक्षरी निरूपण।
तेथें भंगे अंतःकर्ण। सहजचि त्याचें ॥ २४॥

जो कर्मनिष्ठ आहे त्याच्यापुढे वशीकरणाचा ग्रंथ ठेवला अथवा ज्योतिषी असतो त्याच्यापुढे अध्यात्माचे निरूपण केले, तर साहजिकच ते नाराज होतात. (२४)

तैसे परमार्थिक जन। तयांस नस्तां आत्मज्ञान।
ग्रंथ वाचिता समाधान। होणार नाहीं ॥ २५॥

त्याप्रमाणे जे परमार्थाची आवड असणारे लोक आहेत, त्यांच्यापुढे ज्यात आत्मज्ञानाचे निरूपण नाही, असे ग्रंथ वाचले असता त्यांना समाधान होणार नाही. (२५)

आतां असो हें बोलणें। जयासि स्वहित करणें।
तेणें सदा विचरणें। अद्वैतग्रंथीं ॥ २६ ॥

असो. आता हे बोलणे पुरे झाले. ज्याला स्वहित साधून घ्यावयाचे असेल, त्याने नेहमी अद्वैत ग्रंथांचाच अभ्यास करावा. (२६)

आत्मज्ञानी येकचित्त। तेणें पाहाणें अद्वैत।
येकांत स्थळीं निवांत। समाधान ॥ २७ ॥

जो आत्मज्ञानाचा इच्छुक असेल त्याने एकांत स्थळी जाऊन मन एकाग्र करून अद्वैत ग्रंथांचे वाचन, मनन आदी करावे, म्हणजे त्याला निश्चितपणे समाधान प्राप्त होईल. (२७)

बहुत प्रकारें पाहातां। ग्रंथ नाहीं अद्वैतापरता।
परमार्थास तत्वतां। तारूंच कीं ॥ २८ ॥

याप्रमाणे अनेक दृष्टींनी विचार केला असता, अद्वैतासारखा श्रेष्ठ ग्रंथ दुसरा नाही, असे म्हणावे लागते. परमार्थ करणाऱ्याला भवसागरातून तारून नेणारी ती जणू नावच आहे. (२८)

इतर जे प्रपंचिक। हास्य विनोद नवरसिक।
हित नव्हे तें पुस्तक। परमार्थासी ॥ २९ ॥

इतर जे प्रापंचिक ग्रंथ आहेत, ज्यात हास्यविनोद वगैरे आहेत, तसेच शृंगारादी नवरसांनी जे परिपूर्ण आहेत ते ग्रंथ परमार्थी माणसाला हितकारक नाहीत. (२९)

जेणें परमार्थ वाढे। आंगीं अनुताप चढे।
भक्तीसाधन आवडे। त्या नांव ग्रंथ ॥ ३० ॥

ज्या ग्रंथांच्या योगे परमार्थात वाढ होते, अंत:करणात पश्चात्ताप होतो व भगवंताची भक्ती करण्याची आवड उत्पन्न होते, त्याला ग्रंथ म्हणावे. (३०)

जो ऐकतांच गर्व गळे। कां ते भ्रांतीच मावळे।
नातरी येकसरें वोळे। मन भगवंतीं ॥ ३१ ॥

जो ग्रंथ श्रवण करताच देहाभिमान नष्ट होतो, अज्ञान व विपरीत ज्ञानरूपी भ्रांती नष्ट होते अथवा मन एकाएकी भगवंताकडे ओढ घेऊ लागते. (३१)

जेणें होये उपरती। अवगुण पालटती।
जेणें चुके अधोगती। त्या नांव ग्रंथ ॥ ३२ ॥

ज्याच्या श्रवणाने उपरती होते, अवगुण पालटतात आणि त्यामुळे अधोगती चुकते त्याला ग्रंथ म्हणावे. (३२)

जेणें धारिष्ट चढे। जेणें परोपकार घडे।
जेणें विषयवासना मोडे। त्या नांव ग्रंथ ॥ ३३ ॥

ज्या ग्रंथाच्या श्रवणाने अंगी धारिष्ट्य उत्पन्न होते, हातून परोपकार घडू लागतो आणि विषयवासना नष्ट होते, तोच खरोखर ग्रंथ म्हणावा. (३३)

जेणें परत्रसाधन। जेणें ग्रंथें होये ज्ञान।
जेणें होईजे पावन। या नांव ग्रंथ ॥ ३४ ॥

ज्याच्या श्रवणाने परत्र साधन घडते, आत्मज्ञान होते व साधक पवित्र होतो, त्यास ग्रंथ म्हणतात. (३४)

ग्रंथ बहुत असती। नाना विधानें फळश्रुती।
जेथें नुपजे विरक्ती भक्ती। तो ग्रंथचि नव्हे ॥ ३५ ॥

तसे ग्रंथ अनेक असतात, त्यात अनेक विधिविधाने सांगून फलश्रुतींचे वर्णनही केलेले असते. पण ज्याच्या श्रवणाने विरक्ती वा भक्ती उत्पन्न होत नाही, तो ग्रंथच नव्हे. (३५)

मोक्षेंविण फळश्रुती। ते दुराशेची पोथी।
ऐकतां ऐकतां पुढती। दुराशाचि वाढे ॥ ३६ ॥

ज्या ग्रंथात मोक्षाशिवाय अन्य फलश्रुती दिलेल्या असतात, त्या पोथ्या म्हणजे दुराशेच्याच पोथ्या समजाव्यात. जसजसे त्यांचे श्रवण घडत जाते, तसतशी मनात दुराशाच वाढू लागते. (३६)

श्रवणीं लोभ उपजेल जेथें। विवेक कैंचा असेल तेथें।
बैसलीं दुराशेचीं भूतें। तया अधोगती ॥ ३७ ॥

ज्या ग्रंथांच्या श्रवणाने लोभ वाढू लागतो तेथे सारासारविवेक कसा उत्पन्न होणार? ते ग्रंथ ऐकून दुराशेची भुते मानगुटीवर बसतात व त्यामुळे अधोगती मात्र होते. (३७)

ऐकोनिच फळश्रुती। पुढें तरि पावोन म्हणती।
तयां जन्म अधोगती। सहजचि जाली ॥ ३८ ॥

फलश्रुती ऐकून या जन्मी नाहीतर पुढील जन्मी तरी हे फळ मिळेल असे जे म्हणतात, त्यांना आपोआपच परत जन्म घ्यावाच लागतो व अशा प्रकारे त्यांची अधोगतीच होते. (३८)

**नाना फळें पक्षी खाती। तेणेंचि तयां होये तृप्ति।**
**परी त्या चकोराचे चित्तीं। अमृत वसे ॥ ३९॥**

निरनिराळे पक्षी असतात, ते नाना प्रकारची फळे खातात व त्यामुळे त्यांची तृप्ती होते, पण एक चकोर पक्षी असा आहे की, तो इतर कशाची आशाच करीत नाही. त्याच्या चित्तात सदैव चंद्रामृताचा ध्यास असतो. (३९)

**तैसें संसारी मनुष्य। पाहे संसाराची वास।**
**परी ते भगवंताचे अंश। भगवंतचि इछिती॥ ४०॥**

त्याप्रमाणे संसारी माणसे संसाराचीच सोय पाहतात, तो सुखाचा कसा होईल, याचीच त्यांना उत्कंठा असते, पण जे भगवंताचे अंश म्हणजेच भक्त असतात, ते भगवंताचीच इच्छा धरतात. भगवंताची प्राप्ती कशी होईल, हाच एक ध्यास त्यांना लागलेला असतो.(४०)

**ज्ञानियास पाहिजे ज्ञान। भजकास पाहिजे भजन।**
**साधकास पाहिजे साधन। इछेसारिखें ॥ ४१॥**

ज्ञानी माणसाला ज्ञानच हवे असते, भजकाला म्हणजे भक्ताला भजन हवे असते आणि साधकाला इच्छेसारखे साधन हवे असते. (४१)

**परमार्थ्यास परमार्थ। स्वार्थ्यास पाहिजे स्वार्थ।**
**कृपणास पाहिजे अर्थ। मनापासुनी ॥ ४२॥**

ज्यास परमार्थाची आवड असते, म्हणजेच जो परमार्थी असतो त्याला परमार्थ हवा असतो. स्वार्थी असेल त्याला आपला स्वार्थ कसा साधेल हीच एक चिंता असते, तर जो कंजूष मनुष्य असेल, त्याला मनापासून द्रव्याचीच अपेक्षा असते. (४२)

**योगियांस पाहिजे योग। भोगियांस पाहिजे भोग।**
**रोगियांस पाहिजे रोग-। हर्ति मात्रा ॥ ४३॥**

योगी मनुष्यास योगच हवा असतो, भोगी माणसांना भोगच हवे असतात, तर रोगी माणसांना रोग हरण करणारी औषधी हवी असते. (४३)

**कवीस पाहिजे प्रबंद। तार्किकांस तर्कवाद।**
**भाविकांस संवाद। गोड वाटे ॥ ४४॥**

जे कवी असतील त्यांना प्रबंध आवडतात, तार्किक माणसास तर्कवाद करावयास हवा असतो. भाविकांना भगवत् चरित्रातील सुखसंवाद गोड वाटतो. (४४)

**पंडितांस पाहिजे वित्पत्ती। विद्वांसास अधेनप्रीती।**
**कळावंता आवडती। नाना कळा ॥ ४५॥**

पंडित लोकांना व्युत्पत्तीची गोडी असते, विद्वानांना अध्ययनाची प्रीती असते, तर कलावंतांना नाना कला आवडतात. (४५)

**हरिदासां आवडे कीर्तन। सुचिस्मंतां संध्यास्नान।**
**कर्मनिष्ठां विधिविधान। पाहिजे तें ॥ ४६॥**

हरिदासांना कीर्तन आवडते. धार्मिक लोकांना संध्यास्नान आवडते, तर कर्मनिष्ठांना वैदिक अनुष्ठान पाहिजे असते. (४६)

**प्रेमळांस पाहिजे करुणा। दक्षता पाहिजे विचक्षणां।**
**चातुर्य पाहे शाहाणा। आदरेंसीं ॥ ४७॥**

प्रेमळ लोकांना करुणा हवी असते, विचारवंतांना दक्षता हवी असते तर शहाण्या माणसांना चातुर्याबद्दल आदर असतो. (४७)

**भक्त पाहे मूर्तिध्यान। संगीत पाहे ताळज्ञान।**
**रागज्ञानी तानमान। मूर्छना पाहे ॥ ४८॥**

भक्ताला मूर्तिध्यान आवडते. संगीतज्ञ असेल तो तालज्ञानाकडे लक्ष देतो, तर रागज्ञानी असेल तो तानमान, मूर्छना आदींकडे लक्ष देतो. (४८)

**योगाभ्यासी पिंडज्ञान। तत्वज्ञासि तत्वज्ञान।**
**नाडिज्ञानी मात्राज्ञान। पाहातुसे ॥ ४९॥**

योगाभ्यासी पिंडज्ञानाचा विचार करतात, तत्त्वज्ञ तत्त्वज्ञानासंबंधी विचार करतात, तर नाडीज्ञानी असतात ते औषधी मात्रांचे ज्ञान जाणून घेतात. (४९)

**कामिक पाहे कोकशास्त्र। चेटकी पाहे चेटकमंत्र।**
**यंत्री पाहे नाना यंत्र। आदरेंसीं ॥ ५०॥**

जो कामी मनुष्य असेल, तो कामशास्त्र पाहतो. जो चेटूक करणारा असेल तो चेटकमंत्राकडे लक्ष देतो, तर यंत्री असेल तो आदराने नाना यंत्रांचा अभ्यास करतो. (५०)

टवाळां आवडे विनोद। उन्मत्तास नाना छंद।
तामसास अप्रमाद। गोड वाटे ॥५१॥

टवाळखोर लोकांना विनोद आवडतो. उन्मत्त असेल तो नाना छंद करतो, तर तामस माणसाला अमर्याद मस्तीच गोड वाटते. (५१)

मूर्ख होये नादलुब्धी। निंदक पाहे उणी संधी।
पापी पाहे पापबुद्धि। लाऊन आंगीं ॥५२॥

मूर्ख असेल तो नादावर लुब्ध होतो, जो निंदक असतो तो लोकांचे उणे काढण्याची संधी शोधत असतो व पापी असेल तो अंगी पापबुद्धी लावून घेत असतो. (५२)

येकां पाहिजे रसाळ। येकां पाहिजे पाल्हाळ।
येकां पाहिजे केवळ। साबडी भक्ती ॥५३॥

एखाद्याला रसाळ ग्रंथ आवडतो, कुणा एखाद्याला पाल्हाळ पाहिजे असतो तर कुणाला केवळ भोळी भक्ती हवी असते. (५३)

आगमी पाहे आगम। शूर पाहे संग्राम।
येक पाहाती नाना धर्म। इछेसारिखे ॥५४॥

तांत्रिक असतात ते तंत्रशास्त्र पाहतात. शूर असतात त्यांना युद्ध हवे असते तर कुणी इच्छेप्रमाणे नाना धर्मांचा अभ्यास करतात. (५४)

मुक्त पाहे मुक्तलीळा। सर्व पाहे सर्व कळा।
जोतिषी भविष्य पिंगळा। वर्णूं पाहे ॥५५॥

मुक्त असेल त्याला मुक्तावस्थेबद्दल औत्सुक्य असते. सर्वज्ञ असेल तो कौतुकाने सर्व कलांचे निरीक्षण करतो, तर ज्योतिषी असेल तो पिंगळा पक्ष्याच्या आवाजावरून भविष्य सांगण्याचा प्रयत्न करीत असतो. (५५)

ऐसें सांगावें ते किती। आवडीसारिखें ऐकती।
नाना पुस्तकें वाचिती। सर्वकाळ ॥५६॥

असे किती म्हणून वर्णन करावे? ज्याला जे आवडते, ते तो श्रवण करतो आणि सर्वदा नाना पुस्तके वाचत असतो. (५६)

परी परत्र साधनेंविण। म्हणों नये तें श्रवण।
जेथें नाहीं आत्मज्ञान। तया नांव कर्मणा ॥५७॥

पण ज्या ग्रंथात आत्मज्ञान नसेल ते ग्रंथ ऐकणे म्हणजे श्रवण नव्हे. ती केवळ करमणूकच होय. (५७)

गोडीविण गोडपण। नाकेंविण सुलक्षण।
ज्ञानेंविण निरूपण। बोलोंचि नये ॥५८॥

ज्यात गोडी नाही त्या वस्तूला गोड कसे म्हणावे? ज्याला नाकच नसेल त्याला सुलक्षणी कसे म्हणता येईल? तसे ज्यात आत्मज्ञानासंबंधी विचार नसेल त्यास निरूपण म्हणूच नये. (५८)

आतां असो हें बहुत। ऐकावा परमार्थग्रंथ।
परमार्थग्रंथेंविण वेर्थ। गथागोवी ॥५९॥

आता हे बोलणे खूप झाले. थोडक्यात सार हे आहे की, परमार्थ ग्रंथाचेच श्रवण करावे. परमार्थ ग्रंथाशिवायचे इतर ग्रंथ निरुपयोगीच होत. (५९)

म्हणोनि नित्यानित्यविचार। जेथें बोलिला सारासार।
तोचि ग्रंथ पैलपार। पाववी विवेकें ॥६०॥

म्हणून ज्या ग्रंथात नित्यानित्यविचार, सारासारविवेक यांचे निरूपण आहे, तेच ग्रंथ श्रवण करावेत, म्हणजे विवेक प्राप्त होऊन पैलपार जाता येते. (६०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रवणनिरूपणनाम' समास नववा समाप्त.**



## दशक ७ : समास १०
# देहांतनिरूपण

॥ श्रीराम ॥

**मिथ्या तेंचि जालें सत्य। सत्य तेंचि जालें असत्य।**
**मायाविभ्रमाचें कृत्य। ऐसें असे पाहातां ॥ १ ॥**

जी दृश्य सृष्टी वास्तविक मिथ्या आहे, ती आपल्याला सत्य वाटते, जे परब्रह्म सत्य आहे ते आपल्याला असत्य वाटते हे सर्व मायेमुळे जो विशेष भ्रम उत्पन्न होतो, त्यामुळे घडून येते. (१)

**सत्य कळाया कारणें। बोलिलीं नाना निरूपणें।**
**तरी उठेना धरणें। असत्याचें ॥ २ ॥**

सत्य अशा ब्रह्मस्वरूपाचे ज्ञान व्हावे म्हणून नाना निरूपणे, निरनिराळे उपाय सांगतात तरीही असत्य मायेचे धरणे काही उठत नाही. (२)

**असत्य अंतरीं बिंबलें। न सांगतां तें दृढ जालें।**
**सत्य असोन हारपलें। जेथील तेथें ॥ ३ ॥**

असत्य असून 'मी देह' ही देहाहंता आणि दृश्य सृष्टीच सत्य आहे हा निश्चय अंतरात दृढ ठसलेला आहे. तो आपोआप जन्मल्यापासून अनेक जन्मांच्या संस्कारांमुळे उत्पन्न झालेला असतो आणि परब्रह्म मात्र सत्य व सर्वत्र असून तिचे ज्ञान आपल्याला नसते. (३)

**वेदशास्त्रें पुराणें सांगती। सत्याचा निश्चय करिती।**
**तरी नये आत्मप्रचिती। सत्यस्वरूप ॥ ४ ॥**

वेद, शास्त्रे, पुराणे नाना प्रकारे सत्याचा निश्चय व्हावा म्हणून उपदेश करतात, पण याप्रमाणे शास्त्रांनी सांगूनही त्या सत्य स्वरूपाची आत्मप्रचीती येत नाही. (४)

**सत्य असोन आछ्यादलें। मिथ्या नसोन सत्य जालें।**
**ऐसें विपरीत वर्तलें। देखत देखतां ॥ ५ ॥**

परब्रह्म सत्य असून ते मायेच्या योगे आच्छादिले जाते व माया मिथ्या असून ती सत्य वाटत असते. असे सगळे आपल्या समक्षच विपरीत घडून येते. (५)

**ऐसी मायेची करणी। कळों आली तत्क्षणीं।**
**संतसंगे निरूपणीं। विचार घेतां ॥ ६ ॥**

पण ज्यावेळी संतसमागम घडतो व अध्यात्मनिरूपणाच्या श्रवणाने सारासारविवेक उत्पन्न होतो तेव्हा या मायेची करणी समजून येते. (६)

**मागां जालें निरूपण। देखिलें आपणासि आपण।**
**तेणें बाणली खूण। परमार्थाची ॥ ७ ॥**

याचे निरूपण पूर्वी आले आहे. आपणच आपला शोध घेऊन स्वस्वरूपानुभवाने आपले खरे रूप जाणून घेतले आहे. त्यामुळे परमार्थाची खूण अंतरात बाणली आहे. (७)

**तेणें समाधान जालें। चित्त चैतंनीं मिळालें।**
**निजस्वरूपें वोळखिलें। निजवस्तुसी ॥ ८ ॥**

त्यामुळे समाधान लाभले असून चित्त चैतन्याशी एकरूप झाल्याने आपण स्वत:च ब्रह्मस्वरूप आहोत अशी आपल्या खऱ्या स्वरूपाची आपल्याला ओळख पटली आहे. (८)

**प्रारब्धीं टाकिला देहो। बोधें फिटला संदेहो।**
**आतांचि पडो अथवा राहो। मिथ्या कळीवर ॥ ९ ॥**

आत्मबोध झाल्याने संदेह नाहीसे झालेले असून आता देह प्रारब्धाच्या हवाली केला आहे. आता हे मिथ्या कलेवर म्हणजेच देह लगेच पडला अथवा राहिला तरी त्याच्याशी आपला संबंधच उरलेला नाही, अशी ज्ञानी लोकांची भूमिका असते. (९)

**ज्ञानियांचें जें शेरीर। तें मिथ्यत्वें निर्विकार।**
**जेथें पडे तेचि सार। पुण्यभूमी ॥ १० ॥**

ज्ञानी लोकांना 'शरीर मिथ्या' आहे या विचाराने जिवंतपणीच ते असून नसल्यासारखेच वाटत असते. थोडक्यात, ज्ञानी ममत्वरहित असतानाच त्याचे शरीर जेथे कुठे पडते, ती भूमी खरोखरच पुण्यभूमी होय. (१०)

**साधुदर्शनें पावन तीर्थ। पुरती त्यांचे मनोरथ।**
**साधु न येतां जिणें वेर्थ। तयां पुण्यक्षेत्रांचे ॥ ११ ॥**

साधुसंतांच्या दर्शनानेच तीर्थांना पावित्र्य येते व त्यांचे माहात्म्य वाढते. साधुसंत जर आले नाहीत तर त्या तीर्थक्षेत्रांचे जिणे व्यर्थ ठरते. (११)

**पुण्यनदीचें जें तीर। तेथें पडावें शरीर।**
**हा इतर जनाचा विचार। साधु नित्यमुक्त ॥ १२ ॥**

सामान्य लोकांची अशी इच्छा असते की, गंगेसारख्या पुण्यनदीच्या तीरावर आपले शरीर पडावे म्हणजे आपल्याला मुक्ती मिळेल. पण साधू हे नित्यमुक्तच असतात.(१२)

**उत्तरायेण तें उत्तम। दक्षणायेन तें अधम।**
**हा संदेहीं वसे भ्रम। साधु तो नि:संदेह॥ १३ ॥**

उत्तरायणात देह पडला तर उत्तम, दक्षिणायनात पडला तर अधम ह्या संदेहाने सामान्य लोकांच्या मनांत भ्रम उत्पन्न होतो पण साधू हे नि:संदेह झालेले असतात. (१३)

**शुक्लपक्ष उत्तरायेण। गृहीं दीप दिवा मरण।**
**अंतीं राहावें स्मरण। गतीकारणें ॥ १४ ॥**

उत्तरायण असावे, शुक्लपक्ष असावा, घरात दिवा जळत असता दिवसा मरण यावे, त्यातही अंतकाळी भगवंताचे स्मरण राहावे म्हणजे उत्तम गती मिळते, असे लोकांना वाटत असते. (१४)

**इतुकें नलगे योगियांसी। तो जीतचि मुक्त पुण्यरासी।**
**तिळांजुळी पापपुण्यासी। दिधली तेणें ॥ १५ ॥**

योग्यांना या गोष्टींची आवश्यकता नसते. तो पुण्यपुरुष जिवंत असताना मुक्त झालेला असतो. त्याने पापपुण्यांना कधीच तिलांजली दिलेली असते. (१५)

**देहाचा अंत बरा आला। देह सुखरूप गेला।**
**त्यासी म्हणती धन्य जाला। अज्ञान जन ॥ १६ ॥**

अज्ञानी लोक ज्याच्या देहाचा अंत बरा झाला असेल, जो सुखात असता मेला असेल, तो धन्य झाला असे म्हणतात. (१६)

**जनाचें विपरीत मत। अंतीं भेटतो भगवंत।**
**ऐसें कल्पून घात। करिती आपुला स्वयें॥ १७ ॥**

काही अज्ञानी लोकांची तर अशी विपरीत समजूत असते की, अंतकाळी भगवंताचे दर्शन होते, याप्रकारे कल्पना जे करतात, ते आपला घात करून घेतात.(१७)

**जितां सार्थक नाही केलें। वेर्थ आयुष्य निघोन गेलें।**
**मुळीं धान्येचि नाहीं पेरिलें। तें उगवेल कैंचें ॥ १८ ॥**

जिवंत असताना त्यांनी मनुष्यजन्माचे सार्थक केलेले नसते. सर्व आयुष्य व्यर्थच घालवलेले असते. मुळात धान्य पेरलेलेच नसते, तर ते उगवून येणार तरी कसे? (१८)

**जरी केलें ईश्वरभजन। तरीच होईजे पावन।**
**जैसें वेव्हारितां धन। रासि माथां लाभे॥ १९ ॥**

जर ईश्वरभजन केले असेल तरच मनुष्य पावन होतो. जसे जवळ असलेल्या धनाने व्यवहार केला असेल, तरच मुद्दलाबरोबर व्याजही मिळून द्रव्यरास उपलब्ध होते.(१९)

**दिधल्याविण पाविजेना। पेरल्याविण उगवेना।**
**ऐसें हें वाक्य जना। ठाउकेंचि आहे ॥ २० ॥**

दिल्याखेरीज मिळत नाही, पेरल्याशिवाय उगवत नाही हे वाक्य सर्व लोक जाणतातच. (२०)

**न करितां सेवेच्याव्यापारा। स्वामीस म्हणे कोठें मुशारा।**
**तैसें अंतीं अभक्त नरां। स्वहित न घडे ॥ २१ ॥**

एखाद्या नोकराने सेवा न करताच धन्याला म्हणावे की, 'माझा पगार द्या' तर त्याला पगार कसा मिळेल? त्याप्रमाणे ज्याने कधी भक्ती केली नसेल अंती त्याचे स्वहित कसे साधेल? (२१)

**जितां नाहीं भगवद्भक्ती। मेल्यां कैंची होईल मुक्ती।**
**असो जे जे जैसें करिती। ते ते पावती तैसें॥ २२ ॥**

जिवंत असताना भगवंताची भक्ती केली नाही, तर मेल्यावर मुक्ती कशी मिळेल? असो. जे जे जसे करतात त्यांना त्या त्या- प्रमाणे फल प्राप्त होते.(२२)

**एवं न करितांभगवद्भजन। अंतीं नव्हीजे पावन।**
**जरी आलें बरें मरण। तरी भक्तीविण अधोगति॥ २३ ॥**

थोडक्यात म्हणजे जिवंत असताना जर भगवद् भजन केले नसेल तर अंतकाळी पावन होता येत नाही. जरी लोकांच्या समजुतीप्रमाणे बरे मरण आले, तरी भक्ती न केल्याने अधोगती प्राप्त होते. (२३)

**म्हणौन साधूनें आपलें। जीत अस्ताच सार्थक केलें।**
**शरीर कारणीं लागलें। धन्य त्याचें ॥ २४॥**

म्हणून जे साधुसंत असतात, त्यांनी जिवंत असतानाच मनुष्यजन्माचे सार्थक केलेले असते. भगवद्भक्ती अथवा ज्ञानप्राप्ती करून शरीराचा सदुपयोग त्यांनी केलेला असतो. त्यामुळे ते धन्य होत. (२४)

**जे कां जीवन्मुक्त ज्ञानी। त्यांचें शरीर पडो रानीं।**
**अथवा पडो स्मशानीं। तरी धन्य जालें ॥ २५॥**

जे जिवंत असतानाच मुक्त झालेले असतात, अशा ज्ञानी जीवन्मुक्तांचे शरीर रानात पडो अथवा स्मशानात पडो, तरी ते धन्यच असतात. (२५)

**साधूचा देह खितपला। अथवा श्वानादिकीं भक्षिला।**
**हें प्रशस्त न वटे जनाला। मंदबुद्धीस्तव ॥ २६॥**

साधूंचा देह खितपत पडला किंवा कोल्ह्या-कुत्र्यांनी खाल्ला, तर सामान्य लोकांना त्यांच्या मंदबुद्धीमुळे ते प्रशस्त वाटत नाही. (२६)

**अंत बरा नव्हेचि म्हणोन। कष्टी होती इतर जन।**
**परी बापुडे अज्ञान। नेणती वर्म ॥ २७॥**

सामान्य लोक त्याचा अंत बरा झाला नाही, या विचाराने दु:खी होतात, पण ते बिचारे अज्ञानी लोक रहस्य जाणत नाहीत. (२७)

**जो जन्मलाच नाहीं ठाईंचा। त्यास मृत्य येईल कैंचा।**
**विवेकबळें जन्ममृत्याचा। घोट भरिला जेणें॥ २८॥**

पण मुळात जो जन्मलाच नाही, त्याला मृत्यू कसा येईल? जो ज्ञानी असतो त्याने विवेकाच्या बळावर जन्म-मृत्यूच्या भावनेलाच गिळून टाकलेले असते.(२८)

**स्वरूपानुसंधानबळें। सगळी मायाच नाडळे।**
**तयाचा पार न कळे। ब्रह्मादिकांसी ॥ २९॥**

त्याने स्वस्वरूपानुसंधानाच्या बळाने सर्व मायाच नाहीशी केलेली असते. त्यामुळे ब्रह्मादिकांनाही त्याचा पार लागत नाही. (२९)

**तो जीतिच असतां मेला। मरणास मारून ज्याला।**
**जन्ममृत्य न स्मरे त्याला। विवेकबळें ॥ ३०॥**

तो जिवंत असतानाच मेलेला असतो आणि मरणाला मारून जगत असतो. त्यामुळे विवेकाच्या बळाने त्याला जन्म-मृत्यूचे भानच राहिलेले नसते.(३०)

**जो जनीं दिसतो परी वेगळा। वर्ततां भासे निराळा।**
**दृश्यपदार्थ त्या निर्मळा। स्पर्शलाचि नाहीं ॥ ३१॥**

तो सामान्य लोकांमध्येच वावरतो, तरी तो वेगळा असतो. त्याचे आचरण पाहिले की तो इतरांपेक्षा निराळा आहे, हे कळून येते. तो निर्मळ अशा आत्मस्वरूपाशी ऐक्य पावल्याने वस्तुरूपच झालेला असतो. त्यामुळे दृश्य पदार्थादी मायिक असल्याने त्याला स्पर्शच करू शकत नाहीत. (३१)

**असो ऐसे साधुजन। त्यांचें घडलियां भजन।**
**तेणें भजनें पावन। इतर जन होती ॥ ३२॥**

असो. अशा साधुसंतांचे भजन घडले, तर त्यायोगे इतर लोकही पावन होतात. (३२)

**सद्गुरूचा जो अंकित साधक। तेणें केलाचि करावा विवेक।**
**विवेक केलियां तर्क। फुटे निरूपणीं ॥ ३३॥**

जो साधक सद्गुरूच्या अंकित असेल त्याने पुन्हापुन्हा सारासारविवेक करावा. अशा प्रकारे विवेक केल्याने निरूपणाच्यावेळी नवीन विचार स्फुरू लागतात. (३३)

**हेंचि साधकासी निरवणें। अद्वैत प्रांजळ निरूपणें।**
**तुमचेंहि समाधान बाणे। साधूच ऐसें ॥ ३४॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, जे खरे साधक आहेत, त्यांना अगत्याने हेच सांगावयाचे आहे की, अद्वैताच्या प्रांजळ निरूपणामुळे साधुसंतांच्याप्रमाणे तुमच्या ठिकाणीही नि:संदेह असे समाधान जरूर बाणेल. (३४)

**जो संतांस शरण गेला। तो संतचि होऊन ठेला।**
**इतर जनास उपेगा आला। कृपाळूपणें ॥ ३५॥**

जो संतांना शरण जातो, तो स्वत: संतच होतो आणि कृपाळूपणे इतर सामान्य जनांच्या उपयोगी पडतो. (३५)

**ऐसें संतांचे महिमान। संतसंगें होतें ज्ञान।**
**सत्संगापरतें साधन। आणीक नाहीं ॥ ३६॥**

असा संतांचा महिमा आहे! संतसमागमानेच आत्मज्ञान होते. म्हणून सत्संगाहून श्रेष्ठ असे दुसरे साधनच नाही.(३६)

गुरुभजनाचेंनि आधारें। निरूपणाचेनि विचारें।
क्रियाशुद्ध निर्धारें। पाविजे पद ॥ ३७॥

गुरूभजनाच्या आधाराने, अध्यात्मनिरूपणातील विचाराने श्रवण-मनन, करून ते आत्मसात करावेत आणि आचरणही अत्यंत शुद्ध असावे. म्हणजे निश्चितपणे परमपदाची प्राप्ती होते. (३७)

परमार्थाचें जन्मस्थान। तेंचि सद्गुरूचें भजन।
सद्गुरुभजनें समाधान। अकस्मात बाणे ॥ ३८॥

सद्गुरूंचे भजन हे परमार्थाचे जन्मस्थान आहे. आणि सद्गुरुभजनाने म्हणजे त्यांनी सांगितल्याप्रमाणे साधन केले असता, आत्मानुभव प्राप्त होऊन अकस्मात शाश्वत समाधान बाणते. (३८)

देह मिथ्या जाणोनि जीवें। याचें सार्थकचि करावें।
भजनभावें तोषवावें। चित्त सद्गुरूचें ॥ ३९॥

देह मिथ्या आहे हे जाणून घेऊन जीवाने त्याचे सार्थक करावे आणि भावाने सद्गुरूचे भजन करून त्यांना संतुष्ट करून घ्यावे. (३९)

शरणांगतांची वाहे चिंता। तो येक सद्गुरू दाता।
जैसें बाळक वाढवी माता। नाना येत्नें करूनी॥ ४०॥

आई जशी बालकाला नाना प्रयत्न करून वाढविते, त्याप्रमाणे सद्गुरू हे मातेप्रमाणेच शरण आलेल्या भक्तांची सर्व चिंता वाहतात. त्यांच्यासारखा दाता अन्य कुणी नसतो. (४०)

म्हणौन सद्गुरूचें भजन। जयासि घडे तोचि धन्य।
सद्गुरुविण समाधान। आणीक नाहीं ॥ ४१॥

म्हणूनच ज्याला सद्गुरूचे भजन घडते, तो शिष्य धन्यच होय. सद्गुरूशिवाय दुसरी समाधानाची आणखी जागा नाही. (४१)

सरली शब्दाची खटपट। आला ग्रंथाचा सेवट।
येथें सांगितलें पष्ट। सद्गुरुभजन ॥ ४२॥

शब्दांत जे काही सांगता येण्यासारखे होते ते सांगण्याचा प्रयत्न आत्तापर्यंत केला आहे. आता ग्रंथाचा शेवट आला आहे म्हणून परत एकदा सद्गुरुभजनाचे महत्त्व स्पष्ट करून सांगितले आहे. (४२)

सद्गुरुभजनापरतें कांहीं। मोक्षदायेक दुसरें नाहीं।
जयास न मने तेंहीं। अवलोकावी गुरुगीता॥ ४३॥

खरोखर सद्गुरुभजनासारखे मोक्षदायक दुसरे काहीही नाही. ज्याला हे म्हणणे पटत नसेल, त्याने 'गुरुगीता पाहावी. (४३)

तेथें निरोपिलें बरवें। पार्वतीप्रति सदाशिवें।
याकारणें सद्भावें। सद्गुरुचरण सेवावे॥ ४४॥

तेथे सदाशिवाने पार्वतीला सद्गुरुचरण सेवावे हेच उत्तम प्रकारे निरोपिले आहे म्हणून सद्भावाने सद्गुरुचरणच सेवावे. (४४)

जो ये ग्रंथींचा विवेक। विवंचूनि पाहे साधक।
तयास सांपडे येक। निश्चय ज्ञानाचा ॥ ४५॥

या ग्रंथात जे विचार मांडलेले आहेत त्यांचे जो साधक मनन करील, त्याचा आत्मज्ञानासंबंधी निश्चय होईल. (४५)

जें ग्रंथीं बोलिलें अद्वैत। तो म्हणों नये प्राकृत।
सत्य जाणावा वेदांत। अर्थविषईं ॥ ४६॥

ज्या ग्रंथांत अद्वैत ज्ञानाचे प्रतिपादन केलेले असेल तो ग्रंथ प्राकृत, मराठीतला म्हणून कमी प्रतीचा मानू नये. कारण त्याचा अर्थ खरोखर वेदांतपरत्र असतो. (४६)

प्राकृतें वेदांत कळे। सकळ शास्त्रीं पाहातां मिळे।
आणी समाधान निवळे। अंतर्यामी ॥ ४७॥

वेदान्त अनायासे मराठीत सुलभरीत्या प्राप्त होईल. शिवाय अनेक वेदान्तपर शास्त्रीय संस्कृत ग्रंथात जो वेदान्त प्रतिपादिला, तोच या ग्रंथातही असल्याने त्याच्या श्रवणाने अंत:करणात समाधान प्राप्त होईल. (४७)

तें प्राकृत म्हणों नये। जेथें ज्ञानाचे उपाये।
मूर्खासि हें कळे काये। मर्कटा नारिकेळ जैसें॥ ४८॥

ज्यांत आत्मज्ञानाचे उपाय सांगितलेले असतात त्या ग्रंथांना प्राकृत म्हणून तुच्छ मानू नये. पण माकडाला नारळाचे मूल्य-काय कळणार? त्याप्रमाणे मूर्खाला या ग्रंथाचे महत्त्व काय कळणार आहे? (४८)

**आतां असो हें बोलणें। अधिकारपरत्वें घेणें।**
**शिंपीमधील मुक्त उणें। म्हणों नये ॥ ४९ ॥**

असो. आता हे बोलणे पुरे. ज्याने-त्याने आपापल्या कुवतीप्रमाणे, या ग्रंथांतील ज्ञान ग्रहण करावे. बंद शिंपीतील मोती प्रत्यक्ष दिसत नाही, पण म्हणून तो कमी प्रतीचा आहे असे म्हणू नये. (४९)

**जेथे नेति नेति श्रुती। तेथें न चले भाषावित्पत्ती।**
**परब्रह्म आदिअंतीं। अनुर्वाच्य ॥ ५० ॥**

ज्या परब्रह्माचे वर्णन श्रुतींनाही नेति नेति म्हणून करावे लागते, तेथे भाषेतील व्युत्पन्नता, विद्वत्ता उपयोगी पडत नाही. ते परब्रह्म आदी अंती अनिर्वाच्य, शब्दांत न सांगता येण्यासारखेच असते. (५०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहान्तनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक सातवा समाप्त.**



# दशक आठवा : मायोद्भव अथवा ज्ञानदशक

## दशक ८ : समास १

## देवदर्शन

॥ श्रीराम ॥

श्रोतीं व्हावें सावध। विमळ ज्ञान बाळबोध।
गुरुशिष्यांचा संवाद। अति सुगम परियेसा ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की गुरुशिष्यसंवादाच्या रूपाने विमल ज्ञान अगदी मुलांनाही समजेल, असे अगदी सोपे करून सांगितले जात आहे, तरी श्रोत्यांनी सावध होऊन ते ऐकावे. (१)

नाना शास्त्रें धांडोळितां। आयुष्य पुरेना सर्वथा।
अंतरीं संशयाची वेथा। वाढोंचि लागे ॥ २ ॥

नाना शास्त्रांचा शोध घेऊ लागले, तर खरोखर आयुष्य पुरे पडत नाही. मात्र त्याने समाधान प्राप्त न होता अंतरात संशयच वाढू लागतात. (२)

नाना तीर्थें थोरथोरें। सृष्टीमध्यें अपारें।
सुगमें दुर्गमें दुष्करें। पुण्यदायकें ॥ ३ ॥

सृष्टीमध्ये नाना तीर्थे आहेत. एकापेक्षा एक वरचढ अशी असंख्य पुण्यदायक तीर्थे आहेत. काही सुगम आहेत, काही दुर्गम आहेत, काही दुष्कर आहेत. (३)

ऐसी तीर्थें सर्वहि करी। ऐसा कोण रे संसारीं।
फिरों जातां जन्मवरी। आयुष्य पुरेना ॥ ४ ॥

अशा या सर्व तीर्थांचे दर्शन घेऊ शकेल, असा या जगात कुणी एक तरी असेल का रे? एखादा जन्मभर फिरत राहिला, तरी फिरताना आयुष्य कमी पडेल! (४)

नाना तपें नाना दानें। नाना योग नाना साधनें।
हें सर्वहि देवाकारणें। करिजेत आहे ॥ ५ ॥

लोक देवाच्या प्राप्तीकरिता नाना प्रकारचे तप करतात, नाना दाने देतात, नाना प्रकारचे योग व नाना प्रकारची साधने करीत असतात. (५)

पावावया देवाधिदेवा। बहुविध श्रम करावा।
तेणें देव ठाईं पाडावा। हें सर्वमत ॥ ६ ॥

सर्वांना असे वाटत असते की, देवाधिदेवाच्या प्राप्तीसाठी असे नाना प्रकारचे परिश्रम केले की, आपल्याला येथेच देवाची प्राप्ती होईल. (६)

पावावया भगवंतातें। नाना पंथ नाना मतें।
तया देवाचें स्वरूप तें। कैसें आहे ॥ ७ ॥

भगवंताची प्राप्ती व्हावी म्हणून नाना पंथ (संप्रदाय) निर्माण झाले. नाना मते प्रस्थापित केली गेली. त्या देवाचे रूप तरी कसे आहे, हे जाणून घेणे आवश्यक आहे. (७)

बहुत देव सृष्टीवरी। त्यांची गणणा कोण करी।
येक देव कोणेपरी। ठाईं पडेना ॥ ८ ॥

या सृष्टीमध्ये अनेक देव आहेत. त्यांची गणना कोण करू शकणार आहे? पण त्यांतील एकाही देवाची प्राप्ती होत नाही. (८)

बहुविध उपासना। ज्याची जेथें पुरे कामना।
तो तेथेंचि राहिला मना। सदृढ करूनि ॥ ९ ॥

अनेक प्रकारच्या उपासना आहेत. ज्याच्या मनातील कामना ज्या उपासनेने पूर्ण होतात, त्याच्या मनात त्या देवतेविषयीच दृढ श्रद्धाभाव उत्पन्न होतो. (९)

बहु देव बहु भक्त। इछ्या जाले आसक्त।
बहु ऋषी बहु मत। वेगळालें ॥ १० ॥

अनेक देव आहेत, त्यांच्या कामनेने आसक्त झालेले अनेक भक्त आहेत. तसेच अनेक ऋषी होऊन गेले. त्यांची अनेक मतेही वेगवेगळ्या प्रकारची आहेत. (१०)

बहु निवडितां निवडेना। येक निश्चय घडेना।
शास्त्रें भांडती पडेना। निश्चय ठाईं ॥ ११ ॥

अनेक मतमतांतरे असल्याने त्यातील कुठले ग्राह्य आहे याचा निश्चय करता येत नाहीसा झाला आहे. शास्त्राशास्त्रांतसुद्धा मतभेद असल्याने निश्चय करता येत नाही, अशी स्थिती झालेली आहे. (११)

बहुत शास्त्रीं बहुत भेद। मतांमतांस विरोध।
ऐसा करितां वेवाद। बहुत गेले ॥ १२॥

सहस्रामधें कोणी येक। पाहे देवाचा विवेक।
परी त्या देवाचें कौतुक। ठाईं न पडे ॥ १३॥

ठाईं न पडे कैसें म्हणतां। तेथें लागली अहंता।
देव राहिला परता। अहंतागुणें १४॥

आतां असों हे बोलणें। नाना योग ज्याकारणें।
तो देव कोण्या गुणें। ठाईं पडे ॥ १५॥

देव कोणासी म्हणावें। कैसें तयासी जाणावें।
तेंचि बोलणें स्वभावें। बोलिजेल ॥ १६॥

जेणें केलें चराचर। केले सृष्ट्यादि व्यापार।
सर्वकर्ता निरंतर। नाम ज्याचें ॥ १७॥

तेणें केल्या मेघमाळा। चंद्रबिंबीं अमृतकळा।
तेज दिधलें रविमंडळा। जया देवें ॥ १८॥

ज्याची मर्यादा सागरा। जेणें स्थापिलें फणिवरा।
जयाचेनि गुणें तारा। अंतरिक्ष ॥ १९॥

च्यारी खाणी च्यारी वाणी। चौऱ्यासि लक्ष जीवयोनी।
जेणें निर्मिले लोक तिनी। तया नांव देव ॥ २०॥

ब्रह्मा विष्णु आणी हर। हे जयाचे अवतार।
तोचि देव हा निर्धार। निश्चयेंसीं ॥ २१॥

देव्हाराचा उठोनि देव। करूं नेणे सर्व जीव।
तयाचेनि ब्रह्मकटाव। निर्मिला न वचे ॥ २२॥

ठाईं ठाईं देव असती। तेहिं केली नाहीं क्षिती।
चंद्र सूर्य तारा जीमूती। तयांचेनि नव्हे ॥ २३॥

सर्वकर्ता तोचि देव। पाहों जातां निरावेव।
ज्याची कळा लीळा लाघव। नेणती ब्रह्मादिक॥ २४॥

येथें आशंका उठिली। ते पुढीलीये समासीं फिटली।
आतां वृत्ती सावध केली। पाहिजे श्रोतीं ॥ २५॥

पैस अवकाश आकाश। कांहींच नाहीं जें भकास।
तये निर्मळीं वायोस। जन्म जाला ॥ २६॥

अनेक शास्त्रे आहेत, त्यांत अनेक भेद आहेत. मतामतांत विरोध आहे. अशाप्रकारे वादविवाद करता करता अनेक लोक नाहीसे झाले. (१२)

हजारो मनुष्यांत एखादाच खरा देव कुठला, यासंबंधी विचार करू लागतो ते जाणण्यासाठी मनापासून प्रयत्न करू लागतो पण त्या खऱ्या देवाचे रहस्य त्याला कळून येत नाही. (१३)

ठाई न पडे असे कसे म्हणता हो? असे तो अहंकारामुळे म्हणू लागतो. या अहंकारामुळे देव बाजूलाच राहातो. (१४)

असो. आता हे बोलणे राहू दे. ज्याच्या प्राप्तीसाठी नाना योगांचा अभ्यास केला जातो. तो देव कुठल्या उपायाने प्राप्त होतो, हे प्रथम पाहिले पाहिजे. (१५)

म्हणून देव कुणाला म्हणावे, त्याला कसे जाणावे, तेच आता सहजरीत्या सांगितले जाईल. (१६)

ज्याने ही चराचर सृष्टी उत्पन्न केली, ज्याच्या सत्तेने सर्व कार्य चालते व ज्याचे सर्वकर्ता हे नाम निरंतर घेतले जाते, (१७)

ज्याने मेघमाला केल्या, ज्याने चंद्रबिंबाच्या ठिकाणी अमृतमय शीतल चांदणे निर्मिले व ज्याने सूर्यमंडळास तेज दिले तोच देव होय. (१८)

ज्याच्या सत्तेने सागर मर्यादा पाळतो, ज्याने शेषाची स्थापना केली व ज्याच्या सत्तेने अंतरिक्षांत तारका निर्माण झाल्या, (१९)

चारी खाणी, चारी वाणी, चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी व तिन्ही लोक ज्याने निर्मिले, तोच देव जाणावा.(२०)

ब्रह्मा, विष्णू आणि शंकर हे ज्याचे अवतार आहेत तोच खरा देव आहे हा निर्धार करावा. (२१)

देव्हाऱ्यातील देवाची मूर्ती, सर्व जीवांची उत्पत्ती, तसेच ब्रह्मांडाची रचना करू शकत नाही. (२२)

जागोजागी देव असतात. पण पृथ्वी, चंद्र, सूर्य, तारा, मेघ इत्यादींची उत्पत्ती त्यांच्यापासून होत नाही.(२३)

म्हणून या सर्वांना जो निर्माण करतो, तोच खरा देव आहे. पण त्याला पाहून जावे तर तो निरवयव, निराकार असल्याने दिसत नाही. ब्रह्मादिक देवही त्याची कला, लीला व कौशल्य जाणू शकत नाहीत. (२४)

येथे एक शंका उत्पन्न झाली, तिचे निरसन पुढील समासात केले जाईल, आत्ता जे सांगतो आहे, ते ऐकण्यासाठी श्रोत्यांनी सावधान व्हावे. (२५)

पोकळ अवकाश आकाश जेथे काहीच नाही असे भकास होते. त्या निर्मळ आकाशात प्रथम वायूचा जन्म झाला.(२६)

वायोपासून जाला वन्ही। वन्हीपासुनी जालें पाणी।
ऐसी जयाची करणी। अघटित घडली ॥ २७॥

उदकापासून सृष्टि जाली। स्तंभेंविण उभारली।
ऐसी विचित्र कळा केली। या नांव देव ॥ २८॥

देवें निर्मिली हे क्षिती। तिचे पोटीं पाषाण होती।
तयासचि देव म्हणती। विवेकहीन ॥ २९॥

जो सृष्टिनिर्माणकर्ता। तो ये सृष्टीपूर्वी होता।
मग हे तयाची सत्ता। निर्माण जाली ॥ ३०॥

कुल्लाळ पात्रापूर्वी आहे। पात्रें कांहीं कुल्लाळ नव्हे।
तैसा देव पूर्वीच आहे। पाषाण नव्हे सर्वथा॥ ३१॥

मृत्तिकेचें शैन्य केलें। कर्ते वेगळे राहिले।
कार्यकारण येक केलें। तरी होणार नाहीं ॥ ३२॥

तथापि होईल पंचभूतिक। निर्गुण नव्हे कांहीं येक।
कार्यकारणाचा विवेक। भूतांपरता नाहीं ॥ ३३॥

अवघी सृष्टि जो कर्ता। तो ते सृष्टीहूनि पर्ता।
तेथें संशयाची वार्ता। काढूंचि नये ॥ ३४॥

खांबसूत्रींची बाहुली। जेणें पुरुषें नाचविली।
तोचि बाहुली हे बोली। घडे केवी ॥ ३५॥

छायामंडपीची सेना। सृष्टीसारिखीच रचना।
सूत्रें चाळी परी तो नाना। वेक्ति नव्हे ॥ ३६॥

तैसा सृष्टिकर्ता देव। परी तो नव्हे सृष्टिभाव।
जेणें केले नाना जीव। तो जीव कैसेनी ॥ ३७॥

जें जें जया करणें पडे। तें तें तो हें कैसें घडे।
म्हणोनि वायांचि बापुडे। संदेहीं पडती ॥ ३८॥

सृष्टि ऐसेंचि स्वभावें। गोपुर निर्मिलें बरवें।
परी तो गोपुर कर्ता नव्हे। निश्चयेंसीं ॥ ३९॥

वायूपासून अग्नीची उत्पत्ती झाली आणि त्यापासून पाणी झाले. त्या देवाची करणी ही अशी अघटित घडली. (२७)

उदकापासून पृथ्वी झाली, सृष्टी झाली, खांबाशिवाय आधाराशिवाय तिला उभारली. अशी विचित्र ज्याची कला आहे, त्यालाच देव म्हणतात. (२८)

देवाने ही पृथ्वी निर्माण केली. तिच्या पोटीच दगड होतात आणि विवेकहीन माणसे त्यालाच देव म्हणतात. (२९)

या सृष्टीचा निर्माता जो होता, तो या सृष्टीपूर्वीही होता. त्याच्या सत्तेने नंतर ही सृष्टी निर्माण झाली. (३०)

मातीची भांडी निर्माण होण्यापूर्वीही कुंभार असतोच. ती मातीची भांडी म्हणजे काही कुंभार नव्हे. तसा देव हा पूर्वीपासूनच आहे. पाषाण नंतर झाले. म्हणून तो सर्वथा पाषाण नव्हेच. (३१)

मातीचे सैन्य केले. ज्यांनी ते केले ते कर्ते त्या सैन्यापेक्षा वेगळेच राहिले. कार्य म्हणजे मातीचे सैन्य व कारण म्हणजे मातीपासून सैन्य बनविणारे कारागीर. त्यांना नंतर एक करू म्हटले तरी ते होऊ शकत नाही. (३२)

तथापि येथे कार्य म्हणजे मातीचे सैन्य आणि कारण ही दोन्ही पांचभौतिक असल्याने तत्त्वत: एकच आहेत असे म्हणता येईल. कार्यकारणसंबंध हा पंचमहाभूतांना सोडून नसतो, म्हणून निर्गुणाला तो लागू पडत नाही. (३३)

म्हणून अवघ्या सृष्टीचा कर्ता हा त्या सृष्टीहून वेगळा आहे हे निश्चित आहे. म्हणून येथे संशयाचे नावही काढू नये. (३४)

खांबसूत्राच्या बाहुल्यांना जो पुरुष नाचवतो, तो तीच बाहुली आहे असे कसे म्हणता येईल? (३५)

अंधाऱ्या जागी पडद्यावर नाना चित्रांच्या छाया पाडून त्यांची हालचाल दाखविली जाते. तसेच सेना दाखवली तर त्या सैन्यातील शिपाई म्हणजे नाना व्यक्ती आणि ती हालचाल करून दाखविणारा सूत्री (सूत्रधार) एक नव्हेत. सृष्टिरचनेसारखीच ती रचना असते. (३६)

म्हणून सृष्टिकर्ता देव हा त्या सृष्टीतील नसतो. ज्याने नाना जीव निर्माण केले तो जीव कसा असेल? (३७)

जो कोणी जे जे करतो, ते कार्य म्हणजेच तो असे कसे घडू शकेल? कर्ता हा कार्याहून भिन्नच असणार. लोक बापडे कारण नसता उगीचच संशयात पडतात. (३८)

एका कारागिराने नाना प्रसंग दाखवणारे, देवालयाच्या द्वारावर उंच गोपुर निर्माण केले. त्यातील देखावे, व्यक्ती इत्यादी अगदी हुबेहूब बाह्यसृष्टीत दिसतात तशाच केल्या पण गोपुर आणि त्याचा कर्ता नक्कीच एक नव्हेत. (३९)

**तैसें जग निर्मिलें जेणें। तो वेगळा पूर्णपणें।**
**येक म्हणती मूर्खपणें। जग तोचि जगदीश॥ ४०॥**

त्याप्रमाणेच हे जग ज्याने निर्माण केले, तो त्या जगाहून पूर्णपणे वेगळाच आहे. काही लोक मूर्खपणाने जग तोच जगदीश असे म्हणतात. (४०)

**एवं जगदीश तो वेगळा। जग निर्माण त्याची कळा।**
**तो सर्वांमधें परी निराळा। असोन सर्वीं ॥ ४१॥**

थोडक्यात म्हणजे जगाहून जगदीश पूर्णपणे वेगळा असून त्याने या जगाची निर्मिती मोठ्या कौशल्याने केली आहे. तो सदा सर्वत्र सर्वांमध्ये असूनही सर्वांहून निराळा आहे. (४१)

**म्हणोनि भूतांचा कर्दमु। यासी अलिप्त आत्मारामु।**
**अविद्यागुणें मायाभ्रमु। सत्यचि वाटे ॥ ४२॥**

म्हणून पंचमहाभूतांच्या समुदायाहून, मिश्रणाहून आत्माराम हा सर्वस्वी अलिप्त असतो. अविद्येच्या योगे मायेने निर्माण केलेला भ्रम सत्यच वाटतो. (४२)

**मायोपाधी जगडंबर। आहे सर्वहि साचार।**
**ऐसा हा विपरीत विचार। कोठेंचि नाहीं ॥ ४३॥**

मायेने निर्माण केलेला हा जगाचा पसारा सर्व सत्यच आहे, असा विपरीत विचार अध्यात्माच्या ग्रंथात कोठेच आढळून येत नाही. (४३)

**म्हणोनि जग मिथ्या साच आत्मा। सर्वांपर जो परमात्मा।**
**अंतर्बाह्य अंतरात्मा। व्यापूनि असे ॥ ४४॥**

म्हणून जग मिथ्या असून आत्मा सत्य आहे आणि परमात्मा सर्वांच्याही पलीकडचा आहे व त्याने अंतर्बाह्य सर्वांना व्यापलेले असून तोच अंतरात्मा आहे. (४४)

**तयास म्हणावें देव। येर हें अवघेंचि वाव।**
**ऐसा आहे अंतर्भाव। वेदांतीचा ॥ ४५॥**

त्यालाच देव म्हणावे. इतर सर्व जे दृश्य आहे ते मिथ्या आहे. असा वेदान्ताचा अंतरीचा भाव आहे.(४५)

**पदार्थवस्तु नासिवंत। हें तों अनुभवास येत।**
**याकारणें भगवंत। पदार्थावेगळा ॥ ४६॥**

दृश्यसृष्टी आणि तिच्यातील पदार्थ हे सर्व नाशिवंत आहेत याचा अनुभव सर्वांनाच येत असतो म्हणून अविनाशी भगवंत हा पदार्थाहून वेगळा आहे. (४६)

**देव विमळ आणी अचळ। शास्त्रें बोलती सकळ।**
**तया निश्चळास चंचळ। म्हणों नये सर्वथा॥ ४७॥**

सर्व शास्त्रे सांगतात की, देव निर्मल आहे, निश्चल आहे. म्हणून त्या निश्चल परमात्म्याला चुकूनही कधी चंचल म्हणू नये. (४७)

**देव आला देव गेला। देव उपजला देव मेला।**
**ऐसें बोलतां दुरिताला। काये उणें ॥ ४८॥**

देव आला, देव गेला, देव उपजला आणि देव मेला असे कधी म्हणू नये. तसे म्हणण्याने पाप मात्र पदरात पडते.(४८)

**जन्ममरणाची वार्ता। देवास लागेना सर्वथा।**
**देव अमर ज्याची सत्ता। त्यासी मृत्य कैसेनी॥ ४९॥**

आत्मारामाला कधीही जन्ममरण नसते. ज्याच्या सत्तेने इंद्रादी देव अमर झाले आहेत, त्याला मृत्यू कसा येईल ?(४९)

**उपजणें आणी मरणें। येणें जाणें दुःख भोगणें।**
**हें त्या देवाचें करणें। तो कारण वेगळा॥ ५०॥**

जन्मणे, मरणे, येणे आणि जाणे, अथवा दुःख भोगणे हे सर्व त्या देवाच्या सत्तेने चालते. तोच सर्वांचे कारण आहे. म्हणून तो या सर्व कार्यांहून वेगळाच आहे. (५०)

**अंतःकरण पंचप्राण। बहुतत्वीं पिंडज्ञान।**
**यां सर्वांस आहे चळण। म्हणोनि देव नव्हेती॥ ५१॥**

अंतःकरण, पंचप्राण, अनेक तत्त्वांसहित पिंडज्ञान या सर्वांत बदल होत असतो, (त्यांचा नाशही होतो), म्हणून ते देव नव्हेत. (५१)

**येवं कल्पनेरहित। तया नाव भगवंत।**
**देवपणाची मात। तेथें नाहीं ॥ ५२॥**

इंद्रादी देवांचे देवपण कल्पांती नाश पावत असल्याने त्या देवपणाची मातब्बरी कल्पनेरहित असलेल्या अविनाशी ब्रह्मस्वरूपापुढे म्हणजेच भगवंतापुढे चालत नाही.(५२)

**तंव शिष्यें आक्षेपिलें। तरी कैसें ब्रह्मांड केलें।**
**कर्तेपणें कारण पडिलें। कार्यामधें ॥ ५३॥**

हे ऐकून शिष्याने आक्षेप घेतला की, कार्य करताना कर्ता हा कार्यमय झालेला असतो. तरी निर्गुण ब्रह्माने ब्रह्मांड केले असे म्हटले तर मग निर्गुण ब्रह्मच सगुण झाले असे म्हणावे लागेल. तरी ब्रह्मांड कोणी आणि कसे केले ते सांगावे. (५३)

| | |
|---|---|
| द्रष्टेपणें द्रष्टा दृश्यीं। जैसा पडे अनायासीं।<br>कर्तेपणें निर्गुणासी। गुण तैसे ॥५४॥ | द्रष्टा हा द्रष्टेपणाने दृश्य पाहात असता नकळत त्या दृश्याचाच एक भाग बनतो. तसे ब्रह्मांडाचा कर्ता निर्गुण म्हटले तर मग त्या निर्गुणाच्या ठिकाणी गुण कोठून आले? (५४) |
| ब्रह्मांडकर्ता कवण। कैसी त्याची वोळखण।<br>देव सगुण किं निर्गुण। मज निरोपावा ॥५५॥ | म्हणून ब्रह्मांडाचा कर्ता कोण आहे? त्याची ओळख कशी पटवून घ्यावी? देव सगुण आहे की निर्गुण? हे सर्व आपण मला समजावून सांगा. (५५) |
| येक म्हणती त्या ब्रह्मातें। इछ्यामात्रें सृष्टिकर्तें।<br>सृष्टिकर्ते त्यापर्तें। कोण आहे ॥५६॥ | कुणी एखादा म्हणतो की ते ब्रह्म इच्छामात्रेकरून सृष्टी उत्पन्न करते. त्याच्याखेरीज सृष्टीचा कर्ता दुसरा कोण असणार? (५६) |
| आतां असो हे बहु बोली। सकळ माया कोठून जाली।<br>ते हे आतां निरोपिली। पाहिजे स्वामी ॥५७॥ | असो. आता हे अधिक बोलणे राहू दे. हे स्वामी, ही सर्व माया कोठून आली हे आता आपण मला समजावून सांगितले पाहिजे. (५७) |
| ऐसें ऐकोनि वचन। वक्ता म्हणे सावधान।<br>पुढिले समासीं निरूपण। सांगिजेल ॥५८॥ | शिष्याचे हे वचन ऐकून वक्ता म्हणाला की, पुढील समासात याचे निरूपण केले जाईल. ते सावधान होऊन ऐक. (५८) |
| ब्रह्मीं माया कैसी जाली। पुढें असे निरोपिली।<br>श्रोतीं वृत्ति सावध केली। पाहिजे आतां ॥५९॥ | ब्रह्मापासून माया कशी झाली, ह्याचे वर्णन पुढे केले आहे, तेव्हा श्रोत्यांनी वृत्ती सावध करून ते ऐकावे. (५९) |
| पुढें हेंचि निरूपण। विशद केलें श्रवण।<br>जेणें होये समाधान। साधकांचें ॥६०॥ | पुढे हेच निरूपण केलेले आहे. ते मन एकाग्र करून श्रवण केल्याने साधकाचे समाधान होईल.(६०) |

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देवदर्शननाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक ८ : समास २

## सूक्ष्म आशंका

॥ श्रीराम ॥

| | |
|---|---|
| मागां श्रोतीं आक्षेपिलें। तें पाहिजे निरोपिलें।<br>निरावेवीं कैसें जालें। चराचर ॥१॥ | मागील समासात श्रोत्यांनी आक्षेप घेतला होता की ब्रह्म निरवयव असताना त्याच्यापासून चराचर सृष्टी कशी उत्पन्न झाली? त्याच्या समाधानासाठी निरूपण केले पाहिजे. (१) |
| याचें ऐसें प्रतिवचन। ब्रह्म जें कां सनातन।<br>तेथें माया मिथ्याभान। विवर्तरूप भासे ॥२॥ | याचे समाधान असे आहे की, जे सनातन ब्रह्म आहे, त्याच्या ठिकाणी माया ही विवर्तरूप, दोरीवर साप दिसावा, तशी नसूनही दिसणारी कल्पनामय भासत असते. (२) |
| आदि येक परब्रह्म। नित्यमुक्त अक्रिय परम।<br>तेथें अव्याकृत सूक्ष्म। जाली मूळमाया ॥३॥ | सर्वप्रथम केवळ एक नित्यमुक्त, सर्वश्रेष्ठ, अक्रिय असे परब्रह्म तेवढे होते. तेथे अत्यंत सूक्ष्म आणि अव्यक्त अशी मूळमाया उत्पन्न झाली. (३) |
| श्लोक<br>आद्यमेकं परब्रह्म नित्यमुक्तमविक्रियम्।<br>तस्य मायासमावेशो जीवमव्याकृतात्मकम्॥ | **अर्थ**—सर्व प्रथम एक परब्रह्म असते. ते नित्यमुक्त असते. त्याच्या ठिकाणी कुठलाही बदल नसतो. त्यात अत्यंत सूक्ष्म माया उत्पन्न होते. तिच्यांत बीजरूपाने जीव वास करतो. |

आशंका

येक ब्रह्म निराकार। मुक्त अक्रिये निर्विकार।
तेथें माया वोडंबर। कोठून जाली ॥ ४॥

ब्रह्म अखंड निर्गुण। तेथें इच्छा धरी कोण।
निर्गुणीं सगुणेविण। इछा नाहीं ॥ ५॥

मुळीं असेचिना सगुण। ह्मणोनि नामें निर्गुण।
तेथें जालें सगुण। कोणेपरी ॥ ६॥

निर्गुणचि गुणा आलें। ऐसें जरी अनुवादलें।
लागों पाहे येणें बोलें। मूर्खपण ॥ ७॥

येक म्हणती निरावेव। करून अकर्ता तो देव।
त्याची लीळा बापुडे जीव। काये जाणती ॥ ८॥

येक म्हणती तो परमात्मा। कोण जाणे त्याचा महिमा।
प्राणी बापुडा जीवात्मा। काये जाणे ॥ ९॥

उगाच महिमा सांगती। शास्त्रार्थ अवघा लोपिती।
बळेंचि निर्गुणास म्हणती। करूनि अकर्ता ॥ १०॥

मुळीं नाहीं कर्तव्यता। कोण करून अकर्ता।
कर्ता अकर्ता हे वार्ता। समूळ मिथ्या ॥ ११॥

जे ठाईंचें निर्गुण। तेथें कैंचें कर्तेपण।
तरी ते इछा धरी कोण। सृष्टिरचाव्याची ॥ १२॥

इछा परमेश्वराची। ऐसी युक्ती बहुतेकांची।
परी त्या निर्गुणास इछा कैंची। हें कळेना ॥ १३॥

तरी हें इतुकें कोणें केलें। किंवा आपणचि जालें।
देवेंविण उभारलें। कोणेपरी ॥ १४॥

देवेंविण जालें सर्व। मग देवास कैंचा ठाव।
येथें देवाचा अभाव। दिसोन आला ॥ १५॥

देव म्हणों सृष्टिकर्ता। तरीं येवं पाहे सगुणता।
निर्गुणपणाची वार्ता। देवाची बुडाली ॥ १६॥

देव ठाईंचा निर्गुण। तरी सृष्टिकर्ता कोण।
कर्तेपणाचें सगुण। नासिवंत ॥ १७॥

**आशंका**— श्रोता येथे शंका विचारतो की, एकले एक मुक्त, अक्रिय व निराकार ब्रह्म असताना तेथे जादूप्रमाणे माया कोठून आली? (४)

ब्रह्म तर अखंड असून निर्गुण आहे, मग तेथे इच्छा कशी असणार? निर्गुण सगुण झाल्याखेरीज तेथे इच्छा उत्पन्न होऊ शकत नाही. (५)

मुळात गुणरहित असल्याने तर निर्गुण नाम ब्रह्माला पडले आहे. मग तेथे ते सगुण कशा प्रकारे झाले? (६)

निर्गुणच सगुण झाले असे म्हणावे तर या बोलण्याने अंगी मूर्खपणाच येतो. (७)

कोणी एक म्हणतात की, देव निरवयव असून तो सृष्टी करूनही अकर्ता आहे. बिचाऱ्या (अज्ञानी) जीवांना त्याची लीला कशी कळणार? (८)

एक म्हणतात की, तो तर परमात्मा आणि बिचारा जीवात्मा अल्पज्ञ आहे. तो त्या परमात्म्याचा महिमा काय जाणणार? (९)

उगाच महिमा वर्णन करणारे काही लोक म्हणतात की, देव हा सर्व करूनही अकर्ता आहे. निर्गुणासंबंधी बळेच असे विधान करण्याने शास्त्रार्थाला बाधा येत आहे, हे त्यांना कळत नाही. (१०)

निर्गुणाच्या ठिकाणी मुळात क्रियाच नाही तर ते करून अकर्ता कसे असेल? तेथे कर्ता-अकर्ता ही गोष्टच समूळ मिथ्या आहे. (११)

जे मुळचे निर्गुण आहे, तेथे कर्तेपणा कसा असेल? मग सृष्टी रचण्याची इच्छा कोण धरतो, असा प्रश्न उत्पन्न होतो. (१२)

बरेच लोक म्हणतात की, इच्छा परमेश्वराची असते. पण युक्तीने असे समाधान करताना त्यांच्या हे लक्षातच येत नाही, की निर्गुणाला इच्छा कशी असेल? (१३)

मग प्रश्न असा उत्पन्न होतो की, इतक्या विशाल सृष्टीची रचना कोणी केली का आपोआपच हे विश्व उत्पन्न झाले आहे? देवाशिवाय हे कोणी उभारले? (१४)

देवाशिवायच हे सर्व आपोआप झाले म्हणावे, तर मग देवाला स्थानच उरत नाही. म्हणजे देवच नाही असे ठरेल. (१५)

देवच सृष्टिकर्ता असे म्हणावे तर कर्तृत्व सगुणाच्या ठायीच संभवते. मग देव निर्गुण आहे, या बोलण्याला काही अर्थच उरत नाही. (१६)

असा प्रश्न पडतो की, देव जर मुळी निर्गुणच आहे, तर मग सृष्टिकर्ता कोण आहे? सगुणाशिवाय कर्तृत्व नाही आणि सगुण तर नाशिवंत असते. (१७)

येथें पडिले विचार। कैसें जालें सचराचर।
माया म्हणों स्वतंतर। तरी हेंहि विपरीत दिसे॥ १८॥

परत हे सर्व चराचर कसे झाले, हा प्रश्न तसाच अनुत्तरित राहतो. माया स्वतंत्र आहे. तिने हे केले म्हणावे, तरी तेही विपरीत दिसते. (१८)

माया कोणीं नाहीं केली। हे आपणचि विस्तारली।
ऐसें बोलतां बुडाली। देवाची वार्ता ॥ १९॥

मायेला कुणी केलेली नाही, ती स्वत:च उत्पन्न झाली आणि विस्तार पावली, असे म्हटले तर मग देवाला स्थानच राहात नाही. (१९)

देव निर्गुण स्वतसिद्ध। त्यासी मायेसि काये समंध।
ऐसें बोलतां विरुद्ध। दिसोन आलें ॥ २०॥

देव स्वत:सिद्ध असून निर्गुण आहे. त्याचा आणि मायेचा संबंधच काय, असे म्हणावे तरी ते अद्वैत सिद्धांताच्या विरुद्ध ठरते. (२०)

सकळ कांहीं कर्तव्यता। आली मायेच्याचि माथां।
तरी भक्तांस उद्धरिता। देव नाहीं कीं ॥ २१॥

सर्व कर्तृत्व जर त्या मायेचे आहे असे म्हटले, तर मग असा प्रश्न निर्माण होतो की, भक्तांचा उद्धार करणारा देव आहे की नाही? (२१)

देवेंविण नुस्ती माया। कोण नेईल विलया।
आम्हां भक्तां सांभाळया। कोणीच नाहीं ॥ २२॥

देवाशिवाय या मायेचा नाश कोण करील? माया स्वतंत्र असेल आणि देवच कुणी नसेल, तर आम्हां भक्तांचा सांभाळ करायला कोणीच नाही, असे होईल. (२२)

म्हणोनि माया स्वतंतर। ऐसा न घडे कीं विचार।
मायेस निर्मिता सर्वेश्वर। तो येकचि आहे॥ २३॥

म्हणून माया स्वतंत्र हा विचार टिकू शकत नाही. मायेला निर्माण करणारा एक सर्वेश्वरच आहे. (२३)

तरी तो कैसा आहे ईश्वर। मायेचा कैसा विचार।
तरी हें आतां सविस्तर। बोलिलें पाहिजे ॥ २४॥

तरी आता तो ईश्वर कसा आहे, माया कशी आहे, इत्यादी सर्वांच्या विषयी सविस्तर बोलणे आवश्यक आहे. (२४)

श्रोतां व्हावें सावधान। येकाग्र करूनियां मन।
आतां कथानुसंधान। सावध ऐका ॥ २५॥

म्हणून श्रोत्यांनी आता सावध व्हावे व मन एकाग्र करून कथानुसंधान श्रवण करावे. (२५)

येके आशंकेचा भाव। जनीं वेगळाले अनुभव।
तेहि बोलिजेती सर्व। येथानुक्रमें ॥ २६॥

येथे जी शंका निर्माण झाली आहे, त्यासंबंधी लोकांचे अनुभव भिन्न आहेत व म्हणून मतेही भिन्न आहेत. म्हणून प्रथम त्यासंबंधी यथानुक्रमे सांगितले जाईल. (२६)

येक म्हणती देवें केली। म्हणोनि हे विस्तारली।
देवास इछ्या नस्ती जाली। तरी हे माया कैंची॥ २७॥

कुणी एक म्हणतात की, देवानेच माया उत्पन्न केली, म्हणून तिचा इतका विस्तार झाला आहे. देवाला जर इच्छाच झाली नसती, तर ही माया कोठून आली असती? (२७)

येक म्हणती देव निर्गुण। तेथें इछा करी कोण।
माया मिथ्या हे आपण। जालीच नाहीं ॥ २८॥

कुणी म्हणतात की, देव तर निर्गुण आहे, मग तेथे इच्छा कोण करणार? माया ही मिथ्याच आहे (म्हणजे केवळ भासरूप आहे.) वास्तविक ती उत्पन्न झालेलीच नाही. (२८)

येक म्हणती प्रत्यक्ष दिसे। तयेसी नाहीं म्हणतां कैसें।
माया हे अनादि असे। शक्ती ईश्वराची ॥ २९॥

कुणी म्हणतात की, ही प्रत्यक्ष दिसत असून ती नाहीच असे तुम्ही कसे म्हणता? माया ही अनादी असून ती ईश्वराची शक्ती आहे. (२९)

येक म्हणती साच असे। तरी हे ज्ञानें कैसी निरसे।
साचासारिखीच दिसे। परी हे मिथ्या ॥ ३०॥

कुणी म्हणतात की, ही खरी म्हणावी, तर स्वरूपज्ञान होताच ती नष्ट होते. म्हणून ती खऱ्यासारखी दिसत असली, तरी ती मिथ्याच आहे. (३०)

येक म्हणती मिथ्या स्वभावें। तरी साधन कासया करावें।
भक्तिसाधन बोलिलें देवें। मायात्यागाकारणें॥ ३१॥

कुणी एक म्हणतात की, ती मिथ्याच आहे तर साधन करण्याची आवश्यकता काय आहे? भगवंतांनी गीतेत मायेचा त्याग करता यावा, म्हणून भक्तिसाधना सांगितली आहे. (३१)

येक म्हणती मिथ्या दिसतें। भयें अज्ञानसन्येपातें।
साधन औषधही घेईजेतें। परी तें दृश्य मिथ्या॥ ३२॥

कुणी म्हणतात की, अज्ञानरूपी सन्निपातज्वरामुळे ती मिथ्या असून तिचे भय वाटते, म्हणून साधनरूप औषध घेतले पाहिजे. पण तरी ती दिसत असली तरी मिथ्याच आहे. (३२)

अनंत साधनें बोलिलीं। नाना मतें भांबावलीं।
तरी माया नवचे त्यागिली। मिथ्या कैसी म्हणावी॥ ३३॥

असंख्य साधने सांगितली गेली आहेत. मायेविषयी नाना मते व्यक्त झाली आहेत. त्यामुळे खरे तर मन भांबावून जाते. पण तरी तिचा काही केल्या निरास करता येत नाही. मग तिला मिथ्या कशी म्हणावी? (३३)

मिथ्या बोले योगवाणी। मिथ्या वेदशास्त्रीं पुराणीं।
मिथ्या नाना निरूपणीं। बोलिली माया॥ ३४॥

योगीजन माया मिथ्या असे म्हणतात; वेद, शास्त्रे, पुराणेही माया मिथ्या असेच म्हणतात व ज्ञानी लोकही अध्यात्म निरूपणांत अनेक प्रकारे माया मिथ्या असेच प्रतिपादन करतात. (३४)

माया मिथ्या म्हणतां गेली। हे वार्ता नाहीं ऐकिली।
मिथ्या म्हणतांच लागली। समागमें॥ ३५॥

याप्रमाणे सर्वांनी तिला मिथ्या ठरविले असले तरी ती लगेच नाहीशी झाली, असे तर कुठे ऐकू येत नाही. उलट मिथ्या म्हणताच ती येऊन चिकटते असेच दिसून येते. (३५)

जयाचे अंतरीं ज्ञान। नाहीं वोळखिले सज्जन।
तयास मायामिथ्याभान। सत्यचि वाटे॥ ३६॥

ज्याच्या अंतरी ज्ञान नाही आणि ज्याने सज्जन ओळखलेले नाहीत त्याला मायेचे मिथ्या अस्तित्व खरेच वाटते. (३६)

जेणें जैसा निश्चये केला। तयासी तैसाचि फळला।
पाहे तोचि दिसे बिंबला। तैसी माया॥ ३७॥

ज्याच्या मनांत मायेविषयी जसा निश्चय झाला असेल त्याला तसेच फळ मिळते. जो आरशात पाहात असतो त्याला आरशात स्वत:चेच प्रतिबिंब दिसते. म्हणजे तो जसा असतो, तसेच हुबेहूब प्रतिबिंब दिसते. माया ही तशीच आहे. (३७)

येक म्हणती माया कैंची। आहे तें सर्व ब्रह्मचि।
थिजल्या विघुरल्याघृताची। ऐक्यता न मोडे॥ ३८॥

कुणी एक म्हणतात की, माया कुठली? ती नाहीच मुळी. जे सर्व आहे ते ब्रह्मच आहे. तूप हे थिजलेले असो वा पातळ असो, त्याची एकरूपता मोडत नाही. (३८)

थिजलें आणी विघुरलें। हें स्वरूपीं नाहीं बोलिलें।
साहित्य भंगलें येणे बोलें। म्हणती येक॥ ३९॥

दुसरे कुणी म्हणतात की, हा दृष्टान्त योग्य नाही या दृष्टान्ताने बोलण्यात संगती राहात नाही. म्हणून हा अयोग्य आहे. कारण स्वरूपाच्या ठिकाणी घट्ट अथवा पातळ हे काहीही नाही. (३९)

येक म्हणती सर्व ब्रह्म। हें न कळे जयास वर्म।
तयाचे अंतरींचा भ्रम। गेलाच नाहीं॥ ४०॥

कुणी म्हणतात की, सर्व ब्रह्म आहे, यातील वर्म ज्याला कळत नाही त्याच्या अंतरीचा भ्रम गेलेला नाही असे जाणावे. (४०)

येक म्हणती येकचि देव। तेथें कैंचें आणिलें सर्व।
सर्व ब्रह्म हें अपूर्व। आश्चिर्य वाटे॥ ४१॥

कुणी म्हणतात, देव एकला एक आहे, (दुसरी वस्तूच नाही.) तेथे हे 'सर्व' कुठले आणले? सर्व ब्रह्म म्हणणे हे अपूर्व आणि आश्चर्यकारक वाटते. (४१)

येक म्हणती येकचि खरें। आनुहि नाहीं दुसरें।
सर्व ब्रह्म येणें प्रकारें। सहजचि जालें॥ ४२॥

कुणी म्हणतात की, एक ब्रह्म तेवढे खरे. तेथे दुसरे अणुमात्रही नाही. म्हणून याप्रकारे स्वाभाविकच सर्व ब्रह्म हेच सिद्ध झाले. (४२)

सर्व मिथ्या येकसरें। उरलें तेंचि ब्रह्म खरें।
ऐसीं वाक्यें शास्त्राधारें। बोलती येक॥ ४३॥

कुणी असे म्हणतात की, एकंदर सर्व मिथ्या जाऊन जे उरते ते खरे ब्रह्म होय आणि या म्हणण्याला शास्त्राधारही देतात. (४३)

आळंकार आणी सुवर्ण । तेथें नाहीं भिन्नपण ।
आटाआटी वेर्थ सीण । म्हणती येक ॥ ४४ ॥

कुणी म्हणतात की, सुवर्ण आणि त्याचे अलंकार यांत भिन्नपणा नाही, तसेच ब्रह्म आणि दृश्य सृष्टीत भिन्नपणा नसतो. म्हणून एक सत्य, एक मिथ्या असा काथ्याकूट करणे म्हणजे व्यर्थ शीण होय. (४४)

हीन उपमा येकदेसी । कैसी साहेल वस्तूसी ।
वर्णवेक्ती अव्यक्तासी । साम्यता न घडे ॥ ४५ ॥

आत्मवस्तूला अपूर्ण, एकदेशी उपमा कशी देता येईल ? ज्याला रंग आहे, आकार आहे, त्याच्याशी अव्यक्त ब्रह्माची तुलना कशी करता येईल ? (४५)

सुवर्णीं दृष्टी घालितां । मुळींच आहे वेक्तता ।
आळंकार सोने पाहातां । सोनेंचि असे ॥ ४६ ॥

सुवर्ण हे व्यक्त असून आपल्या दृष्टीस ते दिसू शकते. अलंकार सुवर्णाचे असल्याने तेही सोनेच होय. (४६)

मुळीं सोनेंचि हें वेक्त । जड येकदेसी पीत ।
पूर्णास अपूर्णाचा दृष्टांत । केवीं घडे ॥ ४७ ॥

मुळात सोने हे जड, एकदेशी, पीत वर्णाचे आणि व्यक्त आहे. या अपूर्णाचा दृष्टान्त परिपूर्ण अव्यक्त परब्रह्मास कसा देता येईल ? (४७)

दृष्टांत तितुका येकदेसी । देणें घडे कळायासी ।
सिंधु आणी ल्हरीसी । भिन्नत्व कैंचें ॥ ४८ ॥

दृष्टान्त हा नेहमी एकदेशीच असतो पण परब्रह्माची काही कल्पना यावी म्हणून, तो द्यावा लागतो. समुद्र आणि त्याच्या लाटा यांत भिन्नत्व कसे असेल ? (४८)

उत्तम मधेम कनिष्ठ । येका दृष्टांतें कळे पष्ट ।
येका दृष्टांतें नष्ट । संदेह वाढे ॥ ४९ ॥

दृष्टान्तांत उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे प्रकार असतात. उत्तम दृष्टान्त असेल तर विचार स्पष्टपणे कळतो. याउलट एखाद्या दृष्टान्ताने झालेले ज्ञान नष्ट होऊन संदेह मात्र वाढतो. (४९)

कैंचा सिंधु कैंची ल्हरी । अचळास चळाची सरी ।
साचाऐसी वोडंबरी । मानूंच नये ॥ ५० ॥

कसला समुद्र आणि कसली लाट ? अचळ अशा परब्रह्मास चलाची उपमा कशी शोभून दिसेल ? जादू म्हणजेच मिथ्या भास हा कधीही सत्य मानूच नये. (५०)

वोडंबरी हे कल्पना । नाना भास दाखवी जना ।
येरवी हे जाणा । ब्रह्मचि असे ॥ ५१ ॥

माया ही केवळ कल्पनाच असते. तिच्यामुळे लोकांना नाना भास दिसतात. नाहीतर ब्रह्मच सत्य आहे, हे जाणून घ्यावे. (५१)

ऐसा वाद येकमेकां । लागतां राहिली आशंका ।
तेचि आतां पुढें ऐका । सावध होऊनि ॥ ५२ ॥

याप्रकारे एकमेकांत वाद होत राहतात आणि शंका तशीच शिल्लक राहते. त्या शंकेचे निरसन पुढे केले जाईल. ते आता सावध होऊन ऐकावे. (५२)

माया मिथ्या कळों आली । परी ते ब्रह्मीं कैसी जाली ।
म्हणावी ते निर्गुणें केली । तरी ते मुळींच मिथ्या ॥ ५३ ॥

माया मिथ्या हे आता कळले, पण ती परब्रह्माच्या ठिकाणी उत्पन्न झाली कशी ? निर्गुणाने उत्पन्न केली असेही म्हणता येत नाही. कारण ती मुळातच मिथ्या आहे. ( भासरूप आहे. ) (५३)

मिथ्या शब्दीं कांहींच नाहीं । तेथें केलें कोणें काई ।
करणें निर्गुणाचा ठाईं । हेंहि अघटित ॥ ५४ ॥

मिथ्या म्हणजे काहीच नाही. या शब्दाने ती नाहीच असे कळते. मग तेथे तिला कुणी केले, हा प्रश्नच उरत नाही. शिवाय निर्गुणाचे ठायी कर्तृत्व लादणे हेही अघटितच म्हणावे लागेल. (५४)

कर्ता ठाईंचा अरूप । केलें तेंहि मिथ्यारूप ।
तथापी फेडूं आक्षेप । श्रोतयांचा ॥ ५५ ॥

कर्ता हाच मुळात अरूप आणि जे केले तेही मिथ्यारूप हे सर्वच विलक्षण आहे. पण तरी श्रोत्यांचा जो आक्षेप आहे, तो फेडणे आवश्यक असल्याने त्याचे निरसन करूया असे समर्थ म्हणतात. (५५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूक्ष्मआशंकानिरूपण' समास दुसरा समाप्त.

❑ ❑

# दशक ८ : समास ३

## सूक्ष्म आशंका

॥ श्रीराम ॥

अरे जे जालेंचि नाहीं। त्याची वार्ता पुससी काई।
तथापि सांगों जेणें कांहीं। संशय नुरे ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, अरे, जे झालेच नाही त्या विश्वाबद्दल तू प्रश्न करीत आहेस तर काय सांगावे ? तथापि तुझ्या मनांतील संशय नष्ट व्हावा, म्हणून निरूपण करतो. (१)

दोरीकरितां भुजंग। जळाकरितां तरंग।
मार्तंडाकरितां चांग। मृगजळ वाहे ॥ २ ॥

दोरी असते म्हणून भुजंग भासतो, जळ असते म्हणून तरंगाचा भास होतो, सूर्य आहे म्हणून मृगजळ प्रत्यक्ष वाहताना दिसते. (२)

कल्पनेकरितां स्वप्न दिसे। सिंपीकरितां रूपें भासे।
जळाकरितां गार वसे। निमिष्य येक ॥ ३ ॥

मनातील कल्पनेमुळे स्वप्न दिसते, शिंपला असतो, म्हणून रुपे भासते, जल असते म्हणून क्षणभर त्यात बर्फ अथवा गारा दिसून येतात. (३)

मातीकरितां भिंती जाली। सिंधुकरितां ल्हरी आली।
तिळाकरितां पुतळी। दिसों लागे ॥ ४ ॥

मातीमुळे भिंत भासते, समुद्रामुळे लहरींचा भास होतो, डोळ्यांतील बाहुल्यांमुळे दृश्य दिसू लागते. (४)

सोन्याकरितां आळंकार। तंतुकरितां जालें चीर।
कासवाकरितां विस्तार। हातापायांचा ॥ ५ ॥

तूप होतें तरी थिजलें। तरीकरितां मीठ जालें।
बिंबाकरितां बिंबलें। प्रतिबिंब ॥ ६ ॥

सोन्यामुळे अलंकार भासतात, तंतूंच्यामुळे वस्त्राचा भास होतो आणि कासवामुळे त्याचे हातपाय हे नवीन निर्माण झाल्यासारखे भासतात. तूप असते तेच घट्ट झाल्यासारखे दिसते, खाडीतील समुद्राच्या पाण्यामुळे मीठ झाल्यासारखे भासते आणि बिंबामुळे प्रतिबिंब बिंबून द्वैत भासते. (५-६)

पृथ्वीकरितां जालें झाड। झाडाकरितां छ्याया वाड।
धातुकरितां पवाड। उंच नीच वर्णाचा ॥ ७ ॥

पृथ्वीतूनच झाड होते, झाडामुळेच छायेचा भास होतो, धातू-धातू एकरूपच असतात पण त्यांच्या विविध रंगांमुळे त्यांना कमी-अधिक महत्त्व दिले जाते. (७)

आतां असो हा दृष्टांत। अद्वैतास कैंचें द्वैत।
द्वैतेंविण अद्वैत। बोलतांच न ये ॥ ८ ॥

असो. आता हे दृष्टान्त देणे पुरे झाले. अद्वैताच्या ठिकाणी द्वैत कसे असणार? पण द्वैताचा आश्रय घेतल्यावाचून अद्वैतासंबंधी बोलताच येत नाही. (८)

भासाकरितां भास भासे। दृश्याकरितां अदृश्य दिसे।
अदृश्यास उपमा नसे। म्हणोनि निरोपम ॥ ९ ॥

आपल्याला जे हे विविध भास होत असतात, त्यांच्यामुळे दृश्य विश्व हा भास कसा आहे, याची आपल्याला कल्पना येऊ शकते. या दृश्य सृष्टीचा शोध घेऊ लागले की अदृश्य अशा आत्मवस्तूची प्राप्ती होते. खरे तर जे अदृश्य आहे त्याला दृश्य वस्तूची उपमाच देता येत नाही म्हणून ते खरेतर निरुपमच आहे. (९)

कल्पनेविरहित हेत। दृश्यावेगळा दृष्टांत।
द्वैतावेगळें द्वैत। कैसें जालें ॥ १० ॥

कल्पनेशिवाय विचार करता येत नाही. दृश्यच नसेल तर त्याबद्दलचा दृष्टान्त देता येत नाही आणि मुळात द्वैत नसताना हे द्वैत आले कोठून? (१०)

विचित्र भगवंताची करणी। वर्णवेना सहस्त्रफणी।
तेणें केली उभवणी। अनंत ब्रह्मांडाची ॥ ११ ॥

(खरोखर याचे उत्तर देणे अवघड आहे.) भगवंताची करणी फार विचित्र आहे. तिचे वर्णन म्हणजे सहस्त्र मुखे असलेला शेषही करू शकत नाही. त्या भगवंतानेच अनंत ब्रह्मांडांची निर्मिती केली आहे. (११)

परमात्मा परमेश्वरु। सर्वकर्ता जो ईश्वरु।
तयापासूनि विस्तारु। सकळ जाला ॥ १२ ॥

परमात्मा परमेश्वर, जो या सर्व सृष्टीचा कर्ता असून ईश्वर म्हणून ज्यास म्हणतात, त्याच्यापासून हा अनंत ब्रह्मांडाचा विस्तार झाला आहे. (१२)

ऐसीं अनंत नामें धरी। अनंत शक्ती निर्माण करी।
तोचि जाणावा चतुरीं। मूळपुरुष ॥ १३ ॥

त्या मूळपुरुषाची वोळखण। ते मूळमायाचि आपण।
सकळ कांहीं कर्तेपण। तेथेंचि आलें ॥ १४ ॥

श्लोक

कार्यकारणकर्तृत्वे हेतु: प्रकृतिरुच्यते।

हें उघड बोलतां नये। मोडों पाहातो उपाये।
येरवीं हें पाहातां काये। साच आहे ॥ १५ ॥

देवापासून सकळ जालें। हें सर्वांस मानलें।
परी त्या देवास वोळखिलें। पाहिजे कीं ॥ १६ ॥

सिद्धांचे जें निरूपण। तें साधकांस न मने जाण।
पक्व नाहीं अंत:कर्ण। म्हणोनियां ॥ १७ ॥

अविद्यागुणें बोलिजे जीव। मायागुणें बोलिजे शिव।
मूळमायागुणें देव। बोलिजे तो ॥ १८ ॥

म्हणौनि कारण मूळमाया। अनंत शक्ती धरावया।
तेथीचा अर्थ जाणावया। अनुभवी पाहिजे ॥ १९ ॥

मूळमाया तोचि मूळपुरुष। तोचि सर्वांचा ईश।
अनंतनामी जगदीश। तयासीचि बोलिजे ॥ २० ॥

अवघी माया विस्तारली। परी हे निशेष नाथिली।
ऐसिया वचनाची खोली। विरुळा जाणे ॥ २१ ॥

ऐसें अनुर्वाच्य बोलिजे। परी हें स्वानुभवें जाणिजे।
संतसंगेंविण नुमजे। कांहीं केल्यां ॥ २२ ॥

माया तोचि मूळपुरुष। साधकां न मने हें निशेष।
परी अनंतनामी जगदीश। कोणास म्हणावें ॥ २३ ॥

नामरूप माये लागलें। तरी हें बोलणें नीटचि जालें।
येथें श्रोतीं अनुमानिलें। कासयासी ॥ २४ ॥

आता असो हे सकळ बोली। मागील आशंका राहिली।
निराकारीं कैसी जाली। मूळमाया ॥ २५ ॥

ज्याची अनंत नामे आहेत, जो अनंत शक्तींना निर्माण करतो तोच मूळपुरुष म्हणजेच मूळमाया अथवा मायाविशिष्ट ईश्वर होय असे चतुर पुरुषांनी जाणून घ्यावे. (१३)

मूळमाया म्हणजेच हा मूळपुरुष असून सर्व कर्तृत्व त्याच्या ठायीच निर्माण झाले आहे. (१४)

**अर्थ**—कार्य, कारण आणि कर्तृत्व यांचा हेतू मूळ प्रकृतीच आहे.

श्रीसमर्थ म्हणतात की, खरे पाहिले तर हे सर्व काही सत्य आहे का? परंतु हे उघड बोलता येत नाही. कारण असे बोलल्यामुळे सर्व साधनांचे खंडन केल्यासारखे होऊन उपायाऐवजी अपायच होईल. (१५)

देवापासून हे सर्व झाले, हे मत सर्वांना मान्य आहे. पण तरी तो देव कोणता, हे ओळखता तरी यायलाच पाहिजे की! (१६)

सिद्धांचे स्वानुभवाने केलेले ब्रह्मनिरूपण साधकांचे अंत:करण पक्व नसल्याने त्यांना मानवत नाही. (१७)

अविद्या उपाधियुक्त जो असतो, त्याला जीव असे म्हणतात. मायेच्या उपाधीने युक्त असतो, तो शिव म्हणून ओळखला जातो आणि मूळ प्रकृतीने युक्त जो असतो, त्यालाच परमात्मा म्हटले जाते. (१८)

म्हणून विश्वामध्ये अनंत शक्तींची धारणा मूळमायेमुळेच होत असते. पण यातील अर्थ फक्त अनुभवी पुरुषच जाणू शकतो. (१९)

स्फुरणरूप मूळमाया तिलाच मूळपुरुष, ईश्वर, सर्वेश, जगदीश इत्यादी अनंत नामे दिली जातात. (२०)

याप्रमाणे हा सर्व मायेचाच विस्तार आहे, पण ही पूर्णपणे मिथ्याच आहे. हे जे विधान केले आहे यातील सखोल अर्थ एखादाच जाणतो. (२१)

हे शब्दांत न सांगता येण्यासारखे सांगितले जात आहे खरे; पण हे स्वानुभवाने जाणता येते. पण संतसमागमाशिवाय हे काही केल्या उमजत नाही. (२२)

मूळ माया तोच मूळपुरुष असे सांगितले, तरी ते साधकाला पूर्णपणे मान्य होत नाही. त्याला असे वाटते की, मग अनंत नामे असलेला जगदीश कोणाला म्हणायचे? (२३)

परब्रह्म हे नामरूपातीत असते. नामरूपे ही सर्व मायेमुळेच उत्पन्न झाली आहेत. म्हणून अनंतनामे असलेला जगदीश म्हणजेच माया हे म्हणणे योग्यच झाले. येथे श्रोत्यांनी शंका घेण्यास खरे तर वावच नाही. (२४)

असो. आता हे सर्व बोलणे राहू दे. मागील शंका 'निराकारी मूळ माया कशी झाली?' ही तशीच राहिली आहे. (२५)

दृष्टीबंधन मिथ्या सकळ। परी तो कैसा जाला खेळ।
हेंचि आतां अवघें निवळ। करून दाऊं ॥ २६ ॥

त्या शंकेचे आता निरसन करतात की, नजरबंदीचा खेळ करतात, त्यावेळी ज्या वस्तू निर्माण करतात त्या सर्व मिथ्याच असतात. तसेच हे दृश्य जग म्हणजे नजरबंदीचा खेळच असून तो कसा खेळला जातो हेच आता स्पष्ट करून दाखवू या. (२६)

आकाश असतां निश्चळ। मधें वायो जाला चंचळ।
तैसी जाणावी केवळ। मूळमाया ॥ २७ ॥

आकाश निश्चल असताना तेथे एकाएकी चंचल वायू उत्पन्न होतो. तशी निश्चल परब्रह्माच्या ठिकाणी अकस्मात स्फुरणरूप मूळमाया उत्पन्न झाली असे जाणावे. (२७)

रूप वायोचें जालें। तेणें आकाश भंगलें।
ऐसें हें सत्य मानलें। नवचे किं कदा ॥ २८ ॥

वायू निर्माण झाला म्हणून आकाश भंगले गेले. हे कधीही सत्य मानता येत नाही. (२८)

तैसी मूळमाया जाली। आणी निर्गुणता संचली।
येणें दृष्टांतें तुटली। मागील आशंका ॥ २९ ॥

त्याप्रमाणे मूळ माया झाली आणि तरी निर्गुणता तशीच राहिली हे कसे झाले हे वरील दृष्टान्ताने कळले. त्यामुळे मागील शंका फिटली. (२९)

वायु नव्हता पुरातन। तैसी मूळमाया जाण।
साच म्हणतां पुन्हां लीन। होतसे ॥ ३० ॥

वायू ज्याप्रमाणे पूर्वी आकाशांत नव्हता, त्याचप्रमाणे मूळ माया आहे असे जाणावे. तिला सत्यही म्हणता येत नाही. कारण ती पुन्हा परब्रह्मात लीन होते. (३०)

वायो रूपें कैसा आहे। तैसी मूळमाया पाहें।
भासे परी तें न लहे। रूप तयेचें ॥ ३१ ॥

वायूचे रूप जसे आहे तशीच मूळमाया आहे असे जाणावे. ती भासते तर खरी; पण प्रत्यक्ष तिचे रूप दाखविता येत नाही. (३१)

वायो सत्य म्हणों जातां। परी तो न ये दाखवितां।
तयाकडे पाहों जातां। धुळीच दिसे ॥ ३२ ॥

वायूला सत्य म्हणायला जावे तर तो दाखवता येत नाही. त्याला पाहायचा प्रयत्न करू लागले तर धूळच दिसते. (३२)

तैसी मूळमाया भासे। भासे परी ते न दिसे।
पुढें विस्तारली असे। माया अविद्या ॥ ३३ ॥

त्याप्रमाणेच मूळमाया भासते, जाणवते पण दिसत नाही. तिच्यातूनच पुढे अविद्या माया विस्तार पावते.(३३)

जैसें वायोचेनि योगें। दृश्य उडे गगनमार्गें।
मूळमायेच्या संयोगें। तैसें जग ॥ ३४ ॥

वायूच्या योगे ज्याप्रमाणे ढग (धूळ) वगैरे आकाशमार्गाने उडू लागतात असे दिसून येते, तसेच मूळमायेच्या योगाने ही दृश्य सृष्टी दिसू लागते.(३४)

गगनीं अभाळ नाथिलें। अकस्मात उद्भवलें।
मायेचेनि गुणें जालें। तैसें जग ॥ ३५ ॥

पूर्वी आकाशात आभाळ नव्हते. नंतर अकस्मात उद्भवले, तसे मायेच्यामुळे निश्चल परब्रह्माच्या ठिकाणी जग भासू लागले. (३५)

नाथिलेंचि गगन नव्हतें। अकस्मात आलें तेथें।
तैसें दृश्य जालें येथें। तैसियापरी ॥ ३६ ॥

गगनात पूर्वीपासून आभाळ नव्हते व नंतरही राहणार नाही म्हणजेच ते नित्य नसल्याने मिथ्या होय. तसेच परब्रह्माच्या ठिकाणी हे दृश्य जग दिसते असे जाणावे. (३६)

परी त्या अभाळाकरितां। गगनाची गेली निश्चळता।
वाटे परी ते तत्वतां। तैसीच आहे ॥ ३७ ॥

त्या ढगांच्या येण्याजाण्यामुळे आकाशाची गगानाची निश्चलता गेली असे वाटते, परंतु तत्त्वत: ती तशीच असते. (३७)

तैसें मायेकरितां निर्गुण। वाटे जालें सगुण।
परी तें पाहतां संपूर्ण। जैसें तैसें ॥ ३८ ॥

त्याप्रमाणे मायेच्या योगाने निर्गुण सगुण झाले असे वाटते पण वास्तविक पाहता ते संपूर्ण जसेच्या तसेच असते.(३८)

आभाळ आलें आणि गेलें। तरी गगन तें संचलें।
तैसें गुणा नाहीं आलें। निर्गुण ब्रह्म ॥ ३९ ॥

ढग आले आणि गेले तरी आकाश जसे पूर्वी होते तसेच असते, तसेच निर्गुण ब्रह्म कधी सगुण होत नाही. ते जसेच्या तसेच संपूर्ण असते. (३९)

**नभ माथां लागलें दिसे। परी तें जैसें तैसें असे।**
**तैसें जाणावें विश्वासें। निर्गुण ब्रह्म ॥ ४० ॥**

दुरून पाहिले की आकाश अगदी डोंगरमाथ्याला भिडले आहे असे दिसते, पण वास्तविक ते जसेच्या तसेच असते, त्याप्रमाणेच निर्गुण ब्रह्म जसेच्या तसेच असते हे जाणून घ्यावे. (४०)

**ऊर्ध पाहातां आकाश। निळिमा दिसे सावकास।**
**परी तो जाणिजे मिथ्या भास। भासलासे ॥ ४१ ॥**

वर आकाशाकडे पाहिले की आकाश निळे आहे असे दिसते परंतु तो वास्तविक मिथ्याभासच भासत असतो. (४१)

**आकाश पालथें घातलें। चहूंकडे आटोपलें।**
**वाटे विश्वास कोंडिलें। परी तें मोकळेंचि असे ॥ ४२ ॥**

आकाशाकडे पाहिले की असे वाटते की त्यांनी चारी बाजूंनी जणू जगाला आवळून धरले आहे, विश्वाला कोंडले असून त्यावर पालथे घातलेल्या आच्छादनासारखे ते भासते; पण वास्तविक तो भासच असतो. ते जसेच्या तसे मोकळेच असते. (४२)

**पर्वतीं निळ रंग दिसे। परी तो तया लागला नसे।**
**अलिप्त जाणावें तैसें। निर्गुण ब्रह्म ॥ ४३ ॥**

दुरून पर्वतांकडे पाहिले की, ते निळ्या रंगाचे दिसतात पण जवळ गेले की तसे दिसत नाहीत. निळा रंग त्यांना लागलेलाच नसतो. तसेच निर्गुण ब्रह्म मायेपासून अलिप्तच असते, हे जाणून घ्यावे. (४३)

**रथ धावतां पृथ्वी चंचळ। वाटे परी ते असे निश्चळ।**
**तैसें परब्रह्म केवळ। निर्गुण जाणावें ॥ ४४ ॥**

रथ धावत असता त्यात बसणाऱ्या माणसाला पृथ्वीच धावते आहे, ती चंचल आहे असे वाटते परंतु ती निश्चलच असते. तसे निर्गुण परब्रह्म हे निश्चल असते, हे जाणावे. (४४)

**अभाळाकरितां मयंक। वाटे धावतो निशंक।**
**परी तें अवघें माईक। अभाळ चळे ॥ ४५ ॥**

आकाशात चंद्र उगवलेला असताना ढग आले तर त्या ढगांच्यामुळे नि:शंकपणे असे वाटते की चंद्रच धावतो आहे पण ते दृश्य मायिक असते म्हणजे तो केवळ भास असतो. (४५)

**झळे अथवा अग्निज्वाळ। तेणें कंपित दिसे अंत्राळ।**
**वाटे परी तें निश्चळ। जैसें तैसें ॥ ४६ ॥**

अग्नीच्या झळीने अथवा अग्नीच्या ज्वाळेमुळे अग्नीच्या वरील वातावरण कंपित झाल्यासारखे दिसते. पण वास्तविक ते जसेच्या तसे निश्चलच असते. (४६)

**तैसें स्वरूप हें संचलें। असतां वाटे गुणा आलें।**
**ऐसें कल्पनेसि गमलें। परी तें मिथ्या ॥ ४७ ॥**

तसेच ब्रह्मस्वरूप हे सर्वत्र कोंदटलेले असताना निश्चल असताना ते सगुण झाले आहे, असे कल्पनेला वाटते. पण ते वाटणे मिथ्या होय. (४७)

**दृष्टिबंधनाचा खेळ। तैसी माया हे चंचळ।**
**वस्तु शाश्वत निश्चळ। जैसी तैसी ॥ ४८ ॥**

नजरबंदीच्या खेळाप्रमाणे माया ही चंचल आहे. नजरबंदीच्या खेळात जसे क्षणोक्षणी बदल होताना दिसतात पण तो भास असतो तशी वस्तू म्हणजे परब्रह्म हे शाश्वत व निश्चल असून, जसेच्या तसेच असते. त्यात कधी बदल, परिवर्तन होत नाही. (४८)

**ऐसी वस्तु निरावेव। माया दाखवी अवेव।**
**ईचा ऐसाच स्वभाव। नाथिलीच हे ॥ ४९ ॥**

तसेच परब्रह्म निरवयव असून मायेमुळे सावयव भासते. 'जे नाही ते दाखवणे' हा तर मायेचा स्वभावच आहे. म्हणूनच ती मिथ्या आहे. (४९)

**माया पाहाता मुळींच नसे। परी हे साचाऐसी भासे।**
**उद्भवे आणि निरसे। अभाळ जैसें ॥ ५० ॥**

वास्तविक मायेला अस्तित्वच नाही तरी ती खऱ्यासारखी भासते. आकाशात ढग येतात व जातात त्याप्रमाणे ती उत्पन्न होते आणि नाश पावते. (५०)

**ऐसी माया उद्भवली। वस्तु निर्गुण संचली।**
**अहं ऐसी स्फूर्ति जाली। तेचि माया ॥ ५१ ॥**

याप्रमाणे माया उत्पन्न झाली. परब्रह्म वस्तू जशीच्या तशी निर्गुणच संचलेली आहे. बहु स्याम् असे जे स्फुरण तीच माया होय. (५१)

**गुणमायेचे पवाडे। निर्गुणीं हें काहींच न घडे।**
**परी हें घडे आणी मोडे। सस्वरूपीं ॥५२॥**

सर्व दृश्य विश्व हे गुणमय मायेचे लाघव असते. निर्गुणाच्या ठिकाणी काहीच घडत नाही, पण ब्रह्माच्या स्वस्वरूपाच्या आधारावर ही उद्‌भव व लयरूपी घडामोड होत असते. (५२)

**जैसी दृष्टी तरळली। तेणें सेनाच भासली।**
**पाहातां आकाशींच जाली। परी ते मिथ्या ॥५३॥**

दृष्टी भांबावली म्हणजे आकाशात ढगांचे खरे नसलेले आकार, सेना वगैरे भासू लागतात, पण ते मिथ्याच असतात. (५३)

**मिथ्या मायेचा खेळ। उद्भव बोलिला सकळ।**
**नाना तत्वांचा पाल्हाळ। सांडूनिया ॥५४॥**

पाल्हाळ लावून तत्त्वांचे वर्णन न करताच मिथ्या मायेच्या उद्‌भवाचा खेळ कसा चालतो ते सर्व सांगितले आहे. (५४)

**तत्वें मुळींच आहेती। वोंकार वायोची गती।**
**तेथीचा अर्थ जाणती। दक्ष ज्ञानी ॥५५॥**

मूळ मायेतच तत्त्वें आहेत. प्रथमचे चंचलत्व हाच ओंकार आहे. यातील अर्थ अथवा अभिप्राय चतुर, सावध, ज्ञानी लोकच जाणतात. (५५)

**मूळमायेचें चळण। तेंचि वायोचें लक्षण।**
**सूक्ष्म तत्त्वें तेंचि जाण। जडत्वा पावलीं ॥५६॥**

मूळ मायेची जी हालचाल तेच वायूचे लक्षण होय. प्रथम अत्यंत सूक्ष्म रूपात असलेली तत्त्वेंच जडत्व पावतात, म्हणजे स्थूल रूपात प्रगट होतात. (५६)

**ऐसीं पंचमाहांभूतें। पूर्वीं होतीं अवेक्तें।**
**पुढें जालीं वेक्तें। सृष्टिरचनेसी ॥५७॥**

अशी ही पंचमहाभूते प्रथम अव्यक्त दशेत असतात. सृष्टीची रचना होते, त्यावेळी ती व्यक्त होतात. (५७)

**मूळमायेचें लक्षण। तेंचि पंचभूतिक जाण।**
**त्याची पाहें वोळखण। सूक्ष्म दृष्टी ॥५८॥**

पांचभौतिक दृश्यसृष्टी हे मूळमायेचे लक्षण आहे. सूक्ष्म दृष्टीने त्याची ओळख करून घ्यावी. (५८)

**आकाश वायोविण। इछ्याशब्द करी कोण।**
**इच्छाशक्ति तेचि जाण। तेजस्वरूप ॥५९॥**

आकाशात जसा वायूच्या हालचालीशिवाय आवाज होत नाही. त्याचप्रमाणे निश्चल स्वरूपात या चंचलत्वाशिवाय इच्छा-स्फूर्ती होणे शक्य नाही. ती इच्छाशक्ती म्हणजेच तेज हे तत्त्व होय. (५९)

**मृदपण तेंचि जळ। जडत्व पृथ्वी केवळ।**
**ऐसी मूळमाया सकळ। पंचभूतिक जाणावी ॥६०॥**

मृदुपण हेच जलतत्त्व असून जडत्व हे पृथ्वीतत्त्व आहे. याप्रमाणे सर्व पंचमहाभूते ही मूळमाया जाणावी अथवा याप्रमाणे मूळमाया ही पांचभौतिक आहे. (६०)

**येक येक भूतांपोटीं। पंचभूतांची राहाटी।**
**सर्व कळे सूक्ष्मदृष्टी। घालून पाहातां ॥६१॥**

एका एका पंचमहाभूताच्या पोटात पंचमहाभूतांचे अस्तित्व असते. सूक्ष्म दृष्टीने विचार केला, की हे सर्व कळते. (६१)

**पुढें जडत्वास आलीं। तरी असतीं कालवलीं।**
**ऐसी माया विस्तारली। पंचभूतिक ॥६२॥**

पुढे ती व्यक्त झाली, स्थूल रूपात प्रगटली तरी एकमेकांत कालवलेली असतात. (त्यांचे मिश्रण झालेले असते.) याप्रकारे पंचमहाभूतांच्या रूपाने माया विस्तार पावली. (६२)

**मूळमाया पाहातां मुळीं। अथवा अविद्या भूमंडळीं।**
**स्वर्ग मृत्य पाताळीं। पांचचि भूतें ॥६३॥**

मूळ मायेची सर्व प्रथमची अव्यक्तस्थिती असो किंवा सर्व भूमंडळात विस्तार पावलेली अविद्या असो किंवा स्वर्ग, मृत्यू, पाताळ हे तीनही लोक असोत, सर्वत्र या पंचमहाभूतांचाच विस्तार आहे हे दिसून येते. (६३)

श्लोक

स्वर्गे मृत्यौ पाताले वा यत्किंचित्सचराचरं।
सर्वं पंचभूतकं राम षष्ठं किंचिन्न दृश्यते॥

**अर्थ**—हे रामा! स्वर्ग, मृत्यू, पाताळ किंवा जे थोडे सचराचर आहे ते सर्व पांचमहाभूतांनी भरलेले आहे. याशिवाय सहावे असे काहीही नाही.

**सत्य स्वरूप आदिअंतीं। मध्यें पंचभूतें वर्तती।**
**पंचभूतिक जाणिजे श्रोतीं। मूळमाया ॥६४॥**

आदी-अंती परब्रह्म स्वरूप हेच सत्य आहे. मध्ये पंचमहाभूते कार्यान्वित होतात. मूळमाया ही पांचभौतिकच आहे हे श्रोत्यांनी जाणून घ्यावे. (६४)

येथें उठिली आशंका। सावध होऊन ऐका।
पंचभूतें जालीं येका। तमोगुणापासुनी ॥ ६५॥

येथे शंका उत्पन्न झाली ती सावध होऊन ऐका. एका तमोगुणापासून पंचमहाभूते झाली असे म्हणतात. (६५)

मूळमाया गुणापरती। तेथें भूतें कैंचीं होती।
ऐसी आशंका हे श्रोतीं। घेतली मागां ॥ ६६॥

मूळमाया तर गुणावेगळी, गुणातीत आहे मग तेथे पंचमहाभूते कशी होतील? अशी शंका मागून श्रोत्यांनी घेतली. (६६)

ऐसें श्रोतीं आक्षेपिलें। संशयास उभें केलें।
याचें उत्तर दिधलें। पुढिले समासी ॥ ६७॥

असा आक्षेप घेऊन श्रोत्यांनी संशय व्यक्त केला आहे त्याचे उत्तर पुढील समासांत दिले जाईल. (६७)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूक्ष्मआशंकानाम' समास तिसरा समाप्त.**

❑❑

## दशक ८ : समास ४

# सूक्ष्मपंचभूते

॥ श्रीराम ॥

मागील आशंकेचें मूळ। आतां होईल प्रांजळ।
वृत्ति करावी निवळ। निमिष्य येक ॥ १॥

मागील समासात जी शंका श्रोत्यांनी विचारली होती, ती आता समूळ नष्ट होईल, अशा प्रकारे स्पष्टीकरण केले जाईल. तरी श्रोत्यांनी क्षणभर वृत्ती निर्मळ करून ऐकावे. (१)

ब्रह्मीं मूळमाया जाली। तिच्या पोटा माया आली।
मग ते गुणा प्रसवली। म्हणौनि गुणक्षोभिणी॥ २॥

परब्रह्माच्या ठिकाणी सर्वप्रथम स्फुरणरूपाने अव्यक्त सूक्ष्म अशी मूळमाया उत्पन्न झाली. नंतर तिच्याच पोटी जी माया झाली, तिच्यापासून गुण झाले, म्हणून तिला गुणक्षोभिणी माया असे म्हणतात. (२)

पुढें तिजपासाव कोण। सत्वरजतमोगुण।
तमोगुणापासून निर्माण। जालीं पंचभूतें ॥ ३॥

तिच्यापासून कोणते गुण झाले, म्हणून म्हणाल तर सत्त्वरजतमोगुण उत्पन्न झाले व तमोगुणापासून पंचमहाभूते निर्माण झाली. (३)

ऐसीं भूतें उद्भवलीं। पुढें तत्वें विस्तारलीं।
एवं तमोगुणापासून जालीं। पंचमाहांभूतें ॥ ४॥

याप्रमाणे प्रथम ती सूक्ष्मत्वाने उत्पन्न होऊन नंतर सृष्टिरूपाने विस्तारून दृश्य झाली. याप्रमाणे तमोगुणापासूनच पंचमहाभूते झाली. (४)

मूळमाया गुणापरती। तेथें भूतें कैंचीं होतीं।
ऐसी आशंका हे श्रोतीं। घेतली मागां ॥ ५॥

पूर्वी श्रोत्यांनी शंका विचारली होती की, मूळमाया तर गुणापलीकडली आहे, मग तेथे पंचमहाभूते कशी झाली? (५)

आणीक येकयेके भूतीं। पंचभूतें असतीं।
तेहि आतां कैसी स्थिती। प्रांजळ करूं ॥ ६॥

एकेका भूताच्या ठिकाणीही पंचमहाभूते आहेतच. ती स्थिती कशी आहे, हेही आता स्पष्ट करू. (६)

सूक्ष्मदृष्टीचें कौतुक। मूळमाया पंचभूतिक।
श्रोतीं विमळ विवेक। केला पाहिजे ॥ ७॥

सूक्ष्मरूपाने मूळ मायेत अव्यक्त स्वरूपात पंचभूते असतात, हे कळून येईल. मात्र श्रोत्यांनी नीट विवेक केला पाहिजे. (७)

आधीं भूतें तीं जाणावीं। रूपें कैसीं वोळखावीं।
मग ते शोधून पाहावीं। सूक्ष्मदृष्टी ॥ ८॥

त्यांनी प्रथम पंचभूतांना जाणून घ्यावे, त्यांचे रूप ओळखावे आणि मग सूक्ष्मदृष्टीने त्यांचा शोध घ्यावा. (८)

वोळखी नाहीं अंतरीं। ते वोळखावी कोणेपरी।
म्हणोनि भूतांची वोळखी चतुरीं। नावेक परिसावी ॥ ९॥

कशी ओळखायची याचे ज्ञान नाही, तरी ती ओळखावी तरी कशी? म्हणून प्रथम चतुर श्रोत्यांनी त्या भूतांना कसे ओळखावे हे क्षणभर ऐकून घ्यावे. (९)

जें जें जड आणी कठिण। तें तें पृथ्वीचें लक्षण।
मृद आणी वोलेपण। तितुकें आप ॥ १०॥

जे जे जड आणि कठीण असते ते पृथ्वीतत्त्वाचे लक्षण असते आणि मृदू आणि ओलेपणा जेथे असतो, ते जलाचे लक्षण होय. (१०)

जें जें उष्ण आणी सतेज। तें तें जाणावें पैं तेज।
आतां वायोहि सहज। निरोपिजेल ॥ ११॥

जे जे उष्ण आणि सतेज असते ते ते तेजाचे लक्षण होय. आता स्वाभाविकच वायूचे लक्षण सांगितले जाईल.(११)

चैतन्य आणी चंचळ। तो हा वायोचि केवळ।
सुन्य अवकाश निश्चळ। आकाश जाणावें ॥ १२॥

चैतन्य आणि चंचलत्व हे वायूचे लक्षण असून शून्य आणि निश्चल पोकळी हे आकाशाचे लक्षण जाणावे.(१२)

ऐसीं पंचमाहांभूतें। वोळखी धरावी संकेतें।
आतां येकीं पांच भूतें। सावध ऐका ॥ १३॥

याप्रमाणे येथे पंचमहाभूतांची लक्षणे सांगितली. त्या संकेतावरून त्यांना ओळखावे. आता प्रत्येक भूतात पाचही भूते कशी आहेत, हे सावध होऊन ऐकावे.(१३)

जें त्रिगुणाहूनि पर। त्याचा सूक्ष्म विचार।
यालागीं अति तत्पर। होऊन ऐका ॥ १४॥

जे त्रिगुणांच्याही पलीकडले आहे, त्याचा विचार अत्यंत सूक्ष्म आहे, म्हणून अतितत्पर होऊन ऐका.(१४)

सूक्ष्म आकाशीं कैसी पृथ्वी। तेचि आधीं निरोपावी।
येथें धारणा धरावी। श्रोतेजनीं ॥ १५॥

सूक्ष्म आकाशतत्त्वात पृथ्वीतत्त्व कसे आहे, तेच आधी स्पष्ट करून सांगितले जाईल. तरी श्रोत्यांनी मन एकाग्र करून ऐकावे. (१५)

आकाश म्हणजे अवकाश सुन्य। सुन्य म्हणिजे तें अज्ञान।
अज्ञान म्हणिजे जडत्व जाण। तेचि पृथ्वी ॥ १६॥

आकाश म्हणजे शून्य पोकळी आणि शून्य म्हणजे अज्ञान होय. अज्ञान म्हणजेच जडत्व होय आणि तेच पृथ्वीतत्त्व आहे. (१६)

आकाश स्वयें आहे मृद। तेंचि आप स्वतसिद्ध।
आतां तेज तेंहि विशद। करून दाऊं ॥ १७॥

आकाश स्वत: मृदू आहे आणि मृदुता हा पाण्याचा गुण आहे म्हणून याप्रमाणे तेथे आप हे तत्त्व आहे. आता तेजतत्त्व आकाशात कसे आहे, तेही स्पष्ट करू या.(१७)

अज्ञानें भासला भास। तोचि तेजाचा प्रकाश।
आतां वायो सावकाश। साकल्य सांगों ॥ १८॥

अज्ञानामुळे जो प्रकाश जाणवतो, ते तेजतत्त्व होय. तेथे आता वायुतत्त्व कसे आहे, ते नीट सांगतो.(१८)

वायु आकाशा नाहीं भेद। आकाशाइतुका असे स्तब्ध।
तथापी आकाशीं जो निरोध। तोचि वायो ॥ १९॥

वायू आणि आकाश यांत भेद नाही. आकाशाइतकाच तो स्तब्ध असतो. तथापि आकाशाच्या ठिकाणी जो प्रतिबंध असतो, तो वायू जाणावा. (१९)

आकाशीं आकाश मिसळलें। हें तों नलगे किं बोलिलें।
येणें प्रकारें निरोपिलें। आकाश पंचभूत॥ २०॥

आकाशात आकाशतत्त्व मिसळलेलेच आहे हे काही सांगण्याची आवश्यकता नाही. या प्रकारे आकाश या महाभूतात सर्व पंचमहाभूते कशी आहेत, हे स्पष्ट करून सांगितले आहे. (२०)

वायोमध्यें पंचभूतें। तेंहिं ऐका येकचित्तें।
बोलिजेती ते समस्तें। येथान्वयें ॥ २१॥

आता वायूमध्ये पंचमहाभूते कशी आहेत तेही ऐकावे ती अनुक्रमाने सांगितली जातील, ती एकचित्ताने ऐका.(२१)

हळु फूल तरी जड। हळु वारा तरी निबिड।
वायो लागता कडाड। मोडती झाडें ॥ २२॥

फूल हलके असले, तरी त्याला थोडे तरी वजन असते. वारा हळुवार वाहात असला तरी वायु-तत्त्व घनदाटच असते. वाऱ्याने कडाड् असा आवाज होऊन झाडे मोडून पडतात.(२२)

तोलेंविण झाड मोडे। ऐसें हें कहींच न घडे।
तोल तोचि तये जडे। पृथ्वीचा अंश ॥ २३॥

वजनाशिवाय झाड मोडले, असे कधीच घडत नाही. म्हणजे वायूला वजन आहे. वजन तोल हाच वायूच्या ठिकाणी असलेला पृथ्वी तत्त्वाचा अंश होय. (२३)

येथें श्रोते आशंका घेती। तेथें कैंचीं झाडें होतीं।
झाडें नव्हतीं तरी शक्ती। कठिणरूप आहे॥ २४॥

येथे श्रोत्यांनी शंका घेतली की येथे सूक्ष्म पंचमहाभूतांचे वर्णन चालले असता तेथे झाडे कोठून आली? (ती तर दृश्य सृष्टी व्यक्त झाल्यावर उत्पन्न झाली.) यावर वक्ता म्हणतो झाडे नव्हती तरी वायूच्या ठिकाणी शक्ती तर होतीच ना? म्हणून वायूची शक्ती हेच त्यातील कठीणपण आहे आणि कठीणपणा हे पृथ्वीतत्त्वाचे लक्षण आहे. म्हणजे तेथे पृथ्वीचा अंश आहेच. (२४)

वन्हीस्फुलिंग ल्रहान। कांहीं तन्ही असे उष्ण।
तैसें सूक्ष्मीं जडपण। सूक्ष्मरूपें॥ २५॥

अग्नीची अगदी लहान ठिणगी (स्फुलिंग) असली तरी तेथे अगदी किंचित का होईना उष्णता असतेच. तसे सूक्ष्म वायूमध्ये सूक्ष्मरूपाने जडपणा असतो. (२५)

मृदपण तेंचि आप। भास तेजाचें स्वरूप।
वायो तेथें चंचळरूप। सहजचि आहे॥ २६॥

वायूमध्ये जो हळुवारपणा असतो ते आपतत्त्व होय आणि त्यातील प्रकाश हा तेजाचा गुण आहे. शिवाय जेथे वायू तेथे चंचलपणा सहजच असतो. (२६)

सकळांस मिळोन आकाश। सहजचि आहे अवकाश।
पंचभूतांचे अंश। वायोमधें निरोपिले॥ २७॥

सकल भूतांमध्ये आकाश हे अवकाशरूपाने सहजच असते. याप्रमाणे वायूमध्ये पंचमहाभूतांचे अंश कसे आहेत ते स्पष्ट केले. (२७)

आतां तेजाचें लक्षण। भासलेंपण तें कठिण।
तेजीं ऐसी वोळखण। पृथ्वीयेची॥ २८॥

आता तेजामध्ये ते कसे आहेत ते सांगतात. प्रकाश हे तेजाचे जे लक्षण आहे, त्यांत जडत्व आहेच तेच पृथ्वी-तत्त्व होय. (२८)

भासला भास वाटे मृद। तेजीं आप तेंचि प्रसिद्ध।
तेजीं तेज स्वतसिद्ध। सांगणेंचि नलगे॥ २९॥

जो प्रकाश दिसला तो मृदू वाटतो. ते आपतत्त्व तेजाच्या ठिकाणचे समजावे, तेजांत तेज असते, हे तर प्रसिद्धच आहे. ते सांगण्याची आवश्यकता नाही. (२९)

तेजीं वायो ते चंचळ। तेजीं आकाश निश्चळ।
तेजी पंचभूतें सकळ। निरोपिलीं॥ ३०॥

तेजातील चंचलपणा हे वायुतत्त्व आहे तर निश्चलपणा हे आकाशतत्त्व आहे. याप्रमाणे तेजात पंचमहाभूते कशी आहेत, हे स्पष्ट केले आहे. (३०)

आतां आपाचें लक्षण। आप तेंचि जें मृदपण।
मृदपण तें कठिण। तेचि पृथ्वी॥ ३१॥

आपीं आप सहजचि असे। तेज मृदपणें भासे।
वायो स्तब्धपणें दिसे। मृदत्वाआंगी॥ ३२॥

आकाश नलगे सांगावें। तें व्यापकचि स्वभावें।
आपीं पंचभूतांची नांवें। सूक्ष्म निरोपिलीं॥ ३३॥

आप म्हणजे पाणी. आपतत्त्व तेच मृदुपण होय. हलके पाणी आणि जड पाणी असे आपण म्हणतो. जड पाण्यातील जडत्व हेच पृथ्वीतत्त्व आहे. आपांत आपतत्त्व सहजच असते. तेज हे मृदुपणाने भासते. वायू हा मृदुत्वाच्या अंगी स्तब्धपणे दिसतो आणि आकाश-तत्त्व त्याच्या व्यापक स्वभावामुळे मुद्दाम वर्णन करून सांगण्याची आवश्यकता नाही. याप्रमाणे आपाच्या ठिकाणी महाभूते कशी आहेत हे स्पष्ट करून सांगितले. (३१-३३)

आतां पृथ्वीचें लक्षण। कठिण पृथ्वी आपण।
कठिणत्वीं मृदपण। तेंचि आप॥ ३४॥

कठिणत्वाचा जो भास। तोचि तेजाचा प्रकाश।
कठिणत्वीं निरोधांश। तोचि वायो॥ ३५॥

आता पृथ्वीतत्त्वात ती कशी आहेत ते पाहू. कठीणपणा हा तर पृथ्वीतत्त्वाचा गुण आहे. त्या कठीणपणात मृदुता हे आप-तत्त्व होय. कठीणपणाचा जो भास, तो तेजाचा प्रकाश म्हणजे गुण होय. कठीणपणाच्या ठिकाणी जो प्रतिबंध तो वायू होय. (३४-३५)

आकाश सकळांस व्यापक। हा तो प्रगटचि विवेक।
आकाशींच कांहीं येक। भास भासे॥ ३६॥

आकाशतत्त्व तर सगळ्यांत व्यापून आहे, हा विचार तर प्रगटच आहे. आकाशाच्या ठिकाणी कुठलाही भास भासत असतो. (३६)

**आकाश तोडितां तुटेना। आकाश फोडितां फुटेना।**
**आकाश परतें होयेना। तिळमात्र ॥ ३७॥**

आकाशाला तोडावे म्हटले तर तुटत नाही, फोडावे म्हटले तर ते फुटत नाही. त्याला बाजूला सारावे म्हटले तर ते तिळमात्र सरकत नाही. (३७)

**असो आतां पृथ्वीअंत। दाविला भूतांचा संकेत।**
**येक भूतीं पंचभूत। तेंहि निरोपिलें ॥ ३८॥**

असो. याप्रमाणे पृथ्वीपर्यंत सर्व भूतांचे संकेताने वर्णन केले. तसेच एकेका भूतात पंचमहाभूते कशी आहेत, याचेही निरूपण केले. (३८)

**परी हें आहाच पाहातां नातुडे। बळेंचि पोटीं संदेह पडे।**
**भ्रांतिरूपें अहंता चढे। अकस्मात ॥ ३९॥**

पण वरवर पाहिले असता हे कळत नाही आणि त्यामुळे बळेच मनात संशय उत्पन्न होतो आणि त्यामुळे भ्रांती उत्पन्न होऊन अहंकार एकाएकी वाढतो. (३९)

**सूक्ष्मदृष्टीनें पाहातां। वायोचि वाटे तत्वतां।**
**सूक्ष्म वायो शोधूं जातां। पंचभूतें दिसती ॥ ४०॥**

सूक्ष्म दृष्टीने विचार केला की सर्व सूक्ष्म वायूचा खेळ आहे असे वाटते. पण सूक्ष्म वायूचा शोध घेऊ लागले की, पंचमहाभूते दिसून येतात. (४०)

**एवं पंचभूतिक पवन। तेंचि मूळमाया जाण।**
**माया आणी सूक्ष्म त्रिगुण। तेहि पंचभूतिक ॥ ४१॥**

थोडक्यात पंचमहाभूतांसह वायू म्हणजेच मूळमाया होय. माया आणि सूक्ष्म त्रिगुण तेही पंचभौतिकच आहेत. (४१)

**भूतें गुण मेळविजे। त्यासी अष्टधा बोलिजे।**
**पंचभूतिक जाणिजे। अष्टधा प्रकृती ॥ ४२॥**

पंचमहाभूतांत त्रिगुण मिळविले म्हणजे त्यांना अष्टधा म्हणतात. म्हणून अष्टधा प्रकृती ही पांचभौतिकच आहे. (४२)

**शोधून पाहिल्यावीण। संदेह धरणें मूर्खपण।**
**याची पाहावी वोळखण। सूक्ष्मदृष्टी ॥ ४३॥**

कुठल्याही गोष्टीचा शोध न घेता संदेह धरणे हा मूर्खपणा आहे. सूक्ष्म दृष्टीने विचार करून सर्वांची माहिती करून घ्यावी. (४३)

**गुणापासुनी भूतें। पावलीं पष्ट दशेतें।**
**जडत्वा येऊन समस्तें। तत्वें जालीं ॥ ४४॥**

मूळमायेच्या ठिकाणी सूक्ष्म रूपात असलेली पंचमहाभूते त्रिगुणांमुळे स्पष्ट दशेला येतात. जडत्वास येऊन समस्त तत्त्वें प्रगट होतात. (४४)

**पुढें तत्वविवंचना। पिंडब्रह्मांड तत्वरचना।**
**बोलिली असे ते जना। प्रगटचि आहे ॥ ४५॥**

यानंतर जी तत्त्वविवंचना, पिंड ब्रह्मांडातील तत्त्वरचना वगैरे सांगितली जाते, ती लोकांना माहीतच आहे. (४५)

**हा भूतकर्दम बोलिला। सूक्ष्म संकेतें दाविला।**
**ब्रह्मगोळ उभारला। तत्पूर्वीं ॥ ४६॥**

याप्रमाणे पंचमहाभूतांचे मिश्रण कसे झाले हे बुद्धिगम्य तर्काने दाखविले आहे. हे सर्व वर्णन ब्रह्मांडाची रचना होण्यापूर्वीचे आहे. (४६)

**याब्रह्मांडापैलिकडिल गोष्टी। जैं जाली नव्हती सृष्टी।**
**मूळमाया सूक्ष्मदृष्टी। वोळखावी ॥ ४७॥**

या सर्व गोष्टी, ब्रह्मांडाच्या रचनेच्या पूर्वी जेव्हा दृश्य सृष्टी झाली नव्हती, तेव्हाच्या आहेत. सूक्ष्म दृष्टीने विचार करून मूळमायेचे स्वरूप जाणून घ्यावे. (४७)

**सप्तकंचुक प्रचंड। जालें नव्हतें ब्रह्मांड।**
**मायेअविद्येचें बंड। ऐलिकडे ॥ ४८॥**

पंचमहाभूते, अहंकार आणि महत् तत्त्व ही ब्रह्मांडाची आवरणे आहेत असे मानतात. या सप्त आवरणांसह असलेल्या प्रचंड ब्रह्मांडाची रचना, तसेच माया व अविद्या माया यांचे कार्य या सर्व गोष्टी अलीकडील आहेत. (४८)

**ब्रह्मा विष्णु महेश्वर। हा ऐलिकडिल विचार।**
**पृथ्वी मेरु सप्त सागर। ऐलिकडे ॥ ४९॥**

ब्रह्मा, विष्णू, महेश्वर तसेच पृथ्वी, मेरुपर्वत, सप्तसागर यांची रचना वगैरे सर्व अलीकडील गोष्टी आहेत. (४९)

**नाना लोक नाना स्थानें। चंद्र सूर्य तारांगणें।**
**सप्त द्वीपें चौदा भुवनें। ऐलिकडे ॥ ५०॥**

अनेक लोक, अनेक स्थाने, चंद्र, सूर्य, तारांगणे, सात द्वीपे, चौदा भुवने या सर्वांची उत्पत्ती अलीकडील आहे. (५०)

**शेष कूर्म सप्त पाताळ। येकविस स्वर्गें अष्ट दिग्पाळ।**
**तेतिस कोटी देव सकळ। ऐलिकडे ॥ ५१॥**

शेष, कूर्म, सप्त पाताळ, एकवीस स्वर्ग, अष्टदिग्पाल, तेहतीस कोटी देव हे सर्व अलीकडील आहे. (५१)

बारा आदित्य अक्रा रुद्र। नव नाग सप्त ऋषेश्वर।
नाना देवांचे अवतार। ऐलिकडे ॥५२॥

बारा आदित्य, अकरा रुद्र, नवनाग, सप्तर्षी, नाना देवांचे अवतार या सर्व गोष्टी अलीकडील आहेत. (५२)

मेघ मनु चक्रवती। नाना जीवांची उत्पत्ती।
आतां असो सांगों किती। विस्तार हा ॥५३॥

मेघ, मनू, चक्रवर्ती राजे, व इतर नाना जीवांची उत्पत्ती असा हा विस्तार किती म्हणून सांगावा? म्हणून आता हे सांगणे पुरे. (५३)

सकळ विस्ताराचें मूळ। ते मूळमायाच केवळ।
मागां निरोपिली सकळ। पंचभूतिक ॥५४॥

या सर्व विस्ताराचे मूळ केवळ मूळमायाच आहे. ती मूळमाया पंचभौतिक कशी आहे, याचे सविस्तर वर्णन मागे केले आहे. (५४)

सूक्ष्मभूतें जे बोलिलीं। तेचि पुढें जडत्वा आलीं।
ते सकळहि बोलिलीं। पुढिले समासीं ॥५५॥

प्रथम ज्या सूक्ष्म पंच भूतांचे वर्णन केले आहे, तीच पुढे जडत्वास कशी आली, ते सर्व वर्णन पुढील समासात सांगितले जाईल. (५५)

पंचभूतें पृथकाकारें। पुढें निरोपिलीं विस्तारें।
वोळखीकारणें अत्यादरें। श्रोतीं श्रवण करावीं॥५६॥

पंचमहाभूतांपैकी प्रत्येकाचे स्वतंत्र, सविस्तर वर्णन पुढे केले आहे. त्याची ओळख पटावी, म्हणून श्रोत्यांनी अत्यंत आदराने ते श्रवण करावे. (५६)

पंचभूतिक ब्रह्मगोळ। जेणें कळे हा प्रांजळ।
दृश्य सांडून केवळ। वस्तुच पाविजे ॥५७॥

हा ब्रह्मांडगोल पंचभौतिक कसा आहे हे स्पष्टपणे कळले म्हणजे दृश्य सृष्टीची आसक्ती सुटून आत्मवस्तूची प्राप्ती होईल. (५७)

माहाद्वार वोलांडावें। मग देवदर्शन घ्यावें।
तैसें दृश्य हें सांडावें। जाणोनियां ॥५८॥

प्रथम महाद्वार ओलांडावे तेव्हा देवदर्शन होते. त्याप्रमाणे ह्या दृश्य सृष्टीचे रूप जाणून घेऊन तिचा त्याग करावा. (५८)

म्हणोनि दृश्याचा पोटीं। आहे पंचभूतांची दाटी।
येकपणें पडिली मिठी। दृश्य पंचभूतां ॥५९॥

या दृश्य सृष्टीच्या पोटी पंचमहाभूतांचीच गर्दी झालेली आहे. दृश्य आणि पंचमहाभूते यांची एकपणे मिठी पडली आहे म्हणजे दोन्ही एकरूपच आहेत. सर्व दृश्य हे पंचभौतिकच आहे. (५९)

एवं पंचभूतांचेंचि दृश्य। सृष्टी रचली सावकास।
श्रोतीं करून अवकाश। श्रवण करावें ॥६०॥

थोडक्यात म्हणजे पंचमहाभूतांपासून यथावकाश सर्व दृश्य सृष्टीची रचना झाली आहे. श्रोत्यांनी सावकाशपणे श्रवण करावे. (६०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूक्ष्मपंचभूतेनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.**



## दशक ८ : समास ५

# स्थूळ पंचमहाभूते स्वरूपाकाशभेद

॥ श्रीराम ॥

केवळ मूर्ख तें नेणे। ह्मणौन घडलें सांगणें।
पंचभूतांचीं लक्षणें। विशद करूनि ॥१॥

मूर्ख असतात ते पंचमहाभूतांची लक्षणे जाणत नाहीत म्हणून स्पष्ट करून सांगणे भाग पडले. (१)

पंचभूतांचा कर्दम जाला। आतां नवचे वेगळा केला।
परंतु कांहीं येक वेगळाला। करून दाऊं ॥२॥

पंचमहाभूतांचे मिश्रण झालेले आहे. आता त्यांना वेगळे करता येत नाही. परंतु, काही एक वेगळे करून दाखवू. (२)

पर्वत पाषाण शिळा शिखरें। नाना वर्णें ल्हान थोरें।
खडे गुंडे बहु प्रकारें। जाणिजे पृथ्वी ॥३॥

पर्वत, पाषाण, शिळा, शिखरे, नाना रंगांचे लहान मोठे खडे, गुंडे इत्यादी ही पृथ्वी जाणावी. (३)

**नाना रंगांची मृत्तिका। नाना स्थळोस्थळीं जे कां।**
**वाळुकें वाळु अनेका। मिळोन पृथ्वी ॥ ४॥**

नाना रंगांची माती, नाना ठिकाणची वाळवंटे, अनेक प्रकारची वाळू सर्व मिळून पृथ्वीच आहे. (४)

**पुरें पट्टणें मनोहरें। नाना मंदिरें दामोदरें।**
**नाना देवाळ्यें शिखरें। मिळोन पृथ्वी ॥ ५॥**

नाना नगरे, मनोहर पट्टणे, नाना मंदिरे व रत्नखचित मंदिरे म्हणजे दामोदरे, नाना देवालये व त्यांची शिखरे सर्व मिळून पृथ्वीच आहे. (५)

**सप्त द्वीपावती पृथ्वी। काये ह्मणोनि सांगावी।**
**नव खंडें मिळोन जाणावी। वसुंधरा ॥ ६॥**

सप्तद्वीपे असलेली नऊ खंडे मिळून सर्व वसुंधरा म्हणजे ही पृथ्वीच आहे. (६)

**नाना देव नाना नृपती। नाना भाषा नाना रिती।**
**लक्ष चौऱ्यासी उत्पत्ती। मिळोन पृथ्वी ॥ ७॥**

नाना देव, नाना राजे, नाना भाषा, नाना रीती, चौऱ्यांशी लक्ष योनी सर्व मिळून पृथ्वीच आहे. (७)

**नाना उद्वसें जें वनें। नाना तरुवरांचीं बनें।**
**गिरीकंदरें नाना स्थानें। मिळोन पृथ्वी ॥ ८॥**

उद्ध्वस्त झालेली अनेक वने, तसेच व्यवस्थितपणे लावलेल्या अनेक बागा, गिरिकंदरे इत्यादी नाना स्थाने मिळून पृथ्वीच आहे. (८)

**नाना रचना केली देवीं। जे जे निर्मिली मानवीं।**
**सकळ मिळोन पृथ्वी। जाणिजे श्रोतीं ॥ ९॥**

देवांनी केलेली सर्व बहुविध रचना व मानवाने जी विविध निर्मिती केली आहे ती सर्व पृथ्वीच आहे. (९)

**नाना धातु सुवर्णादिक। नाना रत्नें जे अनेक।**
**नाना काष्ठवृक्षादिक। मिळोन पृथ्वी ॥ १०॥**

सुवर्णादी अनेक धातू, अनेक प्रकारची रत्ने व अनेक काष्ठ- वृक्षादी सर्व मिळून पृथ्वीच आहे. (१०)

**आतां असो हें बहुवस। जडांश आणी कठिणांश।**
**सकळ पृथ्वी हा विश्वास। मानिला पाहिजे ॥ ११॥**

आता हे किती म्हणून सांगावे ? ज्या ज्या वस्तूमध्ये जडांश आणि कठिणांश आहे ती सर्व पृथ्वी असा विश्वास धरला पाहिजे. (११)

**बोलिलें पृथ्वीचें रूप। आतां सांगिजेल आप।**
**श्रोतीं वोळखावें रूप। सावध होऊनी ॥ १२॥**

प्रथम पृथ्वीचे रूपाबद्दल सांगितले. आता आपाचे रूपाबद्दल सांगतो, ते श्रोत्यांनी सावध होऊन जाणून घ्यावे व ओळखावे. (१२)

**वापी कूप सरोवर। नाना सरितांचें जें नीर।**
**मेघ आणी सप्त सागर। मिळोन आप ॥ १३॥**

विहिरी, आड, सरोवरे, अनेक नद्यांचे पाणी, मेघ आणि सप्तसागर हे सर्व मिळून आप होय. (१३)

श्लोक

क्षारक्षीरसुरासर्पिर्दधि इक्षुर्जलं तथा॥

**अर्थ**—खारट पाणी, दूध, मध, तूप, दही, उसाचा रस व गोड पाणी असे सात समुद्र आहेत.

**क्षारसमुद्र दिसताहे। सकळ जन दृष्टीस पाहे।**
**जेथें लवण होताहे। तोचि क्षारसिंधु ॥ १४॥**

खारा समुद्र सगळ्या लोकांना प्रत्यक्ष दिसतोच आहे. ज्यातून मीठ निर्माण होते तो क्षारसिंधू होय. (१४)

**येक दुधाचा सागर। त्या नांव क्षीरसागर।**
**देवें दिधला निरंतर। उपमन्यासी ॥ १५॥**

एक दुधाचा सागर आहे. त्याचे नाव क्षीरसागर आहे. तो देवाने उपमन्यूला निरंतर देऊन टाकला आहे. (१५)

**येक समुद्र मद्याचा। येक जाणावा घृताचा।**
**येक निखळ दह्याचा। समुद्र असे ॥ १६॥**

एक मद्याचा समुद्र आहे. एक तुपाचा समुद्र आहे. तर केवळ दह्याचा एक समुद्र आहे. (१६)

**येक उसाच्या रसाचा। येक तो शुद्ध जळाचा।**
**ऐसा सातां समुद्रांचा। वेढा पृथ्वीयेसी ॥ १७॥**

एक उसाच्या रसाचा समुद्र आहे तर एक केवळ शुद्ध पाण्याचा आहे. अशा सात समुद्रांचा पृथ्वीला वेढा आहे. (१७)

एवं भूमंडळीचें जळ। नाना स्थळींचें सकळ।
मिळोन अवघें केवळ। आप जाणावें ॥ १८॥

यात्रमाणे सर्व भूमंडळातील जळ एवढेच नव्हे तर इतर अनेक ठिकाणांचे सर्व जल ते सर्व मिळून आप जाणावे. (१८)

पृथ्वीगर्भी कितियेक। पृथ्वीतळीं आवर्णोदक।
तिहीं लोकींचें उदक। मिळोन आप ॥ १९॥

पृथ्वीच्या गर्भातील जल तसेच पृथ्वीभोवतालच्या वातावरणातील सर्व जलांश एवढेच नव्हे, तर त्रैलोक्यांतील सर्व उदक मिळून आप जाणावे. (१९)

नाना वल्ली बहुवस। नाना तरुवरांचे रस।
मध पारा अमृत विष। मिळोन आप ॥ २०॥

नाना प्रकारच्या वेली, नाना तरुवरांचे रस, मध, पारा, अमृत, विष सर्व मिळून आपच आहे. (२०)

नाना रस स्नेहादिक। याहि वेगळे अनेक।
जळावेगळें अवश्यक। आप बोलिजे ॥ २१॥

नाना रस, तेलादी, याखेरीज अनेक वेगळे रस, जल व त्याशिवायही जे मृदु, शीतल, ओले आहे ते ते सर्व आप समजावे. (२१)

सारद्र आणी सीतळ। जळसारिखें पातळ।
शुक्लीत श्रोणीत मूत्रलाळ। आप बोलिजे ॥ २२॥

ओले आणि शीतल, तसेच जळासारखे पातळ असे जे रेत, रक्त, मूत्र, लाळ इत्यादी तेही आपच समजावे. (२२)

आप संकेतें जाणावें। पातळ वोलें वोळखावें।
मृद सीतळ स्वभावें। आप बोलिजे ॥ २३॥

जे जे पातळ, ओले, मृदू आणि शीतल स्वभावाचे असेल, ते आपण संकेताने आप म्हणून ओळखावे. (२३)

जाला आपाचा संकेत। पातळ मृद गुळगुळित।
स्वेद श्लेष्मा अश्रु समस्त। आप जाणावें ॥ २४॥

पातळ, मृदू आणि गुळगुळीत ही जलाची खूण आहे. म्हणून घाम, कफ, पडसे व अश्रू आदी सर्व आप समजावे. (२४)

तेज ऐका सावधपणें। चंद्र सूर्य तारांगणें।
दिव्य देह सतेजपणें। तेज बोलिजे ॥ २५॥

आता तेजाविषयी सावधपणे ऐका. चंद्र, सूर्य, तारांगणे, तसेच तेजोमय दिव्यदेह हे तेज जाणावे. (२५)

वन्ही मेघीं विद्युल्यता। वन्ही सृष्टी संव्हारिता।
वन्ही सागरा जाळिता। वडवानळु ॥ २६॥

अग्नी, मेघात जी विद्युल्लता चमकते ते तेजतत्त्व होय. तसेच सर्व सृष्टीचा संहार करणारा प्रलयाग्नी आणि सागराला जाळणारा वडवानल, (२६)

वन्ही शंकराचे नेत्रींचा। वन्ही काळाचे क्षुधेचा।
वन्ही परीघ भूगोळाचा। तेज बोलिजे ॥ २७॥

तसेच शंकराच्या नेत्रांतील अग्नी, सर्वांना भक्षण करणारा जो काळ त्याची भूक असणारा अग्नी आणि पृथ्वीच्या भोवतालच्या वातावरणातील अग्नी हे सर्व तेजतत्त्व होय. (२७)

जें जें प्रकाशरूप। तें तें तेजाचें स्वरूप।
शोषक उष्णादि आरोप। तेज जाणावें ॥ २८॥

जे जे प्रकाशरूप असेल, ते ते तेजाचेच स्वरूप होय. तसेच शोषकता, उष्णता यांचे आरोपही तेज-तत्त्वामुळेच होतात. (२८)

वायो जाणावा चंचळ। चैतन्य चेतवी केवळ।
बोलणें चालणें सकळ। वायोमुळें ॥ २९॥

आता वायूसंबंधी ऐका. वायू हा चंचल समजावा. चैतन्य वायूमुळे जाणवते. सर्व शरीराच्या हालचाली, बोलणे, चालणे इत्यादी वायूमुळे होतात. (२९)

हाले डोले तितुका पवन। कांहीं न चले पवनेंविण।
सृष्टी चाळाया कारण। मूळ तो वायो ॥ ३०॥

हलणे, डोलणे वगैरे क्रिया वायूमुळेच होतात. वायूशिवाय चलनवलन काही होऊच शकत नाही. सृष्टीतील सर्व घडामोडी, क्रिया यांना मूळ वायूच कारणीभूत आहे. (३०)

चळण वळण आणी प्रासारण। निरोध आणी अकोचन।
सकळ जाणावा पवन। चंचळरूपी ॥ ३१॥

चलनवलन, प्रसरण आणि आकुंचन व निरोध यामागे चंचल असे वायुतत्त्वच असते हे जाणून घ्यावे. (३१)

प्राण अपान आणी व्यान। चौथा उदान आणी समान।
नाग कूर्म कर्कश जाण। देवदत्त धनंजये ॥ ३२॥

आपल्या शरीरातील प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे पंचप्राण व नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हे पाच उपप्राण हे वायुतत्त्व होय. (३२)

**जितुकें कांहीं होतें चळण। तितुकें वायोचें लक्षण।**
**चंद्र सूर्य तारांगण। वायोचि धर्ता ॥ ३३॥**

जितके काही चलन म्हणजे हालचाल होते ती वायुतत्त्वामुळेच होते. चंद्र, सूर्य, तारांगण यांना वायूच धारण करतो. (३३)

**आकाश जाणावें पोकळ। निर्मळ आणी निश्चळ।**
**अवकाशरूप सकळ। आकाश जाणावें ॥ ३४॥**

यानंतर आकाशाचे वर्णन करीत आहेत. आकाश हे पोकळ, निर्मळ आणि निश्चल असून सर्व अवकाश हे आकाशच आहे, हे जाणून घ्यावे. (३४)

**आकाश सकळांस व्यापक। आकाश अनेकीं येक।**
**आकाशामध्यें कौतुक। चहूं भूतांचें ॥ ३५॥**

सर्व ब्रह्मांडाला आकाशाने व्यापले आहे. अनेकांना ते एकटेच व्यापून आहे आणि पृथ्वी, आप, तेज व वायू या इतर चार भूतांचे कार्य आकाशात चालते. (३५)

**आकाशाऐसें नाहीं सार। आकाश सकळांहून थोर।**
**पाहातां आकाशाचा विचार। स्वरूपासारिखा ॥ ३६॥**

आकाशासारखे सार नाही. सर्वांहून आकाश श्रेष्ठ आहे. आकाशाचा विचार करू लागले की, स्वरूपाशी त्याचे साम्य आहे असे वाटू लागते. (३६)

**तंव शिष्यें केला आक्षेप। दोहींचें सारखेंचि रूप।**
**तरी आकाशचि स्वरूप। कां म्हणों नये ॥ ३७॥**

असे म्हणताच शिष्याने आक्षेप घेतला की, आकाशाचे आणि स्वरूपाचे रूप जर सारखेच आहे, तर आकाशच स्वरूप आहे असे का म्हणू नये? (३७)

**आकाश स्वरूपा कोण भेद। पाहातां दिसती अभेद।**
**आकाश वस्तुच स्वतसिद्ध। कां न म्हणावी ॥ ३८॥**

आकाशात आणि स्वरूपात काय भेद आहे? वर-वर पाहता दोन्हीत भेद नाही, असेच वाटते. मग आकाश ही स्वयंसिद्ध आत्मवस्तू म्हणजेच परब्रह्म असे का म्हणू नये? (३८)

**वस्तु अचळ अढळ। वस्तु निर्मळ निश्चळ।**
**तैसेंचि आकाश केवळ। वस्तुसारिखें ॥ ३९॥**

आत्मवस्तू अचल, अढळ, निर्मळ व निश्चल असते. आकाशही केवळ वस्तूसारखेच आहे. (३९)

**ऐकोनि वक्ता बोले वचन। वस्तु निर्गुण पुरातन।**
**आकाशाआंगीं सप्त गुण। शास्त्रीं निरोपिले ॥ ४०॥**

हे ऐकून वक्ता बोलू लागला की, वस्तू ही पुरातन असून, निर्गुण आहे. तर आकाशाच्या अंगी सात गुण आहेत, असे शास्त्रात सांगितले आहे. (४०)

**काम क्रोध शोक मोहो। भय अज्ञान सुन्यत्व पाहो।**
**ऐसा सप्तविध स्वभावे। आकाशाचा ॥ ४१॥**

काम, क्रोध, शोक, मोह, भय, अज्ञान आणि शून्यत्व असा आकाशाचा सात गुणांनी युक्त असा स्वभाव आहे. (४१)

**ऐसें शास्त्राकारें बोलिलें। ह्मणौनि आकाश भूत जालें।**
**स्वरूप निर्विकार संचलें। उपमेरहित ॥ ४२॥**

शास्त्रात असे म्हटले आहे म्हणून आकाशाला भूत असे म्हटले जाते. स्वरूप हे निर्विकार असून निरुपम व सर्वत्र व्यापून राहिले आहे. (४२)

**काचबंदि आणी जळ। सारिखेंच वाटे सकळ।**
**परी येक काच येक जळ। शाहाणे जाणती ॥ ४३॥**

काचेची जमीन आणि पाणी ही दोन्ही डोळ्यांना सारखीच दिसतात पण शहाणे लोक काच कुठली आणि जळ कोठले, हे अचूक ओळखतात. (४३)

**रुवामध्यें स्फटिक पडिला। लोकीं तद्रूप देखिला।**
**तेणें कपाळमोक्ष जाला। कापुस न करी ॥ ४४॥**

कापसामध्ये स्फटिक पडला तर लोकांना तो त्याच्यासारखा दिसतो. पण स्फटिक कठीण असल्याने कपाळमोक्ष करू शकतो, कापूस करत नाही. (४४)

**तंदुलामधें श्वेत खडे। तंदुलासारिखेच वांकुडे।**
**चाऊं जातां दांत पडे। तेव्हां कळे ॥ ४५॥**

तांदळात पांढरे खडे असतात. ते तांदळाच्या आकारासारखेच वाकडे असतात. म्हणून प्रथमदर्शनी ओळखू येत नाहीत; पण चावायला गेले तर दात पडतो, तेव्हा ते खडे आहेत हे कळते. (४५)

**त्रिभागामधें खडा असे। त्रिभागासारिखाच भासे।**
**शोधूं जातां वेगळा दिसे। कठिणपणें ॥ ४६॥**

चुना, वाळू आणि ताग यांच्या मिश्रणांत खडा पडला तर तो त्या मिश्रणासारखाच भासतो. पण शोध घेतल्यावर तो त्याच्या कठीणपणामुळे त्या मिश्रणाहून वेगळा आहे हे कळून येते. (४६)

**गुळसारिखा गुळदगड। परी तो कठिण निचाड।**
**नागकांडी आणी वेखंड। येक म्हणों नये ॥ ४७॥**

गूळदगड हा गुळासारखा दिसतो पण तो पूर्णपणे कठीण असतो. नागकांडी आणि वेखंड सारखी दिसतात, पण म्हणून त्यांना एक म्हणू नये. (४७)

**सोनें आणी सोनपितळ। येकचि वाटती केवळ।**
**परी पितळेसी मिळतां ज्वाळ। काळिमा चढे ॥ ४८॥**

सोने आणि सोनपितळ अगदी एकसारखीच दिसतात. पण पितळ जर अग्नीत टाकले तर काळे पडते. (४८)

**असो हे हीन दृष्टांत। आकाश म्हणिजे केवळ भूत।**
**तें भूत आणि अनंत। येक कैसे ॥ ४९॥**

आता हे हीन दृष्टान्त देणे पुरे झाले. आकाश हे एक भूत आहे. ते भूत आणि अनंत असा परमात्मा एक कसे असू शकतील? (४९)

**वस्तुसी वर्णचि नसे। आकाश शामवर्ण असे।**
**दोहींस साम्यता कैसे। करिती विचक्षण ॥ ५०॥**

आत्मवस्तूला रंगच नाही. आकाश शामवर्णी निळ्या रंगाचे आहे. मग विचारवंत त्या दोन्हींत साम्य आहे, असे कसे म्हणतील? (५०)

**श्रोते म्हणती कैंचें रूप। आकाश ठाईंचें अरूप।**
**आकाश वस्तुच तद्रूप। भेद नाहीं ॥ ५१॥**

श्रोते म्हणू लागले की, आकाशाला कसले आले आहे रूप? ते ठायीच अरूपच आहे, म्हणून वस्तू आणि आकाश यांत भेद नाही. (५१)

**चहूं भूतांस नाश आहे। आकाश कैसें नासताहे।**
**आकाशास न साहे। वर्ण वेक्ती विकार॥ ५२॥**

इतर चार भूते नाश पावतात, पण आकाश कुठे नाश पावते? शिवाय त्याच्या ठिकाणी रंग व दृश्यत्व हे विकारही नाहीत. (५२)

**आकाश अचळ दिसतें। त्याचें काये नासों पाहातें।**
**पाहातां आमुचेनि मतें। आकाश शाश्वत ॥ ५३॥**

आकाश अचळ आहे. शिवाय ते नाश पावते, असे आपण म्हणता. पण त्याचे काय नाश पावते, हे आम्हांला कळत नाही. आमच्या मते तर आकाश शाश्वत आहे. (५३)

**ऐसें ऐकोन वचन। वक्ता बोले प्रतिवचन।**
**ऐका आतां लक्षण। आकाशाचें ॥ ५४॥**

हे वचन ऐकून वक्ता म्हणाला की, आता याचे उत्तर ऐका. मी तुला आकाशाचे लक्षण सांगतो. (५४)

**आकाश तमापासून जालें। म्हणौन कामक्रोधें वेष्टिलें।**
**अज्ञान सुन्यत्व बोलिलें। नाम तयाचें ॥ ५५॥**

आकाश हे तमोगुणापासून झाले. (कारणाचे गुण कार्यात येतात) म्हणून ते कामक्रोधादींनी वेढलेले आहे. शून्यत्वरूपी अज्ञान असे त्याला म्हणतात. (५५)

**अज्ञानें कामक्रोधादिक। मोहो भये आणी शोक।**
**हा अज्ञानाचा विवेक। आकाशागुणें ॥ ५६॥**

अज्ञानामुळेच काम, क्रोध, शोक, मोह, भय इत्यादी त्याच्या ठिकाणी असतात. शून्यत्व म्हणजे अज्ञान ते आकाशाच्या ठिकाणी आहे. म्हणून आकाशाच्या ठिकाणी हे सर्व असते. (५६)

**नास्तिक नकारवचन। तेंचि सुन्याचें लक्षण।**
**तयास म्हणती हृदयसुन्य। अज्ञान प्राणी ॥ ५७॥**

नास्तिकता व नकार वचन म्हणजेच 'काही नाही' हेच शून्यत्व. हे शून्याचे लक्षण आहे म्हणूनच ज्याच्या ठिकाणी दया-माया नसते, त्या प्राण्याला हृदयशून्य म्हटले जाते. तसेच ज्याच्या हृदयात शून्य म्हणजेच अज्ञान आहे, तो अज्ञानी माणूस असाही अर्थ होतो. (५७)

**आकाश स्तब्धपणें सुन्य। सुन्य म्हणिजे तें अज्ञान।**
**अज्ञान म्हणिजे कठिण। रूप तयाचें ॥ ५८॥**

आकाशाची स्तब्धता हीच त्याची शून्यता. शून्य म्हणजे अज्ञान आणि अज्ञान म्हणजे काठिण्य हे आकाशाचे रूप आहे. (५८)

**कठिण सुन्य विकारवंत। तयास कैसें म्हणावें संत।**
**मनास वाटे हें तद्वत। आहाच दृष्टी ॥ ५९॥**

कठीण, शून्य आणि विकारवंत आकाशाला सत्स्वरूप कसे म्हणावे? वरवर पाहिले असता ते स्वस्वरूपासारखे मनास वाटते. (५९)

**अज्ञान कालवलें आकाशीं। तया कर्दमा ज्ञान नासी।**
**म्हणोनियां आकाशासी। नाश आहे ॥ ६०॥**

आकाशात अज्ञान मिसळलेले असते. त्या मिश्रणाला ज्ञान नष्ट करते म्हणून आकाशाला नाश आहे. (६०)

तैसें आकाश आणि स्वरूप। पाहातां वाटती येकरूप।
परी दोहींमधें विक्षेप। सुन्यत्वाचा ॥ ६१ ॥

म्हणून आकाश आणि स्वरूप वरवर पाहता एकरूप वाटतात, पण दोहोंमधील शून्यत्वात फरक आहे. (६१)

आह्मच पाहातां कल्पनेसी। सारिखेंच वाटे निश्चयेंसीं।
परी आकाश स्वरूपासी। भेद आहे ॥ ६२ ॥

वरवर पाहाता कल्पनेला दोन्ही सारखेच वाटते, पण (विचार केला असता कळते की) आकाशात आणि स्वरूपात निश्चितच भेद आहे. (६२)

उन्मनी आणि सुषुप्ति अवस्ता। सारिखेंच वाटे तत्वता।
परी विवंचून पाहों जातां। भेद आहे ॥ ६३ ॥

ज्याप्रमाणे उन्मनी अवस्था आणि सुषुप्ती अवस्था वरवर पाहिले असता सारख्या वाटतात, पण विश्लेषण करून सखोल विचार केला असता कळून येते की, त्या दोन्ही अवस्थांमध्ये भेद आहे. (सुषुप्तीमध्ये अज्ञान बीजरूपाने शिल्लक असते. उन्मनीत अज्ञान संपूर्ण नष्ट होऊन स्वस्वरूपाशी पूर्ण तादात्म्य झालेले असते. हा फार मोठा फरक आहे.) (६३)

खोटें खऱ्यासारिखें भाविती। परी परीक्षवंत निवडिती।
कां कुरंगें देखोन भुलती। मृगजळासी ॥ ६४ ॥

सामान्य लोक खोट्याला खऱ्याप्रमाणे मानतात पण पारखी असतात त्यांना खऱ्याखोट्याची पारख असल्याने ते खरेच निवडून घेतात. मृगजळाला पाहून हरणे जशी भुलतात तशी अज्ञानी लोकांची स्थिती असते. (६४)

आतां असो हा दृष्टांत। बोलिला कळाया संकेत।
म्हणौनि भूत आणी अनंत। येक नव्हेती ॥ ६५ ॥

आता हे सर्व राहू दे. संकेत कळावा म्हणून हा दृष्टान्त दिला आहे. म्हणून आकाश हे भूत आणि अनंत अशी परब्रह्म वस्तू एक नव्हेत. (६५)

आकाश वेगळेपणें पाहावें। स्वरूपीं स्वरूपचि व्हावें।
वस्तुचें पाहाणें स्वभावें। ऐसें असे ॥ ६६ ॥

आकाश हे वेगळेपणाने पाहाता येते! वस्तूला पाहणे म्हणजे स्वरूपी स्वरूपच होणे अशा प्रकारचे असते. तेथे वस्तू आणि ती पाहणारा असे द्वैत उरतच नाही. (६६)

येथें आशंका फिटली। संदेहवृत्ती मावळली।
भिन्नपणें नवचे अनुभवली। स्वरूपस्थिती ॥ ६७ ॥

येथे आता शंका नाहीशी झाली व त्यामुळे संदेह वृत्ती नष्ट झाली. स्वरूपस्थिती ही कधीही भिन्नपणे अनुभवता येत नाही. (६७)

आकाश अनुभवा येतें। स्वरूप अनुभवापरतें।
म्हणोनिया आकाशातें। साम्यता न घडे ॥ ६८ ॥

आकाशाचा अनुभव भिन्नपणे घेता येतो पण स्वरूप हे अनुभवणाऱ्याच्या पलीकडले आहे. म्हणून स्वरूप आणि आकाश यांत साम्य असू शकत नाही. (६८)

दुग्धासारिखा जळांश। निवडूं जाणती राजहंस।
तैसें स्वरूप आणी आकाश। संत जाणती ॥ ६९ ॥

मिसळलेले दूध आणि पाणी हे दोन्ही एकरूप वाटले तरी राजहंस वेगळे करू शकतात, त्याप्रमाणे आकाश आणि स्वरूप यांतील भेद संतच जाणतात. (६९)

सकळ माया गथागोवी। संतसंगे हे उगवावी।
पाविजे मोक्षाची पदवी। सत्समागमें ॥ ७० ॥

ही सर्व मायेची गुंतागुंत आहे. संतसमागम केला असता हे सर्व कोडे उलगडते. म्हणून संतसमागम करून मोक्षपदाची प्राप्ती करून घ्यावी. (७०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'स्थूळपंचमहाभूतेंस्वरूपाकाशभेदोनाम' समास पाचवा समाप्त.



## दशक ८ : समास ६

# दुश्चीतनिरूपण

॥ श्रीराम ॥

श्रोता विनवी वक्तयासी । सत्संगाची महिमा कैसी ।
मोक्ष लाभे कितां दिवसीं । हें मज निरोपावें ॥ १ ॥

श्रोता वक्त्याला विनंती करीत आहे की, आपण मला सत्संगाचा महिमा कसा आहे तो वर्णन करून सांगावा. किती दिवस सत्संग केला असता मोक्ष लाभतो, हेही मला समजावून सांगा. (१)

धरितां साधूची संगती । कितां दिवसां होते मुक्ती ।
हा निश्चय कृपामूर्ती । मज दीनास करावा ॥ २ ॥

हे कृपामूर्ती, साधूची संगती केल्याने किती दिवसांनी मुक्ती प्राप्त होते त्यासंबंधी निश्चित मत मज-दीनाला सांगा. (२)

मुक्ती लाभे तत्क्षणीं । विश्वासतां निरूपणीं ।
दुश्चीतपणें हानी । होतसे ॥ ३ ॥

यावर वक्त्याने उत्तर दिले की, दृढ विश्वास असेल तर निरूपण श्रवण करताक्षणीच तात्काळ मुक्ती लाभते, पण दुश्चितपणे, भांबावलेपणाने श्रवण केले, तर मात्र हानी होते. (३)

सुचितपणें दुश्चीत । मन होतें अकस्मात ।
त्यास करावें निवांत । कोणे परीं ॥ ४ ॥

यावर श्रोत्याने परत प्रश्न केला की, सुचितपणे म्हणजे एकाग्रमनाने श्रवण करीत असता अकस्मात एकाएकी मन दुश्चित होते. म्हणजे भांबावून जाते. तरी परत त्याला शांत कसे करावे, हे सांगा. (४)

मनाच्या तोडून वोढी । श्रवणीं बैसावें आवडी ।
सावधपणें घडीनें घडी । काळ सार्थक करावा ॥ ५ ॥

यावर वक्ता उत्तर देत आहे की, मनाची प्रयत्नपूर्वक विषयाकडील ओढ तोडून अत्यंत आवडीने आणि क्षणोक्षणी अत्यंत सावध राहून श्रवण करावे व काळ सार्थकी लावावा. (५)

अर्थप्रमेय ग्रंथांतरीं । शोधून घ्यावें अभ्यांतरीं ।
दुश्चीतपण आलें तरी । पुन्हां श्रवण करावें ॥ ६ ॥

अर्थ व सारभूत सिद्धान्त नीट समजून घ्यावे व ग्रंथांतरी त्याचा शोध घेऊन अंतरात त्याचे मनन करावे. मध्येच मन अस्वस्थ झाले, तरी श्रवण सोडू नये. पुन्हापुन्हा श्रवण करीत असावे. (६)

अर्थांतर पाहिल्यावीण । उगेंचि करी जो श्रवण ।
तो श्रोता नव्हे पाषाण । मनुष्यवेषें ॥ ७ ॥

अर्थ नीट समजून न घेता, जो उगीचच श्रवण करतो, तो श्रोता नसून मनुष्यवेषातील पाषाणच होय. (७)

येथें श्रोते मानितील सीण । आम्हांस केलें पाषाण ।
तरी पाषाणाचें लक्षण । सावध ऐका ॥ ८ ॥

आता हे ऐकून श्रोत्यांना वाईट वाटेल की, आपल्याला पाषाण ठरवले, तर आता पाषाणाचे लक्षण ऐका. (८)

वांकुडा तिकडा फोडिला । पाषाण घडून नीट केला ।
दुसरे वेळेसी पाहिला । तरी तो तैसाचि असे ॥ ९ ॥

वाकडातिकडा असलेला दगड फोडून त्याला नीट केला, काही विशिष्ट आकार दिला, तर परत दुसऱ्या वेळेला त्याला पाहिला की, ज्या स्थितीत आपण त्याला ठेवलेला असतो, त्याच स्थितीत तो जसाच्या तसाच असतो. (९)

टांकीनें खपली फोडिली । ते मागुती नाहीं जडली ।
मनुष्याचीकुबुद्धि झाडिली । तरी ते पुन्हा लागे ॥ १० ॥

दगडाची खपली टाकीने तोडली की, ती परत दगडाला चिकटत नाही. पण मनुष्याचे तसे नाही. त्याची कुबुद्धी झाडली, तरी ती पुन्हा येऊन त्याला चिकटते. (१०)

सांगतां अवगुण गेला । पुन्हा मागुता जडला ।
याकारणें माहांभला । पाषाणगोटा ॥ ११ ॥

मनुष्याने कुणाचे ऐकून अवगुणांचा त्याग केला तरी अवगुण परत येऊन चिकटतात. म्हणून त्याच्यापेक्षा पाषाणगोटा खूपच चांगला असे म्हणावे लागते. (११)

ज्याचा अवगुण झडेना । तो पाषाणाहून उणा ।
पाषाण आगळा जाणा । कोटिगुणें ॥ १२ ॥

ज्या मनुष्याचा अवगुण नाहीसा होत नाही, तो मनुष्य पाषाणाहून कमी प्रतीचा म्हणावा लागेल. त्याच्यापेक्षा पाषाण कोटीगुणांनी बरा असे म्हणावे लागेल. (१२)

कोटिगुणें कैसा पाषाण। त्याचेंहि ऐका लक्षण।
श्रोतीं करावें श्रवण। सावध होउनी ॥ १३॥

पाषाणाला कोटीगुणांनी बरा असे का म्हटले, त्याचेही कारण सांगतो. ते श्रोत्यांनी सावध होऊन श्रवण करावे. (१३)

माणीक मोतीं प्रवाळ। पाचि वैडूर्य वज्रनीळ।
गोमेदमणी परिस केवळ। पाषाण बोलिजे ॥ १४॥

माणिक, मोती, पोवळे, पाचू, वैडूर्य, वज्रनीळ तसेच गोमेदमणी व परिस हे सर्वही पाषाणच म्हटले जातात. (१४)

याहिवेगळे बहुत। सूर्यकांत सोमकांत।
नाना मोहरे सप्रचित। औषधाकारणें ॥ १५॥

याखेरीज इतरही अनेक सूर्यकांत, सोमकांत (चंद्रकांत), नाना औषधी मणी, जे औषधाकरितां अनुभवसिद्ध आहेत ते, याप्रमाणे हे सर्वही पाषाणच आहेत. (१५)

याहिवेगळे पाषाण भले। नाना तीर्थी जे लागले।
वापी कूप सेखीं जाले। हरिहरमूर्ती ॥ १६॥

याखेरीज अनेक उत्तम पाषाण नाना तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी अनेक प्रकारे वापी, कूप, घाट, मंदिरे, दीपमाळा वगैरेंसाठी एवढेच नव्हे तर हरिहर आदी देवतांच्या मूर्तीसाठी वापरले जातात. (१६)

याचा पाहातां विचार। पाषाणाऐसें नाहीं सार।
मनुष्य तें काये पामर। पाषाणापुढें ॥ १७॥

त्या सर्वांचा विचार केला की, पाषाण किती मूल्यवान असतात ते कळून येते. म्हणून पाषाणासारखे सार नाही. त्याच्यापुढे बिचाऱ्या पामर मनुष्याचा काय पाड? (१७)

तरी तो ऐसा नव्हे पाषाण। जो अपवित्र निःकारण।
तयासारिखा देह जाण। दुश्चीत अभक्तांचा ॥ १८॥

पण जो पाषाण वरीलप्रमाणे चांगल्या कामासाठी उपयोगात आणला जात नाही उलट जो निरुपयोगी व अपवित्र असतो; त्याच्यासारखाच दुश्चित व अभक्त माणसाचा देह कुचकामाचा व अपवित्र समजावा. (१८)

आतां असो हें बोलणें। घात होतो दुश्चीतपणें।
दुश्चीतपणाचेनि गुणें। प्रपंच ना परमार्थ ॥ १९॥

आता हे बोलणे पुरे झाले, थोडक्यात म्हणजे दुश्चितपणाने आपला घात होतो. त्या अवगुणामुळे धड ना प्रपंच, धड ना परमार्थ अशी स्थिती होते. (१९)

दुश्चीतपणें कार्य नासे। दुश्चीतपणें चिंता वसे।
दुश्चीतपणें स्मरण नसे। क्षण येक पाहातां ॥ २०॥

दुश्चितपणाने कार्य बिघडते, मनात चिंता उत्पन्न होते, पाहता पाहता एका क्षणात विस्मरण होते. (२०)

दुश्चीतपणें शत्रुजिणें। दुश्चीतपणें जन्ममरणें।
दुश्चीतपणाचेनि गुणें। हानी होये ॥ २१॥

त्या अवगुणांमुळे सावध न राहिल्याने शत्रूकडून पराभव पत्करावा लागतो, जन्ममरणाच्या चक्रातून सुटका होत नाही, सर्व प्रकारे अत्यंत नुकसान होत असते. (२१)

दुश्चीतपणें नव्हे साधन। दुश्चीतपणें न घडे भजन।
दुश्चीतपणें नव्हे ज्ञान। साधकांसी ॥ २२॥

दुश्चित्तपणामुळे साधकाच्या हातून नीट साधन होत नाही, की भगवंताचे भजन होत नाही अथवा ज्ञानही प्राप्त होऊ शकत नाही. (२२)

दुश्चीतपणें नव्हे निश्चयो। दुश्चीतपणें न घडे जयो।
दुश्चीतपणें होये क्षयो। आपुल्या स्वहिताचा॥ २३॥

दुश्चित्तपणामुळे कुठल्याही गोष्टीसंबंधी निश्चय होत नाही, कुठल्याही गोष्टीत जय, यश मिळत नाही, आपल्या हिताची सर्वप्रकारे हानी होते. (२३)

दुश्चीतपणें न घडे श्रवण। दुश्चीतपणें न घडे विवरण।
दुश्चीतपणें निरूपण। हातीचें जाये ॥ २४॥

दुश्चित्तपणामुळे नीट श्रवण घडत नाही. श्रवण केलेल्या गोष्टीचे विवरण उत्तम प्रकारे करता येत नाही, त्यामुळे अध्यात्म-निरूपणाच्या श्रवणाने जो लाभ होणार असतो, तो हातचा जातो. (२४)

दुश्चीत बैसलाचि दिसे। परी तो असतचि नसे।
चंचळ चक्रीं पडिलें असे। मानस तयाचें ॥ २५॥

चंचल मनोवृत्तीचा मनुष्य श्रवण करण्यासाठी बसला आहे असे दिसते, पण तो खरे तर असून नसल्यासारखाच असतो. कारण त्याचे मन एखाद्या चक्रात सापडल्यासारखे भ्रमण करीत असते. (२५)

वेडें पिशाच्य निरंतर। अंध मुके आणी बधिर।
तैसा जाणावा संसार। दुश्चीत प्राणियांचा ॥ २६॥

एखाद्या वेड्या माणसाचा किंवा निरंतर पिशाच्च लागलेल्या माणसाचा किंवा अंध, मूकबधिर माणसाचा संसार जसा असतो, तसाच दुश्चित्त प्राण्याचाही संसार धड नसतो. (२६)

सावध असोन उमजेना। श्रवण असोन ऐकेना।
ज्ञान असोन कळेना। सारासारविचार ॥ २७॥

तो सावध म्हणजे शुद्धीत असून त्याला काही उमजत नाही, कान असून त्याला जणू ऐकू येत नाही आणि ज्ञान असून त्याला सारासार विवेक कळत नाही. (२७)

ऐसा जो दुश्चीत आळसी। परलोक कैंचा त्यासी।
जयाचे जिवीं अहर्निशीं। आळस वसे ॥ २८॥

याप्रकारे जो दुश्चित आणि आळशी असतो आणि ज्याच्या चित्तात रात्रंदिवस आळसच भरलेला असतो, त्याला परलोक कसा प्राप्त होणार? (२८)

दुश्चीतपणापासूनि सुटला। तरी तो सवेंच आळस आला।
आळसाहातीं प्राणीयांला। उसंतचि नाहीं ॥ २९॥

जर एखादा माणूस दुश्चितपणातून सुटला, तर त्याला लगेच आळस घेरून टाकतो. एकदा आळसाच्या हाती मनुष्य सापडला, की त्याला उसंतच मिळत नाही. (२९)

आळसें राहिला विचार। आळसें बुडाला आचार।
आळसें नव्हे पाठांतर। कांहीं केल्यां ॥ ३०॥

आळसामुळे विचार करता येत नाही, आळसामुळे आचार बुडतो आणि त्यामुळे काही केल्या पाठांतरही होऊ शकत नाही. (३०)

आळसें घडेना श्रवण। आळसें नव्हे निरूपण।
आळसें परमार्थाची खूण। मळिण जाली ॥ ३१॥

आळसामुळे श्रवण, निरूपण इत्यादी काहीच घडत नाही. त्यामुळे परमार्थही होत नाही. (३१)

आळसें नित्यनेम राहिला। आळसें अभ्यास बुडाला।
आळसें आळस वाढला। असंभाव्य ॥ ३२॥

आळसामुळे नित्यनेम राहूनच जातो, अभ्यास बंदच पडतो आणि आळसाने आळस अमर्याद वाढतो. (३२)

आळसें गेली धारणा धृती। आळसें मळिण जाली वृत्ती।
आळसें विवेकाची गती। मंद जाली ॥ ३३॥

आळसाने निश्चय टिकून राहात नाही, धैर्य नष्ट होते आणि वृत्ती मलिन होते, एवढेच नव्हे तर विवेकही मंदावतो. (३३)

आळसें निद्रा वाढली। आळसें वासना विस्तारली।
आळसें सुन्याकार जाली। सद्बुद्धि निश्चयाची ॥ ३४॥

आळसाने निद्रा वाढली, वासना बळावली आणि आळसाने सद्‌बुद्धीचा निश्चय नाहीसा होतो. (३४)

दुश्चीतपणासवें आळस। आळसें निद्राविळास।
निद्राविळासें केवळ नास। आयुष्याचा ॥ ३५॥

दुश्चित्तपणाने प्रथम आळस वाढतो, आळसामुळे झोपेत सुख वाटू लागते आणि झोपेत अधिक काळ जाऊ लागल्यामुळे आयुष्याचा नाश होतो. (३५)

निद्रा आळस दुश्चीतपण। हेंचि मूर्खाचें लक्षण।
येणेंकरितां निरूपण। उमजेचिना ॥ ३६॥

निद्रा, आळस आणि दुश्चित्तपणा ही मूर्खाची लक्षणे. या तीन अवगुणांमुळे अध्यात्मनिरूपण उमजतच नाही. (३६)

हें तिन्हीं लक्षणें जेथें। विवेक कैंचा असेल तेथें।
अज्ञानास यापरतें। सुखचि नाहीं ॥ ३७॥

ही तीनही लक्षणे जेथे असतात, तेथे विवेक कसा उत्पन्न होणार? अज्ञानी माणसाला आळस व निद्रा यांतच सुख वाटते. याहून अधिक सुख कशात असेल, असे त्याला वाटतच नाही. (३७)

क्षुधा लागतांच जेविला। जेऊन उठतां आळस आला।
आळस येतां निजेला। सावकास ॥ ३८॥

भूक लागल्याबरोबर जेवावे. जेवून उठताच आळस येतो. आळस आला की आरामात झोपून जावे, हेच त्याला बरे वाटते. (३८)

निजोन उठतांच दुश्चीत। कदा नाहीं सावचित।
तेथें कैचें आत्महित। निरूपणीं ॥ ३९॥

निजून उठल्यावरही तो कधी सावचित्त नसतोच. दुश्चित्तपणामुळे निरूपण ऐकूनही आत्महित कसे होणार? (३९)

मर्कटापासीं दिल्हें रत्न। पिशाच्याहातीं निधान।
दुश्चीतापुढें निरूपण। तयापरी होये ॥ ४०॥

माकडाच्या हाती रत्न द्यावे किंवा पिशाच्चाच्या हाती खजिना सोपवावा, त्याप्रमाणे दुश्चित्त असणाऱ्या माणसापुढे अध्यात्म-निरूपण करणे होय. (४०)

आतां असो हे उपपत्ती। आशंकेची कोण गती।
कितां दिवसां होते मुक्ती। सज्जनाचेनि संगें ॥ ४१॥

असो. आता हा ऊहापोह पुरे झाला. मूळ शंकेचे उत्तर आता दिले पाहिजे. सज्जनांच्या संगतीने किती दिवसांत मुक्ती होते, ही मूळ शंका आहे. (४१)

ऐका याचें प्रत्योत्तर। कथेसि व्हावें निरोत्तर।
संतसंगाचा विचार। ऐसा असे ॥ ४२॥

या शंकेचे उत्तर आता ऐका, म्हणजे शंका पूर्ण नाहीशी होईल. संतसंगाचा विचार असा आहे. (४२)

लोहो परीसेसीं लागला। थेंबुटा सागरीं मिळाला।
गंगे सरिते संगम जाला। तत्क्षणीं ॥ ४३॥

लोखंडाला परिसाचा स्पर्श झाला की तत्काळ लोखंडाचे सोने होते, थेंबुटा सागरात मिळाला की तत्क्षणी एकरूप होतो किंवा एखाद्या नदीचा गंगेशी संगम झाला की तत्क्षणी ती गंगाच बनते. (४३)

सावध साक्षपी आणी दक्ष। तयास तत्काळचि मोक्ष।
इतरांस तें अलक्ष। लक्षिलें नवचे ॥ ४४॥

त्याप्रमाणे जो सावध निग्रही व जागरूक असतो, त्याला तत्काळ मोक्ष मिळतो. इतरांना अलक्ष्य अशा स्वरूपाची प्राप्ती करून घेता येत नाही. (४४)

येथें शिष्यप्रज्ञाच केवळ। प्रज्ञावंतां नलगे वेळ।
अनन्यास तत्काळ। मोक्ष लाभे ॥ ४५॥

येथे तत्काळ मोक्ष मिळण्यास शिष्याची प्रज्ञाच केवळ कारणीभूत होते. कुशाग्र बुद्धीने युक्त असणाऱ्यांना वेळ लागत नाही. विशेषत: जे शिष्य अनन्य असतात, त्यांना तत्काळ मोक्ष लाभतो. (४५)

प्रज्ञावंत आणी अनन्य। तयास नलगे येक क्षण।
अनन्य भावार्थेविण। प्रज्ञा खोटी ॥ ४६॥

जे प्रज्ञावंत आणि अनन्यही असतात, त्यांना एक क्षणही लागत नाही. अनन्य भाव जर नसेल तर नुसती प्रज्ञा असून चालत नाही. ती निरुपयोगी ठरते. (४६)

प्रज्ञेविण अर्थ न कळे। विश्वासेंविण वस्तु ना कळे।
प्रज्ञाविश्वासें गळे। देहाभिमान ॥ ४७॥

प्रज्ञा नसेल तर निरूपणाचा अर्थ कळत नाही आणि विश्वास नसेल तर सद्वस्तू कळत नाही. प्रज्ञा आणि विश्वास दोन्ही असतील तर देहाभिमान गळून जातो. (४७)

देहाभिमानाचे अंतीं। सहजचि वस्तुप्राप्ती।
सत्संगें सद्गती। विलंबचि नाहीं ॥ ४८॥

देहाभिमान नष्ट झाला की शेवटी अगदी सहज वस्तूची प्राप्ती होते. सत्संगाने तत्काळ सद्गती मिळते. विलंब लागत नाही. (४८)

सावध साक्षपी विशेष। प्रज्ञावंत आणी विश्वास।
तयास साधनीं सायास। करणेंचि नलगे ॥ ४९॥

जो शिष्य सावध, निग्रही, विशेष प्रज्ञावंत आणि विश्वास बाळगणारा असतो, त्याला साधनाचे कष्ट करावेच लागत नाहीत. (४९)

इतर भाविक साबडे। तयांसहि साधनें मोक्ष जोडे।
साधुसंगें तत्काळ, उडे। विवेकदृष्टी ॥ ५०॥

इतर भोळेभाबडे भाविक लोक असतात, त्यांनाही साधनाने मोक्ष मिळतो. साधूच्या संगतीमुळे विवेकदृष्टी तत्काळ जागृत होते. (५०)

परी तें साधन मोडूं नये। निरूपणाचा उपाये।
निरूपणें लागे सोये। सर्वत्रांसी ॥ ५१॥

पण निरूपणाचा उपाय करीत असताही साधन कधी सोडू नये. निरूपणानेच सर्वांना मार्ग सापडतो. (५१)

आतां मोक्ष आहे कैसा। कैसी स्वरूपाची दशा।
त्याचे प्राप्तीचा भर्वसा। सत्संगें केवी ॥ ५२॥

आता मोक्ष कसा आहे, स्वरूपदशा कशी असते, सत्संगाने त्याची निश्चितपणे प्राप्ती कशी होते, (५२)

ऐसें निरूपण प्रांजळ। पुढें बोलिलें असे सकळ।
श्रोतीं होऊनियां निश्चळ। अवधान द्यावें ॥ ५३॥

याचे स्पष्ट व स्वच्छ निरूपण पुढे सर्व सांगितले जाईल, तरी श्रोत्यांनी निश्चल होऊन शांतचित्ताने अवधान द्यावे. (५३)

अवगुण त्यागावयाकारणें। न्यायनिष्ठुर लागे बोलणें।
श्रोतीं कोप न धरणें। ऐसिया वचनाचा ॥ ५४॥

श्रीसमर्थ म्हणतात की, श्रोत्यांनी अवगुणांचा त्याग करावा म्हणून न्यायनिष्ठुरपणे बोलावे लागते. तरी अशा बोलण्याचा राग श्रोत्यांनी धरू नये. (५४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'दुश्चीतनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक ८ : समास ७

# मोक्षलक्षण

॥ श्रीराम ॥

मागां श्रोतयांचा पक्ष। कितां दिवसां होतो मोक्ष।
तेचि कथा श्रोते दक्ष। होऊन ऐका ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मागे श्रोत्यांनी प्रश्न केला होता, की मोक्ष किती दिवसांत मिळतो? त्याचे उत्तर आता श्रोत्यांनी दक्ष होऊन ऐकावे. (१)

मोक्षास कैसें जाणावें। मोक्ष कोणास ह्मणावें।
संतसंगें पावावें। मोक्षास कैसें ॥ २॥

मोक्षाला कसे ओळखावे, कुणाला मोक्ष मिळाला असे म्हणावे आणि संतांच्या संगतीने मोक्ष कसा प्राप्त करावा, हे सर्व आता ऐका. (२)

तरी बद्ध म्हणिजे बांधला। आणी मोक्ष म्हणिजे मोकळा जाला।
तो संतसंगें कैसा लाधला। तेंहि ऐका ॥ ३॥

तसेच बद्ध म्हणजे बांधलेला आणि मोक्ष म्हणजे मोकळा झालेला. तो मोक्ष संतसंगाने कसा मिळतो, तेही ऐका. (३)

प्राणी संकल्पें बांधला। जीवपणें बद्ध जाला।
तो विवेकें मुक्त केला। साधुजनीं ॥ ४॥

प्राणी संकल्पाने बांधला जातो आणि जीवपणे बद्ध होतो. त्याला साधुलोक विवेकाने मुक्त करतात. (४)

मी जीव ऐसा संकल्प। दृढ धरितां गेले कल्प।
तेणें प्राणी जाला अल्प। देहबुद्धीचा ॥ ५॥

मी जीव आहे असा दृढ संकल्प करून युगेच्या युगे गेली आहेत. त्यामुळे प्राणी अल्पज्ञ, देहबुद्धीचा झाला. (५)

मी जीव मज बंधन। मज आहे जन्ममरण।
केल्या कर्माचें फळ आपण। भोगीन आतां ॥ ६॥

मी जीव आहे, मला बंधन आहे, जन्ममरण आहे. पूर्वी केलेल्या कर्मांचे फळ मी आता भोगीन. (६)

पापाचें फळ तें दुख। आणी पुण्याचें फळ तें सुख।
पापपुण्य अवश्यक। भोगणे लागे ॥ ७॥

पापाचे फळ दु:ख आणि पुण्याचे फळ सुख असते. आपापल्या प्रारब्धानुसार पाप व पुण्य हे भोगावेच लागते. (७)

पापपुण्यभोग सुटेना। आणी गर्भवासहि तुटेना।
ऐसी जयाची कल्पना। दृढ जाली ॥ ८॥

पापपुण्याचा भोग चुकत नाही आणि गर्भ-वासातूनही सुटका नाही, अशी ज्याची दृढ कल्पना झालेली असते, (८)

तया नांव बांधला। जीवपणें बद्ध जाला।
जैसा स्वयें बांधोन कोसला। मृत्य पावे ॥ ९॥

तो जीवपणाने बांधलेला जाणावा. रेशमाचा किडा जसा स्वत:च स्वत:स बांधून घेऊन कोषात गुरफटून घेऊन मरून जातो, (९)

तैसा प्राणी तो अज्ञान। नेणें भगवंताचें ज्ञान।
ह्मणे माझें जन्ममरण। सुटेचिना ॥ १०॥

त्याप्रमाणे तो अज्ञानी जीव, भगवंताचे ज्ञान नसल्याने, आपले जन्ममरण काही सुटत नाही, असे म्हणत राहतो. (१०)

आतां कांहीं दान करूं। पुढिल्या जन्मास आधारु।
तेणें सुखरूप संसारु। होईल माझा ॥ ११॥

तो मनात म्हणतो की, आता या जन्मात काही दानधर्म करीन म्हणजे तेवढाच पुढील जन्माला आधार होईल आणि त्या जन्मात तरी माझा संसार सुखाचा होईल. (११)

पूर्वीं दान नाही केलें। ह्मणोन दरिद्र प्राप्त जालें।
आतां तरी कांहीं केलें। पाहिजे कीं ॥ १२॥

पूर्वीच्या जन्मात काही दानधर्म केला नाही, म्हणून या जन्मात दारिद्र्य प्राप्त झाले. निदान आता या जन्मात तरी काही केलेच पाहिजे की! (१२)

**म्हणौनी दिलें वस्त्र जुनें। आणी येक तांब्र नाणें।**
**म्हणे आतां कोटिगुणें। पावेन पुढें ॥ १३॥**

म्हणून त्याने एक जुने वस्त्र आणि एक तांब्याचे नाणे दान दिले आणि म्हणू लागला की पुढील जन्मात याच्या कोटीगुणाने मला प्राप्ती होईल. (१३)

**कुशावर्ती कुरुक्षेत्रीं। महिमा ऐकोन दान करी।**
**आशा धरिली अभ्यांतरीं। कोटिगुणांची ॥ १४॥**

कुशावर्त, कुरुक्षेत्रादि तीर्थक्षेत्राऐचा महिमा रोकून. आणि पुढील जन्मी त्याचे पुष्कळ फळ मिळेळ या आशेने कांही दान पुण्य करतो. (१४)

**रुका आडका दान केला। अतितास टुकडा घातला।**
**ह्मणे माझा ढीग जाला। कोटि टुकड्यांचा॥ १५॥**

एखादा पैसा, दमडीदान केले आणि अतिथीला एखादा तुकडा खाऊ घातला आणि मनात कल्पना करतो आहे की, यामुळे आता पुढे कोटी तुकड्यांचा ढीग मला मिळेल. (१५)

**तो मी खाईन पुढिलिये जन्मीं। ऐसें कल्पी अंतर्यामीं।**
**वासना गुंतली जन्मकर्मीं। प्राणीयांची ॥ १६॥**

तो मी पुढील जन्मात खाईन अशी कल्पना तो अंतर्यामी करू लागला. याप्रमाणे प्राण्यांची वासना जन्मात आणि कर्मफळात गुंतलेली असते. (१६)

**आतां मी जें देईन। तें पुढिले जन्मीं पावेन।**
**ऐसें कल्पी तो अज्ञान। बद्ध जाणावा ॥ १७॥**

आता मी जे जे देईन ते ते मला पुढील जन्मात मिळेल अशी कल्पना जो करतो तो अज्ञानी व बद्ध जाणावा. (१७)

**बहुतां जन्मांचे अंतीं। होये नरदेहाची प्राप्ती।**
**येथें न होतां ज्ञानें सद्‌गती। गर्भवास चुकेना ॥ १८॥**

अनेक जन्मांच्या शेवटी नरदेहाची प्राप्ती होते. येथे जर ज्ञान मिळवून सद्‌गती प्राप्त करून घेतली नाही, तर गर्भवास चुकत नाही. (१८)

**गर्भवास नरदेहीं घडे। ऐसें हें सर्वथा न घडे।**
**अकस्मात भोगणें पडे। पुन्हा नीच योनी ॥ १९॥**

बरे, परत गर्भवास प्राप्त झाला तरी नरदेहच प्राप्त होईल असे सहसा घडत नाही आणि अकस्मात परत नीच योनी भोगावी लागते. (१९)

**ऐसा निश्चयो शास्त्रांतरीं। बहुतीं केला बहुतांपरीं।**
**नरदेह संसारीं। परम दुल्लभ असे॥ २०॥**

अनेकांनी अनेक प्रकारे शास्त्रामध्ये असे निश्चयपूर्वक म्हटले आहे की, या जगात नरदेह परम दुर्लभ आहे.(२०)

**पापपुण्य समता घडे। तरीच नरदेह जोडे।**
**येरवीं हा जन्म न घडे। हें व्यासवचन भागवतीं॥ २१॥**

श्रीमत् भागवत पुराणात महर्षी वेदव्यास यांनी असे म्हटले आहे की, ज्यावेळी प्राण्याचे पाप व पुण्य समसमान होते, तेव्हाच नरदेह प्राप्त होतो. एरवी नरदेह प्राप्त होत नाही. (२१)

श्लोक

नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं
प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम्।
मयानुकूलेन नभस्वतेरितं
पुमान्भवाब्धिं न तरेत्स आत्महा॥

**अर्थ**—सर्वप्रथम नरदेह अत्यंत दुर्लभ असूनही भगवत्कृपेने सहज मिळाला आहे. तो सुदृढ होडीसारखा असून गुरुदेव हे त्याचे कर्णधार आहेत, मज भगवंताची कृपा हा अनुकूल वाहणारा वारा आहे. हे सर्व मिळूनही जो मनुष्य भवसागरातून तरून जात नाही, तो आत्मघातकी जाणावा.

**नरदेह दुल्लभ। अल्प संकल्पाचा लाभ।**
**गुरु कर्णधारी स्वयंभ। सुख पाववी ॥ २२॥**

नरदेह दुर्लभ आहे खरा; पण अल्पशा संकल्पाने त्याचा लाभ होतो. गुरू हे कर्णधार असून स्वत:सिद्ध असल्याने ते सुखाची प्राप्ती करून देतात. (२२)

**देव अनुकूळ नव्हे जया। स्वयें पापी तो प्राणीया।**
**भवाब्धी न तरवे तया। आत्महत्यारा बोलिजे॥ २३॥**

ज्याला देवाची कृपा लाभत नाही, तो प्राणी स्वत: अत्यंत पापी असतो. त्याला भवसागर तरून जाणे शक्य होत नाही. त्याला आत्मघातकी असे म्हणतात. (२३)

**ज्ञानेंविण प्राणीयांसी। जन्ममृत्य लक्ष चौऱ्यासी।**
**तितुक्या आत्महत्या त्यासी। ह्मणौन आत्महत्यारा॥ २४॥**

नरदेहात ज्ञान प्राप्त करून घेतले नाही तर चौऱ्यांशी लक्ष योनींत जन्म-मरण भोगावे लागते, म्हणजे तितक्या आत्महत्या त्याला घडतात, म्हणून त्याला आत्महत्यारा असे म्हटले आहे. (२४)

नरदेहीं ज्ञानेंविण। कदा न चुके जन्ममरण।
भोगणें लागती दारुण। नाना नीच योनी ॥ २५॥

नरदेह प्राप्त झाला असता ज्ञान प्राप्त करून घेतले नाही तर जन्ममरणपरंपरेतून सुटका होऊ शकत नाही आणि नाना दारुण नीच योनी भोगाव्या लागतात. (२५)

रीस मर्कट श्वान सूकर। अश्व वृषभ ह्मैसा खर।
काक कुर्कुट जंबुक मार्जर। सरड बेडुक मक्षिका॥ २६॥

अस्वल, माकड, कुत्रा, डुक्कर, घोडा, बैल, रेडा, गाढव, कावळा, कोंबडा, कोल्हा, मांजर, सरडा, बेडूक, माशी, (२६)

इत्यादिक नीच योनी। ज्ञान नस्तां भोगणें जनीं।
आशा धरी मूर्ख प्राणी। पुढिलिया जन्माची॥ २७॥

इत्यादी नीच योनी ज्ञान न झाल्याने लोकांना भोगाव्या लागतात. मूर्ख प्राणी पुढल्या जन्माची आशा धरीत असतो. (२७)

हा नरदेह पडतां। तोचि पाविजे मागुतां।
ऐसा विश्वास धरितां। लाज नाहीं ॥ २८॥

हा नरदेह पडल्यावर पुन्हा नरदेहच मिळेल, असा विश्वास धरण्याची त्यांना लाजही वाटत नाही. (२८)

कोण पुण्याचा संग्रहो। जे पुन्हां पाविजे नरदेहो।
दुराशा धरिली पाहो। पुढिलिया जन्माची॥ २९॥

त्यांनी काय असा मोठा पुण्यसंग्रह केलेला असतो की परत नरदेहच लाभावा? पण तरी मनात पुढल्या मनुष्यजन्माची दुराशा बाळगतात. (२९)

ऐसे मूर्ख अज्ञान जन। केलें संकल्पें बंधन।
शत्रू आपणासि आपण। होऊन ठेला ॥ ३०॥

असे जे मूर्ख आणि अज्ञानी लोक असतात, ते स्वत:च्या संकल्पानेच बंधनात पडतात आणि आपण आपलेच शत्रू होऊन राहतात. (३०)

श्लोक

आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः॥

**अर्थ**—आपणच आपले बंधू व आपणच आपले शत्रू असतो.

ऐसें संकल्पाचे बंधन। संतसंगे तुटे जाण।
ऐक तयाचें लक्षण। सांगिजेल ॥ ३१॥

असे जे संकल्पामुळे बंधन उत्पन्न होते ते संतसंगाने तुटते, हे जाणून घ्यावे. आता त्याचे लक्षण सांगतो तेही ऐकावे. (३१)

पांचा भूतांचें शरीर। निर्माण जालें सचराचर।
प्रकृतिस्वभावें जगदाकार। वर्तों लागे ॥ ३२॥

आपले शरीर तसेच सर्व चराचर हे पंचमहाभूतांपासून झालेले आहे. प्रकृतीच्या स्वभावानुसार या जगातील सर्व कार्य चाललेले असते. (३२)

देह अवस्ता अभिमान। स्थानें भोग मात्रा गुण।
शक्तीआदिकरून लक्षण। चौपुटी तत्वांचें ॥ ३३॥

देह, अवस्था, अभिमान, स्थान, भोग, मात्रा, गुण व शक्ती अशी आठ तत्त्वे एका देहाची व याच्या चौपट म्हणजे बत्तीस तत्त्वे चारी देहांची होतात. (३३)

ऐसी पिंडब्रह्मांडरचना। विस्तारें वाढली कल्पना।
निर्धारितां तत्वज्ञाना। मतें भांबावलीं ॥ ३४॥

अशी ही पिंडाची, ब्रह्मांडाची रचना विस्तार पावल्याने तत्त्वज्ञानाचा निर्धार करताना अनेक कल्पनांच्या योगे मतामतांचा गोंधळ झाला आहे. (३४)

नाना मतीं नाना भेद। भेदें वाढती वेवाद।
परी तो ऐक्यतेचा संवाद। साधु जाणती ॥ ३५॥

नाना मते, नाना भेद यांमुळे वादविवाद उत्पन्न झाले आहेत. पण त्या सर्वांचा समन्वय कसा साधायचा ते साधू जाणतात. (३५)

तया संवादाचें लक्षण। पंचभूतिक देह जाण।
त्या देहामध्यें कारण। आत्मा वोळखावा॥ ३६॥

त्या संवादाचे लक्षण याप्रमाणे जाणावे. देह पांचभौतिक आहे. त्यांत आत्मा हा कारण म्हणून ओळखावा. (३६)

देह अंती नासोन जाये। त्यास आत्मा ह्मणों नये।
नानां तत्वांचा समुदाये। देहामध्यें आला ॥ ३७॥

देह शेवटी नष्ट होतो, म्हणून त्याला आत्मा असे कधीही म्हणू नये. या देहाध्ये नाना तत्त्वे एकत्र आलेली आहेत. (३७)

अंत:कर्ण प्राणादिक। विषये इंद्रियें दशक।
हा सूक्ष्माचा विवेक। बोलिला शास्त्रीं ॥ ३८॥

घेतां सूक्ष्माची शुद्धी। भिन्न अंत:करण मन बुद्धी।
नाना तत्वांचे उपाधी। वेगळा आत्मा ॥ ३९॥

स्थूळ सूक्ष्म कारण। माहाकारण विराट हिरण्य।
अव्याकृत मूळप्रकृतिजाण। ऐसे अष्टदेह ॥ ४०॥

च्यारी पिंडीं च्यारी ब्रह्मांडीं। ऐसी अष्टदेहाची प्रौढी।
प्रकृतिपुरुषांची वाढी। दशदेह बोलिजे ॥ ४१॥

ऐसें तत्वांचें लक्षण। आत्मा साक्षी विलक्षण।
कार्य कर्ता कारण। दृश्य तयाचें ॥ ४२॥

जीवशिव पिंडब्रह्मांड। मायेअविद्येचें बंड।
हें सांगतां असे उदंड। परी आत्मा तो वेगळा॥ ४३॥

पाहों जातां आत्मे च्यारी। त्यांचें लक्षण अवधारी।
हें जाणोनि अभ्यांतरीं। सदृढ धरावें ॥ ४४॥

येक जीवात्मा दुसरा शिवात्मा। तिसरा परमात्मा जो विश्वात्मा।
चौथा जाणिजे निर्मळात्मा। ऐसे च्यारी आत्मे ॥ ४५॥

भेद उंच नीच भासती। परी च्यारी येकचि असती।
येविषीं दृष्टांतसंमती। सावध ऐका ॥ ४६॥

घटाकाश मठाकाश। महदाकाश चिदाकाश।
अवघे मिळोन आकाश। येकचि असे ॥ ४७॥

तैसा जीवात्मा आणी शिवात्मा। परमात्मा आणी निर्मळात्मा।
अवघा मिळोन आत्मा। येकचि असे ॥ ४८॥

घटीं व्यापक जें आकाश। तया नांव घटाकाश।
पिंडीं व्यापक ब्रह्मांश। त्यास जीवात्मा बोलिजे॥ ४९॥

मठीं व्यापक जें आकाश। तया नांव मठाकाश।
तैसा ब्रह्मांडी जो ब्रह्मांश। त्यास शिवात्मा बोलिजे॥ ५०॥

अंत:करण, मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे अंत:करणपंचक; प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे प्राणपंचक; शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे विषयपंचक; पाच कर्मेंद्रिये व पाच ज्ञानेंद्रिये मिळून २५ तत्त्वांच्या सूक्ष्म देहांचा विचार शास्त्रात केला आहे. (३८)

सूक्ष्म देहाचा शोध घेऊ लागले की, अंत:करण, मन, बुद्धी व इतरही नाना तत्त्वांच्या उपाधीहून आत्मा वेगळा आहे हे कळते. (३९)

स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण हे पिंडाचे चार व विराट, हिरण्य, अव्याकृत व मूळप्रकृती हे ब्रह्मांडाचे चार मिळून आठ देह आहेत ते जाणून घ्यावे. (४०)

चार पिंडाचे व चार ब्रह्मांडाचे असे आठ देह होतात, याशिवाय प्रकृती व पुरुष धरून दहा देहही सांगितले जातात. (४१)

याप्रमाणे तत्त्वांचे लक्षण सांगितले आहे; पण आत्मा याहूनही विलक्षण म्हणजे लक्षणहीन असून तो या सर्व तत्त्वांचा व कार्य म्हणजे जगत, कर्ता म्हणजे ईश्वर, व कारण म्हणजे माया या सर्वांचाही साक्षी आहे. वरील सर्व आत्म्याहून निराळी असल्याने त्याची दृश्ये आहेत. (४२)

जीव, शिव, पिंड, ब्रह्मांड, विद्यामाया, अविद्यामाया यांच्याविषयी खूपच सांगता येईल; पण आत्मा या सर्वांहून वेगळाच आहे. (४३)

तसे पाहू गेले तरी चार आत्मे आहेत असे सांगितले जाते. त्यांची लक्षणे ऐकून ती अंतरात सुदृढ धरावीत. (४४)

एक जीवात्मा, दुसरा शिवात्मा, तिसरा जो सर्व विश्वाचा आत्मा त्यालाच परमात्मा असेही म्हणतात व चौथा निर्मळात्मा असे चार आत्मे सांगितले जातात. (४५)

त्यांत उच्च, नीच असे भेद भासत असले तरी वास्तविक ते चारी एकच आहेत. हे कळावे म्हणून दृष्टान्त सांगितला जात आहे, तो सावधपणे ऐकावा. (४६)

घटाकाश, मठाकाश, महदाकाश व चिदाकाश अशी चार आकाशे सांगितली जात असली, तरी खरे पाहता सर्व मिळून एकच आकाश आहे. (४७)

त्याप्रमाणेच जीवात्मा, शिवात्मा, परमात्मा आणि निर्मळात्मा सर्व मिळून एकच आत्मा आहे. (४८)

घटाला व्यापून जे आकाश असते त्याचे नाव घटाकाश तसा पिंडाला व्यापून जो ब्रह्मांश असतो, त्याला जीवात्मा म्हणतात. (४९)

मठाला जे आकाश व्यापून असते. त्याला मठाकाश म्हटले जाते. त्याप्रमाणे ब्रह्मांडी जो ब्रह्मांश व्यापून असतो, त्याला शिवात्मा म्हणतात. (५०)

मठाबाहेरील आकाश। तया नांव महदाकाश।
ब्रह्मांडाबाहेरील ब्रह्मांश। त्यास परमात्मा बोलिजे॥ ५१॥

मठाच्या बाहेर जे आकाश असते त्याला महदाकाश असे नाव आहे. त्याप्रमाणे ब्रह्मांडाबाहेरील जो ब्रह्मांश त्याला परमात्मा म्हणतात. (५१)

उपाधीवेगळें आकाश। तया नांव चिदाकाश।
तैसा निर्मळात्मा परेश। तो उपाधीवेगळा ॥ ५२॥

उपाधीवेगळे जे आकाश त्याला चिदाकाश असे नाव आहे तसेच उपाधिवेगळा जो ब्रह्मांश तोच निर्मळात्मा परेश जाणावा. (५२)

उपाधीयोगें वाटे भिन्न। परी तें आकाश अभिन्न।
तैसा आत्मा स्वानंदघन। येकचि असे ॥ ५३॥

उपाधीच्या योगे आकाश भिन्न भासते पण वास्तविक ते अभिन्नच असते त्याप्रमाणे स्वानंदघन असा एकच आत्मा आहे. (५३)

दृश्यासबाह्य अंतरीं। सूक्ष्मात्मा निरंतरीं।
त्याची वर्णावया थोरी। शेष समर्थ नव्हे ॥ ५४॥

दृश्याला आतून-बाहेरून व्यापून असणारा सूक्ष्मात्मा निरंतर एकच आहे. त्याची थोरवी वर्णन करायला शेषसुद्धा समर्थ नाही. (५४)

ऐसें आत्म्याचें लक्षण। जाणतां नाहीं जीवपण।
उपाधी शोधितां, अभिन्न। मुळींच आहे ॥ ५५॥

हे आत्म्याचे लक्षण नीट जाणून घेतले की जीवपण उरतच नाही. चारी भेद उपाधीच्या योगाने भासतात. उपाधीचा शोध घेतला की ती मिथ्या ठरते, म्हणून स्वरूपतः हे भेद खरे नसून समजावून सांगण्यासाठी त्यांची कल्पना केली जाते. मुळात आत्मा एकच एक आहे. (५५)

जीवपणें येकदेसी। अहंकारें जन्म सोसी।
विवेक पाहातां प्राणीयांसी। जन्म कैंचा ॥ ५६॥

देहाच्या उपाधीमुळे तो स्वतःला एकदेशी जीव समजतो आणि अहंकारामुळे जन्म भोगत राहतो. नीट विचार केला असता प्राण्याला जन्मच नाही, हे कळून येते. (५६)

जन्ममृत्यापासून सुटला। या नांव जाणिजे मोक्ष जाला।
तत्वें शोधितां, पावला। तत्वतां वस्तु ॥ ५७॥

जन्ममृत्यूपासून सुटणे यालाच मोक्ष झाला असे म्हणतात. तत्त्वांचा शोध घेऊ लागले असता, त्या तत्त्वांपासून आपण भिन्न आहोत, हे कळून येते व अशा रीतीने शोध घेता घेता तो शोध घेणारा वेगळा उरतच नाही, तर तो तत्त्वतः वस्तूच होतो. (५७)

तेचि वस्तु ते आपण। हें माहावाक्याचें लक्षण।
साधु करिती निरूपण। आपुलेन मुखें ॥ ५८॥

आपण म्हणजे ती वस्तूच आहे. 'तत्त्वमसि' हे महावाक्य आहे. साधू आपल्या मुखाने याच महावाक्याचे स्पष्टीकरण करतात. (५८)

जेचि क्षणीं अनुग्रह केला। तेचि क्षणीं मोक्ष जाला।
बंधन कांहीं आत्मयाला। बोलोंचि नये ॥ ५९॥

ज्या क्षणाला गुरू असा अनुग्रह करतात त्याच क्षणी मोक्ष मिळतो. आत्म्याला बंधन आहे असे बोलूसुद्धा नये. (५९)

आतां आशंका फिटली। संदेहवृत्ती मावळली।
संतसंगें तत्काळ जाली। मोक्षपदवी ॥ ६०॥

आता शंकेचे निरसन होऊन संदेह वृत्ती नाहीशी झाली आणि संतांच्या संगतीने तात्काळ मोक्षपदाची प्राप्ती झाली. (६०)

स्वप्नामधें जो बांधला। तो जागृतीनें मोकळा केला।
ज्ञानविवेकें प्राणीयाला। मोक्षप्राप्ती ॥ ६१॥

स्वप्नामध्ये ज्याला वाटत होते की आपण बांधले गेले आहोत त्याला जागृती आली असता कळून येते की, आपण तर मोकळेच आहोत. (६१)

अज्ञाननिसीचा अंतीं। संकल्पदुःखें नासती।
तेणें गुणें होये प्राप्ती। तत्काळ मोक्षाची ॥ ६२॥

अज्ञानरूपी रात्रीचा शेवट झाला की संकल्पाने निर्माण झालेली दुःखे नाहीशी होतात आणि त्यायोगे तात्काळ मोक्षाची प्राप्ती होते. (६२)

तोडावया स्वप्नबंधन। नलगे आणीक साधन।
तयास प्रेत्न जागृतीवीण। बोलोंचि नये ॥ ६३॥

स्वप्नांतील बंधन तोडायला दुसरे काही साधन करावयाची जरुरी नसते. जागृतीशिवाय इतर प्रयत्नांचा विचारही करू नये. (६३)

तैसा संकल्पें बांधला जीव। त्यासआणीक नाहीं उपाव।
विवेक पाहातां वाव। बंधन होये ॥ ६४॥

त्याप्रमाणे संकल्पाने जीव बांधलेला असतो. त्यातून सुटण्यास विवेकाशिवाय दुसरा उपाय नाही. विवेक केला की, नसून असल्यासारखे मानलेले बंधन नाहीसे होते. (६४)

विवेक पाहिल्याविण। जो जो उपाव तो तो सीण।
विवेक पाहातां आपण। आत्माच असे ॥ ६५॥

विवेक न करता दुसरी जी जी साधने करावीत त्याने सर्व शीणच होतो. विवेक केला की आपण आत्माच आहोत हे कळते. (६५)

आत्मयाचा ठाईं कांहीं। बद्ध मोक्ष दोनी नाहीं।
जन्ममृत्य हें सर्वहि। आत्मत्वीं न घडे ॥ ६६॥

आत्म्याच्या ठिकाणी बंध, मोक्ष दोन्हीही नाहीत. जन्ममृत्यू इत्यादी सर्वही आत्म्याच्या ठिकाणी घडत नाहीत. (६६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मोक्षलक्षणनाम' समास सातवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ८ : समास ८

# आत्मदर्शन

॥ श्रीराम ॥

मागां जालें निरूपण। परमात्मा तो तूंचि जाण।
तया परमात्मयाचें लक्षण। तें हें ऐसें असे ॥ १॥

मागील समासात परमात्मा तो तूचि जाण असे निरूपण केले गेले. आता त्या परमात्म्याचे लक्षण सांगितले जात आहे. (१)

जन्म नाहीं मृत्य नाहीं। येणें नाहीं जाणें नाही।
बद्ध मोक्ष दोनी नाहीं। परमात्मयासी ॥ २॥

परमात्म्याला जन्म नाही, मृत्यू नाही, येणे नाही, जाणे नाही, बंध आणि मोक्ष दोन्हीही नाही. (२)

परमात्मा निर्गुण निराकार। परमात्मा अनंत अपार।
परमात्मा नित्य निरंतर। जैसा तैसा ॥ ३॥

परमात्मा निर्गुण, निराकार, अनंत, अपार, नित्य व निरंतर असा आहे, ज्यात बदल होत नाही, जो जसाच्या तसाच राहतो तो परमात्मा होय. (३)

परमात्मा सर्वांस व्यापक। परमात्मा अनेकीं येक।
परमात्मयाचा विवेक। अतर्क्य आहे ॥ ४॥

परमात्मा हा सर्वव्यापक असून अनेकांना तो एकटाच व्यापून असतो. परमात्म्यासंबंधीचा विवेक हा अतर्क्य आहे. (४)

ऐसी परमात्मयाची स्थिती। बोलताती वेद श्रुती।
परमात्मा पाविजे भक्तीं। येथें संशय नाहीं ॥ ५॥

वेद व श्रुती याप्रकारे परमात्मस्वरूपाचे वर्णन करतात; पण असे असले तरी त्याची प्राप्ती भक्तीने निश्चितपणे होते यात जराही संशय नाही. (५)

तये भक्तीचें लक्षण। भक्ती नवविधा भजन।
नवविधा भजनें पावन। बहु भक्त जाले ॥ ६॥

ती भक्ती म्हणजेच भजन नऊ प्रकारचे आहे. या नवविधाभक्तीच्या योगे अनेक भक्त पावन झाले. (६)

तया नवविधामध्यें सार। आत्मनिवेदन थोर।
तयेचा करावा विचार। स्वानुभवें स्वयें ॥ ७॥

त्या नवविधाभक्तीत आत्मानिवेदन सर्वांत श्रेष्ठ असून सर्वांचे जणू सार आहे. त्या आत्मनिवेदनासंबंधी विचार करून स्वत: अनुभव घ्यावा. (७)

आपुलिया स्वानुभवें। आपणास निवेदावें।
आत्मनिवेदन जाणावें। ऐसें असे ॥ ८॥

आपल्या स्वत:च्या अनुभवाच्या योगे आपले आत्मनिवेदन खरोखरीच झाले आहे की नाही, ते जाणून घ्यावे. (८)

महत्पूजेचा अंतीं। देवास मस्तक वाहाती।
तैसी आहे निकट भक्ती। आत्मनिवेदनाची ॥ ९॥

महापूजा करून शेवटी देवाला मस्तक वाहतात. आत्मनिवेदन भक्ती ही या प्रकारासारखी अत्यंत निकटची भक्ती आहे. (९)

आपणांस निवेदिती। ऐसे भक्त थोडे असती।
तयांस परमात्मा मुक्ती। तत्काळ देतो ॥ १० ॥

यांप्रमाणे स्वत:स समर्पण करणारे भक्त फार थोडे असतात. त्यांना परमात्मा तात्काळ मुक्ती देतो. (१०)

आपणास कैसें निवेदावें। कोठें जाऊन पडावें।
किंवा मस्तक तोडावें। देवापुढें ॥ ११ ॥

त्यावर श्रोत्याने विचारले की, आपण स्वत:स कसे निवेदावे ? कोठे जाऊन पडावे अथवा देवापुढे आपले मस्तक तोडून घ्यावे ? काय करावे ते काहीच कळत नाही. (११)

ऐसें ऐकोन बोलणें। वक्ता वदे सर्वज्ञपणें।
श्रोतां सावधान होणें। येकाग्र चित्तें ॥ १२ ॥

हे बोलणे ऐकून सर्वज्ञ वक्ता म्हणाला की, आता श्रोत्यांनी सावध होऊन चित्त एकाग्र करावे. (१२)

आत्मनिवेदनाचें लक्षण। आधीं पाहावें मी कोण।
मग परमात्मा निर्गुण। तो वोळखावा ॥ १३ ॥

आत्मनिवेदन कशास म्हणावे त्याचे लक्षण सांगतात. आधी मी कोण याचा शोध घ्यावा व नंतर परमात्मा निर्गुण आहे हे जाणून घ्यावे. (१३)

देवाभक्ताचें शोधन। करितां होतें आत्मनिवेदन।
देव आहे पुरातन। भक्त पाहे ॥ १४ ॥

याप्रमाणे देव कसा आहे, भक्त कोणास म्हणावे याचा शोध घेऊ लागले की आपोआप आत्मनिवेदन होते. देव शाश्वत आहे हे भक्तास कळून येते. (१४)

देवास वोळखों जातां। तेथें जाली तद्रूपता।
देवभक्तविभक्तता। मुळींच नाहीं ॥ १५ ॥

देवाची ओळख पटवून घेण्याचा प्रयत्न करताना आपोआप तद्रूपता येते. मग देव-भक्त यांच्यात विभक्तता मुळीच राहात नाही. (१५)

विभक्त नाहीं म्हणोन भक्त। बंद्धन नाहीं म्हणोनि मुक्त।
अयुक्त नाहीं बोलणें युक्त। शास्त्राधारें ॥ १६ ॥

विभक्त नाही म्हणूनच त्याला भक्त म्हणतात. बंधन नाही म्हणूनच मुक्त म्हणतात, हे बोलणे अयुक्त नाही. कारण याला शास्त्राधार असल्याने ते युक्तच आहे. (१६)

देवाभक्ताचें पाहातां मूळ। होये भेदाचें निर्मूळ।
येक परमात्मा सकळ। दृश्यावेगळा ॥ १७ ॥

देव व भक्त यांच्या मुळाचा शोध घेऊ लागल्यावर भेद समूळ नाहीसा होतो. सर्व दृश्याच्या पलीकडे एक परमात्माच आहे हे कळून येते. (१७)

तयासि होतां मिळणी। उरी नाहीं दुजेपणीं।
देव भक्त हे कडसणी। निरसोन गेली ॥ १८ ॥

त्याच्याशी ऐक्य झाले की दुजेपणा म्हणजेच द्वैत उरतच नाही. देव-भक्त असा अडसर राहातच नाही. (१८)

आत्मनिवेदनाचे अंतीं। जें कां घडली अभेद भक्ती।
तये नांव सायोज्यमुक्ती। सत्य जाणावी ॥ १९ ॥

याप्रमाणे आत्मनिवेदनाच्या शेवटी देवभक्तांचे ऐक्य होऊन जी अभेदभक्ती घडते, तिचेच नाव सायुज्यमुक्ती होय हे सत्य जाणून घ्यावे. (१९)

जो संतांस शरण गेला। अद्वैतनिरूपणें बोधला।
मग जरी वेगळा केला। तरी होणार नाहीं ॥ २० ॥

जो संतांना शरण जातो आणि अद्वैताचा उपदेश ज्याला निरूपणाने प्राप्त झालेला असतो. त्याला मग वेगळे करण्याचा प्रयत्न केला, तरी तो वेगळा होऊच शकत नाही. (२०)

नदी मिळाली सागरीं। ते निवडावी कोणेपरी।
लोहो सोनें होतां माघारी। काळिमा न ये ॥ २१ ॥

नदी एकदा सागराला मिळाली, त्याच्याशी एकरूप झाली की तिला निवडून वेगळी कशी करतां येईल? लोखंडाचे परिसाच्या स्पर्शाने एकदा सोने झाले की त्याचा काळसरपणा परतून येत नाही. (२१)

तैसा भगवंतीं मिळाला। तो नवचे वेगळा केला।
देव भक्त आपण जाला। विभक्त नव्हे ॥ २२ ॥

त्याप्रमाणे जो भगवंताशी एकरूप होतो, जो भक्त देवच होतो, तो परत वेगळा केला जाऊ शकत नाही. (२२)

देव भक्त दोनी येक। ज्यासी कळला विवेक।
साधुजनीं मोक्षदायेक। तोचि जाणावा ॥ २३ ॥

देव व भक्त दोन्ही एकच आहेत, हा विवेक ज्याला कळतो तो साधुजनांनाही मोक्षदायक ठरतो, हे जाणून घ्यावे. (२३)

आतां असो हें बोलणें। देव पाहावा भक्तपणें।
तेणें त्याचें ऐश्वर्य बाणे। तत्काळ आंगीं ॥ २४ ॥

आता हे बोलणे पुरे झाले. देवाशी एकरूप होऊन म्हणजेच भक्तपणाने देवाला पाहवे. तसे केल्याने देवाचे ऐश्वर्य अंगी तात्काळ बाणते. (२४)

देहचि होऊन राहिजे। तेणें देहदु:ख साहिजे।
देहातीत होतां पाविजे। परब्रह्म तें ॥ २५॥

'मी देह' असे मानून देहच होऊन राहिले की, देहदु:ख भोगावे लागतेच. देहातीत झाले की परब्रह्माची प्राप्ती होते. (२५)

देहातीत कैसें होणें। कैसें परब्रह्म पावणें।
ऐश्वर्याचीं लक्षणें। कवण सांगिजे ॥ २६॥

यावर श्रोता विचारतो आहे की, देहातीत कसे व्हावे, परब्रह्माची प्राप्ती कशी करून घ्यावी, ऐश्वर्याची लक्षणे कोणती, हे सर्व आपण सांगावे. (२६)

ऐसें श्रोतां आक्षेपिलें। याचें उत्तर काये बोलिलें।
तेंचि आतां निरोपिलें। सावध ऐका ॥ २७॥

श्रोत्यांनी असे प्रश्न विचारले, त्याचे उत्तर काय दिले गेले, तेच आता वर्णन करून सांगितले जाईल. तरी सावध होऊन ऐका. (२७)

देहातीत वस्तु आहे। तें तूं परब्रह्म पाहे।
देहसंग हा न साहे। तुज विदेहासी ॥ २८॥

देहातीत वस्तू म्हणजे जे परब्रह्म तेच तू आहेस. तू विदेह असल्याने तुला देहाशी तादात्म्य सहन होत नाही. (२८)

ज्याची बुद्धी होये ऐसी। वेद वर्णिती तयासी।
शोधितां नाना शास्त्रांसी। न पडे ठाईं ॥ २९॥

ज्याची बुद्धी अशा प्रकारची होते, त्याची थोरवी वेदही वर्णन करतात. नाना शास्त्रांच्या अभ्यासाने सुद्धा अशी बुद्धी प्राप्त होत नाही. (२९)

ऐश्वर्य ऐसें तत्वतां। बाणे देहबुद्धि सोडितां।
देह मी ऐसें भावितां। अधोगती ॥ ३०॥

देहबुद्धी सोडली की, अशा प्रकारचे ऐश्वर्य प्राप्त होते. मी देह अशी भावना ठेवल्याने अधोगती होते.(३०)

याकारणें साधुवचन। मानूं नये अप्रमाण।
मिथ्या मानितां दूषण। लागों पाहे ॥ ३१॥

म्हणून साधूंचे वचन कधी खोटे मानू नये. त्याला मिथ्या मानण्याने दोष लागतो. (३१)

साधुवचन तें कैसें। काये धरावें विश्वासें।
येक वेळ स्वामी ऐसें। मज निरोपावें ॥ ३२॥

यावर श्रोता विचारतो की, साधु-वचन ते कोठले? त्यावर विश्वास का ठेवाव? स्वामी आपण एक वेळ मला हे सर्व समजावून द्यावे. (३२)

सोहं आत्मा स्वानंदघन। अजन्मा तो तूंचि जाण।
हेंचि साधूचें वचन। सदृढ धरावें ॥ ३३॥

सोऽहं म्हणजेच स्वानंदघन आत्मा तोच मी आहे. तो अजन्मा असून तो तूच आहेस, हे जाणावे. हेच साधूचे वचन अंतरात सुदृढ धरावे. (३३)

महावाक्याचें अंतर। तूंचि ब्रह्म निरंतर।
ऐसिया वचनाचा विसर। पडोंचि नये ॥ ३४॥

महावाक्याचे मर्म जे 'तूच निरंतर ब्रह्म आहेस' या वाक्याचा विसर कधीही पडू देऊ नये. (३४)

देहासि होईल अंत। मग मी पावेन अनंत।
ऐसें बोलणें निभ्रांत। मानूंचि नये ॥ ३५॥

देहाचा अंत होईल आणि मग मला अनंताची प्राप्ती होईल असे हे भ्रमिष्टपणाचे बोलणे कधी मानूच नये.(३५)

येक मूर्ख ऐसें म्हणती। माया नासेल कल्पांतीं।
मग आम्हांस ब्रह्मप्राप्ती। येरवीं नाहीं ॥ ३६॥

काही मूर्ख लोक असे म्हणतात की कल्पांती मायेचा नाश होईल तेव्हाच आम्हांला ब्रह्मप्राप्ती होईल, तोपर्यंत होणार नाही. (३६)

मायेसी होईल कल्पांत। अथवा देहासी येईल अंत।
तेव्हां पावेन निवांत। परब्रह्म मी ॥ ३७॥

कल्पांताच्यावेळी माया नाहीशी होईल तेव्हा अथवा या देहाचा अंत होईल, तेव्हा मला सावकाश परब्रह्म प्राप्त होईल. (३७)

हें बोलणें अप्रमाण। ऐसें नव्हे समाधान।
समाधानाचें लक्षण। वेगळेंचि असे ॥ ३८॥

हे बोलणे बिनबुडाचे आहे. याने समाधान होऊ शकत नाही. समाधानाचे लक्षण काही वेगळेच असते. (३८)

शैन्य अवघेंचि मरावें। मग राज्यपद प्राप्त व्हावें।
शैन्य अस्तांचि राज्य करावें। हें कळेना ॥ ३९॥

सैन्य सर्वच्या सर्व मरून जावे व मग आपल्याला राज्यपद मिळावे अशी इच्छा धरण्यापेक्षा सैन्य असतानाच राज्य करावे, हे अधिक बरे पण हे कळत नाही. (३९)

माया असोनिच नाहीं। देह असतांच विदेही।
ऐसें समाधान कांहीं। वोळखावें ॥ ४० ॥

त्याप्रमाणेच माया असूनही नसणे व देही असतानाच विदेही होणे यात जे समाधान आहे, ते जाणून घेतले पाहिजे. (४०)

राज्यपद हातासी आलें। मग परिवारें काय केलें।
परिवारा देखतां राज्य गेलें। हें तों घडेना ॥ ४१ ॥

एकदा राज्यपद हातात आल्यावर मग परिवाराने काय बिघडणार आहे? परिवारामुळे राज्य गेले असे तर घडूच शकत नाही. (४१)

प्राप्त जालियां आत्मज्ञान। तैसें दृश्य देहभान।
दृष्टीं पडतां समाधान। जाणार नाहीं ॥ ४२ ॥

एकदा आत्मज्ञान झाल्यावर जरी दृश्य जगत् दृष्टीस दिसत असले, देहाचे भानही राहात असले, तरी प्राप्त झालेले समाधान त्यामुळे जाणार नाही. (४२)

मार्गीं मुळी सर्पाकार। देखतां भये आलें थोर।
कळतां तेथीचा विचार। मग मारणें काये ॥ ४३ ॥

मार्गाने जात असताना सर्पाच्या आकाराची मुळी वाटेत दिसली त्यामुळे सर्प आहे, असे वाटून खूप भीतीही वाटली, पण मग कळले की हा सर्प नसून ही मुळी आहे. मग आता मारायचे कुणाला आणि कशासाठी? (४३)

तैसी माया भयानक। विचार पाहातां माईक।
मग तयेचा धाक। कासया धरावा ॥ ४४ ॥

त्याप्रमाणे माया भयानक वाटत होती; पण विचार केल्यावर ती मायिक आहे, मिथ्या आहे हे कळून आले. मग आता तिचा धाक कशाला धरायचा? (४४)

देखतां मृगजळाचे पूर। म्हणे कैसा पावों पैलपार।
कळतां तेथीचा विचार। सांकडें कैंचें ॥ ४५ ॥

मृगजळाचा पूर पाहून प्रथम वाटू लागले की, याच्या पैलतीरास आपण कसे जाऊ शकू, पण ज्यावेळी कळले की तेथे जल नाहीच मग संकट कसले? (४५)

देखतां स्वप्न भयानक। स्वप्नीं वाटे परम धाक।
जागृती आलीयां साशंक। कासया व्हावें ॥ ४६ ॥

भयानक स्वप्न दिसले आणि स्वप्नात खूप भीती वाटली. नंतर जागृती आल्यावर साशंक कशाला व्हावे? (४६)

तथापी माया कल्पनेसी दिसे। आपण कल्पनेतीत असे।
तेथें उद्वेग काईसे। निर्विकल्पासी ॥ ४७ ॥

त्याचप्रमाणे कल्पनेमुळेच माया दिसते आणि आपण तर कल्पनातीत आहोत, निर्विकल्प आहोत. मग आपल्याला उद्वेग येण्याचे कारणच काय? (४७)

अंतीं मती तेचि गती। ऐसें सर्वत्र बोलती।
तुझा अंतीं तुझी प्राप्ती। सहजचि जाली ॥ ४८ ॥

सर्व सांगतात की 'अंती मती तेचि गती' मग तुझा अंत होईल तेव्हा म्हणजे तुझ्या 'मी' पणाच्या अंती तुला तुझ्या स्वस्वरूपाची प्राप्ती सहजच होईल. (४८)

चौदेहांचा अंत। आणी जन्म मुळाचा प्रांत।
अंतांप्रांतासी अलिप्त। तो तूं आत्मा ॥ ४९ ॥

चारी देहादी एकूण सर्व दृश्य प्रपंचाचा अंत व जन्म म्हणजेच लय व उत्पत्ती जेथे होतात, तो मूळमायेचा प्रांत अथवा या सर्व दृश्य पदार्थांची उत्पत्ती व लय जिच्यामुळे होतात त्या मूळमायेचा अत्यंत शेवट ज्यात होतो, ते आत्मस्वरूप तूच असल्याने, मायामय या सर्व व्यवहारापासून तू सर्वथा अलिप्त आहेस (४९)

ज्यासी ऐसी आहे मती। तयास ज्ञानें आत्मगती।
गती आणी अवगती। वेगळाचि तो ॥ ५० ॥

ज्याची बुद्धी याप्रकारे दृढ झालेली असते त्याला ज्ञानाने आत्मगती प्राप्त होते. म्हणजे तो आत्म्याशी एकरूप होतो व त्यामुळे सद्‌गती व अधोगती यांच्या पलीकडे तो जाऊन पोहोचतो (५०)

मति खुंटली वेदांची। तेथें गती आणी अवगती कैंची।
आत्मशास्त्रगुरुप्रचितीची। ऐक्यता आली ॥ ५१ ॥

ज्या स्थितीचे वर्णन करताना वेदांची मतीही कुंठित होते तेथे गती अथवा अवगती कशी असू शकेल? अशा साधकाला आत्मप्रचीती, शास्त्रप्रचीती व गुरुप्रचीती येऊन तो परब्रह्माशी ऐक्य पावतो. (५१)

जीवपणाची फिटली भ्रांती। वस्तु आली आत्मप्रचिती।
प्राणी पावला उत्तम गती। सद्गुरुबोधें ॥ ५२ ॥

'मी जीव आहे' ही भ्रांती नष्ट होऊन परब्रह्मवस्तूची आत्मप्रचीती त्याला प्राप्त होते. अशा रीतीने सद्गुरूंच्या उपदेशामुळे माणसाला उत्तम गती प्राप्त होते. (५२)

सद्गुरुबोध जेव्हां जाला। चौंदेहांस अंत आला।
तेणें निजध्यास लागला। सस्वरूपीं ॥ ५३ ॥

सद्गुरूंचा अनुग्रह मिळताच चारी देहांचा नाश होतो. म्हणजे या चारी देहांपैकी एकही मी नाही हे ज्ञान होते व स्वस्वरूपाचा निदिध्यास लागतो. (५३)

तेणें निजध्यासें प्राणी। ध्येयचि जाला निर्वाणीं।
सायोज्यमुक्तीचा धनी। होऊन बैसला ॥ ५४ ॥

त्या निदिध्यासामुळे मनुष्य निश्चयपूर्वक ध्येयच होतो, आत्मरूपच होतो आणि सायुज्यमुक्तीचा धनी होऊन बसतो.(५४)

दृश्य पदार्थ वोसरतां। आवघा आत्माचि तत्वतां।
नेहटून विचारें पाहातां। दृश्य मुळींच नाहीं॥ ५५ ॥

दृश्य पदार्थ म्हणजे माया नष्ट झाली की सर्वत्र एक आत्माच खरोखर व्याप्त आहे हे कळते आणि विचार करून लक्षपूर्वक पाहिले की दृश्य मुळी नाहीच हे कळून येते.(५५)

मिथ्या मिथ्यत्वें पाहिलें। मिथ्यापणें अनुभवा आलें।
श्रोतीं पाहिजे ऐकिलें। या नांव मोक्ष ॥ ५६ ॥

मिथ्या दृश्य हे मिथ्याच आहे हे नुसते कळते असेही नाही. तर तसा अनुभवही आला, त्यामुळे त्याची आसक्ती संपूर्ण नाहीशी झाली. श्रोत्यांनी हे जाणले पाहिजे की, यालाच मोक्ष असे म्हणतात. (५६)

सद्गुरुवचन हृदईं धरी। तोचि मोक्षाचा अधिकारी।
श्रवण मनन केलेंचि करी। अत्यादरें ॥ ५७ ॥

जो सद्गुरूचे वचन हृदयात दृढ धारण करतो, तोच मोक्षाचा अधिकारी होतो. तो अत्यंत आदराने वारंवार सद्गुरूंच्या वचनाचे श्रवण-मनन करीतच राहतो. (५७)

जेथें आटती दोनी पक्ष। तेथें लक्ष ना अलक्ष।
या नांव जाणिजे मोक्ष। नेमस्त आत्मा ॥ ५८ ॥

जेथे अज्ञान हा पूर्वपक्ष व ज्ञान उत्तरपक्ष हे दोन्ही नाहीसे होतात, जेथे लक्ष्य अथवा अलक्ष्यही काही उरलेले नसते, असा नेमस्त एकला एक आत्मा त्याच्याशी ऐक्य पावणे, हाच मोक्ष म्हणून जाणावा. (५८)

जेथें ध्यान धारणा सरे। कल्पना निर्विकल्पीं मुरे।
केवळ ज्ञप्तिमात्र उरे। सूक्ष्म ब्रह्म ॥ ५९ ॥

जेथे ध्यान, धारणा आदी त्रिपुटी नष्ट होते, कल्पना जेथे निर्विकल्पात लय पावून सूक्ष्म ब्रह्म तेवढे ज्ञप्तिरूपाने म्हणजे जाणीवरूपाने उरते, त्यास मोक्ष म्हणावे. (५९)

भवमृगजळ आटलें। लटिकें बंधन सुटलें।
अजन्म्यास मुक्त केलें। जन्मदुःखापासुनी ॥ ६० ॥

मग संसाररूपी मृगजळ आटून जाते, खोटेच केवळ मानलेले बंधन सुटते. जो वास्तविक अजन्माच आहे, तो मिथ्या जन्मदुःखापासून मुक्त होतो. (६०)

निःसंगाची संगव्याधी। विदेहाची देहबुद्धी।
विवेकें तोडिली उपाधी। निःप्रपंचाची ॥ ६१ ॥

जो निःसंगच आहे त्याला भ्रांतीने संगरूपी रोग जडला होता, तो रोग नष्ट होतो. जो विदेही असून स्वतःस देही मानत होता त्याची देहबुद्धी नाहीशी होते आणि जो प्रपंचापासून सदैव अलिप्त आहे, त्याची प्रपंचरूपी उपाधी विवेकाच्या योगे नाहीशी होते.(६१)

अद्वैताचें तोडिलें द्वैत। येकांतास दिला येकांत।
अनंतास दिला अंत। अनंताचा ॥ ६२ ॥

जो वस्तुतः अद्वैत आहे त्याचे काल्पनिक द्वैत नष्ट केले, जो एकला एकच आहे त्याचा एकांत त्याला परत मिळवून दिला. जो अनंत आहे त्याच्या अनन्तपणाचाही अंत झाला. 'मी अनंत' ही जाणीवही उरली नाही. (६२)

जागृतीस चेवविलें। चेईऱ्यास सावध केलें।
निजबोधास प्रबोधिलें। आत्मज्ञान ॥ ६३ ॥

जागृतीलाच जागे केले, जागृत असलेल्याला सावध केले, निजबोधालाच आत्मज्ञानाचा उपदेश केला. (६३)

अमृतास केलें अमर। मोक्षास मुक्तीचें घर।
संयोगास निरंतर। योग केला ॥ ६४ ॥

जो कधी मरू शकतच नाही, त्याला अमर केले. मोक्षाला मुक्तीचे घर मिळवून दिले. ज्याचा कधी वियोग होऊ शकतच नाही, त्याचा निरंतर योग घडवून आणला. (६४)

निर्गुणास निर्गुण केलें। सार्थकाचे सार्थक जालें।
बहुतां दिवसां भेटलें। आपणासि आपण ॥ ६५॥

'मी निर्गुण' अशी जाणीवही राहिली नाही; म्हणजे निर्गुणालाही गुणरहित केले. आत्मज्ञान झाले तरच मनुष्यजन्माचे सार्थक होते. त्या सार्थकाचेही सार्थक झाले आणि अनेक दिवसांनी आपली स्वतःची आपल्याशी भेट झाली.(६५)

तुटला द्वैताचा पडदा। अभेदें तोडिलें भेदा।
भूतपंचकाची बाधा। निरसोन गेली ॥ ६६॥

द्वैताचा पडदा तुटून गेला, अद्वैताने भेदास नाहीसे केले, पंचमहाभूतांनी झडपले होते, ती भूतबाधा नाहीशी झाली.(६६)

जालें साधनाचें फळ। निश्चळास केलें निश्चळ।
निर्मळाचा गेला मळ। विवेकबळें ॥ ६७॥

विवेकामुळे साधन सफल झाले, निश्चळ परब्रह्मास निश्चल केले आणि निर्मळाचा मायारूपी मिथ्या मळ निघून गेला. (६७)

होतें सन्निध चुकलें। ज्याचें त्यास प्राप्त जालें।
आपणा देखता फिटलें। जन्मदुःख ॥ ६८॥

जवळ असूनही ज्याची चुकामूक झाली होती, ते ज्याचे त्यास प्राप्त झाले. आपल्या सत्य स्वरूपाला पाहताच अज्ञानामुळे भासणारे जन्मदुःख नाहीसे झाले. (६८)

दुष्ट स्वप्नें जाजावला। ब्राह्मण नीच याती पावला।
आपणासि आपण सांपडला। जागेपणें ॥ ६९॥

एका ब्राह्मणाला वाईट स्वप्न पडले की, आपण नीच जातीत जन्मलो आहोत. त्यामुळे तो खूप त्रासला, कष्टी झाला. जागा झाल्यावर त्याला कळले की, ते स्वप्न होते. आपण जसे होतो तसेच आहोत म्हणजे जणू आपण हरवलो होतो आणि आता आपणच आपल्याला सापडलो आहोत.(६९)

ऐसें जयास जालें ज्ञान। तया पुरुषाचें लक्षण।
पुढिले समासीं निरूपण। बोलिलें असे ॥ ७०॥

या प्रकारे ज्याला आत्मज्ञान झालेले आहे, त्या पुरुषाचे लक्षण पुढील समासात केले आहे ते ऐकावे. (७०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मदर्शननाम' समास आठवा समाप्त.

❑ ❑

## दशक ८ : समास ९

# सिद्धलक्षण

॥ श्रीराम ॥

अंतरीं गेलियां अमृत। बाह्य काया लखलखित।
अंतरस्थिति बाणतां संत। लक्षणें कैसीं ॥ १॥

श्रोता वक्त्यास प्रश्न करीत आहे. एखाद्याने अमृत प्राशन केले की ते पोटात गेल्यावर त्याची बाह्य कांतीसुद्धा लखलखीत दिसते, त्याप्रमाणे अंतरात स्वस्वरूपानुभव आलेल्या संतांची बाह्य लक्षणे कशी असतात ते सांगावे.(१)

जालें आत्मज्ञान बरवें। हे कैसेनि पां जाणावें।
म्हणोनि बोलिलीं स्वभावें। साधुलक्षणें ॥ २॥

एखाद्याला आत्मज्ञान निःसंदेहपणे झालेले आहे, हे कसे जाणावे? या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी आता स्वाभाविकपणे साधुलक्षणे सांगतो. (२)

ऐक सिद्धांचें लक्षण। सिद्ध म्हणिजे स्वरूप जाण।
तेथें पाहातां वेगळेपण। मुळींच नाहीं ॥ ३॥

आता सिद्धांचे लक्षण ऐक. सिद्धाचे मुख्य लक्षण म्हणजे तो स्वस्वरूपाशी एकरूप झालेला असतो. तेथे वेगळेपण जराही शिल्लक राहिलेले नसते. (३)

स्वरूप होऊन राहिजे। तया नांव सिद्ध बोलिजे।
सिद्धस्वरूपींच साजे। सिद्धपण ॥ ४॥

स्वरूप होऊन राहाणे, यालाच सिद्ध हे नाव आहे. जो स्वरूपाकार होऊन राहतो त्यालाच सिद्ध असे म्हणतात. कारण स्वरूप हे नेहमी स्वयंसिद्ध असते. (४)

वेदशास्त्रीं जें प्रसिद्ध । सस्वरूप स्वतसिद्ध ।
तयासिच बोलिजे सिद्ध । अन्यथा न घडे ॥५॥

स्वस्वरूप स्वयंसिद्ध आहे, हे वेदात, शास्त्रांतही प्रसिद्ध आहे. हे स्वयंसिद्ध स्वरूप जो स्वत: झाला त्यालाच सिद्ध म्हणावे. अन्यत्र 'सिद्ध' या शब्दाचा प्रयोग करताच येत नाही. (५)

तथापी बोलों कांहीं येक । साधकास कळाया विवेक ।
सिद्धलक्षणाचें कौतुक । तें हें ऐसें असे ॥६॥

तरी पण साधकाला विचार करून जाणता यावीत, म्हणून काही सिद्ध लक्षणांचे कौतुकाने वर्णन करीत आहे. ते असे (६)

अंतरस्थित स्वरूप जाली । पुढें काया कैसी वर्तली ।
जैसी स्वप्नींची नाथिली । स्वप्नरचना ॥७॥

स्वप्नात ज्याप्रमाणे मिथ्याच काही दिसते, ऐकू येते, त्याप्रमाणे सिद्ध पुरुषाची अंतरस्थिती स्वरूपाकार झाली तरी देहाने तो इतर सामान्य लोकांप्रमाणे व्यवहार करताना दिसतो. (७)

तथापी सिद्धांचे लक्षण । कांहीं करूं निरूपण ।
जेणें बाणे अंतर्खूण । परमार्थाची ॥८॥

तरीही परमार्थाची अंतर्खूण बाणावी, म्हणून येथे काही सिद्ध- लक्षणांचे निरूपण केले जात आहे (८)

सदा स्वरूपानुसंधान । हें मुख्य साधूचें लक्षण ।
जनीं असोन आपण । जनावेगळा ॥९॥

निरंतर स्वरूपानुसंधान हे साधूचे मुख्य लक्षण आहे. तो लोकांत लोकांसारखाच वागत असतो, पण त्याची अंतरस्थिती अगदी लोकांवेगळी असते. (९)

स्वरूपीं दृष्टी पडतां । तुटोन गेली संसारचिंता ।
पुढें लागली ममता । निरूपणाची ॥१०॥

स्वस्वरूपानुभव आल्याने त्याला प्रपंचाची चिंताच राहत नाही, तर अध्यात्मनिरूपणाबद्दल प्रेम वाटू लागते. (१०)

हें साधकाचें लक्षण । परी सिद्धाआंगीं असे जाण ।
सिद्धलक्षण साधकेंविण । बोलोंच नये ॥११॥

खरे पाहिले तर हे साधकाचे लक्षण आहे, पण ते सिद्धाच्याही ठिकाणी दिसून येते. कारण साधकच साधन करून पुढे सिद्ध झालेला असतो. त्यामुळे साधकाची लक्षणेच सिद्धाच्याही ठिकाणी आढळतात. (११)

बाह्य साधकाचे परी । आणि स्वरूपाकार अंतरीं ।
सिद्धलक्षण तें चतुरीं । जाणिजे ऐसें ॥१२॥

बाहेरून त्याचे आचरण उत्तम साधकासारखेच असते, पण अंतरी तो स्वरूपाकार झालेला असतो, हे चतुर श्रोत्यांनी जाणून घ्यावे. (१२)

संदेहरहित साधन । तेंचि सिद्धांचें लक्षण ।
अंतर्बाह्य समाधान । चळेना ऐसें ॥१३॥

सिद्ध बाहेरून साधन करीत असला तरी त्याच्या अंतरात कुठलाही संदेह नसतो. त्याचे साधन नि:संदेहपणे चालते. बाह्य परिस्थिती कशीही असली तरी त्याचे अंतर्बाह्य समाधान जराही ढळत नाही. (१३)

अचळ जाली अंतरस्थिती । तेथें चळणास कैंची गती ।
स्वरूपीं लागतां वृत्ती । स्वरूपचि जाली ॥१४॥

सतत स्वरूपानुसंधानामुळे त्याची अंतरस्थिती अढळ झालेली असते. तेथे चलन होईलच कसे? स्वरूपाकडे वृत्ती सतत लागली की ती स्वरूपच होऊन जाते. स्वरूपाशी तिचे ऐक्य होते (१४)

मग तो चळतांच अचळ । चंचळपणें निश्चळ ।
निश्चळ असोन चंचळ । देह त्याचा ॥१५॥

अशी स्थिती एकदा प्राप्त झाली की देहाची हालचाल होत असतानाही तो अंतर्यामी स्थिर अचल असतो. चंचल दिसत असला तरी अंतर्यामी निश्चल असतो आणि याप्रमाणे अंतर्यामी निश्चल असूनही देहाची सर्व हालचाल सुरू असते. (१५)

स्वरूपीं स्वरूपचि जाला । मग तो पडोनिच राहिला ।
अथवा उठोनि पळाला । तरी चळेना ॥१६॥

स्वरूपी जो स्वरूपाकार होऊन राहतो, तो देहाने एका ठिकाणी पडून राहिला अथवा उठून धावत सुटला, तरी त्यामुळे त्याच्या अंतरस्थितीत बदल होत नाही. (१६)

येथें कारण अंतरस्थिती। अंतरींच पाहिजे निवृत्ती।
अंतर लागलें भगवंतीं। तोचि साधु ॥ १७॥

येथे अंतरस्थितीच अत्यंत महत्त्वाची आहे. अंतरी वृत्तीच नाही, अशी निवृत्त अवस्था होणे आवश्यक आहे. ज्याचे अंत:करण भगवंताकडे लागलेले असते, तोच साधू होय. (१७)

बाह्य भलतैसें असावें। परी अंतर स्वरूपीं लागावें।
लक्षणें दिसती स्वभावें। साधुआंगीं ॥ १८॥

बाहेरून देहाची स्थिती कशीही असली तरी अंतर्यामी स्वरूपानुसंधान असले पाहिजे. त्यामुळे साधूच्या अंगी काही लक्षणे स्वाभाविकरीत्याच दिसून येतात. (१८)

राजीं बैसतां अवलिळा। आंगीं बाणे राजकळा।
स्वरूपीं लागतां जिव्हाळा। लक्षणें बाणती ॥ १९॥

एखादा मनुष्य अकस्मात राज्यपदावर आला की, त्याच्या अंगी राजकळा आपोआप बाणते. त्याप्रमाणे स्वरूपी लक्ष लागले, प्रेम उत्पन्न झाले की काही लक्षणे आपोआप अंगी बाणतात. (१९)

येरव्हीं अभ्यास करितां। हातां न चढती सर्वथा।
स्वरूपीं राहावें तत्वतां। स्वरूप होऊनी ॥ २०॥

ती लक्षणे एरवी कितीही अभ्यास केला तरी प्राप्त होऊ शकत नाहीत, स्वरूपाच्या ठिकाणी स्वरूपाकार होऊन राहावे लागते. तरच ती लक्षणे अंगी बाणतात. (२०)

अभ्यासाचा मुगुटमणी। वृत्ती राहावी निर्गुणीं।
संतसंगें निरूपणीं। स्थिती बाणे ॥ २१॥

वृत्ती सतत निर्गुणी राहाणे ही अभ्यासातील सर्वोच्च स्थिती आहे. संतसंगतीत सतत अध्यात्माचे निरूपण श्रवण केल्याने ती स्थिती अंगी बाणते. (२१)

ऐसीं लक्षणें बरवीं। स्वरूपाकारें अभ्यासावीं।
स्वरूप सोडितां गोसावी। भांबावती ॥ २२॥

स्वरूपानुसंधानाने स्वरूपाकार होत असता या उत्तम लक्षणांचाही अभ्यास करावा. स्वरूपानुसंधान सुटले की सिद्धही भ्रष्ट होतात. (२२)

आतां असो हें बोलणें। ऐका साधूचीं लक्षणें।
जेणें समाधान बाणे। साधकाआंगीं ॥ २३॥

असो. आता हे बोलणे पुरे झाले. आता ज्यायोगे साधकाच्या अंगी समाधान बाणते, ती साधूची लक्षणे ऐका. (२३)

स्वरूपीं भरतां कल्पना। तेथें कैची उरेल कामना।
म्हणौनियां साधुजना। कामचि नाहीं ॥ २४॥

स्वरूप निर्विकल्प असल्याने तेथे कल्पना करू लागल्यास कल्पनाच नाहीशी होते, तर कल्पनेमुळे उत्पन्न होणारी कामना तेथे कशी शिल्लक उरेल? म्हणून साधू निष्काम असतात. (२४)

कल्पिला विषयो हातींचा जावा। तेणें गुणें क्रोध यावा।
साधुजनाचा अक्षै ठेवा। जाणार नाहीं ॥ २५॥

आपण एखादी वस्तू वा भोग प्राप्त व्हावा, म्हणून कल्पना केली आणि ती इच्छा पुरी झाली नाही की आपल्याला राग येतो, पण साधूचा ठेवा अक्षय असतो. स्वस्वरूपरूप ठेवा कधी नाहीसा होतच नाही. (२५)

म्हणोनि ते क्रोधरहित। जाणती स्वरूप संत।
नासिवंत हे पदार्थ। सांडुनियां ॥ २६॥

म्हणून साधू हे क्रोधरहित असतात. सर्व नाशिवंत पदार्थांचा त्यांनी मनाने त्याग केलेला असतो व स्वरूप हे सत्य आहे, नित्य आहे हे जाणून त्यांनी त्याचा स्वीकार केलेला असतो. (२६)

जेथें नाहीं दुसरी परी। क्रोध यावा कोणावरी।
क्रोधरहित सचराचरीं। साधुजन वर्तती ॥ २७॥

जेथे दुसरे कोणी नाहीच, तेथे क्रोध तरी कुणावर करणार? म्हणून या जगात वावरत असूनही साधू क्रोधरहित असतात. (२७)

आपुला आपण स्वानंद। कोणावरी करावा मद।
याकारणें वादवेवाद। तुटोन गेला ॥ २८॥

आपणच स्वानंदरूपाने सर्वत्र असताना गर्व तरी कुणावर करणार त्यामुळे कुणाशी वादविवाद करण्याचा प्रसंगच येत नाही. (२८)

साधु स्वरूप निर्विकार। तेथें कैंचा तिरस्कार।
आपला आपण मत्सर। कोणावरी करावा ॥ २९॥

साधू स्वरूपाकार झालेले असतात आणि स्वरूप तर निर्विकार आहे, मग तिरस्कार उत्पन्न होईलच कसा? सर्वत्र आपणच आहोत तर आपणच आपला मत्सर कसा करणार (२९)

साधु वस्तु अनायासें। याकारणें मत्सर नसे।
मदमत्सराचें पिसें। साधुसी नाहीं ॥ ३० ॥

साधू अनायासे आत्मवस्तुरूप झालेले असतात. त्यामुळे तेथे विकारांना वावच नसल्याने मद-मत्सराचे खूळ साधूंच्या ठिकाणी नसते. (३०)

साधु स्वरूप स्वयंभ। तेथें कैंचा असेल दंभ।
जेथें द्वैताचा आरंभ। जालाच नाहीं ॥ ३१ ॥

साधू हे स्वत:सिद्ध स्वरूपाकार झालेले असतात. तेथे द्वैत निर्माणच होऊ शकत नाही, मग तेथे दंभ असेलच कसा? (३१)

जेणें दृश्य केलें विसंच। तयास कैंचा हो प्रपंच।
याकारणें नि:प्रपंच। साधु जाणावा ॥ ३२ ॥

ज्याने सर्व दृश्य सृष्टी मिथ्या जाणून तिचा त्याग केलेला असतो, त्याला प्रपंच कसा असेल? म्हणून साधू हा नि:प्रपंच असतो हे जाणून घ्यावे. (३२)

अवघे ब्रह्मांड त्याचें घर। पंचभूतिक हा जोजार।
मिथ्या जाणोन सत्वर। त्याग केला ॥ ३३ ॥

ज्याने हा पांचभौतिक पसारा मिथ्या आहे हे कळताच सत्वर त्याचा त्याग केलेला असतो व अवघे ब्रह्मांड हेच ज्याचे घर झालेले असते, तो साधू होय. (३३)

याकारणें लोभ नसे। साधु सदा निर्लोभ असे।
जयाची वासना समरसे। शुद्धस्वरूपीं ॥ ३४ ॥

पांचभौतिक पसारा मिथ्या हे तो जाणत असल्याने त्याला कशाचाही लोभ नसतो. शुद्ध स्वस्वरूपाच्या ठिकाणी त्याची वासना लय पावलेली असते, म्हणून साधू सदा निर्लोभ असतो (३४)

आपुला आपण आघवा। स्वार्थ कोणाचा करावा।
म्हणोनि साधु तो जाणावा। शोकरहित ॥ ३५ ॥

आत्मरूपाने आपणच सर्वत्र व्याप्त आहोत, असे तो जाणतो. मग स्वार्थ कोणाचा साधावा? साधू स्वार्थरहित होतो. त्यामुळेच तो शोकरहितही होतो.(३५)

दृश्य सांडून नासिवंत। स्वरूप सेविलें शाश्वत।
याकारणें शोकरहित। साधु जाणावा ॥ ३६ ॥

नाशिवंत दृश्याचे मिथ्यापण जाणून साधूने त्याचा त्याग केलेला असतो व शाश्वत अशा स्वरूपाचा आश्रय केलेला असल्याने साधू शोकरहित झालेला असतो, हे जाणावे. (३६)

शोकें दुखवावी वृत्ती। तरी ते जाहाली निवृत्ती।
ह्मणौनि साधु आदिअंतीं। शोकरहित ॥ ३७ ॥

शोकामुळे मनात दु:खाची वृत्ती उत्पन्न होते, पण साधू हा वृत्तिरहित झालेला असतो. म्हणून तो आदि व अंती शोकरहित असतो. (३७)

मोहें झळंबावें मन। तरी तें जाहालें उन्मन।
याकारणें साधुजन। मोहातीत ॥ ३८ ॥

मन मोहाने पछाडले जाते, पण साधूला उन्मनी अवस्था प्राप्त झालेली असल्याने तो मोहातीत असतो. (३८)

साधु वस्तु अद्वये। तेथें कैंचें वाटेल भये।
परब्रह्म तें निर्भये। तोचि साधु ॥ ३९ ॥

आत्मवस्तू एकच आहे. तिच्याशी साधू एकरूप झालेला असल्याने त्याला भय कशाचे वाटणार? परब्रह्म जसे निर्भय असते, तसाच त्याच्याशी ऐक्य पावलेला साधूही निर्भय असतो. (३९)

याकारणें भयातीत। साधु निर्भय निवांत।
सकळांस मांडेल अंत। साधु अनंतरूपी ॥ ४० ॥

साधू हा भयातीत असल्याने निर्भय आणि निवांत असतो. सर्व दृश्य सृष्टीचा प्रलयकाळी अंत ओढवला तरी साधू अनंतरूप परब्रह्माशी ऐक्य पावल्याने अनंतच होतो(४०)

सत्यस्वरूपें अमर जाला। भये कैंचें वाटेल त्याला।
याकारणें साधुजनाला। भयेचि नाहीं ॥ ४१ ॥

सत्यस्वरूपी ऐक्य पावून तो अमर झालेला असतो. मग त्याला भय कसे वाटेल? म्हणून साधूंना भयच नसते(४१)

जेथें नाहीं द्वंद्वभेद। आपला आपण अभेद।
तेथे कैंचा उठेल खेद। देहबुद्धीचा ॥ ४२ ॥

जेथे द्वैतामुळे येणारे वितुष्ट नाही, तेथे खेद कसा उत्पन्न होणार? देहबुद्धीमुळे खेद उत्पन्न होतो. साधू आपण केवळ अभेद म्हणजे एकच आत्मरूप झालेला असल्याने त्यास खेद होत नाही. (४२)

बुद्धीनें नेमिलें निर्गुणा। त्यास कोणीच नेईना।
याकारणें साधुजना। खेदचि नाहीं ॥ ४३ ॥

त्याच्या बुद्धीने निर्गुणाचा निश्चय केलेला असतो आणि निर्गुणाला तर कोणी नेऊच शकत नाही. त्यामुळे साधूंना खेदच नसतो (४३)

आपण येकला ठाईंचा। स्वार्थ करावा कोणाचा।
दृश्य नस्तां स्वार्थाचा। ठावचि नाहीं ॥ ४४ ॥

आपण तो एकला एक असतो, तर स्वार्थ कुणाचा करणार? दृश्य मिथ्या ठरल्याने स्वार्थाला जागाच उरली नाही. (४४)

साधु आपणचि येक। तेथें कैंचा दुःखशोक।
दुजेविण अविवेक। येणार नाहीं ॥ ४५ ॥

साधू स्वरूपाकार झाल्याने द्वैत पूर्ण निःशेष झालेले असते. दुसरा कोणी नाहीच, तर अविवेक तरी कसा असणार? आणि मग दुःख-शोक तरी कसे असणार? (४५)

आशा धरितां परमार्थाची। दुराशा तुटली स्वार्थाची।
म्हणोन नैराशता साधूची। वोळखण ॥ ४६ ॥

परमार्थाची इच्छा धरल्याने स्वार्थाची दुराशा नष्ट झाली, म्हणून निःस्पृहता किंवा वैराग्य हे साधूचे लक्षण जाणावे. (४६)

मृदपणें जैसें गगन। तैसें साधूचें लक्षण।
याकारणें साधुवचन। कठीण नाहीं ॥ ४७ ॥

गगन जसे मृदू असते तसा स्वरूपाकार झालेला साधूही मृदू असतो. म्हणून तो कधी कठोर वचन बोलतच नाही. (४७)

स्वरूपाचा संयोगीं। स्वरूपचि जाला योगी।
याकारणें वीतरागी। निरंतर ॥ ४८ ॥

स्वरूपाशी ऐक्य झाल्याने योगी स्वरूपच झालेला असतो. म्हणून तो निरंतर अनासक्त असतो. (४८)

स्थिती बाणतां स्वरूपाची। चिंता सोडिली देहाची।
याकारणें होणाराची। चिंता नसे ॥ ४९ ॥

स्वरूपस्थिती बाणल्यामुळे त्याने देह प्रारब्धावर सोडलेला असतो. जे आपले स्वरूप नाही त्याची चिंता कशाला करायची? म्हणून त्याने पुढे काय होईल, कसे होईल अशी देहाच्या संबंधाने उत्पन्न होणारी चिंता सोडलेली असते. (४९)

स्वरूपीं लागतां बुद्धी। तुटे अवघी उपाधी।
याकारणें निरोपाधी। साधुजन ॥ ५० ॥

बुद्धी स्वरूपाच्या ठिकाणी जडल्यामुळे सर्व उपाधी नष्ट होतात. म्हणून साधूलोक निरुपाधिक असतात. (५०)

साधु स्वरूपींच राहे। तेथें संगचि न साहे।
म्हणोनि साधु तो न पाहे। मानापमान ॥ ५१ ॥

साधू नेहमी स्वरूपाकार होऊन राहतो आणि स्वरूप तर निःसंग असते, त्यामुळे साधूही निःसंग होतो. म्हणून तो मानापमानाचा विचारच करीत नाही. (५१)

अलक्षास लावी लक्ष। म्हणोन साधु परम दक्ष।
वोढूं जाणती कैपक्ष। परमार्थाचा ॥ ५२ ॥

साधू अलक्ष्य अशा आत्मस्वरूपावर लक्ष केंद्रित करतो, म्हणून तो अत्यंत सावध असतो आणि नेहमी परमार्थाचा कैवार घेतो. (५२)

स्वरूपीं न साहे मळ। ह्मणौन साधु तो निर्मळ।
साधु स्वरूपचि केवळ। म्हणोनियां ॥ ५३ ॥

स्वरूपाच्या ठिकाणी मायारूपी मळ नसतो म्हणून साधूही निर्मळ असतात. कारण ते स्वरूपच झालेले असतात. (५३)

सकळ धर्मांमधें धर्म। स्वरूपीं राहाणें हा स्वधर्म।
हेंचि जाणिजे मुख्य वर्म। साधुलक्षणाचें ॥ ५४ ॥

सर्व धर्मामध्ये स्वधर्म हा श्रेष्ठ धर्म असतो आणि स्वरूपी राहाणे हाच स्वधर्म होय. साधू निरंतर स्वरूपी राहत असतात, हेच साधुलक्षणाचे मुख्य वर्म आहे. (५४)

धरितां साधूची संगती। आपषाच लागे स्वरूपस्थिती।
स्वरूपस्थितीनें बाणती। लक्षणें आंगीं ॥ ५५ ॥

साधूची संगत धरली म्हणजे आपोआप स्वरूपस्थिती प्राप्त होते आणि स्वरूपस्थितीमुळे साधूची लक्षणे अंगी बाणतात. (५५)

ऐसीं साधूचीं लक्षणें। आंगीं बाणती निरूपणें।
परंतु स्वरूपीं राहाणें। निरंतर ॥ ५६ ॥

अध्यात्मनिरूपणाने, त्याच्या श्रवणाने साधूची लक्षणे अंगी बाणतात, पण निरंतर स्वरूपी राहावयास हवे. (५६)

निरंतर स्वरूपीं राहातां। स्वरूपचि होईजे तत्वतां।
मग लक्षणें आंगीं बाणतां। वेळ नाहीं ॥५७॥

निरंतर स्वरूपी राहिले, की तत्त्वत: साधक स्वस्वरूपच होतो. मग साधूची लक्षणे अंगी बाणण्यास वेळ लागत नाही. (५७)

स्वरूपीं राहिल्यां मती। अवगुण अवघेचि सांडती।
परंतु यासी सत्संगती। निरूपण पाहिजे ॥५८॥

बुद्धी स्वरूपामध्ये स्थिर राहिली की, सर्व अवगुण नष्ट होतात, पण हे सर्व होण्यासाठी सत्संगती आणि संतमुखाने अध्यात्मनिरूपण ऐकणे हे व्हावयालाच हवे. (५८)

सकळ सृष्टीचा ठाईं। अनुभव येकचि नाहीं।
तो बोलिजेल सर्वही। पुढिले समासीं ॥५९॥

सर्व सृष्टीमध्ये सर्वांचा अनुभव एकसारखाच नसतो. त्यासंबंधी पुढील समासात सांगितले जाईल. (५९)

कोणें स्थितीनें राहाती। कैसा अनुभव पाहाती।
रामदास म्हणे श्रोतीं। अवधान देणें ॥६०॥

कोण कोण कुठल्या प्रकारे राहतात, त्यांना काय काय अनुभव येतात, ते श्रोत्यांनी अवधान देऊन ऐकावे, असे रामदास सांगतात. (६०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सिद्धलक्षणनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक ८ : समास १०

# सुन्यत्वनिर्शन

॥ श्रीराम ॥

जनाचे अनुभव पुसतां। कल्हो उठिला अवचिता।
हा कथाकल्लोळ श्रोतां। कौतुकें ऐकावा ॥१॥

श्री समर्थ म्हणतात की, लोकांना त्यांच्या त्यांच्या अनुभवाबद्दल विचारताच एकच गदारोळ उठला. प्रत्येकजण आपले मत, अनुभव सांगू लागला. त्यामुळे जो काही कल्लोळ उडाला, तो श्रोत्यांनी कौतुकाने ऐकावा.(१)

येक म्हणती हा संसारु। करितां पाविजे पैलपारु।
आपला नव्हे कीं जोजारु। जीव देवाचे ॥२॥

एक म्हणतो की, हा संसार करता करताच आपण पैलतीराला पोहोचू. हा व्याप आपला थोडाच आहे? सर्व जीव देवाचे आहेत. (२)

येक म्हणती हें न घडे। लोभ येऊन आंगीं जडे।
पोटस्तें करणें घडे। सेवा कुटुंबाची ॥३॥

दुसरा कुणी म्हणतो की, असे काही घडणार नाही. संसार करता करता लोभ येऊन अंगाला चिकटतो. पोटासाठी कुटुंबाची सेवा करणे भाग पडते. (३)

येक म्हणती स्वभावें। संसार करावा सुखें नावें।
कांहीं दानपुण्य करावें। सद्गतीकारणें ॥४॥

कुणी म्हणतात की सुखेनैव संसार करावा. मात्र सद्‌गती प्राप्त व्हावी म्हणून काही दान, पुण्य आदीही करावे. (४)

येक म्हणती संसार खोटा। वैराग्यें घ्यावा देशवटा।
येणें स्वर्गलोकींच्या वाटा। मोकळ्या होती ॥५॥

कुणी म्हणतात की संसार खोटा आहे. म्हणून वैराग्य धारण करून देशत्याग करावा. म्हणजे स्वर्गप्राप्तीचे अनेक मार्ग मोकळे होतात. (५)

येक म्हणती कोठें जावें। वेर्थची कासया हिंडावें।
आपुले आश्रमीं असावें। आश्रमधर्म करूनी॥६॥

कुणी म्हणतात की उगीच कोठे जायचे? व्यर्थ कशाला इकडे-तिकडे हिंडायचे! त्यापेक्षा आपला जो आश्रम असेल त्याचे आचरण त्या आश्रमात राहूनच करावे (६)

येक म्हणती कैंचा धर्म। अवघा होतसे अधर्म।
ये संसारीं नाना कर्म। करणें लागे ॥७॥

कुणी म्हणतात की, कुठला आला आहे धर्म? सर्व अधर्मच घडत असतो. या संसारात नाना प्रकारची कर्मे करावी लागतात (७)

**येक म्हणती बहुतांपरी। वासना असावी बरी।**
**येणेंचि तरिजे संसारीं। अनायासें ॥ ८ ॥**

कुणी म्हणतात की, या सर्वांपेक्षा आपली वासना बरी असावी म्हणजे अनायासे हा संसार तरून जाता येतो. (८)

**येक म्हणती कारण भाव। भावेंचि पाविजे देव।**
**येर हें अवघेंचि वाव। गथागोवी ॥ ९ ॥**

एक म्हणतात की, आपला भावच सर्व गोष्टीस कारण असतो. भाव चांगला असेल तर त्यामुळे देवाचीही प्राप्ती होते. भावाशिवाय सर्व व्यर्थ आहे. गोंधळ आहे. (९)

**येक म्हणती वडिलें जीवीं। अवघीं देवचि मानावीं।**
**मायेबापें पूजित जावीं। येकाभावें ॥ १० ॥**

आपल्या आईवडिलांना जीवाभावाने देवच मानीत जावे व एकनिष्ठपणाने आई-वडिलांची पूजा करावी. (१०)

**येक म्हणती देवब्राह्मण। त्यांचें करावें पूजन।**
**मायेबाप नारायेण। विश्वजनाचा ॥ ११ ॥**

कुणी म्हणतात की, देवाब्राह्मणांचे पूजन करावे. त्यामुळे भगवान नारायण प्रसन्न होतात. (११)

**येक म्हणती शास्त्र पाहावें। तेथें निरोपिलें देवें।**
**तेणें प्रमाणेंचि जावें। परलोकासी ॥ १२ ॥**

कुणी म्हणतात की, शास्त्रात काय सांगितले आहे त्याप्रमाणे वागावे, असे भगवान म्हणतात. त्याप्रमाणे वागले असता परलोक प्राप्त होतो. (१२)

**येक म्हणती अहो जना। शास्त्र पाहातां पुरवेना।**
**याकारणें साधुजना। शरण जावें ॥ १३ ॥**

एक म्हणतात की, अहो, शास्त्रे इतकी आहेत की त्यांचा अभ्यास करायला आयुष्य पुरे पडणार नाही. म्हणून त्यापेक्षा साधू-संतांना शरण जावे, हे बरे. (१३)

**येक म्हणती सांडा गोठी। वायांचि करितां चाउटी।**
**सर्वांस कारण पोटीं। भूतदया असावी ॥ १४ ॥**

कुणी म्हणतात की, उगीच वटवट करणे बंद करा. ती गोष्ट राहू दे. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे पोटात भूतदया असावी. (१४)

**येक म्हणती येकचि बरवें। आपुल्या आचारें असावें।**
**अंतकाळीं नाम घ्यावें। सर्वोत्तमाचें ॥ १५ ॥**

एक म्हणतात की, आपापल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणे आचार करावा हे सर्वांत चांगले. आणि अंतकाळी सर्वोत्तमाचे नाव घ्यावे. (१५)

**येक म्हणती पुण्य असेल। तरीच नाम येईल।**
**नाहीं तरी भुली पडेल। अंतकाळीं ॥ १६ ॥**

दुसरा कुणी म्हणतो की, जर गाठी पुण्य असेल तरच अंतकाळी मुखात नाम येईल, नाहीतर विसर पडेल, भ्रांती उत्पन्न होईल. (१६)

**येक म्हणती जीत असावें। तंवचि सार्थक करावें।**
**येक म्हणती फिरावें। तीर्थाटण ॥ १७ ॥**

एक म्हणतात की, जिवंतपणी आयुष्याचे सार्थक करावे. तर दुसरा कुणी म्हणतो की, तीर्थयात्रा करीत फिरावे हे चांगले. (१७)

**येक म्हणती हें अटाटी। पाणीपाषाणाची भेटी।**
**चुबकुळ्या मारिता हिंपुटी। कासाविस व्हावें ॥ १८ ॥**

कुणी एक म्हणतो की, व्यर्थ खटाटोप कशाला करावा? तीर्थक्षेत्रात जिकडे-तिकडे पाणी आणि पाषाणाशिवाय काय आहे? तीर्थात बुचकळ्या मारताना नाकातोंडात पाणी जाऊन कष्ट होतात आणि जीव मात्र कासावीस होतो. (१८)

**येक म्हणती सांडी वाचाळी। अगाध महिमा भूमंडळीं।**
**दर्शनमात्रें होये होळी। माहापातकाची ॥ १९ ॥**

त्यावर दुसरा कुणी म्हणतो की, वाचाळपणा बंद कर. या पृथ्वीवर तीर्थक्षेत्रांचा महिमा अगाध आहे. केवळ त्यांच्या दर्शनाने मोठमोठी पातके भस्म होऊन जातात. (१९)

**येक म्हणती तीर्थ स्वभावें। कारण मन अवरावें।**
**येक म्हणती कीर्तन करावें। सावकास ॥ २० ॥**

कुणी एक म्हणतो की, मनच बंधमोक्षाला कारण असल्याने संयमाने त्यासच आवरावे म्हणजे तेच तीर्थस्वरूप बनते, तर दुसरा कुणी म्हणतो की, वेळ मिळेल तेव्हा कीर्तन करीत जावे. (२०)

**येक म्हणती योग बरवा। मुख्य तोचि आधीं साधावा।**
**देहो अमरचि करावा। अकस्मात ॥ २१ ॥**

कुणी म्हणतो योग हेच उत्तम साधन आहे. म्हणून तोच मुख्य साधावा आणि एकाएकी आपला देहच अमर करावा. (२१)

येक म्हणती ऐसें काये। काळवंचना करूं नये।
येक म्हणती धरावी सोये। भक्तिमार्गाची ॥ २२॥

त्यावर दुसरा कुणी म्हणतो की, हे बरे नाही. माणसाने काळाची फसवणूक करू नये. तर तिसराच कुणी म्हणतो की, आपण आपले भक्तिमार्गास लागावे हे बरे. (२२)

येक म्हणती ज्ञान बरवें। येक म्हणती साधन करावें।
येक म्हणती मुक्त असावें। निरंतर ॥ २३॥

कुणी म्हणतात की, ज्ञान उत्तम. कुणी म्हणतात की, साधन करावे. तर आणखी कुणी म्हणतात की, निरंतर मुक्तच असावे. (२३)

येक म्हणती अनर्गळा। धरीं पापाचा कंटाळा।
येक म्हणती रे मोकळा। मार्ग आमुचा ॥ २४॥

त्यावर कुणी एखादा म्हणतो की, अरे, उच्छृंखल माणसा, जरा तरी पापाचा कंटाळा धर ! त्यावर कुणी उत्तर देतो की, अरे, आमचा मार्गच मुळी मोकळेपणाने वागण्याचा आहे. (२४)

येक म्हणतीं हें विशेष। करूं नये निंदा द्वेष।
येक म्हणती सावकास। दुष्टसंग त्यागावा ॥ २५॥

कुणी म्हणतो की, कुणाचीही निंदा अथवा द्वेष करू नये हे महत्त्वाचे आहे. तर दुसरा म्हणतो की, हळूहळू दुष्टांची संगत सोडावी. (२५)

येक म्हणती ज्याचें खावें। त्या सन्मुखचि मरावें।
तेणें तत्काळचि पावावें। मोक्षपद ॥ २६॥

कुणी म्हणतात की, ज्याचे अन्न आपण खातो त्याची चाकरी करीत त्याच्यासमोर मरावे म्हणजे तत्काळ मोक्षपद प्राप्त होते. (२६)

येक म्हणती सांडा गोठी। आधीं पाहिजे ते रोटी।
मग करावी चाउटी। सावकास ॥ २७॥

कुणी म्हणतात की, या सर्व गोष्टी राहू दे. आधी पोटाला अन्न कसे मिळेल हे पाहिले पाहिजे. इतर वटवट नंतर सावकाश करीत बसावे. (२७)

येक म्हणती पाउस असावा। मग सकळ योग बरवा।
कारण दुष्काळ न पडावा। म्हणिजे बरें ॥ २८॥

कुणी म्हणतात की, प्रथम चांगला पाऊस पडावा म्हणजे मग इतर गोष्टी सुरळीत चालतात. दुष्काळ पडला नाही म्हणजे बरे (२८)

येक म्हणती तपोनिधी-। होतां, वोळती सकळ सिद्धी।
येक म्हणती रे आधीं। इंद्रपद साधावें ॥ २९॥

कुणी म्हणतात की, खूप तप केले पाहिजे म्हणजे मग सिद्धी प्राप्त होतात. दुसरा कुणी म्हणतो की, आधी इंद्रपदाची प्राप्ती करून घ्यावी. (२९)

येक म्हणती आगम पाह्यवा। वेताळ प्रसन्न करून यावा।
तेणें पाविजे देवा। स्वर्गलोकीं ॥ ३०॥

कुणी म्हणतात की, तंत्रशास्त्राचा अभ्यास करून आधी वेताळाला प्रसन्न करून घ्यावे. त्यायोगे स्वर्गलोक प्राप्त होऊन देव भेटतो (३०)

येक म्हणती अघोरमंत्र। तेणें होईजे स्वतंत्र।
श्रीहरी जयेचा कळत्र। तेचि वोळे ॥ ३१॥

कुणी म्हणतात की, अघोर मंत्राचे अनुष्ठान करावे म्हणजे स्वतंत्र होता येते व जिचा आधार श्रीहरी आहे ती लक्ष्मी प्रसन्न होते. (३१)

ती लागले सर्व धर्म। तेथें कैंचें क्रियाकर्म।
येक म्हणती कुकर्म। तिच्या मदें ॥ ३२॥

त्या लक्ष्मीच्या योगेच सर्व धर्म घडतात. मग तेथे क्रियाकर्माची आवश्यकता उरत नाही. तर दुसरा कुणी म्हणतो की, लक्ष्मीच्या मदानेच कुकर्म घडते. (३२)

येक म्हणती येक साक्षप। करावा मृत्युंजयाचा जप।
तेणें गुणें सर्व संकल्प। सिद्धीतें पावती ॥ ३३॥

कुणी म्हणतात की, एक प्रयत्न जरूर करून पहावा. मृत्युंजयाचा जप केला की, त्यायोगे सर्व संकल्प सिद्धीस जातात (३३)

येक म्हणती बट भैरव। तेणें पाविजे वैभव।
येक म्हणती झोटिंग सर्व। पुर्वितसे ॥ ३४॥

कुणी म्हणतो की, बटुक भैरवाची उपासना केली की, वैभव प्राप्त होते. दुसरा कुणी म्हणतो की, झोटिंग सर्व इच्छा पूर्ण करतो. (३४)

येक म्हणती काळी कंकाळी। येक म्हणती भद्रकाळी।
येक म्हणती उचिष्ट चांडाळी। साहें करावी ॥ ३५॥

कुणी म्हणतात, काळी कंकाळी, तर दुसरे कुणी म्हणतात, भद्रकाळी तर आणखी कुणी म्हणतात की, उच्छिष्ट चांडाळी साह्य करून घ्यावी. (३५)

येक म्हणती विघ्नहर। येक म्हणती भोळा शंकर।
येक म्हणती सत्वर। पावे भगवती ॥ ३६॥

कुणी म्हणतात विघ्नहर लवकर पावतो, तर दुसरे कुणी म्हणतात की भोळा शंकर लवकर पावतो, तर कुणी म्हणतात की भगवती सत्वर पावते. (३६)

येक म्हणती मल्लारी। सत्वरचि सभाग्य करी।
येक म्हणती माहा बरी। भक्ति वेंकटेशाची ॥ ३७॥

कुणी एक म्हणतो की, मल्हारीच्या कृपेने लवकर भाग्योदय होतो, तर दुसरा कुणी म्हणतो, व्यंकटेशाची भक्ती करावी हे फार उत्तम. (३७)

येक म्हणती पूर्व ठेवा। येक म्हणती प्रेत्न करावा।
येक म्हणती भार घालावा। देवाचवरी ॥ ३८॥

कुणी म्हणतात पूर्वप्रारब्ध असेल तसे होईल, तर दुसरे कुणी म्हणतात की, प्रयत्न करावा तर आणखी कुणी म्हणतात की, सर्व भार देवावरच घालावा. (३८)

येक म्हणती देव कैंचा। अंतचि पाहातो भल्यांचा।
येक म्हणती हा युगाचा। युगधर्म ॥ ३९॥

कुणी म्हणतो की, कसला आलाय देव! तो भल्याभल्यांचा अंत पाहतो! तर दुसरा कुणी म्हणतो की, हा युगाचा युगधर्मच आहे. (३९)

येक आश्चीर्य मानिती। येक विस्मयो करिती।
येक कंटाळोन म्हणती। काये होईल तें पाहावें॥ ४०॥

ही बोलणी ऐकून कुणी आश्चर्य करतात, तर कुणी चकित होतात. तर कुणी कंटाळून म्हणतात की, जे जे होईल ते पाहावे! (४०)

ऐसे प्रपंचिक जन। लक्षणें सांगतां गहन।
परंतु कांहींयेक चिन्ह। अल्पमात्र बोलिलें ॥ ४१॥

याप्रमाणे प्रापंचिक लोक आपापली मते सांगतात. ती अपार आहेत, परंतु थोडी कल्पना यावी, म्हणून त्यातली काही येथे सांगितली आहेत. (४१)

आतां असो हा स्वभाव। ज्ञात्यांचा कैसा अनुभव।
तोहि सांगिजेल सर्व। सावध ऐका ॥ ४२॥

असो. आता प्रापंचिकांचा स्वभाव सांगणे पुरे झाले. ज्ञानी लोकांचा अनुभव कसा असतो तेही सर्व आता सांगतो. सावधपणे ऐका. (४२)

येक म्हणती करावी भक्ती। श्रीहरी देईल सद्गती।
येक म्हणती ब्रह्मप्राप्ती। कर्मेंचि होये ॥ ४३॥

कुणी म्हणतात की, भगवंताची भक्ती करावी म्हणजे श्रीहरी सद्गती देईल. तर दुसरे कुणी म्हणतात की, कर्मानेच ब्रह्मप्राप्ती होते. (४३)

येक म्हणती भोग सुटेना। जन्ममरण हें तुटेना।
येक म्हणती उर्मी नाना। अज्ञानाच्या ॥ ४४॥

कुणी म्हणतात की, प्रारब्ध भोग टाळता येत नाहीत आणि त्यामुळे जन्ममरणातूनही सुटका होत नाही. कुणी म्हणतात की, या अज्ञानाच्याच अनेक ऊर्मी आहेत. (४४)

येक म्हणती सर्व ब्रह्म। तेथें कैंचे क्रियाकर्म।
येक म्हणती हा अधर्म। बोलोंचि नये ॥ ४५॥

एखादा म्हणतो की, सर्व ब्रह्मच आहे, मग तेथे क्रिया तरी कुठली आणि कर्म तरी कुठले? तर दुसरा कुणी म्हणतो की, असे मानणे हा अधर्म आहे. खरे तर असे बोलूसुद्धा नये. (४५)

येक म्हणती सर्व नासे। उरलें तेंचि ब्रह्म असे।
येक म्हणती ऐसें नसे। समाधान ॥ ४६॥

कुणी म्हणतात की, प्रलयाच्या वेळी सर्व नाश पावल्यावर उरते ते ब्रह्म. तर कुणी म्हणतात की, समाधान अशा प्रकारचे नसते. (४६)

सर्व ब्रह्म केवळ ब्रह्म। दोनी पूर्वपक्षाचे भ्रम।
अनुभवाचें वेगळें वर्म। म्हणती येक ॥ ४७॥

कुणी म्हणतात की, सर्व ब्रह्म असे म्हणणे व सर्व जाऊन उरते ते ब्रह्म म्हणणे हे दोन्ही पूर्वपक्षाचे भ्रम आहेत. अनुभवाचे वर्म काही वेगळेच आहे. (४७)

येक म्हणती हें न घडे। अनुर्वाच्य वस्तु घडे।
जें बोलतां मोन्य पडे। वेदशास्त्रांसी ॥ ४८॥

एक म्हणतात की, जी अनिर्वाच्य वस्तू आहे तिचे वर्णन होऊ शकत नाही. वेद आणि शास्त्रे यांनाही त्याचे वर्णन करताना मौन धरावे लागते. (४८)

तंव श्रोता अनुवादला। म्हणे निश्चये कोण केला।
सिद्धांतमतें अनुभवाला। उरी कैंची ॥ ४९॥

येथे श्रोत्यांनी शंका घेतली की, ब्रह्म कसे आहे हा निश्चय कोणी केला? सिद्धांत असा आहे की, तेथे अनुभवाला वावच नाही. म्हणजे अनुभवरूपी द्वैतही ब्रह्माच्या ठिकाणी उरत नाही असा सिद्धांत आहे.(४९)

अनुभव देहीं वेगळाले। हें पूर्वींच बोलिलें।
आतां कांहीं येक केलें। नवचे कीं ॥ ५०॥

प्रत्येक देहाचे अनुभव वेगवेगळे असतात असे पूर्वीच सांगितले आहे. आता काही केले तरी ते एक होऊ शकत नाहीत. (५०)

येक साक्षत्वें वर्तती। साक्षी वेगळाची म्हणती।
आपण द्रष्टा ऐसी स्थिती। स्वानुभवाची ॥ ५१॥

एखादा साक्षित्वाने वागतो, साक्षी वेगळाच आहे असेही म्हणतो. आपण द्रष्टा, साक्षी ही स्वानुभवाची स्थिती आहे. (५१)

दृश्यापासून द्रष्टा वेगळा। ऐसी अलिप्तपणाची कळा।
आपण साक्षत्वें निराळा। स्वानुभवें ॥ ५२॥

दृश्यापासून द्रष्टा नेहमी वेगळाच असतो. याचा साक्षात अनुभव आला की दृश्यात राहूनही अलिप्त कसे राहावे ही कला अवगत होते आणि मग त्याला तसा आपण साक्षित्वाने निराळे असल्याचा अनुभवही येतो. (५२)

सकळ पदार्थ जाणतां। तो पदार्थाहून पर्ता।
देहीं असोन अलिप्तता। सहजचि जाली ॥ ५३॥

जो सर्व पदार्थांना जाणतो तो त्या सर्व पदार्थांहून वेगळाच असतो. त्यामुळे ज्ञाता देहात असूनही सहजच त्यापासून अलिप्त असतो. (५३)

येक ऐसें स्वानुभवें। म्हणती साक्षत्वें वर्तावें।
दृश्य असोनि वेगळें व्हावें। द्रष्टेपणें ॥ ५४॥

एक स्वानुभवाने असे म्हणतात की, आपण साक्षित्वाने वेगळे आहोत. म्हणून दृश्यात असूनही द्रष्टेपणाने त्यापासून वेगळे व्हावे. (५४)

येक म्हणती नाहीं भेद। वस्तु ठाईंची अभेद।
तेथें कैंचा मतिमंद। द्रष्टा आणिला ॥ ५५॥

कुणी दुसरे असे म्हणतात की, आत्मवस्तू एक आहे. तेथे भेदच नसताना यात हा मतिमंद द्रष्टा कसा आणला? (५५)

अवघी साकरचि स्वभावें। तेथें कडु काय निवडावें।
द्रष्टा कैंचा स्वानुभवें। अवघेंचि ब्रह्म ॥ ५६॥

सर्वच जर साखर आहे तर त्यातून कडू कसे काय निवडावे? त्यामुळे ब्रह्माशिवाय दुसरे काही नाही, हा स्वानुभव असताना तेथे द्रष्टा कोठून आणला? (५६)

प्रपंच परब्रह्म अभेद। भेदवादी मानिती भेद।
परी हा आत्मा स्वानंद। आकारला ॥ ५७॥

प्रपंच, परब्रह्म यात भेदच नाही. हे एकरूप आहेत. पण भेदवादी लोक त्यात भेद मानतात. खरे तर स्वानंदरूप आत्माच दृश्यरूपाने आकाराला आला आहे. (५७)

विघुरलें तुप थिजलें। तैसें निर्गुणचि गुणा आलें।
तेथें काये वेगळें केलें। द्रष्टेपणें ॥ ५८॥

पातळ तूप असते तेच थिजून घट्ट होते, त्याप्रमाणे निर्गुण ब्रह्मच सगुण होते. तेथे द्रष्टेपणाने काय वेगळे केले ?(५८)

म्हणौनि द्रष्टा आणि दृश्य। अवघा येकचि जगदीश।
द्रष्टेपणाचे सायास। कासयासी ॥ ५९॥

म्हणून द्रष्टा आणि दृश्य मिळून सर्व एकच एक जगदीशच जर आहे, द्रष्टेपणाचे सायास कशाला ?(५९)

ब्रह्मचि आकारलें सर्व। ऐसा येकांचा अनुभव।
ऐसे हे दोनी स्वभाव। निरोपिले ॥ ६०॥

सर्व दृश्य जग म्हणजे परब्रह्मच साकार झालेले आहे, असा एखाद्याचा अनुभव असतो. याप्रमाणे हे दोन्ही स्वभाव वर्णन केले आहेत. (६०)

अवघा आत्मा आकारला। आपण भिन्न कैंचा उरला।
दुसरा अनुभव बोलिला। ऐसियापरी ॥ ६१॥

एक आत्माच एकला एक आकारास आला आहे. त्याहून दुसरी वस्तूच नाही. तेथे आपण भिन्न उरतोच कोठे? असा हा दुसऱ्या काही लोकांचा अनुभव येथे सांगितला आहे.(६१)

ऐक तिसरा अनुभव। प्रपंच सारुनियां सर्व।
कांहीं नाहीं तोचि देव। ऐसें म्हणती ॥ ६२॥

आता तिसरा अनुभव सांगतो तो ऐक. सर्व दृश्य सृष्टीचा पसारा बाजूला सारल्यावर काहीही नाही असे जे वाटते, तोच देव, असे काही लोक म्हणतात. (६२)

दृश्य अवघें वेगळें केलें। केवळ अदृश्यचि उरलें।
तेंचि ब्रह्म अनुभविलें। म्हणती येक ॥ ६३॥

सर्व दृश्य वेगळे केल्यावर केवळ अदृश्य जे उरले तेच ब्रह्म असा अनुभव काही लोक सांगतात. (६३)

परी तें ब्रह्म म्हणो नये। उपायासारिखा अपाये।
सुन्यत्वास ब्रह्म काये। म्हणों येईल ॥ ६४॥

पण त्याला ब्रह्म म्हणू नये. कारण शून्याला ब्रह्म म्हटल्याने उपायच अपाय ठरेल. शून्यत्वाला कधी ब्रह्म म्हणता येईल का? (६४)

दृश्य अवघें वोलांडिलें। अदृश्य सुन्यत्वीं पडिलें।
ब्रह्म म्हणौनि मुरडलें। तेथुनिच मागें ॥ ६५॥

दृश्य सर्व ओलांडले की अदृश्यच शिल्लक राहते. ते शून्यरूप असते. साधक त्यालाच ब्रह्म समजतो आणि मागे फिरतो. (६५)

इकडे दृश्य तिकडे देव। मध्यें सुन्यत्वाचा ठाव।
तयास मंदबुद्धीस्तव। प्राणी ब्रह्म ह्मणे ॥ ६६॥

एकीकडे दृश्य असते, दुसरीकडे देव असतो. मध्ये शून्यत्व असते, पण अज्ञानामुळे प्राणी त्यालाच ब्रह्म समजतो. (६६)

रायास नाहीं वोळखिलें। सेवकास रावसें कल्पिलें।
परी तें अवघें वेर्थ गेलें। राजा देखतां ॥ ६७॥

एखाद्याने राजाला ओळखत नसल्याने सेवकालाच राजा मानले, पण प्रत्यक्ष राजाची भेट झाल्यावर ते सर्व व्यर्थ ठरले. (६७)

तैसें सुन्यत्व कल्पिलें ब्रह्म। पुढें देखतां परब्रह्म।
सुन्यत्वाचा अवघा भ्रम। तुटोन गेला ॥ ६८॥

तसे शून्यत्व हेच ब्रह्म अशी कल्पना केली, पण पुढे परब्रह्माचा साक्षात अनुभव आल्यावर शून्यत्व हेच ब्रह्म हा सर्व भ्रम नष्ट झाला. (६८)

परी हा सूक्ष्म आडताळा। वारी विवेकें वेगळा।
जैसें दुग्ध घेऊन जळा। राजहंस सांडी ॥ ६९॥

म्हणून हा सूक्ष्म अडथळा, राजहंस ज्याप्रमाणे पाण्याचा त्याग करून दूध तेवढे घेतो त्याप्रमाणे सारासारविवेकाने दूर सारावा. (६९)

आधीं दृश्य सोडिलें। मग सुन्यत्व वोलांडिलें।
मूळमायेपरतें देखिलें। परब्रह्म ॥ ७०॥

आधी दृश्य पांचभौतिक सृष्टीचा त्याग करावा, मग शून्यत्व ओलांडावे आणि मूळमायेच्या पलीकडे असलेले परब्रह्म पाहावे. (७०)

वेगळेपणें पाहाणें घडे। तेणें वृत्ति सुन्यत्वीं पडे।
पोटीं संदेह पवाडे। सुन्यत्वाचा ॥ ७१॥

पाहावे असे म्हटले की, जी वस्तू पाहावयाची ती व पाहणारा असा वेगळेपणा येतो, त्यामुळे वृत्ती शून्यत्वात पडते आणि मग शून्यत्व हेच ब्रह्म असा मनात संदेह उत्पन्न होतो. (७१)

भिन्नपणें अनुभविलें। तयास सुन्य ऐसें बोलिलें।
वस्तु लक्षितां अभिन्न जालें। पाहिजे आधीं ॥ ७२॥

भिन्नपणे जे अनुभवले ते 'काही नाही' म्हणून त्याला शून्य असे नाव दिले. पण आत्मवस्तूचे अनुसंधान करू लागले की त्याच्याशी एकरूपता व्हावयास हवी. (७२)

वस्तु आपणचि होणें। ऐसें वस्तूचें पाहाणें।
निश्चयेसीं भिन्नपणें। सुन्यत्व लाभे ॥ ७३॥

आत्मवस्तूला पाहणे म्हणजे ती वस्तू स्वत: आपणच होणे या प्रकारचे असते. भिन्नपणामुळे निश्चितच शून्यत्वाची प्राप्ती होते. (७३)

याकारणें सुन्य कांहीं। परब्रह्म होणार नाहीं।
वस्तुरूप होऊन पाहीं। स्वानुभवें ॥ ७४॥

म्हणून शून्य हे परब्रह्म होऊ शकत नाही. स्वत: अनुभव घ्यावा व ब्रह्मस्वरूपच होऊन राहावे. (७४)

आपण वस्तु सिद्धचि आहे। मन मी ऐसें कल्पूं नये।
साधु सांगती उपाये। तूंचि आत्मा ॥ ७५॥

आपण स्वयंसिद्ध आत्मवस्तूच आहोत. म्हणून मी म्हणजे मन अशी कल्पना करू नये. यावर साधू उपाय सांगतात की, तूच आत्मा आहेस असे अनुसंधान करावे. (७५)

मन मी ऐसें नाथिलें। संतीं नाहीं निरोपिलें।
मानावें कोणाच्या बोलें। मन मी ऐसें ॥ ७६ ॥

मी मुळात मन नाहीच. शिवाय संतांनीही तसे सांगितलेले नाही. मग कुणाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून 'मी' मन असे मानावे? (७६)

संतवचनीं ठेवितां भाव। तोचि शुद्ध स्वानुभव।
मनाचा तैसाच स्वभाव। आपण वस्तु ॥ ७७ ॥

संतवचनावर दृढ निष्ठा ठेवावी. कारण त्यांची वचने स्वानुभवावर आधारित असतात. मनाला जसे वळण लावावे तसे ते लागते हा मनाचा स्वभाव आहे. म्हणून आपण आत्मवस्तूच आहोत ही गोष्ट मनावर ठसविण्याचा प्रयत्न करावा. (७७)

जयाचा घ्यावा अनुभव। तोचि आपण निरावेव।
आपुला घेती अनुभव। विश्वजन ॥ ७८ ॥

ज्याचा आपण अनुभव घ्यावयास जातो ती अवयवरहित वस्तूच आपण होतो हा अनुभव आपण घ्यावा. या आपल्या अनुभवाचा लाभ जगातील इतर लोकांनाही मिळतो. (७८)

लोभी धन साधूं गेले। तंव ते लोभी धनचि जाले।
मग तें भाग्यपुरुषीं भोगिलें। सावकास ॥ ७९ ॥

लोभी माणूस हा धनाचा शोध घेऊ लागतो व अखेर तो धनच होतो. त्याची वृत्ती केवळ धनरूप बनते. तो स्वतः त्या धनाचा उपभोगही घेत नाही आणि मग दुसराच कुणी भाग्यवान पुरुष त्या धनाचा दीर्घकाळ उपभोग घेतो. (७९)

तैसें देहबुद्धि सोडितां। साधकास जालें तत्वतां।
अनुभवाची मुख्य वार्ता। ते हे ऐसी ॥ ८० ॥

त्याप्रमाणे साधकाने देहबुद्धी सोडली की, तो स्वतःच ब्रह्मरूप होतो. अनुभवाशिवाय स्वानुभवाची हीच मुख्य गोम म्हणजे रहस्य आहे. (८०)

आपण वस्तु मुळीं येक। ऐसा ज्ञानाचा विवेक।
येथून हा ज्ञानदशक। संपूर्ण जाला ॥ ८१ ॥

आपण आणि आत्मवस्तू म्हणा अगर परब्रह्मवस्तू म्हणा, मुळात एकच आहोत हे ज्ञानाच्या विचाराचे सार आहे. याप्रमाणे येथे हा ज्ञानदशक संपूर्ण झाला आहे. (८१)

आत्मज्ञान निरोपिलें। येथामतीनें बोलिलें।
न्यूनपूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं ॥ ८२ ॥

मी माझ्या बुद्धीनुसार आत्मज्ञानाचे निरूपण केले आहे. त्यात अधिक-उणे जे असेल त्यासाठी श्रोत्यांनी क्षमा केली पाहिजे, असे श्री समर्थ म्हणतात (८२)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सुन्यत्वनिर्शननाम' समास दहावा समाप्त.

दशक आठवा समाप्त

❑ ❑

# दशक नववा : गुणरूप

## दशक ९ : समास १

## आशंका

॥ श्रीराम ॥

**निराकार म्हणिजे काये। निराधार म्हणिजे काये।**
**निर्विकल्प म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ १ ॥**

या समासात श्रोत्यांनी अनेक शंका विचारलेल्या आहेत म्हणून त्याला हे नाव दिले असावे. श्रोता विचारत आहे की, निराकार म्हणजे काय? निराधार म्हणजे काय? व निर्विकल्प म्हणजे काय हे मला समजावून सांगावे. (१)

**निराकार म्हणिजे आकार नाहीं। निराधार म्हणिजे आधार नाहीं।**
**निर्विकल्प म्हणिजे कल्पना नाहीं। परब्रह्मासी ॥ २ ॥**

वक्ता म्हणत आहे की, परब्रह्माला निराकार म्हणजे आकार नाही, निराधार म्हणजे आधार नाही आणि निर्विकल्प म्हणजे त्याच्या ठिकाणी कल्पना नाही.(२)

**निरामय म्हणिजे काये। निराभास म्हणिजे काये।**
**निरावेव म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ ३ ॥**

निरामय म्हणजे काय, निराभास म्हणजे काय, निरावेव म्हणजे काय, हे मला सांगावे. (३)

**निरामय म्हणिजे जळमये नाहीं। निराभास म्हणिजे भासचि नाहीं।**
**निरावेव म्हणिजे अवेव नाहीं। परब्रह्मासी ॥ ४ ॥**

निरामय म्हणजे जे जलमय नाही. आमय म्हणजे विकार. जलमय होणे हा प्रलयकाळचा ब्रह्मांडविकार होय. हा विकार नसलेले ते निरामय म्हणजे परब्रह्म. निराभास म्हणजे जेथे भास नाही आणि निरावेव म्हणजे ज्याला अवयव नाहीत, ते परब्रह्म. (४)

**निःप्रपंच म्हणिजे काये। निःकळंक म्हणिजे काये।**
**निरोपाधी म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ ५ ॥**

निःप्रपंच म्हणजे काय? निःकळंक म्हणजे काय? आणि निरोपाधी म्हणजे काय, ते मला सांगावे. (५)

**निःप्रपंच म्हणिजे प्रपंच नाहीं। निःकळंक म्हणिजे कळंक नाही।**
**निरोपाधी म्हणिजे उपाधी नाहीं। परब्रह्मासी ॥ ६ ॥**

निःप्रपंच म्हणजे प्रपंच नाही, निःकळंक म्हणजे कलंक नाही आणि निरूपाधी म्हणजे ज्याला उपाधी नाही, ते परब्रह्म होय. (६)

**निरोपम्य म्हणिजे काये। निरालंब म्हणिजे काये।**
**निरापेक्षा म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ ७ ॥**

निरोपम्य म्हणजे काय, निरालम्ब म्हणजे काय व निरापेक्ष म्हणजे काय ते मला सांगावे. (७)

**निरोपम्य म्हणिजे उपमा नाहीं। निरालंब म्हणिजे अवलंबन नाहीं।**
**निरापेक्षा म्हणिजे अपेक्षा नाहीं। परब्रह्मासी ॥ ८ ॥**

निरोपम्य म्हणजे ज्याला उपमा नाही, निरालंब म्हणजे ज्याला आधार नाही आणि निरापेक्ष म्हणजे ज्याला अपेक्षा नाही, ते परब्रह्म असे जाणावे. (८)

**निरंजन म्हणिजे काये। निरंतर म्हणिजे काये।**
**निर्गुण म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ ९ ॥**

निरंजन म्हणजे काय, निरंतर म्हणजे काय आणि निर्गुण म्हणजे काय, ते मला सांगावे. (९)

**निरंजन म्हणिजे जनचि नाहीं। निरंतरम्हणिजे अंतर नाहीं।**
**निर्गुण म्हणिजे गुणचि नाहीं। परब्रह्मासी ॥ १० ॥**

निरंजन म्हणजे जेथे जन नाहीत, सर्व लोकादी सृष्टीच जेथे झालेलीच नाही ते. निरंतर म्हणजे कमी-अधिकपणाचा परिणाम नसलेले आणि निर्गुण म्हणजे जे गुणरहित आहे, ते परब्रह्म जाणावे. (१०)

**निःसंग म्हणिजे काये। निर्मळ म्हणिजे काये।**
**निश्चळ म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ ११ ॥**

निःसंग म्हणजे काय, निर्मळ म्हणजे काय आणि निश्चळ म्हणजे काय, हे मला सांगावे. (११)

**निःसंग म्हणिजे संगचि नाहीं। निर्मळ म्हणिजे मळचि नाहीं।**
**निश्चळ म्हणिजे चळण नाहीं। परब्रह्मासी ॥ १२ ॥**

निःसंग म्हणजे ज्याला संग नाही, निर्मळ म्हणजे ज्याच्या ठिकाणी मायारूपी मळ नाही आणि निश्चळ म्हणजे ज्याच्या ठिकाणी चलनवलन नाही, ते परब्रह्म असे जाणावे. (१२)

**निशब्द म्हणिजे काये। निर्दोष म्हणिजे काये।**
**निवृत्ती म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ १३ ॥**

निःशब्द म्हणजे काय, निर्दोष म्हणजे काय आणि निवृत्ती म्हणजे काय, ते मला सांगावे. (१३)

**निशब्द म्हणिजे शब्दचि नाहीं। निर्दोष म्हणिजे दोषचि नाहीं।**
**निवृत्ती म्हणिजे वृत्तिच नाहीं। परब्रह्मासी ॥ १४ ॥**

निःशब्द म्हणजे जेथे शब्दच नाही, निर्दोष म्हणजे जेथे दोषच नाही आणि निवृत्ती म्हणजे जेथे वृत्तीच नाही, असे परब्रह्म होय. (१४)

**निःकाम म्हणिजे काये। निर्लेप म्हणिजे काये।**
**निःकर्म म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ १५ ॥**

निष्काम म्हणजे काय, निर्लेप म्हणजे काय आणि निष्कर्म म्हणजे काय, ते मला सांगावे. (१५)

**निःकाम म्हणिजे कामचि नाहीं। निर्लेप म्हणिजे लेपचि नाहीं।**
**निःकर्म म्हणिजे कर्मचि नाहीं। परब्रह्मासी ॥ १६ ॥**

निष्काम म्हणजे जेथे कामच नाही, निर्लेप म्हणजे जेथे लेपच नाही आणि निष्कर्म म्हणजे ज्याच्या ठिकाणी कर्म संभवतच नाही, ते परब्रह्म असे जाणावे. (१६)

**अनाम्य म्हणिजे काये। अजन्मा म्हणिजे काये।**
**अप्रत्यक्ष म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ १७ ॥**

अनाम्य म्हणजे काय, अजन्मा म्हणजे काय आणि अप्रत्यक्ष म्हणजे काय, हे मला सांगावे. (१७)

**अनाम्य म्हणिजे नामचि नाहीं। अजन्मा म्हणिजे जन्मचि नाहीं।**
**अप्रत्यक्ष म्हणिजे प्रत्यक्ष नाहीं। परब्रह्म तें ॥ १८ ॥**

अनाम्य म्हणजे ज्याला नामच नाही, अजन्मा म्हणजे ज्याला जन्मच नाही आणि अप्रत्यक्ष म्हणजे जे प्रत्यक्ष नाही, ते परब्रह्म होय. (१८)

**अगणीत म्हणिजे काये। अकर्तव्य म्हणिजे काये।**
**अक्षै म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ १९ ॥**

अगणित म्हणजे काय, अकर्तव्य म्हणजे काय आणि अक्षय म्हणजे काय, हे मला सांगावे. (१९)

**अगणीत म्हणिजे गणीत नाहीं। अकर्तव्य म्हणिजे कर्तव्यता नाहीं।**
**अक्षै म्हणिजे क्षयचि नाहीं। परब्रह्मासी ॥ २० ॥**

अगणित म्हणजे ज्याला मर्यादा नाही ते, अकर्तव्य म्हणजे ज्याला कर्तव्यता नाही ते आणि अक्षय म्हणजे ज्याला क्षयच नाही, ते परब्रह्म असे जाणावे. (२०)

**अरूप म्हणिजे काये। अलक्ष म्हणिजे काये।**
**अनंत म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ २१ ॥**

अरूप म्हणजे काय, अलक्ष म्हणजे काय आणि अनंत म्हणजे काय, हे मला सांगावे. (२१)

**अरूप म्हणिजे रूपचि नाहीं। अलक्ष म्हणिजे लक्षत नाहीं।**
**अनंत म्हणिजे अंतचि नाहीं। परब्रह्मासी ॥ २२ ॥**

अरूप म्हणजे ज्याला रूपच नाही, अलक्ष म्हणजे जे वेगळे राहून पाहता येत नाही आणि अनंत म्हणजे ज्याला अंत नाही, ते परब्रह्म होय. (२२)

**अपार म्हणिजे काये। अढळ म्हणिजे काये।**
**अतर्क्य म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ २३ ॥**

अपार म्हणजे काय, अढळ म्हणजे काय व अतर्क्य म्हणजे काय, हे आपण मला सांगावे. (२३)

**अपार म्हणिजे पारचि नाहीं। अढळ म्हणिजे ढळचि नाहीं।**
**अतर्क्य म्हणिजे तर्कत नाहीं। परब्रह्म तें ॥ २४ ॥**

अपार म्हणजे ज्याला पारच नाही, अढळ म्हणजे जे जसे आहे तसेच असते आणि अतर्क्य म्हणजे ज्याच्याविषयी तर्कच करवता येत नाही असे ते परब्रह्म होय. (२४)

**अद्वैत म्हणिजे काये। अदृश्य म्हणिजे काये।**
**अच्युत म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ २५ ॥**

अद्वैत म्हणजे काय, अदृश्य म्हणजे काय आणि अच्युत म्हणजे काय, ते मला सांगावे. (२५)

अद्वैत म्हणिजे द्वैतचि नाहीं। अदृश्य म्हणिजे दृश्यचि नाहीं।
अच्युत म्हणिजे चेवत नाहीं। परब्रह्म तें ॥ २६ ॥

अछेद म्हणिजे काये। अदाह्य म्हणिजे काये।
अक्लेद म्हणिजे काये। मज निरोपावें ॥ २७ ॥

अछेद म्हणिजे छेदेना। अदाह्य म्हणिजे जळेना।
अक्लेद म्हणिजे काल्वेना। परब्रह्म तें ॥ २८ ॥

परब्रह्म म्हणिजे सकळांपरतें। तयास पाह्यतां आपणचि तें।
हें कळे अनुभवमतें। सद्गुरु केलियां ॥ २९ ॥

अद्वैत म्हणजे जेथे द्वैतच नाही, अदृश्य म्हणजे जे पाहता येत नाही, आणि अच्युत म्हणजे जे कधी आपल्या स्थानावरून खाली घसरत नाही, ते परब्रह्म असे जाणावे. (२६)

अच्छेद्य म्हणजे काय, अदाह्य म्हणजे काय आणि अक्लेद म्हणजे काय ते मला सांगावे. अच्छेद्य म्हणजे जे छेदले जात नाही, अदाह्य म्हणजे जे जळत नाही आणि अक्लेद्य म्हणजे जे पाण्याने कालवता येत नाही, ते परब्रह्म होय. (२७-२८)

याप्रमाणे ज्याचे वर्णन केले जाते ते परब्रह्म सर्वांच्या पलीकडील असून त्याचा शोध घेऊ गेल्यास आपण तेच परब्रह्म आहोत असा अनुभव सद्गुरू केला असता त्यांच्या कृपेने येतो. (२९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आशंकानाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक ९ : समास २

## ब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

जें जें कांहीं साकार दिसे। तें तें कल्पांतीं नासे।
स्वरूप तें असतचि असे। सर्वकाळ ॥ १ ॥

जें सकळांमध्यें सार। मिथ्या नव्हे तें साचार।
जें कां नित्य निरंतर। संचलें असे ॥ २ ॥

तें भगवंताचे निजरूप। त्यासि बोलिजे स्वरूप।
याहि वेगळीं अमूप। नामें तयाचीं ॥ ३ ॥

त्यास नामाचा संकेत। कळवया हा दृष्टांत।
परी तें स्वरूप नामातीत। असतचि असे ॥ ४ ॥

दृश्यासबाह्य संचलें। परी तें विश्वास चोरलें।
जवळिच नाहींसें जालें। असतचि कैसें ॥ ५ ॥

ऐसा ऐकोनियां देव। उठे दृष्टीचा भाव।
पाहों जातां दिसे सर्व। दृश्यचि आवघें ॥ ६ ॥

दृष्टीचा विषयो दृश्य। तोचि जालियां सादृश्य।
तेणें दृष्टी पावे संतोष। परी तें देखणें नव्हे ॥ ७ ॥

दृष्टीस दिसे तें नासे। येतद्विषईं श्रुति असे।
म्हणौन जें दृष्टीस दिसे। तें स्वरूप नव्हे ॥ ८ ॥

जे जे या जगात आकाराला येते, ते ते सर्व कल्पांती नाश पावते. पण स्वरूपाचा कधीही नाश होत नाही. ते सर्वकाळ जसेच्या तसेच असते. (१)

ते सर्वांचे सार असून तेच सत्य आहे. ते मिथ्या नसून नित्य निरंतर सर्वांच्या अंतर्बाह्य व्यापलेले आहे. (२)

तेच भगवंताचे खरे रूप असून त्यालाच स्वरूप असे म्हणतात. याशिवायही त्याची अनेक नामे आहेत. (३)

त्याचे स्वरूप कळावे म्हणूनच त्याला नामे दिली जातात व दृष्टांत दिले जातात. पण खरे तर ते स्वरूप नामातीत असून ते सदैव जसेच्या तसेच असते. (४)

वास्तविक दृश्य सृष्टीच्या आत-बाहेर सर्वत्र ते कोंदाटलेले आहे, पण तरी ते जगातील सामान्य लोकांपासून गुप्त राहिलेले आहे. म्हणून ते अत्यंत जवळ असूनही नाहीच असे लोकांना वाटते. (५)

असे हे देवाचे वर्णन ऐकून लोकांच्या मनात त्याला प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहावे, असा भाव उत्पन्न होतो. पण त्याला पाहण्याचा प्रयत्न केला तो देव तर दिसतच नाही, पण अवघी दृश्य सृष्टीच दिसते. (६)

नेत्रांचा विषयच दृश्य हा आहे. प्रत्यक्ष दिसला असता संतोष होतो. पण ते खरे पाहाणे नव्हेच. (७)

जे जे दृष्टीला दिसते ते ते नाश पावते या अर्थाची श्रुती आहे. (यद् दृष्टं तद् नष्टं). म्हणूनच जे जे दृष्टीला दिसते, ते स्वरूप नव्हे. (कारण स्वरूप तर शाश्वत आहे.) (८)

स्वरूप तें निराभास। आणी दृश्य भासलें साभास।
भासास बोलिला नास। वेदांतशास्त्रीं ॥ ९॥

दृश्य हे भासमय असते म्हणून ते भासते आणि वेदांत शास्त्रात भास हा नाशिवंत असतो असे म्हटले आहे. म्हणून स्वरूपाच्या ठिकाणी भास मुळीच नाही. (९)

आणी पाहातां दृश्यचि भासे। वस्तु दृश्यावेगळी असे।
स्वानुभवें पाहातां दिसे। दृश्यासबाह्य ॥ १०॥

आपण जेव्हा डोळ्यांनी पाहातो, तेव्हा दृश्यच डोळ्याला दिसते. पण आत्मवस्तू ही दृश्यावेगळी आहे. ज्या वेळी आत्म-वस्तूचा साक्षात अनुभव येतो, तेव्हा ती दृश्याच्या सबाह्य अभ्यंतरी व्यापून राहिली आहे, असा अनुभव येतो.(१०)

जें निराभास निर्गुण। त्याची काये सांगावी खूण।
परी तें स्वरूप जाण। सन्निधचि असे ॥ ११॥

जे आभासरहित, गुणरहित आहे, त्याची खूण तरी कशी काय सांगणार? पण ते स्वरूप आपल्या अगदी जवळच असते. (११)

जैसा आकाशीं भासला भास। आणि सकळांमधें आकाश।
तैसा जाणिजे जगदीश। सबाह्य अभ्यांतरीं ॥ १२॥

जसे आकाशातच सर्व भास भासतात आणि सर्वांमध्ये आकाशच व्यापून असते, त्याप्रमाणे जगदीशही सर्व जगास सबाह्य अभ्यंतरी व्यापून राहिलेला असतो. (१२)

उदकामधें परी भिजेना। पृथ्वीमधें परी झिजेना।
वन्हीमधें परी सिजेना। स्वरूप देवाचें ॥ १३॥

स्वरूप पाण्यामध्ये असते, तरी ते भिजत नाही. पृथ्वीमध्ये असते तरी ते झिजत नाही. अग्नीमध्ये असले तरी शिजत नाही, असे देवाचे स्वरूप विलक्षण आहे.(१३)

तें रेंद्यामध्यें परी बुडेना। तें वायोमधें परी उडेना।
सुवर्णीं असे परी घडेना। सुवर्णासारिखें ॥ १४॥

ते चिखलात असते तरी बुडत नाही आणि वायूमध्ये असते तरी उडत नाही आणि सुवर्णात असून सुवर्णासारखे ते घडविता येत नाही. (१४)

ऐसें जें संचलें सर्वदा। परी तें आकळेना कदा।
अभेदामाजी वाढवी भेदा। ते हे अहंता ॥ १५॥

असे ते सदा सर्वत्र संचलेले असूनही ते कधीही कळून येत नाही. अशा त्या अभेद स्वरूपाच्या ठिकाणी अहंकारामुळे भेद वाढतो. (१५)

तिच्या स्वरूपाची खूण। सांगों कांहीं वोळखण।
अहंतेचें निरूपण। सावध ऐका ॥ १६॥

ती अहंता कशी असते हे ओळखता यावे म्हणून तिच्या स्वरूपाची खूण वर्णन करून सांगतो. तरी आता अहंतेचे निरूपण सावध होऊन ऐका. (१६)

जे स्वरूपाकडे पावे। अनुभवासवें झेंपावे।
अनुभवाचे शब्द आघवे। बोलोन दावी ॥ १७॥

अहंता स्वरूपाकडे वळते (म्हणजे 'अहं ब्रह्मास्मि') असे चिंतन घडू लागते. तसे अनुसंधान होता होता स्वस्वरूपानुभव येतो. मग ती अहंता आपला अनुभव शब्दांत बोलून दाखवते. (१७)

म्हणे आतां मीच स्वरूप। तेंचि अहंतेचें रूप।
निराकारीं आपें आप। वेगळी पडे ॥ १८॥

ती म्हणते की, 'मीच स्वरूप आहे' असे म्हणणे हेच अहंतेचे रूप आहे. 'मीच स्वरूप' असे म्हणताना साहजिकच जाणीव मी रूपाने आणि स्वरूप रूपाने द्विधा झालेली असते, म्हणून निराकार ब्रह्मापासून वेगळी पडते. (१८)

स्वयें मीच आहे ब्रह्म। ऐसा अहंतेचा भ्रम।
ऐसिये सूक्ष्मीं सूक्ष्म। पाहातां दिसे ॥ १९॥

मीच स्वत: ब्रह्म आहे, असे म्हणताना अहंतेचा भ्रम अजून कायम आहे. हेच सूक्ष्म ब्रह्मासंबंधी सूक्ष्म विचार केल्यावर कळून येते. (१९)

कल्पना आकळी हेत। वस्तु कल्पनातीत।
म्हणौन नाकळे अंत। अनंताचा ॥ २०॥

'अहं ब्रह्मास्मि' हा भाव कल्पनेने जाणता येतो. पण वस्तू तर कल्पनातीत आहे. अनंताचा अंत जाणताच येत नाही. कारण अनंताचा शोध घेणारा अनंताशी एकरूप होतो. त्याचे अस्तित्वच राहत नाही. (२०)

**अन्वये आणी वीतरेक। हा शब्दभेद कोणीयेक।**
**निशब्दाचा अंतरविवेक। शोधिला पाहिजे ॥ २१॥**

अन्वय म्हणजे उभारणी व व्यतिरेक म्हणजे संहारणी हा केवळ शाब्दिक भेदच असतो. जेथे शब्द पोहोचूच शकत नाही, त्या नि:शब्दाचा म्हणजे परब्रह्माच्या स्वरूपाचा अंतर्मुख होऊन विचार केला पाहिजे.(२१)

**आधीं घेईजे वाच्यांश। मग वोळखिजे लक्ष्यांश।**
**लक्ष्यांशीं पाहातां वाच्यांश। असेल कैंचा ॥ २२॥**

आधी शब्दार्थाकडे लक्ष द्यावे. मग त्यात जो गूढ भावार्थ असेल तो लक्षात घ्यावा. लक्ष्यार्थाचे चिंतन करू लागले की वाच्यांश म्हणजे शब्दार्थ मागे पडतो. (२२)

**सर्वब्रह्म आणी विमळब्रह्म। हा वाच्यांशाचा अनुक्रम।**
**शोधितां लक्ष्यांशाचें वर्म। वाच्यांश नसे ॥ २३॥**

सर्व ब्रह्म आणि विमळ ब्रह्म यात केवळ शब्दार्थाचाच भेद आहे. लक्ष्यांशाचे वर्म जाणण्याचा प्रयत्न केला की दोन्हींनी निर्देश केलेले परब्रह्म एकच आहे हे कळून येते आणि ते परब्रह्म तर शब्दाच्या पलीकडील आहे. तेथे वाच्यांश पोहोचूच शकत नाही. (२३)

**सर्व विमळ दोनी पक्ष। वाच्यांशीं आटती प्रत्यक्ष।**
**लक्ष्यांशीं लविता लक्ष। पक्षपात घडे ॥ २४॥**

सर्व ब्रह्म व विमळ ब्रह्म हे दोन्ही पक्ष वाच्यांशात आटून जातात हे प्रत्यक्ष दिसते. दोन्हींच्या लक्ष्यांशाकडे लक्ष केंद्रित केले की हे दोन्ही पक्ष गळून पडतात म्हणजे दोन्हीचा भावार्थ परब्रह्म एकले एकच असा होतो. (२४)

**हें लक्ष्यांशें अनुभवणें। येथें नाहीं वाच्यांश बोलणें।**
**मुख्य अनुभवाचे खुणे। वाचारंभ कैंचा ॥ २५॥**

लक्ष्यांशाचे अनुसंधान करून अनुभव घ्यावा. स्वरूपाच्या अनुभवामध्ये शब्द बोलण्याचे कामच राहात नाही. ही खूण अनुभवण्याची आहे. तेथे वाचेचे कामच उरत नाही. (२५)

**परा पश्यंती मधेमां वैखरी। जेथें वोसरती च्यारी।**
**तेथें शब्दकळाकुंसरी। कोण काज ॥ २६॥**

ज्या परब्रह्माच्या ठिकाणी परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चारी वाचा ओसरतात, पोहोचू शकत नाहीत, तेथे शब्दपांडित्य काय कामाचे? (२६)

**शब्द बोलतां सवेंच नासे। तेथें शाश्वतता कोठें असे।**
**प्रत्यक्षास प्रमाण नसे। बरें पाहा ॥ २७॥**

शब्द उच्चारला गेला की लगेच तो नाहीसा होतो. मग तेथे शाश्वतता कोठे आहे? ही सर्वांच्या अनुभवाची गोष्ट असल्याने तिला प्रमाण देण्याची आवश्यकताच नाही. (२७)

**शब्द प्रत्यक्ष नासिवंत। म्हणोन घडे पक्षपात।**
**सर्व विमळ ऐसा हेत। अनुभवीं नाहीं ॥ २८॥**

शब्द प्रत्यक्ष नाशिवंत असल्याने स्वरूपाच्या ठिकाणी सर्व वाद, मतभेद नष्ट होतात. तेथे सर्व ब्रह्म की विमल ब्रह्म असा प्रश्न उरत नाही. कारण अनुभव हा नेहमी भावातीत असतो. (२८)

**ऐक अनुभवाचें लक्षण। अनुभव म्हणिजे अनन्य जाण।**
**ऐक अनन्याचें लक्षण। ऐसें असे ॥ २९॥**

आता अनुभवाचे लक्षण ऐक. अनुभव म्हणजे अनन्य म्हणजेच जेथे अन्य नाही, ते एकले एक स्वस्वरूप तेच आपण होणे. (२९)

**अनन्य म्हणिजे अन्य नसे। आत्मनिवेदन जैसें।**
**संगभंगें असतचि असे। आत्मा आत्मपणें ॥ ३०॥**

अनन्य म्हणजे दुसरा कुणी नसणे म्हणजेच आत्मनिवेदन असे जाणावे. मीपणाच्या त्यागानंतर 'मी आत्मा' या अनुभवातील 'मी' ची जाणीव नष्ट झाल्यावर तद्रूपतेने केवळ आत्माच उरतो. (३०)

**आत्म्यास नाहीं आत्मपण। हेंचि निःसंगाचें लक्षण।**
**हें वाच्यांशें बोलिलें जाण। कळवया कारणें ॥ ३१ ॥**

आत्म्याच्या ठिकाणी 'मी आत्मा' ही जाणीवही नसते. हे निःसंगाचे लक्षण होय. वास्तविक ह्या अवस्थेचे वर्णन शब्दात होऊ शकत नाही, पण कळावे यासाठी सांगणे भाग पडते. (३१)

**येरवीं लक्ष्यांश तो वाच्यांशें। सांगिजेल हें घडे कैसें।**
**वाक्यविवरणें अपैसें। कळों लागे ॥ ३२ ॥**

एरवी जो लक्ष्यांश असतो तो वाच्यांशाने म्हणजे केवळ शब्दार्थाने सांगणे शक्य नसते. पण त्या लक्ष्यांशाचे सूक्ष्म बुद्धीने विवरण केले की, तो आपोआप कळू लागतो. (३२)

**करावें तत्वविवरण। शोधावें ब्रह्म निर्गुण।**
**पाहावें आपणास आपण। म्हणिजे कळे ॥ ३३ ॥**

तत्त्वांचे विवरण करून निर्गुण ब्रह्माचा शोध घेण्याचा अभ्यास करावा म्हणजे आपल्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान होते व अनुसंधानाने स्वस्वरूपाचा साक्षात अनुभव येतो. (३३)

**हें न बोलतांच विवरिजे। विवरोन विरोन राहिजे।**
**मग अबोलणेंचि साजे। माहापुरुषीं ॥ ३४ ॥**

न बोलताच या सांगण्याचे मनन करावे व तेथेच तन्मय होऊन रहावे. असे तन्मय झालेले महापुरुषच नुसत्या कृपादृष्टीने साधकात स्वानुभव संचरित करू शकतात. त्यांचे मौन हेच खरे प्रवचन ठरते. (३४)

**शब्दचि निशब्द होती। श्रुति नेति नेति ह्मणती।**
**हें तों आलें आत्मप्रचिती। प्रत्यक्ष आतां ॥ ३५ ॥**

स्वरूपापर्यंत शब्द पोहोचूच शकत नाही. त्यामुळे प्रत्यक्ष आत्मप्रचीती आली की श्रुती त्याचे 'नेति, नेति' म्हणून वर्णन का करतात हे कळते. (३५)

**प्रचित आलियां अनुमान। हा तों प्रत्यक्ष दुराभिमान।**
**तरी आतां मी अज्ञान। मज कांहींच न कळे ॥ ३६ ॥**

असा अनुभव आल्यावरही अनुमान करीत राहाणे म्हणजे प्रत्यक्ष दुरभिमानच आहे आणि अभिमान जेथे असतो तेथे अज्ञान असतेच. त्यामुळे असा दुरभिमानी जो, त्याला काहीच कळत नसते. (३६)

**मी लटिका माझें बोलणें लटिकें। मी लटिका माझें चालणें लटिकें।**
**मी माझें अवघेंचि लटिकें। कल्पनिक ॥ ३७ ॥**

आपण ज्याला 'मी' म्हणतो तो तर खोटाच असतो, त्यामुळे त्या 'मी' चे बोलणे, चालणे, मी माझे म्हणणे वगैरे सर्वच काल्पनिक लटके असते. (३७)

**मज मुळींच नाहीं ठाव। माझें बोलणें अवघेंचि वाव।**
**हा प्रकृतीचा स्वभाव। प्रकृती लटिकी ॥ ३८ ॥**

'मी' पणालाच जेथे स्थान नाही, तेथे माझे सर्व बोलणेही व्यर्थच होय. हे सर्व प्रकृतीच्या स्वभावानुसारच घडते आणि प्रकृती ही खोटी भासमय आहे. (३८)

**प्रकृति आणी पुरुष। यां दोहींस जेथें निरास।**
**तेथें मीपण विशेष। हें केंवि घडे ॥ ३९ ॥**

स्वरूपाच्या ठिकाणी प्रकृती म्हणजे वायुरूप स्फुरण व पुरुष म्हणजे शुद्ध जाणीव या दोहींचा निरास होतो, तेथे 'मी' ही विशेष भावना राहीलच कशी? (३९)

**जेथें सर्वही अशेष जालें। तेथें विशेष कैंचें आलें।**
**मी मौनी म्हणतां भंगलें। मौन्य जैसें ॥ ४० ॥**

जेथे सर्व दृश्य निःशेष झाले, तेथे 'मी पण' हे विशेष तरी कसे राहील? एखाद्या माणसाने म्हणावे की 'मी मौनी आहे' म्हणजे त्याच्या या बोलण्यानेच त्याचे मौन भंग पावते, तसेच जे निःशेष आहे, त्याला विशेष ठरविल्याने घडते. (४०)

**आता मौन्य न भंगावें। करून कांहींच न करावें।**
**असोन निशेष नसावें। विवेकबळें ॥ ४१ ॥**

म्हणून आता स्वरूपानुभव घ्यावा, पण मौन भंगू देऊ नये. सर्व करीत असूनही काही करू नये. म्हणजे देहाने व्यवहार करीत असूनही अंतर्यामी पूर्णपणे मीपणाविरहित विवेकाच्या बळावर असावे. (४१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'ब्रह्मनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

# दशक ९ : समास ३
## निःसंदेह निरूपण

॥ श्रीराम ॥

श्रोतीं केला अनुमान। ऐसें कैसें ब्रह्मज्ञान।
कांहींच नाहीं असोन। हें केंवि घडे ॥ १ ॥

सकळ करून अकर्ता। सकळ भोगून अभोक्ता।
सकळांमधें अलिप्तता। येईल कैसी ॥ २ ॥

तथापी तुम्ही म्हणतां। योगी भोगून अभोक्ता।
स्वर्गनर्कहि आतां। येणें न्यायें ॥ ३ ॥

जन्म मृत्य भोगीलेच भोगी। परी तो भोगून अभोक्ता योगी।
यातनाहि तयालागीं। येणेंचि पाडें ॥ ४ ॥

कुटून नाहीं कुटिला। रडोन नाहीं रडला।
कुंथोन नाहीं कुंथिला। योगेश्वर ॥ ५ ॥

जन्म नसोन घातला। पतित नसोन जाला।
यातना नसोन पावला। नानापरी ॥ ६ ॥

ऐसा श्रोतयांचा अनुमान। श्रोतीं घेतलें आडरान।
आतां याचें समाधान। केलें पाहिजे ॥ ७ ॥

वक्ता म्हणे सावध व्हावें। तुम्ही बोलतां बरवें।
परी हें तुमच्याच अनुभवें। तुम्हास घडे ॥ ८ ॥

ज्याचा अनुभव जैसा। तो तो बोलतो तैसा।
संपदेविण जो धिवसा। तो निरार्थक ॥ ९ ॥

नाहीं ज्ञानाची संपदा। अज्ञानदारिद्रें आपदा।
भोगिल्याच भोगी सदा। शब्दज्ञानें ॥ १० ॥

योगी वोळखावा योगेश्वरें। ज्ञानी वोळखावा ज्ञानेश्वरें।
माहाचतुर तो चतुरें। वोळखावा ॥ ११ ॥

अनुभवी अनुभवियास कळे। अलिप्त अलिप्तपणें निवळे।
विदेहाचा देहभाव गळे। विदेही देखतां ॥ १२ ॥

मागील निरूपण ऐकून श्रोत्यांनी प्रश्न केला की असे कसे ब्रह्मज्ञान? ब्रह्म असून काहीच नाही हे कसे शक्य आहे? (१)

सर्व करून अकर्ता राहाणे, सर्व भोगून अभोक्ता असणे आणि सर्वांत राहून अलिप्तता हे कसे शक्य होईल? (२)

तथापि तुम्ही म्हणता की, योगी हा सर्व भोगून अभोक्ता असतो, मग स्वर्ग आणि नरक यांनाही हाच न्याय लागू पडतो की काय? (३)

जरी जन्ममृत्यू भोगावे लागले, तरी ते भोगूनही तो अभोक्ताच असतो का? मग याच न्यायाने तो यातनाही भोगून भोगत नाही, असे म्हणायचे का ? (४)

याचा अर्थ असा होतो का की, त्याला कुणी मारून कुटून काढला तरी तो मार खातच नाही. दुःखाने रडूनही रडत नाही. कण्हत कुंथत असूनही तो योगेश्वर कुंथत कण्हत नाही. (५)

जन्म घेऊनही जन्मत नाही, पतित नसून पतित होतो आणि यातना नसूनही नाना यातना भोगतो. (६)

वक्त्याच्या बोलण्यावर श्रोत्यांनी विचाराच्या आडरानात शिरून अनेक आक्षेप घेतले. तेव्हा आता याचे समाधान केलेच पाहिजे. (७)

वक्ता म्हणू लागला की, तुम्ही सावध व्हावे. तुमच्या अनुभवानुसार तुम्हांला जे वाटते, ते तुम्ही बोलता, हे योग्यच आहे. (८)

ज्याला जसा अनुभव येतो, तो माणूस त्याप्रमाणे बोलतो. ज्याच्याजवळ संपत्ती नसते, त्याचा भरवसाही निरर्थक ठरतो. (९)

ज्याच्याजवळ ज्ञानाची संपत्ती नसते आणि जो अज्ञानरूपी दारिद्र्याने सर्वकाळ आपदाच भोगत असतो, त्याला शब्दज्ञान असले, तरी त्यामुळे जन्ममरणाच्या संकटातून त्याची सुटका होत नाही. (१०)

योग्याची ओळख योग्यालाच पटते. जो श्रेष्ठ ज्ञानी असेल तोच दुसऱ्या ज्ञानी माणसाला ओळखू शकतो. जो अत्यंत चतुर असेल तोच चतुर माणसाची पारख करू शकतो. (११)

जो अनुभवी असतो, तोच अनुभवी पुरुषाला जाणतो. जो अलिप्त असतो, त्यालाच अलिप्त पुरुषाला पाहून संतोष वाटतो आणि जो विदेही असतो त्यास कुणी विदेही भेटला, तर आनंदाने त्याचे देहभान हरपते. (१२)

**बद्धासारिखा सिद्ध। आणी सिद्धासारिखा बद्ध।**
**येक भावील तो अबद्ध। म्हणावाच नलगे ॥ १३॥**

कुणी एखादा सिद्ध असून बद्धासारखा वागतो, तर कुणी एखादा बद्ध सिद्धपणाचे सोंग आणीत असतो. त्यांना जो एकसारखे मानतो, तो मूर्ख असतो, हे सांगण्याचीही आवश्यकता नाही. (१३)

**झडपला तो देहधारी। आणी देहधारक पंचाक्षरी।**
**परंतु दोघां येकसरी। कैसी द्यावी ॥ १४॥**

ज्याला एखाद्या भूताने झडपलेले असते तोही देहधारी असतो आणि ती भूतबाधा नाहीशी करणारा मांत्रिकही देहधारीच असतो, म्हणून दोघांना एकसारखे कसे म्हणता येईल? (१४)

**तैसा अज्ञान पतित। आणी ज्ञानी जीवन्मुक्त।**
**दोघे समान मानील तो युक्त। कैसा म्हणावा ॥ १५॥**

त्याप्रमाणे अज्ञानी पतित अशा माणसाला आणि ज्ञानी जीवन्मुक्ताला समान मानील, त्या पुरुषाला शहाणा कसे म्हणावे? (१५)

**आतां असो हे दृष्टांत। प्रचित बोलों कांहीं हेत।**
**येथें श्रोतीं सावचित्त। क्षणयेक व्हावें ॥ १६॥**

आता हे दृष्टान्त देणे पुरे झाले. आता प्रचीतीचा, स्वानुभवाचा काही विचार सांगतो, तरी श्रोत्यांनी क्षणभर अत्यंत एकाग्र चित्ताने ऐकावे. (१६)

**जो जो ज्ञानें गुप्त जाला। जो विवेकें विराला।**
**जो अनन्यपणें उरला- । नाहींच कांहीं ॥ १७॥**

जो जो कुणी ज्ञानाने गुप्त झाला म्हणजे देहाने असून नसल्यासारखा झालेला असतो, जो विवेकाने आत्मस्वरूपी विरून गेलेला असतो आणि अनन्यपणामुळे वेगळा असा उरतच नाही, (१७)

**तयास कैसें गवसावें। शोधूं जातां तोचि व्हावें।**
**तोचि होतां म्हणावें। नलगे कांहीं ॥ १८॥**

त्याला कसे शोधून काढावे ? कारण त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न करताच शोधणाराच तद्रूप होतो. त्यामुळे काही बोलण्याचा प्रश्नच उरत नाही. (१८)

**देहीं पाहातां दिसेना। तत्त्वें शोधितां भासेना।**
**ब्रह्म आहे निवडेना- । कांहीं केल्यां ॥ १९॥**

त्याच्या देहात त्याचा शोध घ्यावा तर तो तेथे नसतोच. तत्त्वांत म्हणजे पंचमहाभूतात शोध घ्यावा म्हटले तर तेथे तो भासत नाही. ब्रह्मरूप झालेला असल्याने त्याला काही केल्या निवडून वेगळाही काढता येत नाही. (१९)

**दिसतो तरी देहधारी। परी कांहींच नाहीं अंतरीं।**
**तयास पाहातां वरिवरी। कळेल कैसा ॥ २०॥**

दिसायला इतर सामान्य देहधारी माणसांसारखाच तो दिसतो, पण त्याच्या अंतरात 'मी देह' हा भावच नसतो. पण वरवर पाहिले असता हे कसे कळून येईल? (२०)

**कळाया शोधावें अंतर। तंव तो नित्य निरंतर।**
**जयास धुंडितां विकार। निर्विकार होती ॥ २१॥**

त्याची खरी स्थिती कळावी म्हणून त्याच्या अंतरंगाचा शोध घ्यावा म्हणावे, तर तो स्वरूपाकार झालेला असतो. त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला की शोध घेणाराच निर्विकार होतो. (२१)

**तो परमात्मा केवळ। तयास नाहीं मायामळ।**
**अखंड हेतुचा विटाळ। जालाच नाहीं ॥ २२॥**

तो केवळ परमात्मरूपच झालेला असतो. त्याच्या ठिकाणी मायारूपी मळ नसतो. तो अखंड एकरूपच असतो, त्यामुळे इच्छारूपी द्वैताचा विटाळ त्याला झालेला नसतो. (२२)

**ऐसा जो कां योगीराज। तो आत्मा सहजीं सहज।**
**पूर्णब्रह्म वेदबीज। देहाकारें कळेना ॥ २३॥**

असा जो योगीराज असतो, तो अगदी सहजपणे आत्म-रूपच असतो. पूर्णब्रह्म आणि वेदाचे बीजच असलेला तो ब्रह्मस्वरूप योगी त्याच्या देहावरून ओळखता येत नाही. (२३)

देह भावितां देहचि दिसे। परी अंतर अनारिसें असे।
तयास शोधितां नसे। जन्ममरण ॥ २४॥

देहाकडे पाहिले असता तो सामान्य देहधारी माणसाप्रमाणेच दिसतो, पण त्याची अंतस्थिती अगदी वेगळी असते. त्या स्थितीचा शोध घेऊ लागले, तर त्याला जन्ममरण नाही हे कळून येते. (२४)

जयास जन्ममरण व्हावें। तें तो नव्हेचि स्वभावें।
नाहींच तें आणावें। कोठून कैंचें ॥ २५॥

ज्याला जन्ममृत्यू असतात तो देह तो स्वाभाविकच नसतो. जे जेथे नसतेच ते तेथे कोठून आणि कसे आणावे? (२५)

निर्गुणास जन्म कल्पिला। अथवा निर्गुण उडविला।
तरी उडाला आणी जन्मला। आपला आपण ॥ २६॥

ज्ञानी पुरुष हा निर्गुण परब्रह्मस्वरूप असतो. त्याचा जन्म झाला असे म्हटले किंवा तो मेला असे म्हटले तरी त्याच्या निर्गुणत्वात काहीच फरक पडत नाही. तो जन्मला आणि मेला ह्या अज्ञानी माणसाच्या कल्पना असतात. (२६)

माध्यानीं थुंकितां सूर्यावरी। तो थुंका पडेल आपणाच वरी।
दुसऱ्यास चिंतितां अंतरीं। आपणास घडे ॥ २७॥

भर दुपारी सूर्यावर थुंकण्याचा प्रयत्न केला तर ती थुंकी आपल्याच अंगावर पडते. म्हणून दुसऱ्यासंबंधी आपण ज्या कल्पना मनात करतो, त्याप्रमाणे आपल्यालाच भोगावे लागते. म्हणजे ज्ञानी पुरुषाला जन्ममरण आहे हे चिंतिले असता आपण ते त्याच्यावर आरोपित केल्यासारखे होते. त्यामुळे त्याचे तर काहीच बिघडत नाही, पण दोष आपल्याला लागतो. (२७)

समर्थ रायाचें महिमान। जाणतां होतें समाधान।
परंतु भुंकों लागलें स्वान। तरी तें स्वानचि आहे ॥ २८॥

एखादा सामर्थ्यसंपन्न राजा आहे, तर त्याची थोरवी जाणून पाहून मनाला समाधान होते. पण कुत्री त्याच्यावर भुंकतात. ती बोलून-चालून कुत्रीच असतात. (त्यांना त्याची थोरवी कशी कळणार?) (२८)

ज्ञानी तो सत्यस्वरूप। अज्ञान देखे मनुष्यरूप।
भावासारिखा फळद्रूप। देव तैसा ॥ २९॥

ज्ञानी तो सत्यस्वरूप असतो, पण अज्ञानी माणसाला तो मनुष्यरूप दिसतो. ज्याचा भाव जसा असेल, तसा देव त्याला फलद्रूप होतो. त्याप्रमाणेच अज्ञानी माणसाचे असते. (२९)

देव निराकार निर्गुण। लोक भाविती पाषाण।
पाषाण फुटतो निर्गुण। फुटेल कैसा ॥ ३०॥

देव वास्तविक, निर्गुण निराकार आहे. लोक पाषाणात त्याची भावना करतात. पाषाण फुटतो, पण निर्गुण-निराकार देव कसा फुटेल? (३०)

देव सदोदित संचला। लोकीं बहुविध केला।
परंतु बहुविध जाला। हें तो घडेना ॥ ३१॥

देव एकला एकच सर्वत्र ओतप्रोत संचलेला असतो. पण सामान्य लोकांनी त्याला अनेक नामारूपांचा केला आहे. म्हणून तो बहुविध झाला, पण असे तर घडत नाही. (३१)

तैसा साधु आत्मज्ञानी। बोधें पूर्ण समाधानी।
विवेकें आत्मनिवेदनी। आत्मरूपी ॥ ३२॥

त्याप्रमाणे आत्मज्ञानी साधू हा बोधामुळे पूर्ण समाधानी असतो. सारासारविवेकाने आत्मनिवेदन करून तो आत्म्याशी एकरूप झालेला असतो. (३२)

जळोन काष्ठाचा आकार। अग्नि दिसे काष्ठाकार।
परी काष्ठ होईल हा विचार। बोलोंच नये ॥ ३३॥

लाकूड जळते, तेव्हा त्यातील अग्नी काष्ठाचा जसा आकार असेल तसेच त्या आकाराचा दिसतो. पण ते परत काष्ठ होईल असा विचार तर बोलू सुद्धा नये. (३३)

कपूर असे तो जळता दिसे। तैसा ज्ञानीदेह भासे।
त्यास जन्मवितां कैसें। कर्दळीउदरीं ॥ ३४॥

कापूर जळताना त्याचा आकार भासत असतो. त्याप्रमाणे ज्ञान्याचा देह भासत असतो. जळत असलेला कापराचा खडा परत कर्दळीतून उत्पन्न होत नसतो. तसा ज्ञानाग्नीने दग्ध झालेला ज्ञान्याचा देह एकदा नष्ट झाला की परत तो जन्मास येत नाही. (३४)

**बीज भाजलें उगवेना। वस्त्र जळालें उकलेना।**
**वोघ निवडितां निवडेना। गंगेमधें ॥ ३५ ॥**

भाजलेले बीज असले की ते पेरले तरी उगवून येत नाही. वस्त्र एकदा जळले की त्याचीघडी उकलत नाही. एखादा पाण्याचा प्रवाह गंगेला मिळाला की तो निवडून वेगळा करता येत नाही. (३५)

**वोघ गंगेमागें दिसे। गंगा येकदेसी असे।**
**साधु कांहींच न भासे। आणी आत्मा सर्वगत॥ ३६ ॥**

गंगेला मिळण्यापूर्वी तो प्रवाह वेगळा दिसत असतो आणि गंगा तर एकदेशी आहे. पण साधू तर काहीच भासत नाही आणि तो ज्याच्याशी एकरूप होतो तो आत्मा तर आहे म्हणून तो आत्मरूप साधू वेगळा राहात नाही. (३६)

**सुवर्ण नव्हे लोखंड। साधूस जन्म थोतांड।**
**अज्ञान प्राणी जडमूढ। तयास हें उमजेचिना ॥ ३७॥**

परीसाने एकदा लोखंडाचे सुवर्ण झाले की, ते सुवर्ण परत लोखंड होत नाही. त्याप्रमाणे साधूला परत जन्म घ्यावा लागत नाही. जे लोक अज्ञानी जडमूढ असतात, त्यांना हे उमजत नाही. म्हणून साधूस जन्म असतो, असे ते समजतात. (३७)

**अंधास कांहींच न दिसे। तरी ते लोक आंधळे कैसे।**
**सन्नपातें बरळतसे। सन्नपाती ॥ ३८ ॥**

आंधळ्या माणसाला काही दिसत नाही, पण म्हणून इतर लोकांना आंधळे कसे म्हणता येईल? सन्निपात ज्वर झालेला रोगी त्या ज्वरामुळे वाटेल ते बरळू लागतो, त्याप्रमाणे अज्ञानी लोक ज्ञानी साधूबद्दलही हवे ते बरळत असतात.(३८)

**जो स्वप्नामधें भ्याला। तो स्वप्नभयें वोसणाला।**
**तें भये जागत्याला। केवि लागे ॥ ३९ ॥**

जो स्वप्नात भ्यालेला असतो, तो स्वप्नात भयाने बरळू लागतो. पण जो जागा झालेला असतो, त्याला स्वप्नभय कसे वाटणार? (३९)

**मुळी सर्पाकार देखिली। येक भ्याला येकें वोळखिली।**
**दोघांची अवस्ता लेखिली। सारिखीच कैसी ॥ ४० ॥**

दोन माणसे रस्त्याने जात असताना त्यांना सर्पाकार मुळी दिसली. एकाने ही मुळी आहे हे ओळखले नाही. त्यामुळे त्याला तो सर्प वाटून तो भ्याला. दुसऱ्याने ती मुळी आहे, सर्प नव्हे, हे ओळखले. त्यामुळे तो मुळीच भ्याला नाही. मग दोघांची अवस्था सारखी कशी लेखता येईल? (४०)

**हातीं धरितांहि डसेना। हें येकास भासेना।**
**तरी ते त्याची कल्पना। तयासीच बाधी ॥ ४१ ॥**

ती मुळी हातात धरली तरी ती डसत नाही, हे भ्यालेल्या माणसाला पटत नाही.म्हणजे त्याची कल्पनाच त्याला बाधक ठरते. (४१)

**विंचु सर्प डसला। तेणें तोचि जाकळला।**
**तयाचेनि लोक जाला। कासावीस कैसा ॥ ४२ ॥**

ज्याला साप, विंचू डसतो तो त्यामुळे व्याकूळ होतो, पण त्यामुळे इतर लोक कसे कासावीस होतील? (४२)

**आतां तुटला अनुमान। ज्ञानियांस कळे ज्ञान।**
**अज्ञानास जन्ममरण। चुकेचिना ॥ ४३ ॥**

आता श्रोत्यांच्या शंकेचे समाधान झाले असेल. जो ज्ञानी असेल तोच ज्ञानी माणसास ओळखू शकतो. अज्ञानी माणूस ज्ञानी माणसास ओळखू शकत नाही आणि त्याचे जन्ममरणही चुकत नाही. (४३)

**येका जाणण्यासाठीं। लोक पडिले अटाटी।**
**नेणपणें हिंपुटी होती। जन्ममृत्यें ॥ ४४ ॥**

एका आत्म्याला जाणण्यासाठी लोक आटापिटा करीत राहतात आणि अज्ञानाने कष्टी होतात. जन्ममृत्यूचे दु:ख भोगत राहातात. (४४)

**तेंचि कथानुसंधान। पुढें केलें परिछिन्न।**
**सावधान सावधान। म्हणे वक्ता ॥ ४५ ॥**

हाच विषय पुढे अधिक स्पष्ट करून सांगितला जाईल तरी 'सावधान' 'सावधान' असे वक्ता म्हणाला. (४५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'नि:संदेहनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक ९ : समास ४

# जाणपणनिरूपण

॥ श्रीराम ॥

**पृथ्वीमधें लोक सकळ। येक संपन्न येक दुर्बळ।**
**येक निर्मळ येक वोंगळ। काय निमित्य ॥ १ ॥**

येथे श्रोत्याने प्रथम काही प्रश्न केले आहेत. तो म्हणतो की, पृथ्वीमध्ये अनेक लोक आहेत. त्यांत कुणी संपन्न असतो, तर कुणी दुर्बळ असतो. कुणी निर्मळ असतो, तर कुणी ओंगळ असतो. याचे कारण काय आहे? (१)

**कित्येक राजे नांदती। कित्येक दरिद्र भोगिती।**
**कितीयेकांची उत्तमस्थिती। कित्येक अधमोद्धम ॥ २ ॥**

कित्येक राज्यपद भोगतात, तर कित्येक दरिद्री असतात. कित्येकांची स्थिती उत्तम असते, तर कित्येकांची अधमाहून अधम असते. (२)

**ऐसें काय निमित्य जालें। हें मज पाहिजे निरोपिलें।**
**याचें उत्तर ऐकिलें। पाहिजे श्रोतीं ॥ ३ ॥**

ह्या विषमतेचे कारण काय? असे व्हावयास काय निमित्त घडते? ते मला सांगितले पाहिजे. श्रोत्यांनी ते उत्तर ऐकले पाहिजे. (३)

**हे सकळ गुणापासी गती। सगुण भाग्यश्री भोगिती।**
**अवगुणास दरिद्रप्राप्ती। येदर्थीं संदेह नाहीं ॥ ४ ॥**

हे सर्व गुणांवर अवलंबून आहे. जे सद्‌गुणी असतात ते भाग्यश्रीचा उपभोग घेतात आणि अवगुणी असतात त्यांना दारिद्र्य प्राप्त होते. यात संशयास जराही जागा नाही. (४)

**जो जो जेथें उपजला। तो ते वेवसाईं उमजला।**
**तयास लोक म्हणती भला। कार्यकर्ता ॥ ५ ॥**

जो जो माणूस ज्या ज्या व्यवसायात तो व्यवसाय करणाऱ्या घरात वा कुळात जन्माला येतो, तो व्यवसाय करणे त्याला चांगले जमते. अशा रीतीने तो व्यवसाय करू लागला की, लोक त्याला चांगला कार्यकर्ता आहे असे म्हणून वाखाणतात. (५)

**जाणता तो कार्य करी। नेणता कांहींच न करी।**
**जाणता तो पोट भरी। नेणता भीक मागे ॥ ६ ॥**

जाणता, हुशार असेल तो काम करतो. जो नेणता असतो तो काहीच करीत नाही. त्यामुळे जाणता माणूस व्यवस्थित पोट भरू शकतो, तर नेणत्याला भीक मागण्याची पाळी येते. (६)

**हें तों प्रगटचि असे। जनीं पाहातां प्रत्यक्ष दिसे।**
**विद्येवीण करंटा वसे। विद्या तो भाग्यवंत ॥ ७ ॥**

ही गोष्ट तर जगात प्रत्यक्षच दिसून येते की, जो विद्याहीन असतो तो करंटा राहातो आणि ज्याच्याजवळ विद्या असते, तो भाग्यवान ठरतो. (७)

**आपुली विद्या न सिकसी। तरी काये भीक मागसी।**
**जेथें तेथें बुद्धी ऐसी। वडिलें सांगती ॥ ८ ॥**

आपली विद्या शिकला नाहीस, तर भीक मागण्याची वेळ येईल. अशा प्रकारे जेथे तेथे वडील माणसे मुलांना उपदेश करीत असतात. (८)

**वडिल आहे करंटा। आणी समर्थ होये धाकुटा।**
**कां जे विद्येनें मोठा। म्हणोनियां ॥ ९ ॥**

एखाद्या घरी मोठा भाऊ भाग्यहीन करंटा असतो, तर धाकटा पुष्कळ विद्या शिकून समर्थ, कर्तबगार आणि भाग्यवान ठरतो. (९)

**विद्या नाहीं बुद्धि नाहीं। विवेक नाहीं साक्षेप नाहीं।**
**कुशळता नाहीं व्याप नाहीं। म्हणौन प्राणी करंटा ॥ १० ॥**

ज्याच्याजवळ विद्या नसेल, बुद्धी नसेल, विवेक नसेल, आग्रह नसेल, कौशल्य नसेल, व्याप नसेल, तर तो प्राणी करंटा भाग्यहीन ठरतो. (१०)

**इतुकेंहि जेथें वसे। तेथें वैभवास उणें नसे।**
**वैभव सांडितां अपैसें। पाठीं लागे ॥ ११ ॥**

या सर्व गोष्टी म्हणजे विद्या बुद्धि जेथे असतील, तेथे वैभवाला तोटा नसतो. त्याने वैभव नको म्हटले, तरी ते आपोआप पाठीस लागून येते. (११)

**वडिल समर्थ धाकुटा भिकारी । ऐका याची कैसी परी ।**
**वडिलाऐसा व्याप न करी । म्हणोनियां ॥ १२ ॥**

एखाद्या घरी वडील भाऊ कर्तबगार असतो, समर्थ असतो, तर धाकटा भिकारी असतो. याचे कारण हेच असते की, धाकटा मोठ्या भावाप्रमाणे व्याप करीत नाही.(१२)

**जैसी विद्या तैसी हांव । जैसा व्याप तैसें वैभव ।**
**तोलासारिखा हावभाव । लोक करिती ॥ १३ ॥**

जशी विद्या असेल तिला अनुसरून त्या माणसाची महत्त्वाकांक्षा असते. जितका त्याचा व्याप असेल तितक्या प्रमाणात त्या माणसाला वैभव प्राप्त होते. प्रत्येकाच्या सामर्थ्यानुसार जो तो कर्तबगारी दाखवितो. (१३)

**विद्या नसे वैभव नसे । तेथें निर्मळ कैंचा असे ।**
**करंटपणें वोखटा दिसे । वोंगळ आणी विकारी ॥ १४ ॥**

ज्याच्याजवळ विद्या नाही, वैभव नाही, तो निर्मळ कसा असेल? तो करंटेपणाने वाईट दिसतो, गलिच्छ आणि विकारी असतो. (१४)

**पशु पक्षी गुणवंत । त्यास कृपा करी समर्थ ।**
**गुण नस्तां जिणें वेर्थ । प्राणीमात्रांचें ॥ १५ ॥**

पशू, पक्षी, यांच्या ठिकाणी सुद्धा जर काही गुण असतील तर समर्थ लोक त्यांच्यावर कृपा करतात. काही चांगले गुण नसतील, तर त्या प्राणिमात्रांचे जिणे व्यर्थ होय. (१५)

**गुण नाहीं गौरव नाहीं । सामर्थ्य नाहीं महत्त्व नाहीं ।**
**कुशळता नाहीं तर्क नाहीं । प्राणीमात्रांसी ॥ १६ ॥**

काही माणसे अशी असतात की, त्यांच्या अंगी गुण, मोठेपणा, सामर्थ्य, महत्त्व, कुशलता अथवा तर्क यांपैकी काहीच नसते. (१६)

**याकारणें उत्तम गुण । तेंचि भाग्याचें लक्षण ।**
**लक्षणेंविण अवलक्षण । सहजचि जालें ॥ १७ ॥**

म्हणून उत्तम गुण हेच भाग्याचे लक्षण होय. याउलट ते नसतील, तर भाग्याच्या लक्षणाऐवजी तेथे सहजच अवलक्षण दिसून येते. (१७)

**जनामधें जो जाणता । त्यास आहे मान्यता ।**
**कोणी येक विद्या असतां । महत्व पावे ॥ १८ ॥**

जो जाणता माणूस असतो, त्याला लोकात मान्यता मिळते. काही ना काही विद्या येत असेल, तर सहजच महत्त्व प्राप्त होते. (१८)

**प्रपंच अथवा परमार्थ । जाणता तोचि समर्थ ।**
**नेणता जाणिजे वेर्थ । निःकारण ॥ १९ ॥**

प्रपंच असो वा परमार्थ, त्यात जाणता मनुष्यच समर्थ ठरतो. नेणता असेल तो कुचकामाचा असून व्यर्थच जगतो.(१९)

**नेणतां विंचु सर्प डसे । नेणतां जीवघात असे ।**
**नेणतां कार्य नासे । कोणी येक ॥ २० ॥**

अज्ञानामुळे विंचू, साप डसतो किंवा अज्ञानामुळे जीवघात होतो किंवा एखादे कार्यही अज्ञानामुळेच बिघडते. (२०)

**नेणतां प्राणी सिंतरे । नेणपणें तऱ्हे भरे ।**
**नेणपणें ठके विसरे । पदार्थ कांहीं ॥ २१ ॥**

अज्ञानी माणूसच फसतो, अज्ञानी माणूसच तऱ्हेवाईकपणे वागतो किंवा पदार्थ, वस्तू यांचा त्याला विसर पडतो.(२१)

**नेणतां वैरी जिंकिती । नेणतां अपाईं पडती ।**
**नेणतां संव्हारती, घडती- । जीव नास ॥ २२ ॥**

अज्ञानी माणसाला वैरी जिंकतात. अज्ञानामुळे संकटात पडावे लागते. अज्ञानामुळेच संहार घडतो आणि अनेक जीवांचा नाश होतो. (२२)

**आपुलें स्वहित न कळे जना । तेणें भोगिती यातना ।**
**ज्ञान नेणतां अज्ञाना । अधोगती ॥ २३ ॥**

लोकांना आपले हित कशात आहे हे कळत नाही, त्यामुळे यातना भोगाव्या लागतात. ज्ञान नसल्याने अज्ञानी माणसाची अधोगती होते. (२३)

**मायाब्रह्म जीवशिव । सारासार भावाभाव ।**
**जाटिल्यासाठीं होतें वाव । जन्ममरण ॥ २४ ॥**

माया म्हणजे काय, ब्रह्म म्हणजे काय, जीव कुणाला म्हणावे, शिव कुणाला म्हणावे, भाव म्हणजे काय, अभाव म्हणजे काय, सार काय आहे, असार काय आहे वगैरे सर्व जाणून घेतले की जन्ममरणातून सुटका होते. (२४)

**कोण कर्ता निश्चयेंसीं । बद्ध मोक्ष तो कोणासीं ।**
**ऐसें जाणतां प्राणियांसीं । सुटिका घडे ॥ २५ ॥**

कर्ता कुणाला म्हणावे, याचा निश्चय, बंध, मोक्ष कुणाचा होतो इत्यादी जाणले असता मनुष्याची जन्ममरणांतून सुटका होते. (२५)

जाणिजे देव निर्गुण। जाणिजे मी तो कोण।
जाणिजे अनन्यलक्षण। म्हणिजे मुक्त ॥ २६॥

देव निर्गुण आहे हे जाणावे. आपण 'मी' म्हणतो तो 'मी' कोण हे जाणून घ्यावे. अनन्य म्हणजे काय, त्याचे लक्षण कोणते वगैरे जाणले म्हणजे मुक्ती मिळते. (२६)

जितुकें जाणोन सांडिलें। तितुकें दृश्य वोलांडिलें।
जाणत्यास जाणतां तुटलें। मूळ मीपणाचें ॥ २७॥

सर्वांचे स्वरूप जाणून त्याचा त्याग केला, जितके दृश्य आहे ते नाशिवंत जाणून त्यास ओलांडले आणि हे सर्व जाणणारा जो आत्मा त्याला जाणले असता मीपणाचे मूळच नाहीसे होते. (२७)

न जाणतां कोटीवरी। साधनें केलीं परोपरीं।
तरी मोक्षास अधिकारी। होणार नाहीं ॥ २८॥

वरील सर्व गोष्टी न जाणता परोपरीने कोट्यवधी साधने केली, तरी तो माणूस मोक्षाचा अधिकारी होणार नाही. (२८)

मायाब्रह्म वोळखावें। आपणास आपण जाणावें।
इतुक्यासाठीं स्वभावें। चुके जन्म ॥ २९॥

माया कशी आहे, ब्रह्माचे स्वरूप काय आहे हे ओळखावे व स्वरूपाचे अनुसंधान ठेवून आपण आपणास जाणून घ्यावे. हे सर्व केल्यानेच स्वाभाविकपणे पुन्हा जन्मावे लागत नाही. (२९)

जाणतां समर्थांचें अंतर। प्रसंगें वर्ते तदनंतर।
भाग्य वैभव अपार। तेणेंचि पावे ॥ ३०॥

समर्थांचे अंतरंग जाणून घेऊन नंतर प्रसंगानुसार योग्य आचरण केल्याने अपार भाग्य, वैभव प्राप्त होते (३०)

म्हणौन जाणणें नव्हे सामान्य। जाणतां होईजे सर्वमान्य।
कांहींच नेणतां अमान्य। सर्वत्र करिती ॥ ३१॥

म्हणून जाणणे ही सामान्य गोष्ट समजू नये. जाणून जे काही केले जाते, ते सर्वांना मान्य होते. काहीही जाणून न घेता जे काही केले जाते ते सर्वांना अमान्य होते.(३१)

पदार्थ देखोन भूत भावी। नेणतें झडपोन प्राण ठेवी।
मिथ्या आहे उठाठेवी। जाणते जाणती ॥ ३२॥

एखादा अज्ञानी माणूस एखादा पदार्थ अंधारामुळे नीट दिसला नाही, तर तेथे भूताची कल्पना करतो आणि अज्ञानामुळे आपल्याला भूताने झपाटले असे मानून भीतीने प्राण सोडतो. हे सर्व काही अज्ञानामुळे जो मिथ्या भास झाला, त्याची उठाठेव आहे हे जाणती माणसे ओळखतात. (३२)

जाणत्यास कळे वर्म। नेणत्याचें खोटें कर्म।
सकळ कांहीं धर्माधर्म। जाणतां कळे ॥ ३३॥

जाणत्याला यातील रहस्य कळते. नेणता अज्ञानाने कर्म करतो ते खोटे असते. जाणून घेतल्याने सर्व धर्म-अधर्माचे ज्ञान होते. (३३)

नेणत्यास येमयातना। जाणत्यास कांहींच लगेना।
सकळ जाणोन,विवंचना-। करी तो मुक्त ॥ ३४॥

अज्ञानी माणसाला यमयातना भोगाव्या लागतात. जाणता असतो त्याला काहीच भोगावे लागत नाही. कारण तो सर्व काही जाणून घेऊन त्यावर विचार करतो व मुक्त होतो. (३४)

नेणतां कांहीं राजकारण। अपमान करून घेती प्राण।
नेणतां कठीण वर्तमान। समस्तांस होये ॥ ३५॥

ज्याला व्यवहारात कसे वागावे याचे ज्ञान नसते, तो एखादे वेळी दुसऱ्याचा अपमान करून त्याचा प्राणही घेतो. यामुळे त्याच्या अज्ञानामुळे सगळयांच्यावर कठीण प्रसंग येतो (३५)

म्हणोनियां नेणणें खोटें। नेणते प्राणी ते करंटे।
जाणतां विवरतां तुटे। जन्ममरण ॥ ३६॥

म्हणूनच अज्ञान हे वाईट असून अज्ञानी प्राणी करंटे असतात. म्हणून ज्ञान प्राप्त करून त्याचे चिंतन केले असता जन्ममरणातून सुटका होते. (३६)

म्हणोन अलक्ष करूं नये। जाणणें हाचि उपाये।
जाणतां सांपडे सोये। परलोकाची ॥ ३७॥

म्हणून ज्ञानाकडे दुर्लक्ष करू नये. जाणणे हाच एकमेव उपाय असून त्यानेच परलोकाची सोय सापडते. (३७)

जाणणें सकळांस प्रमाण। मूर्खास वाटे अप्रमाण।
परंतु अलिप्तपणाची खूण। जाणतां कळे ॥ ३८ ॥

ज्ञान हे सर्वांना प्रमाण वाटते, पण मूर्खाला ते अप्रमाण वाटते. पण ज्ञानामुळेच अलिप्तपणाची खूण कळते. (३८)

येक जाणणें करून परतें। कोण सोडी प्राणीयांतें।
कोणी येक कार्य जें तें। जाटिल्याविण न कळे ॥ ३९ ॥

एका ज्ञानाशिवाय प्राण्यांची जन्ममरणातून सुटका करणारे कोण आहे? कुठलेही कार्य असो, ते जाणल्याशिवाय सिद्धीस जात नाही. (३९)

जाणणें म्हणिजे स्मरण। नेणणें म्हणिजे विस्मरण।
दोहींमधें कोण प्रमाण। शाहाणे जाणती ॥ ४० ॥

जाणणे म्हणजे (स्वस्वरूपाचे) स्मरण आणि नेणणे म्हणजे (स्वस्वरूपाचे) विस्मरण होय. या दोन्हीमध्ये प्रमाण कोण ते शहाणे लोक जाणतात. (४०)

जाणते लोक शाहाणे। नेणते वेडे दैन्यवाणे।
विज्ञान तेंहि जाणपणें। कळों आलें ॥ ४१ ॥

जाणते लोक असतात ते शहाणे असतात. नेणते वेडे, दैन्यवाणे असतात. विज्ञान म्हणजेच अनुभव म्हणजे काय हे पण जाणपणामुळेच कळू लागते. (४१)

जेथें जाणपण खुंटलें। तेथें बोलणेंही तुटलें।
हेतुरहित जालें। समाधान ॥ ४२ ॥

जेथे जाणीवही खुंटते, तेथे बोलणेही तुटते. स्वरूपानुभव आला की जाणीवही राहात नाही आणि शब्दही तेथपर्यंत पोहोचू शकत नाही. त्यामुळे हेतुरहित अनिर्वचनीय असे समाधान प्राप्त होते. (४२)

श्रोते म्हणती हें प्रमाण। जालें परम समाधान।
परी पिंडब्रह्मांड ऐक्यलक्षण। मज निरोपावें ॥ ४३ ॥

श्रोते म्हणतात की आपले हे सांगणे प्रमाण आहे. त्यामुळे परम समाधान प्राप्त झाले आहे. परंतु आता पिंड-ब्रह्मांड ऐक्य लक्षण मला समजावून सांगावे. (४३)

ब्रह्मांडीं तेचि पिंडीं असे। बहुत बोलती ऐसें।
परंतु याचा प्रत्यय विलसे। ऐसें केलें पाहिजे ॥ ४४ ॥

जे ब्रह्मांडात असते, तेच पिंडात असते असे अनेक लोक सांगतात, पण त्याचा प्रत्यय यावा असे आपण केले पाहिजे (४४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'जाणपणनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.

❑ ❑

## दशक ९ : समास ५

# अनुमाननिर्शन

॥ श्रीराम ॥

पिंडासारिखी ब्रह्मांडरचना। नये आमुच्या अनुमाना।
प्रचित पाहातां नाना। मतें भांबावती ॥ १ ॥

श्रोते येथे विचारत आहेत की, पिंडासारखीच ब्रह्मांडाची रचना आहे असे सर्व सांगतात. ते आमच्या तर्काला पटत नाही. त्याची प्रचीती पाहावी म्हटले, तर अनेक मतांचा गोंधळ दिसून येतो. (१)

जें पिंडीं तेंचि ब्रह्मांडीं। ऐसी बोलावयाची प्रौढी।
हें वचन घडीनें घडी। तत्वज्ञ बोलती ॥ २ ॥

'जे पिंडी तेचि ब्रह्मांडी' अशी बोलण्याची एक पद्धत पडली आहे. तत्त्वचिंतकही हे वाक्य वारंवार बोलतात. (२)

पिंड ब्रह्मांड येक राहाटी। ऐसी लोकांची लोकधाटी।
परी प्रत्ययाचे परीपाटीं। तगों न सके ॥ ३ ॥

पिंड-ब्रह्मांड यांचे व्यवहार एकसारखेच असतात असे बोलण्याची लोकांची एक रीत झाली आहे. पण हे म्हणणे प्रत्ययापुढे टिकत नाही. (३)

स्थूळ सूक्ष्म कारण माहाकारण। हे च्यारी पिंडींचे देह जाण।
विराट हिरण्य अव्याकृत मूळप्रकृती हे खूण। ब्रह्मांडींची ॥ ४ ॥

स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण हे चार पिंडाचे देह आहेत असे जाण व विराट, हिरण्य, अव्याकृत आणि मूळ प्रकृती हे ब्रह्मांडाचे चार देह आहेत. (४)

हे शास्त्रधाटी जाणावी। परी प्रचित कैसी आणावी।
प्रचित पाहातां गथागोवी। होत आहे ॥ ५॥

शास्त्रामध्ये या प्रकारचे वर्णन आहे हे खरे पण याची प्रचीती कशी घ्यावी? प्रचीती घेण्याचा प्रयत्न केला की, सर्व गोंधळ होतो. (५)

पिंडीं आहे अंत:करण। तरी ब्रह्मांडीं विष्णु जाण।
पिंडीं बोलिजेतें मन। तरी ब्रह्मांडीं चंद्रमा ॥ ६॥

वक्ता म्हणतो की, पिंडात अंत:करण असते, तसा ब्रह्मांडात विष्णू जाणावा. पिंडात मन म्हणतात, तर ब्रह्मांडात चंद्रमा आहे. (६)

पिंडीं बुद्धी ऐसें बोलिजे। तरी ब्रह्मांडीं ब्रह्मा ऐसें जाणिजे।
पिंडीं चित्त ब्रह्मांडीं वोळखिजे। नारायेणु ॥ ७॥

पिंडात जशी बुद्धी तसा ब्रह्मांडात ब्रह्मा जाणावा. पिंडात चित्त, तसा ब्रह्मांडात नारायण आहे. (७)

पिंडीं बोलिजे अहंकार। ब्रह्मांडीं रुद्र हा निर्धार।
ऐसा बोलिला विचार। शास्त्रांतरीं ॥ ८॥

पिंडात अहंकार तोच ब्रह्मांडात रुद्र हे निर्धारपूर्वक शास्त्रामध्ये सांगितले आहे. (८)

तरी कोण विष्णूचें अंत:कर्ण। चंद्राचें कैसें मन।
ब्रह्मयाचें बुद्धिलक्षण। मज निरोपावें ॥ ९॥

यावर परत श्रोता विचारत आहे की, विष्णू म्हणजे अंत:करण कसे, चंद्र म्हणजे मन कसे आणि ब्रह्मदेवाला बुद्धी का म्हणतात ते मला सांगावे. (९)

नारायेणाचें कैसें चित्त। रुद्रअहंकाराचा हेत।
हा विचार पाहोन नेमस्त। मज निरोपावा ॥ १०॥

चित्त म्हणजे नारायण कसा आणि रुद्राला अहंकार म्हणण्यात काय हेतू आहे, ह्यासंबंधी सर्व विचार मला सांगावा. (१०)

प्रचितनिश्चयापुढें अनुमान। जैसें सिंहापुढें आलें स्वान।
खऱ्यापुढें खोटें प्रमाण। होईल कैसें ॥ ११॥

अनुभवाच्या निश्चयापुढे अनुमान म्हणजे सिंहापुढे कुत्रे यावे तसे आहे. खऱ्यापुढे खोटे कसे टिकून राहील? (११)

परी यास पारखी पाहिजे। पारखीनें निश्चय लाहिजे।
परीक्षा नस्तां राहिजे। अनुमानसंशईं ॥ १२॥

पण हा निवाडा परीक्षावंत व्यक्तीशिवाय होऊ शकत नाही. जो पारखी असतो तोच ठामपणे सांगू शकतो. ज्याला परीक्षा करता येत नाही, तो अनुमान करीत संशयग्रस्त होऊन राहातो. (१२)

विष्णु चंद्र आणी ब्रह्मा। नारायेण आणी रुद्रनामा।
यां पाचांचीं अंत:कर्णपंचकें आम्हा। स्वामी निरोपावी ॥ १३॥

विष्णू, चंद्र, ब्रह्मा, नारायण आणि रुद्र ह्यांना ब्रह्मांडाचे अंत:करणपंचक का म्हणतात, ते हे स्वामी, तुम्ही आम्हांला समजावून द्यावे. (१३)

येथें प्रचित हें प्रमाण। नलगे शास्त्राचा अनुमान।
अथवा शास्त्रीं तरी पाहोन। प्रत्ययो आणावा ॥ १४॥

वक्ता यावर म्हणतो की, या जगात अनुभव हाच प्रमाण मानला पाहिजे. शास्त्रांच्या अनुमानाला काही अर्थ नाही. अथवा शास्त्रग्रंथात जरी पाहाण्यात आले तरी तसा अनुभव येणे आवश्यक आहे. (१४)

प्रचितीवीण जें बोलणें। तें अवघेंचि कंटाळवाणें।
तोंड पसरून जैसें सुणें। रडोन गेलें ॥ १५॥

प्रत्यक्ष अनुभवावाचून जे सांगितले जाते, ते सर्व कंटाळवाणे वाटते. एखादे कुत्रे तोंड पसरून रडू लागते, ते जसे ऐकवत नाही, तशी स्थिती होते. (१५)

तेथें काये हो ऐकावें। आणी काये शोधून पाहावें।
जेथें प्रत्ययाच्या नांवें। सुन्याकार ॥ १६॥

जेथे प्रत्ययाच्या अनुभवाच्या नावाने शून्याकार असतो, तेथे काय हो ऐकायचे? आणि शोधून तरी काय पाहायचे? (१६)

आवघे आंधळेचि मिळाले। तेथें डोळसाचें काय चाले।
अनुभवाचे नेत्र गेले। तेथें अंधकार ॥ १७॥

जेथे सर्व आंधळेच जमलेले असतात, तेथे डोळसाचे काय चालणार? अनुभवाचे नेत्र नसले की सर्वत्र अंधकारच भासणार. (१७)

नाहीं दुग्ध नाहीं पाणी। केली विष्ठेची सारणी।
तेथें निवडायाचे धनी। ते एक डोंबकावळे ॥ १८॥

जेथे दूध व पाणी एकत्र केलेले असते तेथे पाण्याचा त्याग करून दूध ग्रहण करायला नीरक्षीरविवेकी राजहंसाची आवश्यकता असते. संत हे राजहंसासारखे सारासारविवेकाने दृश्य सृष्टीचा त्याग करून आत्मवस्तू ग्रहण करतात. पण जेथे दूधही नाही आणि पाणीही नाही, तेथे राजहंसाचे कामच नाही. जेथे केवळ विषयरूपी विष्ठेचे अस्तित्व आहे, तेथे निवड करण्यास डोमकावळेच योग्य असतात. (१८)

आपुले इछेनें बोलिलें। पिंडाऐसें ब्रह्मांड कल्पिलें।
परी तें प्रचितीस आलें। कोण्या प्रकारें ॥ १९॥

ज्याला जशी इच्छा झाली तशी कल्पना त्याने केली आणि त्याप्रमाणे बोलण्यास सुरुवात केली. त्याचप्रमाणे पिंडाप्रमाणे ब्रह्मांडाची कल्पना केली, पण ते प्रचीतीला कशा प्रकारे आणावे, हे कोणी सांगत नाही. (१९)

म्हणोन हा अवघाच अनुमान। अवघें कल्पनेचें रान।
भलीं न घ्यावें आडरान। तश्करीं घ्यावें ॥ २०॥

म्हणून हे सर्व बोलणे अनुमानाचे आहे. सर्व काल्पनिक आहे. शब्दारण्य आहे. भल्या माणसाने आडरानात शिरू नये. चोर असतात, तेच आडरानात शिरतात. (२०)

कल्पून निर्मिले मंत्र। देव ते कल्पनामात्र।
देव नाहीं स्वतंत्र। मंत्राधेन ॥ २१॥

निरनिराळ्या लोकांनी कल्पना करून मंत्र निर्माण केले व त्याप्रमाणेच देवही कल्पनेने निर्मिले. ते देव स्वतंत्र नसतात, तर मंत्रांच्या अधीन असतात. (२१)

येथें न बोलतां जाणावें। बोलणें विवेका आणावें।
आंधळें पाउलीं वोळखावें। विचक्षणें ॥ २२॥

या गोष्टी अधिक स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाही. यातील अभिप्राय विचाराच्या योगे शहाण्यांनी जाणून घ्यावा. आंधळ्याच्या चालण्याच्या पद्धतीवरूनच हा आंधळा आहे हे शहाणी माणसे ओळखतात.(२२)

जयास जैसें भासलें। तेणें तैसें कवित्व केलें।
परी हें पाहिजे निवडिलें। प्रचितीनें ॥ २३॥

ज्याला जसे भासले तसे त्याने वर्णन केले. पण अनुभव घेऊन त्यातील खऱ्या-खोट्याची निवड केली पाहिजे. (२३)

ब्रह्म्यानें सकळ निर्मिलें। ब्रह्म्यास कोणें निर्माण केलें।
विष्णूनें विश्व पाळिलें। विष्णूस पाळिता कवणु ॥ २४॥

ब्रह्मदेवाने सर्व सृष्टी निर्माण केली, पण त्या ब्रह्मदेवाला कुणी निर्माण केले? विष्णू विश्वाचे पालन करतो, पण त्या विष्णूचे पालन कोण करतो? (२४)

रुद्र विश्वसंव्हारकर्ता। परी कोण रुद्रास संव्हारिता।
कोण काळाचा नियंता। कळला पाहिजे ॥ २५॥

रुद्र सर्व विश्वाचा संहारकर्ता आहे, पण त्या रुद्राचा संहार कोण करतो? काळाचा नियंता कोण आहे हे सर्व कळले पाहिजे. (२५)

याचा कळेना विचार। तो अवघा अंधकार।
म्हणोनियां सारासार। विचार करणें ॥ २६॥

जोपर्यंत याचा विचार कळत नाही तोपर्यंत सर्व अंधकार असतो. म्हणूनच सारासारविचार करणे आवश्यक आहे.(२६)

ब्रह्मांड स्वभावेंचि जालें। परंतु हें पिंडाकार कल्पिलें।
कल्पिलें परी प्रत्यया आलें। नाहीं कदा ॥ २७॥

ब्रह्मांड हे अगदी सहजच निर्माण झाले, परंतु याला पिंडासारखे कल्पिले गेले. पण जरी कल्पना केली तरी तसा अनुभव कधी आलाच नाही. (२७)

पाहातां ब्रह्मांडाची प्रचिती। कित्येक संशय उठती।
हें काल्पनिक श्रोतीं। नेमस्त जाणावें ॥ २८॥

ब्रह्मांडाची प्रचीती घ्यावी म्हणून विचार करू लागले की अनेक संशय निर्माण होतात म्हणून श्रोत्यांनी हे सर्व काल्पनिक आहे हे नीटपणे जाणून घ्यावे.(२८)

पिंडासारिखी ब्रह्मांडरचना। कोण आणितो अनुमाना।
ब्रह्मांडीं पदार्थ नाना। ते पिंडीं कैंचे ॥ २९॥

पिंडासारखी ब्रह्मांडाची रचना आहे असे म्हणणारे अनुमानच करत असतात. ब्रह्मांडात अनेक पदार्थ आहेत ते पिंडात कोठे आढळून येतात? (२९)

औटकोटी भूतावळी । औटकोटी तीर्थावळी ।
औटकोटी मंत्रावळी । पिंडीं कोठें ॥ ३० ॥

ब्रह्मांडात साडेतीन कोटी भूते आहेत. साडेतीन कोटी तीर्थे आहेत. साडेतीन कोटी मंत्र आहेत. पण पिंडात हे असणे शक्य नाही. (३०)

तेतीस कोटी सुरवर । अठ्यासि सहस्त्र ऋषेश्वर ।
नवकोटी कात्यायेणीचा विचार । पिंडीं कोठें ॥ ३१ ॥

ब्रह्मांडात तेहतीस कोटी देव आहेत. अठ्ठ्याऐंशी हजार ऋषीश्वर आहेत. नऊ कोटी कात्यायनी आहेत. हे सर्व पिंडात कोठे आहे ? (३१)

च्यामुंडा छपन्न कोटी । कित्येक जीव कोट्यानुकोटी ।
चौऱ्यासी लक्ष योनींची दाटी । पिंडी कोठें ॥ ३२ ॥

ब्रह्मांडीं पदार्थ निर्माण जाले । पृथकाकारें वेगळले ।
तेहि तितुके निरोपिले । पाहिजेत पिंडीं ॥ ३३ ॥

ब्रह्मांडात छप्पन्न कोटी चामुंडा आहेत. कित्येक प्रकारचे जीव कोट्यानुकोटी आहेत. एकूण चौऱ्याऐंशी लक्ष योनींची दाटी झालेली आहे. हे पिंडात कोठे आहे? अशा ब्रह्मांडात विविध आकाराचे अनेक पदार्थ निर्माण झालेले आहेत तितके पिंडात दाखविता येणारच नाहीत. (३२-३३)

जितुक्या औषधी तितुकीं फळे । नाना प्रकारीं रसाळें ।
नाना बीजें धान्यें सकळें । पिंडीं निरोपावीं ॥ ३४ ॥

असंख्य औषधी, नाना प्रकारची रसाळ फळे, नाना बीजे, सर्व प्रकारची धान्ये पिंडात दाखवून देता येतील का ? (३४)

हें सांगतां पुरवेना । तरी उगेंचि बोलवेना ।
बोलिलें न येतां अनुमाना । लाजिरवाणें ॥ ३५ ॥

असे कितीही सांगितले तरी पुरे पडणार नाही. उगीचच बोलण्यात काही अर्थ नाही. जे वर्णन केले आहे त्याचा अनुभव आला नाही, तर ते लाजिरवाणे ठरेल. (३५)

तरी हें निरोपिलें नवचे । फुकट बोलतां काय वेचे ।
याकारणें अनुमानाचें । कार्य नाहीं ॥ ३६ ॥

तरी हे वर्णन करण्यात अर्थ नाही. फुकट बोलण्यात काय खर्च होते म्हणून अनुमानाने बोलण्याने काहीच कार्य साधले जात नाही. (३६)

पांच भूतें ते ब्रह्मांडीं । आणी पांचचि वर्तती पिंडीं ।
याची पाहावी रोकडी । प्रचीत आतां ॥ ३७ ॥

ब्रह्मांडात पाचच महाभूते आहेत, तशीच ती पिंडातही पाचच क्रियाशील आहेत. याचा प्रत्यक्ष रोकडा अनुभव कोणीही घ्यावा. (३७)

पांचा भूतांचें ब्रह्मांड । आणी पंचभूतिक हें पिंड ।
यावेगळें तें उदंड । अनुमानज्ञान ॥ ३८ ॥

ब्रह्मांड हे पंचभौतिक आणि पिंडही पंचभौतिकच आहे. हाच 'पिंडी ते ब्रह्मांडी' याचा खरा अर्थ आहे. इतर सर्व गोष्टी काल्पनिक आहेत. (३८)

जितुकें अनुमानाचें बोलणें । तितुकें वमनप्राये त्यागणें ।
निश्चयात्मक तेंचि बोलणें । प्रत्ययाचें ॥ ३९ ॥

अनुमानाचे जे काही बोलणे असेल ते वांतीप्रमाणे त्यागावे. जे प्रत्ययाचे, अनुभवाचे बोलणे असते तेच निश्चयात्मक असते. (३९)

जेंचि पिंडीं तेंचि ब्रह्मांडीं । प्रचित नाहीं कीं रोकडी ।
पंचभूतांची तांतडी । दोहीकडे ॥ ४० ॥

जे पिंडी ते ब्रह्मांडी याची रोकडी प्रतीती आता आली ना ? दोन्हीकडे पंचमहाभूतांचीच गर्दी, वर्तणूक आहे. (४०)

म्हणोनि देहींचे थानमान । हा तों अवघाचि अनुमान ।
आतां येक समाधान । मुख्य तें कैसें ॥ ४१ ॥

म्हणून पिंड व ब्रह्मांड या दोन्हीतील देहांची स्थाने प्रमाण इत्यादी सर्व अनुमान म्हणजेच काल्पनिक आहे हे जाणून घ्यावे. आता मुख्य खरे समाधान कसे असते ते पाहू या. (४१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अनुमाननिर्शननाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ९ : समास ६

## गुणरूपनिरूपण

॥ श्रीराम ॥

आकाश जैसें निराकार । तैसा ब्रह्माचा विचार ।
तेथें वायोचा विकार । तैसी मूळमाया ॥ १ ॥

आकाश जसे निराकार आहे तसेच ब्रह्म निराकार आहे. आकाशात वायूचा विकार उत्पन्न होतो, तशी ब्रह्माच्या ठिकाणी स्फुरणरूपाने मूळमाया उत्पन्न होते. (१)

**हें दासबोधीं असे बोलिलें। ज्ञानदशकीं प्रांजळ केलें।**
**मूळमायेंत दाखविलें। पंचभूतिक ॥ २॥**

दासबोधाच्या आठव्या ज्ञानदशक नावाच्या दशकात मूळ मायेत पंचमहाभूते कशी सूक्ष्मरूपाने असतात हे स्पष्टपणे वर्णन केले आहे. (२)

**तेथें जाणीव तो सत्वगुण। मध्य तो रजोगुण।**
**नेणीव तमोगुण। जाणिजे श्रोतीं ॥ ३॥**

तेथे जाणीव हा सत्वगुण, जाणीवनेणीवमिश्रित तो रजोगुण आणि नेणीव तो तमोगुण हे श्रोत्यांनी जाणून घ्यावे. (३)

**म्हणाल तेथें कैंची जाणीव। तरी ऐका याचा अभिप्राव।**
**पिंडीं माहाकारण देहीं सर्व-। साक्षिणी अवस्था ॥ ४॥**

तेथे जाणीव कशा प्रकारे आहे असे म्हणाल तर त्याचा अभिप्राय ऐका. पिंडाचा चौथा महाकारण देह म्हणजेच सर्वसाक्षिणी तूर्यावस्था होय. (४)

**तैसी मूळप्रकृती ती ब्रह्मांडींचें। देह माहाकारण साचें।**
**म्हणोन तेथें जाणीवेचें। अधिष्ठान आलें ॥ ५॥**

तशीच ब्रह्मांडाच्या ठिकाणी मूळ प्रकृती ही महाकारण देहच खरोखर असल्याने तेथेच जाणीवेचे अधिष्ठान असते. (५)

**असो मूळमायेभीतरीं। गुप्त त्रिगुण वास करी।**
**पष्ट होती संधी चतुरीं। जाणावी गुणक्षोभिणी॥ ६॥**

असो या मूळमायेतच गुप्तपणे त्रिगुण वास करतात. योग्य संधी मिळताच ते स्पष्ट होतात, तीच गुणक्षोभिणी तूर्यावस्था हे शहाण्या लोकांनी जाणून घ्यावे. (६)

**जैसा तृणाचा पोटराकळा। पुढें उकलोन होये मोकळा।**
**तैसी मूळमाया अवलीळा। गुणा प्रसवली ॥ ७॥**

जसे गवताचे कणीस पुढे उकलून मोकळे होते, तशीच मूळमाया ही अनायासे गुणांना जन्म देती झाली.(७)

**मूळमाया वायोस्वरूप। ऐक गुणक्षोभिणीचें रूप।**
**गुणविकार होतांचि अल्प। गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ८॥**

मूळ माया ही वायुस्वरूप असते. आता गुणक्षोभिणी मायेचे रूप ऐका. मूळमायेच्या ठिकाणी सूक्ष्मरूपाने गुणरूपी विकार उत्पन्न झाला की, तिलाच गुणक्षोभिणी म्हणतात.(८)

**पुढें जाणीव मध्यस्त नेणीव। मिश्रित चालिला स्वभाव।**
**तेथें मातृकास ठाव। शब्द जाला ॥ ९॥**

गुणक्षोभिणीपासून जाणीव म्हणजेच सत्वगुण, मध्यस्थ म्हणजे जाणीवनेणीवमिश्रित रजोगुण आणि नेणीव म्हणजे तमोगुण यांच्या मिश्रणाने विश्व निर्माण करण्याची क्रिया नैसर्गिकपणे चालते. तेथे गुणांच्या ठिकाणी सर्वप्रथम ॐकारमय साडेतीन मात्रांचा शब्दध्वनी उत्पन्न झाला.(९)

**तों शब्दगुण आकाशींचा। ऐसा अभिप्राव येथीचा।**
**शब्देंचि वेदशास्त्रांचा। आकार जाला ॥ १०॥**

शब्द हा आकाशाचा गुण असल्याने अर्थातच आकाश झाले व पुढे त्यापासून पृथ्वीपर्यंतची पंचमहाभूते झाली. शब्दाच्या आधारेच वेदादी शास्त्रे आकाराला आली.(१०)

**पंचभूतें त्रिगुणाकार। अवघा वायोचा विकार।**
**जाणीवनेणीवेचा विचार। वायोचिकरितां ॥ ११॥**

पंचभूते आणि त्रिगुण म्हणजेच अष्टधा प्रकृती होय. मूळ मायेतही सर्व सूक्ष्मरूपाने असतात. जाणीव व नेणीव यांचा विचारही मूळमायेमुळेच उत्पन्न होतो. (११)

**वायो नस्तां कैंची जाणीव। जाणीव नस्तां कैंची नेणीव।**
**जाणीवनेणीवेस ठाव। वायोगुणें ॥ १२॥**

परब्रह्माच्या ठिकाणी जाणीव म्हणजे ज्ञानही नसते व नेणीव म्हणजे अज्ञानही नसते. मूळ माया जर नसती तर जाणीव कुठली आणि जाणीव नसती तर नेणीवही कुठली ? म्हणून ज्ञानअज्ञानास कारण मूळमाया म्हणजे वायूच आहे.(१२)

**जेथें मुळींच नाहीं चळण। तेथें कैंचें जाणीवलक्षण।**
**म्हणोनि वायोचा गुण। नेमस्त जाणावा ॥ १३॥**

जेथे जराही चलनवलन नसेल तेथे जाणीव तरी कशी असणार ? म्हणून चलनवलन हा वायूचा गुण आहे, हे नीट जाणून घ्यावे. (१३)

**येकापासून येक जालें। हें येक उगेंचि दिसोन आलें।**
**स्वरूप मुळींच भासलें। त्रिगुणभूतांचें ॥ १४॥**

एकापासून एक भूत झाले असे उगीच दिसून येते. पण मूळमायेतच हे त्रिगुणांचे आणि पंचमहाभूतांचे म्हणजे अष्टधा प्रकृतीचे स्वरूप आहे. थोडक्यात म्हणजे मूळमाया म्हणजेच अष्टधा प्रकृती होय. (१४)

ऐसा हा मुळींचा कर्दमु। पुढें पष्टतेचा अनुक्रमु।
सांगतां येकापासून येक आमु। हेंहि खरें॥ १५॥

मूळमायेतच हे अष्टधा स्वरूप प्रथम अव्यक्त असते व पुढे ते स्पष्ट व्यक्त होत जाते. स्पष्टतेच्या अनुक्रमामुळेच एकापासून दुसरे उत्पन्न झाले असे म्हटले जाते तेही खरेच आहे. (१५)

वायोचा कर्दम बोलिला। तयापासून अग्नि जाला।
तोहि पाहातां देखिला। कर्दमुचि ॥ १६॥

प्रथम वायूचे मिश्रण असते. त्यापासून अग्नी झाला. तोही वास्तविक पंचमहाभूतांचे मिश्रणच असतो.(१६)

अग्नीपासून जालें आप। तेंहि कर्दमस्वरूप।
आपापासून पृथ्वीचें रूप। तेंहि कर्दमरूपी ॥ १७॥

नंतर अग्नीपासून जल झाले. तेही मिश्रित स्वरूपाचे असते. नंतर आपापासून पृथ्वी हे भूत झाले. तेही मिश्रित स्वरूपाचेच असते. एकात इतर भूतांचे अंश असल्याने ही सर्व मिश्रणरूपच होत. (१७)

येथे आशंका उठिली। भूतांस जाणीव कोठें देखिली।
तरी भूतांत जाणीव हे ऐकिली। नाहीं वार्ता ॥ १८॥

येथे अशी शंका उत्पन्न झाली की भूते जड असतात, मग त्यात जाणीव कशी दिसेल? भूतात जाणीव असते असे तर कुठे ऐकूही येत नाही.(१८)

जाणीव म्हणिजे जाणतें चळण। तेंचि वायोचें लक्षण।
वायोआंगीं सकळ गुण। मागां निरोपिले ॥ १९॥

जाणीव म्हणजे हेतुपूर्वक केलेली हालचाल. वायूचे हेच लक्षण आहे. वायूमध्ये म्हणजेच मूळमायेमध्येच सर्व गुण असतात हे मागेच सांगितले आहे. (१९)

म्हणोन जाणीवनेणीवमिश्रीत। अवघें चालिलें पंचभूत।
म्हणोनियां भूतांत। जाणीव असे ॥ २०॥

पंचमहाभूतांचा विस्तार जाणीवनेणीवमिश्रित चाललेला असतो. म्हणजेच पंचमहाभूतात जाणीव असते. (२०)

कोठें दिसे कोठें न दिसे। परी ते भूतीं व्यापून असे।
तिक्षण बुद्धि करितां भासे। स्थूळ सूक्ष्म ॥ २१॥

कुठे ती स्पष्टपणे दिसून येते, तर कुठे ती दिसत नाही. पण सर्व पंचमहाभूतांना ती व्यापून असते. सूक्ष्म बुद्धीने विचार केला की जाणिवेचे सूक्ष्म किंवा स्थूल रूप कळून येते. (२१)

पंचभूतें आकारलीं। भूतीं भूतें कालवलीं।
तरी पाहातां भासलीं। येक स्थूळ येक सूक्ष्में ॥ २२॥

पंचभूते आकाराला आली, तेव्हासुद्धा ती एकमेकात कालवलेलीच असतात, पण वरवर पहाता ती वेगळी भासतात. काही स्थूलरूपाने असतात तर काही सूक्ष्मरूपाने.(२२)

निरोधवायो न भासे। तैसी जाणीव न दिसे।
न दिसे परी ते असे। भूतरूपें ॥ २३॥

जेव्हा वारा वाहात नाही, स्तब्ध असतो तेव्हा तो आहे असे वाटत नाही. तसेच जाणीवेचे आहे. ती असते, पण दिसत नाही. पण ती भूतरूपाने असतेच (२३)

काष्ठीं अग्नी दिसेना। निरोधवायो भासेना।
जाणीव तैसी लक्षेना। येकायेकीं ॥ २४॥

काष्ठात अग्नी असतो, तो दिसत नाही. वायूचा निरोध होतो, तेव्हा तो भासत नाही. त्याप्रमाणे जाणीवही एकाएकी लक्षात येत नाही. (२४)

भूतें वेगळालीं दिसती। पाहातां येकचि भासती।
बहुत धूर्तपणें प्रचिती। वोळखावी ॥ २५॥

पंचमहाभूते दिसताना वेगवेगळी दिसतात, पण वास्तविक ती एकरूपच असतात. अत्यंत चतुरपणे याची प्रचीती घ्यावी म्हणजे त्यांची ओळख पटते.(२५)

ब्रह्मापासून मूळमाया। मूळमायेपासून गुणमाया।
गुणमायेपासून तया। गुणास जन्म ॥ २६॥

ब्रह्मापासून मूळमाया उत्पन्न झाली. मूळमायेपासून गुणमाया झाली आणि तिच्यापासून गुणांचा जन्म झाला.(२६)

गुणापासूनियां भूतें। पावलीं पष्ट दशेतें।
ऐसियांचीं रूपें समस्तें। निरोपिलीं ॥ २७॥

गुणांपासून मूळमायेत अव्यक्त असलेली पंचमहाभूते स्पष्टपणे दिसू लागली. या सर्वांची रूपे पूर्वी स्पष्ट करून सांगितली आहेत. (२७)

**आकाश गुणापासून जालें। हें कदापी नाहीं घडलें।**
**शब्दगुणास कल्पिलें। आकाश वायां ॥ २८॥**

यावर श्रोत्याने शंका काढली की, आकाश हे गुणापासून झाले हे कधीच घडत नाही. शब्दगुणाला आधार हवा म्हणून विनाकारण आकाशाची कल्पना केली आहे. (२८)

**येक सांगतां येकचि भावी। उगीच करी गथागोवी।**
**तया वेड्याची उगवी। कोणें करावी ॥ २९॥**

यावर वक्ता म्हणू लागला की, एक सांगायला गेले की तू दुसरीच कल्पना करतोस. उगीचच गोंधळ निर्माण करतोस. अशा वेड्याची समजूत कोणी कशी घालावी? (२९)

**सिकविल्यांहि कळेना। उमजविल्यांहि उमजेना।**
**दृष्टांतेंहि तर्केना। मंदरूप ॥ ३०॥**

शिकवले तरी कळत नाही. समजावले तरी समजत नाही. दृष्टांताने पटवून देण्याचा प्रयत्न केला, तरी मंद बुद्धीमुळे त्यावरूनही तर्काने जाणता येत नाही. (३०)

**भूतांहून भूत थोर। हाहि दाविला विचार।**
**परी भूतांवडिल स्वतंत्र। कोण आहे ॥ ३१॥**

पंचमहाभूतांमध्ये एकापेक्षा दुसरे थोर आहे, हाही विचार स्पष्ट करून सांगितला. मग भूतांमध्ये स्वतंत्र कोण आहे? (३१)

**जेथें मूळमाया पंचभूतिक। तेथें काये राहिला विवेक।**
**मूळमायेपरतें येक। निर्गुणब्रह्म ॥ ३२॥**

जेथे मूळ मायाही पंचभौतिक आहे, तर आता आणखी काय विचार करणार? मूळ मायेपरते एक निर्गुणब्रह्मच फक्त असते. (३२)

**ब्रह्मीं मूळमाया जाली। तिची लीळा परीक्षिली।**
**तंव ते निखळ वोतली। भूतें त्रिगुणांची ॥ ३३॥**

ब्रह्माच्या ठिकाणी मूळमाया झाली. तिने निर्माण केलेल्या या विश्वोत्पत्तिरूप खेळाचे परीक्षण केले की कळून येते की, मूळ माया म्हणजे निव्वळ त्रिगुणांची आणि पंचमहाभूतांची जणू मूसच आहे. (३३)

**भूतें विकारवंत चत्वार। आकाश पाहातां निर्विकार।**
**आकाश भूत हा विचार। उपाधीकरितां ॥ ३४॥**

चार भूते विकारवंत भासतात, पण आकाशाकडे पाहता ते निर्विकार भासते. पण आकाशाला वेगळेपणाने पाहता येते आणि त्याच्या ठिकाणी शून्यत्व ही उपाधी आहे. म्हणून त्याची गणना पंचमहाभूतांमध्ये केली जाते. (३४)

**पिंडीं व्यापक म्हणोन जीव। ब्रह्मांडीं व्यापक म्हणोन शिव।**
**तैसाच हाहि अभिप्राव। आकाशाचा ॥ ३५॥**

पिंडाला व्यापून असणारी जाणीव, तिला जीव म्हणतात. ब्रह्मांडाला व्यापून असणाऱ्या जाणिवेला शिव म्हणतात. तसाच अभिप्राय आकाशाचा आहे. (३५)

**उपाधीमधें सापडलें। सूक्ष्म पाहातां भासलें।**
**इतुक्यासाठीं आकाश जालें। भूतरूप ॥ ३६॥**

ते शून्यत्वाच्या उपाधीत सापडले आणि सूक्ष्म असून दृष्टीला भासले म्हणून आकाश हे भूतरूप झाले. (३६)

**आकाश अवकाश तो भकास। परब्रह्म तें निराभास।**
**उपाधी नस्तां जें आकाश। तेंचि ब्रह्म ॥ ३७॥**

आकाश हे अवकाशरूप असल्याने ते शून्य आहे. तसे ते भासते. परब्रह्म हे निराभास आहे. शून्यत्वरहित जे आकाश तेच ब्रह्म होय. (३७)

**जाणीव नेणीव मध्यमान। हेंचि गुणांचें प्रमाण।**
**येथें निरोपिलें त्रिगुण। रूपेंसहित ॥ ३८॥**

सत्त्व, तम आणि रज या गुणांचे प्रमाण म्हणजे जाणीव, नेणीव व जाणीवनेणीवमिश्रित असे आहे. याप्रमाणे येथे त्रिगुणांचे त्यांच्या रूपासहित वर्णन केले आहे. (३८)

**प्रकृती पावली विस्तारातें। पुढें येकाचें येकचि होतें।**
**विकारवंतचि तयातें। नेम कैंचा ॥ ३९॥**

पुढे अष्टधा प्रकृतीच विस्तार पावली व एकातून एक पदार्थ निर्माण झाले. प्रकृती ही विकारवंत असल्यामुळे तिच्यातून असंख्य वस्तू कशा निर्माण झाल्या, याबद्दल आश्चर्य करायला नको. (३९)

काळें पांढरें मेळवितां। पारवें होतें तत्वतां।
काळें पिवळें मेळवितां। हिरवें होये ॥ ४० ॥

उदाहरणार्थ, काळ्या रंगात पांढरा रंग मिसळला की पारवा रंग निर्माण होतो. निळ्या रंगात पिवळा रंग मिसळला की हिरवा रंग तयार होतो. (४०)

ऐसे रंग नानापरी। मेळवितां पालट धरी।
तैसें दृश्य हें विकारी। विकारवंत ॥ ४१ ॥

याप्रकारे नाना रंगांचे मिश्रण केले की नवनवीन रंग तयार होतात. पहिल्या रंगाचे स्वरूप बदलून जाते. त्याप्रमाणे सर्व दृश्य सृष्टी ही विकारवंत आहे. (४१)

येका जीवनें नाना रंग। उमटों लागती तरंग।
पालटाचा लागवेग। किती म्हणोन पाहावा ॥ ४२ ॥

पंचमहाभूतांपैकी एका पाण्याचा विचार केला तरी त्यामुळे किती फेरबदल घडून येतात ते पाहिले की आश्चर्य वाटू लागते. मुळात पाणी एकच असून त्यावर अनेक तरंग उठतात आणि पाहता पाहता इतका बदल घडून येत असतो की सांगणेही मुष्किल. (४२)

येका उदकाचे विकार। पाहातां दिसती अपार।
पांचा भूतांचे विस्तार। चौऱ्यासी लक्ष योनी ॥ ४३ ॥

उदक हे पंचभूतांपैकी एक. त्याचे विकार जर अपार आहेत, तर मग सर्व पंचमहाभूतांचा विस्तार किती सांगावा? चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी हा पंचभूतांचाच विस्तार आहे. (४३)

नाना देहाचें बीज उदक। उदकापासून सकळ लोक।
किडा मुंगी स्वापदादिक। उदकेंचि होयें ॥ ४४ ॥

अनेक प्रकारच्या देहांचे बीज उदकच आहे. उदकापासूनच सर्व लोक निर्माण झाले आहेत. किडा, मुंगी, श्वापदादिक जेवढी जीवसृष्टी दिसून येते, ती उदकामुळेच उत्पन्न होते. (४४)

शुक्लीत श्रोणीत ह्मणिजे नीर। त्या नीराचें हें शरीर।
नखें दंत अस्तिमात्र। उदकाच्या होती ॥ ४५ ॥

रेत, रक्त म्हणजेही पाणीच आहे. त्या पाण्याचेच हे शरीर बनलेले आहे. शरीरातील नखे, दात, अस्थी वगैरेही उदकापासूनच होतात. (४५)

मुळ्यांचे बारीक पागोरे। तेणें पंथें उदक भरे।
त्या उदकेंचि विस्तारे। वृक्षमात्र ॥ ४६ ॥

झाडाच्या मुळांचे जे बारीक तंतू असतात, त्या मार्गानेच उदक त्या वृक्षाच्या सर्व अवयवांत भरले जाते आणि त्या उदकाच्यामुळे त्या वृक्षाचा इतका विस्तार होत असतो. (४६)

अंब्रवृक्ष मोहरा आले। अवघे उदकाकरितां जाले।
फळीं फुलीं लगडलें। सावकास ॥ ४७ ॥

आम्रवृक्षांना मोहोर येतो. पुढे यथावकाश ते फळाफुलांनी लगडून जातात, बहराला येतात, ते सर्वही उदकामुळेच घडते. (४७)

खोड फोडून अंबे पाहतां। तेथें दिसेना सर्वथा।
खांद्या फोडून फळेंपाहातां। वोलीं सालें ॥ ४८ ॥

आंब्याच्या झाडाला आंबे लागतात म्हणून जर त्याचे खोड फोडून त्यात आंबे पाहू लागले तर तेथे आंबे आढळत नाहीत. तसेच फांद्या तोडून फळे पाहू गेल्यासही ओली सालेच हाती येतात. (४८)

मुळापासून सेवटवरी। फळ नाहीं तदनंतरीं।
जळरूप फळ चतुरीं। विवेकें जाणावें ॥ ४९ ॥

मुळापासून शेंड्यापर्यंत अशा प्रकारे पाहिले असता फळ दिसून येत नाही, पण झाडाला येणारे फळ हे जलरूप असते, हे विवेकाच्या योगे चतुर पुरुषाने जाणून घ्यावे. (४९)

तेंचि जळ सेंड्या चढे। तेव्हां वृक्षमात्र लगडे।
येकाचें येकचि घडे। येणें प्रकारें ॥ ५० ॥

तेच जल शेंड्यापर्यंत पोहोचते तेव्हा वृक्ष फळांनी लगडून येतो. याप्रमाणे एकापासून एक याप्रकारे निर्माण होते. (५०)

पत्रें पुष्पें फळें भेद। किती करावा अनुवाद।
सूक्ष्म दृष्टीनें विशद। होत आहे ॥ ५१ ॥

एकाच पाण्यापासून पाने, फुले, फळे इत्यादी बदल घडून येतात. किती म्हणून वर्णन करावे! सूक्ष्म दृष्टीने पाहिले की सर्व स्पष्टपणे कळून येते. (५१)

भूतांचे विकार सांगों किती। क्षणक्षणा पाल्टती।
येकाचे येकचि होती। नाना वर्ण ॥ ५२॥

पंचमहाभूतांचे विकार किती सांगणार? त्यात क्षणोक्षणी बदल घडून येत असतो. एकाहून एक असे अनेक रंग उत्पन्न होतात. (५२)

त्रिगुणभूतांची लटपट। पाहों जातां हे खटपट।
बहुरूप बहु पाल्ट। किती म्हणोन सांगावा ॥ ५३॥

त्रिगुण आणि पंचमहाभूतांच्या मिश्रणाची ही सर्व करामत आहे. यासंबंधी विचार करता असंख्य रूपे व असंख्य बदल सारखे घडून येताना दिसतात. त्यांचे किती वर्णन करावे? (५३)

ये प्रकृतीचा निरास। विवेकें वारावा सावकास।
मग परमात्मा परेश। अनन्यभावें भजावा ॥ ५४॥

म्हणून या अष्टधा प्रकृतीचे निराकरण विवेकाने सावकाश करून तिला बाजूस सारावे व मग अनन्यभावाने परमात्मा जो परेश त्यास भजावे. (५४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'गुणरूपनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक ९ : समास ७

# विकल्पनिर्शन

॥ श्रीराम ॥

आधीं स्थूळ आहे येक। तरी मग अंत:कर्णपंचक।
जाणतेपणाचा विवेक। स्थूळाकरितां ॥ १॥

आधी स्थूल देह दिसतो. मग त्यात अंत:करणपंचक आढळते. ज्ञानाचा विवेक हा स्थूलाच्या आधारेच होतो. (१)

तैसेंचि ब्रह्मांडेंवीण कांहीं। मूळमायेसि जाणीव नाहीं।
स्थूळाच्या आधारें सर्वहि। कार्य चाले ॥ २॥

त्याप्रमाणे ब्रह्मांडाशिवाय मूळ मायेच्या ठिकाणी जाणीव नसते. त्यावरून सर्व कार्य स्थूलाच्या आधारे चालते, असेच वाटते. (२)

तें स्थूळचि नस्तां निर्माण। कोठें राहेल अंत:कर्ण।
ऐसा श्रोतीं केला प्रश्न। याचें उत्तर ऐका ॥ ३॥

हे स्थूल निर्माणच झाले नसते, तर अंत:करण कोठे राहिले असते, असा प्रश्न श्रोत्याने केला आहे. याचे उत्तर आता ऐका. (३)

कोसले अथवा कांटेघरें। नाना पृष्ठिभागीं चाल्ती घरें।
जीव करिती ल्हानथोरें। शक्तीनुसार ॥ ४॥

रेशमाचे किडे आणि शरीररक्षणार्थ कठीण कवच तयार करणारे किडे असे अनेक जीव पाठीवर घरे निर्माण करतात व इतरही लहान-थोर आपापल्या शक्तीस अनुसरून घरे बांधतात. (४)

शंख सिंपी घुला कवडे। आधीं त्यांचें घर घडे।
किंवा आधीं निर्माण किडे। हें विचारावें ॥ ५॥

शंख, शिंपी, घुला, कवडे यात जे किडे राहातात, ते किडे आधी निर्माण होतात की त्यांचे घर आधी निर्माण होते, याचा विचार करावा. (५)

आधीं प्राणी ते होती। मग घरें निर्माण करिती।
हे तों प्रत्यक्ष प्रचिती। सांगणें नलगे ॥ ६॥

आधी प्राणी होतात आणि मग ते घरे निर्माण करतात ही तर प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे. ती सांगण्याची आवश्यकता नाही. (६)

तैसें आधीं सूक्ष्म जाण। मग स्थूळ होतें निर्माण।
येणें दृष्टांतें प्रश्न। फिटला श्रोतयांचा ॥ ७॥

त्याप्रमाणेच आधी सूक्ष्म रूपात जे असते, ते मग स्थूल रूपात प्रकट होते किंवा निर्माण होते. या दृष्टांताने श्रोत्याच्या प्रश्नाचे उत्तर त्याला मिळाले. (७)

तंव श्रोता पुसे आणीक। जी आठवलें कांहीं येक।
जन्ममृत्याचा विवेक। मज निरोपावा ॥ ८॥

तेव्हा श्रोता आणखी काही विचारू लागला. जी, मला आणखी काही आठवले आहे. तरी जन्ममृत्यूचा विवेक मला समजावून सांगा. (८)

कोण जन्मास घालितें। आणी मागुता कोण जन्म घेतें।
हें प्रत्यया कैसें येतें। कोण्या प्रकारें ॥ ९॥

प्राण्याला जन्माला कोण घालते आणि मागून कोण जन्म घेते? त्याचा अनुभव कशा प्रकारे येतो? (९)

ब्रह्मा जन्मास घालितो। विष्णु प्रतिपाळ करितो।
रुद्र अवघें संव्हारितो। ऐसें बोल्ती ॥ १०॥

ब्रह्मदेव जन्माला घालतो, विष्णू प्रतिपाळ करतो आणि रुद्र सर्वांचा संहार करतो, असे सर्व म्हणतात. (१०)

**तरी हें प्रवृत्तीचें बोलणें। प्रत्ययास आणी उणें।**
**प्रत्यय पाहातां श्लाघ्यवाणें। होणार नाहीं ॥ ११॥**

पण हे जनरूढीचे बोलणे झाले. त्याप्रमाणे अनुभव येत नाही. प्रत्ययाच्या दृष्टीने ते योग्य होणार नाही.(११)

**ब्रह्म्यास कोणें जन्मासघातलें। विष्णूस कोणें प्रतिपाळिलें।**
**रुद्रास कोणे संव्हारिलें। माहाप्रळई ॥ १२॥**

मग ब्रह्मदेवास कोणी जन्मास घातले, विष्णूचा प्रतिपाळ कुणी केला आणि रुद्राचा महाप्रलयकाळी संहार कोण करतो? (१२)

**म्हणौनि हा सृष्टीभाव। अवघा मायेचा स्वभाव।**
**कर्ता म्हणों निर्गुण देव। तरी तो निर्विकारी ॥ १३॥**

म्हणून हे सृष्टीरूपी नाटक हा सर्व मायेचा खेळ आहे. शिवाय निर्गुण देव कर्ता असेही म्हणता येत नाही, कारण तो तर निर्विकारी आहे. (१३)

**म्हणावें माया जन्मास घाली। तरी हे आपणचि विस्तारली।**
**आणी विचारितां थारली। हेंहि घडेना ॥ १४॥**

बरे, माया जन्मास घालते असे म्हणावे, तर ती स्वत:च विस्तार पावली आहे आणि विचार करून पाहिले असता ती स्थिर आहे, असेही म्हणता येत नाही. (१४)

**आतां जन्मतो तो कोण। कैसी त्याची वोळखण।**
**आणी संचिताचें लक्षण। तेंहि निरोपावें ॥ १५॥**

म्हणून आता जन्मतो तो कोण? त्याला कसे ओळखावे? तसेच संचिताचे लक्षण काय, तेही मला नीटपणे सांगावे. (१५)

**पुण्याचें कैसें रूप। आणी पापाचें कैसें स्वरूप।**
**याहि शब्दाचा आक्षेप। कोण कर्ता ॥ १६॥**

पुण्याचे रूप कसे आहे? पापाचे स्वरूप कसे आहे? तसेच हा शंका घेणारा मी कोण? (१६)

**हें कांहींच न ये अनुमाना। म्हणती जन्म घेते वासना।**
**परी ते पाहातां दिसेना। ना धरितां न ये ॥ १७॥**

यांपैकी काहीही माझ्या ध्यानात येत नाही. असे म्हणतात की, वासना जन्म घेते किंवा वासनेमुळे जन्म घ्यावा लागतो. पण वासना तर दिसून येत नाही आणि तिला पकडताही येत नाही. (१७)

**वासना कामना आणी कल्पना। हेतु भावना मति नाना।**
**ऐशा अनंत वृत्ती जाणा। अंत:कर्णपंचकाच्या ॥ १८॥**

वासना, कामना, कल्पना, हेतू, भावना आणि नाना प्रकारची बुद्धी या सर्व अंत:करणपंचकाच्याच अनंत वृत्ती आहेत, हे जाणावे. (१८)

**असो हें अवघें जाणीवयंत्र। जाणीव म्हणिजे स्मरणमात्र।**
**त्या स्मरणास जन्मसूत्र। कैसें लागे ॥ १९॥**

असो, हे सर्व जाणीवयंत्राचे कार्य आहे. जाणीव म्हणजे स्वत:चे केवळ स्मरण होय. त्या मीपणाच्या स्मरणाला जन्मसूत्र कसे लागेल? (१९)

**देहो निर्माण पांचा भूतांचा। वायो चाळक तयाचा।**
**जाणणें हा मनाचा। मनोभाव ॥ २०॥**

देह तर पाचभौतिक असतो. वायूमुळे त्याचे चलनवलन घडते. या देहात जाणणे हे मनाचे काम आहे. (२०)

**ऐसें हें सहजचि घडलें। तत्वांचें गुंथाडें जालें।**
**कोणास कोणें जन्मविलें। कोण्या प्रकारें ॥ २१॥**

या सर्व गोष्टी अगदी सहज घडलेल्या आहेत. तत्त्वांची गुंतागुंत होऊन त्यापासून देह आणि मन आपोआप निर्माण झाले. तेथे कोणी कोणाला कुठल्या प्रकारे जन्मास घातले? (२१)

**तरी हें पाहातां दिसेना। म्हणोन जन्मचि असेना।**
**उपजला प्राणी येना। मागुतां जन्मा ॥ २२॥**

शिवाय कोण कोणास जन्मास घालतो, ते पाहू गेले असता आढळून येत नाही. म्हणून परत जन्मच नाही. एकदा उपजलेला प्राणी मेल्यावर परत जन्मास येत नाही. (२२)

**कोणासीच जन्म नाहीं। तरी संतसंगें केलें काई।**
**ऐसा अभिप्राव सर्वहि। श्रोतयांचा ॥ २३॥**

कोणालाच जर जन्म नाही, तर संत- संगतीने काय साधते? असा सर्व श्रोत्यांचा अभिप्राय आहे. (२३)

पूर्वीं स्मरण ना विस्मरण। मधेंचि हें जालें स्मरण।
अंतर्यामीं अंत:कर्ण। जाणती कळा ॥ २४॥

जन्माला येण्यापूर्वी स्मरणही नव्हते आणि विस्मरणही नव्हते. जन्माला आल्यावर हे स्मरण उत्पन्न झाले. माणसाच्या अंतर्यामी जे अंत:करण आहे. तेच जाणीवेचे रूप आहे. (२४)

सावध आहे तों स्मरण। विकळ होतां विस्मरण।
विस्मरण पडतां मरण। पावती प्राणी ॥ २५॥

माणूस सावध असतो, तोपर्यंत स्मरण असते. विकल झाला की विस्मरण होते. जाणीव संपूर्ण लोपली की पूर्ण विस्मरण होऊन प्राणी मरण पावतो (२५)

स्मरण विस्मरण राहिलें। मग देहास मरण आलें।
पुढें जन्मास घातलें। कोणास कोणें ॥ २६॥

स्मरणही नाही व विस्मरणही नाही अशी स्थिती होते, तेव्हा देहाला मरण येते. पुढे मग कोण कोणाला जन्मास घालतो? (२६)

म्हणोनि जन्मचि असेना। आणी यातनाहि दिसेना।
अवघी वेर्थचि कल्पना। बळावली ॥ २७॥

म्हणून एकदा मरण आले की पुन्हा जन्मही नाही आणि यमयातनाही दिसून येत नाहीत. या सर्व गोष्टी कल्पनेच्या जोरावर कल्पिल्या जातात. त्यांना काही अर्थच नाही. (२७)

म्हणौन जन्मचि नाहीं कोणासी। श्रोतयांची आशंका ऐसी।
मरोन गेलें तें जन्मासी। मागुतें न ये ॥ २८॥

म्हणून कुणालाही पुनर्जन्मच नाही, अशी श्रोत्यांची शंका आहे. एकदा मेल्यावर त्या प्राण्याला परत जन्म घ्यावा लागत नाही. (२८)

वाळलें काष्ठ हिरवळेना। पडिलें फळ तें पुन्हां लागेना।
तैसें पडिलें शरीर येना। जन्मास मागुतें ॥ २९॥

वाळलेले लाकूड असते, त्याला परत हिरवी पालवी फुटत नाही. फळ एकदा झाडावरून गळून पडले की ते परत झाडावर लागत नाही. त्याप्रमाणे एकदा शरीर पडले की, ते परत जन्मास येत नाही. (२९)

मडकें अवचितें फुटलें। फुटलें तें फुटोनिच गेलें।
तैसेंचि पुन्हां जन्मलें। नाहीं मनुष्य ॥ ३०॥

एखादे मडके अवचित फुटले की ते फुटूनच जाते. त्याप्रमाणे एकदा मनुष्य मेला की तो फिरून जन्मास येत नाही. (३०)

येथें अज्ञान आणी सज्ञान। सारिखेच जालें समान।
ऐसा बळावला अनुमान। श्रोतयांसी ॥ ३१॥

श्रोत्यांचे हे बोलणे ऐकून असे अनुमान निघते की, ते अज्ञानी आणि ज्ञानी माणसांना सारखेच समजतात.(३१)

वक्ता म्हणे हो ऐका। अवघें पाषांड करू नका।
अनुमान असेल तरी विवेका। अवलोकावें ॥ ३२॥

त्यावर वक्ता म्हणतो की, अहो ऐका. उगाच नास्तिकपणा करू नका. माणसाने तर्क करावेत, पण विचारपूर्वक करावेत. (३२)

प्रेत्नेंवीण कार्य जालें। जेविल्यावीण पोट भरलें।
ज्ञानेंवीण मुक्त जालें। हें तों घडेना ॥ ३३॥

प्रयत्नाशिवाय कार्य झाले आहे, जेवल्याशिवायच पोट भरले आहे आणि ज्ञान न होता मुक्ती मिळाली आहे, असे कधी घडत नाही. (३३)

स्वयें आपण जेविला। त्यास वाटे लोक धाला।
परंतु हें समस्तांला। घडलें पाहिजे ॥ ३४॥

एखादा स्वत: जेवला तर त्याला वाटते की, लोकही तृप्त झाले. पण असे कधी घडत नाही. सगळे जेव्हा जेवतील, तेव्हाच ते तृप्त होतील. (३४)

पोहणें सिकला तो तरेल। पोहणें नेणे तो बुडेल।
येथेंहि अनुमान करील। ऐसा कवणु ॥ ३५॥

ज्याला पोहायला येते तोच तरतो. ज्याला पोहणे येत नसेल तो बुडतो. येथे काही कुणी अनुमान करण्याची आवश्यकता नाही. (३५)

तैसें जयांस ज्ञान जालें। ते ते तितुकेच तरले।
ज्याचें बंधनचि तुटलें। तोचि मुक्त ॥ ३६॥

त्याप्रमाणे ज्यांना ज्ञान झालेले असते, ते तेवढेच तरून जातात. ज्याचे बंधन तुटते, तोच फक्त मुक्त होतो.(३६)

**मोकळा म्हणे नाही बंधन। आणी प्रत्यक्ष बंदीं पडिले जन।**
**त्यांचे कैसें समाधान। तें तुम्ही पहा ॥ ३७॥**

जो मोकळा झालेला असतो, तो म्हणतो, कुणालाही बंधन नाही आणि इकडे तर अनेक लोक प्रत्यक्ष बद्ध असलेले दिसतात. तर याचा समन्वय कसा करायचा, ते तुम्हीच पाहा. (३७)

**नेणे दुसऱ्याची तळमळ। तें मनुष्य परदुःखसीतळ।**
**तैसाच हाहि केवळ। अनुभव जाणावा ॥ ३८॥**

जो दुसऱ्याचे दुःख जाणू शकत नाही, अशा माणसाला परदुःख शीतल वाटते असे म्हटले जाते. त्याप्रमाणेच मोकळ्या झालेल्या माणसाला बंधनात असलेल्याचे दुःख कळत नाही, असे या अनुभवावरून जाणावे. (३८)

**जयास आत्मज्ञान जालें। तत्वें तत्व विवंचिलें।**
**खुणेसी पावतांच बाणलें। समाधान ॥ ३९॥**

ज्याला आत्मज्ञान झालेले असते, त्याने तत्त्वांचा तत्त्वाने निरास केलेला असतो, अशा माणसाला स्वस्वरूपानुभव येऊन खूण पटते व पूर्ण समाधान बाणते (३९)

**ज्ञानें चुके जन्ममरण। सगट बोलणें अप्रमाण।**
**वेदशास्त्र आणी पुराण। मग कासयासी ॥ ४०॥**

ज्ञानानेच जन्ममरण चुकते. सरसकट सर्वांचे जन्ममरण चुकते हे बोलणे अप्रमाण आहे. तसे असते तर वेदशास्त्रे, पुराणे यांची काय आवश्यकता? (४०)

**वेदशास्त्रविचारबोली। माहानुभावांची मंडळी।**
**भूमंडळीं लोक सकळी। हें मानीतना ॥ ४१॥**

सर्वांचे सरसकट जन्ममरण चुकते, हे मत वेदशास्त्रातील विचार, वचने व या जगातील सर्व आत्मज्ञानी लोक यांना मान्य नाही. (४१)

**अवघें होतां अप्रमाण। मग आपलेंच काय प्रमाण।**
**म्हणोन जेथें आत्मज्ञान। तोचि मुक्त ॥ ४२॥**

सगळ्यांना जे अप्रमाण वाटते, ते फक्त आपण म्हणता म्हणून प्रमाण काय? म्हणून ज्याला आत्मज्ञान झालेले असेल तोच मुक्त होय. (४२)

**अवघेच मुक्त पाहतां नर। हाहि ज्ञानाचा उद्गार।**
**ज्ञानेंविण तो उद्धार। होणार नाहीं ॥ ४३॥**

ज्ञानी माणसाला वाटते की, सर्वच माणसे मुक्त आहेत, पण ते त्याचे ज्ञान प्राप्त झाल्यावरचे उद्गार असतात. ते त्याच्या भूमिकेवरून योग्य असतात, पण ज्ञानाशिवाय उद्धार होत नाही हेच खरे आहे. (४३)

**आत्मज्ञान कळों आलें। म्हणोन दृश्य मिथ्या जालें।**
**परंतु वेढा लाविलें। सकळांस येणें ॥ ४४॥**

ज्याला आत्मज्ञान होते, त्याला हे सर्व दृश्य मिथ्या आहे हे कळून येते. पण इतर सर्व अज्ञानी लोकांना या दृश्यानेच गुरफटून टाकलेले असते. (४४)

**आतां प्रश्न हा फिटला। ज्ञानी ज्ञानें मुक्त जाला।**
**अज्ञान तो बांधला। आपले कल्पनेनें ॥ ४५॥**

आता श्रोत्यांचा प्रश्न फिटला आहे. ज्ञानी हा ज्ञानाच्या योगे मुक्त होतो. अज्ञानी हा त्याच्या स्वतःच्या कल्पनेनेच बांधला जातो. (४५)

**विज्ञानासारिखें अज्ञान। आणी मुक्तासारिखें बंधन।**
**निश्चयासारिखा अनुमान। मानूंचि नये ॥ ४६॥**

वृत्तिशून्य असे विज्ञान आणि नेणतेपणाचे अज्ञान, कर्तृत्वाहंकाराचा त्याग केलेला मुक्त आणि आळसाने काही न करणारा बद्ध आणि स्वानुभवाने जन्ममृत्यू नसल्याचा ज्ञानी माणसाचा निश्चय आणि अज्ञानी माणसाने तर्काने जन्ममृत्यूच नाही असे केलेले अनुमान ही कधीही बरोबरीची मानूच नयेत. (४६)

**बंधन म्हणिजे कांहींच नाहीं। परी वेढा लाविलें सर्व हि।**
**यास उपावचि नाहीं। कळल्यावांचुनी ॥ ४७॥**

बंधन म्हणजे काहीच नाही. पण तरी कल्पनेने सर्वांना घेरल्यामुळे त्यांना आपण बद्ध आहोत, असे वाटते. म्हणून सत्य काय हे जाणून घेण्याखेरीज यावर उपायच नाही. (४७)

कांहींच नाहीं आणी बाधी। हेंचि नवल पाहा आधीं।
मिथ्या जाणिजेना बद्धि। म्हणोन बद्ध ॥ ४८॥

काहीच नाही आणि तरी बांधून ठेवते, हेच आधी केवढे मोठे आश्चर्य आहे! बंधन मिथ्या आहे हे न जाणल्यामुळे अज्ञानी स्वत:स बद्ध मानतो. (४८)

भोळा भाव सिद्धी जाव। हा उधाराचा उपाव।
रोकडा मोक्षाचा अभिप्राव। विवेकें जाणावा ॥ ४९॥

कुणी म्हणतात की, 'भोळा भाव सिद्धीस जाव.' पण हा सर्व उधारीचा उपाय आहे. दीर्घकाळाने सिद्धीस जाणारा आहे. विवेक करून रोकडा मोक्ष म्हणण्यातील अभिप्राय जाणून घ्यावा. (४९)

प्राणी व्हावया मोकळा। आधीं पाहिजे जाणीवकळा।
सकळ जाणतां निराळा। सहजचि होये ॥ ५०॥

प्राणी मोकळा होण्याकरिता सर्वप्रथम अत्यंत सूक्ष्म बुद्धीची आवश्यकता आहे. सूक्ष्म बुद्धीने सारासारविवेक केला की सर्व काही समजून येते व माणूस द्रष्टेपणाने दृश्यापासून आपोआप निराळा होतो. (५०)

कांहींच नेणिजे तें अज्ञान। सकळ जाणिजे तें ज्ञान।
जाणीव राहातां विज्ञान। स्वयेंचि आत्मा ॥ ५१॥

काहीच न कळणे म्हणजे अज्ञान होय आणि सर्व जाणणे म्हणजे ज्ञान होय. ज्ञानाच्या जाणिवेचाही लय होतो तेच विज्ञान होय. त्यायोगे साधक स्वत: आत्माच बनतो.(५१)

अमृत सेऊन अमर जाला। तो म्हणे मृत्य कैसा येतो जनाला।
तैसा विवेकी म्हणे बद्धाला। जन्म तो कैसा॥ ५२॥

जो अमृत प्राशन करून अमर झालेला असतो, तो म्हणतो की, लोकांना मृत्यू येतो तरी कसा? याप्रमाणे विवेकी बद्धाला म्हणतो की, जन्म हा असतो कसा?(५२)

जाणता म्हणे जनातें। तुम्हांस भूत कैसें झडपितें।
तुम्हांस वीष कैसें चढतें। निर्विष म्हणे ॥ ५३॥

ज्ञानी पुरुष लोकांना म्हणतो की, तुम्हांला भूतबाधा होते तरी कशी? ज्यास विषबाधेचा अनुभव नसतो तो दुसऱ्यास म्हणतो की तुम्हांला विष चढते तरी कसे?(५३)

आधीं बद्धासारिखें व्हावें। मग हें नलगेचि पुसावें।
विवेक दुरी ठेऊन पाहावें। लक्षण बद्धाचें ॥ ५४॥

आधी बद्धासारखे व्हावे लागते. विवेक दूर ठेवून बद्धाचे लक्षण जाणून घेतले की असले प्रश्न विचारण्याची आवश्यकता राहात नाही. (५४)

निजेल्यास चेईला तो। म्हणे हा कां रे वोसणातो।
अनुभव पाहाणेंचि आहे तो। तरी मग निजोन पाहावा ॥ ५५॥

जो जागा झालेला आहे तो झोपलेल्या माणसाला म्हणतो की, अरे, हा का बरळतो आहे? तो का बरळतो आहे हे जाणून घ्यायचे तर स्वत: झोपी जाणे आवश्यक आहे.(५५)

ज्ञात्याची उगवली वृत्ती। बद्धऐसी न पडे गुंती।
भुकेल्याची अनुभवप्राप्ती। धाल्यास नाहीं ॥ ५६॥

ज्ञानी माणसाची वृत्ती विषयापासून मुक्त झालेली असते. म्हणून ती बद्ध माणसाप्रमाणे दृश्यात आसक्त होत नाही. जो जेवून तृप्त झालेला असतो, त्यास भुकेलेल्या माणसाची अनुभवप्राप्ती होत नाही. (५६)

इतुकेन आशंका तुटली। ज्ञानें मोक्षप्राप्ती जाली।
विवेक पाहातां बाणली। अंतरस्थिती ॥ ५७॥

या विवेचनाने श्रोत्याची आशंका नष्ट झाली. ज्ञानानेच मोक्षप्राप्ती होते. आत्मानात्मविवेकाने आत्मज्ञान अंतरात दृढ बाणते. अशा ज्ञान्याला पुन्हा जन्म प्राप्त होत नाही.(५७)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विकल्पनिर्शननाम' समास सातवा समाप्त.



## दशक ९ : समास ८

# देहांतनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ज्ञाता सुटला ज्ञानमतें। परंतु जन्म कैसा बद्धातें।**
**बद्धाचें काये जन्मतें। अंतकाळीं ॥ १ ॥**

श्रोता म्हणतो की, ज्ञान प्राप्त झाल्याने ज्ञाता जन्ममरणातून सुटतो हे कळले. परंतु बद्धाला परत जन्म कसा प्राप्त होतो? देहाच्या अंतकाळी काय जन्मते? (१)

**बद्ध प्राणी मरोन गेले। तेथें कांहींच नाहीं उरलें।**
**जाणीवेचें विस्मरण जालें। मरणापूर्वीं ॥ २ ॥**

वरवर पाहिले असता असे वाटते की, बद्ध माणूस मरून गेला की, त्याचे काहीच उरत नाही. कारण मरणापूर्वी त्याची जाणीव संपूर्ण नष्ट झालेली असते. (२)

**ऐसी घेतली आशंका। याचें उत्तर ऐका।**
**आतां दुश्चीत होऊं नका। म्हणे वक्ता ॥ ३ ॥**

श्रोत्याने अशी जी शंका घेतली, तिचे उत्तर आता ऐका. वक्ता म्हणतो, आता चित्त दुश्चित्त मात्र होऊ देऊ नका.(३)

**पंचप्राण स्थळें सोडिती। प्राणरूप वासनावृत्ती।**
**वासनामिश्रित प्राण जाती। देह सोडुनियां ॥ ४ ॥**

देहाच्या अंतकाळी पाचही प्राण आपापले स्थान सोडतात, त्या वेळी प्राणरूप वासनावृत्तीही त्याच्याबरोबर बाहेर पडते. याप्रमाणे वासनामिश्रित पंचप्राण देह सोडून जातात. (४)

**वायोसरिसी वासना गेली। ते वायोरूपेंचि राहिली।**
**पुन्हां जन्म घेऊन आली। हेतुपरत्वें ॥ ५ ॥**

प्राण व वासना दोन्ही वायुरूपच असतात. ती वायुरूपेच राहातात व हेतुपरत्वे परत जन्मास येतात. (५)

**कित्येक प्राणी नि:शेष मरती। पुन्हा मागुते जीव येती।**
**ढकलून दिल्हें तेणें दुखवती। हस्तपादादिक ॥ ६ ॥**

कित्येक लोक पूर्णपणे मरतात, पण काही कारणाने परत जिवंत होतात. त्यांना प्रेत समजून ढकलून दिले, तर त्यांचे हातपाय आदी अवयव दुखावले जातात. (६)

**सर्पदृष्टी जालियांवरी। तीं दिवसां उठवी धन्वंतरी।**
**तेव्हां ते माघारी। वासना येते कीं ॥ ७ ॥**

सर्पाची नजर बाधली तर मनुष्य प्रेत होऊन पडतो. पण उत्तम मांत्रिक किंवा धन्वंतरी त्याला तीन दिवसांनी उठवतो तेव्हा वायुरूप वासनाच परत माघारी येते. (७)

**कित्येक सेवें होऊन पडती। कित्येक तयांस उठविती।**
**येमलोकींहून आणिती। माघारे प्राणी ॥ ८ ॥**

कित्येक शव होऊन पडतात, त्यांना दुसरे कित्येक उठवितात. यमलोकातून त्यांना परत आणलेले असते. (८)

**कित्येक पूर्वीं श्रापिले। ते शापें देह पावले।**
**उश्रापकाळीं पुन्हां आले। पूर्वदेहीं ॥ ९ ॥**

पूर्वी कित्येकांना शाप मिळाल्याने पहिला देह जाऊन दुसरा देह प्राप्त होतो. त्यांना उ:शाप मिळालेला असला की त्याची मुदत संपते, तेव्हा तो दुसरा देह टाकून परत ते पूर्वदेहात येतात. (९)

**कित्येकीं बहु जन्म घेतले। कित्येक परकाया प्रवेशले।**
**ऐसे आले आणी गेले। बहुत लोक ॥ १० ॥**

काही लोकांना अनेक जन्म घ्यावे लागतात. कुणी परकाया-प्रवेश करतात. असे कित्येक लोक जन्मतात आणि मरतात. (१०)

**फुंकिल्यासरिसा वायोगेला। तेथें वायोसुत निर्माण जाला।**
**म्हणोन वायोरूप वासनेला। जन्म आहे ॥ ११ ॥**

फुंकण्याने गती निर्माण होते, त्याप्रमाणे वासनेमुळे गतिमान झालेला प्राण मरणसमयी बाहेर पडतो. तेथे मन (वासनापूर्तीचे मुख्य साधन जे मन तेही वायुस्वरूपच असल्याने त्यास वायुसुत म्हटले आहे) निर्माण झाले म्हणून मग वासना जी वायुरूप असते ती जन्म घेते. (११)

**मनाच्या वृत्ती नाना। त्यांत जन्म घेते वासना।**
**वासना पाहतां दिसेना। परंतु आहे ॥ १२ ॥**

पाहायला गेले तर वासना दिसत नाही, पण ती असते. मनाच्या ज्या अनेक वृत्ती असतात, त्यांत वासना जन्म घेते. (१२)

वासना जाणिजे जाणीवहेत। जाणीव मुळींचा मूळतंत।
मूळमायेंत असे मिश्रित। कारणरूपें ॥ १३ ॥

जाणिवेमुळे होणारी इच्छा, आशा म्हणजे वासना होय. मूळ मायेमध्ये कारणरूपाने वायू जाणिवेसहित असतो. म्हणून जाणिवेचा धागा मूळमायेपर्यंत पोहोचतो. (१३)

कारणरूप आहे ब्रह्मांडीं। कार्यरूपें वर्ते पिंडीं।
अनुमानितां तांतडीं। अनुमानेना ॥ १४ ॥

जाणीव ही ब्रह्मांडात कारणरूपाने आणि देहात वासनामय कार्यरूपाने असते. घाईगर्दीने तिचे योग्य अनुमान करता येत नाही. (१४)

परंतु आहे सूक्ष्मरूप। जैसें वायोचें स्वरूप।
सकळ देव वायोरूप। आणी भूतसृष्टि ॥ १५ ॥

वायूचे स्वरूप जसे सूक्ष्म असते, त्याप्रमाणे जाणीवही सूक्ष्मरूप असते. सर्व देव आणि भूतसृष्टी वायुरूपच आहे. (१५)

वायोमधें विकार नाना। वायो तरी पाहातां दिसेना।
तैसी जाणीववासना। अति सूक्ष्म ॥ १६ ॥

वायूमध्ये नाना विकार असतात, पण वायू डोळ्याला दिसत नाही. त्याप्रमाणे जाणीव व वासना याही अति सूक्ष्म असतात. (१६)

त्रिगुण आणी पंचभूतें। हे वायोमध्यें मिश्रितें।
अनुमानेना म्हणोन त्यातें। मिथ्या म्हणों नये ॥ १७ ॥

त्रिगुण आणि पंचमहाभूते ही सर्व वायूमध्ये मिसळलेली आहेत. पण ती दिसत नाहीत म्हणून त्यांना मिथ्या म्हणू नये. (१७)

सहज वायो चाले। तरी सुगंध दुर्गंध कळों आले।
उष्ण सीतळ तप्त निवाले। प्रत्यक्ष प्राणी ॥ १८ ॥

वारा स्वाभाविकरीत्या वाहत असतो, तरी सुगंध-दुर्गंधाची जाणीव होते, तसेच उष्ण पदार्थ शीतल होतात. तापलेले प्राणी निवतात, हे आपल्याला प्रत्यक्ष अनुभवास येते. (१८)

वायोचेनि मेघ वोळती। वायोचेनि नक्षत्रें चालती।
सकळ सृष्टीची वर्तती गती। सकळ तो वायो ॥ १९ ॥

वायूमुळे ढग हालचाल करतात व वृष्टी करतात. वायूमुळेच नक्षत्रे भ्रमण करतात. एवढेच नव्हे, तर सृष्टीतील सर्व घडामोडीला वायूच कारण असतो. (१९)

वायोरूपें देवतें भूतें। आंगीं भरती अकस्मातें।
वीध केलियां प्रेतें। सावध होतीं ॥ २० ॥

देवता आणि भूते ही वायुरूपच असतात व अकस्मात अंगात प्रवेश करतात. काही विधिविधान केले की प्रेतेसुद्धा जिवंत होतात. (२०)

वारें निराळें न बोले। देहामधें भरोन डोले।
आळी घेऊन जन्मा आले। कित्येक प्राणी ॥ २१ ॥

अंगात संचारणारे वारे देहाशिवाय बोलू शकत नाही. कुणाच्या तरी देहात संचार करून ते प्रगट होते व वासनापूर्तीचा प्रयत्न करते. याप्रकारे आसक्तीमुळे कित्येक प्राणी जन्मास येतात. (२१)

राहाणें ब्राह्मणसमंध जाती। राहाणें ठेवणीं सांपडतीं।
नाना गुंतले उगवती। प्रत्यक्ष राहाणें ॥ २२ ॥

राहाणे म्हणजे अंगात देवतेचा संचार करवणे, असे प्रयोग करून ब्रह्मसमंधास हुसकून लावतात, पुरून ठेवलेले द्रव्य सापडवून देतात किंवा नाना संकटातून लोकांची सुटका करतात. (२२)

ऐसा वायोचा विकार। येवंचे कळेना विस्तार।
सकळ कांहीं चराचर। वायोमुळें ॥ २३ ॥

याप्रमाणे वायूचा विकार व विस्तार कळतच नाही. सर्व चराचरसृष्टीचे अस्तित्व वायूमुळेच आहे. (२३)

वायो स्तब्धरूपें सृष्टीधर्ता। वायो चंचळरूपें सृष्टीकर्ता।
न कळे तरी विचारीं प्रवर्ता। म्हणिजे कळे ॥ २४ ॥

वायू स्तब्ध राहून सृष्टीला धारण करतो. चंचल होऊन तोच सृष्टी निर्माण करतो. हे कळत नसेल तर त्यावर विचार, चिंतन करू लागा. म्हणजे कळेल. (२४)

मुळापासून सेवटवरी। वायोचि सकळ कांहीं करी।
वायोवेगळें कर्तुत्व चतुरीं। मज निरोपावें ॥ २५ ॥

मूळमायेपासून अगदी शेवटपर्यंत वायूच सर्व काही करीत असतो. वायुवेगळे इतर कोणाचे कर्तृत्व असेल, तर चतुर पुरुषांनी मला सांगावे. (२५)

जाणीवरूप मूळमाया। जाणीव जाते आपल्या ठाया।
गुप्त प्रगट होऊनियां। विश्वीं वर्ते ॥ २६ ॥

मूळमाया ही जाणीवरूप आहे. जाणीव शेवटी स्वरूपी लीन होते. याप्रमाणे कधी गुप्त तर कधी प्रगट होऊन ती विश्वात संचार करते. (२६)

कोठें गुप्त कोठें प्रगटे। जैसें जीवन उफाळे आटे।
पुढें मागुता वोघ लोटे। भूमंडळीं ॥ २७॥

पाणी जसे कधी जमिनीत गुप्त असते, कधी उफाळून वर येते, तर कधी आटते व परत जोराने प्रवाहरूपाने वाहू लागते. तशी जाणीवही कधी गुप्त असते, कधी प्रगट होते, तर कधी परत गुप्त होते. असे परिवर्तन सतत चालू असते. (२७)

तैसाच वायोमधें जाणीवप्रकार। उमटे आटे निरंतर।
कोठें विकारे कोठें समीर। उगाच वाजे ॥ २८॥

तसाच वायूमधील जाणिवेचा प्रकार आहे. कधी ती प्रगट होते, कधी अदृश्य होते. याप्रमाणे निरंतर तिच्यात परिवर्तन घडून येत असते. कोठे वाऱ्याने वादळ उत्पन्न होते, तर कधी वारा आल्हाददायक झुळुकीसारखा मंद वाहत असतो. (२८)

वारी आंगावरून जाती। तेणें हातपाये वाळती।
वारा वाजतां करपती। आलीं पिकें ॥ २९॥

वारे अंगावरून गेले की त्यामुळे हातपाय वाळून जातात, तर कधी उभी पिके वाऱ्याने करपून जातात.(२९)

नाना रोगांचीं नाना वारीं। पीडा करिती पृथ्वीवरी।
वीज कडाडी अंबरीं। वायोमुळें ॥ ३०॥

नाना रोगांची उत्पत्ती वाऱ्यामुळे होते व पृथ्वीवर लोकांना पीडा सोसावी लागते. आकाशात वाऱ्यामुळेच विजेचा कडकडाट होत असतो. (३०)

वायोकरितां रागोद्धार। कळे वोळखीचा निर्धार।
दीप लागे मेघ पडे हा चमत्कार। रागोद्धारीं ॥ ३१॥

वायूमुळे नाना राग आळविता येतात आणि ते राग ओळखताही येतात. कुशल गायकाने दीपमल्हार राग आळविल्याने दीप लागतात, मेघमल्हार आळविला की पाऊस पडतो, असे चमत्कार घडतात. (३१)

वायो फुंकितां भुली पडती। वायो फुंकितां खांडकें करपती।
वायोकरितां चालती। नाना मंत्र ॥ ३२॥

वायू फुंकल्याने भूल पडते. वायू फुंकल्याने अंगावरील गळवे कोरडी पडतात. वायूमुळेच नाना प्रकारच्या मंत्रांचे प्रयोग केले जातात. (३२)

मंत्रें देव प्रगटती। मंत्रें भूतें अखरकिती।
बाजीगरी वोडंबरी करिती। मंत्रसामर्थ्यें ॥ ३३॥

मंत्रांमुळे देव प्रगट होतात. मंत्रामुळे भूते आकर्षित होतात. मंत्रसामर्थ्यानेच जादूचे व मंत्रविद्येचे चमत्कार घडवून आणतात. (३३)

राक्षसांची मावरचना। ते हे देवांदिकां कळेना।
विचित्र सामर्थ्यें नाना। स्तंबनमोहनादिकें ॥ ३४॥

राक्षसांच्या मायेची करामत देवांनाही कळत नाही. स्तंभन, मोहन आदी नाना प्रकारचे विचित्र सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी असते. (३४)

धडचि पिसें करावें। पिसेंच उमजवावें।
नाना विकार सांगावे। किती म्हणोनी ॥ ३५॥

शहाणा असेल त्याला वेडे करायचे, वेडा असेल त्यास शहाणे करायचे, याप्रमाणे किती विकार आणि प्रकार वर्णन करावेत? (३५)

मंत्रीं संग्राम देवांचा। मंत्रीं साभिमान ऋषींचा।
महिमा मंत्रसामर्थ्याचा। कोण जाणे ॥ ३६॥

देवांच्या संग्रामात निरनिराळ्या मंत्रांचाच उपयोग केला जातो. ऋषींचा मोठेपणाही त्यांच्या मंत्रसामर्थ्यावरच अवलंबून असतो. मंत्रसामर्थ्याचा महिमा कोण जाणू शकेल?(३६)

मंत्रीं पक्षी आटोपिती। मूशकें स्वापदें बांधती।
मंत्रीं माहांसर्प खिळिती। आणी धनलाभ ॥ ३७॥

मंत्रांनी पक्ष्यांवर सत्ता गाजवता येते. उंदीर व इतर श्वापदे यांना बंधन घालता येते. मोठमोठ्या सर्पांना एका जागी खिळवून ठेवता येते आणि धनलाभही करून घेता येतो (३७)

आतां असो हा प्रश्न जाला। बद्धाचा जन्म प्रत्यया आला।
मागील प्रश्न फिटला। श्रोतयाचा ॥ ३८॥

असो. आता श्रोत्यांचा जो प्रश्न होता की बद्धाला जन्म कसा प्राप्त होतो, तो प्रश्न आता मिटला आहे. बद्धाला पुनर्जन्म असतो हे प्रत्ययाला आले आहे. (३८)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहान्तनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.

❑ ❑

## दशक ९ : समास ९

# संदेहवारण

॥ श्रीराम ॥

ब्रह्म वारितां वारेना। ब्रह्म सारितां सरेना।
ब्रह्म कांहीं वोसरेना। येकीकडे ॥ १॥

श्रोते येथे आपली शंका बोलून दाखवीत आहेत. ते म्हणतात की, ब्रह्माचे निवारण करू म्हटले तरी ते करता येत नाही. त्याला बाजूला सारावे म्हटले तरी सारता येत नाही. त्यात कमी-जास्त करावे म्हटले तरी करता येत नाही. (१)

ब्रह्म भेदितां भेदेना। ब्रह्म छेदितां छेदेना।
ब्रह्म परतें होयेना। केलें तरी ॥ २॥

ब्रह्मास भेदावे म्हटले तरी ते भेदले जात नाही. ब्रह्मास छेदावे म्हटले तर ते छेदले जात नाही. त्याला मागे ढकलावे असे वाटले तरी ते ढकलले जात नाही. (२)

ब्रह्म खंडेना अखंड। ब्रह्मीं नाहीं दुसरें बंड।
तरी कैसें हें ब्रह्मांड। सिरकलें मधें ॥ ३॥

ब्रह्माचे तुकडे करावे म्हटले तरी ते केले जात नाहीत. जे ब्रह्म अखंड असल्याने त्यात त्याच्याशिवाय दुसरे काहीही असतच नाही. आणि तरी ते ब्रह्मांड त्याच्यामध्ये कसे काय शिरले? (३)

पर्वत पाषाण सिळा सिखरें। नाना स्थळें स्थळांतरें।
भूगोळरचना कोण्याप्रकारें। जाली परब्रह्मीं ॥ ४॥

पर्वत, पाषाण, शिळा, शिखरे, नाना स्थळे, इत्यादी भूगोल-रचना त्या परब्रह्माच्या ठिकाणी कशी काय झाली? (४)

भूगोळ आहे ब्रह्मामधें। ब्रह्म आहे भूगोळामधें।
पाहातां येक येकामधें। प्रत्यक्ष दिसे ॥ ५॥

पृथ्वी ब्रह्मामध्ये आहे आणि ब्रह्म पृथ्वीमध्ये आहे, असे हे एकामध्ये एक आहे, हे तर प्रत्यक्ष दिसून येते. (५)

ब्रह्मीं भूगोळें पैस केला। आणी भूगोळहि ब्रह्में भेदिला।
विचार पाहातां प्रत्यय आला। प्रत्यक्ष आतां ॥ ६॥

ब्रह्माच्या ठिकाणी पृथ्वीने जागा व्यापली आणि पृथ्वीला भेदूनही ब्रह्म आहेच, असा प्रत्यक्ष प्रत्ययही विचाराच्या योगे आला. (६)

ब्रह्में ब्रह्मांड भेदिलें। हें तों पाहातां नीटचि जालें।
परी ब्रह्मास ब्रह्मांडें भेदिलें। हें विपरीत दिसे ॥ ७॥

ब्रह्म अत्यंत सूक्ष्म असल्याने त्याने ब्रह्मांड भेदले, ही गोष्ट विचार करू पाहता ठीक वाटते. पण ब्रह्माला ब्रह्मांडाने भेदले, हे विपरीत वाटते. (७)

भेदिलें नाहीं म्हणावें। तरी ब्रह्मीं ब्रह्मांड स्वभावें।
हें सकळांस अनुभवें। दिसत आहे ॥ ८॥

बरे, भेदले नाही म्हणावे, तरी ब्रह्माच्या ठिकाणीच स्वाभाविकरीत्या ब्रह्मांड आहे, हे तर सगळ्यांना अनुभवाने कळून येत आहे. (८)

तरी हें आतां कैसें जालें। विचारून पाहिजे बोलिलें।
ऐसें श्रोतीं आक्षेपिलें। आक्षेपवचन ॥ ९॥

तरी आता हे कसे काय झाले, ते विचार करून आपण आम्हांला सांगा, असे श्रोत्याने आक्षेप घेऊन म्हटले. (९)

आतां याचें प्रत्योत्तर। सावध ऐका निरोत्तर।
येथें पडिले कीं विचार। संदेहाचे ॥ १०॥

आता या प्रश्नाचे प्रत्युत्तर सावध होऊन ऐका. म्हणजे तुम्ही निःशंक व्हाल. पण येथे काही शंका निर्माण होतात. (१०)

ब्रह्मांड नाहीं म्हणों तरी दिसे।
आणी दिसे म्हणों तरी नासे।
आतां हें समजती कैसें। श्रोतेजन ॥ ११॥

ब्रह्मांड नाही म्हणावे तरी ते डोळ्यांना दिसते आणि जे दिसते ते तरी नाश पावते. आता श्रोत्यांनी हे सर्व नीट समजून घ्यावे. (११)

तंव श्रोते जाले उद्दित। आहों म्हणती सावचित।
प्रसंगें बोलों उचित। प्रत्योत्तर ॥ १२॥

हे ऐकून श्रोते उत्साहित झाले आणि म्हणाले की, आम्ही अगदी लक्ष देऊन ऐकत आहोत. तेव्हा वक्ता म्हणाला की, या प्रश्नाचे उचित उत्तर मी देतो. (१२)

आकाशीं दीपास लाविलें। दीपें आकाश परतें केलें।
हें तों घडेना पाहिलें। पाहिजे श्रोतीं ॥ १३॥

आकाशात दीप लावले तरी त्यामुळे त्या दीपांनी आकाशास बाजूस सारले असे तर घडूच शकत नाही, हे श्रोत्यांनी लक्षात घेतले पाहिजे. (१३)

आप तेज अथवा पवन। सारूं न सकती गगन।
गगन पाहातां सघन। चळेल कैसें ॥ १४॥

आप, तेज किंवा वायू ही भूतेही आकाशास बाजूला सारू शकत नाहीत. आकाश घनदाट सर्वत्र सारखेच असते. ते कसे चळेल? (१४)

**अथवा कठीण जाली मेदिनी। तरी गगनें केली चाळणी।**
**पृथ्वीचें सर्वांग भेदुनी। राहिलें गगन ॥ १५ ॥**

अथवा पृथ्वी अत्यंत कठीण आहे तरी आकाश त्या पृथ्वीच्याही अणुरेणूत व्याप्त आहे. ते अत्यंत सूक्ष्म असल्याने त्याने जणू काही पृथ्वीला भेदून तिची चाळणी करून, तिचे सर्वांग भेदून गगन तेथे राहिले आहे. (१५)

**याची प्रचित ऐसी असे। जें जडत्वा आलें तितुकें नासे।**
**आकाश जैसें तैसें असे। चळणार नाहीं ॥ १६ ॥**

याची प्रचीती अशी आहे की, जे जडत्वास येते, ते ते सर्व नाश पावते. आकाश अत्यंत सूक्ष्म असल्याने ते जसेच्या तसेच असते. ते चळणारच नाही. (१६)

**वेगळेपणें पाहावें। तयास आकाश म्हणावें।**
**अभिन्न होतां स्वभावें। आकाश ब्रह्म ॥ १७ ॥**

आकाश वेगळेपणाने पाहता येते, म्हणून त्याला पंचभूतांपैकी एक भूत आहे असे म्हणावे लागते. ते जर अभिन्नपणे पाहता येईल, तर आकाशांत व ब्रह्मात फरक राहाणार नाही. त्याला ब्रह्मच म्हणावे लागेल. (१७)

**तस्मात आकाश चळेना। भेद गगनाचा कळेना।**
**भासलें ब्रह्म तयास जाणा। आकाश म्हणावें ॥ १८ ॥**

म्हणून आकाश चळत नाही. आकाशाचे स्वरूप आपल्याला नीट कळत नाही. तरीही पाहू गेल्यास ब्रह्मासारखे जे वाटते ते आकाश होय. (१८)

**निर्गुण ब्रह्मसें भासलें। कल्पूं जातां अनुमानलें।**
**म्हणोन आकाश बोलिलें। कल्पनेसाठीं ॥ १९ ॥**

ते निर्गुण ब्रह्मासारखेच भासते. पण त्याची कल्पना आपण करू शकतो. त्याचे अनुमान करता येते. म्हणून निर्गुण ब्रह्म जे निर्विकल्प आहे, याची काहीशी कल्पना आकाशावरून येऊ शकते. (१९)

**कल्पनेसि भासे भास। तितुकें जाणावें आकाश।**
**परब्रह्म निराभास। निर्विकल्प ॥ २० ॥**

कल्पनेला जे जे भासते, ते आकाश जाणावे. परब्रह्म निराभास निर्विकल्प आहे. (२०)

**पंचभूतांमधें वास। म्हणौन बोलिजे आकाश।**
**भूतांतरीं जो ब्रह्मांश। तेंचि गगन ॥ २१ ॥**

सर्व पंचभूतांमध्ये आकाशतत्त्व व्यापून आहे म्हणून त्याला आकाश म्हणतात. भूतांच्यामध्ये जो ब्रह्मांश ते गगन होय. (२१)

**प्रत्यक्ष होतें जातें। अचळ कैसें म्हणावें त्यातें।**
**म्हणोनियां गगनातें। भेदिलें नाहीं ॥ २२ ॥**

गगनाच्या ठिकाणीच दीपादी दृश्य प्रत्यक्ष होते आणि जाते, परंतु गगनात त्यामुळे काहीच बदल होत नाही. मात्र ते अचल ब्रह्म नव्हे. (२२)

**पृथ्वी विरोन उरे जीवन। जीवन नस्तां उरे अग्न।**
**अग्न विझतां उरे पवन। तोहि नासे ॥ २३ ॥**

पृथ्वी पाण्यात विरून जाते तेव्हा फक्त पाणी उरते. ते पाणी नाहीसे झाले की अग्नी उरतो. अग्नी विझला की वायू उरतो व नंतर तोही नाश पावतो. (२३)

**मिथ्या आलें आणी गेलें। तेणें खरें तें भंगलें।**
**ऐसें हें प्रचितीस आलें। कोणेंपरी ॥ २४ ॥**

जे येते आणि जाते ते मिथ्या असते. त्याने जे खरे आहे ते भंगले असे भासते. पण हा अनुभव का येतो ते पाहिले पाहिजे. (२४)

**भ्रमें प्रत्यक्ष दिसतें। विचार पाहातां काये तेथें।**
**भ्रममूळ या जगातें। खरें कैसें म्हणावें ॥ २५ ॥**

भ्रमाने तसे दिसते. विचार करून पाहिला की हे कळते. भ्रमामुळे भासणाऱ्या या जगाला खरे कसे म्हणावे? (२५)

**भ्रम शोधितां कांहींच नाहीं। तेथें भेदिलें कोणें काई।**
**भ्रमें भेदिलें म्हणतां ठाईं। भ्रमचि मिथ्या ॥ २६ ॥**

भ्रमाचा शोध घेतला तर तेथे काहीच नाही, हे कळून येते. मग तेथे कोणी कशास भेदले असे म्हणावे? भ्रमाने भेदले असे म्हणावे तरी तो भ्रमही मिथ्याच होय. (२६)

**भ्रमाचें रूप मिथ्या जालें। मग सुखें म्हणावें भेदिलें।**
**मुळीं लटिकें त्यानें केलें। तेंहि तैसें ॥ २७॥**

भ्रमाचे रूप मिथ्या झाले, तेथे मग खुशाल भेदिले असे म्हणावे. मुळातच जे खोटे आहे, त्याने जे केले म्हणावे तेही तसे खोटेच असते. (२७)

**लटिक्यानें उदंड केलें। तरी आमुचें काये गेलें।**
**केलें म्हणतांच नाथिलें। शाहाणे जाणती ॥ २८॥**

खोट्याने उदंड केले असे धरले तरी त्यात आपले काय गेले? शहाणे लोक जाणतात की, त्याने केले असे म्हटले जाते, तरी वास्तविक काहीच घडलेले नसते. (२८)

**सागरामधें खसखस। तैसें परब्रह्मीं दृश्य।**
**मतीसारिखा मतिप्रकाश। अंतरीं वाढे ॥ २९॥**

परब्रह्माच्या ठिकाणी दृश्य विश्व हे सागरात खसखस तसे समजावे. माणसाची जेवढी बुद्धी असेल तेवढा त्या बुद्धीचा प्रकाश म्हणजेच ज्ञान अंतरात वाढते.(२९)

**मती करितां विशाळ। कवळे लागे अंतराळ।**
**पाहातां भासे ब्रह्मगोळ। कवीठ जैसें ॥ ३०॥**

मती विशाल केली की ती गगनाला कवटाळते. मग तिला हा ब्रह्मगोल कवठाएवढा दिसू लागतो.(३०)

**वत्ति त्याहून विशाळ। करिता ब्रह्मांड बद्रिफळ।**
**ब्रह्माकार होतां केवळ। कांहींच नाहीं ॥ ३१॥**

वृत्ती त्याहून विशाल केली की ब्रह्मांड बोराएवढे भासू लागते आणि ती अचानक ब्रह्माकार झाली की मग काहीच उरत नाही. (३१)

**आपण विवेकें विशाळला। मर्यादेवेगळा जाला।**
**मग ब्रह्मगोळ देखिला। वटबीजन्यायें ॥ ३२॥**

आपण विवेकाने विशाल झालो, तर स्थलकालाच्या मर्यादा गळून पडल्याने ब्रह्मांड आपल्याला वडाच्या बी प्रमाणे बारीक दिसू लागते. (३२)

**होतां त्याहून विस्तीर्ण। वटबीज कोटिप्रमाण।**
**आपण होतां परिपूर्ण। कांहींच नाहीं ॥ ३३॥**

त्याहून आपण विशाल झालो की, ब्रह्मांड वटबीजापेक्षाही कोटीपटीने आणखी बारीक दिसू लागते. आपण परिपूर्ण ब्रह्म झालो की ब्रह्मांड उरतच नाही.(३३)

**आपण भ्रमें ल्हानाळला। केवळ देहधारी जाला।**
**तरी मग ब्रह्मांड त्याला। कवळेल कैसें ॥ ३४॥**

आपण भ्रमाने स्वत:ला लहान समजतो. फक्त देहबुद्धीचे होतो. मग आपल्याला ब्रह्मांड कसे कवळता येईल? (३४)

**वृत्ति ऐसी वाढवावी। पसरून नाहींच करावी।**
**पूर्णब्रह्मास पुरवावी। चहूंकडे ॥ ३५॥**

वृत्ती अशी वाढवावी की ती विस्तार पावून नाहीशीच व्हावी. पूर्णब्रह्माला चहूकडून पुरून उरेल अशी करावी. (३५)

**जंव येक सुवर्ण आणितां। तेणें ब्रह्मांड मढवितां।**
**कैसें होईल तें तत्वतां। बरें पाहा ॥ ३६॥**

आपण जर थोडे सोने आणले आणि त्याने ब्रह्मांडाला मढविण्याचा प्रयत्न केला, तर कसे होईल पहा बरे! (३६)

**वस्तु वृत्तीस कवळे। तेणें वृत्ति फाटोन वितुळे।**
**निर्गुण आत्माच निवळे। जैसा तैसा ॥ ३७॥**

वृत्तीला जसजसे स्वरूपाचे आकलन होत जाईल, तसतशी ती व्यापक होत जाऊन शेवटी फाटून, वितळून जाईल. ती पूर्णपणे नष्ट झाल्यावर निर्गुण आत्माच केवळ जसाच्या तसा उरेल. (३७)

**येथें फिटली आशंका। श्रोते हो संदेह धरूं नका।**
**अनुमान असेल तरी विवेका। अवलोकावें ॥ ३८॥**

आता येथे शंका फिटली. श्रोते हो, उगीच संदेह धरू नका. अजून संदेह असेल तर नीट विचार करून पहा. (३८)

**विवेकें तुटे अनुमान। विवेकें होये समाधान।**
**विवेकें आत्मनिवेदन। मोक्ष लाभे ॥ ३९॥**

विवेकाच्या योगाने संदेह नष्ट होईल. विवेकानेच समाधान लाभेल आणि आत्मनिवेदन होऊन मोक्ष लाभेल. (३९)

केली मोक्षाची उपेक्षा। विवेकें सारिलें पूर्वपक्षा।
सिद्धांत आत्मा प्रत्यक्षा। प्रमाण नलगे ॥ ४० ॥

मुक्तपणालाही जो विसरला आणि अशा रीतीने विवेकाच्या बळावर पूर्वपक्षाला म्हणजे साऱ्या मायेलाच बाजूला सारल्यामुळे, तिचा त्याग केल्यामुळे सिद्धांतस्वरूप जो आत्माराम तोच तो होतो. हा स्वानुभव असल्याने त्याला दुसऱ्या प्रमाणाची आवश्यकता राहात नाही (४०)

हे प्रचितीचीं उत्तरें। कळती सारासारविचारें।
मननध्यासें साक्षात्कारें। पावन होईजे ॥ ४१ ॥

हे सर्व प्रचीतीचे बोलणे आहे. सारासारविवेकाच्या योगाने यातील रहस्य कळेल. त्याचे मनन व निदिध्यासन केल्याने आत्म-साक्षात्कार होतो व त्याप्रमाणे तुम्ही पावन व्हाल (व्हावे). (४१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'संदेहवारणनाम' समास नववा समाप्त.

❑ ❑

## दशक ९ : समास १०

## स्थितिनिरूपण

॥ श्रीराम ॥

देउळामधें जगन्नायेक। आणी देउळावरी बैसला काक।
परी तो देवाहून अधिक। म्हणों नये कीं ॥ १ ॥

समजा, एक देऊळ आहे. त्यात देव आहे आणि त्या देवळाच्या शिखरावर कावळा जाऊन बसला. तर तो देवापेक्षा उच्चस्थानी बसला, म्हणून त्याला देवाहून श्रेष्ठ म्हणू नये.(१)

सभा बैसली राजद्वारीं। आणी मर्कट गेलें स्तंभावरी।
परी तें सभेहून श्रेष्ठ चतुरीं। कैसें मानावें ॥ २ ॥

राजद्वारी सभा भरलेली असताना एखादे माकड येऊन तेथील खांबावर बसले, तर ते त्या सभेहून श्रेष्ठ असे शहाण्या लोकांनी कसे मानावे ? (२)

ब्राह्मण स्नान करून गेले। आणी बक तैसेचि बैसले।
परी ते ब्राह्मणापरीस भले। कैसे मानावे ॥ ३ ॥

एखाद्या तळ्यातील पाण्यात स्नान करून ब्राह्मण तेथून निघून गेले आणि बगळे त्या तळ्यातच ध्यानस्थ असल्यासारखे बसले, तरी त्या बगळ्यांना त्या ब्राह्मणांहून चांगले कसे मानावे ?(३)

ब्राह्मणामधें कोणी नेमस्त। कोणी जाले अव्यावेस्त।
आणी स्वान सदा ध्यानस्त। परी तें उत्तम नव्हे॥ ४ ॥

ब्राह्मणांमध्ये कोणी नियमाने वागणारे असतात, तर कुणी अव्यवस्थित वागणारे असतात. आणि एखादा कुत्रा नेहमी डोळे झाकून ध्यानस्थासारखा बसला तरी त्याला कुणी ब्राह्मणाहून उत्तम मानत नाहीत. (४)

ब्राह्मण लक्षमुद्रा नेणे। मार्जर लक्षविषईं शाहाणें।
परी ब्राह्मणापरीस विशेष कोणें। म्हणावें तयासी ॥ ५ ॥

मांजराला लक्ष्यमुद्रा म्हणजे एखाद्या वस्तूकडे एकाग्र दृष्टी करून पाहणे सहजसाध्य असते. ब्राह्मणाला ती साध्य नसली तरी त्या मांजराला ब्राह्मणापेक्षा श्रेष्ठ मानता येत नाही. (५)

ब्राह्मण पाहे भेदाभेद। मक्षिका सर्वांस अभेद।
परी तीस जाला ज्ञानबोध। हें तों न घडे कीं ॥ ६ ॥

ब्राह्मण भेदाभेद पाहून वागतो. माशी सर्व बाबतीत भेद पाहातच नाही. म्हणून काही तिला ज्ञानबोध झाला आहे, असे नाही म्हणत.(६)

उंच वस्त्रें नीच ल्याला। आणि समर्थ उघडाच बैसला।
परी तो आहे परीक्षिला। परीक्षवंतीं ॥ ७ ॥

एखाद्या नीच माणसाने उंची वस्त्रे परिधान केली आणि एखादा श्रेष्ठ पुरुष उघडाच बसला, तरी यांतील श्रेष्ठ-कनिष्ठाची पारख परीक्षावंत करतात. (७)

बाह्याकार केला अधीक। परी तो अवघा लोकिक।
येथें पाहिजे मुख्य येक। अंतरनिष्ठा ॥ ८ ॥

बाहेरून खूप थाटमाट केला तर तो लौकिकात खपून जातो, पण परमार्थात मुख्य अंतरनिष्ठा पाहिजे. (८)

लोकिक बरा संपादिला। परी अंतरीं सावध नाहीं जाला।
मुख्यदेवास चुकला। तो आत्मघातकी ॥ ९ ॥

एखाद्याने चांगला लौकिक संपादन केला, पण तो अंतरात जर (परमार्थाविषयी) सावध झाला नाही, तर मुख्य देवाला म्हणजे आत्मारामास अंतरतो व आत्मघातकी ठरतो. (९)

देवास भजतां देवलोक। पित्रांस भजतां पित्रलोक।
भूतांस भजतां भूतलोक। पाविजेतो ॥ १० ॥

जे देवाचे भजन करतात ते (मरणोत्तर) देवलोकास प्राप्त होतात. जे पितरांना भजतात त्यांना पितृलोकाची प्राप्ती होते आणि जे भूतांना भजतात ते भूतलोकास जातात. (१०)

**जेणें जयास भजावें। तेणें त्या लोकासी जावें।**
**निर्गुणीं भजतां व्हावें। निर्गुणचि स्वयें ॥ ११॥**

जे लोक ज्याचे भजन करतात, ते ते त्या त्या लोकास जातात. जे निर्गुणास भजतात, ते स्वतः निर्गुणच होतात.(११)

**निर्गुणाचें कैसें भजन। निर्गुणीं असावें अनन्य।**
**अनन्य होतां होईजे धन्य। निश्चयेंसीं ॥ १२॥**

निर्गुणाचे भजन कसे करावे? तर निर्गुणाशी अनन्य व्हावे. असे अनन्य झाल्याने तो माणूस निश्चितपणे धन्य होतो. (१२)

**सकळ केलियाचें सार्थक। देव वोळखावा येक।**
**आपण कोण हा विवेक। पाहिला पाहिजे ॥ १३॥**

खरा देव कोण हे ओळखले म्हणजे सर्व जे प्रयत्न केलेले असतात त्यांचे सार्थक होते. आपले खरे स्वरूप काय आहे, हा विवेक मनुष्याने केलाच पाहिजे.(१३)

**देव पाहातां निराकार। आपला तों माईक विचार।**
**सोहं आत्मा हा निर्धार। बाणोन गेला ॥ १४॥**

देव पाहिला तर तो निर्गुण, निराकार आहे. आपण ज्याला 'मी' म्हणतो, तो देह तर मायिक आहे. म्हणून 'आत्मा तोच मी' हा निर्धार अंगी बाणतो. (१४)

**आतां अनुमान तो काई। वस्तु आहे वस्तुचा ठाईं।**
**देहभाव कांहींच नाहीं। धांडोळितां ॥ १५॥**

म्हणून आता अनुमान करण्याची आवश्यकताच नाही. आत्मवस्तू जेथल्या तेथेच असते आणि देहबुद्धीचा शोध घेऊ लागल्यावर ती शिल्लकच राहत नाही(१५)

**सिद्धास आणी साधन। हा तों अवघाच अनुमान।**
**मुक्तास आणी बंधन। आडळेना ॥ १६॥**

जो सिद्ध झालेला असतो, त्याच्या ठिकाणी साधनाची कल्पना करणे किंवा जो मुक्त झाला आहे त्याच्या ठिकाणी बंधनाची कल्पना करणे योग्य नाही. (१६)

**साधनें जें कांहीं साधावें। तें तों आपणचि स्वभावें।**
**आतां साधकाच्या नांवें। सुन्याकार ॥ १७॥**

साधन करून जे काही साधावयाचे ते साध्य तो स्वाभाविकपणे झाला असल्याने आता साधनाच्या नावे शून्याकार होतो. म्हणजे त्याला साधनाची आवश्यकता उरत नाही.(१७)

**कुल्लाळ पावला राजपदवी। आतां रासभें कासया राखावीं।**
**कुल्लाळपणाची उठाठेवी। कासया पाहिजे ॥ १८॥**

कुंभाराला राज्यपद प्राप्त झाल्यावर त्याने आता गाढवे कशाला राखावी? आता त्याला कुंभाराच्या व्यवसायाची उठाठेव कशाला हवी? (१८)

**तैसा अवघा वृत्तीभाव। नाना साधनाचा उपाव।**
**साध्य जालियां कैंचा ठाव। साधनासी ॥ १९॥**

त्याप्रमाणे प्रत्येक साधन हे वृत्तिमयच असल्याने शेवटी वृत्ती वाढविण्यासच कारण होते. पण एकदा साध्याशी एकरूप झाल्यावर साधनाला वावच उरत नाही. (१९)

**साधनें काय साधावें। नेमें काये फळ घ्यावें।**
**आपण वस्तु भरंगळावें। कासयासी ॥ २०॥**

आत्मवस्तू आपण स्वतःच असताना साधनाने काय साधायचे किंवा नेमधर्माने काय फळ साध्य करून घ्यायचे आणि उगीच भरकटायचे कशाला? (२०)

**देह तरी पांचा भूतांचा। जीव तरी अंश ब्रह्मींचा।**
**परमात्मा तरी अनन्याचा। ठाव पाहा ॥ २१॥**

तू जर स्वतःला देह मानत असशील, तर देह तर पंचमहाभूतांचा आहे. जीव जर मानत असशील तर तो परब्रह्माचा अंश आहे. आणि परमात्मा जर समजत असशील तर त्याच्याशी एकरूप कसे होता येईल, त्याचा शोध घे. (२१)

**उगेंचि पाहातां मीपण दिसे। शोध घेतां कांहींच नसे।**
**तत्वें तत्व निरसें। पुढें निखळ आत्मा ॥ २२॥**

उगीच देहबुद्धीने पाहू लागले की 'मी देह' असे वाटते, पण शोध घेऊ लागल्यावर देह पंचभौतिक हे कळल्याने 'मी' राहात नाही. नंतर तत्त्वाने तत्त्वांचा निरास झाला की, निखळ आत्मा तेवढा उरतो (२२)

**आत्मा आहे आत्मपणें। जीव आहे जीवपणें।**
**माया आहे मायापणें। विस्तारली ॥ २३॥**

आत्मा आत्मपणाने असतो, जीव जीवपणाने असतो आणि माया मायापणाने म्हणजे मिथ्यात्वाने विस्तार पावलेली असते. (२३)

ऐसें अवघेंचि आहे। आणी आपणहि कोणीयेक आहे।
हें सकळ शोधून पाहे। तोचि ज्ञानी ॥ २४॥

हे सगळे असते आणि त्यांना पाहणारा आपण कुणी एक द्रष्टाही असतो. विवेकाने या सगळ्याचा जो कुणी शोध घेतो, तोच ज्ञानी होय. (२४)

शोधूं जाणे सकळांसी। परी पाहों नेणे आपणासी।
ऐसा ज्ञानी येकदेसी। वृत्तिरूपें ॥ २५॥

जो या सगळ्यांचा शोध घेतो, पण आपले स्वरूप जाणत नाही, असा ज्ञानी मीपणाच्या वृत्तीने एकदेशी असतो. (२५)

तें वृत्तिरूप जरी पाहिलें। तरी मग कांहींच नाहीं राहिलें।
प्रकृतिनिरासें अवघेंचि गेलें। विकारवंत ॥ २६॥

त्या वृत्तिरूपाला साक्षीत्वाने पाहिले की, वृत्तीच शिल्लक राहात नाही. प्रकृतीचा निरास झाला की सर्व नाशिवंत नाहीसे होते. (२६)

उरलें ते निखळ निर्गुण। विवंचितां तेंचि आपण।
ऐसी हे परमार्थाची खूण। अगाध आहे ॥ २७॥

आणि केवळ निर्गुण ब्रह्म तेवढे उरते आणि त्याचे अनुसंधान केल्याने आपण ते ब्रह्मच आहोत असा साक्षात अनुभव येतो. अशी ही परमार्थाची खूण अगाध आहे. (२७)

फळ येक आपण येक। ऐसा नाहीं हा विवेक।
फळांचे फळ कोणीयेक। स्वयेंचि होईजे ॥ २८॥

आपण कुणी वेगळा आणि फळ आपल्यापेक्षा वेगळे अशा प्रकारचा हा विवेक नाही. फळांचेही सर्वश्रेष्ठ फळ ते आपणच स्वत: होतो. (२८)

रंक होतां राजा जाला। बरें पाहातां प्रत्यये आला।
रंकपणाचा गल्बला। रंकीं करावा ॥ २९॥

एखादा दीन भिकारी राजा झाला. नीटपणे शोध घेतल्यावर आपण खरेच राजा झालो आहोत, असा प्रत्ययही त्याला आला. मग रंकपणातील किरकिर करण्याची आवश्यकताच त्याला राहात नाही. जो कुणी रंक असेल त्याने ती करावी. (२९)

वेद शास्त्रें पुराणें। नाना साधनें निरूपणें।
सिद्ध साधु ज्याकारणें। नाना सायास करिती॥ ३०॥

सिद्ध, साधू, वेद, शास्त्रे, पुराणे, नाना साधने, नाना निरूपणे ज्यासाठी नाना सायास करतात, (३०)

तें ब्रह्मरूप आपणचि आंगें। सारासारविचारप्रसंगें।
करणें न करणें वाउगें। कांहींच नाहीं ॥ ३१॥

ते ब्रह्मरूप आपण स्वत:च आहोत, असे सारासारविचाराच्या योगे जाणून घ्यावे, म्हणजे करणे, न करणे काहीच उरत नाही.(३१)

रंक राजआज्ञेसि भ्यालें। तेंचि पुढें राजा जालें।
मग तें भयेचि उडालें। रंकपणासरिसें ॥ ३२॥

भिकारी पूर्वी राजाज्ञेला भीत होता. पुढे तोच राजा झाला, त्या वेळी रंकपणाही नष्ट झाला आणि त्याबरोबर पूर्वी राजाज्ञेचे भय वाटत होते, तेही नष्ट झाले. (३२)

वेदें वेदाज्ञेनें चालावें। सच्छास्त्रें शास्त्र अभ्यासावें।
तीर्थें तीर्थास जावें। कोण्याप्रकारें ॥ ३३॥

ज्ञानी पुरुष साक्षात वेदरूप, शास्त्ररूप, तीर्थरूप बनतो. वेदाने वेदाज्ञेचे पालन कसे करावे? सत्-शास्त्रानेच कोणत्या शास्त्राचा अभ्यास कसा करावा? आणि तीर्थाने कुठल्या तीर्थास जावे?(३३)

अमृतें सेवावें अमृत। अनंतें पाहावा अनंत।
भगवंतें लक्षावा भगवंत। कोण्या प्रकारें ॥ ३४॥

अमृताने अमृत कसे सेवावे, अनंताने अनंत कसा पाहावा, किंवा भगवंताने भगवंताचे ध्यान कशा प्रकारे करावे? (३४)

संतें असंत त्यागावे। निर्गुणें निर्गुणासी भंगावें।
स्वरूपें स्वरूपी रंगावें। कोण्याप्रकारें ॥ ३५॥

सदा सर्वत्र स्थित, व्यापक आहे त्याने नसलेल्याचा त्याग कसा करावा बरे? निर्गुणाने निर्गुणाला कसे नष्ट करावे? स्वरूपाने स्वरूपात कोण्या प्रकारे रंगावे? (३५)

अंजनें ल्यावें अंजन। धनें साधावें धन।
निरंजनें निरंजन। कैसें अनुभवावें ॥ ३६॥

अंजनाने अंजन कसे ल्यावे? धनाने धन कसे प्राप्त करावे? निरंजनाने निरंजनास कसे अनुभवावे? (३६)

साध्य करावें साधनासी। ध्येये धरावें ध्यानासी।
उन्मनें आवरावें मनासी। कोण्याप्रकारें ॥ ३७॥

जे साध्य आहे त्याने साधन कसे करावे? जे ध्येय आहे त्याने ध्यान कसे धरावे? आणि उन्मनाने मनाला कसे आवरावे?(३७)

(वरील सर्व गोष्टींचे प्रयोजनच उरत नाही हा भावार्थ आहे.)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'स्थितिनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

दशक नववा समाप्त

❑ ❑

# दशक दहावा : जगज्ज्योती

## दशक १० : समास १

## अंत:कर्ण येक

॥ श्रीराम ॥

**सकळांचे अंत:करण येक। किंवा येक नव्हे अनेक।**
**ऐसें हें निश्चयात्मक। मज निरोपावें ॥ १॥**

श्रोते विचारतात की, प्राणिमात्रांचे अंत:करण एकच आहे की ते वेगळे वेगळे आहे, हे आपण निश्चितपणे आम्हांला सांगावे. (१)

**ऐसें श्रोतयानें पुसिलें। अंत:करण येक किं वेगळालें।**
**याचें उत्तर ऐकिलें। पाहिजे श्रोतीं ॥ २॥**

श्रोत्यांनी जो प्रश्न केला आहे की, सर्वांचे अंत:करण एकच आहे की वेगवेगळे आहे याचे उत्तर आता श्रोत्यांनी ऐकावे. (२)

**समस्तांचें अंत:कर्ण येक। निश्चयो जाणावा नेमक।**
**हा प्रत्ययाचा विवेक। तुज निरोपिला ॥ ३॥**

सर्वांचे अंत:करण एकच आहे, हे निश्चितपणे जाणावे. हा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. तो मी तुला सांगितला. (३)

**श्रोता म्हणे वक्तयासी। अंत:कर्ण येक समस्तांसी।**
**तरी मिळेना येकयेकासी। काये निमित्य ॥ ४॥**

यावर श्रोता वक्त्याला म्हणतो की, सर्वांची अंत:करणे जर एकच आहेत, तर ते एकमेकांशी समरस का होत नाही. (४)

**येक जेवितां अवघे धाले। येक निवतां अवघे निवाले।**
**येक मरतां अवघे मेले। पाहिजेत कीं ॥ ५॥**

असे जर असते, तर एक जेवला असता, तर सर्वांची पोटे भरली असती. एक शांत झाला असता तर सगळे शांत झाले असते. एक मेला असता तर सर्वच मेले, असे व्हायला हवे होते. (५)

**येक सुखी येक दु:खी। ऐसें वर्ततें लोकिकीं।**
**येका अंत:करणाची वोळखी। कैसी जाणावी ॥ ६॥**

जगात एक सुखी तर एक दु:खी असे दिसून येते. तर सर्वांचे अंत:करण एकच आहे असे कसे जाणावे ?(६)

**जनीं वेगळाली भावना। कोणास कोणीच मिळेना।**
**म्हणौन हें अनुमाना। येत नाहीं ॥ ७॥**

जगात प्रत्येकाची भावना वेगवेगळी असते. एकाचे दुसऱ्याशी पटत नाही म्हणून हे म्हणणे पटत नाही. (७)

**अंत:कर्ण येक असतें। तरी येकाचें येकास कळों येतें।**
**कांहीं चोरितांच न येतें। गौप्य गुह्य ॥ ८॥**

सर्वांचे अंत:करण एकच असते, तर एकाच्या मनातील विचार दुसऱ्याला कळले असते. मग एखादी गुप्त गोष्ट चोरून ठेवताच आली नसती. (८)

**याकारणें अनुमानेना। अंतकर्ण येक हें घडेना।**
**विरोध लागला जना। काये निमित्य ॥ ९॥**

म्हणून हा निष्कर्ष काही बरोबर वाटत नाही. अंत:करण एकच आहे हे बरोबर वाटत नाही. जर असे असते, तर एकमेकात विरोध किंवा तकरार का झाली असती ? (९)

**सर्प डसाया येतो। प्राणी भेऊन पळतो।**
**येक अंत:करण तरी तो। विरोध नसावा ॥ १०॥**

सर्प दंश करायला येतो आणि माणूस भिऊन पळू लागतो. जर अंत:करण एक असते, तर असा विरोध दिसला नसता. (१०)

**ऐसी श्रोतयाची आशंका। वक्ता म्हणे चळों नका।**
**सावध होऊन ऐका। निरूपण ॥ ११॥**

अशी श्रोत्यांची शंका ऐकून वक्ता म्हणतो की श्रोत्यांनी आपले मन द्विधा होऊ देऊ नये. या प्रश्नाचे उत्तर त्यांनी सावध होऊन ऐकावे. (११)

**अंत:कर्ण ह्मणिजे जाणीव। जाणीव जाणता स्वभाव।**
**देहरक्षणाचा उपाव। जाणती कळा ॥ १२॥**

अंत:करण म्हणजे जाणीव होय. जाणीव म्हणजे जाणण्याची शक्ती. या जाणिवेमुळेच आपल्याला देहरक्षणाचा उपाय सुचतो. (१२)

**सर्प जाणोन डंखूं आला। प्राणी जाणोन पळाला।**
**दोहींकडे जाणीवेला। बरें पाहा ॥ १३॥**

या जाणिवेच्या प्रेरणेने सर्प डंख करण्यास येतो आणि त्याच जाणिवेच्या योगे तो माणूस दुसरीकडे पळतो. या दोघांमध्ये देहरक्षणाची जाणीवच प्रेरणा देत असते, ते लक्षात घ्यावे. (१३)

**दोहींकडे जाणीवेसी पाहिलें। तरी अंत:कर्ण येकचि जालें।**
**विचारितां प्रत्यया आलें। जाणीवरूपें ॥ १४॥**

दोघांमध्ये जाणिवेची प्रेरणा आहे म्हणून दोघांचे अंत:करण जाणीवरूपाने एकच असले पाहिजे, असा प्रत्यक्ष अनुभव येतो. (१४)

**जाणीवरूपें अंत:कर्ण। सकळांचें येक हें प्रमाण।**
**जीवमात्रांस जाणपण। येकचि असे ॥ १५॥**

जाणीवरूपाने सर्वांचे अंत:करण एकच असते. म्हणजे प्रत्येक जीवमात्रात जाणीव एकच असते.(१५)

**येके दृष्टीचें देखणें। येके जिव्हेचें चाखणें।**
**ऐकणें स्पर्शणें वास घेणें। सर्वत्रांस येक ॥ १६॥**

डोळ्यांनी पाहणे, जिभेने चव घेणे, ऐकणे, स्पर्श करणे, वास घेणे या इंद्रियांच्या क्रियेमागील प्रेरणा देणारी जाणीव सर्वांत एकच असते. (१६)

**पशु पक्षी किडा मुंगी। जीवमात्र निर्माण जगीं।**
**जाणीवकळा सर्वांलगीं। येकचि आहे ॥ १७॥**

पशू, पक्षी, किडा, मुंगी किंबहुना जगात जन्माला आलेला जीव या सर्वांना जाणीव एकच असते.(१७)

**सर्वांस जळ तें सीतळ। सर्वांस अग्नि तेजाळ।**
**सर्वांस अंत:कर्ण केवळ। जाणती कळा ॥ १८॥**

सर्वांना पाणी गारच लागते. अग्नी उष्णच लागतो. याप्रमाणे सर्वांचे अंत:करण म्हणजे जाणीव एकच असते. (१८)

**आवडे नावडे ऐसें जालें। तरी हें देहस्वभावावरी गेलें।**
**परंतु हें कळों आलें। अंत:कर्णयोगें ॥ १९॥**

प्रत्येकाची आवड-निवड ही ज्याच्या-त्याच्या देहस्वभावानुसार असते. पण प्रत्येकाला तिचे ज्ञान जाणिवेच्या अंत:करणाच्या योगेच होते. (१९)

**सर्वांचें अंत:कर्ण येक। ऐसा निश्चयो निश्चयात्मक।**
**जाणती याचें कौतुक। चहुंकडे ॥ २०॥**

तेव्हा सर्वांचे अंत:करण एकच आहे, हे आता अगदी पक्के निश्चित झाले. हेच नवल आपल्याला जगात सर्वत्र पाहायला मिळते. (२०)

**इतुकेन फिटली आशंका। आतां अनुमान करूं नका।**
**जाणणें तितुकें येका। अंत:कर्णाचें ॥ २१॥**

इतके सांगितल्यावर श्रोत्यांची शंका फिटली. आता श्रोत्यांनी उगीच तर्क काढू नयेत. ही जाणीव म्हणजेच जाणणे हे एका अंत:करणाचेच असते.(२१)

**जाणोन जीव चारा घेती। जाणोन भिती लपती।**
**जाणोनियां पळोन जाती। प्राणीमात्र ॥ २२॥**

या जाणीवेमुळेच जीव चारा खातात, भीतीने लपतात. जाणिवेनेच प्राणी पळूनही जातात. (२२)

**किडामुंगीपासून ब्रह्मादिक। समस्तांस अंत:कर्ण येक।**
**ये गोष्टीचें कौतुक। प्रत्यें जाणावें ॥ २३॥**

किडा-मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचे अंत:करण एकच आहे. या गोष्टीचे कौतुक प्रत्येकाने अनुभवाने जाणावे. (२३)

**थोर ल्हान तरी अग्नी। थोडें बहु तरी पाणी।**
**न्यून पूर्ण तरी प्राणी। अंत:कर्णें जाणती ॥ २४॥**

अग्नी लहान असो वा मोठा असो, पाणी थोडे असो की पुष्कळ असो, पाणी ते पाणीच व अग्नी तो अग्नीच असतो. त्याचप्रमाणे मनुष्यप्राण्यात जाणीव कमी असो वा अधिक असो, सर्व प्राणी अंत:करणानेच जाणतात. (२४)

**कोठें उणें कोठें अधीक। परंतु जिनसमासला येक।**
**जंगम प्राणी कोणीयेक। जाटिल्याविण नाहीं ॥ २५॥**

काही प्राण्यांत जाणीव कमी असते, तर काही प्राण्यांत ती जास्त असते. तिचे मूळ स्वरूप एकच असते. कोणीही हालचाल करणारा प्राणी अंत:करणाशिवाय असू शकत नाही. (२५)

**जाणीव ह्मणिजे अंत:कर्ण । अंत:कर्ण विष्णूचा अंश जाण।**
**विष्णू करितो पाळण । येणें प्रकारें ॥ २६ ॥**

अशा प्रकारे जाणीव म्हणजे अंत:करण होय. अंत:करण हा विष्णूचा अंश आहे. अशा प्रकारे विष्णू हा विश्वाचा पालनकर्ता आहे. (२६)

**नेणतां प्राणी संव्हारतो । नेणीव तमोगुण बोलिजेतो।**
**तमोगुणें रुद्र संव्हारितो । येणें प्रकारें ॥ २७ ॥**

ज्यांच्या ठिकाणी जाणीव नसते त्या प्राण्यांचा नाश होतो. म्हणून तमोगुणाचे लक्षण नेणीव हे आहे. अशा रीतीने रुद्र तमोगुणाने संहार करतो. (२७)

**कांहीं जाणीव कांहीं नेणीव । हा रजोगुणाचा स्वभाव।**
**जाणतां नेणतां जीव । जन्मास येती ॥ २८ ॥**

थोडी जाणीव आणि थोडी नेणीव हा रजोगुणाचा स्वभाव आहे. असे जाणीव-नेणीवयुक्त जीव पुन्हा जन्माला येतात. (२८)

**जाणीवेनें होतें सुख । नेणीवेनें होतें दु:ख।**
**सुखदु:ख अवश्यक । उत्पत्तिगुणें ॥ २९ ॥**

जाणिवेने सुख अनुभवण्यास मिळते आणि नेणिवेमुळे दु:ख भोगावे लागते. म्हणून जीव जन्माला आला की त्याला सुख व दु:ख दोन्ही भोगावे लागते. (२९)

**जाणण्यानेणण्याची बुद्धि । तोचि देहीं जाणावा विधी।**
**स्थूळ देहीं ब्रह्मा त्रिशुद्धि । उत्पत्तिकर्ता ॥ ३० ॥**

जाणीव-नेणीवपणाची बुद्धी हाच देहात ब्रह्मदेवाचा अंश जाणावा. स्थूल देहात पुत्रादी उत्पन्न करणारा जो रजोगुण तोच ब्रह्मा असे निश्चयपूर्वक समजावे. (३०)

**ऐसा उत्पत्ति स्थिति संव्हार । प्रसंगें बोलिला विचार।**
**परंतु याचा निर्धार । प्रत्यें पाहावा ॥ ३१ ॥**

या प्रसंगाच्या निमित्ताने उत्पत्ती, स्थिती व संहार यांचे विवेचन येथे केले आहे. परंतु त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन मग याबद्दल आपले मत निश्चित करावे. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अंत:कर्ण येकनाम' समास पहिला समाप्त.**



## दशक १० : समास २

# देहआशंका

॥ श्रीराम ॥

**स्वामीनें विचारदाखविला। येथें विष्णूचा अभाव दिसोन आला।**
**ब्रह्मा विष्णु महेशाला। उरी नाहीं ॥ १ ॥**

श्रोता येथे म्हणत आहे की, स्वामींनी मागील समासात आपल्या स्थूल देहातही ब्रह्मा, विष्णू व महेश आहेत, असा विचार बोलून दाखविला होता. पण आपल्या शरीरात तर ते दिसून येत नाहीत व तसा अनुभवही येत नाही. (१)

**उत्पत्ति स्थिती संव्हार। ब्रह्मा विष्णु महेश्वर।**
**याचा पाहातां विचार। प्रत्ययो नाहीं ॥ २ ॥**

ब्रह्मा, विष्णू व महेश हे उत्पत्ती, स्थिती, संहार करतात असे म्हटले जाते, पण तसा अनुभव मात्र येत नाही. (२)

**ब्रह्मा उत्पत्तिकर्ता चौमुखांचा। येथें प्रत्ययो नाहीं त्याचा।**
**पाळणकर्ता विष्णु चौभुजांचा। तोही ऐकोन जाणों ॥ ३ ॥**

उत्पत्तिकर्ता ब्रह्मा चार मुखांचा असे म्हणतात, पण तसा त्याचा प्रत्यक्ष अनुभव येत नाही. पालनकर्ता विष्णू हा चार भुजांचा आहे असेही ऐकिवातच आहे, पण प्रत्यक्ष अनुभव नाही. (३)

**महेश संव्हार करितो। हाही प्रत्ययो कैसा येतो।**
**लिंगमहिमा पुराणीं तो। विपरीत बोलिला ॥ ४ ॥**

महेश संहार करतो तो कसा हाही प्रत्यक्ष अनुभव नाही. लिंग पुराणात शिवच उत्पत्ती, स्थिती आणि लयकर्ता आहे असे सांगितले आहे. त्या पुराणातील हा महिमाही विचित्रच वाटतो. (४)

**मूळमायेस कोणें केलें। हें तों पाहिजे कळलें।**
**तिही देवांचे रूप जालें। ऐलिकडे ॥ ५ ॥**

मूळ मायेला कोणी उत्पन्न केले, हेही कळले पाहिजे. तिन्ही देवांची उत्पत्ती मायेच्या अलीकडली आहे. (५)

**मूळमाया लोकजननी। तयेपासून गुणक्षोभिणी।**
**गुणक्षोभिणीपासून त्रिगुणी। जन्म देवां ॥ ६ ॥**

मूळमाया हीच सर्व लोकांची जननी आहे. तिच्यापासून गुणक्षोभिणी माया उत्पन्न झाली आणि गुणक्षोभिणी मायेपासून ब्रह्मा, विष्णू व महेश या त्रिगुणी देवांचा जन्म झाला. (६)

**ऐसें बोलती शास्त्रकारक। आणि प्रवृत्तीचेहि लोक।**
**प्रत्यये पुसतां कित्येक। अकांत करिती ॥ ७ ॥**

याप्रमाणे शास्त्रकर्ते व इतर प्रापंचिक लोकही बोलतात. पण त्यांना त्यांच्या अनुभवाविषयी विचारले की, मात्र कित्येक जण अकांडतांडव करतात. (७)

**म्हणोन त्यास पुसावेना। त्यांचेन प्रत्ययो आणवेना।**
**प्रत्ययेंविण प्रेत्न नाना। ठकाठकी ॥ ८ ॥**

म्हणून त्यांना तर विचारावेसेच वाटत नाही आणि त्यांना प्रत्यक्ष अनुभवही आणून देता येत नाही. अनुभवाशिवाय नाना प्रयत्न म्हणजे नुसती फसवणूक आहे. (८)

**प्रचितीवीण वैद्य म्हणवी। उगीच करी उठाठेवी।**
**तया मूर्खाला गोवी। प्राणीमात्र ॥ ९ ॥**

जो मनुष्य वैद्यकी शिकलेला नाही, ज्याला काही अनुभव नाही आणि उगीच स्वत:ला वैद्य म्हणवून घेऊन उठाठेव करतो, त्या मूर्खाला इतर लोक संकटात गोवतात. (९)

**तैसाच हाहि विचार। प्रत्ययें करावा निर्धार।**
**प्रत्ययें नस्तां अंधकार। गुरुशिष्यांसी ॥ १० ॥**

हे देव आणि त्यांच्याविषयीचे अनुभव याबाबतही असाच प्रकार असतो. अनुभव घेऊन काही निर्णय घ्यावा लागतो. अनुभव नसेल तर गुरू आणि शिष्य दोघेही अज्ञानरूपी अंधारात चाचपडत राहतात. (१०)

**बरें लोकांस काये म्हणावें। लोक म्हणती तेंचि बरवें।**
**परंतु स्वामीनें सांगावें। विशद करूनी ॥ ११ ॥**

बरे, लोकांना तरी दोष देण्यात काय अर्थ आहे? लोक म्हणतात, हे मान्य करावेच लागते. परंतु आता खरे काय ते स्वामींनी स्पष्ट करून सांगावे. (११)

म्हणों देवीं माया केली। तरी देवांचीं रूपें मायेंत आलीं।
जरी म्हणों मायेनें माया केली। तरी दुसरी नाहीं ॥ १२॥

देवांनी माया निर्माण केली म्हणावे, तर देवांची रूपेच मायेतून उत्पन्न झाली आहेत. मायेने माया उत्पन्न केली म्हणावे तर माया तर एकच आहे. दुसरी नाही. (१२)

जरी म्हणों भूतीं केली। तरी ते भूतांचीच वळली।
म्हणावें जरी परब्रह्में केली। तरी ब्रह्मीं कर्तुत्व नाहीं॥ १३॥

माया पंचमहाभूतांनी केली म्हणावे तर ती पंचमहाभूते तर मायेतच समाविष्ट आहेत. बरे, ती निर्गुण ब्रह्माने केली म्हणावे तर परब्रह्माच्या ठिकाणी कुठलेही कर्तृत्वच नाही.(१३)

आणी माया खरी असावी। तरी ब्रह्मीं कर्तुत्वाची गोवी।
माया मिथ्या ऐसी जाणावी। तरी कर्तुत्व कैंचें ॥ १४॥

बरे, माया जर खरी असती तर मग ब्रह्माच्या ठिकाणी कर्तृत्व लादता आले असते. पण माया तर मिथ्या (आभासरूपच) आहे हे जाणले की कर्तृत्वाचा प्रश्नच कुठे येतो? (१४)

आतां हें अवघेंचि उगवे। आणी मनास प्रत्यये फावे।
ऐसें केलें पाहिजे देवें। कृपाळुपणें ॥ १५॥

तेव्हा आता ह्या सर्व गोष्टींचा उलगडा व्हावा आणि प्रत्यक्ष अनुभवही यावा असे देवांनी (स्वामींनी) कृपाळूपणाने काही केले पाहिजे, असे श्रोता म्हणाला. (१५)

वेद मातृकावीण नाहीं। मातृका देहावीण नाहीं।
देह निर्माण होत नाहीं। देहावेगळा ॥ १६॥

वेद हे मात्रात्मक आहेत. साडेतीन-(अ, उ, म, व अर्धमात्रा) मात्रा आणि त्यांचा प्रणवात्मक उच्चार यातून वेदांची उत्पत्ती झाली. त्यांचा उच्चार तर देहाशिवाय होत नाही. देहही देहांतूनच निर्माण होत असतात.(१६)

तया देहामधें नरदेहो। त्या नरदेहांत ब्राह्मणदेहो।
तया ब्राह्मणदेहास पाहो। अधिकार वेदीं ॥ १७॥

त्या सर्व देहांत नरदेह श्रेष्ठ आहे. त्यातही ब्राह्मणदेह अधिक श्रेष्ठ व त्या ब्राह्मण देहधारींनाच वेदाचा अधिकार आहे. (१७)

असो वेद कोठून जाले। देह कासयाचे केले।
देव कैसे प्रगटले। कोण्या प्रकारें ॥ १८॥

असो. वेद कोठून आले? देह कशा प्रकारे उत्पन्न झाले? देव कसे प्रगटले? (१८)

ऐसा बळवला अनुमान। केलें पाहिजे समाधान।
वक्ता म्हणे सावधान। होईं आतां ॥ १९॥

असे अनेक तर्क श्रोत्याच्या मनात उत्पन्न झाले. याचे समाधान आता केले पाहिजे. म्हणून वक्ता म्हणाला की, आता नीट सावध होऊन ऐक. (१९)

प्रत्यये पाहातां सांकडी। अवघी होते विघडाविघडी।
अनुमानितां घडीनें घडी। काळ जातो ॥ २०॥

अनुभव घेऊन पाहावे म्हटले की अडचण उत्पन्न होते व शास्त्रांशी त्यांचा मेळ जमला नाही की सगळेच बिघडून जाते आणि मग निरनिराळे तर्क करता करता घडीने घडी आयुष्यातील काळ निघून जातो. (२०)

लोकधाटी शास्त्रनिर्णये। येथें बहुधा निश्चये।
म्हणोनियां येक प्रत्यये। येणार नाहीं ॥ २१॥

जनरूढी आणि शास्त्रांचा निर्णय यांत खूप अंतर दिसून येते. त्यांतही एक मत नसते, म्हणून एकच अनुभव येत नाही. (२१)

आतां शास्त्राची भीड धरावी। तरी सुटेना हे गथागोवी।
गथागोवी हे उगवावी। तरी शास्त्रभेद दिसे ॥ २२॥

आता शास्त्राची भीड धरावी तर ही गुंतागुंत काही सुटत नाही. ही गुंतागुंत सोडवायचा प्रयत्न करावा, तर शास्त्रवचनांत मतभेद आढळून येतात. (२२)

शास्त्र रक्षून प्रत्यये आणिला। पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत पाहिला।
शाहाणा मूर्ख समजाविला। येका वचनें ॥ २३॥

शास्त्रवचनही प्रमाण मानावे व अनुभवही घेऊन पाहावा. पूर्वपक्षाचे खंडन करून सिद्धांत जाणून घ्यावा. अनुभवाच्या व शास्त्राच्या आधारे एकच वचन असे उच्चारावे की, शहाण्या व मूर्ख माणसाचेही त्याने समाधान व्हावे. (२३)

शास्त्रींच पूर्वपक्ष बोलिला। पूर्वपक्ष म्हणावें लटक्याला।
विचार पाहाता आम्हांला। शब्द नाहीं ॥ २४॥

शास्त्रातच अशी पद्धत आहे की पूर्वपक्ष मांडला जातो, तो लटिकाच असतो व नंतर तो खोडून काढला जातो. म्हणून हा विचार करून आम्ही पूर्वपक्षाचे खंडन केले, तर आम्हांला त्यात दोष देऊ नये. (२४)

तथापि बोलें कांहींयेक। शास्त्र रक्षून कौतुक।
श्रोतीं सादर विवेक। केला पाहिजे ॥ २५॥

तथापि शास्त्राचेही रक्षण करून या विषयाचे कौतुकाने जे विवेचन केले जाईल, त्यावर श्रोत्यांनी आदरपूर्वक विचार केला पाहिजे, असे वक्ता म्हणाला. (२५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहआशंकानाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक १० : समास ३

# देहआशंकाशोधन

॥ श्रीराम ॥

उपाधीविण जें आकाश। तेंचि ब्रह्म निराभास।
तें निराभासीं मूळमायेस। जन्म जाला ॥ १॥

वक्ता सांगू लागला की, शून्यत्वाच्या उपाधीशिवाय जे आकाश की ज्याच्या ठिकाणी कुठलाही भास नाही, असे ब्रह्म होय. त्या निराभास ब्रह्माच्या ठिकाणी स्फुरणरूप मूळ मायेचा जन्म झाला. (१)

तें मूळमायेचें लक्षण। वायोस्वरूपचि जाण।
पंचभूतें आणि त्रिगुण। वायोआंगीं ॥ २॥

त्या मूळमायेचे लक्षण म्हणजे चंचलत्व. ती वायुस्वरूप असून तिच्यातच पंचमहाभूते आणि त्रिगुण, हे अत्यंत सूक्ष्म रूपात असतात. (२)

आकाशापासून वायो जाला। तो वायोदेव बोलिला।
वायोपासून अग्नी जाला। तो अग्निदेव ॥ ३॥

आकाशापासून वायू झाला, त्याला वायुदेव असे म्हणतात. पुढे वायूपासून अग्नी निर्माण झाला, त्याला अग्निदेव म्हणतात. (३)

अग्नीपासून जालें आप। तें नारायेणाचें स्वरूप।
आपापासून पृथ्वीचें रूप। तें बीजाकारें ॥ ४॥

अग्नीपासून जलतत्त्व निर्माण झाले. तेच नारायणाचे स्वरूप आहे. आपापासून बीजाच्या आकाराने पृथ्वी निर्माण झाली. (४)

ते पृथ्वीचे पोटीं पाषाण। बहु देवांचें लक्षण।
नाना प्रचित प्रमाण। पाषाणदेवीं ॥ ५॥

त्या पृथ्वीच्या पोटात अनेक पाषाण असतात. त्यांपैकी काहींमध्ये पुष्कळ देवांची लक्षणे आढळून येतात व या पाषाणदेवांची अनेकांना प्रचीतीही येते. (५)

नाना वृक्ष मृत्तिका। प्रचित रोकडी विश्वलोकां।
समस्त देवांचा थारायेका। वायोमध्यें ॥ ६॥

नाना वृक्ष, मातीच्या मूर्ती यांमध्येही जगातील लोकांना देवत्वाचा रोकडा अनुभव येतो. समस्त देवांचा आश्रय वायू हाच असतो. वृक्ष, पाषाण, मृत्तिकादी सर्वांत वायू हा असतोच. (६)

देव यक्षिणी कात्यायेणी। चामुंडा जखिणी मानविणी।
नाना शक्ति नाना स्थानीं। देशपरत्वें ॥ ७॥

देशपरत्वे देव, यक्षिणी, कात्यायनी, चामुंडा, जाखिणी, मानविणी वगैरे नाना रूपांत निरनिराळ्या ठिकाणी शक्तिरूपात देवता वास करतात. (७)

पुरुषनामें कित्येक। देव असती अनेक।
भूतें देवतें नपुषक। नामें बोलिजेती ॥ ८॥

पुरुषवाचक असे कित्येक देव आहेत. तर भूते, दैवते ही नपुसक लिंगी नावे असणारी ही अनेक दैवते आहेत. (८)

देव देवता देवतें भूतें। पृथ्वीमध्यें असंख्यातें।
परंतु या समस्तांतें। वायोस्वरूप बोलिजे ॥ ९॥

या पृथ्वीवर असंख्य देव, देवता, दैवते, भूते आदी आहेत. पण ही सर्व वायुस्वरूपच आहेत. (९)

वायोस्वरूप सदा असणें। प्रसंगें नाना देह धरणें।
गुप्त प्रगट होणें जाणें। समस्तांसी ॥ १०॥

नेहमी ती वायुस्वरूपातच असतात. काही प्रसंगाने ती नाना देह धारण करतात. कधी ती गुप्त असतात, तर कधी प्रगट होतात. हा प्रकार सर्वच देवतांबाबत चालतो. (१०)

वायोस्वरूपें विचरती। वायोमध्यें जगज्जोती।
जाणतीकळा वासना वृत्ति। नाना भेदें ॥ ११॥

ती सर्व वायुरूपाने संचार करीत असतात. वायूमध्ये असलेल्या चैतन्याची, जगज्ज्योतीचीच, जाणीव, वासना, वृत्ती इत्यादी वेगवेगळी नावे आहेत. (११)

आकाशापासून वायो जाला। तो दों प्रकारें विभागला।
सावधपणें विचार केला। पाहिजे श्रोतीं ॥ १२॥

आकाशापासून वायू झाला तो दोन प्रकारांत विभागला गेला. त्यासंबंधी श्रोत्यांनी सावधपणे विचार करणे आवश्यक आहे. (१२)

येक वारा सकळ जाणती। येक वायोमधील जगज्जोती।
जगज्जोतीच्या अनंत मूर्ती। देवदेवतांच्या ॥ १३॥

एक ज्यास आपण वारा असे म्हणतो, त्यास तर सर्वच जाणतात. दुसऱ्यास प्राणशक्ती किंवा वायूमधील जगज्ज्योती असे म्हणतात. अनेक देवदेवतांच्या अनंत मूर्तींच्या मध्ये ही जगज्ज्योती म्हणजे प्राणशक्तीच व्यापून असते. (१३)

वायो बहुत विकारला। परंतु दों प्रकारें विभागला।
आतां विचार ऐकिला। पाहिजे तेजाचा ॥ १४॥

याप्रमाणे वायू अनेक प्रकारे विकार पावला, परंतु तो मुख्यत: दोन प्रकारांत विभागलेला आहे. आता तेजाचा विचार ऐकून घेतला पाहिजे. (१४)

वायोपासून तेज जालें। उष्ण सीतळ प्रकाशलें।
द्विविध रूप ऐकिलें। पाहिजे तेजाचें ॥ १५॥

वायूपासून तेज झाले. तेही उष्ण आणि शीतल या दोन प्रकाराने प्रकाशते. त्या तेजाच्या द्विविध रूपाचे वर्णन ऐकले पाहिजे. (१५)

उष्णापासून जाला भानु। प्रकाशरूप दैदीप्यमानु।
सर्वभक्षक हुताशनु। आणी विद्युल्यता ॥ १६॥

उष्ण तेजापासून अत्यंत देदीप्यमान प्रकाशरूप सूर्य आणि सर्वभक्षक अग्नी आणि वीज निर्माण झाली. (१६)

सीतळापासून आप अमृत। चंद्र तारा आणी सीत।
आतां परिसा सावचित्त। होऊन श्रोते ॥ १७॥

शीतल भागापासून जल, अमृत, चंद्र, तारा आणि थंडपणा निर्माण झाला. श्रोत्यांनी आता सावधचित्त होऊन सर्व ऐकावे. (१७)

तेज बहुत विकारलें। परंतु द्विविधाच बोलिलें।
आपहि द्विविधाच निरोपिलें। आप आणी अमृत ॥ १८॥

तेजाचाही खूप विस्तार झाला, पण तेही दोन प्रकारांतच विभागले आहे. त्याप्रमाणेच आप हेही दोनच प्रकारात विभागले गेले आहे. एक आप व दुसरे अमृत होय. (१८)

ऐकें पृथ्वीचा विचार। पाषाण मृत्तिका निरंतर।
आणीक दुसरा प्रकार। सुवर्ण परीस नाना रत्नें ॥ १९॥

आता पृथ्वीचा विचार ऐका. एक प्रकार म्हणजे पाषाण मृत्तिका. यात तर फरक नाही. आणि दुसरा प्रकार म्हणजे सुवर्ण, परीस व नानारत्ने हा होय. (१९)

बहुरत्ना वसुंधरा। कोण खोटा कोण खरा।
अवघें कळे विचारा- । रूढ होतां ॥ २०॥

'बहुरत्ना वसुंधरा' असे म्हणतात, पण कोण खरा, कोण खोटा हे विचारारूढ झाल्यावरच कळून येते. (२०)

मनुष्यें कोठून जालीं। हे मुख्य आशंका राहिली।
पुढें वृत्ति सावध केली। पाहिजे श्रोतीं ॥ २१॥

मनुष्ये कुठून आली ही मूळ शंका अजून तशीच राहिली आहे. म्हणून त्याचे उत्तर ऐकण्यासाठी श्रोत्यांनी वृत्ती सावध केली पाहिजे. (२१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहआशंकाशोधननाम' समास तिसरा समाप्त.

❑ ❑

## दशक १० : समास ४

## बीजलक्षण

॥ श्रीराम ॥

आतां पाहों जातां उत्पत्ती। मनुष्यांपासून मनुष्यें होती।
पशुपासून पशु निपजती। प्रत्यक्ष आतां ॥ १॥

वक्ता म्हणतो की, आता उत्पत्तीसंबंधी पाहू गेले तर असे दिसून येते की, मनुष्यापासून मनुष्याची उत्पत्ती होते, पशूपासून पशूंची उत्पत्ती होते, हे आपण प्रत्यक्ष पाहातोच. (१)

खेचरें आणी भूचरें। वनचरें आणी जळचरें।
नाना प्रकारीचीं शरीरें। शेरीरांपासून होती ॥ २॥

आकाशगामी, पृथ्वीवर विचरण करणारे, वनात आणि जळात राहाणारे प्राणी यांची नाना प्रकारची शरीरे शरीरापासूनच उत्पन्न होतात. (२)

प्रत्यक्षास आणी प्रमाण। निश्चयास आणि अनुमान।
मार्ग देखोन आडरान। घेऊंच नये ॥ ३॥

जी गोष्ट प्रत्यक्ष दिसून येते, तिला प्रमाण देण्याची आवश्यकता नसते व जी गोष्ट निश्चित असते तिच्यासंबंधी अनुमान करण्याची जरूर नसते. सरळ असलेला रस्ता सोडून उगीच आडरानात शिरू नये. (३)

विपरीतापासून विपरीतें होती । परी शरीरेंच बोलिजेती ।
शरीरावांचून उत्पत्ती । होणार नाहीं ॥ ४ ॥

संकरित प्रजेपासून (उदा. खेचर इत्यादी) संकरित प्रजाच उत्पन्न होते, पण तीही शरीरापासूनच होते. शरीरावाचून उत्पत्ती होऊच शकत नाही. (४)

तरी हे उत्पत्ति कैसी जाली । कासयाची कोणें केली ।
जेणें केली त्याची निर्मिली । काया कोणें ॥ ५ ॥

तरी ही उत्पत्ती कशी झाली, कोणी व का केली, ज्याने केली त्याचा देह कोणी निर्माण केला? (५)

ऐसें पाहातां उदंड लांबलें । परी मुळीं शेरीर कैसें जालें ।
कासयाचें उभारिलें । कोणें कैसें ॥ ६ ॥

अशा रीतीने विचार करू लागले तर खूपच लांबड लागेल. प्रथम हे शरीर मुळात झाले तरी कसे? ते कशाचे केले आहे? कोणी व कसे केले आहे? (६)

ऐसी हे मागील आशंका । राहात गेली ते ऐका ।
कदापी जाजु घेऊं नका । प्रत्ययो आलियानें ॥ ७ ॥

अशी ही मागे विचारलेली शंका अजून तशीच राहिली आहे म्हणून त्याचे उत्तर आता ऐका. पण प्रत्यय आल्यावर मात्र कधीही दुराग्रह धरू नका. (७)

प्रत्ययोचि आहे प्रमाण । मूर्खास वाटे अप्रमाण ।
पिंडें प्रचितशब्दें जाण । विश्वासासी ॥ ८ ॥

प्रत्ययच प्रमाण मानला पाहिजे. पण मूर्खाला तो अप्रमाण वाटतो. पण या देहात जीवाला अनुभवामुळेच विश्वास निर्माण होतो. (८)

ब्रह्मीं मूळमाया जाली । तेचि अष्टधा प्रकृति बोलिली ।
भूतीं त्रिगुणीं कालवली । मूळमाया ॥ ९ ॥

ब्रह्माच्या ठिकाणी मूळमाया उत्पन्न झाली. तिलाच अष्टधा प्रकृती असे म्हणतात. पंचमहाभूते व त्रिगुण हे तिच्या ठिकाणी सूक्ष्म अंशाने मिसळलेले असतात. (९)

ते मूळमाया वायोस्वरूप । वायोमध्यें जाणीवेचें रुप ।
तेचि इच्छा परी आरोप । ब्रह्मीं न घडे ॥ १० ॥

ती मूळ माया वायुस्वरूप असते. वायूमध्येच जाणीव असते. जाणीव म्हणजेच इच्छा होय. पण तिचा आरोप परब्रह्मावर करता येत नाही. (१०)

तथापि ब्रह्मीं कल्पिला । तरी तो शब्द वायां गेला ।
आत्मा निर्गुण संचला । शब्दातीत ॥ ११ ॥

तरी पण जर इच्छेचा आरोप परब्रह्माच्या ठिकाणी कल्पिला, तर ते म्हणणे व्यर्थ ठरते. कारण आत्मा हा निर्गुण, सर्वत्र कोंदाटलेला असूनही शब्दातीत आहे. (११)

आत्मा निर्गुण वस्तु ब्रह्म । नाममात्र तितुका भ्रम ।
कल्पून लाविला संभ्रम । तरी तो लागणार नाहीं ॥ १२ ॥

आत्मा म्हणजेच निर्गुण ब्रह्म वस्तू होय. जितकी नामे आहेत तो सर्व भ्रम आहे. कल्पनेने त्याच्यावर भ्रमाने नामरूपाचे अवडंबर लादण्याचा प्रयत्न केला, तरी तो सफल होणार नाही (१२)

तथापि आग्रहें लाविला । जरी धोंडा मारिला आकाशाला ।
आकाशावरी कुंथिला । तरी तें तुटेना ॥ १३ ॥

तरीही आग्रहाने तसा प्रयत्न केला तर, आकाशाला दगड मारला किंवा त्याच्यावर कुणी थुंकले तरी आकाशापर्यंत कुठलीही वस्तू, पदार्थ पोहोचूच शकत नाही. (१३)

तैसें ब्रह्म निर्विकार । निर्विकारीं लाविती विकार ।
विकार नासे निर्विकार । जैसें तैसें ॥ १४ ॥

त्याप्रमाणेच ब्रह्म निर्विकार असल्याने त्याच्यावर विकाराचा आरोप केला असता, विकार नाश पावतात, निर्विकार ब्रह्म जसेच्या तसेच असते. (१४)

आतां ऐका प्रत्ययो । जाणोनि धरावा निश्चयो ।
तरीच पाविजे जयो । अनुभवाचा ॥ १५ ॥

आता प्रत्यक्ष अनुभव सांगतो, तो नीट जाणून त्याप्रमाणे मनात दृढ निश्चय करावा. म्हणजे तुम्हांलाही स्वत:ला तसा अनुभव येईल. (१५)

मायाब्रह्मीं जो समीर । त्यांत जाणता तो ईश्वर ।
ईश्वर आणि सर्वेश्वर । तयासीच बोलिजे ॥ १६ ॥

ब्रह्माच्या ठिकाणी वायुस्वरूप जी मूळमाया झाली, तिच्या ठिकाणची जी जाणीवकळा तोच ईश्वर होय. त्यालाच ईश्वर, सर्वेश्वर असे म्हणतात. (१६)

तोचि ईश्वर गुणासी आला । त्याचा त्रिगुणभेद जाला ।
ब्रह्मा विष्णु महेश उपजला । तये ठाईं ॥ १७ ॥

त्याच ईश्वरापासून म्हणजे जाणिवेपासून गुणमाया झाली. त्यातून रज, सत्त्व, व तम असे त्रिगुण वेगवेगळे झाले. त्यातूनच ब्रह्मा, विष्णू व महेश उत्पन्न झाले. (१७)

सत्व रज आणि तम। हे त्रिगुण उत्तमोत्तम।
यांच्या स्वरूपाचाअनुक्रम। मागां निरोपिला ॥ १८॥

सत्त्व, रज, आणि तम हे उत्तमोत्तम त्रिगुण असून त्यांच्या स्वरूपाचा अनुक्रम पूर्वी वर्णन केला आहे.(१८)

जाणता विष्णू भगवान। जाणतानेणता चतुराननं।
नेणता महेश पंचानन। अत्यंत भोळा ॥ १९॥

(सत्वगुणमय) जाणता तो विष्णू भगवान होय. (रजोगुणमय) म्हणजेच जाणीवनेणीवयुक्त तो चतुरानन ब्रह्मदेव होय आणि (तमोगुणमय) नेणीवयुक्त अत्यंत भोळा पंचमुख महेश जाणावा. (१९)

त्रिगुण त्रिगुणीं कालवले। कैसे होती वेगळाले।
परी विशेष न्यून भासले। ते बोलावे लागती ॥ २०॥

त्रिगुण खरे तर एकमेकांत मिसळलेलेच आहेत. त्यांना वेगळे कसे करणार? पण ते जसे कमी-अधिक भासतील, त्याप्रमाणे त्यांचे वर्णन करावे लागते.(२०)

वायोमध्यें विष्णु होता। तो वायोस्वरूपचि तत्वतां।
पुढें जाला देहधर्ता। चतुर्भुजु ॥ २१॥

मूळ मायेत सत्त्वगुणरूपाने विष्णू वायुरूपच निराकार होता, तोच पुढे चतुर्भुज देह धारण करणारा झाला.(२१)

तैसाच ब्रह्मा आणि महेश। देह धरिती सावकास।
गुप्त प्रगट होतां तयांस। वेळ नाहीं ॥ २२॥

त्याचप्रमाणे रजोगुणापासून ब्रह्मदेव आणि तमोगुणापासून महेश यथावकाश देहधारी झाले. त्यांना गुप्त, प्रगट होण्यास मुळीच वेळ लागत नाही. (२२)

आतां रोकडी प्रचिती। मनुष्यें गुप्त प्रगटती।
मां त्या देवांच्याच मूर्ती। सामर्थ्यवंत ॥ २३॥

आता रोकडा अनुभव पाहा. मनुष्य सुद्धा जर गुप्त होतात, प्रगट होतात हे आपल्याला प्रत्यक्ष अनुभवास येते, तर मग या सर्व अत्यंत सामर्थ्यसंपन्न देवतांच्याच मूर्ती. मग त्यांना हे अशक्य कसे असेल? (२३)

देव देवता भूतें देवतें। चढतें सामर्थ्य आहे तेथें।
येणेंचि न्यायें राक्षसांतें। सामर्थ्यकळा ॥ २४॥

देव, देवता, भूते, दैवते यांच्या ठिकाणी उत्तरोत्तर अधिक सामर्थ्य असते. त्याचप्रमाणे राक्षसांच्या अंगीही त्याच प्रकारचे सामर्थ्य आढळून येते. (२४)

झोटिंगवायोस्वरूपअसती। सवेंच खुळखुळं चालती।
खोबरीं खारिका टाकून देती। अकस्मात ॥ २५॥

झोटिंग वायुस्वरूपच असतात. ते दिसत नाहीत, पण माणसाबरोबर चालू लागले की खुळखुळ आवाज मात्र ऐकू येतो. व ते अचानक खारीक-खोबरे वगैरे वस्तूही टाकून देतात. (२५)

अवघेंचि न्याल अभावें। तरी हें बहुतेकांस ठावें।
आपुलाल्या अनुभवें। विश्वलोक जाणती ॥ २६॥

आता हे सर्वच खोटे मानाल, त्यावर श्रद्धा जर न ठेवाल तर या गोष्टी घडतात हे अनेक जणांना माहीत आहे. जगातील लोक आपापल्या अनुभवावरूनच या गोष्टी जाणतात. (२६)

मनुष्ये धरिती शरीरवेष। नाना परकायाप्रवेश।
मां तो परमात्मा जगदीश। कैसा न धरी ॥ २७॥

मनुष्यसुद्धा वेगवेगळी शरीरे व वेष धारण करू शकतात, परकायाप्रवेश करू शकतात. मग तो परमात्मा जगदीश अशा गोष्टी का बरे करू शकणार नाही?(२७)

म्हणोनि वायोस्वरूपें देह धरिले। ब्रह्मा विष्णु महेश जाले।
पुढें तेचि विस्तारले। पुत्रपौत्रीं ॥ २८॥

म्हणून वायुस्वरूप जाणिवेने जे देह धरले तेच ब्रह्मा, विष्णू, महेश झाले व पुढे मुले, नातवंडे यांच्या रूपाने तेच विस्तार पावले. (२८)

अंतरींच स्त्रिया कल्पिल्या। तों त्या कल्पितांच निर्माण जाल्या।
परी तयापासून प्रजा निर्मिल्या। नाहींत कदा ॥ २९॥

त्यांनी अंतरांतच स्त्रियांची कल्पना केली आणि कल्पना करताच त्या निर्माण झाल्या. पण त्यांच्यापासून त्यांनी कधीही प्रजा निर्माण केली नाही. (२९)

इछून पुत्र कल्पिले। ते ते प्रसंगीं निर्माण जाले।
येणें प्रकारें वर्तले। हरिहरादिक ॥ ३०॥

हरिहरादिकांनी पुत्रांची कल्पना केली आणि त्या त्या प्रसंगी ते निर्माण झाले. याप्रकारे हे त्रिदेव वागले. (३०)

पुढें ब्रह्मयानें सृष्टी कल्पिली। इछेसरिसी सृष्टी जाली।
जीवसृष्टि निर्माण केली। ब्रह्मदेवें ॥ ३१ ॥

पुढे ब्रह्मदेवाने प्रथम सृष्टीची कल्पना केली. त्या इच्छेसरशी सृष्टी निर्माण झाली. नंतर ब्रह्मदेवानेच जीवसृष्टी निर्माण केली. (३१)

नाना प्रकारीचे प्राणी कल्पिले। इछेसरिसे निर्माण जाले।
अवघे जोडेचि उदेले। अंडजजारजादिक ॥ ३२ ॥

नाना प्रकारच्या प्राण्यांची त्यांनी कल्पना केली आणि त्यांच्या इच्छेसरसे ते निर्माण झाले. नंतर त्यांनी सर्व अंडज, जारज इत्यादी नर-मादी जोडेच निर्माण केले. (३२)

येक जळस्वेदापासून जाले। ते प्राणी स्वेदज बोलिले।
येक वायोकरितां जाले। अकस्मात उद्बिज ॥ ३३ ॥

घामाच्या जलापासून झाले, त्यांना स्वेदज म्हणतात. दुसरे वायूतून अचानक निर्माण झाले त्यांना उद्भिज्ज म्हणजे वृक्षादी, जे जमीन फोडून उगवणारे म्हणतात. (३३)

मनुष्यांची गौडविद्या। राक्षसांची वोडंबरीविद्या।
ब्रह्मयाची सृष्टिविद्या। येणें प्रकारें ॥ ३४ ॥

मनुष्याची गौडविद्या, राक्षसांची वोडंबरीविद्या तशीच, ब्रह्मदेवाची विद्या आहे, तिला सृष्टिविद्या म्हणतात. (३४)

कांहींयेक मनुष्यांची। त्याहून विशेष राक्षेसांची।
त्याहून विशेष ब्रह्मयाची। सृष्टिविद्या ॥ ३५ ॥

मनुष्यांची गौडविद्या काही थोड्या वस्तू निर्माण करते, त्याहून राक्षसांची वोडंबरी विद्या बऱ्याच अधिक वस्तू निर्माण करते. पण ब्रह्मदेवाची सृष्टिविद्या त्याहूनही अधिक म्हणजे संपूर्ण सृष्टी निर्माण करते. (३५)

जाणते नेणते प्राणी निर्मिले। वेद वदोन मार्ग लाविले।
ब्रह्मयानें निर्माण केले। येणें प्रकारें ॥ ३६ ॥

ब्रह्मदेवाने जाणते व नेणते प्राणी निर्माण केले. नंतर वेद निर्माण करून त्यांना मार्गदर्शनही केले. याप्रकारे हे सर्व ब्रह्मदेवाने निर्मिले. (३६)

मग शरीरांपासून शरीरें। सृष्टि वाढली विकारें।
सकळ शरीरे येणें प्रकारें। निर्माण जालीं ॥ ३७ ॥

यानंतर पुढे शरीरापासून शरीरे निर्माण झाली आणि सृष्टीचा प्रचंड विस्तार झाला. याप्रमाणे सर्व शरीरे निर्माण झाली. (३७)

येथें आशंका फिटली। सकळ सृष्टी विस्तारली।
विचार पाहातां प्रत्यया आली। येथान्वयें ॥ ३८ ॥

येथे आता शंका नाहीशी झाली. सकळ सृष्टी याप्रमाणे विस्तार पावली. याचा प्रत्यक्ष अनुभवही यथानुक्रमे आपल्याला येतो. (३८)

ऐसी सृष्टि निर्माण केली। पुढें विष्णूनें कैसी प्रतिपाळिली।
हेहि विवंचना पाहिली। पाहिजे श्रोतीं ॥ ३९ ॥

अशा या सृष्टीचा प्रतिपाळ विष्णूने कसा केला, हेही श्रोत्यांनी विचारपूर्वक जाणून घेतले पाहिजे. (३९)

सकळ प्राणी निर्माणजाले। ते मूळरूपें जाणोन पाळिले।
शरीरें दैत्य निर्दाळिले। नाना प्रकारींचे ॥ ४० ॥

सर्व प्राणी निर्माण झाले. त्यांचा जाणीव या मूळ रूपाने प्रतिपाळ केला (म्हणजे प्रत्येक प्राणी जाणिवेनेच स्वसंरक्षण करीत असतो) आणि स्थूल शरीरे घेऊन दैत्यांचा संहार विष्णूंनी केला. (४०)

नाना अवतार धरणें। दुष्टांचा संव्हार करणें।
धर्म स्थापायाकारणें। विष्णूस जन्म ॥ ४१ ॥

दुष्टांचा संहार करण्यासाठी आणि धर्माची स्थापना करण्यासाठी विष्णूला नाना अवताररूपाने जन्म घ्यावा लागतो. (४१)

म्हणोन धर्मस्थापनेचे नर। तेहिं विष्णूचे अवतार।
अभक्त दुर्जन रजनीचर। सहजचि जाले ॥ ४२ ॥

म्हणून धर्माची स्थापना करणारे सज्जनही विष्णूचे अवतारच जाणावेत. साहजिकच अभक्त दुर्जन हे राक्षस जाणावे. (४२)

**आतां प्राणी जे जन्मले। ते नेणोन संव्हारले।**
**मूळरूपें संव्हारिले। येणें प्रकारें ॥ ४३ ॥**

आता जे जे प्राणी जन्माला येतात त्यांचा नेणीव या मूळरूपाने संहार केला जातो. नेणीव म्हणजे अज्ञानानेच प्राण्यांचा संहार होत असतो. (४३)

**शरीरें रुद्र खवळेल। तैं जीवसृष्टि संव्हारेल।**
**अवघें ब्रह्मांडचि जळेल। संव्हारकाळीं ॥ ४४ ॥**

ज्या वेळी प्रलयकाळ येईल, त्या वेळी महेश स्थूलरूपाने खवळेल आणि सर्व जीवसृष्टीचा संहार होऊन अवघे ब्रह्मांडच जळून भस्मसात होईल. (४४)

**एवं उत्पत्ती स्थिती संव्हार। याचा ऐसा आहे विचार।**
**श्रोतीं होऊन तत्पर। अवधान द्यावें ॥ ४५ ॥**

याप्रमाणे उत्पत्ती, स्थिती, संहार याप्रकारे होत असतो. तरी आता श्रोत्यांनी तत्पर होऊन अवधान द्यावे. (४५)

**कल्पांतीं संव्हार घडेल। तोचि पुढें सांगिजेल।**
**पंचप्रळय वोळखेल। तोचि ज्ञानी ॥ ४६ ॥**

कल्पांताच्या वेळी संहार कसा घडेल हे पुढे सांगितले जाईल. एकूण पाच प्रलय आहेत. ते जो जाणून घेईल, तोच खरा ज्ञानी होय. (४६)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'बीजलक्षणनाम' समास चौथा समाप्त.**

❑ ❑

## दशक १० : समास ५

## पंचप्रळयनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ऐका प्रळयाचें लक्षण। पिंडीं दोनी प्रळये जाण।**
**येक निद्रा येक मरण। देहांतकाळ ॥ १ ॥**

श्री समर्थ म्हणतात की, आता प्रलयाचे लक्षण जाणून घ्या. पिंडाच्या ठिकाणी दोन प्रलय होतात. एक निद्रा आणि दुसरा देहांतकाळ म्हणजेच देहाचे मरण होय. (१)

**देहधारक तिनी मूर्ती। निद्रा जेव्हां संपादिती।**
**तो निद्राप्रळय श्रोतीं। ब्रह्मांडींचा जाणावा ॥ २ ॥**

देहधारी त्रिदेव म्हणजे ब्रह्मा, विष्णू व महेश ज्या वेळी निद्रा घेतात, तो ब्रह्मांडातील निद्राप्रलय जाणावा. (२)

**तिनी मूर्तीस होईल अंत। ब्रह्मांडास मांडेल कल्पांत।**
**तेव्हां जाणावा नेमस्त। ब्रह्मप्रळये जाला ॥ ३ ॥**

ज्या वेळी या तिन्ही देवांचा अंत होतो, तेव्हा ब्रह्मांडाचा कल्पांत ओढवतो, त्यावेळी तो खरोखर ब्रह्मप्रलय झाला असे जाणावे (३).

**दोनी पिंडीं दोनी ब्रह्मांडीं। च्यारी प्रळय नवखंडीं।**
**पांचवा प्रळय उदंडी। जाणिजे विवेकाचा ॥ ४ ॥**

या नऊ खंडांच्या सृष्टीत पिंडाच्या ठिकाणी दोन व ब्रह्मांडाच्या ठिकाणी दोन असे चार प्रलय होतात. पाचवा सर्वांत महत्त्वाचा व उत्तम प्रलय म्हणजे विवेकाने होणारा प्रलय होय. (४)

**ऐसे हे पांचहि प्रळये। सांगितले येथान्वयें।**
**आतां हे अनुभवास ये। ऐसें करूं ॥ ५ ॥**

याप्रमाणे हे पाच प्रलय यथानुक्रमे सांगितले आहेत. आता ते अनुभवास येतील अशा रीतीने त्यांचे वर्णन करू या. (५)

**निद्रा जेव्हा संचरे। तेव्हां जागृतीव्यापार सरे।**
**सुषुप्ति अथवा स्वप्न भरे। अकस्मात आंगीं ॥ ६ ॥**

ज्या वेळी झोप येते, त्या वेळी जागृतीत होणारे सर्व व्यापार थांबतात व अकस्मात गाढ झोप लागते अथवा स्वप्न पडते. (६)

**या नांव निद्राप्रळये। जागृतीचा होये क्षये।**
**आतां ऐका देहांतसमये। म्हणिजे मृत्यप्रळये ॥ ७ ॥**

याप्रकारे जागृतीचा क्षय होतो त्यास निद्राप्रलय म्हणतात. आता देहांताच्या वेळी जो प्रलय होतो, त्या मृत्युप्रलयासंबंधी ऐका. (७)

देहीं रोग बळावती । अथवा कठीण प्रसंग पडती ।
तेणे पंचप्राण जाती । व्यापार सांडुनी ॥ ८ ॥

तिकडे गेला मनपवनु । इकडे राहिली नुस्ती तनु ।
दुसरा प्रळये अनुमानु । असेचिना ॥ ९ ॥

तिसरा ब्रह्या निजेला । तों हा मृत्यलोक गोळा जाला ।
अवघा व्यापार खुंटला । प्राणीमात्रांचा ॥ १० ॥

तेव्हां प्राणीयांचे सूक्ष्मांश । वायोचक्रीं करिती वास ।
कित्येक काळ जातां ब्रह्मयास । जागृती घडे ॥ ११ ॥

पुन्हा मागुती सृष्टि रची । विसंचिले जीव मागुतें संची ।
सीमा होतां आयुष्याची । ब्रह्मप्रळय मांडे ॥ १२ ॥

शत वरुषें मेघ जाती । तेणें प्राणी मृत्य पावती ।
असंभाव्य तर्के क्षिती । मर्यादेवेगळी ॥ १३ ॥

सूर्य तपे बाराकळी । तेणें पृथ्वीची होय होळी ।
अग्नि पावतां पाताळीं । शेष विष वमी ॥ १४ ॥

आकाशीं सूर्याच्या ज्वाळा । पाताळीं शेष विष वमी गरळा ।
दोहिकडून जळतां भूगोळा । उरी कैंची ॥ १५ ॥

सूर्यास खडतरता चढे । हलकाल्लोळ चहुंकडे ।
कोसळती मेरुचे कडे । घडघडायमान ॥ १६ ॥

अमरावती सत्यलोक । वैकुंठ कैळासादिक ।
याहिवेगळे नाना लोक । भस्मोन जाती ॥ १७ ॥

मेरू अवघाचि घसरे । तेथील महिमाच वोसरे ।
देवसमुदाव वावरे । वायोचक्रीं ॥ १८ ॥

भस्म जालियां धरत्री । प्रजन्य पडें शुंडाधारीं ।
मही विरे जळांतरीं । निमिष्यमात्रें ॥ १९ ॥

पुढें नुस्तें उरेल जळ । तयास शोषील अनळ ।
पुढें येकवटती ज्वाळ । मर्यादेवेगळे ॥ २० ॥

समुद्रींचा वडवानळ । शिवनेत्रींचा नेत्रानळ ।
सप्तकंचुकींचा आवर्णानळ । सूर्य आणि विद्युल्यता ॥ २१ ॥

ऐसे ज्वाळ येकवटती । तेणें देव देह सोडिती ।
पूर्वरूपें मिळोन जाती । प्रभंजनीं ॥ २२ ॥

देहामध्ये रोग बळावतात किंवा काही कठीण प्रसंग ओढवतात आणि पंचप्राण आपले काम सोडून देह सोडून निघून जातात. (८)

वासनायुक्त प्राण निघून गेले. इकडे नुसता देह निष्प्राण पडून राहतो. यालाच दुसरा प्रलय म्हणजे मृत्युप्रलय म्हणतात. तो अनुभवास येत असल्याने तेथे तर्काला जागाच नसते. (९)

तिसरा प्रलय ब्रह्मांडीचा निद्रा प्रलय होय. हा ज्या वेळी ब्रह्मदेव झोपी जातो, त्या वेळी सर्व प्राणिमात्रांचा व्यापार खुंटतो व मृत्युलोक नाश पावतो. (१०)

त्या वेळी प्राणिमात्रांचे सूक्ष्मांश वायुचक्रांत वास करतात. असा बराच काळ गेल्यावर ब्रह्मदेवाची रात्र सरून त्याला जागृती येते व तो परत पूर्वीप्रमाणेच सृष्टीरचना करतो आणि ज्यांचे सूक्ष्मांश वायुचक्रांत लीन झालेले असतात, त्या जीवांची पुन्हा उत्पत्ती करतो. ब्रह्मदेवाच्या आयुष्याचा अवधी जेव्हा संपतो, त्या वेळी ब्रह्मप्रलयास सुरुवात होते. (११-१२)

शंभर वर्षे पाऊस पडत नाही. त्यामुळे प्राणी मरून जातात. कल्पना येणार नाही अशा प्रकारे पृथ्वीला भेगा पडू लागतात. (१३)

सूर्य बारा कळांनी ताप देऊ लागतो. (बाराही महिन्यांतील बारा आदित्यांचा ताप एकवटावा त्याप्रमाणे.) असह्य उष्णता उत्पन्न होऊन पृथ्वी जळून खाक होते. अग्नी पाताळापर्यंत पोहोचल्याने शेषनाग विष ओकू लागतो. (१४)

आकाशातून सूर्याच्या ज्वाळा व पाताळातून शेषाने ओकलेले विष याप्रकारे दोन्हीकडून जळू लागल्यावर पृथ्वी शिल्लक तरी कशी राहील? (१५)

सूर्य अधिकच उग्रतेने तापू लागल्याने चहूकडे हलकल्लोळ माजतो, कडकडाट करून मेरुपर्वताचे कडे धडाधड कोसळू लागतात. (१६)

अमरावती, सत्यलोक, वैकुंठ, कैलास यांशिवायही अनेक लोक सर्व जळून खाक होतात. (१७)

मेरू पर्वतच नष्ट होतो. त्याचा सर्व महिमा नाहीसा होतो आणि देवसमुदायही वायुचक्रांत सूक्ष्मांशाने वावरतो. (१८)

पृथ्वी भस्म झाल्यानंतर हत्तीच्या सोंडेसारख्या प्रचंड धारांनी पाऊस कोसळू लागतो. त्या जलात पृथ्वी निमिषात विरून जाते. (१९)

पुढे सर्वत्र नुसते पाणीच पाणी उरते. नंतर ते सर्व जल अग्नी शोषून टाकतो आणि अमर्याद ज्वाला एकत्र होऊन उफाळू लागतात. (२०)

समुद्रातील वडवानल, शिवाच्या नेत्रांतील नेत्राग्नी, पृथ्वीच्या सप्त आवरणांतील आवर्णानल, सूर्य आणि विद्युल्लता, याप्रमाणें हे सर्व एकत्रित होऊन ज्वाला उफाळू लागल्या की देवही देहत्याग करतात आणि पूर्वरूपाने वायूमध्ये मिळून जातात. (२१-२२)

तो वारा झडपी वैश्वानरा। वन्ही विझेल येकसरा।
वायो धांवे सैरावैरा। परब्रह्मीं ॥ २३ ॥

त्या वाऱ्याने वैश्वानर म्हणजे अग्नी एकाएकी विझून जातो आणि वायू ब्रह्मांडात सैरावैरा धावत सुटतो.(२३)

धूम्र वितुळे आकाशीं। तैसें होईल समीरासी।
बहुतांमध्यें थोडियासी। नाश बोलिला ॥ २४ ॥

पण धूर आकाशात ज्याप्रमाणे नाहीसा होतो, तशीच वायूची स्थिती होते व तो परब्रह्मी नाहीसा होतो. बरोबरच आहे, बऱ्याच असलेल्या वस्तूपुढे थोड्याचा नाश होतो, असे म्हणतात. (२४)

वायो वितुळतांच जाण। सूक्ष्म भूतें आणी त्रिगुण।
ईश्वर सांडी अधिष्ठान। निर्विकल्पीं ॥ २५ ॥

वायू वितळून गेला की सूक्ष्म पंचमहाभूते आणि त्रिगुण मिळून अष्टधाप्रकृती आणि जाणीवरूप ईश्वर ही निर्विकल्प स्वरूपात लीन होतात. (२५)

तेथें जाणीव राहिली। आणी जगज्जोती निमाली।
शुद्ध सारांश उरली। स्वरूपस्थिती ॥ २६ ॥

तेथे फक्त शुद्ध जाणीव तेवढी राहते, पण जगज्ज्योती नाहीशी होते. शुद्ध सारांश स्वरूपस्थिती तेवढी उरते. (२६)

जितुकीं कांहीं नामाभिधानें। तये प्रकृतीचेनि गुणें।
प्रकृती नस्ता बोलणें। कैसें बोलावें ॥ २७ ॥

जितकी काही नामे व रूपे आहेत ती प्रकृतीच्या योगेच असतात. प्रकृती उरली नाही की बोलण्यासारखे काही उरतच नाही. (२७)

प्रकृती अस्तां विवेक कीजे। त्यास विवेकप्रळये बोलिजे।
पांचहि प्रळय वोजें। तुज निरोपिले ॥ २८ ॥

म्हणून प्रलयाची वाट न पाहता, प्रकृती म्हणजे दृश्य सृष्टी असतानाच विवेकाने स्वरूपस्थितीचा अनुभव घ्यावा. यालाच विवेक- प्रलय असे म्हणतात. याप्रमाणे पाचही प्रकारचे प्रलय तुला उत्तम प्रकारे वर्णन करून सांगितले आहेत. (२८)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पंचप्रळयनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १० : समास ६

## भ्रमनिरूपण

॥ श्रीराम ॥

उत्पत्ती स्थिति संव्हार। याचा निरोपिला वेव्हार।
परमात्मा निर्गुण निराकार। जैसा तैसा ॥ १ ॥

पूर्वी विश्वाची उत्पत्ती, स्थिती व संहार यांच्यासंबंधी निरूपण केले होते. या सर्व घटना घडत असता निर्गुण निराकार परमात्मा जसाच्या तसाच असतो. (१)

होतें वर्ततें आणी जातें। याचा समंध नाहीं तेथें।
आद्य मध्य अवसाने तें। संचलेंचि आहे ॥ २ ॥

विश्व उत्पन्न होते ते दीर्घकाळ असते व कल्पांती प्रलय झाल्यावर नाहीसे होते. पण निर्गुण निराकार परमात्म्याशी त्याचा काहीही संबंध नसतो. तो विश्वाच्या आधी, मध्ये व अंती सर्वत्र जसाच्या तसाच घनदाट कोंदाटलेला असतो. (२)

परब्रह्म असतचि असे। मध्येंचि हा भ्रम भासे।
भासे परंतु अवघा नासे। काळांतरीं ॥ ३ ॥

परब्रह्म सर्वकाळ असतेच असते. त्यावर मध्येच हा विश्वाचा भ्रम भासू लागतो. तो काही काळ भासतो व कालांतराने नाशही पावतो. (३)

उत्पत्तीस्थितीसंव्हारत। मध्येंहि अखंड होत जात।
पुढे सेवटीं कल्पांत। सकळांस आहे ॥ ४ ॥

विश्वाची उत्पत्ती, स्थिती, संहार हे परब्रह्माच्या ठिकाणी सतत होत जात आहेत असे निरंतर दिसून येत असते हे खरे, पण कल्पांती पंचमहाभूते, त्रिगुण यांसह सर्वांचा नाश ठरलेलाच असतो. (४)

यामधें ज्यास विवेक आहे। तो आधींच जाणताहे।
सारासार विचारें पाहें। म्हणोनियां ॥ ५ ॥

जो विवेकी असतो, तो सारासारविचार करत असल्याने या सर्व गोष्टी तो आधीच जाणत असतो. (५)

**बहुत भ्रमिष्ट मिळाले। त्यांत उमजल्याचें काय चाले।**
**सृष्टीमधें उमजले। ऐसे थोडे ॥ ६॥**

अनेक भ्रमिष्ट लोक एकत्र जमले असता तेथे एखादा शहाणा आला आणि काही सांगू लागला तर ते कुणीच ऐकून घेत नाही. सृष्टीमध्येही भ्रमिष्ट लोकच अधिक आहेत. जाणते लोक फार थोडे असतात. (६)

**त्या उमजल्यांचे लक्षण। कांहीं करूं निरूपण।**
**भ्रमाहून विलक्षण। माहापुरुष ॥ ७॥**

ज्याचा भ्रम नष्ट झालेला असतो, अशा जाणत्या महापुरुषाचे लक्षण आता वर्णन करून सांगू. या भ्रमाच्या विपरीत ते असते. (७)

**भ्रम हा नसेल जयासी। मनीं वोळखावें तयासी।**
**ऐक आतां भ्रमासी। निरोपिजेल ॥ ८॥**

एखाद्याला भ्रम झालेला आहे की नाही हे त्याच्या मनावरून ओळखावे. म्हणून आता भ्रम म्हणजे काय ते सांगितले जाईल. (८)

**येक परब्रह्म संचलें। कदापी नाहीं विकारलें।**
**त्यावेगळें भासलें। ते भ्रमरूप ॥ ९॥**

एक परब्रह्मच सर्वत्र घनदाट संचलेले असते. त्याच्या ठिकाणी कुठलेही विकार उत्पन्न होत नाहीत. त्याच्याखेरीज जे काही दिसते, भासते, ते काल्पनिक, भ्रमरूप जाणावे. (९)

**जयासी बोलिला कल्पांत। त्रिगुण आणि पंचभूत।**
**हें अवघेंचि समस्त। भ्रमरूप ॥ १०॥**

ज्या ज्या गोष्टी कल्पान्ताचे वेळी नाश पावतात म्हणून सांगितले ती पंचमहाभूते व त्रिगुण हे सर्व भ्रमरूपच आहेत. (१०)

**मी तूं हा भ्रम। उपासनाहि भ्रम।**
**ईश्वरभाव हाहि भ्रम। निश्चयेंसी ॥ ११॥**

'मी,' 'तू' हा भ्रम, एवढेच नव्हे, तर उपासना आणि ईश्वरभाव हेही निश्चितपणे भ्रमच आहेत. (११)

श्लोक

भ्रमेणाहं भ्रमेण त्वं भ्रमेणोपासका जनाः।
भ्रमेणेश्वरभावत्वं भ्रममूलमिदं जगत्॥

**अर्थ**—भ्रमाने मी आहे असा भास होतो. भ्रमाने तू आहेस असे वाटते. उपासक लोक व ईश्वरभाव हेही भ्रमच आहेत. हे सर्व जगच भ्रममूलक आहे.

**याकारणें सृष्टि भासत। परंतु भ्रमचि हा समस्त।**
**यामध्यें जे विचारवंत। तेचि धन्य ॥ १२॥**

याप्रमाणे सर्व सृष्टीच खरी वाटत असली तरी सर्व दृश्य सृष्टी म्हणजेही भ्रमच आहे. जे विचारवंत लोक हे जाणतात, ते धन्य होत. (१२)

**आतां भ्रमाचा विचारु। अत्यंतचि प्रांजळ करूं।**
**दृष्टांतद्वारें विवरूं। श्रोतयांसी ॥ १३॥**

आता भ्रमाचा विचार अधिक स्पष्ट करण्यासाठी दृष्टान्ताच्याद्वारे श्रोत्यांना समजावून देऊ. (१३)

**भ्रमण करितां दुरी देसीं। दिशाभूलि आपणासी।**
**कां वोळखी मोडे जीवलगांसी। या नांव भ्रम ॥ १४॥**

दूरदेशात फिरत असता दिशाभूल झाली किंवा आपल्या जिवलग माणसांची तातातूट झाली की जी अवस्था होते, तो भ्रमच जाणावा. (१४)

**कां उन्मत्त द्रव्य सेविलें। तेणें अनेक भासों लागलें।**
**नाना वेथां कां झडपिलें। भूतें तो भ्रम ॥ १५॥**

मादक द्रव्य सेवन केल्याने जे अनेक भास होऊ लागतात किंवा अनेक रोगांनी आपल्याला ग्रासले आहे असे वाटणे, किंवा भूताने झडपले आहे असे वाटणे, हे सर्व भ्रमच आहेत. (१५)

**दशावतारीं वाटती नारी। कां ते मांडली बाजीगरी।**
**उगाच संदेह अंतरीं। या नांव भ्रम ॥ १६॥**

दशावतारी नाटकांतील स्त्रिया खरेच स्त्रिया आहेत असे वाटणे, किंवा इंद्रजाल अथवा जादूचे खेळ खरे वाटणे, तसेच मनात कारण नसता संशय उत्पन्न होणे हे भ्रमच आहेत. (१६)

**ठेविला ठाव तो विसरला। कां मार्गी जातां मार्ग चुकला।**
**पट्टणामधें भांबावला। या नांव भ्रम ॥ १७॥**

जेथे वस्तू ठेवली ती जागा विसरणे किंवा वाटेने जात असता रस्ता चुकणे किंवा शहरात गेल्यावर गोंधळून जाणे हेही भ्रमच आहेत. (१७)

**वस्तु आपणापासीं असतां। गेली म्हणोनि होये दुचिता।**
**आपलें आपण विसरतां। या नांव भ्रम ॥१८॥**

आपली वस्तू आपल्याजवळच असता ती गेली, हरवली असे समजून बेचैन होणे किंवा आपल्याला स्वत:चाच विसर पडणे, (१८)

**कांहीं पदार्थ विसरोन गेला। कां जें सिकला तें विसरला।**
**स्वप्नदु:खें घाबिरा जाला। या नांव भ्रम ॥१९॥**

कुठे गेले असता तेथे एखादी वस्तू विसरून येणे किंवा पूर्वी शिकलेल्याचा विसर पडणे, तसेच स्वप्नांतील दु:खाने जीव घाबरा होणे हे सर्व भ्रमच आहेत.(१९)

**दुश्चिन्हें अथवा अपशकुन। मिथ्या वार्तेनें भंगे मन।**
**वचके पदार्थ देखोन। या नांव भ्रम ॥२०॥**

दुश्चिन्हे, अपशकुन किंवा खोटी अफवा यांमुळे मन अस्वस्थ होणे, एखादा अनोळखी पदार्थ पाहून एकदम दचकणे हेही भ्रमच आहेत. (२०)

**वृक्ष काष्ठ देखिलें। मनांत वाटे भूत आलें।**
**कांहींच नस्तां हडबडिलें। या नांव भ्रम ॥२१॥**

एखादे झाड किंवा लाकूड अंधुक प्रकाशात नीट दिसले नाही की मनात भूत समजून एकदम हडबडून जाणे. (२१)

**काच म्हणोन उदकांतपडे। कां सभा देखोन दर्पणीं पवाडे।**
**द्वार चुकोन भलती कडे। जाणें या नांव भ्रम ॥२२॥**

काच समजून पाण्यात पडणे, आरशात प्रतिबिंबित झालेली सभा खरी वाटणे, एकीकडे दार असता ते न कळल्याने भलतीकडेच दार आहे असे समजून जाणे हे सर्व भ्रम आहेत. (हे तीनही भ्रम दुर्योधनाला मयसभेत अनुभवण्यास मिळाले होते.) (२२)

**येक अस्तां येक वाटे। येक सांगतां येक निवटे।**
**येक दिसतां येक उठे। या नांव भ्रम ॥२३॥**

एक असता दुसरेच काही वाटणे, एक सांगितले असता दुसरेच समजणे, एक दिसत असता भलतेच वाटणे. (२३)

**आतां जें जें देइजेतें। तें तें पुढें पाविजेतें।**
**मेलें माणुस भोजना येतें। या नांव भ्रम ॥२४॥**

आता आपण जे जे (दान) देऊ ते ते आपल्याला पुढे मिळेल असे वाटणे किंवा मेलेले माणूस भोजनाला येते असे वाटणे, याला भ्रमच म्हणतात. (२४)

**ये जन्मींचें पुढिले जन्मीं। कांहीं येक पावेन मी।**
**प्रीती गुंतली मनुष्याचे नामीं। या नांव भ्रम ॥२५॥**

या जन्मातील काही आपल्याला पुढील जन्मी मिळेल असे वाटणे आणि मनुष्याच्या नामाबद्दल प्रेम उत्पन्न होणे, (२५)

**मेलें मनुष्य स्वप्ना आलें। तेणें कांहीं मागितलें।**
**मनीं अखंड बैसलें। या नांव भ्रम ॥२६॥**

मेलेले मनुष्य स्वप्नात येऊन त्याने काही मागितले तर त्याचेच मनात सारखे स्मरण होणे, हे सर्व भ्रमच आहेत. (२६)

**अवघें मिथ्या म्हणौन बोले। आणि सामर्थ्यावर मन चाले।**
**ज्ञाते वैभवें दपटले। या नांव भ्रम ॥२७॥**

ज्ञात्याचा आव आणून अवघे मिथ्या म्हणून म्हणायचे आणि सिद्धींची इच्छा करायची किंवा वैभवावर आसक्त व्हावयाचे, हेही भ्रमच आहेत. (२७)

**कर्मठपणें ज्ञान विटे। कां ज्ञातेपणें बळें भ्रष्टे।**
**कोणीयेक सीमा फिटे। या नांव भ्रम ॥२८॥**

कर्मठपणामुळे ज्ञानाचा कंटाळा वाटणे किंवा ज्ञानाचा अभिमान धरून त्याच्या बळावर भ्रष्टाचार करणे, यांपैकी कुठलेही मर्यादेबाहेर जाणे, याला भ्रमच म्हणतात.(२८)

**देहाभिमान कर्माभिमान। ज्यात्याभिमान कुळाभिमान।**
**ज्ञानाभिमान मोक्षाभिमान। या नांव भ्रम ॥२९॥**

देहाभिमान, कर्माभिमान, जात्याभिमान, कुळाभिमान, ज्ञानाभिमान आणि मोक्षाभिमान हे सर्वही भ्रमच आहेत.(२९)

**कैसा न्याय तो न कळे। केला अन्याये तो नाडळे।**
**उगाच अभिमानें खवळे। या नांव भ्रम ॥३०॥**

न्याय म्हणजे काय हे न कळणे, आपण एखाद्यावर अन्याय केला तर तो लक्षात न येणे, आणि उगीच अभिमानाने खवळून उठणे याला भ्रम म्हणतात.(३०)

मागील कांहीं आठवेना। पुढील विचार सुचेना।
अखंड आरूढ अनुमाना। या नांव भ्रम ॥ ३१॥

मागील काही न आठवणे, पुढे काय करावे हे न कळणे आणि अखंड नाना कल्पना करीत राहणे या सर्वास भ्रमच म्हणतात. (३१)

प्रचीतिविण औषध घेणें। प्रचित नस्तां पथ्य करणें।
प्रचीतीवीण ज्ञान सांगणें। या नांव भ्रम ॥ ३२॥

अनुभवाने खात्री पटली नसताना औषध घेणे, अनुभव न घेता पथ्य करणे आणि अनुभवाशिवाय ज्ञान सांगणे हे भ्रम होत. (३२)

फळश्रुतीवीण प्रयोग। ज्ञानेंविण नुस्ता योग।
उगाच शरीरें भोगिजे भोग। या नांव भ्रम ॥ ३३॥

ज्याची फलश्रुती माहीत नाही असे प्रयोग करणे, ज्ञानाशिवाय नुसताच योग करणे, शरीराने उगीचच भोग भोगणे हे सर्व भ्रमच आहेत. (३३)

ब्रह्मा लिहितो अदृष्टीं। आणि वाचून जाते सटी।
ऐशा प्रकारीच्या गोष्टी। या नांव भ्रम ॥ ३४॥

ब्रह्मा प्रारब्धात जे असेल ते लिहून जातो व सटवाई ते वाचून जाते, या प्रकारच्या ज्या गोष्टी त्या म्हणजे भ्रमच आहेत. (३४)

उदंड भ्रम विस्तारला। अज्ञानजनीं पैसावला।
अल्प संकेतें बोलिला। कळावयाकारणें ॥ ३५॥

याप्रमाणे भ्रमाचा अफाट विस्तार झाला असून अज्ञानी लोकांत तर तो फारच पसरलेला आहे. त्याचे स्वरूप कळावे म्हणून येथे काही थोड्या गोष्टी उदाहरणासाठी सांगितल्या आहेत. (३५)

भ्रमरूप विश्व स्वभावें। तेथें काये म्हणोन सांगावें।
निर्गुण ब्रह्मावेगळें अवघें। भ्रमरूप ॥ ३६॥

सर्व विश्वच जेथे स्वाभाविकपणे भ्रमरूप आहे तेथे किती म्हणून वर्णन करणार? निर्गुण ब्रह्माखेरीज जे जे म्हणून आहे ते सर्व भ्रमरूपच आहे. (३६)

ज्ञात्यास नाही संसार। ऐसें बोलती अपार।
गत ज्ञात्याचे चमत्कार। या नांव भ्रम ॥ ३७॥

आत्मज्ञानी माणसाला संसार नाही असे सर्वच म्हणत असतात आणि तरी देह ठेवलेल्या ज्ञात्याच्या चमत्काराचे वर्णन करतात, हा सुद्धा भ्रमच आहे. (३७)

येथें आशंका उठिली। ज्ञात्याची समाधी पूजिली।
तेथें कांही प्रचित आली। किंवा नाहीं ॥ ३८॥

येथे श्रोत्याने शंका उपस्थित केली की आत्मज्ञानी सत्पुरुषांच्या समाधीची पूजा केली तर त्यामुळे त्या स्थळी काही प्रचीती येते की नाही? (३८)

तैसेचि अवतारी संपले। त्यांचेंहि सामर्थ्य उदंड चाले।
तरी ते काये गुंतले। वासना धरूनि ॥ ३९॥

त्याप्रमाणे अनेक अवतारी सत्पुरुषांनी देहत्याग केल्यावरही त्यांच्या सामर्थ्याचा उदंड अनुभव येत असतो. मग काय ते वासनेत गुंतून येथे राहिले आहेत असे समजायचे की काय? (३९)

ऐसी आशंका उद्भवली। समर्थें पाहिजे निरसिली।
इतुकेन हे समाप्त जाली। कथा भ्रमाची ॥ ४०॥

याप्रमाणे शंका निर्माण झाली, ती समर्थांनी दूर केली पाहिजे. याप्रमाणे येथे ही भ्रमाची कथा समाप्त झाली आहे. (४०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'भ्रमनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.**

❑ ❑

## दशक १० : समास ७

# सगुणभजन निरूपण

॥ श्रीराम ॥

अवतारादिक ज्ञानी संत। सारासारविचारें मुक्त।
त्यांचें सामर्थ्य चालत। कोण्या प्रकारें ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, अवतारादी तसेच इतर ज्ञानी संत वगैरे सारासारविचाराने मुक्त झालेले असतात, तरी त्यांच्या सामर्थ्याचा प्रत्यय येत असतो. हे कसे काय होते? (१)

हे श्रोतयांची आशंका। पाहातां प्रश्न केला निका।
सावध होऊन ऐका। म्हणे वक्ता ॥ २ ॥

ही श्रोत्यांची शंका आहे, ती अत्यंत योग्य आहे. तेव्हा आता-सावध होऊन या शंकेचे उत्तर ऐकावे असे वक्ता म्हणाला. (२)

ज्ञानी मुक्त होऊन गेले। मागें त्यांचें सामर्थ्य चाले।
परंतु ते नाहीं आले। वासना धरूनी ॥ ३ ॥

ज्ञानी लोक मुक्त होतात, पण त्यांच्या मागेही त्यांच्या सामर्थ्याचा अनुभव येतो, पण म्हणून ते वासना धरून परत आलेले नसतात. (३)

लोकांस होतो चमत्कार। लोक मानिती साचार।
परंतु याचा विचार। पाहिला पाहिजे ॥ ४ ॥

लोकांना त्यांच्या सामार्थ्याचा प्रत्यय येतो, म्हणून मोठा चमत्कार वाटतो. त्यामुळे ते आहेतच असे लोकांना खरोखरच वाटते. म्हणून या गोष्टीचा विचार करणे आवश्यक आहे. (४)

जीत अस्तां नेणों किती। जनामधें चमत्कार होती।
ऐसियाची सद्यप्रचिती। रोकडी पाहावी ॥ ५ ॥

संत हयात असतानाही लोकांमध्ये अनेक चमत्कार घडून येतात. अशा चमत्कारांचा साक्षात अनुभव घेऊन पाहावा. (५)

तो तरी आपण नाहीं गेला। लोकीं प्रत्यक्ष देखिला।
ऐसा हा चमत्कार जाला। यास काय म्हणावें ॥ ६ ॥

तो संत त्याच्या घरीच असतो, कोठेही जात नाही. तरी दुसऱ्या ठिकाणीही लोकांनी त्याला प्रत्यक्ष पाहिलेले असते. असा हा चमत्कार होतो, त्याला काय म्हणावे? (६)

तरी हा लोकांचा भावार्थ। भाविकां देव येथार्थ।
अनेत्र कल्पना वेर्थ। कुतर्काची ॥ ७ ॥

तरी हे लोकांच्या दृढ भावार्थामुळे घडून येते. जेथे भाव तेथे देव याच अर्थाने लोकांना प्रत्यय येत असतो. येथे दुसरे तर्क किंवा कल्पना करणे व्यर्थ आहे. (७)

आवडे तें स्वप्नीं देखिलें। तरी काय तेथून आलें।
म्हणाल तेणें आठविलें। तरी द्रव्य कां दिसे ॥ ८ ॥

आपल्याला मनापासून जे आवडते, ते आपल्याला स्वप्नात दिसते. बाहेरून कोठून थोडेच आलेले असते? तुम्ही म्हणाल की नुसते स्मरण होते. तर मग स्वप्नांत वस्तू प्रत्यक्ष का दिसतात? (८)

एवं आपली कल्पना। स्वप्नीं येती पदार्थ नाना।
परी ते पदार्थ चालतीना। अथवा आठऊ नाहीं ॥ ९ ॥

याप्रमाणे आपल्या कल्पनेमुळेच स्वप्नांत नाना पदार्थ दिसत असतात, पण ते पदार्थ व्यवहारात उपयोगी पडत नाहीत. स्मरण झाले म्हणून ते दिसतात हे खरे नाही. (९)

येथें तुटली आशंका। ज्ञात्यास जन्म कल्पूं नका।
उमजेना तरी विवेका। बरें पाहा ॥ १० ॥

येथे शंकेचे निरसन झाले. ज्ञात्याला जन्म आहे अशी कल्पना करू नका. कळत नसेल तर नीट विचार करून पाहा म्हणजे कळेल. (१०)

ज्ञानी मुक्त होऊन गेले। त्यांचें सामर्थ्य उगेंचि चाले।
कां जे पुण्यमार्गें चालिले। म्हणोनियां ॥ ११ ॥

ज्ञानी मुक्त झालेले असतात, पण तरी त्यांच्या सामर्थ्याचा आपोआप प्रत्यय येतो. कारण त्यांनी पुण्यमार्गाचे आचरण केलेले असते. (११)

याकारणें पुण्यमार्गें चालावें। भजन देवाचें वाढवावें।
न्याये सांडून न जावें। अन्यायमार्गें ॥ १२॥

म्हणून माणसाने नेहमी पुण्यमार्गाचेच आचरण करावे व देवाचे भजन वाढवावे. न्याय सोडून अन्यायमार्गाने त्याने कधीही जाऊ नये. (१२)

नाना पुरश्चरणें करावीं। नाना तीर्थाटणें फिरावीं।
नाना सामर्थ्यें वाढवावीं। वैराग्यबळें ॥ १३॥

त्याने नाना पुरश्चरणे करावीत, नाना तीर्थक्षेत्रे हिंडून देवदर्शन करावे आणि वैराग्याच्या योगे नाना प्रकारचे सामर्थ्य संपादन करावे. (१३)

निश्चयें बैसे वस्तूकडे। तरी ज्ञानमार्गेंहि सामर्थ्य चढे।
कोणीयेक येकांत मोडे। ऐसें न करावें ॥ १४॥

आपल्या ब्रह्मत्वाचा निश्चय दृढ झाल्यानेही ज्ञानमार्गाने अंगी सामर्थ्य चढते. पण सामर्थ्याच्या मागे लागून ज्ञानप्राप्तीसाठी आवश्यक असलेला एकांत मात्र भंगू देऊ नये. (१४)

येक गुरु येक देव। कोठें तरी असावा भाव।
भावार्थ नस्तां वाव। सर्व कांहीं ॥ १५॥

एक गुरू किंवा एक देव यांपैकी कोठेतरी एकनिष्ठ भाव असावा. असा एकनिष्ठ भाव नसेल, तर सर्व काही व्यर्थ आहे. (१५)

निर्गुणीं ज्ञान जालें। म्हणोन सगुण अलक्ष केलें।
तरी तें ज्ञातें नागवलें। दोहिंकडे ॥ १६॥

निर्गुणाचे ज्ञान झाल्यावर जर सगुणाकडे दुर्लक्ष केले, तर ते ज्ञाते दोन्हीकडून नागवले जातात. (१६)

नाहीं भक्ति नाहीं ज्ञान। मधेंच पैसावला अभिमान।
म्हणौनियां जपध्यान। सांडूंच नये ॥ १७॥

धड भक्ती नाही, धड ज्ञान नाही, मधल्यामध्ये अभिमान मात्र भरपूर वाढतो, म्हणून सगुणाचे जप, ध्यान इत्यादी सोडूच नये. (१७)

सांडील सगुणभजनासी। तरी तो ज्ञाता परी अपेसी।
म्हणौनियां सगुणभजनासी। सांडूंचि नये ॥ १८॥

जो कोणी सगुण भजनाचा त्याग करतो, तो ज्ञाता जरी असला तरी ईश्वराच्या राज्यांत त्याच्या कृपेच्या अभावी तो अपयशी ठरतो. म्हणून काही झाले तरी सगुण भजन कधी सोडूच नये. (१८)

निःकामबुद्धीचिया भजना। त्रैलोकीं नाहीं तुळणा।
सामर्थेंविण घडेना। निःकाम भजन ॥ १९॥

निष्काम बुद्धीने केलेल्या भजनाची त्रैलोक्यात कशाशीही तुलना होऊ शकत नाही. पण योग्यतेशिवाय निष्काम भजन घडतच नाही. (१९)

कामनेनें फळ घडे। निःकाम भजनें भगवंत जोडे।
फळ भगवंता कोणीकडे। महदांतर ॥ २०॥

सकाम भजनाने इच्छित फळाची प्राप्ती होते, पण निष्काम भजनाने प्रत्यक्ष भगवंताची प्राप्ती होते. क्षुल्लक फलप्राप्ती आणि साक्षात भगवंताची प्राप्ती, यांत कुठल्याकुठे मोठे अंतर आहे. (२०)

नाना फळें देवापासी। आणी फळ अंतरी भगवंतासी।
याकारणें परमेश्वरासी। निःकाम भजावें ॥ २१॥

सकाम भजनाने देवाकडूनच नाना प्रकारची फलप्राप्ती होते, पण त्यामुळे भगवंत दुरावतो. म्हणून भगवंत जर हवा असेल, तर त्यासाठी निष्काम भावनेने त्याचे भजन करावे. (२१)

निःकामभजनाचें फळ आगळें। सामर्थ्य चढे मर्यादेवेगळें।
तेथें बापुडीं फळें। कोणीकडे ॥ २२॥

निष्काम भजनाचे फळ अलौकिक आहे. त्याने अंगी अमर्याद सामर्थ्य बाणते. त्यापुढे इतर क्षुद्र फळांची काय किंमत? (२२)

भक्तें जे मनीं धरावें। तें देवें आपणचि करावें।
तेथें वेगळें भावावें। नलगे कदा ॥ २३॥

भक्ताने जे जे मनात धरावे, ते देव स्वतःहूनच करतो. तेथे वेगळेपणाची भावना धरून प्रार्थना वगैरे करावी लागत नाही. (२३)

**दोनी सामर्थ्ये येक होतां। काळास नाटोपे सर्वथा।**
**तेथें इतरांची कोण कथा। कीटकन्यायें ॥ २४॥**

निष्काम भजनाचे आणि ब्रह्मज्ञानाचे सामर्थ्य एकवटले की काळाचेही सामर्थ्य त्याच्यापुढे उणे पडते. तेथे कीटकन्यायाने इतरांची काय कथा? (२४)

**म्हणोनि नि:काम भजन। वरी विशेष ब्रह्मज्ञान।**
**तयास तुळितां त्रिभुवन। उणें वाटे ॥ २५॥**

म्हणून निष्काम भजन आणि विशेष ब्रह्मज्ञान यांची तुलना करण्यायोग्य त्रिभुवनात दुसरे काहीही नाही. (२५)

**येथें बुद्धीचा प्रकाश। आणीक न चढे विशेष।**
**प्रताप कीर्ती आणि येश। निरंतर ॥ २६॥**

ज्ञानी भक्ताचा महिमा वर्णन करण्यास बुद्धीचा प्रकाश अपुरा पडतो. त्याचा प्रताप, कीर्ती आणि यश निरंतर वाढतच जाते. (२६)

**निरूपणाचा विचार। आणी हरिकथेचा गजर।**
**तेथें होती तत्पर। प्राणीमात्र ॥ २७॥**

जेथे आत्मज्ञानाची चर्चा आणि हरिकथेचा गजर निरंतर होत असतो, अशा सत्पुरुषाकडे प्राणिमात्र तत्काळ आकर्षित होतात. (२७)

**जेथें भ्रष्टाकार घडेना। तो परमार्थहि दडेना।**
**समाधान विघडेना। निश्चयाचें ॥ २८॥**

अशा सत्पुरुषाजवळ आचारभ्रष्टता अथवा दंभाभिमानादी परमार्थभ्रष्टता यांचा लवलेशही नसतो. त्याचा परमार्थ कधीही लपून राहात नाही आणि स्वस्वरूपानुभव आल्यामुळे त्याला जे निश्चयात्मक समाधान लाभलेले असते, त्यात कधी बिघाड होत नाही. (२८)

**सारासारविचार करणें। न्यायेअन्याये अखंड पाहाणें।**
**बुद्धि भगवंताचें देणें। पालटेना ॥ २९॥**

सारासारविचार करणे आणि अखंड योग्य-अयोग्य पाहून त्याप्रमाणे वागणे या प्रकारची बुद्धी ही भगवंताची देणगीच असते. ती भगवंताची अक्षय कृपाच असून त्यात कधी बदल होत नाही. (२९)

**भक्त भगवंतीं अनन्य। त्यासी बुद्धि देतो आपण।**
**येदर्थी भगवद्वचन। सावध ऐका ॥ ३०॥**

जो भक्त भगवंताशी अनन्य झालेला असतो, त्यास भगवान स्वत:च अशी बुद्धी देतात. या अर्थाचे भगवंताचे वचन आहे, ते सावधपणे ऐका. (३०)

श्लोक

ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते॥

**अर्थ**—मी त्यांना अशी बुद्धी देतो की, त्यायोगे ते मलाच येऊन मिळतात.

**म्हणोन सगुण भजन। वरी विशेष ब्रह्मज्ञान।**
**प्रत्ययाचे समाधान। दुल्लभ जगीं ॥ ३१॥**

म्हणूनच सगुण भजन आणि त्याहूनही विशेष म्हणजे ब्रह्मज्ञानाच्या साक्षात अनुभवाच्या योगे प्राप्त होणारे समाधान या गोष्टी जगात अत्यंत दुर्लभ आहेत. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सगुणभजननिरूपणनाम' समास सातवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १० : समास ८
# प्रचितनिरूपण

॥ श्रीराम ॥

ऐका प्रचितीचीं लक्षणें। प्रचित पाहेल तें शाहाणें।
येर वेडे दैन्यवाणे। प्रचितीविण ॥ १ ॥

आता प्रचीतीची लक्षणे ऐका. जो स्वानुभव घेऊन कुठल्याही गोष्टीची पारख करतो, तो शहाणा समजावा. जे कोणी प्रचीती घेत नाहीत, ते वेडे आणि दैन्यवाणे जाणावेत. (१)

नाना रत्नें नाना नाणीं। परीक्षून न घेतां हानी।
प्रचित न येतां निरूपणीं। बैसोंच नये ॥ २ ॥

नाना रत्ने अथवा नाना नाणी, त्यांची परीक्षा न करता जर घेतली तर नुकसान ठरलेलेच. ज्या निरूपणात वक्त्याचा स्वानुभव प्रकट होत नसेल, ते ऐकायला बसूच नये. (२)

तुरंग शस्त्र दमून पाहिलें। बरें पाहातां प्रचितीस आले।
तरी मग पाहिजे घेतलें। जाणते पुरुषीं ॥ ३ ॥

घोडा व शस्त्र यांना आधी अजमावून पाहिले पाहिजे व बरे आहे, अशी प्रचीती आल्यावर मग ते जाणत्या पुरुषांनी खरेदी केले पाहिजे. (३)

बीज उगवेलसें पाहावें। तरी मग द्रव्य घालून घ्यावें।
प्रचित आलियां ऐकावें। निरूपण ॥ ४ ॥

बीज उगवेल हे आधी पाहावे व मग द्रव्य देऊन ते खरेदी करावे. वक्ता जे निरूपण करतो त्याची प्रचीती आली तरच ते निरूपण ऐकावे. (४)

देहीं आरोग्यता जाली। ऐसी जना प्रचित आली।
तर मग आगत्य घेतली। पाहिजे मात्रा ॥ ५ ॥

एखाद्या औषधाने रोग्याला बरे वाटून आरोग्यप्राप्ती झाली अशी लोकांना प्रचीती आली असेल तर ती मात्रा (औषध) अगत्याने घ्यावी. (५)

प्रचितीविण औषध घेणें। तरी मग धडचि विधडणें।
अनुमानें जें कार्य करणें। तेंचि मूर्खपण ॥ ६ ॥

एखाद्या औषधाचा कुणालाही अनुभव नसता ते घेणे म्हणजे चांगली प्रकृती बिघडवून घेणे जाणावे. कुठलेही कार्य केवळ अनुमानाने करणे म्हणजे मूर्खपणाच होय. (६)

प्रचितीस नाहीं आलें। आणी सुवर्ण करविलें।
तरी मग जाणावें ठकिलें। देखतदेखतां ॥ ७ ॥

काही लोक किमयेने तांब्याचे किंवा लोखंडाचे सोने करून देतो असे म्हणतात, पण त्यांच्या म्हणण्याची प्रचीती न घेता त्यांच्यावर विश्वास ठेवून त्यास सोने करायला सांगणे म्हणजे बघता बघता फसविले जाणे होय. (७)

शोधून पाहिल्याविण। कांहींतरी येक कारण।
होणार नाहीं निर्वाण। प्राणास घडे ॥ ८ ॥

पारखल्याशिवाय केलेली कोणतीही गोष्ट कारणी लागत नाही. मात्र प्राणावर बेतण्याची शक्यता असते. (८)

म्हणोनी अनुमानाचें कार्ये। भल्यांनी कदापि करूं नये।
उपाय पाहातां अपाये। नेमस्त घडे ॥ ९ ॥

म्हणून चांगल्या माणसाने अनुमानाने कुठलेही कार्य करू नये. अनुभव न घेता कार्य केल्याने उपायाच्याऐवजी अपायच निश्चितपणे घडतो. (९)

पाण्यांतील म्हैसीची साटी। करणें हें बुद्धिच खोटी।
शोधिल्याविण हिंपुटी। होणें घडे ॥ १० ॥

पाण्यात बसलेली म्हैस तिची नीट पारख न करता खरेदी करणे म्हणजे मूर्खपणाच होय. नीट तपास न करता खरेदी केल्याने शेवटी कष्टी व्हावे लागेल. (१०)

विश्वासें घर घेतलें। ऐसें किती नाहीं ऐकिलें।
मैदें मैंदावें केलें। तरी तें शोधिलें पाहिजे ॥ ११ ॥

केवळ दुसऱ्याच्या विश्वासावर घर घेतले, असे कोणी कधी ऐकले आहे काय? कपटी माणसाने कपट केले, तर ते आधी जाणून घेतले पाहिजे. (११)

शोधल्याविण अन्नवस्त्र घेणें। तेणें प्राणास मुकणें।
लटिक्याचा विश्वास धरणें। हेंचि मूर्खपण ॥ १२॥

नीट चौकशी न करता अन्नवस्त्र घेतल्याने प्राणास मुकण्याची पाळी येते. खोट्या माणसाचा विश्वास धरणे म्हणजे मूर्खपणाच होय. (१२)

संगती चोराची धरितां। घात होईल तत्वतां।
ठकु सिंतरु शोधितां। ठाईं पडे ॥ १३॥

चोराची संगती धरली तर निश्चितच घात होतो. नीट शोध घेतला तर कोण लबाड हे कळून येईल. (१३)

गैरसाळ तामगिरी। कोणी नवी मुद्रा करी।
नाना कपट परोपरीं। शोधून पाहावें ॥ १४॥

खोटी नाणी करणारे, तांब्याचे सोने करणारे, तसेच खरी पण अधिकाराशिवायची नाणी करणारे, यांप्रकारे फसवणूक करणारे शोधून काढले पाहिजेत. (१४)

दिवाळखोराचा मांड। पाहातां वैभव दिसे उदंड।
परी तें अवघें थोतांड। भंड पुढें ॥ १५॥

दिवाळखोराचा पसारा पाहिला की तेथे उदंड वैभव दृष्टीस पडते, पण वास्तविक ते सर्व थोतांड असते. पुढे फजिती ठरलेलीच असते. (१५)

तैसें प्रचितीवीण ज्ञान। तेथें नाहीं समाधान।
करून बहुतांचा अनुमान। अन्हीत जालें ॥ १६॥

त्याप्रमाणे स्वानुभव नसता ज्ञान सांगणे म्हणजे थोतांडच समजावे. त्या व्यक्तीकडून खरे समाधान मिळत नाही. पण स्वत:स अनुभव नसता अनुमानाने ज्ञान सांगून तो अनेक जणांचे अनहित मात्र करतो.(१६)

मंत्र यंत्र उपदेसिले। नेणतें प्राणी तें गोविलें।
जैसें झांकून मारिलें। दुखणाईत ॥ १७॥

अनुभव नसताना मंत्र-यंत्रादींचा उपदेश करून अज्ञानी लोकांना ते फसवतात. एखाद्या दुखणेकऱ्याला झाकून ठेवून नंतर मारावे तसा प्रकार होतो. (१७)

वैद्य पाहिला परी कच्चा। तरी प्राण गेला पोराचा।
येथें उपाये दुसऱ्याचा। काये चाले ॥ १८॥

एखाद्याचा मुलगा आजारी असता त्याने औषधोपचार करण्यासाठी वैद्य आणला, पण तो वैद्य होता अर्धवट ज्ञान असलेला. त्यामुळे त्याच्या औषधाने त्या पोराचा प्राण मात्र गेला. तर तेथे दुसऱ्याचा काय उपाय चालणार? (१८)

दु:खें अंतरीं झिजे। आणी वैद्य पुसतां लाजे।
तरीच मग त्यासी साजे। आत्महत्यारेपण ॥ १९॥

एखादा माणूस दुखण्याने आतल्या आत झिजत चालला आहे, पण वैद्याने दुखण्यासंबंधी प्रश्न केल्यावर त्यास काही सांगण्यास लाजू लागला, तर त्याने आपलाच आपण घात करून घेतला, असे म्हणावे लागते.(१९)

जाणत्यावरी गर्व केला। तरी नेणत्याकरितां बुडाला।
येथें कोणाचा घात जाला। बरें पाहा ॥ २०॥

जाणत्या माणसाचा गर्वाने अनादर करून नेणत्याची संगत धरल्यामुळे एखादा माणूस बुडतो. यात कुणाचा घात झाला, सांगा बरे? (२०)

पापाची खंडणा जाली। जन्मयातना चुकली।
ऐसी स्वयें प्रचित आली। म्हणिजे बरें ॥ २१॥

पाप सर्व नष्ट झाले. परत जन्मास यावे लागणार नाही. अशी आपली आपल्याला प्रचीती आली पाहिजे. (२१)

परमेश्वरास वोळखिलें। आपण कोणसें कळलें।
आत्मनिवेदन जालें। म्हणिजे बरें ॥ २२॥

परमेश्वराचे खरे स्वरूप स्वत: अनुभवाने जाणले व आपण कोण ह्याचाही अनुभव घेऊन आत्मनिवेदन झाले, म्हणजे बरे. (२२)

ब्रह्मांड कोणें केलें। कासयाचें उभारलें।
मुख्य कर्त्यास वोळखिलें। म्हणिजे बरें ॥ २३॥

ब्रह्मांडाचा कर्ता कोण, याची उभारणी कशी झाली आणि मुख्य कर्ता कोण हे सर्व ज्ञान होणे अत्यंत आवश्यक आहे. (२३)

येथें अनुमान राहिला। तरी परमार्थ केला तो वायां गेला।
प्राणी संशईं बुडाला। प्रचितीविण ॥ २४॥

ह्या सर्व गोष्टींविषयी जर मनात संदेह असेल, तर मग जो परमार्थ केला असेल, तो वाया गेला असे जाणावे. कारण प्रचीती नसेल तर तो माणूस संशयात बुडून जातो. (२४)

हें परमार्थाचें वर्म । ल्रटिकें बोले तो अधम ।
ल्रटिकें मानी तो अधमोद्धम । येथार्थ जाणावा ॥ २५ ॥

येथे थोडक्यात परमार्थाचे वर्म सांगितले आहे. हे खोटे आहे असे जर कुणी म्हणेल, तर तो माणूस अधम आहे असे जाणावे. आणि जो या वर्मास खोटे मानील, तो खरोखरच अधमाधमच जाणावा. (२५)

येथें बोलण्याची जाली सीमा । नेणतां न कळे परमात्मा ।
असत्य नाहीं सर्वोत्तमा । तूं जाणसी ॥ २६ ॥

आता यापुढे काही बोलण्यासारखे उरलेच नाही. अज्ञान जोपर्यंत शिल्लक असते, तोपर्यंत परमात्मस्वरूपाचे ज्ञान होऊ शकत नाही. 'हे सर्वोत्तमा (रामराया), मी जे सांगतो ते असत्य नाही हे तू जाणतोसच.'(२६)

माझे उपासनेचा बडिवार । ज्ञान सांगावें साचार ।
मिथ्या बोलतां उत्तर । प्रभूस लगे ॥ २७ ॥

माझ्या उपासनेची थोरवी हीच आहे की खरोखर सत्य असेल तेच ज्ञान लोकांना सांगावे. मी जर मिथ्या बोलेन तर दोष प्रभूला लागेल. (कारण श्रीरामाचे दास खोटे बोलतात असे ठरेल.) (२७)

म्हणोनि सत्यचि बोलिलें । कर्त्यास पाहिजे वोळखिलें ।
मायोद्भवाचें शोधिलें । पाहिजे मूळ ॥ २८ ॥

म्हणून जे सत्य आहे, तेच सांगितले जात आहे. खरा कर्ता कोण हे साधकाने ओळखले पाहिजे. तसेच माया कोठे व कशी उत्पन्न झाली याच्या मुळाचाही शोध घेतला पाहिजे. (२८)

तेंचि पुढें निरूपण । बोलिलेंचि बोलिलें प्रमाण ।
श्रोतीं सावध अंतःकर्ण । घातलेंचि घालवें ॥ २९ ॥

तेच निरूपण पुढे केले जाईल. पूर्वी जे बोलले गेले आहे तेच परत बोलावे लागत आहे, तरी श्रोत्यांनी सावध होऊन पूर्ण लक्ष द्यावे. (२९)

सूक्ष्म निरूपण लागलें । तेथे बोलिलेंचि मागुतें बोलिलें ।
श्रोत्यांस पाहिजे उमजलें । म्हणौनियां ॥ ३० ॥

सूक्ष्म विषयाचे निरूपण करावयाचे असल्याने श्रोत्यांना ते नीट उमजावे म्हणून पूर्वी बोललेलेच फिरून बोलणे भाग पडत आहे. (३०)

प्रचित पाहातां निकट । उडोन जाती परिपाठ ।
म्हणोनि हे खटपट । करणें लगे ॥ ३१ ॥

स्पष्ट व सूक्ष्म अनुभवाचा विचार केला की रूढीचे खंडन होते. म्हणून ही खटपट करावी लागत आहे. (३१)

परिपाठेंचि जरी बोलिलें । तरी प्रचितसमाधान बुडालें ।
प्रचितसमाधान राखिलें । तरी परिपाठ उडे ॥ ३२ ॥

जनरूढीप्रमाणे बोलावे तर स्वानुभवामुळे प्राप्त होणारे समाधान मिळत नाही. बरे, प्रचीतीचे समाधान मिळावे म्हणून प्रयत्न केला की जनरूढीशी विरोध भासतो. (३२)

ऐसी सांकडी दोहींकडे । म्हणौन बोलिलेंचि बोलणें घडे ।
दोनी राखोनियां कोडें । उकलून दाऊं ॥ ३३ ॥

अशा प्रकारे दोन्ही बाजूकडून अडचण उपस्थित होते, म्हणूनच बोललेलेच परत बोलावे लागत आहे. आता दोन्हीचे रक्षण करून हे कोडे उकलून दाखवू या. (३३)

परिपाठ आणी प्रचित प्रमाण । दोनी राखोन निरूपण ।
श्रोते परम विचक्षण । विवरोत पुढें ॥ ३४ ॥

जनरूढी आणि अनुभव या दोन्हीचे प्रामाण्य राखून निरूपण केले जाईल. विचारवंत श्रोत्यांनी त्याचे पुनःपुनः मनन करावे. (३४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'प्रचितनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.

❑ ❑

## दशक १० : समास ९

# पुरुषप्रकृति

॥ श्रीराम ॥

आकाशीं वायो जालानिर्माण । तैसी ब्रह्मीं मूळमाया जाण ।
त्या वायोमधें त्रिगुण । आणी पंचभूतें ॥ १ ॥

आकाशात वायू निर्माण झाला, त्याप्रमाणे परब्रह्माच्या ठिकाणी मूळ माया उत्पन्न झाली. त्या वायूमध्येच सूक्ष्म रूपाने पंचमहाभूते आणि त्रिगुण असतात. (१)

वटबीजीं असे वाड । फोडून पाहातां न दिसे झाड ।
नाना वृक्षांचे जुंबाड । बीजापासून होती ॥ २ ॥

वडाच्या झाडाचे बी अगदी ल्हान असते. बी फोडून पाहिली तर तेथे झाड दिसत नाही, पण त्या एका बीजापासूनच वृक्षांचे समूहच्या समूह निर्माण होतात. (२)

तैसी बीजरूप मूळमाया । विस्तार जाला तेथूनियां ।
तिचें स्वरूप शोधुनियां । बरें पाहावें ॥ ३ ॥

तशी मूळ माया ही बीजरूप असून तिच्यापासून ह्या दृश्यसृष्टीचा विस्तार झाला आहे. त्या मूळमायेचे स्वरूप नीट विचारपूर्वक जाणून घ्यावे. (३)

तेथें दोनी भेद दिसती । विवेकें पाहावी प्रचिती ।
निश्चळीं जे चंचळ स्थिती । तोचि वायो ॥ ४ ॥

तेथे दोन भेद आहेत, त्यांची प्रचीती विवेकाने घ्यावी. निश्चल स्वरूपात जी चंचळता निर्माण होते, तोच वायू होय. (४)

तयामधें जाणीवकळा । जगज्जोतीचा जिव्हाळा ।
वायो जाणीव मिळोन मेळा । मूळमाया बोलिजे ॥ ५ ॥

त्यामध्ये जी जाणीव असते, तेच जगज्ज्योतीचे सातत्याने अस्तित्व होय. वायू आणि जाणीव दोन्ही मिळून मूळ माया असते. (५)

सरिता म्हणतां बायको भासे । तेथें पाहातां पाणीच असे ।
विवेकी हो समजा तैसें । मूळमायेसी ॥ ६ ॥

'सरिता' शब्द उच्चारताच कुणी बाई असावी असे वाटते, पण प्रत्यक्षात ती नदी म्हणजे पाणीच असते. त्याप्रमाणे 'मूळ माया' शब्दही उच्चारल्यावर बाईची कल्पना येते खरी, पण विवेकी माणसाने नीट विचार करून मूळमायेचे स्वरूप जाणून घ्यावे. (६)

वायो जाणीव जगज्जोती । तयास मूळमाया म्हणती ।
पुरुष आणी प्रकृती । याचेंच नांव ॥ ७ ॥

वायू आणि जाणीव म्हणजेच जगज्ज्योती मिळून एकत्रितपणे त्यांना मूळ माया म्हणतात. यालाच पुरुष आणि प्रकृती असेही म्हणतात. (७)

वायोस म्हणती प्रकृती । आणि पुरुष म्हणती जगज्जोती ।
पुरुषप्रकृती शिवशक्ती । याचेंच नांव ॥ ८ ॥

वायूला प्रकृती म्हणतात आणि जगज्ज्योती म्हणजे जाणीव तिला पुरुष म्हणतात. पुरुष-प्रकृती यांनाच शिव-शक्ती असेही नाव आहे. (८)

वायोमधें जाणीव विशेष । तोचि प्रकृतीमधें पुरुष ।
ये गोष्टीचा विश्वास । धरिला पाहिजे ॥ ९ ॥

वायूमधील विशेष जाणीव हीच प्रकृतीमधील पुरुष होय, या गोष्टीवर विश्वास ठेवलाच पाहिजे. (९)

वायो शक्ति जाणीव ईश्वर । अर्धनारीनटेश्वर ।
लोक म्हणती निरंतर । येणें प्रकारें ॥ १० ॥

वायू शक्तिमय तर ईश्वर जाणीवमय आहे. यालाच अर्धनारीनटेश्वर असेही लोक निरंतर म्हणतात. (१०)

वायोमध्यें जाणीव गुण। तेंचि ईश्वराचें लक्षण।
तयापासून त्रिगुण। पुढें जालें ॥ ११ ॥

वायूमध्ये जो जाणीव गुण असतो, तेच ईश्वराचे लक्षण होय. त्याच्यापासूनच पुढे त्रिगुण उत्पन्न झाले. (११)

तया गुणांमधें सत्वगुण। निखळ जाणीवलक्षण।
त्याचा देहधारी आपण। विष्णु जाणा ॥ १२ ॥

त्या त्रिगुणांपैकी जो शुद्ध सत्त्वगुण तेच जाणिवेचे लक्षण होय. त्याचा देहधारी तो विष्णू जाणावा.(१२)

त्याच्या अंशें जग चाले। ऐसें भगवद्गीता बोले।
गुंतले तेचि उगवले। विचार पाहातां ॥ १३ ॥

त्याच्या अंशानेच जग चालते असे भगवद्गीता सांगते. दृश्यामध्ये गुंतल्यामुळे शुद्ध जाणिवेचा हा अंश (अहं ब्रह्मास्मि) लोप पावतो. सारासारविचाराने तो प्रचीतीला येतो. (१३)

येक जाणीव वांटली। प्राणीमात्रांस विभागली।
जाणजाणों वांचविली। सर्वत्र काया ॥ १४ ॥

ती शुद्ध जाणीवच सर्व प्राणिमात्रांमध्ये विभागली गेली. त्या जाणिवेच्या योगानेच सर्व प्राणी आपापल्या देहाचे संरक्षण करतात. (१४)

तयेचें नांव जगज्जोती। प्राणीमात्र तिचेन जिती।
याची रोकडी प्रचिती। प्रत्यक्ष पाहावी ॥ १५ ॥

त्या शुद्ध जाणिवेचे नाव जगज्ज्योती असून तिच्या योगानेच सर्व प्राणिमात्र जगतात. याचा प्रत्यक्ष अनुभव आपल्याला नेहमी येतोच. (१५)

पक्षी श्वापद किडा मुंगी। कोणीयेक प्राणी जगीं।
जाणीव खेळे त्याचा आंगी। निरंतर ॥ १६ ॥

जगात जितके म्हणून प्राणी आहेत, पक्षी, जनावरे, किडा, मुंगी आदी कुणीही असो, त्यांच्या अंगी निरंतर जाणीव खेळत असते. (१६)

जाणोनी काया पळविती। तेण गुणें वांचती।
दडती आणी लपती। जाणजाणों ॥ १७ ॥

जाणिवेच्या योगाने त्यांना धोका वाटला की ते पळून जातात आणि जीव वाचवितात. जाणिवेमुळेच ते लपतात, दडतात व अशा प्रकारे स्वसंरक्षण करतात.(१७)

आवघ्या जगास वांचविती। म्हणोनि नामें जगज्जोती।
ते गेलियां प्राणी मरती। जेथील तेथें ॥ १८ ॥

ही शुद्ध जाणीवच सर्व जगास वाचविते, म्हणून तिला जगज्ज्योती नाव दिले जाते. ती जाणीव नष्ट झाली की प्राणी जेथल्या तेथे मरून पडतात. (१८)

मुळींचे जाणीवेचा विकार। पुढें जाला विस्तार।
जैसे उदकाचे तुषार। अनंत रेणु ॥ १९ ॥

मूळ मायेतील जाणिवेचाच पुढे विस्तार झाला. उदकाचे तुषार असावेत, तसे जाणिवेपासून अनंत रेणू निर्माण झाले. (१९)

तैसे देव देवता देवतें भूतें। मिथ्या म्हणों नये त्यांतें।
आपलाल्या सामर्थ्यें ते। सृष्टीमधें फिरती ॥ २० ॥

त्याप्रमाणे देव, देवता, दैवते, भूते वगैरे आपापल्या सामर्थ्यानुसार सृष्टीमध्ये फिरत असतात. त्यांना मिथ्या म्हणू नये. (२०)

सदा विचरती वायोस्वरूपें। स्वइच्छा पालटिती रूपें।
अज्ञानप्राणी भ्रमें संकल्पें। त्यास बाधिती ॥ २१ ॥

वायुस्वरूपात ती सदा फिरत असतात व स्वतःच्या इच्छेनुसार रूपे पालटत असतात. अज्ञानी लोकांच्या ठिकाणी भ्रम असतात, संकल्प असतात, म्हणून त्यांना बाधा करतात. (२१)

ज्ञात्यास संकल्पचि असेना। म्हणोन त्यांचेच बाधवेना।
याकारणें आत्मज्ञाना। अभ्यासावें ॥ २२ ॥

जो आत्मज्ञानी असतो त्याच्या ठिकाणी कुठलाही संकल्पच नसतो, म्हणून त्याला ते बाधा करूच शकत नाहीत. म्हणून आत्मज्ञानाचा अभ्यास करावा. (२२)

अभ्यासिलीयां आत्मज्ञान। सर्वकर्मास होये खंडण।
हे रोकडी प्रचित प्रमाण। संदेह नाहीं ॥ २३ ॥

आत्मज्ञानाचा अभ्यास केल्याने सर्व कर्मांचे खंडन होते, ही अगदी रोकडी प्रचीती आहे. त्यात संदेहाला जागाच नाही. (२३)

ज्ञानेंविण कर्म विघडे। हें तों कदापि न घडे।
सद्गुरुवीण ज्ञान जोडे। हेंहि अघटीत ॥ २४ ॥

ज्ञानाशिवाय कर्मफल कदापिही नष्ट होत नाही. त्याचप्रमाणे सद्गुरूशिवाय ज्ञान झाले, असेही कधी घडू शकत नाही. (२४)

म्हणोन सद्गुरु करावा। सत्संग शोधून धरावा।
तत्वविचार विवरावा। अंतर्यामीं ॥ २५ ॥

म्हणून सद्गुरूंना शरण जावे, शोधून सत्संग करावा आणि अंतर्यामी सतत तत्त्वविचाराचे मनन, निदिध्यासन करावे. (२५)

तत्वें तत्व निरसोन जातां। आपला आपणचि तत्वता।
अनन्यभावें सार्थकता। सहजचि जाली ॥ २६ ॥

तत्त्वाने तत्त्वांचे निरसन झाले की आपण केवळ आत्मरूपाने उरतो. आत्म्याशी अनन्यभाव ठेवल्याने स्वस्वरूपानुभव येऊन साहजिकच सार्थकता लाभते. (२६)

विचार न करितां जें केलें। तें तें वाउगें वेर्थ गेलें।
म्हणोनि विचारीं प्रवर्तलें। पाहिजे आधीं ॥ २७ ॥

विचार न करता जे जे करावे, ते चांगले होत नाही व व्यर्थच जाते, म्हणून सर्वप्रथम विचाराच्या ठिकाणी प्रवृत्त झाले पाहिजे. (२७)

विचार पाहेल तो पुरुषु। विचार न पाहे तो पशु।
ऐसी वचनें सर्वेशु। ठाईं ठाईं बोलिला ॥ २८ ॥

जो सारासारविचार करून पाहतो तोच पुरुष म्हणवून घेण्यास योग्य ठरतो. जो याप्रकारे विचार करत नाही तो पशू होय, अशा अर्थाची वचने भगवंताने ठायी ठायी बोलून दाखविली आहेत. (२८)

सिद्धांत साधायाकारणें। पूर्वपक्ष लागे उडवणें।
परंतु साधकां निरूपणें। साक्षात्कार ॥ २९ ॥

सिद्धांताचा निश्चय व्हावा, म्हणून प्रथम पूर्वपक्ष मांडून त्याचे खंडण करावे लागते. पण साधकांनी चर्चेतच न गुरफटता आत्मसाक्षात्कार करून घ्यावा. (२९)

श्रवण मनन निजध्यास। प्रचितीनें बाणतां विश्वास।
रोकडा साक्षात्कार सायास। करणेंचि नलगे ॥ ३० ॥

सतत श्रवण, मनन, निदिध्यासन केले असता प्रचीती येते व विश्वास दृढ होतो. मग रोकडा साक्षात्कार होण्यासाठी वेगळे सायास करावेच लागत नाहीत. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पुरुषप्रकृतिनाम' समास नववा समाप्त.

❑ ❑

## दशक १० : समास १०

## चळाचळनिरूपण

॥ श्रीराम ॥

गगनासारिखें ब्रह्म पोकळ। उदंड उंच अंतराळ।
निर्गुण निर्मळ निश्चळ। सदोदित ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, ब्रह्म हे आकाशासारखे पोकळ, अमर्याद उंच असे अंतराळ असून ते सदोदित निर्गुण, निर्मळ आणि निश्चल आहे. (१)

त्यास परमात्मा म्हणती। आणिक नामें नेणों किती।
परी तें जाणिजे आदिअंतीं। जैसें तैसें ॥ २ ॥

त्यालाच परमात्मा असे म्हणतात. आणखीही त्याला किती नावे आहेत ते कसे जाणणार? पण तरी ते परब्रह्म आदि, अंती जसेच्या तसेच आहे, हे जाणून घ्यावे.(२)

विस्तीर्ण पसरला पैस। भोंवता दाटला अवकाश।
भासचि नाहीं निराभास। जैसें तैसें ॥ ३ ॥

खूप मोठी विस्तीर्ण जागा आहे. तिच्या सर्व बाजूंस अवकाश दाटलेले आहे, अशी कल्पना केली तर तसा भास कदाचित होऊ शकेल, पण परब्रह्म हे निराभास असून ते सदैव जसेच्या तसेच असते. (३)

चहूंकडे पाताळतळीं। अंतचि नाहीं अंतराळीं।
कल्पांतकाळीं सर्वकाळीं। संचलेंचि असे ॥४॥

ते ब्रह्म चहूकडे, पाताळाच्याही खाली, अंतराळाच्या वर असे अनंत, सदा सर्वकाळी एवढेच नव्हे, तर कल्पांतकाळीही सर्वत्र घनदाट कोंदटलेले असते. (४)

ऐसें कांहीं एक अचंचळ। तें अचंचळीं भासे चंचळ।
त्यास नामेंहि पुष्कळ। त्रिविधा प्रकारें ॥५॥

अशा त्या एकल्या एक अचंचल परब्रह्माच्या ठिकाणी काही चंचळ असल्याचा भास निर्माण झाला. त्यालाही अनेक प्रकारे बरीच नामे ठेवली गेली. (५)

न दिसतां नांव ठेवणें। न देखतां खूण सांगणें।
असो हें जाणायाकारणें। नामाभिधानें ॥६॥

जे दिसत नाही त्याला नावे ठेवायची, जे दिसत नाही त्याची खूण/लक्षणे सांगायची हे सगळे विलक्षणच आहे. पण त्याचे स्वरूप जाणता यावे म्हणून त्यास निरनिराळी नावे दिली जातात. (६)

मूळमाया मूळप्रकृति। मुळपुरुष ऐसें ह्मणती।
शिवशक्ति नामें किती। नाना प्रकारें ॥७॥

त्यालाच मूळमाया, मूळप्रकृती, मूळपुरुष असे म्हणतात. शिवशक्ती आदीही अनेक नावे नाना प्रकारे ठेवली जातात. (७)

परी जें नाम ठेविलें जया। आधीं वोळखावें तया।
प्रचितीवीण कासया। वल्गना करावी ॥८॥

पण ज्या वस्तूला जे नाव ठेवलेले असते, त्या वस्तूचे ज्ञान आधी करून घ्यावे. प्रचीतीशिवाय उगीच वल्गना करण्यात काय अर्थ आहे? (८)

रूपाचि न धरितां सोये। नामासरिसें भरंगळों नये।
प्रत्ययाविण गळंगा होये। अनुमानज्ञानें ॥९॥

रूप न जाणताच नामाच्या योगे भरकटत जाऊ नये. अनुभव नसता नुसत्या अनुमानाच्या ज्ञानामुळे गोंधळच माजतो. (९)

निश्चळ गगनीं चंचळ वारा। वाजों लागला भरारां।
परी त्या गगना आणि समीरा। भेद आहे ॥१०॥

निश्चल अशा गगनात एकाएकी चंचळ वारा भरारा वाहू लागला तरी त्या गगनात आणि वाऱ्यात खूप भेद आहे. (१०)

तैसें निश्चळ परब्रह्म। चंचळ माया भासला भ्रम।
त्या भ्रमाचा संभ्रम। करून दाऊं ॥११॥

तसेच निश्चल अशा परब्रह्माच्या ठिकाणी चंचळ अशा मायेचा भ्रम भासू लागला. त्या भ्रमाचाच विस्तार कसा झाला ते आता स्पष्ट करून दाखवू. (११)

जैसा गगनीं चालिला पवन। तैसें निश्चळीं जालें चळण।
इछा स्फूर्तिलक्षण। स्फूर्णरूप ॥१२॥

जसा आकाशात वायू झाला तसे निश्चल ब्रह्माच्या ठिकाणी हालचाल झाली. 'एकोऽहं बहुस्याम्' ही इच्छास्फुरणरूप स्फूर्ती निर्माण झाली. (१२)

अहंपणें जाणीव जाली। तेचि मूळप्रकृति बोलिली।
माहाकारणकाया रचली। ब्रह्मांडीची ॥१३॥

निर्विकार ब्रह्माच्या ठिकाणी अहंपणाने जी जाणीव झाली तिलाच मूळ प्रकृती म्हणतात. हाच ब्रह्मांडाचा महाकारण देह होय. (१३)

महामाया मूळप्रकृती। कारण ते अव्याकृती।
सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती। विराट ते स्थूळ ॥१४॥

ब्रह्मांडाचा महामाया किंवा मूलप्रकृती हा महाकारण देह आहे. अव्याकृती हा कारणदेह आहे. ब्रह्मांडाच्या सूक्ष्म देहाला हिरण्यगर्भ म्हणतात आणि स्थूल देहाला विराट म्हणतात. (१४)

ऐसें पंचीकर्ण शास्त्रप्रमये। ईश्वरतनुचतुष्टये।
ह्मणोन हें बोलणें होये। जाणीव मूळमाया ॥१५॥

शास्त्रामध्ये जे पंचीकरण सांगितले आहे, त्याप्रमाणे हे ईश्वराचे चार देह आहेत. म्हणून मूळमायेच्या ठिकाणी जाणीव असते, असे म्हणावेच लागते. (१५)

परमात्मा परमेश्वर। परेश ज्ञानघन ईश्वरु।
जगदीश जगदात्मा जगदेश्वरु। पुरुषनामें ॥१६॥

परमात्मा, परमेश्वर, परेश, ज्ञानघन, ईश्वर, जगदीश, जगदात्मा, जगदीश्वर ही त्या परमात्म्याची पुरुषवाचक नामे आहेत. (१६)

सत्तारूप ज्ञानस्वरूप । प्रकाशरूप जोतिरूप ।
कारणरूप चिद्रूप । शुद्ध सूक्ष्म अलिप्त ॥ १७ ॥

आत्मा अंतरात्मा विश्वात्मा । द्रष्टा साक्षी सर्वात्मा ।
क्षेत्रज्ञ शिवात्मा जीवात्मा । देही कूटस्त बोलिजे ॥ १८ ॥

इंद्रात्मा ब्रह्मात्मा हरिहरात्मा । येमात्मा धर्मात्मा नैरुत्यात्मा ।
वरुणवायोकुबेरात्मा । ऋषीदेवमुनिधर्ता ॥ १९ ॥

गण गंधर्व विद्याधर । येक्ष किन्नर नारद तुंबर ।
सर्व लोकांचे अंतर । तो सर्वांतरात्मा बोलिजे ॥ २० ॥

चंद्र सूर्य तारामंडळें । भूमंडळें मेघमंडळें ।
येकवीस स्वर्गें सप्तपाताळें । अंतरात्माच वर्तवी ॥ २१ ॥

गुप्त वल्ली पाल्हाळली । तिचीं पुरुषनामें घेतलीं ।
आतां स्त्रीनामें ऐकिलीं । पाहिजे श्रोतीं ॥ २२ ॥

मूळमाया जगदेश्वरी । परमविद्या परमेश्वरी ।
विश्वंवंद्या विश्वेश्वरी । त्रैलोक्यजननी ॥ २३ ॥

अंतर्हेतु अंतर्कळा । मौन्यगर्भ जाणीवकळा ।
चपळ जगज्जोती जीवनकळा । परा पश्यंती मध्यमा ॥ २४ ॥

युक्ति बुद्धि मति धारणा । सावधानता नाना चाळणा ।
भूत भविष्य वर्तमाना । उकलून दावी ॥ २५ ॥

जागृति स्वप्न सुषुप्तीजाणे । तुर्या ताटस्ता अवस्ता जाणे ।
सुख दुःख सकळ जाणे । मानापमान ॥ २६ ॥

ते परम कठीण कृपालु । ते परम कोमळ स्नेहालु ।
ते परम क्रोधी लोभालु । मर्यादेवेगळी ॥ २७ ॥

शांती क्ष्मा विरक्ती भक्ती । अध्यात्मविद्या सायोज्यमुक्ति ।
विचारणा सहजस्थिती । जयेचेनी ॥ २८ ॥

सत्तारूप, ज्ञानस्वरूप, प्रकाशरूप, ज्योतीरूप, कारणरूप, चिद्रूप, शुद्ध, सूक्ष्म, अलिप्त,

आत्मा, अंतरात्मा, विश्वात्मा, द्रष्टा, साक्षी, सर्वात्मा, क्षेत्रज्ञ, शिवात्मा, जीवात्मा, देही, कूटस्थ इत्यादी नावेही आहेत. (१७-१८)

इंद्रात्मा, ब्रह्मात्मा, हरिहरात्मा, यमात्मा, धर्मात्मा नैर्ऋत्यात्मा, वरुण-वायूकुबेरात्मा, ऋषीदेवमुनीधर्ता,

गण, गंधर्व, विद्याधर, यक्ष, किन्नर, नारद, तुंबर इत्यादी सर्व लोकांचे अंतःकरण तोच सर्वांतरात्मा म्हणावा. (१९-२०)

चंद्र, सूर्य, तारामंडळे, भूमंडळे, मेघमंडळे, एकवीस स्वर्ग आणि सात पाताळ यांना अंतरात्माच चालवतो. (२१)

मूळ मायारूपी गुप्त वेल आहे. तिचा अफाट विस्तार झाला आहे. प्रथम तिची पुरुषवाचक नामे सांगितली. आता श्रोत्यांनी स्त्रीवाचक नामेही ऐकली पाहिजेत. (२२)

मूळमाया, जगदीश्वरी, परमविद्या, परमेश्वरी, विश्ववंद्या, विश्वेश्वरी, त्रैलोक्यजननी, अंतर्हेतु, अंतर्कळा, मौन्यगर्भ, जाणीवकळा, चपळ, जगज्ज्योती, जीवनकळा, परा, पश्यंती, मध्यमा

युक्ती, बुद्धी, मती, धारणा, सावधानता, नाना चाळणा, भूत, भविष्य, वर्तमानाला उलगडून दाखविणारी शक्ती ही तिची स्त्रीनामे आहेत. (२३-२५)

जी जागृती, स्वप्न, सुषुप्ती अवस्थांना जाणते, तुर्या, तटस्थता, या अवस्थांनाही जाणते. त्याप्रमाणे सुख-दुःख, मानापमान आदी सर्वही जाणते, (२६)

ती अत्यंत कठीण असून कृपाळू आहे, परम कोमल आणि स्नेहाळू आहे. त्याचबरोबर परम क्रोधी असून अमर्याद प्रेम करणारी आहे. (२७)

तिच्यामुळेच शांती, क्षमा, विरक्ती, भक्ती, अध्यात्मविद्या, सायुज्यमुक्ती, विचारणा आणि सहजस्थिती अनुभवास येतात. (२८)

**पूर्वीं पुरुषनामें बोलिलीं। उपरी स्त्रीनामें निरोपिलीं।**
**आतां नपुषकनामें ऐकिलीं। पाहिजे चंचळाचीं ॥ २९॥**

पूर्वी पुरुषवाचक नामे सांगितली, नंतर स्त्रीवाचक नामे सांगितली. आता चंचळाची नपुंसक नामे ऐकली पाहिजेत. (२९)

**जाणणें अंत:कर्ण चित्त। श्रवण मनन चैतन्य जीवित।**
**येतें जातें सुचीत। होऊन पाहा ॥ ३०॥**

जाणणे, अंत:करण, चित्त, श्रवण, मनन, चैतन्य, जीवित, जाणारे व येणारे हे सर्व सावध होऊन पहा.(३०)

**मीपण तूंपण जाणपण। ज्ञातेपण सर्वज्ञपण।**
**जीवपण शिवपण ईश्वरपण। अलिप्तपण बोलिजे ॥ ३१॥**

मीपण, तूपण, जाणपण, ज्ञातेपण, सर्वज्ञपण, जीवपण, शिवपण, ईश्वरपण, अलिप्तपण अशी ही सर्व नावे आहेत. (३१)

**ऐसीं नामें उदंड असती। परी ते येकचि जगज्जोती।**
**विचारवंत ते जाणती। सर्वांतरात्मा ॥ ३२॥**

याप्रमाणे असंख्य नामे आहेत, पण ती एकाच जगज्ज्योतीची आहेत. विचारवंत असतात ते जाणतात की, जगज्ज्योती म्हणजेच सर्वांतरात्मा होय. (३२)

**आत्मा जगज्जोती सर्वज्ञपण। तीनी मिळोन येकचि जाण।**
**अंत:कर्णचि प्रमाण। ज्ञप्तीमात्र ॥ ३३॥**

आत्मा, जगज्ज्योती, सर्वज्ञपण तिन्ही मिळून एकच आहेत. (पुरुषवाचक, स्त्रीवाचक व नपुंसक). शुद्ध जाणीवस्वरूप अंत:करण हेच यास प्रमाण आहे.(३३)

**ढीग जाले पदार्थांचे। पुरुष स्त्री नपुंसक नामाचे।**
**परंतु सृष्टीरचनेचें। किती ह्मणोन सांगावे ॥ ३४॥**

पुरुषवाचक, स्त्रीवाचक आणि नपुंसक वाचक पदार्थांचे ढीगच्या ढीग झाले आहेत. आणखी या सृष्टीतील कितीतरी नावे सांगता येतील. पण सगळे सांगणे कसे शक्य आहे. (३४)

**सकळ चाळिता येक। अंतरात्मा वर्तवी अनेक।**
**मुंगीपासून ब्रह्मादिक। तेणेंचि चालती ॥ ३५॥**

एक अंतरात्माच सर्वांचा चालक, प्रेरक आहे. मुंगीपासून ब्रह्मादिकापर्यंत सर्वांना त्याचेपासूनच प्रेरणा मिळते. (३५)

**तो अंतरात्मा आहे कैसा। प्रस्तुत वोळखावा आमासा।**
**नाना प्रकारींचा तमासा। येथेंचि आहे ॥ ३६॥**

तो अंतरात्मा आहे तरी कसा? त्याची जराशी ओळख आत्ताच करून घ्यावी. नाना प्रकारचा तमाशा (खेळ) त्याच्या ठिकाणीच चाललेला असतो. (३६)

**तो कळतो परी दिसेना। प्रचित येते परी भासेना।**
**शरीरीं असे परी वसेना। येके ठाईं ॥ ३७॥**

तो आहे हे कळते, पण तो दिसत नाही. त्याची प्रचीती येते, पण तो भासत नाही. शरीरात असतो, पण एका ठिकाणी राहात नाही. (३७)

**तीक्षणपणें गगनीं भरे। सरोवर देखतांच पसरे।**
**पदार्थ लक्षून उरे। चहुंकडे ॥ ३८॥**

सूक्ष्मपणाने तो आकाश व्यापून राहतो, तर सरोवर पाहिले की तो सरोवरभर पसरतो. सर्व पदार्थांस पाहून चहूकडे उरून राहतो. (३८)

**जैसा पदार्थ दृष्टीस दिसतो। तो त्यासारिखाच होतो।**
**वायोहूनि विशेष तो। चंचळविषईं ॥ ३९॥**

जसा पदार्थ दृष्टीस पडतो त्यासारखा तो होतो. वाऱ्यापेक्षाही तो अधिक चपळ आहे. (३९)

**कित्येक दृष्टीनें देखे। कितीयेक रसनेनें चाखे।**
**कितीयेक ते वोळखे। मनेंकरूनि ॥ ४०॥**

दृष्टीने तो कित्येक पदार्थ बघतो, जिभेने कित्येक पदार्थ चाखतो. मनाने तो कित्येक गोष्टी जाणतो. (४०)

**श्रोत्रीं बैसोन शब्द ऐकतो। घ्राणेंद्रियें वास घेतो।**
**त्वचेइंद्रियें जाणतो। सीतोष्णादिक ॥ ४१॥**

कानांत बसून तो शब्द ऐकतो, नाकाने वास घेतो; स्पर्शेंद्रियाने शीत-उष्णादिक जाणतो. (४१)

**ऐशा जाणे अंतर्कळा। सकळांमधें परी निराळा।**
**पाहातां त्याची अगाध लीळा। तोचि जाणे ॥ ४२॥**

अशा सर्व अंतरकळा जाणत असूनही तो सर्वांत असूनही निराळा असतो. खरोखर त्याची अगाध लीला तोच फक्त जाणू शकतो. (४२)

**तो पुरुष ना सुंदरी। बाळ तारुण्य ना कुमारी।**
**नपुंसकाचा देहधारी। परी नपुंसक नव्हे ॥ ४३॥**

तो पुरुष नाही, स्त्री नाही, बाळ नाही, तरुण नाही, कुमारी नाही. नपुंसकाच्या देहातही तोच असतो, परंतु तो नपुंसक नव्हे. (४३)

**तो चाल्वी सकळ देहासी। करून अकर्ता म्हणती त्यासी।**
**तो क्षेत्रज्ञ क्षेत्रवासी। देही कूटस्त बोलिजे ॥ ४४॥**

तोच सर्व देहांना चालवितो, म्हणून त्याला करून अकर्ता असे म्हणतात. या शरीररूपी क्षेत्रात वास करतो म्हणून व सर्व जाणतो म्हणून त्यास क्षेत्रज्ञ म्हणतात. तसेच देही, कूटस्थ असेही म्हणतात. (४४)

श्लोक

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोक्षर उच्यते॥

दोनी पुरुष लोकीं असती। क्षराक्षर बोलिजेती।
सर्व भूतें क्षर म्हणती। अक्षर कूटस्त बोलिजे॥ ४५॥

उत्तम पुरुष तो आणीक। निःप्रपंच निःकळंक।
निरंजन परमात्मा येक। निर्विकारी ॥ ४६॥

च्यारी देह निरसावे। साधकें देहातीत व्हावें।
देहातीत होतां जाणावें। अनन्य भक्त ॥ ४७॥

देहमात्र निरसुनी गेला। तेथें अंतरात्मा कैसा उरला।
निर्विकारीं विकाराला। ठाव नाहीं ॥ ४८॥

निश्चळ परब्रह्म येक। चंचळ जाणावें माईक।
ऐसा प्रत्यय निश्चयात्मक। विवेकें पाहावा ॥ ४९॥

येथें बहुत नलगे खळखळ। येक चंचळ येक निश्चळ।
शाश्वत कोणतें केवळ। ज्ञानें वोळखावें ॥ ५०॥

असार त्यागून घेईजे सार। म्हणोन सारासारविचार।
नित्यानित्य निरंतर। पाहाती ज्ञानी ॥ ५१॥

जेथे ज्ञानचि होतें विज्ञान। जेथें मनचि होतें उन्मन।
तेथें कैंचें चंचळपण। आत्मयासी ॥ ५२॥

सांगणोवांगणीचें काम नव्हे। आपुल्या अनुभवें जाणावें।
प्रत्ययाविण सिणावें। तेंचि पाप ॥ ५३॥

सत्यायेवढें सुकृत नाहीं। असत्यायेवढें पाप नाहीं।
प्रचितीविण कोठेंचि नाहीं। समाधान ॥ ५४॥

सत्य म्हणिजे स्वरूप जाण। असत्य माया हें प्रमाण।
येथें निरोपिलें पापपुण्य। रूपेंसहित ॥ ५५॥

दृश्य पाप वोसरलें। पुण्य परब्रह्म उरलें।
अनन्य होतांच जालें। नामातीत ॥ ५६॥

आपण वस्तु स्वतसिद्ध। तेथें नाहीं देहसमंध।
पापरासी होती दग्ध। येणें प्रकारें ॥ ५७॥

**अर्थ**—या लोकात हे दोनच पुरुष आहेत. त्यांना क्षर आणि अक्षर असे म्हणतात. सर्व भूते म्हणजे क्षर पुरुष, तर कूटस्थ म्हणजे अक्षर पुरुष होय.

दोन पुरुष या लोकांत आहेत. त्यांना क्षर आणि अक्षर म्हणतात. सर्व भूते क्षर आहेत आणि कूटस्थ अक्षर म्हणजे अविनाशी आहे, असे सांगतात. (४५)

याशिवाय जो उत्तम पुरुष म्हणून सांगितला जातो, तो म्हणजे निःप्रपंच, निष्कलंक, निरंजन आणि निर्विकारी एकला एक परमात्माच होय. (४६)

पिंडाच्या चारी देहांचे निरसन करून साधकाने देहातीत व्हावे. जो या प्रकारे देहातीत होतो, तोच अनन्य भक्त जाणावा. (४७)

सर्व देहांचा निरास झाल्यावर अंतरात्मा म्हणजेच देहातील आत्मा कसा उरणार? जेथे देह नाही तेथे हे नाव तरी कसे उरणार? निर्विकार परब्रह्म वस्तूच्या ठिकाणी विकाराला जागाच नाही. (४८)

परब्रह्म फक्त एक निश्चल आहे. बाकी मूळमायेसकट जे जे चंचळ आहे, बदलणारे आहे, मायिक आहे ते जाणून विवेकाने याचा निश्चयात्मक अनुभव घ्यावा. (४९)

येथे जास्त कटकट करण्याची आवश्यकता नाही. एक चंचळ आहे, एक निश्चल आहे. यातील शाश्वत कोणते हे केवळ ज्ञानाने, स्वरूपानुभव घेऊन ओळखावे. (५०)

यातील जे असार आहे त्याचा त्याग करून जे सार आहे ते ग्रहण करावे. यालाच सारासारविवेक किंवा नित्यानित्यविवेक करून ज्ञानी निरंतर पाहातात. (५१)

शाब्दिक ज्ञानाचे जेथे अनुभवात रूपांतर होते, जेथे मनच उन्मन होते. त्या आत्मवस्तूच्या ठायी चंचळपण कसे असेल? (५२)

हे काही सांगोवांगीचे काम नाही. मी जे सांगतो ते स्वानुभवाने सांगत आहे. तुम्ही स्वतःच्या अनुभवाने हे जाणावे. प्रत्ययाशिवाय उगीच शिणणे हे खरोखर पापच आहे. (५३)

सत्यासारखे पुण्य नाही आणि असत्याएवढे पाप नाही. अनुभव आल्याशिवाय काही केले तरी समाधान लाभणार नाही. (५४)

स्वरूप म्हणजेच सत्य होय आणि माया असत्य आहे प्रमाणांनी सिद्धच झाले आहे. याप्रमाणे पाप-पुण्य स्वरूप येथे स्पष्ट केले आहे. (५५)

दृश्य सृष्टी असत्य असल्याने ती पापरूप आहे, ते पाप नष्ट झाले आणि परब्रह्म सत्य आहे, म्हणून तेच पुण्य आहे. ते फक्त उरले. त्या परब्रह्माशी ऐक्य होताच साधक नामातीत होतो. (५६)

आपण स्वयंसिद्ध आत्मवस्तूच आहोत. देहाशी आपला काही एक संबंध नाही, असा अनुभव आला की त्या ज्ञानाग्नीने पापराशी दग्ध होऊन जातात. (५७)

| | |
|---|---|
| येरवीं ब्रह्मज्ञानेंवीण । जें जें साधन तो तो सीण ।<br>नाना दोषांचें क्षाळण । होईल कैसें ॥ ५८ ॥ | या ब्रह्मज्ञानाखेरीज एरवी जे जे साधन करावे, ते ते व्यर्थ श्रमच होत. त्या साधनांनी पापाचे क्षालन होऊ शकत नाही. (५८) |
| पापाचें वळलें शरीर । पापचि घडे तदनंतर ।<br>अंतरीं रोग वरीवरी उपचार । काय करी ॥ ५९ ॥ | हे शरीर जणू काय पापाचेच बनले आहे. त्यामुळे नंतरही त्याच्याकडून निरंतर पापच घडत असते. अंतरात देहबुद्धिरूपी भवरोग झालेला असतो व आपण वरवरचे उपचार करीत राहतो, तर रोग बरा कसा होणार?(५९) |
| नाना क्षेत्रीं हें मुंडिलें । नाना तीर्थीं हें दंडिलें ।<br>नाना निग्रहीं खंडिलें । ठाईं ठाईं ॥ ६० ॥ | नाना क्षेत्रांत जाऊन मुंडण केले, नाना तीर्थक्षेत्रांत जाऊन शरीर शिणवले किंवा अनेक प्रकारच्या निग्रहांनी नाना प्रकारे ते तोडले. (६०) |
| नाना मत्तिकेनें घांसिलें । अथवा तप्तमुद्रेनें लांसिलें ।<br>जरी हें वरीवरी तासिलें । तरी शुद्ध नव्हे ॥ ६१ ॥ | अनेक ठिकाणच्या मातीने ते घासले, अथवा तप्त मुद्रेने डागले किंवा हे वरवर तासून जरी काढले, तरी ते शुद्ध होणार नाही. (६१) |
| सेणाचे गोळे गिळिले । गोमुत्राचे मोघे घेतले ।<br>माळा रुद्राक्ष घातले । काष्ठमणी ॥ ६२ ॥ | शेणाचे (गोमयाचे) गोळे गिळले, गाडगे भरून गोमूत्र प्राशन केले, गळ्यात रुद्राक्षाच्या, तुळशीमण्याच्या माळा जरी घातल्या, (६२) |
| वेष वरीवरी केला । परी अंतरीं दोष भरला ।<br>त्या दोषाच्या दहनाला । आत्मज्ञान पाहिजे ॥ ६३ ॥ | वरवर उत्तम वेष केला, पण अंतरात दोषच दोष भरलेला असतो. त्या दोषाचे दहन व्हावे, म्हणून आत्मज्ञानाचीच आवश्यकता असते. (६३) |
| नाना व्रतें नाना दानें । नाना योग तीर्थाटणें ।<br>सर्वांहुनी कोटीगुणें । महिमा आत्मज्ञानाचा ॥ ६४ ॥ | अनेक व्रते, अनेक दाने, नाना प्रकारचे याग किंवा तीर्थाटणे यापेक्षा आत्मज्ञानाचा महिमा कोटिगुणाने अधिक आहे. (६४) |
| आत्मज्ञान पाहे सदा । त्याच्या पुण्यास नाहीं मर्यादा ।<br>दुष्ट पातकाची बाधा । निरसोन गेली ॥ ६५ ॥ | जो सदा आत्मज्ञानात मग्न असतो, त्याच्या पुण्याला सीमाच नसते. दुष्ट पातकाची बाधा केव्हाच नष्ट झालेली असते. (६५) |
| वेदशास्त्रीं सत्यस्वरूप । तेंचि ज्ञानियांचे रूप ।<br>पुण्य जालें अमूप । सुकृतें सीमा सांडिली ॥ ६६ ॥ | वेदशास्त्रात सत्यस्वरूप म्हणून ज्याचे वर्णन केलेले असते तेच ज्ञानी माणसाचे रूप असते. तो सत्यस्वरूपच होतो. त्यामुळे अमाप पुण्य संपादन केले जाते. पुण्याची सीमाच जणू ओलांडली जाते. (६६) |
| या प्रचितीच्या गोष्टी । प्रचित पाहावी आत्मदृष्टी ।<br>प्रचितवेगळे कष्टी । होऊंच नये ॥ ६७ ॥ | या सर्व अनुभवाच्या गोष्टी आहेत. स्वत: अनुभव घेऊन पाहावा. अनुभव न घेऊन कष्टी होऊच नये. (६७) |
| आगा ये प्रचितीचे लोक हो । प्रचित नस्तां अवघा शोक हो ।<br>रघुनाथकृपेनें राहो । प्रत्यय निश्चयाचा ॥ ६८ ॥ | अहो, प्रचीतीच्या लोकांनो, तुम्ही प्रचीती घ्यावी. प्रचीतीशिवाय सर्व दु:खच वाट्याला येते. तुम्हांला रघुनाथाच्या कृपेने दृढ अनुभव येऊन तुमचा आत्मस्वरूपाचा निश्चय टिकून राहो. (६८) |

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चळाचळनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

**दशक दहावा समाप्त.**

❑ ❑

# दशक अकरावा : भीमदशक

## दशक ११ : समास १

## सिद्धान्तनिरूपण

॥ श्रीराम ॥

आकाशापासून वायो होतो । हा तों प्रत्यये येतो ।
वायोपासून अग्नी जो तो । सावध ऐका ॥ १ ॥

आकाशापासून वायू होतो हे प्रत्यक्ष अनुभवास येते. आता वायूपासून अग्नी कसा निर्माण होतो ते सावधपणे ऐका. (१)

वायोची कठिण घिसणी । तेथें निर्माण जाला वन्ही ।
मंद वायो सीतळ पाणी । तेथुनि जालें ॥ २ ॥

वायूचे जे कठीण घर्षण होते, तेथे अग्नी निर्माण झाला आणि वायूच्या मंद झुळकेपासून शीतल पाणी निर्माण झाले. (२)

आपापासून जाली पृथ्वी । ते नाना बीजरूप जाणावी ।
बीजापासून उत्पत्ति व्हावी । हा स्वभावचि आहे ॥ ३ ॥

आपापासून पृथ्वी निर्माण झाली. पृथ्वीमध्ये नाना बीजे सामावलेली असतात. बीजापासूनच वनस्पती, प्राणिमात्र यांची स्वाभाविकरीत्या उत्पत्ती होत असते. (३)

मुळीं सृष्टी कल्पनेची । कल्पना आहे मुळींची ।
जयेपासून देवत्रयाची । काया जाली ॥ ४ ॥

ही संपूर्ण सृष्टीच कल्पनामय आहे. 'बहु स्याम्' ही जी पहिली कल्पना तीच मूळमाया होय. तिच्यापासूनच ब्रह्मा, विष्णू व महेश या त्रिदेवांचे देह उत्पन्न झाले. (४)

निश्चळामधें चंचळ । तेचि कल्पना केवळ ।
अष्टधा प्रकृतीचें मूळ । कल्पनारूप ॥ ५ ॥

निश्चल अशा परब्रह्मामध्ये चंचळाची कल्पना करणे हेच अति विलक्षण आहे. याप्रमाणे अष्टधा प्रकृतीचे मूळच मुळी कल्पनारूप आहे. (५)

कल्पना तेचि अष्टधा प्रकृति । अष्टधा तेचि कल्पनामूर्ती ।
मुळाग्रापासून उत्पत्ति । अष्टधा जाणावी ॥ ६ ॥

कल्पनाच अष्टधा प्रकृतिरूपाने व्यक्त झाली असून अष्टधा प्रकृती हीच मूर्तिमंत कल्पना होय. अगदी मुळापासून शेवटपर्यंत जे जे उत्पन्न झाले आहे, ते अष्टधा प्रकृतिरूपच आहे, हे जाणून घ्यावे. (६)

पांच भूतें तीन गुण । आठ जालीं दोनी मिळोन ।
म्हणौनि अष्टधा प्रकृति जाण । बोलिजेते ॥ ७ ॥

पंचमहाभूते आणि त्रिगुण मिळून आठ तत्त्वे होतात. म्हणूनच त्यांना अष्टधा प्रकृती म्हटले जाते. (७)

मुळीं कल्पनारूप जाली । पुढें तेचि फांपावली ।
केवळ जडत्वास आली । सृष्टिरूपें ॥ ८ ॥

प्रथम कल्पनाच मूळमाया सूक्ष्मरूपाने उत्पन्न झाली व तीच पुढे वाढली, विस्तारली आणि सृष्टिरूपाने स्थूलपणे आकारास आली. (८)

मुळीं जाली ते मूळमाया । त्रिगुण जाले ते गुणमाया ।
जडत्व पावली ते अविद्यामाया । सृष्टिरूपें ॥ ९ ॥

मुळात जी स्फुरणरूपाने उत्पन्न झाली ती मूळमाया होय. तिच्या ठिकाणी त्रिगुण प्रगट झाले, ती गुणमाया होय आणि सृष्टिरूपाने जी जडत्वास प्राप्त झाली, ती अविद्या माया जाणावी. (९)

पुढें च्यारी खाणी जाल्या । च्यारी वाणी विस्तारल्या ।
नाना योनी प्रगटल्या । नाना वेक्ती ॥ १० ॥

पुढे जीवांच्या चारी खाणी प्रगट झाल्या, चार प्रकारच्या वाणी विस्तारल्या, अनेक योनी प्रगट झाल्या आणि नाना व्यक्ती प्रगट झाल्या. असे असंख्य जीव निर्माण झाले. (१०)

ऐसी जाली उभारणी । आतां ऐका संव्हारणी ।
मागील दशकीं विशद करूनि । बोलिलें असे ॥ ११ ॥

या प्रकाराने या दृश्य सृष्टीची उभारणी झाली. आता संहारणी कशी झाली ते ऐका. मागील दशकात संहारणी विस्तारपूर्वक सांगितलीच आहे. (११)

परंतु आतां संकळित । बोलिजेल संव्हारसंकेत ।
श्रोते वक्ते येथें चित्त । देऊन ऐका ॥ १२ ॥

परंतु आता या समासातही संहारणी संकेतरूपाने संकलित करून सांगितली जाईल. तरी श्रोत्या-वक्त्यांनी चित्त एकाग्र करून ती नीटपणे ऐकावी. (१२)

शत वरुषें अनावृष्टि। तेथें आटेल जीवसृष्टि।
ऐशा कल्पांताच्या गोष्टी। शास्त्रीं निरोपिल्या ॥ १३

शंभर वर्षे पृथ्वीवर पाऊसच न पडल्याने सर्व जीवसृष्टी नष्ट होईल. अशा प्रकारच्या कल्पान्ताच्या गोष्टी शास्त्रांत वर्णन केलेल्या आहेत. (१३)

बाराकळीं तपे सूर्य। तेणें पृथ्वीची रक्षा होये।
मग ते रक्षा विरोन जाये। जळांतरीं ॥ १४॥

सूर्य त्याच्या बारा कळांनी तापू लागला की, सर्व पृथ्वी जळून तिची राख होऊन जाते. तीच राख महाप्रलयाच्या वेळी जळात विरून जाते. (१४)

तें जळ शोषी वैश्वानरु। वन्ही झडपी समीरु।
समीर वितुळे निराकारु। जैसें तैसें ॥ १५॥

अग्नीमुळे ते सर्व जल शोषले जाते व वायूमुळे तो अग्नीही विझून जातो. नंतर तो वायूही आकाशाच्या ठिकाणी लय पावतो व परब्रह्म मात्र निराकार जसेच्या तसेच असते. (१५)

ऐसी सृष्टिसंव्हारणी जाली। मागां विस्तारें बोलिली।
मायानिरासें उरली। स्वरूपस्थिति ॥ १६॥

याप्रकारे सृष्टीचा संहार कसा होतो, हे पूर्वी विस्तारपूर्वक सांगितलेच आहे. मायेचाही निरास झाला की, केवळ निर्विकार स्वरूपस्थिती मात्र उरते. (१६)

तेथें जीवशिव पिंडब्रह्मांड। आटोन गेलें थोतांड।
मायेअविद्येचें बंड। वितळोन गेलें ॥ १७॥

अशी स्थिती होते, तेव्हा जीव-शिव, पिंड-ब्रह्मांड, वगैरे सर्व थोतांड नाहीसे होते आणि अविद्यामायाही संपूर्ण नाश पावते. (१७)

विवेकेंचि बोलिला क्षये। म्हणोनि विवेकप्रळये।
विवेकी जाणती काये। मूर्खास कळे ॥ १८॥

याप्रमाणे विवेकाने जो संहार करावयाचा, त्याला विवेक-प्रलय असे म्हणतात. जे विवेकी असतात, ते अनुभवाने जाणतात. पण मूर्खांना हे कसे कळणार? (१८)

सृष्टि शोधितां सकळ। येक चंचळ येक निश्चळ।
चंचळास कर्ता चंचळ। चंचळरूपी ॥ १९॥

सर्व दृश्य सृष्टीचा विचाराने शोध घेऊ गेले असता दोनच तत्त्वे आढळून येतात. एक चंचळ व एक निश्चल होय. चंचळाचा कर्ताही चंचळच असतो व तो चंचळरूपच असतो. (१९)

जो सकळ शरीरीं वर्ते। सकळ कर्तुत्वास प्रवर्ते।
करून अकर्ता हा वर्ते। शब्द जया ॥ २०॥

जो सर्वांच्या शरीरास प्रेरणा देतो, सर्व कर्तृत्व ज्याच्यामुळे घडते, त्यालाच करून अकर्ता असे म्हटले जाते. (२०)

राव रंक ब्रह्मादिक। सकळांमधें वर्ते येक।
नाना शरीरें चाळक। इंद्रियेंद्वारें ॥ २१॥

राव, रंक, ब्रह्मादिक देव या सर्वांना तोच एक चालवतो व सर्वांच्या कर्तृत्वास प्रेरणा देतो. इंद्रियांच्या द्वारे तोच अनेक शरीरांना चालना देत असतो. (२१)

त्यास परमात्मा बोलती। सकळ कर्ता ऐसें जाणती।
परि तो नासेल प्रचिती। विवेकें पाहावी ॥ २२॥

त्यालाच लोक परमात्मा असे म्हणतात व तोच सकळांचा कर्ता आहे असेही जाणतात. पण तोही अखेर नाश पावतो, याची प्रचीती विवेकाने जाणावी. (२२)

जो स्वानामधें गुरुगुरितो। जो सूकरांमधें कुरुकुरितो।
गाढवीं भरोन भुंकतो। आटाहास्यें ॥ २३॥

जो कुत्र्यामध्ये गुरगुरतो, डुकरामध्ये कुरकुरतो आणि गाढवात अंतर्यामी भरून अट्टाहासाने ओरडतो. (२३)

लोक नाना देह देखती। विवेकी देहांत पाहाती।
पंडित समदर्शनें घेती। येणें प्रकारें ॥ २४॥

सामान्य लोक नाना देहांकडे स्थूल दृष्टीने पाहतात. जे विवेकी असतात ते देहातील अंतरात्म्याला पाहतात. जे पंडित असतात ते सर्वांना याप्रकारे समदृष्टीने पाहतात. (२४)

श्लोक

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।
शुनि चैव श्वपाके च पंडिता: समदर्शिन:॥

**अर्थ**—विद्या आणि विनय यांनी संपन्न असलेला ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा आणि चांडाल या सर्वांना विवेकी पुरुष समदृष्टीने पाहतात.

देह पाहातां वेगळाले। परंतु अंतर येकचि जालें।
प्राणीमात्र देखिलें। येकांतरें ॥ २५॥

प्राण्यांचे देह वेगवेगळे दिसले तरी अंतरी जाणीव कळा सर्वांच्या ठिकाणी एकच असल्याने विवेकी पुरुष सर्वांना समदृष्टीने पाहातात. (२५)

अनेक प्राणी निर्माण होती। परी येकचि कळा वर्तती।
तये नांव जगज्जोती। जाणतीकळा ॥ २६॥

अनेक प्राणी निर्माण होतात. पण ते सर्व अंत:करणातील जाणिवेच्या योगेच व्यवहार करीत असतात. त्या जाणीवकळेलाच जगज्ज्योती नाव आहे. (२६)

श्रोत्रीं नाना शब्द जाणे । त्वचेमधे सीतोष्ण जाणे ।
चक्षुमधें पाहों जाणे । नाना पदार्थ ॥ २७ ॥

सर्व प्राणी कानांनी शब्द ऐकून जाणून घेतात. त्वचेच्या योगे त्यांना शीत, उष्ण याचे ज्ञान होते. (डोळ्यांच्या) योगेच सर्व प्राणी नाना पदार्थ पाहतात. (२७)

रसनेमधें रस जाणे । घ्राणामधें वास तो जाणे ।
कर्मइंद्रियामधें जाणे । नाना विषयस्वाद ॥ २८ ॥

जिभेच्या योगे त्यांना रसाची जाणीव होते. नाकाच्या योगे निरनिराळे वास घेतात. कर्मेंद्रियांच्या योगे नाना विषयांचा स्वाद ते घेतात. (२८)

सूक्ष्म रूपें स्थूळ रक्षी । नाना सुखदुःखें परीक्षी ।
त्यास म्हणती अंतरसाक्षी । अंतरात्मा ॥ २९ ॥

सर्वांच्या हृदयांत सूक्ष्मरूपाने राहून स्थूल देहाचे जो रक्षण करतो व नाना सुख-दुःखांची जो अनुभूती घेतो, त्यालाच अंतर-साक्षी अंतरात्मा असे म्हणतात. (२९)

आत्मा अंतरात्मा विश्वात्मा । चैतन्य सर्वात्मा सूक्ष्मात्मा ।
जीवात्मा शिवात्मा परमात्मा । द्रष्य साक्षी सत्तारूप ॥ ३० ॥

आत्मा, अंतरात्मा, विश्वात्मा, चैतन्य, सर्वात्मा, सूक्ष्मात्मा, जीवात्मा, शिवात्मा, परमात्मा, द्रष्य, साक्षी, सत्तारूप हीही त्याची नावे आहेत. (३०)

विकारामधील विकारी । अखंड नाना विकार करी ।
तयास वस्तु म्हणती भिकारी । परम हीन ॥ ३१ ॥

विकारात्मक शरीरात राहणारा आणि नाना चेष्या करणारा म्हणून विकारी, आणि अखंड नाना विकार उत्पन्न करतो, म्हणून त्याला सद्वस्तू म्हणता येत नाही. पण दृष्टीने जे भिकारी आहेत, असे परम हीन लोक या जगज्योतीलाच सद्वस्तू किंवा परब्रह्म वस्तू म्हणतात. (३१)

सर्व येकचि दिसती । अवघा येकंकार करिती ।
ते अवघी माईक स्थिती । चंचळामधें ॥ ३२ ॥

या चंचळाच्या राज्यात सर्व देह बाह्यत: सारखेच दिसतात, म्हणून वर्णाश्रमधर्माचा अनादर करून सर्व एकच मानणारांची स्थिती मायिक होय. (३२)

चंचळ माया ते माईक । निश्चळ परब्रह्म येक ।
नित्यानित्यविवेक । याकारणें ॥ ३३ ॥

जे जे म्हणून चंचळ आहे ते सर्व मायिक आहे. निश्चल परब्रह्म एकले एक जसेच्या तसेच असते. म्हणूनच नित्यानित्यविवेकाने त्यास जाणून घ्यावे. (३३)

जातो जीव तो प्राण । नेणे जीव तो अज्ञान ।
जन्मतो जीव तो जाण । वासनात्मक ॥ ३४ ॥

जीव जातो असे जेव्हा म्हटले जाते, तेव्हा प्राण जातो. स्वरूप जो जाणत नाही तो अज्ञानी जीव होय. ज्यास जन्म असतो तो वासनात्मक जीव जाणावा. (३४)

ऐक्य जीव तो ब्रह्मांश । जेथें पिंडब्रह्मांडनिरास ।
येथें सांगितले विशेष । चत्वार जीव ॥ ३५ ॥

स्वरूपी ज्याचे ऐक्य झाले आहे, तो जीव ब्रह्मांश होय. तेथे पिंड-ब्रह्मांडाचे निरसन झालेले असते. याप्रमाणे हे जीवांचे चार विशेष प्रकार सांगितले आहेत. (३५)

असो हें अवघें चंचळ । चंचळ जाईल सकळ ।
निश्चळ तें निश्चळ । आदिअंतीं ॥ ३६ ॥

असो. हे सर्वच चंचळ आहेत व जे जे चंचळ असते ते शेवटी नाश पावते. जे निश्चल असते, ते आदि-अंती जसेच्या तसे निश्चलच असते. (३६)

आद्य मध्य अवसान । जे वस्तु समसमान ।
निर्विकारी निर्गुण निरंजन । निःसंग निःप्रपंच ॥ ३७ ॥

जी परब्रह्मवस्तू आहे, ती आधी, मध्ये व अंती सदासर्वकाळ समानच असते. ती निर्विकारी, निर्गुण, निरंजन, निःसंग आणि निःप्रपंच असते. (३७)

उपाधिनिरासें तत्वतां । जीवशिवास ऐक्यता ।
विवंचून पाहों जातां । उपाधि कैंची ॥ ३८ ॥

जीवाची उपाधी अविद्या माया व शिवाची उपाधी विद्या माया या दोन्ही उपाधींचा तत्त्वज्ञानाने निरास झाला असता जीवशिवाची ऐक्यता घडून येते. नीट विचार करून पाहिल्यावर उपाधीच नाही, हे कळून येते. (३८)

असो जाणणें तितुकें ज्ञान । परंतु होतें विज्ञान ।
मनें वोळखावें उन्मन । कोणया प्रकारें ॥ ३९ ॥

हे सर्व जाणणे यास ज्ञान म्हणतात, परंतु ज्ञानाचे अनुभवात रूपांतर झाल्यावर मग त्याला विज्ञान असे म्हणतात. उन्मन म्हणजे मनाचा लय ज्या अवस्थेत होतो ती स्थिती होय. त्या स्थितीचा परिचय मनाने कसा बरे होऊ शकेल? (३९)

**वृत्तीस न कळे निवृत्ति। गुणास कैंची निर्गुणप्राप्ती।**
**गुणातीत साधक संतीं। विवेकें केलें ॥ ४०॥**

जोपर्यंत वृत्ती शिल्लक असते, तोपर्यंत निवृत्ती म्हणजे काय हे कळू शकत नाही. गुणांच्या पलीकडे गेल्याशिवाय निर्गुणाची प्राप्ती होऊ शकत नाही. संत असतात ते विवेक जागृत करून साधकांना गुणातीत करतात. (४०)

**श्रवणापरीस मनन सार। मननें कळे सारासार।**
**निजध्यासें साक्षात्कार। निःसंग वस्तु ॥ ४१॥**

अध्यात्मनिरूपणाचे श्रवण करण्यापेक्षा त्याचे मनन करणे हे अधिक श्रेष्ठ आहे. कारण मनन केल्यानेच सारासारविवेक उत्पन्न होतो. याप्रकारे मनन केल्यानंतर त्याच्या निदिध्यासाने निःसंग जी आत्मवस्तू तिचा साक्षात्कार होतो. (४१)

**निर्गुणीं जे अनन्यता। तेचि मुक्ति सायोज्यता।**
**लक्ष्यांश वाच्यांश आतां। पुरे जाला ॥ ४२॥**

निर्गुणाच्या ठिकाणी जी ऐक्यता तिलाच सायुज्यमुक्ती म्हणतात. याचा साक्षात अनुभव आल्यानंतर वाच्यांश आणि लक्ष्यांश दोन्हीही शिल्लक राहात नाहीत. (४२)

**अलक्षीं राहिलें लक्ष। सिद्धांतीं कैंचा पूर्वपक्ष।**
**अप्रत्यक्षास कैंचें प्रत्यक्ष। असोन नाहीं ॥ ४३॥**

अलक्ष्याच्या ठिकाणी लक्ष्य विरून जाते. सिद्धांतापुढे पूर्वपक्ष कसा टिकणार? इतरांना प्रत्यक्ष वाटणारी माया जो साक्षात्कारी झाला, त्याला दिसणार तरी कशी? त्याला ती असून नसल्यासारखीच होय. (४३)

**असोन माईक उपाधी। तेचि सहजसमाधी।**
**श्रवणें वळावी बुद्धी। निश्चयाची ॥ ४४॥**

याप्रमाणे जो आत्मानुभवी आहे, त्याला मायारूपी उपाधी असून नसल्यासारखीच असल्याने तो नित्य सहजसमाधीत लीन असतो. ही स्थिती प्राप्त होण्यासाठी श्रवणाने आत्मवस्तूसंबंधी निश्चयात्मक बुद्धी प्राप्त होणे आवश्यक असते. (४४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सिद्धान्तनिरूपणनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक ११ : समास २

# चत्वारदेवनिरूपण

॥ श्रीराम ॥

**येक निश्चळ येक चंचळ। चंचळीं गुंतलें सकळ।**
**निश्चळ तें निश्चळ। जैसें तैसें ॥ १॥**

जगामध्ये दोनच वस्तू आहेत. एक निश्चल आहे, एक चंचळ आहे. सर्व प्राणिमात्र चंचळातच गुंतलेले आहेत. निश्चल हे सदासर्वकाळ जसेच्या तसे असते. (१)

**पाहे निश्चळाचा विवेक। ऐसा लक्षांमधें येक।**
**निश्चळऐसा निश्चयात्मक। निश्चळचि तो ॥ २॥**

निश्चलासंबंधी विचार करणारा लक्षावधी माणसांत एखादाच असतो. जो निश्चलासंबंधी निश्चयात्मक विचार करतो, तो स्वतःही निश्चलाप्रमाणे निश्चलच बनतो. (२)

**या निश्चळाच्या गोष्टी सांगती। पुन्हां चंचळाकडे धांवती।**
**चंचळचक्रीं निघोन जाती। ऐसे थोडे ॥ ३॥**

काही लोक असे असतात की, गोष्टी तर निश्चलाच्या करतात, पण पुन्हा चंचळाकडेच धावतात. या चंचलाच्या चक्रातून सहीसलामत सुटणारे फारच थोडे असतात. (३)

**चंचळीं चंचळ जन्मलें। चंचळाचिमधें वाढलें।**
**अवघें चंचळचि बिंबलें। जन्मवरी ॥ ४॥**

चंचळात चंचळच जन्मते, ते चंचळातच वाढते आणि त्यामुळे जन्मभर मनावर, चंचळाचाच ठसा उमटतो. (४)

**पृथ्वी अवघी चंचळाकडे। करणें तितुकें चंचळीं घडे।**
**चंचळ सांडून निश्चळीं पवाडे। ऐसा कैंचा ॥ ५॥**

सारी सृष्टी चंचळ आहे. सर्व क्रिया चंचळातच घडत असतात. म्हणून चंचळ सोडून निश्चलाचा विवेक करणारा विरळाच असतो. (५)

**चंचळ कांहीं निश्चळेना। निश्चळ कदापी चळेना।**
**नित्यानित्यविवेकें जना। उमजे कांहीं ॥६॥**

जे चंचळ आहे ते कधी निश्चल होऊ शकत नाही आणि जे निश्चल आहे ते कदापि चळत नाही. नित्यानित्यविवेक केल्याने लोकांना चंचळ काय आणि निश्चल काय याचे थोडेसे ज्ञान होते. (६)

**कांहीं उमजलें तरी नुमजे। कांहीं समजलें तरी न समजे।**
**कांहीं बुझे तरी निर्बुजे। किंचित मात्र ॥७॥**

पण थोडे फार कळले तरी न कळल्यासारखेच होते. थोडे काही समजले असे वाटते, पण समजलेले नसते. काही प्रचीती आल्यासारखी वाटते, पण ती किंचितमात्रच कळते. (७)

**संदेह अनुमान आणी भ्रम। अवघा चंचळामधें श्रम।**
**निश्चळीं कदा नाहीं वर्म। समजलें पाहिजे ॥८॥**

माणसाच्या मनात जे संदेह, अनुमान आणि भ्रम वगैरे उत्पन्न होतात, ते सर्व चंचळामुळेच होणारे भ्रम असतात. या गोष्टी निश्चलामध्ये कधी असूच शकत नाहीत, हे वर्म समजले पाहिजे. (८)

**चंचळाकरी तितुकी माया। माईक जाये विल्या।**
**ल्हान थोर म्हणावया। कार्य नाहीं ॥९॥**

जेवढे काही चंचळाकार आहे ते सर्व मायिक असते व जे जे मायिक असते ते नाश पावते. मायानिर्मित वस्तूमध्ये लहान -थोर असा भेद करणेच बरोबर नाही. कारण सर्व काही नाशिवंतच असते. (९)

**सगट माया विस्तारली। अष्टधा प्रकृति फांपावली।**
**चित्रविचित्र विकारली। नाना रूपें ॥१०॥**

सरसकट सर्वत्र मायाच विस्तारली असून अष्टधा प्रकृतीच्या रूपाने तीच फोफावली आहे. तिच्या योगेच चित्रविचित्र नाना रूपे उत्पन्न झाली आहेत. (१०)

**नाना उत्पत्ती नाना विकार। नाना प्राणी ल्हान थोर।**
**नाना पदार्थ मकार। नाना रूपें ॥११॥**

मायेच्या योगेच अनेक पदार्थ उत्पन्न झाले आहेत, नाना विकार उत्पन्न झाले आहेत. लहान-थोर असंख्य प्राणी, नाना पदार्थ, नाना प्रकार, नाना रूपे यांनी विश्व व्यापून गेले आहे. (११)

**विकारवंत विकारलें। सूक्ष्म जडत्वास आलें।**
**अमर्याद दिसों लागलें। कांहींचाबाहीं ॥१२॥**

अष्टधा प्रकृती विकारवंत असल्याने तिच्या योगे सूक्ष्म अव्यक्त असलेली ही सृष्टी दृश्य झाली व अमर्याद काहीच्या बाही स्थूल रूपाने प्रगट झाली. (१२)

**मग नाना शरीरें निर्माण जालीं। नाना नामाभिधानें ठेविलीं।**
**भाषापरत्वें कळों आलीं। कांहीं कांहीं ॥१३॥**

मग नाना शरीरे निर्माण झाली. त्यांना नाना नामे ठेवली गेली. भाषेच्या योगाने त्यांतील काही काही कळून येऊ लागली. (१३)

**मग नाना रीति नाना दंडक। आचार येकाहून येक।**
**वर्तों लागले सकळ लोक। लोकाचारें ॥१४॥**

मग नाना रीती, नाना दंडक निर्माण झाले. निरनिराळ्या प्रकारचे लोकाचार रूढ झाले. ते एकापेक्षा एक भिन्न होते व त्या लोकाचारांप्रमाणे सर्व लोक वागू लागले. (१४)

**अष्टधा प्रकृतीचीं शरीरें। निर्माण जालीं ल्हानथोरें।**
**पुढें आपुलाल्या प्रकारें। वर्तों लागती ॥१५॥**

अष्टधा प्रकृतीच्या योगे अनेक लहानथोर शरीरे निर्माण झाली व लोक आपापल्या स्वभावानुसार वागू लागले. (१५)

**नाना मतें निर्माण जालीं। नाना पाषांडें वाढलीं।**
**नाना प्रकारीचीं उठिलीं। नाना बंडें ॥१६॥**

अनेक मतमतांतरे निर्माण झाली. अनेक पाखंडे वाढू लागली. नाना प्रकारचे नाना मतप्रवाह निर्माण झाले. (१६)

**जैसा प्रवाह पडिला। तैसाच लोक चालिला।**
**कोण वारील कोणाला। येक नाहीं ॥१७॥**

रूढीचा प्रवाह जसा निर्माण झाला, त्याला अनुसरून लोक वागू लागले. कोण कोणाला जाब विचारणार, अशी परिस्थिती निर्माण झाली. (१७)

पृथ्वीचा जाला गळांठा। येकाहून येक मोठा।
कोण खरा कोण खोटा। कोण जाणे ॥१८॥

सर्व पृथ्वीवर एकच गोंधळ माजून राहिला. प्रत्येक जण स्वत:ला दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ मानू लागला. त्यामुळे कोण खरा आणि कोण खोटा हेच कळेनासे झाले. (१८)

आचार बहुकचिंत पडिला। कित्येक पोटासाठीं बुडाला।
अवघा वरपंगचि जाला। साभिमानें ॥१९॥

नाना प्रकारचा आचार रूढ झाला. पोटासाठी उत्तम आचार बुडाला, तर अभिमानामुळे आचाराचा देखावा दांभिक लोक करू लागले. (१९)

देव जाले उदंड। देवांचें मांडलें भंड।
भूतादेवतांचे थोतांड। येकचि जालें ॥२०॥

देव उदंड झाले. सर्वत्र देव-देवतांचे बंड माजले. भूते आणि दैवते यांचे थोतांड सर्वत्र माजून कुणाला काही कळेनासे झाले. (२०)

मुख्य देव तो कळेना। काशास कांहींच मिळेना।
येकास येक वळेना। अनावर ॥२१॥

खरा देव कोणता हे कुणीच जाणत नव्हते. एकाची मते दुसऱ्याच्या मतांशी मिळत नव्हती. सर्वच मतभेद अनावर झाले आणि कुणीच कुणाचे ऐकत नाही अशी अनवस्था ओढवली. (२१)

ऐसा नासला विचार। कोण पाहातो सारासार।
कैंचा ल्हान कैंचा थोर। कळेचिना ॥२२॥

याप्रमाणे सगळा समाज विवेकहीन बनला आहे. सारासार विचार करणारा कुणी राहिलेला नाही. त्यामुळे कोण लहान, कोण थोर हेही कळेनासे झाले आहे. (२२)

शास्त्रांचा बाजार भरला। देवांचा गल्बला जाला।
लोक कामनेच्या व्रताला। झोंबोन पडती ॥२३॥

शास्त्रांचा बाजार भरला आहे. देवांची एकच गर्दी झाली आहे. लोक सकाम व्रतवैकल्ये करण्यासाठी जीवाचा आटापिटा करीत आहेत. (२३)

ऐसें अवघें नासलें। सत्यासत्य हारपलें।
अवघें अनायेक जालें। चहूंकडे ॥२४॥

अशा प्रकारे सर्वच नासले आहे. सत्यासत्य कळेनासे झाले आहे. जिकडे-तिकडे योग्य नेता कुणी नसल्याने अराजक माजले आहे. (२४)

मतामतांचा गल्बला। कोणी पुसेना कोणाला।
जो जे मतीं सांपडला। तयास तेंचि थोर ॥२५॥

मतमतांचा गल्बला माजून कुणी कुणाला विचारीत नाही असे झाले आहे. जो ज्या मतांच्या प्रवाहात सापडतो, त्याला तेच मत श्रेष्ठ वाटू लागते. (२५)

असत्याचा अभिमान। तेणें पाविजे पतन।
ह्मणोनियां ज्ञाते जन। सत्य शोधिती ॥२६॥

असत्याचा अभिमान धरला की अध:पात ठरलेला असतो. म्हणूनच ज्ञाते लोक सत्याचा शोध घेत असतात. (२६)

लोक वर्तती सकळ। तें ज्ञात्यास करतळामळ।
आतां ऐका केवळ। विवेकी हो ॥२७॥

लोक ज्याप्रमाणे वागत असतात, ते तसे का वागतात हे ज्ञात्या पुरुषांना तळहातावरील आवळ्याप्रमाणे स्पष्टपणे कळून येत असते. तरी आता विवेकी पुरुषांनी हे सर्व नीट ऐकावे. (२७)

लोक कोण्या पंथें जाती। आणि कोण्या देवास भजती।
ऐसी हे रोकडी प्रचिती। सावध ऐका ॥२८॥

लोक कोणत्या मार्गाचे आचरण करतात, कुठल्या देवाला भजतात, त्यासंबंधीचा रोकडा अनुभव आता सावधपणे ऐका. (२८)

मृत्तिका धातु पाषाणादिक। ऐसिया प्रतिमा अनेक।
बहुतेक लोकांचा दंडक। प्रतिमादेवीं ॥२९॥

मृत्तिका, धातू, पाषाणादींच्या अनेक प्रकारच्या प्रतिमा असतात. बहुतेक लोक रूढ मार्गाने अशा प्रतिमारूपी देवांना भजतात. (२९)

नाना देवांचे अवतार। चरित्रें ऐकती येक नर।
जप ध्यान निरंतर। करिती पूजा ॥३०॥

काही लोक देवांचे जे नाना अवतार झाले, त्या अवतारांची चरित्रे आदराने ऐकतात व त्यांची पूजा करून निरंतर त्यांचा जप, ध्यान आदी करीत असतात. (३०)

येक सकळांचा अंतरात्मा। विश्वीं वर्ते जो विश्वात्मा।
द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा। मानिती येक ॥३१॥

तर काही लोक या जगातील सर्व जीवांचा तो अंतरात्मा आहे, या जगात जो विश्वात्मा, द्रष्टा, साक्षी, ज्ञानात्मा म्हणून ओळखला जातो, त्या एकाला मानतात आणि भजतात. (३१)

येक ते निर्मळ निश्चळ। कदापी नव्हेति चंचळ ।
अनन्यभावें केवळ। वस्तुच ते ॥ ३२॥

तर काही लोक निर्मळ, निश्चल अशा परब्रह्म वस्तूलाच अनन्यभावाने भजतात. त्यांची त्या अचळ परब्रह्माच्या ठिकाणी अचल निष्ठा असते. त्यामुळे ते केवळ वस्तुरूपच होऊन राहतात. (३२)

येक नाना प्रतिमा। दुसरा अवतारमहिमा ।
तिसरा तो अंतरात्मा। चौथा तो निर्विकारी ॥ ३३॥

याप्रमाणे नाना प्रतिमा हा एक प्रकार, दुसरा प्रकार अवतारमहिमा, तिसरा प्रकार अंतरात्मा, आणि चौथा प्रकार निर्विकार परब्रह्म. (३३)

ऐसे हे चत्वार देव। सृष्टीमधील स्वभाव ।
यावेगळा अंतर्भाव। कोठेंचि नाहीं ॥३४॥

असे हे चार प्रकारचे देव सांगितले जातात. ह्या चार प्रकारांखेरीज इतर कुठलाही प्रकार या सृष्टीत आढळून येत नाही. (३४)

अवघें येकचि मानिती। ते साक्ष देव जाणती ।
परंतु अष्टधा प्रकृति। वोळखिली पाहिजे ॥ ३५॥

कुणी एकच प्रकार साक्षी देवाचा जाणतात. पण हे सर्व अष्टधा प्रकृतीतच आहेत, हे जाणून घेतले पाहिजे. (३५)

प्रकृतीमधील देव। तो प्रकृतीचा स्वभाव ।
भावातीत माहानभाव। विवेकें जाणावा ॥ ३६॥

अष्टधा प्रकृतीमधील देव हा प्रकृतीच्याच स्वभावाचा म्हणजे मायिकच असतो. म्हणून भावातीत जो खरा देव तो श्रेष्ठ पुरुषाने विवेकाने जाणून घ्यावा. (३६)

जो निर्मळास ध्याईल। तो निर्मळचि होईल ।
जो जयास भजेल। तो तद्रूप जाणावा ॥ ३७॥

जो निर्मळ, निश्चल अशा देवाचे ध्यान करील, तो स्वत:ही निर्मलच होईल. जो ज्याचे भजन करतो, तो त्याच्याशी तद्रूप होतो, हे जाणून घ्यावे. (३७)

क्षीर नीर निवडिती। ते राजहंस बोलिजेती ।
सारासार जाणती। ते माहानभाव ॥ ३८॥

क्षीरनीर एकत्र केले असता त्यातून पाणी सोडून दूध जे ग्रहण करतात, त्यांनाच राजहंस म्हटले जाते. तसे जे सारासार निवडून सार ग्रहण करतात, तेच आत्मसाक्षात्कारी पुरुष जाणावेत. (३८)

अरे जो चंचळास ध्याईल। तो सहजचि चळेल ।
जो निश्चळास भजेल। तो निश्चळचि ॥ ३९॥

अरे, जो चंचळाचे ध्यान करतो तो स्वत:ही चंचळच बनतो आणि जो निश्चलास भजेल तो निश्चलच होईल, हे जाणून घ्यावे. (३९)

प्रकृतीसारिखें चालावें। परी अंतरीं शाश्वत वोळखावें ।
सत्य होऊन वर्तावें। लोकांऐसें ॥ ४०॥

सर्वसामान्य प्रापंचिकासारखे वर्तन असावे, पण अंतरंगात शाश्वत आत्मवस्तूचे अनुसंधान असावे. स्वत: सत्य वस्तू होऊन लोकांमध्ये मात्र लोकांसारखेच वागावे. (४०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चत्वारदेवनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक ११ : समास ३

# सिकवणनिरूपण

॥ श्रीराम ॥

बहुतां जन्मांचा सेवट। नरदेह सांपडे अवचट ।
येथें वर्तावें चोखट। नीतिन्यायें ॥ १॥

अनेक जन्मांच्या शेवटी अचानक नरदेह लाभतो. म्हणून नरदेहात नीतिन्यायाने शुद्ध आचरण करून त्याचे सार्थक करावे. (१)

प्रपंच करावा नेमक। पाहावा परमार्थविवेक ।
जेणेंकरितां उभय लोक। संतुष्ट होती ॥ २॥

माणसाने प्रपंचही नीतिनियमाने वागून अगदी व्यवस्थित करावा आणि परमार्थासंबंधीही विचार करावा. असे केल्याने इहलोक आणि परलोक दोन्हीकडे सुख लागते. (२)

शत वरुषें वय नेमिलें। त्यात बाळपण नेणतां गेलें ।
तारुण्य अवघें वेचलें। विषयांकडे ॥ ३॥

माणसाचे आयुष्य अंदाजे शंभर वर्षांचे मानले जाते. त्यातील बालपण तर अज्ञानातच निघून जाते आणि तारुण्य तर सगळे विषयभोग भोगण्यात खर्ची पडते. (३)

वृद्धपणीं नाना रोग। भोगणें लगे कर्मभोग।
आतां भगवंताचा योग। कोणे वेळे ॥ ४॥

म्हातारपणी देह अनेक रोगांनी जर्जर होतो. प्रारब्धाप्रमाणे कर्मभोग भोगावेच लागतात. मग भगवंताची प्राप्ती करून घेण्यास वेळ तरी कसा मिळणार? (४)

राजिक देविक उदेग चिंता। अन्न वस्त्र देहममता।
नाना प्रसंगे अवचिता। जन्म गेला ॥ ५॥

राजकीय त्रास, दैविक ताप, उद्वेग, चिंता, अन्न-वस्त्राची तरतूद करणे, देहममता आणि इतर अचानक ओढवणारे प्रसंग यात बघता बघता आयुष्य सरून जाते. (५)

लोक मरमरों जाती। वडिलें गेलीं हे प्रचिती।
जाणत जाणत निश्चिती। काये मानिलें ॥ ६॥

आजूबाजूला लोक मरतच असतात, वडील माणसेही जातात. हा अनुभव सतत येतच असतो. हे जाणून तरी निश्चिंत कसे राहावे? (६)

अग्न गृहासी लागला। आणि सावकास निजेला।
तो कैसा म्हणावा भला। आत्महत्यारा ॥ ७॥

एखाद्या माणसाच्या घराला आग लागलेली असता त्याने बेसावधपणे खुशाल झोपून राहावे, तर त्याला शहाणा कोण म्हणेल? त्याला आत्मघातकीच म्हणावे लागेल. (७)

पुण्यमार्ग अवघा बुडाला। पापसंग्रह उदंड जाला।
येमयातनेचा झोला। कठीण आहे ॥ ८॥

जीवनात माणसाने काहीच पुण्य केले नाही आणि उदंड पापसंग्रहच केला, तर त्याला पुढे कठीण अशा यमयातनेच्या हल्ल्यास तोंड द्यावे लागते. (८)

तरी आता ऐसें न करावें। बहुत विवेकें वर्तावें।
इहलोक परत्र साधावें। दोहींकडे ॥ ९॥

म्हणून आता असे करू नये. प्रपंच आणि परमार्थात दोन्हीकडे अत्यंत विवेकाने वागावे आणि इहलोकी आणि परलोकी आपले हित साधावे. (९)

आळसाचें फळ रोकडें। जांभया देऊन निद्रा पडे।
सुख म्हणौन आवडे। आळसी लोकां ॥ १०॥

जो कोणी अत्यंत आळशी असतो, त्याला त्याच्या आळसाचे फळ तत्काळ प्राप्त होते. असा माणूस जांभया देऊन खुशाल झोपी जातो. आळशी लोकांना अशा प्रकारे झोपून राहण्यातच सुख वाटते. (१०)

साक्षेप करितां कष्टती। परंतु पुढें सुखाडती।
खाती जेविती सुखी होती। येत्नेंकरूनी ॥ ११॥

जे कोणी कष्ट करतात, त्यांना पुढे सुख मिळते. प्रयत्नपूर्वक उद्योग केल्याने ते खाऊन-पिऊन सुखी होतात. (११)

आळस उदास नागवणा। आळस प्रेत्नबुडवणा।
आळसें करंटपणाच्या खुणा। प्रगट होती॥ १२॥

आळसामुळे माणसाला कधी सुख लाभू शकत नाही. तो उदास होतो. सर्व प्रकारे तो नागवला जातो. आळसामुळे प्रयत्न केलाच जात नाही आणि अखेर करंटेपणाची लक्षणे आळशी मनुष्याच्या ठिकाणी स्पष्टपणे दिसू लागतात. (१२)

म्हणौन आळस नसावा। तरीच पाविजे वैभवा।
अत्रीं परत्रीं जीवा। समाधान ॥ १३॥

म्हणून माणसाने कधी आळस करू नये. आळस सोडून उद्योग केल्यानेच वैभव प्राप्त होते आणि जीवाला इहलोकी आणि परलोकी समाधान प्राप्त होते. (१३)

प्रेत्न करावा तो कोण। हेंचि ऐका निरूपण।
सावध करून अंत:करण। निमिष्य येक ॥ १४॥

पण तो प्रयत्न कोणता करावा, याचे निरूपण आता क्षणभर चित्त एकाग्र करून सावधपणे ऐका. (१४)

प्रात:काळीं उठावें। कांहीं पाठांतर करावें।
येथानशक्ति आठवावें। सर्वोत्तमासी ॥ १५॥

रोज प्रात:काळी उठावे, नित्य काहीतरी पाठांतर करावे आणि यथाशक्ती सर्वोत्तमास आठवावे. (१५)

मग दिशेकडे जावें। जे कोणासिच नव्हे ठावें।
शौच्य आच्मन करावें। निर्मळ जळें ॥ १६॥

मग गावाबाहेर लांब कोठेतरी शौचास जावे व स्वच्छ पाण्याने हातपाय धुऊन आचमन करावे.(१६)

**मुखमार्जन प्रात:स्नान। संध्या तर्पण देवतार्चन।**
**पुढें वैश्यदेव उपासन। येथासांग ॥१७॥**

**कांहीं फळ्हार घ्यावा। मग संसारधंदा करावा।**
**सुशब्दें राजी राखावा। सकळ ल्रेक ॥१८॥**

**ज्या ज्याचा जो व्यापार। तेथें असावें खबर्दार।**
**दुश्चितपणें तरी पोर। वेढा ल्रवी ॥१९॥**

**चुके ठके विसरे सांडी। आठवण जालियां चर्फडी।**
**दुश्चित आळसाची रोकडी। प्रचित पाहा ॥२०॥**

**याकारणें सावधान। येकाग्र असावें मन।**
**तरी मग जेवितां भोजन। गोड वाटे ॥२१॥**

**पुढें भोजन जालियांवरी। कांहीं वाची चर्चा करी।**
**येकांतीं जाऊन विवरी। नाना ग्रंथ ॥२२॥**

**तरीच प्राणी शाहाणा होतो। नाहींतरी मूर्खचि राहातो।**
**ल्रेक खाती आपण पाहातो। दैन्यवाणा ॥२३॥**

**ऐक सदेवपणाचें लक्षण। रिकामा जाऊं नेदी येक क्षण।**
**प्रपंचवेवसायाचें ज्ञान। बरें पाहे ॥२४॥**

**कांहीं मेळवी मग जेवी। गुंतल्या ल्रेकांस उगवी।**
**शरीर कारणीं ल्रवी। कांहीं तरी ॥२५॥**

**कांहीं धर्मचर्चा पुराण। हरीकथा निरूपण।**
**वायां जाऊं नेदी क्षण। दोहींकडे ॥२६॥**

**ऐसा जो सर्वसावध। त्याचा कैंचा असेल खेद।**
**विवेकें तुटल्र समंध। देहबुद्धीचा ॥२७॥**

**आहे तितुकें देवाचें। ऐसे वर्तणें निश्चयाचें।**
**मूळ तुटें उद्वेगाचें। येणें रीतीं ॥२८॥**

नंतर तोंड धुऊन प्रात:स्नान करावे आणि संध्या, तर्पण, देवतार्चन करून यथासांग वैश्वदेव व उपासना करावी. (१७)

नंतर काही फलाहार घेऊन मग संसारासाठी आवश्यक तो उद्योग-धंदा करावा. सर्वांशी नेहमी गोड बोलून सर्वांना राजी राखावे. (१८)

ज्याचा जो काही व्यापार, धंदा असेल तो अत्यंत दक्षतेने, सावधपणे करावा. तेथे बेसावधपणा केल्यास एखादे पोरही फसवू शकेल, हे ध्यानी घ्यावे. (१९)

जो माणूस चुकतो, फसतो, विसरतो, वस्तू वा पदार्थ हरवतो आणि नंतर आठवण आल्यावर चरफडतो त्याची फटफजिती होते. दुश्चितपणा व आळस यांच्या परिणामामुळे अशी प्रचीती येते. (२०)

म्हणून माणसाने अत्यंत सावध असावे. जे काही करायचे असेल ते मन एकाग्र करून करावे. अशारीतीने उद्योगधंदा व्यवस्थित करून घरी आल्यावर भोजन केले असता ते गोड लागते. (२१)

पुढे भोजन झाल्यावरही अनेक चांगल्या ग्रंथांचे वाचन करावे, त्यावर चर्चा करावी. नंतर एकांतात त्यावर मनन, चिंतन करावे. (२२)

याप्रमाणे केल्यानेच माणूस शहाणा होतो, नाहीतर तो मूर्खच राहतो. आणि मग लोक खात-पीत असताना त्यांच्याकडे आशाळभूतासारखा दैन्यवाणा होऊन पाहात राहतो. (२३)

आता भाग्यवंताचे लक्षण सांगतो, ते ऐक. भाग्यवान असतो, तो एक क्षणभरही रिकामा बसून राहात नाही. आपल्या प्रपंचासाठी जो व्यवसाय करतो, त्याचे उत्तम ज्ञान तो संपादन करतो व सर्व वेळ सार्थकी लावतो. (२४)

काही ना काही कमावल्याशिवाय जो खात नाही व अडलेल्या-नडलेल्या लोकांना जो यथाशक्ती मदत करीत असतो, असा मनुष्य खरोखरच आपल्या देहाचे सार्थक करतो. (२५)

तो रोज काही ना काही धर्मचर्चा करतो, पुराण श्रवण करतो आणि हरिकथा व अध्यात्मनिरूपण यात वेळ घालवतो. प्रपंच आणि परमार्थ दोन्हीकडे तो एक क्षणही वाया जाऊ देत नाही. (२६)

असा जो सर्वकाळ सर्व विषयांबाबत अत्यंत सावध असतो त्यास खेद होईलच कसा? सारासारविचाराने तो देहबुद्धीचा संबंध तोडून टाकतो. (२७)

जे काही आहे, ते सर्व देवाचे आहे, असा त्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झालेला असतो व त्यास अनुसरून तो वागत असल्याने उद्वेगाचे मूळ कारणच नाहीसे होते. (२८)

प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थीं पंचिकर्ण ।
महावाक्याचें विवरण । करितां सुटे ॥ २९ ॥

प्रपंच उत्तम प्रकारे होण्यासाठी सुवर्णाची म्हणजे पैशाची आवश्यकता असते, तर परमार्थासाठी पंचीकरण जाणून घेणे आवश्यक असते. यानंतर 'तत्त्वमसि' इत्यादी महावाक्यांचे मनन, निदिध्यासन म्हणजेच विवरण केले असता मोक्ष प्राप्त होतो. (२९)

कर्म उपासना आणि ज्ञान । येणें राहे समाधान ।
परमार्थाचें जें साधन । तेंचि ऐकत जावें ॥ ३० ॥

कर्म, उपासना आणि ज्ञान यांपैकी आपणांस रुचेल ते परमार्थ-साधन करावे. यांचेसंबंधी सतत श्रवण करावे, म्हणजे शाश्वत समाधान प्राप्त होते. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सिकवणनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.**



## दशक ११ : समास ४

# विवेकनिरूपण

॥ श्रीराम ॥

ब्रह्म म्हणिजे निराकार । गगनासारिखा विचार ।
विकार नाहीं निर्विकार । तेंचि ब्रह्म ॥ १ ॥

ब्रह्म हे निराकार असते. ते गगनासारखे असे म्हणता येईल, पण गगनाच्या ठिकाणी विकार असतो आणि ब्रह्म हे पूर्ण निर्विकार असते. (१)

ब्रह्म म्हणिजे निश्चळ । अंतरात्मा तो चंचळ ।
द्रष्टा साक्षी केवळ । बोलिजे तया ॥ २ ॥

ब्रह्म हे निश्चल असते, तर अंतरात्मा हा चंचळ असतो. त्याला द्रष्टा अथवा केवळ साक्षी असे म्हणतात. (२)

तो अंतरात्मा म्हणिजे देव । त्याचा चंचळ स्वभाव ।
पाळिताहे सकळ जीव । अंतरीं वसोनी ॥ ३ ॥

तो अंतरात्मा म्हणजेच देव होय. तो चंचळ स्वभावाचा असून सर्वांच्या अंत:करणात जाणीवरूपाने राहून सर्व जीवांचे पालन करतो. (३)

त्यावेगळे जड पदार्थ । तेणेंवीण देह वेर्थ ।
तेणेंचि कळे परमार्थ । सकळ कांहीं ॥ ४ ॥

त्या अंतरात्म्याशिवाय सर्व दृश्य पदार्थ अचेतन असतात. त्याच्याशिवाय देहालाही काही अर्थ उरत नाही. त्या अंतरात्म्याच्या योगे परमार्थ आदी सगळ्या गोष्टींचे ज्ञान होते. (४)

कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग ।
प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग । देवचि चाल्वी ॥ ५ ॥

कर्ममार्ग, उपासनामार्ग, ज्ञानमार्ग, सिद्धांतमार्ग, प्रवृत्तिमार्ग, निवृत्तिमार्ग सर्व काही देव म्हणजे अंतरात्माच चालवतो. (५)

चंचळेंविण निश्चळ कळेना । चंचळ तरी स्थिरावेना ।
ऐसे हे विचार नाना । बरे पाहा ॥ ६ ॥

चंचळाशिवाय म्हणजेच अंतरात्म्याशिवाय निश्चल अशा परब्रह्माचे ज्ञान होत नाही आणि जे चंचळ असते ते टिकू शकत नाही, ते नाश पावते. अशा प्रकारे नाना विचार उत्पन्न होतात, ते नीट जाणून घ्यावेत. (६)

चंचळनिश्चळाची संधी । तेथें भांबावते बुद्धि ।
कर्ममार्गाचे जे विधी । ते मग ऐलिकडे ॥ ७ ॥

चंचळ अंतरात्म्याकडून निश्चल परब्रह्माकडे जाताना त्याच्या संधिकालात मध्येच शून्यत्वाचे विघ्न येते, तेथे साधकाची बुद्धी भांबावून जाते. म्हणून तो शून्यालाच परब्रह्म समजण्याचा संभव असतो. त्या स्थितीत कर्ममार्गाचे विधिनिषेध अलीकडेच राहतात. (७)

देव या सकळांचें मूळ । देवास मूळ ना डाळ ।
परब्रह्म तें निश्चळ । निर्विकारी ॥ ८ ॥

देव किंवा अंतरात्मा हाच सर्वांचे मूळ असला, तरी त्या देवाला मूळ ना शेंडा अशी स्थिती असते. फक्त परब्रह्म हेच निश्चल आणि निर्विकारी असते. (८)

निर्विकारी आणि विकारी। येक म्हणेल तो भिकारी।
विचाराची होते वारी। देखतदेखतां ॥ ९॥

निर्विकारी परब्रह्म आणि विकारी अंतरात्मा एकच आहेत, असे जो कुणी म्हणेल, तो विवेकाच्या दृष्टीने भिकारीच जाणावा. चंचळ आणि निश्चल एकच असल्याचा विचार सारासारविवेकाने नष्ट होतो. (९)

सकळ परमार्थास मूळ। पंचीकर्ण माहावाक्य केवळ।
तेंचि करावें प्रांजळ। पुनःपुन्हां ॥ १०॥

पंचीकरण आणि महावाक्याचे विवरण हे सर्व परमार्थाचे मूळ आहे, आधार आहे. म्हणून प्रांजळपणे त्याचे वारंवार मनन, निदिध्यासन करावे. (१०)

पहिला देह स्थूळकाया। आठवा देह मूळमाया।
अष्ट देह निर्शल्यिां। विकार कैंचा ॥ ११॥

पिंडाचा पहिला देह म्हणजे आपले स्थूल शरीर होय. आणि ब्रह्मांडाचा चौथा देह म्हणजे मूळमाया होय. हे पिंडाचे चार व ब्रह्मांडाचे चार मिळून आठ देहांचे विवेकाने निरसन केल्यावर विकार शिल्लक उरतोच कोठे? (११)

याकारणें विकारी। साचाऐसी बाजीगरी।
येक समजे, येक खरी। मानिताहे ॥ १२॥

म्हणून सर्व दृश्य सृष्टी ही सतत बदलणारी असून ती गारुडीविद्येसारखी आभासमय असूनही खऱ्यासारखी वाटते. विवेकी लोक ती अशाश्वत, मिथ्या हे जाणतात, तर विवेकहीन लोक तिला खरी मानतात. (१२)

उत्पत्ति स्थिती संव्हार। यावेगळा निर्विकार।
कळायासाठीं सारासार। विचार केला ॥ १३॥

उत्पत्ती, स्थिती, आणि संहार यांच्याही पलीकडे असलेले निर्विकार परब्रह्म जाणून घेण्यासाठी सारासारविचार केला पाहिजे. (१३)

सार असार दोनी येक। तेथें कैंचा उरला विवेक।
परीक्षा नेणती रंक। पापी करंटे ॥ १४॥

सार आणि असार दोन्ही एकच असे मानले तर मग विवेकाला वावच उरत नाही. जे सार कोणते आणि असार कोणते याची परीक्षा निवड करणे जाणत नाहीत, ते विवेकहीन लोक पापी, रंक आणि भाग्यहीनच जाणावेत. (१४)

जो येकचि विस्तारला। तो अंतरात्मा बोलिला।
नाना विकारीं विकारला। निर्विकारी नव्हे ॥ १

जो अंतरात्मा एकला एक विस्तार पावला, नाना विकार ज्याच्या ठिकाणी उत्पन्न झाले, तो नक्कीच निर्विकारी परब्रह्म नव्हे. (१५)

ऐसें प्रगटचि आहे। आपुल्या प्रत्ययें पाहें।
काय राहे काय न राहे। हें कळेना ॥ १६॥

हे सर्व खरे तर स्पष्टच आहे. आपल्या अनुभवासही येत असते. तरी सुद्धा काय शाश्वत आणि काय अशाश्वत हे कळत नाही. (१६)

जें अखंड होत जातें। जें सर्वदा संव्हारतें।
रोकडें प्रचितीस येतें। जनामधें ॥ १७॥

जे अखंड निर्माण होते व नाश पावते, ज्याचा नेहमी संहार होतो, त्याची लोकांना रोकडी प्रचीती येतच असते. (१७)

येक रडे येक चर्फडी। येकांची धरी नरडी।
येकमेकां झोंबती बराडी। दुकळल्ले जैसे ॥ १८॥

कुणी एखादा रडत असतो, तर दुसरा कुणी एखादा चरफडत असतो. कुणी दुसऱ्याचे नरडे धरतो, तर कुणी आशाळभूत दुष्काळातून आल्यासारखे एकमेकांशी झोंबू लागतात. (१८)

नाहीं न्याये नाहीं नीति। ऐसे हे लोक वर्तती।
आणि अवघेंच सार म्हणती। विवेकहीन ॥ १९॥

समाजात लोक न्यायनीती सोडून वागत असतात आणि तरीही विवेकहीन माणसे ह्या सर्व गोष्टीच सार आहेत असे म्हणतात. (१९)

धोंडे सांडून सोनें घ्यावें। माती सांडून अन्न खावें।
आणि आवघेंचि सार म्हणावें। बाष्कळपणें ॥ २०॥

सामान्य माणूसही धोंडे टाकून सोने घेतो, माती न खाता अन्न खातो, म्हणजे त्यालाही सार, असार कळते. आणि तरी बाष्कळपणाने सर्वच सार आहे, असे म्हणणे म्हणजे मूर्खपणाच होय. (२०)

म्हणौनि हा विचार करावा। सत्यमार्ग तोचि धरावा।
लाभ जाणोन घ्यावा। विवेकाचा ॥ २१ ॥

म्हणून सारासारविचार करून सत्य मार्गाचाच अवलंब करावा आणि विवेकाने आपला लाभ करून घ्यावा. (२१)

सारगार येकचि सरी। तेथें परीक्षेस कैंची उरी।
याकारणें चतुरीं। परीक्षा करावी ॥ २२ ॥

सार म्हणजे संपत्ती आणि गार म्हणजे गारगोटी दोन्ही सारखेच असे म्हटले तर तेथे परीक्षेला वावच उरणार नाही. म्हणून शहाण्या माणसांनी वस्तूची नीट पारख करावी. (२२)

जेथें परीक्षेचा अभाव। तेथें दे घाव घे घाव।
सगट सारिका स्वभाव। लौंदपणाचा ॥ २३ ॥

जेथे परीक्षाच केली जात नाही, तेथे दोन दिले काय किंवा दोन घेतले काय, काहीच फरक पडत नाही. सरसकट सर्व मूर्खपणाचाच बाजार असतो. (२३)

घेव ये तेंचि घ्यावें। घेव न ये तें सांडावें।
उंच नीच वोळखावें। त्या नांव ज्ञान ॥ २४ ॥

घेण्यासारखे असेल तेच घ्यावे, जे घेण्यासारखे नसेल त्याचा त्याग करावा. चांगले काय, वाईट काय हे ओळखावे. यालाच ज्ञान असे म्हणतात. (२४)

संसारसांतेस आले। येक लाभें अमर जाले।
येक ते करंटे ठकले। मुदल गेलें ॥ २५ ॥

संसाररूपी बाजारपेठेत आले असता काही लोक लाभ करून घेऊन देव होतात. पण काही भाग्यहीन नरदेहरूपी मूळ मुद्दलही घालवून बसतात. (२५)

जाणत्यानें ऐसें न करावें। सार तेंचि शोधून घ्यावें।
असार तें जाणोनत्यागावें। वमक जैसें ॥ २६ ॥

म्हणून जाणत्याने म्हणजे शहाण्या माणसाने असे करू नये. विवेकाने सार असेल तेच निवडून घ्यावे, असार जे असेल ते जाणून त्याचा ओकारीप्रमाणे त्याग करावा. (२६)

तें वमक करी प्राशन। तरी तें स्वानाचें लक्षण।
तेथें सुचिस्मंत ब्राह्मण। काय करी ॥ २७ ॥

कुत्र्याचा स्वभावच असा असतो की तो वमनच प्राशन करतो. पवित्र ब्राह्मणाने असे करावे काय? (२७)

जेहिं जैसें संचित केलें। तयास तैसेंचि घडलें।
जें अभ्यासीं पडोन जडलें। तें तों सुटेना ॥ २८ ॥

ज्याचे जसे पूर्वकर्म असेल, त्याच्याकडून त्याला अनुसरून कृती घडत असते. ज्यांचा अनेक जन्मांत अभ्यास घडलेला असतो, ती लक्षणे सुटता सुटत नाहीत. (२८)

येक दिव्यान्नें भक्षिती। येक विष्ठा सावडिती।
आपल्या वडिलांचा घेती। साभिमान ॥ २९ ॥

काही दिव्यान्ने सेवन करतात, तर काही विष्ठाच चिवडत बसतात आणि वर अभिमानाने आपल्या पूर्वजांप्रमाणे आपण करतो, असे म्हणतात. (२९)

असो विवेकेंविण। बोलणें तितुका सीणें।
कोणीयेकें श्रवण मनन। केलेंचि करावें ॥ ३० ॥

असो. ज्याच्या ठिकाणी विवेक नाही, त्यास या गोष्टी सांगणे म्हणजे केवळ श्रम होय म्हणून शहाण्याने नेहमी श्रवण-मनन करावे. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विवेकनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.

❑ ❑

## दशक ११ : समास ५

# राजकारणनिरूपण

॥ श्रीराम ॥

कर्म केलेंचि करावें। ध्यान धरिलेंचि धरावें।
विवरलेंचि विवरावें। पुन्हां निरूपण ॥ १ ॥

पूर्वी केलेलेच उत्तम कर्म पुन्हा पुन्हा करावे. ध्यानाभ्यासही नित्य करीतच जावा. तसेच अध्यात्मनिरूपणाचे विवरण सतत तेच तेच करीत असावे. (१)

**तैसें आम्हांस घडलें। बोलिलेंचि बोलणें पडिलें।**
**कां जें बिघडलेंचि घडलें। पाहिजे समाधान ॥ २॥**

समर्थ म्हणतात की, आम्हांलाही तसेच करावे लागत आहे. जे पूर्वी बोललो तेच परत परत बोलणे भाग पडत आहे. कारण श्रोत्यांचे बिघडलेले समाधान त्यांना परत प्राप्त करून दिले पाहिजे. (२)

**अनन्य राहे समुदाव। इतर जनास उपजे भाव।**
**ऐसा आहे अभिप्राव। उपायाचा ॥ ३॥**

आपल्याभोवती जो लोकसमुदाय गोळा झाला आहे, त्याची अनन्य निष्ठा टिकवणे फार महत्त्वाचे आहे. त्यांची अशी अनन्य निष्ठा पाहून इतर लोकांच्या मनातही भाव उत्पन्न होतो. हा उपाय करण्यात मुख्य हेतू लोकशिक्षण हा आहे. (३)

**मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण।**
**तिसरें तें सावधपण। सर्वविषईं ॥ ४॥**

लोकसंग्रह करणाऱ्याच्या अंगी कोणती लक्षणे हवीत, ते येथे सांगत आहेत. त्याला उत्तम प्रकारे हरिकथा आणि अध्यात्मनिरूपण करता आले पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे त्याच्या अंगी मुसद्दीपणा हवा आणि तिसरी गोष्ट म्हणजे सर्वच बाबतीत सावधपणा हवा. (४)

**चौथा अत्यंत साक्षेप। फेडावे नाना आक्षेप।**
**अन्याये थोर अथवा अल्प। क्षमा करीत जावे ॥ ५॥**

चौथी गोष्ट म्हणजे चिकाटीचा व्यासंग असला पाहिजे आणि इतरांचे आक्षेप यांचे निरसन त्याला करता आले पाहिजे. तसेच इतरांचे लहान-थोर अन्याय क्षमा करण्याची वृत्ती त्याच्या ठिकाणी असणे आवश्यक आहे. (५)

**जाणावें पराचें अंतर। उदासीनता निरंतर।**
**नीतिन्यायासि अंतर। पडोंच नेदावें ॥ ६॥**

तो लोकांच्या अंत:करणातील भाव जाणणारा असला पाहिजे. निरंतर तो अलिप्त असला पाहिजे. कुठल्याही परिस्थितीत त्याने नीतिन्याय सोडून वागता कामा नये. (६)

**संकेतें लोक वेधावा। येकूनयेक बोधावा।**
**प्रपंचहि सावरावा। येथानशक्त्या ॥ ७॥**

संकेताने त्याने लोकांना आकर्षित करून घ्यावे व लोकांना उपदेश करावा, शहाणे करावे आणि यथानुशक्ती त्यांचा प्रपंच सावरण्यासही मदत करावी. (७)

**प्रपंचसमयो वोळखावा। धीर बहुत असावा।**
**संमंध पडों नेदावा। अति परी तयाचा ॥ ८॥**

प्रपंचात वेळप्रसंगाचे भान ठेवावे. कठीण समयीही धीर सोडू नये. यथायोग्य ते सर्व करीत असताही प्रपंचात अधिक गुंतू नये. (८)

**उपाधीसी विस्तारावें। उपाधींत न संपडावें।**
**नीचत्व पहिलेंच घ्यावें। आणि मूर्खपण ॥ ९॥**

आपल्या कार्याचा व्याप वाढवावा, पण त्यात जास्त गुंतू नये. सुरुवातीपासूनच आपण आपल्याकडे कमीपणा घ्यावा, मूर्खपणाही घ्यावा. (९)

**दोष देखोन झांकावे। अवगुण अखंड न बोलावे।**
**दुर्जन सांपडोन सोडावे। परोपकार करूनी ॥ १०॥**

दुसऱ्याचे दोष दिसले तरी त्यावर पांघरूण घालावे. कुणाचेही अवगुण कधीच बोलून दाखवू नयेत. दुर्जनांशी गाठ पडली तर (त्यांना समज देऊन) त्यांच्यावर उपकार करून त्यांना सोडून द्यावे. (१०)

**तऱ्हे भरोंच नये। सुचावे नाना उपाये।**
**नव्हे तेंचि करावें कार्ये। दीर्घ प्रेत्नें ॥ ११॥**

तऱ्हेवाईकपणे वागू नये. अडचणीत सापडले असता नाना उपाय योजून सुटका करून घ्यावी. दीर्घ प्रयत्नाने असंभाव्य कार्येही करून दाखवावीत. (११)

**फड नासोंचि नेदावा। पडिला प्रसंग सांवरावा।**
**अतिवाद न करावा। कोणीयेकासी ॥ १२॥**

समुदायात फूट पडू देऊ नये. कठीण प्रसंगी धैर्याने सर्वांस सावरून धरावे. कुणाशीही अतिवाद करू नये. (१२)

**दुसऱ्याचें अभिष्ट जाणावें। बहुतांचें बहुत सोसावें।**
**न सोसे तरी जावें। दिगांतराप्रती ॥ १३॥**

दुसऱ्यांचे मनोगत, इच्छित जाणून घ्यावे. अनेकांचे अनेक प्रकारचे वागणे सोसावे. जर ते सोसत नसेल तर तेथून लांब कुठे तरी निघून जावे. (१३)

दुःख दुसऱ्याचें जाणावें। ऐकोन तरी वांटून घ्यावें ।
बरें वाईट सोसावें। समुदायाचें ॥ १४॥

दुसऱ्याचे दुःख जाणावे आणि ते सहानुभूतीने ऐकून वाटून घ्यावे. आपल्या समुदायाचे बरे-वाईट सहन करावे. (१४)

अपार असावें पाठांतर। सन्निधचि असावा विचार ।
सदा सर्वदा तत्पर। परोपकारासी ॥ १५॥

खूप पाठांतर असावे. नेहमी विचारपूर्वक वागावे. तसेच परोपकार करण्यासाठी सदैव तत्पर असावे. (१५)

शांती करून करवावी। तऱ्हे सांडून सांडवावी ।
क्रिया करूनी करवावी। बहुतांकरवीं ॥ १६॥

स्वतः अत्यंत शांत राहावे व इतरांनाही शांत करावे. आपण तऱ्हेवाईकपणाने वागू नये व इतरांनाही वागू देऊ नये. आपण स्वतः कार्य करीत असावे व अनेक लोकांकडूनही करवून घ्यावे. (१६)

करणें असेल अपाये। तरी बोलोन दाखऊं नये ।
परस्परेंचि प्रत्यये। प्रचितीस आणावा ॥ १७॥

कुणाला अपाय करायचाच असला, तर तो बोलून दाखवू नये. परस्पर दुसऱ्याकडून कार्य करून घेऊन त्याला प्रत्यय आणून द्यावा. (१७)

जो बहुतांचें सोसीना। त्यास बहुत लोक मिळेना ।
बहुत सोसितां, उरेना-। महत्व आपुलें ॥ १८॥

जो अनेक लोकांचे बोलणे, वागणे सहन करीत नाही, त्याला लोकसंग्रह करता येत नाही. पण म्हणून जास्त सोशीकपणाही दाखवू नये. नाहीतर आपले महत्त्वच राहत नाही. (१८)

राजकारण बहुत करावें। परंतु कळोंच नेदावें ।
परपीडेवरी नसावें। अंतःकरण ॥ १९॥

मुत्सद्देगिरीने वागावे. पण आपण काय करतो याचा कुणालाही थांगपत्ता लागू देऊ नये. दुसऱ्याला त्रास देण्याचा विचार मात्र मनात कधीही येऊ देऊ नये. (१९)

लोक पारखून सांडावे। राजकारणें अभिमान झाडावे ।
पुन्हा मेळवून घ्यावें। दुरील दोरें ॥ २०॥

लोकांची नीट पारख करावी. जे अभिमानी असतील त्यांचा अभिमान मुत्सद्देगिरीने दूर करावा व परत त्यांना युक्ती-प्रयुक्तीने आपलेसे करून घ्यावे. (२०)

हिरवटासी दुरी धरावें। कचरटासी न बोलावें ।
समंध पडतां सोडून जावें। येकीकडे ॥ २१॥

हिरवटाला लांब ठेवावे. भीतिग्रस्त माणसाला आपले बेत सांगू नयेत. अशा माणसांशी संबंध आल्यास तेथून दुसरीकडे निघून जावे. (२१)

ऐसें असो राजकारण। सांगतां तें असाधारण ।
सुचित अस्तां अंतःकरण। राजकारण जाणे ॥ २२॥

असो. राजकारण हे अशा प्रकारचे असते. त्याचे वर्णन करून सांगणे अवघड आहे. ज्याचे अंतःकरण एकाग्र होऊ शकते, तोच राजकारण जाणू शकतो. (२२)

वृक्षीं रूढासी उचलावें। युद्धकर्त्यास ढकलून द्यावें ।
कारबाराचें सांगावें। आंग कैसें ॥ २३॥

भीतिग्रस्त असेल त्याला धीर द्यावा व युद्धकर्त्याला ढकलून द्यावे. कारभाराचे निश्चित असे स्वरूप सांगता येत नाही. कारण केव्हा केव्हा योग्य पण भीतिग्रस्त अशा माणसांना सहानुभूतीने धीर देऊन कार्यास उद्युक्त करावे लागते, तर केव्हा शूरास जास्तच चेव येण्यासाठी टोचून बोलून दूर सारावे लागते. (२३)

पाहातां तरी सांपडेना। कीर्ति करूं तरी राहेना ।
आलें वैभव अभिळासीना। कांहीं केल्या ॥ २४॥

जो मुत्सद्दी असतो त्याला शोधू जावे, तर तो सापडत नाही. पण कीर्ती वाढेल असे कार्य केल्याशिवायही तो राहात नाही. बरे, लौकिक वैभवाचा स्वार्थही त्याच्या ठिकाणी आढळत नाही. (२४)

येकांची पाठी राखणें। येकांस देखो न सकणें ।
ऐसीं नव्हेत कीं लक्षणें। चातुर्याचीं ॥ २५॥

एखाद्याची पाठ राखणे, आणि कुणा एखाद्याचा उत्कर्ष पाहू न शकणे ही काही चातुर्याची लक्षणे नव्हेत. (२५)

न्याय बोलतांहि मानेना। हित तेंचि न ये मना ।
येथें कांहींच चालेना। त्यागेंविण ॥ २६॥

न्याय्य असेल ते सांगू लागले असता जो ते ऐकत नाही, जी गोष्ट त्याच्या हिताची म्हणून सांगण्यास जावे तर ते ज्याच्या मनास येत नाही, अशा माणसापुढे काही उपाय चालत नाही. त्याचा त्यागच करावा लागतो. (२६)

श्रोतीं कळोन आक्षेपिलें। म्हणौन बोलिलेंचि बोलिलें।
न्यूनपूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं ॥ २७॥

श्रोत्यांना हे सर्व कळत असून त्यांनी आक्षेप घेतला म्हणून पूर्वी बोललेलेच परत बोलावे लागते, तरी श्रोत्यांनी अधिक-उणे काही बोलले गेले असेल, त्याबद्दल क्षमा केली पाहिजे. (२७)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'राजकारणनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.

❑ ❑

## दशक ११ : समास ६

## महंतलक्षण

॥ श्रीराम ॥

शुद्ध नेटकें ल्याहावें। लेहोन शुद्ध शोधावें।
शोधून शुद्ध वाचावें। चुकों नये ॥ १॥

जो महंत असेल त्याने शुद्ध लिहावे, नीटनेटके लिहावे. लिहून झाल्यावर त्यातील अशुद्ध शोधून काढून ते शुद्ध करावे व अशा रीतीने तपासून शुद्ध केल्यावर ते व्यवस्थित शुद्ध वाचावे. या सर्व बाबतीत चुका करू नयेत. (१)

विश्कळित मात्रुका नेमस्त कराव्या। धाट्या जाणोन सदृढ धराव्या।
रंग राखोन भराव्या। नाना कथा ॥ २॥

विस्कळित काना-मात्रा तपासून व्यवस्थित कराव्यात. लेखनाची जी शैली एकदा स्वीकारली असेल तीच सुदृढ धरावी. लिहिताना कथा-प्रसंगाच्या अनुरोधाने मध्ये मध्ये सुंदर चित्रे काढून ती उत्तम प्रकारे रंगवावीत. (२)

जाणायाचें सांगतां न ये। सांगायाचें नेमस्त न ये।
समजल्याविण कांहींच न ये। कोणीयेक ॥ ३॥

ज्याला जे जाणायचे ते नीट सांगता येत नाही, जे सांगायचे असेल ते व्यवस्थितपणे सांगता येत नाही किंवा ज्याला काहीच नीट समजत नाही, असा माणूस महंत होऊ शकत नाही. (३)

हरिकथा निरूपण। नेमस्तपणें राजकारण।
वर्तायाचें लक्षण। तेंही असावें ॥ ४॥

महंतास हरिकथा व अध्यात्मनिरूपण करणे चांगल्या प्रकारे येणे आवश्यक आहे. तसेच नेमस्तपणे राजकारण करणेही त्याला यावयास हवे. त्याचे आचरणही उत्तम असायलाच हवे. (४)

पुसों जाणे सांगों जाणे। अर्थांतर करूं जाणे।
सकळिकांचें राखों जाणे। समाधान ॥ ५॥

कुणाला काय विचारावे, कुणाला काय सांगावे, ग्रंथातील मजकुराचा अचूक अर्थ करणे, हे सर्व महंतास आले पाहिजे. सर्वांचे मन राखून त्यांचे समाधान करणे त्याला जमायला हवे. (५)

दीर्घ सूचना आधीं कळे। सावधपणें तर्क प्रबळे।
जाणजाणोनि निवळे। येथायोग्य ॥ ६॥

पुढे काय घडणार याची ज्याला आधी कल्पना येते आणि जो सावधपणे त्याच्याविषयी तर्क करून त्या वेळी कसे वागावे याचा यथायोग्य निश्चय करू शकतो, तोच महंत होण्यास लायक ठरतो. (६)

ऐसा जाणे जो समस्त। तोचि महंत बुद्धिवंत।
यावेगळें अंतवंत। सकळ कांहीं ॥ ७॥

अशा प्रकारे जो सर्व गोष्टी जाणतो, तोच बुद्धिमान महंत होय. याखेरीज जे इतर सर्व काही ते नाशिवंत जाणावे. (७)

ताळवेळ तानमानें। प्रबंद कविता जाड वचनें।
मज्यालसी नाना चिन्हें। सुचती जया ॥ ८॥

ज्याला काळवेळ यांची योग्य समज आहे, जो प्रबंध, काव्य करणे व सुभाषिते उच्चारणे यात प्रवीण असून, ज्याच्या अंगी सभाधीटपणा असतो व ज्याला योग्य वेळी योग्य गोष्टी सुचतात; (८)

जो येकांतास तत्पर। आधीं करी पाठांतर।
अथवा शोधी अर्थांतर। ग्रंथगर्भींचें ॥ ९॥

जो एकांताविषयी तत्पर असतो, आधी खूप पाठांतर करून नंतर जो अर्थाचा शोध घेऊन ग्रंथांतील सार ग्रहण करतो; (९)

आधींच सिकोन जो सिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ।
गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ १० ॥

जो एखादी विद्या अथवा कला आधी स्वत: शिकून मग लोकांना शिकवतो, तोच श्रेष्ठ पदवी प्राप्त करू शकतो. असा महंत विवेकाच्या बळावर मायेत गुरफटलेल्या लोकांना सोडवतो. (१०)

अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर ।
भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर । करून दावी ॥ ११ ॥

त्याचे अक्षर सुंदर असते, वाचणे सुंदर असते, बोलणे सुंदर असते, चालणे सुंदर असते. त्याची भक्ती, त्याचे ज्ञान आणि त्याचे वैराग्यही सुंदर असून त्यास अनुसरून त्याचे वागणे असते. (११)

जयास येलचि आवडे । नाना प्रसंगीं पवाडे ।
धीटपणें प्रगटे दडे । ऐसा नव्हे ॥ १२ ॥

त्याला नेहमी प्रयत्न करणेच आवडते, जो कठीण प्रसंगी धैर्याने उभा ठाकतो, धीटपणे आल्या प्रसंगाला उघडपणे तोंड देतो, कधीही दडून बसत नाही. (१२)

सांकडीमधें वर्तों जाणे । उपाधीमधें मिळों जाणे ।
अलिप्तपणें राखों जाणे । आपणासी ॥ १३ ॥

संकटसमयी कसे वागावे हे तो यथार्थपणे जाणतो, तो लोकसंग्रहही करू शकतो आणि त्याच वेळी स्वत:स त्यापासून अलिप्त कसे राखावे हेही जाणतो. (१३)

आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठेंचि नाहीं ।
जैसा अंतरात्मा ठाईंचा ठाईं । गुप्त जाला ॥ १४ ॥

तसे बघितले तर तो सर्वांठायी असतो, पण बारकाईने विचार केला असता तो कोठेच गुंतलेला नाही हे कळून येते. अंतरात्मा जसा प्रत्येकाच्या हृदयातच असतो, पण गुप्त असतो. (१४)

त्यावेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे ।
न दिसोन वर्तवीतसे । प्राणीमात्रांसी ॥ १५ ॥

खरे तर अंतरात्म्याशिवाय काहीच खरे नाही, पण त्यास पाहू जावे तर तो दिसत नाही, पण दिसत नसूनही तोच सर्व प्राणिमात्रांना चालवत असतो. (१५)

तैसाच हाहि नानापरी । बहुत जनास शाहाणे करी ।
नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६ ॥

तसाच महंत हाही नाना प्रकारे अनेक लोकांना शहाणे करून सोडतो. लौकिक विद्या, अध्यात्मविद्या व इतरही नाना विद्या यांचे विवरण तो करतो. (१६)

आपणाकरितां शाहाणे होती । ते सहजचि सोये धरिती ।
जाणतेपणाची महंती । ऐसी असे ॥ १७ ॥

जे आपले कल्याण इच्छितात, ते स्वाभाविकच अशा महंताचा आश्रय घेतात. ज्ञानाची महती ही अशी थोर आहे. (१७)

राखों जाणें नीतिन्याय । न करी न करवी अन्याये ।
कठिण प्रसंगीं उपाये । करूं जाण ॥ १८ ॥

महंत नीतिन्यायाने वागतो, स्वत: कधी अन्याय करत नाही अथवा दुसऱ्याकडूनही करवीत नाही. कठीण प्रसंगी काय उपाय योजावा, हेही तो अचूक जाणतो. (१८)

ऐसा पुरुष धारणेचा । तोचि आधार बहुतांचा ।
दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९ ॥

अशा लक्षणांचा जो पुरुष असतो, तो अनेक जणांचा आधार ठरतो. रामदास म्हणतात की, रघुनाथाच्या अंगी असणारा हा गुण महंताने घ्यावा. (१९)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'महंतलक्षणनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक ११ : समास ७
# चंचळनदीनिरूपण

॥ श्रीराम ॥

चंचळ नदी गुप्त गंगा। स्मरणें पावन करी जगा।
प्रचित रोकडी पाहा गा। अन्यथा नव्हे ॥ १॥

या समासात समर्थांनी मायेचे नदीच्या रूपकाद्वारे वर्णन केले आहे. ते म्हणतात की, विद्या अविद्यात्मक माया ही एक अत्यंत चंचळ अशी महानदी आहे. तीतील ज्ञानमय सद्विद्या ही गुप्त गंगेप्रमाणे सर्व जगाला केवळ स्मरणाने पावन करणारी आहे. या वचनाची श्रोत्यांनी प्रचीती घेऊन पाहावी, म्हणजे हे वचन खोटे नव्हे हे त्यांना कळून येईल. (१)

केवळ अचंचळीं निर्माणजाली। अधोमुखें बळें चालिली।
अखंड वाहे परी देखिली। नाहींच कोणीं ॥ २॥

ही चंचळ महानदी केवळ निश्चल अशा परब्रह्माच्या ठिकाणी उगम पावून मोठ्या वेगाने अधोमुख वाहात जाते. ती अखंड वाहतच असते आणि तरी तिला कोणीच पाहू शकत नाही. (२)

वळणें वांकाणें भोवरे। उकळ्या तरंग झरे।
लादा लाटा कातरे। ठाईं ठाईं ॥ ३॥

या महानदीत अनेक वळणे, वाकणे, भोवरे आहेत. उकळ्या, तरंग, झरे आहेत, दलदल आहे. उसळणाऱ्या लाटा आहेत. खडकामुळे ती ठायी ठायी दुभंगली जाते. (३)

शुष्क जळाचे चळाळ। धारा धबाबे खळाळ।
चिपळ्या चळक्या भळाळ। चपळ पाणी ॥ ४॥

कित्येक ठिकाणी तिचे पात्र अगदी कोरडे पडलेले असते, तर काही ठिकाणी तिचा प्रवाह धबधब्याच्या रूपाने खळखळाट करीत कोसळत असतो. काही ठिकाणी पात्र अगदी अरुंद असते. काही ठिकाणी खूप रुंदही असते. काही ठिकाणी प्रवाह खूप जोरात वाहात असतो. असे हे पाणी अत्यंत चंचळ, चपळ असते. (४)

फेण फुगे हेलावे। सैरावैरा उदक धावे।
थेंब फुई मोजावे। अणुरेणु किती ॥ ५॥

कित्येक ठिकाणी त्यावर फेस येतो, तर कित्येक ठिकाणी फेसाचे फुगे बनून ते वाऱ्यामुळे हेलकावे खातात. नदीचे उदक सैरावैरा सर्वत्र धावत असते. त्यातील थेंब, तुषार आणि असंख्य अणूरेणू यांची मोजदाद, गणती कोण करू शकेल? (५)

वोसाणे वाहाती उदंड। झोतावे दर्कुटे दगड।
खडकें बेटें आड। वळसा उठे ॥ ६॥

प्रवाहात सापडून असंख्य पदार्थ, केरकचरा वगैरे वाहात येतात. अनेक ठिकाणी धबधबे निर्माण होतात. लहान-मोठे दगड, खडक आणि बेटे यांनी पाणी दुभंगले जाऊन वळसे घेऊन पुढे वाहतच असते. (६)

मृद भूमी तुटोन गेल्या। कठीण तैश्याचि राहिल्या।
ठाईं ठाईं उदंड पाहिल्या। सृष्टीमधें ॥ ७॥

मऊ जमिनी वाहून जातात, म्हणजेच अज्ञानी भ्याड जीव मायेच्या प्रवाहांत वाहात जातात, तर कठीण जमिनी म्हणजे ज्ञानी शूर लोक जसेच्या तसेच राहातात. असे दृश्य सृष्टीमध्ये जागोजागी दिसत असते. (७)

येक ते वाहतचि गेले। येक वळशामधें पडिले।
येक सांकडींत आडकले। अधोमुख ॥ ८॥

काही लोक या मायानदीत वाहातच गेले, कुणी भोवऱ्यात अडकले, तर काही अधोमुख होऊन कडेकपारीत अडकले. (८)

येक आपटआपटोंच गेलीं। येक चिरडचिर्डोंच मेलीं।
कितीयेक ते फुगलीं। पाणी भरलें ॥ ९॥

एक आपटत आपटतच खलास झाले, तर कुणी चिरडून चिरडून मेले. तर कित्येकांच्या पोटांत पाणी भरल्याने ते फुगून गेले. म्हणजे कित्येकांना अहंकार होऊन ते गर्वाने फुगून जातात. (९)

येक बळाचे निवडले। ते पोहतचि उगमास गेले।
उगमदर्शनें पवित्र जाले। तीर्थरूप ॥ १०॥

काही निधड्या छातीचे बलवान असे निवडक लोक मात्र पोहत पोहत लौकिक प्रवाहाच्या उलट जाऊन उगमास पोहोचले म्हणजे परब्रह्माकडे पोहोचले. त्याच्याशी एकरूप झाले. असे उगमाकडे म्हणजे परब्रह्माकडे जे गेले ते त्या परब्रह्माच्या साक्षात्काराने पवित्र होऊन तीर्थरूप बनतात. (१०)

तेथें ब्रह्मादिकांचीं भुवनें। ब्रह्मांडदेवतांचीं स्थानें।
उफराटी गंगा पाहातां मिळणें। सकळांस तेथें ॥ ११ ॥

यांप्रमाणे लौकिक प्रवाहाच्या उलट दिशेस जे जातात, त्यांना तेथे ब्रह्मादी देवतांची भुवने व ब्रह्मांड देवतांची स्थाने यांचे दर्शन घडते. (११)

त्या जळाऐसें नाहीं निर्मळ। त्या जळाऐसें नाहीं चंचळ।
आपोनारायण केवळ। बोलिजे त्यासी ॥ १२ ॥

त्या उगमाच्या ठिकाणी जे जळ असते, ते अत्यंत निर्मळ असते, पण चंचळही असते. त्यालाच आपोनारायण असेही म्हणतात. (१२)

माहानदी परी अंतराळीं। प्रत्यक्ष वाहे सर्वकाळीं।
स्वर्गमृत्यपाताळी। पसरली पाहा ॥ १३ ॥

ही महामायारूपी नदी अंतराळात म्हणजे चिदाकाशात परब्रह्म स्वरूपात सर्वकाळी प्रत्यक्ष वाहत असते. ती स्वर्ग, मृत्यू, पाताळ या तीनही लोकांत पसरलेली आहे. (१३)

अधोर्ध अष्टहि दिशा। तिचें उदक करी वळसा।
जाणते जाणती जगदीशा। सारिखीच ते ॥ १४ ॥

खाली-वर, सर्वत्र, आठ दिशांना या मायानदीचे उदक वेढून राहिलेले आहे. ज्ञानी लोक या महामायेला जगदीशासारखीच आहे असे जाणतात. (१४)

अनंत पात्रीं उदक भरलें। कोठें पाझपाझरोंच गेलें।
कितीयेक तें वेचलें। संसारासी ॥ १५ ॥

अनेक पात्रांत म्हणजे प्राणिमात्रांत या मायानदीचे उदक म्हणजे अहंभाव भरलेला असतो. पण काही पात्रांतून मात्र ते पाझरून पाझरून नाहीसे होते. (म्हणजे साधुसंत आदींचा अहंभाव मात्र वाहून जाऊन नाहीसा झालेला असतो.) कित्येक त्या पाण्याचा संसारासाठी उपयोग करतात. (१५)

येक्यासंगें तें कडवट। येक्यासंगें तें गुळचट।
येक्यासंगें तें तिखट। तुरट क्षार ॥ १६ ॥

जसे पात्र असेल तसे ते उदक बनते. कडवटाबरोबर कडवट, गुळचटाबरोबर गुळचट, तर तिखटाबरोबर तिखट, तुरटाबरोबर तुरट, तर क्षाराबरोबर क्षार बनते. (१६)

ज्या ज्या पदार्थास मिळे। तेथें तद्रूपचि मिसळे।
सखोल भूमीस तुंबळे। सखोलपणें ॥ १७ ॥

ज्या ज्या पदार्थांत ते मिसळले जाते त्याच्याशी ते तद्रूप होते. सखोल भूमी असेल तर ते त्यात सखोलपणे भरून राहते. (१७)

विषामधें विषचि होतें। अमृतामधें मिळोन जातें।
सुगंधीं सुगंध तें। दुर्गंधीं दुर्गंध ॥ १८ ॥

विषामध्ये ते विषच होते. अमृतात एकजीव होऊन अमृत बनते. सुगंधी पदार्थाच्या योगे सुगंधी, तर दुर्गंधी पदार्थाच्या योगे दुर्गंधी बनते. (१८)

गुणीं अवगुणीं मिळे। ज्याचें त्यापरी निवळे।
त्या उदकाचा महिमा न कळे। उदकेंविण ॥ १९ ॥

गुणात गुणी, अवगुणात अवगुणी, ज्याचा जसा गुण असेल त्याप्रमाणे ते होते. त्या उदकाचा म्हणजे मायेचा महिमा उदकाशिवाय म्हणजेच विद्यामायेच्या सहाय्याशिवाय कळत नाही. (१९)

उदक वाहे अपरांपर। न कळे नदी कीं सरोवर।
जळवास करून नर। राहिले कितीयेक ॥ २० ॥

उदक इतके अपरंपार वाहात असते की नदी आहे की सरोवर आहे हेही कळत नाहीसे होते. त्यांत कित्येक माणसे जळवास करून म्हणजे संसारातच गुंतून राहातात. (२०)

उगमापैलिकडे गेले। तेथें परतोन पाहिलें।
तंव तें पाणीच आटलें। कांहीं नाहीं ॥ २१ ॥

जे उगमापलीकडे जातात, म्हणजे मायेपलीकडे जाऊन परब्रह्मापर्यंत पोहोचतात, त्यांनी मागे वळून पाहिले की त्यांना सर्व पाणीच आटून गेलेले दिसते. तेथे पाणीच नाही, काहीही नाही, असा अनुभव त्यांना येतो. (२१)

वृत्तिसुन्य योगेश्वर। याचा पाहावा विचार ।
दास म्हणे वारंवार। किती सांगों ॥ २२ ॥

मीपणाविरहित जे साक्षात्कारी योगेश्वर त्यांचा अनुभव असा असतो. यासंबंधी श्रोत्यांनी विचार करावा. रामदास म्हणतात की, वारंवार तीच गोष्ट किती म्हणून सांगावी? (२२)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चंचळनदीनिरूपणनाम' समास सातवा समाप्त.

❑❑

## दशक ११ : समास ८
# अंतरात्माविवरण

॥ श्रीराम ॥

आधीं वंदूं सकळकर्ता। समस्त देवांचा जो भर्ता।
त्याचे भजनीं प्रवर्ता। कोणीतरी ॥ १ ॥

आता सर्व विश्वाचा कर्ता आणि सर्व देवांचा जो देव त्याला आधी वंदन करू या. श्रोतेहो, कोणीतरी त्या देवाचे भजन करण्यास प्रवृत्त व्हा. (१)

तेणेंविण कार्य न चले। पडिलें पर्ण तेंहि न हाले।
अवघें त्रैलोक्येचि चाले। जयाचेनी ॥ २ ॥

त्याच्या सत्तेशिवाय कुठलेही कार्य घडत नाही. गळून पडलेले पानही त्याच्या सत्तेशिवाय हलू शकत नाही. त्याच्या सत्तेनेच सर्व त्रैलोक्यातील कार्य चालते. (२)

तो अंतरात्मा सकळांचा। देवदानवमानवांचा ।
चत्वारखाणी चत्वारवाणीचा। प्रवर्तकु ॥ ३ ॥

तो देव, दानव, मानव यांचा, तसेच चार खाणी, चारी वाणी यांचा प्रवर्तक असून त्यालाच सर्वांचा अंतरात्मा असे म्हणतात. (३)

तो येकलाचि सकळांघटीं। करी भिन्नभिन्ना राहाटी।
सकळ सृष्टीची गोष्टी। किती म्हणौन सांगावी ॥ ४ ॥

तोच सर्व प्राण्यांच्या ठिकाणी वास करून सर्वांकडून भिन्न भिन्न क्रिया करवितो. सर्व सृष्टीतील घडामोडी त्याच्या योगेच होत असल्याने किती म्हणून वर्णन करणार? (४)

ऐसा जो गुप्तेश्वर। त्यास म्हणावें ईश्वर।
सकळ ऐश्वर्य थोर थोर। जयाचेनि भोगिती ॥ ५ ॥

असा जो सर्वांच्या अंतर्यामी गुप्तपणे राहणारा सर्वांचा चालक त्यालाच ईश्वर असे म्हणावे. त्याच्या योगेच थोर थोर लोकांना सर्व प्रकारचे ऐश्वर्य प्राप्त होत असते. (५)

ऐसा जेणें वोळखिला। तो विश्वंभरचि जाला।
समाधी सहजस्थितीला। कोण पुसे ॥ ६ ॥

अशा त्या ईश्वराला जो स्वानुभवाने जाणतो, तो स्वत: विश्वंभरच होतो. याप्रमाणे जो आत्मारामच बनतो, तो समाधी किंवा सहज स्थितीला कशाला महत्त्व देईल? (६)

अवघें त्रैलोक्य विवरावें। तेव्हां वर्म पडेल ठावें।
आवचटें घबाड सिणावें। नलगेचि कांहीं ॥ ७ ॥

सर्व दृश्य सृष्टीचे सारासारविवेकाने विवरण, निरसन करावे, तेव्हाच अचानक वर्म कळून येते. अचानक आत्मवस्तुरूपी घबाड प्राप्त होते. त्यासाठी मग दुसरे काही कष्ट करावे लागत नाहीत. (७)

पाहातां ऐसा कोण आहे। जो अंतरात्मा विवरोन पाहे।
अल्प स्वल्प कळोन राहे। समाधानें ॥ ८ ॥

प्रत्यक्ष स्वरूपानुभव येईपर्यंत अंतरात्म्याचे विवरण करणारा एखादाच असतो. बहुतेक लोक अल्प-स्वल्प ज्ञानानेच समाधान मानतात. (८)

आरे हें पाहिलेंच पाहावें। विवरलेंचि मागुतें विवरावें।
वाचिलेंचि वाचावें। पुन्हपुन्हा ॥ ९ ॥

बाबांनो, असे एवढ्या-तेवढ्यावर समाधान मानू नका. अंतरात्म्याचा शोध घेतच राहा. पूर्वी विवरण केले असले तरी पुन्हापुन्हा विवरण करा. पूर्वी त्यासंबंधी वाचलेले असेल तरी परत परत वाचून चिंतन करा. (९)

अंतरात्मा केवढा कैसा । पाहाणाराची कोण दशा ।
देखिल्या ऐकिल्या ऐसा । विवेक सांगे ॥ १० ॥

अंतरात्मा केवढा आहे, कसा आहे, त्याचे स्वरूप काय, ज्यांना त्याचा साक्षात्कार होतो त्यांची काय स्थिती होते, याबद्दल ज्याने जेवढे ऐकले किंवा पाहिले असेल तेवढेच तो सांगतो. (१०)

उदंड ऐकिलें देखिलें । अंतरात्म्यास नवचे पुरवलें ।
प्राणी देहधारी बाऊलें । काये जाणे ॥ ११ ॥

पण उदंड ऐकले आणि पाहिले तरी त्याने अंतरात्म्याची ओळख होऊ शकत नाही. कारण देहधारी प्राणी बिचारा अल्पज्ञ अज्ञानी असतो. तो अंतरात्म्यास कसा जाणणार? (११)

पूर्णास अपूर्ण पुरेना । कां जें अखंड विवरेना ।
विवरतां विवरतां उरेना । देवावेगळा ॥ १२ ॥

अंतरात्मा हा चंचळ, अपूर्ण असल्याने तो पूर्ण निश्चल परब्रह्म केव्हाही होणार नाही, पण हे कळत नाही; कारण अखंड विवरण घडत नाही. जो कोणी निरंतर विवरण करीतच राहतो, तो मग देवापासून वेगळा उरतच नाही. तो एकरूप होऊन जातो. (१२)

विभक्तपणें नसावें । तरीच भक्त म्हणवावें ।
नाहींतरी वेर्थचि सिणावें । खटाटोपें ॥ १३ ॥

जो याप्रमाणे एकरूप होतो, विभक्तपणे उरतच नाही, त्यालाच भक्त म्हणवून घेणे शोभते. याप्रमाणे ऐक्य जोपर्यंत होत नाही, तोपर्यंत जे प्रयत्न करावे तो केवळ शीणच होय. (१३)

उगाच घर पाहोन गेला । घरधनी नाहीं वोळखिला ।
राज्यामधूनचि आला । परी राजा नेणे ॥ १४ ॥

एखादा माणूस जाऊन उगाच नुसते घर पाहून आला आणि घरमालकाला भेटलाच नाही किंवा कुणी एखाद्या राज्यात जाऊन आला, पण राजालाच त्याने जाणले नाही. (१४)

देहसंगें विषये भोगिले । देहसंगें प्राणी मिरवलें ।
देहधर्त्यास चुकलें । नवल मोठें ॥ १५ ॥

त्याप्रमाणे माणसांची स्थिती असते. ते देहाच्या योगे विषयोपभोग भोगतात, देहाच्या योगे मोठेपणा मिरवतात, पण देह धारण करणारा जो अंतरात्मा त्यास मात्र जाणत नाहीत, ही मोठी नवलाची गोष्ट आहे. (१५)

ऐसे लोक अविवेकी । आणि म्हणती आम्ही विवेकी ।
बरें ज्याची जैसी टाकी । तैसें करावें ॥ १६ ॥

याप्रमाणे लोक विवेकहीन असतात, पण स्वत:ला मोठे विवेकी म्हणवतात. असो. ज्याची जशी कुवत असेल, तसा तो वागतो. (१६)

मूर्ख अंतर राखों नेणे । म्हणौन असावें शाहाणे ।
ते शाहाणेहि दैन्यवाणे । होऊन गेले ॥ १७ ॥

मूर्ख माणूस असतो तो आपल्या अंतरात असणाऱ्या अंतरात्म्यास जाणत नाही. म्हणून माणसाने शहाणे असावे. पण जगात मात्र असे दिसून येते की, जे स्वत:स शहाणे समजतात, तेही त्यांच्या अंतरात्म्यास जाणत नसल्याने दैन्यवाणेच असतात. (१७)

अंतरीं ठेवणें चुकलें । दारोदारीं धुंडूं लागलें ।
तैसें अज्ञानास जालें । देव न कळे ॥ १८ ॥

आपल्या अंतरातच आत्मवस्तुरूपी ठेवा असून, ते त्याच्या शोधासाठी दारोदार हिंडतात आणि अज्ञानामुळे त्यांना खरा देव कोण हे कळतच नाही. (१८)

या देवाचें ध्यान करी । ऐसा कोण सृष्टीवरी ।
वृत्ती येकदेसी तर्तरी । पवाडेल कोठें ॥ १९ ॥

अनंत अशा अंतरात्म्याचे ध्यान करणारा या सृष्टीवर कोण आहे? माणसाची वृत्ती एकदेशी असते. तिची शक्ती मर्यादित असते. (१९)

ब्रह्मांडीं दाटले प्राणी । बहुरूपें बहुवाणी ।
भूगर्भी आणि पाषाणीं । कितीयेक ॥ २० ॥

या ब्रह्मांडात प्राण्यांची एकच दाटी झाली आहे. त्यांची अनेक रूपे आहेत, अनेक भाषा आहेत, एवढेच नव्हे, तर भूगर्भात आणि पाषाणातही कित्येक प्राणी आहेत. (२०)

इतुके ठाईं पुरवला। अनेकीं येकचि वर्तला ।
गुप्त आणि प्रगटला। कितीयेक ॥ २१॥

इतक्या सर्वांना पुरूनही जो शिल्लक उरतो आणि या अनेकांच्या ठिकाणी जो एकच वर्तत असतो, तो अंतरात्मा काही ठिकाणी गुप्त असतो, तर काही ठिकाणी प्रगट असतो. (२१)

चंचळें न होईजे निश्चळ। प्रचित जाणावी केवळ ।
चंचळ तें नव्हे निश्चळ। परब्रह्म तें ॥ २२॥

जोपर्यंत माणूस चंचळाच्या सत्तेत वावरत असतो तोपर्यंत तो निश्चल अशा परब्रह्माशी एकरूप होऊ शकत नाही, हे केवळ अनुभवाने जाणून घ्यावे. चंचळ अंतरात्मा आणि निश्चल परब्रह्म एक म्हणता येणार नाही. (२२)

तत्वें तत्व जेव्हां उडे। तेव्हां देहबुद्धि झडे ।
निर्मळ निश्चळ चहुंकडे। निरंजन ॥ २३॥

तत्त्वाने तत्त्वांचे जेव्हा निरसन होते, तेव्हा 'मी देह' ही देहबुद्धी नष्ट होते. आणि मग चहूकडे निर्मळ, निश्चल, निरंजन असे परब्रह्मच ओतप्रोत कोंदटलेले आहे, अशी अनुभूती येते. (२३)

आपण कोण कोठें कैंचा। ऐसा मार्ग विवेकाचा ।
प्राणी जो स्वयें काचा। त्यास हें कळेना ॥ २४॥

पण हे सर्व होण्यासाठी माणसाने मी कोण, मी कसा आहे, कोठून आलो याचा विवेकाने शोध घेण्याचा प्रयत्न करायला हवा. जो प्राणी स्वत: अर्धवट असतो, त्याला हे कळत नाही. (२४)

भल्यानें विवेक धरावा। दुस्तर संसार तरावा ।
अवघा वंशचि उधरावा। हरिभक्ती करूनी ॥ २५॥

म्हणून भल्या माणसाने सारासारविवेकाचा मार्ग धरून या दुस्तर संसारातून तरून जावे आणि हरिभक्ती करून आपल्या संपूर्ण वंशाचाच उद्धार करावा. (२५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अंतरात्माविवरणनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक ११ : समास ९

## उपदेश

॥ श्रीराम ॥

आधीं कर्माचा प्रसंग। कर्म केलें पाहिजे सांग ।
कदाचित पडिलें व्यंग। तरी प्रत्यवाय घडे ॥ १॥

प्रत्येक माणसाला सर्वप्रथम कर्म हे करावेच लागते. म्हणून कर्म जे करायचे ते व्यवस्थितपणे केले पाहिजे. त्यात काही न्यूनता राहिली तर दोष लागतो. (१)

म्हणौन कर्म आरंभिलें। कांहींयेक सांग घडलें ।
जेथजेथें अंतर पडिलें। तेथें हरिस्मरण करावें ॥ २॥

म्हणून एखादे कर्म आरंभले असता ते काही प्रमाणात यथासांग घडले, पण काही ठिकाणी त्यात चूक झाली, तर तेथे हरिस्मरण करावे. (२)

तरी तो हरी आहे कैसा। विचार पाहावा ऐसा ।
संधेपूर्वी जगदीशा। चोविसां नामीं स्मरावें ॥ ३॥

पण ज्याचे स्मरण करावयाचे तो हरी आहे तरी कसा याचाही विचार करणे आवश्यक आहे. संध्या करण्यापूर्वी त्या जगदीशाची चोवीस नामे घेऊन त्याचे स्मरण करावे. (३)

चोविसनामी सहस्त्रनामी। अनंतनामी तो अनामी ।
तो कैसा आहे अंतर्यामीं। विवेकें वोळखावा ॥ ४॥

ज्याची ती चोवीस नामे आहेत, एवढेच नव्हे, तर सहस्त्र नामेच काय पण अनंत नामे आहेत, तो वास्तविक नामरूपातीत आहे, हे आपण विवेकाने आपल्या अंतर्यामी ओळखावे. (४)

ब्राह्मण स्नानसंध्या करून आला। मग तो देवार्चनास बैसला ।
येथासांग तो पूजिला। प्रतिमादेवो ॥ ५॥

ब्राह्मण स्नान-संध्या करून येतो आणि नंतर देवतार्चनास बसतो, त्या वेळी देव म्हणून तो यथासांग प्रतिमेचे पूजन करतो. (५)

नाना देवांच्या नानाप्रतिमा। लोक पूजिती धरून प्रेमा।
ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा। कैसा आहे ॥ ६॥

नाना देवांच्या नाना प्रतिमा असतात. लोक प्रेमाने त्या प्रतिमांची पूजाही करतात. पण ज्याच्या प्रतिमेची आपण पूजा करतो तो परमात्मा आहे तरी कसा, हे जाणून घेतले पाहिजे. (६)

ऐसें वोळखिलें पाहिजे। वोळखोन भजन कीजे।
जैसा साहेब नमस्कारिजे। वोळखिल्याउपरी ॥ ७॥

याप्रकारे त्या परमात्म्याचे खरे स्वरूप जाणून मग त्याचे भजन-पूजन केले पाहिजे. जसे मालक कोण आहे हे ओळखल्यानंतर त्यास आपण नमस्कार करतो. (७)

तैसा परमात्मा परमेश्वर। बरा वोळखावा पाहोन विचार।
तरीच पाविजे पार। भ्रमसागराचा ॥ ८॥

त्याप्रमाणे विचार करून परमात्मा, परमेश्वर कसा आहे हे जाणून घेतले, तरच या भ्रमरूपी भवसागराच्या पार जाता येते. (८)

पूजा घेताती प्रतिमा। आंगा येतो अंतरात्मा।
अवतारी तरी निजधामा। येऊन गेले ॥ ९॥

प्रतिमांची पूजा केली तरी ती अंतरात्म्यास पावते. भगवंताचे अवतार किंवा अवतारी पुरुष या जगात येऊन कार्य करून परत निजधामास जातात. (९)

परी ते निजरूपें असती। तें निजरूप ते जगज्जोती।
सत्वगुण तयेस म्हणती। जाणती कळा ॥ १०॥

पण ते निजरूपाने असतातच आणि ते निजरूप म्हणजेच जगज्ज्योती होय. शुद्ध सत्त्वगुण किंवा जाणती कळा असेही तिला म्हणतात. (१०)

तये कळेचे पोटीं। देव असती कोट्यानुकोटी।
या अनुभवाच्या गोष्टी। प्रत्ययें पाहाव्या ॥ ११॥

त्या जाणती कळेच्या म्हणजेच जगज्ज्योतीच्या पोटीच कोट्यनुकोटी देव असतात. या गोष्टीचा जाणत्या लोकांनी अनुभव घेऊन पाहावा. (११)

देहपुरामधें ईश। म्हणोन तया नांव पुरुष।
जगामधें जगदीश। तैसा वोळखावा ॥ १२॥

या देहरूपी पुरामध्ये जो ईश असतो, त्याला त्याच्या संबंधानेच 'पुरुष' असे म्हणतात. तोच जगाच्या संदर्भात 'जगदीश' म्हणून ओळखला जातो. (१२)

जाणीवरूपें जगदांतरें। प्रस्तुत वर्तती शरीरें।
अंतःकरण विष्णु येणें प्रकारें। वोळखावा ॥ १३॥

जगातील सर्व प्राण्यांच्या शरीरात जाणीवरूपाने राहून जो त्या शरीरांना कार्यप्रवण करतो, तोच अंतःकरणरूपी विष्णू होय, याप्रकारे त्यास जाणून घ्यावे. (१३)

तो विष्णु आहे जगदांतरीं। तोचि आपुले अंतरीं।
कर्ता भोक्ता चतुरीं। अंतरात्मा वोळखावा॥ १४॥

जो विष्णू याप्रकारे सर्व जगांतील प्राण्यांच्या अंतर्यामी असतो, तोच आपल्या अंतरात असतो आणि तोच कर्ता-भोक्ता असणारा अंतरात्मा होय, हे चतुर पुरुषांनी जाणून घ्यावे. (१४)

ऐके देखे हुंगे चाखे। जाणोन विचारें वोळखे।
कित्येक आपुले पारिखे। जाणताहे ॥ १५॥

तोच इंद्रियांच्या द्वारे ऐकतो, पाहातो, हुंगतो, चाखतो, सर्व जाणून विचाराने पदार्थ ओळखतो, तसेच विचाराने आपला कोण, परका कोण हेही जाणतो. (१५)

येकचि जगाचा जिव्हाळा। परी देहलोभाचा आडताळा।
देहसमंधें वेगळा। अभिमान धरी ॥ १६॥

सर्व जगाची जीवनकला म्हणजेच अंतरात्मा एकच असून देहलोभाच्या अडथळ्यामुळे, देहाच्या संबंधाने आपण इतरांहून वेगळे आहोत, असा अभिमान तो धरतो. (१६)

उपजे वाढे मरे मारी। जैशा उचलती लहरीवरी लहरी।
चंचळ सागरीं भरोवरी। त्रैलोक्य होत जातें ॥ १७॥

सागरात जशा एकामागोमाग एक लाटा येतच राहतात, त्याप्रमाणे तो अंतरात्मा निरनिराळे देह धारण करतो, त्यांची वाढ होते, ते देह मरतात, इतरांस मारतात. अशा प्रकारे त्या चंचळ अंतरात्मारूपी सागरातील लाटांच्या रूपाने त्रैळोक्याची उत्पत्ती, स्थिती, लय होतच राहतात. (१७)

त्रैलोका वर्तवितो येक। म्हणौन त्रैलोक्यनायेक ।
ऐसा प्रत्ययाचा विवेक। पाहाना कैसा ॥ १८॥

संपूर्ण त्रैलोक्याला तो अंतरात्माच चालवितो, म्हणूनच त्याला त्रैलोक्यनायक असे म्हणतात. विवेकाने याचा अनुभव तरी घेऊन पहा ना. (१८)

ऐसा अंतरात्मा बोलिला। परी तोहि तत्वांमधें आला ।
पुढें विचार पाहिजे केला। माहावाक्याचा ॥ १९॥

असा हा अंतरात्मा सर्वशक्तिसंपन्न असला, तरी तो तत्त्वामध्येच अंतर्भूत होतो, म्हणून पुढेही महावाक्याचा विचार निरंतर करीतच राहिले पाहिजे. (१९)

आधीं देखिला देहधारी। मग पाहावें जगदांतरीं ।
तयाचेनियां उपरी। परब्रह्म पावे ॥ २०॥

आधी देहधारी जो अंतरात्मा त्याचा शोध घ्यावा. नंतर जगदांतरी. त्याचा शोध घेता घेता अचानक परब्रह्माची प्राप्ती होते. (२०)

परब्रह्माचा विचार। होतां, निवडे सारासार ।
चंचळ जाईल हा निर्धार। चुकेना कीं ॥ २१॥

सारासारविचाराने परब्रह्मासंबंधी विचार करू लागल्यावर तेथे चंचळ राहाणार नाही, हे निर्धारपूर्वक जाणून घ्यावे. (२१)

उत्पत्ति स्थिति संव्हार जाण। त्याहून वेगळा निरंजन ।
येथें ज्ञानाचें विज्ञान। होत आहे ॥ २२॥

जे चंचळ आहे त्यालाच उत्पत्ती, स्थिती, संहार हे विकार असतात. त्याहून निरंजन परमात्मा हा वेगळा असतो. हे जाणणे याला विज्ञान म्हणतात. (२२)

अष्टदेह थानमान। जाणोन जालियां निर्शन ।
पुढें उरे निरंजन। विमळ ब्रह्म ॥ २३॥

पिंडाचे चार व ब्रह्मांडाचे चार मिळून सर्व अष्ट देहांचा जेव्हा निरास होतो, तेव्हा केवळ निरंजन विमल ब्रह्म तेवढे उरते. (२३)

विचारेंचि अनन्य जाला। पाहाणाराविण प्रत्यय आला ।
तेहि वृत्ति निवृत्तीला। बरें पाहा ॥ २४॥

विचाराने ऐक्य अनुभवावे. हा अनुभव घेणारा निराळा कोणी नाही, असा निश्चय झाला, तरी ही पण अति सूक्ष्म अशी वृत्तीच होय. हिचाही लय झाला पाहिजे. (२४)

येथें राहिला वाच्यांश। पाहोन सांडिला लक्ष्यांश ।
लक्ष्यांशासरिसा वृत्तिलेश। तोहि गेला ॥ २५॥

येथे वाच्यांश म्हणजे शब्दार्थ मावळतो, अनुभवून लक्ष्यांशही मागे पडतो आणि लक्ष्यांशाबरोबर त्या अति सूक्ष्म वृत्तीचाही लय होतो. अर्थात परब्रह्माशी ऐक्य होते. (२५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उपदेशनाम' समास नववा समाप्त.**



## दशक ११ : समास १०

# निस्पृह वर्तणूक

॥ श्रीराम ॥

मूर्ख येकदेसी होतो। चतुर सर्वत्र पाहातो ।
जैसा बहुधा होऊन भोगितो। नाना सुखें ॥ १॥

मूर्ख माणूस संकुचित दृष्टीने जगाकडे पाहातो. चतुर माणसाचे सर्वत्र बारकाईने लक्ष असते. ज्याप्रमाणे अंतरात्मा अनेकरूपांनी अनेकविध सुखांचा उपभोग घेतो. (१)

तोचि अंतरात्मा महंत। तो कां होईल संकोचित ।
प्रशस्त जाणता समस्त। विख्यात योगी ॥ २॥

त्या अंतरात्म्यासारखाच महंत असल्याने त्याची दृष्टीही विशाल असते. तो सर्व काही जाणतो आणि तो विख्यात योगीही असतो. (२)

कर्ता भोक्ता तत्वतां। भूमंडळीं सर्व सत्ता ।
त्यावेगळा त्यास ज्ञाता। पाहेसा कवणु ॥ ३॥

सर्व जगात कर्ता, भोक्ता, तत्त्वत: अंतरात्माच असतो आणि सर्व भूमंडळावर त्याचीच सत्ता असते. त्याला जाणणारा दुसरा कुणी असूच शकत नाही. तो स्वत:च स्वत:स जाणतो. (३)

ऐसें महंतें असावें। सर्व सार शोधुन घ्यावें।
पाहों जातां न संपडावें। येकायेकी ॥ ४॥

महंताने अशा अंतरात्म्याप्रमाणे असावे. त्याने सर्व शोधून सार ग्रहण करावे आणि कुणी त्याचा शोध घेऊ लागल्यास त्यास सहजासहजी सापडू नये. (४)

कीर्तिरूपें उदंड ख्यात। जाणती लाहान थोर समस्त।
वेश पाहातां शाश्वत। येकही नाहीं ॥ ५॥

त्याची उदंड कीर्ती झाल्याने कीर्तिरूपाने सर्व त्याला जाणतात, पण एकही वेष शाश्वत नसल्याने ते त्यास ओळखू शकत नाहीत. (५)

प्रगट कीर्ति ते ढळेना। बहुत जनास कळेना।
पाहों जातां आडळेना। काये कैसें ॥ ६॥

त्याची सर्वत्र जी कीर्ती झालेली असते, ती कधी कमी होत नाही, पण बहुतेक लोकांना तो प्रत्यक्ष कसा आहे हे कळत नाही. तो कसा काय आहे, याचा पत्ताच कुणाला लागत नाही. (६)

वेषभूषण तें दूषण। कीर्तिभूषण तें भूषण।
चाळणेविण येक क्षण। जाउच नेदी ॥ ७॥

उत्तम वेष हे खरे भूषण नसून दूषणच ठरते. कारण उत्तम कीर्ती हेच खरे भूषण होय. महंत हा मननाशिवाय एक क्षणही जाऊ देत नाही. (७)

त्यागी वोळखीचे जन। सर्वकाळ नित्य नूतन।
लोक शोधून पाहाती मन। परी इछा दिसेना ॥ ८॥

जुन्या ओळखीच्या लोकांना सोडून तो नित्य नूतन लोकांत मिसळतो. त्याच्या मनात काय आहे याचा अंदाज घेण्याचा लोक प्रयत्न करतात, पण त्याला कुठलीही इच्छा वा वासना असल्याचे त्यांना आढळून येत नाही. (८)

पुर्ते कोणाकडे पाहेना। पुर्ते कोणासीं बोलेना।
पुर्ते येके स्थळीं राहेना। उठोन जातो ॥ ९॥

तो कोणाकडेही पुरते पाहत नाही, कोणाशी पुरते बोलत नाही. दीर्घकाळ एका ठिकाणी राहातही नाही. तेथून उठून निघून जातो. (९)

जातें स्थळ तें सांगेना। सांगितलें तेथें तरी जायेना।
आपुली स्थिती अनुमाना। येवोंच नेदी ॥ १०॥

आपण कोठे जाणार ते कोणाला सांगत नाही. समजा, कदाचित सांगितले तर तेथे तो मुळी जातच नाही. आपण कोठे आहोत याचा कुणाला थांगपत्ताच लागू देत नाही. (१०)

लोकीं केलें तें चुकावी। लोकीं भाविलें तें उलथवी।
लोकीं तर्किलें तें दावी। निर्फळ करूनी ॥ ११॥

लोकांनी काही अनुमान केले तर ते चुकीचे ठरवितो. लोकांनी काही कल्पना केली असेल तर त्याच्या उलट करतो. लोकांनी जे तर्क केले असतील, ते तो निष्फळ करतो. (११)

लोकांस पाह्याचा आदर। तेथें याचा अनादर।
लोक सर्वकाळ तत्पर। तेथें याची अनिछ्या ॥ १२॥

लोकांना दृश्य पाहण्याची आवड असते, तेथे महंताला अनादर वाटतो. लोक सर्वकाळ ज्यासाठी अति तत्पर असतात, त्या गोष्टीची महंतास अनिच्छा असते. (१२)

एवं कल्पितां कल्पेना। ना तर्कितांहि तर्केना।
कदापी भावितां भावेना। योगेश्वर ॥ १३॥

याप्रमाणे महंताविषयी कल्पना करू जावे, तर तेही जमत नाही. नाना तर्क करू जावे तर तर्क करणेही अशक्य होते. त्याच्याविषयी काही भावनाही करता येत नाहीत, असा तो विलक्षण योगेश्वर असतो. (१३)

ऐसें अंतर सांपडेना। शरीर ठाईं पडेना।
क्षणयेक विशंभेना। कथाकीर्तन ॥ १४॥

याप्रमाणे महंताच्या अंतरंगात काय चालले आहे हेही लोकांना कळून येत नाही आणि शरीराने गाठ पडणेही कठीण जाते. मात्र महंत कथा-कीर्तनांत क्षणभरही खंड पडू देत नाही. (१४)

लोक संकल्प विकल्प करिती। ते अवघेचि निर्फळ होती।
जनाची जना लाजवी वृत्ति। तेव्हां योगेश्वर ॥ १५॥

लोक त्याच्यासंबंधी जे जे संकल्प-विकल्प करतात, ते सर्व निष्फळ होतात. त्यामुळे लोकांना स्वत:लाच स्वत:ची लाज वाटू लागते. अशा प्रकारची प्रतिक्रिया ज्याच्याबद्दल दिसून येते, तो योगेश्वर आहे असे जाणावे. (१५)

बहुतीं शोधून पाहिलें। बहुतांच्या मनास आलें।
तरी मग जाणावें साधिलें। महत्कृत्य ॥ १६ ॥

महंताच्या कार्याविषयी, चारित्र्याविषयी अनेक लोक शोध घेतात. या गोष्टी जर त्यांच्या मनास आल्या, तर मग फारच मोठे कार्य साधले गेले आहे असे जाणावे. (१६)

अखंड येकांत सेवावा। अभ्यासचि करीत जावा।
काळ सार्थकचि करावा। जनासहित ॥ १७ ॥

महंताने अखंड एकांत करावा, सतत अभ्यास करीत असावे आणि स्वत:सहित लोकांचा वेळही सार्थकी लावावा. (१७)

उत्तम गुण तितुके घ्यावे। घेऊन जनास सिकवावे।
उदंड समुदाये करावे। परी गुप्तरूपें ॥ १८ ॥

त्याने स्वत: उत्तम गुण संपादन करावेत आणि लोकांनाही शिकवावे. अखंड लोकसंग्रह करीत असावे. पण हे सर्व गुप्तपणे करावे. (१८)

अखंड कामाची लगबग। उपासनेस लावावें जग।
लोक समजोन मग। आज्ञा इछिती ॥ १९ ॥

अखंड कामाची घाईगर्दी सुरू असावी. अनेक लोकांना त्याने भगवंताची उपासना करण्यास प्रेरणा द्यावी म्हणजे मग त्याची ती तळमळ पाहून लोक त्याच्या आज्ञेची इच्छा करू लागतात. (स्वत:स त्याचे सेवक मानू लागतात.) (१९)

आधीं कष्ट मग फळ। कष्टचि नाहीं तें निर्फळ।
साक्षेपेंविण केवळ। वृथापुष्ट ॥ २० ॥

आधी कष्ट करावेत आणि मग फळाची अपेक्षा ठेवावी. कष्टच केले नाहीत तर कार्यसिद्धी होत नाही. जो कष्ट करीत नाही, तो कुचकामाचा समजावा. (२०)

लोक बहुत शोधावे। त्यांचे अधिकार जाणावे।
जाणजाणोन धरावे। जवळी दुरी ॥ २१ ॥

अनेक लोक पारखून त्यांचा अधिकार जाणून घ्यावा आणि त्यांच्या लायकीप्रमाणे त्यांना जवळ करावे अथवा दूर सारावे. (२१)

अधिकारपरत्वें कार्य होतें। अधिकार नस्तां वेर्थ जातें।
जाणोनि शोधावीं चित्तें। नाना प्रकारें ॥ २२ ॥

ज्याचा जसा अधिकार असेल, त्याचेकडून त्याप्रकारे योग्य ते काम करवून घ्यावे. लायकी नसताना कार्य सांगितले असता ते व्यर्थ जाते, म्हणून अनेक प्रकारे लोकांच्या अंतरंगाचा शोध घ्यावा. (२२)

अधिकार पाहोन कार्य सांगणें। साक्षेप पाहोन विश्वास धरणें।
आपला मगज राखणें। कांहींतरी ॥ २३ ॥

ज्याचा त्याचा अधिकार पाहून त्यास अनुसरून त्यास कार्य सांगावे. त्याची काम करण्याची कुवत पाहून त्याच्यावर विश्वास ठेवावा आणि काही झाले तरी आपले महत्त्व कायम राखावे. (२३)

हें प्रचितीचें बोलिलें। आधीं केलें मग सांगितलें।
मानेल तरी पाहिजे घेतलें। कोणीयेकें ॥ २४ ॥

हे बोलणे अनुभवाचे आहे. आधी स्वत: करून मी लोकांना सांगितले आहे. माझे म्हणणे ज्यास पटत असेल त्याने यापासून बोध घेतला पाहिजे. (२४)

महंतें महंत करावे। युक्तिबुद्धीनें भरावे।
जाणते करून विखरावे। नाना देसीं ॥ २५ ॥

महंताने दुसरे नवीन महंत करावेत आणि त्यांना युक्ती व बुद्धीने शहाणे करावे. त्यांना ज्ञानसंपन्न करून देशाच्या निरनिराळ्या भागात पाठवावे. (२५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'निस्पृहवर्तणूकनाम' समास दहावा समाप्त.

❑ ❑

# बारावा दशक : विवेकवैराग्य

## दशक १२ : समास १

### विमळलक्षण

॥ श्रीराम ॥

**आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका ।**
**येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १ ॥**

माणसाने आधी व्यवहार नेटकेपणाने करावा आणि मग परमार्थाचा विचार करावा. विवेकी जन हो! येथे आळस करू नका. (१)

**प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ।**
**प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥ २ ॥**

प्रपंचाकडे दुर्लक्ष करून जर तुम्ही परमार्थ साधण्याचा प्रयत्न कराल, तर तुम्ही कष्टी व्हाल. जर तुम्ही प्रपंच आणि परमार्थ दोन्ही सावधपणे व्यवस्थित कराल, तरच तुम्हांला विवेकी म्हणता येईल. (२)

**प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।**
**मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ ३ ॥**

प्रपंचाकडे दुर्लक्ष करून परमार्थ करू लागल्यास खायला अन्न मिळत नाही. अशा भाग्यहीन माणसाला परमार्थ कसा साधेल? (३)

**परमार्थ सांडून प्रपंच करिसी । तरी तूं येमयातना भोगिसी ।**
**अंतीं परम कष्टी होसी । येमयातना भोगितां ॥ ४ ॥**

बरे, परमार्थ अजिबात सोडून देऊन केवळ तुम्ही प्रपंचच कराल, तर तुम्हांला पुढे यमयातना भोगाव्या लागतील आणि यमयातना भोगता भोगता अत्यंत कष्ट होतील. (४)

**साहेबकामास नाहीं गेला । गृहींच सुरवाडोन बैसला ।**
**तरी साहेब कुटील तयाला । पाहाती लोक ॥ ५ ॥**

एखादा नोकर मालकाकडे कामाला गेलाच नाही आणि खुशाल आळसाने घरीच बसून राहिला, तर त्याचा मालक त्याला कुटून काढील आणि लोक ती गंमत पाहात राहतील. (५)

**तेव्हां महत्वचि गेलें । दुर्जनाचें हांसें जालें ।**
**दु:ख उदंड भोगिलें । आपुल्या जीवें ॥ ६ ॥**

तेव्हा मग अशा माणसाचे महत्त्वच राहाणार नाही. त्या दुर्जन माणसाचे हसे होईल आणि त्याला उदंड दु:ख भोगावे लागेल. (६)

**तैसेंचि होणार अंतीं । म्हणौन भजावें भगवंतीं ।**
**परमार्थाची प्रचिती । रोकडी घ्यावी ॥ ७ ॥**

जर परमार्थ केलाच नाही, तर आपली पण शेवटी तशीच स्थिती होईल. म्हणून आपला मालक जो भगवंत त्याला भजावे आणि परमार्थाची प्रत्यक्ष प्रचीती घ्यावी. (७)

**संसारीं असतां मुक्त । तोचि जाणावा संयुक्त ।**
**अखंड पाहे युक्तायुक्त । विचारणा हे ॥ ८ ॥**

साधकाच्या विवेक-वैराग्यादिकांची कसोटी प्रत्यक्ष संसारातील व्यवहारात होत असते. व्यवहारातही ज्याची धारणा ढळत नाही तोच साधक योग्य असतो. नेहमी योग्य काय, अयोग्य काय, याचा विचार करूनच वागत असतो. (८)

**प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण ।**
**प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ ९ ॥**

जो प्रपंचात अत्यंत दक्ष असतो, तोच परमार्थही नीट करू शकतो. ज्याला प्रपंच सावधपणे करणे जमत नाही, त्याला परमार्थही जमू शकत नाही. (९)

**म्हणौन सावधानपणें । प्रपंच परमार्थ चालवणें ।**
**ऐसें न करितां भोगणें । नाना दु:खें ॥ १० ॥**

म्हणून अत्यंत सावधपणाने प्रपंच आणि परमार्थ दोन्हीही करावेत. असे केले नाही, तर पुढे अनेक प्रकारची दु:खे भोगावी लागतात. (१०)

**पर्णाळि पाहोन उचलें । जीवसृष्टि विवेकें चाले ।**
**आणि पुरुष होऊन भ्रमले । यासी काये म्हणावें ॥ ११ ॥**

पानावरचा किडा अगोदर पुढचे पाय दुसऱ्या पानावर रोवल्यावरच मग पाठीमागील पानाचा आधार सोडतो. मनुष्याखेरीज इतर जीवसृष्टीसुद्धा विवेकाने वागते आणि ज्याला बुद्धीची विशेष देणगी आहे, असा पुरुष अविवेकाने भ्रमिष्टासारखा वागतो, याला काय म्हणावे? (११)

**म्हणौन असावी दीर्घसूचना। अखंड करावी चाळणा।**
**पुढील होणार अनुमाना। आणून सोडावें ॥ १२॥**

म्हणून विवेकी माणसाच्या ठिकाणी दूरदृष्टी असावी आणि त्याने निरंतर परिस्थितीचा अंदाज घेत असावे आणि विचाराने पुढे काय होणार आहे, याचा अचूक अंदाज करून परिस्थिती जाणून घ्यावी. (१२)

**सुखी असतो खबर्दार। दुःखी होतो बेखबर।**
**ऐसा हा लौकिक विचार। दिसतचि आहे ॥ १३॥**

जे याप्रकारे दक्ष असतात, ते सुखी होतात. जे बेसावध असतात, ते दु:खी होतात. असे लौकिक व्यवहारातही विचाराने प्रत्यक्ष दिसून येते. (१३)

**म्हणौन सर्वसावधान। धन्य तयाचें महिमान ।**
**जनीं राखें समाधान। तोचि येक ॥ १४॥**

म्हणून जो सदासर्वकाळ सर्व बाबतीत सावध असतो, त्याचा महिमा किती म्हणून वर्णन करावा? तोच खरोखर धन्य होय. सर्व लोकांचे समाधान तोच एकटा करू शकतो. (१४)

**चाळणेचा आळस केला। तरी अवचिता पडेल घाला।**
**ते वेळे सावरायाला। अवकाश कैंचा ॥ १५॥**

परिस्थितीचा अचूक अंदाज घेण्यात जर आळस केला, तर मग अवचित संकट उपस्थित होईल आणि मग सावरायलासुद्धा वेळ मिळणार नाही. (१५)

**म्हणौन दीर्घसूचनेचे लोक। त्यांचा पाहावा विवेक।**
**लोकांकरितां लोक। शाहाणे होती ॥ १६॥**

म्हणून विवेकसंपन्न दूरदृष्टी असणारे लोक कसे विचारपूर्वक वागतात, हे जाणून घ्यावे. एकाच्या उदाहरणाने दुसरा शहाणा होतो, ही लोकांची रीतच आहे. (१६)

**परी ते शाहाणे वोळखावे। गुणवंताचे गुण घ्यावे।**
**अवगुण देखोन सांडावे। जनामधें ॥ १७॥**

म्हणून आपल्या भोवताली जे लोक असतात, त्यांत शहाणे कोण आहेत हे ओळखावे. जे गुणवान आहेत, त्यांचे गुण आपण घ्यावे. लोकांमधील अवगुण जे असतील, ते पाहून त्या अवगुणांचा त्याग करावा. (१७)

**मनुष्य पारखूं राहेना। आणि कोणाचें मन तोडीना।**
**मनुष्यमात्र अनुमाना। आणून पाहे ॥ १८॥**

विवेकी असतो, तो प्रत्येकाची मनोमन परीक्षा करीतच असतो, पण तो कोणाचे मन मात्र दुखवत नाही. पण मनुष्यमात्रासंबंधी तो अचूक अनुमान मात्र करतो. (१८)

**दिसे सकळांस सारिखा। पाहातां विवेकी नेटका ।**
**कामी निकामी लोकां। बरें पाहे ॥ १९॥**

बाहेरून वरवर पाहिले तर तो इतर सामान्य लोकांसारखाच दिसतो, पण अंतर्यामी तो अत्यंत विवेकी असतो. तो कोण काम करणारा आहे आणि कोण निकामी आहे हे बरोबर जाणतो. (१९)

**जाणोन पाहिजेत सर्व। हेंचि तयाचें अपूर्व ।**
**ज्याचें त्यापरी गौरव। राखों जाणे ॥ २०॥**

आणि हे सर्व जाणूनही तो सर्व तऱ्हेच्या लोकांशी यथायोग्य व्यवहार ठेवू शकतो, हे त्याचे वैशिष्ट्य होय. ज्याची जशी योग्यता असेल, त्याप्रमाणे त्या त्या व्यक्तीचा योग्य तो गौरव करण्याचे चातुर्य त्याच्या ठिकाणी असते. (२०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विमळलक्षणनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक १२ : समास २
### प्रत्ययनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ऐका संसारासी आले हो। स्त्री पुरुष निस्पृह हो।**
**सुचितपणें पाहो। अर्थांतर ॥ १ ॥**

या संसारात आलेल्या सर्व स्त्रिया, पुरुष, नि:स्पृह यांनी मी काय सांगतो ते ऐका आणि त्याचा अर्थ नीट समजून घेऊन त्यावर विचार करा. (१)

**काये म्हणते वासना। काये कल्पिते कल्पना।**
**अंतरींचे तरंग नाना। प्रकारें उठती ॥२॥**

आपली वासना काय म्हणते, आपली कल्पना काय काय मनोरथ करते, अंत:करणात अनेक प्रकारच्या विचारांचे तरंग कसे उठत असतात, याचा विचार करा. (२)

**बरें खावें बरें जेवावें। बरें ल्यावें बरें नेसावें।**
**मनासारिखें असावें। सकळ कांहीं ॥ ३ ॥**

आपल्याला वाटते की, बरे खावे, बरे जेवावे, बरे कपडे घालावेत, बरे नेसावे. सर्व काही अगदी आपल्या मनासारखे असावे. (३)

**ऐसें आहे मनोगत। तरी ते कांहींच न होत।**
**बरें करितां अकस्मात। वाईट होतें ॥ ४ ॥**

याप्रमाणे आपले मनोगत असते, पण तसे काहीच घडत नाही. आपण काही चांगले करायला जावे, तर अकस्मात वाईटच घडून येते. (४)

**येक सुखी येक दु:खी। प्रत्यक्ष वर्ततें लोकीं।**
**कष्टी होऊनियां सेखीं। प्रारब्धावरी घालिती ॥ ५ ॥**

संसारात एक सुखी तर एक दु:खी असे प्रत्यक्ष घडताना दिसून येते. त्यामुळे लोक कष्टी होतात आणि अखेर सर्व दोष प्रारब्धावर ठेवतात. (५)

**अचुक येत्न करवेना। म्हणौन केलें तें सजेना।**
**आपला अवगुण जाणवेना। कांहीं केल्यां ॥ ६ ॥**

खरे तर अचूक प्रयत्न केला जात नाही, म्हणूनच काही लोक यशस्वी होत नाहीत. पण लोकांना आपला अवगुण काही केल्या कळूनच येत नाही. (६)

**जो आपला आपण नेणे। तो दुसऱ्याचें काये जाणे।**
**न्यायें सांडितां दैन्यवाणे। होती लोक ॥ ७ ॥**

जो आपल्या स्वत:ला जाणत नाही, तो दुसऱ्याला काय जाणणार? न्याय्य मार्गाने जाणे सोडल्यामुळे लोक दैन्यवाणे जिणे जगत आहेत. (७)

**लोकांचें मनोगत कळेना। लोकांसारिखें वर्तवेना।**
**मूर्खपणें लोकीं नाना। कळह उठती ॥ ८ ॥**

लोकांना परस्परांचे मनोगत कळत नाही, त्यामुळे एकमेकाच्या मनासारखे वागता येत नाही. त्यामुळे मूर्खपणामुळे लोकांच्यामध्ये नाना प्रकारचे कलह निर्माण होतात. (८)

**मग ते कळो वाढती। परस्परें कष्टी होती।**
**प्रेत्न राहातां अंतीं। श्रमचि होये ॥ ९ ॥**

मग ते कलह वाढू लागतात आणि सर्वच लोक याप्रकारे परस्परांमुळे कष्टी होतात. कुणी योग्य दिशेने प्रयत्नच करीत नाही आणि शेवटी सर्वांना विनाकारण श्रमच होतात. (९)

**ऐसी नव्हे वर्तणुक। परीक्षावे नाना लोक।**
**समजलें पाहिजे नेमक। ज्याचें त्यापरी ॥ १० ॥**

अशी वर्तणूक असू नये. अनेक लोकांची अनेक प्रकारे परीक्षा करावी. कोण माणूस कसा आहे हे बरोबर जाणून घेतले पाहिजे. (१०)

**शब्दपरीक्षा अंतरपरीक्षा। कांहीं येक कळे दक्षा।**
**मनोगत नतद्रक्षा। काय कळे ॥ ११ ॥**

जो दक्ष असतो, त्याला लोकांच्या बोलण्यावरून, त्यांच्या अंतरंगाची पारख होते. जे नतद्रष्ट असतात त्यांना दुसऱ्याचे मनोगत कसे काय कळणार? (११)

**दुसऱ्यास शब्द ठेवणें। आपला कैपक्ष घेणें।**
**पाहों जातां लोकिकलक्षणें। बहुतेक ऐसीं ॥ १२ ॥**

दुसऱ्याला दोष द्यायचा आणि आपलेच म्हणणे बरोबर असा दुराग्रह धरायचा, अशीच या जगात बहुतेकांची प्रवृत्ती आढळून येते. (१२)

**लोकीं बरें म्हणायाकारणें। भल्यांस लागतें सोसणें।**
**न सोसितां भंडवाणें। सहजचि होये ॥ १३॥**

ज्याला लोकांनी आपल्याला चांगले म्हणावे असे वाटत असेल त्याने लोकांचे बोलणे, वागणे सहन करायला हवे. ते जर सोसले नाही, तर सहजच फजिती होते. (१३)

**आपणास जें मानेना। तेथें कदापि राहावेना।**
**उरी तोडून जावेना। कोणीयेकें ॥ १४॥**

जेथे आपल्याला बरे वाटत नाही, तेथे कधीही राहू नये. पण कोणीही भीड मोडून किंवा भांडण करून जाऊ नये. (१४)

**बोलतो खरें चालतो खरें। त्यास मानिती ल्हानथोरें।**
**न्याये अन्याये परस्परें। सहजचि कळे ॥ १५॥**

जो कोणी नेहमी खरे बोलतो आणि खरेपणानेच वागतो त्याला सर्व लहान-थोर मानतात. न्याय-अन्याय कुणालाही सहजच कळतो. (१५)

**लोकांस कळेना तंवरी। विवेकें क्ष्मा जो न करी।**
**तेणेंकरितां बराबरी। होत जाते ॥ १६॥**

लोकांना जोपर्यंत आपल्या योग्यतेची कल्पना येत नाही, तोपर्यंत थोर लोकांनी लोकांना विवेकाने क्षमाच केली पाहिजे. तसे जर तो न करील तर मग इतरांची आणि त्याची बरोबरीच होईल. (१६)

**जंवरी चंदन झिजेना। तंव तो सुगंध कळेना।**
**चंदन आणि वृक्ष नाना। सगट होती ॥ १७॥**

जोपर्यंत चंदन झिजत नाही, तोपर्यंत त्याचा सुगंध कळत नाही आणि म्हणून चंदन आणि इतर नाना वृक्ष लोकांना सारखेच वाटतात. (१७)

**जंव उत्तम गुण न कळे। तों या जनास काये कळे।**
**उत्तम गुण देखतां निवळे। जगदांतर ॥ १८॥**

जोपर्यंत मनुष्याच्या अंगी असलेले उत्तम गुण प्रगट होत नाहीत, तोपर्यंत लोकांना त्याची थोरवी कळत नाही. ज्यावेळी प्रसंगपरत्वे उत्तम गुण प्रगट होतात, तेव्हा जगातील लोकांच्या अंत:करणास समाधान वाटते. (१८)

**जगदांतर निवळत गेलें। जगदांतरीं सख्य जालें।**
**मग जाणावें वोळलें। विश्वजन ॥ १९॥**

लोकांच्या अंत:करणास समाधान झाले, लोकांशी सख्य झाले की मग लोक प्रसन्न झाले आहेत, हे जाणावे. (१९)

**जनींजनार्दन वोळला। तरी काये उणें तयाला।**
**राजी राखावें सकळांला। कठीण आहे ॥ २०॥**

ज्याच्यावर जनीजनार्दन म्हणजे भगवत्स्वरूप जनता प्रसन्न होते, त्याला काय उणे पडणार आहे? पण सर्वांना प्रसन्न करणे सोपे नाही. (२०)

**पेरिलें तें उगवतें। उसिणें द्यावें घ्यावें लागतें।**
**वर्म काढितां भंगतें। परांतर ॥ २१॥**

जसे जे आपण पेरतो तेच उगवून येते. लोकांशी व्यवहार करताना उसने द्यावे-घ्यावे लागते. पण म्हणून आपण जर कोणाचे वर्म काढले, तर त्याचे अंत:करण दुखावले जाते. (२१)

**लोकिकीं बरेंपण केलें। तेणें सौख्य वाढलें।**
**उत्तरासारिखें आलें। प्रत्योत्तर ॥ २२॥**

लोकांशी आपण चांगले वागलो तर आपले सुख वाढते. आपण जसे उत्तर द्यावे, त्याप्रमाणे आपल्याला प्रत्युत्तर मिळते. (२२)

**हें आवघें आपणांपासीं। येथें बोल नाहीं जनासी।**
**सिकवावें आपल्या मनासी। क्षणक्षणा ॥ २३॥**

म्हणून त्याचा उपाय आपल्याच हातात असतो. लोकांना उगीच दोष देणे योग्य नाही, म्हणून आपणच आपल्या मनाला क्षणोक्षणी शिकवावे. (२३)

**खळ दुर्जन भेटला। क्षमेचा धीर बुडाला।**
**तरी मोनेंचि स्थळत्याग केला। पाहिजे साधकें ॥ २४॥**

समजा, एखाद्या अत्यंत दुर्जनाशी गाठ पडली आणि क्षमा करणे अगदी अशक्य झाले, तर गुपचूप न बोलता साधकाने ते स्थळ सोडून निघून जावे. (२४)

लोक नाना परीक्षा जाणती । अंतरपरीक्षा नेणती ।
तेणें प्राणी करंटे होती । संदेह नाहीं ॥ २५ ॥

लोक अनेक प्रकारे परीक्षा करणे जाणतात, पण त्यांना दुसऱ्याच्या अंत:करणाची पारख करता येत नाही. म्हणूनच माणसे भाग्यहीन ठरतात, यात शंका नाही. (२५)

आपणास आहे मरण । म्हणौन राखावें बरेंपण ।
कठिण आहे लक्षण । विवेकाचें ॥ २६ ॥

आपण आज ना उद्या मरणार आहोतच हे जाणून सर्वांशी भलेपणाने वागावे. या प्रकारचा विवेक करणे कठीण आहे, हे मात्र खरे. (२६)

थोर ल्हान समान । आपले पारिखे सकळ जन ।
चढतें वाढतें सनेधान । करितां बरें ॥ २७ ॥

आपल्यापेक्षा लहान असणाऱ्यांशी, मोठे असणाऱ्यांशी किंवा समवयस्क असतील त्यांच्याशी, तसेच आपले व परके अशा सर्वच लोकांशी उत्तरोत्तर वाढत्या प्रेमाचे संबंध असावेत हे बरे. (२७)

बरें करितां बरें होतें । हें तों प्रत्ययास येतें ।
आतां पुढे सांगावें तें । कोणास काये ॥ २८ ॥

आपण लोकांचे बरे केले की त्यायोगे आपलेही बरेच होते, ही तर अनुभवाची गोष्ट आहे. आता यापुढे आणखी कोणाला काय सांगावे बरे? (२८)

हरिकथानिरूपण । बरेपणें राजकारण ।
प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ २९ ॥

नित्य हरिकथा आणि अध्यात्मनिरूपण करीत असावे. प्रसंग पाहून चांगुलपणाने राजकारणही करावे. प्रसंगानुसार विवेकाने वागलो नाही, तर सर्वच व्यर्थ ठरते. (२९)

विद्या उदंडचि सिकला । प्रसंगमान चुकतचि गेला ।
तरी मग तये विद्येला । कोण पुसे ॥ ३० ॥

एखाद्याने खूप विद्या संपादन केली, पण योग्य वेळी त्याला विद्येचा उपयोग करता आला नाही, तर ती विद्या व्यर्थ होय. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'प्रत्ययनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.



## दशक १२ : समास ३

## भक्तिनिरूपण

॥ श्रीराम ॥

पृथ्वीमधें बहुत लोक । तेहिं पाहावा विवेक ।
इहलोक आणि परलोक । बरा पाहावा ॥ १ ॥

या पृथ्वीवर असंख्य लोक आहेत. त्यांनी विवेक करून आपला इहलोक आणि परलोक कसा सुधारेल, हे पाहावे. (१)

इहलोक साधायाकारणें । जाणत्याची संगती धरणें ।
परलोक साधायाकारणें । सद्गुरु पाहिजे ॥ २ ॥

इहलोकी सुख मिळावे म्हणून व्यवहारकुशल जाणत्या माणसाची संगती धरावी. तर परमार्थ साधण्यासाठी सद्गुरू करणे आवश्यक आहे. (२)

सद्गुरुसी काये पुसावें । हेंहि कळेना स्वभावें ।
अनन्यभावें येकभावें । दोनी गोष्टी पुसाव्या ॥ ३ ॥

सामान्य लोकांना त्यांच्या अज्ञानी स्वभावामुळे सद्गुरूंना काय विचारावे, हेही कळत नाही. अनन्यभावाने, एकनिष्ठपणे त्यांना पुढील दोन गोष्टी विचाराव्यात. (३)

दोनी गोष्टी त्या कोण । देव कोण आपण कोण ।
या गोष्टीचें विवरण । केलेंचि करावें ॥ ४ ॥

त्या दोन गोष्टी कुठल्या म्हणाल, तर एक म्हणजे देव कोण आहे आणि दुसरी गोष्ट म्हणजे आपण कोण आहोत, ह्या होत. याचे सद्गुरू जे उत्तर देतील, त्याचे विवरण वारंवार करावे. (४)

आधीं मुख्य देव तो कोण । मग आपण भक्त तो कोण ।
पंचीकर्ण माहावाक्यविवरण । केलेंचि करावें ॥ ५ ॥

आधी मुख्य देव कोणता हे जाणून घ्यावे आणि नंतर आपण भक्त म्हणजे कोण हे जाणून घ्यावे. त्यासाठी पंचीकरण आणि महावाक्यांचे विवरण म्हणजे अर्थ जाणून श्रवण, मनन, निदिध्यासन पुन्हापुन्हा करीतच असावे. (५)

सकळ केलियाचें फळ। शाश्वत वोळखावें निश्चळ।
आपण कोण हा केवळ। शोध घ्यावा ॥ ६॥

हे सर्व केले असता शाश्वत, निश्चल अशा परब्रह्माची ओळख होते. आपले खरे स्वरूप काय आहे, याचाही शोध घ्यावा. (६)

सारासार विचार घेतां। पदांस नाहीं शाश्वतता।
आधीं कारण भगवंता। वोळखिलें पाहिजे ॥ ७॥

सारासारविचार केला असता महावाक्यातील शब्द हे शाश्वत नसतात, हे जाणून घ्यावे. आणि हा विचार करणारा अंतरात्मा म्हणजेच आपण कोण हे आधी ओळखले पाहिजे. (७)

निश्चळ चंचळ आणी जड। अवघा मायेचा पवाड।
यामधें वस्तु जाड। जाणार नाहीं ॥ ८॥

निश्चल, चंचळ आणि जड हा सर्व तर मायेचाच विस्तार आहे. म्हणून हे सर्व नाशिवंत होय. मायातीत असे जे परब्रह्म ते मात्र असे नाशिवंत नाही. (८)

तें परब्रह्म धुंडावें। विवेकें त्रैलोक्य हिंडावें।
माईक विचारें खंडावें। परीक्षवंतीं ॥ ९॥

परीक्षावंत माणसाने विवेकाने सर्व त्रैलोक्याचा शोध घ्यावा आणि सारासारविचाराने जे मायिक त्याचा त्याग करावा आणि परब्रह्माचा शोध घ्यावा. (९)

खोटें सोडून खरें घ्यावें। परीक्षवंतीं परीक्षावें।
मायेचें अवघेंचि जाणावें। रूप माईक ॥ १०॥

परीक्षावंताने खऱ्या-खोट्याची परीक्षा करून खोटे असेल ते सोडून खरे असेल ते घ्यावे. मायेचे सर्व रूपच मायिक आहे, हे जाणून घ्यावे. (१०)

पंचभूतिक हे माया। माईक जाये विलया।
पिंडब्रह्मांड अष्टकाया। नासिवंत ॥ ११॥

जे जे सर्व पांचभौतिक आहे, ते सर्व माया असून जे जे मायिक आहे ते सर्व अंती नाश पावते, म्हणून पिंडाचे चार व ब्रह्मांडाचे चार मिळून जे आठ देह आहेत, ते सर्व नाशिवंत आहेत, हे जाणून घ्यावे. (११)

दिसेल तितुकें नासेल। उपजेल तितुकें मरेल।
रचेल तितुकें खचेल। रूप मायेचें ॥ १२॥

जे जे दिसते, ते ते नाश पावणार. जे जे उपजते ते ते मरणार. जे जे रचले जाते ते ते खचणार. असे हे मायेचे रूप आहे. (१२)

वाढेल तितुकें मोडेल। येईल तितुकें जाईल।
भूतांस भूत खाईल। कल्पांतकाळीं ॥ १३॥

ज्याची ज्याची वाढ होईल, ते ते क्षय पावणार. जे जे येईल ते ते जाईल. कल्पांताच्या समयी पंचमहाभूतांचा एकेका भूतांत अनुक्रमे लय होणार. (१३)

देहधारक तितुके नासती। हे तों रोकडी प्रचिती।
मनुष्येंविण उत्पत्ति। रेत कैंचें ॥ १४॥

जितके देह उत्पन्न होतात ते सर्व नष्ट होतात, ही तर प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे. माणसावाचून माणूस कसा उत्पन्न होणार? वीर्य कसे उत्पन्न होणार? (१४)

अन्न नस्तां रेत कैंचें। वोषधी नस्तां अन्न कैंचें।
वोषधीस जीणें कैंचें। पृथ्वी नस्तां ॥ १५॥

अन्न नसेल तर वीर्य कसे उत्पन्न होणार? झाडे असल्याशिवाय अन्न कसे उत्पन्न होणार? आणि पृथ्वी नसेल तर वनस्पती, झाडे, झुडुपे कशी जगतील? (१५)

आप नस्तां पृथ्वी नाहीं। तेज नस्तां आप नाहीं।
वायो नस्तां तेज नाहीं। ऐसें जाणावें ॥ १६॥

आप नसेल तर पृथ्वी नसेल. तेज नसेल तर आपही नसेल. वायू नसेल तर तेजही नसेल. असे हे सर्व जाणून घ्यावे. (१६)

अंतरात्मा नस्तां वायो कैंचा। विकार नस्तां अंतरात्मा कैंचा।
निर्विकारीं विकार कैंचा। बरें पाहा ॥ १७॥

अंतरात्मा नसेल तर वायू तरी कसा असेल? विकार नसेल तर अंतरात्मा तरी कसा असेल? आणि निर्विकाराच्या ठिकाणी विकार कसा असू शकेल? या सर्व गोष्टींचा नीट विचार करून पाहावा. (१७)

पृथ्वी नाहीं आप नाहीं। तेज नाहीं वायो नाहीं।
अंतरात्मा विकार नाहीं। निर्विकारीं ॥ १८॥

निर्विकार अशा परब्रह्माच्या ठिकाणी पृथ्वी नाही, आप नाही, तेज नाही, वायू नाही, विकारी अंतरात्माही नाही. (१८)

निर्विकार जें निर्गुण। तेचि शाश्वताची खूण।
अष्टधा प्रकृति संपूर्ण। नासिवंत ॥ १९॥

निर्विकार, निर्गुण असे परब्रह्म हेच केवळ शाश्वत असते. बाकी संपूर्ण अष्टधा प्रकृती ही नाशिवंत आहे. (१९)

नासिवंत समजोन पाहिलें। तों तें अस्तांचि नस्तें जालें।
सारासारें कळों आलें। समाधान ॥ २०॥

नाशिवंत जे जे आहे, ते विचाराने जाणून मग त्याच्याकडे पाहू लागले की ते असून नसल्यासारखे होते. आणि सारासारविवेकाने त्याचे सत्य स्वरूप कळले की, समाधान प्राप्त होते. (२०)

विवेकें पाहिला विचार। मनास आलें सारासार।
येणेंकरितां विचार। सदृढ जाला ॥ २१॥

आपण विचार करू लागलो की आपोआप मनात सारासारविवेक जागृत होतो आणि मग शाश्वत परब्रह्माविषयीचा विचार सुदृढ होऊ लागतो. (२१)

शाश्वत देव तो निर्गुण। ऐसी अंतरीं बाणली खूण।
देव कळला मी कोण। कळलें पाहिजे ॥ २२॥

मग शाश्वत देव हा निर्गुण आहे, ही खूण अनुभवाने अंतरात बाणते. याप्रमाणे देव कोण हे कळले तरी 'मी कोण' हे कळायलाच हवे. (२२)

मी कोण पाहिजे कळलें। देहतत्व तितुकें शोधिलें।
मनोवृत्तीचा ठाईं आलें। मीतूंपण ॥ २३॥

मी कोण हे कळायला हवे, म्हणून प्रथम देहाचा तत्त्वाने निरास केला. तेव्हा मग 'मी तू पणा' हा मनोवृत्तीच्या ठिकाणी आहे, असे वाटले. (२३)

सकळ देहाचा शोध घेतां। मीपण दिसेना पाहातां।
मीतूंपण हें तत्वतां। तत्वीं मावळलें ॥ २४॥

याप्रमाणे स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण इत्यादी सर्व देहांचा विचाराने निरास झाला की, 'मी' म्हणून कोणी शिल्लकच राहात नाही. तत्त्वात तत्त्वाचा निरास केला की, त्या तत्त्वांमध्ये मीतूपणही नष्ट होते. (२४)

दृश्य पदार्थचि वोसरे। तत्वें तत्व तेव्हां सरे।
मीतूंपण हें कैंचें उरे। तत्वतां वस्तु ॥ २५॥

जेव्हा एका तत्त्वाचा दुसऱ्यात लय होतो, तेव्हा सर्व दृश्य पदार्थच मायिक आहेत हे कळून येते. मग 'मी-तू पणा' तरी कसा उरणार? फक्त आत्मवस्तू तेवढी उरते. (२५)

पंचीकर्ण तत्वविवर्ण। माहावाक्यें वस्तु आपण।
निसंगपणें निवेदन। केलें पाहिजे ॥ २६॥

म्हणून पंचीकरण, तत्त्वविवरण करून महावाक्यांच्या साह्याने मीपणाविरहित आत्मनिवेदन करून अनुभवले पाहिजे. (२६)

देवाभक्तांचें मूळ। शोधून पाहातां सकळ।
उपाधीवेगळा केवळ। निरोपाधी आत्मा ॥ २७॥

याप्रमाणे देवाच्या आणि भक्ताच्या मुळाचा शोध घेऊन पाहू लागल्यावर सर्व उपाधींचा निरास होऊन उपाधिवेगळा निरुपाधिक केवळ आत्मा तेवढा शिल्लक राहातो. (२७)

मीपण तें बुडालें। विवेकें वेगळेपणें गेलें।
निवृत्तिपदास प्राप्त जालें। उन्मनीपद ॥ २८॥

मीपण नाहीसे होते. विवेकाने वेगळेपणा, द्वैतही जाते आणि मायेच्या वेढ्यातून निवृत्त झालेले मन उन्मन बनते व नंतर तो साधक परब्रह्मस्वरूपी ऐक्य पावतो. (२८)

विज्ञानीं राहिलें ज्ञान। ध्येये राहिलें ध्यान।
सकळ कांहीं कार्याकारण। पाहोन सांडिलें ॥ २९॥

स्वस्वरूपानुभवात ज्ञानही शिल्लक राहत नाही. स्वतः ध्येयरूपच झाल्याने ध्यानही उरत नाही. आब्रह्मस्तंवापर्यंत सर्व काही कार्यकारणसापेक्ष आहे, असे समजून त्या सर्वांचा त्याग केला. (२९)

जन्ममरणाचें चुकलें। पाप अवघेंचि बुडालें।
यमयातनेचें जालें। निसंतान ॥ ३०॥

जन्ममरणाचे फेरे चुकले, सर्व पाप नष्ट झाले आणि यमयातनेची भीतीही नष्ट झाली. (३०)

निर्बंद अवघाचि तुटला। विचारें मोक्ष प्राप्त जाला।
जन्म सार्थकचि वाटला। सकळ कांहीं ॥ ३१॥

बंधन सर्वस्वी नष्ट झाले, विचाराने मोक्षप्राप्ती झाली आणि मनुष्यजन्माचे सार्थक झाले असे वाटले. (३१)

नाना किंत निवारले। धोके अवघेचि तुटले।
ज्ञानविवेकें पावन जाले। बहुत लोक ॥ ३२॥

नाना प्रकारचे शंकासंशय नाहीसे झाले. कुठलीही भीती राहिली नाही. ज्ञानाचा विवेक केल्याने अनेक लोक पवित्र झाले. (३२)

पतितपावनाचे दास। तेहि पावन करिती जगास।
ऐसी हे प्रचित मनास। बहुतांच्या आली ॥ ३३॥

पतितपावन अशा रामाचे दास असतात, ते सर्व जगाला पावन करतात, अशी प्रचीती अनेकांच्या मनाला आलेली आहे. (३३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'भक्तिनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.

❑ ❑

## दशक १२ : समास ४

## विवेकवैराग्य

॥ श्रीराम ॥

महद्भाग्य हातासी आलें। परी भोगूं नाहीं जाणितलें।
तैसें वैराग्य उत्पन्न जालें। परी विवेक नाहीं ॥ १॥

एखाद्याला मोठ्या भाग्याने ऐश्वर्य प्राप्त झाले, पण त्याचा उपभोग कसा घ्यावा, हे जर त्याला कळत नसेल, तर ते प्राप्त होऊनही व्यर्थ ठरते. त्याप्रमाणे एखाद्यास वैराग्य उत्पन्न झाले, पण त्याच्या ठिकाणी विवेक नसेल, तर त्या वैराग्याचा व्हावा तसा उपयोग होत नाही. (१)

आदळतें आफळतें। कष्टी होतें दु:खी होतें।
ऐकतें देखतें येतें। वैराग्य तेणें ॥ २॥

या जगात माणसाला प्रपंचात नाना प्रसंगांस तोंड द्यावे लागते, त्यामुळे तो आदळ-आपट करतो, कष्टी होतो, दु:खी होतो. अशा रीतीने ऐकून, पाहून आणि अनुभवून एखाद्या माणसाला वैराग्य उत्पन्न होते. (२)

नाना प्रपंचाच्या वोढी। नाना संकटें सांकडीं।
संसार सांडुनी देशधडी। होये तेणें ॥ ३॥

संसारात ओढाताण होते, नाना संकटे, अडचणी उपस्थित होतात. त्यामुळे तो माणूस संसार सोडून दुसऱ्या देशात निघून जातो. (३)

तो चिंतेपासून सुटला। पराधेनतेपासूनि पळाला।
दु:खत्यागें मोकळा जाला। रोगी जैसा ॥ ४॥

त्यामुळे रोगी जसा रोग बरा झाल्यावर दु:खमुक्त होतो, तसा तो माणूसही चिंतेपासून, पराधीनतेपासून आणि प्रापंचिक दु:खांतून मुक्त होतो. (४)

परी तो होऊं नये मोकाट। नष्ट भ्रष्ट आणी चाट।
सीमाच नाहीं सैराट। गुरूं जैसें ॥ ५॥

पण त्याने मोकाट, उनाड, अनाचारी, उन्मत्त, एखाद्या जनावराप्रमाणे मोकाट होऊ नये. (५)

विवेकेंविण वैराग्ये केलें। तरी अविवेकें अनर्थी घातलें।
अवघें वेर्थचि गेलें। दोहिंकडे ॥ ६॥

विवेक नसता वैराग्य प्राप्त होऊन प्रपंच सोडून गेला, तर अविवेकामुळे अनर्थ उत्पन्न होऊन प्रपंच व परमार्थ दोन्हीकडे नुकसानच होते. (६)

ना प्रपंच ना परमार्थ। अवघें जिणेंचि जालें वेर्थ।
अविवेकें अनर्थ। ऐसा केला ॥ ७॥

धड ना प्रपंच, ना परमार्थ, असे होऊन त्याचे जगणेच व्यर्थ ठरते. अविवेकामुळे असा अनर्थ ओढवतो. (७)

कां वेर्थचि ज्ञान बडबडिला। परी वैराग्ययोग नाहीं घडला।
जैसा कारागृहीं अडकला। पुरुषार्थ सांगे ॥ ८॥

एखादा असा शब्दज्ञानी असतो की, तोंडाने ज्ञान बडबडत असतो, पण वैराग्याचा पूर्ण अभाव असतो. त्यामुळे एखाद्याने तुरुंगात बसून पुरुषार्थाच्या बढाया माराव्यात, तशी त्याची ती बडबड व्यर्थ ठरते. (८)

वैराग्येंविण ज्ञान। तो वेर्थचि साभिमान।
लोभदंभें घोळसून। कासाविस केला ॥ ९॥

वैराग्याशिवायचे ज्ञान म्हणजे ते वृथा अभिमानाला कारण ठरते. अशी व्यक्ती लोभ आणि दंभ यांनी घुसळली जाऊन कासावीस होते. (९)

स्वान बांधलें तरी भुंके। तैसा स्वार्थमुळें थिंके।
पराधीक देखों न सके। साभिमानें ॥ १०॥

कुत्र्याला बांधून घातले तरी ते भुंकत राहाते, तसा वैराग्यहीन शब्दज्ञानी स्वार्थामुळे चरफडत राहातो. अभिमानामुळे तो दुसऱ्याचा उत्कर्ष जराही सहन करू शकत नाही. (१०)

हें येकेंविण येक। तेणें उगाच वाढे शोक।
आतां वैराग्य आणि विवेक। योग ऐका ॥ ११॥

याप्रमाणे वैराग्य आणि विवेक हे एकाशिवाय दुसरे दुःखालाच वाढवतात. आता वैराग्य आणि विवेक दोन्ही एकत्र असतील तर काय होते, ते ऐका. (११)

विवेकें अंतरीं सुटला। वैराग्यें प्रपंच तुटला।
अंतर्बाह्य मोकळा जाला। निःसंग योगी ॥ १२॥

विवेकाने जो अंतरी अनासक्त झालेला असतो आणि वैराग्यामुळे ज्याने प्रपंचाचा बाहेरही त्याग केलेला असतो, तो योगी निःसंग परब्रह्माशी एकरूप होतो. (१२)

जैसें मुखें ज्ञान बोले। तैसीच सवें क्रिया चाले।
दीक्षा देखोनी चक्कित जाले। सुचिस्मंत ॥१३॥

तो मुखाने जसे ज्ञान सांगतो, त्याला अनुसरूनच त्याचे वागणे असते. त्याची वागण्याची रीत पाहून सज्जन लोकही आश्चर्यचकित होतात. (१३)

आस्था नाहीं त्रैलोक्याची। स्थिति बाणली वैराग्याची।
येत्नविवेकधारणेची। सीमा नाहीं ॥ १४॥

वैराग्य सुदृढपणे बाणलेले असल्याने त्याला त्रैलोक्यातील कुठल्याही पदार्थाबद्दल, व्यक्तीबद्दल मोह, आस्था नसते. पण त्याच्या प्रयत्नास आणि विवेकधारणेस सीमाच नसते. (१४)

संगीत रसाळ हरिकीर्तन। ताळबद्ध तानमान।
प्रेमळ आवडीचें भजन। अंतरापासुनी ॥ १५॥

तो तालबद्ध, ताना इत्यादी संगीताचा जाणकार असून अत्यंत रसाळ हरिकीर्तन करतो आणि त्याला अगदी अंतःकरणापासून भगवंताचे प्रेमाने भजन करणे आवडते. (१५)

तत्काळचि सन्मार्ग लागे। ऐसा अंतरी विवेक जागे।
वगतृत्व करितां न भंगे। साहित्य प्रत्ययाचे ॥ १६॥

त्याचे हे हरिकीर्तन, प्रेमळ भजन ऐकून लोक तत्काळ सन्मार्गास लागतात, त्यांच्या अंतरी विवेक जागृत होतो. त्याचे वक्तृत्व असे असते की, त्यातून वेदान्तासारखे अनुभूत शास्त्रसिद्धान्त प्रगट होतात. (१६)

सन्मार्गें जगास मिळाला। म्हणिजे जगदीश वोळला।
प्रसंग पाहिजे कळला। कोणीयेक ॥ १७॥

याप्रमाणे तो लोकांना सन्मार्गी लावू लागला की, त्याच्यावर जगदीश प्रसन्न झाला असे जाणावे. पण तरी त्यानेही प्रसंग पाहून वागायला हवे. (१७)

प्रखर वैराग्य उदासीन। प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान।
स्नानसंध्या भगवद्भजन। पुण्यमार्ग ॥ १८॥

अशा व्यक्तीच्या ठिकाणी प्रखर वैराग्य, अनासक्ती, अनुभवयुक्त ब्रह्मज्ञान व स्नानसंध्या आणि भगवद्भजन असे पुण्यमार्गाचे सर्वांगीण दर्शन घडते. (१८)

विवेकवैराग्य तें ऐसें। नुस्तें वैराग्य हेंकाडपिसें।
शब्दज्ञान येव्हिलसें। आपणचि वाटे ॥ १९॥

याप्रमाणे विवेक, वैराग्य दोन्ही असले की अशी स्थिती असते. नुसते वैराग्य म्हणजे एककल्लीपणा अथवा खुळेपणाच होय. आणि केवळ शब्दज्ञान हे वैराग्याच्या अभावी कंटाळवाणे वाटते. (१९)

म्हणौन विवेक आणि वैराग्य। तेंचि जाणिजे महद्भाग्य।
रामदास म्हणे योग्य। साधु जाणती ॥ २०॥

म्हणून विवेक आणि वैराग्य दोन्हीची जोड असणे हे महद्भाग्य होय. रामदास म्हणतात की, साधू असतात ते हे सर्व जाणतात. (२०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विवेकवैराग्यनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.

❑ ❑

## दशक १२ : समास ५
### आत्मनिवेदन

॥ श्रीराम ॥

रेखेचें गुंडाळें केलें। मात्रुकाक्षरीं शब्द जाले।
शब्द मेळऊन चाले। श्लोक गद्य प्रबंद ॥ १॥

वेदशास्त्रें पुराणें। नाना काव्यें निरूपणें।
ग्रंथभेद अनुवादणें। किती म्हणोनि ॥ २॥

नाना ऋषी नाना मतें। पाहों जातां असंख्यातें।
भाषा लिपी जेथ तेथें। काये उणें ॥ ३॥

वर्ग ऋचा श्रुति स्मृति। अधे स्वर्ग स्तबक जाती।
प्रसंग मानें समास पोथी। बहुधा नामें ॥ ४॥

नाना पदें नाना श्लोक। नाना बीर नाना कडक।
नाना साख्या दोहडे अनेक । नामाभिधानें ॥ ५॥

डफगाणें माचिगाणें। दंडिगाणें कथागाणें।
नाना मानें नाना जसनें। नाना खेळ ॥ ६॥

ध्वनि घोष नाद रेखा। चहुं वाचामध्यें देखा।
वाचारूपेंहि ऐका। नाना भेद ॥ ७॥

उन्मेष परा, ध्वनि पश्यंती। नाद मध्यमा, शब्द चौथी।
वैखरीपासून उमटती। नाना शब्दरत्नें ॥ ८॥

अकार उकार मकार। अर्धमात्राचें अंतर।
औटमात्रा तदनंतर। बावन मात्रुका ॥ ९॥

नाना भेद रागज्ञान। नृत्यभेद तानमान।
अर्थभेद तत्वज्ञान। विवंचना ॥ १०॥

तत्वांमध्यें मुख्य तत्व। तें जाणावें शुद्धसत्व।
अर्धमात्रा महत्तत्व। मूळमाया ॥ ११॥

नाना तत्वें ल्हानथोरें। मिळोन अष्टहि शरीरें।
अष्टधा प्रकृतीचें वारें। निघोन जातें ॥ १२॥

रेषा काढून तिला निरनिराळे आकार दिले की अक्षरे तयार होतात. त्या अक्षरांना काना-मात्रा दिल्याने शब्द तयार होतात. असे अनेक शब्द एकत्र येऊन त्यांतून श्लोक, गद्य, प्रबंध वगैरे साहित्य निर्माण होते. (१)

वेद, शास्त्रे, पुराणे, नाना काव्ये, निरूपणे इत्यादी ग्रंथांचे अनेक प्रकार आहेत. ते किती म्हणून सांगावेत? (२)

अनेक ऋषी झाले. त्यांची अनेक मते आहेत. ती सांगता येणे शक्य नाही. कारण ती असंख्य आहेत. अनेक भाषा आणि अनेक लिप्या असल्याने ग्रंथाना काय तोटा? (३)

वेदांतील वर्ग वेद मनू इत्यादी ऋषींनी समाजासाठी लिहिलेले 'मनुस्मृती' आदी ग्रंथ, अध्याय, सर्ग, स्तबक, जाती इत्यादी ग्रंथ विभाग, माने, समास आदी चम्पू आदी काव्याचे भाग आणि पोथ्या, किती म्हणून नावे सांगावीत? (४)

नाना पदे, नाना श्लोक, नाना वीर, कडक, साक्या, दोहे इत्यादी हिंदी काव्यांतील छंद अशी अनेक नावे आहेत. (५)

याशिवाय डफगाणे, माचिगाणे, दिंडी गाण्याचे प्रकार, तसेच कथागाणे, नाना माने, नाना आडकथा, नाना खेळ इत्यादी गाण्यांचे अनेक प्रकार आहेत. (६)

ध्वनी, घोष, नाद, रेखा असे चारी वाचांमध्ये अनेक भेद आहेत. वाणीचेही अनेक प्रकार आहेत. (७)

उन्मेष म्हणजे स्फूर्ती ही परावाचा होय. ध्वनी ही पश्यंती, नाद ही मध्यमा, आणि शब्द ही चौथी वैखरी वाणी होय. या वैखरीपासूनच नाना शब्दरत्ने प्रगट होतात. (८)

सर्वप्रथम अकार, उकार, मकार आणि अर्धमात्रा मिळून साडेतीन मात्रांचा प्रणव ओंकार उत्पन्न झाला आणि त्यानंतर सोळा स्वर आणि छत्तीस व्यंजने मिळून बावन्न अक्षरे निर्माण झाली. (९)

नाना प्रकारचे रागज्ञान, नृत्याचे भेद, तानमान, अर्थभेद, तत्त्वज्ञान व त्याचे विवरण सर्व काही शब्दांच्या योगेच चालते. (१०)

तत्त्वांमध्ये शुद्ध सत्व हे मुख्य तत्त्व जाणावे. ह्यालाच अर्धमात्रा, महत्तत्त्व किंवा मूळमाया म्हणतात. (११)

नाना लहान-थोर तत्त्वांच्या कमी-अधिक मिश्रणाने आठ देह निर्माण होतात. (चार पिंडाचे व चार ब्रह्मांडाचे). पंचमहाभूते व त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृती बनते. तिच्यामध्ये चंचळ वायू असल्याने ती निघून जाते. (१२)

**वारें नस्तां जें गगन। तैसें परब्रह्म सघन।**
**अष्ट देहाचें निर्शन। करून पाहावें ॥ १३॥**

चंचळ वायू लय पावल्यावर जसे निश्चल गगन शिल्लक उरते, तसे परब्रह्म सघन सर्वत्र कोंदटलेले असते. आठही देहांचा निरास करून त्या निश्चल परब्रह्मास अनुभवाने जाणावे. (१३)

**ब्रह्मांडपिंडउभार। पिंडब्रह्मांडसंव्हार।**
**दोहिवेगळें सारासार। विमळब्रह्म ॥ १४॥**

ब्रह्मांडापासून पिंडापर्यंत उभारणी आणि पिंडापासून ब्रह्मांडापर्यंत संहारणी कशी होते ते जाणून घ्यावे, म्हणजे सारासारविवेकाने या दोहीवेगळे जे विमल ब्रह्म त्याचा बोध होतो. (१४)

**पदार्थ जड आत्मा चंचळ। विमळब्रह्म तें निश्चळ।**
**विवरोन विरे तत्काळ। तद्रूप होये ॥ १५॥**

सर्व दृश्य पदार्थ जड असतात, अंतरात्मा चंचळ असतो, फक्त विमल ब्रह्म तेवढे निश्चल असते. त्या विमल ब्रह्माचे मनन, निदिध्यासन, चिंतन करता करता सहज तद्रूपता प्राप्त होते. (१५)

**पदार्थ मनें काया वाचा। मी हा अवघाचि देवाचा।**
**जड आत्मनिवेदनाचा। विचार ऐसा ॥ १६॥**

सर्व दृश्य पदार्थ, आपले मन, काया, वाचा यांसह मी सर्वच्या सर्व देवाचा हा विचार दृढ होणे हे जड आत्मनिवेदन होय. (१६)

**चंचळ कर्ता तो जगदीश। प्राणीमात्र त्याचा अंश।**
**त्याचा तोचि, आपणास। ठाव नाहीं ॥ १७॥**

ईश्वर म्हणजेच मूळमाया अथवा अंतरात्मा हा चंचळ असून तोच कर्ता आहे आणि प्राणिमात्र त्याचा अंश आहे. येथे आपण म्हणजे 'मी' म्हणून कुणी नाहीच. (१७)

**चंचळ आत्मनिवेदन। याचें सांगितलें लक्षण।**
**कर्ता देव तो आपण। कोठेंचि नाहीं ॥ १८॥**

देव हाच कर्ता, आपणाला अस्तित्वच नाही, ही धारणा दृढ होणे, हे चंचळ आत्मनिवेदनाचे लक्षण आहे. (१८)

**चंचळ चळे स्वप्नाकार। निश्चळ देव तो निराकार।**
**आत्मनिवेदनाचा प्रकार। जाणिजे ऐसा ॥ १९॥**

चंचळ हे अशाश्वत असून स्वप्नाप्रमाणे मिथ्या आहे आणि निश्चल देव हा निराकार असून एकला एक आहे. त्याच्याशिवाय अन्य काही नाहीच, ही अनुभूती येणे हा आत्मनिवेदनाचा प्रकार होय. (१९)

**ठावचि नाहीं चंचळाचा। तेथें आधीं आपण कैंचा।**
**निश्चळ आत्मनिवेदनाचा। विवेक ऐसा ॥ २०॥**

जेथे चंचळाचा म्हणजे मूळमायेचाच पत्ता नाही, तेथे 'आपण' म्हणून अस्तित्व राहीलच कसे, हा विचार दृढ होणे, हा निश्चल आत्मनिवेदनाचा विवेक होय, (२०)

**तिहिं प्रकारें आपण। नाहीं नाहीं दुजेपण।**
**आपण नस्तां मीपण। नाहींच कोठें ॥ २१॥**

याप्रमाणे या तिन्ही प्रकारच्या आत्मनिवेदनात मीपण म्हणजे 'आपण' च शिल्लक उरत नसल्याने तेथे दुजेपण म्हणजेच वेगळेपणा उरतच नाही. आपणच नाही, मग मीपण तरी कोठे असणार? (२१)

**पाहातां पाहातां अनुमानलें। कळतां कळतां कळों आलें।**
**पाह्यतां अवघेंचि निवांत जालें। बोलणें आतां ॥ २२॥**

ग्रंथ वाचता वाचता अनुमानाने कळू लागते आणि कळता कळता प्रत्यक्ष अनुभव येतो. याप्रमाणे शोध घेत असता सर्व जाऊन केवळ निवांत निश्चल परब्रह्मच राहिले तेव्हा आता बोलण्यासारखे काही उरलेच नाही. (२२)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मनिवेदननाम' समास पाचवा समाप्त.

❑ ❑

## दशक १२ : समास ६
### सृष्टिक्रमनिरूपण

॥ श्रीराम ॥

ब्रह्म निर्मळ निश्चळ। शाश्वत सार अमल विमळ।
अवकाश घन पोकळ। गगनाऐसें ॥ १ ॥

परब्रह्म हे निर्मळ, निश्चल, शाश्वत, सर्वांचे सार असून अमल, विमल आणि गगनासारखे सूक्ष्म असून सर्वत्र घनदाट व्यापून राहिलेले असते. (१)

तयास करणें ना धरणें। तयास जन्म ना मरणें।
तेथें जाणणें ना नेणणें। सुन्यातीत ॥ २ ॥

त्याला काहीही करणे नसते, धरणे नसते. त्यास जन्म नसतो, मरण नसते. त्याच्या ठिकाणी जाणीवही नसते व नेणीवही नसते आणि ते शून्याच्याही पलीकडे असते. (२)

तें रचेना ना खचेना। तें होयेना ना जायेना।
मायातीत निरंजना। पारचि नाहीं ॥ ३ ॥

ते रचत नाही, खचत नाही, उत्पन्न होत नाही, नाश पावत नाही, त्या मायातीत निरंजनाला पारच नाही. (३)

पुढें संकल्प उठिला। षडगुणेश्वर बोलिजे त्याला।
अर्धनारीनटेश्वराला। बोलिजेतें ॥ ४ ॥

अशा त्या परब्रह्माच्या ठिकाणी '**बहु स्याम्**' हे मूळ स्फुरण उठले. त्यालाच अर्धनारीनटेश्वर, षड्गुणेश्वर असे म्हणतात. (४)

सर्वेश्वर सर्वज्ञ। साक्षी द्रष्टा ज्ञानघन।
परेश परमात्मा जगजीवन। मूळपुरुष ॥ ५ ॥

त्याला सर्वेश्वर, सर्वज्ञ, साक्षी, द्रष्टा, ज्ञानघन, परेश, परमात्मा, जगजीवन, मूळ पुरुष असेही म्हणतात. (५)

ते मूळमाया बहुगुणी। अधोमुखें गुणक्षोभिणी।
गुणत्रये तिजपासूनि। निर्माण जाले ॥ ६ ॥

तीच बहुगुणी मूळमाया विस्ताररूपाने गुणक्षोभिणी झाली आणि तिच्यापासून तीनही गुण निर्माण झाले. (६)

पुढें विष्णु जाला निर्माण। जाणतीकळा सत्वगुण।
जो करिताहे पाळण। त्रैलोक्याचें ॥ ७ ॥

पुढे जाणती कळा अर्थात सत्त्वगुणापासून विष्णू निर्माण झाला. तोच या त्रैलोक्याचे पालन करतो. (७)

पुढें जाणीवनेणीवमिश्रित। ब्रह्मा जाणावा नेमस्त।
त्याच्या गुणें उत्पत्ति होत। भुवनत्रैं ॥ ८ ॥

पुढे जाणीव-नेणीवमिश्रित रजोगुणापासून ब्रह्मा झाला व त्याच्या रजोगुणापासून भुवनत्रयाची उत्पत्ती झाली. (८)

पुढें रुद्र तमोगुण। सकळ संव्हाराचें कारण।
सकळ कांहीं कर्तेपण। तेथेंचि आलें ॥ ९ ॥

पुढे तमोगुणयुक्त रुद्र जो सर्व संहाराचे कारण आहे, तो निर्माण झाला. याप्रमाणे सर्व काही कर्तेपण तेथेच आले. (९)

तेथून पुढें पंचभूतें। पावलीं पष्ट दशेतें।
अष्टधा प्रकृतीचें स्वरूप तें। मुळींच आहे ॥ १० ॥

पुढे त्यापासून पंचमहाभूते स्पष्ट दशेला प्राप्त झाली, म्हणून स्थूल रूपाने प्रकट झाली. मूळमायेचे ठिकाणीच अष्टधा प्रकृती अत्यंत सूक्ष्म रूपाने अव्यक्त दशेत असते. (१०)

निश्चळीं जालें चळण। तेंचि वायोचें लक्षण।
पंचभूतें आणि त्रिगुण। सूक्ष्म अष्टधा ॥ ११ ॥

निश्चलाच्या ठिकाणी जे चलनवलन झाले तेच वायूचे लक्षण होय. त्या मूळमायेतच पंचभूते आणि त्रिगुण सूक्ष्म रूपाने असतात. (११)

आकाश म्हणिजे अंतरात्मा। प्रत्ययें पाहावा महिमा।
त्या आकाशापासून जन्मा। वायो आला ॥ १२ ॥

आकाश म्हणजेच अंतरात्मा होय. त्याचा महिमा अनुभवाने जाणून घ्यावा. त्या आकाशापासून वायूचा जन्म झाला. (१२)

तया वायोच्या दोनी झुळुका। उष्ण सीतळ ऐका।
सीतळपासून तारा मयंका। जन्म जाला ॥ १३ ॥

वायूच्या दोन प्रकारच्या झुळुका आहेत. एक उष्ण व एक शीतल. शीतलपासून चंद्र आणि तारा यांचा जन्म झाला. (१३)

उष्णापासून रवि वन्ही । विद्युल्यता आदिकरूनि ।
सीतळ उष्ण मिळोनि । तेज जाणावें ॥ १४ ॥

उष्णापासून सूर्य, अग्नी आणि विद्युल्लता निर्माण झाली. हे शीत आणि उष्ण मिळून तेज तत्त्व जाणावे. (१४)

तया तेजापासून जालें आप । आप आळोन पृथ्वीचें रूप ।
पुढें औषधी अमूप । निर्माण जाल्यां ॥ १५ ॥

त्या तेजापासून आप झाले. आप आळून पृथ्वीचे रूप निर्माण झाले व त्या पृथ्वीवर असंख्य वनौषधी निर्माण झाल्या. (१५)

औषधीपासून नाना रस । नाना बीज अन्नरस ।
चौऱ्यासि लक्ष योनीचा वास । भूमंडळीं ॥ १६ ॥

औषधींपासून नाना रस, नाना बीजे, नाना अन्नरस निर्माण होऊन या भूमंडलावर चौऱ्याऐंशी लक्ष योनी वास करून राहू लागल्या. (१६)

ऐसी जाली सृष्टिरचना । विचार आणिला पाहिजे मना ।
प्रत्ययेंविण अनुमाना । पात्र होइजे ॥ १७ ॥

याप्रकारे या दृश्य सृष्टीची रचना झाली. साधकाने या सृष्टिरचनेच्या क्रमाचा विचार करून अनुभव घ्यावा. अनुभव नसेल, तर उगीच अनुमान, तर्क करीत बसावे लागते. (१७)

ऐसा जाला आकार । येणेंचि न्यायें संव्हार ।
सारासारविचार । यास बोलिजे ॥ १८ ॥

याप्रमाणे ही सृष्टी आकारास प्राप्त झाली. ज्या अनुक्रमाने उभारणी झाली, त्याच क्रमाने यथान्याय संहारणी होते. या दोन्हीच्या विचारालाच सारासारविचार म्हणतात. (१८)

जें जें जेथून निर्माण जालें । तें तें तेथेंचि निमालें ।
येणेंचि न्यायें संव्हारलें । माहाप्रळईं ॥ १९ ॥

जे जे तत्त्व जेथून निर्माण होते, तेथेच ते लय पावते. या न्यायानेच महाप्रलयाच्या वेळी सर्व दृश्य सृष्टीचा संहार होतो. (१९)

आद्य मध्य अवसान । जें शाश्वत निरंजन ।
तेथें लावावें अनुसंधान । जाणते पुरुषीं ॥ २० ॥

म्हणून जाणत्या पुरुषांनी सृष्टीपूर्वी, सृष्टी असताना आणि सृष्टीचा संहार झाल्यावर जे शाश्वत निरंजन परब्रह्म जसेच्या तसेच असते, त्याच्याकडे अनुसंधान लावावे. (२०)

होत जाते नाना रचना । परी ते कांहींच तगेना ।
सारासार विचारणा । याकारणें ॥ २१ ॥

नाना रचना होतात आणि जातात, पण एकही टिकून राहात नाही, शाश्वत असत नाही. म्हणून यासाठीच आपण सारासारविवेक केला पाहिजे. (२१)

द्रष्टा साक्षी अंतरात्मा । सर्वत्र बोलती महिमा ।
परी हे सर्वसाक्षिणी अवस्ता मां । प्रत्ययें पाहावी ॥ २२ ॥

मात्र ज्या अंतरात्म्याचा द्रष्टा, साक्षी असा महिमा वर्णन करतात, तो म्हणजे सर्वसाक्षिणी तुर्या अवस्था मात्र होय, हे अनुभवून पाहावे. (२२)

मुळापासून सेवटवरी । अवघी मायेची भरोवरी ।
नाना विद्या कळाकुंसरी । तयेमधें ॥ २३ ॥

मुळापासून शेवटापर्यंत अवघा मायेचाच विस्तार होय. नाना विद्या, कला, कुसरी यांचा अंतर्भाव मायेमध्येच होतो. (२३)

जो उपाधीचा सेवट पावेल । त्यास भ्रम ऐसें वाटेल ।
जो उपाधीमध्यें आडकेल । त्यास काढिता कवण ॥ २४ ॥

जो उपाधीच्याही पलीकडे जाईल, तो सर्व दृश्य सृष्टी म्हणजे भ्रम आहे हे जाणेल. पण जो उपाधी खरी असे धरून चालेल, त्याला त्यातून कोण सोडवू शकणार आहे? (२४)

विवेकप्रत्ययाचीं कामें । कैसीं घडतील अनुमानभ्रमें ।
सारासारविचाराचेन संभ्रमें । पाविजे ब्रह्म ॥ २५ ॥

विवेकाच्या साहाय्याने अनुभवाने जे कार्य होते, ते अनुमानाने, भ्रमाने कसे साध्य होईल? सारासारविवेकाच्या साहाय्यानेच परब्रह्माची प्राप्ती होते. (२५)

ब्रह्मांडींचें माहाकारण । ते मूळमाया जाण ।
अपूर्णास म्हणती ब्रह्म पूर्ण । विवेकहीन ॥ २६ ॥

ब्रह्मांडाचा महाकारण देह म्हणजेच मूळमाया जाणावी. जे विवेकहीन असतात, ते अपूर्ण अशा मूळमायेलाच पूर्णब्रह्म समजतात. (२६)

सृष्टीमधें बहुजन। येक भोगिती नृपासन।
येक विष्ठा टाकिती जाण। प्रत्यक्ष आतां ॥ २७॥

सृष्टीमध्ये असंख्य लोक आहेत. कुणी राजसिंहासनावर बसून सुखोपभोग भोगतात, तर एक विष्ठा टाकण्यासारखे हीन काम करीत असतात. हे आपल्याला प्रत्यक्ष अनुभवास येते. (२७)

ऐसे उदंड लोक असती। आपणास थोर म्हणती।
परी ते विवेकी जाणती। सकळ कांहीं ॥ २८॥

कित्येक लोक असे आहेत की, जे आपल्याला थोर म्हणवितात, पण जे विवेकी असतात, तेच खरोखर थोर कोण आहे हे जाणतात. (२८)

ऐसा आहे समाचार। कारण पाहिजे विचार।
बहुतांच्या बोलें हा संसार। नासूं नये ॥ २९॥

खरी स्थिती ही अशी आहे. म्हणून विवेक करणे अत्यंत आवश्यक आहे. अविवेकी लोकांच्या नादाने उगाच आयुष्य फुकट घालवू नये. (२९)

पुस्तकज्ञानें निश्चये धरणें। तरी गुरु कासया करणें।
याकारणें विवरणें। आपुल्या प्रत्ययें ॥ ३०॥

पुस्तकी ज्ञानाने जर परब्रह्मस्वरूपाचा निश्चय होत असता, तर मग सद्गुरू करण्याची काय आवश्यकता असते, हे आपल्याच अनुभवावरून ठरवावे. (३०)

जो बहुतांच्या बोलें लागला। तो नेमस्त जाणावा बुडाला।
येक साहेब नस्तां कोणाला। मुश्यारा मागावा ॥ ३१॥

जो अनेकांच्या बोलण्यावर विश्वास ठेवतो, तो नक्कीच बुडाला असे जाणावे. एकच मालक नसेल तर वेतन कोणाजवळ मागणार? (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सृष्टीक्रमनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.**

❑ ❑

## दशक १२ : समास ७

## विषयत्यागनिरूपण

॥ श्रीराम ॥

न्यायें निष्ठुर बोलणें। बहुतांस वाटे कंटाळवाणें।
मळमळ करितां जेवणें। विहित नव्हे ॥ १॥

न्यायनिष्ठुर बोलणे अनेकांना आवडत नाही. त्यांना ते कंटाळवाणे वाटते. पण मळमळत असताना जेवणे योग्य नव्हे. त्याप्रमाणेच मनात शंका ठेवून श्रवण केले असता ते हिताचे ठरत नाही. (१)

बहुतीं विषय निंदिले। आणि तेचि सेवित गेले।
विषयत्यागें देह चाले। हें तों घडेना ॥ २॥

श्रोत्यांच्या मनात अशी शंका आहे की, अनेक लोक विषयांची निंदा करतात, पण स्वत: तेही विषय सेवन करीत असतात. विषयांचा जर संपूर्ण त्याग केला, तर देह कसा चालेल? ते अशक्य वाटते. (२)

बोलणें येक चालणें येक। त्याचें नांव हीन विवेक।
येणें करितां सकळ लोक। हांसों लागती ॥ ३॥

एक बोलायचे आणि वागायचे मात्र त्याच्या विरुद्ध. याला हीन विवेक म्हणतात. अशा तऱ्हेने वागले असता सर्व लोक उपहास करतात. (३)

विषयत्यागेंविण तों कांहीं। परलोक तो प्राप्त नाहीं।
ऐसें बोलणें ठाईं ठाईं। बरें पाहा ॥ ४॥

लोक ठायी ठायी असे म्हणतात की, विषयत्यागाशिवाय परलोक प्राप्त होत नाही, याचा नीट विचार करा. (४)

प्रपंची खाती जेविती। परमार्थी काये उपवास करिती।
उभयता सारिखे दिसती। विषयाविषईं ॥ ५॥

प्रापंचिक असतात ते खातात-पितात आणि पारमार्थिक लोक उपास करतात, असे थोडेच आहे? विषयसेवनाचे बाबतीत तर दोघे सारखेच दिसतात. (५)

देह चालतां विषय त्यागी। ऐसा कोण आहे जगीं।
याचा निर्वाह मजलागीं। देवें निरोपावा ॥ ६॥

देह जिवंत असताना जो विषयांचा त्याग करतो असा या जगात कोण आहे? याचे उत्तर गुरुदेवांनी कृपा करून मला सांगावे. (६)

विषय अवघा त्यागावा। तरीच परमार्थ करावा।
ऐसें पाहातां गोवा। दिसतो किं ॥ ७॥

विषयाचा संपूर्ण त्याग करावा आणि मगच परमार्थ करावा, असे म्हणण्यात फार घोटाळा आहे, असे मला वाटते. (७)

ऐसा श्रोता अनुवादला। वक्ता उत्तर देता जाला।
सावध होऊन मन घाला। येतद्विषईं ॥ ८॥

याप्रमाणे श्रोत्याने शंका उत्पन्न केली, तिला वक्त्याने जे उत्तर दिले, ते मन एकाग्र करून सावधपणे ऐका. (८)

वैराग्यें करावा त्याग। तरीच परमार्थयोग।
प्रपंचत्यागें सर्व सांग। परमार्थ घडे ॥ ९॥

वैराग्याने विषयत्याग करावा, तरच परमार्थ साध्य होतो यात शंका नाही. प्रपंचाचा संपूर्ण त्याग केला, तरच परमार्थ यथासांग घडतो. (९)

मागें ज्ञानी होऊन गेले। तेंहिं बहुत कष्ट केले।
तरी मग विख्यात जाले। भूमंडळीं ॥ १०॥

पूर्वी जे अनेक ज्ञानी लोक होऊन गेले, त्यांनी परमार्थ साध्य होण्यासाठी खूप कष्ट सोसले. तेव्हा ते या भूमंडळावर प्रसिद्ध झाले. (१०)

येर मत्सर करितांच गेलीं। अन्न अन्न म्हणतां मेलीं।
कित्येक भ्रष्टलीं। पोटासाठीं ॥ ११॥

याखेरीज कित्येक लोक लोकांचा मत्सर करतानाच मरून गेले; तर कित्येक अन्नान्नदशा होऊन मरून गेले, तर कित्येक पोटासाठी भ्रष्ट झाले. (११)

वैराग्य मुळींहून नाहीं। ज्ञान प्रत्ययाचें नाहीं।
सुचि आचार तोहि नाहीं। भजन कैंचें ॥ १२॥

आधी मुळात जराही वैराग्य नाही, अनुभवाचे ज्ञान तेही नाही, आणि शुद्ध आचार तोही नाही, मग भजन कसे घडणार? (१२)

ऐसे प्रकारीचे जन। आपणास म्हणती सज्जन।
पाहों जातां अनुमान। अवघाच दिसे ॥ १३॥

अशा प्रकारचे लोकही आपणांस सज्जन म्हणवितात आणि प्रत्यक्षात मात्र हे सर्व काल्पनिकच असते. (१३)

जयास नाहीं अनुताप। हेंचि येक पूर्वपाप।
क्षणक्ष्णा विक्षेप। पराधीकपणें ॥ १४॥

ज्याला कृतकर्माबद्दल पश्चात्ताप होत नाही, त्याचे ते पूर्वपापच जाणावे. शिवाय दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न झाल्याने क्षणोक्षणी दु:ख होत असते ते वेगळेच. (१४)

मज नाहीं तुज साजेना। हें तों अवघें ठाउकें आहे जना।
खात्यास न खातें देखों सकेना। ऐसें आहे ॥ १५॥

मला जे मिळत नाही, ते तुलाही शोभून दिसत नाही, असा मत्सरी माणसाचा स्वभाव असतो, हे सर्व लोकांना माहीत आहे. ज्याला खायला मिळत नाही, तो दुसऱ्यास खाताना शांतपणे बघू शकत नाही, अशी ही स्थिती असते. (१५)

भाग्यपुरुष थोर थोर। त्यास निंदिती डीवाळखोर।
सावास देखतां चोर। चर्फडी जैसा ॥ १६॥

भाग्यवंत अशा थोर थोर लोकांना पाहून टवाळखोर लोक त्यांची निंदा करतात. सज्जन माणसाला पाहून चोर जसा चरफडतो, तसाच हा प्रकार आहे. (१६)

वैराग्यापरतें नाहीं भाग्य। वैराग्य नाहीं तें अभाग्य।
वैराग्य नस्तां योग्य। परमार्थ नव्हे ॥ १७॥

वैराग्यासारखे भाग्य नाही, ज्याच्याजवळ वैराग्य नसेल तो अभागी होय. वैराग्य नसताना परमार्थ व्यवस्थित होऊच शकत नाही. (१७)

प्रत्ययेज्ञानी वीतरागी। विवेकबळें सकळ त्यागी।
ते जाणीजे माहांयोगी। ईश्वरी पुरुष ॥ १८॥

जो पुरुष स्वात्मानुभवी असतो, अनासक्त असतो, वैराग्यसंपन्न असतो, तो पुरुष महायोगी ईश्वरी अवतारच जाणावा. (१८)

अष्टमासिद्धीची उपेक्षा। करून घेतली योगदीक्षा।
घरोघरीं मागे भिक्षा। माहादेव ॥ १९॥

अष्टमहासिद्धींची जो उपेक्षा करतो, ज्याने योगदीक्षा घेतलेली असते आणि जो घरोघरी भिक्षा मागून उदरनिर्वाह करतो, तो महादेवच होय. (१९)

ईश्वराची बराबरी। कैसा करील वेषधारी।
म्हणोनियां सगटसरी। होत नाहीं ॥ २०॥

केवळ बैराग्यासारखा वेष धारण करणारा वेषधारी ईश्वराची बरोबरी कसा करू शकेल? म्हणून केवळ बाह्य वेषावरून दोघांची बरोबरी होऊ शकत नाही. (२०)

उदास आणी विवेक। त्यास शोधिती सकळ लोक।
जैसें लालची मूर्ख रंक। तें दैन्यवाणें ॥ २१॥

ज्याच्या ठिकाणी औदासीन्य आणि विवेक दोन्ही असतात अशाचा शोध सर्व लोक घेत असतात, तर लालची, रंक आणि मूर्ख माणूस दैन्यवाणे जीवन जगत असतो. (२१)

जे विचारापासून चेवले। जे आचारापासून भ्रष्टले।
विवेक करूं विसरले। विषयलोभी ॥ २२॥

विषयलोभी जे असतात ते विचार करू शकत नाहीत किंवा विवेकहीन असतात, आचारभ्रष्टही असतात. (२२)

भजन तरी आवडेना। पुरश्चर्ण कदापि घडेना।
भल्यांस त्यांस पडेना। येतन्निमित्य ॥ २३॥

त्यांना भजन मुळीच आवडत नाही. त्यांच्या हातून कधीही पुरश्चरण आदी घडत नाही. आणि याच कारणामुळे चांगल्या माणसांशी त्यांचे पटत नाही. (२३)

वैराग्यें करून भ्रष्टेना। ज्ञान भजन सांडीना।
वित्पन्न आणि वाद घेना। ऐसा थोडा ॥ २४॥

वैराग्यसंपन्न असून जो भ्रष्ट होत नाही, ज्ञानी असून जो सगुणाचे भजन सोडत नाही आणि व्युत्पन्न असून जो वाद घालत नाही, असा एखादाच विरळा असतो. (२४)

कष्ट करितां सेत पिके। उंच वस्त तत्काळ विके।
जाणत्या लोकांच्या कौतुकें। उड्या पडती ॥ २५॥

कष्ट केल्याने शेतात उत्तम पीक येते. चांगली वस्तू तत्काळ विकली जाते. त्याप्रमाणे अशा विवेकवैराग्यसंपन्न माणसांकडे लोकांच्या उड्या पडतात. (२५)

येर ते अवघेचि मंदले। दुराशेनें खोटे जाले।
कानकोंडें ज्ञान केलें। भ्रष्टाकारें ॥ २६॥

अशा माणसांखेरीज इतर जे असतात, ते सर्व त्याच्यापुढे निस्तेज ठरतात. कारण त्यांच्या मनात दुराशा असल्याने ते खोटे ठरतात. ते वैराग्यभ्रष्ट होतात आणि त्यामुळे त्यांच्या ज्ञानालाही कमीपणा येतो. (२६)

सबळ विषय त्यागणें। शुद्ध कार्याकारण घेणें।
विषयत्यागाचीं लक्षणें। वोळखा ऐसीं ॥ २७॥

अशुद्ध विषयांचा त्याग करावा व शुद्ध विषयांचे देहनिर्वाहापुरते कार्यकारणपरत्वे सेवन करावे. हीच विषयत्यागाची लक्षणे जाणून घ्यावीत. (२७)

सकळ कांहीं कर्ता देव। नाहीं प्रकृतीचा ठाव।
विवेकाचा अभिप्राव। विवेकी जाणती ॥ २८॥

विवेकी पुरुष जाणतो की, सर्वांचा कर्ता-करविता एक देवच आहे. प्रकृतीला अस्तित्वच नाही. हा विचार विवेकी बरोबर जाणतात. (२८)

शूरत्वविषईं खडतर। त्यास मानिती ल्हानथोर।
कामगार आणि आंगचोर। येक कैसा ॥ २९॥

जो शूरत्वाविषयी तत्पर असतो, त्याला लहान-थोर सर्व मान देतात. असा कार्यकर्ता आणि अंगचोर आहे त्याची बरोबरी कशी होईल? (२९)

त्यागात्याग तार्किक जाणे। बोलऐसें चालों जाणे।
पिंडब्रह्मांड सकळ जाणे। येथायोग्य ॥ ३०॥

कशाचा त्याग करावा आणि कशाचा करू नये हे तर्काने चतुर माणूस जाणतो. त्याचे वागणे त्याच्या बोलण्यास अनुसरूनच असते. पिंडब्रह्मांड विचार, सारासारविवेक वगैरे सर्व काही तो यथायोग्य प्रकारे जाणतो. (३०)

ऐसा जो सर्वजाणता। उत्तमलक्षणी पुरुता।
तयाचेनि सार्थकता। सहजचि होये ॥ ३१॥

असा जो सर्व जाणणारा उत्तम लक्षणांनी पूर्णपणे युक्त पुरुष असतो, त्याच्या संगतीने आपल्या जीवनाचेही सहज सार्थक होते. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विषयत्यागनिरूपणनाम' समास सातवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १२ : समास ८

### काळरूप

॥ श्रीराम ॥

मूळमाया जगदेश्वर। पुढें अष्टधेचा विस्तार।
सृष्टिक्रमें आकार। आकारला ॥ १ ॥

प्रथम मूळमाया म्हणजेच जगदीश्वर होता. त्यापासून अष्टधा प्रकृतीचा विस्तार होऊन यथानुक्रमे सर्व दृश्य सृष्टी स्थूल रूपाने आकारास आली. (१)

हें अवघेच नस्तां, निर्मळ। जैसें गगन अंतराळ।
निराकारीं काळवेळ। कांहींच नाहीं ॥ २ ॥

ज्या वेळी हे काहीच नव्हते, तेव्हा निर्मळ गगनासारखे निराकार, निश्चल परब्रह्म तेवढे एकले एक होते. त्या निराकाराच्या ठिकाणी काळ-वेळ इत्यादी काहीच नव्हते. (२)

उपाधीचा विस्तार जाला। तेथें काळ दिसोन आला।
येरवीं पाहातां काळाला। ठावचि नाहीं ॥ ३ ॥

उपाधीचा विस्तार झाला, तेव्हा काळ-वेळ वगैरे दिसून येऊ लागले. उपाधी नसताना काळाला काही अस्तित्वच नाही. (३)

येक चंचळ येक निश्चळ। यावेगळा कोठें काळ।
चंचळ आहे तावत्काळ। काळ म्हणावें ॥ ४ ॥

एक चंचळ (मूळमाया) आणि एक निश्चल परब्रह्म हे दोनच प्रकार आहेत. यावेगळा काळ हा तिसरा प्रकारच नाही. जोपर्यंत चंचळ आहे, तोपर्यंत चंचळाच्या सापेक्षतेने काळ ही संज्ञा द्यावी लागते. (४)

आकाश म्हणिजेअवकाश। अवकाश बोलिले विलंबास।
त्या विलंबरूप काळास। जाणोनि घ्यावें ॥ ५ ॥

आकाश म्हणजेच अवकाश होय. विलंबालाच अवकाश असे म्हणतात. काळ हा विलंबरूप आहे. त्याचे स्वरूप जाणून घ्यावे. (५)

सूर्याकरितां विलंब कळे। गणना सकळांची आकळे।
पळापासून निवळे। युगपरियंत ॥ ६ ॥

सूर्यामुळे आपल्याला काळ कळतो. आपण काळाची गणना एका पळापासून एका युगापर्यंत करू शकतो (६)

पळ घटिका प्रहर दिवस। अहोरात्र पक्ष मास।
शड्मास वरि युगास। ठाव जाला ॥ ७ ॥

पळ, घटिका, प्रहर, दिवस, अहोरात्र, पक्ष, मास, सहा महिने याप्रमाणे आपण युगापर्यंत कालगणना करू शकतो. (७)

क्रेत त्रेत द्वापार कळी। संख्या चालिली भूमंडळीं।
देवांचीं आयुष्यें आगळीं। शास्त्रीं निरोपिलीं ॥ ८ ॥

त्यानंतर कृत, त्रेता, द्वापर आणि कली अशी चार युगे या भूमंडळावर चालत आली आहेत. याखेरीज देवांची आयुष्ये वेगवेगळ्या शास्त्रांत वर्णिली आहेत. (८)

ते देवत्रयाची खटपट। सूक्ष्मरूपें विलगट।
दंडक सांडितां चटपट। लोकांस होते ॥ ९ ॥

त्या तिन्ही देवांची कार्ये सूक्ष्मरूपाने पण जिव्हाळ्याने चाललेली असतात. लोकांनी नीतिनियम मोडले, तर त्यांना पश्चात्तापाची पाळी येते. (९)

मिश्रित त्रिगुण निवडेना। तेणें आद्यंत सृष्टिरचना।
कोण थोर कोण साना। कैसा म्हणावा ॥ १० ॥

तिन्ही गुण एकमेकांत मिसळलेले आहेत. ते वेगळे करता येत नाहीत. आरंभापासून ते शेवटपर्यंत सर्व सृष्टीची रचना त्यांच्यामुळेच झाली आहे. तेथे कोण लहान आणि कोण थोर हे कसे म्हणावे? (१०)

असो हीं जाणत्याचीं कामें। नेणता उगाच गुंते भ्रमें।
प्रत्यये जाणजाणों वर्मे। ठाईं पाडावीं ॥ ११ ॥

असो. ही शहाण्या माणसाची कामे आहेत. अज्ञानी उगाच भ्रमाने गुंतून पडतो. अनुभवाने यांतील रहस्ये जाणून घ्यावीत. (११)

उत्पन्नकाळ सृष्टिकाळ। स्थितिकाळ संव्हारकाळ।
आद्यंत अवघा काळ। विलंबरूपी ॥ १२ ॥

काळाला प्रसंगानुसार निरनिराळी नामे प्राप्त होतात. उत्पन्नकाळ, सृष्टिकाळ, स्थितिकाळ, संहारकाळ इत्यादी. आरंभापासून शेवटपर्यंत काळ हा विलंबरूपच असतो. (१२)

जें जें जये प्रसंगीं जालें। तेथें काळाचें नांव पडिलें।
बरें नसेल अनुमानलें। तरी पुढें ऐका ॥ १३॥

प्रजन्यकाळ शीतकाळ। उष्णकाळ संतोषकाळ।
सुखदु:खआनंदकाळ। प्रत्यये येतो ॥ १४॥

प्रात:काळ माध्यानकाळ। सायंकाळ वसंतकाळ।
पर्वकाळ कठिणकाळ। जाणिजे लोकीं ॥ १५॥

जन्मकाळ बाळत्वकाळ। तारुण्यकाळ वृधाप्यकाळ।
अंतकाळ विषमकाळ। वेळरूपें ॥ १६॥

सुकाळ आणि दुष्काळ। प्रदोषकाळ पुण्यकाळ।
सकळ वेळा मिळोन काळ। तयास म्हणावें ॥ १७॥

असतें येक वाटतें येक। त्याचें नांव हीन विवेक।
नाना प्रवृत्तीचे लोक। प्रवृत्ति जाणती ॥ १८॥

प्रवृत्ति चाले अधोमुखें। निवृत्ति धावे ऊर्धमुखें।
ऊर्धमुखें नाना सुखें। विवेकी जाणती ॥ १९॥

ब्रह्मांडरचना जेथून जाली। तेथें विवेकी दृष्टि घाली।
विवरतां विवरतां लाधली। पूर्वापार स्थिति ॥ २०॥

प्रपंचीं असोन परमार्थ पाहे। तोहि ये स्थितीतें लाहे।
प्रारब्धयोगें करून राहे। लोकांमधें ॥ २१॥

सकळांचें येकचि मूळ। येक जाणते येक बाष्कळ।
विवेकें करून तत्काळ। परलोक साधावा ॥ २२॥

तरीच जन्माचें सार्थक। भले पाहाती उभये लोक।
कारण मुळींचा विवेक। पाहिला पाहिजे ॥ २३॥

विवेकहीन जे जन। ते जाणावे पशुसमान।
त्यांचें ऐकतां भाषण। परलोक कैंचा ॥ २४॥

बरें आमचें काये गेलें। जें केलें तें फळास आलें।
पेरिलें तें उगवलें। भोगिती आतां ॥ २५॥

ज्या ज्या प्रसंगी जे जे घडते, त्या त्यानुसार काळाला नाव पडते. तर्काने जाणता येत नसेल, तर पुढे सांगतो ते ऐका (१३)

पर्जन्यकाळ, शीतकाळ, उष्णकाळ, संतोषकाळ, सुख-दु:ख-आनंदकाळ, यांचा प्रत्यय आपल्याला येतो (१४)

प्रात:काळ, माध्याह्नकाळ, सायंकाळ, वसंतकाळ, पर्वकाळ, कठीण काळ इत्यादी लोक जाणतातच. (१५)

जन्मकाळ, बाल्यकाळ, तारुण्यकाळ, वृद्धापकाळ, अंतकाळ, विषमकाळ हे वेळेनुसार प्राप्त होतात.(१६)

सुकाळ, दुष्काळ, प्रदोषकाळ, पुण्यकाळ या सर्व वेळांना मिळून काळ म्हणावे. (१७)

एक असताना दुसरेच काही वाटते, यास हीन विवेक म्हणतात. नाना प्रवृत्तीचे लोक प्रवृत्तीच जाणतात. (१८)

प्रवृत्ती अधोमुखाकडे म्हणजे अनेकत्वाकडे जाते, तर निवृत्ती ऊर्ध्वमुखाकडे म्हणजे एकत्वाकडे धावते. एकत्वामुळेच नाना सुखे प्राप्त होतात, हे विवेकी लोक जाणतात. (१९)

ज्या निश्चळ परब्रह्मापासून ब्रह्मांडरचना झाली, तेथे विवेकी लोक आपले लक्ष केंद्रित करतात आणि त्याचे अनुसंधान करता करता त्यांना पूर्वापर स्थिती म्हणजे परब्रह्माशी तादात्म्य प्राप्त होते. (२०)

जो कुणी प्रपंचात असून याप्रमाणे परब्रह्माचे निरंतर अनुसंधान करतो, त्यालाही परमार्थाची प्राप्ती तो प्रारब्धाच्या योगाने लोकात राहात असला तरीही होते. (२१)

निर्गुण-निराकार परब्रह्म हेच सर्वांचे मिळून एकच मूळ आहे. काही लोक शहाणे असतात, काही मूर्ख असतात. शहाण्या लोकांनी विवेक करून तत्काळ परलोक साधावा. (२२)

असे केले तरच मनुष्य-जन्माचे सार्थक होते. भले लोक असतात तेच इहलोक आणि परलोक दोन्हींचा विचार करतात. म्हणून विवेकाने मूळ परब्रह्मापर्यंत पोहोचले पाहिजे. (२३)

जे लोक विवेकहीन असतात, ते पशूसमान जाणावेत. त्यांचे भाषण ऐकून त्याप्रमाणे आचरण केल्यास परलोक कुठला? (२४)

माणूस अविवेकीपणाने वागला तर आमचे काय नुकसान होणार आहे. त्याने जे केले असेल त्याचे त्याप्रमाणे फळ त्याला प्राप्त झालेले आहे. जे पेरले असेल, तेच आता उगवले आहे आणि तेच आता त्यांना भोगावे लागत आहे. (२५)

पुढेंहि करी तो पावे। भक्तियोगें भगवंत फावे।
देव भक्त मिळता दुणावें। समाधान ॥ २६ ॥

पुढेही जो जसे करतो त्यास तसे फळ मिळते. म्हणून भक्तियोगाने भगवंताची प्राप्ती करून घ्यावी. देवभक्ताचे मीलन झाले की, समाधान दुपटीने वाढते. (२६)

कीर्ति करून नाहीं मेले। ते उगेच आले आणि गेले।
शाहाणे होऊन भुलले। काये सांगावें ॥ २७ ॥

जे मरणापूर्वी कीर्ती संपादन करीत नाहीत, ते जगात उगाचच येतात आणि जातात. शहाणे असूनही भुलतात, याला काय म्हणावे? (२७)

येथील येथें अवघेंचि राहातें। ऐसें प्रत्ययास येतें।
कोण काये घेऊन जातें। सांगाना कां ॥ २८ ॥

येथील सर्व वस्तू, व्यक्ती येथेच राहातात ही गोष्ट तर नेहमी अनुभवास येते. मरताना कोण काय घेऊन जाते, जरा सांगा तर खरे! (२८)

पदार्थीं असावें उदास। विवेक पाहावा सावकास।
येणेंकरितां जगदीश। अलभ्य लाभे ॥ २९ ॥

म्हणून दृश्य पदार्थाविषयी अनासक्त राहून सावकाश सारासारविवेक करीत असावे, म्हणजे विवेकाच्या योगे जगदीशाचा अलभ्य लाभ होतो. (२९)

जगदीशापरता लाभ नाहीं। कार्याकारण सर्व कांहीं।
संसार करित असतांहि। समाधान ॥ ३० ॥

जगदीशाहून श्रेष्ठ दुसरा लाभ नाही. योगायोगाने सर्व काही होते. या भावनेमुळे संसारही समाधानास कारण होतो. (३०)

मागां होते जनकादिक। राज्य करितांहि अनेक।
तैसेचि आतां पुण्यश्लोक। कित्येक असती ॥ ३१ ॥

पूर्वी जनकादिकांसारखे अनेक राजे राज्य करीत असतानाही मुक्त झाले. त्यांच्यासारखे पुण्यश्लोक आताही अनेक आहेत. (३१)

राजा असतां मृत्य आला। लक्ष कोटी कबुल जाला।
तरी सोडिना तयाला। मृत्य कांहीं ॥ ३२ ॥

एखादा राजा असताना त्याचा मृत्युकाळ आल्यावर त्याने मृत्यूला लक्ष कोटी द्रव्य देण्याचे कबूल केले, तरी काही केल्या मृत्यू त्याला सोडीत नाही. (३२)

ऐसें हें पराधेन जिणें। यामधें दुखणें बाहाणें।
नाना उद्वेग चिंता करणें। किती म्हणोनि ॥ ३३ ॥

असे हे मानवाचे जिणे अत्यंत पराधीन आहे. त्यातच दुखणीबाणी, नाना उद्वेग, नाना चिंता यांनी माणूस त्रस्त होतो. ते किती म्हणून सांगावे ? (३३)

हाट भरला संसाराचा। नफा पाहावा देवाचा।
तरीच या कष्टाचा। परियाये होतो ॥ ३४ ॥

याप्रमाणे हा संसाराचा बाजार भरलेला आहे. यात देवाची प्राप्ती हा नफा कसा मिळेल, ते आधी पाहावे. त्यासाठी कसून प्रयत्न करावेत, तरच सर्व कष्टांचा मोबदला मिळतो. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'काळरूपनाम' समास आठवा समाप्त.**

❑❑

## दशक १२ : समास ९
## येत्नसिकवण

॥ श्रीराम ॥

दुर्बल नाचारी वोडगस्त। आळसी खादाड रिणगस्त।
मूर्खपणें अवघें वेस्त। कांहींच नाहीं ॥ १ ॥

एखादा माणूस दुर्बळ, निराश्रित, ओढगस्तीने जगणारा, आळशी, खादाड, कर्जबाजारी, मूर्खपणाने सर्व प्रकारे अयोग्य वर्तन करणारा, एकही गुण ज्याच्या अंगी नाही असा असतो. (१)

खाया नाहीं जेवाया नाहीं। लेया नाहीं नेसाया नाहीं।
अंथराया नाहीं पांघराया नाहीं। कोंपट नाहीं अभागी ॥ २ ॥

ज्याला धड खायला नाही, जेवायला नाही, काही ल्यायला नाही, नेसायला नाही, अंथरायला नाही, पांघरायला नाही, राहायला खोपट नाही, असा अभागी असतो. (२)

सोयेरे नाहीं धायेरे नाहीं। इष्ट नाहीं मित्र नाहीं।
पाहातां कोठें वोळखी नाहीं। आश्रयेविण परदेसी ॥ ३॥

त्याला सगे नाहीत, सोयरे-धायरे नाहीत. इष्ट-मित्र नाही. त्याची कुणाशी ओळख नाही, असा आश्रयाशिवाय परदेशी माणसासारखा दैन्यवाणा झालेला असतो. (३)

तेणें कैसें करावें। काये जीवेसीं धरावें।
वाचावें किं मरावें। कोण्याप्रकारें ॥ ४॥

त्याने काय करावे? कशा प्रकारे जिवंत राहावे की मरून जावे? करावे तरी काय? (४)

ऐसें कोणीयेकें पुसिलें। कोणीयेकें उत्तर दिधलें।
श्रोतीं सावध ऐकिलें। पाहिजे आतां ॥ ५॥

असे कोणी एकाने विचारले. त्याला जे उत्तर दिले गेले, ते आता श्रोत्यांनी सावध होऊन ऐकले पाहिजे. (५)

ल्हानथोर काम कांहीं। केल्यावेगळें होत नाहीं।
करंट्या सावध पाहीं। सदेव होसी ॥ ६॥

लहान-मोठे कुठलेही काम असो, ते केल्याखेरीज होत नाही. करंट्या माणसाने सावधपणे ही गोष्ट जर जाणून घेतली, तर तोही भाग्यवान होईल. (६)

अंतरीं नाहीं सावधानता। येत्न ठाकेना पुरता।
सुखसंतोषाची वार्ता। तेथें कैंची ॥ ७॥

जेथे अंतरी सावधानता नसते, पूर्ण कसोशीने प्रयत्न केला जात नाही, तेथे सुख-संतोष कसे प्राप्त होणार? (७)

म्हणोन आळस सोडावा। येत्न साक्षेपें जोडावा।
दुश्चितपणाचा मोडावा। थारा बळें ॥ ८॥

म्हणून आळस सोडून चिकाटीने सातत्याने प्रयत्न करावा. मनातील दुश्चित्तपणाचा भाव प्रयत्नपूर्वक मोडावा. (८)

प्रात:काळीं उठत जावें। प्रात:स्मरामि करावें।
नित्य नेमें स्मरावें। पाठांतर ॥ ९॥

नित्य प्रात:काळी उठावे. प्रात:स्मरामि म्हणून भगवंताचे स्मरण करावे. नित्य नेमाने पाठांतर करावे. (९)

मागील उजळणी पुढें पाठ। नेम धरावा निकट।
बाष्कळपणाची वटवट। करूंच नये ॥ १०॥

पूर्वी पाठ केले, त्याची उजळणी करून पुढील पाठांतर करण्याचा नेम निग्रहाने पाळावा. उगीच बाष्कळपणाची वटवट करूच नये. (१०)

दिशेकडे दुरी जावें। सुचिस्मंत होऊन यावें।
येतां कांहीं तरी आणावें। रितें खोटें ॥ ११॥

शौचासाठी दूर कोठेतरी जावे. निर्मळ होऊन यावे. येताना काही ना काही आणावे. रिकाम्या हाताने येणे योग्य नाही. (११)

धूतवस्त्रें घालावीं पिळून। करावें चरणक्षाळण।
देवदर्शन देवार्चन। येथासांग ॥ १२॥

आपण धुऊन आणलेली वस्त्रे पिळून वाळत घालावी. हातपाय स्वच्छ धुऊन देवदर्शन, देवतार्चन यथासांग करावे. (१२)

कांहीं फळाहार घ्यावा। पुढें वेवसाये करावा।
लोक आपला परावा। म्हणत जावा ॥ १३॥

काही फलाहार घेऊन पुढे आपला जो उद्योगधंदा असेल, तो करावा. आपला कोण, परका कोण याप्रमाणे लोकांची पारख करावी. (१३)

सुंदर अक्षर ल्याहावें। पष्ट नेमस्त वाचावें।
विवरविवरों जाणावें। अर्थांतर ॥ १४॥

सुंदर अक्षर लिहावे. स्पष्ट बरोबर वाचावे. अर्थाचे वारंवार विवरण करून तो नीट जाणून घ्यावा. (१४)

नेमस्त नेटकें पुसावें। विशद करून सांगावें।
प्रत्ययेंविण बोलावें। तेंचि पाप ॥ १५॥

कुणाला काही विचारावयाचे असेल, तर नीट, नेमके विचारावे. कुणाला काही सांगायचे असेल तर नीट स्पष्ट करून सांगावे. अनुभवाशिवाय बोलणे हेच पाप होय. (१५)

सावधानता असावी। नीतिमर्यादा राखावी।
जनास माने ऐसी करावी। क्रियासिद्धि ॥ १६॥

वागण्यात सावधानता असावी. नीतिमर्यादा पाळावी आणि लोकांना पटेल अशा प्रकारेच कार्यसिद्धी करावी. (१६)

आलियाचें समाधान। हरिकथा निरूपण।
सर्वदा प्रसंग पाहोन। वर्तत जावें ॥ १७॥

ताळ धाटी मुद्रा शुद्ध । अर्थ प्रमये अन्वये शुद्ध ।
गद्यपद्यें दृष्टांत शुद्ध। अन्वयाचे ॥ १८॥

गाणें वाजविणें नाचणें। हस्तन्यास दाखवणें।
सभारंजकें वचनें। आडकथा छंदबंद ॥ १९॥

बहुतांचें समाधान राखावें। बहुतांस मानेल तें बोलावें।
विल्गा पडों नेदावें। कथेमधें ॥ २०॥

लोकांस उदंड वाजी आणूं नये।लोकांचें उकलावें हृदये।
तरी मग स्वभावें होये। नामघोष ॥ २१॥

भक्ति ज्ञान वैराग्य योग। नाना साधनाचे प्रयोग।
जेणें तुटे भवरोग। मननमात्रें ॥ २२॥

जैसें बोलणें बोलावें। तैसेंचि चालणें चालावें।
मग महंतलीळा स्वभावें। आंगीं बाणे ॥ २३॥

युक्तिवीण साजिरा योग। तो दुराशेचा रोग।
संगतीच्या लोकांचा भोग। उभा ठेला ॥ २४॥

ऐसें न करावें सर्वथा। जनास पावऊं नये वेथा।
हृदईं चिंतावें समर्था। रघुनाथजीसी ॥ २५॥

उदासवृत्तीस मानवे जन। विशेष कथानिरूपण।
रामकथा ब्रह्मांड भेदून। पैलाड न्यावी ॥ २६॥

सांग महंती संगीत गाणें। तेथें वैभवास काय उणें।
नभामाजी तारांगणें। तैसे लोक ॥ २७॥

आकलबंद नाहीं जेथें। अवघेंचि विश्कळित तेथें।
येकें आकलेविण तें। काये आहे ॥ २८॥

घालून अकलेचा पवाड। व्हावें ब्रह्मांडाहून जाड।
तेथें कैचें आणिलें द्वाड। करंटपण ॥ २९॥

येथें आशंका फिटली। बुद्धि येत्नीं प्रवेशली।
कांहींयेक आशा वाढली। अंतःकर्णी ॥ ३०॥

आल्या- गेल्याचे समाधान करावे. नित्य हरिकथा आणि अध्यात्मनिरूपण करीत जावे आणि नेहमी प्रसंग पाहून यथायोग्य आचारण करावे. (१७)

ताल, धाटी, शुद्ध मुद्रा, अर्थ प्रमेये, शुद्ध अन्वय, गद्य, पद्य, उत्तम दृष्टांत, अन्वय, गाणे, वाजविणे, नाचणे, हाताने हावभाव करणे, सभेस रंजक वाटतील अशी वचने सांगणे, आडकथा, छंद, बंध इत्यादी सर्वांचा समयोचित उपयोग हरिकथेत करावा. अनेकांचे समाधान होईल आणि सर्वांना पटेल असेच बोलावे. कथेमध्ये विसंगती येऊ देऊ नये. (१८-२०)

लोकांना फार जिकिरीस आणू नये. लोकांचे अंत:करण प्रसन्न होईल, असे बोलावे. म्हणजे मग स्वाभाविकच लोक आनंदाने नामघोष करतात. (२१)

भक्ती, ज्ञान, वैराग्य, योग, नाना प्रकाराची साधने याचे असे विवरण करावे की, श्रोत्यांनी ते मनन केले असता तेवढ्यानेही त्यांचा भवरोग नष्ट व्हावा (२२)

आपण जसे बोलतो तसेच आपले वागणेही असावे. म्हणजे महंताचे चारित्र्य सहजच अंगी बाणते. (२३)

महंतीचा योग येणे उत्तम हे खरे, पण योग्य गुण अंगी नसतील तर तो दुराशेचा रोग ठरतो आणि संगतीत असणाऱ्या लोकांचा जणू भोगच उभा राहतो. (२४)

म्हणून अशा प्रकारे कधीही वागू नये. लोकांना दु:ख होईल असे कधी करू नये. हृदयात नेहमी समर्थ अशा रघुनाथाचे स्मरण करावे. (२५)

अनासक्त वृत्ती लोकांना मानवते. कथानिरूपण अशा उत्तम प्रकारे करावे की, रामकथा ब्रह्मांड भेदून त्याच्याही पलीकडे न्यावी. (२६)

जेथे उत्तम गुणांनी युक्त महंतपणा असेल, संगीत असेल, गाणे असेल, तेथे वैभवास काय उणे पडणार आहे! आकाशात असंख्य तारे चंद्राभोवती असतात, त्याप्रमाणे त्याच्याभोवती लोक गर्दी करून सोडतात. (२७)

जेथे अक्कलहुशारी नसेल तेथे सर्वच विस्कळित होऊन जाते. एका अक्कलहुशारीशिवाय काय आहे? (२८)

म्हणून अक्कलहुशारीच्या सामर्थ्याने ब्रह्मांडाहून श्रेष्ठ व्हावे. मग तेथे द्वाड अभागीपण कसे राहील? (२९)

येथे श्रोत्यांची शंका फिटली. बुद्धीला प्रयत्नाचे महत्त्व कळले आणि म्हणून अंत:करणात आशा वाढली. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'येत्नसिकवणनाम' समास नववा समाप्त.

❑ ❑

## दशक १२ : समास १०

### उत्तमपुरुष

॥ श्रीराम ॥

आपण येथेष्ट जेवणें। उरलें तें अन्न वाटणें।
परंतु वाया दवडणें। हा धर्म नव्हे ॥ १॥

आपण पोटभर जेवल्यावर जे अन्न उरेल ते वाटावे. ते वाया घालवणे हा काही धर्म नव्हे. (१)

तैसें ज्ञानें तृप्त व्हावें। तेंचि ज्ञान जनास सांगावें।
तरतेन बुडों नेदावें। बुडतयासी ॥ २॥

त्याप्रमाणे ज्ञानाने आपण तृप्त व्हावे आणि तेच ज्ञान लोकांना सांगावे. ज्याला पोहायला येत असेल, त्याने इतरांना बुडू देऊ नये. (२)

उत्तम गुण स्वयें घ्यावे। ते बहुतांस सांगावे।
वर्तल्याविण बोलावे। ते शब्द मिथ्या ॥ ३॥

स्वत: उत्तम गुण घ्यावेत आणि मग ते इतरांना सांगावेत. स्वत: आचरण केल्याशिवाय बोलणे म्हणजे खोटे बोलण्यासारखेच आहे. (३)

स्नान संध्या देवार्चन। येकाग्र करावें जपध्यान।
हरिकथा निरूपण। केलें पाहिजे ॥ ४॥

स्नान, संध्या, देवार्चन, एकाग्र मनाने जप आणि ध्यान, तसेच हरिकथा आणि अध्यात्मनिरूपण हे केलेच पाहिजे. (४)

शरीर परोपकारीं लावावें। बहुतांच्या कार्यास यावें।
उणें पडों नेदावें। कोणियेकाचें ॥ ५॥

आपले शरीर परोपकारासाठी झिजवावे. अनेकांच्या उपयोगी पडावे. कुणाचेही उणे पडू देऊ नये. (५)

आडलें जाकसलें जाणावें। यथानशक्ति कामास यावें।
मृदवचनें बोलत जावें। कोणीयेकासी ॥ ६॥

कुणी अडले असेल, गांजलेले असेल, तर ते जाणून घ्यावे आणि त्याला आपल्या शक्तीनुसार मदत करावी. कुणाशीही मृदु वचनांनी बोलावे. (६)

दुसऱ्याच्या दु:खें दु:खवावें। परसंतोषें सुखी व्हावें।
प्राणीमात्रास मेळऊन घ्यावें। बऱ्या शब्दें ॥ ७॥

दुसऱ्याच्या दु:खाने दु:खी व्हावे, लोकांच्या संतोषाने सुखी व्हावे, गोड शब्दाने प्राणिमात्रांना आपलेसे करून घ्यावे. (७)

बहुतांचे अन्याये क्षमावे। बहुतांचे कार्यभाग करावे।
आपल्यापरीस व्हावे। पारखे जन ॥ ८॥

अनेकांच्या अन्यायाची त्यांना क्षमा करावी. अनेकांच्या कार्यात त्यांना मदत करावी. परके लोक असतील त्यांना आपल्या बाजूचे करून घ्यावे. (८)

दुसऱ्यांचें अंतर जाणावें। तदनुसारचि वर्तावें।
लोकांस परीक्षित जावें। नाना प्रकारें ॥ ९॥

दुसऱ्यांच्या अंतरंगातील विचार जाणून त्यानुसार त्यांच्याशी वागावे. नाना प्रकारे लोकांची परीक्षा करीत असावे. (९)

नेमकचि बोलावें। तत्काळचि प्रतिवचन द्यावें।
कदापी रागास न यावें। क्षमारूपें ॥ १०॥

मोजकेच बोलावे. कुणी काही विचारले, तर तात्काळ त्यास प्रत्युत्तर द्यावे. कधीही कुणावर रागावू नये. सर्वांना क्षमा करावी (१०)

आलस्य अवघाच दवडावा। येत्न उदंडचि करावा।
शब्दमत्सर न करावा। कोणीयेकाचा ॥ ११॥

आळस पूर्णपणे झटकून टाकावा. उदंड प्रयत्न करीत राहावे. दुसऱ्या कुणी बोललेला एखादा शब्द धरून त्यावर वितंडवाद कधी घालू नये. (११)

उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा। शब्द निवडून बोलावा।
सावधपणें करीत जावा। संसार आपला ॥ १२॥

उत्तम पदार्थ असेल, तो दुसऱ्यास द्यावा. शब्द विचारपूर्वक बोलावा. आपला संसार दक्षतेने करीत जावा. (१२)

मरणाचें स्मरण असावें। हरिभक्तीस सादर व्हावें।
मरोन कीर्तीस उरवावें। येणें प्रकारें ॥ १३॥

मरणाचे नेहमी स्मरण ठेवावे आणि हरिभक्तीस सादर असावे. याप्रकारे वागून मेल्यावरही कीर्तिरूपे उरावे (१३)

नेमकेपणें वर्तों लागला। तो बहुतांस कळों आला।
सर्व आर्जवी तयाला। काये उणें ॥ १४॥

याप्रमाणे उत्तम गुणाने युक्त असे त्याचे नेमस्त वागणे पाहून अनेक लोकांत तो प्रसिद्धी पावतो. मग सर्व लोक त्याच्याशी प्रेमाने वागू लागतात. मग त्याला काहीच उणे पडत नाही. (१४)

ऐसा उत्तम गुणी विशेष। तयास म्हणावें पुरुष।
जयाच्या भजनें जगदीश। तृप्त होये ॥ १५॥

अशा विशेष उत्तम गुणांनी जो संपन्न असतो, त्यालाच माणूस म्हणावे. त्याने केलेल्या भजनाने जगदीश प्रसन्न होतो. (१५)

उदंड धि:कारून बोलती। तरी चळों नेदावी शांती।
दुर्जनास मिळोन जाती। धन्य ते साधु ॥ १६॥

लोक जरी खूप धिक्कारून बोलले, तरी आपली शांती कधी ढळू देऊ नये. जे दुर्जनांनाही आपलेसे करतात, ते साधू धन्य होत. (१६)

उत्तम गुणी शृंघारला। ज्ञानवैराग्यें शोभला।
तोचि येक जाणावा भला। भूमंडळीं ॥ १७॥

उत्तम गुणांनी जो शृंगारलेला असतो, ज्ञान आणि वैराग्याने जो शोभत असतो, तोच एक या भूमंडळावर उत्तम म्हणून जाणावा. (१७)

स्वयें आपण कष्टावें। बहुतांचें सोसित जावें।
झिजोन कीर्तीस उरवावें। नाना प्रकारें ॥ १८॥

आपण स्वत: कष्ट करावेत. अनेकांचे वागणे, बोलणे सोशीत असावे आणि नाना प्रकारांनी झिजून आपली कीर्ती उरवावी. (१८)

कीर्ती पाहों जाता सुख नाहीं। सुख पाहातां कीर्ती नाहीं।
विचारेंविण कोठेंचि नाहीं। समाधान ॥ १९॥

कीर्ती हवी असेल, तर सुखाची अपेक्षा करू नये. सुखाची लालसा असेल, तर कीर्ती मिळणार नाही. विचाराशिवाय प्रपंच वा परमार्थ कोठेच समाधान मिळणार नाही. (१९)

परांतरास न लावावा ढका। कदापि पडों नेदावा चुका।
क्षमासीळ तयाच्या तुका। ह्मनी नाहीं ॥ २०॥

लोकांचे अंत:करण कधी दुखवू नये. यात कधीही चूक होऊ देऊ नये. जो क्षमाशील असतो, त्याच्या महत्त्वाची कधी हानी होत नाही. (२०)

आपलें अथवा परावें। कार्य अवघेंच करावें।
प्रसंगीं कामास चुकवावें। हें विहित नव्हे ॥ २१॥

आपले असो, दुसऱ्याचे असो, उत्तम कार्य नेहमी करीतच असावे. प्रसंगी कामचुकारपणा करणे हे कधीही योग्य नाही. (२१)

बरें बोलतां सुख वाटतें। हें तों प्रत्यक्ष कळतें।
आत्मवत परावें तें। मानीत जावें ॥ २२॥

चांगले गोड बोलल्यामुळे सुख वाटते, हे तर अनुभवाने प्रत्यक्ष कळतेच. म्हणून लोकांना स्वत:सारखेच मानीत जावे. (२२)

कठिण शब्दें वाईट वाटतें। हें तों प्रत्ययास येतें।
तरी मग वाईट बोलावें तें। काये निमित्य ॥ २३॥

कुणी कठोर शब्द बोलले की, वाईट वाटते, असा तर अनुभव येतच असतो. तर मग दुसऱ्याला तरी का वाईट बोलावे? (२३)

आपणास चिमोटा घेतला। तेणें कासाविस जाला।
आपणावरून दुसऱ्याला। राखत जावें ॥ २४॥

आपल्याला कुणी चिमोटा घेतला, तर आपला जीव कासावीस होतो. म्हणून आपल्यावरून लोकांच्या दु:खाची कल्पना करून त्यांना दु:ख न होईल असे वागावे. त्यांना प्रसन्न राखावे. (२४)

जे दुसऱ्यास दु:ख करी। ते अपवित्र वैखरी।
आपणास घात करी। कोणियेके प्रसंगीं ॥ २५॥

जी दुसऱ्याला दु:ख देते, ती वैखरी वाणी अपवित्र होय. ती वेळप्रसंगी आपल्याच घातास कारण ठरते. (२५)

पेरिलें ते उगवतें। बोलण्यासारिखें उत्तर येतें।
तरी मग कर्कश बोलावें तें। काये निमित्य ॥ २६॥

जे पेरावे तेच उगवून येते. आपण जसे बोलू, तसेच उत्तर आपल्याला मिळते. मग कुठल्या कारणाने कर्कश बोलावे बरे ? (२६)

आपल्या पुरुषार्थवैभवें। बहुतांस सुखी करावें।
परंतु कष्टी करावें। हे राक्षेसी क्रिया ॥ २७॥

आपल्या पराक्रमाने, वैभवाने अनेकांना सुखी करावे. त्याच्यायोगे दुसऱ्यास दु:खी करणे ही राक्षसी क्रिया होय. (२७)

दंभ दर्प अभिमान। क्रोध आणी कठिण वचन।
हें अज्ञानाचें लक्षण। भगवद्गीतेंत बोलिलें ॥ २८॥

दंभ, दर्प, अभिमान, क्रोध आणि कठोर वचन ही अज्ञानाची लक्षणे आहेत, असे भगवद्गीतेत म्हटले आहे. (२८)

जो उत्तम गुणें शोभला। तोचि पुरुष माहांभला।
कित्तेक लोक तयाला। शोधीत फिरती ॥ २९॥

जो उत्तम गुणांनी शोभत असतो, तोच महापुरुष जाणावा. कित्येक लोक त्याला शोधत फिरतात. (२९)

क्रियेविण शब्दज्ञान। तेंचि स्वानाचें वमन।
भले तेथें अवलोकन। कदापी न करिती ॥ ३०॥

क्रियेशिवाय नुसते शब्दज्ञान हे कुत्र्याच्या ओकासारखे असते. चांगले लोक कधीही तिकडे बघतही नाहीत. (३०)

मनापासून भक्ति करणें। उत्तम गुण अगत्य धरणें।
तया माहांपुरुषाकारणें। धुंडीत येती ॥ ३१॥

जो मनापासून भक्ती करतो आणि अगत्याने उत्तम गुण धारण करतो, त्या महापुरुषाला लोक शोधत येतात. (३१)

ऐसा जो माहानुभाव। तेणें करावा समुदाव।
भक्तियोगें देवाधिदेव। आपुला करावा ॥ ३२॥

असा जो कुणी साक्षात्कारी महापुरुष असेल त्याने लोकसंग्रह करावा आणि भक्तीच्या योगे देवाधिदेव आपलासा करावा. (३२)

आपण आवचितें मरोन जावें। मग भजन कोणें करावें।
याकारणें भजनास लावावे। बहुत लोक ॥ ३३॥

समजा, आपण अवचित मरून गेलो, तर मग भजन कोण करील? असा विचार करून त्याने अनेक लोकांना भगवद्भक्ती करण्यास लावावे. (३३)

आमची प्रतिज्ञा ऐसी। कांहीं न मागावें शिष्यासी।
आपणामागें जगदीशासी। भजत जावें ॥ ३४॥

आमची प्रतिज्ञा अशी आहे की शिष्यापाशी काहीही मागू नये; पण एवढे जरूर मागावे की त्यांनी आपल्या मागे जगदीशास भजत जावे. (३४)

याकारणें समुदाव। जाला पाहिजे मोहोछाव।
हातोपातीं देवाधिदेव। वोळेसा करावा ॥ ३५॥

हे व्हावे म्हणून समुदाय एकत्रित करण्यासाठी महोत्सव करावेत आणि सहजासहजी देवाधिदेव प्रसन्न होईल असे करावे. (३५)

आता समुदायाकारणें। पाहिजेती दोनी लक्षणें।
श्रोतीं येथें सावधपणें। मन घालावें ॥ ३६॥

आता लोकसंग्रह व्हावा म्हणून महंताच्या अंगी पुढील दोन लक्षणे असणे आवश्यक आहे. श्रोत्यांनी मन एकाग्र करून सावधपणे ती ऐकावीत. (३६)

जेणें बहुतांस घडे भक्ति। ते हे रोकडी प्रबोधशक्ति।
बहुतांचें मनोगत हातीं। घेतलें पाहिजे ॥ ३७॥

ज्या योगाने अनेकांकडून भक्ती घडेल अशा रीतीने प्रबोधनशक्ती म्हणजे विषय नीट समजावून सांगता येईल, असे वक्तृत्व हवे आणि अनेकांचे अंत:करण जिंकता आले पाहिजे. (३७)

मागां बोलिले उत्तम गुण। तयास मानिती प्रमाण।
प्रबोधशक्तीचें लक्षण। पुढें चालें ॥ ३८॥

यापूर्वी जे उत्तम गुण सांगितले ते अंगी असणे आवश्यक आहे. ते ज्याच्या अंगी दिसून येतात त्याचे बोलणे लोक प्रमाण मानतात व त्याच्या प्रबोधनशक्तीने लोक प्रेरित होऊन कार्य करू लागतात. (३८)

बोलण्यासारिखें चालणें। स्वयें करून बोलणें।
तयाचीं वचनें प्रमाणें। मानिती जनीं ॥ ३९॥

जो बोलण्याप्रमाणेच स्वत: वागतो आणि आधी स्वत: करून मग बोलून दुसऱ्यास उपदेश करतो त्याची वचने लोक प्रमाण मानतात. (३९)

जें जें जनास मानेना। तें तें जनहि मानीना।
आपण येकला जन नाना। सृष्टिमधें ॥ ४०॥

जे जे लोकांना पटत नाही ते ते लोक मानत नाहीत, ऐकून घेत नाहीत. आपण एकटे असतो आणि जगात लोक अनेक असतात. (४०)

**म्हणोन सांगाती असावे। मानत मानत शिकवावे।**
**हळुहळु सेवटा न्यावे। विवेकानें ॥ ४१ ॥**

म्हणून लोकांना बरोबर घेऊन कार्य करावे, हळूहळू समजावत त्यांच्या कलाने घेऊन त्यांना शिकवावे आणि विवेकाने हळूहळू त्यांना शेवटच्या पायरीपर्यंत न्यावे. (४१)

**परंतु हे विवेकाचीं कामें। विवेकी करील नेमें।**
**इतर ते बापुडे भ्रमें। भांडोंच लागले ॥ ४२ ॥**

परंतु याप्रमाणे युक्तीने लोकसंग्रह करणे हे विवेकी पुरुषाचे काम आहे. त्यालाच ते जमते. इतर लोक बापडे भ्रमाने एकमेकांत भांडूच लागतात. (४२)

**बहुतांसी भांडतां येकला। शैन्यावांचून पुरवला।**
**याकारणें बहुतांला। राजी राखावें ॥ ४३ ॥**

सेनापती ज्याप्रमाणे सैन्याशिवाय एकटा काहीच करू शकत नाही, त्याप्रमाणे सर्वांशी जो भांडतो तो एकाकी पडतो व काहीच कार्य करू शकत नाही. म्हणून उत्तम पुरुषाने अनेक लोकांना राजी राखावे. (४३)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उत्तमपुरुषनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.**

❑ ❑

# दशक तेरावा : नामरूप

## दशक १३ : समास १

### आत्मानात्मविवेक

॥ श्रीराम ॥

**आत्मानात्मविवेक करावा। करून बरा विवरावा।**
**विवरोन सदृढ धरावा। जीवामध्यें ॥ १ ॥**

माणसाने आत्मानात्मविवेक करावा. त्याचे वारंवार विवरण, चिंतन, मनन, निदिध्यासन करावे आणि तो आपल्या अंत:करणामध्ये दृढपणे धारण करावा. (१)

**आत्मा कोण अनात्मा कोण। त्याचें करावें विवरण।**
**तेंचि आतां निरूपण। सावध ऐका ॥ २ ॥**

आत्मा कोण, अनात्मा कोण याचे विवरण करावे. ते कसे करावे, यासंबंधीचे निरूपण श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावे. (२)

**च्यारि खाणी च्यारि वाणी। चौऱ्यासि लक्ष जीवप्राणी।**
**संख्या बोलिली पुराणीं। वर्तती आतां ॥ ३ ॥**

चार खाणी, चार वाणी यांसह चौऱ्यांशी लक्ष जीव योनीतील असंख्य जीव या पृथ्वीतलावर वावरत आहेत, असे पुराणात वर्णिले आहे. (३)

**नाना प्रकारीचीं शरीरें। सृष्टींत दिसती अपारें।**
**तयामधें निर्धारे। आत्मा कवणु ॥ ४ ॥**

याप्रमाणे या सृष्टीमध्ये नाना प्रकारची अपार शरीरे आहेत. त्यांमध्ये आत्मा कोण हा निर्धार केला पाहिजे. (४)

**दृष्टीमधें पाहातो। श्रवणामध्यें ऐकतो।**
**रसनेमध्यें स्वाद घेतो। प्रत्यक्ष आतां ॥ ५ ॥**

जो डोळ्यांमध्ये राहून पाहातो, कानांच्या द्वारे ऐकतो, जिभेच्या द्वारे स्वाद घेतो, हे आपल्याला प्रत्यक्ष अनुभवास येते. (५)

**घ्राणामधें वास घेतो। सर्वांगीं तो स्पर्शतो।**
**वाचेमधें बोलवितो। जाणोनि शब्द ॥ ६ ॥**

नाकाने जो वास घेतो, सर्वांगाने जो स्पर्श करतो, शब्द जाणून जो वाचेच्या द्वारे बोलवितो. (६)

**सावधान आणि चंचळ। चहूंकडे चळवळ।**
**एकलाचि चालवी सकळ। इंद्रियेंद्वारा ॥ ७ ॥**

असा सावधान असूनही जो चंचल असतो आणि चहूकडे जो एकला एक इंद्रियद्वारा सर्व चलनवलन करवितो, (७)

**पाये चालवी हात हालवी। भृकुटी पालवी डोळा घालवी।**
**संकेतखुणा बोलवी। तोचि आत्मा ॥ ८ ॥**

पायांनी चालवतो, हात हालवतो, भुवया ताणतो, डोळे मिचकावतो, संकेताने खुणा करतो तोच आत्मा होय. (८)

**धिटाई लाजवी खाजवी। खोंकवी वोकवी थुंकवी।**
**अन्न जेऊन उदक सेववी। तोचि आत्मा ॥ ९ ॥**

जो धीट होतो, लाजतो, खाजवतो, खोकतो, ओकतो, थुंकवतो, अन्न जेवून जो पाणी पितो, तो आत्माच जाणावा. (९)

**मळमूत्रत्याग करी। शरीरमात्र सावरी।**
**प्रवृत्ति निवृत्ति विवरी। तोचि आत्मा ॥ १० ॥**

जो मळमूत्र त्याग करतो, शरीरमात्राचे रक्षण करतो, प्रवृत्ती-निवृत्ती म्हणजे काय याचे विवरण करतो, तो आत्माच होय. (१०)

**ऐके देखे हुंगे चाखे। नाना प्रकारें वोळखे।**
**संतोष पावे आणी धाके। तोचि आत्मा ॥ ११ ॥**

जो ऐकतो, पाहतो, हुंगतो, चाखतो, नाना प्रकारे पदार्थ ओळखतो, कधी संतोष पावतो, तर कधी भितो, तो आत्माच जाणावा. (११)

आनंद विनोद उदेग चिंता। काया छ्याया माया ममता।
जीवित्वें पावे नाना वेथा। तोचि आत्मा ॥ १२॥

आनंद, विनोद, उद्वेग, चिंता, कायाछाया म्हणजेच बुद्ध्यवच्छिन्न प्रतिबिंब म्हणजेच जीवपणा, तसेच माया-ममता अशा नाना व्यथा जो जीवित्वामुळे म्हणजे लघुत्व, कर्तेपणा, मीपणा यांच्यामुळे भोगतो, तोही आत्माच जाणावा. (१२)

पदार्थाची आस्था धरी। जनीं वाईट बरें करी।
आपल्यां राखे पराव्यां मारी। तोचि आत्मा ॥ १३॥

पदार्थाविषयी आसक्ती धरतो, जगात बरे अथवा वाईट करतो, आपले असतील त्यांचा सांभाळ करतो, परके असतील त्यांना मारतो, तो आत्माच जाणावा. (१३)

युद्धे होतां दोहिंकडे। नाना शरीरीं वावडे।
परस्परें पाडी पडे। तोचि आत्मा ॥ १४॥

ज्या वेळी एखादे युद्ध सुरू होते, तेव्हा दोन्ही बाजूकडे अनेक शरीरांत आत्माच वावरतो. तोच परस्परांना पाडतो आणि स्वत: पडतोही. (१४)

तो येतो जातो देहीं वर्ततो। हासतो रडतो प्रस्तावतो।
समर्थ करंटा होतो। व्यापासारिखा ॥ १५॥

तो आत्मा देहात येतो, देहातून जातो, देहात राहून तोच सर्व क्रिया करतो. तोच हसतो, रडतो, पस्तावतो. ज्याप्रमाणे व्याप असेल, त्याप्रमाणे समर्थ अथवा भाग्यहीनही तोच बनतो. (१५)

होतो लंडी होतो बळकट। होतो विद्यावंत होतो धट।
न्यायेवंत होतो उत्धट। तोचि आत्मा ॥ १६॥

तोच भ्याड होतो, बळकट होतो, विद्यावंत होतो अथवा दांडगट होतो. कधी न्यायवंत तर कधी उद्धट होतो, तो आत्माच जाणावा. (१६)

धीर उदार आणि कृपण। वेडा आणि विचक्षण।
उछक आणि सहिष्णु। तोचि आत्मा ॥ १७॥

धीर, उदार अथवा कंजूष, वेडा अथवा चतुर, उच्छृंखल आणि सहनशीलही आत्माच होतो. (१७)

विद्या कुविद्या दोहिंकडे। आनंदरूप वावडे।
जेथें तेथें सर्वांकडे। तोचि आत्मा ॥ १८॥

विद्या अथवा कुविद्या दोन्हीकडे आनंदरूपाने तोच वावरतो. जेथे तेथे सर्वत्र तो आत्माच सर्व काही होतो. (१८)

निजे उठे बैसे चाले। धांवे धावडी डोले तोले।
मोइरे धायेरे केले। तोचि आत्मा ॥ १९॥

जो निजतो, उठतो, बसतो किंवा चालतो, धावतो, लगबग करतो, डोलतो, तोलतो, सोयरे वा धायरे करतो, तोही आत्माच होय. (१९)

पोथी वाची अर्थ सांगे। ताळ धरी गाऊं लागे।
वादविवाद वाउगे। तोचि आत्मा ॥ २०॥

जो पोथी वाचतो, अर्थ सांगतो, ताल धरतो, गाऊ लागतो, उगीचच वादविवाद करतो, तो आत्मा असे जाणावे. (२०)

आत्मा नस्तां देहांतरीं। मग तें प्रेत सचराचरीं।
देहसंगें आत्मा करी। सर्व कांहीं ॥ २१॥

जर देहात आत्मा नसेल, तर तो देह चराचरात प्रेत बनते. देहाच्या संगतीनेच आत्मा सर्व काही करीत असतो. (२१)

येकेंविण येक काये। कामा नये वायां जाये।
ह्मणोनि हा उपाये। देहयोगें ॥ २२॥

देह अनित्य आत्मा नित्य। हाचि विवेक नित्यानित्य।
अवघें सूक्ष्माचें कृत्य। जाणती ज्ञानी ॥ २३॥

एका-शिवाय दुसऱ्याचा काहीही उपयोग नाही. वाया जातो. म्हणून देहामुळेच आत्मा उपयुक्त ठरतो. देह अनित्य आहे, तर आत्मा हा नित्य आहे, असा विवेक करणे यालाच नित्यानित्यविवेक म्हणतात. हा विवेक करण्याचे काम फार सूक्ष्म आहे. (२२-२३)

**पिंडीं देहधर्ता जीव। ब्रह्मांडीं देहधर्ता शिव।**
**ईश्वरतनुचतुष्टये सर्व। ईश्वर धर्ता ॥ २४॥**

पिंडाच्या ठिकाणी देह धारण करणारास जीव म्हणतात तर, ब्रह्मांडात देह धारण करणारा शिव होय. ब्रह्मांडातील विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत आणि मूलप्रकृती हे सर्व चार देह ईश्वर धारण करतो. (२४)

**त्रिगुणापर्ता जो ईश्वर। अर्धनारीनटेश्वर।**
**सकळ सृष्टीचा विचार। तेथून जाला ॥ २५॥**

त्रिगुणातीत जो ईश्वर म्हणजेच मूळमाया होय. यालाच अर्धनारीनटेश्वर म्हणतात. त्याच्यापासूनच सर्व सृष्टीचा विस्तार झाला आहे. (२५)

**बरवें विचारून पाहीं। स्त्री पुरुष तेथें नाहीं।**
**चंचळरूप येतें कांहीं। प्रत्ययासी ॥ २६॥**

नीट विचार करून पाहिले असता तेथे स्त्री-पुरुष असे काहीही नाही. फक्त चंचलत्व म्हणजे वायूच्या रूपाचा अनुभव तेवढा येतो. (२६)

**मुळीहून सेवटवरी। ब्रह्मादि पिप्लीका देहधारी।**
**नित्यानित्यविवेक चतुरीं। जाणिजे ऐसा ॥ २७॥**

मुळापासून शेवटापर्यंत ब्रह्मादिकांपासून मुंगीपर्यंत सर्व देहधारी आहेत. असा हा नित्यानित्यविवेक चतुर पुरुषांनी जाणून घ्यावा. (२७)

**जड तितुकें अनित्य। आणि सूक्ष्म तितुकें नित्य।**
**याहिमध्यें नित्यानित्य। पुढें निरोपिलें ॥२८॥**

जड तितके अनित्य आणि सूक्ष्म तितके नित्य, याहीपेक्षा अधिक सखोल विचार पुढे केला जाईल. (२८)

**स्थूळ सूक्ष्म वोलांडिलें। कारण माहाकारण सांडिलें।**
**विराट हिरण्यगर्भ खंडिलें। विवेकानें ॥ २९॥**

**अव्याकृत मूळप्रकृती। तेथें जाऊन बैसली वृत्ती।**
**ते वृत्ति व्हावया निवृत्ति। निरूपण ऐका ॥ ३०॥**

स्थूल, सूक्ष्म ओलांडून जावे, कारण महाकारण देहाचा त्याग केला आणि विवेकाने विराट आणि हिरण्यगर्भाचे खंडण केले की, अव्याकृत जी मूळ प्रकृती तेथे वृत्ती स्थिर होते. ती वृत्ती जाऊन वृत्तिरहित स्थिती होण्यासाठी पुढील निरूपण ऐकावे. (२९-३०)

**आत्मानात्माविवेक बोलिला। चंचळात्मा प्रत्यया आला।**
**पुढिले समासीं निरोपिला। सारासार विचार ॥ ३१॥**

या समासात आत्मानात्मविचार सांगितला. आणि चंचलात्मा अनुभवास आला आहे. पुढील समासात सारासारविचार स्पष्ट करून सांगितला आहे. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मानात्मविवेकनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक १३ : समास २

## सारासारनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ऐका सारासार विचार। उभारलें जगडंबर।**
**त्यांत कोण सार कोण असार। विवेकें वोळखा ॥ १॥**

आता सारासारविचार म्हणजे काय ते ऐका. हा विश्वाचा जो अफाट पसारा आहे, त्यात सार कोणते आणि असार कोणते हे विवेकाने ओळखावे. (१)

**दिसेल तें नासेल। आणि येईल तें जाईल।**
**जें असतचि असेल। तेंचि सार ॥ २॥**

जे दिसते ते नाश पावते. जे येते ते जाते. जे नेहमी जसेच्या तसे राहाते तेच सार होय. (२)

मागां आत्मनात्माविवेक बोलिला। अनात्मा वोळखोन सांडिला।
आत्मा जाणतां लागला। मुळींचा मूळतंतु ॥ ३ ॥

मागे आत्मानात्मविवेकासंबंधी बोलणे झाले आहे. अनात्मा कोण हे ओळखून त्याचा त्याग केला. आत्मा कोण हे विवरण करीत असता मूळमायेच्या आरंभापर्यंत धागा हाती आला. (३)

मुळीं जे राहिली वृत्ति। जाली पाहिजे निवृत्ति।
सारासार विचार श्रोतीं। बरा पाहावा ॥ ४ ॥

मूळ मायेच्या ठिकाणी जी वृत्ती शिल्लक असते, तीही जाऊन वृत्तिरहित झाले पाहिजे. यासाठी श्रोत्यांनी सारासारविवेक चांगल्या प्रकारे करावा. (४)

नित्यानित्य विवेक केला। आत्मा नित्यसा निवडिला।
निवृत्तिरूपें हेत उरला। निराकारीं ॥ ५ ॥

नित्यानित्यविवेक केल्यावर आत्मा नित्य आहे, अशी निवड केली. पण चंचल आत्म्याला पाहिल्यावर निराकाराबद्दलची आशा अजून शिल्लक राहिली. (५)

हेत म्हणिजे तो चंचळ। निर्गुण म्हणिजे निश्चळ।
सारासारविचारें चंचळ। होऊन जातें ॥ ६ ॥

आशा ही चंचळ असते. निर्गुण परब्रह्म हे निश्चळ असते. सारासारविचाराने ते चंचल होते आणि नष्ट होते. (६)

चळे म्हणोनि ते चंचळ। न चळे म्हणोनि निश्चळ।
निश्चळीं उडे चंचळ। निश्चयेसीं ॥ ७ ॥

चळते म्हणूनच त्यास चंचळ म्हणतात आणि चळत नाही म्हणून आत्म्यास निश्चळ म्हणतात. निश्चळाच्या ठिकाणी चंचळ नष्ट होते, हे निश्चयपूर्वक जाणून घ्यावे. (७)

ज्ञान आणि उपासना। दोनी येकचि पाहाना।
उपासनेकरितां जना। जगोद्धार ॥ ८ ॥

ज्ञान आणि उपासना दोन्ही एकच आहेत. पण उपासनेच्या योगानेच जगाचा उद्धार होतो. (८)

द्रष्टा साक्षी जाणता। ज्ञानघन चैतन्यसत्ता।
ज्ञान देवचि तत्वतां। बरें पाहा ॥ ९ ॥

द्रष्टा, साक्षी, जाणता, ज्ञानघन, चैतन्यसत्ता, ज्ञान, देव ही सर्व एकाच अंतरात्म्याची नावे आहेत, हे समजून घ्यावे. (९)

त्या ज्ञानाचें विज्ञान होतें। शोधून पाहा बहुत मतें।
चंचळ अवघें नासतें। येणें प्रकारें ॥ १० ॥

त्या ज्ञानाचेच पुढे विज्ञान होते. निरनिराळ्या मतांचा शोध घेतला, तर जे चंचळ असते ते नष्ट होते, असेच सर्वांचे मत असल्याचे दिसून येते. (१०)

नासिवंत नासेल किं नासेना। ऐसा अनुमानचि आहे मना।
तरी तो पुरुष सहसा ज्ञाना। अधिकारी नव्हे ॥ ११ ॥

ज्या पुरुषाच्या मनात जे नाशिवंत आहे, ते नाश पावेल की नाही, अशा प्रकारचा संशय असतो, तो पुरुष सहसा ज्ञानाधिकारी नसतो. (११)

नित्य निश्चये केला। संदेह उरतचि गेला।
तरी तो जाणावा वाहावला। माहा मृगजळीं ॥ १२ ॥

नित्य निश्चय तर करीत असतो, पण एकीकडे मनातील संदेहही नष्ट होत नाही, असे ज्याच्या बाबतीत घडते, तो मायेच्या महामृगजळात वाहात गेला म्हणून समजावे. (१२)

क्षयेचि नाहीं जो अक्षई। व्यापकपणें सर्वां ठाईं।
तेथें हेत संदेह नाहीं। निर्विकारीं ॥ १३ ॥

ज्याला क्षयच नाही असे अक्षय परब्रह्म सर्वांच्या ठायी व्यापकपणे ओतप्रोत भरून राहिलेले असते. त्या निर्विकार परब्रह्माच्या ठिकाणी हेतू अथवा संदेह हे विकार असूच शकत नाहीत. (१३)

जें उदंड घनदाट। आद्य मध्य सेवट।
अचळ अढळ अतुट। जैसें तैसें ॥ १४ ॥

जे उदंड घनदाट असून आदि, मध्ये आणि शेवटी अचळ, अढळ, अतूट जसेच्या तसेच असते. (१४)

म्हणतां जैसें गगन। गगनाहून तें सघन।
जन्मेचि नाहीं निरंजन। सदोदित ॥ १५ ॥

जे गगनासारखे वाटते, पण गगनाहूनही ओतप्रोत घनदाट आणि सूक्ष्म असते, जेथे काही जन्मलेच नाही असे सदोदित निरंजन असते. (१५)

चर्मचक्षु ज्ञानचक्षु। हा तों अवघाच पूर्वपक्षु।
निर्गुण ठाईंचा अलक्षु। लक्षवेना ॥ १६॥

निरर्थक असते, असे निर्गुण परब्रह्मकी जे सहजच अलक्ष ज्याच्यासंबंधी चर्मचक्षू, ज्ञानचक्षू इत्यादी बालणें असल्याने दुजेपणाने जाणता येत नाही. (१६)

संगत्यागेंविण कांहीं। परब्रह्म होणार नाहीं।
संगत्याग करून पाहीं। मौन्यगर्भा ॥ १७॥

संगत्यागाशिवाय परब्रह्माशी ऐक्य होऊ शकत नाही. म्हणून मीपणाचा त्याग जेव्हा होतो, जेथे स्फुरणादी सर्व वाणी नष्ट होतात. (१७)

निर्शतां अवघेंचि निर्शलें। चंचळ तितुकें निघोन गेलें।
निश्चळ परब्रह्म उरलें। तेंचि सार ॥ १८॥

तत्त्वांचे निरसन करता करता सर्वांचेच निरसन होते. चंचळ जितके असते, ते सर्व लय पावते आणि निश्चळ परब्रह्म तेवढे उरते. तेच सार होय. (१८)

आठवा देह मूळमाया। निर्शोन गेल्या अष्टकाया।
साधु सांगती उपाया। कृपाळुपणें ॥ १९॥

पिंड-ब्रह्मांडाच्या मिळून आठ देहांचे विवेकाने निरसन होऊन आठवा देह जी मूळ माया तीही लय पावावी, म्हणून साधू लोक कृपाळूपणे उपाय सांगतात. (१९)

सोहं हंसा तत्वमसी। तें ब्रह्म तूं आहेसी।
विचार पाहातां स्थिति ऐसी। सहजचि होते ॥ २०॥

'सोहं, 'हंसा', 'तत्त्वमसि' ही महावाक्ये निर्देश करतात की ते ब्रह्मच तू आहेस. या महावाक्यांचा उपदेश संत करतात आणि त्यांच्या अर्थाचे निरंतर अनुसंधान केल्याने सहजच त्या परब्रह्माशी ऐक्य होते. (२०)

साधक असोन ब्रह्म उरलें। तेथें वृत्तिसुन्य जालें।
सारासार विचारिलें। येणें प्रकारें ॥ २१॥

साधक वेगळा राहून जर ब्रह्म पाहू गेला, तर वृत्तीच्या अंती त्याला शून्यत्वाचीच प्राप्ती होईल. असा धोका असल्याने सारासारविचार अत्यंत दक्षतेने केला पाहिजे. (२१)

तें तापेना ना निवेना। उजळेना ना काळवंडेना।
डहुळेना ना निवळेना। परब्रह्म तें ॥ २२॥

जे तापत नाही, निवत नाही, उजळत नाही, काळवंडत नाही, डहुळत नाही, निवळत नाही, ते परब्रह्म होय. (२२)

दिसेना ना भासेना। उपजेना ना नासेना।
तें येना ना जाईना। परब्रह्म तें ॥ २३॥

जे दिसत नाही, भासत नाही, जे उपजत नाही, नाश पावत नाही, जे येत नाही, जात नाही, ते परब्रह्म असे जाणावे. (२३)

तें भिजेना ना वाळेना। तें विझेना ना जळेना।
जयास कोणीच नेईना। परब्रह्म तें ॥ २४॥

जे भिजत नाही, वाळत नाही, जे विझत नाही, जळत नाही, ज्याला कोणी नेऊ शकत नाही, ते परब्रह्म होय. (२४)

जें सन्मुख चि चहुंकडे। जेथें दृश्य भास उडे।
धन्य साधु तो पवाडे। निर्विकारीं ॥ २५॥

ते परबह्म चहूकडे सन्मुखच असते. जेथे दृश्य सृष्टीचा भास नाहींसा होतो, अशा निर्विकार परब्रह्माच्या ठिकाणी जो साधू प्रतिष्ठित होतो, तो धन्य होय. (२५)

निर्विकल्पीं कल्पनातीत। तोचि वोळखावा संत।
येर अवघेचि असंत। भ्रमरूप ॥ २६॥

निर्विकल्पत्वाच्या जाणिवेशिवाय जो निर्विकल्पी मुरून जाईल, ऐक्य पावेल, त्यालाच संत म्हणून ओळखावा. जे असे ऐक्य पावत नाहीत, ते सर्व भ्रमरूप असंत आहेत, असे जाणावे. (२६)

खोटें सांडून खरें घ्यावे। तरीच परीक्षवंत म्हणावें।
असार सांडून सार घ्यावें। परब्रह्म तें ॥ २७॥

खोटे सोडून खरे जो घेतो त्यालाच पारखी म्हणतात. म्हणून असार सोडून सार असे जे परब्रह्म ते घ्यावे. (२७)

जाणतां जाणतां जाणीव जाते। आपली वृत्ति तद्रूप होते।
आत्मनिवेदन भक्ति ते। ऐसी आहे ॥ २८॥

त्या परब्रह्मास जाणता जाणता जाणीव जाऊन आपली वृत्ती तद्रूप होते. यालाच आत्मनिवेदन भक्ती असे म्हणतात, हे जाणून घ्यावे. (२८)

वाच्यांशें भक्ति मुक्ति बोलावी। लक्ष्यांशें तद्रूपता विवरावी।
विवरतां हेतु नुरावी। ते तद्रूपता ॥ २९॥

शब्दांच्या योगे भक्ती-मुक्तीचे वर्णन करावे. अर्थांतर पाहून तद्रूपता कशी साधता येईल ते विवरावे आणि विवरता विवरता जाणीवही उरू नये. यालाच तद्रूपता असे म्हणतात. (२९)

सद्रूप चिद्रूप आणि तद्रूप । सस्वरूप म्हणिजे आपलें रूप ।
आपलें रूप म्हणिजे अरूप । तत्वनिर्शनाउपरी ॥ ३० ॥

जाणीव विवरता विवरताना मीपणाचाही सहज लय होतो. सद्रूप, चिद्रूप आणि तद्रूप तसेच स्वस्वरूप हेच आपले खरे रूप होय. तत्त्वनिरसन केल्यावर अरूप हेच आपले रूप होय, असा साक्षात अनुभव येतो. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सारासारनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**



## दशक १३ : समास ३

## उभारणीनिरूपण

॥ श्रीराम ॥

ब्रह्म घन आणि पोकळ । आकाशाहून विशाळ ।
निर्मळ आणी निश्चळ । निर्विकारी ॥ १ ॥

ब्रह्म हे घन, पोकळ भासणारे, आकाशाहून विशाल, निर्मळ, निश्चळ आणि निर्विकारी आहे. (१)

ऐसेंचि असतां कित्येक काळ । तेथें आरंभला भूगोळ ।
तया भूगोळाचें मूळ । सावध ऐका ॥ २ ॥

असे ते असता दीर्घकाळ लोटला आणि मग या भूगोलाच्या निर्मितीचा आरंभ झाला. त्या भूगोलाचे मूळ काय आहे ते सावधपणे ऐका. (२)

परब्रह्म असतां निश्चळ । तेथें संकल्प उठिला चंचळ ।
तयास बोलिजे केवळ । आदिनारायेण ॥ ३ ॥

असे ते परब्रह्म निश्चळ असताना तेथे 'बहु स्याम्' हा चंचळ संकल्प उठला, त्यालाच केवळ आदि नारायण म्हणतात. (३)

मूळमाया जगदेश्वर । त्यासीच म्हणिजे शड्गुणैश्वर ।
अष्टधा प्रकृतीचा विचार । तेथें पाहा ॥ ४ ॥

यालाच मूळमाया, जगदीश्वर, षड्गुणेश्वर, म्हणतात. तेथे अष्टधा प्रकृती कशी उत्पन्न झाली, तो विचार आता पहा.. (४)

ऐलिकडे गुणक्षोभिणी । तेथें जन्म घेतला त्रिगुणीं ।
मूळ वोंकाराची मांडणी । तेथून जाणावी ॥ ५ ॥

या मूळ मायेतूनच गुणक्षोभिणी माया उत्पन्न झाली. तिच्यापासूनच त्रिगुणांनी जन्म घेतला. मूळ ओंकार तेथूनच उत्पन्न झाला. (५)

अकार उकार मकार । तिनी मिळोन वोंकार ।
पुढें पंचभूतांचा विस्तार । विस्तारला ॥ ६ ॥

अकार, उकार, मकार तिन्ही मिळून ओंकार झाला. यानंतर पंचभूतांचा प्रचंड विस्तार झाला. (६)

आकाश म्हणिजेतें अंतरात्म्यासी । तयापासून जन्म वायोसी ।
वायोपासून तेजासी । जन्म जाला ॥ ७ ॥

अंतरात्म्यालाच आकाश म्हणतात. त्यापासून वायूचा जन्म झाला. वायूपासून तेज उत्पन्न झाले. (७)

वायोचा कातरा घसवटे । तेणें उष्णें वन्हि पेटे ।
सूर्यबिंब तें प्रगटे । तये ठाईं ॥ ८ ॥

वायूमध्ये घर्षण होऊन उष्ण अग्नी प्रगट झाला. त्यातून सूर्यबिंब प्रगट झाले. (८)

वारा वाजतो सीतळ । तेथें निर्माण जालें जळ ।
तें जळ आळोन भूगोळ । निर्माण जाला ॥ ९ ॥

नंतर थंड वारा वाहू लागला. तेथे जळ निर्माण झाले. ते जळ आळून भूगोल म्हणजे पृथ्वी निर्माण झाली. (९)

त्या भूगोळाचे पोटीं । अनंत बीजांचिया कोटी ।
पृथ्वी पाण्या होता भेटी । अंकुर निघती ॥ १० ॥

त्या भूगोलाच्या पोटात नाना प्रकारची अनंत बीजे निर्माण झाली. आणि पृथ्वी व पाणी यांच्या मदतीने त्या बीजांतून अंकुर निघाले. (१०)

पृथ्वी वल्ली नाना रंग । पत्रें पुष्पांचे तरंग ।
नाना स्वाद ते मग । फळें जालीं ॥ ११ ॥

पृथ्वीवर नाना रंगांच्या नाना वेली, पाने, फुले यांची निर्मिती झाली. मग अनेक प्रकारची चव असलेली अनेक फळे उत्पन्न झाली. (११)

पत्रें पुष्पें फळें मुळें । नाना वर्ण नाना रसाळें ।
नाना धान्यें अन्नें केवळें । तेथून जालीं ॥ १२ ॥

पाने, फुले, फळे, मुळे, नाना वर्णाची, नाना प्रकारच्या रसांनी युक्त अशी नाना अन्नधान्ये वगैरे सर्व पृथ्वी व जलाच्या संयोगानेच निर्माण झाली. (१२)

अन्नापासून जाले रेत। रेतापासून प्राणी निपजत।
ऐसी हे रोकडी प्रचित। उत्पत्तीची ॥ १३ ॥

अन्नापासून वीर्य झाले आणि त्यापासून प्राणी उत्पन्न झाले. याप्रकारे या उपत्तीची रोकडी प्रचीती सर्वांना येते. (१३)

अंडज जारज श्वेतज उद्बीज। पृथ्वी पाणी सकळांचे बीज।
ऐसें हें नवल चोज। सृष्टिरचनेचें ॥ १४ ॥

अंडज, जारज, स्वेदज आणि उद्‌भिज्ज या सर्वांची उत्पत्ती पृथ्वी आणि जल तत्त्वामुळे झाली. हे या सृष्टिरचनेचे मोठे नवल आहे. (१४)

च्यारि खाणी च्यारि वाणी। चौऱ्यासि लक्ष जीवयोनी।
निर्माण जाले लोक तिनी। पिंडब्रह्मांड ॥ १५ ॥

चार खाणी, चार वाणी, चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी, तसेच पिंड व ब्रह्मांड, तसेच तिन्ही लोक यांची याप्रमाणे उत्पत्ती झाली. (१५)

मुळीं अष्टधा प्रकृती। अवघे पाण्यापासून जन्मती।
पाणी नसतां मरती। सकळ प्राणी ॥ १६ ॥

मूळची ही अष्टधा प्रकृती. सर्व प्राणी पाण्यापासून जन्मतात. पाणी नसेल तर कोणीही जिवंत राहू शकणार नाही. (१६)

नव्हे अनुमानाचें बोलणें। याचा बरा प्रत्यये घेणें।
वेदशास्त्रें पुराणें। प्रत्ययें घ्यावीं ॥ १७ ॥

हे बोलणे अनुमानाचे नाही. याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन पहावा. वेद-शास्त्र-पुराणे ही अनुभवाने जाणून घ्यावीत. (१७)

जें आपल्या प्रत्यया येना। तें आनुमानिक घ्यावेना।
प्रत्ययाविण सकळ जना। वेवसाये नाहीं ॥ १८ ॥

जे आपल्या अनुभवाला येत नसेल, अशा काल्पनिक गोष्टींचा कधी स्वीकार करू नये. अनुभवाशिवाय सर्व लोकांना प्रपंचात अथवा परमार्थातही दुसरा आधार नाही. (१८)

वेवसाये प्रवृत्ती निवृत्ती। दोहिंकडे पाहिजे प्रचिती।
प्रचितीविण अनुमानें असती। ते विवेकहीन ॥ १९ ॥

व्यवसाय प्रपंचाचा असो वा परमार्थाचा असो, दोन्हीकडे प्रचीती असणे अत्यंत आवश्यक आहे. प्रचीतीखेरीज जे लोक केवळ अनुमानावर विसंबून राहतात, ते विवेकहीन असतात. (१९)

ऐसा सृष्टिरचनेचा विचार। संकळित बोलिला प्रकार।
आतां विस्ताराचा संव्हार। तोहि ऐका ॥ २० ॥

असा हा सृष्टिरचनेसंबंधीचा विचार येथे संकलित करून सांगितला आहे. आता या विस्ताराचा संहार कसा होतो, तेही ऐका. (२०)

मुळापासून सेवटवरी। अवघा आत्मारामचि करी।
करी आणि विवरी। येथायोग्य ॥ २१ ॥

मुळापासून शेवटापर्यंत सर्व काही आत्मारामच करत असतो. तोच करतो आणि तोच यथायोग्य विवरणही करतो. (२१)

पुढे संव्हार निरोपिला। श्रोतीं पाहिजे ऐकिला।
इतुक्याउपरी जाला। समास पूर्ण ॥ २२ ॥

पुढील समासात संहाराचे वर्णन केले आहे. ते श्रोत्यांनी ऐकले पाहिजे. इतक्यावर हा समास येथे पूर्ण झाला आहे. (२२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उभारणीनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.**

❑❑

## दशक १३ : समास ४

### प्रलय

॥ श्रीराम ॥

पृथ्वीस होईल अंत। भूतांस मांडेल कल्पांत।
ऐसा समाचार साध्यंत। शास्त्रीं निरोपिला ॥ १॥

पृथ्वीचा अंत होईल, सर्व भूते कल्पांताच्या वेळी नाश पावतील, असे शास्त्रांत सविस्तर वर्णन केले आहे. (१)

शत वरुषें अनावृष्टि। तेणें जळेल हे सृष्टि।
पर्वत माती ऐसी पृष्ठी। भूमीची तरके ॥ २॥

शंभर वर्षे अनावृष्टी होईल. पाऊसच न पडल्याने ही सर्व सृष्टी जळून जाईल. पर्वत मावतील अशा पृथ्वी तडकून मोठमोठ्या भेगा पडतील. (२)

बारा कळी सूर्यमंडळा। किर्णापासून निघती ज्वाळा।
शत वरुषें भूगोळा। दहन होये ॥ ३॥

सूर्य बारा कलांनी तापू लागेल. त्यामुळे त्याच्या किरणांतून ज्वाला निघून शंभर वर्षे भूगोल जळत राहील. (३)

सिंधुरवर्ण वसुंधरा। ज्वाळा लागती फणिवरा।
तो आहाळोन सरारां। विष वमी ॥ ४॥

पृथ्वी जळत असता शेंदरी रंगाच्या ज्वाळा उत्पन्न होऊन त्या शेषापर्यंत पोहोचतील. तेव्हा पोळल्याने कळवळून तो भयंकर विष ओकू लागेल. (४)

त्या विषाच्या ज्वाळा निघती। तेणें पाताळें जळती।
माहापावकें भस्म होती। पाताळ लोक ॥ ५॥

त्या विषापासून ज्वाळा निघून त्यामुळे पाताळ जळू लागेल. त्या महाअग्ने सर्व पाताळलोक जळून भस्म होतील. (५)

तेथें महाभूतें खवळती। प्रळयेवात सुटती।
प्रळयेपावक वाढती। चहुंकडे ॥ ६॥

त्यामुळे पंचमहाभूते खवळतील आणि प्रलयकालचा वारा वाहू लागून त्यामुळे चहूकडे प्रलयाग्नी पसरेल. (६)

तेथें अक्रा रुद्र खवळले। बारा सूर्य कडकडिले।
पावकमात्र येकवटले। प्रळयेकाळीं ॥ ७॥

त्या वेळी अकरा रुद्र खवळतील, बारा सूर्य कडाडतील, प्रलयकाळी सर्व अग्नी एकवटतील. (७)

वायो विजांचे तडाखे। तेणें पृथ्वी अवघी तरखे।
कठिणत्व अवघेंचि फांके। चहुंकडे ॥ ८॥

वारा आणि वीज यांच्या तडाख्याने अवघी पृथ्वी तडकेल. तिचे कठिणत्व चहूंकडे पसरेल. (८)

तेथें मेरूची कोण गणना। कोण सांभाळिल कोणा।
चंद्र सूर्य तारांगणा। मूस जाली ॥ ९॥

तेथे मेरूची काय कथा? तेथे कोण कोणाला सांभाळू शकेल? चंद्र, सूर्य, तारांगण सर्व वितळून एकवटतील. (९)

पृथ्वीने विरी सांडिली। अवघी धगधगायेमान जाली।
ब्रह्मांडभटीं जळोन गेली। येकसरां ॥ १०॥

सारी पृथ्वी काठिण्य सोडून, धगधगायमान होऊन ब्रह्मांडभर झालेल्या वह्नीच्या भट्टीत एकाच वेळी जळून जाईल. (१०)

जळोनि विरी सांडिली। विशेष माहावृष्टी जाली।
तेणें पृथ्वी विराली। जळामधें ॥ ११॥

जलानेही सत्त्व सोडले की, विशेष महावृष्टी होऊन त्या जलात पृथ्वी विरून जाईल. (११)

भाजला चुना जळीं विरे। तैसा पृथ्वीस धीर न धरे।
विरी सांडूनिया त्वरें। जळीं मिळाली ॥ १२॥

भाजलेला चुना जसा त्वरित पाण्यात विरून जातो, तसा पृथ्वीलाही धीर धरवत नाही आणि सत्त्व सोडून ती त्वरेने जलात विरून जाते. (१२)

शेष कूर्म वाऱ्हाव गेला। पृथ्वीचा आधार तुटला।
सत्त्व सांडून जळाला। मिळोन गेली ॥ १३॥

शेष, कूर्म, वराह सर्व नष्ट झाल्याने पृथ्वीचा आधार नाहीसा होऊन ती सत्त्व सोडून पाण्यात मिसळून जाते. (१३)

तेथें प्रळयेमेघ उचलले। कठिण घोषें गर्जिनले।
अखंड विजा कडकडिले। ध्वनि घोष ॥ १४॥

तेथे प्रलयमेघ उत्पन्न होऊन मोठमोठ्याने गर्जना करू लागतात. त्यात अखंड विजा मोठमोठ्याने आवाज करीत कडाडू लागतात. (१४)

पर्वतप्राये पडती गारा। पर्वत उडती ऐसा वारा।
निबिड तया अंधकारा। उपमाचि नाहीं ॥ १५॥

पर्वतासारख्या मोठमोठ्या गारा पडू लागतात, पर्वतही उडून जातील अशा वेगाने वारा वाहू लागतो आणि इतका घनदाट अंधकार पसरतो की, त्याला उपमाच देता येत नाही. (१५)

सिंधु नद्या एकवटल्या। नेणो नभींहून रिचवल्या।
संधिच नाहीं धारा मिळाल्या। अखंड पाणी ॥ १६॥

मोठमोठ्या नद्या आणि समुद्र एक होतात. आकाशातून जलधारा अशा वाहू लागतात की, आकाशातूनच रिचवल्याप्रमाणे दोन धारांमध्ये जराही पोकळी राहात नाही. त्यामुळे सर्वत्र पाणीच पाणी होते. (१६)

तेथें मछ कूर्म सर्प पडती। पर्वतासारिखे दिसती।
गर्जना होतां मिसळती। जळात जळें ॥ १७॥

तेथे पर्वतासारखे मत्स्य, कूर्म, सर्प वगैरे पाण्यात पडले आणि घनगर्जना झाली की, सर्व पाणी एक होते. (१७)

सप्त सिंधु आवर्णी गेले। आवर्णवेडे मोकळे जाले।
जळरूप जालियां खवळले। प्रळयेपावक ॥ १८॥

सप्तसमुद्र सर्व एक झाले, समुद्राने मर्यादा सोडली, जेव्हा सर्व जलरूप झाले, तेव्हा प्रलयाग्नी खवळले. (१८)

ब्रह्मांडा ऐसा तप्तलोहो। शोषी जळाचा समूहो।
तैसें जळास जालें पाहो। अपूर्व मोठें ॥ १९॥

ब्रह्मांडाएवढा तापलेल्या लोखंडाचा गोळा होऊन त्याने सर्व जलसमूह शोषून टाकले. त्याप्रमाणे जलाच्या ठिकाणीही मोठे अपूर्व घडले. (१९)

तेणें आटोन गेलें पाणी। असंभाव्य माजला वन्ही।
तया वन्हीस केली झडपणी। प्रळयवातें ॥ २०॥

सर्व पाणी आटून गेले आणि प्रलयाग्नी असंभाव्य असा माजला. त्या अग्नीला नंतर प्रलयवाताने झडपले. (२०)

दीपास पालव घातला। तैसा प्रळयेपावक विझाला।
पुढें वायो प्रबळला। असंभाव्य ॥ २१॥

दिव्याला पदराने वारा घातल्यावर तो विझावा, तसा प्रलयवाताने प्रलयाग्नी विझून गेला आणि पुढे प्रलयवातच असंभाव्य असा खवळला. (२१)

उदंड पोकळी थोडा वारा। तेणें वितळोन गेला सारा।
पंचभूतांचा पसारा। आटोपला ॥ २२॥

पण आकाशाची पोकळी इतकी विशाल आणि त्या मानाने तो प्रलयवात अगदीच थोडा. त्यामुळे त्या पोकळीत तो सर्व वितळून गेला. याप्रमाणे पंचमहाभूतांचा सर्व पसारा नष्ट झाला. (२२)

महद्भूत मूळमाया। विस्मरणें वितुळे काया।
पदार्थमात्र राहावया। ठाव नाहीं ॥ २३॥

महद्भूत जी मूळ माया तीही 'बहु स्याम्' या स्मरणाचेही विस्मरण झाल्याने स्वप्नाप्रमाणेच नष्ट झाली. त्यामुळे पदार्थमात्रास ठावच राहिला नाही. (२३)

दृश्य हलकालोळें नेलें। जड चंचळ वितुळलें।
याउपरी शाश्वत उरलें। परब्रह्म तें ॥ २४॥

सर्व दृश्य सृष्टी हलकल्लोळाने नाहीशी झाली. जड चंचळ मूळ माया वितळून गेली. याप्रमाणे नंतर केवळ शाश्वत परब्रह्म उरले. (२४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'प्रलयनाम' समास चौथा समाप्त.

❑ ❑

## दशक १३ : समास ५
## कहाणीनिरूपण

॥ श्रीराम ॥

कोणी येक दोघे जण । पृथ्वी फिरती उदासीन ।
काळक्रमणें लागून । कथा आरंभिली ॥ १ ॥

कुणी दोघे मित्र पृथ्वीवर अनासक्तपणे हिंडत होते. वेळ चांगल्या प्रकारे जावा, म्हणून त्यांनी कथा सांगायला आरंभ केला. (१)

श्रोता पुसे वक्तयासी । काहाणी सांगा जी बरवीसी ।
वक्ता म्हणे श्रोतयासी । सावध ऐकें ॥ २ ॥

हे ऐकून श्रोता वक्त्यास म्हणाला की, एखादी छानशी गोष्ट सांगा ना ! तेव्हा वक्ता श्रोत्याला म्हणाला की, कहाणी सांगतो. तू सावधपणे ऐक. (२)

येकें स्त्रीपुरुषें होतीं । उभयेतांमधें बहु प्रीति ।
येकरूपेंचि वर्तती । भिन्न नाहीं ॥ ३ ॥

एक स्त्री आणि एक पुरुष यांचे जोडपे होते. त्या उभयतांमध्ये अत्यंत प्रीती होती. त्यांच्यात जराही भिन्नत्व नव्हते. दोघे अगदी एकमताने एकरूप असल्यासारखी वागत असत. (३)

ऐसा कांही येक काळ लोटला । तयांस येक पुत्र जाला ।
कार्यकर्ता आणि भला । सर्वविषीं ॥ ४ ॥

असा काही काळ लोटला तेव्हा त्यांना (जाणीवरूप विष्णू) एक पुत्र झाला. तो सर्व बाबतीत चांगला असून, मोठा कार्यकर्ता होता. (४)

पुढें त्यासहि जाला कुमर । तो पित्याहून आतुर ।
कांहीं तदर्ध चतुर । व्यापकपणें ॥ ५ ॥

पुढे त्या पुत्रालाही एक कुमार (ब्रह्मदेव) झाला. तो पित्यापेक्षाही उतावळ्या स्वभावाचा आणि व्यापकपणे पित्यापेक्षा अर्धचतुर होता. (५)

तेणें व्याप उदंड केला । बहुत कन्यापुत्र व्याला ।
उदंड लोक संचिला । नाना प्रकारें ॥ ६ ॥

त्याने व्याप खूप वाढवला आणि अनेक कन्या-पुत्रांना जन्म दिला. याप्रमाणे नाना प्रकारचे असंख्य लोक निर्माण झाले. (६)

त्याचा पुत्र जेष्ठ । तो अज्ञान आणि रागिट ।
अथवा चुकतां नीट । संव्हार करी ॥ ७ ॥

त्याचा सर्वांत ज्येष्ठ पुत्र (शंकर) अत्यंत अज्ञानी आणि रागीट होता. कुणाचे जरा काही चुकले की, तो संहार करी. (७)

पिता उगाच बैसला । लेकें बहुत व्याप केला ।
सर्वज्ञ जाणता भला । जेष्ठ पुत्र ॥ ८ ॥

पिता (मूळ पुरुष) स्वस्थ बसून राहिला होता. त्याच्या लेकाने (म्हणजे विष्णूने) खूप व्याप वाढवला. तो ज्येष्ठ पुत्र चांगला जाणता आणि सर्वज्ञ होता. (८)

नातु त्याचें अर्ध जाणे । पणतु तो कांहींच नेणे ।
चुकतां संव्हारणें । माहा क्रोधी ॥ ९ ॥

नातू होता तो अर्धेच जाणत होता, तर पणतू काहीच जाणत नव्हता. तो महाक्रोधी होता आणि कुणी चुकले की त्याचा संहार करी. (९)

लेक सकळांचें पाळण करी । नातु मेळवी वरिचावरी ।
पणतु चुकल्यां संव्हारा करी । अकस्मात ॥ १० ॥

लेक (विष्णू) सर्वांचे पालन-पोषण करीत असे. नातू वारंवार प्रजा वाढवी. तर पणतू कुणी चुकले असता अकस्मात संहार करी. (१०)

नेमस्तपणें वंश वाढला । विस्तार उदंडचि जाला ।
ऐसा बहुत काळ गेला । आनंदरूप ॥ ११ ॥

याप्रमाणे नियमितपणे वंश वाढत गेला आणि प्रचंड विस्तार झाला. प्रथम बराच काळ मोठ्या आनंदात गेला. (११)

विस्तार वाढला गणवेना । वडिलांस कोणीच मानीना ।
परस्परें किंत मना । बहुत पडिला ॥ १२ ॥

विस्तार इतका वाढला की, मोजदाद करणे अशक्य झाले. पुढे वडिलांना कुणी मानेनासे झाले. सर्वांच्या मनात परस्परांबद्दल संशय वाढू लागला. (१२)

उदंड घरकळहो लागला । तेणें कित्येक संव्हार जाला ।
विपट पडिलें थोरथोरांला । बेबंद जालें ॥ १३ ॥

उदंड गृहकलह सुरू होऊन त्यामुळे कित्येकांचा संहार झाला. थोरामोठ्यांतही वितुष्ट आले आणि बेबंदशाही माजली. (१३)

नेणपणें भरीं भरले। मग ते अवघेच संव्हारले।
जैसे यादव निमाले। उन्मत्तपणें ॥ १४॥

अज्ञानाच्या भराने ते उन्मत्त झाले आणि मग सर्वांचाच, यादव जसे उन्मत्तपणे एकमेकांशी भांडून मेले, त्याप्रमाणे संहार झाला. (१४)

बाप लेंक नातु पणतु। सकळांचा जाला निपातु।
कन्या पुत्र हेतु मातु। अणुमात्र नाहीं ॥ १५॥

बाप, लेक, नातू, पणतू सगळ्यांचा संहार झाला. आणि कन्या, पुत्र, पणतू, नातू यांपैकीही कोणी शिल्लक उरले नाही. (१५)

ऐसी काहाणी जो विवरला। तो जन्मापासून सुटला।
श्रोता वक्ता धन्य जाला। प्रचितीनें ॥ १६॥

अशा या कहाणीचे जो विवरण करील तो जन्ममरणचक्रातून सुटेल. याची प्रचीती घेतल्याने श्रोता आणि वक्ता दोघेही धन्य झाले. (१६)

ऐसी काहाणी अपूर्व जे ते। उदंड वेळ होत जाते।
इतुकें बोलोनी गोसावी ते। निवांत जाले ॥ १७॥

अशी ही अपूर्व कहाणी नित्य होत-जात असते. इतके बोलून श्रीगुरू निवांत झाले. (१७)

आमची काहाणी सरो। तुमचे अंतरीं भरो।
ऐसें बोलणें विवरो। कोणीतरी ॥ १८॥

आमची कहाणी सरो आणि तुमचे अंतरांत भरून राहो. असे बोलून वक्ता म्हणतो की, या कहाणीचे कुणीतरी मनन करावे. (१८)

चुकत वांकत आठवलें। इतुकें संकळित बोलिलें।
न्यूनपूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं ॥ १९॥

चुकत-माकत जेवढे आठवले तेवढे संकलित करून येथे सांगितले. त्यात अधिक उणे काही झाले असेल, तर श्रोत्यांनी क्षमा केली पाहिजे. (१९)

ऐसी काहाणी निरंतर। विवेकें ऐकती जे नर।
दास म्हणे जग्गोधार। तेचि करिती ॥ २०॥

अशी ही कहाणी जे नर निरंतर विचारपूर्वक ऐकतील रामदास म्हणतात की, ते जगदुद्धार करतील. (२०)

त्या जगोद्धाराचें लक्षण। केलें पाहिजे विवरण।
सार निवडावें, निरूपण। यास बोलिजे ॥ २१॥

तो जगदुद्धार कसा होईल, ते लक्षण ऐका. या कहाणीचे विवरण करून त्यातून सार निवडावे. यालाच निरूपण म्हणतात. (२१)

निरूपणीं प्रत्ययें विवरावें। नाना तत्वकोडें उकलावें।
समजतां समजतां व्हावें। निःसंदेह ॥ २२॥

निरूपण लक्षपूर्वक ऐकावे. त्याची आपल्या अनुभवाशी सांगड घालून ते नीट समजून घ्यावे. म्हणजे त्यातील अनेक तत्त्वांचा उलगडा होईल आणि समजता समजता स्वानुभव येऊन श्रोता निःसंदेह होईल. (२२)

विवरोन पाहातां अष्ट देह। पुढे सहजचि निःसंदेह।
अखंड निरूपणें राहे। समाधान ॥ २३॥

पिंडाचे चार आणि ब्रह्मांडाचे चार मिळून जे अष्ट देह आहेत, त्यांचे विवरण करून पाहिले पाहिजे. साहजिकच श्रोता निःसंदेह होतो. मात्र, अखंड निरूपण करीत राहिल्यानेच शाश्वत समाधान प्राप्त होते. (२३)

तत्वांचा गल्बला जेथें। निवांत कैंचें असेल तेथें।
याकारणें गुल्लिपरतें। कोणियेकें असावें ॥ २४॥

जेथे तत्त्वांचा गलबला असेल, तेथे निवांतपणा कसा असेल? म्हणून या घोटाळ्यापासून कोणी एकाने नेहमी अलिप्त असावे. (२४)

ऐसा सूक्ष्म संवाद। केलाचि करावा विशद।
पुढिले समासीं लघुबोध। सावध ऐका ॥ २५॥

असा हा सूक्ष्म संवाद पुन्हा पुन्हा स्पष्ट करून समजून घ्यावा. आता पुढील समासात लघुबोध सांगितला जाईल. तो श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावा. (२५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कहाणीनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.

❑❑

## दशक १३ : समास ६

### लघुबोध

॥ श्रीराम ॥

जें बोलिजेती पंचतत्वें। त्यांचीं अभ्यासाया नांवें।
तदुपरी स्वानुभवें। रूपें जाणावीं ॥ १ ॥

ज्यांना पंचतत्त्वे म्हणतात, त्यांचा अभ्यास करण्यासाठी त्यांची नावे आधी ऐका आणि त्यानंतर स्वानुभवाने त्यांचे रूप जाणून घ्या. (१)

यामधें शाश्वत कोण। आणी अशाश्वत कोण।
ऐसें करावें विवरण। प्रत्ययाचें ॥ २ ॥

नंतर यामध्ये शाश्वत कोणते, अशाश्वत कोणते हे अनुभव घेऊन विवरण करून जाणून घ्यावे. (२)

पंचभूतांचा विचार। नांवरूप सारासार।
तोचि बोलिला निर्धार। सावध ऐका ॥ ३ ॥

पंचभूतांच्या नावा-रूपासंबंधी जो विचार त्यालाच सारासारविचार म्हणतात. त्यासंबंधीचा निर्धार आता सावधपणे ऐका. (३)

पृथ्वी आप तेज वायो आकाश। नावें बोलिलीं सावकास।
आतां रूपाचा विश्वास। श्रवणें धरावा ॥ ४ ॥

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश अशी या पंचमहाभूतांची नावे आहेत. आता रूपाचा विश्वास श्रवणाच्या योगे धरावा. (४)

पृथ्वी म्हणिजे ते धरणी। आप म्हणिजे तें पाणी।
तेज म्हणिजे अग्नि तरणी। सतेजादिक ॥ ५ ॥

पृथ्वी म्हणजे जमीन, आप म्हणजे पाणी, तेज म्हणजे अग्नी, सूर्य इत्यादी सतेज पदार्थ होत. (५)

वायो म्हणिजे तो वारा। आकाश म्हणिजे पैस सारा।
आतां शाश्वत तें विचारा। आपले मनीं ॥ ६ ॥

वायू म्हणजे वारा, आकाश म्हणजे सारी जागा. आता आपल्या मनात शाश्वत काय याचा विचार करावा. (६)

येक शीत चांचपावें। म्हणिजे वर्म पडे ठावें।
तैसें थोड्या अनुभवें। बहुत जाणावें ॥ ७ ॥

भाताचे एक शीत चाचपले, तरी सबंध भात कच्चा की पक्का याची परीक्षा होते. त्याप्रमाणे थोड्याशा अनुभवाने बरेच काही जाणून घ्यावे. (७)

पृथ्वी रचते आणि खचते। हें तों प्रत्ययास येतें।
नाना रचना होत जाते। सृष्टिमधें ॥ ८ ॥

पृथ्वी रचते आणि खचते हे तर आपल्या अनुभवास येतच असते. या सृष्टीमध्ये नाना रचना होतात आणि जातात. (८)

म्हणौन रचतें तें खचतें। आप तेंहि आटोन जाते।
तेजहि प्रगटोन विझतें। वारेंहि राहे ॥ ९ ॥

म्हणून जे रचते ते खचते हे जाणून घ्यावे. पाणीही आटून जाते. तेजही प्रगटते आणि कालांतराने विझून जाते. वाराही लय पावतो. (९)

अवकाश नाममात्र आहे। तेंहि विचारितां न राहे।
एवं पंचभूतिक राहे। हें तों घडेना ॥ १० ॥

अवकाश हे नाममात्रच असते. जास्त विचार केल्यास तेही राहात नाही. म्हणजेच पांचभौतिक असते, ते राहात नाही, हे जाणावे. (१०)

ऐसा पांचा भूतांचा विस्तार। नासिवंत हा निर्धार। शाश्वत
आत्मा निराकार। सत्य जाणावा ॥ ११ ॥

याप्रमाणे पंचमहाभूतांचा हा जो विस्तार आहे, तो सर्व नाशिवंत आहे, असा निर्धार झाला. फक्त निराकार आत्मा तेवढा सत्य, शाश्वत आहे, हे जाणून घ्यावे. (११)

तो आत्मा कोणास कळेना। ज्ञानेंविण आकळेना।
म्हणोनियां संतजना। विचारावें ॥ १२ ॥

तो आत्मा कुणालाही कळून येत नाही. ज्ञानानेच त्याला जाणता येते. म्हणूनच संतजनांना त्यासंबंधी विचारावे. (१२)

विचारितां सज्जनासी। ते म्हणती कीं अविनासी।
जन्म मृत्यु आत्मयासी। बोलोंच नये ॥ १३ ॥

सज्जनांना विचारले की, ते म्हणतात की, आत्मा हा अविनाशी आहे. आत्म्याला जन्म-मृत्यू आहेत, असे बोलूसुद्धा नये. (१३)

निराकारीं भासे आकार। आणी आकारीं भासे निराकार।
निराकार आणी आकार। विवेकें वोळखावा ॥ १४ ॥

निराकाराच्या (आत्म्याच्या) ठिकाणी (जगाचा) आकाराचा भास होतो आणि आकाराच्या ठिकाणी निराकार भासते. म्हणून निराकार आणि आकार कोणते ते विवेकाने ओळखावे. (१४)

**निराकार जाणावा नित्य। आकार जाणावा अनित्य।**
**यास बोलिजे नित्यानित्य। विचारणा ॥ १५॥**

निराकार जे असते ते नित्य आणि आकार असतो ते अनित्य हे जाणून घ्यावे. यालाच नित्यानित्यविचारणा असे म्हणतात. (१५)

**सारीं भासे असार। आणि असारीं भासे सार।**
**सारासार विचार। शोधून पाहावा ॥ १६॥**

सार जे असते ते असार भासते आणि असार असते ते सार भासते. म्हणून सारासारविचाराने सार काय ते शोधून पाहावे. (१६)

**पंचभूतिक तें माइक। परंतु भासे अनेक।**
**आणि आत्मा येक। व्यापून असे ॥ १७॥**

पांचभौतिक जे जे असते ते ते मायिक असते आणि ते अनेक रूपांत भासते. आणि आत्मा एकच असून, तो सर्वांना व्यापून असतो. (१७)

**चहुं भूतांमधें गगन। तैसें गगनीं असे सघन।**
**नेहटून पाहातां अभिन्न। गगन आणि वस्तु ॥ १८॥**

चारी महाभूतांमध्ये गगन व्याप्त असते. तसे गगनात सूक्ष्म ब्रह्म व्याप्त असते. नीट विचारपूर्वक पाहिले असता गगन आणि आत्मवस्तू अभिन्न आहेत, हे कळून येते. (१८)

**उपाधीयोगेंचि आकाश। उपाधी नस्तां निराभास।**
**निराभास तें अविनाश। तैसें गगन ॥ १९॥**

उपाधीयोगेच त्याला आकाश म्हणावे लागते. (एक भूत म्हणून गणावे लागते.) उपाधी नसेल, तर ते निराभास जाणावे. जे निराभास असते ते अविनाशी असते. तसेच गगन जाणावे (१९)

**आतां असो हे विवंचना। परंतु जें पाहातां नासेना।**
**तें गे तेंचि अनुमाना। विवेकें आणावें ॥ २०॥**

आता ही विवंचना राहू दे. परंतु जे पाहिले असता नाश पावत नाही, तेच विवेकाने अनुमानात आणावे. (२०)

**परमात्मा तो निराकार। जाणिजे हा विचार सार।**
**आणि आपण कोण विचार। पाहिला पाहिजे ॥ २१॥**

परमात्मा हा निराकार असून त्याला जाणणे, हेच सर्व विचाराचे सार आहे. याखेरीज आपण कोण हा विचारही केला पाहिजे. (२१)

**देहास अंत येतां। वायो जातो तत्वतां।**
**हें लटिकें म्हणाल तरी आतां। स्वासोस्वास धरावा ॥ २२॥**

देहाचा जेव्हा अंत होतो, तेव्हा तत्त्वतः त्यातून वायू निघून जातो. हे जर खोटे म्हणत असाल, तर श्वासोच्छ्वास कोंडून धरून पाहावा. (२२)

**स्वास कोंडतां देह पडे। देह पडतां म्हणतीं मडें।**
**मड्यास कर्तृत्व न घडे। कदाकाळीं ॥ २३॥**

श्वास कोंडला गेला की देह पडतो. असा देह पडला की त्याला मढे म्हणतात आणि मढ्याला कधीही कर्तृत्व नसते. (२३)

**देहावेगळा वायो न करी। वायोवेगळा देह न करी।**
**विचार पाहातां कांहींच न करी। येकावेगळें येक ॥ २४॥**

देहावेगळा वायू काही करू शकत नाही आणि वायूवेगळा देहही काही करू शकत नाही. विचार करून पाहिले असता कळून येते की, एकाशिवाय दुसरा काहीच करू शकत नाही. (२४)

**उगेंच पाहातां मनुष्य दिसे। विचार घेतां कांहींच नसे।**
**अभेदभक्तीचें लक्षण ऐसें। वोळखावें ॥ २५॥**

उगीच वरवर पाहता मनुष्य दिसतो, पण विचार करता स्वरूपाशिवाय इतर काहीच राहात नाही. अभेदभक्तीचे लक्षण हे असे ओळखावे. (२५)

**कर्ता आपण ऐसें म्हणावें। तरी आपलें इछेसारिखें व्हावें।**
**इछेसारिखें न होतां मानावें। अवघेंच वाव ॥ २६॥**

आपण कर्ता असे म्हणावे, तर मग आपल्या इच्छेप्रमाणे कार्य व्हावयास हवे. पण तसे ते होतेच असे नाही. कार्य इच्छेसारखे होत नसेल, तर आपण कर्ता हे म्हणणेच व्यर्थ ठरते. (२६)

**म्हणोन कर्ता नव्हे किं आपण। तेथें भोक्ता कैंचा कोण।**
**हें विचाराचें लक्षण। अविचारें न घडे ॥ २७॥**

म्हणून आपण कर्ता नव्हे, हे स्पष्ट अनुभवास येते. आपण जर कर्ता नाही तर मग आपण भोक्ता तरी कसे असू शकणार? याप्रमाणे सूक्ष्मपणे विचार केला तर या गोष्टी कळतात. अविचाराने हे कळत नाही. (२७)

**अविचार आणि विचार। जैसा प्रकाश अंधकार।**
**विकार आणि निर्विकार। येक नव्हे कीं ॥ २८॥**

अविचार आणि विचार यांत अंधकार आणि प्रकाशासारखे अंतर आहे. एक असेल, तेथे दुसरे असू शकत नाही. त्याप्रमाणेच विकार आणि निर्विकार एक असू शकत नाही. (२८)

जेथें नाहीं विवंचना। तेथें कांहींच चालेना।
खरें तेंचि अनुमाना। कदा न ये ॥ २९॥

जेथे सूक्ष्म विवंचना केली जात नाही, तेथे काहीच उपाय चालत नाही. खरे जे निर्विकल्प ब्रह्म त्याची कल्पना तेथे येऊ शकत नाही. (२९)

प्रत्ययास बोलिजे न्याये। अप्रत्यये तो अन्याये।
ज्यात्यांधास परीक्षा काये। नाना रत्नांची ॥ ३०॥

स्वात्मानुभवास जर न्याय असे म्हटले तर, तो अनुभव न येणे यास अन्याय म्हणावे लागते. जो जन्मांध आहे, त्याला नाना रत्नांची पारख कशी करता येईल. ? (३०)

म्हणोन ज्ञाता धन्य धन्य। जो निर्गुणेंसी अनन्य।
आत्मनिवेदनें मान्य। परम पुरुष ॥ ३१॥

म्हणून निर्गुणाशी अनन्य असणारा ज्ञाता पुरुष खरोखरच धन्य होय. आत्मनिवेदन झाल्याने तो श्रेष्ठ पुरुष म्हणून सर्वांना मान्य होतो. (३१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'लघुबोधनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक १३ : समास ७

## प्रत्ययेविवरण

॥ श्रीराम ॥

निर्मळ निश्चळ निराभास। तयास दृष्टांत आकाश।
आकाश म्हणिजे अवकाश। पसरला पैस ॥ १॥

निर्मळ, निश्चळ, निराभास अशा परब्रह्मास फक्त आकाशाचा दृष्टांत देता येतो. आकाश म्हणजे ऐसपैस पसरलेले अवकाश होय. (१)

आधीं पैस मग पदार्थ। प्रत्यये पाहातां यथार्थ।
प्रत्ययेंविण पाहातां वेर्थ। सकळ कांहीं ॥ २॥

आधी पोकळी असते, मग तेथे पदार्थ निर्माण होतो, असा यथार्थ अनुभव आपल्याला येत असतो. अनुभवाशिवाय जे काही असेल, ते सर्व व्यर्थ समजावे. (२)

ब्रह्म म्हणिजे तें निश्चळ। आत्मा म्हणिजे तो चंचळ।
तयास दृष्टांत केवळ। वायो जाणावा ॥ ३॥

परब्रह्म हे निश्चळ आहे, तर आत्मा हा चंचळ आहे. त्याला योग्य दृष्टांत वायूचा जाणावा. (३)

घटाकाश दृष्टांत ब्रह्माचा। घटबिंब दृष्टांत आत्म्याचा।
विवरतां अर्थ दोहींचा। भिन्न आहे ॥ ४॥

ब्रह्माला घटाकाशाचा दृष्टांत देतात, तर आत्म्याला घटबिंबाचा दृष्टांत देतात. या दोन्ही दृष्टांतांच्या अर्थाचे विवरण केले की दोन्ही भिन्न आहेत हे कळते (घटातील आकाश निश्चल असते आणि घटात पाणी भरल्यावर त्या घटातील पाण्यात जे आकाश प्रतिबिंबित होते ते पाण्याच्या उपाधीमुळे चंचल भासते. तसे परब्रह्म ते निश्चल असते आणि बुद्धीत प्रतिबिंबित जे चैतन्य तोच चंचल असा जीवात्मा होय.) (४)

भूत म्हणिजे जितुकें जालें। जालें तितुकें निमालें।
चंचळ आलें आणी गेलें। ऐसें जाणावें ॥ ५॥

भूत म्हणजे जे उत्पन्न झाले ते. जे जे उत्पन्न होते, ते ते नष्ट होते. चंचळही येते आणि जाते हे जाणून घ्यावे. (५)

अविद्या जड आत्मा चंचळ। जड कर्पूर आत्मा अनळ।
दोनी जळोन तत्काळ। विझोन जाती ॥ ६॥

अविद्या ही जड आहे, तर आत्मा चेतन असला तरी चंचळ आहे. जड अविद्या ही कापरासारखी आहे, तर चेतन आत्मा अग्नीसारखा आहे. दोन्ही जळून तत्काळ विझून जातात. (६)

ब्रह्म आकाश निश्चळ जाती। आत्मा वायो चंचळ जाती।
परीक्षवंत परीक्षिती। खरें किं खोटें ॥ ७॥

ब्रह्म आणि आकाश हे निश्चळ स्वभावाचे आहेत, तर आत्मा आणि वायू हे चंचळ आहेत. परीक्षवंत परीक्षा करून काय खरे, काय खोटे हे अचूक जाणतात. (७)

जड अनेक आत्मा येक। ऐसा आत्मानात्मविवेक।
जगा वर्तविता जगन्नायेक। तयास म्हणावें ॥ ८॥

जड किंवा स्थूल पदार्थ अनेक आहेत. आत्मा एक आहे. असा हा आत्मानात्मविवेक आहे. तो आत्माच सर्व जगाचा चालक आहे. म्हणून त्यालाच जगन्नायक म्हणावे. (८)

**जड अनात्मा चेतवी आत्मा। सर्वीं वर्ते सर्वात्मा।**
**अवघा मिळोन चंचळात्मा। निश्चळ नव्हे ॥ ९॥**

जड अनात्म वस्तूला आत्मा चेतवितो. सर्वांना जो प्रेरणा देतो त्याला सर्वात्मा म्हणतात. आणि सर्वांचा मिळून जो अंतरात्मा त्यालाच चंचळात्मा म्हणतात. तो म्हणजे निश्चल परब्रह्म नव्हे. (९)

**निश्चळ तें परब्रह्म। जेथें नाहीं दृश्यभ्रम।**
**विमळ ब्रह्म तें निभ्रम। जैसें तैसें ॥ १०॥**

परब्रह्म निश्चळ असते. तेथे दृश्यभ्रम नसतो. विमळ ब्रह्म हे भ्रमरहित, जसेच्या तसेच असते(१०)

**आधीं आत्मानात्माविवेक थोर। मग सारासारविचार।**
**सारासारविचारें संव्हार। प्रकृतीचा ॥ ११॥**

आधी थोर असा आत्मानात्मविवेक करावा. नंतर सारासारविचार करावा. सारासारविवेकाने असार अशा प्रकृतीचा संहार होतो. (११)

**विचारें प्रकृति संव्हारे। दृश्य अस्तांच वोसरे।**
**अंतरात्मा निर्गुणी संचरे। अध्यात्मश्रवणें ॥ १२॥**

केवळ विचारानेही प्रकृतीचा संहार होतो आणि दृश्य जगत दिसत असूनही नसल्यासारखे होते. अध्यात्मश्रवणाने अंतरात्मा निर्गुणात प्रवेश करतो. त्याच्याशी तादात्म्य पावतो. (१२)

**चढता अर्थ लागला। तरी अंतरात्मा चढतचि गेला।**
**उतरल्या अर्थें उतरला। भूमंडळीं ॥ १३॥**

जसा अर्थ लागेल त्याप्रमाणे अंतरात्मा बनतो. उन्नती करणारा अर्थ लागला, तर अंतरात्म्याची आध्यात्मिक उन्नती होते. उतरता अर्थ लागला तर अंतरात्माही भूमंडळी उतरतो म्हणजे दृश्य जगताशी तादात्म्य पावतो. (१३)

**अर्थासारिखा आत्मा होतो। जिकडे नेला तिकडे जातो।**
**अनुमानें संदेहीं पडतो। कांहींयेक ॥ १४॥**

जसा अर्थ लागेल त्याप्रमाणे अंतरात्मा बनतो. त्याला जिकडे न्यावे तिकडे तो जातो. अनुमानाने तो काही वेळा संदेहात पडतो. (१४)

**निसंदेह अर्थ चालिला। तरी आत्मा निसंदेहचि जाला।**
**अनुमानअर्थें जाला। अनुमानरूपी ॥ १५॥**

नि:संदेह अर्थ लागला तर अंतरात्मा नि:संदेही होतो. आनुमानिक अर्थ लागला, तर तो अनुमानरूप होतो. (१५)

**नवरसिक अर्थ चाले। श्रोते तद्रूपचि जाले।**
**चाटपणें होऊन गेले। चाटचि आवघे ॥ १६॥**

अध्यात्मनिरूपणात किंवा कथेत नवरसात्मक वर्णन असेल, तर श्रोते त्या वर्णनाशी तद्रूप होतात. चावटपणाचे वर्णन असेल, तर ते ऐकून श्रोतेही सर्व चावट होऊन जातात. (१६)

**जैसा जैसा घडे संग। तैसे गुह्यराचे रंग।**
**याकारणें उत्तम मार्ग। पाहोन धरावा ॥ १७॥**

जसा संग घडतो तसे सरड्याचे रंग बदलत असतात. अंतरात्म्याचेही तसेच आहे. म्हणून माणसाने विचारपूर्वक उत्तम मार्गच धरावा. (१७)

**उत्तम अन्नें बोलत गेले। तरी मन अन्नाकारचि जालें।**
**लावण्य वनितेचें वर्णिलें। तरी मन तेथेंचि बैसे ॥ १८॥**

उत्तम अन्नाविषयी बोलणे चालू असेल तर माणसाचे मन अन्नाकारच होते. स्त्रीच्या लावण्याचे वर्णन चालू असेल, तर मन तेथेच तादात्म्य पावते. (१८)

**पदार्थवर्णन अघवें। किती म्हणोन सांगावें।**
**परंतु अंतरीं समजावें। होये किं नव्हे ॥ १९॥**

याप्रमाणे ज्या पदार्थाचे वर्णन करावे तेथे मन तादात्म्य पावते. त्याचे किती म्हणून वर्णन करणार? पण प्रत्येकाने आपल्या मनाशीच विचार करावा की, असे होते की नाही? (१९)

**जें जें देखिलें आणी ऐकिलें। तें अंतरीं सदृढ बैसलें।**
**हित अन्हित परीक्षिलें। परीक्षवंतीं ॥ २०॥**

जे जे माणूस पाहातो किंवा ऐकतो ते ते त्याच्या अंतरी सुदृढ होऊन बसते. म्हणून काय केल्याने हित होईल आणि काय केल्याने अनहित होईल, याची परीक्षा करून परीक्षावंताने ज्यायोगे हित होईल ते करावे. (२०)

**याकारणें सर्व सांडावें। येक देवास धुंडावें।**
**तरीच वर्म पडे ठावें। कांहींयेक ॥ २१॥**

म्हणून माणसाने इतर सर्व काही सोडून द्यावे आणि फक्त एका देवाचा शोध घ्यावा. म्हणजे त्याला यातील रहस्य थोडेफार कळून येईल. (२१)

नाना सुखें देवें केलीं । लोकें तयास चुकलीं ।
ऐसीं चुकतांच गेलीं । जन्मवरी ॥ २२ ॥

अनेक प्रकारची सुखे देवानेच उत्पन्न केली आहेत, पण लोकांना देवाचाच विसर पडतो. ही त्यांच्याकडून चूक होत असते. अशी चूक करीतच त्यांचा जन्म वाया जातो. (२२)

सर्व सांडून शोधा मजला । ऐसें देवचि बोलिला ।
लोकीं शब्द अमान्य केला । भगवंताचा ॥ २३ ॥

'सर्व सोडून मला शोधा' असे प्रत्यक्ष भगवंतांनीच सांगितले आहे. पण लोकांनी भगवंतांचाही शब्द मानला नाही. (२३)

म्हणोन नाना दुःखें भोगिती । सर्वकाळ कष्टी होती ।
मनीं सुखचि इछिती । परी तें कैंचें ॥ २४ ॥

म्हणूनच त्यांना नाना प्रकारचे दुःख सोसावे लागते आणि त्यामुळे ते सर्वकाळ कष्टी होतात. मनात तर त्यांना सुखाचीच इच्छा असते, पण ते कसे मिळणार? (२४)

उदंड सुख जया लागलें । वेडें तयास चुकलें ।
सुख सुख म्हणतांच मेलें । दुःख भोगितां ॥ २५ ॥

ज्या भगवंतापाशी उदंड सुख आहे. त्या भगवंताला वेडे लोक विसरतात. त्यामुळे सुख, सुख असे म्हणत असता दुःख भोगून मरून जातात. (२५)

शाहाण्यानें ऐसें न करावें । सुख होये तेंचि करावें ।
देवासी धुंडित जावें । ब्रह्मांडापरतें ॥ २६ ॥

म्हणून शहाण्या माणसाने असे चुकू नये. ज्यायोगे सुख होईल तेच करावे. ब्रह्मांडाच्याही पलीकडे जाऊन देवाला धुंडावे. . (२६)

मुख्य देवचि ठाईं पडिला । मग काये उणें तयाला ।
लोक वेडे विवेकाला । सांडून जाती ॥ २७ ॥

मुख्य देवाचीच एकदा प्राप्ती झाली की, मग त्याला सुखाला काय उणे पडणार आहे? वेडे लोक विवेकाला सोडून वागतात. (२७)

विवेकाचें फळ तें सुख । अविवेकाचें फळ तें दुःख ।
यांत मानेल तें अवश्यक । केलें पाहिजे ॥ २८ ॥

विवेकाचे फळ ते सुख होय आणि अविवेकाचे फळ ते दुःख होय. यांपैकी ज्याला जे हवे असेल ते मिळावे म्हणून जे करणे आवश्यक आहे, ते त्याने केले पाहिजे. (२८)

कर्तयासी वोळखावें । यास विवेक म्हणावें ।
विवेक सांडितां व्हावें । परम दुःखी ॥ २९ ॥

मुख्य कर्ता कोण हे ओळखणे यालाच विवेक म्हणतात. तो विवेक केला नाही, तर परम दुःखी व्हावे लागते. (२९)

आतां असो हें बोलणें । कर्त्यास वोळखणें ।
आपलें हित विचक्षणें । चुकों नये ॥ ३० ॥

असो. आता हे बोलणे राहू दे. विचारवंताने मुख्य कर्त्यास ओळखावे व आपले हित साधावे. यात चूक करू नये (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'प्रत्ययेविवरणनाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक १३ : समास ८

## कर्तानिरूपण

॥ श्रीराम ॥

श्रोता म्हणे वक्तयासी । कोण कर्ता निश्चयेंसीं ।
सकळ सृष्टि ब्रह्मांडासी । कोणें केलें ॥ १ ॥

श्रोत्याने वक्त्याला असा प्रश्न केला की, या सर्व सृष्टीला, ब्रह्मांडाला कोणी केले? या सर्वांचा कर्ता कोण हे निश्चयपूर्वक सांगावे. (१)

तंव बोलिले सभानायेक । जे बोलिके येकाहून येक ।
या बोलण्याचें कौतुक । श्रोतीं सादर ऐकावें ॥ २ ॥

हे ऐकून त्या सभेत बसलेले एकाहून एक हुशार लोक त्यांच्या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी पुढे सरसावले. त्यांच्या बोलण्याचे कौतुक श्रोत्यांनी सादर ऐकावे. (२)

**येक म्हणती कर्ता देव। येक म्हणती कोण देव।**
**आपुलाला अभिप्राव। बोलते जाले ॥ ३॥**

एक म्हणाला की, देव कर्ता आहे. त्यावर दुसरा कोणी विचारू लागला की, कोणता देव ? यावर प्रत्येकजण आपापला अभिप्राय व्यक्त करू लागले. (३)

**उत्तम मध्यम कनिष्ठ। भावार्थे बोलती पष्ट।**
**आपुलाली उपासना श्रेष्ठ। मानिती जनीं ॥ ४॥**

त्यांत उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ असे सर्व प्रकारचे लोक होते. ते आपापला भावार्थ स्पष्ट शब्दांत सांगू लागले. या जगात ज्याची जी उपासना असेल, तीच त्याला श्रेष्ठ वाटत असते. (४)

**कोणीयेक ऐसें म्हणती । कर्ता देव मंगळमूर्ती ।**
**येक म्हणती सरस्वती। सर्व करी ॥५॥**

कोणी म्हणू लागले की, मंगलमूर्ती गणेश हाच कर्ता देव आहे. तर दुसरा कुणी म्हणू लागला, सरस्वतीच सर्व काही करते. (५)

**येक म्हणती कर्ता भैरव। येक म्हणती खंडेराव।**
**येक म्हणती बीरेदेव। येक म्हणती भगवती ॥ ६॥**

कुणी भैरव, तर कुणी खंडेराव, तर कुणी बीरदेव, तर कुणी भगवती कर्ता आहे, असे म्हणू लागले. (६)

**येक म्हणती नरहरी। येक म्हणती बनशंकरी।**
**येक म्हणती सर्व करी। नारायेणु ॥७॥**

कुणी म्हणू लागले की, नरहरी कर्ता आहे, तर कुणी बनशंकरी सर्व करते म्हणू लागले, तर कुणी नारायण सर्व करतो असे म्हणाले. (७)

**येक म्हणती श्रीराम कर्ता। येक म्हणती श्रीकृष्ण कर्ता।**
**येक म्हणती भगवंत कर्ता। केशवराज ॥८॥**

एक म्हणू लागले की, श्रीराम कर्ता आहे, कोणी श्रीकृष्ण कर्त्ता, तर दुसरे कुणी भगवंत कर्ता अथवा केशवराज कर्ता, असे म्हणू लागले. (८)

**येक म्हणती पांडुरंग। येक म्हणती श्रीरंग।**
**येक म्हणती झोटिंग। सर्व करी ॥९॥**

कुणी पांडुरंग तर कुणी श्रीरंग, तर आणखी कुणी झोटींग सर्व करतो, असे म्हणू लागले. (९)

**येक म्हणती मुंज्या कर्ता। येक म्हणती सूर्य कर्ता।**
**येक म्हणती अग्न कर्ता। सकळ कांहीं ॥१०॥**

कुणी मुंज्या, तर कुणी सूर्य, तर कुणी अग्नीला सर्वांचा कर्ता म्हणू लागले. (१०)

**येक म्हणती लक्ष्मी करी। येक म्हणती मारुती करी।**
**येक म्हणती धरत्री करी। सर्व कांहीं ॥११॥**

कुणी म्हणाले की, लक्ष्मीने सर्व केले, तर कुणी म्हणाले की, मारुतीने सर्व केले. तर कुणी पृथ्वीने सर्व काही केले, असे मत व्यक्त केले. (११)

**येक म्हणती तुकाई। येक म्हणती येमाई।**
**येक म्हणती सटवाई। सर्व करी ॥१२॥**

कुणी तुकाईला, तर कुणी यमाईला, तर कुणी सटवाईला कर्ता ठरवले. (१२)

**येक म्हणती भार्गव कर्ता। येक म्हणती वामन कर्ता।**
**येक म्हणती परमात्मा कर्ता। येकचि आहे ॥१३॥**

एक म्हणू लागला भार्गव कर्ता, तर दुसरा म्हणू लागला की, वामन कर्ता. तर आणखी कुणी परमात्मा कर्ता असे म्हणू लागला. (१३)

**येक म्हणती विरणा कर्ता। येक म्हणती बस्वंणा कर्ता।**
**येक म्हणती रेवंणा कर्ता। सर्व कांहीं ॥१४॥**

एक म्हणू लागला वीरण्णा कर्ता, दुसरा म्हणू लागला की बसवण्णा कर्ता, तर आणखी कुणी रेवण्णाला कर्ता ठरविले. (१४)

**कोणी म्हणती खळया कर्ता। येक म्हणती स्वामी कार्तिक कर्ता।**
**येक म्हणती वेंकटेश कर्ता। सर्व कांहीं ॥१५॥**

कुणी खळनाथाला कर्ता ठरवले, तर कुणी कार्तिक स्वामीला कर्ता मानले, तर कुणी व्यंकटेशाने सर्व काही केले, असे प्रतिपादन केले. (१५)

**येक म्हणती गुरु कर्ता। येक म्हणती दत्त कर्ता।**
**येक म्हणती मुख्य कर्ता। वोढ्या जगन्नाथ ॥१६॥**

कुणी गुरूंना तर कुणी दत्तांना तर कुणी ओढ्या जगन्नाथाला कर्ता ठरविले. (१६)

**येक म्हणती ब्रह्मा कर्ता। येक म्हणती विष्णु कर्ता।**
**येक म्हणती महेश कर्ता। निश्चयेंसीं ॥१७॥**

एक म्हणू लागले की, ब्रह्मा कर्ता, दुसरे म्हणू लागले की विष्णू कर्ता, तर आणखी कुणी म्हणू लागले की, महेशच निश्चयपूर्वक कर्ता आहे. (१७)

येक म्हणती प्रजन्य कर्ता। येक म्हणती वायो कर्ता।
येक म्हणती करून अकर्ता। निर्गुण देव ॥ १८॥

कुणी पर्जन्याला, तर कुणी वायूला कर्ता ठरवले. कुणी निर्गुण देवच करून अकर्ता आहे, असे म्हणू लागले. (१८)

येक म्हणती माया करी। येक म्हणती जीव करी।
येक म्हणती सर्व करी। प्रारब्धयोग ॥ १९॥

कुणी माया सर्व करते म्हणू लागले, तर कुणी जीव सर्व करतो असे म्हणू लागले, तर कुणी प्रारब्धयोगच सर्व करतो, असे म्हणू लागले. (१९)

येक म्हणती प्रेत्न करी। येक म्हणती स्वभाव करी।
येक म्हणती कोण करी। कोण जाणे ॥ २०॥

कुणी प्रयत्नाला तर कुणी स्वभावाला कर्ता ठरवले. तर कुणी म्हणू लागले की, कोण कर्ता आहे कोण जाणे. (२०)

ऐसा कर्त्याचा विचार। पुसतां भरला बाजार।
आतां कोणाचें उत्तर। खरें मानावें ॥ २१॥

याप्रमाणे कर्त्यासंबंधी प्रश्न विचारला असता जणू बाजारच भरला. आता कुणाचे उत्तर खरे मानावे ? (२१)

जेहिं जो देव मानिला। कर्ता म्हणती तयाला।
ऐसा लोकांचा गल्बला। वोसरेना ॥ २२॥

ज्यांनी जो देव मानला, त्यांनी त्याला कर्ता ठरविले. असा लोकांचा गलबला झाला, तो काही केल्या थांबेना. (२२)

आपुलाल्या साभिमानें। निश्चयेचि केला मनें।
याचा विचार पाहाणे। घडेचिना ॥ २३॥

प्रत्येकाने आपापल्या दैवतांच्या अभिमानाने मनाने तोच कर्ता म्हणून निश्चय केला. पण यावर जास्त सखोल विचार कुणी करीनाच. (२३)

बहु लोकांचा बहु विचार। अवघा राहों द्या बाजार।
परंतु याचा विचार। ऐसा आहे ॥ २४॥

याप्रमाणे अनेक लोकांनी अनेक विचार मांडले. पण हा अवघा बाजार आता राहू दे. परंतु यासंबंधी खरा विचार असा आहे. (२४)

श्रोतीं व्हावें सावधान। निश्चयें तोडावा अनुमान।
प्रत्यये मानावा प्रमाण। जाणते पुरुषीं ॥ २५॥

श्रोत्यांनी आता सावधान व्हावे आणि कर्ता कोण हे निश्चयपूर्वक जाणून अनुमानाचा त्याग करावा. जाणत्या पुरुषांनी अनुभव हाच प्रमाणभूत मानावा. (२५)

जें जें कर्तयाने केलें। तें तें त्याउपरी जालें।
कर्त्यापूर्वीं आडळलें। न पाहिजे कीं ॥ २६॥

कर्ता जे जे करतो, ते त्याच्यानंतर उत्पन्न झालेले असते. ते कर्त्याच्या पूर्वी आढळून येता कामा नये. (२६)

केलें तें पंचभूतिक। आणि पंचभूतिक ब्रह्मादिक।
तरी भूतांशें पंचभूतिक। केलें तें घडेना ॥ २७॥

जे केलेले आहे ते सर्व पांचभौतिक आहे. आणि ब्रह्मादि देवही पांचभौतिकच आहेत. ते भूतांश आहेत तेव्हा त्यांनी पांचभौतिक निर्माण केले, असे होऊ शकत नाही. (२७)

पंचभूतांस वेगळें करावें। मग कर्त्यास वोळखावें।
पंचभूतिक तें स्वभावें। कर्त्यांत आलें ॥ २८॥

पंचमहाभूतांना वेगळे करून कर्त्याला ओळखले पाहिजे. पांचभौतिकापासून जे झालेले असते, त्या कार्यात पंचमहाभूते स्वाभाविकपणेच असतात. (२८)

पंचभूतांवेगळें निर्गुण। तेथें नाहीं कर्तेपण।
निर्विकारास विकार कोण। लाऊं शके ॥ २९॥

पंचमहाभूतांपेक्षा निर्गुण वेगळे आहे, पण निर्गुणाच्या ठिकाणी कर्तेपण असू शकत नाही. निर्विकारास विकार कोण लावू शकेल? (२९)

निर्गुणास कर्तव्य न घडे। सगुण जाल्यांत सांपडे।
आतां कर्तव्यता कोणेकडे। बरें पाहा ॥ ३०॥

निर्गुणाच्या ठिकाणी कर्तृत्व नसते आणि सगुण तर झालेल्यांत समाविष्ट होते. मग आता कर्तृत्व कोणाकडे जाते पहा बरे. (३०)

लटिक्याचा कर्ता कोण। हें पुसणेंचि अप्रमाण।
म्हणोन हेंचि प्रमाण। जें स्वभावेंचि जालें ॥ ३१॥

जे आभासात्मक आहे, त्याचा कर्ता कोण हे विचारणेच अयोग्य आहे. म्हणून हेच प्रमाण मानावे लागते की ते आपोआप झाले. (३१)

येक सगुण येक निर्गुण। कोठें लाऊं कर्तेपण।
या अर्थाचें विवरण। बरें पाहा ॥ ३२॥

एक सगुण आणि एक निर्गुण यांपैकी कुणाहीकडे कर्तेपण लावता येत नाही. या अर्थाचे आता स्पष्टीकरण पहा. (३२)

सगुणें सगुण केलें। तरी तें पूर्वींच आहे जालें।
निर्गुणास कर्तव्य लाविलें। न वचे कीं कदा ॥ ३३॥

सगुणाने सगुण केले असे म्हणता येत नाही. कारण ते तर पूर्वीच झालेले आहे. आणि निर्गुणाच्या ठिकाणी कधीही कर्तृत्व मानता येत नाही. (३३)

येथें कर्ताचि दिसेना। प्रत्यये आणावा अनुमाना।
दृश्य सत्यत्वें असेना। म्हणोनियां ॥ ३४॥

येथे कुणी कर्ताच दिसत नाही. म्हणून अनुभवाने अनुमान करून हे जाणून घ्यावे की दृश्य हे सत्यच नाही. (३४)

केलें तें अवघेंच लटिकें। तरी कर्ता हें बोलणेंचि फिकें।
वक्ता म्हणे रे विवेकें। बरें पाहा ॥ ३५॥

जे केले असे म्हटले जात आहे, ते सर्वच मिथ्या आहे. म्हणून त्याचा कर्ता या बोलण्याला अर्थच उरत नाही. वक्ता म्हणतो की, जरा नीट विचार करून पहा बरे. (३५)

बरें पाहातां प्रत्यये आला। तरी कां करावा गल्बला।
प्रचित आलियां आपणाला। अंतर्यामीं ॥ ३६॥

नीट विचार करून पाहिल्यावर प्रत्यय येतो, मग उगीच गलबला कशाला करावा? आपल्याला अंतर्यामी प्रचीती येते. (३६)

आतां असो हें बोलणें। विवेकी तोचि हें जाणें।
पूर्वपक्ष लगे उडवणें। येरवीं अनुर्वाच ॥ ३७॥

असो. आता हे बोलणे राहू दे. पूर्वपक्ष लटिका असतो. त्याचे खंडन करावेच लागते. अन्यथा हे सर्व अनिर्वचनीय आहे, हे विवेकी जाणतो. (३७)

तंव श्रोता करी प्रस्न। देहीं सुखदुःखभोक्ता कोण।
पुढें हेंचि निरूपण। बोलिलें असे ॥ ३८॥

यावर श्रोत्याने प्रश्न केला की, देहामध्ये सुखदुःखभोक्ता कोण असतो? तेव्हा याचे निरूपण पुढल्या समासात केले आहे, असे समर्थ सांगतात. (३८)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कर्तानिरूपणनाम' समास आठवा समाप्त.

❑ ❑

## दशक १३ : समास ९

## आत्मविवरण

॥ श्रीराम ॥

आत्मयास शेरीरयोगें। उद्वेग चिंता करणें लागे।
शरीरयोगें आत्मा जगे। हें तों प्रगटचि आहे ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आत्म्याला शरीराच्या योगाने उद्वेग, चिंता करावी लागते. शरीराच्या योगानेच आत्मा जगतो हे तर उघडच आहे. (१)

देह अन्नचि खायेना। तरी आत्मा कदापी जगेना।
आत्म्याविण चेतना। देहास कैंची ॥ २॥

देहाने जर अन्न खाल्ले नाही, तर आत्मा कधीही जगू शकत नाही. आणि आत्मा नसेल तर देहाच्या ठिकाणी चेतना राहू शकत नाही. (२)

हें येकावेगळें येक। करूं जातां निरार्थक।
उभयेयोगें कोणीयेक। कार्य चाले ॥ ३॥

देह आणि आत्मा यांना वेगळे करावे म्हटले, तर ते निरर्थक ठरते. या दोन्हींच्या सहकार्यानेच काही एक कार्य घडते. (३)

देहाला नाहीं चेतना। आत्म्यास पदार्थ उचलेना।
स्वप्नभोजनें भरेना। पोट कांहीं ॥ ४॥

देहाला चेतना नाही आणि आत्म्याला पदार्थ उचलता येत नाही. स्वप्नभोजनाने काही कोणाचे पोट भरत नाही. (४)

आत्मा स्वप्नअवस्थेंत जातो। परन्तु देहामध्यें हि असतो।
निदसुरेपणें खाजवितो। चमत्कार पाहा ॥ ५॥

आत्मा स्वप्नावस्थेत जातो, पण त्याच वेळी देहामध्येही असतो आणि अर्धवट झोपेत तो खाजवतोही. हा केवढा चमत्कार आहे पहा बरे. (५)

अन्नरसें वाढे शरीर। शरीरप्रमाणें विचार।
वृद्धपणीं तदनंतर। दोनी ल्हानाळती ॥ ६॥

अन्नरसाने शरीराची वाढ होते आणि शरीराबरोबरच विचारही वाढतो. वृद्धावस्थेत नंतर शरीर आणि विचार दोन्ही क्षीण होतात. (६)

उन्मत्त द्रव्य देह खातो। देहयोगें आत्मा भुलतो।
विस्मरणें शुद्धि सांडितो। सकळ कांहीं ॥ ७॥

देहाने उन्मत्त द्रव्याचे सेवन केले की देहाच्या योगाने आत्माही भुलतो आणि विस्मरणामुळे त्याला कशाचीही शुद्धी राहात नाही. (७)

देहानें घेतलें वीष। आत्मा जाये सावकास।
वाढणें मोडणें आत्मयास। नेमस्त आहे ॥ ८॥

देहाने विष घेतले, तर यथावकाश आत्मा देह सोडून जातो. वाढ आणि क्षय हे देहाच्या योगे आत्म्यालाही निश्चितपणे भोगावे लागतात. (८)

वाढणें मोडणें जाणें येणें। सुख दुःख देहाचेनि गुणें।
नाना प्रकारें भोगणें। आत्मयास घडे ॥ ९॥

वाढणे, मोडणे, जाणे, येणे आणि देहाच्या योगाने सुख-दुःखही नाना प्रकारे आत्म्याला भोगावे लागते. (९)

वारुळ म्हणिजे पोकळ। मुंग्यांचे मार्गचि सकळ।
तैसेंचि हें केवळ। शरीर जाणावें ॥ १०॥

वारूळ म्हणजे पोकळ. मुंग्यांचे मार्ग पोकळच असतात. तसेच केवळ हे शरीर जाणावे (१०)

शरीरीं नाडीचा खेटा। नाडीमध्यें पोकळ वाटा।
ल्हान थोर सगटा। दाटल्या नाडी ॥ ११॥

शरीरात नाड्यांचा गुंताडा असतो. त्या नाड्यांमध्ये पोकळ वाटा असतात. लहान-थोर सरसकट नाड्यांची दाटी झालेली आहे. (११)

प्राणी अन्नोदक घेतो। त्याचा अन्नरस होतो।
त्यास वायो प्रवर्ततो। स्वासोस्वासें ॥ १२॥

प्राणी अन्नोदक घेतो, त्याचाच अन्नरस होतो. त्याला वायू श्वासोच्छवासाच्या योगे प्रवर्तवितो. (१२)

नाडीद्वारां धांवे जीवन। जीवनामधें खेळे पवन।
त्या पवनासरिसा जाण। आत्माहि विवरे ॥ १३॥

नाड्यांच्या द्वारे अन्नरस सर्व शरीरभर पसरतो. त्या जीवनामध्ये वायू खेळत असतो आणि वायूप्रमाणेच आत्माही सर्वत्र विचरत असतो. (१३)

तृषेनें शोकलें शरीर। आत्म्यास कळे हा विचार।
मग उठवून शरीर। चालवी उदकाकडे ॥ १४॥

जर तहानेने शरीर सुकले तर हा विचार आत्म्याला कळतो. तो मग शरीरास उठवून उदकाकडे चालवितो. (१४)

उदक मागे शब्द बोलवी। मार्ग पाहोन शरीर चालवी।
शरीर अवघेंच हालवी। प्रसंगानुसार ॥ १५॥

शब्द बोलवून उदक मागतो. मार्ग पाहून शरीरास चालवतो. प्रसंगानुसार सर्व शरीराची आवश्यक हालचाल तो करतो. (१५)

क्षुधा लागते ऐसें जाणतो। मग देहाला उठवितो।
आच्यावाच्या बोलवितो। ज्यासीं त्यासीं ॥ १६॥

भूक लागली तर ते जाणून आत्माच देहाला उठवितो आणि ज्याला-त्याला अर्वाच्य बोलायला लावतो. (१६)

बायेकांत म्हणे जालें जालें। देह सोवळें करून आणिलें।
पायांत भरून चालविलें। तांतडीं तांतडीं ॥ १७॥

बायकोच्या शरीरातील जीवात्मा म्हणतो की झाले, झाले, जेवण तयार आहे. मग तो जीवात्मा देहाला सोवळे करून आणतो. तोच पायांत भरून त्यास भराभर भराभर चालवितो. (१७)

त्यासी पात्रावरी बैसविलें। नेत्रीं भरोन पात्र पाहिलें।
हाताकरवीं आरंभिलें। आपोशन ॥ १८॥

तोच पानावर आणून बसवितो. त्याच्या नेत्रांत भरून भोजनपात्र पाहतो आणि हाताकडून आपोष्णी घ्यावयास लावतो. (१८)

हाताकरवीं ग्रास उचलवी। मुखीं जाऊन मुख पसरवी।
दातांकरवीं चाववी। नेटें नेटें ॥ १९॥

तोच हाताकडून घास उचलवितो, मुखात जाऊन मुख पसरवितो, आणि दातांकडून नीटपणे अन्न चाववितो. (१९)

आपण जिव्हेमधें खेळे। पाहातो परिमळसोहळे।
केंस काडी खडा कळे। तत्काळ थुंकी ॥ २०॥

तो जीवात्माच जिव्हेमध्ये खेळून स्वाद घेतो. नाकाने सुवासाचे सुख भोगवितो. जर कदाचित अन्नात केस, काडी, खडा असल्याचे कळून आले की, तो तत्काळ थुंकतो. (२०)

**आळणी कळतां मीठ मागे। बायलेसि म्हणे आगे कांगे।**
**डोळे ताऊन पाहों लागे। रागें रागें ॥ २१॥**

पदार्थ अळणी झाला असेल, तर त्याला कळते व तो लगेच मीठ मागतो आणि बायकोला 'अगे कां गे' असे म्हणून रागारागाने तिच्याकडे डोळे वटारून पाहू लागतो. (२१)

**गोडी लागतांच आनंदे। गोड नस्तां परम खेदे।**
**वांकडी गोष्टी अंतरीं भेदे। आत्मयासी ॥ २२॥**

पदार्थ गोड लागला की, त्याला आनंद होतो. गोड नसेल, तर त्याला फार खेद होतो. एखादी गोष्ट त्याच्या मनासारखी झाली नाही, तर त्याला अंतर्यामी फार क्लेश होतात. (२२)

**नाना अन्नाची गोडी। नाना रसें स्वाद निवडी।**
**तिखट लागतां मस्तक झाडी। आणी खोंकी ॥२३॥**

नाना प्रकारच्या अन्नाची त्याला आवड असते. अनेक प्रकारच्या रसांचा स्वाद घेऊन तो आवडनिवड करतो. पदार्थ तिखट असेल, तर तो मस्तक झाडतो आणि ठसका लागल्यामुळे खोकू लागतो. (२३)

**मिरपुडी घातली फार। कायसें करितें खापर।**
**जिव्हेकरवीं कठिणोत्तर। बोलवी रागें ॥ २४॥**

'फार मिरपूड घातली आहेस' 'काय खापरासारखा पदार्थ करतेस' असे तो जिव्हेच्या द्वारे रागाने कठोर शब्द बोलवितो. (२४)

**आज्य उदंड जेविला। सवेंच तांब्या उचलिला।**
**घळघळां घेऊं लागला। सावकाश ॥ २५॥**

तुपातील पक्वान्न फार खाल्ल्याने त्याला खूप तहान लागते म्हणून तो स्वतःच हाताकडून तांब्या उचलवून घटाघटा पाणी पिऊ लागतो. (२५)

**देहीं सुखदुःखभोक्ता। तो येक आत्माचि पाहातां।**
**आत्म्याविण देह वृथा। मडें होये ॥ २६॥**

देहात सुखदुःखभोक्ता एक आत्माच असतो, आत्मा नसेल तर देहाचा काही उपयोग नाही. त्याचे मढे होते. (२६)

**मनाच्या अनंत वृत्ति। जाणणें तेचि आत्मस्थिती।**
**त्रैलोकीं जितुक्या वेक्ती। तदांतरीं आत्मा ॥ २७॥**

मनाच्या अनंत वृत्ती जी जाणते ती जाणीव म्हणजे आत्मा होय. त्रैलोक्यात जितक्या व्यक्ती आहेत त्या सर्व व्यक्तींच्या अंतर्यामी आत्मा असतो. (२७)

**जगामध्यें जगदात्मा। विश्वामधें विश्वात्मा।**
**सर्व चालवी सर्वात्मा। नाना रूपें ॥ २८॥**

जगामध्ये त्याला जगदात्मा म्हणतात. विश्वामध्ये त्याला विश्वात्मा म्हणतात. जो सर्वांना चालवितो, त्याला सर्वात्मा म्हणतात. अशी नाना रूपे तो घेतो. (२८)

**हुंगे चाखे ऐके देखे। मृद कठिण वोळखे।**
**शीत उष्ण ठाउकें। तत्काळ होये ॥ २९॥**

तोच हुंगतो, चाखतो, ऐकतो, पाहतो, मृदु-कठीण ओळखतो, शीत आणि उष्ण त्याला तत्काळ उमजते. (२९)

**सावधपणें लाघवी। बहुत करी उठाठेवी।**
**या धूर्तांच्या उगवी। धूर्तचि करी ॥ ३०॥**

सावधपणाने आणि चपळतेने तो अनेक उठाठेवी करतो. या धूर्त आत्म्याची परीक्षा धूर्तच करू शकतो. (३०)

**वायोसरिसा परिमळ येतो। परि तो परिमळ वितळोन जातो।**
**वायो धुळी घेऊनी येतो। परी तेहि जाये ॥ ३१॥**

वाऱ्याबरोबर सुगंध येतो, पण थोड्या वेळाने तो वितळून जातो. कधी कधी वाऱ्याबरोबर धूळही येते, पण तीही नंतर जाते. (३१)

**शीत उष्ण वायोसरिसें। सुवासें अथवा कुवासें।**
**असिजे परी सावकासें। तगणें न घडे ॥ ३२॥**

वाऱ्याबरोबर शीत, उष्ण, सुवास, दुर्गंध इत्यादी येतात, पण यथावकाश ते नाहीसे होतात. टिकून राहू शकत नाहीत. (३२)

**वायोसरिसे रोग येती। वायोसरिसी भूतें धांवती।**
**धूर आणी धुकटें येती। वायोसवें ॥ ३३॥**

वाऱ्याबरोबर रोग (जंतू) येतात. वायूबरोबर भूते धावतात. धूर आणि धुके इत्यादीही वाऱ्याबरोबर येतात. (३३)

**वायोसवें कांहींच जगेना। आत्म्यासवें वायो तगेना।**
**आत्म्याची चपळता जाणा। अधिक आहे ॥ ३४॥**

वायूबरोबर येणारे काहीच टिकून राहात नाही. आत्म्याबरोबर वायू बरोबरी करू शकत नाही. वायूपेक्षा आत्म्याची चपळता अधिक आहे. (३४)

वायो कठिणास आडतो। आत्मा कठिण भेदून जातो।
कठिण पाहों तरी तो। छेदेहिना ॥ ३५॥

कठीण पदार्थ मध्ये आला, तर वायू अडतो. पण आत्मा कठीण पदार्थास भेदून पलीकडे जातो. आत्म्याचा कठीणपणा पाहू गेले तर तो इतका कठीण आहे की, तो छेदलाही जात नाही. (३५)

वायो झडझडां वाजे। आत्मा कांहींच न वाजे।
मोनेंचि अंतरीं समजे। विवरोन पाहातां ॥ ३६॥

वायू झडझडा वाजतो. आत्मा जराही आवाज करीत नाही. मौन राहून अंतर्यामी त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला, तर त्याचे अनुसंधान करणाऱ्यास तो कळून येतो. (३६)

शरीरास बरें केलें। तें आत्मयास पावलें।
शरीरयोगें जालें। समाधान ॥ ३७॥

शरीरास सुख दिले तर ते आत्म्याला पावते. शरीराच्या योगेचे त्याला समाधान लाभते. (३७)

देहावेगळे उपाये नाना। करितां आत्मयास पावेना।
समाधान पावे वासना। देहाचेनि ॥ ३८॥

देहाशिवाय अनेक उपाय केले, तरी आत्म्यास पावत नाहीत. आत्म्याची जी वासना असेल, ती देहाच्या माध्यमाद्वारेच समाधान पावते. (३८)

देहआत्मयांचें कौतुक। पाहों जातां हें अनेक।
देहावेगळी आडणुक। आत्मयास होये ॥ ३९॥

देह आणि आत्मा यांच्या संयोगाचे कौतुक पाहू लागले तर अनेक प्रकारे ते दिसून येते. देह नसेल, तर सर्व बाजूने आत्म्याची अडवणूक होते. (३९)

येक असतां उदंड घडे। वेगळें पाहातां कांहींच न घडे।
विवेकें त्रैलोकीं पवाडे। देहात्मयोगें ॥ ४०॥

दोन्ही एकत्र असतात, तेव्हा उदंड कार्य घडते. ते वेगळे झाले, तर काहीच घडू शकत नाही. दोन्ही असतील तर विवेकाच्या बळावर त्रैलोक्याचा ठाव घेता येतो. (४०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मविवरणनाम' समास नववा समाप्त.

❑❑

## दशक १३ : समास १०

## सिकवणनिरूपण

॥ श्रीराम ॥

पालेमाळा सुमनमाळा। फळमाळा बीजमाळा।
पाषाणमाळा कवडेमाळा। सूत्रें चालती ॥ १॥

झाडाची पाने, फुले, फळे, बीजे, यांच्या, त्याचप्रमाणे पाषाण, कवड्या इत्यादींच्या माळा करतात. त्यात दोरी ओवलेली असते. (१)

स्फटिकमाळा मोहरेमाळा। काष्ठमाळा गंधमाळा।
धातुमाळा रत्नमाळा। जाळ्या वोलि चांदोवे ॥ २॥

परी हें तंतूनें चालतें। तंतू नस्तां विष्कळित होतें।
तैसें म्हणों आत्मयातें। तरी साहित्य न पडे ॥ ३॥

याखेरीज स्फटिकांच्या माळा, मोहरांच्या माळा, काष्ठमाळा, गंधमाळा, धातुमाळा, रत्नमाळा, तसेच जाळ्या, ओळी आणि चांदवे, इत्यादी सर्वांमध्ये दोरा ओवलेला असतो. म्हणून ते एकत्रित राहातात. तंतू नसेल, तर सर्व विस्कळित होऊन जाते. आत्म्याला त्या तंतूप्रमाणे म्हणावे, तर हा दृष्टांत योग्य नव्हे. (२-३)

तंतूस मणी वोविला। तंतूमध्येंचि राहिला।
आत्मा सर्वांगीं व्यापला। पाहाना कां ॥ ४॥

सर्व मण्यांमधून तंतू ओवलेला असतो, पण तो फक्त मध्यभागीच राहतो. आत्म्याचे तसे नाही. तो तर सर्वांगी व्यापून असतो. पहा ना. (४)

आत्मा चपळ सहजगुणें। दोरी काये चळों जाणे।
म्हणोन दृष्टांत देणें। साहित्य न घडे ॥ ५॥

आत्मा स्वाभाविकपणे चपळ असतो. दोरी काही चळून हालचाल करू शकत नाही. म्हणून हा दृष्टांत योग्य नव्हे. (५)

**नाना वल्लींत जळांश। उसांमध्ये दाटला रस।**
**परी तो रस आणी वाकस। येक नव्हे ॥ ६॥**

नाना वेलीत जलांश असतो. उसामध्येही रस दाटून भरलेला असतो. पण तो रस आणि चोयट्या एक नव्हेत. (६)

**देही आत्मा देह अनात्मा। त्याहून पर तो परमात्मा।**
**निरंजनास उपमा। असेचिना ॥ ७॥**

आत्मा देहांत राहणारा आहे, पण देह अनात्मा आहे. परमात्मा हा त्याहूनही पलीकडे आहे. त्या निरंजन परमात्म्यास देण्यास योग्य उपमाच नाही. (७)

**रायापासून रंकवरी। अवघ्या मनुष्यांचिया हारी।**
**सगट समान सरी। कैसी करावी ॥ ८॥**

राजापासून रंकापर्यंत अवघे सर्व मनुष्यमात्रच आहेत. पण म्हणून सर्वांना सरसकट एकसारखे लेखता येत नाही. (८)

**देव दानव मानव। नीच योनी हीन जीव।**
**पापी सुकृति अभिप्राव। उदंड आहे ॥ ९॥**

देव, दानव, मानव, नीच योनी, हीन जीव, पापी आणि पुण्यवान असे उदंड प्रकार आहेत. त्यांचा अभिप्राय वेगवेगळा आहे. (९)

**येकांशें जग चाले। परी सामर्थ्य वेगळालें।**
**येकासंगें मुक्त केलें। येकासंगें रवरव ॥ १०॥**

भगवंताच्या एकांशाने जग चालते. ईश्वराचा काही अंश जगास व्यापून आहे. हे खरे असले, तरी प्रत्येक व्यक्ती, पदार्थ यांचे सामर्थ्य वेगवेगळे आहे. एखाद्याच्या संगतीने मुक्त होता येते, तर दुसऱ्या एखाद्याच्या संगतीमुळे रौरव नरक प्राप्त होतो. (१०)

**साकर माती पृथ्वी होये। परी ते माती खातां न ये।**
**गरळ आप नव्हे काये। परी तें खोटें ॥ ११॥**

साखर आणि माती दोन्ही पृथ्वीतत्त्वाचीच रूपे आहेत. पण म्हणून माती खाता येत नाही. विषातही जलतत्त्वच असत नाही का? पण तो सारखेपणा खोटा आहे. (११)

**पुण्यात्मा आणी पापात्मा। दोहिंकडे अंतरात्मा।**
**साधु भोंदु सीमा। सांडूंच नये ॥ १२॥**

पुण्यात्मा आणि पापात्मा यांच्यामध्ये अंतरात्मा एकच आहे. पण म्हणून साधू आणि भोंदू ही सीमा ओलांडू नये. (१२)

**अंतर येक तों खरें। परी सांगातें घेऊं नये तीं माहारें।**
**पंडित आणि चाटें पोरें। येक कैसीं ॥ १३॥**

सर्वांचा अंतरात्मा एक आहे. हे खरे असले तरी महारास बरोबर घेऊन जेवणे योग्य नव्हे. विद्वान आणि वात्रट पोरे यांना समान कसे लेखता येईल? (१३)

**मनुष्य आणि गधडे। राजहंस आणि कोंबडें।**
**राजे आणि माकडें। येक कैसीं ॥ १४॥**

मनुष्य आणि गाढव, राजहंस आणि कोंबडा, राजे आणि माकडे यांना एक कसे म्हणावे? (१४)

**भागीरथीचें जळ आप। मोरी संवदणी तेंहि आप।**
**कुश्चिळ उदक अल्प। सेववेना ॥ १५॥**

भागीरथीचे जल तेही पाणी आणि मोरीतील किंवा डबक्यातील पाणी तेही पाणीच, पण म्हणून घाणेरडे पाणी थोडेसुद्धा सेवन करता येत नाही. (१५)

**याकारणें आचारशुद्ध। त्याउपरी विचारशुद्ध।**
**वीतरागी आणि सुबुद्ध। ऐसा पाहिजे ॥ १६॥**

म्हणून माणसाचा आचार शुद्ध हवा, त्यापेक्षाही विचार शुद्ध हवेत आणि तो अनासक्त आणि सुबुद्ध असाच असायला हवा. (१६)

**शूरांहून मानिलें लंडी। तरी युद्धप्रसंगीं नरकांडी।**
**श्रीमंत सांडून बराडीं। सेवितां कैसें ॥ १७॥**

समजा, एखाद्या भित्र्या माणसाला शूरापेक्षा अधिक श्रेष्ठ मानले, तर युद्धाच्या प्रसंगी फजितीच होईल. श्रीमंतांची सेवा करायची सोडून दरिद्री माणसाची सेवा करणे कसे योग्य ठरेल? (१७)

**येका उदकें सकळ जालें। परी पाहोन पाहिजे सेविलें।**
**सगट अवघेंच घेतलें। तरी तें मूर्खपण ॥ १८॥**

एका उदकामुळेच सर्व काही उत्पन्न होते. पण म्हणून योग्य, अयोग्य पाहूनच त्या वस्तूचे सेवन केले पाहिजे. सरसकट सर्वच घेणे हा मूर्खपणा आहे. (१८)

**जीवनाचेंच जालें अन्न। अन्नाचें जालें वमन।**
**परी वमनाचें भोजन। करितां न ये ॥ १९॥**

पाण्याचेच अन्न होते. पण त्या अन्नाची ओक झाली, तर त्या ओकीचे भोजन करताच येत नाही. (१९)

**तैसें निंद्य सोडून द्यावें। वंद्य तें हृदईं धरावें।**
**सत्कीर्तीनें भरावें। भूमंडळ ॥ २०॥**

त्याप्रमाणेच जे निंद्य आहे, ते सोडून द्यावे. जे वंद्य असेल, ते हृदयात धारण करावे आणि सत्कीर्तीने भूमंडळ भरून टाकावे. (२०)

**उत्तमांसि उत्तम माने। कनिष्ठांस तें न माने।**
**म्हणौन करंटे देवानें । करून ठेवले ॥ २१॥**

उत्तम लोकांना उत्तमच आवडते. कनिष्ठांना उत्तम मान्य होत नाही. म्हणूनच देवाने त्यांना भाग्यहीन करून ठेवलेले असते. (२१)

**सांडा अवघें करंटपण। धरावें उत्तम लक्षण।**
**हरिकथा पुराण श्रवण। नीति न्यायें ॥ २२॥**

म्हणून श्रीसमर्थ सर्वांना सांगत आहेत की, लोकांनी सर्व करंटेपणा सोडून द्यावा आणि उत्तम लक्षणे आत्मसात करावीत. त्यांनी हरिकथा, पुराणे यांचे श्रवण करावे आणि नीति-न्यायाने वागावे. (२२)

**वर्तायाचा विवेक। राजी राखणें सकळ लोक।**
**हळुहळु पुण्यश्लोक। करीत जावे ॥ २३॥**

विचारपूर्वक वागून सर्व लोकांना राजी राखावे आणि हळूहळू त्यांना पुण्याच्या मार्गाकडे वळवावे. (२३)

**मुलाचे चालीनें चालावें। मुलाच्या मनोगतें बोलावें।**
**तैसें जनास सिकवावें। हळुहळु ॥ २४॥**

मुलाशी वागताना जसे आपण मुलाच्या चालीने चालतो, त्याचे मनोगत ओळखून बोलतो, त्याप्रमाणेच लोकांचे मनोगत जाणून त्यांच्या कलाकलाने घेऊन त्यांना हळूहळू शिकवावे. (२४)

**मुख्य मनोगत राखणें। हेंचि चातुर्याचीं लक्षणें।**
**चतुर तो चतुरांग जाणे। इतर तीं वेडीं ॥ २५॥**

लोकांचे मनोगत राखणे हेच चातुर्याचे लक्षण आहे. जो चतुर असतो, तो चतुराचे हे अंग जाणतो. इतर लोक वेडेच असतात. (२५)

**वेड्यास वेडें म्हणों नये। वर्म कदापि बोलों नये।**
**तरीच घडे दिग्विजये। निस्पृहासी ॥ २६॥**

पण वेड्या माणसाला कधीही वेडे म्हणू नये. चारचौघांमध्ये एखाद्याचे वर्म कधी बोलू नये. असे वागले, तरच निःस्पृह माणसाला यश प्राप्त होते.(२६)

**उदंड स्थळीं उदंड प्रसंग। जाणोनि करणें येथासांग।**
**प्राणिमात्रांचा अंतरंग। होऊन जावें ॥ २७॥**

अनेक स्थळी निरनिराळ्या प्रसंगांना तोंड द्यावे लागते. त्या वेळी वेळप्रसंग ओळखून त्या प्रसंगास अनुसरून यथायोग्य आचरण करावे लागते. म्हणून प्राणिमात्रांच्या अंतरंगाशी एकरूप होऊन जावे. (२७)

**मनोगत राखोन जातां। परस्परें होये अवस्ता।**
**मनोगत तोडितां, वेवस्ता। बरी नाहीं ॥ २८॥**

यात्रमाणे मनोगत राखून जरी ती व्यक्ती दूर गेली, तरी लोकांना परतभेटीची उत्कंठा लागून राहते. मनोगत राखले नाही, तर लोकसंग्रह होऊ शकत नाही. (२८)

**याकारणें मनोगत। राखेल, तो मोठा महंत।**
**मनोगत राखतां समस्त। वोढोन येती ॥ २९॥**

म्हणून जो मनोगत राखतो, तोच श्रेष्ठ महंत जाणावा. लोकांचे मनोगत राखले की, समस्त लोक त्याच्याकडे आकर्षित होतात. (२९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सिकवणनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक तेरावा समाप्त.**



# दशक चौदावा : अखंड ध्यान

## दशक १४ : समास १

### निस्पृहलक्षण

॥ श्रीराम ॥

ऐका निस्पृहाची सिकवण। युक्ति बुद्धि शहाणपण।
जेणें राहे समाधान। निरंतर ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, नि:स्पृहाची शिकवण आता ऐका. त्याच्या ठिकाणी युक्ती, बुद्धी, शहाणपण या गोष्टी असणे आवश्यक आहे. त्यायोगेच निरंतर समाधान राहते. (१)

सोपा मंत्र परी नेमस्त। साधें वोषध गुणवंत।
साधें बोलणें सप्रचीत। तैसें माझें ॥ २॥

मंत्र सोपा आहे, पण प्रतीती देणारा आहे. औषध साधे असावे, पण ते गुण देणारे असावे. तसे माझे बोलणे साधे असले, तरी प्रचीतीचे आहे. (२)

तत्काळचि अवगुण जाती। उत्तम गुणाची होये प्राप्ती।
शब्दवोषध तीव्र श्रोतीं। साक्षपें सेवावें ॥ ३॥

याने अवगुण तत्काळ जातात आणि उत्तम गुणांची प्राप्ती होते. म्हणून हे तीव्र शब्दरूप औषध श्रोत्यांनी आग्रहाने सेवावे (३)

निस्पृहता धरूं नये। धरिली तरी सोडूं नये।
सोडिली तरी हिंडों नये। वोळखीमधें ॥ ४॥

आधी नि:स्पृहता धरू नये आणि एकदा धरली तर सोडू नये. समजा यदाकदाचित सोडली तर निदान ओळखीच्या लोकांमध्ये हिंडू नये. (४)

कांता दृष्टी राखों नये। मनास गोडी चाखऊं नये।
धारिष्टि चळतां दाखऊं नये। मुख आपुलें ॥ ५॥

स्त्रियांकडे दृष्टी जाऊ देऊ नये. मनास विषयाची गोडी चाखवू नये. समजा धारिष्ट चळले, तर तेथून सरळ निघून जावे. कुणाला आपले तोंड दाखवू नये. (५)

येके स्थळीं राहों नये। कानकोंडें साहों नये।
द्रव्य दारा पाहों नये। आळकेपणें ॥ ६॥

एका स्थळी जास्त दिवस राहू नये. लोकांचे मिंधेपण सहन करू नये. हावरटपणाने द्रव्य आणि स्त्रिया यांच्याकडे पाहू नये. (६)

आचारभ्रष्ट होऊं नये। दिल्यां द्रव्य घेऊं नये।
उणा शब्द येऊं नये। आपणावरी ॥ ७॥

आचारभ्रष्ट होऊ नये. कुणी द्रव्य देऊ लागले तरी घेऊ नये. आपल्यावर उणा शब्द येऊ देऊ नये. (७)

भिक्षेविषीं लाजों नये। बहुत भिक्षा घेऊं नये।
पुसतांहि देऊं नये। वोळखी आपली ॥ ८॥

भिक्षा मागण्यास लाजू नये. जरुरीपेक्षा जास्त भिक्षा घेऊ नये. कुणी विचारले तरी आपली ओळख देऊ नये. (८)

धड मळिण नेसों नये। गोड अन्न खाऊं नये।
दुराग्रह करूं नये। प्रसंगें वर्तावें ॥ ९॥

धड व स्वच्छ वस्त्र नेसावे. गोड अन्न खाऊ नये. कुठल्याही बाबतीत दुराग्रह धरू नये. प्रसंग पाहून यथायोग्य वर्तन करावे. (९)

भोगीं मन असों नये। देहदु:खें त्रासों नये।
पुढें आशा धरूं नये। जीवित्वाची ॥ १०॥

भोगाच्या ठिकाणी मन आसक्त असू नये. देहदु:ख प्राप्त झाले असता त्रासू नये. पुढे जीवित्वाची आशा धरू नये. (१०)

विरक्ती गळों देऊं नये। धारिष्टि चळों देऊं नये।
ज्ञान मळिण होऊं नये। विवेकबळें ॥ ११॥

विरक्ती कधी कमी होऊ देऊ नये. धारिष्ट कधी सोडू नये. विवेकाच्या बळावर ज्ञान कधी मलिन होऊ देऊ नये. (११)

करुणाकीर्तन सोडूं नये। अंतर्ध्यान मोडूं नये।
प्रेमतंतु तोडूं नये। सगुणमूर्तीचा ॥ १२॥

कीर्तन करून देवाला आळवणे कधी सोडू नये. अंतर्यामी भगवंताचे ध्यान केल्याशिवाय कधी राहू नये. सगुण मूर्तीच्या ठिकाणी जडलेला प्रेमाचा धागा कधी तोडू नये. (१२)

पोटीं चिंता धरूं नये। कष्टें खेद मानूं नये।
समईं धीर सांडूं नये। कांहीं केल्यां ॥ १३॥

पोटात कुठलीही चिंता करू नये. कष्ट झाले तरी खेद मानू नये. कुठलाही कठीण प्रसंग ओढवल्यावरही काही झाले तरी धीर सोडू नये. (१३)

अपमानितां सिणों नये। निखंदितां कष्टों नये।
धि:कारितां झुरों नये। कांहीं केल्या ॥ १४॥

कुणी अपमान केला तर शीण मानू नये. कुणी निंदा केली तरी कष्टी होऊ नये. कुणी धिक्कार केला तरी मनातल्या मनात झुरू नये. (१४)

लोकलाज धरूं नये। लाजवितां लाजों नये।
खिजवितां खिजों नये। विरक्त पुरुषें ॥ १५॥

लोकांची लाज धरू नये. त्यांनी मुद्दाम लाजवण्याचा प्रयत्न केला तरी लाजू नये. खिजवायचा, चिडविण्याचा प्रयत्न केला तरी विरक्त पुरुषाने चिडू नये. (१५)

शुद्धमार्ग सोडूं नये। दुर्जनासीं तंडों नये।
समंध पडों देऊं नये। चांडाळासी ॥ १६॥

शुद्ध आचरणाचा मार्ग सोडू नये. दुर्जन माणसाशी वादविवाद, भांडण करू नये. नीच माणसाशी शक्यतो संबंधच येऊ देऊ नये. (१६)

तपीळपण धरूं नये। भांडवितां भांडों नये।
उडवितां उडऊं नये। निजस्थिती आपुली ॥ १७॥

तापटपणा करू नये. कुणी मुद्दाम भांडण लावून देण्याचा प्रयत्न केला तरी आपण भांडू नये. आपली निजस्थिती उडवून देण्याचा कुणी प्रयत्न केला तरी ती उडवून देऊ नये. (१७)

हांसवितां हासों नये। बोलवितां बोलों नये।
चालवितां चालों नये। क्षणक्षणा ॥ १८॥

कुणी हसविण्याचा प्रयत्न केला, तर उगीचच्या उगीच आपण हसू नये. मुद्दाम कुणी बोलते करण्याचा प्रयत्न केला तरी बोलू नये. क्षणोक्षणी लोक चालवतील तसे चालू नये. (१८)

येक वेष धरूं नये। येक साज करूं नये।
येकदेसी होऊं नये। भ्रमण करावें ॥ १९॥

नेहमी एकच वेष करू नये. वागण्याची एकच ठेवण असू नये. एकदेशी राहू नये. नित्य भ्रमण करीत असावे. (१९)

सलगी पडों देऊं नये। प्रतिग्रह घेऊं नये।
सभेमध्यें बैसों नये। सर्वकाळ ॥ २०॥

कुणाशीही सलगी करू नये. दान कधी घेऊ नये. सदासर्वकाळ लोकसमुदायात बसू नये. (२०)

नेम आंगीं लाऊं नये। भरवसा कोणास देऊं नये।
अंगीकार करूं नये। नेमस्तपणाचा ॥ २१॥

कुठलाही नेम अंगी लावून घेऊ नये. कुणाला जामीन राहू नये. नियमितपणाच्या बंदिस्त राहू नये. (२१)

नित्यनेम सांडूं नये। अभ्यास बुडों देऊं नये।
परतंत्र होऊं नये। कांहीं केल्या ॥ २२॥

आपला नित्यनेम कधी सोडू नये. रोजच्या रोज अभ्यास करावा. त्यात चूक होऊ देऊ नये. काहीही झाले तरी परतंत्र होऊ नये. (२२)

स्वतंत्रता मोडूं नये। निरापेक्षा तोडूं नये।
परापेक्षा होऊं नये। क्षणक्षणा ॥ २३॥

आपली स्वतंत्रता जतन करावी. नेहमी निरपेक्ष असावे. आणि क्षणाक्षणाला दुसरा मदत करील, ही अपेक्षा कधी करू नये. (२३)

वैभव दृष्टीं पाहों नये। उपाधीसुखें राहों नये।
येकांत मोडूं देऊं नये। स्वरूपस्थितीचा ॥ २४॥

आपल्या दृष्टीने लोकांचे ऐश्वर्य कधी पाहू नये. उपाधीचे कधी सुख मानून एकाच स्थळी राहू नये. आपल्या निजस्थितीच्या एकांताचा कधी भंग होऊ देऊ नये. (२४)

अनर्गळता करूं नये। लोकलाज धरूं नये।
कोठेंतरी होऊं नये। आसक्त कदा ॥ २५॥

कधीही उच्छृंखलता, स्वेच्छाचार करू नये. लोकांची भीड, लाज बाळगू नये. कधीही, कोठेही आसक्त होऊ नये. (२५)

परंपरा तोडूं नये। उपाधी मोडूं देऊं नये।
ज्ञानमार्ग सोडूं नये। कदाकाळीं ॥ २६॥

परंपरेचे रक्षण करावे. उपासनेची उपाधी कधी सोडू नये आणि कधीही ज्ञानमार्गाचा त्याग करू नये. (२६)

कर्ममार्ग सांडूं नये। वैराग्य मोडूं देऊं नये।
साधन भजन खंडूं नये। कदाकाळीं ॥ २७॥

कर्ममार्गाचे यथासांग आचरण करावे. आपले वैराग्य नेहमी जतन करावे. साधनात आणि भजनात कधीही खंड पडू देऊ नये. (२७)

अतिवाद करूं नये। अनित्य पोटीं धरूं नये।
रागें भरीं भरों नये। भलतीकडे ॥ २८॥

अतिवाद करू नये. अन्याय पोटी धरू नये. रागाच्या भरीला पडून भलतीकडे वाहात जाऊ नये. (२८)

न मनी त्यास सांगों नये। कंटाळवाणें बोलों नये।
बहुसाल असों नये। येकेस्थळीं ॥ २९॥

जो आपले ऐकत नसेल, त्याला सांगायला जाऊ नये. लोकांना कंटाळवाणे वाटेल असे बोलू नये. एकाच स्थळी अनेक वर्षे राहू नये. (२९)

कांहीं उपाधी करूं नये। केली तरी धरूं नये।
धरिली तरी सांपडों नये। उपाधीमधें ॥ ३०॥

काही उपाधी करू नये. केली, तरी तिलाच धरून राहू नये. समजा धरली तरी त्या उपाधीतच कायम गुंतून राहू नये. (३०)

थोरपणें असों नये। महत्त्व धरून बैसों नये।
कांहीं मान इच्छूं नये। कोठेंतरी ॥ ३१॥

आपण कुणी थोर व्यक्ती आहोत अशी भावना मनात बाळगू नये. आपलेच महत्त्व धरून बसू नये. कुठेही कोणाकडूनही मानाची इच्छा करू नये. (३१)

साधेपण सोडूं नये। सानेपण मोडूं नये।
बळात्कारें जोडूं नये। अभिमान आंगीं ॥ ३२॥

आपला साधेपणा सोडू नये. लहानपणा मोडू नये. आणि बळेच अंगी अभिमान येऊ देऊ नये. (३२)

अधिकारेंवीण सांगों नये। दाटून उपदेश देऊं नये।
कानकोंडा करूं नये। परमार्थ कदा ॥ ३३॥

आपला अधिकार असल्याशिवाय कुणाला काही सांगायला जाऊ नये. एखाद्याला त्याची इच्छा नसता उपदेश देऊ नये. मिंधेपणाने कधी परमार्थ करू नये. (३३)

कठिण वैराग्य सोडूं नये। कठिण अभ्यास सांडूं नये।
कठिणता धरूं नये। कोणेकेविशइं ॥ ३४॥

प्रखर वैराग्य असावे. कठीण वाटला तरी अभ्यास कधी सोडू नये. कोणाशीही कठोरपणे वागू नये. (३४)

कठिण शब्द बोलों नये। कठिण आज्ञा करूं नये।
कठिण धीरत्व सोडूं नये । कांहीं केल्या ॥ ३५॥

कुणाला कठोर शब्द बोलू नये. पालन करण्यास अवघड अशी आज्ञा कुणाला करू नये. कुठल्याही प्रसंगी आपले कठीण धैर्य सोडू नये. (३५)

आपण आसक्त होऊं नये। केल्यावीण सांगों नये।
बहुसाल मागों नये। शिष्यवर्गासी ॥ ३६॥

आपण कुठेही आसक्त होऊ नये. आपण स्वत: केल्याशिवाय एखादी गोष्ट दुसऱ्या कुणाला करण्यास सांगू नये. आपल्या शिष्यवर्गाकडून कधीही काही मागू नये. (३६)

उद्धट शब्द बोलों नये। इंद्रियें स्मरण करूं नये।
शाक्तमार्गें भरों नये। मुक्तपणें भरीं ॥ ३७॥

कधीही उद्धट शब्द बोलू नये. इंद्रियांनी विषयांचे स्मरण करू नये. मुक्तपणाचा अभिमान धरून स्वेच्छाचाराचे वर्तन कधी करू नये. (३७)

नीच कृतीं लाजों नये। वैभव होतां माजों नये।
क्रोधें भरीं भरों नये। जाणपणें ॥ ३८॥

हलके काम करायला लाजू नये. वैभव प्राप्त झाले असता माजू नये. विचाराने वागावे आणि क्रोधाच्या अधीन कधी होऊ नये. (३८)

थोरपणें चुकों नये। न्याये नीति सांडूं नये।
अप्रमाण वर्तों नये। कांहीं केल्यां ॥३९॥

आपल्याला कोण विचारणार आहे, या मोठेपणाच्या आढ्यतेने चुकीचे आचरण करू नये. न्यायनीती यांचा कधी त्याग करू नये. कुठल्याही परिस्थितीत अयोग्य वर्तन करू नये. (३९)

कळल्यावीण बोलों नये। अनुमानें निश्चये करूं नये।
सांगतां दुःख धरूं नये। मूर्खपणें ॥ ४० ॥

एखादा विषय स्वतःला नीट कळल्याशिवाय त्यासंबंधी बोलू नये. केवळ कल्पनेने एखाद्या गोष्टीसंबंधी निश्चयपूर्वक विधान करू नये. आपल्याला कुणी काही चांगले सांगू लागले, तर ते नीट ऐकून घ्यावे. मूर्खपणाने दुःख मानू नये. (४०)

सावधपण सोडूं नये। व्यापकपण सांडूं नये।
कदा सुख मानूं नये। निसुगपणाचें ॥ ४१ ॥

सावधपण कधी सांडू नये. मनाचे व्यापकपण कधी सांडू नये. आळसाचे कधी सुख मानू नये. (४१)

विकल्प पोटीं धरूं नये। स्वार्थआज्ञा करूं नये।
केली तरी टाकूं नये। आपणास पुढें ॥ ४२ ॥

कुणाविषयीही मनात विकल्प येऊ देऊ नये. आपला स्वार्थ साधण्यासाठी दुसऱ्याला आज्ञा करू नये. समजा, अपरिहार्य परिस्थितीत आज्ञा केली, तर तिने सर्वांचेच काम साधेल असे पाहावे. (४२)

प्रसंगेंवीण बोलों नये। अन्वयेंवीण गाऊं नये।
विचारेंवीण जाऊं नये। अविचारपंथें ॥ ४३ ॥

प्रसंग पडल्याशिवाय उगीच बोलू नये. आग्रहाशिवाय गाऊ नये. विचार न करता अयोग्य मार्गाने जाऊ नये. (४३)

परोपकार सांडूं नये। परपीडा करूं नये।
विकल्प पडों देऊं नये। कोणीयेकासी ॥ ४४ ॥

परोपकार केल्याखेरीज राहू नये. परपीडा कधी करू नये. लोकांच्यात वितुष्ट निर्माण होईल असे काही करू नये. (४४)

नेणपण सोडूं नये। महंतपण सांडूं नये।
द्रव्यासाठीं हिंडों नये। कीर्तन करीत ॥ ४५ ॥

आपल्याला सर्व कळते असे कधी मानू नये, पण महंतपणाला बाधा येऊ देऊ नये. द्रव्यासाठी गावोगाव कीर्तन करीत हिंडू नये. (४५)

संशयात्मक बोलों नये। बहुत निश्चये करूं नये।
निर्वाहेंवीण धरूं नये। ग्रंथ हातीं ॥ ४६ ॥

संशयात्मक कधी बोलू नये. उगीचच अनेक निश्चय करू नयेत. समजावून सांगण्याचे सामर्थ्य असल्याशिवाय लोकांपुढे ग्रंथ वाचू नये. (४६)

जाणपणें पुसों नये। अहंभाव दिसों नये।
सांगेन ऐसें म्हणों नये। कोणीयेकासी ॥ ४७ ॥

परीक्षा पाहण्यासाठी कुणाला काही विचारू नये. आपल्या मोठेपणाचे प्रदर्शन करू नये. कुणाला काही सांगेन असे खोटे आश्वासन देऊ नये. (४७)

ज्ञानगर्व धरूं नये। सहसा छळणा करूं नये।
कोठें वाद घालूं नये। कोणीयेकासीं ॥ ४८ ॥

ज्ञानाचा गर्व धरू नये. सहसा कुणाची टवाळी करू नये. कुठेही उगीच कोणाशी वाद घालीत बसू नये. (४८)

स्वार्थबुद्धी जडों नये। कारबारीं पडों नये।
कार्येकर्ते होऊं नये। राजद्वारीं ॥ ४९ ॥

स्वार्थ-बुद्धी जडू देऊ नये. राजद्वारी कार्यकर्ते होऊन कुठल्याही कारभारात पडू नये. (४९)

कोणास भर्वसा देऊं नये। जड भिक्षा मागों नये।
भिक्षेसाठी सांगों नये। परंपरा आपुली ॥ ५० ॥

कोणाला उगीच आश्वासने देऊ नये. जड भिक्षा कधी मागू नये आणि भिक्षा मिळावी यासाठी आपली गुरुपरंपरा कधी सांगू नये (५०)

सोइरिकींत पडों नये। मध्यावर्ति घडों नये।
प्रपंचाची जडों नये। उपाधी आंगीं ॥ ५१ ॥

कुठेही सोयरिकीत पडू नये. मध्यस्थी कधी करू नये. प्रपंचाची उपाधी कधी अंगी जडू देऊ नये. (५१)

प्रपंचप्रस्तीं जाऊं नये। बाष्कळ अन्न खाऊं नये।
पाहुण्यासरिसें घेऊं नये। आमंत्रणें कदां ॥ ५२ ॥

प्रपंचाचे जेथे प्रस्थ असेल, तेथे जाऊ नये. अपवित्र अन्न खाऊ नये. पाहुण्याबरोबर कोणाची आमंत्रणे घेऊ नयेत. ( ५२)

श्राध पक्ष सटी सामासें। शांती फळशोबन बारसें।
भोग राहाण बहुवसें। नवस व्रतें उद्यापनें ॥ ५३ ॥

श्राद्ध, पक्ष, सटी, सहामास, शांती, फळशोभन, बारसे, भोग, राहाण, नवस, व्रते, उद्यापने, (५३)

तेथें निस्पृहें जाऊं नये। त्याचें अन्न खाऊं नये।
येळिल्वाणें करूं नये। आपणासी ॥ ५४ ॥

जेथे याप्रमाणे संस्कार सुरू असतील, तेथे निःस्पृहाने कधी जाऊ नये आणि त्या माणसाचे अन्नही कधी खाऊ नये. स्वतःला त्याने अशुद्ध, संस्काररहित, अपवित्र करून घेऊ नये. (५४)

लग्नमुहूर्ती जाऊं नये। पोटासाठीं गाऊं नये।
मोलें कीर्तन करूं नये। कोठेंतरी ॥ ५५ ॥

कुणाच्याही घरी लग्नमुहूर्ताच्या वेळी जाऊ नये. पोटासाठी कधी गाऊ नये. कोठेही बिदागी ठरवून कधी कीर्तन करू नये. (५५)

आपली भिक्षा सोडूं नये। वारें अन्न खाऊं नये।
निस्पृहासि घडों नये। मोलयात्रा ॥ ५६ ॥

आपले भिक्षा मागणे कधी सोडू नये. वार लावून तेथील अन्न खाऊ नये. दुसऱ्याच्या पैशाने होणारी यात्रा नि:स्पृहाने कधी करू नये. (५६)

मोलें सुकृत करूं नये। मोलपुजारी होऊं नये।
दिल्हा तरी घेऊं नये। इनाम निस्पृहें ॥ ५७ ॥

दक्षिणा ठरवून कधी पुण्यकर्म करू नये. कधी पगारी पुजारी बनू नये. दुसऱ्याने इनाम देऊ केले तरी नि:स्पृहाने ते घेऊ नये. (५७)

कोठें मठ करूं नये। केला तरी तो धरूं नये।
मठपती होऊन बैसों नये। निस्पृह पुरुषें ॥ ५८ ॥

नि:स्पृहाने कोठेही मठ करू नये. केला तरी तो धरून राहू नये. नि:स्पृह पुरुषाने कधीही मठपती होऊन बसू नये (५८)

निस्पृहें अवघेंचि करावें। परी आपण तेथें न संपडावें।
परस्परें उभारावें। भक्तिमार्गासी ॥ ५९ ॥

नि:स्पृहाने सर्व काही करावे, पण आपण त्यात गुंतू नये. परस्पर दुसऱ्याकडून भक्तिमार्गाचा प्रचार करावा. तो वाढवावा. (५९)

प्रत्नेंविण राहों नये। आळस दृष्टी आणूं नये।
देह अस्तां पाहों नये। वियोग उपासनेचा ॥ ६० ॥

त्याने प्रयत्न केल्याशिवाय कधी राहू नये. कधी आळस दृष्टीपुढे आणू नये. जोपर्यंत देह आहे तोपर्यंत त्याने उपासनेला कधी सोडू नये. (६०)

उपाधीमध्यें पडों नये। उपाधी आंगीं जडों नये।
भजनमार्ग मोडूं नये। निसंगळपणें ॥ ६१ ॥

त्याने कधी उपाधीमध्ये पडू नये. उपाधी मध्ये गुंतू नये. आणि अव्यवस्थितपणामुळे भजनमार्ग सोडू नये. (६१)

बहुउपाधी करूं नये। उपाधीविण कामा नये।
सगुणभक्ति सोडूं नये। विभक्ति खोटी ॥ ६२ ॥

फार उपाधी करू नये. पण उपाधीच करायची नाही असेही होऊ देऊ नये. त्याने सगुणभक्ती कधी सोडू नये. भगवंताशी द्वैत अथवा वेगळेपणा नसावा. तसा असणे योग्य नव्हे. (६२)

बहुसाल धांवों नये। बहुसाल राहों नये।
बहुत कष्ट करूं नये। असुदें खोटें ॥ ६३ ॥

अनेक वर्षे धावाधाव करू नये. एकाच ठिकाणी अनेक वर्षे राहू नये. फार कष्ट करू नयेत, पण आयतेपणाही करू नये. तो योग्य नव्हे. (६३)

बहुसाल बोलों नये। अबोलणें कामा नये।
बहुत अन्न खाऊं नये। उपवास खोटा ॥ ६४ ॥

अखंड बोलत राहू नये किंवा अगदी अबोलही राहू नये. फार अन्न खाऊ नये आणि अन्नावीण राहणे हेही योग्य नव्हे. (६४)

बहुसाल निजों नये। बहुत निद्रा मोडूं नये।
बहुनेम धरूं नये। बाश्कळ खोटें ॥ ६५ ॥

फार वेळ झोपू नये. आणि निद्रा न घेताही राहू नये. फार नेम धरू नयेत, पण नेमरहित राहाणेही अयोग्य होय. (६५)

बहु जनीं असों नये। बहु आरण्य सेऊं नये।
बहु देह पाळूं नये। आत्महत्या खोटी ॥ ६६ ॥

सारखेच लोकांत मिसळू नये किंवा सतत अरण्यवासही करू नये. देहाचे फार लाड करू नयेत आणि आत्महत्याही करू नये. (६६)

बहु संग धरूं नये। संतसंग सांडूं नये।
कर्मठपण कामा नये। अनाचार खोटा ॥ ६७ ॥

कुणाशीही अति संग करू नये. पण संतसंग मात्र कधी सोडू नये. फार कर्मठपणाही नसावा. पण अनाचार खोटा हेही ध्यानात ठेवावे. (६७)

बहु लोकिक सांडूं नये। लोकांधेन होऊं नये।
बहु प्रीती कामा नये। निष्ठुरता खोटी ॥ ६८ ॥

फार लोकाचार सोडू नये, पण लोकांच्या आधीन होऊनही राहू नये. कुणावरही फार प्रेम करू नये, पण निष्ठुरतेने वागणेही अयोग्यच होय. (६८)

बहु संशये धरूं नये। मुक्तमार्ग कामा नये।
बहु साधनीं पडों नये। साधनेंवीण खोटें ॥ ६९ ॥

फार संशय धरू नये आणि स्वेच्छाचारही करू नये. अनेकानेक साधनांच्या मागे लागू नये. पण साधनेशिवाय राहणेही योग्य नाही. (६९)

बहु विषये भोगूं नये। विषयत्याग करितां नये।
देहलोभ धरूं नये। बहु त्रास खोटा ॥ ७० ॥

फार विषय भोगू नये, पण साधनोपयोगी विषयाचा त्याग करू नये. तसेच शरीरनिर्वाहासाठी आवश्यक अशा विषयांचा त्याग करणेही योग्य नव्हे. देहलोभ धरू नये, पण उगीचच देहाला त्रास सोसायला लावणेही अयोग्य होय. (७०)

वेगळा अनुभव घेऊं नये। अनुभवेंवीण कामा नये।
आत्मस्थिती बोलों नये। स्तब्धता खोटी ॥ ७१ ॥

वेगळेपणाने अनुभव घेऊ नये, पण अनुभवाशिवायही राहता कामा नये. आत्मस्थिती कुणाला सांगू नये हे खरे, पण म्हणून तिच्यासंबंधी सर्वस्वी मौन पाळणे हेही अयोग्य होय. (७१)

मन उरों देऊं नये। मनेंवीण कामा नये।
अलक्ष वस्तु लक्षा नये। लक्षेंवीण खोटें ॥ ७२ ॥

मनाला शिल्लक उरू देऊ नये, उन्मनी प्राप्त करावी हे खरे, पण मनाशिवाय कार्य होऊ शकत नाही म्हणून वश केलेले मन असायलाच हवे. तसेच अलक्ष वस्तू जे परब्रह्म ते लक्षात येत नाही, पण म्हणून तिच्या अनुसंधानाशिवाय राहाणे हे अयोग्य होय. (७२)

मनबुद्धीअगोचर। बुद्धीवीण अंधकार।
जाणीवेचा पडो विसर। नेणीव खोटी ॥ ७३ ॥

परब्रह्मवस्तू मनबुद्धी अगोचर आहे हे खरे असले तरी बुद्धीशिवाय तिचे ज्ञान होऊ शकत नाही. बुद्धी नसेल तर अज्ञानरूपी अंधकार दूर होणार नाही. जाणिवेचा विसर पडणे, स्वात्मानुभवासाठी आवश्यक आहे हे खरे, पण नेणीव म्हणजेच अज्ञानास योग्य मानता येत नाही. (७३)

ज्ञातेपण धरूं नये। ज्ञानेंवीण कामा नये।
अतर्क्य वस्तु तर्का नये। तर्केंवीण खोटें ॥ ७४ ॥

ज्ञातेपणाचा अभिमान धरू नये हे बरोबर आहे पण म्हणून ज्ञानाशिवाय राहणेही उपयोगी नाही. परब्रह्म वस्तू अतर्क्य आहे. तिच्यासंबंधी तर्क करता येत नाही हे खरे असले, तरी तर्कच न करणे हे अयोग्य आहे. (७४)

दृश्यस्मरण कामा नये। विस्मरण पडों नये।
कांहीं चर्चा करूं नये। केलीयावीण न चले॥ ७५ ॥

दृश्य वस्तूचे स्मरण असणे उपयुक्त नाही, पण म्हणून विस्मरणाचा अंगीकार करणे योग्य नाही. कारण नसताना चर्चा करू नये. जेव्हा आवश्यक असेल, तेव्हा चर्चा केल्याशिवाय चालू शकत नाही. (७५)

जगीं भेद कामा नये। वर्णसंकर करूं नये।
आपला धर्म उडऊं नये। अभिमान खोटा ॥ ७६ ॥

जगात भेद मानू नये, हे जरी खरे असले, तरी वर्णसंकर कधी करू नये. आपला धर्म कधी सोडू नये, पण त्याचा अभिमान बाळगणे हे अयोग्य होय. (७६)

आशाबद्धत बोलों नये। विवेकेंवीण चालों नये।
समाधान हालों नये। कांहीं केल्यां ॥ ७७ ॥

मनात कसली तरी आशा ठेवून बोलू नये. विवेकाशिवाय वर्तन करू नये. काहीही झाले तरी आपले समाधान भंग होऊ देऊ नये. (७७)

अबद्ध पोथी लेहों नये। पोथीवीण कामा नये।
अबद्ध वाचूं नये। वाचिल्यावीण खोटें॥ ७८ ॥

विषयांची संगती नसलेली विस्कळित पोथी लिहू नये. पण पोथीशिवाय राहू नये. अशुद्ध वाचू नये, पण काहीच न वाचता राहणेही योग्य नव्हे. (७८)

निस्पृहें वगत्रुत्व सांडूं नये। आशंका घेतां भांडों नये।
श्रोतयांचा मानूं नये। वीट कदा ॥ ७९ ॥

निःस्पृहाने कधी वक्तृत्व सोडू नये, पण श्रोत्यांनी शंका घेतली तर त्यांच्याशी भांडू नये. कधीही श्रोत्यांचा कंटाळा मानू नये. (७९)

हे सिकवण धरितां चित्तीं । सकळ सुखें वोळगती ।
आंगीं बाणे महंती । अकस्मात ॥ ८० ॥

ही शिकवण जर चित्तात दृढ धरली आणि त्याप्रमाणे वागले तर सर्व सुखे प्राप्त होतात. आणि अकस्मात महंताचे उत्तम गुण आपल्या ठिकाणी प्रकट होऊ लागतात. (८०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'निस्पृहलक्षणनाम' समास पहिला समाप्त.**

❑ ❑

## दशक १४ : समास २

## भिक्षानिरूपण

॥ श्रीराम ॥

**ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागितली पाहिजे भिक्षा ।**
**वोंभवति या पक्षा । रक्षिलें पाहिजे ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, ब्राह्मणांच्या जीवनपद्धतीचे मुख्य लक्षण त्यांनी भिक्षा मागितली पाहिजे हे आहे. **'ओम भवति भिक्षां देहि'** या ब्रीदाचे त्यांनी रक्षण केले पाहिजे. (१)

**भिक्षा मागोन जो जेविला । तो निराहारी बोलिला ।**
**प्रतिग्रहावेगळा जाला । भिक्षा मागतां ॥ २ ॥**

जो ब्राह्मण भिक्षा मागून जेवतो, तो निराहारी मानला जातो. भिक्षा मागण्यामुळे तो दानांत येणाऱ्या दोषापासून अलिप्त होतो. (२)

**संतासंत जे जन । तेथें कोरान्न मागोन करी भोजन ।**
**तेणें केलें अमृतप्राशन । प्रतिदिनीं ॥ ३ ॥**

जो संत आणि असंत लोकांच्या जवळ कोरान्न मागून भोजन करतो, त्याने रोजच्या रोज अमृतप्राशनच केले आहे, असे मानावे. (३)

**श्लोक**

भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव प्रतिग्रहः ।
असंतो वापि संतो वा सोमपानं दिने दिने ॥ १ ॥

**अर्थ**—भिक्षा मागून पोट भरणारा माणूस निराहारी असतो. भिक्षा घेणे म्हणजे दान घेणे नव्हे. भिक्षा घालणारे लोक सज्जन असोत किंवा दुर्जन असोत, त्यांनी घातलेल्या भिक्षेने पोट भरणे म्हणजे रोज सोमपान करणेच होय. (१)

**ऐसा भिक्षेचा महिमा । भिक्षा माने सर्वोत्तमा ।**
**ईश्वराचा अगाध महिमा । तोहि भिक्षा मागे ॥ ४ ॥**

भिक्षेचा असा महिमा आहे. ईश्वरालाही भिक्षा मागणे मान्य आहे. ईश्वराचा महिमा अगाध असून तोही भिक्षा मागतो. (४)

**दत्त गोरक्ष आदिकरूनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं ।**
**निस्पृहता भिक्षेपासुनी । प्रगट होये ॥ ५ ॥**

दत्त, गोरक्ष आदी सिद्धही लोकांत भिक्षा मागतात. भिक्षेमुळे भिक्षा मागणाराची निःस्पृहताच प्रगट होत असते. (५)

**वार लाऊन बैसला । तरी तो पराधेन जाला ।**
**तैसीच नित्यावळीला । स्वतंत्रता कैंची ॥ ६ ॥**

जो वार लावून जेवतो तो पराधीन होतो. त्याप्रमाणे जो नित्य एखाद्याच्या घरी नेमाने जेवतो, त्याला स्वतंत्रता कुठली ? (६)

**आठां दिवसां धान्य मेळविलें । तरी तें कंटाळवाणें जालें ।**
**प्राणी येकायेकीं चेवलें । नित्यनूतनतेपासुनी ॥ ७ ॥**

आठ दिवसांनी एकदाच धान्य मिळवले तर ते कंटाळवाणे होते. नित्य नूतनतेच्या लाभापासून त्या व्यक्ती वंचित होतात. (७)

**नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें ।**
**तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ॥ ८ ॥**

नित्य नूतन ठिकाणी हिंडावे, उदंड देशाटन करावे, तरच भिक्षा मागणे हे प्रशंसनीय ठरते. (८)

**अखंड भिक्षेचा अभ्यास । तयास वाटेना परदेश ।**
**जिकडे तिकडे स्वदेश । भुवनत्रैं ॥ ९ ॥**

जो नेहमीच भिक्षा मागून जेवतो, त्याला कुठलाही देश परका वाटत नाही. त्रिभुवनात तो कोठेही गेला तरी जिकडे-तिकडे त्याला स्वदेशच वाटतो. (९)

**भिक्षा मागतां किरकों नये । भिक्षा मागतां लाजों नये ।**
**भिक्षा मागतां भागों नये । परिभ्रमण करावें ॥ १० ॥**

भिक्षा मागताना कुरकुर करू नये. भिक्षा मागताना लाजू नये. भिक्षा मागताना थकून जाऊ नये. भिक्षा मागणाराने परिभ्रमण करावे. (१०)

भिक्षा आणि चमत्कार। च्याकाटती ल्हानथोर।
कीर्ति वर्णी निरंतर। भगवंताची ॥ ११ ॥

एखादा माणूस भिक्षा मागतो आणि चमत्कार करतो, हे ऐकल्यावर किंवा पाहिल्यावर लहान-थोर माणसे आश्चर्यचकित होतात. तो भगवंतांची कीर्ती निरंतर वर्णन करीत असतो. (म्हणूनच चमत्कार घडतात.) (११)

भिक्षा म्हणिजे कामधेनु। सदा फळ नव्हे सामान्यु।
भिक्षेस करी जो अमान्यु। तो करंटा जोगी ॥ १२ ॥

भिक्षा म्हणजे सदा फळ देणारी कामधेनूच होय. तिला सामान्य मानू नये. जो भिक्षेला अमान्य करतो, तो योगी असला तरी भाग्यहीन जाणावा. (१२)

भिक्षेनें वोळखी होती। भिक्षेनें भरम चुकती।
सामान्य भिक्षा मान्य करिती। सकळ प्राणी ॥ १३ ॥

भिक्षेने नवीन ओळखी होतात. भ्रम नाहीसे होतात. सर्व प्राणी सामान्यपणे भिक्षा मान्य करतात. (१३)

भिक्षा म्हणजे निर्भये स्थिती। भिक्षेनें प्रगटे महंती।
स्वतंत्रता ईश्वरप्राप्ती। भिक्षागुणें ॥ १४ ॥

भिक्षा म्हणजे निर्भय स्थिती होय. भिक्षेने महंती प्रकट होते. भिक्षेच्या योगे स्वतंत्रता कायम राहून ईश्वरप्राप्तीसुद्धा होते. (१४)

भिक्षेस नाहीं आडथाळा। भिक्षाहारी तो मोकळा।
भिक्षेकरितां सार्थक वेळा। काळ जातो ॥ १५ ॥

भिक्षा मागण्यात काहीही अडथळा नाही. भिक्षाहारी हा उपाधीपासून मोकळा असतो. भिक्षेकरिता जो वेळ लागतो, तेवढा काळ सार्थकी लागतो. (१५)

भिक्षा म्हणिजे अमरवल्ली। जिकडे तिकडे लगडली।
अवकाळीं फळदायेनी जाली। निर्ल्लजासी ॥ १६ ॥

भिक्षा म्हणजे जिकडे-तिकडे फळाफुलांनी लगडलेली जणू अमर वेल आहे. जे निर्लज्ज लोक असतात, त्यांना त्यांच्या वाईट दिवसांत ती फलदायिनी ठरते. (१६)

पृथ्वीमधें देश नाना। फिरतां उपवासी मरेना।
कोणे येके ठाईं जना। जड नव्हे ॥ १७ ॥

पृथ्वीमध्ये इतके अनेक प्रकारचे देश आहेत की, त्या देशांतून फिरणारा भिक्षेकरी उपाशी मरत नाही. कारण तो कोठेही एका जागी राहात नसल्याने (नित्य नवीन ठिकाणच्या) लोकांना तो जड वाटत नाही. (१७)

गोरज्य वाणिज्य कृषी। त्याहून प्रतिष्ठा भिक्षेसी।
विसंभों नये झोळीसी। कदाकाळीं ॥ १८ ॥

दूधदुभत्याचा व्यवसाय, व्यापारधंदा अथवा शेती याहूनही भिक्षेला प्रतिष्ठा आहे. म्हणून कधीही झोळीला बाजूला करू नये. (१८)

भिक्षेऐसें नाहीं वैराग्य। वैराग्यापरतें नाहीं भाग्य।
वैराग्य नस्तां अभाग्य। येकदेसी ॥ १९ ॥

भिक्षा मागणे हे वैराग्याचे लक्षण आहे आणि वैराग्यासारखे भाग्य दुसरे नाही. वैराग्य जर नसेल तर तो माणूस एकदेशी आणि भाग्यहीन समजावा. (१९)

कांहीं भिक्षा आहे म्हणावें। अल्पसंतोषी असावें।
बहुत आणितां घ्यावें। मुष्टी येक ॥ २० ॥

'काही भिक्षा आहे का' असे कुणाच्याही दारापुढे म्हणावे आणि जी भिक्षा मिळेल त्यात अल्पसंतोषी असावे. भिक्षा घालणाराने अधिक देऊ केल्यास फक्त एक मूठभर भिक्षा घ्यावी. (२०)

सुखरूप भिक्षा मागणें। ऐसीं निस्पृहतेचीं लक्षणें।
मृद वागविळास करणें। परम सौख्यकारी ॥ २१ ॥

भिक्षा मागताना ती प्रसन्नपणे मागावी, हे निःस्पृहाचे लक्षण आहे. सर्वांशी अत्यंत गोड, मृदू शब्दांत बोलावे, म्हणजे ऐकणारालाही परम सुख मिळते. (२१)

ऐसी भिक्षेची स्थिती। अल्प बोलिलें येथामती।
भिक्षा वांचवी विपत्ती। होणार काळीं ॥ २२ ॥

अशी ही भिक्षेची स्थिती येथे यथामती थोडीशी सांगितली आहे. पुढे येणाऱ्या संकटातून भिक्षा माणसाला वाचवते. (२२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'भिक्षानिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**



## दशक १४ : समास ३
### कवित्वकळानिरूपण
॥ श्रीराम ॥

**कवित्व शब्दसुमनमाळा। अर्थ परिमळ आगळा।**
**तेणें संतषट्पदकुळा। आनंद होये ॥ १ ॥**

**ऐसी माळा अंतःकरणीं। गुंफून पूजा रामचरणीं।**
**वोंकारतंत अखंडपणीं। खंडूंच नये ॥ २ ॥**

**परोपकाराकारणें। कवित्व अगत्य करणें।**
**तया कवित्वाचीं लक्षणें। बोलिजेती ॥ ३ ॥**

**जेणें घडे भगवद्भक्ती। जेणें घडे विरक्ती।**
**ऐसिया कवित्वाची युक्ती। आधीं वाढवावी ॥ ४ ॥**

**क्रियेवीण शब्दज्ञान। तया न मनिती सज्जन।**
**म्हणौनी देव प्रसन्न। अनुतापें करावा ॥ ५ ॥**

**देवाचेन प्रसन्नपणें। जें जें घडे बोलणें।**
**तें तें अत्यंत श्लाघ्यवाणें। या नांव प्रासादिक ॥ ६ ॥**

**धीट पाठ प्रसादिक। ऐसें बोलती अनेक।**
**तरी हा त्रिविध विवेक। बोलिजेल ॥ ७ ॥**

**धीट म्हणिजे धीटपणें केलें। जें जें आपुल्या मनास आलें।**
**बळेंचि कवित्व रचिलें। या नांव धीट बोलिजे ॥ ८ ॥**

**पाठ म्हणिजे पाठांतर। बहुत पाहिलें ग्रंथांतर।**
**तयासारिखा उतार। आपणहि केला ॥ ९ ॥**

**सीघ्रचि कवित्व जोडिलें। दृष्टी पडिलें तें चि वर्णिलें।**
**भक्तिवांचून जें केलें। त्या नाव धीटपाठ ॥ १० ॥**

**कामिक रसिक श्रृंघारिक। वीर हास्य प्रस्ताविक।**
**कौतुक विनोद अनेक। या नांव धीटपाठ ॥ ११ ॥**

**मन जालें कामाकार। तैसेचि निघती उद्गार।**
**धीटपाठें परपार। पाविजेत नाहीं ॥ १२ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, कवित्व म्हणजे शब्दरूपी फुलांची माळ असून, त्याचा अर्थ म्हणजे त्या फुलांचा आगळा-वेगळा सुगंध होय. त्याच्या योगे संतरूपी भुंग्यांच्या कुळाला आनंद होतो. (१)

अशी शब्दरूपी सुमनांची माळ अंतःकरणात गुंफून ती रामचरणी अर्पण करावी. मात्र त्यातील ओंकाररूपी तंतू अखंड राहील, तो तुटणार नाही, याची काळजी घ्यावी. (२)

परोपकारासाठी कवित्व अगत्याने करावे. असे परोपकारी कवित्व कसे असते, त्याची लक्षणे आता सांगितली जातील. (३)

ज्यायोगे भगवद्भक्ती घडेल, विरक्ती घडेल अशा कवित्वाची निर्मिती व्हावी म्हणून जे उपाय करणे जरूर आहेत, ते आधी करावेत. (४)

क्रियेशिवायच्या शब्दज्ञानाला सज्जन लोक महत्त्व देत नाहीत. म्हणून आधी अनुतापाने देवाला प्रसन्न करून घ्यावे. (५)

देवाच्या प्रसन्नतेने, त्याच्या कृपेने जे जे बोलणे बोलले जाते, ते अत्यंत प्रशंसनीय असते. त्याला प्रासादिक नाव आहे. (६)

धीट, पाठ आणि प्रासादिक असे काव्याचे तीन प्रकार अनेकजण सांगतात. या तीन प्रकारांबद्दल येथे विचार सांगितला जाईल. (७)

धीट म्हणजे जे जे आपल्या मनात आले, त्यावर बळेच धीटपणे जे कवित्व रचले जाते, त्याला धीट हे नाव दिले जाते. (८)

पाठ म्हणजे पाठांतर. अनेक ग्रंथांचा अभ्यास केल्यावर त्याच्या धर्तीवर आपणही काव्य रचले त्यास पाठ म्हणतात. (९)

जे जे दृष्टीस पडले, त्यावर जे शीघ्र कवित्व केले जाते व ज्यांत भक्ती नसते, त्याला धीटपाठ असे नाव आहे. (१०)

कामिक, रसिक, शृंगारिक, वीर, हास्य या रसांनी युक्त, ज्यांत काही आश्चर्यजनक गोष्टी, विनोद, प्रास्ताविक वगैरे असते, त्याला धीटपाठ म्हणतात. (११)

मन ज्या वेळी कामवासनेने भरून कामाकार होते, त्या वेळी कवी जे काव्य रचतो, ते कामाकारच असते. त्यास धीटपाठ म्हणतात. पण अशा काव्याने भवसागरातून मुक्तता होणार नाही. (१२)

व्हावया उदरशांती। करणें लगे नरस्तुती।
तेथें केली जे वित्पत्ती। त्या नांव धीटपाठ ॥ १३॥

पोटातील भुकेची आग शांत करण्यासाठी मनुष्याची स्तुती करण्याकरता जी विद्वत्ता प्रकट केली जाते, त्या काव्यास धीटपाठ म्हणतात. (१३)

कवित्व नसावें धीटपाठ। कवित्व नसावें खटपट।
कवित्व नसावें उद्धट। पाषांडमत ॥ १४॥

कवित्व धीटपाठ नसावे किंवा ते ओढूनताणून केलेले नसावे. तसेच ते उद्धट किंवा पाखंड मताने युक्त नसावे. (१४)

कवित्व नसावें वादांग। कवित्व नसावें रसभंग।
कवित्व नसावें रंगभंग। दृष्टांतहीन ॥ १५॥

कवित्व वादंग माजविणारे नसावे अथवा ते रसभंग करणारे नसावे. तसेच ते रंगभंग करणारे अथवा दृष्टांतहीनही नसावे. (१५)

कवित्व नसावें पाल्हाळ। कवित्व नसावें बाष्कळ।
कवित्व नसावें कुटीळ। लक्षुनियां ॥ १६॥

कवित्व पाल्हाळिक किंवा बाष्कळही नसावे. तसेच कोणा कुटील माणसाला लक्षून केलेलेही नसावे. (१६)

हीन कवित्व नसावें। बोलिलेंचि न बोलावें।
छंदभंग न करावें। मुद्राहीन ॥ १७॥

हीन दर्जाचे कवित्व नसावे. त्यात पुनरावृत्ती नसावी. आणि छंद, वृत्ते वगैरेच्या नियमांचा भंगही केलेला नसावा. निर्दोष काव्य असावे. (१७)

वित्पत्तीहीन तर्कहीन। कळाहीन शब्दहीन।
भक्तिज्ञानवैराग्यहीन। कवित्व नसावें ॥ १८॥

व्युत्पत्तिहीन, तर्कहीन, कलाहीन, शब्दहीन अथवा ज्यात भक्तिज्ञानवैराग्याचे वर्णन नाही असे कवित्व नसावे. (१८)

भक्तिहीन जें कवित्व। तेंचि जाणावें ठोंबें मत।
आवडीहीन जें वगत्रुत्व। कंटाळवाणें ॥ १९॥

भक्तिहीन असलेले कवित्व म्हणजे अडाणी माणसाचे मत असे समजावे. भक्तीची आवड नसताना केलेले वक्तृत्व कंटाळवाणे होते. (१९)

भक्तिविण जो अनुवाद। तोचि जाणावा विनोद।
प्रीतीविण संवाद। घडे केंवीं ॥२०॥

भक्तीशिवाय केलेले काव्य म्हणजे विनोद किंवा करमणूक होय. भगवंताविषयी प्रेम नसेल, तर भगवंताशी संवाद कसा घडेल (२०)

असो धीट पाठ ते ऐसे। नाथिलें अहंतेचें पिसें।
आतां प्रसादिक तें कैसें। सांगिजेल ॥ २१॥

असो. धीटपाठ या प्रकाराचे कवित्व हे अशा प्रकारचे असते. मिथ्या असलेल्या अहंकाराला लागलेले ते एक प्रकारचे वेडच असते. आता प्रासादिक कवित्व कसे असते ते सांगितले जाईल. (२१)

वैभव कांता कांचन। जयास वाटे हें वमन।
अंतरीं लागलें ध्यान। सर्वोत्तमाचें ॥ २२॥

वैभव, स्त्री आणि सोने हे ज्याला वमनाप्रमाणे त्याज्य वाटते आणि ज्याच्या अंतरी सर्वोत्तमाचे ध्यान लागलेले असते, (२२)

जयास घडीनें घडी। लागे भगवंतीं आवडी।
चढती वाढती गोडी। भगवद्भजनाची ॥ २३॥

ज्याला घडोघडी भगवंताच्या ठिकाणी आवड उत्पन्न होत असते आणि त्यामुळे ज्याला भगवद्‌भजनात चढती-वाढती गोडी लागते. (२३)

जो भगवद्भजनेंवीण। जाऊं नेदी येक क्षण।
सर्वकाळ अंत:करण। भक्तिरंगें रंगलें ॥ २४॥

जो भगवद्‌भजनाशिवाय एक क्षणही जाऊ देत नाही आणि ज्याचे अंत:करण सर्वकाळ भक्तीत रंगलेले असते (२४)

जया अंतरीं भगवंत। अचळ राहिला निवांत।
तो स्वभावें जें बोलत। तें ब्रह्मनिरूपण ॥ २५॥

ज्याच्या अंत:करणात निरंतर भगवंत अचळ आणि निवांत वास करून राहिलेला असतो, तो सहज स्वभावाने जे जे बोलतो, ते ते ब्रह्मनिरूपणच असते. (२५)

अंतरीं बैसला गोविंद। तेणें लागला भक्तिछंद।
भक्तिविण अनुवाद। आणीक नाहीं ॥ २६॥

त्याच्या अंतरी गोविंद राहिला असल्याने त्याला भक्तीचा छंद लागलेला असतो, त्यामुळे भक्तीशिवाय दुसरा विषयच त्याच्या बोलण्यात येत नाही (२६)

आवडी लागली अंतरीं। तैसीच वदे वैखरी।
भावें करुणाकीर्तन करी। प्रेमभरें नाचतु ॥ २७॥

मनात भक्तीची अत्यंत आवड असल्याने त्याची वाणी त्याप्रमाणेच भक्तीविषयी बोलते. तो अत्यंत प्रेमाने, करुणेने भगवंताला आळवीत कीर्तन करून प्रेमभराने नाचतो. (२७)

भगवंतीं लागलें मन। तेणें नाठवे देहभान।
शंका लज्या पळोन। दुरी ठेली ॥ २८॥

भगवंताच्या ठिकाणी मन जडलेले असल्याने त्याला देहभान उरत नाही. त्यामुळे शंका आणि लोकलाज त्याच्यापासून दूर पळून जातात. (२८)

तो प्रेमरंगें रंगला। तो भक्तिमदें मातला।
तेणें अहंभाव घातला। पायांतळीं ॥ २९॥

तो प्रेमरंगात रंगून जातो, भक्तीच्या मदाने उन्मत्त होतो, त्या वेळी असे वाटते की, अहंभावाला जणू तो पायदळी तुडवीत आहे . (२९)

गात नाचत निशंक। तयास कैंचे दिसती लोक।
दृष्टीं त्रैलोक्यनायेक। वसोन ठेला ॥ ३०॥

जो प्रेमाने उन्मत्त होऊन नाचत, गात असतो त्याला लोक दिसतील तरी कसे? त्याच्या दृष्टीत त्रैलोक्यनायक भगवंतच भरून राहिलेला असतो. (३०)

ऐसा भगवंतीं रंगला। आणीक कांहीं नलगे त्याला।
स्वइच्छा वर्णूं लागला। ध्यान कीर्ती प्रताप ॥ ३१॥

असा जो भगवंताच्या ठिकाणी रंगून गेलेला असतो, त्याला दुसरे काहीही नको असते. आपल्या स्वत:च्या इच्छेनुसार तो भगवंताच्या रूपाचे, अनेक प्रकारच्या कीर्तीचे, प्रतापाचे वर्णन करू लागतो. (३१)

नाना ध्यानें नाना मूर्ती। नाना प्रताप नाना कीर्ती।
तयापुढें नरस्तुती। त्रुणतुल्य वाटे ॥ ३२॥

तो भगवंताची अनेक प्रकारची ध्याने, अनेक प्रकारच्या मूर्ती, भगवंताचे विविध पराक्रम आणि अपार कीर्ती यांचे वर्णन करू लागतो. त्यापुढे नरस्तुती करणे त्याला कस्पटासारखे अत्यंत तुच्छ वाटते. (३२)

असो ऐसा भगवद्भक्त। जो ये संसारीं विरक्त।
तयास मानिती मुक्त। साधुजन ॥ ३३॥

असा जो या संसारात विरक्त असा भगवद्भक्त असतो, त्याला साधुलोक मुक्त समजतात. (३३)

त्याचे भक्तीचें कौतुक। तया नांव प्रसादिक।
सहज बोलतां विवेक। प्रगट होय ॥ ३४॥

त्याच्या भक्तीमुळे जे कौतुकास्पद काव्य होते त्याला प्रासादिक कवित्व म्हणतात. त्यातून सहजपणे विवेक प्रगट होत असतो. (३४)

ऐका कवित्वलक्षण। केलेंच करूं निरूपण।
जेणें निवे अंत:कर्ण। श्रोतयांचें ॥ ३५॥

आता कवित्वाच्या लक्षणाचे पुन्हा निरूपण करू या. त्यायोगे श्रोत्यांचे अंत:करण नक्कीच निवेल. (३५)

कवित्व असावें निर्मळ। कवित्व असावें सरळ।
कवित्व असावें प्रांजळ। अन्वयाचें ॥ ३६॥

कवित्व निर्मळ असावे. सरळ, सोपे आणि प्रांजळ अनुभवाने युक्त असावे. (३६)

कवित्व असावें भक्तिबळें। कवित्व असावें अर्थागळें।
कवित्व असावें वेगळें। अहंतेसी ॥ ३७॥

भक्तीच्या बळावर ते कवित्व निर्माण झालेले असावे. ते अर्थगंभीर असावे आणि अहंभावरहित असावे. (३७)

कवित्व असावें कीर्तिवाड। कवित्व असावें रम्य गोड।
कवित्व असावें जाड। प्रतापविषीं ॥ ३८॥

त्या कवित्वात भगवंताची महान कीर्ती वर्णिलेली असावी. ते रम्य, गोड व भगवंताच्या प्रतापाच्या वर्णनाने भरलेले उत्कृष्ट असे असावे. (३८)

कवित्व असावें सोपें। कवित्व असावें अल्परूपें।
कवित्व असावें सुल्लपें। चरणबंद ॥ ३९॥

कवित्व सोपे, छोटेसे, सुलभ आणि चरणांची नियमबद्ध रचना असलेले असावे. (३९)

मृदु मंजुळ कोमळ। भव्य अद्भुत विशाळ।
गौल्य माधुर्य रसाळ। भक्तिरसें ॥ ४०॥

कवित्व भक्तिरसाने भरलेले आणि म्हणून मृदू, मंजूळ, कोमल, तसेच भव्य, अद्भुत, विशाल, व्यवस्थित रचना असलेले, माधुर्ययुक्त आणि रसाळ असावे. (४०)

अक्षरबंद पदबंद। नाना चातुर्य प्रबंद।
नाना कौशल्यता छंदबंद। धाटी मुद्रा अनेक ॥ ४१ ॥

उत्तम कवित्वात पुढील अनेक गोष्टी असाव्यात. अक्षरबंध, पद- बंध म्हणजे चित्रकाव्य, चतुराईने रचना केलेले नाना प्रबंध, कुशलतेने रचलेले छंद, बंध, नाना धाटी, नाना मुद्रा असाव्यात. (४१)

नाना युक्ती नाना बुद्धी। नाना कळा नाना सिद्धी।
नाना अन्वये साधी। नाना कवित्व ॥ ४२ ॥

त्यात नाना युक्ती, नाना बुद्धी, नाना कला, नाना सिद्धी, नाना अन्वय साधणारे अनेक प्रकारचे कवित्व असावे. (४२)

नाना साहित्य दृष्टांत। नाना तर्क धात मात।
नाना संमती सिद्धांत। पूर्वपक्षेंसीं ॥ ४३ ॥

त्यांत अनेक प्रकारचे साहित्यिक दृष्टांत, नाना तर्क, त्यांची स्थापना आणि त्यांचे खंडण, तसेच पूर्वपक्षासह नाना संमती आणि नाना सिद्धांतांचे निरूपण असावे. (४३)

नाना गती नाना वित्पत्ती। नाना मती नाना स्फूर्ति।
नाना धारणा नाना धृती। या नांव कवित्व ॥ ४४ ॥

नाना मती, नाना व्युत्पत्ती, नाना मती, नाना स्फूर्ती, नाना धारणा, नाना धृती ज्यात असतात, त्याला कवित्व म्हणावे. (४४)

शंका आशंका प्रत्योत्तरें। नाना काव्यें शास्त्राधारें।
तुटे संशये निर्धारें। निर्धारितां ॥ ४५ ॥

त्यांत शंका, आशंका, प्रत्युत्तरे, शास्त्राधार देण्यासाठी दुसरी नाना काव्ये असावीत. त्यामुळे अध्यात्माविषयी निर्धार होऊन त्यायोगे सर्व संशय नष्ट होतात. (४५)

नाना प्रसंग नाना विचार। नाना योग नाना विवर।
नाना तत्त्वचर्चासार। या नांव कवित्व ॥ ४६ ॥

ज्यात नाना प्रसंग, नाना विचार, नाना योग, नाना विषयांचे विवरण, नाना तत्त्वांच्या चर्चा आणि त्यांचे सार वर्णिलेले असते, त्याला कवित्व म्हणतात. (४६)

नाना साधनें पुरश्चरणें। नाना तपें तीर्थाटणें।
नाना संदेह फेडणें। या नांव कवित्व ॥ ४७ ॥

ज्यांत नाना साधने, नाना पुरश्चरणे, नाना प्रकारची तपे आणि तीर्थाटणे यांचे वर्णन असून, नाना प्रकारचे संदेह फेडले जातात, त्याला कवित्व म्हणतात. (४७)

जेणें अनुताप उपजे। जेणें लौकिक लाजे।
जेणें ज्ञान उमजे। या नांव कवित्व ॥ ४८ ॥

वरील प्रकारच्या कवित्वामुळे काय लाभ होतो, ते येथून पुढे सांगितले आहे. ज्याने पश्चात्ताप उत्पन्न होतो, लौकिक सुखाच्या आसक्तीची लाज वाटते आणि ज्ञान होते, त्यास कवित्व म्हणावे. (४८)

जेणें ज्ञान हें प्रबळे। जेणें वृत्ती हे मावळे।
जेणें भक्तिमार्ग कळे। या नांव कवित्व ॥ ४९ ॥

ज्याच्या योगे ज्ञान सुदृढ होते, वृत्ती मावळते आणि भक्तिमार्गाचे ज्ञान होते, त्यास कवित्व म्हणावे. (४९)

जेणें देहबुद्धी तुटे। जेणें भवसिंधु आटे।
जेणें भगवंत प्रगटे। या नांव कवित्व ॥ ५० ॥

ज्याच्या योगे देहबुद्धी नष्ट होते, भवसागर आटून जातो आणि भगवंत प्रगट होतो, त्यास कवित्व म्हणावे. (५०)

जेणें सद्बुद्धि लागे। जेणें पाषांड भंगे।
जेणें विवेक जागे। या नांव कवित्व ॥ ५१ ॥

ज्याच्या योगे सद्बुद्धी उत्पन्न होते, पाखंड नाहीसे होते आणि विवेक जागृत होतो, त्यास कवित्व म्हणतात. (५१)

जेणें सद्वस्तु भासे। जेणें भास हा निरसे।
जेणें भिन्नत्व नासे। या नांव कवित्व ॥ ५२ ॥

ज्याच्या योगे सद्वस्तूचा साक्षात अनुभव येतो, मायेचा आभास मावळतो आणि द्वैताचा नाश होतो, त्यास कवित्व म्हणावे. (५२)

जेणें होये समाधान। जेणें तुटे संसारबंधन।
जया मानिती सज्जन। तया नांव कवित्व ॥ ५३ ॥

ज्याच्या योगे संसारबंधन तुटून शाश्वत समाधान प्राप्त होते, ज्याला सज्जन मानतात, ते कवित्व होय. (५३)

ऐसें कवित्वलक्षण। सांगतां तें असाधारण।
परंतु कांहींयेक निरूपण। बुझावया केलें ॥ ५४ ॥

कवित्वलक्षण खरे म्हणजे असाधारण आहे, पण ते कळावे, यासाठी त्याचे थोडेफार निरूपण येथे केले आहे. (५४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कवित्वकळानिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.

❑ ❑

## दशक १४ : समास ४

### कीर्तनलक्षण

॥ श्रीराम ॥

कल्युगीं कीर्तन करावें। केवळ कोमळ कुशळ गावें।
कठीण कर्कश कुर्टे सांडावें। येकीकडे ॥ १ ॥

(या समासात श्रीसमर्थांनी 'ज्ञ' सोडून बाकीच्या ३५ व्यंजनांची आद्याक्षरे क्रमाने योजून ओव्या केल्या आहेत. काही ठिकाणी पर्याय योजले आहेत. ङ साठी न, ञ साठी य, ण साठी न, ष साठी ख, ळ साठी ल)

श्रीसमर्थ म्हणतात की, कलियुगात कीर्तन जरूर करावे, पण केवळ कोमल आणि कुशलतेने गावे. कठोर, कर्कश आणि किरट्या आवाजात गाऊ नये. (१)

खटखट खुंटून टाकावी। खळखळ खळांसीं न करावी।
खरें खोटें खवळों नेदावी। वृत्ती आपुली ॥ २ ॥

भांडणतंटा सोडून द्यावा. दुष्टाशी खळखळ म्हणजे विरोध करू नये. खऱ्याखोट्याने वृत्ती खवळू देऊ नये. (२)

गर्वगाणें गाऊं नये। गातां गातां गळों नये।
गौप्य गुज गर्जों नये। गुण गावे ॥ ३ ॥

अभिमानाने गाऊ नये. गातागाता थकून गाणे अर्धवट सोडू नये. दुसऱ्याचे गुप्त रहस्य चारचौघामध्ये मोठमोठ्याने गर्जून सांगू नये. दुसऱ्याचे गुणच वर्णावेत. (३)

घष्टणी घिसणी घस्मरपणें। घसर घसरूं घसा खाणें।
घुमघुमों चि घुमणें। योग्य नव्हे ॥ ४ ॥

घासाघासी, घिसघीस, घसघस, घसा खाकरणे, ओरडणे, या गोष्टी कीर्तनात करू नयेत. तसेच अंगात आल्याप्रमाणे उगीच घुमू नये. (४)

नाना नामें भगवंताचीं। नाना ध्यानें सगुणाचीं।
नाना कीर्तनें कीर्तीचीं। अद्भुत करावीं ॥ ५ ॥

भगवंताची नाना नामे, सगुणाच्या नाना रूपांची ध्यानयोग्य वर्णने, भगवंताची कीर्ती यांचे अद्‌भुत असे वर्णन कीर्तनात करावे. (५)

चकचक चुकावेना। चाट चावट चळावेना।
चरचर चुरचुर लागेना। ऐसें करावें ॥ ६ ॥

कीर्तनात चुका करू नयेत. लबाड आणि चावट लोकांना चेकाळू देऊ नये. कुणाचे अंतःकरण दुखावेल असे चरचरीत अथवा चुरचुरीत कीर्तनात बोलू नये. (६)

छळछळ छळणा करूंनये। छळितां छळितां छळों नये।
छळणें छळणा करूं नये। कोणीयेकांची ॥ ७ ॥

कोणासही फसवू नये. उगीच कुणाचा छळ करू नये. आपल्याला कुणी छळले तरी आपण कुणाला छळू नये. (७)

जि जि जि जि म्हणावेना। जो जो जागे तो तो पावना।
जपजपों जनींजनार्दना। संतुष्ट करावें ॥ ८ ॥

कुणाची हांजीहांजी करू नये. जो जो जागृत होतो तो तो पावन होतो. म्हणून निरंतर जप करून जनताजनार्दनाला संतुष्ट करावे. (८)

झिरपे झरे पाझरे जळ। झळके दुरुनी झळाळ।
झडझडां झळकती सकळ। प्राणी तेथें ॥ ९ ॥

झिरपे आणि झरे यांतून पाणी पाझरत असते. झऱ्यांतून झुळझुळ पाणी वाहताना ते दुरून चकाकताना दिसते. ते पाहून ते पाणी पिण्यासाठी सर्व प्राणी झडझडून तेथे येतात. (९)

या या या या म्हणावें नलगे। या या या या उपाव नलगे।
या या या या कांहींच नलगे। सुबुद्धासी ॥ १० ॥

त्या प्राण्यांना या, या असे बोलवावे लागत नाही किंवा ते यावेत म्हणून काही उपायही करावा लागत नाही. त्यांना तहान लागली की ते स्वतःच येतात. त्याप्रमाणे जो शहाणा माणूस असेल त्याला कीर्तन ऐकण्यासाठी आमंत्रण करावे लागत नाही. भक्तिज्ञानाच्या ओढीने तो स्वतःहून तेथे येतो. (१०)

टक टक टक करूं नये। टाळाटाळी टिकों नये।
टम टम टम टम लाऊं नये। कंटाळवाणी ॥ ११ ॥

सारखी कटकट करू नये. कीर्तन करण्याची टाळाटाळ करू नये, पण कंटाळवाणी बडबडही करू नये. (११)

ठस ठेंबस ठकावेना। ठक ठक ठक करावेना।
ठकें ठमकें ठसावेना। मूर्तिध्यान ॥ १२॥

अडाणी आणि मंदमती माणसाची संगत करू नये. उगीच अर्थहीन कटकट करू नये. बाहेरून ठमठमाट दाखविल्याने अंतरंगात मूर्तीचे ध्यान ठसणार नाही. (१२)

डळमळ डळमळ डकों नये। डगमग डगमग कामा नये।
डंडळ डंडळ चुकों नये। हेंकाडपणें ॥ १३॥

मनात अनिश्चितता, अस्वस्थता नसावी. कुठल्याही परिस्थितीत मनोधैर्य ढळता कामा नये. धांदरटपणाने वेड्यासारखे वागून चुका करू नयेत. (१३)

ढिसाळ ढाळ ढळती कुंचे। ढोबळ ढसकण डुले नाचे।
ढळेंचिना ढिगढिगांचे। कंटाळवाणे ॥ १४॥

काही माणसे ढिसाळपणाने चवऱ्या आणि पंखे ढाळतात. काही गलेलठ्ठ माणसे भाताच्या गोळ्यासारखी जागच्या जागी हलतात, डुलतात, तर काही कंटाळवाणेपणाने ढिगासारखी बसकण घालून जराही न हलता बसून राहतात. (१४)

नाना नेटक नागर। नाना नम्र गुणागर।
नाना नेमक मधुर। नेमस्त गाणें ॥ १५॥

कीर्तनकार नीटनेटका, सुसंस्कृत, चतुर असावा. तो नम्र आणि सद्गुणसंपन्न असावा. त्याचे वागणे नेमस्त असावे आणि गाणे मधुर, सुरेल, लयबद्ध असावे. (१५)

ताळ तंबुरे तानमानें। ताळबद्ध तंतगाणें।
तूर्त तार्किक तनें मनें। तल्लीन होती ॥ १६॥

गाण्याच्या जोडीला टाळ, तंबोरे, तानमान आणि तंतुवाद्ये साथीला असावीत. जे जाणकार, तर्कनिष्ठ लोक असतात ते यामुळे शरीराने आणि मनाने तत्काळ तल्लीन होतात. (१६)

थर्थरां थरकती रोमांच। थै थै थै स्वरें उंच।
थिरथिर थिरावे नाच। प्रेमळ भक्तांचा ॥ १७॥

प्रेमळ भक्तांनी ते ऐकले की त्यांच्या शरीरावर थरथरून रोमांच उभे राहातात. ते उच्च स्वराने नामसंकीर्तन करीत धुंद होऊन थयथय थयथय नाचू लागतात. ते त्यात इतके रंगतात की त्यांचा नाच लवकर थांबूच शकत नाही. (१७)

दक्ष दाक्षण्य दाटलें। बंदें प्रबंदें कोंदाटलें।
दमदम दुमदुमों लागलें । जगदांतर ॥ १८॥

कीर्तन- कौशल्याला भरती येते. त्यातील छंद, प्रबंध इत्यादी साहित्याने श्रोते भारावून जातात आणि कीर्तनाच्या घोषाने सर्व जग आणि लोकांचे अंतरंग दुमदूमन जाते. (१८)

धूर्त तूर्त धावोन आला। धिंगबुद्धीनें धिंग जाला।
धाकें धाकें धोकला। रंग अवघा ॥ १९॥

कीर्तन असे रंगात आले असता एखादा दांडगट माणूस मध्येच येऊन कीर्तनात शिरून दांडगाई करू लागतो. त्यामुळे कीर्तनाच्या जमलेल्या रंगाचा बेरंग होणार की काय, असा धाक लोकांना वाटू लागतो. (१९)

नाना नाटक नेटकें। नाना मानें तुकें कौतुकें।
नाना नेमक अनेकें। विद्यापात्रें ॥ २०॥

पण कीर्तनातील आख्यानाचाच तो भाग होता, ते एक नाटक होते, हे कळल्यावर लोक नटाचे कौशल्य वाखाणू लागतात. (२०)

पाप पळोन गेलें दुरी। पुण्य पुष्कळ प्रगटे वरी।
परतरतो परे अंतरीं। चटक लागे ॥ २१॥

असे भावपूर्ण रसाळ कीर्तन असेल तेथून पाप दूर पळून जाते. पुष्कळ पुण्य प्रगट होते. लोकांना कीर्तन अत्यंत आवडल्याने त्यांना कीर्तनाची चटक लागते आणि ते परत परत ऐकावे असे वाटून ते परत कीर्तनास येऊ लागतात. (२१)

फुकट फाकट फटवणें नाहीं। फटकळ फुगडी पिंगा नाहीं।
फिकें फसकट फोल नाहीं। भकाध्या निंदा ॥ २२॥

अशा कीर्तनात उगीच फुकटफाकट कुणाला फसविणे नसते, फुटकळ फुगडी, पिंगा इत्यादी धांगडधिंगा नाही किंवा उगीच कुणाची फुसकी, व्यर्थ, फिकी कुटाळकी अथवा निंदाही नसते. (२२)

बरें बरें बरें म्हणती। बाबा बाबा उदंड करिती।
बळें बळेंचि बळाविती। कथेलागीं ॥ २३॥

अशा कीर्तनाला लोक 'बरे' म्हणून वाखाणतात. कीर्तनकाराला 'बाबा, बाबा' म्हणून त्याचा मानसन्मान करतात आणि कथा करण्यासाठी अत्यंत आग्रहाने त्याला बोलावतात. (२३)

भला भला भला लोकीं। भक्तिभावें भव्य अनेकीं।
भूषण भाविक लोकीं। परोपकारें ॥ २४॥

लोकांत त्याचा 'भला, भला' म्हणून नावलौकिक होतो. भक्तिभावामुळे अनेक लोकांत तो भव्य म्हणून उठून दिसतो. त्याच्या परोपकारी वृत्तीमुळे भाविक लोकांना तो भूषणास्पद वाटतो. (२४)

मानेल तरी मानावें मनें। मत्त न व्हावें ममतेनें।
मी मी मी मी बहुत जनें। म्हणिजेत आहे ॥ २५॥

हे मी जे म्हणतो, ते तुमच्या मनाला पटले तर तुम्ही मानावे. आसक्तीने उन्मत्त होऊ नये. अनेक लोक मी मी असा मीपणाचा अहंकार धरतात. (२५)

येकें टोंकत येकांपासीं। येऊं येऊं येती झडेसी।
या या या या असें तयासी। म्हणावें नलगे ॥ २६॥

काही कीर्तनकार लोकांना 'मी तुमच्याकडे कीर्तनास येतो' असे म्हणून बळजबरीने मागे लागतात. 'आमच्याकडे या' असे त्यांना म्हणावेच लागत नाही. (२६)

राग रंग रसाळ सुरंगें। अंतर संगित रागें।
रत्नपरीक्षा रत्नामागें। धांवती लोक ॥ २७॥

रत्नाची पारख करणारे लोक ज्याप्रमाणे रत्नाचा सुगावा लागला की, त्यामागे धावतात, त्याप्रमाणे रागदारीसह होणारे रसाळ, भक्तिरसात रंगलेले असे सुश्राव्य कीर्तन जेथे होते, तेथे जाणकार लोक आपणहून धावत येतात. (२७)

लवलवां लवती लोचन। लकलकां लकलें मन।
लपलपों लपती जन। आवडीनें ॥ २८॥

असे कीर्तन ऐकताना लोकांचे डोळे अश्रूंनी भरून येतात, त्यांचे मन चकित होते आणि अत्यंत आवडीने आणि घाईगर्दीने ते कीर्तन ऐकण्यास येतात. (२८)

वचनें वाउगीं वदेना। वावरेविवरे वसेना।
वगत्रुत्वें निववी जना। विनित होउनी ॥ २९॥

उत्तम कीर्तनकार कीर्तनात वावगा शब्द बोलत नाही, त्याच्या अंतःकरणात वाकडे-तिकडे काहीही नसते. अत्यंत नम्र होऊन तो आपल्या वक्तृत्वाने लोकांचे अंतःकरण निववितो. (२९)

सारासार समस्तांला। सिकऊं सिकऊं जनाला।
साहित संगित सज्जनाला। बरें वाटे ॥ ३०॥

जगातील सर्व लोकांना सारासारविवेक करायला शिकवावे, अशी त्याची इच्छा असते. सज्जन माणसाला साहित्य आणि संगीत चांगले वाटते. (३०)

खरेंखोटें खरें वाटलें। खर्खर खुर्खुर खुंटलें।
खोटें खोटेपणें गेलें। खोटें म्हणोनियां ॥ ३१॥

जगामध्ये खरेखोटे एकमेकांत मिसळलेले असते. त्यातील खरे कळले, म्हणजे सर्व खरखर, संघर्ष नष्ट होतो. खोटे हे खोटेच असते म्हणून खोटेपणाने ते नाहीसे होते. (३१)

शाहाणे शोधितां शोधेना। शास्त्रार्थ श्रुती बोधेना।
शुक शारिका शमेना। शब्द तयाचा ॥ ३२॥

खरे काय याचा शोध घेऊ लागले, तर शहाण्यांनाही ते उमगत नाही. श्रुती आणि शास्त्रेही त्याचा बोध करून देऊ शकत नाहीत, पण पोपट आणि साळुंकी यांच्याप्रमाणे ते आपले शब्दज्ञान मिरवतच राहातात. (३२)

हरुषें हरुषें हांसिला। हाहाहोहोनें भुलला।
हित होईना तयाला। परत्रीचें ॥ ३३॥

अति हर्ष झाल्याने जो कीर्तनात हसतो, श्रोत्यांनी हो, हो, हो, हो केल्याने जो भुलतो, त्याचे व श्रोत्यांचे परलोकांत कल्याण होत नाही. (३३)

लक्षावें लक्षितां अलक्षीं। लक्षिलें लोचनातें लक्षी।
लंगलें लयेतें अलक्षी। विहिंगममार्गें ॥ ३४॥

अलक्ष असे जे परमात्मस्वरूप त्याकडे लक्ष देण्याचा प्रयत्न करावा. डोळ्यांचा डोळा व्हावे. विहंगम मार्गाने म्हणजे पक्ष्याप्रमाणे त्वरेने अलक्षी लय लावावा. (३४)

क्षेत्र क्षेत्रज्ञ क्षोभतो। क्षमेनें क्षमून क्षमवितो।
क्षमणें क्षोभणें क्षेत्रज्ञ तो। सर्वां ठाईं ॥ ३५॥

शरीरात जो अंतरात्मा असतो, तो एखादे वेळी क्षोभतो, तर एखादे वेळी क्षमाशील होऊन सर्वांना शांतवतो. याप्रमाणे कधी क्षोभणारा, कधी क्षमा करणारा असा अंतरात्मा सर्वांच्याच हृदयात राहात असतो. (३५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'कीर्तनलक्षणनाम' समास चौथा समाप्त.

❑ ❑

## दशक १४ : समास ५

### हरिकथालक्षण

॥ श्रीराम ॥

**मागां हरिकथेचें लक्षण । श्रोतीं केला होता प्रश्न ।**
**सावध होऊन विचक्षण । परिसोत आतां ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, मागे हरिकथेचे लक्षण काय असा प्रश्न श्रोत्यांनी केला होता, तरी जाणत्यांनी सावध होऊन त्याचे उत्तर आता ऐकावे. (१)

**हरिकथा कैसी करावी । रंगें कैसी भरावी ।**
**जेणें पाविजे पदवी । रघुनाथकृपेची ॥ २ ॥**

हरिकथा कशा प्रकारे करावी, तिच्यात रंग कसा भरावा की, ज्यायोगे रघुनाथाच्या कृपेस पात्र होता येते, ते आता ऐका. (२)

**सोनें आणि परिमळे । युक्षदंडा लागती फळें ।**
**गौल्य माधुर्य रसाळें । तरी ते अपूर्वता ॥ ३ ॥**

सोन्याला सुगंध आला आणि उसाला गोड, मधुर, रसाळ फळे लागली तर जी अपूर्वता ठरेल, (३)

**तैसा हरिदास आणी विरक्त । ज्ञाता आणि प्रेमळ भक्त ।**
**वित्पन्न आणि वादरहित । तरी हेहि अपूर्वता ॥ ४ ॥**

त्याप्रमाणे, हरिदास असून, विरक्त, ज्ञानी असून प्रेमळ भक्त, आणि व्युत्पन्न असून जर ती व्यक्ती वादरहित असेल, तर तीही अपूर्वताच होय. (४)

**रागज्ञानी ताळज्ञानी । सकळकळा ब्रह्मज्ञानी ।**
**निराभिमानें वर्ते जनीं । तरी हेहि अपूर्वता ॥ ५ ॥**

रागाचे, तालाचे उत्तम ज्ञान असणारा, सर्व कलांचे उत्तम ज्ञान असून, जो ब्रह्मज्ञानी असूनही, लोकांच्यात अत्यंत निरभिमानाने वागतो, तो कीर्तनकार अपूर्वच म्हणावा. (५)

**मछर नाहीं जयासी । जो अत्यंत प्रिये सज्जनासी ।**
**चतुरांग जाणे मानसीं । अंतरनिष्ठ ॥ ६ ॥**

ज्याच्या मनात जराही मत्सर नाही, जो सज्जनांना अत्यंत प्रिय आहे, जो चतुरस्र असून अंतर्यामी ब्रह्मनिष्ठ आहे, असा कीर्तनकार उत्तम होय. (६)

**जयंत्यादिकें नाना पर्वें । तीर्थें क्षेत्रें जें अपूर्वें ।**
**जेथें वसिजे देवाधिदेवें । सामर्थ्यरूपें ॥ ७ ॥**

जयंती, पुण्यतिथी इत्यादी पर्वकाळांत तसेच अपूर्व अशा तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी सामर्थ्यरूपाने देवाधिदेवाचे अस्तित्व असते. (७)

**तया तीर्थातें जे न मानिती । शब्दज्ञानें मिथ्या म्हणती ।**
**तया पामरां श्रीपती । जोडेल कैंचा ॥ ८ ॥**

जे अशा तीर्थांना मानीत नाहीत, शब्दज्ञानाने मिथ्या म्हणतात, अशा पामरांना भगवंतांची प्राप्ती कशी होईल? (८)

**निर्गुण नेलें संदेहानें । सगुण नेलें ब्रह्मज्ञानें ।**
**दोहिंकडे अभिमानें । वोस केलें ॥ ९ ॥**

निर्गुणाचे अनुभवजन्य निःसंदेह ज्ञान नाही, केवळ शाब्दिक ब्रह्मज्ञानामुळे सगुणावर श्रद्धा नाही, याप्रमाणे अभिमानामुळे ना निर्गुणाची प्राप्ती ना सगुणाची प्राप्ती, अशी स्थिती होऊन दोन्ही दृष्ट्या ते वाया जातात. (९)

**पुढें असतां सगुणमूर्ती । निर्गुणकथा जे करिती ।**
**प्रतिपादून उछेदिती । तेचि पढतमूर्ख ॥ १० ॥**

जे कीर्तनकार सगुण मूर्ती पुढे असताना कथेत निर्गुणाचे प्रतिपादन करून सगुणाचे खंडण करतात, ते पढतमूर्ख जाणावेत. (१०)

**ऐसी न कीजे हरिकथा । अंतर पडे उभये पंथा ।**
**परिस लक्षणें आतां । हरिकथेचीं ॥ ११ ॥**

म्हणून अशा प्रकारे हरिकथा करू नये. कारण सगुण-निर्गुण यांपैकी कुठलेच त्यायोगे साध्य होत नाही. आता उत्तम हरिकथेची लक्षणे श्रोत्यांनी ऐकावीत. (११)

**सगुणमूर्तीपुढें भावें । करुणाकीर्तन करावें ।**
**नाना ध्यानें वर्णावें । प्रतापकीर्तीतें ॥ १२ ॥**

सगुण मूर्तीपुढे भक्तिभावाने करूणरसप्रधान भावपूर्ण कीर्तन करावें. कीर्तनात भगवंताच्या विविध रूपांच्या ध्यानाचे, त्याच्या प्रतापाचे, कीर्तीचे वर्णन करावे. (१२)

**ऐसें गातां स्वभावें । रसाळ कथा वोढवे ।**
**सर्वांतरीं हेलावे । प्रेमसुख ॥ १३ ॥**

अशा प्रकारे भगवंताचे गुणवर्णन केल्याने स्वाभाविकच कथेत अधिकाधिक रस उत्पन्न होऊन सर्व श्रोत्यांच्या अंतःकरणात भगवंतांसंबंधी प्रेमसुख उचंबळून येते. (१३)

कथा रचायाची खूण। सगुणीं नाणावें निर्गुण।
न बोलावे दोष गुण। पुढिलांचे कदा ॥ १४॥

उत्तम कथा करावयाची असेल, तर सगुणांच्या कथेत मध्येच निर्गुणाचे प्रतिपादन करू नये. तसेच पुढे बसलेल्या श्रोत्यांच्या गुणदोषांचे वर्णन करू नये. (१४)

देवाचें वर्णावें वैभव। नाना प्रकारें महत्त्व।
सगुणीं ठेउनियां भाव। हरिकथा करावी ॥ १५॥

सगुणाच्या ठिकाणी भाव ठेवून देवाच्या वैभवाचे व माहात्म्याचे नाना प्रकारे वर्णन हरिकथेत करावे. (१५)

लाज सांडून जनाची। आस्था सांडून धनाची।
नीच नवी कीर्तनाची। आवडी धरावी ॥ १६॥

लोकांची लाज, भीड न धरता आणि द्रव्याची अपेक्षा न करता कीर्तनाची नित्य नवी आवड धरावी. नित्य नवीन आख्याने रंगवावीत. (१६)

नम्र होऊन राजांगणीं। नि:शंक जावें लोटांगणीं।
करताळिका नृत्य वाणी। नामघोषें गर्जावें ॥ १७॥

नम्रतेने देवळातील सभामंडपात नि:शंकपणे देवापुढे लोटांगण घालावे. हातांनी टाळी वाजवत आणि मुखाने नामघोष करीत नाचावे. (१७)

येकांची कीर्ति येकांपुढें। वर्णितां साहित्य न पडे।
म्हणोनियां निवाडे। जेथील तेथें ॥ १८॥

ज्या देवापुढे कीर्तन करायचे असेल, त्याच देवाचे चरित्र, कीर्ती यांचे वर्णन कीर्तनात करावे. तेथे दुसऱ्या देवाची कीर्ती गाऊ नये. जे जेथे योग्य असेल, त्याचीच निवड करावी (१८)

मूर्ती नस्तां सगुण। श्रवणीं बैसले साधुजन।
तरी अद्वैतनिरूपण। अवश्य करावें ॥ १९॥

समजा, जर कीर्तन करताना समोर सगुण मूर्ती नसेल आणि श्रवणास अधिकारी श्रोते असे साधुसज्जन बसलेले असतील, तर अद्वैताचे निरूपण अवश्य करावे. (१९)

नाहीं मूर्ती नाहीं सज्जन। श्रवणीं बैसले भाविक जन।
तरी करावें कीर्तन। प्रस्ताविक वैराग्य ॥ २०॥

समोर सगुण मूर्ती नसेल, अधिकारी साधुसज्जन श्रोते नसतील आणि सर्वसाधारण भाविक लोक श्रवणासाठी बसलेले असतील, तर परमार्थाची प्रस्तावनाच जणू असे जे वैराग्य त्याचे महत्त्व कीर्तनात वर्णन करावे. (२०)

श्रृंघारिक नवरसिक। यामधें सांडावें येक।
स्त्रियादिकांचें कौतुक। वर्णूं नये कीं ॥ २१॥

समजा, कीर्तनात नवरसांचे वर्णन करावे लागले, तरी त्यातील शृंगार रसाच्या वर्णनात स्त्रियांच्या सौंदर्याचे, हावभावांचे कौतुकाने वर्णन करू नये. (२१)

लावण्य स्त्रियांचें वर्णितां। विकार बाधिजे तत्त्वता।
धारिष्टापासून श्रोता। चळे तत्काळ ॥ २२॥

स्त्रियांच्या लावण्याचे वर्णन केल्याने श्रोत्यांच्या मनात कामविकार निर्माण होतो. त्यामुळे तत्काळ ते आपल्या धैर्यापासून चळतात. (२२)

म्हणउन तें तजावें। जें बाधक साधकां स्वभावें।
घेतां अंतरीं ठसावें। ध्यान स्त्रियांचें ॥ २३॥

म्हणून ते गाळावे ज्यायोगे स्त्रियांचे ध्यान श्रोत्यांच्या मनी ठसेल असे, साधकांना जे अत्यंत बाधक आहे, असे वर्णन कीर्तनकाराने करू नये. (२३)

लावण्य स्त्रियांचें ध्यान। कामाकार जालें मन।
कैचें आठवेल ध्यान। ईश्वराचें ॥ २४॥

स्त्रियांच्या लावण्याचे ध्यान लागून जर श्रोता-वक्ता याचे मनांत कामविकार उत्पन्न झाला, तर त्यांना ईश्वराचे ध्यान करणे कसे शक्य होईल? (२४)

स्त्री वर्णितां सुखावला। लावण्याचे भरीं भरला।
तो स्वयें जाणावा चेवला। ईश्वरापासुनी ॥ २५॥

जो कीर्तनकार स्त्रियांचे वर्णन करताना सुखावतो, त्यांच्या लावण्याच्या भरीस पडतो, तो स्वत:ही ईश्वरापासून दुरावला आहे, असे जाणावे. (२५)

हरिकथेसी भावबळें। गेला रंग तो तुंबळे।
निमिष्य येक जरी आकळे। ध्यानीं परमात्मा ॥ २६॥

हरिकथा करीत असता वक्ता जर एक क्षणभर जरी परमात्म्याच्या ध्यानात मग्न झाला, तरी हरिकथेच्या पूर्वी ओसरलेला रंग भावभक्तीच्या बळाने उचंबळून येतो. (२६)

ध्यानीं गुंतलें मन। कैचें आठवेल जन।
निशंक निर्लज कीर्तन। करितां रंग माजे ॥ २७॥

परमात्म्याच्या ध्यानात मन गुंग झाल्याने समोर लोक बसलेले आहेत, हे स्मरणसुद्धा त्याला राहात नाही. आणि प्रेमामुळे तो नि:शंक निर्लज्ज होऊन कीर्तन करू लागला, की रंग भरतो. (२७)

रागज्ञान ताळज्ञान। स्वरज्ञानेंसीं वित्पन्न।
अर्थान्वयाचें कीर्तन। करूं जाणे ॥ २८॥

एखाद्या कीर्तनकाराला उत्तम रागज्ञान असते, तालज्ञान असते, स्वरज्ञान असते, तो विद्वानही असतो आणि अन्वय, अर्थ यांचा समन्वय करून तो उत्तम कीर्तन करतो. (२८)

छपन्न भाषा नाना कळा। कंठमाधुर्य कोकिळा।
परी तो भक्तिमार्ग वेगळा। भक्त जाणती ॥ २९॥

जगात अनेक भाषा आहेत. एखाद्या कीर्तनकाराला अनेक भाषा येत असतात. त्याच्या अंगी नाना कळा असतात. कोकिळेसारखे कंठमाधुर्यही त्याच्याजवळ असते, पण भक्तिमार्ग हा यापेक्षा वेगळाच आहे. जे भक्त असतात, तेच त्यास जाणू शकतात. (२९)

भक्तांस देवाचें ध्यान। देवावांचून नेणे अन्न।
कळावंतांचें जें मन। तें कळाकार जालें ॥ ३०॥

भक्ताला फक्त देवाचेच ध्यान असते. देवावाचून अन्य तो काहीही जाणत नाही अथवा देवाशिवाय इतर काही म्हणजे अन्नही त्याला आठवत नाही. जो कलाकार असतो, त्याचे मन कलाकार होते. (३०)

श्रीहरिवीण जे कळा। तेचि जाणावी अवकळा।
देवास सांडून वेगळा। प्रत्यक्ष पडिला ॥ ३१॥

भगवंतावाचून जी कळा ती कळा नसून अवकळा असते. एखादा कलाकार कलेमुळे देवाला विसरून वेगळा पडतो, हे प्रत्यक्ष दिसून येते. (३१)

सर्पी वेढिलें चंदनासी। निधानाआड विवसी।
नाना कळा देवासी। आड तैस्या ॥ ३२॥

चंदनाला सर्पाने वेढावे किंवा पुरलेल्या द्रव्याच्या लाभाच्या आड पिशाच्च अथवा हडळ येते, तशा देवाच्या प्राप्तीच्या आड कधी कधी अनेक कला येतात. (३२)

सांडून देव सर्वज्ञ। नादामध्यें व्हावें मग्न।
तें प्रत्यक्ष विघ्न। आडवें आलें ॥ ३३॥

सर्वज्ञ देवाला सोडून नादामध्ये जर मन मग्न झाले, तर ते भगवत्प्राप्तीच्या आड आलेले प्रत्यक्ष विघ्नच समजावे. (३३)

येक मन गुंतलें स्वरीं। कोणें चिंतावा श्रीहरी।
बळेंचि धरूनियां चोरीं। शिश्रूषा घेतली ॥ ३४॥

माणसाला मन तर एकच आहे. ते जर स्वरातच गुंतून पडले, तर श्रीहरींचे ध्यान कोणी करावे? एखाद्या चोराने एखाद्या माणसाला बळेच धरून न्यावे आणि त्याच्याकडून सेवा करून घ्यावी, तसेच ते घडते. (३४)

करितां देवाचें दर्शन। आडवें आलें रागज्ञान।
तेणें धरूनियां मन। स्वरामागें नेलें ॥ ३५॥

कीर्तनकार देवदर्शन घडावे म्हणून कीर्तन करू लागतो, पण त्याचे रागज्ञान त्यात विघ्नाप्रमाणे आडवे येते. ते रागज्ञान त्याच्या मनाला पकडून धरून स्वरामागे घेऊन जाते. (३५)

भेटों जातां राजद्वारीं। बळेंचि धरिला बेगारी।
कळावंतां तैसी परी। कळेनें केली ॥ ३६॥

राजाला भेटावे म्हणून राजद्वारी जाणाऱ्या माणसाला राजाच्या सेवकांनी पकडून वेठबिगारीला लावावे, त्याप्रमाणे कलेच्या योगाने कलावंताची स्थिती होते. (३६)

मन ठेऊन ईश्वरीं। जो कोणी हरिकथा करी।
तोचि ये संसारीं। धन्य जाणा ॥ ३७॥

जो कोणी ईश्वराच्या ठिकाणी मन ठेवून हरिकथा करतो, तो या जगात धन्य जाणावा. (३७)

जयास हरिकथेची गोडी। उठे नीच नवी आवडी।
तयास जोडली जोडी। सर्वोत्तमाची ॥ ३८॥

ज्याला हरिकथेची आवड असून,हरिकथेत नित्य नवी गोडी वाटते, त्याने सर्वोत्तमास आपलेसे केले आहे असे जाणावे. (३८)

हरिकथा मांडली जेथें। सर्व सांडून धांवे तेथें।
आलस्य निद्रा दवडून स्वार्थे। हरिकथेसी सादर ॥ ३९॥

जेथे कुठे हरिकथा होत असेल, तेथे आळस, निद्रा आणि स्वार्थ इत्यादी सोडून जो धाव घेतो आणि अत्यंत आदराने कथा ऐकतो, (३९)

हरिभक्तांचिये घरीं। नीच कृत्य अंगिकारी।
साहेभूत सर्वांपरी। साक्षपें होये ॥ ४० ॥

तसेच हरिभक्ताच्या घरी कोणतेही हलके काम देखील मनापासून करतो आणि सर्व प्रकारे जाणीवपूर्वक त्यास साहाय्यभूत होतो, (४०)

या नांव हरिदास। जयासि नामीं विश्वास।
येथून हा समास। संपूर्ण जाला ॥ ४१ ॥

आणि ज्याचा नामावर दृढ विश्वास असतो त्याला हरिदास असे म्हणतात. श्रीसमर्थ असे म्हणतात की, येथे हा समास पूर्ण झाला. (४१).

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'हरिकथालक्षणनाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १४ : समास ६
## चातुर्येलक्षण

॥ श्रीराम ॥

रूप लावण्य अभ्यासितां न ये। सहजगुणास न चले उपाये।
कांहीं तरी धरावी सोये। अगांतुक गुणाची ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, आपले रूप आणि लावण्य हे गुण अभ्यासाने साध्य होत नाहीत. कारण ते जन्मजात असतात. तेथे काही उपाय चालत नाही. म्हणून आगंतुक गुण प्राप्त करण्यासाठी जरूर प्रयत्न करावेत. (१)

काळें माणुस गोरें होयेना। वनाळास येत्न चालेना।
मुक्यास वाचा फुटेना। हा सहजगुण ॥ २ ॥

काळा माणूस गोरा होऊ शकत नाही. जन्मखुणा, व्रण इ. काढता येत नाही. मुक्या माणसाला बोलता येत नाही, कारण तो त्याचा सहज गुण आहे. (२)

आंधळें डोळस होयेना। बधिर तें ऐकेना।
पांगुळ पाये घेइना। हा सहजगुण ॥ ३ ॥

आंधळा माणूस डोळस होऊ शकत नाही. बधिर माणूस ऐकू शकत नाही. पांगळा माणूस चालू शकत नाही. हा त्याचा सहज गुण आहे. (३)

कुरूपतेचीं लक्षणें। किती म्हणोनि सांगणें।
रूप लावण्य याकारणें। पालटेना ॥ ४ ॥

यांप्रमाणे कुरूपतेची किती तरी लक्षणे सांगता येतील. पण मूळ जे रूप आणि लावण्य असते, त्यात बदल होऊ शकत नाही. (४)

अवगुण सोडितां जाती। उत्तम गुण अभ्यासितां येती।
कुविद्या सांडून सिकती। शाहाणे विद्या ॥ ५ ॥

पण अवगुण सोडता येतात, उत्तम गुण अभ्यासाने प्राप्त करता येतात. शहाणे लोक असतात ते कुविद्येचा त्याग करून सद्‌विद्या शिकतात. (५)

मूर्खपण सांडितां जातें। शाहाणपण सिकतां येतें।
कारबार करितां उमजतें। सकळ कांहीं ॥ ६ ॥

मूर्खपणाचा त्याग केला तर ते जाते. शिकल्याने शहाणपण येऊ शकते. कारभार, उद्योगधंदा करू लागल्यावर त्यांतील सर्व काही बारकावे कळू लागतात. (६)

मान्यता आवडे जीवीं। तरी कां उपेक्षा करावी।
चातुर्येंविण उंच पदवी। कदापी नाहीं ॥ ७ ॥

माणसाला मोठेपणा मनापासून आवडतो, मग त्याची उपेक्षा का करावी? चातुर्याशिवाय श्रेष्ठ पदवी कधीही प्राप्त होत नाही. (७)

ऐसी प्रचित येते मना। तरी कां स्वहित कराना।
सन्मार्गें चालतां, जना-। सज्जना माने ॥ ८ ॥

मनाला अशी प्रचीती येत असते, मग आपले हित का साधून घेत नाही. सन्मार्गाने चालले असता लोकांत आणि सज्जनात मान्यता मिळते. (८)

देहे नेटकें श्रृंघारिलें। परी चातुर्येंविण नासलें।
गुणेंविण साजिरें केलें। बाष्कळ जैसें ॥ ९ ॥

देहाला बाहेरून नीटनेटके शृंगारले, तरी अंगी चातुर्य नसेल तर ते व्यर्थ ठरते. बाष्कळ माणसाच्या अंगी गुण नसताना त्याला सजवावे, तसे हे आहे. (९)

अंतर्कळा श्रृंघारावी। नानापरी उमजवावी।
संपदा मेळऊन भोगावी। सावकास ॥ १० ॥

म्हणून माणसाने आपले अंतरंग उत्तम गुणांनी युक्त करावे. नाना प्रकारचे ज्ञान प्राप्त करावे आणि संपत्ती मिळवून सावकाश तिचा उपभोग घ्यावा. (१०)

प्रेत्न करीना सिकेना। शरीर तेंहि कष्टवीना।
उत्तम गुण घेईना। सदाकोपी ॥ ११ ॥

जो काहीही प्रयत्न करत नाही, काही शिकत नाही, शरीरास काहीही कष्ट पडू देत नाही आणि उत्तम गुणही घेत नाही, तो सदा चिडचिडत असतो. (११)

आपण दुसऱ्यास करावें। तें उसिणें सवेंचि घ्यावें।
जना कष्टवितां कष्टावें। लगेल बहु ॥ १२ ॥

आपण दुसऱ्याशी जसे वागतो, तशीच त्याची प्रतिक्रिया आपल्याला प्राप्त होते. आपण जर लोकांना त्रास दिला तर आपल्यालाही खूप त्रास सोसावा लागेल. (१२)

न्यायें वर्तेल तो शाहाणा। अन्याइ तो दैन्यवाणा।
नाना चातुर्याच्या खुणा। चतुर जाणे ॥ १३ ॥

जो न्यायाने वागतो, तोच शहाणा होय. जो अन्यायाने वागतो, तो दैन्यवाणा असतो. जो चतुर असतो, तोच चातुर्याच्या नाना खुणा जाणतो. (१३)

जें बहुतांस मानलें। तें बहुतीं मान्य केलें।
येर तें वेर्थचि गेलें। जगनिंद्य ॥ १४ ॥

जी गोष्ट अनेकांना मान्य असते, ती सर्वमान्य ठरते. याउलट जे अनेकांना मान्य नाही, ते व्यर्थ होते. निंद्य ठरते. (१४)

लोक आपणासि वोळावे। किंवा आवघेच कोंसळावे।
आपणास समाधान फावे। ऐसें करावें ॥ १५ ॥

लोक आपणावर प्रसन्न होवोत अथवा आपल्याविरुद्ध जावोत, ज्यायोगे आपणाला समाधान वाटेल तेच करावे. (१५)

समाधानें समाधान वाढे। मित्रिनें मित्रि जोडे।
मोडितां क्षणमात्रें मोडे। बरेपण ॥ १६ ॥

समाधानाने समाधान वाढते. मैत्रीने मैत्री वाढते. पण चांगुलपणा नष्ट व्हायला एक क्षणही पुरेसा होतो. (१६)

अहो कांहो अरे कां रे। जनीं ऐकिजेतें किं रे।
कळत असतांच कां रे। निकामीपण ॥ १७ ॥

आपण 'अहो' असे सन्मानाने संबोधले तर 'का हो' असे आपल्याला संबोधले जाते. आपण 'अरे' म्हटले तर 'का रे' असे प्रत्युत्तर मिळते, असे हे लोकांत ऐकू येते, दिसते. तरी कळत असून, आपण अयोग्य वर्तन का बरे करावे ? (१७)

चातुर्यें श्रृंघारे अंतर। वस्त्रें श्रृंघारे शरीर।
दोहिंमधें कोण थोर। बरें पाहा ॥ १८ ॥

एखादा चातुर्याने अंतरंग सजवतो, दुसरा कुणी उत्तम वस्त्रे धारण करून शरीर शृंगारतो. या दोघांमध्ये थोर कुणास म्हणावे, हे विचार करून पहा बरे! (१८)

बाह्याकार श्रृंघारिलें। तेणें लोकांच्या हातासि काये आलें।
चातुर्यें बहुतांसि रक्षिलें। नाना प्रकारें ॥ १९ ॥

बाहेरून शरीरास शृंगारले त्यामुळे लोकांचा काय फायदा झाला? चातुर्याने अनेकांचे नाना प्रकारे रक्षण करता येते. (१९)

बरें खावें बरें जेवावें। बरें ल्यावें बरें नेसावें।
समस्तीं बरें म्हणावें। ऐसी वासना ॥ २० ॥

चांगले खावे, चांगले जेवावे, उत्तम वस्त्र ल्यावे. उत्तम वस्त्र नेसावे. सर्व लोकांनी आपल्याला चांगले म्हणावे, अशी वासना-इच्छा सर्वांनाच असते. (२०)

तनें मनें झिजावें। तेणें भलें म्हणोन घ्यावें।
उगेंचि कल्पितां सिणावें। लगेल पुढें ॥ २१ ॥

शरीराने, मनाने जो लोकांसाठी झिजतो, कष्ट करतो, त्याला लोक भले म्हणतात. उगीच काहीच न करता जो बसून कल्पना करीत राहातो, त्याला पुढे शिणावे लागते. (२१)

लोकीं कार्यभाग आडे। तो कार्यभाग जेथें घडे।
लोक सहजचि वोढे। कामासाठीं ॥ २२ ॥

लोकांचे एखादे काम अडलेले असते, ते ज्याच्यामुळे पूर्ण होते, त्याच्याकडे आपापल्या कामासाठी लोक सहजच आकर्षित होतात. (२२)

म्हणोन दुसऱ्यास सुखी करावें। तेणें आपण सुखी व्हावें।
दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें। लागेल स्वयें ॥ २३॥

म्हणून दुसऱ्याला सुखी करावे आणि त्यायोगे आपणही सुखी व्हावे. आपण जर दुसऱ्याला कष्ट दिले, तर पुढे आपल्यालाही कष्ट सोसावे लागतात. (२३)

हें तों प्रगटचि आहे। पाहिल्याविण कामा नये।
समजणें हा उपाये। प्राणीमात्रांसी ॥ २४॥

नीट जाणून घेतल्याशिवाय कुठलेही काम नीट होत नाही, ही गोष्ट प्रगटच आहे. म्हणून कुठलीही गोष्ट समजून घेणे हाच सर्व प्राणिमात्रासाठी उपाय आहे. (२४)

समजले आणी वर्तले। तेचि भाग्यपुरुष जाले।
यावेगळे उरले। तें करंटे पुरुष ॥ २५॥

जे कोणी कुठल्याही विषयाची नीट माहिती करून घेऊन त्याप्रमाणे वागतात, ते पुरुष भाग्यवान होत. याशिवाय जे इतर असे करीत नाहीत, ते करंटे, भाग्यहीन जाणावेत. (२५)

जितुका व्याप तितुकें वैभव। वैभवासारिखा हावभाव।
समजलें पाहिजे, उपाव। प्रगटचि आहे ॥ २६॥

जितका व्याप आपण वाढवू, त्याप्रमाणे वैभव प्राप्त होते. जसे वैभव प्राप्त होईल, तसे त्याचे बोलणे-वागणे असते. म्हणून नीट समजून वागणे हाच यासाठी उपाय आहे. (२६)

आळसें कार्येभाग नासतो। साक्षेप होत होत होतो।
दिसते गोष्टी कळेना, तो-। शाहाणा कैसा ॥ २७॥

कुठल्याही गोष्टीत आळस केला तरी कार्य होत नाही. सतत प्रयत्न करीत राहिले की कार्य सिद्धीस जाते. ही गोष्ट प्रत्यक्ष दिसत असता ज्याला कळत नाही, त्याला शहाणे कसे म्हणावे? (२७)

मित्रि करितां होतें कृत्य। वैर करितां होतो मृत्य।
बोलिलें हें सत्य किं असत्य। वोळखावें ॥ २८॥

कुणाशीही मैत्री केली की आपले काम होते. याउलट कुणाशी वैर केले तर मृत्यू ओढवतो. मी जे सांगतो ते खरे की खोटे हे श्रोत्यांनी ओळखावे. (२८)

आपणास शाहाणें करूं नेणे। आपलें हित आपण नेणे।
जनीं मैत्रि राखों नेणे। वैर करी ॥ २९॥

जो स्वतःला शहाणा करू शकत नाही; ज्याला आपले स्वतःचे हित कशात आहे हे कळत नाही, लोकांशी मैत्री कशी करावी हेही कळत नाही आणि जो लोकांशी वैर करतो, (२९)

ऐसे प्रकारीचे जन। त्यास म्हणावें अज्ञान।
तयापासीं समाधान। कोण पावे ॥ ३०॥

असा जो कोणी असतो, त्याला अज्ञानी म्हणावे. त्याच्यापाशी समाधान कोणाळा लाभेल? (३०)

आपण येकायेकी येकला। सृष्टींत भांडत चालिला।
बहुतांमध्यें येकल्याला। येश कैंचें ॥ ३१॥

असा जो अगदी एकटा पडून सर्वांशी भांडत राहतो, त्याला चारचौघांत यश कसे मिळणार? (३१)

बहुतांचे मुखीं उरावें। बहुतांचे अंतरीं भरावें।
उत्तम गुणीं विवरावें। प्राणीमात्रांसी ॥ ३२॥

म्हणून अनेकांना मदत करून नाव कमवावे. अनेकांच्या अंतःकरणात स्थान मिळवावे. उत्तम गुणांच्या योगे प्राणिमात्रांस विवेकी करावे. (३२)

शाहाणे करावें जन। पतित करावे पावन।
सृष्टिमधें भगवद्भजन। वाढवावें ॥ ३३॥

लोकांना शहाणे करावे. पतित असतील त्यांना पावन करून घ्यावे. जगात भगवद्‌भजन वाढवावे, असे श्रीसमर्थ सांगतात. (३३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चातुर्येलक्षणनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक १४ : समास ७
## युगधर्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

नाना वेष नाना आश्रम। सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम।
जेथें पावती विश्राम। त्रैलोक्यवासी ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, या जगात नाना वेष आणि नाना आश्रम आहेत. पण सर्वांचे मूळ गृहस्थाश्रम आहे. सर्व त्रैलोक्यांतील लोकांना गृहस्थाच्या घरीच विश्राम प्राप्त होतो. (१)

देव ऋषी मुनी योगी। नाना तापसी वीतरागी।
पितृआदिकरून विभागी। अतीत अभ्यागत ॥ २ ॥

देव, ऋषी, मुनी, योगी, अनेक तपस्वी लोक, तसेच वैराग्यसंपन्न लोक, तसेच पितर आणि अतिथी-अभ्यागत आदी सर्व गृहस्थाघरच्या अन्नाचे अधिकारी असतात. (२)

गृहस्थाश्रमीं निर्माण जाले। आपला आश्रम टाकून गेले।
परंतु गृहस्थागृहीं हिंडों लागले। कीर्तिरूपें ॥ ३ ॥

हे सर्व गृहस्थाश्रमातच जन्मले. त्यांनी नंतर गृहस्थाश्रमाचा त्याग केला आणि साधन करून कीर्ती मिळवली; परंतु भिक्षेसाठी त्यांना गृहस्थांच्या घरीच हिंडावे लागते. (३)

याकारणें गृहस्थाश्रम। सकळामधें उत्तमोत्तम।
परंतु पाहिजे स्वधर्म। आणी भूतदया ॥ ४ ॥

म्हणून सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम हा उत्तमोत्तम होय. परंतु गृहस्थाच्या ठिकाणी स्वधर्मनिष्ठा आणि भूतदया मात्र असणे आवश्यक आहे. (४)

जेथें शडकर्मे चालती। विध्योक्त क्रिया आचरती।
वाग्माधुर्ये बोलती। प्राणीमात्रांसी ॥ ५ ॥

गृहस्थाश्रमातच षट्कर्मे (अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान आणि प्रतिग्रह) चालतात. गृहस्थ विधियुक्त क्रियेचे आचरण करतात आणि प्राणिमात्रांशी मधुर वाणीने बोलतात. (५)

सर्व प्रकारें नेमक। शास्त्रोक्त करणें कांहींयेक।
त्याहिमध्यें अलोलिक। तो हा भक्तिमार्ग ॥ ६ ॥

सर्व प्रकारे शास्त्रोक्त कर्मांचे नियमितपणे आचरण करावे. त्यांतही भक्तिमार्ग हा अलौकिक आहे. (६)

पुरश्चरणी कायाक्लेसी। दृढव्रती परम सायासी।
जगदीशावेगळें जयासी। थोर नाहीं ॥ ७ ॥

जो पुरश्चरणे करतो, शरीरास कष्ट देण्यास तयार असतो, दृढव्रती आणि खूप प्रयत्नशील असतो, पण ज्याला एका जगदीशाशिवाय दुसरे काही श्रेष्ठ वाटत नाही, (७)

काया वाचा जीवें प्राणें। कष्टे भगवंताकारणें।
मनें घेतलें धरणें। भजनमार्गी ॥ ८ ॥

जो शरीराने, वाणीने, जीवाने आणि प्राणाने भगवंतासाठी कष्ट सोसतो, ज्याच्या मनाने भक्तिमार्गात जणू काही धरणेच धरलेले असते, (८)

ऐसा भगवंताचा भक्त। विशेष अंतरीं विरक्त।
संसार सांडून जाला मुक्त। देवाकारणें ॥ ९ ॥

असा जो भगवतांचा भक्त असतो आणि जो अंतरात विशेष विरक्त असतो, तो संसार सोडून भगवंतासाठी मुक्त होतो. (९)

अंतरापासून वैराग्य। तेंचि जाणावें महद्भाग्य।
लोलंगतेयेवढें अभाग्य। आणीक नाहीं ॥ १० ॥

अंत:करणापासून वैराग्य उत्पन्न होणे हे महद्भाग्य जाणावे. आसक्तीएवढे अभाग्य दुसरे नाही. (१०)

राजे राज्य सांडून गेले। भगवंताकारणें हिंडले।
कीर्तिरूपें पावन जाले। भूमंडळीं ॥ ११ ॥

असे वैराग्य प्राप्त झाल्यानेच अनेक राजे राज्य सोडून भगवत्प्राप्तीकरिता हिंडले आणि भगवत्प्राप्ती करून घेऊन या जगात कीर्तिरूपाने पावन झाले. (११)

ऐसा जो कां योगेश्वर। अंतरीं प्रत्ययाचा विचार।
उकलूं जाणे अंतर। प्राणीमात्रांचें ॥ १२ ॥

असा जो योगेश्वर असतो, ज्याला अंतर्यामी स्वरूपानुभव आलेला असतो, तो सर्व प्राणिमात्रांचे अंत:करण जाणू शकतो. त्याच्याकडे लोक आकर्षित होतात. (१२)

ऐसी वृत्ती उदासीन। त्याहिवरी विशेष आत्मज्ञान।
दर्शनमात्रें समाधान। पावती लोक ॥ १३ ॥

असा जो अनासक्त आणि त्याहूनही विशेष म्हणजे आत्मज्ञानी असतो, त्याच्या केवळ दर्शनानेही लोकांना समाधान होते. (१३)

बहुतांसी करी उपाये। तो जनाच्या वाट्या न ये।
अखंड जयाचे हृदये। भगवद्रूप ॥ १४॥

तो अनेक लोकांवर उपकार करतो, त्यांच्या उपयोगी पडतो, म्हणून लोक त्याच्यामागे धावतात. पण तो लोकांच्या वाट्यासच येत नाही. त्याचे हृदय अखंड भगवद्रूप झालेले असते. (१४)

जनास दिसे हा दुश्चित। परी तो आहे सावचित।
अखंड जयाचें चित्त। परमेश्वरीं ॥ १५॥

लोकांना बाह्यत: तो आपल्यासारखाच दुश्चित्त आहे, असे वाटते. पण तो नेहमी सावधान असतो आणि त्याचे चित्त अखंड परमेश्वराच्या ठिकाणी जडलेले असते. (१५)

उपासनामूर्तिध्यानीं। अथवा आत्मानुसंधानीं।
नाहीं तरी श्रवणमननीं। निरंतर ॥ १६॥

तो निरंतर उपास्य देवतेच्या मूर्तीच्या ध्यानात अथवा आत्मानुसंधानात नाहीतर श्रवणमननात दंग असतो. (१६)

पूर्वजांच्या पुण्यकोटी। संग्रह असिल्यां गांठीं।
तरीच ऐसीयाची भेटी। होये जनासी ॥ १७॥

पूर्वजांच्या अपरंपार पुण्याचा संग्रह गाठी असेल, तरच लोकांची अशा भगवद्भक्ताशी गाठ पडू शकते. (१७)

प्रचीतिविण जें ज्ञान। तो आवघाचि अनुमान।
तेथें कैंचें परत्रसाधन। प्राणीयांसी ॥ १८॥

अनुभवाशिवायचे ज्ञान ते खरे नसून काल्पनिक असते. त्यायोगे प्राणिमात्रांचा उद्धार कसा होणार? (१८)

याकारणें मुख्य प्रत्यये। प्रचीतिविण कामा नये।
उपायासारिखा अपाये। शाहाणे जाणती ॥ १९॥

म्हणून परमार्थात प्रचीतीला, अनुभवाला महत्त्व आहे. अनुभवाशिवायचे ज्ञान उपयोगी पडत नाही. त्याने उपायाएवजी अपायच होतो, हे शहाणे लोक जाणतात. (१९)

वेडें संसार सांडून गेलें। तरी तें कष्टकष्टोंचि मेलें।
दोहिंकडे अंतरलें। इहलोक परत्र ॥ २०॥

एखादा वेडा अज्ञानी माणूस घर सोडून निघून जातो आणि कष्ट करून करून मरून जातो. प्रपंच आणि परमार्थ तसेच इहलोक आणि परलोक या दोन्हींना तो अंतरतो. (२०)

रागें रागें निघोन गेला। तरी तो भांडभांडोंचि मेला।
बहुत लोक कष्टी केला। आपणहि कष्टी ॥ २१॥

रागारागाने निघून गेला आणि भांडता भांडताच मरून गेला. त्याच्यामुळे अनेक लोक दु:खी-कष्टी झाले आणि तो स्वत:ही कष्टी झाला. (२१)

निघोन गेला परी अज्ञान। त्याचे संगती लागले जन।
गुरु शिष्य दोघे समान। अज्ञानरूपें ॥ २२॥

एखादा असा घर सोडून निघून जातो, पण तो अज्ञानीच असतो. काही लोक त्याच्या संगतीला लागतात. पण गुरुशिष्य दोघेही अज्ञानामुळे समसमानच असतात. (२२)

आशाबद्धी अनाचारी। निघोन गेला देशांतरीं।
तरी तो अनाचारचि करी। जनामधें ॥ २३॥

एखादा आशाळभूत आणि दुराचारी माणूस घर सोडून देशांतराला गेला तरी, तेथेही लोकांत तो अनाचारच करतो. (२३)

गृहीं पोटेंविण कष्टती। कष्टी होऊन निघोन जाती।
त्यास ठाईं ठाईं मारिती। चोरी भरतां ॥ २४॥

घरी अन्नावाचून कष्टी होतात आणि घर सोडून निघून जातात. त्याने चोरी केली अथवा त्याच्यावर चोरीचा आरोप आला तर लोक त्याला जेथे जाईल तेथे चोप देतात. (२४)

संसार मिथ्या ऐसा कळला। ज्ञान समजोन निघोन गेला।
तेणें जन पावन केला। आपणाऐसा ॥ २५॥

जो नित्यानित्यविवेकाने संसार मिथ्या आहे हे जाणून ज्ञानप्राप्तीसाठी निघून जातो, तो ज्ञान प्राप्त करून स्वत: पावन होतो व इतर लोकांनाही पावन करतो. (२५)

येके संगतीनें तरती। येके संगतीनें बुडती।
याकारणें सत्संगती। बरी पाहावी ॥ २६॥

संगतीनेच एखादा तरतो, तर संगतीनेच एखादा बुडतो. म्हणून नीट विचारपूर्वक सत्संगतीच करावी. (२६)

जेथें नाहीं विवेकपरीक्षा। तेथें कैंची असेल दीक्षा।
घरोघरीं मागतां भिक्षा। कोठेंहि मिळेना ॥ २७॥

जेथे विवेकाच्या कसोटीस साधू उतरत नाही, तेथे त्याच्याकडून दीक्षा कशी प्राप्त होणार? अज्ञानाने उगीच घरोघरी भिक्षा मागितली तरी ती कोठेच मिळत नाही. (२७)

जो दुसऱ्याचें अंतर जाणे। देश काळ प्रसंग जाणे।
तया पुरुषा काय उणें। भूमंडळीं ॥ २८॥

जो दुसऱ्याचे अंतरंग जाणतो, वेळप्रसंग जाणतो अशा (चतुर) पुरुषाला या भूमंडळावर काहीही उणे पडत नाही. (२८)

नीच प्राणी गुरुत्व पावला। तेथें आचारचि बुडाला।
वेदशास्त्रब्राह्मणाला। कोण पुसे ॥ २९॥

नीच माणसाला गुरुत्व प्राप्त झाले तर आचारच नष्ट होतो. मग वेद, शास्त्र, ब्राह्मण यांना कोण विचारतो. (२९)

ब्रह्मज्ञानाचा विचारू। त्याचा ब्राह्मणासीच अधिकारू।
वर्णानां ब्राह्मणो गुरुः। ऐसें वचन ॥ ३०॥

फक्त ब्राह्मणांनाच ब्रह्मज्ञानाचा अधिकार आहे. **'वर्णानां ब्राह्मणो गुरुः'** असे शास्त्रवचन आहे.(३०)

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले।
गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्यांचे ॥ ३१॥

पण ब्राह्मण आता बुद्धिभ्रष्ट झाले आहेत. त्यांची बुद्धी असून नसल्यासारखी झाली आहे. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी शुद्ध आचारही राहिलेला नाही. स्वतःचे श्रेष्ठत्व सोडून ते शिष्यांचेही शिष्य झाले आहेत. (३१)

कित्येक दावलमलकास जाती। कित्येक पीरास भजती।
कित्येक तुरुक होती। आपले इच्छेनें ॥ ३२॥

कित्येक जण दावलमलकाकडे जातात. कित्येकजण पीराला भजतात, तर कित्येकजण आपल्या इच्छेने तुर्क होतात. (३२)

ऐसा कल्युगींचा आचार। कोठें राहिला विचार।
पुढें पुढें वर्णसंकर। होणार आहे ॥ ३३॥

कलियुगातील आचार हा असा आहे. विचार कुठे शिल्लकच राहिलेला नाही. पुढे पुढे वर्णसंकर होणार आहे. (३३)

गुरुत्व आलें नीचयाती। कांहींयेक वाढली महंती।
शूद्र आचार बुडविती। ब्राह्मणाचा ॥ ३४॥

आध्यात्मिक गुरुत्व हलक्या जातीच्या लोकांकडे गेल्याने ते स्वतःचा मोठेपणा थोडा फार वाढवतात. शूद्र स्वतःच अनाचारी असल्याने त्यांच्या अनुयायांत ब्राह्मणांच्या आचाराचे महत्त्व राहत नाही. (३४)

हें ब्राह्मणास कळेना। त्याची वृत्तिच वळेना।
मिथ्या अभिमान गळेना। मूर्खपणाचा ॥ ३५॥

पण आपला अधःपात होत आहे, हे ब्राह्मणाला कळत नाही. त्याच्या वृत्तीत बदल होत नाही. त्याचा मूर्खपणाचा अभिमान नाहीसा होत नाही. (३५)

राज्य नेलें म्लेंछिं क्षेत्रीं। गुरुत्व नेलें कुपात्रीं।
आपण अरत्रीं ना परत्रीं। कांहींच नाहीं ॥ ३६॥

म्लेंच्छांनी, क्षत्रियांनी राज्य नेले. अपात्र व्यक्तींनी त्यांचे गुरुत्व नेले. धड ना इहलोक धड ना परलोक, काहीच नाही, अशी त्यांची स्थिती झाली आहे.(३६)

ब्राह्मणास ग्रामणीनें बुडविलें। विष्णूनें श्रीवत्स मिरविलें।
त्याच विष्णूनें श्रापिलें। फरशरामें ॥ ३७॥

ब्राह्मणांना अनाचाराने, बुडविले आहे. ब्राह्मणांचे पदचिह्न श्रीवत्स ज्या श्रीविष्णूने आपल्या वक्षःस्थलावर मिरविले, त्या विष्णूनेच परशुरामरूपाने त्यांना शाप दिला. (३७)

आम्हीहि तेचि ब्राह्मण। दुःखें बोलिलें हें वचन।
वडिल गेले ग्रामणी करून। आम्हां भोंवतें ॥ ३८॥

आम्हीही तेच ब्राह्मण आहोत, म्हणून मोठ्या दुःखाने आम्ही हे वचन बोलत आहोत. वडील माणसे अनाचार करून गेली, त्याचे परिणाम आम्हांला भोवत आहेत. (३८)

आतांचे ब्राह्मणीं काय केलें। अन्न मिळेना ऐसें जालें।
तुम्ह्य बहुतांचे प्रचितीस आलें। किंवा नाहीं ॥ ३९॥

आत्ताचे ब्राह्मण तरी काय करीत आहेत? त्यांना खायला अन्न मिळत नाही, असे झाले आहे. तुमच्यापैकी अनेकांच्या हे अनुभवास आले की नाही ? (३९)

बरें वडिलांस काये म्हणावें। ब्राह्मणाचें अदृष्ट जाणावें।
प्रसंगें बोलिलें स्वभावें। क्षमा केलें पाहिजे ॥४०॥

पण वडील माणसांना काय म्हणावे? त्यांना कसा दोष द्यावा? ब्राह्मणांचे अदृष्ट म्हणून असे झाले असे समजावे. प्रसंगामुळे स्वाभाविकच बोलले गेले, तरी श्रोत्यांनी क्षमा केली पाहिजे. (४०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'युगधर्मनिरूपणनाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक १४ : समास ८
## अखंडध्याननिरूपण

॥ श्रीराम ॥

बरें ऐसा प्रसंग जाला। जाला तो होऊन गेला।
आतां तरी ब्राह्मणीं आपणाला। शाहाणे करावें ॥ १ ॥

देव पुजावा विमळहस्तीं। तेणें भाग्य पाविजे समस्तीं।
मूर्ख अभक्त वेस्तीं। दरिद्र भोगिजे ॥ २ ॥

आधीं देवास वोळखावें। मग अनन्यभावें भजावें।
अखंड ध्यानचि धरावें। सर्वोत्तमाचें ॥ ३ ॥

सर्वांमधें जो उत्तम। तया नांव सर्वोत्तम।
आत्मानात्मविवेकवर्म। ठाईं पाडावें ॥ ४ ॥

जाणजाणों देह रक्षी। आत्म द्रष्टा अंतरसाक्षी।
पदार्थमात्रास परीक्षी। जाणपणें ॥ ५ ॥

तो सकळ देहांमधें वर्ततो। इंद्रियेंग्राम चेष्टवितो।
प्रचितीनें प्रत्यये येतो। प्राणीमात्रीं ॥ ६ ॥

प्राणीमात्रीं जगदांतरें। म्हणोनि राखावीं अंतरें।
दाता भोक्ता परस्परें। सकळ कांहीं ॥ ७ ॥

देव वर्ततो जगदांतरीं। तोचि आपुले अंतरीं।
त्रैलोकींचे प्राणीमात्रीं। बरें पाहा ॥ ८ ॥

मुळीं पाहाणार तो येकला। सकळां ठाईं विभागला।
देहप्रकृतीनें जाला। भिन्न भिन्न ॥ ९ ॥

भिन्न भासे देहाकारें। प्रस्तुत येकचि अंतरें।
बोलणें चालणें निर्धारें। त्यासीच घडे ॥ १० ॥

आपुले पारिखे सकळ लोक। पक्षी स्वापद पश्वादिक।
किडा मुंगी देहधारक। सकळ प्राणी ॥ ११ ॥

खेचर भूचर वनचर। नाना प्रकारें जळचर।
चत्वार खाणी विस्तार। किती म्हणोन सांगावा ॥ १२ ॥

समस्त जाणीवेनें वर्तती। रोकडी पाहावी प्रचिती।
त्याची आपुली संगती। अखंड आहे ॥ १३ ॥

जगदांतरें वोळला धणी। किती येकवटील प्राणी।
परी ते वोळयाची करणी। आपणापासीं ॥ १४ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, ब्राह्मणांच्यावर असा प्रसंग आला तर आला तो येऊन गेला. झाले गेले होऊन गेले, म्हणून समजून ब्राह्मणांनी आता तरी स्वत:ला शहाणे करावे. (१)

देवाची पूजा निर्मल हाताने करावी. त्यायोगे पूजा करणाराला सर्व प्रकारचे भाग्य लाभते. मूर्ख, गैरशिस्त, अभक्त असा उपासक दारिद्र्य भोगतो. (२)

प्रथम देवाला ओळखावे आणि मग अनन्यभावाने त्याला भजावे. त्या सर्वोत्तमाचे अखंड ध्यान धरावे. (३)

सर्वांमध्ये जो उत्तम त्याला सर्वोत्तम म्हणतात. आत्मानात्मविवेकाने हे वर्म जाणून घ्यावे. (४)

जाणीवरूपाने जो देहाचे रक्षण करतो, जो द्रष्टा, अंतरसाक्षी आहे, तो आत्माच जाणीवरूपाने पदार्थमात्राची परीक्षा करीत असतो. (५)

सर्वांच्या देहामध्ये तोच राहतो आणि सर्व इंद्रियांना चेतना देऊन त्यांच्याकडून कामे करून घेतो. हे सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी अनुभवास येते. (६)

जगताचा जो अंतर्यामी तोच सर्व प्राणिमात्रांत आहे. म्हणून सर्वांची अंत:करणे राजी राखावीत. तोच परस्परांचा दाता, भोक्ता, इत्यादी सर्व काही आहे. (७)

जो देव सर्व जगाच्या अंतर्यामी आहे, तोच आपल्याही अंतरात आहे व तोच त्रैलोक्यातील प्राणिमात्रांच्याही अंतर्यामी आहे, हे नीट जाणून घ्यावे. (८)

मूळ पाहाणारा म्हणजेच द्रष्टा सर्वांच्या ठायी तो एकच आहे, पण देहप्रकृतीमुळे सर्वांच्या ठिकाणी वेगवेगळा झाला आहे. (९)

देहाच्या आकारामुळे भिन्न भासतो, परंतु वस्तुत: अंत:करणातील जाणीवरूपाने तो एकच आहे. त्याच्या योगेच बोलणे, चालणे इत्यादी सर्व क्रिया होत असतात. (१०)

आपले आणि परके सर्व लोक, पक्षी, श्वापदे, पशू आदी, तसेच किडा, मुंगी इत्यादी सर्व देहधारक प्राणी, (११)

आकाशात विचरण करणारे, भूचर, वनचर नाना प्रकारचे जलचर, चत्वार खाणी इत्यादी विस्तार किती म्हणून वर्णन करावा? (१२)

सर्वजण जाणिवेनेच वागत असतात, याची प्रत्यक्ष प्रचीती घ्यावी. त्यांची व आपली संगती अखंड आहे. (१३)

सर्व जगाचा अंतरात्मा हाच जगाचा मालक आहे. त्याला जर प्रसन्न करून घेतले, तर सर्व प्राणी आपल्याजवळ एकत्र येतील. पण त्याला प्रसन्न करून घेण्याची कृती आपल्यापाशीच आहे. (१४)

हें आपणाकडेच येतें। राजी राखिजे समस्तें।
देहासि बरें करावें तें। आत्मयास पावे ॥ १५॥

जगदात्मा प्रसन्न होईल असे करणे आपल्याच हातात आहे. सर्व प्राणिमात्रांना प्रसन्न राखावे. देहाला बरे केले की, ते त्या देहधारकाच्या आत्म्यास पावते. (१५)

दुर्जन प्राणी त्यांतील देव। त्याचा लताड स्वभाव।
रागास आला जरी राव। तरी तंडों नये कीं ॥ १६॥

दुर्जन प्राणी असतो, त्याच्याही अंतरात देव असतो, पण त्याचा स्वभाव लाथाड असतो. दुर्जनामुळे अंतरात्म्यास जरी राग आला, तरी भांडण करू नये. (१६)

प्रसंगी सांडीच करणें। पुढें विवेकें विवरणें।
विवेक सज्जनचि होणें। सकळ लोकीं ॥ १७॥

प्रसंगी सोडून द्यावे आणि विवेकाने विवरण करून सर्व लोकांत आपण सज्जनाप्रमाणेच वागावे. (१७)

आत्मत्वीं दिसतो भेद। हा अवघाचि देहसमंध।
येका जीवनें नाना स्वाद। औषधीभेदें ॥ १८॥

या देहाच्या संबंधामुळेच आत्म्याच्या ठिकाणी भेद दिसतो. पाणी एकच असते, पण औषधींच्या भेदाने ते नाना चवींचे होते. (१८)

गरळ आणि अमृत जालें। परी आपपण नाहीं गेलें।
साक्षत्वें आत्मयास पाहिलें। पाहिजे तैसें ॥ १९॥

जलच विष होते व अमृतही होते, पण त्याचे आपपण म्हणजे जलत्व जात नाही. हे जसे, तसेच साक्षित्वाने आत्म्यास सर्व ठिकाणी पाहिले पाहिजे. (१९)

अंतरनिष्ठ जो पुरुष। तो अंतरनिष्ठेनें विशेष।
जगामधें जो जगदीश। तो तयास वोळखे ॥ २०॥

अंतरनिष्ठ जो पुरुष असतो, तो विशेष अंतरनिष्ठेच्या योगाने जगात जो जगदीश आहे, त्याला ओळखतो. (२०)

नयनेंचि पाहावा नयेन। मनें शोधावें मन।
तैसाचि हा भगवान। सकळां घटीं ॥ २१॥

डोळ्याने डोळा पाहावा, मनानेच मनाचा शोध घ्यावा, त्याचप्रमाणे आपल्या अंतरात्म्याच्या योगे सर्वांच्या ठिकाणी असलेल्या अंतरात्म्यास ओळखावे. (२१)

तेणेंविण कार्यभाग आडे। सकळ कांहीं तेणेंचि घडे।
प्राणी विवेकें पवाडे। तेणेंचि योगें ॥ २२॥

त्या अंतरात्म्यावाचून कुठलेही कार्य होऊ शकत नाही. सर्व काही त्याच्यामुळेच घडते. त्याच्यामुळेच प्राणी विवेक करू शकतो. (२२)

जागृतीस व्यापार घडतो। समंध तयासीच पडतो।
स्वप्नामधें घडे जो तो। येणेंचि न्यायें ॥ २३॥

जागृतीत जो व्यवहार होतो, तोही अंतरात्म्याच्या संबंधानेच होतो. स्वप्नातही जे काही घडते, तेही अंतरात्म्याच्या योगेच घडते. (२३)

अखंड ध्यानाचें लक्षण। अखंड देवाचें स्मरण।
याचें कळतां विवरण। सहजचि घडे ॥ २४॥

आता जे विवरण सांगितले, ते नीट कळले म्हणजे मग सहजच अखंड देवाचे स्मरण होते आणि अखंड ध्यानाचे हेच लक्षण आहे. (२४)

सहज सांडून सायास। हाचि कोणीयेक दोष।
आत्मा सांडून अनात्म्यास। ध्यानीं धरिती ॥ २५॥

सहज सोडून उगीच सायास करणे हाच मोठा दोष आहे. आत्म्यास सोडून लोक अनात्म्याचे ध्यान धरतात. (२५)

परी तें धरितांहि धरेना। ध्यानीं येती वेक्ति नाना।
उगेंचि कष्टती मना। कासाविस करूनी ॥ २६॥

पण प्रयत्न करूनही ते साध्य होत नाही. ध्यानात नाना व्यक्ती येतात. लोक मनाला कासावीस करून उगीचच कष्टी होतात. (२६)

मूर्तिध्यान करितां सायासें। तेथें येकाचें येकचि दिसे।
भासों नये तेंचि भासे। विलक्षण ॥ २७॥

मोठ्या प्रयत्नाने मूर्तीचे ध्यान करू लागावे, तर एकाऐवजी दुसरे भलतेच दिसते. जे भासू नये असे विलक्षण दुसरेच भासू लागते. (२७)

ध्यान देवाचें करावें। किंवा देवाल्याचें करावें।
हेंचि बरें विवरावें। आपले ठाईं ॥ २८॥

आपण ध्यान देवाचे करायचे की देवालयाचे याचा प्रत्येकाने स्वत:शीच विचार करून पाहावा. (२८)

देह देउळ आत्मा देव। कोठें धरूं पाहातां भाव।
देव वोळखोन जीव। तेथेंचि लावावा ॥ २९॥

देह हे देऊळ आहे आणि आत्मा हा देव आहे, म्हणून हे ओळखून भावभक्तीने त्या देवाच्या ठिकाणीच जीव लावावा. (२९)

**अंतरनिष्ठ ध्यान ऐसें। दंडकध्यान अनारिसें।**
**प्रत्ययेंविण सकळ पिसें। अनुमानध्यान ॥ ३० ॥**

अंतर्निष्ठ ध्यान हे अशा प्रकारचे असते. दंडक ध्यान म्हणजे रूढ पद्धतीनुसार केलेले ध्यान वेगळेच असते. अनुभवाशिवायचे ध्यान त्यास अनुमानावर आधारलेले ध्यान म्हणून अनुमान ध्यान म्हटले असून, तो शुद्ध वेडेपणा होय. (३०)

**अनुमानें अनुमान वाढे। ध्यान धरितां सवेंचि मोडे।**
**उगेचि कष्टती बापुडे। स्थूळध्यानें ॥ ३१ ॥**

कल्पनेने कल्पना वाढत जाते आणि ध्यान धरलेले असते, ते मोडते. स्थूल ध्यानाच्या योगे लोक बापडे उगीचच कष्टी होतात. (३१)

**देवास देहधारी कल्पिती। तेथें नाना विकल्प उठती।**
**भोगणें त्यागणें विपत्ति। देहयोगें ॥ ३२ ॥**

देवाला देहधारी समजतात. त्यामुळे तेथे नाना विकल्प उठतात. देहाच्या योगे भोगणे, त्यागणे, विपत्ती हे सर्वच येते. (३२)

**ऐसें मनीं आठवतें। विचारितां भलतेंचि होतें।**
**दिसों नये तें दिसतें। नाना स्वप्नीं ॥ ३३ ॥**

अशा तऱ्हेने मनात विचार सुरू होतात. त्यामुळे भलतेच होते. अनेक प्रकारची स्वप्ने पडून जे दिसू नये ते दिसते. (३३)

**दिसतें तें सांगतां न ये। बळें भावार्थ धरितां नये।**
**साधक कासाविस होये। अंतर्यामीं ॥ ३४ ॥**

जे दिसते ते कुणाला सांगता येत नाही. बळजबरीने भाव टिकू शकत नाही. त्यामुळे साधक अंतर्यामी कासावीस होतो. (३४)

**सांगोपांग धडे ध्यान। त्यास साक्ष आपुलें मन।**
**मनामध्यें विकल्पदर्शन। होऊंच नये ॥ ३५ ॥**

सांगोपांग ध्यान घडते की नाही, याला आपले मन साक्षी असते, म्हणून आपल्याला मनोमनी ते कळते. मनात कुठलाही विकल्प उठताच कामा नये. (३५)

**फुटक मन येकवटिलें। तेणें तुटक ध्यान केलें।**
**तेथें कोण सार्थक जालें। पाहाना कां ॥ ३६ ॥**

इतरत्र वावरत असलेले मन एकाग्र करण्याचा प्रयत्न केला, पण त्याने तुटके म्हणजे खंडित ध्यान केले, तर तेथे कोणते सार्थक झाले ? जरा विचार करून पहा ना ! (३६)

**अखंड ध्यानें न घडे हित। तरी तो जाणावा पतित।**
**हाचि अर्थ सावचित। बरा पाहावा ॥ ३७ ॥**

अखंड ध्यान धरूनही जर हित होत नसेल, तर तो मनुष्य पतित जाणावा. पण असे होणे शक्य नाही, म्हणून नीट विचार करून पाहावा. (३७)

**ध्यान धरितें तें कोण। ध्यानीं आठवतें तें कोण।**
**दोनीमधें अनन्य लक्षण। असिलें पाहिजे ॥ ३८ ॥**

ध्यान धरणारा कोण असतो ? जे ध्यानात आठवते तो कोण ? या दोघांमध्ये एकात्मभाव असला पाहिजे. (३८)

**अनन्य सहजचि आहे। साधक शोधून न पाहे।**
**ज्ञानी तो विवरोन राहे। समाधानें ॥ ३९ ॥**

खरे तर अनन्य हे स्वाभाविकच आहे. पण साधक शोधूनच पाहात नाही. ज्ञानी असतो तो विवरून स्वानुभवाने जाणतो आणि म्हणून समाधान पावतो. (३९)

**ऐसीं हे प्रत्ययाची कामें। प्रत्ययेंविण बाधिजे भ्रमें।**
**लोकदंडकसंभ्रमें। चालती प्राणी ॥ ४० ॥**

अशा या सर्व अनुभवाच्या गोष्टी आहेत. अनुभव नसेल, तर भ्रम उत्पन्न होतो. लोकरूढीला धरून लोक भ्रमाने वागतात. (४०)

**दंडकध्यानाचें लक्षण। धरून बैसलें अवलक्षण।**
**प्रमाण आणि अप्रमाण। बाजारी नेणती ॥ ४१ ॥**

रूढ पद्धतीनुसार ध्यानाचे लक्षण मनात धरून बसतात. हेच अवलक्षण होय. प्रमाण काय, अप्रमाण काय, हे अध्यात्माचा बाजार मांडणारे लोक जाणत नाहीत. (४१)

**मिथ्या समाचार उठविती। वाउग्याच बोंबा घालिती।**
**मनास आणितां अंतीं। आवघेंचि मिथ्या ॥ ४२ ॥**

असे बाजारी लोक खोट्याच अफवा उठवतात, उगीचच शिव्या देतात, पण नीट विचार केल्यावर हे सर्व खोटे आहे, हे कळून येते. (४२)

**कोणीयेक ध्यानस्त बैसला। कोणीयेक सिकवी त्याला।**
**मुकुट काढूनि माळ घाला। म्हणिजे बरें ॥ ४३ ॥**

कोणी एक साधक ध्यानाला बसला. त्याला दुसरा कोणी एक शिकवू लागला. 'मुकूट काढून माळ घाल म्हणजे बरे' असे तो म्हणाला. (४३)

**मनाचेथें काये दुष्काळ। जे आखुड कल्पिली माळ।**
**सांगते ऐकते केवळ। मूर्ख जाणावे ॥ ४४॥**

सर्व मनानेच कल्पायचे, मग तेथे कुठल्या गोष्टीची कमतरता आहे? म्हणून त्याने कल्पना केली की माळ आखूड आहे, म्हणून मुकूट काढून ती घालावी. याप्रमाणे सांगणारा आणि ऐकणारा दोघेही मूर्खच जाणावेत. (४४)

**प्रत्यक्ष कष्ट करावे न लगती। दोरे फुलें गुंफावीं न लगती।**
**कल्पनेची माळ थिटी करिती। काये निमित्य ॥ ४५॥**

ध्यानात प्रत्यक्ष कष्ट करावे लागत नाहीत. दोऱ्यात फुले गुंफावी लागत नाहीत आणि तरी कल्पनेतील माळ ही आखूड करतात, ती कोणत्या कारणाने? (४५)

**बुधीविण प्राणी सकळ। ते ते अवघेचि बाष्कळ।**
**तया मूर्खासी खळखळ। कोणें करावी ॥ ४६॥**

बुद्धीशिवाय जे प्राणी ते अवघे निर्बुद्धच समजावेत. त्या मूर्खांशी वादविवाद कोणी करावा? (४६)

**जेणें जैसा परमार्थ केला। तैसाच पृथ्वीवरी दंडक चालिला।**
**साता पांचांचा बळावला। साभिमान ॥ ४७॥**

त्याने जसा परमार्थ केलेला असतो, तशी रूढी पडते. पाच-सात अनुयायी मिळून अट्टहासाने पंथ पुढे रेटला जातो. किंवा अशा पंथात सात म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह, शोक, भय व अज्ञान; आणि पाच म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पाच विषयांची गडबडच अहंकाराने बळावते. (४७)

**प्रत्ययेंविण साभिमान। रोगी मारिले झांकून।**
**तेथें अवघाचि अनुमान। ज्ञान कैंचें ॥ ४८॥**

अनुभवाशिवाय अभिमान करणे म्हणजे रोगी झाकून त्याला मारण्यासारखे आहे. सर्वच अनुमान असेल तेथे ज्ञान कसे असणार? (४८)

**सर्व साभिमान सांडावा। प्रत्ययें विवेक मांडावा।**
**माया पूर्वपक्ष खंडावा। विवेकबळें ॥ ४९॥**

सर्व अभिमान सोडून द्यावा. अनुभवाने विवेक प्रतिपादावा. मायेच्या पूर्वपक्षाचे विवेकाच्या बळाने खंडण करावे आणि परमात्मप्राप्ती करून घ्यावी. (४९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अखंडध्याननिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**



## दशक १४ : समास ९

## शाश्वतनिरूपण

॥ श्रीराम ॥

**पिंडाचें पाहिलें कौतुक। शोधिला आत्मानात्माविवेक।**
**पिंड अनात्मा आत्मा येक। सकळ कर्ता ॥ १॥**

श्रीसमर्थ सांगतात की, आपण पिंडाचे कौतुक पाहिले नंतर आत्मानात्मविवेकाने त्याचा शोध घेतला आणि या निर्णयापर्यंत पोहोचलो की, पिंड हा अनात्मा आहे. आत्मा हा एकच असून, तोच सर्वांचा कर्ता आहे. (१)

**आत्म्यास अनन्यता बोलिली। ते विवेकें प्रत्यया आली।**
**आतां पाहिजे समजली। ब्रह्मांडरचना ॥ २॥**

आत्मा हेच आपले स्वरूप आहे. अशा प्रकारे आत्म्याची अनन्यता विवेकाने आपल्या अनुभवास आली. आता ब्रह्मांडाची रचना समजून घेणे आवश्यक आहे. (२)

**आत्मानात्माविवेक पिंडीं। सारासारविचार ब्रह्मांडीं।**
**विवरविवरों हे गोडी। घेतली पाहिजे ॥ ३॥**

पिंडाची रचना आत्मानात्मविवेकाने जाणून घ्यावी आणि ब्रह्मांडाची रचना सारासारविवेकाने जाणावी. त्याचे सतत विवरण करून गोडी उत्पन्न होईल, असा प्रयत्न केला पाहिजे. (३)

**पिंड कार्य ब्रह्मांड कारण। याचें करावें विवरण।**
**हेंचि पुढें निरूपण। बोलिलें असे ॥ ४॥**

पिंड हे कार्य आहे आणि ब्रह्मांड हे कारण आहे. याचे विवरण पुढील निरूपणात केले आहे. (४)

**असार म्हणिजे नासिवंत। सार म्हणिजे तें शाश्वत।**
**जयास होईल कल्पांत। तें सार नव्हे ॥ ५॥**

असार म्हणजे नाशिवंत आणि सार म्हणजे जे शाश्वत असते ते. ज्यास कल्पांत होतो ते सार नव्हे. (५)

पृथ्वी जळापासून जाली। पुढें ते जळीं मिळाली।
जळाची उत्पत्ती वाढली। तेजापासुनी ॥ ६ ॥

पृथ्वी जलापासून झाली आणि पुढे ती जलात विरघळून गेली. जलाची उत्पत्ती तेजापासून झाली. (६)

तें जळ तेजें शोषिलें। महत्तेजें आटोन गेलें।
पुढें तेजचि उरलें। सावकाश ॥ ७ ॥

ते जल तेजाने शोषले, महत्तेजाने ते आटूनच गेले आणि केवळ तेजच उरले. (७)

तेज जालें वायोपासुनी। वायो झडपी तयालागुनी।
तेज जाउनी दाटणी। वायोचीच जाली ॥ ८ ॥

तेज वायूपासून झाले. त्याला वायू झडपून, विझवून टाकतो. तेज जाऊन सर्वत्र वायूचीच दाटी झाली. (८)

वायो गगनापासुनी जाला। मागुतां तेथेंचि विराला।
ऐसा हा कल्पांत बोलिला। वेदांतशास्त्रीं ॥ ९ ॥

वायू गगनापासून झाला आणि शेवटी तेथेच लय पावला. अशा प्रकारे कल्पांताचे वर्णन वेदांतशास्त्रात केले आहे. (९)

गुणमाया मूळमाया। परब्रह्मीं पावती लया।
तें परब्रह्म विवराया। विवेक पाहिजे ॥ १० ॥

गुणमाया आणि मूळ माया परब्रह्माच्या ठायी लय पावतात. या परब्रह्माचे विवरण करण्यासाठी विवेक पाहिजे. (१०)

सर्व उपाधींचा सेवट। तेथें नाहीं दृश्य खटपट।
निर्गुण ब्रह्म घनदाट। सकळां ठाईं ॥ ११ ॥

सर्व उपाधींचा शेवट जेथे होतो, जेथे दृश्याचा काहीच मागमूस नसतो. फक्त सर्व ठायी निर्गुण ब्रह्म ओतप्रोत भरून राहिलेले असते. (११)

उदंड कल्पांत जाला। तरी नाश नाहीं तयाला।
मायात्यागें शाश्वताला। वोळखावें ॥ १२ ॥

फार मोठा प्रलय जरी झाला तरी परब्रह्म नाश पावत नाही, म्हणून विवेकाने मायेचा त्याग करून शाश्वत ब्रह्मास अनुभवाने जाणावे. (१२)

देव अंतरात्मा सगुण। सगुणें पाविजे निर्गुण।
निर्गुणज्ञानें विज्ञान। होत असे ॥ १३ ॥

अंतरात्माच सगुण देव होय. त्याच्या योगाने निर्गुणाची प्राप्ती करून घ्यावी. निर्गुणाच्या ध्यानाने तद्रूप असल्याचा साधकाला अनुभव येऊ लागतो. त्यालाच विज्ञान म्हणतात. (१३)

कल्पनेतीत जें निर्मळ। तेथें नाहीं मायामळ।
मिथ्यत्वें दृश्य सकळ। होत जातें ॥ १४ ॥

परब्रह्म हे कल्पनातीत असून निर्मळ असते. त्याच्या ठिकाणी मायारूपी मळ नसतो. स्वात्मानुभव आला की, सर्व दृश्य हे मिथ्या आहे हे कळते, म्हणजेच ते असून नसल्यासारखे होते. (१४)

जें होतें आणि सवेंचि जातें। तें तें प्रत्ययास येतें।
जेथें होणें जाणें नाहीं तें। विवेकें वोळखावें ॥ १५ ॥

जे जे उत्पन्न होते, ते ते सहज नाश पावते, हे तर प्रत्यक्ष अनुभवास येते. म्हणून विवेकाने ज्याला उत्पन्न होणे आणि नाश पावणे नाही ते शाश्वत ब्रह्म जाणून घ्यावे. (१५)

येक ज्ञान येक अज्ञान। येक जाणावें विपरीत ज्ञान।
हे त्रिपुटी होये क्षीण। तेंचि विज्ञान ॥ १६ ॥

एक ज्ञान (म्हणजे 'अहं ब्रह्मास्मि') दुसरे अज्ञान म्हणजे आपले खरे स्वरूप न जाणणे, आणि तिसरे विपरीत ज्ञान म्हणजे मी देहच आहे असे समजणे, ही त्रिपुटी जेव्हा नाहीशी होते, तेव्हा साधकाला स्वस्वरूपानुभव येऊन जीवब्रह्मैक्य होते, तेच विज्ञान होय. (१६)

वेदांत सिधांत धादांत । याची पाहावी प्रचित ।
निर्विकार सदोदित। जेथें तेथें ॥ १७ ॥

वेदान्त— शास्त्रप्रचीती, सिद्धान्त (गुरुप्रचीती) व धादान्त म्हणजे आत्मप्रचीती यांचा साक्षात अनुभव घ्यावा. निर्विकार परब्रह्म हे जेथल्या तेथे जसेच्या तसे असते हे जाणून घ्यावे. (१७)

तें ज्ञानदृष्टीनें पाहावें। पाहोन अनन्य राहावें।
मुख्य आत्मनिवेदन जाणावें। याचें नांव ॥ १८ ॥

ज्ञानदृष्टीने त्याचा साक्षात अनुभव घ्यावा आणि त्याच्याशी एकरूप होऊन राहावे. याचेच नाव मुख्य आत्मनिवेदन होय. (१८)

दृश्यास दिसतें दृश्य। मनास भासतो भास।
दृश्यभासातीत अविनाश। परब्रह्म तें ॥ १९॥

दृश्याला दृश्य दिसते, मनाला भास भासतो. दृश्य आणि भास यांच्या पलीकडे असते, ते अविनाशी परब्रह्म जाणावे. (१९)

पाहों जातां दुरीच्या दुरी। परब्रह्म सबाहेअंतरीं।
अंतचि नाहीं अनंत, सरी-। कोणास द्यावी ॥ २०॥

परब्रह्माला चर्मचक्षूने पाहू गेले, तर ते दिसू शकत नाही. पण वास्तविक परब्रह्म सर्व दृश्य जगताच्या अंतर्बाह्य ओतप्रोत भरलेले आहे. त्याला अंतच नाही. त्या अनंताची बरोबरी कोण करू शकणार बरे? (२०)

चंचळ तें स्थिरावेना। निश्चळ तें कदापी चळेना।
आभाळ येतें जातें, गगना-। चळण नाहीं ॥ २१॥

जे चंचळ असते ते कधी स्थिर राहू शकत नाही. जे निश्चळ असते ते कधीही चळत नाही. गगनात आभाळ म्हणजे ढग येतात आणि जातात, पण गगन चळत नाही. ते निश्चळ जसेच्या तसेच असते. (२१)

जें विकारें वाढे मोडे। तेथें शाश्वतता कैंची घडे।
कल्पांत होतांच विघडे। सकळ कांहीं ॥ २२॥

जे विकार पावते, वाढते आणि मोडते ते शाश्वत कसे बरे असू शकेल? कल्पांत होतो तेव्हा सर्व पंचभौतिक सृष्टी नाश पावते. (२२)

जें अंतरींच भ्रमलें। मायासंभ्रमें संभ्रमलें।
तयास हें कैसें उकले। आव्हाट चक्र ॥ २३॥

ज्याच्या अंत:करणात मायेच्या योगाने भ्रम उत्पन्न झालेला असतो, अशा संभ्रमित लोकांना या अफाट चक्राचा उलगडा कसा होणार? (२३)

भिडेनें वेव्हार निवडेना। भिडेनें सिधांत कळेना।
भिडेनें देव आकळेना। अंतर्यामीं ॥ २४॥

अशा संभ्रमित माणसाला व्यवहार कसा करावा हेही कळत नाही. त्याला सिद्धान्तही कळत नाही आणि अंतर्यामीच असलेल्या देवाचाही शोध लागत नाही. (२४)

वैद्याची प्रचित येईना। आणि भीडहि उलंघेना।
तरी मग रोगी वांचेना। ऐसें जाणावें ॥ २५॥

वैद्याच्या औषधाचा गुणही येत नाही आणि त्याची भीडही मोडता येत नाही, अशी जेव्हा स्थिती होते, तेव्हा रोगी आता जगणार नाही, असे जाणावे. (२५)

जेणें राजा वोळखिला। तो राव म्हणेना भलत्याला।
जेणें देव वोळखिला। तो देवरूपी ॥ २६॥

जो राजाला नीट ओळखत असतो, तो भलत्या माणसाला राजा म्हणत नाही. ज्याने देव ओळखलेला असतो, तो स्वत: देवरूपच होतो. (२६)

जयास माईकाची भीड। तें काये बोलेल द्वाड।
विचार पाहातां उघड। सकळ कांहीं ॥ २७॥

ज्याला मायिकाची भीड पडते तो अर्धवट ज्ञानी देवाबद्दल काय सांगणार? त्याने जर सारासारविवेक केला तर त्याला सर्व काही स्पष्टपणे कळून येईल. (२७)

भीड मायेऐलीकडे। परब्रह्म तें पैलीकडे।
पैलीकडे ऐलीकडे। सदोदित ॥ २८॥

अज्ञान हे मायेच्या अलीकडे असते आणि परब्रह्म मायेच्या पलीकडे असते. माया सदोदित अलीकडे आणि परब्रह्म पलीकडेच असते. (२८)

लटिक्याची भीड धरणें। भ्रमें भलतेंचि करणें।
ऐसीं नव्हती लक्षणें। विवेकाचीं ॥ २९॥

जी माया मिथ्या आहे, तिची भीड धरून भ्रमाने भलतेच करणे हे विवेकाचे लक्षण नव्हे. (२९)

खोटें आवघेंचि सांडावें। खरें प्रत्ययें वोळखावें।
मायात्यागें समजावें। परब्रह्म ॥ ३०॥

जे खोटे आहे, त्या सर्वांचा त्याग करावा आणि अनुभवाने खरे ओळखावे. मायेचा त्याग करून परब्रह्म जाणून घ्यावे. (३०)

तें मायेचें जें लक्षण। तेंचि पुढें निरूपण।
सुचितपणें विवरण। केलें पाहिजे ॥ ३१॥

त्या मायेच्या लक्षणाचे वर्णन पुढील समासात केले आहे. त्याचे शांत चित्ताने मनन केले पाहिजे. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'शाश्वतनिरूपणनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक १४ : समास १०

### मायानिरूपण

॥ श्रीराम ॥

**माया दिसे परी नासे। वस्तु न दिसे परी न नासे।**
**माया सत्य वाटे परी मिथ्या असे। निरंतर ॥ १॥**

श्रीसमर्थ सांगतात की, माया दिसते पण ती नाश पावते. परब्रह्म वस्तू दिसत नाही, पण ती नाशही पावत नाही. माया सत्य वाटते खरी, पण ती निरंतर मिथ्याच असते. (१)

**करंटा पडोनी उताणा। करी नानापरी कल्पना।**
**परी तें कांहींच घडेना। तैसी माया ॥ २॥**

एखादा भाग्यहीन माणूस काहीच उद्योग न करता उताणा पडून राहून नाना मनोराज्ये करीत असतो, तशीच माया जाणावी. (२)

**द्रव्यदारेचें स्वप्नवैभव। नाना विळासें हावभाव।**
**क्षणीक वाटे परी माव। तैसी माया ॥ ३॥**

स्वप्नांत द्रव्य आणि स्त्री यांचे कितीही वैभव आणि हावभाव, नाना विलास आदी दिसतात आणि क्षणभर म्हणजे स्वप्न असेपर्यंत ते खरेही वाटतात. पण ते वास्तविक मिथ्या असतात, तशीच माया जाणावी. (३)

**गगनीं गंधर्वनगरें। दिसताती नाना प्रकारें।**
**नाना रूपें नाना विकारें। तैसी माया ॥ ४॥**

आकाशात नाना प्रकारची, नाना रूपे, नाना विकारांनी युक्त अशी गंधर्वनगरे दिसतात, पण तो आभास असतो आणि क्षणभंगुर असतो. तशीच माया जाणावी. (४)

**लक्ष्मुमी रायेविनोदाची। बोलतां वाटे साची।**
**मिथ्या प्रचित तेथींची। तैसी माया ॥ ५॥**

बहुरूप्याची लक्ष्मी जेव्हा तो बोलत असतो तेव्हा खरी वाटते, पण त्याची ती लक्ष्मी म्हणजेच वैभव जसे मिथ्या असते, तशीच माया मिथ्या जाणावी. (५)

**दसऱ्याचे सुवर्णाचे लटे। लोक म्हणती परी ते कांटे।**
**परी सर्वत्र रहाटे। तैसी माया ॥ ६॥**

दसऱ्याचे सोने त्या वेळी लोक जरी मान्य करतात, तरी वास्तविक ते काटे असतात. पण तरी खरे मानून लोकव्यवहार चालतो, तशी माया होय. (६)

**मेल्याचा मोहोछाव करणें। सतीचें वैभव वाढवणें।**
**मसणीं जाउनी रुदन करणें। तैसी माया ॥ ७॥**

मेलेल्या माणसानिमित्त महोत्सव करणे, सतीचे वैभव वाढविणे आणि स्मशानात जाऊन रडणे, त्याप्रमाणे माया जाणावी. (७)

**राखेसी म्हणती लक्ष्मुमी। दुसरी भारदोरी लक्ष्मुमी।**
**तिसरी नाममात्र लक्ष्मुमी। तैसी माया ॥ ८॥**

ठेवलेल्या स्त्रीला लक्ष्मी म्हणतात. तसेच भारदोरीला (म्हणजे गर्भपात थांबविणारी मंत्रित दोरी) ही दुसरी लक्ष्मी म्हणतात, तिसरी कुणी स्त्री नावाची लक्ष्मी असते, तशी माया होय. (८)

**मुळीं बाळविधवा नारी। तिचें नांव जन्मसावित्री।**
**कुबेर हिंडे घरोघरीं। तैसी माया ॥ ९॥**

मुळात जी स्त्री बालविधवा आहे पण तिचे नाव मात्र जन्मसावित्री असावे आणि ज्याचे नाव कुबेर आहे पण त्याने दारोदारी भिक्षा मागत हिंडावे,तशी माया जाणावी. (९)

**दशअवतारांतील कृष्णा। उपजे जीर्ण वस्त्रांची तृष्णा।**
**नदी नामें पीयुष्णा। तैसी माया ॥ १०॥**

दशावतारी नाटकात कृष्णाचे काम करणारा नाटकात द्रौपदीला वस्त्रे पुरवितो आणि खेळ संपल्यावर कुणी आपल्याला जुनेपाने वस्त्र तरी द्यावे, अशी आशा करीत असतो. किंवा थोडेसे पाणी असणाऱ्या नदीचे नाव मात्र 'पीयुष्णा' म्हणजे 'अमृताची नदी' असावे, तशी माया असते. (१०)

**बहुरूपांतील रामदेवराव। ग्रामस्तांपुढें दाखवी हावभाव।**
**कां माहांराज म्हणोनि लाघव। तैसी माया ॥ ११॥**

बहुरूप्याच्या खेळात एखादा रामदेवराव म्हणजे श्रीमंत राजाचे सोंग आणून लोकांपुढे त्याप्रमाणे हावभाव करतो. पण नंतर लोकांकडे महाराज म्हणून पै-पैसा मागतो. त्याच्यासारखीच माया आहे. (११)

देव्हारां असे अनपूर्णा। आणी गृहीं अन्नचि मिळेना।
नामें सरस्वती सिकेना। शुभावळु ॥ १२॥

देव्हाऱ्यात अन्नपूर्णा आहे आणि घरात खायला अन्न मिळत नाही. एखाद्या स्त्रीचे नाव सरस्वती आहे, पण ती शिकत नाही, आणि गोवऱ्या थापते, (१२)

सुण्यास व्याघ्र नाम ठेविलें। पुत्रास इंद्रनामें पाचारिलें।
कुरूप परी आळविलें। सुंदरा ऐसें ॥ १३॥

कुत्र्याला वाघ्या नाव ठेवावे, पुत्राला इंद्र नाव ठेवावे आणि कुरूप स्त्रीला सुंदरा म्हणून आळवावे, (१३)

मूर्ख नामें सकळकळा। राशभी नामें कोकिळा।
नातरी डोळसेचा डोळा। फुटका जैसा ॥ १४॥

एखाद्या मूर्खाला सकलकलाविद्यासंपन्न म्हणावे. एखादीचा आवाज गाढवीसारखा असता तिला कोकिळा म्हणावे, डोळा फुटलेल्या माणसाला डोळस म्हणावे, (१४)

मातांगीचें नाम तुळसी। चर्मिकीचें नाम कासी।
बोलती अतिशूद्रिणीसी। भागीरथी ऐसें ॥ १५॥

मांगिणीचे नाव तुळशी असावे, चांभारणीचे नाव काशी असावे आणि अतिशूद्र स्त्रीला भागीरथी म्हणावे, (१५)

साउली आणी अंधकार। येक होतां तेथीचा विचार।
उगाचि दिसे भासमात्र। तैसी माया ॥ १६॥

सावली आणि अंधार एक झाल्यावर जशी स्थिती होते आणि अंधुक प्रकाशामुळे उगाच भास मात्र होतात, तशी माया असते. (१६)

श्रवण बोटें संधी करतळ। रविरश्में दिसती इंगळ।
रम्य आरक्तकल्होळ। तैसी माया ॥ १७॥

आपले कान, बोटे, सांधे आणि तळहात हे सूर्यप्रकाशात इंगळासारखे म्हणजे लाल लाल अति रम्य दिसतात, तशी माया भासमय जाणावी. (१७)

भगवें वस्त्र देखतां मनाला। वाटे अग्नचि लागला।
विवंचितां प्रत्ये आला। तैसी माया ॥ १८॥

भगवे वस्त्र पाहिल्यावर मनाला आग लागल्यासारखे वाटते. पण विचार केल्यावर प्रत्यय येतो, तशी माया आहे. (१८)

जळीं चरणकरांगुळें। आखुड लांबें किरकोळें।
विपरीत काणे दिसती जळें। तैसी माया ॥ १९॥

पाण्यात हातपाय ठेवले की बोटे आखूड, लांब, बारीक दिसतात. पाण्यामुळे ती विपरीत वाकडी-तिकडी दिसतात, तशी माया जाणावी. (१९)

भोवंडीनें पृथ्वी कलथली। कामिणीनें पिवळी जाली।
सन्यपातस्थां अनुभवली। तैसी माया ॥ २०॥

भोवळ येणाऱ्या माणसाला पृथ्वी कलंडलेली दिसते. काविळीने ती पिवळी दिसते. सन्निपात झालेल्या माणसाला ती वेगळीच अनुभवास येते, तशी माया जाणावी. (२०)

कोणीयेक पदार्थविकार। उगाचि दिसे भासमात्र।
अनन्याचा अन्य प्रकार। तैसी माया ॥ २१॥

एखादा पदार्थ विकारामुळे उगीचच वेगळाच भासतो. असते एक आणि दिसते मात्र भलतेच. तशी माया जाणावी. (२१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'मायानिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

दशक चौदावा समाप्त.

❑ ❑

# दशक पंधरावा : आत्मदशक

## दशक १५ : समास १

### चातुर्यलक्षण

॥ श्रीराम ॥

अस्तिमांशांचीं शरीरें। त्यांत राहिजे जीवेश्वरें।
नाना विकारीं विकारें। प्रविण होईजे ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, सर्व शरीरे अस्थिमांसमयच असतात. त्यात जीवरूपाने ईश्वर राहतो. शरीरात नाना प्रकारचे विकार उत्पन्न होतात. त्या त्या विकारानुसार बदलण्यात तो प्रवीण असतो. (१)

घनवट पोचट स्वभावें। विवरोन जाणिजे जीवें।
व्हावें न व्हावें आघवें। जीव जाणे ॥ २ ॥

घनदाट काय आणि पोचट काय हे जीव अगदी सहजपणे विवरून जाणतो. त्यांपैकी काय व्हावे व काय होऊ नये, हे सर्व त्याला बरोबर कळते. (२)

येकीं मागमागों घेणें। येकां न मागतांच देणें।
प्रचीतीनें सुलक्षणें। वोळखावीं ॥ ३ ॥

एखाद्याला अनेक वेळा तोंड वेंगाडावे, तेव्हा एखादी गोष्ट मिळते. तर दुसऱ्या एखाद्याला त्याने न मागताच लोक देतात. या अनुभवावरून उत्तम लक्षणे कोणती ते ओळखावे. (३)

जीव जीवांत घालावा। आत्मा आत्म्यांत मिसळावा।
राहराहों शोध घ्यावा। परांतरांचा ॥ ४ ॥

माणसाने जीवाला जीव द्यावा, आत्म्यात आत्मा मिसळावा म्हणजे आपले एकरूपत्व जाणून सर्वांशी आत्मीयतेने वागावे. राहून राहून दुसऱ्यांच्या अंत:करणात काय चालले आहे, याचा शोध घ्यावा. (४)

जानवें हेंवडकारें जालें। ढिलेपणें हेवड आलें।
नेमस्तपणें शोभलें। दृष्टीपुढें ॥ ५ ॥

जानवे ढिले असले की, ते एकात एक गुंतते. पण ते जर नीटनेटकेपणाने घातले असेल, तर शोभून दिसते. (५)

तैसेंचि हें मनास मन। विवेकें जावें मिळोन।
ढिलेपणें अनुमान। होत आहे ॥ ६ ॥

त्याप्रमाणेच माणसाने विवेकाने आपले मन दुसऱ्याच्या मनाशी मिळवून घ्यावे म्हणजे चांगले. ढिलेपणाने उगीच मनात नाना कल्पनांना वाव मिळतो. (६)

अनुमानें अनुमान वाढतो। भिडेनें कार्यभाग नासतो।
याकारणें प्रत्यये तो। आधीं पाहावा ॥ ७ ॥

कल्पनेने कल्पना वाढत जाते. भिडेने कार्यभाग साधत नाही म्हणून आधी अनुभव घेऊन पहावा. (७)

दुसऱ्याचे जीवीचें कळेना। परांतर तें जाणवेना।
वश्य होती लोक नाना। कोण्या प्रकारें ॥ ८ ॥

दुसऱ्याच्या मनात काय आहे ते कळत नसेल, त्याचे अंत:करण जाणता येत नसेल, तर मग अनेक लोक वश कसे होतील? (८)

आकल सांडून परती। लोक वश्यकर्ण करिती।
अपूर्णपणें हलु पडती। ठाईं ठाईं ॥ ९ ॥

अक्कल न वापरता लोक वशीकरणाचे प्रयोग करतात, पण ते वेळोवेळी निष्फळ झाल्याने थंडावतात. (९)

जगदीश आहे जगदांतरीं। चेटकें करावीं कोणावरी।
जो कोणी विवेकें विवरी। तोचि श्रेष्ठ ॥ १० ॥

जगदीश परमात्मा हा सर्व जगातील प्राणिमात्रांच्या अंतर्यामी असताना चेटके कोणावरती करावीत? याप्रकारे जो विचार करून जाणून घेतो, तोच श्रेष्ठ होय. (१०)

श्रेष्ठ कार्यें करी श्रेष्ठ। कृत्रिम करी तो कनिष्ठ।
कर्मानुसार प्राणी नष्ट। अथवा भले ॥ ११ ॥

जो श्रेष्ठ कार्य करतो, तोच श्रेष्ठ होय. कनिष्ठ असतो तो सामान्य कार्ये करतो. आपापल्या कर्मानुसार माणूस श्रेष्ठ अथवा कनिष्ठ ठरतो. (११)

राजे जाती राजपंथें। चोर जाती चोरपंथें।
वेडें ठके अल्पस्वार्थें। मूर्खपणें ॥ १२ ॥

राजे लोक राजमार्गाने जातात. चोर असतात ते चोरवाटेने जातात. वेडे लोक असतात ते थोडासा स्वार्थ साधण्यासाठी मूर्खपणे वागतात. (१२)

**मूर्खास वाटे मी शाहाणा। परी तो वेडा दैन्यवाणा।**
**नाना चातुर्याच्या खुणा। चतुर जाणे ॥ १३ ॥**

मूर्ख माणसाला वाटते की मी फार शहाणा आहे, पण वास्तविक तो वेडा आणि दैन्यवाणा असतो. जो चतुर असतो, तो अनेक प्रकारे चातुर्याच्या खुणा जाणतो. (१३)

**जो जगदांतरें मिळाला। तो जगदांतरचि जाला।**
**अत्रीं परत्रीं तयाला। काये उणें ॥ १४ ॥**

जो जगाच्या अंत:करणाशी एकरूप होतो, तो सर्वांचा अंतरात्माच होतो. त्याला इहलोकात आणि परलोकात काय उणे पडणार आहे? (१४)

**बुद्धि देणें भगवंताचें। बुद्धिवीण माणुस काचें।**
**राज्य सांडून फुकाचें। भीक मागे ॥ १५ ॥**

बुद्धी हे भगवंताचे देणे असते. ज्या माणसाला बुद्धी नसते असा निर्बुद्ध माणूस कच्चा असतो. त्यामुळे तो आयते मिळालेले राज्य सोडून भीक मागतो. (मनुष्यदेह प्राप्त झाला असता स्वस्वरूपज्ञान प्राप्त करून घेत नाही आणि अज्ञानाने दु:खी होतो.) (१५)

**जें जें जेथें निर्माण जालें। तें तें तयास मानलें।**
**अभिमान देऊन गोविलें। ठाईं ठाईं ॥ १६ ॥**

ज्या ज्या गोष्टी जेथे निर्माण होतात तेथील लोकांना त्याच आवडतात. मान्य होतात. त्यांना त्याचा अभिमान वाटतो. पण अभिमानामुळे ते ठायी ठायी गुंततात. (१६)

**अवघेच म्हणती आम्ही थोर। अवघेचि म्हणती आम्ही सुंदर।**
**अवघेचि म्हणती आम्ही चतुर। भूमंडळीं ॥ १७ ॥**

या जगांत सर्वच लोक म्हणतात की, आम्ही थोर आहोत, आम्ही सुंदर आहोत. आम्ही चतुर आहोत.(१७)

**ऐसा विचार आणितां मना। कोणीच लहान म्हणवीना।**
**जाणते आणिती अनुमाना। सकळ कांहीं ॥ १८ ॥**

असा विचार करून कोणीच स्वत:ला लहान म्हणवून घेत नाही. पण जाणते लोक असतात, ते कल्पनेने सर्व काही जाणतात. (१८)

**आपुलाल्या साभिमानें। लोक चालिले अनुमानें।**
**परंतु हें विवेकानें। पाहिलें पाहिजे ॥ १९ ॥**

आपापल्या अभिमानामुळे लोक कल्पना करीत राहातात. पण विवेकाने हे सर्व नीट जाणून घेतले पाहिजे. (१९)

**लटिक्याचा साभिमानघेणें। सत्य अवघेंच सोडणें।**
**मूर्खपणाचीं लक्षणें। ते हे ऐसीं ॥ २० ॥**

खोट्याचा अभिमान धरायचा आणि सत्याचा सर्वस्वी त्याग करायचा, ही तर चक्क मूर्खपणाची लक्षणे आहेत. (२०)

**सत्याचा जो साभिमान। तो जाणावा निराभिमान।**
**न्याये अन्याये समान। कदापि नव्हे ॥ २१ ॥**

जो सत्याचा अभिमान धरतो, तो निरभिमानी असतो. न्याय आणि अन्याय कदापिही एक नव्हेत. (२१)

**न्याये ह्मणिजे तो शाश्वत। अन्याये ह्मणिजे तो अशाश्वत।**
**बाष्कळ आणि नेमस्त। येक कैसा ॥ २२ ॥**

न्याय म्हणजे शाश्वत आणि अन्याय म्हणजे अशाश्वत होय. बाष्कळ आणि नेमस्त यांना एक कसे म्हणता येईल? (२२)

**येक उघड भाग्य भोगिती। येक तश्कर पळोन जाती।**
**येकांची प्रगट महंती। येकांची कानकोंडी ॥ २३ ॥**

एखादा प्रगटपणे भाग्य भोगतो, तर दुसरा एखादा चोरी करून पळून जातो. एकाचा मोठेपणा प्रगट असतो, तर एखाद्याचा मिंधेपणा असतो. (२३)

**आचारविचारेंविण। जें जें करणें तो तो सीण।**
**धूर्त आणि विचक्षण। तेचि शोधावे ॥ २४ ॥**

उत्तम आचार-विचाराशिवाय जे जे काही करावे, तो उगीच शीण होय. म्हणून चतुर आणि विद्वान माणसांचाच शोध घ्यावा. (२४)

**उदंड बाजारी मिळाले। परी ते धूर्तेंचि आळिले।**
**धूर्तांपासीं कांहीं न चले। बाजाऱ्यांचें ॥ २५ ॥**

उदंड बाजारबुणगे एकत्र आले तरी धूर्त चतुर माणूस त्यांना बरोबर ओळखतो. चतुर माणसापुढे बाजाऱ्यांचे काही चालत नाही. (२५)

**याकारणें मुख्य मुख्य। तयांसीं करावें सख्य।**
**येणेंकरितां असंख्य। बाजारी मिळती ॥ २६ ॥**

याकारणे जे कोणी मुख्य असतील, श्रेष्ठ असतील, त्यांच्याशी सख्य करावे. असे केल्याने असंख्य बाजारबुणगे भोवती जमतात. (२६)

धूर्तासि धूर्तचि आवडे। धूर्त धूर्तींच पवाडे।
उगेचि हिंडती वेडे। कार्येंविण ॥ २७॥

हुशार माणसाला हुशार–चतुर माणूसच आवडतो. शहाण्या लोकांमध्ये शहाणपणाची दाद मिळते. वेडे लोक असतात ते काही काम न करता उगीचच भटकत असतात. (२७)

धूर्तासि धूर्तपण कळलें। तेणें मनास मन मिळालें।
परी हें गुप्तरूपें केलें। पाहिजे सर्वे ॥ २८॥

चतुर माणसालाच चतुरपणाची पारख होते. असे झाले की त्यांची मने मिळतात. पण हे सर्व काही गुप्तरूपाने केले पाहिजे. (२८)

समर्थाचें राखतां मन। तेथें येती उदंड जन।
जन आणि सज्जन। आर्जव करिती ॥ २९॥

मोठ्या माणसाचे मन राखले, त्याला प्रसन्न करून घेतले की तेथे असंख्य लोक एकत्रित येतात. सज्जन माणसे आणि सामान्य लोकही आर्जव करतात. (२९)

वोळखीनें वोळखी साधावी। बुद्धीनें बुद्धि बोधावी।
नीतिन्यायें वाट रोधावी। पाषांडाची ॥ ३०॥

ओळखीने ओळखी वाढवाव्यात. आपल्या बुद्धीने लोकांना उपदेश करावा. नीतिन्यायाने वागून पाखंडमताचा प्रचार न होईल असा प्रयत्न करावा. (३०)

वेष धरावा बावळा। अंतरी असाव्या नाना कळा।
सगट लोकांचा जिव्हाळा। मोडूं नये ॥ ३१॥

वेष साधासुधा धरावा, पण अंतर्यामी अनेक कळा असाव्यात. सर्व लोकांचे प्रेम जतन करावे, त्यात अंतराय पडू देऊ नये. (३१)

निस्पृह आणि नित्य नूतन। प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान।
प्रगट जाणता सज्जन। दुल्लभ जगीं ॥ ३२॥

निःस्पृह असून ज्याच्या ठिकाणी नित्य नूतन स्वानुभवपूर्ण ब्रह्मज्ञान प्रगट दिसत असते, असा जाणता सज्जन या जगात दुर्लभ आहे. (३२)

नाना जिनसपाठांतरे। निवती सकळांचीं अंतरें।
चंचळपणें तदनंतरें। सकळां ठाईं ॥ ३३॥

नाना विषयांच्या पाठांतराने युक्त, सर्वांच्या अंतःकरणास निववणारा असून तो चंचळपणे सर्वत्र संचार करीत असतो. (३३)

येके ठाईं बैसोन राहिला। तरी मग व्यापचि बुडाला।
सावधपणें ज्याला त्याला। भेटि द्यावी ॥ ३४॥

तो जर एकाच ठिकाणी बसून राहिला, तर मग सर्व लोकसंग्रहच नष्ट होईल. म्हणून सावधपणे सर्वांना वरचेवर भेट द्यावी. (३४)

भेटभेटों उरी राखणें। हें चातुर्याचीं लक्षणें।
मनुष्यमात्र उत्तम गुणें। समाधान पावे ॥ ३५॥

वरचेवर भेटून त्यांना आपलेसे करावे, हीच चातुर्याची लक्षणे आहेत. उत्तम गुणांच्यामुळे मनुष्यमात्राला समाधान लाभते. (३५)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चातुर्यलक्षणनाम' समास पहिला समाप्त.

❑ ❑

## दशक १५ : समास २

## निःस्पृहव्यापलक्षण

॥ श्रीराम ॥

पृथ्वीमधें मानवी शरीरें। उदंड दाटलीं लाहानथोरें।
पालटती मनोविकारें। क्षणक्षणा ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, या पृथ्वीवर असंख्य मानवशरीरे असून लहान–थोर माणसांची गर्दीच गर्दी झाली आहे. त्यांचे मनोविकार क्षणोक्षणी पालटत असतात. (१)

जितुक्या मूर्ती तितुक्या प्रकृती। सारिख्या नस्ती आदिअंतीं।
नेमचि नाहीं पाहावें किती। काये म्हणोनी ॥ २॥

जितके लोक तितक्या प्रकृती, स्वभाव आहेत. सुरुवातीपासून शेवटापर्यंत एकसारखा दुसरा आढळत नाही. त्यात काही नियमच नसल्याने किती भिन्नता आढळते, ते कसे सांगावे? (२)

कित्येक म्लेंच होऊनगेले। कित्येक फिरंगणांत आटले।
देशभाषानें रुधिले। कितीयेक ॥ ३॥

या देशातील कित्येक लोक म्लेंच्छ होऊन गेले. कित्येक लोक पोर्तुगीज राज्यात बेपत्ता झाले. भाषाभेदाने कित्येकांची अडवणूक झाली. (३)

म-हाष्ट्रदेश थोडा उरला। राजकारणें लोक रुधिला।
अवकाश नाहीं जेवायाला। उदंड कामें ॥ ४॥

महाराष्ट्र देशच यापासून थोडा फार वाचला आहे. येथे लोक राजकारणात अडकले आहेत. त्यांना इतकी कामे आहेत की जेवायलाही वेळ नाही. (४)

कित्येक युद्धप्रसंगी गुंतले। तेणें गुणें उन्मत्त जाले।
रात्रंदिवस करूं लागले। युद्धचर्चा ॥ ५॥

कित्येक युद्धप्रसंगात इतके गुंतले आहेत की, त्यामुळे उन्मत्त होऊन रात्रंदिवस युद्धाचीच चर्चा करू लागले आहेत. (५)

उदिम्यास व्यासंग लागला। अवकाश नाहींसा जाला।
अवघा पोटधंदाच लागला। निरंतर ॥ ६॥

व्यापारी लोकांचा धंदा इतका वाढला आहे की त्यांना मोकळा वेळच मिळत नाहीसा झाला आहे. निरंतर आपल्या पोटापाण्याचा धंदा करण्यात ते गढून गेले आहेत. (६)

शडदर्शनें नाना मतें। पाषांडें वाढलीं बहुतें।
पृथ्वीमधें जेथतेथें। उपदेसिती ॥ ७॥

षड्दर्शने-सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा (वेदांत) आणि नाना मते तसेच नास्तिक मते खूपच वाढली आहेत. या जगात अनेक लोक जेथे तेथे लोकांना उपदेश करीत आहेत. (७)

स्मार्थीं आणि वैष्णवीं। उरलीं सुरलीं नेलीं आघवी।
ऐसी पाहातां गथागोवी। उदंड जाली ॥ ८॥

यांतून उरलेले लोक स्मार्त किंवा वैष्णव मताचे अनुसरण करीत आहेत. याप्रमाणे सर्वत्र गोंधळच माजून राहिला आहे. (८)

कित्येक कामनेचे भक्त। ठाइं ठाइं जाले आसक्त।
युक्त अथवा अयुक्त। पाहातो कोण ॥ ९॥

कित्येक सकाम भक्ती करणारे आहेत. ते निरनिराळ्या विषयांत आसक्त झालेले असल्याने योग्य किंवा अयोग्य हे पाहणार तरी कसे? (९)

या गल्बल्यामध्यें गल्बला। कोणी कोणी वाढविला।
त्यास देखों सकेनासा जाला। वैदिक लोक ॥ १०॥

या गोंधळातच कोणी कोणी अधिक गोंधळ वाढवीत आहेत. ते वैदिक लोकांना पाहावत नाही. (१०)

त्याहिमधें हरिकीर्तन। तेथें वोढले कित्येक जन।
प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान। कोण पाहे ॥ ११॥

त्यातही हरिकीर्तनाकडे अनेक लोक आकर्षित होत आहेत. तेथे अनुभवाच्या ब्रह्मज्ञानाचा विचार कोण करतो? (११)

या कारणें ज्ञान दुल्लभ। पुण्यें घडे अलभ्य लाभ।
विचारवंतां सुल्लभ। सकळ कांहीं ॥ १२॥

यामुळे ज्ञान दुर्लभ झाले आहे. जो पुण्यवान असेल, त्यालाच ज्ञानाचा अलभ्य लाभ होतो. विचारवंतांना मात्र सर्व काही सुलभ होते. (१२)

विचार कळला सांगतां नये। उदंड येती अंतराये।
उपाये योजितां अपाये। आडवे येती ॥ १३॥

विचार आपल्यापुरता कळतो, पण तो दुसऱ्याला सांगता येत नाही. त्यातही अनेक विघ्ने येतच असतात. म्हणजे उपाय करायला जावे, तर अपायच घडतो. (१३)

त्याहिमधें जो तिक्षण। रिकामा जाऊं नेदी क्षण।
धूर्त तार्किक विचक्षण। सकळां माने ॥ १४॥

त्यामध्येही जो हुशार असतो, तो आपला एक क्षणही फुकट जाऊ देत नाही. अशा हुशार, तर्कनिष्ठ आणि विचारवंत माणसाला सगळे मान देतात. (१४)

नाना जिनस उदंड पाठ। वदों लागला घडघडाट।
अव्हाटचि केली वाट। सामर्थ्यबळें ॥ १५॥

ज्याचे उत्तम पाठांतर असते, तो धडाधड बोलू लागला की आपल्या सामर्थ्याच्या बळावर परमार्थाची वाट रुंद, विस्तीर्ण करतो. (१५)

प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें। जाणें सकळांची अंतरें।
निरूपणें तदनंतरें। चटक लागे ॥ १६॥

लोकांना ज्ञानोपदेश करण्याचे अनेक मार्ग त्याला अवगत असतात. तो सर्व लोकांची अंत:करणे जाणतो आणि त्यानंतर तो अशा उत्तम प्रकारे निरूपण करतो की लोकांना चटक लागते. (१६)

मतें मतांतरें सगट। प्रत्यये बोलोन करी सपाट।
दंडक सांडून, नीट-। वेधी जना ॥ १७॥

अनेक मते व मतांतरे, तो स्वानुभवावर आधारलेल्या आपल्या बोलण्याने खोडून काढतो. रूढी मोडून तो सर्व लोकांना स्वत:कडे आकर्षित करतो. (१७)

**नेमकें भेदकें वचनें। अखंड पाहे प्रसंगमानें।**
**उदास वृत्तीच्या गुमानें। उठोन जातो ॥ १८ ॥**

तो मोजकी पण भेदक वचने प्रसंगानुसार नेहमी बोलतो आणि अनासक्तपणे तेथून उठूनही जातो. (१८)

**प्रत्यये बोलोन उठोन गेला। चटक लागली लोकांला।**
**नाना मार्ग सांडून त्याला। शरण येती ॥ १९ ॥**

आपल्या अनुभवाच्या आधारे तो बोलत असल्याने लोकांना त्याचे निरूपण ऐकण्याची चटक लागते. इतर नाना मार्ग सोडून ते त्यालाच शरण येतात. (१९)

**परी तो कोठें आडळेना। कोणे स्थळीं सांपडेना।**
**वेष पाहातां हीनदीना। सारिखा दिसे ॥ २० ॥**

पण त्याचा शोध घेऊ लागले की तो कोठेच दिसत नाही. कुठल्याच स्थळी सापडत नाही. त्याचा वेष पाहिला तर तो अगदी हीनदीन माणसासारखा दिसतो. (२०)

**उदंड करी गुप्तरूपें। भिकाऱ्यासारिखा स्वरूपें।**
**तेथें येशकीर्तिप्रतापें। सीमा सांडिली ॥ २१ ॥**

तो स्वरूपाने भिकाऱ्यासारखा दिसतो. गुप्तरूपाने उदंड कार्य करीत असतो. पण वास्तविक त्याच्या यश, कीर्ती, प्रतापाने सीमा ओलांडलेली असते. (२१)

**ठाईं ठाईं भजन लावी। आपण तेथून चुकावी।**
**मछरमतांची गोवी। लागोंच नेदी ॥ २२ ॥**

ठिकठिकाणी तो लोकांना भक्तिमार्गास लावतो आणि आपण तेथून निघून जातो. मतामतांच्या गोंधळात जो जराही गुंतत नाही. (२२)

**खनाळामधें जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे।**
**सर्वत्रांची चिंता वाहे। सर्वकाळ ॥ २३ ॥**

तो जेथे त्याला कोणी पाहणार नाही, अशा कडेकपारीत जाऊन राहतो. पण तेथे राहून तो सर्वांची काळजी करीत असतो. (२३)

**अवघड स्थळीं कठीण लोक। तेथें राहाणें नेमक।**
**सृष्टीमधें सकळ लोक। धुंडीत येती ॥ २४ ॥**

जेथे जंगली लोक असतात, अशा अवघड ठिकाणी तो नेमका जाऊन राहातो. पण जगातील लोक तेथेही त्याला शोधीत येतात. (२४)

**तेथें कोणाचें चालेना। अनुमात्र अनुमानेना।**
**कट्ट घालून राजकारणा। लोक लावी ॥ २५ ॥**

त्याच्यापुढे कोणाचेच काही चालत नाही. लोक त्याच्याविषयी अणुमात्र अनुमान करू शकत नाहीत. लोकांच्यात एकोपा घडवून तो लोकांना राजकारणात मार्गदर्शन करतो. (२५)

**लोकीं लोक वाढविले। तेणें अमर्याद जाले।**
**भूमंडळीं सत्ता चाले। गुप्तरूपें ॥ २६ ॥**

अशा रीतीने या जगात तो अफाट लोकसंग्रह करतो, त्यामुळे त्याचे सामर्थ्य अमर्याद वाढते. जगात गुप्तरूपाने त्याचीच सत्ता चालत असते. (२६)

**ठाईं ठाईं उदंड तावे। मनुष्यमात्र तितुकें झोंबे।**
**चहुंकडे उदंड लांबे। परमार्थबुद्धि ॥ २७ ॥**

ठिकठिकाणी अनुयायांचे समुदाय निर्माण होतात. मनुष्यमात्र त्याच्याकडे आकर्षित होतो आणि चहूकडे परमार्थबुद्धीचा उदंड प्रचार होतो. (२७)

**उपासनेचा गजर। स्थळोस्थळीं थोर थोर।**
**प्रत्ययानें प्राणीमात्र। सोडविले ॥ २८ ॥**

जागोजागी उपासनेचा मोठमोठ्याने गजर होऊ लागतो. स्वानुभवाने तो प्राणिमात्रांना मुक्त करतो. (२८)

**ऐसे कैवाडे उदंड जाणे। तेणें लोक होती शहाणे।**
**जेथें तेथें प्रत्यये बाणे। प्राणिमात्रांसी ॥ २९ ॥**

अशा प्रकारच्या युक्त्या तो अनेक जाणतो व त्यायोगे लोकांना शहाणे करतो. जेथे तेथे तो आपल्या ज्ञानाचा लोकांना प्रत्यय आणून देतो. (२९)

**ऐसी कीर्ति करून जावें। तरीच संसारास यावें।**
**दास म्हणे हें स्वभावें। संकेतें बोलिलें ॥ ३० ॥**

संसारात आल्यासारखे याप्रकारे कीर्ती मिळवून जावे व जीवन सार्थक करावे. रामदास म्हणतात की, मी हे अगदी सहज उदाहरणासाठी बोललो आहे. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'निःस्पृहव्यापलक्षणनाम' समास दुसरा समाप्त.**



## दशक १५ : समास ३
## श्रेष्ठ अंतरात्मानिरूपण

॥ श्रीराम ॥

मुळापासून सैरावैरा। अवघा पंचीकर्ण पसारा।
त्यांत साक्षत्वाचा दोरा। तोहि तत्वरूप ॥ १॥

श्रीसमर्थ सांगतात की, या दृश्य सृष्टीमध्ये अगदी मूळमायेपासून जो हा अफाट पसारा दिसून येतो तो सर्व पंचमहाभूतांपासून झालेला म्हणजे पांचभौतिकच आहे. यात जो साक्षीत्वाचा, जाणिवेचा तंतू दोरा ओवलेला आहे, तो म्हणजे अंतरात्मा. हाही तत्त्वरूपच आहे. (१)

दुरस्ता दाटल्या फौजा। उंच सिंहासनीं राजा।
याचा विचार समजा। अंतर्यामी ॥ २॥

दोन्ही बाजूला सैन्य दाटून भरलेले असते आणि उंच सिंहासनावर राजा बसलेला असतो. या बोलण्याचा अभिप्राय अंतर्यामी विचाराने जाणून घ्यावा. (सैन्याप्रमाणे असलेल्या पंचभौतिक विश्वाच्या पसाऱ्यात साक्षी म्हणजे अंतरात्मा हा राजासारखा श्रेष्ठ होय.) (२)

देहमात्र अस्तिमांशाचें। तैसेंचि जाणावें नृपतीचें।
मुळापासून सृष्टीचें। तत्वरूप ॥ ३॥

सर्व देह हे अस्थिमांसाचे असतात, तसेच राजाचेही समजावे. मूळमायेपासून सर्व सृष्टी तत्त्वरूप म्हणजे पांचभौतिकच होय. (राजा आणि प्रजा सर्वच पांचभौतिक आहेत.) (३)

रायाचे सत्तेनें चालतें। परन्तु अवघीं पंचभूतें।
मुळीं आधिक जाणिवेचें तें। अधिष्ठान आहे ॥ ४॥

राजाच्या सत्तेने सर्व कारभार चालतो, पण सर्व काही पांचभौतिकच आहे. मूळमायेच्या ठिकाणी इतरांपेक्षा जाणिवेचे अधिक अधिष्ठान हे वैशिष्ट्य आहे. (४)

विवेकें बहुत पैसावले। म्हणौन अवतारी बोलिले।
मनु चक्रवती जाले। येणेंचि न्यायें ॥ ५॥

विवेकाने जे व्यापक झाले, त्यांना अवतारी म्हणतात. या न्यायानेच मनू आदींना चक्रवर्ती म्हटले जाते. (५)

जेथें उदंड जाणीव। तेचि तितुके सदेव।
थोडे जाणीवेनें नर्देव। होती लोक ॥ ६॥

ज्यांच्या ठायी उदंड जाणीव असते, ते भाग्यवान होत. अल्प जाणीव असेल तर लोक निर्दैव, करंटे होतात. (६)

व्याप आटोप करिती। धके चपेटे सोसिती।
तेणें प्राणी सदेव होती। देखतदेखतां ॥ ७॥

जे लोक खूप प्रयत्न करून व्याप वाढवितात. निरनिराळे धक्के सोसतात, तेच लोक पाहता पाहता भाग्यवान होतात. (७)

ऐसें हें आतां वर्ततें। मूर्ख लोकांस कळेना तें।
विवेकी मनुष्य समजतें। सकळ कांहीं ॥ ८॥

आजकालसुद्धा असेच घडत असते, पण मूर्ख लोकांना ते कळत नाही. जो विवेकी माणूस असतो, त्याला सर्व काही कळते. (८)

थोर लाहान बुद्धीपासी। सगट कळेना लोकांसी।
आधीं उपजलें तयासी। थोर म्हणती ॥ ९॥

थोरपण, लहानपण हे बुद्धीवर अवलंबून असते, हे सर्व लोकांना कळते. आधी जो जन्माला आला असेल, म्हणजे ज्याचे वय जास्त आहे, त्याला लोक थोर म्हणतात. (९)

वयें धाकुटा नृपती। वृद्ध तयास नमस्कार करिती।
विचित्र विवेकाची गती। कळली पाहिजे ॥ १०॥

राजा वयाने लहान असला तरी वृद्ध माणसे त्याला नमस्कार करतात. विवेकाची तऱ्हा अशी विचित्र आहे, ती समजली पाहिजे. (१०)

सामान्य लोकांचें ज्ञान। तो अवघाच अनुमान।
दीक्षादंडकाचें लक्षण। येणेंचि पाडें ॥ ११॥

सामान्य लोकांचे ज्ञान केवळ अनुमानाचे असते. दीक्षेचा लौकिक रूढ विधी, त्याचे लक्षण असेच निरर्थक होय. (११)

| | |
|---|---|
| नव्हे कोणास म्हणावें। सामान्यास काये ठावें।<br>कोणकोणास म्हणावें। किती म्हणोनी ॥ १२॥ | पण हे खरे नाही असे कोणाकोणाला सांगावे? सामान्य लोकांना यातील काही कळत नाही. शिवाय हे किती जणांना सांगणार? कारण लोक तर बहुसंख्य आहेत. (१२) |
| धाकुटा भाग्यास चढला। तरी तुच्छ करिती तयाला।<br>याकारणें सलगीच्या लोकांला। दुरी धरावें ॥ १३॥ | एखादा लहान वयाचा माणूस भाग्यास चढला तरी लोक त्याला तुच्छ समजतात. म्हणून लोकांशी जास्त सलगी करू नये. त्यांना थोडे दूरच ठेवावे. (१३) |
| नेमस्त कळेना वचन। नेमस्त नये राजकारण।<br>उगेचि धरिती थोरपण। मूर्खपणें ॥ १४॥ | मोजके कसे बोलावे, नेमस्तपणे राजकारण कसे करावे, हे कळत नसतानाही काही लोक स्वत:ला मूर्खपणाने थोर समजतात. (१४) |
| नेमस्त कांहींच कळेना। नेमस्त कोणीच मानीना।<br>आधीं उपजलें त्या थोरपणा। कोण पुसे ॥ १५॥ | ज्याला निश्चितपणे काहीच कळत नाही आणि ज्याला कोणीही थोर मानत नाही, तो केवळ आधी जन्मला म्हणजेच वयाने थोर असला तरी त्याला कोण विचारतो? (१५) |
| वडिलां वडिलपण नाहीं। धाकुट्यां धाकुटपण नाहीं।<br>ऐसें बोलती त्यांस नाहीं। शाहाणपण ॥ १६॥ | जे लोक असे म्हणतात की, 'वडील माणसांना कुणी वडील म्हणून मान देत नाहीत किंवा लहानांनी आपले लहानपण सोडले,' त्यांना शहाणपण नाही, असे समजावे. (१६) |
| गुणेविण वडिलपण। हें तों आवघेंच अप्रमाण।<br>त्याची प्रचीत प्रमाण। थोरपणीं ॥ १७॥ | गुणांशिवाय मोठेपणा मानणे हे सर्वच अयोग्य, अप्रमाण होय. थोरपणा हा प्रचीतीवर प्रमाण मानावा. (१७) |
| तथापि वडिलांस मानावें। वडिलें वडिलपण जाणावें।<br>नेणतां पुढें कष्टावें। थोरपणीं ॥ १८॥ | तथापि वयाने वडील असणारांनाही मान द्यावा. पण वडील माणसांनीही आपले वडीलपण खरे नव्हे हे जाणून घ्यावे, नाहीतर पुढे म्हातारपणी त्रास होईल. (१८) |
| तस्मात वडिल अंतरात्मा। जेथें चेतला तेथें महिमा।<br>हें तों प्रग टचि आहे, आम्हां। शब्द नाहीं ॥ १९॥ | म्हणून सर्वांत वडील म्हणजे श्रेष्ठ जो अंतरात्मा तो जेथे प्रकाशित, जागृत झालेला असतो, त्या माणसाला मोठेपणा प्राप्त होतो हे तर उघडच आहे. असे म्हटल्याने आमच्याकडे दोष येत नाही. (१९) |
| याकारणें कोणीयेकें। शाहाणपण सिकावें विवेकें।<br>विवेक न सिकतां, तुकें। तुटोन जाती ॥ २०॥ | म्हणून कुणाही माणसाने विवेकाने शहाणपण शिकून घ्यावे. विवेकाने शहाणपण शिकले नाही, तर महत्त्व राहात नाही. (२०) |
| तुक तुटलें म्हणिजे गेलें। जन्मा येऊन काये केलें।<br>बळेंचि सांदिस घातलें। आपणासी ॥ २१॥ | पत जर राहिली नाही, तर मग जन्माला येऊन काय केले? बळेच स्वत:ला तुच्छ करून घेतले असे होईल. (२१) |
| सगट बायेका सिव्या देसी। सांदीस पडिला ऐसें म्हणती।<br>मूर्खपणाची प्राप्ती। ठाकून आली ॥ २२॥ | असे झाले तर सरसकट स्त्रियासुद्धा शिव्या देतात. अडगळीत पडला, व्यर्थ स्वत:ला तुच्छ करून घेतले, असे म्हणू लागतात. अशा रीतीने मूर्खपणा पदरात पडतो. (२२) |
| ऐसें कोणीयेकें न करावें। सर्व सार्थकचि करावें।<br>कळेना तरी विवरावें। ग्रंथांतरीं ॥ २३॥ | म्हणून कुणी असे करू नये. सर्व प्रकारे जन्माचे सार्थक करून घ्यावे. आपणास कळत नसेल तर ग्रंथांचा अभ्यास करून जाणून घ्यावे. (२३) |
| शाहाण्यास कोणीतरी बाहाती। मूर्खास लोक दवडून देती।<br>जीवास आवडे संपत्ति। तरी शाहाणे व्हावें ॥ २४॥ | शहाण्या माणसाला सर्व बोलावतात, मान देतात, मूर्खास दूर सारतात. प्रत्येक जीवाला मोठेपणा आवडत असतो, म्हणून प्रत्येकाने शहाणे व्हावे. (२४) |
| आहो या शाहाणपणाकारणें। बहुतांचे कष्ट करणें।<br>परंतु शाहाणपण सिकणें। हें उत्तमोत्तम ॥ २५॥ | हे शहाणपण प्राप्त व्हावे, म्हणून अनेक प्रकारे कष्ट करावे लागले तरी करावेत, पण काहीही करून शहाणपण शिकून घ्यावे हेच उत्तमोत्तम होय. (२५) |

जो बहुतांस मानला। तो जाणावा शाहाणा जाला।
जनीं शाहाण्या मनुष्याला। काये उणें ॥ २६ ॥

जो अनेकांना मान्य होतो, तोच शहाणा झाला असे जाणावे. जो शहाणा असतो, त्या माणसाला या जगात काय उणे पडणार आहे? (२६)

आपलें हित न करी लोकिकीं। तो जाणावा आत्मघातकी।
या मूर्खायेवढा पातकी। आणिक नाहीं ॥ २७ ॥

लौकिकात जो आपले हित करीत नाही तो आत्मघातकी जाणावा. या मूर्खाएवढा पातकी दुसरा कोणीही नाही. (२७)

आपण संसारीं कष्टतो। लोकांकरवीं रागेजोन घेतो।
जनामधें शाहाणा तो। ऐसें न करी ॥ २८ ॥

आपण संसारात कष्ट करतो, पण (मूर्खपणामुळे) लोकांकडून रागवून घेतो. असे शहाणा माणूस करीत नाही. (२८)

साधकां सिकविलें स्वभावें। मानेल तरी सुखें घ्यावें।
मानेना तरी सांडावें। येकीकडे ॥ २९ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, मी साधकांना स्वाभाविकपणे हे शिकविले आहे. त्यांना पटले तर त्यांनी सुखाने घ्यावे. जर पटले नाही तर सोडून द्यावे. (२९)

तुम्ही श्रोते परम दक्ष। अलक्षास लावितां लक्ष।
हें तों सामान्य प्रत्यक्ष। जाणतसा ॥ ३० ॥

आपण सर्व श्रोते परम दक्ष आहात. आपण अलक्ष अशा परब्रह्माकडे लक्ष लावीत असता, ध्यान करीत असता. मग मी जे सांगितले, ते तर अत्यंत सामान्य आहे. ही गोष्ट तर आपण प्रत्यक्ष जाणताच. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रेष्ठ अंतरात्मानिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.**



## दशक १५ : समास ४

## शाश्वतब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

पृथ्वीपासून जालीं झाडें। झाडापासून होती लांकडें।
लांकडें भस्मोन पुढें। पृथ्वीच होये ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, पृथ्वीपासून झाडे उत्पन्न होतात. पुढे ती झाडे वाळून लाकूड बनतात. ती लाकडे पुढे जळून भस्म होतात. म्हणजे परत (मातीच) पृथ्वीच होते. (१)

पृथ्वीपासून वेल होती। नाना जिनस फांपावती।
वाळोन कुजोन मागुती। पृथ्वीच होये ॥ २ ॥

पृथ्वीपासून वेली बनतात. नानाप्रकारे फळाफुलांनी विस्तार पावतात. त्या वेली पुढे वाळून अथवा कुजून त्यांची मातीच होते. (२)

नाना धान्यांचीं नाना अन्नें। मनुष्यें करिती भोजनें।
नाना विष्ठा नाना वमनें। पृथ्वीच होये ॥ ३ ॥

नाना प्रकारच्या धान्यांपासून अन्नाचे नाना प्रकार तयार करून माणसे त्यांचे भोजन करतात. त्या अन्नाची विष्ठा अथवा ओक बनते म्हणजे मातीच होते. (३)

नाना पक्षादिकीं भक्षिलें। तरीं पुढें तैसेंचि जालें।
वाळोन भस्म होऊन गेलें। पुन्हां पृथ्वी ॥ ४ ॥

अथवा ती धान्ये, फळे, पाने, फुले वगैरे पशुपक्ष्यादी भक्षण करतात. त्यांचेही पुढे तसेच विष्ठादी होते किंवा वाळून अथवा जळून भस्म वगैरे होते. म्हणजे परत माती (पृथ्वी) च होते. (४)

मनुष्यें मरतांच ऐका। क्रिमि भस्म कां मृत्तिका।
ऐशा काया पडती अनेका। पुढें पृथ्वी ॥ ५ ॥

माणसे मेली की त्यांच्या प्रेतास कृमी भक्षण करतात. जाळल्याने भस्म होते अथवा पुरले तर मातीच होते. अशा प्रकारे अनेक शरीरांची शेवटी मातीच होते. म्हणजे पृथ्वीच होते. (५)

नाना तृण पदार्थ कुजती। पुढें त्याची होये माती।
नाना किडे मरोन जाती। पुढें पृथ्वी ॥ ६ ॥

नाना तृणे, पदार्थ कुजून त्यांची माती होते. तसेच अनेक प्रकारचे किडे वगैरे मरतात, त्यांचीही माती होते. (६)

**पदार्थ दाटले अपार। किती सांगावा विस्तार।**
**पृथ्वीवांचून थार। कोणास आहे ॥ ७॥**

जगात इतके असंख्य पदार्थ आहेत की, त्यांचा विस्तार किती म्हणून वर्णन करावा. पण सर्वांना शेवटी पृथ्वीशिवाय दुसरा थारा नाही. (७)

**झाडपाले आणि तृण। पशु भक्षितां होतें सेण।**
**खात मूत भस्म मिळोन। पुन्हा पृथ्वी ॥ ८॥**

झाडे, पालापाचोळा, गवत वगैरे पशू भक्षण करतात. त्याचे शेण होते. त्याचे खत होते ते, त्यांचे मूत्र, भस्म आदी काहीही झाले, तरी ती मातीच (पृथ्वीतत्त्वच) असते. (८)

**उत्पत्ति स्थिति संव्हारतें। तें तें पृथ्वीस मिळोन जातें।**
**जितुकें होतें आणि जातें। पुन्हा पृथ्वी ॥ ९॥**

ज्याचा ज्याचा उत्पत्ती, स्थिती, व संहार होतो ते ते सर्व शेवटी पृथ्वीतच मिसळून जाते. जितके उपजते आणि नाश पावते, त्याची पुन्हा मातीच होते. (९)

**नाना बीजांचिया रासी। विरढोन लगती गगनासी।**
**पुढें सेवटीं पृथ्वीसी। मिळोन जाती ॥ १०॥**

अनेक बीजांच्या राशी उगवून, वाढून गगनापर्यंत जातात, पण शेवटी त्या पृथ्वीतच मिसळून जातात. (१०)

**लोक नाना धातु पुरिती। बहुतां दिवसां होये माती।**
**सुवर्णपाषाणाची गती। तैसीच आहे ॥ ११॥**

लोक नाना धातू (सोने, चांदी इत्यादी) पुरून ठेवतात, पण दीर्घ काळानंतर त्यांची मातीच होते. सुवर्ण असो वा पाषाण, सर्वांची तीच गती आहे. (११)

**मातीचें होतें सुवर्ण। आणी मृत्तिकेचे होती पाषाण।**
**माहा अग्निसंगें भस्मोन। पृथ्वीच होये ॥ १२॥**

मातीचेच सुवर्ण होते, मातीचेच पाषाण होतात, मोठ्या प्रलयाग्नीने त्याचे भस्म होते. म्हणजे परत ते पृथ्वीतत्त्वच होते. (१२)

**सुवर्णाचें जर होतें। जर सेवटीं कुजोन जातें।**
**रस होऊन वितुळतें। पुन्हा पृथ्वी ॥ १३॥**

सुवर्णापासून जर तयार होते, ती पण शेवटी कुजून जाते आणि अग्नीने वितळून रस बनून परत पृथ्वी तत्त्वातच रूपांतर होते. (१३)

**पृथ्वीपासून धातु निपजती। अग्निसंगें रस होती।**
**तया रसाची होये जगती। कठीणरूपें ॥ १४॥**

पृथ्वीपासूनच सर्व धातू निपजतात. अग्नीच्या संपर्काने त्या रसरूप होतात. ते रस कठीण बनले की परत त्यांची पृथ्वीच होते. (१४)

**नाना जळासी गंधी सुटे। तेथें पृथ्वीचें रूप प्रगटे।**
**दिवसेंदिवस जळ आटे। पुढें पृथ्वी ॥ १५॥**

जलाला जो नाना प्रकारचा गंध येतो तो गंध म्हणजे पृथ्वीचेच रूप प्रगट होत असते. जसे दिवस जातील तसे जल हळूहळू आटते आणि पुढे पृथ्वीच उरते. (१५)

**पत्रें पुष्पें फळें येती। नाना जीव खाऊन जाती।**
**ते जीव मरतां जगती। नेमस्त होये ॥ १६॥**

पृथ्वीवर अनेक पत्रे, पुष्पे, फळे येतात, त्यांना अनेक जीव खाऊन टाकतात. ते सर्व जीव मरतात, तेव्हा निश्चितपणे त्यांची मातीच होते. (१६)

**जितुका कांहीं जाला आकार। तितुक्यास पृथ्वीचा आधार।**
**होती जाती प्राणीमात्र। सेवट पृथ्वी ॥ १७॥**

जितका म्हणून आकार बनतो, त्या सर्वांना पृथ्वीचाच आधार असतो. प्राणिमात्र होतात आणि जातात. शेवटी पृथ्वी तेवढी उरते. (१७)

**हें किती म्हणौन सांगावें। विवेकें अवघेंचि जाणावें।**
**खांजणीभांजणीचें समजावें। मूळ तैसें ॥ १८॥**

याप्रमाणे किती वर्णन करावे? मनुष्याने विवेकाने सर्व समजून घ्यावे. उभारणी आणि संहारणीचे मूळ याप्रमाणे जाणून घ्यावे. (१८)

**आप आळेन पृथ्वीजाली। पुन्हां आपींच विराली।**
**अग्नियोगें भस्म जाली। म्हणोनियां ॥ १९॥**

आप (जल) आळून पृथ्वी झाली. ती परत जलातच विरली. अग्नीच्या योगाने भस्म झाल्यामुळेच हे घडले. (१९)

**आप जालें तेजापासुनी। पुढें तेजें घेतलें सोखुनी।**
**तें तेज जालें वायोचेनी। पुढें वायो झडपी ॥ २०॥**

आप हे तेजापासून झाले. ते पुढे तेजानेच शोषून घेतले. ते तेज वायूपासून होते आणि पुढे वायूच त्याला विझवतो. (२०)

वायो गगनीं निर्माण जाला । पुढें गगनींच विराला ।
ऐसें खांजणीभांजणीला । बरें पाहा ॥ २१ ॥

जें जें जेथें निर्माण होतें । तें तें तेथें लया जातें ।
येणें रितीं पंचभूतें । नाश पावती ॥ २२ ॥

भूत म्हणिज निर्माण जालें । पुन्हां मागुतें निमालें ।
पुढें शाश्वत उरलें । परब्रह्म तें ॥ २३ ॥

तें परब्रह्म जों कळेना । तों जन्ममृत्य चुकेना ।
चत्वार खाणी जीव नाना । होणें घडे ॥ २४ ॥

जडाचें मूळ तें चंचळ । चंचळाचें मूळ तें निश्चळ ।
निश्चळासी नाहीं मूळ । बरें पाहा ॥ २५ ॥

पूर्वपक्ष म्हणिजे जालें । सिद्धांत म्हणिजे निमालें ।
पक्षातीत जें संचलें । परब्रह्म तें ॥ २६ ॥

हें प्रचितीनें जाणावें । विचारें खुणेसी बाणावें ।
विचारेंविण सिणावें । तेंचि मूर्खपणें ॥ २७ ॥

ज्ञानी भिडेनें दडपला । निश्चळ परब्रह्म कैंचें त्याला ।
उगाच करितो गल्बला । मायेमधें ॥ २८ ॥

माया निशेष नासली । पुढें स्थिति कैसी उरली ।
विचक्षणें विवरिली । पाहिजे स्वयें ॥ २९ ॥

निशेष मायेचें निर्शन । होतां आत्मनिवेदन ।
वाच्यांश नाहीं विज्ञान । कैसें जाणावें ॥ ३० ॥

लोकांचे बोलीं जो लागला । तो अनुमानेंच बुडाला ।
याकारणें प्रत्ययाला । पाहिलेंच पाहावें ॥ ३१ ॥

वायू गगनात निर्माण झाला आणि पुढे गगनातच लय पावला. याप्रमाणे उभारणी आणि संहारणीला जाणून घ्यावे. (२१)

जे जे तत्त्व जेथे निर्माण होते, ते ते तेथेच लय पावते. याप्रमाणे पंचमहाभूते नाश पावतात. (२२)

भूत म्हणजे जे निर्माण झाले आणि पुन्हा मागाहून लय पावले. पुढे फक्त शाश्वत परब्रह्म तेवढे उरले. (२३)

त्या परब्रह्माचे ज्ञान जोपर्यंत होत नाही, तोपर्यंत जन्ममरण चुकत नाही. चार खाणीत नाना जीवयोनीत जन्म घ्यावा लागतो. (२४)

जडाचे मूळ चंचळ माया आहे आणि चंचळ मायेचे मूळ ते निश्चळ परब्रह्म आहे. त्या निश्चळाला दुसरे मूळ नाही, हे विचार करून जाणून घ्यावे. (२५)

जगत झाले असून ते सत्य आहे हा पूर्वपक्ष, आणि ते मिथ्या आहे हा सिद्धांत होय. या दोन्ही पक्षांहून जे अलिप्त, जेथे काहीच झाले नाही ते परब्रह्म सर्वत्र ओतप्रोत संचलेले आहे. (२६)

अनुभवाने हे जाणावे आणि निरंतर अनुसंधान करून त्याची खूण बाणून घ्यावी. विचार न करता शिणत राहावे, हा मूर्खपणा होय. (२७)

ज्ञानी असून जो मायेच्या भिडेने दडपला जातो, त्याला निश्चळ परब्रह्माची प्राप्ती कशी होणार? तो उगीच मायेमध्ये गलबला करीत राहतो. (२८)

माया नि:शेष नाहिशी झाली की पुढे काय स्थिती झाली त्याचा विचारवंताने स्वत: विचार केला पाहिजे. (२९)

मायेचे निरसन पूर्णपणे ज्या वेळी होते, तेव्हाच खरे आत्मनिवेदन होते. त्या वेळी शब्दच उरत नाही; त्या विज्ञानाचे दुजेपणाने ज्ञान कसे व्हावे? (३०)

जो लोकांच्या बोलण्याने विचलित होतो, तो अनुमानामुळे, कल्पनेमुळे ज्ञानापासून वंचित होतो. म्हणून पुन्हापुन्हा अनुभवाचा, प्रत्ययाचा पाठपुरावा करीतच राहिले पाहिजे. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'शाश्वतब्रह्मनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.**



## दशक १५ : समास ५
## चंचळ लक्षण

॥ श्रीराम ॥

दोघांऐसीं तीन चालती। अगुणीं अष्टधा प्रकृती।
अधोर्ध सांडून वर्तती। इंद्रफणी ऐसीं ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, वायू आणि जाणीव प्रकृती आणि पुरुष या दोघांच्या प्रेरणेने सत्त्व, रज, तम हे त्रिगुण–त्रिदेव या अगुण (गुणातीत) अशा परब्रह्मात वागत असतात. ज्याप्रमाणे इंद्र (मांजर) आणि फणी (सर्प) एकमेकांवर टपून असतात, त्याप्रमाणेच ही सूक्ष्म चंचळ अष्टधा प्रकृती अधजड पांचभौतिकाला आणि ऊर्ध्वनिश्चळ स्वरूपाला सोडून मध्यभागी खेळ करीत असते. तात्पर्य, चंचळ अंतरात्मा पूर्णपणे जडत्व आणि निश्चळत्वही पावत नसून या दोघांच्या मध्यभागीच वावरत असतो. (१)

पणतोंडें भक्षितो पणजा। मूल बापास मारी वोजा।
चुकाऱ्या गेला राजा। चौघां जणांचा ॥ २ ॥

वायू हा पणजा, अग्नी हा आजा, आप बाप आणि पृथ्वी मूल. पणजा पणतवंडांना खाऊन टाकतो. (यात चार महाभूते एकात एक लय पावतात ही लीला वर्णन केली आहे.) तर मूल बापाला सहज मारते. (यात त्रिगुणांची लीला वर्णन केली आहे.) चौघांचा राजा चुकाऱ्या गेला असे म्हटले आहे. येथे राजा म्हणजे आकाश म्हणजेच अंतरात्मा होय. हा या लीलेत जणू नाहीसाच झालेला, दुर्लक्षित झालेला दिसतो. (२)

देव देवाळ्यामधें लपाला। देऊळ पूजितां पावे त्याला।
सृष्टिमधें ज्याला त्याला। ऐसेंचि आहे ॥ ३ ॥

देव म्हणजे अंतरात्मा हा देवाल्यात म्हणजे देहात लपलेला असतो. देवळाची पूजा केली की ती देवाला पावते. सृष्टीमध्ये सर्व प्राण्यांमध्ये हीच गोष्ट दिसून येते. (३)

दोनी नामें येकास पडिलीं। लोकीं नेमस्त कल्पिलीं।
विवेकें प्रत्ययें पाहिलीं। तों येकचि नाम ॥ ४ ॥

प्रकृती आणि पुरुष ही दोन्ही नावे वस्तुत: एका मायेचीच आहेत. लोक दोहोंची कल्पना करतात. पण विवेकाने प्रत्यय घेऊन पाहिल्यावर दोन्ही एकाचीच नावे आहेत हे कळते. (४)

नाहीं पुरुष ना वनिता। लोकीं कल्पिलें तत्त्वता।
याचा बरा शोध घेतां। कांहींच नाहीं ॥ ५ ॥

नावाप्रमाणे तेथे कुणी पुरुष अथवा स्त्री नाही. लोकांनी तत्त्वांच्या ठिकाणी अशी कल्पना केलेली आहे. सारासारविवेकाने याचा शोध घेतल्यावर कळून येते की खरे तर येथे काहीच नाही. (५)

स्त्री नदी पुरुष खळाळ। ऐसें बोलती सकळ।
विचार पाहातां निवळ। देह नाहीं ॥ ६ ॥

स्त्रीलिंगी नदी आणि ओढा पुल्लिंगी असे सर्व लोक बोलतात. विचार करून पाहिले की कळते की पाण्याला स्त्री अथवा पुरुषाचा देह नाही. (६)

आपण आपणास कळेना। पाहों जातां आकळेना।
काशास कांहींच मिळेना। उदंडपणें ॥ ७ ॥

आपण कोण हे आपले आपल्यालाही कळत नाही. शोध घ्यावा म्हणावे तर तेही जमत नाही. अफाटपणामुळे उदंडपणामुळे कशाचाच कशाशी मेळ बसत नाही. (७)

येकलाचि उदंड जाला। उदंडचि येकला पडिला।
आपणासी आपला। गल्बला सोसवेना ॥ ८ ॥

एकला एक होता तोच उदंड झाला आणि उदंड होऊनही तो एकला एकच असतो. आपलाच गलबला आपल्याला सोसवत नाही असे झाले. (८)

येक असोन फुटी पडिली। फुटी असोन स्थिति येकली।
विचित्र कळा पैसावली। प्राणीमात्रीं ॥ ९ ॥

एक असून त्यात फूट पडल्याने अनेक झाल्यासारखा दिसतो. पण प्रत्येकात भिन्नत्व दिसत असले तरी अंतरस्थिती अंतरात्मा एकच होय. अनेक रूपांत भासूनही एकत्व भंगू न देण्याची ही अंतरात्म्याची विचित्र कळा सर्व प्राणिमात्रांत पसरली आहे. (९)

वल्लीमधें जळ संचरे। कोरडेपणें हें वावरे।
वोलेवांचून न थिरे। कांहीं केल्यां ॥ १० ॥

वेलीमध्ये पाणी भरून राहिलेले असते, पण तिला स्पर्श केला तर ओलेपणा जाणवत नाही. ती बाहेरून कोरडीच असते. पण ओलेपणाशिवाय ती काही केल्या जगूच शकणार नाही. (१०)

झाडांमधें केलीं आळीं। झाडें धांवती निराळीं।
कित्येक झाडें अंतराळीं। उडोन जाती ॥ ११ ॥

झाडांना पाणी घालण्यासाठी आळी केलेली असतात. पाणी मिळाल्याने झाडे आकाशात वाढतात. कित्येक झाडे आकाशात उंच वाढतात, तर काही झाडे म्हणजे पक्षी वगैरे उडून जातात. (११)

भूमीपासून वेगळीं जालीं। परी तें नाहींत वाळलीं।
निराळींच बळावलीं। जेथतेथें ॥ १२ ॥

जमिनीपासून वेगळी झाली तरी ती वाळत नाहीत. ती जेथे तेथे आकाशात जोमाने वाढतात. (१२)

देवाकरितां चालती झाडें। देव नस्तां होती लांकडें।
नीटचि आहे कुवाडें। सर्वथा नव्हे ॥ १३ ॥

अंतरात्मा आहे म्हणून देह जगतो, अंतरात्मा नसेल तर झाडाचे लाकूड होते. हे सर्व स्पष्टच आहे. त्यात गुप्त काहीच नाही. (१३)

झाडापासून झाडें होती। तेहि अंतरीक्ष जाती।
मुळानें भेदिली जगती। कदापि नाहीं ॥ १४ ॥

झाडापासून झाडे होतात. तीही झाडे आकाशात जातात. देहरूपी झाडाच्या मुळ्या जमिनीत मुळीच जात नाहीत. मुळाने पृथ्वी भेदली असे कधी होत नाही. (१४)

झाडास झाडें खातपाणी। घालून पाळिलीं प्रतिदिनीं।
बोलकीं झाडें शब्दमथनीं। विचार घेती ॥ १५ ॥

झाडांना झाडेच खतपाणी घालून रोजच्या रोज पाळतात. जी बोलकी झाडे असतात, ती शब्दांचे मंथन करून त्यातील जे सार असते, त्याचे ग्रहण करतात. (१५)

होणार तितुकें आधींच जालें। मग कल्पकल्पून बोलिलें।
जाणतयासी समजलें। सकळ कांहीं ॥ १६ ॥

जे काही होणार असते, ते आधीच होऊन जाते, पण त्याचे विवेचन आपापल्या कल्पनेप्रमाणे शास्त्रकारांनी केलेले आहे. जो ज्ञानी असतो, त्यालाच सर्व काही नीट समजते. (१६)

समजलें तरी उमजेना। उमजलें तरी समजेना।
प्रत्ययेंविण अनुमानेना। सकळ कांहीं ॥ १७ ॥

एखाद्याला ते समजले तरी उमजत नाही, दुसऱ्या कुणाला ते उमजते पण समजत नाही. जोपर्यंत प्रत्यक्ष अनुभव येत नाही तोपर्यंत त्याची संपूर्णपणे कल्पनाही करता येत नाही. (१७)

सर्वत्रांचा वडिल कोण। हेचि पाहावी वोळखण।
भेटे आपणास आपण। जगदांतरें ॥ १८ ॥

सर्वांहून श्रेष्ठ कोण याचा विचार करावा. त्याची म्हणजेच अंतरात्म्याची ओळख करून घ्यावी म्हणजे आपली आपल्याला भेट होते म्हणजेच स्वस्वरूपानुभव येतो आणि तोच अंतरात्मा सर्वांच्या अंतर्यामी आहे हेही कळून येते. (१८)

अंतरनिष्ठांची उंच कोटी। बाहेरमुद्याची संगती खोटी।
मूर्ख काये समजेल गोष्टी। शाहाणे जाणती ॥ १९ ॥

जे अंतर्निष्ठ असतात ते फार उच्च कोटीचे जाणावेत. जे बहिर्मुख असतात, त्यांची संगती खोटी म्हणजे वाईट असते. पण मूर्खाला या गोष्टी कळत नाहीत. शहाणे लोक असतात तेच सर्व जाणतात. (१९)

अंतरें राखतां राजी। भलत्यास भलताच नवाजी।
अंतरें न राखतां भाजी। मिळणार नाहीं ॥ २० ॥

आपण जर दुसऱ्याचे अंत:करण जाणून त्यास प्रसन्न केले तर कुणीही आपल्याला नावाजतो. आपण जर दुसऱ्याचे मन जाणून त्यास समाधान होईल असे वागलो नाही, तर भाजीसारखा क्षुद्र पदार्थही आपल्याला प्राप्त होणार नाही. (२०)

ऐसें वर्ततें प्रत्यक्ष। अलक्षीं लावावें लक्ष।
दक्षास भेटतां दक्ष। समाधान होतें ॥ २१ ॥

हे असे प्रत्यक्ष घडते हे आपल्याला दिसून येते. म्हणून अलक्ष अशा परब्रह्माकडे लक्ष लावावे. त्याचे अनुसंधान ठेवावे. अशा प्रकारे जो आत्मानुभवाविषयी दक्ष असतो, त्याला दुसरा दक्ष माणूस भेटला की अत्यंत समाधान लाभते. (२१)

**मनास मिळतां मन। पाहोन येती निरंजन।**
**चंचळचक्र उलंघून। पैलाड जाती ॥ २२॥**

गुरुशिष्यांचा ऐक्यभाव झाला, मनास मन मिळाले की त्या निरंजन परमात्म्यास पाहता येते. आणि मायेचा-मीपणाचा सर्व उपद्व्याप ओलांडून पलीकडे जाता येते. (२२)

**येकदा जाऊन पाहोन आले। मग तें सन्निध देखिलें।**
**चर्मचक्षीं लक्षिलें। न वचे कदा ॥ २३॥**

एकदा त्या निरंजन परमात्म्याचा अनुभव आला की तो सदैव अगदी जवळच आहे असे दिसते, म्हणजे जेथे पहावे तेथे सर्वत्र तोच दिसतो. पण चर्मचक्षूने, डोळ्याने त्याचा अनुभव कधी घेणे शक्यच नसते. (२३)

**नाना शरीरीं चंचळ। अखंड करी चळवळ।**
**परब्रह्म तें निश्चळ। सर्वां ठाईं ॥ २४॥**

नाना शरीरात तो चंचळ अंतरात्मा अखंड चळवळ करीत असतो, पण परब्रह्म मात्र सर्वत्र घनदाट कोंदाटलेले असले तरी ते निश्चळच असते. (२४)

**चंचळ धांवे येकीकडे। वोस पडे दुसरेकडे।**
**चंचळ पुरे सर्वांकडे। हें तो घडेना ॥ २५॥**

चंचळ असते ते एकीकडे धावले की दुसरीकडे ओस पडते. चंचळ सर्व ठिकाणी एकाच वेळी पुरे पडेल असे कधी घडूच शकत नाही. (२५)

**चंचळ चंचळास पुरेना। आवघें चंचळ विवरेना।**
**निश्चळ अपार अनुमाना। कैसें येतें ॥ २६॥**

चंचळ असा हा अंतरात्मा चंचळाच्या म्हणजे मूळमायेच्या सर्व व्यापालाच जर पूर्णपणे ओळखू शकत नाही, तर अपार आणि निश्चळ अशा परब्रह्माची तो कल्पना तरी कशी करू शकेल? (२६)

**गगनीं चालिली हवावी। कैसी पावेल पार पदवी।**
**जातां मधेंचि विझावी। ह्या स्वभावचि तिचा॥ २७॥**

दारूचा बाण पेटविल्यावर तो आकाशात उंच जातो, पण तो आकाशाला भेदून पलीकडे कसा जाऊ शकेल? जाता जाता तो मध्येच विझतो कारण तो त्याचा स्वभावच आहे. (२७)

**मनोधर्म येकदेशी। कैसा आकळिल वस्तुसी।**
**निर्गुण सांडून अपेसी। सर्व ब्रह्म म्हणे ॥ २८॥**

त्याप्रमाणेच मन हे एकदेशी असल्याने सर्वव्यापक अशा परब्रह्म वस्तूला ते कसे जाणू शकेल? जो भाग्यहीन असतो, तोच परब्रह्माचा साक्षात अनुभव त्याला नसल्याने सर्वच ब्रह्म असे म्हणतो. (२८)

**नाहीं सारासारविचार। तेथें अवघा अंधकार।**
**खरें सांडून खोटें पोर। नेणतें घेतें ॥ २९॥**

जेथे सारासारविचार नसतो, तेथे सर्व अंधकारच असतो. अज्ञानी माणूस सत्य असे सार सोडून खोटे असार ग्रहण करतो. एखाद्या लहान अज्ञानी मुलासारखेच त्याचे हे वागणे असते. (२९)

**ब्रह्मांडाचें माहाकारण। तेथून हें पंचीकर्ण।**
**माहावाक्याचें विवर्ण। वेगळें असे ॥ ३०॥**

ब्रह्मांडाचा महाकारण देह म्हणजे मूळ माया होय. तेथूनच पंचमहाभूते व पंचीकरण वगैरे उत्पन्न होते. पण महावाक्याचे विवरण हे यापासून अगदी वेगळे असते. (३०)

**महत्तत्त्व महद्भूत। तोचि जाणावा भगवंत।**
**उपासना हे समाप्त। येथून जाली ॥ ३१॥**

महत् तत्त्व सर्वांत श्रेष्ठ तत्त्व आणि महत् भूत म्हणजे सर्व उत्पन्न झालेल्या वस्तूंतील श्रेष्ठ वस्तू होय. म्हणजेच जाणीवकळा किंवा जगज्ज्योती अथवा अंतरात्मा होय. तोच षड्गुणैश्वर्ययुक्त भगवंत जाणावा. त्याचे निरंतर अनुसंधान हीच खरी उपासना होय. मूळमायेतच द्वैतरूपी उपासनेची समाप्ती होते. कारण अनुसंधान करता करता परब्रह्म वस्तूशी तादात्म्य झाले की, त्या वस्तूखेरीज दुसरे म्हणून कोणी उरतच नाही, तर कोण कुणाची उपासना करणार? (३१)

**कर्म उपासना आणि ज्ञान। त्रिकांड वेद हें प्रमाण।**
**ज्ञानाचें होतें विज्ञान। परब्रह्मीं ॥ ३२॥**

कर्म, उपासना आणि ज्ञान हे वेदांचे तीन भाग प्रमाण मानले जातात. पण याप्रमाणे वेदाचे ज्ञान झाले तरी ज्या वेळी परब्रह्मवस्तूशी ज्ञाता एकरूप होतो, त्या वेळी तो पूर्णता प्राप्त करतो. यालाच विज्ञान म्हणतात. ज्ञानाची परिसमाप्ती विज्ञानात होणे हेच महत्त्वाचे आहे. (३२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चंचळलक्षणनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १५ : समास ६
### चातुर्यविवरण

॥ श्रीराम ॥

**पीतापासून कृष्ण जालें। भूमंडळीं विस्तारलें।**
**तेणेंविण उमजलें। हें तों घडेना ॥ १॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, दिव्यापासून (किंवा पिवळ्या हिरड्यापासून) काजळ, काळी शाई झाली. ती सर्व भूखंडावर विस्तार पावली. तिच्याशिवाय ज्ञान प्राप्त झाले, असे तर होऊच शकत नाही. (१)

**आहे तरी स्वल्प लक्षण। सर्वत्रांची सांठवण।**
**अद्धम आणी उत्तम गुण। तेथेंचि असती ॥ २॥**

काजळ किंवा शाई तसे पाहिले तर अगदी क्षुल्लक वस्तू आहे. पण तिच्यामुळेच सर्वत्र सर्व प्रकारचे ज्ञान साठवले जाते. अधम गुण आणि उत्तम गुण दोन्ही तिच्यातच सामावलेले असतात. (२)

**महीसुत सरसाविला। सरसाऊन द्विधा केला।**
**उभयेता मिळोन चालिला। कार्येभाग ॥ ३॥**

महीसुत म्हणजे बोरू पुढे सरसावतो. नंतर त्याला तासून छेद दिला जातो. याप्रमाणे शाई आणि बोरू या दोघांच्या संयोगाने सर्व लिखाण, सर्व कार्यभाग चालतो. (३)

**स्वेतास्वेतास गांठी पडतां। मधें कृष्ण मिश्रित होतां।**
**इहलोकसार्थकता। होत आहे ॥ ४॥**

श्वेत कागद आणि अश्वेत बोरू यांची गाठ पडली आणि त्यात कृष्ण शाई मिश्रित झाली. त्यामुळेच इहलोकात सार्थकता प्राप्त होते. (४)

**विवरतां याचा विचार। मूर्ख तोचि होये चतुर।**
**सद्यप्रचित साक्षात्कार। परलोकींचा ॥ ५॥**

त्यांचे विवरण केले असता मूर्ख असेल तोही चतुर होतो आणि तत्काळ अनुभव येऊन परब्रह्माचा साक्षात्कारही होऊ शकतो. (५)

**सकळांस जें मान्य। तेंचि होतसे सामान्य।**
**सामान्यास अनन्य। होईजेत नाहीं ॥ ६॥**

सर्वांना जे मान्य असते, त्यालाच सामान्य लोकही मान्यता देतात. पण सामान्यपणे सर्वांस मान्य असलेल्या मायिक संसाराचा अंगीकार शहाणा साधक करीत नाही. (६)

**उत्तम मध्यम कनिष्ठ रेखा। अदृष्टीची गुप्त रेखा।**
**चत्वार अनुभव सारिखा। होत नाहीं ॥ ७॥**

नशिबाचे चार वेगवेगळे प्रकार आहेत. उत्तम, मध्यम, कनिष्ठ आणि अदृष्ट म्हणजेच सुप्त. हातावरील रेखा पाहून भविष्य सांगणाराचा सर्वांचा अनुभव एक असत नाही. (७)

**चौदा पीड्यांचे पवाडे। सांगती ते शाहाणे कीं वेडे।**
**ऐकत्यानें घडे किं न घडे। ऐसें पाहावें ॥ ८॥**

उगीच मागील चौदा पिढ्यांचे पराक्रम जे वर्णन करीत असतात ते लोक शहाणे की वेडे? ऐकणाऱ्याने सांप्रत तसेच घडत आहे की नाही हे पहावे. (८)

**रेखा तितुकी पुसोन जाते। प्रत्यक्ष प्रत्यया येतें।**
**डोळेझांकणी करावी ते। कायेनिमित्य ॥ ९॥**

नशिबाची रेखा प्रभुकृपेने बदलता येते, असा प्रत्यक्ष प्रत्यय येतो आणि तरी माणसाने तिकडे डोळेझाक का म्हणून करावी? (९)

**बहुतांचे बोलीं लागलें। तें प्राणी अनुमानीं बुडाले।**
**मुख्य निश्चये चुकलें। प्रत्ययाचा ॥ १०॥**

अनेकांच्या बोलण्यावर विश्वास ठेवल्याने माणूस संशयात बुडून जातो. आणि मुख्य जे अनुभवाचे निश्चयात्मक ज्ञान त्यास मुकतो. (१०)

**उदंडाचें उदंड ऐकावें। परी तें प्रत्ययें पाहावे।**
**खरेंखोटें निवडावें। अंतर्यामीं ॥ ११॥**

अनेक लोक ज्या अनेक गोष्टी सांगतात, त्या सर्व ऐकून घ्याव्यात, पण आपणाला ज्याचा साक्षात अनुभव येईल, त्यावरूनच अंतर्यामी खऱ्याखोट्याची निवड करावी. (११)

**कोणासी नव्हे म्हणों नये। समजावे अपाये उपाये।**
**प्रत्यये घ्यावा बहुत काये। बोलोनियां ॥ १२॥**

कुणाचे मत खोडून काढू नये, पण आपण मनाशी विचार करून उपाय आणि अपाय समजून घ्यावे आणि स्वत: प्रत्यय घ्यावा. यापेक्षा अधिक काय सांगावे? (१२)

**माणुस हेंकाड आणीकच्चें। मान्य करावें तयाचें।**
**येणें प्रकारें बहुतांचें। अंतर राखावें ॥ १३॥**

माणूस हट्टी आणि अर्धवट ज्ञान असलेला असला तरी त्याचे म्हणणे मान्य करावे. याप्रकारे आपण अनेक लोकांना अंतर्यामी खूष राखावे. (१३)

**अंतरीं पीळ पेच वळसा। तोचि वाढवी बहुवसा।**
**तरी मग शाहाणा कैसा। निवऊं नेणे ॥ १४॥**

अंतरात जर अभिमान, डावपेच असतील तर तेच नाना तऱ्हेने वाढत जाते. अशा प्रकारे जो माणूस वागतो तो दुसऱ्याचे अंत:करण निववू शकत नाही. मग त्याला शहाणा कसे म्हणावे? (१४)

**वेडें करावें शाहाणें। तरीच जिणें श्लाघ्यवाणें।**
**उगेंच वादांग वाढविणें। हें मूर्खपण ॥ १५॥**

जे वेडे असतील, त्यांना शिकवून शहाणे करावे. असे केल्यानेच जीवनाचे सार्थक होते. उगीच वादंग वाढविणे हा मूर्खपणा होय. (१५)

**मिळोन जाऊन मेळवावें। पडी घेऊन उलथावें।**
**कांहींच कळों नेदावें। विवेकबळें ॥ १६॥**

लोकांशी मिळते घेऊन लोकसंग्रह करावा. वेळप्रसंगी पड खाऊन दुसऱ्याचा डाव त्याच्यावरच उलटवावा, पण विवेकाच्या जोरावर आपल्या अंतरंगाचा पत्ता दुसऱ्यास लागू देऊ नये. (१६)

**दुसऱ्याचे चालणीं चालावें। दुसऱ्याचे बोलणीं बोलावें।**
**दुसऱ्याचे मनोगतें जावें। मिळोनियां ॥ १७॥**

दुसऱ्याच्या चालीने चालावे, दुसऱ्याच्या बोलीने बोलावे, दुसऱ्याचे मनोगत जाणून त्याच्याशी समरस होऊन जावे. (१७)

**जो दुसऱ्याच्या हितावरी। तो विपट कहिंच न करी।**
**मानत मानत विवरी। अंतर तयाचें ॥ १८॥**

जो नेहमी दुसऱ्याच्या हिताचा विचार करतो, तो कधीच वितुष्ट येऊ देत नाही. त्याचे म्हणणे मानत मानत हळूहळू त्याचे अंतरंग जाणून घेतो. (१८)

**आधीं अंतर हातीं घ्यावें। मग हळुहळु उकलावें।**
**नाना उपायें न्यावें। परलोकासी ॥ १९॥**

आधी अंतरंग जाणून घ्यावे आणि मग हळूहळू त्यास बोलता करावे आणि मग नाना उपायांनी त्याला परमार्थाकडे लावावे. (१९)

**हेंकाडास हेंकाड मिळाला। तेथें गल्बलाचि जाला।**
**कळहो उठतां चातुर्याला। ठाव कैंचा ॥ २०॥**

हेकट माणसाला दुसरा हेकट माणूस भेटला, तर तेथे भांडणतंटाच उपस्थित होतो. एकदा कलह उत्पन्न झाला की ,तेथे चातुर्याला वावच उरत नाही. (२०)

**उगीच करिती बडबड। परी करून दाखविणें हें अवघड।**
**परस्थळ साधणें जड। कठिण आहे ॥ २१॥**

लोक उगीच बडबड करतात, पण दुसऱ्याचे मन राखणे ही गोष्ट अत्यंत अवघड आहे. बोलायला सोपी पण करायला कठीण आहे. (२१)

**धके चपेटे सोसावे। नीच शब्द साहात जावे।**
**प्रस्तावोन परावे। आपले होती ॥ २२॥**

त्यासाठी प्रथम धक्के-धपेटे सोसावे लागतात. नीच शब्द सहन करावे लागतात. तेव्हा मग लोकांना पश्चात्ताप होतो आणि नंतर ते आपलेसे होतात. (२२)

**प्रसंग जाणोनि बोलावें। जाणपण कांहींच न घ्यावें।**
**लीनता धरून जावें। जेथतेथें ॥ २३॥**

प्रसंग पाहून बोलावे. आपली हुशारी प्रकट करू नये. जेथे तेथे लीनता धरून वागावे. (२३)

**कुग्रामें अथवा नगरें। पाहावीं घरांचीं घरें।**
**भिक्षामिसें ल्हानथोरें। परीक्षून सोडावीं ॥ २४॥**

कुग्रामात अथवा नगरात घरोघरी हिंडावे आणि भिक्षेच्या निमित्ताने लहान-थोर सर्व माणसांची नीट पारख करावी. (२४)

**बहुतीं कांहीं तरी सांपडे। विचक्षण लोकीं मित्री घडे।**
**उगेंच बैसतां कांहींच न घडे। फिर्णे विवरणें ॥ २५॥**

पुष्कळांच्या ठिकाणी काही ना काही घेण्यासारखा गुण आढळतो. विचारवंत लोकांशी मैत्री होते. उगीच हात जोडून स्वस्थ बसले तर फिरणे वा विवरणे यांपैकी काहीच घडत नाही. (२५)

**सावधपणें सर्व जाणावें। वर्तमान आधींच घ्यावें।**
**जाऊं ये तिकडे जावें। विवेकेंसहित ॥ २६॥**

सावधपणे सर्व जाणावे. जेथे जावयाचे असेल तेथील वर्तमान आधीच जाणून घ्यावे व मग जाण्याला योग्य असेल तिकडेच विचारपूर्वक जावे. (२६)

नाना जिनसपाठांतरें। निवती सकळांची अंतरें।
लेहोन देतां परोपकारें। सीमा सांडावी ॥ २७॥

नाना प्रकारे उत्तम पाठांतराने लोकांची अंत:करणे निववावीत. परोपकाराने लोकांना ग्रंथ आदी लिहून देऊन त्यांच्यावर अमर्याद उपकार करावेत. (२७)

जैसें जयास पाहिजे। तैसें तयास दीजे।
तरी मग श्रेष्ठचि होईजे। सकळां मान्ये ॥ २८॥

ज्याला जे पाहिजे असेल, ते त्याप्रमाणेच त्याला द्यावे. म्हणजे सर्व लोकांची मान्यता मिळून माणूस श्रेष्ठ होतो. (२८)

भूमंडळीं सकळांस मान्य। तो म्हणों नये सामान्य ।
कित्येक लोक अनन्य। तया पुरुषासी ॥ २९॥

जो या जगात सर्वमान्य होतो, त्यास सामान्य समजू नये. त्या पुरुषाशी कित्येक लोक एकनिष्ठ होतात. (२९)

ऐसीं चातुर्याचीं लक्षणें। चातुर्यें दिग्विजये करणें।
मग तयास काये उणें। जेथतेथें ॥ ३०॥

अशी ही चातुर्याची लक्षणे आहेत. चातुर्याने जो लोकांची मने जिंकतो, त्याला मग तो कुठेही गेला, तरी काहीही उणे पडत नाही. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चातुर्यविवरणनाम' समास सहावा समाप्त.**



## दशक १५ : समास ७
## अधोर्ध्वनिरूपण

॥ श्रीराम ॥

नाना विकाराचें मूळ। ते हे मूळमायाच केवळ।
अचंचळीं जे चंचळ। सूक्ष्मरूपें ॥ १॥

श्रीसमर्थ म्हणतात की, अनेक विकारांचे मूळ मूळमायाच फक्त आहे. निश्चळ अशा परब्रह्माच्या ठिकाणी ती चंचळ पण अतिसूक्ष्मरूपाने असते. (१)

मूळमाया जाणीवेची। मुळींच्या मूळ संकल्पाची।
वोळखी शड्गुणैश्वराची। येणेंचि न्यायें ॥ २॥

जाणीव म्हणजे मूळमाया होय. ब्रह्माच्या ठिकाणी जो मूळ संकल्प उठला, तीच मूळमाया होय. तिलाच षड्गुणैश्वर्यसंपन्न असे म्हणतात. (२)

प्रकृतिपुरुष शिवशक्ती। आर्धनारीनटेश्वर म्हणती ।
परी ते आवघी जगज्जोती। मूळ त्यासी ॥ ३॥

प्रकृती-पुरुष, शिवशक्ती, अर्धनारीनटेश्वर इत्यादी नावांनी तिला ओळखतात. पण ती जगज्ज्योती म्हणजे मूळ जाणीवच होय. (३)

संकल्पाचें जें चळण। तेंचि वायोचें लक्षण।
वायो आणी त्रिगुण। आणी पंचभूतें ॥ ४॥

संकल्पाचे जे चलन तेच वायूचे लक्षण स्वरूप होय. वायू, त्रिगुण आणि पंचमहाभूते एकच जाणावी. (४)

पाहातां कोणीयेक वेल। त्याच्या मुळ्या असती खोल।
पत्रें पुष्पें फळें केवळ। मुळाचपासी ॥ ५॥

एखादा वेल पाहिला, तर त्याच्या मुळ्या खोल गेलेल्या असतात. त्या मुळ्यांच्या मुळेच वेलाला पाने, फुले, फळे लागतात. (५)

याहिवेगळे नाना रंग। आकार विकार तरंग।
नाना स्वाद अंतरंग। मुळामध्यें ॥ ६॥

इतरही त्या वेलाच्या ठिकाणी जे नाना रंग, आकार, विकार, तरंग, नाना स्वाद इत्यादी दिसून येतात, त्यांचे अंतरंग मुळामध्येच असते. (६)

तेंचि मूळ फोडून पाहातां। कांहींच नाहीं वाटे आतां।
पुढें वाढतां वाढतां। दिसों लागे ॥ ७॥

पण तीच मुळी फोडून पाहिल्यास तेथे काहीच दिसून येत नाही, त्यामुळे त्यात काही नाही असेच प्रथम वाटते. पण पुढे जसजशी वेलाची वाढ होते, तसे हे सर्व स्पष्ट दिसू लागते. (७)

कड्यावरी वेल निघाला। अधोमुखें बळें चालिला।
फांपावोन पुढें आला। भूमंडळीं ॥ ८॥

एखाद्या कड्यावरही कधी कधी वेल निघतो. तो जोमाने खालच्या बाजूकडे वाढू लागतो. तो फोफावून पुढे खूप विस्तार पावतो व जमिनीपर्यंत येऊन पोहोचतो. (८)

तैसी मूळमाया जाण। पंचभूतें आणी त्रिगुण ।
मुळीं आहेत हें प्रमाण। प्रत्ययें जाणावें ॥ ९॥

मूळमाया ही त्याप्रमाणेच जाणावी. तिच्यातच पंचमहाभूते आणि त्रिगुण प्रथम अत्यंत सूक्ष्मरूपाने असतात. हे अनुभवानेच जाणून घ्यावे. (९)

अखंड वेल पुढें वाढला। नाना विकारीं शोभला।
विकारांचा विकार जाला। असंभाव्य ॥ १० ॥

असा हा वेल पुढे अखंड वाढू लागला. तो नाना विकारांनी शोभू लागला. त्या विकारांतून आणखी असंभाव्य विकार उत्पन्न झाले. (१०)

नाना फडगरें फुटलीं। नाना जुंबाडें वाढलीं।
अनंत अग्रें चालिलीं। सृष्टीमधें ॥ ११ ॥

त्याला अनेक शाखा फुटल्या, अनेक समुदाय वाढले आणि या सृष्टीमध्ये त्याची अनंत अग्रे पसरत चालली. (११)

कित्येक फळें तीं पडती। सवेंचि आणीक निघती।
ऐसीं होती आणी जाती। सर्वकाळ ॥ १२ ॥

कित्येक फळे गळून पडली. त्याचबरोबर आणखी नवीनही लागली. याप्रमाणे कित्येक वेल आले आणि गेले. (१२)

येक वेलचि वाळले। पुन्हां तेथेंचि फुटले।
ऐसे आले आणी गेले। कितीयेक ॥ १३ ॥

काही वेल वाळले. नंतर तेथेच दुसरे फुटले. याप्रमाणे कित्येक वेल आले आणि गेले. (१३)

पानें झडती आणि फुटती। पुष्पें फळें तेणेंचि रीति।
मध्यें जीव हे जगती। असंभाव्य ॥ १४ ॥

वेलाची जुनी पाने गळून पडतात, नवीन फुटतात. त्याचप्रमाणे फुले, फळेही पहिली गळून पडतात आणि नवीन फुटतच असतात. मध्यंतरी असंख्य जीवांची उत्पत्ती होतच असते. (१४)

अवघा वेलचि कर्पतो। मूळापासून पुन्हां होतो।
ऐसाअवघा विचार जो,तो-। प्रत्यक्ष जाणावा ॥ १५ ॥

कधी कधी संपूर्ण वेलच करपून जातो, पण परत मुळापासून पुन्हा उगवतो. याप्रमाणे विचार करून व प्रत्यक्ष अनुभवाने सर्व जाणून घ्यावे. (१५)

मूळ खाणोन काढिलें। प्रत्ययेज्ञानें निर्मूळ केलें।
तरी मग वाढणेंचि राहिलें। सकळ कांहीं ॥ १६ ॥

वासनामय मूळ खणून काढले. स्वस्वरूपानुभवाने निर्मूलन केले म्हणजे मूळच नष्ट झाले की मग वेलाची वाढच संपूर्ण बंद पडते. (१६)

मुळीं बीज सेवटीं बीज। मध्यें जळरूप बीज।
ऐसा हा स्वभाव सहज। विस्तारला ॥ १७ ॥

सगळ्यांच्या आधी मुळात बीज असते, शेवटीही बीजच राहते. मध्ये जळरूपाने नाना पत्री, पुष्पे, फळे, या रूपानेही बीजच विस्तारलेले असते. याप्रकारे त्या बीजाचाच हा सर्व स्वाभाविक (सहज) विस्तार असतो. (१७)

मुळामधील ज्या गोष्टी। सांगताहे बीजसृष्टी।
जेथील अंश तेथें कष्टी। न होतां जातो ॥ १८ ॥

मुळात काय आहे हेच बीजापासून झालेली पाने, फळे इत्यादी बीजांमध्ये दिसत नसूनही प्रगट करीत असतात. काहीही कष्ट न पडता जिथला जो अंश असतो, तेथे तो व्यवस्थितपणे जातो. (१८)

जातो येतो पुन्हां जातो। ऐसा प्रत्यावृत्ति करितो।
परंतु आत्मज्ञानी जो, तो-। अन्यथा न घडे ॥ १९ ॥

याप्रमाणे जीव जातो, येतो, पुन्हा जातो याप्रमाणे येरझारा करीतच असतो. परंतु जो आत्मज्ञानी असतो, तो मात्र जन्ममृत्यू असणारा असा होत नाही. (१९)

न घडे ऐसें जरी म्हणावें। तरी कांहींतरी लगे जाणावें।
अंतरींच परी ठावें। सकळांस कैंचें ॥ २० ॥

आत्मज्ञानाच्या बाबतीत असे घडत नाही असे जरी आपण म्हटले, तरी त्यालाही काहीतरी म्हणजे सतत अनुसंधानादी करावेच लागते. हे ज्याचे त्याला अंतर्यामी माहीत असते, पण सर्वांना ते कसे कळणार? (२०)

तेणेंसींच कार्यभाग करिती। परंतु तयास नेणती।
दिसेना ते काये करिती। बापुडे लोक ॥ २१ ॥

अंतरात्म्याच्या बळावरच सर्व लोक कार्यभाग करीत असतात, तरी ते त्याला जाणत नाहीत. पण लोक तरी बिचारे काय करणार? कारण तो तर दिसत नाही! (२१)

विषयभोग तेणेंचि घडे। तेणेंविण कांहींच न घडे।
स्थूळ सांडून सूक्ष्मीं पवाडे। ऐसा पाहिजे ॥ २२ ॥

प्राणी अंतरात्म्यामुळेच विषयभोग घेऊ शकतात. त्याच्याशिवाय तर काहीच घडू शकत नाही. म्हणून स्थूल देहास सोडून सूक्ष्माचा विचार केला पाहिजे. (२२)

जें आपलेंचि अंतर। तद्रुपचि जगदांतर।
शरीरभेदाचे विकार। वेगळाले ॥ २३ ॥

जो आपल्या अंतरी आहे, तोच जगाच्या अंतरी आहे. दोन्हीकडे अंतरात्मा एकच आहे. शरीरभेदामुळे तो वेगळा दिसतो. (२३)

आंगोळीची आंगोळीस वेधना। येकीची येकीस कळेना।
हात पाये अवेव नाना। येणेंचि न्यायें ॥ २४॥

एका बोटाचे दु:ख त्या बोटालाच फक्त जाणवते. दुसऱ्या बोटाला ते कळत नाही. हातपाय इत्यादी अवयवांचेही तसेच आहे. (२४)

अवेवाचें अवेव नेणे। मा तो परांचें काये जाणे।
परांतर याकारणें। जाणवेना ॥ २५॥

एका अवयवाचे दु:ख दुसऱ्या अवयवालाही कळत नाही, तेथे दुसऱ्या माणसाचे काय जाणवणार? म्हणून लोकांचे अंत:करणही याप्रकारेच जाणता येत नाही. (२५)

येकाचि उदकें सकळ वनस्पती। नाना अग्रेभेद दिसती।
खुडिलीं तितुकींच सुकती। येर ते टवटवीत ॥ २६॥

एकाच पाण्याने सर्व वनस्पतींचे पोषण होते. अंकुर फुटल्यावर वनस्पतींतला भेद कळून येतो. त्यांचा जेवढा भाग खुडावा, तेवढाच फक्त सुकतो. न खुडलेला टवटवीत राहतो. (२६)

येणेंचि न्यायें भेद जाला। कळेना येकाचें येकाला।
जाणपणें आत्मयाला। भेद नाहीं ॥ २७॥

या न्यायानेच वस्तू-वस्तूत भेद उत्पन्न झाला. एकाचे दुसऱ्याला कळत नाही, पण जाणीवरूपाने आत्म्यामध्ये (अंतरात्म्यामध्ये) भेद नाही. (२७)

आत्मत्वीं भेद दिसे। देहप्रकृतीकरितां भासे।
तरी जाणतचि असे। बहुतेक ॥ २८॥

आत्म्याच्या ठिकाणी जो भेद दिसतो, तो देहाच्या प्रकृतीमुळे दिसतो. प्रत्येकाच्या ठायी दिसणारा वेगळेपणा हा देहस्वभावामुळे होय, हे बहुतेकांना माहीत असते. (२८)

देखोन ऐकोन जाणती। शाहाणे अंतर परीक्षिती।
धूर्त ते अवघेंच समजती। गुप्तरूपें ॥ २९॥

बहुतेक लोक पाहून आणि ऐकून जाणतात, पण शहाणे असतात, ते अंतरंगाची परीक्षा करून जाणतात. धूर्त लोक सर्वच जाणतात, पण गुप्तरूपाने म्हणजे उघड बोलून दाखवत नाहीत. (२९)

जो बहुतांचें पाळण करी। तो बहुतांचें अंतर विवरी।
धूर्तपणें ठाऊकें करी। सकळ कांहीं ॥ ३०॥

जो अनेकांचे पालन करतो, अनेकांचे अंतरंग तपासून पाहतो त्याला धूर्तपणामुळे सगळे काही ठाऊक होते. (३०)

आधीं मनोगत पाहाती। मग विश्वास धरिती।
प्राणीमात्र येणें रिती। वर्तताहे ॥ ३१॥

लोक दुसऱ्याचे मनोगत आधी जाणून घेतात आणि मग त्याच्यावर विश्वास ठेवतात. सर्व प्राणिमात्र या पद्धतीने वागत असतात. (३१)

स्मरणामागें विस्मरण। रोकडी प्रचित प्रमाण।
आपलें ठेवणें आपण। चुकताहे ॥ ३२॥

स्मरणानंतर विस्मरण होतच असते याची रोकडी प्रचीती सर्वांना येत असते. त्यामुळे आपलीच वस्तू आपल्याला आठवत नाही. (३२)

आपलेंच आपणा स्मरेना। बोलिलें तें आठवेना।
उठती अनंत कल्पना। ठाउक्या कैंच्या ॥ ३३॥

आपलीच वस्तू आपल्याला आठवत नाही. आपण काय बोललो तेही आठवत नाही. त्यामुळे मनात अनंत कल्पना उठत असतात. पण त्या कशा लक्षात राहणार? (३३)

ऐसें हें चंचळ चक्र। कांहीं नीट कांहीं वक्र।
जाला रंक अथवा शक्र। तरी स्मरणास्मरणें ॥ ३४॥

असे हे स्मरण-विस्मरणाचे चक्र सारखे सुरू असते. त्यात काही सरळ असते, काही वाकडे असते. रंक असो वा इंद्र असो, कुणालाही स्मरण-विस्मरण हे होतच असते. (३४)

स्मरण म्हणिजे देव। विस्मरण म्हणिजे दानव।
स्मरणविस्मरणें मानव। वर्तती आतां ॥ ३५॥

स्मरण म्हणजे देव. तर दानव हे विस्मरणरूप आहेत. मानवांत हे दोन्ही प्रकार असतात, म्हणजे कधी स्मरण तर कधी विस्मरण असा प्रकार त्यांच्या जीवनात दिसून येतो. (३५)

म्हणोनि देवी आणि दानवी। संपत्ति द्विधा जाणावी।
प्रचित मानसीं आणावी। विवेकेंसहित ॥ ३६॥

म्हणूनच मानवी संपत्ती ही दोन प्रकारची असते. दैवी प्रकृतीची अथवा दानवी स्वरूपाची. विवेकाने आपल्या मनात याची प्रचीती पाहावी. (३६)

विवेकें विवेक जाणावा। आत्म्यानें आत्मा वोळखावा।
नेत्रें नेत्रचि पाहावा। दर्पणींचा ॥ ३७॥

विवेकाने सारासारविवेक जाणावा. अंतरात्म्याने आत्मा ओळखावा. आपल्या डोळ्यांनीच आरशातील डोळा पहावा. (३७)

स्थूळें स्थूळ खाजवावें। सूक्ष्में सूक्ष्म समजावें।
खुणेनें खुणेसी बाणावें। अंतर्यामीं ॥ ३८॥

स्थूलाने स्थूल खाजवावे. सूक्ष्माने सूक्ष्म जाणून घ्यावे. खुणेनेच अंतर्यामी खूण बाणून घ्यावी. (३८)

विचारें जाणावा विचार। अंतरें जाणावें अंतर।
अंतरें जाणावें परांतर। होउनियां ॥ ३९॥

विचाराने दुसऱ्याच्या मनातील विचार जाणावा. आपल्या अंतरंगावरून लोकांचे अंतरंग जाणावे. दुसऱ्याच्या अंतरंगाशी समरस होऊन ते जाणून घ्यावे. (३९)

स्मरणामाजी विस्मरण। हेंचि भेदाचें लक्षण।
येकदेसी परिपूर्ण। होत नाहीं ॥ ४०॥

अंतरात्मा सर्वत्र आहे या स्मरणाचे विस्मरण होऊन मी, तू इत्यादी भेद निर्माण होतो. हा भेद एकदेशीसापेक्ष असल्याने तो परिपूर्ण म्हणजे खरा नव्हे. (४०)

पुढें सिके मागें विसरे। पुढें उजेडे मागें अंधारें।
पुढें स्मरे मागें विस्मरे। सकळ कांहीं ॥ ४१॥

पुढचे शिकतो पण मागचे विसरतो. पुढे उजेड असतो पण मागे अंधार असतो. माणूस पुढचे स्मरतो आणि मागचे सर्व काही विसरतो अशी त्याची स्थिती असते. (४१)

तुर्या जाणावी स्मरण। सुषुप्ति जाणावी विस्मरण।
उभयेता शरीरीं जाण। वर्तती आतां ॥ ४२॥

तुर्यावस्था म्हणजे स्मरण असे जाणावे तर सुषुप्ती अवस्था म्हणजे विस्मरण होय. ह्या दोन्ही अवस्था माणसांच्या देहांत राहतात. (४२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अधोर्ध्वनिरूपणनाम' समास सातवा समाप्त.**



## दशक १५ : समास ८

## सूक्ष्मजीवनिरूपण

॥ श्रीराम ॥

रेणूहून सूक्ष्म किडे। त्यांचें आयुष्य निपटचि थोडें।
युक्ति बुद्धि तेणेंचि पाडें। तयामध्यें ॥ १॥

या सृष्टीमध्ये रेणूहूनही सूक्ष्म असे कित्येक किडे आहेत. त्यांचे आयुष्य अगदीच थोडे असते आणि त्यांच्यामध्ये त्या प्रमाणातच अत्यंत अल्प बुद्धी असते. (१)

ऐसे नाना जीव असती। पाहों जातां न दिसती।
अंत:कर्णपंचकाची स्थिती। तेथेंहि आहे ॥ २॥

असे अनेक जीव इतके सूक्ष्म असतात की त्यांना पाहू जाता ते डोळ्यांना दिसत नाहीत. परंतु अंत:करणपंचकाची स्थिती त्यांच्या ठिकाणीही असते. (२)

त्यांपुरतें त्यांचें ज्ञान। विषये इंद्रियें समान।
सूक्ष्म शरीरें विवरोन। पाहातो कोण ॥ ३॥

त्यांच्यापुरतेच त्यांचे ज्ञान असते. त्यांची इंद्रिये आणि विषयभोग हेही समानच असतात. पण सूक्ष्म शरीराचे विवरण कोण करणार? (३)

त्यास मुंगी माहाथोर। नेणों चालिला कुंजर।
मुंगीस मुताचा पूर। ऐसें बोलती ॥ ४॥

ते जीव इतके सूक्ष्म असतात की त्यांना मुंगीही फार विशाल वाटते. जणू एखादा हत्तीच चालला आहे असे त्यांना वाटते. पण आपल्या दृष्टीने मुंगी इतकी लहान आहे की 'मुंगीला मुताचा पूर' अशी म्हणच पडली आहे. (४)

तें मुंगीसमान शरीरें। उदंड असती ल्हानथोरें।
समस्तांमध्यें जीवेश्वरें। वस्ति कीजे ॥ ५॥

त्या मुंगीप्रमाणे लहान-मोठी असंख्य शरीरे आहेत आणि त्या सर्व शरीरात जीवरूपी ईश्वराने (अंतरात्म्याने) वस्ती केलेली आहे. (५)

ऐसिया किड्यांचा संभार। उदंड दाटला विस्तार।
अत्यंत साक्षपी जो नर। तो विवरोन पाहे ॥ ६॥

असे किड्यांचे समुदाय या पृथ्वीवर अपार दाटलेले आहेत. जो यत्नशील आणि विचारी माणूस असतो, तोच त्यांचेसंबंधी विवरण करून सत्य जाणून घेतो. (६)

नाना नक्षत्रीं नाना किडे। त्यांस भासती पर्वतायेवढे।
आयुष्यहि तेणेंचि पाडें। उदंड वाटे ॥ ७॥

नाना नक्षत्रांच्या ठिकाणीही नाना प्रकारचे किडे असतात. ते आकाराने पर्वताएवढे भासतात. त्यांचे आयुष्यही त्या प्रमाणात फारच दीर्घ असते. (७)

पक्षायेवढें ल्हान नाहीं। पक्षायेवढें थोर नाहीं।
सर्प आणि मछ पाहीं। येणेंचि पाडें ॥ ८॥

अत्यंत ल्हान पक्षी असतात त्याप्रमाणे खूप मोठेही पक्षी असतात. सर्प आणि मासे यांचेही असेच आहे. (८)

मुंगीपासून थोरथोरें। चढती वाढती शरीरें।
त्यांचीं निर्धारितां अंतरें। कळों येती ॥ ९॥

मुंगीपासून एकाहून एक मोठी, चढती-वाढती शरीरे आहेत. नीट विचार केला की, त्यांचे अंतरंगही कळून येते. (९)

नाना वर्ण नाना रंग। नाना जीवनाचे तरंग।
येक सुरंग येक विरंग। किती म्हणौनि सांगावे ॥ १०॥

त्यामध्ये नाना वर्ण, नाना रंग असतात. जीवनाचे नाना प्रकारचे तरंग म्हणजे जीवनपद्धती असतात. काहींचे रंग सुंदर असतात. काहींचे रंग घाणेरडे असतात. किती म्हणून सांगावे? (१०)

येकें सकुमारें येकें कठोरें। निर्माण केलीं जगदेश्वरें।
सुवर्णासारिखीं शरीरें। दैदिप्यमानें ॥ ११॥

एखाद्या प्राण्याचे शरीर अत्यंत कोमल असते, तर एखाद्याचे फार कठीण असते. तर कुणाचे सोन्यासारखे चकचकीत असते. जगदीश्वरानेच अशी ही वेगवेगळ्या प्रकारची शरीरे निर्माण केली आहेत. (११)

शरीरभेदें आहारभेदें। वाचाभेदें गुणभेदें।
अंतरीं वसिजे अभेदें। येकरूपें ॥ १२॥

त्या प्राण्यांच्या शरीरांत अनेक भेद आहेत. त्यांच्या आहारांतही नाना भेद आहेत. वाचेमध्ये आणि गुणांमध्येही भरपूर भेद आहेत. पण त्या सर्वांच्या अंतरात अंतरात्मा सर्वत्र एकच आहे,. (१२)

येक त्रासकें येक मारकें। पाहों जातां नाना कौतुकें।
कितीयेक आमोलिकें। सृष्टीमध्यें ॥ १३॥

एखादा प्राणी त्रासणारा असतो, दुसरा एखादा मारणारा असतो. या सृष्टीमध्ये असे कित्येक अमोलिक चमत्कार पाहावयास मिळतात. (१३)

ऐसीं अवघीं विवरोन पाहे। ऐसा प्राणी कोण आहे।
आपल्यापुरतें जाणोन राहे। किंचितमात्र ॥ १४॥

या सर्वांचे विवरण करून पाहील, असा कोण प्राणी या जगात आहे? प्रत्येक जण आपापल्यापुरते थोडेसे जाणून घेतो. (१४)

नवखंड हे वसुंधरा। सप्तसागरांचा फेरा।
ब्रह्मांडाबाहेरील नीरा। कोण पाहे ॥ १५॥

ही पृथ्वी नवखंड असून तिच्याभोवती सप्त सागरांचा वेढा आहे. त्या ब्रह्मांडाबाहेर जे पाणी आहे, ते कोण पाहातो? (१५)

त्या नीरामध्यें जीवअसती। पाहों जातां असंख्याती।
त्या विशाळ जीवांची स्थिती। कोण जाणे ॥ १६॥

त्या पाण्यातही जीव असतात व ते असंख्य आणि विशाल असतात. त्या जीवांची स्थिती कोण जाणणार? (१६)

जेथें जीवन तेथें जीव। हा उत्पत्तीचा स्वभाव।
पाहातां याचा अभिप्राव। उदंड असे ॥ १७॥

जेथे जल असते तेथे तेथे जीव असतात. हा उत्पत्तीचा स्वभावच आहे. याचा अभिप्राय पाहायला गेलो, तर तो उदंडच आहे. (१७)

पृथ्वीगर्भीं नाना नीरें। त्या नीरामध्यें शरीरें।
नाना जिनस ल्हानथोरें। कोण जाणे ॥ १८॥

पृथ्वीच्या पोटातही अनेक जलाशय आहेत. त्या पाण्यामध्येही अनेक शरीरे, अनेक लहान-मोठे पदार्थ इत्यादी आहेत. त्यांना कोण जाणू शकेल? (१८)

येक प्राणी अंतरिक्ष असती। तेंही नाहीं देखिली क्षिती।
वरीच्यावरी उडोन जाती। पक्ष फुटल्यानंतरें ॥ १९॥

काही प्राणी अंतरिक्षात असतात. त्यांनी कधी पृथ्वीच पाहिलेली नसते. त्यांना पंख फुटल्यावर ते वरच्यावरच उडून जातात. (१९)

नाना खेचरें आणि भूचरें। नाना वनचरें आणि जळचरें।
चौऱ्यासि योनीप्रकारें। कोण जाणे ॥ २०॥

आकाशात संचार करणारे नाना प्राणी, कित्येक पृथ्वीवर हिंडणारे प्राणी, तर कित्येक जंगलात राहाणारे प्राणी असतात. काही प्राणी पाण्यातच विहार करणारे असतात. अशा या चौऱ्यांऐंशी लक्ष योनींच्या प्रकारांना कोण जाणू शकेल? (२०)

उष्ण तेज वेगळें करूनी। जेथें तेथें जीवयोनी।
कल्पनेपासुनी होती प्राणी। कोण जाणे ॥ २१ ॥

फक्त अग्नी सोडून जेथे तेथे जीवयोनी उत्पन्न होतात. काही प्राणी तर कल्पनेपासून उत्पन्न होतात. त्यांना कोण जाणू शकेल? (२१)

येक नाना सामर्थ्यें केलें। येक इच्छेपासून जाले।
येक शब्दासरिसे पावले। श्रापदेह ॥ २२ ॥

काही आपल्या योगसामर्थ्याने प्राणी उत्पन्न करतात, काही इच्छामात्रे करून होतात, तर काही शापांच्या शब्दोच्चाराबरोबर शापदेह धारण करतात. (२२)

येक देह बाजीगरीचे। येक देह वोडंबरीचे।
येक देह देवतांचे। नाना प्रकारें ॥ २३ ॥

काही देह बाजीगरीचे तर काही देह वोडंबरीचे, तर काही नाना प्रकारच्या देवतांचे असतात. (२३)

येक क्रोधापासून जाले। येक तपापासून जन्मले।
येक उश्रापें पावले। पूर्वदेह ॥ २४ ॥

काही देहांची उत्पत्ती क्रोधापासून होते, तर काहींची तपापासून होते, तर काही जणांना उ:शापामुळे आपापले पूर्वदेह प्राप्त होतात. (२४)

ऐसें भगवंताचें करणें। किती म्हणौन सांगणें।
विचित्र मायेच्या गुणें। होत जातें ॥ २५ ॥

असे हे भगवंताचे करणे अलौकिक आहे. त्याचे किती वर्णन करणार? मायेच्या योगाने असे हे सर्व विचित्र विचित्र होत जाते. (२५)

नाना अवघड करणी केली। कोणीं देखिली ना ऐकिली।
विचित्र कळा समजली। पाहिजे सर्वे ॥ २६ ॥

मायेने ही अशी विलक्षण आणि अवघड जी करणी केली आहे, तशी कधी कुणी ऐकलेली नाही किंवा पाहिलेलीही नाही. ही मायेची विचित्र कला सर्व नीट जाणून घेणे आवश्यक आहे. (२६)

थोडें बहुत समजलें। पोटापुरती विद्या सिकलें।
प्राणी उगेंच गर्वे गेलें। मी ज्ञाता म्हणौनी ॥ २७ ॥

एखाद्याला थोडे फार कळले, पोटापुरती विद्या तो शिकला तरी त्याला 'मी ज्ञाता' असा गर्व होऊन तो वाया जातो. (२७)

ज्ञानी येक अंतरात्मा। सर्वांमधें सर्वात्मा।
त्याचा कळवया महिमा। बुद्धि कैंची ॥ २८ ॥

सर्वांच्या अंतर्यामी असणारा सर्वात्मा, म्हणजे एक अंतरात्माच खरा ज्ञानी होय. पण त्याचा महिमा कळेल अशी बुद्धी कुणाला आहे? (२८)

सप्तकंचुक ब्रह्मांड। त्यांत सप्तकंचुक पिंड।
त्या पिंडामधें उदंड। प्राणी असती ॥ २९ ॥

पंचमहाभूते, अहंकार आणि महत्तत्त्व या सात वेष्टणांचे ब्रह्मांड असते आणि त्यात सात आवरणांनी युक्त पिंड असतो. त्या पिंडातही उदंड प्राणी असतात. (२९)

आपल्या देहांतील न कळे। मा तें अवघें कैंचें कळे।
लोक होती उतावळे। अल्पज्ञानें ॥ ३० ॥

माणसाला आपल्या देहात काय काय आहे हेही नीट कळत नाही, तर मग सर्व सृष्टीतील जीवांचे ज्ञान कसे असणार? पण अज्ञानी लोक अल्पज्ञानाने उतावळे होतात. (३०)

अनुरेणाऐसे जिनस। त्यांचे आम्ही विराट पुरुष।
आमचें उदंडचि आयुष्य। त्यांच्या हिसेबें ॥ ३१ ॥

अणूरेणूएवढे अत्यंत सूक्ष्म जीव असतात, त्यांना आपण मनुष्य म्हणजे विराट पुरुषाप्रमाणे भासतो. त्यांच्या हिशोबाने आपले आयुष्यही त्यांना दीर्घच वाटते. (३१)

त्यांच्या रिती त्यांचे दंडक। वर्तायाचे असती अनेक।
जाणे सर्वहि कौतुक। ऐसा कैंचा ॥ ३२ ॥

त्यांच्या आचरणाचे नियम, त्यांच्या पद्धती, वगैरे निरनिराळ्या प्रकारचे असते. हे सर्व कौतुक जाणू शकेल असा कोण आहे? (३२)

धन्य परमेश्वराची करणी। अनुमानेना अंत:करणीं।
उगीच अहंता पापिणी। वेढा लावी ॥ ३३ ॥

खरोखरच परमेश्वराची करणी अद्भुत, धन्य, अलौकिक अशीच आहे. कितीही कल्पना केली तरी अंत:करणात तिचे ज्ञान होऊ शकत नाही. पण अहंतारूपी पापीण माणसाला उगीच गुंतवून ठेवते. (३३)

अहंता सांडून विवरणें। कित्येक देवाचें करणें।
पाहातां मनुष्याचें जिणें। थोडें आहे ॥ ३४ ॥

देवाची जी कित्येक करणी आहे, तिचे अहंता सोडून विवरण केले पाहिजे. मनुष्याचे आयुष्य इतके थोडे अल्प आहे की विवरण करण्यास ते पुरणार नाही. (३४)

थोडें जिणें अर्धपुडीकाया। गर्व करिती रडाया।
शरीर आवघें पडाया। वेळ नाहीं ॥ ३५॥

आयुष्य अत्यंत थोडे आणि क्षणभंगुर देह तरी गर्व करतात आणि रडतात. शरीर पडायला जराही वेळ लागत नाही. (३५)

कुश्चीळ ठाइ जन्मलें। आणि कुश्चीळ रसेंचि वाढलें।
यास म्हणती थोरलें। कोण्या हिसेबें ॥ ३६॥

घाणेरड्या जागी देह जन्मतो, तो घाणेरड्या रसानेच वाढतो आणि या देहाला थोर म्हणतात, ते कोणत्या हिशोबाने? (३६)

कुश्चीळ आणि क्षणभंगुर। अखंड वेथा चिंतातुर।
लोक उगेच म्हणती थोर। वेडपणें ॥ ३७॥

देह अत्यंत अपवित्र आणि क्षणभंगुर असतो. त्याला अखंड निरनिराळ्या व्यथा भोगाव्या लागतात, मनातही तो सदैव चिंतातुर असतो आणि तरी लोक याला वेडेपणाने थोर म्हणतात. (३७)

काया माया दों दिसांची। आदिअंतीं अवघी ची ची।
झांकातापा करून उगीचि। थोरीव दाविती ॥ ३८॥

देह आणि संपत्ती फक्त काही दिवसांपुरतीच असतात. जन्ममृत्युसमयी (आधी आणि अंती) सर्व फजितीच असते. उगीच वस्त्राने झाकपाक करून देहाचा मोठेपणा मिरवितात. (३८)

झांकिलें तरी उपंढर पडे। दुर्गंधी सुटे जिकडे तिकडे।
जो कोणी विवेकें पवाडे। तोचि धन्य ॥ ३९॥

मरणकाळी झाकून ठेवला तरी देह उघडा पडतो आणि त्यामुळे सर्वत्र दुर्गंधी सुटते. जो कोणी विवेकाने ज्ञानसंपन्न होतो, तोच धन्य होय. (३९)

उगेंचि कायसा तंडावें । मोडा अहंतेचे पुंडावे ।
विवेकें देवास धुंडावें। हें उत्तमोत्तम ॥ ४०॥

उगीचच भांडणतंटा कशाला करावा? अहंतेचे बंड मोडून काढावे आणि विवेकाने देवाचा शोध घ्यावा, हेच उत्तमोत्तम होय. (४०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूक्ष्मजीवनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १५ : समास ९

## पिंडोत्पत्ती

॥ श्रीराम ॥

चौंखाणीचे प्राणी असती। अवघे उदकेंचि वाढती।
ऐसे होती आणी जाती। असंख्यात ॥ १॥

चारी खाणींचे जे प्राणी असतात, ते सर्व उदकाच्या योगानेच वाढतात. असे असंख्य प्राणी होतात उपजतात आणि मरतात. (१)

तत्त्वांचें शरीर जालें। अंतरात्म्यासगट वळलें।
त्यांचे मूळ जों शोधिलें। तों उदकरूप ॥ २॥

सर्व प्राण्यांचे शरीर हे अंतरात्म्यासह तत्त्वांचे झालेले असते. त्याचे मूळ शोधले की, ते उदकरूप आहे हे कळून येते. (२)

शरत्काळींचीं शरीरें। पीळपीळों झिरपती नीरें।
उभये रेतें येकत्रें। मिसळती रक्तीं ॥ ३॥

शरत्काली घामरूपाने जसे सर्वांगातून पाणी झिरपते, त्याप्रमाणे सर्वांगाचे सारभूत असे पुरुषवीर्य आणि स्त्रीरेत ही रक्तात एकत्र मिसळतात. (३)

अन्नरस देहरस। रक्तरेतें बांधे मूस।
रसद्वयें सावकास। वाढों लागे ॥ ४॥

अन्नरस, देहरस, रक्त आणि रेत यांची मूस तयार होते आणि दोन्ही रसांच्या योगे शरीर सावकाश वाढू लागते. (४)

वाढतां वाढतां वाढलें। कोमळाचें कठीण जालें।
पुढें उदक पैसावलें। नाना अवेवीं ॥ ५॥

ते वाढता वाढता कोमल असलेले हळूहळू कठीण होते. नंतर उदकामुळेच नाना अवयव वगैरे विस्तार होतो. (५)

संपूर्ण होतां बाहेरी पडे। भूमीस पडतां मग तें रडे।
अवघ्याचें अवघेंच घडे। ऐसें आहे ॥ ६॥

संपूर्ण वाढ झाली की ते बाहेर पडते आणि भूमीवर पडले की रडू लागते. सर्व प्राण्यांच्या बाबतीत सर्व असेच घडत असते. (६)

कुडी वाढे कुबुद्धि वाढे। मुळापासून अवघेंचि घडे।
अवघेंचि मोडे आणि वाढे। देखतदेखतां ॥ ७॥

कुडी म्हणजे शरीर वाढू लागते, तशी कुबुद्धी वाढू लागते. मुळापासूनच सर्व उत्पन्न होते. सर्वच मोडते आणि पाहता पाहता वाढते. (७)

पुढें अवघियांचें शरीर। दिवसेंदिवस जालें थोर।
सुचों लागला विचार। कांहीं कांहीं ॥ ८॥

पुढे सर्वांचेच शरीर वाढू लागून दिवसेंदिवस मोठे होऊ लागते आणि मग काही काही विचारही सुचू लागतात. (८)

फळामधें बीज आलें। तेणें न्यायें तेथें जालें।
ऐकतां देखतां उमजलें। सकळ कांहीं ॥ ९॥

फळामध्ये बीज येतेच. त्याच न्यायाने येथेही घडते. ऐकून आणि पाहून सर्व काही समजू लागते. (९)

बीजें उदकें अंकुरती। उदक नस्तां उडोन जाती।
येके ठाईं उदक माती। होतां बरें ॥ १०॥

बीजे असतात ती उदकामुळे अंकुरतात. उदक मिळाले नाही, तर नष्ट होतात. बीजांना माती आणि पाणी दोन्ही एकत्र प्राप्त झाले तर बरे. (१०)

दोहिंमधें असतां बीज। भिजोन अंकुर सहज।
वाढतां वाढतां पुढें रीझ। उदंड आहे ॥ ११॥

माती आणि पाणी या दोन्हीच्या संयोगाने भिजून बीजाला सहजच अंकुर फुटतो. वाढता वाढता पुढे उदंड वाढ होते. (११)

इकडे मुळ्या धावा घेती। तिकडे अग्रें हेलावती।
मुळें अग्र द्विधा होती। बीजापासून ॥ १२॥

इकडे मुळ्या जमिनीकडे धाव घेतात, तर तिकडे अग्रे वाऱ्याने डोलू लागतात. एकीकडे मुळे आणि एकीकडे अग्रे बीजापासून विभागली जातात. (१२)

मुळ्या चालिल्या पाताळीं। अग्रे धांवती अंतराळीं।
नाना पत्रीं पुष्पीं फळीं। लगडलीं झाडें ॥ १३॥

मुळ्या खाली पाताळाकडे जातात, तर अग्रे आकाशाकडे धावतात. आणि नाना पाने, फुले आणि फळे यांनी झाडे लगडून जातात. (१३)

फळांवडिल सुमनें। सुमनांवडिल पानें।
पानांवडिल अनुसंधानें। काष्ठें आवघीं ॥ १४॥

फळांच्या पूर्वी फुले येतात, फुलांच्या आधी पाने येतात. पानांच्यापेक्षा वडील म्हणजे आधी सर्व लाकडे उत्पन्न होतात. (१४)

काष्ठांवडिल मुळ्या बारिक। मुळ्यांवडिल तें उदक।
उदक आळोन कौतुक। भूमंडळाचें ॥ १५॥

काष्ठापूर्वी मुळ्या अगदी बारीक अशा उत्पन्न झालेल्या असतात. मुळ्यांपेक्षा उदक वडील म्हणजे श्रेष्ठ होय. कारण उदक आळूनच या पृथ्वीवरील सर्व प्राणी, पदार्थ उत्पन्न होतात. (१५)

याची ऐसी आहे प्रचिती। तेव्हां सकळांवडिल जगती।
जगतीवडिल मूर्ती। आपोनारायेणाची ॥ १६॥

या सर्व अनुभवावरून या जगात सर्वांत आधी उत्पन्न झाल्याने वडील व श्रेष्ठ कोण असेल तर आपोनारायण होय. (१६)

तयावडिल अग्निदेव। अग्नीवडिल वायेदेव।
वायेदेवावडिल स्वभाव। अंतरात्म्याचा ॥ १७॥

त्याला वडील अग्निदेव आहे. त्या अग्निदेवाहून वायुदेव वडील आहे आणि त्या वायुदेवापेक्षा स्वाभाविकच अंतरात्मा वडील (श्रेष्ठ) आहे. (१७)

सकळांवडिल अंतरात्मा। त्यासि नेणे तो दुरात्मा।
दुरात्मा म्हणिजे दुरीआत्मा। अंतरला तया ॥ १८॥

म्हणून सर्वांना वडील, सर्वांहून श्रेष्ठ जो अंतरात्मा, त्याला जो जाणत नाही, तो दुरात्मा होय. दुरात्मा म्हणजे ज्याला आत्मा दुरावला, अंतरला, तो होय. (१८)

जवळी असोन चुकलें। प्रत्ययास नाहीं सोकलें।
उगेंचि आलें आणी गेलें। देवाचकरितां ॥१९॥

जवळ असून ते अंतरात्म्यास ओळखण्यास चुकले. त्यांनी अनुभवाची सवय लावून घेतली नाही. उगाच जन्मले आणि मेले, तेही अंतरात्म्यामुळेच होय. (१९)

**म्हणौन सकळांवडिल देव। त्यासी होतां अनन्यभाव।**
**मग हे प्रकृतीचा स्वभाव। पाल्टों लगे ॥ २०॥**

म्हणून सकळांहून श्रेष्ठ अशा अंतरात्म्याशी अनन्य झाले म्हणजे देहस्वभाव पालटू लागून बाहेरच्या विषयांचे आकर्षण कमी होऊ लागते आणि माणूस जास्तच अंतर्मुख होऊ लागतो. (२०)

**करी आपुला व्यासंग। कदापि नव्हे ध्यानभंग।**
**बोलणें चालणें वेंग। पडोंच नेदी ॥ २१॥**

आपला जो व्यासंग, व्यवसाय असेल तो करावा, पण ध्यानाभ्यास कधी खंडित होऊ देऊ नये. त्यामुळे बोलणे-चालणे यात काहीच फरक पडत नाही. (२१)

**जें वडिलीं निर्माण केलें। तें पाहिजे पाहिलें।**
**काये काये वडिलीं केलें। किती पाहावें ॥ २२॥**

जे वडिलांनी निर्माण केले असेल, ते पाहिलेच पाहिजे. वडिलांनी काय काय केले ते किती म्हणून पाहावे? (२२)

**तो वडिल जेथें चेतला। तोचि भाग्यपुरुष जाला।**
**अल्पचेतनें तयाला। अल्पभाग्य ॥ २३॥**

तो अंतरात्मा जेथे जागृत होतो, तो पुरुष भाग्यवान ठरतो. जो थोडासाच अंतरात्म्यास जाणतो, त्याला थोडासाच लाभ होतो. (२३)

**तया नारायेणाला मनीं। अखंड आठवावें ध्यानीं।**
**मग ते लक्ष्मी तयापासुनी। जाईल कोठें ॥ २४॥**

त्या नारायणाला ध्यानीमनी अखंड आठवावे. मग त्याचीच असलेली लक्ष्मी त्याच्यापासून दूर जाईल तरी कोठे? (२४)

**नारायेण असे विश्वीं। त्याची पूजा करीत जावी।**
**याकारणें तोषवावी। कोणीतरी काया ॥ २५॥**

नारायण सर्व विश्वात भरून राहिलेला आहे. त्याची पूजा नेहमी करावी. त्यासाठीच कोणाचीही का होईना काया तोषवावी. देहाची सेवा करावी. ती नारायणाला पोहोचते. (२५)

**उपासना शोधून पाहिली। तों ते विश्वपाळिती जाली।**
**न कळे लीळा परीक्षिली। न वचे कोणा ॥ २६॥**

उपासना म्हणजे काय याचा शोध घेतला, तेव्हा उपासना म्हणजे विश्वरूप अंतरात्म्याची सेवा असे कळून आले. त्या अंतरात्म्याची लीला परीक्षा केल्याशिवाय कुणाला कळत नाही. (२६)

**देवाची लीळा देवेंविण। आणीक दुसरा पाहे कोण।**
**पाहाणें तितुकें आपण। देवचि असे ॥ २७॥**

देवाची लीला देवाशिवाय दुसरा कोण पाहू शकेल? पाहिल्यावर कळते की आपण तो देवच होय. (२७)

**उपासना सकळां ठाईं। आत्माराम कोठें नाहीं।**
**याकारणें ठाईं ठाईं। रामे आटोपिलें ॥ २८॥**

या विश्वात सर्व त्याचीच उपासना चालते. आत्माराम कोठे नाही असे नाही. सर्व जागी तोच आत्माराम भरून राहिलेला आहे. त्यामुळे त्याचीच सत्ता ठायीठायी चालताना दिसते. (२८)

**ऐसी माझी उपासना। आणितां नये अनुमाना।**
**नेऊन घाली निरंजना। पैलिकडे ॥ २९॥**

माझी उपासना ही अशी आहे. तिच्या व्यापकतेचे अनुमान बुद्धीला होत नाही. तिच्या योगे साधक निरंजनाच्याही पलीकडे जाऊन पोहोचतो. (२९)

**देवाकरितां कर्मे चालती। देवाकरितां उपासक होती।**
**देवाकरितां ज्ञानी असती॥ कितियेक ॥ ३०॥**

अंतरात्म्यामुळेच सर्व कर्मे चालतात. अंतरात्म्यामुळेच उपासक उपासना करतात. अंतरात्म्यामुळेच कित्येक ज्ञानी होतात. (३०)

**नाना शास्त्रें नाना मतें। देवचि बोलिला समस्तें।**
**नेमकांनेमक वेस्तावेस्तें। कर्मानुसार ॥ ३१॥**

नाना शास्त्रे, नाना मते. देव म्हणजे अंतरात्म्यानेच सर्व काही केले आहे. कर्मानुसार जो तो चांगला अथवा वाईट अर्थ लावतो. (३१)

**देवास अवघें लागे करावें। त्यांत घेऊं ये तितुकें घ्यावें।**
**अधिकारासारिखें चालवें। म्हणिजे बरें ॥ ३२॥**

वंद्य, निंद्य सर्व देवानेच केले असले तरी त्यातून योग्य तेच घ्यावे. आपापल्या योग्यतेनुसार चालावे म्हणजे बरे. (३२)

**आवाहन विसर्जन। ऐसेंचि बोलिलें विधान।**
**पूर्वपक्ष जाला येथून। सिद्धांत पुढें ॥ ३३॥**

उभारणी आणि संहारणी म्हणजेच आवाहन आणि विसर्जन असाच पूजनाचा विधी असतो. उपासना अशी द्वैतमय असल्याने ती पूर्वपक्षातच म्हणजे मायेतच येते. आता पुढे सिद्धान्ताचे निरूपण येईल. (३३)

**वेदांत सिद्धांत धादांत। प्रचित प्रमाण नेमस्त।**
**पंचिकर्ण सांडून हित। वाक्यार्थ पाहावा ॥ ३४॥**

वेदांत, सिद्धांत आणि धादांत यांत मुख्य प्रचीतीच निश्चयपूर्वक प्रमाण आहे. पंचीकरणादी उभारणी संहारणीच्या पलीकडे जाऊन महावाक्याचा लक्ष्यार्थ अनुभवावा. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पिंडोत्पत्तीनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक १५ : समास १०

## सिद्धान्तनिरूपण

॥ श्रीराम ॥

**गगनीं अवघेंचि होत जातें। गगनाऐसें तगेना तें।**
**निश्चळीं चंचळ नाना तें। येणेंचि न्यायें ॥ १॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, आकाशात अनेक घटना होतात आणि जातात. त्या आकाशासारख्या टिकून राहात नाहीत. त्याचप्रमाणे निश्चळ परब्रह्माच्या ठिकाणी चंचळ येते आणि जाते. (१)

**अंधार दाटला बळें। वाटे गगन जालें काळें।**
**रविकिर्णें तें पिवळें। सवेंचि वाटे ॥ २॥**

ज्या वेळी आकाशात बळेच अंधार दाटून येतो तेव्हा आकाश काळे झाले असे वाटते. सूर्यकिरण जेव्हा आकाशात पसरतात तेव्हा ते पिवळे झाले असे वाटते. (२)

**उदंड हिंव जेव्हां पडिलें। गमे गगन थंड जालें।**
**उष्ण झळेनें वाळलें। ऐसें वाटे ॥ ३॥**

जेव्हा अतिशय थंडी पडते तेव्हा आकाश थंड झाले आहे असे वाटते. व कडक उन्हामुळे ते जणू वाळून जाते! (३)

**ऐसें जें कांहीं वाटलें। तें तें जाले आणि गेलें।**
**आकाशासारिखें तगलें। हें तों घडेना ॥ ४॥**

असे जे जे वाटते ते येते आणि जाते. पण ते काही आकाशासारखे टिकून राहत नाही. (४)

**उत्तम जाणीवेचा जिनस। समजोन पाहे सावकास।**
**निराभास तें आकाश। भास मिथ्या ॥ ५॥**

उत्तम जाणीव असेल तिलाच हे सावकाश समजते की आकाश हे निराभास असून भास हे मिथ्या आहेत. (५)

**उदक पसरे वायो पसरे। आत्मा अत्यंतचि पसरे।**
**तत्त्वें तत्त्व अवघेंचि पसरे। अंतर्यामीं ॥ ६॥**

उदक सर्वत्र पसरते, वायू सर्वत्र पसरतो, आत्मा तर अत्यंतच पसरतो. तत्त्वे सर्वच व्यापक आहेत. हे अंतर्यामी विचार केला असता कळून येते. (६)

**चळतें आणि चळेना तें। अंतरीं अवघेंच कळतें।**
**विवरणेंचि निवळतें। प्राणीमात्रासी ॥ ७॥**

काय चंचल आणि काय स्थिर नाही हे अंतरात्म्याला सगळेच कळते. प्राणिमात्राने विवरण करून पाहिले की, त्यास सर्व उलगडा होतो. (७)

**विवरतां विवरतां शेवटीं। निवृत्तिपदीं अखंड भेटी।**
**जालियानें तुटी। होणार नाहीं ॥ ८॥**

विवरण करता करता शेवटी निवृत्तिपदाची प्राप्ती होते. निश्चळ परब्रह्माशी अखंड भेट होते आणि मग परत ताटातूट होत नाही. (८)

**जेथें ज्ञानाचें होतें विज्ञान। आणि मनाचें होतें उन्मन।**
**तत्त्वनिर्शनीं अनन्य। विवेकें होतें ॥ ९॥**

अशा प्रकारे आत्मसाक्षात्कार झाला की द्वैत राहातच नाही. ज्ञानाचे विज्ञान होते, मनाचे उन्मन होते आणि सारासारविवेकाने तत्त्वांचे निरसन होऊन जीव परब्रह्माशी अनन्य म्हणजे एकरूप होतो. (९)

**वडिलांस शोधून पाहिलें। तों चंचळाचें निश्चळ जालें।**
**देवभक्तपण गेलें। तये ठाइं ॥ १०॥**

अंतरात्म्याला शोधून पाहिल्यावर चंचळ अंतरात्मा निश्चळ परब्रह्म झाला आणि त्या ठिकाणी देव-भक्तपणाही एकवटला. देव आणि भक्त असे द्वैत उरलेच नाही. (१०)

**ठाव म्हणतां पदार्थ नाहीं। पदार्थमात्र मुळीं नाहीं।**
**जैसें तैसें बोलों कांहीं। कळावया ॥ ११ ॥**

'तेथे' वगैरे (स्थलवाचक) शब्द वापरले खरे, पण तेथे पदार्थमात्र काहीच नाही. जसे सुचले तसे कळण्यासाठी बोलले एवढेच. (११)

**अज्ञानशक्ति निरसली। ज्ञानशक्ति मावळली।**
**वृत्तिसुन्यें कैसी जाली। स्थिती पाहा ॥ १२ ॥**

अज्ञानशक्तीचे निरसन झाले, ज्ञानशक्ती मावळली, म्हणजे तिचा परब्रह्माच्या ठिकाणी लय झाला आणि वृत्ति-शून्य स्थिती प्राप्त झाली. (१२)

**मुख्य शक्तिपात तो ऐसा। नाहीं चंचळाचा वळसा।**
**निवांतीं निवांत कैसा। निर्विकारी ॥ १३ ॥**

सद्गुरुकृपेने शिष्याच्या अंतरीचा चंचळपणा संपूर्ण नष्ट होऊन प्रत्यक्ष ब्रह्मस्वरूप होणे हाच मुख्य शक्तिपात होय असे समर्थ म्हणतात. मुख्य शक्तिपाताच्या ठिकाणी चंचळाचा वळसा म्हणजे भोवरा नाही. तेथे साधक शिष्य निश्चळ निर्विकार अशा परब्रह्माच्या ठायी स्थिर होतो. (१३)

**चंचळाचीं विकार बाल्टें। तें चंचळचि जेथें आटे।**
**चंचळ निश्चळ घनवटे। हें तों घडेना ॥ १४ ॥**

चंचळाच्या विकाराची अग्रे, शाखा, मुख्य चंचळच तेथे नाहीसे झाल्याने शिल्लक उरत नाहीत. चंचळ आणि निश्चळ मिसळणे हे तर कधी घडत नाही. (१४)

**माहावाक्याचा विचारु। तेथें संन्याशास अधिकारु।**
**दैवीकृपेचा जो नरु। तोहि विवरोन पाहे ॥ १५ ॥**

महावाक्याचा विचार करण्याचा अधिकार फक्त संन्याशांनाच असतो किंवा एखाद्यावर दैवी कृपा जर झाली तर मग तोही महावाक्याचे विवरण करू शकतो. (१५)

**संन्यासी म्हणिजे शडन्यासी। विचारवंत सर्व संन्यासी।**
**आपली करणीआपणासी। निश्चयेंसीं ॥ १६ ॥**

संन्यासी म्हणजे जो षड् म्हणजे सहा गोष्टींचा त्याग करतो. (कामक्रोधादी सहा विकारांचा जो त्याग करतो त्यास संन्यासी म्हणावे.) ब्रह्मविचार करणारे सर्व संन्यासीच होत. कारण या विचारात विकारांचा त्यागच आवश्यक असतो. आपण जेवढी साधना करावी तेवढी निश्चयपूर्वक आपल्या उपयोगी पडते. (१६)

**जगदीश वोळल्यावरी। तेथें कोण अनुमान करी।**
**आतां असो हें विचारी। विचार जाणती ॥ १७ ॥**

जगदीश एकदा प्रसन्न झाल्यावर तेथे अनुमान करण्याची काय आवश्यकता आहे? असो. आता हे राहू दे. जे विचारवंत असतात, ते हे विचार जाणतात. (१७)

**जे जे विचारी समजले। ते ते निःसंग होऊन गेले।**
**देहाभिमानी जे उरले। ते देहाभिमान रक्षिती ॥ १८ ॥**

जे जे विवेकी लोक हे सर्व समजले ते ते निःसंग होऊन परब्रह्माशी एकरूप होऊन गेले. देहाभिमानी जे असतात ते देहाभिमानाचेच रक्षण करीत बसतात. (१८)

**लक्षीं बैसलें अलक्ष। उडोन गेला पूर्वपक्ष।**
**हेतुरूपें अंतरसाक्ष। तोहि मावळला ॥ १९ ॥**

ज्याच्या मनात ब्रह्म ठसले त्याच्या बाबतीत पूर्वपक्ष म्हणजे माया उडूनच जाते आणि अंतरात्मा जो हेतुरूप असतो तोही मावळतो. (१९)

**आकाश आणि पाताळ। दोनी नामें अंतराळ।**
**काढितां दृश्याचें चडळ। अखंड जालें ॥ २० ॥**

आकाश आणि पाताळ दोन्ही वास्तविक अंतराळच आहेत. त्यांच्यामध्ये दृश्याचा जो पडदा आहे, तो काढला की ते अखंड होते. (२०)

**तें तों अखंडचि आहे। मन उपाधी लक्षून पाहे।**
**उपाधीनिरासें साहे। शब्द कैसा ॥ २१ ॥**

वास्तविक ते अखंडच आहे पण मन उपाधीकडे पाहून त्यास खंडित मानते. उपाधि निरास झाल्यावर तेथे शब्दही सहन होत नाही. (२१)

**शब्दपर कल्पनेपर। मनबुद्धिअगोचर।**
**विचारें पाहावा विचार। अंतर्यामीं ॥ २२ ॥**

शब्दातीत, कल्पनातीत, मनबुद्धीअगोचर जो परमात्मा याच्या सबंधी अंतर्यामी सारासारविवेकाने विचार करून पाहावा. (२२)

**पाहातां पाहातां कळों येतें। कळलें तितुकें वेर्थ जातें।**
**अवघड कैसें बोलावें तें। कोण्या प्रकारें ॥ २३॥**

पाहाता पाहाता कळू लागले, पण कळले अशी जाणीवही राहता कामा नये. ती राहिली तर मग कळूनही ते न कळल्यासारखेच व्यर्थ होते. हा विषयच असा अवघड आहे की, कशा प्रकारे बोलून तो समजावून द्यावा हेच कळत नाही. (२३)

**वाक्यार्थवाच्यांश शोधिला। अलक्षीं लक्ष्यांश बुडाला।**
**पुढें समजोन बोला। कोणीतरी ॥ २४॥**

वाक्यार्थवाच्यांश यांचा शोध घेऊन त्यातील लक्ष्यांशाचे मनन, निदिध्यासन करावे लागते. ते करता करता अलक्षी म्हणजे परब्रह्मी लक्ष्यांश लय पावतो. मग हे सर्व समजले तरी बोलताच येत नाही. (२४)

**शाश्वतास शोधीत गेला। तेणें ज्ञानी साच जाला।**
**विकार सांडून मिळाला। निर्विकारीं ॥ २५॥**

शाश्वताचा शोध घेता घेता शोध घेणाराच ज्ञानी सत्यस्वरूप होतो. विकारांचा त्याग होऊन तो निर्विकारी ऐक्य पावतो. (२५)

**दु:स्वप्न उदंड देखिलें। जागें होतां लटिकें जालें।**
**पुन्हां जरी तें आठविलें। तरी तें मिथ्या ॥ २६॥**

एखाद्याला दु:स्वप्न पडते, पण तो जागा झाला की, ते मिथ्या ठरते. समजा जरी त्याला ते परत आठवले, तरी ते मिथ्या होते, हे ज्ञान त्याचे कायम राहते. त्यामुळे तो दु:खी होत नाही. (२६)

**प्रारब्धयोगें देह असे। असे अथवा नासे।**
**विचार अंतरी बैसे। चळेना ऐसा ॥ २७॥**

प्रारब्धयोग असतो, त्याप्रमाणे देह राहतो अथवा नष्ट होतो. पण ब्रह्मविचार जो अंतरात दृढ झालेला असतो, तो चळत नाही. (२७)

**बीज अग्नीनें भाजलें। त्याचें वाढणें खुंटलें।**
**ज्ञात्यास तैसें जालें। वासनाबीज ॥ २८॥**

बीज असते ते अग्नीने भाजले की, त्याचे वाढणे खुंटते. त्याला परत अंकुर येऊ शकत नाही. ज्ञात्याच्या बाबतीतही तसेच घडते. त्याचे वासनाबीज ज्ञानाग्नीने भाजले गेल्याने त्यास परत अंकुर फुटत नाही. त्याच्या मनात परत वासना निर्माण होत नाही आणि त्यामुळे त्याला परत जन्म घ्यावा लागत नाही. (२८)

**विचारें निश्चळ जाली बुद्धि। बुद्धिपासीं कार्यसिद्धि।**
**पाहातां वडिलांची बुद्धि। निश्चळीं गेली ॥ २९॥**

विवेकाने ज्ञात्याची बुद्धी आत्मस्वरूपी स्थिर झालेली असते. त्या स्थिरबुद्धीमुळेच कार्यसिद्धी होत असते. पूर्वी झालेले साधू, संत यांची बुद्धीही निश्चळ परब्रह्मात समरसून गेली होती. (२९)

**निश्चळास ध्यातो तो निश्चळ। चंचळास ध्यातो तो चंचळ।**
**भूतास ध्यातो तो केवळ। भूत होये ॥ ३०॥**

जो निश्चळाचे ध्यान करतो तो निश्चळ होतो. जो चंचळाचे ध्यान करतो तो चंचळ होतो. जो केवळ भूतास ध्यातो तो भूतच होतो. (३०)

**जो पावला सेवटवरी। तयास हें कांहींच न करी।**
**अंतरनिष्ठां बाजीगरी। तैसी माया ॥ ३१॥**

जो परब्रह्मापर्यंत पोहोचतो, त्याला हे काहीच करीत नाही. जे अंतरनिष्ठ असतात, त्यांना माया म्हणजे गारुडी विद्येप्रमाणे मिथ्या भासते. (३१)

**मिथ्या ऐसें कळों आलें। विचारानें सदृढ जालें।**
**अवघें भयेंचि उडालें। अकस्मात ॥ ३२॥**

माया मिथ्या असे कळून येते आणि निरंतर विचाराने ते अंतरात सुदृढ होते. त्यायोगे अकस्मात सर्व प्रकारचे भयच नाहीसे होते. (३२)

**उपासनेचें उत्तीर्ण व्हावें। भक्तजनें वाढवावें।**
**अंतरीं विवेकें उमजावें। सकळ कांहीं ॥ ३३॥**

हे सर्व श्रीरामउपासनेमुळे कळले, म्हणून कृतज्ञतेने जगात श्रीरामभक्ती ही वाढवावी. हे कार्य करीत असताही अंतरी विवेकयुक्त राहून यशापयशाने आपली भूमिका चळू देऊ नये, असे श्रीसमर्थ सांगतात. (३३)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सिद्धान्तनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक पंधरावा समाप्त.**

❑❑

# दशक सोळावा : सप्ततिन्वयाचा

## दशक १६ : समास १

### वाल्मीकिस्तवन

॥ श्रीराम ॥

**धन्य धन्य तो वाल्मीक। ऋषीमाजी पुण्यश्लोक।**
**जयाचेन हा त्रिलोक्य। पावन जाला ॥ १ ॥**

**भविष्य आणी शतकोटी। हें तों नाहीं देखिलें दृष्टी।**
**धांडोळितां सकळ सृष्टि। श्रुत नव्हे ॥ २ ॥**

**भविष्याचें येक वचन। कदाचित जालें प्रमाण।**
**तरी आश्चिर्य मानिती जन। भूमंडळीचे ॥ ३ ॥**

**नसतां रघुनाथ अवतार। नाहीं पाहिला शास्त्राधार।**
**रामकथेचा विस्तार। विस्तारिला जेणें ॥ ४ ॥**

**ऐसा जयाचा वाग्विळास। ऐकोनी संतोषला महेश।**
**मग विभागिलें त्रयलोक्यास। शतकोटी रामायेण ॥ ५ ॥**

**ज्याचें कवित्व शंकरें पाहिलें। इतरां न वचे अनुमानलें।**
**रामउपासकांसी जालें। परम समाधान ॥ ६ ॥**

**ऋषी होते थोर थोर। बहुतीं केला कवित्वविचार।**
**परी वाल्मीकासारिखा कवेश्वर। न भूतो न भविष्यति॥ ७ ॥**

**पूर्वीं केलीं दुष्ट कर्मे। परी पावन जाला रामनामें।**
**नाम जपतां दृढ नेमें। पुण्यें सीमा सांडिली ॥ ८ ॥**

**उफराटें नाम म्हणतां वाचें। पर्वत फुटले पापाचे।**
**ध्वज उभारले पुण्याचे। ब्रह्मांडावरुते ॥ ९ ॥**

**वाल्मीकें जेथें तप केलें। तें वन पुण्यपावन जालें।**
**शुष्क काष्ठीं अंकुर फुटले। तपोबळें जयाच्या ॥ १० ॥**

**पूर्वीं होता वाल्हाकोळी। जीवघातकी भूमंडळीं।**
**तोचि वंदिजे सकळीं। विबुधीं आणि ऋषेश्वरीं॥ ११ ॥**

ज्याच्या योगे त्रैलोक्य पावन झाले असे ते ऋषींमध्ये पुण्यश्लोक गणले गेलेले वाल्मीकी खरोखरच धन्य धन्य आहेत. (१)

भविष्यकाळी घडणारे आणि ते सुद्धा शतकोटी संख्यायुक्त रामायण ज्यांनी आधीच लिहिले त्यांच्याबद्दल काय म्हणावे? सर्व सृष्टी धुंडाळली तरी अशी गोष्ट कुठेही ऐकण्यात किंवा पाहण्यात येत नाही. (२)

या जगात भविष्यात घडणाऱ्या गोष्टीसंबंधी एखादे वचन जरी खरे ठरले, तरी लोकांना आश्चर्य वाटते. (३)

ज्या वेळी रघुनाथाचा अवतारही झालेला नव्हता, अशा वेळी कुठलाही शास्त्राधार पाहिलेला नसता, वाल्मीकीने रामकथेचा इतका अफाट विस्तार केला. (४)

असा त्यांचा तो वाग्विलास पाहून महेश अत्यंत प्रसन्न झाले आणि त्यांनी ते शतकोटी रामायण त्रैलोक्यासाठी तीन भागांत विभागले. (५)

वाल्मीकींच्या कवित्वाची थोरवी फक्त शंकरच जाणू शकले. इतरांना त्याचे अनुमानही करता येणे शक्य नाही. त्यांच्या काव्यामुळे रामउपासकांना मात्र परम समाधान झाले. (६)

कित्येक थोर थोर ऋषी होऊन गेले. त्यातील अनेकांनी काव्यरचनाही केली. पण वाल्मीकींच्या सारखा कवीश्वर पूर्वी कधी झाला नाही आणि भविष्यकाळातही कोणी होणार नाही. (७)

पूर्वी त्यांनी खूप दुष्ट कर्मे केली, पण रामनामाने ते पावन झाले. दृढ नेमाने त्यांनी अखंड नाम जपल्यामुळे त्यांच्या पुण्याने सीमा ओलांडली. (८)

त्यांनी उलट्या रामनामाचा मुखाने इतका जप केला की त्यांचे पूर्वीचे पर्वतासारखे प्रचंड पाप नष्ट झाले आणि ब्रह्मांडामध्ये त्यांच्या पुण्याचे ध्वज फडकत राहिले. (९)

ज्या वनात वाल्मीकींनी तप केले, ते वन पुण्याने पावन झाले. एवढेच नव्हे, तर त्यांच्या तपोबलाने शुष्क काष्ठालाही अंकुर फुटले. (१०)

पूर्वी ते वाल्या कोळी म्हणून ओळखले जात. सर्व जगात ते जीवघातकी म्हणून ज्ञात होते. तेच पुढे रामनामामुळे इतके थोर झाले की सगळे देव, विद्वान आणि ऋषीश्वर त्यांना वंदन करू लागले. (११)

**उपरति आणि अनुताप। तेथें कैंचें उरेल पाप।**
**देह्यांततपें पुण्यरूप। दुसरा जन्म जाला ॥ १२॥**

ज्याला उपरती आणि पश्चात्ताप झाला असेल त्याचे पाप कसे शिल्लक राहील? वाल्मीकींनी देहात असणारा जो देही अंतरात्मा, मीपण, त्याचा नाश होईपर्यंत केलेल्या तपामुळे त्यांचा जणू पुण्यरूपाने दुसरा जन्मच झाला. (१२)

**अनुतापें आसन घातलें। देह्याचें वारुळ जालें।**
**तेंचि नाम पुढें पडिलें। वाल्मीक ऐसें ॥ १३॥**

कृतकर्माचा अत्यंत पश्चात्ताप झाल्याने त्यांनी उलट्या रामनामाचा जप करण्यासाठी जे आसन घातले, ते देहावर वारूळ वाढले तरी त्यांना कळले नाही. त्यामुळेच वाल्मीकी हे नाव त्यांना पडले. (१३)

**वारुळास वाल्मीक बोलिजे। म्हणोनि वाल्मीक नाम साजे।**
**जयाच्या तीव्र तपें झिजे। हृदय तापसाचें ॥ १४॥**

वारुळालाच वाल्मीक म्हणतात, म्हणूनच त्यांना वाल्मीकी हे नाव शोभून दिसले. त्यांची तपस्या पाहून तपस्वी लोकांच्या हृदयाचाही थरकाप होतो. (१४)

**जो तापसांमाजीं श्रेष्ठ। जो कवेश्वरांमधें वरिष्ठ।**
**जयाचें बोलणें पष्ट। निश्चयाचें ॥ १५॥**

वाल्मीकी हे तपस्वांच्यामध्ये श्रेष्ठ, कवीश्वरांमध्ये वरिष्ठ असून त्यांचे बोलणे स्वानुभवाचे असल्याने निश्चयात्मक आणि स्पष्ट असते. (१५)

**जो निष्ठावंतांचें मंडण। रघुनाथभक्तांचें भूषण।**
**ज्याची धारणा असाधारण। साधकां सदृढ करी ॥ १६॥**

वाल्मीकी हे त्यांच्या दृढ निष्ठेमुळे निष्ठावंतांमध्ये ते अलंकाराप्रमाणे शोभतात. रघुनाथभक्तांना ते भूषणास्पद वाटतात आणि त्यांची असाधारण धारणा साधकांना त्यांची धारणा सुदृढ करण्यास प्रेरणा देते. (१६)

**धन्य वाल्मीक ऋषेश्वर। समर्थांचा कवेश्वर।**
**तयासी माझा नमस्कार। साष्टांगभावें ॥ १७॥**

ऋषीश्वर वाल्मीकी, जे श्रीराम समर्थांचे कवीश्वर आहेत, ते खरोखर धन्य आहेत. रामदास म्हणतात की, त्यांना माझा साष्टांग- भावे नमस्कार असो. (१७)

**वाल्मीक ऋषी बोलिला नसता। तरी आम्हांसी कैंची रामकथा।**
**म्हणोनियां समर्था। काय म्हणोनी वर्णावें॥ १८॥**

वाल्मीकी ऋषींनी जर रामायणरचना केली नसती, तर आम्हांला रामकथा कशी प्राप्त झाली असती? म्हणून त्यांचे वर्णन कसे करावे हेच कळत नाही. (१८)

**रघुनाथकीर्ति प्रगट केली। तेणें तयाची महिमा वाढली।**
**भक्तमंडळी सुखी जाली। श्रवणमात्रें ॥ १९॥**

रघुनाथकीर्ती रामायणरूपाने प्रगट केल्याने वाल्मीकींचा महिमाही वाढला. त्या रामायणाच्या केवळ श्रवणानेही भक्तमंडळी सुखी झाली. (१९)

**आपुला काळ सार्थक केला। रघुनाथकीर्तीमधें बुडाला।**
**भूमंडळीं उधरिला। बहुत लोक ॥ २०॥**

रघुनाथकीर्तीमध्ये, भक्तिरसात डुंबत राहून वाल्मीकींनी आपल्या जीवनातील काळ सार्थकी तर लावलाच, पण या पृथ्वीतलावरील अनेक लोकांचाही त्यांनी उद्धार केला. (२०)

**रघुनाथभक्त थोर थोर। महिमा जयांचा अपार।**
**त्या समस्तांचा किंकर। रामदास म्हणे ॥२१॥**

जे थोर थोर रघुनाथभक्त होऊन गेले, त्या अपार महिमा असलेल्या समस्त रघुनाथभक्तांचा मी किंकर आहे, असे रामदास म्हणतात. (२१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'वाल्मीकिस्तवननाम' समास पहिला समाप्त.**



## दशक १६ : समास २
## सूर्यस्तवन

॥ श्रीराम ॥

**धन्य धन्य हा सूर्यवौंश । सकळ वौंशामधें विशेष।**
**मार्तंडमंडळाचा प्रकाश । फांकला भूमंडळीं ॥ १॥**

श्री समर्थ म्हणतात की, जगात अनेक वंश आहेत, पण त्या सर्वांमध्ये सूर्यवंश हा विशेष असल्याने तो खरोखरच धन्य धन्य आहे. सर्व पृथ्वीतलावर सूर्यमंडलाचा प्रकाश पसरलेला आहे. (१)

**सोमाआंगीं आहे लांछन । पक्षा येका होय क्षीण।**
**रविकिर्ण फांकतां आपण । कळाहीन होये ॥ २॥**

चंद्रबिंबावर कलंक असतो, शिवाय तो एका पंधरवड्यात क्षीण होत जातो. सूर्याच्या किरणांचा प्रकाश सर्वत्र फाकला की, तो कळाहीन, निस्तेज होतो. (२)

**याकारणें सूर्यापुढें । दुसरी साम्यता न घडे।**
**जयाच्या प्रकाशें उजेडे । प्राणीमात्रांसी ॥ ३॥**

म्हणून ज्याच्या प्रकाशामुळे सर्व प्राणिमात्रांना उजेड प्राप्त होतो, त्या सूर्याची बरोबरी दुसरा कोणीही करू शकत नाही. (३)

**नाना धर्म नाना कर्में । उत्तमें मध्यमें अधमें।**
**सुगमें दुर्गमें नित्य नेमें । सृष्टीमधें चालती ॥ ४॥**

उत्तम, मध्यम, अधम, तसेच सुगम आणि दुर्गम असे नाना धर्म, नाना कर्मे सूर्यामुळेच या सृष्टीमध्ये नित्यनेमाने चालू असतात. (४)

**वेदशास्त्रें आणी पुराणें । मंत्र यंत्र नाना साधनें।**
**संध्या स्नान पूजाविधानें । सूर्येंविण बापुडीं ॥ ५॥**

वेद, शास्त्रे, पुराणे, नाना मंत्र, नाना यंत्रे, नाना साधने तसेच स्नान, संध्या, पूजाविधी सर्व सूर्यावरच अवलंबून असतात. सूर्याशिवाय ती बापुडी चालूच शकत नाहीत. (५)

**नाना योग नाना मतें । पाहों जातां असंख्यातें।**
**जाती आपुलाल्या पंथें । सूर्यउदय जालियां ॥ ६॥**

नाना योग, नाना मते पाहू गेल्यास ती असंख्य आहेत. पण सूर्योदय झाल्यावरच सर्व कार्यान्वित होतात. (६)

**प्रपंचिक अथवा परमार्थिक । कार्य करणें कोणीयेक।**
**दिवसेंविण निरार्थक । सार्थक नव्हे ॥ ७॥**

प्रापंचिक असो अथवा पारमार्थिक असो, कुठल्याही प्रकारचे कार्य करायचे असले तरी ते दिवसाच करावे लागते. तरच ते उत्तम प्रकारे सिद्धीस जाते. अन्यथा ते निरर्थक ठरते. (७)

**सूर्याचें अधिष्ठान डोळे । डोळे नसतां सर्व आंधळे।**
**याकारणें कांहींच न चले । सूर्येंविण ॥ ८॥**

सूर्याचे अधिष्ठान प्रत्येक प्राणिमात्राच्या डोळ्यात असते. डोळे नसतील तर सर्व आंधळेच म्हणावे लागतील. म्हणून सूर्याशिवाय काहीच चालत नाही. (८)

**म्हणाल अंध कवित्वें करिती । तरी हेहि सूर्याचीच गती।**
**थंड जालियां आपुली मती । मग मतिप्रकाश कैंचा ॥ ९॥**

तुम्ही एखादे वेळी असे म्हणाल की, अंध व्यक्तीसुद्धा कवित्व करू शकतात, पण हेसुद्धा सूर्यामुळेच घडते. आपली बुद्धी जर गारठली, तर बुद्धीचा प्रकाश कसा पडेल? (९)

**उष्ण प्रकाश तो सूर्याचा । शीत प्रकाश तो चंद्राचा।**
**उष्णत्व नस्तां देहयाचा । घात होये ॥ १०॥**

सूर्याचा प्रकाश उष्ण असतो. चंद्राचा प्रकाश शीत, थंड असतो. देहाच्या ठिकाणी उष्णता नसेल तर देह टिकू शकणार नाही. त्याचा नाश होईल. (१०)

**याकारणें सूर्येंविण । सहसा न चले कारण।**
**श्रोते तुम्ही विचक्षण । शोधून पाहा ॥ ११॥**

म्हणून सूर्याशिवाय सहसा काहीच कार्य होत नाही. श्रोते हो, तुम्ही चतुर आहात. तरी विचार करून पहा. (११)

**हरिहरांच्या अवतारमूर्ती । शिवशक्तीच्या अनंत वेक्ती।**
**यापूर्वीं होता गभस्ती । आतांहि आहे ॥ १२॥**

हरिहरांच्या अवतारमूर्ती, तसेच शिवशक्तियुक्त अनंत व्यक्ती यांची उत्पत्ती होण्यापूर्वीही सूर्य होता आणि आताही तो आहेच. (१२)

**जितुके संसारासी आले । तितुके सूर्याखालें वर्तले।**
**अंतीं देहे त्यागून गेले। प्रभाकरादेखतां ॥ १३॥**

जितके प्राणी या संसारात जन्मास येतात ते सर्व सूर्यामुळे व सूर्यप्रकाशात वावरतात आणि अंती देहत्यागही सूर्यदेखतच करतात. (१३)

चंद्र ऐलीकडे जाला। क्षीरसागरीं मथून काढिला।
चौदा रत्नांमधें आला। बंधु लक्ष्मुमीचा ॥ १४॥

चंद्राची उत्पत्ती अलीकडील आहे. क्षीरसागराचे मंथन करून जी चौदा रत्ने प्रगट झाली, त्यात हा लक्ष्मीचा भाऊ प्रगट झाला. (१४)

विश्वचक्षु हा भास्कर। ऐसें जाणती ल्हहानथोर।
याकारणें दिवाकर। श्रेष्ठाहून श्रेष्ठ ॥ १५॥

भास्कर हा सर्व जगाचा नेत्र आहे, हे सर्व लोक जाणतात. म्हणूनच सूर्य हा श्रेष्ठाहूनही श्रेष्ठ आहे. (१५)

अपार नभमार्ग क्रमणें। ऐसेंचि प्रत्यहीं येणें जाणें।
या लोकोपकाराकारणें। आज्ञा समर्थाची ॥ १६॥

सूर्य रोज अपार अशा आकाशमार्गाने मार्गक्रमण करतो. रोजच्या रोज त्याचे असे येणे-जाणे चालू असते. या लोकोपकाराविषयी त्यास भगवंताची आज्ञा झालेली आहे. (१६)

दिवस नस्तां अंधकार। सर्वांसी नकळे सारासार।
दिवसेंविण तश्कर। कां दिवाभीत पक्षी ॥ १७॥

दिवस उगवला नाही, तर सर्वत्र अंधार पसरेल, मग लोकांना सारासार कळणार नाही. दिवस नसेल तर चोर आणि घुबड यांना बरे वाटते. (१७)

सूर्यापुढें आणिक दुसरें। कोण आणावें सामोरें।
तेजोरासी निर्धारें। उपमेरहित ॥ १८॥

सूर्यापुढे त्याची बरोबर करील, असे दुसरे कोणास आणावे? सूर्यच खरोखर तेजोराशीच असल्याने त्याला कुणाची उपमाच देता येत नाही. (१८)

ऐसा हा सविता सकळांचा। पूर्वज होय रघुनाथाचा।
अगाध महिमा मानवी वाचा। काये म्हणोनि वर्णावी ॥ १९॥

असा हा सूर्य सगळ्यांचाच आहे आणि रघुनाथाचा तर तो पूर्वजच आहे. त्याचा अगाध महिमा मानवी वाचेने कसा वर्णन करता येईल? (१९)

रघुनाथवौंश पूर्वापर। येकाहूनि येक थोर।
मज मतिमंदास हा विचार। काये कळे ॥ २०॥

सूर्यवंश, रघुनाथाचा वंश हा खूप पुरातन असून त्यात एकाहून एक थोर पुरुष होऊन गेले आहेत. रामदास म्हणतात की, मी तर मतिमंद आहे. त्यांची थोरवी मला कशी कळेल? (२०)

रघुनाथाचा समुदाव। तेथें गुंतला अंतर्भाव।
म्हणौनि वर्णितां महत्त्व। वाग्दुर्बळ मी ॥ २१॥

ज्या ठिकाणी रघुनाथाच्या भक्तांचा समुदाय असतो, तेथे माझे अंतरंग गुंतलेले असते. म्हणून त्यांचे महत्त्व मला मुखदुर्बलाला कसे वर्णन करता येईल? (२१)

सकळ दोषाचा परिहार। करितां सूर्यास नमस्कार।
स्फूर्ति वाढे निरंतर। सूर्यदर्शन घेतां ॥ २२॥

सूर्यास नमस्कार केल्याने सर्व दोषांचा परिहार होतो आणि सूर्यदर्शन घेतल्याने निरंतर स्फूर्ती वाढते. (२२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूर्यस्तवननाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक १६ : समास ३
## पृथ्वीस्तवन

॥ श्रीराम ॥

धन्य धन्य हे वसुमती। इचा महिमा सांगों किती।
प्राणीमात्र तितुके राहाती। तिच्या आधारें ॥ १॥

ही पृथ्वी खरोखरच धन्य धन्य आहे. तिचा महिमा किती वर्णन करावा? जितके म्हणून प्राणिमात्र आहेत ते पृथ्वीच्या आधारानेच राहतात. (१)

अंतरीक्ष राहाती जीव। तोहि पृथ्वीचा स्वभाव।
देहे जड नस्तां जीव। कैसे तगती ॥ २॥

आकाशात राहणारे जीव, यांनाही पृथ्वीचाच आधार असतो, म्हणजे त्यांचे देह पृथ्वीतत्वाचेच असतात. जड पृथ्वीतत्वाचे देह नसतील, तर जीव तगून कसे राहतील? (२)

जाळिती पोळिती कुदळिती। नांगरिती उकरिती खाणती।
मळ मूत्र तिजवरी करिती। आणी वमन ॥ ३॥

पृथ्वीला लोक जाळतात, पोळतात, कुदळीने खणतात, नांगरतात, उकरतात, खणून काढतात. तिच्यावर मलमूत्र करतात, ओकतात, (३)

नासकें कुजकें जर्जर। पृथ्वीविण कैची थार।
देह्यांतकाळीं शरीर। तिजवरी पडे ॥ ४॥

नासके, कुजके, जीर्ण पदार्थ यांना पृथ्वीशिवाय थारा कुठे आहे? देहान्तसमयी शरीर पृथ्वीवरच पडत असते. (४)

बरें वाईट सकळ कांहीं। पृथ्वीविण थार नाहीं।
नाना धातु द्रव्य तेंही। भूमीचे पोटीं ॥ ५॥

बरे वाईट जे काही सर्व आहे, त्याला पृथ्वीशिवाय थारा नाही. नाना धातू, द्रव्य आदी सर्व पृथ्वीच्या पोटातच असतात. (५)

येकास येक संव्हारिती। प्राणी भूमीवरी असती।
भूमी सांडून जाती। कोणीकडे ॥ ६॥

प्राणी एक दुसऱ्याचा संहार करतात, पण दोघेही पृथ्वीवरच उभे असतात. भूमी सोडून ते जाणार तरी कुठे? (६)

गड कोठ पुरें पट्टणें। नाना देश कळती अटणें।
देव दानव मानव राहाणें। पृथ्वीवरी ॥ ७॥

गड, किल्ले, पुरे, नगरे तसेच नाना देश जे आहेत ते पर्यटनाने कळून येतात. देव, दानव, मानव आदी सर्व पृथ्वीवरच राहात असतात. (७)

नाना रत्नें हिरे परीस। नाना धातु द्रव्यांश।
गुप्त प्रगट कराव्यास। पृथ्वीविण नाहीं ॥ ८॥

नाना रत्ने, हिरे, परीस, तसेच नाना धातू आणि द्रव्यांश यांना गुप्त अथवा प्रकट व्हावयास पृथ्वीशिवाय वावच नाही. (८)

मेरुमांदार हिमाचळ। नाना अष्टकुळाचळ।
नाना पक्षी मछ व्याळ। भूमंडळीं ॥ ९॥

मेरू, मांदार, हिमालय तसेच नील, निषध, विंध्य, माल्यवान, मलय, गंधमादन, हेमकूट हे अष्ट कुलपर्वत, नाना पक्षी, मासे, सर्प इत्यादी सर्व पृथ्वीच्याच आधारे राहतात. (९)

नाना समुद्रापैलीकडे। भोंवतें आवर्णोदका कडें।
असंभाव्य तुटले कडे। भूमंडळाचे ॥ १०॥

नाना समुद्रांच्या पलीकडे पृथ्वीच्या भोवती जे आवर्णोदकाचे कडे आहे आणि जे पृथ्वीचे मोठमोठे असंभाव्य तुटके कडे आहेत, (१०)

त्यांमधें गुप्त विवरें। ल्हानथोरें अपारें।
तेथें निबिड अंधकारें। वस्ती कीजे ॥ ११॥

त्यामध्ये लहान-थोर अशी अपार गुप्त विवरे आहेत. त्यात निबिड अंधार भरून राहिलेला आहे. (११)

आवर्णोदक तें अपार। त्याचा कोण जाणे पार।
उदंड दाटले जळचर। असंभाव्य मोठे ॥ १२॥

त्या अपार आवर्णोदकाचा पार कोण जाणू शकेल? त्यात असंभाव्य असे मोठमोठे जलचर उदंड दाटलेले आहेत. (१२)

त्या जीवनास आधारपवन। निबिड दाट आणी घन।
फुटों शकेना जीवन। कोणेकडे ॥ १३॥

त्या जीवनाला वायू हा आधार असून तो वायू निबिड, घनदाट आहे म्हणून ते पाणी कोणीकडेही फुटून वाहून जाऊ शकत नाही. (१३)

त्या प्रभंजनासी आधार। कठीणपणें अहंकार।
ऐसा त्या भूगोळाचा पार। कोण जाणे ॥ १४॥

त्या प्रभंजनाला वायूला अज्ञानरूपी काठिण्याने अहंकाराचा आधार असतो. अशा त्या भूगोलाचा पार कोण बरे जाणू शकेल? (१४)

नाना पदार्थांच्या खाणी। धातुरत्नांच्या दाटणी।
कल्पतरु चिंतामणी। अमृतकुंडें ॥ १५॥

पृथ्वीवरच नाना पदार्थांच्या खाणी आहेत, तसेच नाना धातू, रत्ने यांच्या खाणींचीही दाटी झालेली आहे. कल्पतरू, अमृतकुंडे, चिंतामणी ही पृथ्वीवरच आहेत. (१५)

नाना दीपें नाना खंडें। वसती उद्वसें उदंडें।
तेथें नाना जीवनाचीं बंडें। वेगळालीं ॥ १६॥

या पृथ्वीवर नाना बेटे आहेत, नाना खंडे आहेत, तसेच उदंड ओसाड प्रदेशही आहेत आणि जेथे नाना प्रकारच्या प्राण्यांचे वेगवेगळे समुदाय आहेत, अशी स्थानेही आहेत. (१६)

मेरुभोंवते कडे कापले। असंभाव्य कडोसें पडिलें।
निबिड तरु लागले। नाना जिनसी ॥ १७॥

मेरूभोवती कापलेले कडे आहेत. त्यांतून असंभाव्य कवडसे, अथवा डोंगरांच्या पडलेल्या छायाकृती आहेत. त्यात नाना प्रकारचे निबिड वृक्ष उगवलेले आहेत. (१७)

त्यासन्निध लोकालोक। जेथें सूर्याचें फिरे चाक।
चंद्राद्रि द्रोणाद्रि मैनाक। माहां गिरी ॥ १८॥

त्याच्याजवळ लोकालोक पर्वत असून तेथे सूर्याचे चक्र फिरत असते. याशिवाय चंद्राद्री, द्रोणाद्री, मैनाक व इतरही मोठमोठे पर्वत या पृथ्वीवरच आहेत. (१८)

नाना देशीं पाषाणभेद। नाना जिनसी मृत्तिकाभेद।
नाना विभूति छंद बंद। नाना खाणी ॥ १९॥

या पृथ्वीवर नाना देश आहेत. त्यांत अनेक प्रकारचे पाषाणांचे, मृत्तिकांचे, नाना जिनसांचे भेद आढळून येतात. तसेच नाना विभूती, नाना छंद, नाना बंध आणि नाना खाणी आढळतात. (१९)

बहुरत्न हे वसुंदरा। ऐसा पदार्थ कैंचा दुसरा।
अफाट पडिलें सैरावैरा। जिकडे तिकडे ॥ २०॥

म्हणूनच 'बहुरत्ना वसुंधरा' असे म्हटले जाते. या पृथ्वीसारखा अफाट आणि जिकडे-तिकडे सैरावैरा पसरलेला दुसरा पदार्थ कुठला असणार आहे? (२०)

अवघी पृथ्वी फिरोन पाहे। ऐसा प्राणी कोण आहे।
दुजी तुळणा न साहे। धरणीविषीं ॥ २१॥

सर्व पृथ्वी हिंडून पाहू शकेल असा प्राणी कोण असणार आहे? या धरणीशी तुलना करता येईल असा पदार्थच नाही. (२१)

नाना वल्ली नाना पिकें। देसोदेसीं अनेकें।
पाहों जातां सारिख्या सारिखें। येकहि नाहीं ॥ २२॥

देशोदेशी अनेक प्रकारच्या वेली, नाना प्रकारची अन्नधान्ये आहेत, पण आश्चर्य म्हणजे एकासारखे दुसरे एकही नाही. (२२)

स्वर्ग मृत्य आणी पाताळें। अपूर्व रचिलीं तीन ताळें।
पाताळलोकीं माहां व्याळें। वस्ती कीजे ॥ २३॥

भगवंतांनी स्वर्ग, मृत्यू आणि पाताळ अशा ह्या तीन अपूर्व लोकांची रचना केली आहे. पाताळात मोठमोठ्या सर्पांनी वस्ती केली आहे. (२३)

नाना वल्ली बीजांचीखाणी। ते हे विशाळ धरणी।
अभिनव कर्त्याची करणी। होऊन गेली ॥ २४॥

ही पृथ्वी म्हणजे अति विशाल अशी नाना वल्लींची आणि बीजांची खाणच आहे. ही अंतरात्म्याची मोठी अपूर्व अशी करणी होऊन गेली आहे. (२४)

गड कोट नाना नगरें। पुरें पट्टणें मनोहरें।
सकळ ठाईं जगदेश्वरें। वस्ती कीजे ॥ २५॥

गड, कोट, नाना नगरे, पुरे, पट्टणे सर्व मनोहर असून त्या सर्वांच्या ठायी जगदीश्वराने वस्ती केलेली आहे. (२५)

माहां बळी होऊन गेले। पृथ्वीवरी चौताळले।
सामर्थ्ये निराळे राहिले। हें तों घडेना ॥ २६॥

या पृथ्वीवरच अनेक बलवान पुरुष होऊन गेले. त्यांनी येथेच मोठा पराक्रम गाजवला. पण आपल्या सामर्थ्याच्या बळावर ते पृथ्वीपासून वेगळे राहिले, असे तर घडू शकत नाही. (२६)

असंभाव्य हे जगती। जीव कितीयेक जाती।
नाना अवतारपंगती। भूमंडळावरी ॥ २७॥

ही पृथ्वी खरोखरच असंभाव्य आहे. कित्येक जातीचे जीव, भगवंताच्या अनेक प्रकारच्या अवतारांच्या पंक्ती या भूमंडळावरच झाल्या. (२७)

सध्यां रोकडें प्रमाण। कांहीं करावा नलगे अनुमान।
नाना प्रकारीचें जीवन। पृथ्वीचेनि आधारें ॥ २८॥

सध्या म्हणजे आजकालही या गोष्टीची रोकडी प्रचीती येत असते. येथे अनुमान, कल्पना करावी लागत नाही. या पृथ्वीच्या आधारानेच नाना प्रकारचे जीव जीवन जगतात. (२८)

कित्तेक भूमी माझी म्हणती। सेवटीं आपणचि मरोन जाती।
कित्तेक काळ होतां जगती। जैसी तैसी ॥ २९॥

कित्येक लोक जमीन माझी असे म्हणतात आणि शेवटी आपणच मरून जातात. पण कित्येक काळ लोटला तरी ही पृथ्वी जशीच्या तशीच असते. (२९)

ऐसा पृथ्वीचा महिमा। दुसरी काये द्यावी उपमा।
ब्रह्मादिकांपासुनी आम्हां। आश्रयोचि आहे ॥ ३०॥

असा या पृथ्वीचा महिमा आहे. तिला दुसऱ्या कशाचीही उपमा देता येत नाही. अगदी ब्रह्मादिकांपासून आपणा सर्वांचा आधार पृथ्वीच आहे. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पृथ्वीस्तवननाम' समास तिसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक १६ : समास ४
## आपनिरूपण

॥ श्रीराम ॥

आतां सकळांचें जन्मस्थान। सकळ जीवांचे जीवन।
जयास आपोनारायेण। ऐसें बोलिजे ॥ १ ॥

आता सर्व प्राणिमात्रांचे जे जन्मस्थान आहे, सर्व जीवांचे जे जीवन आहे व ज्याला आपोनारायण म्हणतात त्यासंबंधी बोलू या. (१)

पृथ्वीस आधार आवर्णोदक। सप्तसिंधूचें सिंधोदक।
नाना मेघीचें मेघोदक। भूमंडळीं चालिलें ॥ २ ॥

पृथ्वीला आवर्णोदकाचा आधार आहे. सप्तसागरांचे पाणी आणि नाना मेघांनी वृष्टी केलेले मेघोदक म्हणजे पावसाचे पाणी या भूमंडळावरच वाहात आहे. (२)

नाना नद्या नाना देसीं। वाहात मिळाल्या सागरासी।
ल्हानथोर पुण्यरासी। अगाध महिमे ॥ ३ ॥

नाना देशांतून नाना नद्या वाहतात आणि शेवटी समुद्रास जाऊन मिळतात. त्यांचा महिमा कमी-अधिक असतो, पण काहींचा महिमा मात्र अगाध असतो. (३)

नद्या पर्वतींहून कोंसळल्या। नाना सांकडीमधें रिचवल्या।
धबाबां खळाळां चालिल्या। असंभाव्य ॥ ४ ॥

पर्वतातून उगम पावून त्या कोसळत असतात. काही कडे-कपारीत अडकतात, तर काही धबाधब धबधब्याच्या रूपाने असंभाव्य खळखळाट करीत वाहत जातात. (४)

कूप बावी सरोवरें। उदंड तळीं थोरथोरें।
निर्मळें उचंबळती नीरें। नाना देसीं ॥ ५ ॥

याशिवाय नाना देशांत कूप, वापी, सरोवरे, मोठमोठे तलाव यांतून निर्मल स्वच्छ पाणी उचंबळत असते. (५)

गायेमुखें पाट जाती। नाना काल्वे वाहाती।
नाना झऱ्या झिरपती। झरती नीरें ॥ ६ ॥

गायमुखातून, पाट्यातून, कालव्यांतून असे अनेक प्रकारे पाणी वाहात असते, तसेच नाना ठिकाणी झऱ्यांतून आणि झरींतून पाणी झिरपत असते. (६)

डुरें विहीरे पाझर। पर्वत फुटोन वाहे नीर।
ऐसे उदकाचे प्रकार। भूमंडळीं ॥ ७ ॥

डहुरे, विहिरी, पाझर तसेच पर्वतातील भेगांतून पाणी वाहात असते. असे या पृथ्वीवर पाण्याचे नाना प्रकार आहेत. (७)

जितुके गिरी तितुक्या धारा। कोंसळती भयंकरा।
पाभळ वाहाळा अपारा। उकळ्या सांडिती ॥ ८ ॥

जितके पर्वत आहेत, तितक्यावरून पाण्याच्या भयंकर धारा कोसळत असतात. अपार पाभळ (झरे), ओहोळ आणि फवारे वाहात असतात. (८)

भूमंडळीचें जळ आघवें। किती म्हणोनी सांगावें।
नाना कारंजीं आणावें। बांधोनी पाणी ॥ ९ ॥

याप्रमाणे सर्व पृथ्वीवरील जलाचे वर्णन कुठवर म्हणून करावे? पाण्याला बांध घालून नाना कारंज्यांतून पाणी सोडतात. (९)

डोहो डवकें खबाडीं टांकीं। नाना गिरिकंदरीं अनेकीं।
नाना जळें नाना लोकीं। वेगळालीं ॥ १० ॥

डोह, डबकी, लहान आणि मोठी टाकी याप्रमाणे नाना गिरिकंदरातून अनेक प्रकारे अनेक प्रकारचे पाणी आढळून येते. (१०)

तीर्थें येकाहून येक। माहांपवित्र पुण्यदायक।
अगाध महिमा शास्त्रकारक। बोलोनि गेले ॥ ११ ॥

एकापेक्षा एक श्रेष्ठ अशी महापवित्र आणि पुण्यदायक तीर्थे आहेत. त्यांचा अगाध महिमा शास्त्रकारांनी वर्णन केलेला आहे. (११)

नाना तीर्थांचीं पुण्योदकें। नाना स्थळेस्थळीं सीतळोदकें।
तैसींच नाना उष्णोदकें। ठाईं ठाईं ॥ १२ ॥

अनेक तीर्थांचे पाणी पुण्यदायक आहे. शिवाय नाना ठिकाणी थंड पाण्याचे, तर कित्येक ठिकाणी उष्णोदकाचे झरे आहेत. (१२)

नाना वल्लीमधें जीवन। नाना फळीं फुलीं जीवन।
नाना कंदीं मुळीं जीवन। गुणकारकें ॥ १३ ॥

नाना प्रकारच्या वेली, फळे, फुले, नाना कंद आणि मुळे यांमध्ये पाणीच भरून राहिलेले आहे. काहींचे पाणी अत्यंत गुणकारक असते. (१३)

क्षारोदकें सिंधोदकें। विषोदकें पीयूषोदकें।
नाना स्थळांतरीं उदकें। नाना गुणाचीं ॥ १४ ॥

खारे पाणी, समुद्राचे पाणी, विषारी पाणी, अमृतासारखे मधुर पाणी, निरनिराळ्या ठिकाणचे निरनिराळे गुण असणारे पाणी, (१४)

नाना युक्षदंडाचे रस। नाना फळांचे नाना रस।
नाना प्रकारीचे गोरस। मद पारा गुळत्र ॥ १५॥

नाना मुक्तफळांचें पाणी। नाना रत्नीं तळपे पाणी।
नाना शस्त्रामधें पाणी। नाना गुणाचें ॥ १६॥

शुक्लीत श्रोणीत लाळ मूत्र स्वेद। नाना उदकाचे नाना भेद।
विवरोन पाहातां विशद। होत जातें ॥ १७॥

उदकाचे देह केवळ। उदकाचेंचि भूमंडळ।
चंद्रमंडळ सूर्यमंडळ। उदकाकरितां ॥ १८॥

क्षारसिंधु क्षीरसिंधु। सुरासिंधु आज्यसिंधु।
दधिसिंधु युक्षरससिंधु। शुद्ध सिंधु उदकाचा॥ १९॥

ऐसें उदक विस्तारलें। मुळापासून सेवटा आलें।
मधेंहि ठाईं ठाईं उमटलें। ठाईं ठाईं गुप्त ॥ २०॥

जे जे बीजीं मिश्रित जालें। तो तो स्वाद घेऊन उठिलें।
उसामधें गोडीस आलें। परम सुंदर ॥ २१॥

उदकाचें बांधा हें शरीर। उदकचि पाहिजे तदनंतर।
उदकचि उत्पत्तिविस्तार। किती म्हणोनि सांगावा॥ २२॥

उदक तारक उदक मारक। उदक नाना सौख्यदायेक।
पाहातां उदकाचा विवेक। अलोलीक आहे ॥ २३॥

भूमंडळीं धांवे नीर। नाना ध्वनी त्या सुंदर।
धबाबां धबाबां थोर। रिचवती धारा ॥ २४॥

ठाईं ठाईं डोहो तुंबती। विशाळ तळीं डबाबिती।
चबाबिती थबाबिती। कालवे पाट ॥ २५॥

येकी पालथ्या गंगावाहाती। उदकें सन्निधचि असती।
खळाळां झरे वाहाती। भूमीचे पोटीं ॥ २६॥

भूमीगर्भी डोहो भरले। कोण्ही देखिले ना ऐकिले।
ठाईं ठाईं झोवीरे जाले। विदुल्यतांचे ॥ २७॥

नाना प्रकारच्या उसाचे रस, नाना प्रकारच्या फळांचे नाना रस, नाना प्रकारचे दूध, मादक रस, याशिवाय पारा, काकवी, याप्रकारचे रस असतात. (१५)

नाना प्रकारच्या मोत्यांचे पाणी, नाना रत्नांच्या ठिकाणी तळपणारे पाणी, तसेच नाना शस्त्रांच्या ठिकाणी असणारे नाना गुणांचे पाणी, (१६)

वीर्य, रक्त, लाळ, मूत्र, घाम याप्रमाणे उदकाचे नाना भेद आहेत. त्यांचे विवरण करून पाहिले असता ते भेद स्पष्टपणे कळून येतात. (१७)

सर्व प्राण्यांचे देह उदकाचेच असतात, भूमंडळही उदकाचेच आहे आणि उदकाच्या योगेच चंद्रमंडळ आणि सूर्यमंडळ ही झाली आहेत. (१८)

खारा समुद्र, दुधाचा समुद्र, दारूचा समुद्र, तुपाचा समुद्र, दह्याचा समुद्र, उसाच्या रसाचा समुद्र आणि शुद्ध पाण्याचा समुद्र असे सात समुद्र आहेत. (१९)

याप्रमाणे सर्वत्र त्या पाण्याचाच विस्तार मुळापासून शेवटपर्यंत झालेला आहे. ते मध्येच कुठे कुठे प्रकट दिसून येते, तर कुठेकुठे ते गुप्तही असते. (२०)

ज्या बीजात उदक मिश्रित होते, त्या बीजाचा स्वाद घेऊन ते अंकुरते. उसामध्ये ते परम सुंदर अशा गोडीला प्राप्त होते. (२१)

आपले हे शरीर पाण्यामुळेच उत्पन्न होते. पण नंतरही शरीरास पाणी आवश्यक असते. पाण्यापासून कुठल्या गोष्टी उत्पन्न होतात, ते विस्तारपूर्वक सांगणे शक्यच नाही. (२२)

उदक तारकही आहे आणि मारकही आहे. नाना प्रकारे उदक हे सुख देणारे आहे. याप्रमाणे उदकासंबंधी विचार करू लागले की ते अलौकिक आहे, हे समजून येते. (२३)

भूमंडलावर जे पाणी धावते, त्याचा नाना प्रकारे सुंदर आवाज ऐकू येतो. कधी कधी पाण्याच्या मोठमोठ्या धारा धबाबा आवाज करीत धबधब्याच्या रूपाने कोसळतात. (२४)

ठिकठिकाणी पाण्याचे डोह तुडूंब भरलेले असतात, तर काही ठिकाणी विशाल तलाव पाण्याने भरलेले असतात. काही ठिकाणी पाण्याचे कालवे आणि पाट थबथबलेले आढळतात. (२५)

एखादी नदी जमिनीखालून गुप्त वाहात असते. (उदाहरणार्थ त्यांचे पाणी जमिनीच्या खाली, पण जवळच असते.) काही स्थळी भूगर्भातून खळाळा झरे वाहात असतात. (२६)

कोणी कधी पाहिलेले नाहीत किंवा ऐकलेलेही नाहीत असे पाण्याचे मोठे डोह भूगर्भात असतात, तर कित्येक ठिकाणी वीज पडून निर्माण झालेले झरे आढळून येतात. (२७)

पृथ्वीतळीं पाणी भरलें। पृथ्वीमधें पाणी खेळे।
पृथ्वीवरी प्रगटलें। उदंड पाणी ॥ २८॥

अशा प्रकारे पृथ्वीच्या खाली पाणी भरलेले आहे. पृथ्वीमध्ये सर्वत्र पाणी खेळत असते आणि पृथ्वीतलावरही उदंड पाणी प्रगटलेले दिसून येते. (२८)

स्वर्गमृत्यपाताळीं। येक नदी तीन ताळीं।
मेघोदक अंतराळीं। वृष्टी करी ॥ २९॥

स्वर्ग, मृत्यू आणि पाताळ अशा तीनही लोकांत एकच नदी गंगा वाहत असते आणि अंतराळातून मेघांच्या द्वारेही वृष्टी होतच असते. (२९)

पृथ्वीचें मूळ जीवन। जीवनाचें मूळ दहन।
दहनाचें मूळ पवन। थोराहून थोर ॥ ३०॥

पृथ्वीचे मूळच पाण्यात आहे. त्या पाण्याचे मूळ अग्नीत आहे. त्या अग्नीचे मूळ वायूत आहे. तोच थोराहून थोर म्हणजेच सर्वश्रेष्ठ आहे. (३०)

त्याहून थोर परमेश्वर। महद्भूतांचा विचार।
त्याहून थोर परात्पर। परब्रह्म जाणावें ॥ ३१॥

त्या वायूहून थोर परमेश्वर आहे. हा परमेश्वर म्हणजे महत् भूत अर्थात अंतरात्मा होय. त्याच्याहून श्रेष्ठ परात्पर परब्रह्म आहे, हे जाणून घ्यावे. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आपनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.**

❑ ❑

## दशक १६ : समास ५

## अग्निनिरूपण

॥ श्रीराम ॥

धन्य धन्य हा वैश्वानरु। होये रघुनाथाचा श्वशुरु।
विश्वव्यापक विश्वंभरु। पिता जानकीचा ॥ १॥

हा अग्नी खरोखर धन्य धन्य आहे. तो रघुनाथाचा सासरा आहे. तो विश्वव्यापक असून विश्वाचे भरण-पोषणही तोच करतो. तोच जानकीचाही पिता आहे. (१)

ज्याच्या मुखें भगवंत भोक्ता। जो ऋषीचा फळदाता।
तमहिमरोगहर्ता। भर्ता विश्वजनाचा ॥ २॥

अग्नीच्या मुखानेच भगवंत सर्व यज्ञीय सामग्रीचा भोग घेतात. अग्नीच ऋषींना तपस्येचे फल देणारा आहे. अग्नीच अंधार, थंडी आणि रोग यांचे हरण करून जगातील सर्व लोकांचे पोषण करतो. (२)

नाना वर्ण नाना भेद। जीवमात्रांस अभेद।
अभेद आणी परम शुध। ब्रह्मादिकांसी ॥ ३॥

जीवमात्रांत अनेक वर्ण आणि अनेक भेद असतात. पण अग्नी मात्र सर्वांशी समत्वाने वागतो. तो ब्रह्मादी देवांसह सर्वांस भिन्न आणि परम शुद्ध असाच असतो. (३)

अग्नीकरितां सृष्टी चाले। अग्नीकरितां लोक धाले।
अग्नीकरितां सकळ ज्याले। ल्हानथोर ॥ ४॥

अग्नी आहे म्हणून सृष्टी चालते. अग्नीमुळे लोकांना संतोष होतो. अग्नीमुळेच सर्व लहान-थोर जगतात. (४)

अग्नीनें आळलें भूमंडळ। लोकांस राहाव्या जालें स्थळ।
दीप दीपिका नाना ज्वाळ। जेथें तेथें ॥ ५॥

अग्नीने पाणी शोषून भूमंडळ घट्ट केले आणि त्यामुळेच लोकांना राहाण्यासाठी स्थळ निर्माण झाले. अग्नीमुळेच नाना प्रकारचे दीप, दीपिका आणि नाना ज्वाळा जेथे तेथे दिसतात. (५)

पोटामधें जठराग्नी। तेणें क्षुधा लागे जनीं।
अग्नीकरितां भोजनीं। रुची येते ॥ ६॥

पोटात जठराग्नी असतो म्हणून लोकांना भूक लागते आणि त्या अग्नीमुळेच भोजनातही रुची येते. (६)

अग्नी सर्वांगी व्यापक। उष्णें राहे कोणी येक।
उष्ण नस्तां सकळ लोक। मरोन जाती ॥ ७॥

अग्नी सर्वांगास व्यापून असतो म्हणून आपल्या शरीरात उष्णता असते. तशी उष्णता राहिली नाही, तर सर्व लोक मरून जातील. (७)

आधीं अग्नी मंद होतो। पुढें प्राणी तो नासतो।
ऐसा हा अनुभव येतो। प्राणिमात्रांसी ॥ ८॥

माणूस मरायच्या आधी त्याच्या शरीरातील अग्नी मंद होतो आणि नंतर प्राणी मरतो. हा अनुभव सर्व प्राणिमात्रांना येत असतो. (८)

असतां अग्नीचें बळ। शत्रु जिंके तात्काळ।
अग्नी आहे तावत्काळ। जिणें आहे ॥ ९॥

अग्नीचे बळ जोपर्यंत असते, तोपर्यंत शत्रूला तात्काळ जिंकता येते. जोपर्यंत अग्नी असतो तोपर्यंत प्राणी जगतो. (९)

नाना रस निर्माण जाले। अग्नीकरितां निपजले।
माहांरोगी आरोग्य जाले। निमिषमात्रें ॥ १०॥

अग्नीमुळेच नाना रस उत्पन्न होतात. त्यामुळे महारोगीसुद्धा निमिषमात्रात म्हणजे अगदी अल्पकाळात आरोग्यसंपन्न होतात. (१०)

सूर्य सकळांहून विशेष। सूर्याउपरी अग्नीप्रकाश।
रात्रभागीं लोक अग्नीस। साहें करिती ॥ ११॥

सूर्य सर्वांहून श्रेष्ठ आहे, पण त्याहूनही अग्नीचा प्रकाश श्रेष्ठ आहे. रात्री सर्व लोकास अग्नीच साह्यभूत किंवा मदतकर्ता होतो. (११)

अंत्यजगृहींचा अग्नी आणिला। त्यास दोष नाहीं बोलिला।
सकळां गृहीं पवित्र जाला। वैश्वानरू ॥ १२॥

अंत्यजाच्या घरातला अग्नी आणला, तरी त्यामुळे दोष लागत नाही असे शास्त्र सांगते. कारण अग्नी हा सर्वांच्या गृहीचा पवित्रच असतो. (१२)

अग्नीहोत्र नाना याग। अग्नीकरितां होती सांग।
अग्नी त्रुप्त होतां मग। सुप्रसन्न होतो ॥ १३॥

अग्निहोत्र, नाना प्रकारचे यज्ञयाग अग्नीमुळेच यथासांग पार पडतात. अग्नी याप्रकारे तृप्त झाला की सुप्रसन्न होतो. (१३)

देव दानव मानव। अग्नीकरितां चाले सर्व।
सकळ जनासी उपाव। अग्नी आहे ॥ १४॥

देव, मानव, दानव यांचे सर्व व्यवहार अग्नीमुळेच चालतात. सर्व लोकांचे कल्याण अग्नीमुळेच होते. (१४)

लग्नें करिती थोर थोर। नाना दारूचा प्रकार।
भूमंडळीं यात्रा थोर। दारूनें शोभती ॥ १५॥

थोरामोठ्यांच्या लग्नसमारंभात शोभेच्या दारूचे नानाप्रकार करतात. या जगात मोठमोठ्या यात्रा भरतात. त्या वेळीही दारूनेच त्यांना शोभा येते. (१५)

नाना लोक रोगी होती। उष्ण औषधें सेविती।
तेणें लोक आरोग्य होती। वन्हीकरितां ॥ १६॥

अनेक लोकांना अनेक प्रकारचे रोग होतात तेव्हा उष्ण औषधे सेवन करून अग्नीच्या साहाय्यानेच लोक आरोग्यसंपन्न होतात. (१६)

ब्राह्मणास तनुमनु। सूर्यदेव हुताशनु।
येतद्विषईं अनुमानु। कांहींच नाहीं ॥ १७॥

ब्राह्मणाचे तर तन मन आदी सर्वस्व म्हणजे सूर्य आणि अग्नी हेच होत. याविषयी अनुमान करण्याची आवश्यकताच नाही. (१७)

लोकामधें जठरानळु। सागरीं आहे वडवानळु।
भूगोळबाहेर आवर्णानळु। शिवनेत्रीं विदुल्यता ॥ १८॥

लोकात जठराग्नी असतो. सागरात वडवाग्नी आहे. भूगोलाच्या बाहेर आवर्णानळ आहे, तर शंकराच्या डोळ्यांत वीजरूपी अग्नी आहे. (१८)

कुपीपासून अग्नी होतो। उंचदर्पणीं अग्नी निघतो।
काष्ठमंथनी प्रगटतो। चकमकेनें ॥ १९॥

काचेच्या भिंगापासून अग्नी निर्माण होतो. तसाच तो उंच आरशातूनही प्रकट होतो. लाकडाच्या घर्षणाने आणि चकमकीच्या योगेही अग्नी प्रकट होतो. (१९)

अग्नी सकळां ठाईं आहे। कठीण घिसणीं प्रगट होये।
आग्यासर्पें दग्ध होये। गिरीकंदरें ॥ २०॥

सर्व प्राणिमात्रांच्या ठायी अग्नी आहे. कठीण घर्षणाने तो प्रगट होतो. आग्या सर्पामुळे (मुखातून ज्वाला काढणाऱ्या सर्पामुळे) गिरिकंदरात आग लागून ती दग्ध होतात. (२०)

अग्नीकरितां नाना उपाये। अग्नीकरितां नाना अपाये।
विवेकेंविण सकळ होये। निरार्थक ॥ २१॥

अग्नीमुळेच नाना उपाय होतात किंवा नाना अपायही होऊ शकतात, म्हणून विवेकाची आवश्यकता आहे. विवेकाशिवाय सर्व निरर्थक ठरते. (२१)

भूमंडळीं ल्हानथोर। सकळांस वन्हीचा आधार।
अग्नीमुखें परमेश्वर। संतुष्ट होये ॥ २२॥

या पृथ्वीतलावर सर्व लहान-थोरांना अग्नीचाच आधार असतो. अग्निमुखानेच परमेश्वर संतुष्ट होतो. (२२)

ऐसा अग्नीचा महिमा। बोलिजे तितुकी उणी उपमा।
उत्तरोत्तर अगाध महिमा। अग्नीपुरुषाचा ॥ २३॥

असा हा अग्नीचा महिमा कितीही वर्णन केला तरी अपुराच होईल. त्याला द्यायला योग्य उपमाच नाही. अग्निपुरुषाचा महिमा हा उत्तरोत्तर जास्त अगाधच होणार आहे. (२३)

जीत असतां सुखी करी। मेल्यां प्रेत भस्म करी।
सर्वभक्षकु त्याची थोरी। काये म्हणोनी सांगावी ॥ २४॥

मनुष्य जिवंत असताना अग्नी त्याला सुख देतो आणि मेल्यावर तो प्रेताला भस्म करतो. अग्नी सर्वभक्षक आहे. त्याची थोरवी काय वर्णावी? (२४)

सकळ सृष्टीचा संव्हार। प्रळय करी वैश्वानर।
वैश्वानरें पदार्थमात्र। कांहींच उरेना ॥ २५॥

तो सर्व सृष्टीचा संहार करतो, सर्वांचा प्रलय करतो. पदार्थमात्रांपैकी काहीच शिल्लक उरत नाही. (२५)

नाना होम उदंड करिती। घरोघरीं वैशदेव चालती।
नाना क्षेत्रीं दीप जळती। देवापासीं ॥ २६॥

लोक नाना प्रकारचे होम करतात. घरोघरी वैश्वदेव चालतात. निरनिराळ्या क्षेत्रांमध्ये देवापाशी दीप जळत असतात. (२६)

दीपाराधनें निलांजने। देव वोवाळिजे जने।
खरें खोटें निवडणें। दिव्य होतां ॥ २७॥

दीपाराधना, नीरांजने इत्यादी अनेक प्रकारे देवाला लोक ओवाळतात. अग्निदिव्य करून लोक खऱ्याखोट्याची निवड परीक्षा करतात. (२७)

अष्टधा प्रकुर्ती लोक तिन्ही। सकळ व्यापून राहिला वन्ही।
अगाध महिमा वदनीं। किती म्हणोनी बोलावा॥ २८॥

अष्टधा प्रकृती आणि तीनही लोक यांना व्यापून अग्नी राहतो, अशा त्या अग्नीचा महिमा मुखाने किती म्हणून वर्णन करावा. (२८)

च्यारी शृंगे त्रिपदीं जात। दोनी शिरें सप्त हात।
ऐसा बोलिला शास्त्रार्थ। प्रचितीविण ॥ २९॥

अग्नीला चार शिंगे, तीन पाय, दोन शिरे आणि सात हात आहेत, असा शास्त्रार्थ आहे. अग्नीची चार शृंगे धर्म, अर्थ, काम, मोक्ष.
तीन पाय—कर्म, उपासना, ज्ञान
दोन शिरे—प्रवृत्ती आणि निवृत्ती
सात हात—भू: आदी ७ व्याहृती
हे प्रचीतीशिवाय थोडेच सांगितले जाते? (२९)

ऐसा वन्ही उष्णमूर्ती। तो मी बोलिलों येथामती।
न्यूनपूर्ण क्षमा श्रोतीं। केलें पाहिजे ॥ ३०॥

अशा या उष्णमूर्ती अग्नीचे वर्णन मी यथामती केले आहे. यात अधिक-उणे झाले असेल, तर श्रोत्यांनी क्षमा केली पाहिजे. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अग्निनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.

❑ ❑

## दशक १६ : समास ६
## वायोस्तवनिरूपण

॥ श्रीराम ॥

धन्य धन्य हा वायदेव। याचा विचित्र स्वभाव।
वायोकरितां सकळ जीव। वर्तती जनीं ॥ १॥

हा वायुदेव खरोखरच धन्य धन्य आहे. याचा स्वभाव जरा विचित्र आहे. या वायूमुळेच या जगात सर्व जीव जगत असतात. (१)

वायोकरितां श्वासोश्वास। नाना विद्यांचा अभ्यास।
वायोकरितां शरीरास। चळण घडे ॥ २॥

वायूमुळेच जीवांना श्वासोच्छ्वास करता येतो. नाना विद्यांचा अभ्यास करता येतो. वायूमुळेच शरीरास चलनवलन घडते. (२)

चळण वळण प्रासारण। निरोधन आणी आकोचन।
प्राण अपान व्यान उदान। समान वायु ॥ ३॥

चलन, वलन, प्रसारण, निरोध आणि आकुंचन हे सर्व वायूमुळे होते. शरीरात प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे पाच मुख्य प्राण आहेत. यांच्या रूपाने वायूच माणसाच्या शरीरात वावरतो. (३)

नाग कूर्म कर्कश वायो। देवदत्त धनंजयो।
ऐसे हे वायोचे स्वभावो। उदंड असती ॥ ४॥

नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय हे पाच उपप्राण आहेत. अशा रीतीने वायूचे स्वभाव उदंड आहेत. (४)

**वायो ब्रह्मांडीं प्रगटला। ब्रह्मांडदेवतांस पुरवला।**
**तेथुनी पिंडीं प्रगटला। नाना गुणें ॥ ५ ॥**

प्रथम वायू ब्रह्मांडात प्रगटला. तेथे ब्रह्मादी अनेक देवता त्याने निर्माण केल्या. नंतर तो अनेक प्रकारांनी पिंडात प्रगटला. (५)

**स्वर्गलोकीं सकळ देव। तैसेचि पुरुषार्थी दानव।**
**मृत्यलोकींचे मानव। विख्यात राजे ॥ ६ ॥**

स्वर्गलोकातील सर्व देव, तसेच पुरुषार्थी असे दानव, मृत्युलोकातील मानव आणि इतर प्रख्यात राजे, (६)

**नरदेहीं नाना भेदे। अनंत भेदाचीं श्वापदें।**
**वनचरें जळचरें आनंदें। क्रीडा करिती ॥ ७ ॥**

नरदेहातील अनेक भेद, अनंत भेदाची श्वापदे, वनचर, जलचर प्राणी वगैरे या वायूमुळेच आनंदात क्रीडा करीत असतात. (७)

**त्या समस्तांमध्यें वायु खेळे। खेचरकुळ अवघें चळे ।**
**उठती वन्हीचे उबाळे। वायोकरितां ॥ ८ ॥**

या सर्वांमध्ये वायू खेळत असतो. सर्व पक्ष्यांचे समुदायही वायूमुळेच उडतात. हालचाल करतात. आगीचे लोळही वायूमुळेच उठतात. (८)

**वायो मेघाचें भरण भरी। सवेंच पिटून परतें सारी।**
**वायो ऐसा कारबारी। दुसरा नाहीं ॥ ९ ॥**

वायूच मेघांना आकाशात भरतो. नंतर स्वत:च त्यांना झोडपून दूर सारतो. वायूसारखा कारभारी दुसरा कुणी नाही. (९)

**परी ते आत्मयाची सत्ता। वर्ते शरीरी तत्वता।**
**परी व्यापकपणें यासमर्था। तुळणा नाहीं ॥ १० ॥**

शरीरातील वायू हा अंतरात्म्याच्या सत्तेत, त्याच्या इच्छेनुसार वागत असतो. पण बाहेरील वायू व्यापक आणि स्वतंत्र असल्याने त्याच्या सामर्थ्याला मर्यादाच नसते. (१०)

**गिरीहून दाट फौजा। मेघ उठिले लोककाजा।**
**गर्जगर्जों तडक विजा। वायोबळें ॥ ११ ॥**

पर्वताच्या शिखरांवाचून मेघांच्या दाट फौजा लोकांच्या कल्याणासाठी वायूच एकत्रित करतो. वायूच्या बळानेच मेघ गर्जना करू लागतात, विजा तडकू लागतात. (११)

**चंद्र सूर्य नक्षत्रमाळा। ग्रहमंडळें मेघमाळा।**
**ये ब्रह्मांडीं नाना कळा। वायोकरितां ॥ १२ ॥**

या ब्रह्मांडातील चंद्र, सूर्य, नक्षत्रमाला, ग्रहमंडले आणि मेघमाला इत्यादी नाना कळा वायूमुळेच होतात. (१२)

**येकवटलें तें निवडेना। कालवलें तें वेगळें होयेना।**
**तैसें हे बेंचाड नाना। केवी कळे ॥ १३ ॥**

वायूमुळेच पंचमहाभूते एकवटतात. ती वेगळी निवडून काढता येत नाहीत. त्यांचे मिश्रण झालेले असते ते वेगळे होऊ शकत नाही. याप्रमाणे हा सगळा गुंता झालेला असतो. तो कसा कळणार? (१३)

**वायो सुटे सरारां। असंभाव्य पडती गारा।**
**तैसे जीव हे नीरा-। सरिसे पडती ॥ १४ ॥**

मोठा सोसाट्याचा वारा सुटला की, असंभाव्य गारा पडू लागतात. तसेच त्या पाण्याबरोबर अनेक जीवही पडतात. (१४)

**वायुरूपें कमळकळा। तोचि आधार जळा।**
**तया जळाच्या आधारें भूगोळ। शेषें धरिलें ॥ १५ ॥**

कमळाला जसा देठाचा आधार असतो, तसा जल, भूगोल आणि शेष इत्यादींना वायूचा आधार असतो. (१५)

**शेषास पवनाचा आहार। आहारें फुगे शरीर।**
**तरी मग घेतला भार। भूमंडळाचा ॥ १६ ॥**

वायू हा शेषाचा आहार आहे. त्या वायूने शेषाचे शरीर फुगते आणि मग तो भूमंडळाचा भार सहन करू शकतो. (१६)

**माहांकूर्माचें शरीर भलें। नेणों ब्रह्मांड पालथें घातलें।**
**येवढें शरीर तें राहिलें। वायोचेनी ॥ १७ ॥**

महाकूर्माचे शरीर भलेमोठे असते. त्याच्याकडे पाहिले की ब्रह्मांडच जणू पालथे घातले आहे की काय असे वाटते. ते एवढे प्रचंड शरीर वायूमुळेच राहते. (१७)

**वाराहें आपुलें दंतीं। पृथ्वी धरिली होती।**
**तयाची येवढी शक्ती। वायुबळें ॥ १८ ॥**

वराहाने आपल्या दाढांवर पृथ्वी धारण केली होती. त्याला वायूच्या बळानेच एवढी शक्ती लाभली होती. (१८)

**ब्रह्मा विष्णु महेश्वर। चौथा आपण जगदेश्वर।**
**वायोस्वरूप विचार। विवेकी जाणती ॥ १९ ॥**

ब्रह्मा, विष्णू, महेश्वर आणि चौथा स्वत: जगदीश्वर हे सर्व वायुस्वरूपच असतात. हा विचार विवेकी जाणतात. (१९)

तेतिस कोटी सुरवर। अठ्यासी सहस्र ऋषेश्वर।
सिध योगी भारेंभार। वायोकरितां ॥ २० ॥

तेहतीस कोटी देव, अठ्ठ्याऐंशी हजार ऋषीश्वर, सिद्ध आणि भारंभार योगी हे सर्व वायुरूपच असतात. (२०)

नव कोटी कात्यायणी। छेपन कोटी च्यामुंडिणी।
औट कोटी भूतखाणी। वायोरूपें ॥ २१ ॥

नवकोटी कात्यायनी, छप्पन्न कोटी चामुंडा आणि साडेतीन कोटी भूतयोनी ही सर्व वायुरूपच असतात. (२१)

भूतें देवतें नाना शक्ती। वायोरूप त्यांच्या वेक्ती।
नाना जीव नेणों किती। भूमंडळीं ॥ २२ ॥

भूते, दैवते, नाना शक्ती यांचे देह वायुरूपच असतात. या भूमंडळावर असेच किती वायुस्वरूप जीव आहेत. ते कोण जाणणार? (२२)

पिंडी ब्रह्मांडीं पुरवला। बाहेर कंचुकास गेला।
सकळां ठाईं पुरवला। समर्थ वायु ॥ २३ ॥

पिंड, ब्रह्मांडाला पुरून वायू बाहेरून आवरण करण्यास गेला आहे . असा हा वायू समर्थ असून सर्वांठायी पुरून उरला आहे. (२३)

ऐसा हा समर्थ पवन। हनुमंत जयाचा नंदन।
रघुनाथस्मरणीं तनमन। हनुमंताचें ॥ २४ ॥

अशा या समर्थ वायूचा पुत्र हनुमान आहे. त्या हनुमंताचे तनमन रघुनाथाच्या स्मरणात लागलेले आहे. (२४)

हनुमंत वायोचा प्रसीध। पित्यापुत्रांस नाहीं भेद।
म्हणोनी दोघेहि अभेद। पुरुषार्थविषीं ॥ २५ ॥

हनुमंत हा वायूचा प्रसिद्ध पुत्र असून पितापुत्रात भेद नाही. म्हणून पुरुषार्थाच्या बाबतीत दोघेही समान आहेत. (२५)

हनुमंतास बोलिजे प्राणनाथ। येणें गुणें हा समर्थ।
प्राणेंविण सकळ वेर्थ। होत जातें ॥ २६ ॥

हनुमंताला प्राणनाथ म्हणतात. यावरून त्याचे सामर्थ्य किती आहे हे कळून येते. एक प्राण नसेल तर सर्व व्यर्थच जाते. (२६)

मागें मृत्य आला हनुमंता। तेव्हां वायो रोधला होता।
सकळ देवांस आवस्ता। प्राणांत मांडलें ॥ २७ ॥

पूर्वी सूर्यबिंब ग्रासण्यास गेला असता हनुमानाला इंद्राचे वज्र लागून मूर्च्छा आली, तेव्हा हनुमंताचा मृत्यूच ओढवला असता, पण वायूने सर्वांच्या प्राणांचा निरोध केला आणि त्यामुळे सर्व देवांची प्राणान्त अवस्था झाली. (२७)

देव सकळ मिळोन। केलें वायूचें स्तवन।
वायो प्रसन्न होऊन। मोकळें केलें ॥ २८ ॥

तेव्हा सर्व देवांनी मिळून वायूचे स्तवन केले. वायूने प्रसन्न होऊन सर्वांना मोकळे केले. (२८)

म्हणोनि प्रतापी थोर। हनुमंत ईश्वरी अवतार।
याचा पुरुषार्थ सुरवर। पाहातचि राहिले ॥ २९ ॥

(तेव्हा सर्व देवांनी हनुमंतास अनेक वर दिले) म्हणून असा हा थोर प्रतापी हनुमान म्हणजे ईश्वरी अवतारच आहे. सर्व देव थक्क होऊन याचा पुरुषार्थ पाहातच राहिले. (२९)

देव कारागृहीं होते। हनुमंतें देखिलें अवचितें।
संव्हार करूनी लंकेभोंवतें। विटंबून पाडिलें ॥ ३० ॥

देव रावणाच्या कारागृहात होते, हे हनुमंताने पाहिल्यावर त्याने अकस्मात अनेक राक्षसांचा संहार करून त्यांची विटंबना करून त्यांना लंकेभोवती फेकून दिले. (३०)

उसिणें घेतलें देवांचें। मूळ शोधिलें राक्षसांचें।
मोठें कौतुक पुछ्यकेताचें। आश्चीर्य वाटे ॥ ३१ ॥

रावणाने देवांना दिलेल्या कष्टाचे हनुमंताने उट्टे काढले. त्याने राक्षसांची पाळेमुळे खणून काढली. या पुच्छकेतूच्या पराक्रमाचे मोठे आश्चर्य आणि कौतुक वाटते. (३१)

रावण होता सिंह्यासनावरी। तेथें जाऊन ठोंसरे मारी।
लंकेमधें निरोध करी। उदक कैचें ॥ ३२ ॥

रावण सिंहासनावर बसला असता तेथे जाऊन हनुमंताने त्यास ठोसे मारले. लंकेमध्ये त्याने निरोध केला. त्यामुळे तेथे उदक मिळेनासे झाले. (३२)

देवास आधार वाटला। मोठा पुरुषार्थ देखिला।
मनामधें रघुनाथाला। करुणा करिती ॥ ३३ ॥

त्याचा तो मोठा पराक्रम पाहून देवांना आधार वाटला. त्यांनी मनामध्ये रघुनाथाला करुणेने आळविले. (३३)

दैत्य आवघे संव्हारिले। देव तत्काळ सोडिले।
प्राणीमात्र सुखी जाले। त्रयलोक्यवासी ॥ ३४ ॥

तेव्हा त्यांनी सर्व दैत्यांचा संहार केला. देवांना तात्काळ कैदेतून सोडविले आणि त्रैलोक्यातील सर्व प्राणिमात्रांना सुखी केले. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'वायोस्तवनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.**

❑ ❑

## दशक १६ : समास ७
### महद्भूतनिरूपण

॥ श्रीराम ॥

पृथ्वीचें मूळ जीवन। जीवनाचें मूळ अग्न।
अग्नीचें मूळ पवन। मागां निरोपिलें ॥ १॥

पृथ्वीचे मूळ जीवन म्हणजे पाणी हे आहे. पाण्याचे मूळ अग्नी हे आहे. अग्नीचे मूळ वायू हे आहे. याचे निरूपण पूर्वी केले आहे. (१)

आतां ऐका पवनाचें मूळ। तो हा अंतरात्माचि केवळ।
अत्यंतचि चंचळ। सकळांमधें ॥ २॥

आता वायूचे मूळ जो अंतरात्मा त्याचे निरूपण ऐका. हा अंतरात्मा सर्वांमध्ये व्याप्त असून अत्यंतच चंचळ आहे. (२)

तो येतो जातो दिसेना। स्थिर होऊन बैसेना।
ज्याचें रूप अनुमानेना। वेदश्रुतींसी ॥ ३॥

तो येतो-जातो. पण दिसत नाही. जराही स्थिर होऊन बसत नाही. वेद आणि श्रुतीही त्याच्या रूपासंबंधी अनुमान करू शकत नाहीत. (३)

मुळीं मुळींचे स्फूर्ण। तेंचि अंतरात्म्याचें लक्षण।
जगदेश्वरापासून त्रिगुण। पुढें जाले ॥ ४॥

मूळ परब्रह्माच्या ठिकाणी जे आद्य स्फुरण तेच अंतरात्म्याचे लक्षण आहे. यालाच जगदीश्वर म्हणतात. त्याच्यापासूनच पुढे त्रिगुण प्रकट झाले. (४)

त्रिगुणापासून जालीं भूतें। पावलीं पष्ट दशेतें।
त्या भूतांचें स्वरूप तें। विवेकें वोळखावें ॥ ५॥

त्रिगुणापासूनच पुढे पंचमहाभूते स्पष्ट दशेला आली. विवेकाने त्या पंचमहाभूतांचे स्वरूप जाणून घ्यावे. (५)

त्यामधें मुख्य आकाश। चौ भूतामधें विशेष।
याच्या प्रकाशें प्रकाश। सकळ कांहीं ॥ ६॥

त्या पंचमहाभूतांमध्ये आकाश हे इतर चार महाभूतांपेक्षा विशेष महत्त्वपूर्ण आहे. याच्या प्रकाशामुळेच सर्व काही प्रकाशित होते. (६)

येक विष्णु महद्भूत। ऐसा भूतांचा संकेत।
परंतु याची प्रचीत। पाहिली पाहिजे ॥ ७॥

'एक विष्णू महद्भूत' असे म्हटले जाते. परंतु विवेकाने याची प्रचीती घेतली पाहिजे. (७)

विस्तारें बोलिलीं भूतें। त्या भूतामधें व्यापक तें।
विवरोन पाहातां येतें। प्रत्ययासी ॥ ८॥

सर्व भूतांचे विस्ताराने वर्णन केले आहे. त्या भूतामध्ये सर्वांत ते व्यापक आहे. याचा प्रत्यय आपणांस विवरणाने येतो. (८)

आत्मयाच्या चपळपणापुढें। वायो तें किती बापुडें।
आत्म्याचें चपळपण रोकडें। समजोन पाहावें ॥ ९॥

अंतरात्मा हा इतका चपळ आहे की वायूही त्याच्या चंचळपणापुढे कमी पडतो. आत्म्याच्या चंचळपणाची रोकडी प्रचीती नीट समजून घ्यावी. (९)

आत्म्यावेगळें काम चालेना। आत्मा दिसेना ना आडळेना।
गुप्तरूपें विचार नाना। पाहोन सोडी ॥ १०॥

आत्म्याशिवाय कुठलेही काम होऊ शकत नाही. तो अत्यंत सूक्ष्म असल्याने दिसत नाही, आढळत नाही. पण तोच गुप्तरूपाने नाना प्रकारे विचार करून निश्चय करतो. (१०)

पिंड ब्रह्मांड व्यापून धरिलें। नाना शरीरीं विळसलें।
विवेकी जनासी भासलें। जगदांतरीं ॥ ११॥

अंतरात्मा पिंड-ब्रह्मांडास आत-बाहेर व्यापून असतो. नाना शरीरांत तोच विलसत असतो. विवेकी पुरुषांना जगदांतरी त्याचा प्रत्यय येतो. (११)

आत्म्याविण देहे चालती। हें तों न घडे कल्पांतीं।
अष्टधा प्रकुर्तीच्या वेक्ती। रूपासी आल्या ॥ १२॥

अंतरात्म्याशिवाय देह चालू शकेल असे कल्पांतीही घडू शकत नाही. अष्टधा प्रकृतीतील घटक जे पंचमहाभूते आणि त्रिगुण ते आत्म्यामुळे व्यक्त दशेस आले. (१२)

मुळापासून सेवटवरी। सकळ कांहीं आत्माच करी।
आत्म्यापैलिकडे निर्विकारी। परब्रह्म तें ॥ १३॥

मुळापासून शेवटापर्यंत सर्व काही अंतरात्माच करतो. निर्विकारी परब्रह्म हे आत्म्याच्या पलीकडील आहे. (१३)

आत्मा शरीरीं वर्ततो। इंद्रियेंग्राम चेष्टवितो।
नाना सुखदुःखें भोगितो। देह्यात्मयोगें ॥ १४॥

आत्मा हा शरीराच्या ठिकाणी राहातो. सर्व इंद्रियसमूहाला तोच चेतवितो तसेच देह आणि अंतरात्मा यांच्या संयोगाने नाना सुख- दुःखे भोगतो. (१४)

**सप्तकंचुक हें ब्रह्मांड। त्यामधें सप्तकंचुक पिंड।**
**त्या पिंडामधें आत्मा जाड। विवेकें वोळखा ॥ १५॥**

हे ब्रह्मांड सात आवरणांनी युक्त असून त्यातच सप्त आवरणांनी युक्त पिंड असतो. त्या पिंडामध्ये जो श्रेष्ठ असा आत्मा असतो, तो विवेकाने जाणून घ्यावा. (१५)

**शब्द ऐकोन समजतो। समजोन प्रत्योत्तर देतो।**
**कठीण मृद सीतोष्ण जाणतो। त्वचेमधें ॥ १६॥**

तोच शब्द ऐकून त्याचा अर्थ समजून घेतो आणि प्रत्युत्तरही देतो. त्वचेच्या योगे तो कठीण, मृदू, तसेच शीत आणि उष्ण हेही जाणतो. (१६)

**नेत्रीं भरोनी पदार्थपाहाणें। नाना पदार्थ परीक्षणें।**
**उंच नीच समजणें। मनामधें ॥ १७॥**

नेत्रामध्ये भरून राहून नाना पदार्थ पाहतो, त्यांची परीक्षा करतो आणि मनामध्ये त्यातील श्रेष्ठ, कनिष्ठही समजतो. (१७)

**क्रूरदृष्टी सौम्यदृष्टी। कपटदृष्टी कृपादृष्टी।**
**नाना प्रकारीच्या दृष्टी। भेद जाणे ॥ १८॥**

क्रूर दृष्टी, सौम्य दृष्टी, कपट दृष्टी, कृपा दृष्टी नाना प्रकारच्या दृष्टींमधील भेदही तो जाणतो. (१८)

**जिव्हेमधें नाना स्वाद। निवडूं जाणे भेदाभेद।**
**जें जें जाणें तें तें विशद। करुनी बोले ॥ १९॥**

जिभेमध्ये राहून तो नाना स्वादामधील भेद-अभेद जाणू शकतो आणि जे जे जाणतो ते स्पष्ट करून सांगूही शकतो. बोलू शकतो. (१९)

**उत्तम अन्नाचे परिमळ। नाना सुगंध परिमळ।**
**नाना फळांचे परिमळ। घ्राणइंद्रियें जाणे ॥ २०॥**

घ्राणेंद्रियाच्या योगाने तो उत्तम अन्नाचा सुंदर वास, नाना प्रकारचे सुगंध, नाना फळांचे, फुलांचे गंध वगैरे जाणतो. (२०)

**जिव्हेनें स्वाद घेणेंबोलणें। पाणीइंद्रियें घेणें देणें।**
**पादइंद्रियें येणें जाणें। सर्वकाळ ॥ २१॥**

जिभेने स्वाद घेणे आणि बोलणे, हाताने पदार्थ देणे आणि घेणे, आणि पायांनी येणे-जाणे वगैरे सर्व क्रिया सर्वकाळ अंतरात्माच करीत असतो. (२१)

**शिस्नइंद्रियें सुरतभोग। गुदइंद्रियें मळोत्सर्ग।**
**मनेंकरूनी सकळ सांग। कल्पून पाहे ॥ २२॥**

जननेंद्रियांनी कामभोग, गुदइंद्रियाने मलोत्सर्ग करणे, मनाने सर्व प्रकारच्या कल्पना करणे, (२२)

**ऐसे व्यापार परोपरी। त्रिभुवनीं येकलाचि करी।**
**त्याची वर्णावया थोरी। दुसरा नाहीं ॥ २३॥**

असे परोपरीचे व्यापार त्रिभुवनात तो एकटाच करीत असतो. त्याची थोरवी वर्णन करायला त्याच्याशिवाय दुसरा कोणी नाहीच. (२३)

**त्याविण दुसरा कैचा। जे महिमा सांगावा तयाचा।**
**व्याप आटोप आत्मयाचा। न भूतो न भविष्यति॥२४॥**

त्याच्याशिवाय दुसरा कोणी नाहीच, तर त्याची थोरवी कशी वर्णावी? अंतरात्म्याचा व्याप आणि त्याची कार्यशक्ती ही पूर्वी कधी झालेली नाही व पुढेही कधी होणार नाही, अशी विलक्षण आहे. (२४)

**चौदा विद्या चौसष्टी कळा। धूर्तपणाच्या नाना कळा।**
**वेद शास्त्र पुराण जिव्हाळा। तेणेंविण कैचा ॥ २५॥**

चौदा विद्या, चौसष्ट कला, शिवाय धूर्तपणाच्या नाना कळा, तसेच वेद, शास्त्रे, पुराणे यांचे रहस्य हे सर्व अंतरात्म्यामुळेच जाणणे शक्य आहे. त्याच्याशिवाय काहीही शक्य नाही. (२५)

**येहलोकींचा आचार। परलोकीं सारासारविचार।**
**उभय लोकींचा निर्धार। आत्माच करी ॥ २६॥**

इहलोकातील आचार, परलोकासंबंधी सारासारविचार, याप्रमाणे उभय लोकांसंबंधी निर्धार अंतरात्माच करतो. (२६)

**नाना मतें नाना भेद। नाना संवाद वेवाद।**
**नाना निश्चय भेदाभेद। आत्माच करी ॥ २७॥**

नाना मते, नाना भेद, नाना संवाद आणि नाना विवाद, नाना निश्चय आणि भेदाभेद सर्व अंतरात्माच करतो. (२७)

**मुख्य तत्व विस्तारलें। तेणें तयास रूप आणिलें।**
**येणेकरितां सार्थक जालें। सकळ कांहीं ॥ २८॥**

मुख्य तत्त्वाचा विस्तार होऊन या सृष्टीच्या व्यापास रूप प्राप्त झाले. या अंतरात्म्यामुळे सर्व काही सार्थक झाले आहे. (२८)

**लिहिणें वाचणें पाठांतर करणें। पुसणें सांगणें अर्थ करणें।**
**गाणें वाजवणें नाचणें। आत्म्याचकरितां ॥ २९॥**

लिहिणे, वाचणे, पाठांतर करणे, विचारणे, सांगणे, अर्थ करणे, गाणे, वाद्य वाजवणे, नाचणे हे सर्व काही अंतरात्म्याकरताच असते. (२९)

नाना सुखें आनंदतो। नाना दुःखें कष्टी होतो।
देहे धरितो आणी सोडितो। नानाप्रकारें ॥ ३०॥

अंतरात्माच नाना सुखांनी आनंदित होतो. नाना दुःखांनी कष्टी होतो. नाना प्रकारचे देह धरतो आणि देह सोडतो. (३०)

येकलाचि नाना देहे धरी। येकलाचि नटे परोपरी।
नट नाट्यकळा कुसरी। त्याविण नाहीं ॥ ३१॥

अंतरात्मा एकटाच नाना देह धारण करतो. एकटाच नाना प्रकारे नटतो. नट, नाट्यकला कौशल्य अंतरात्म्याशिवाय काहीच होऊ शकत नाही. (३१)

येकलाचि जाला बहुरूपी। बहुरूपी बहुसाक्षपी।
बहुरूपें बहुप्रतापी। आणी लंडी ॥ ३२॥

तो एकटाच बहुरूपी होतो आणि बहुरूप्याप्रमाणे नाना सोंगे घेतो. तो बहुरूपी असून मोठा उद्योगी आहे. अनेक रूपे धारण करतो. कधी तो अत्यंत प्रतापी बनतो, तर कधी भित्र्याचे सोंग घेतो. (३२)

येकलाचि विस्तारला कैसा। पाहे बहुविध तमासा।
दंपत्येंविण कैसा। विस्तारला ॥ ३३॥

तो एकटाच असून त्याचा इतका अफाट विस्तार झालाच कसा हे एक आश्चर्यच आहे. दांपत्य नसून अंतरात्म्याचा एवढा विस्तार कसा काय झाला? (३३)

स्त्रियांस पाहिजे पुरुष। पुरुषासी पाहिजे स्त्रीवेष।
ऐसा आवडीचा संतोष। परस्परें ॥ ३४॥

स्त्रीला पुरुष हवासा वाटतो. पुरुषाला स्त्री हवी असते. याप्रमाणे परस्परांना परस्परांच्या आवडीमुळे संतोष वाटतो. (३४)

स्थूळाचें मूळ ते लिंग। लिंगामधें हे प्रसंग।
येणें प्रकारें जग। प्रत्यक्ष चाले ॥ ३५॥

स्थूल देहाचे मूळ सूक्ष्म देहात आहे. सूक्ष्म देहातील वासनेमुळे स्त्रीपुरुष हा भेद निर्माण होतो. याप्रमाणे जगात प्रत्यक्ष व्यवहार चालतो. (३५)

पुरुषांचा जीव स्त्रियांची जीवी। ऐसी होती उठाठेवी।
परी या सूक्ष्माची गोवी। समजली पाहिजे ॥ ३६॥

पुरुषांचा जीव आणि स्त्रियांची जीवी असे मुळात नाही, पण अज्ञानी लोक उगीचच अशी उठाठेव करतात. परंतु सूक्ष्म देहातील हा वासनेचा गुंता मात्र विवेकाने जाणून घेतला पाहिजे. (३६)

स्थूळाकरितां वाटे भेद। सूक्ष्मी आवघेंचि अभेद।
ऐसें बोलणें निरुध। प्रत्यया आलें ॥ ३७॥

स्थूल देहामध्ये हा भेद दिसतो खरा, पण सूक्ष्माच्या ठिकाणी अभेदच असतो. असे हे निश्चयात्मक असून अनुभवास येणारे आहे. (३७)

बायकोनें बायकोस भोगिलें। ऐसें नाही कीं घडलें।
बायेकोस अंतरी लागलें। ध्यान पुरुषाचें ॥ ३८॥

स्त्रीने स्त्रीचा उपभोग घेतला असे कधी घडत नाही. स्त्रीच्या अंतरी पुरुषाचेच ध्यान लागलेले असते. (३८)

स्त्रीसी पुरुष पुरुषास वधु। ऐसा आहे हा समंधु।
याकारणें सूक्ष्म संवादु। सुक्ष्मीं च आहे ॥ ३९॥

स्त्रीस पुरुष हवा असतो आणि पुरुषास वधू म्हणजे स्त्री हवी असते असा हा संबंध असतो. म्हणून या सूक्ष्म संवादाचे मूळ सूक्ष्म देहातच म्हणजे वासनेतच आहे. (३९)

पुरुषइछेमधें प्रकृती। प्रकृतीमधें पुरुषवेक्ती।
प्रकृतीपुरुष बोलती। येणें न्यायें ॥ ४०॥

पुरुषाच्या ठिकाणी जी इच्छा ती म्हणजे प्रकृती आणि प्रकृतीमध्ये जी जाणीव तो पुरुष होय. या न्यायानेच लोक पुरुष-प्रकृती किंवा प्रकृति-पुरुष असे म्हणतात. (४०)

पिंडावरून ब्रह्मांड पाहावें। प्रचीतीनें प्रचीतीस घ्यावें।
उमजेना तरी उमजावें। विवरविवरों ॥ ४१॥

याप्रमाणे पिंडावरून ब्रह्मांडाचा विचार करावा. पिंडातील अनुभवाने ब्रह्मांडातील अनुभव जाणावा. जर हे उमजत नसेल तर वारंवार विवरण करून समजून घ्यावे. (४१)

द्वैतइछा होते मुळीं। तरी ते आली भूमंडळीं।
भूमंडळीं आणी मुळीं। रुजु पाहावें ॥ ४२॥

मूळमायेतच द्वैताची इच्छा झाली. तेच द्वैत पुढे दृश्य सृष्टीत आले. दृश्य सृष्टीतील द्वैत आणि मूळमायेतील द्वैत यांचा मेळ घालून पाहावा. (४२)

येथें मोठा जाला साक्षेप। फिटला श्रोतयांचा आक्षेप।
जे प्रकृतीपुरुषाचें रूप। निवडोन गेलें ॥ ४३॥

याप्रमाणे प्रकृति-पुरुषाचे रूप येथे स्पष्ट करून सांगितले आहे. त्यामुळे श्रोत्यांच्या आक्षेपाचे समाधान झाले आहे. हे फारच मोठे कार्य साधले गेले आहे, असे श्रीसमर्थ म्हणतात. (४३)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'महद्‌भूतनिरूपणनाम ' समास सातवा समाप्त.**



## दशक १६ : समास ८
## आत्मारामनिरूपण

॥ श्रीराम ॥

नमूं गणपती मंगळमूर्ती। जयाचेनि मतिस्फूर्ती।
लोक भजती स्तवन करिती। आत्मयाचें ॥ १ ॥

आता मंगलमूर्ती जो गणपती त्याला वंदन करू या. त्याच्यामुळे बुद्धीमध्ये स्फूर्ती उत्पन्न होते आणि लोक आत्म्याचे स्तवन व भजन करतात. (१)

नमूं वैखरी वागेश्वरी। अभ्यांतरीं प्रकाश करी।
नाना भरोवरी विवरी। नाना विद्या ॥ २ ॥

नंतर वाणीरूपी वागीश्वरीला नमन करू या. तिच्या कृपेनेच अंतरात प्रकाश पडतो. तिच्यामुळेच नाना विद्या, नाना प्रकारे विवरण करून स्पष्ट केल्या जातात. (२)

सकळ जनामधें नाम। रामनाम उत्तमोत्तम।
श्रम जाउनी विश्राम। चंद्रमौळी पावला ॥ ३ ॥

सर्व लोकांत रामनाम हे सर्व नामांत उत्तमोत्तम आहे. रामनामाच्या प्रभावाने चंद्रमौळी शंकरांचा शीण नाहीसा होऊन त्यांना विश्राम प्राप्त झाला. (३)

नामाचा महिमा थोर। रूप कैसें उत्तरोत्तर।
परात्पर परमेश्वर। त्रयलोक्यधर्ता ॥ ४ ॥

नामाचा महिमा थोर आहे. नामाच्या योगे परमेश्वराच्या सगुण रूपाचे म्हणजे त्रैलोक्याच्या धर्त्याचे रूप प्रगट होते आणि उत्तरोत्तर प्रगती होऊन निर्गुण, निराकार जो परात्पर त्याच्या स्वरूपाशी तादात्म्य होते. (४)

आत्माराम चहुंकडे। लोक वावडे जिकडे तिकडे।
देहे पडे मृत्य घडे। आत्मयाविण ॥ ५ ॥

आत्माराम हा अंतर्यामी रूपाने सगळीकडे व्यापून आहे. त्याच्या योगाने लोक जिकडे-तिकडे वावरत असतात. आत्मा देह सोडून गेला की, आत्म्याशिवाय देहाचा मृत्यू घडून येतो. (५)

जीवात्मा शिवात्मा परमात्मा। जगदात्मा विश्वात्मा गुप्तात्मा।
आत्मा अंतरात्मा सूक्ष्मात्मा। देवदानवमानवीं ॥ ६ ॥

देव, दानव व मानव आत्म्याला अनेक नावांनी ओळखतात. जीवात्मा, शिवात्मा, परमात्मा, जगदात्मा, विश्वात्मा, गुप्तात्मा, आत्मा, अंतरात्मा, सूक्ष्मात्मा ही त्याचीच नावे आहेत. (६)

सकळ मार्ग चालती बोलती। अवतारपंगतीची गती।
आत्म्याकरितां होत जाती। ब्रह्मादिक ॥ ७ ॥

अंतरात्म्यामुळेच जगातील सर्व मार्ग चालतात, बोलतात, नाना अवतारांची मालिका, त्यांचे कार्य आत्म्यामुळेच घडून येते. ब्रह्मादिक देव आत्म्यामुळेच येतात आणि जातात. (७)

नादरूप जोतीरूप। साक्षरूप सत्तारूप।
चैतन्यरूप सस्वरूप। द्रष्टारूप जाणिजे ॥ ८ ॥

त्या आत्म्यालाच नादरूप, ज्योतीरूप, साक्षरूप, सत्तारूप, चैतन्यरूप, स्वस्वरूप, द्रष्टारूप म्हणून जाणतात. (८)

नरोत्तमु वीरोत्तमु। पुरुषोत्तमु रघोत्तमु।
सर्वोत्तमु उत्तमोत्तमु। त्रयलोक्यवासी ॥ ९ ॥

त्यालाच नरोत्तम, वीरोत्तम, पुरुषोत्तम, रघूत्तम, सर्वोत्तम, उत्तमोत्तम, त्रैलोक्यवासी असेही म्हणतात. (९)

नाना खटपट आणी चटपट। नाना लटपट आणि झटपट।
आत्मा नस्तां सर्व सपाट। चहुंकडे ॥ १० ॥

जगातील नाना खटपटी, चटपटी, लटपटी आणि झटपटी, सर्व घटना, अंतरात्म्याच्या योगेच चालतात. आत्मा नसेल तर चहूकडे उजाड होऊन जाईल. (१०)

आत्म्याविण वेडें कुडें। आत्म्याविण मडें बापुडें।
आत्म्याविण थडें रोकडें। शरीराचें ॥ ११ ॥

आत्म्याविना सर्व वेडेवाकडेच होते. शरीर मढे बनते. आत्म्याशिवाय शरीराचे थंडगार शव बनते. ही अनुभवाची गोष्ट आहे. (११)

आत्मज्ञानी समजे मनीं। पाहें जनीं आत्मयालागुनी।
भुवनीं अथवा त्रिभुवनीं। आत्म्याविणें वोस ॥ १२ ॥

आत्मज्ञानी असतो तो हे सर्व जाणतो. लोकांकडे पाहताना तो त्यांच्या आत्मस्वरूपाकडेच पाहात असतो. घरात अथवा त्रिभुवनात आत्म्याशिवाय सर्व ओसच आहे (१२)

परम सुंदर आणि चतुर। जाणे सकळ सारासार।
आत्म्याविण अंधकार। उभय लोकीं ॥ १३ ॥

अंतरात्मा हा परम सुंदर आणि चतुर असून सर्व सारासार विवेक तो जाणतो. आत्म्याशिवाय इहलोकी आणि परलोकी सगळा अंधारच पसरतो. (१३)

**सर्वांगीं सिध सावध। नाना भेद नाना वेध।**
**नाना खेद आणी आनंद। तेणेंचिकरितां ॥ १४॥**

अंतरात्मा सर्वांगांनी परिपूर्ण असून सिद्ध आणि सावध असतो. त्याच्यामुळेच नाना भेद, नाना वेध, नाना खेद आणि नाना प्रकारचे आनंद यांचा अनुभव येतो. (१४)

**रंक अथवा ब्रह्मादिक। येकचि चाल्वी अनेक।**
**पाहावा नित्यानित्यविवेक। कोण्ही येकें ॥ १५॥**

रंक असो वा ब्रह्मादी देव असोत, एक अंतरात्माच या सर्वांना चालवतो. म्हणून मनुष्याने नित्यानित्यविवेक करावा. (१५)

**ज्याचे घरीं पद्मिणी नारी। आत्मा तंवरी आवडी धरी।**
**आत्मा गेलियां शरीरीं। तेज कैंचें ॥ १६॥**

एखाद्याची स्त्री अत्यंत सुंदर असली तरी तिच्यात आत्मा असतो तोवर माणूस तिच्यावर प्रेम करतो. तिच्या शरीरातून आत्मा निघून गेला, तर तेथे तेज कसे राहील? (१६)

**आत्मा दिसेना ना भासेना। बाह्यात्कारें अनुमानेना।**
**नाना मनाच्या कल्पना। आत्मयाचेनी ॥ १७॥**

आत्मा दिसत नाही, अथवा भासतही नाही. बहिर्मुख वृत्तीने त्याचे अनुमानही करता येत नाही. मनात येणाऱ्या नाना कल्पनाही आत्म्यामुळेच येत असतात. (१७)

**आत्मा शरीरीं वास्तव्य करी। अवघें ब्रह्मांड विवरी भरी।**
**वासना भावना परोपरीं। किती म्हणोनी सांगाव्या॥ १८॥**

आत्मा शरीरात वास्तव्य करतो आणि तेथे तो साऱ्या ब्रह्मांडाचा विचार करतो. ब्रह्मांड भरूनही राहतो. त्याचप्रमाणे त्याच्यामुळेच मनात अनेक प्रकारच्या वासना, भावना उत्पन्न होतात. त्या किती म्हणून सांगाव्यात. (१८)

**मनाच्या अनंत वृत्ती। अनंत कल्पना धरिती।**
**अनंत प्राणी सांगों किती। अंतर त्यांचें ॥ १९॥**

मनाच्या अनंत वृत्ती असतात, मनात अनंत कल्पना उत्पन्न होतात. जगात अनंत प्राणी आहेत. त्यांचे अंतरंग कसे सांगता येईल? (१९)

**अनंत राजकारणें धरणें। कुबुधी सुबुधी विवरणें।**
**कळों नेदणें चुकावणें। प्राणीमात्रांसी ॥ २०॥**

मनुष्य अनंत राजकारणे करतो, धरतो, सोडतो; कुबुद्धी आणि सुबुद्धी यांचे विवरण करतो, आपले अंतरंग कुणास कळू देतो, कुणास कळू देत नाही. कोणास तो चुकवतो. याप्रमाणे प्राणिमात्र अंतरात्म्याच्या साहाय्याने अनेक गोष्टी करीत असतात. (२०)

**येकास येक जपती टपती। येकास येक खपती लपती।**
**शत्रुपणाची स्थिती गती। चहुंकडे ॥ २१॥**

कुणी कुणाला जपत असतात, तर कुणी कुणाला मारायला टपलेले असतात. कुणी कुणाला खपवतात, तर कुणी लपून राहतात. अशा प्रकारची शत्रुत्वाची भावना चहूकडे दिसून येते. (२१)

**पृथ्वीमधें परोपरीं। येकास येक सिंतरी।**
**कित्तेक भक्त परोपरीं। परोपकार करिती ॥ २२॥**

या पृथ्वीतलावर कुणी कुणाला फसवीत असतो, तर कित्येक भक्त असे असतात की, ते नाना प्रकारे परोपकार करीत असतात. (२२)

**येक आत्मा अनंत भेद। देहेपरत्वें घेती स्वाद।**
**आत्मा ठाईंचा अभेद। भेदहि धरी ॥ २३॥**

एकच आत्मा असून देहापरत्वे नाना भेद उत्पन्न होतात आणि निरनिराळ्या प्रकारचे फलभोग भोगावे लागतात. आत्मा खरे तर आपल्यापरीने अभेदच आहे. पण तो भेद करतो आहे असे वाटते. (२३)

**पुरुषास स्त्री पाहिजे। स्त्रीस पुरुष पाहिजे।**
**नवरीस नवरी पाहिजे। हें तों घडेना ॥ २४॥**

पुरुषाला स्त्री पाहिजे असते. स्त्रीला पुरुष हवा असतो. नवरीला नवरीच पाहिजे असे तर घडतच नाही. (२४)

**पुरुषाचा जीव स्त्रियांची जीवी। ऐसी नाहीं उठाठेवी।**
**विषयसुखाची गोवी। तेथें भेद आहे ॥ २५॥**

पण पुरुषांचा तो जीव आणि स्त्रियांची जीवी असा भेद तर करताच येत नाही. विषयसुखाच्या बाबतीत मात्र भेद असतो. (२५)

**ज्या प्राण्यास जो आहार। तेथेंचि होती तत्पर।**
**पशूचे आहारीं नर। अनादरें वर्तती ॥ २६॥**

ज्या प्राण्याचा जो आहार असतो, तेथे तो तत्पर असतो. पशूंच्या आहाराबद्दल माणसे अनादराने वागतात. (२६)

**आहारभेद देहेभेद। गुप्त प्रगट उदंड भेद।**
**तैसाचि जाणावा आनंद। वेगळाला ॥ २७॥**

आहारभेद, देहाचे निरनिराळे भेद, यांशिवाय काही प्रगट, काही गुप्त असे उदंड भेद असतात. त्याप्रमाणे प्रत्येकाचा आनंदही वेगवेगळ्या प्रकारचा असतो.(२७)

सिंधु भूगर्भींचीं नीरें। त्या नीरामधील शरीरें।
आवर्णोदकाचीं जळचरें। अत्यंत मोठीं ॥ २८ ॥

समुद्रातील पाणी, भूगर्भातील पाणी या पाण्यामध्येही प्राणी असतात. आवर्णोदकातील जलचर प्राणी तर अत्यंत मोठे असतात. (२८)

सूक्ष्म दृष्टीं आणितां मना। शरीराचा अंत लगेना।
मा तो अंतरात्मा अनुमाना। कैसा येतो ॥ २९ ॥

सूक्ष्म दृष्टीने जरी मनाशी विचार केला तर आपल्या स्वत:च्या शरीराचाही अंत आपल्याला लागत नाही. मग अत्यंत सूक्ष्म असा जो अंतरात्मा त्याचे अनुमान कसे करता येईल? (२९)

देह्यात्मयोग शोधून पाहिला। तेणें कांहीं अनुमानला।
स्थूळसूक्ष्माचा गलबला। गथागोवी ॥ ३० ॥

देह आणि आत्मा यांच्या संयोगासंबंधी शोध घेण्याचा प्रयत्न केला, तर अंतरात्म्यासंबंधी काहीसे अनुमान करता येते. पण देह स्थूल आणि आत्मा सूक्ष्म त्यामुळे या स्थूलसूक्ष्माच्या गुंतागुंतीमुळे मोठा गोंधळ उडतो. (३०)

गथागोवी उगवाव्याकारणें। केलीं नाना निरूपणें।
अंतरात्मा कृपाळुपणें। बहुतां मुखें बोलिला ॥ ३१ ॥

हा गुंता उलगडावा म्हणूनच अनेकांनी अनेक प्रकारे निरूपणे केली आहेत. वास्तविक अंतरात्माच कृपाळूपणे अनेकांच्या मुखांतून बोलला आहे असे श्रीसमर्थ सांगतात. (३१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मारामनिरूपणनाम ' समास आठवा समाप्त.



## दशक १६ : समास ९
## नाना उपासनानिरूपण

॥ श्रीराम ॥

पृथ्वीमधें लोक नाना। त्यास नाना उपासना।
भावार्थें प्रवर्तले भजना। ठाईं ठाईं ॥ १ ॥

येथे प्रारंभी श्रोता प्रश्न करीत आहे. तो म्हणतो की, पृथ्वीमध्ये अनेक लोक आहेत. त्यांच्या नाना प्रकारच्या उपासना आहेत. जागोजागी लोक भावार्थाने भजन करीत असतात. (१)

आपुल्या देवास भजती। नाना स्तुती स्तवनें करिती।
जे ते निर्गुण म्हणिती। उपासनेसी ॥ २ ॥

आपल्या आवडीच्या देवाला ते भजतात. त्याची नाना प्रकारे स्तुती-स्तवने करतात. प्रत्येक जण आपल्या उपासनेला निर्गुण म्हणतो. (२)

याचा कैसा आहे भाव। मज सांगिजे अभिप्राव।
अरे हा स्तुतीचा स्वभाव। ऐसा आहे ॥ ३ ॥

यात काय भाव आहे? याबद्दल आपले मत काय आहे ते मला सांगावे. यावर वक्ता म्हणतो की, अरे, आपापल्या देवाची स्तुती करावी असा माणसाचा स्वभावच असतो (३)

निर्गुण म्हणिजे बहुगुण। बहुगुणी अंतरात्मा जाण।
सकळ त्याचे अंश हें प्रमाण। प्रचित पाहा ॥ ४ ॥

निर्गुण असे म्हणणे मायेमुळेच शक्य होते आणि ती माया बहुगुणी असल्याने निर्गुणच बहुगुणी आहे, असे म्हटले जाते. वास्तविक चंचळ अंतरात्माच बहुगुणी आहे. सर्व देव हे त्याचेच अंश आहेत, हे अनुभवाने जाणून घ्यावे (४)

सकळ जनासी मानावें तें। येका अंतरात्म्यास पावतें।
अधिकारपरत्वें तें। मान्य कीजे ॥ ५ ॥

सर्व लोकांना जे मान्य होते, ते अंतरात्म्याला पावते. आपल्या अधिकारानुरूप सर्वांचा अंतरात्मा एकच आहे की नाही हे पटेल. (५)

श्रोता म्हणे हा अनुमान। मुळीं घालावें जीवन।
तें पावे पानोपान। हे सध्या प्रचिती ॥ ६ ॥

यावर श्रोता म्हणतो की, ही कल्पना आहे. झाडाच्या मुळांना पाणी घालावे लागते, तेव्हा ते पानोपानी पोहोचते. ही रोकडी प्रचीती आहे. (६)

वक्ता म्हणे तुळसीवरी। उदक घालावें पात्रभरी।
परी न थिरे निमिषभरी। भूमीस भेदे ॥ ७॥

यावर वक्ता म्हणतो की, तुळसीच्या रोपाला भांडंभर पाणी घातले तरी ते वर पानावर राहात नाही, ते एका क्षणात जमिनीला भेदून मुळाकडेच जाते. (७)

थोरा वृक्षास कैसें करावें। सेंड्या पात्र कैसें न्यावें।
याचा अभिप्राव देवें। मज निरोपावा ॥ ८॥

तेव्हा श्रोता म्हणाला की, तुळशीचे ठीक आहे, पण मोठ्या वृक्षाच्या बाबतीत काय करावे? त्याच्या शेंड्यापर्यंत पात्र कसे न्यावे? याचा अभिप्राय स्वामींनी मला स्पष्ट करून सांगावा. (८)

प्रजन्याचें उदक पडतें। तें तों मुळाकडे येतें।
हात चि पावेना तेथें। काये करिती ॥ ९॥

पावसाचे पाणी मोठ्या वृक्षावर पडते, पण तेही मुळाकडेच जाते. पात्राने पाणी घालायला हात पुरत नसेल तर काय करावे? (९)

सकळास मूळ सांपडे। ऐसें पुण्य कैंचें घडे।
साधुजनाचें पवाडे। विवेकीं मन ॥ १०॥

सगळ्यांनाच मूळ सापडेल इतके त्यांचे पुण्य कोठे असते? साधुसंतांचे विवेकी मन मात्र मुळापर्यंत म्हणजे अंतरात्म्यापर्यंत जाऊन पोहोचते. (१०)

तथापी वृक्षांचेनि पडिपाडें। जीवन घालितां कोठें पडे।
ये गोष्टीचें सांकडें। कांहींच नाहीं ॥ ११॥

तथापि वृक्षाच्या दृष्टांतावरून झाडाला कोठेही पाणी घातले तरी ते कोठे जाते हे लक्षात येईल. म्हणून काहीच अडचण राहाणार नाही. (११)

मागील आशंकेचें निर्शन। होतां जालें समाधान।
आतां गुणास निर्गुण। कैसें म्हणती ॥ १२॥

मागे जी शंका विचारली होती, तिचे निरसन झाल्याने श्रोत्यास समाधान झाले. आता गुणाला निर्गुण कसे म्हणतात, ही शंका राहिली. (१२)

चंचळपणें विकारलें। सगुण ऐसें बोलिलें।
येर तें निर्गुण उरलें। गुणातीत ॥ १३॥

जे चंचळपणे विकार पावते, त्याला सगुण म्हणतात. याखेरीज जे गुणातीत उरते ते निर्गुण होय. (१३)

वक्ता म्हणे हा विचार। शोधून पाहावें सारासार।
अंतरीं राहातां निर्धार। नांव नाहीं ॥ १४॥

वक्ता म्हणतो, हा विचार कळण्यासाठी सारासारविवेकाने सार काय हे शोधून काढावे व त्यासंबंधी स्वानुभवाने निर्धार, निश्चय झाला की 'निर्गुण' हे नावही मग उरत नाही. (१४)

विवेकेंचि तो मुख्य राजा। आणि सेवकाचें नांव राजा।
याचा विचार समजा। वेवाद खोटा ॥ १५॥

एक खराच राजा असतो आणि एका सेवकाचे नाव राजा असते. विवेकानेच खरा कोण हे जाणून घ्यावे. तेथे वादविवाद करणे योग्य नाही. (१५)

कल्पांतप्रळईं जें उरलें। तें निर्गुण ऐसें बोलिलें।
येर तें अवघेंचि जालें। मायेमधें ॥ १६॥

प्रलयकाळी कल्पान्त झाल्यावरही जे शिल्लक उरते, त्यास 'निर्गुण' म्हणावे. याखेरीज जे जे काही सर्व उत्पन्न होते, ते मायेमध्येच येते. (१६)

सेना शाहार बाजार। नाना यात्रा ल्हहानथोर।
शब्द उठती अपार। कैसे निवडावे ॥ १७॥

सैन्यामध्ये, शहरामध्ये, बाजारामध्ये तसेच लहान-मोठ्या यात्रांमध्ये अपार शब्द उठतात, त्यांची निवड कशी करावी? (१७)

काळामधें प्रज्न्यकाळ। मध्यरात्रीं होतां निवळ।
नाना जीव बोलती सकळ। कैसें निवडावें ॥ १८॥

पर्जन्यकाळात दिवसभर पाऊस कोसळून मध्यरात्री जरा निवळला की, नाना जीव सर्व एकदमच आवाज करू लागतात. त्यांची निवड कशी करावी? (१८)

नाना देश भाषा मतें। भूमंडळीं असंख्यातें।
बहु ऋषी बहु मतें। कैसीं निवडावीं ॥ १९॥

पृथ्वीतलावर नाना देश आहेत. त्यांत अनेक प्रकारच्या भाषा आहेत. त्यांत असंख्य मते आहेत. शिवाय अनेक ऋषी असून त्यांचीही वेगवेगळी अनेक मते आहेत. त्यांत निवड कशी करावी? (१९)

वृष्टि होतांच अंकुर। सृष्टीवरी निघती अपार।
नाना तरु ल्हानथोर। कैसे निवडावे ॥ २०॥

पाऊस पडला की पृथ्वीवर नाना बीजे अंकुरतात. या सृष्टीमध्ये नाना प्रकारचे अपार तरू, लहान-थोर वृक्ष निर्माण होतात. त्यातून निवड कशी करावी? (२०)

खेचरें भूचरें जळचरें। नाना प्रकारीचीं शरीरें।
नाना रंग चित्रविचित्रें। कैसीं निवडावीं ॥ २१ ॥

आकाशात संचार करणारे, पृथ्वीवर विचरण करणारे आणि जलात विहार करणारे प्राणी, पक्षी अशी नाना प्रकारची शरीरे आहेत. ती चित्रविचित्र नाना रंगांचीही असतात. त्यांतून निवड कशी करावी? (२१)

कैसें दृश्य आकारलें। नानापरीं विकारलें।
उदंडचि पैसावलें। कैसें निवडावें ॥ २२ ॥

हे दृश्य विश्व याप्रकारे आकारास येऊन त्यात नाना प्रकारचे विकार उत्पन्न होऊन त्याचा अफाट विस्तार झाला आहे. यात निवड कशी करावी? (२२)

पोकळीमधें गंधर्वनगरें। नाना रंग ल्हानथोरें।
बहु वेक्ति बहु प्रकारें। कैसीं निवडावीं ॥ २३ ॥

आकाशाच्या पोकळीत नाना गंधर्व नगरे दिसतात. ती लहान-थोर नाना रंगाची असतात. त्यामध्ये नाना प्रकारच्या आकृती दिसतात. त्यांमध्ये निवड करणे अशक्यच असते. (२३)

दिवसरजनीचे प्रकार। चांदिणें आणी अंधकार।
विचार आणी अविचार। कैसा निवडावा ॥ २४ ॥

दिवस आणि रात्र, चांदणे आणि अंधकार, विचार आणि अविचार यांत निवड कशी करायची? (२४)

विसार आणी आठवण। नेमस्त आणी बाष्कळपण।
प्रचित आणी अनुमान। येणें रीतीं ॥ २५ ॥

विस्मरण आणि स्मरण, शिस्त आणि गैरशिस्त, प्रचीती आणि अनुमान यांतही निवड करणे याप्रमाणेच कठीण आहे. (२५)

न्याय आणी अन्याय। होय आणी न होये।
विवेकेंविण काये। उमजों जाणे ॥ २६ ॥

न्याय आणि अन्याय, होय अथवा नाही याचा निवाडा विवेकाशिवाय होऊच शकत नाही. (२६)

कार्यकर्ता आणीनिकामी। शूर आणी कुकर्मी।
धर्मी आणी अधर्मी। कळला पाहिजे ॥ २७ ॥

कोण कार्यकर्ता आहे आणि कोण निकामी आहे, कोण शूर आहे आणि कोण वाईट कर्मे करणारा आहे, कोण धार्मिक आहे आणि कोण अधर्मी आहे हे कळलेच पाहिजे. (२७)

धनाढ्य आणी दिवाळखोर। साव आणी तश्कर।
खरें खोटें हा विचार। कळला पाहिजे ॥ २८ ॥

धनाढ्य कोण आहे आणि दिवाळखोर कोण आहे, सज्जन कोण आहे आणि चोर कोण आहे, काय खरे आणि काय खोटे आहे, हा विचार कळलाच पाहिजे. (२८)

वरिष्ठ आणी कनिष्ठ। भ्रष्ट आणी अंतरनिष्ठ।
सारासार विचार पष्ट। कळला पाहिजे ॥ २९ ॥

वरिष्ठ कोण आहे आणि कनिष्ठ कोण आहे, भ्रष्ट कोण आहे आणि अंतरनिष्ठ कोण आहे, हे सारासारविवेकाने स्पष्टपणे जाणून घेतले पाहिजे. (२९)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'नाना उपासनानिरूपणनाम ' समास नववा समाप्त.**



## दशक १६ : समास १०

## गुणभूतनिरूपण

॥ श्रीराम ॥

पंचभूतें चाले जग। पंचभूतांची लगबग।
पंचभूतें गेलियां मग। काये आहे ॥ १ ॥

येथे श्रोता वक्त्यास प्रश्न करीत आहे की, पंचभूतांनी जग चालते. जगात सर्वत्र पंचमहाभूतांचीच लगबग (कार्य) चाललेली दिसून येते. ती पंचमहाभूते लय पावली की मग काय उरते? (१)

श्रोता वक्तयास बोले। भूतांचे महिमे वाढविले।
आणि त्रिगुण कोठें गेले। सांगा स्वामी ॥ २ ॥

श्रोता वक्त्याला प्रश्न करतो की, स्वामी, सारासारविवेकात पंचमहाभूतांचे फारच महत्त्व वाढविलेले दिसते आणि मग त्रिगुण कोठे गेले, हे आपण कृपा करून सांगावे. (२)

अंतरात्मा पांचवें भूत। त्रिगुण त्याचें अंगभूत।
सावध करूनियां चित्त। बरें पाहें ॥ ३॥

त्यावर स्वामी सांगतात की, अंतरात्मा हे पाचवे भूत जाणावे. त्रिगुणांचा अंतर्भाव त्यातच होतो. हे चित्त सावध करून नीट विचार करून पाहिले असता कळेल. (३)

भूत म्हणिजे जितुकें जालें। त्रिगुण जाल्यांत आलें।
इतुकेन मूळ खंडलें। आशंकेचें ॥ ४॥

भूत ह्याचा अर्थच जितके झाले ते भूतच होय. त्रिगुणही झालेल्यातच जमा आहेत. इतके सांगितल्याने आशंकेचे मूळच नाहीसे झाले आहे. (४)

भूतावेगळे कांहीं नाहीं। भूतजात हे सर्वहि।
येकावेगळे येक कांहीं। घडेचिना ॥ ५॥

भूतावेगळे या दृश्य सृष्टीत दुसरे काहीही नाही. हे सर्व पांचभौतिकच आहे. एकाशिवाय दुसऱ्या एकापासून काही घडूच शकत नाही. (५)

आत्म्याचेनी जाला पवन। पवनाचेन प्रगटे अग्न।
अग्नीपासून जीवन। ऐसें बोलती ॥ ६॥

अंतरात्म्यापासून वायू झाला. वायूपासून अग्नी झाला. अग्नीपासून पाणी झाले असे सांगतात. (६)

जीवन आवघें डबाबिलें। तें रविमंडळें आळलें।
वन्हीवायोचेन जालें। भूमंडळ ॥ ७॥

जिकडे-तिकडे अवघे पाणीच डबडबून भरून राहिले होते. ते सूर्यामुळे आळले आणि अग्नी आणि वायू यांच्या साहाय्याने भूमंडळ म्हणजे पृथ्वी निर्माण झाली. (७)

वन्ही वायो रवी नस्तां। तरी होते उदंड सीतळता।
ते सीतळतेमधें उष्णता। येणें न्यायें ॥ ८॥

अग्नी, वायू आणि सूर्य नसते तर उदंड शीतलताच झाली असती. त्यांच्यामुळेच शीतलतेमध्ये उष्णत निर्माण झाली. (८)

आवघें वर्मासी वर्म केलें। तरीच येवढें फांपावलें।
देहेमात्र तितुकें जालें। वर्माकरितां ॥ ९॥

एका भुताच्या वर्माने दुसऱ्या भुताच्या वर्मावर मात केली. सर्व काही अशाच प्रकारे एवढे विस्तारले आहे. या पंचमहाभूतांच्या समन्वयामुळेच देहमात्र तितुके झाले आहेत. (९)

आवघें सीतळचि असतें। तरी प्राणीमात्र मरोनी जातें।
आवघ्या उष्णेंचि करपतें। सकळ कांहीं ॥ १०॥

सर्वत्र शीतलताच असती, तर प्राणिमात्र मरून गेले असते. केवळ उष्णताच असती, तरी सर्व काही करपून गेले असते. (१०)

भूमंडळ आळोन गोठलें। तें रविकिर्णें वाळोन गेलें।
मग सहज चि देवें रचिलें। उपायासी ॥ ११॥

भूमंडल आळून गोठले. ते रविकिरणांनी वाळले. तेव्हा सहजच देवाने उपाय केला. (११)

म्हणोनी केला प्रज्यन्यकाळ। थंड जालें भूमंडळ।
पुढें उष्ण कांहीं सीतळ। सीतकाळ जाणावा ॥ १२॥

त्यांनी पर्जन्यकाळ उत्पन्न केला. त्यामुळे भूमंडल थंड झाले. पुढे उष्णकाळ, पुढे काही शीतल असा शीतकाळ केला, हे जाणून घ्यावे. (१२)

सीतकाळें कष्टले लोक। कर्पोन गेलें वृक्षादिक।
म्हणोन पुढें कौतुक। उष्णकाळाचें ॥ १३॥

शीतकाळाने लोकांना कष्ट झाले. वृक्षादिक थंडीने वाळून गेले. म्हणून पुढे देवाने उष्णकाळाचे कौतुक निर्माण केले. (१३)

त्याहिमधें प्रात:काळ। माध्यानकाळ सायंकाळ।
सीतकाळ उष्णकाळ। निर्माण केले ॥ १४॥

त्यातही प्रात:काळ, मध्याह्नकाळ, सायंकाळ तसेच शीतकाळ, उष्णकाळ वगैरे निर्माण केले. (१४)

ऐसें येकामागें येक केलें। विलेनें नेमस्त लाविलें।
येणेंकरितां जगले। प्राणीमात्र ॥ १५॥

असे एकामागोमाग एक निर्माण केले आणि क्रमाने त्यांना नेमस्त केले. त्यामुळेच प्राणिमात्र जगले. (१५)

नाना रसें रोग कठीण। म्हणोनी औषधी केल्या निर्माण।
परंतु सृष्टीचें विवरण। कळलें पाहिजे ॥ १६॥

अन्नातील नाना रसांनी कठीण रोग झाले, म्हणून औषधी निर्माण केल्या. याप्रमाणे सृष्टीची रचना जाणून घेतली पाहिजे. (१६)

देहेमूळ रक्त रेत। त्या आपाचे होती दात।
ऐसीच भूमंडळीं प्रचित। नाना रत्नांची ॥ १७॥

देहाचे मूळ रक्त आणि रेत हे आहे. ते द्रवरूप आहे. पण त्या आपापासूनच देहात कठीण असे दात निर्माण होतात. हे पिंडात जसे होते, तसेच ब्रह्मांडात नाना रत्नांची (कठीण पदार्थांची) उत्पत्ती होते, ही प्रचीती जाणून घ्यावी. (१७)

सकळांसी मूळ जीवन बांधा। जीवनें चाले सकळ धंदा।
जीवनेंविण हरिगोविंदा। प्राणी कैंचे ॥ १८॥

सर्वांचे मूळ जीवन म्हणजे पाणी आहे. त्याच्या योगानेच सर्व धंदा, जीवननिर्वाह, व्यवहार चालतो. जीवन नसेल तर मग 'हरिगोविंदा' असेच म्हणावे लागले असते. प्राणी जगलेच नसते. (१८)

जीवनाचें मुक्ताफळ। शुक्रासारिखें सुढाळ।
हिरे माणिके इंद्रनीळ। ते जळें जाले ॥ १९॥

पाण्याचेच मोती होतात. ते शुक्राच्या चांदणीसारखे तेजस्वी असतात. हिरे, माणके, इंद्रनील वगैरे रत्नेही जलामुळेच होतात. (१९)

महिमा कोणाचा सांगावा। जाला कर्दमुचि आघवा।
वेगळवेगळु निवडावा। कोण्या प्रकारें ॥ २०॥

पंचमहाभूतांचेच सर्व मिश्रण झालेले आहे. त्यामुळे त्यांपैकी कोणाचा महिमा वर्णन करावा? त्यांना वेगवेगळे निवडावे तरी कोणत्या प्रकारे? (२०)

परंतु बोलिले कांहींयेक। मनास कळवया विवेक।
जनामधें तार्किक लोक। समजती आघवें ॥ २१॥

परंतु समजण्यासाठी, मनाला विवेक करण्यास सोपे जावे म्हणून काही एक बोललो. लोकात जे तार्किक असतील, ते सर्व काही समजतील. (२१)

आवघें समजलें हें घडेना। शास्त्रांशास्त्रांसी पडेना।
अनुमानें निश्चय होयेना। कांहींयेक ॥ २२॥

सर्व काही समजले असे होतच नाही. शास्त्राशास्त्रांत मतैक्यच होत नाही. आणि अनुमान करू लागले तरी काही एक निश्चय होत नाही. (२२)

अगाध गुण भगवंताचे। शेष वर्णूं न शके वाचे।
वेदविधी तेहि काचे। देवेंविण ॥ २३॥

भगवंताचे गुण अगाध आहेत. शेषही त्यांचे वर्णन करू शकत नाही. देवाशिवाय म्हणजे अंतरात्म्याशिवाय वेदविधीही कमी पडतात. (२३)

आत्माराम सकळां पाळी। आवघें त्रयलोक्य सांभाळी।
तया येकेंविण धुळी। होये सर्वत्रांची ॥ २४॥

आत्मारामच सर्वांना पाळतो. अवघ्या त्रैलोक्याला सांभाळतो. तो एकटा नसेल, तर सर्वांची धूळधाण होते. (२४)

जेथें आत्माराम नाहीं। तेथें उरों न शके कांहीं।
त्रयलोकीचे प्राणी सर्वही। प्रेतरूपी ॥ २५॥

जेथे आत्माराम नसेल, तेथे काहीही उरूच शकत नाही. त्याच्याशिवाय त्रैलोक्यातील सर्व प्राणी प्रेतरूपच जाणावेत. (२५)

आत्मा नस्तां येती मरणें। आत्म्याविण कैंचें जिणें।
बरा विवेक समजणें। अंतर्यामीं ॥ २६॥

अंतरात्मा देहातून निघून गेला की देह मरतो. अंतरात्म्याशिवाय जगणे शक्यच नसते. ही गोष्ट अंतर्यामी विवेकाने जाणून घ्यावी. (२६)

समजणें जें विवेकाचें। तेंहि आत्म्याविण कैंचें।
कोणीयेकें जगदीशाचें। भजन करावें ॥ २७॥

विवेकाने समजून घेणे हे सुद्धा अंतरात्म्याशिवाय कसे शक्य आहे? म्हणून माणसाने जगदीशाचे भजन करावे. (२७)

उपासना प्रगट जाली। तरी हे विचारणा कळली।
याकारणें पाहिजे केली। विचारणा देवाची ॥ २८॥

ज्याच्या अंतर्यामी उपासनेची आवड निर्माण होते, त्यालाच हे सर्व विचार कळतात. म्हणूनच अंतरात्म्यासंबंधी विचारणा केली पाहिजे. (२८)

उपासनेचा मोठा आश्रयो। उपासनेविण निराश्रयो।
उदंड केलें तरी तो जयो। प्राप्त नाहीं ॥ २९॥

साधकाला उपासनेचा मोठा आधार असतो. उपासनेशिवाय सर्व निराश्रय म्हणून व्यर्थ जाते. अंतरात्म्याच्या ज्ञानाशिवाय इतर यज्ञयागादी उदंड खटपटी केल्या, तरी त्या फुकट होत. त्यांनी जय प्राप्त होणार नाही. संसाररूपी शत्रूला जिंकता येणार नाही. उपासनेने देवाची कृपा प्राप्त होते आणि कृपेनेच कार्यभाग साधतो म्हणून उपासना केलीच पाहिजे. (२९)

समर्थाची नाहीं पाठी। तयास भलताच कुटी।
याकारणें उठाउठी। भजन करावें ॥ ३०॥

समर्थांचा पाठिंबा आश्रय नसेल, तर कुणीही येऊन आपल्याला कुटून काढील. म्हणून उठता-बसता सतत देवाचे भजन करावे. (३०)

भजन साधन अभ्यास। येणें पाविजे परलोकास।
दास म्हणे हा विश्वास। धरिला पाहिजे ॥ ३१॥

भजन, साधन आणि अभ्यास या तीनही गोष्टींमुळे परमार्थ साधला जातो. रामदास म्हणतात की, यावर माणसाने विश्वास ठेवला पाहिजे. (३१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'गुणभूतनिरूपणनाम ' समास दहावा समाप्त.

**दशक सोळावा समाप्त.**

❑ ❑

# दशक सतरावा : प्रकृतिपुरुष

## दशक १७ : समास १

### देवबळात्कार

॥ श्रीराम ॥

निश्चळ ब्रह्मीं चंचळ आत्मा। सकळां पर जो परमात्मा।
चैतन्य साक्षी ज्ञानात्मा। षड्गुणैश्वरु ॥ १ ॥

मूळ परब्रह्म हे निश्चळ आहे. त्यामध्ये जे चंचळ स्फुरण उत्पन्न होते, तोच आत्मा होय. तो सर्वांहून श्रेष्ठ म्हणून त्यास परमात्मा म्हणतात. चैतन्य, साक्षी, ज्ञानात्मा, षड्गुणेश्वर ही त्याचीच नावे आहेत. (१)

सकळ जगाचा ईश्वरु। म्हणौन नामें जगदेश्वरु।
तयापासून विस्तारु। विस्तारला ॥ २ ॥

सर्व जगाचा ईश्वर म्हणून त्यास जगदीश्वर म्हणतात. त्याच्यापासून सृष्टीचा हा अफाट विस्तार झाला आहे. (२)

शिवशक्ति जगदेश्वरी। प्रकृतिपुरुष परमेश्वरी।
मूळमाया गुणेश्वरी। गुणक्षोभिणी ॥ ३ ॥

त्यालाच शिवशक्ती, जगदीश्वरी, प्रकृतिपुरुष, परमेश्वरी, मूळमाया, गुणेश्वरी, गुणक्षोभिणी इत्यादी नावाने ओळखतात. (३)

क्षेत्रज्ञ द्रष्टा कूटस्त साक्षी। अंतरात्मा सर्वलक्षी।
शुद्धसत्व महत्तत्त्व परीक्षी। जाणता साधु ॥ ४ ॥

क्षेत्रज्ञ, द्रष्टा, कूटस्थ, साक्षी, सर्वलक्षी, अंतरात्मा, शुद्धसत्व, महत्तत्त्व यांची परीक्षा करून जो त्यांना जाणतो, तोच जाणता साधू होय. (४)

ब्रह्मा विष्णु महेश्वरु। नाना पिंडीं जीवेश्वरु।
त्यास भासती प्राणीमात्रु। लहानथोर ॥ ५ ॥

ब्रह्मा, विष्णू, महेश्वर, नाना पिंडांच्या ठिकाणी असणारा जीवेश्वर यांकडेच लक्ष ठेवून तो सर्व लहानथोर प्राणिमात्रांना पाहतो. (५)

देहदेउळामधें बैसला। न भजतां मारितो देहाला।
म्हणौनि त्याच्या भेणें तयाला। भजती लोक ॥ ६ ॥

अंतरात्मा हा देहरूपी देवळात बसलेला असतो. त्याचे भजन केले नाही, तर तो देहाला मारून टाकतो. म्हणून भयाने सर्व लोक त्याला भजतात. (६)

जे वेळेसी भजन चुकलें। तें तें तेव्हां पछ्याडिलें।
आवडीनें भजों लागले। सकळ लोक ॥ ७ ॥

ज्या ज्या वेळी भजनात चूक होते, तेव्हा तेव्हा तो लोकांना छळतो. म्हणून आवडीने सर्व लोक त्याला भजू लागले. (७)

जें जें जेव्हां आक्षेपिलें। तें तें तत्काळचि दिधलें।
त्रैलोक्य भजों लागलें। येणें प्रकारें ॥ ८ ॥

त्याने ज्या ज्या वेळी जे जे अपेक्षिले, त्या त्या वेळी तत्काळ ते दिले गेले. याप्रकारे त्रैलोक्य त्याला भजू लागले. (८)

पांचा विषयांचा नैव्यद्य। जेव्हां पाहिजे तेव्हां सिद्ध।
ऐसें न करितां सद्य। रोग होती ॥ ९ ॥

पाच विषयभोगांचा नैवेद्य जेव्हा हवा तेव्हा तयारच असतो. असे जर केले नाही तर तत्काळ रोग होतो. (९)

जेणें काळें नैव्यद्य पावेना। तेणें काळें देव राहेना।
भाग्य वैभव पदार्थ नाना। सांडून जातो ॥ १० ॥

ज्या वेळी नैवेद्य मिळत नाहीसा होतो, त्या वेळी देव तेथे राहात नाही. भाग्य, वैभव, नाना पदार्थ टाकून तो देहत्याग करतो. (१०)

जातो तो कळों देईना। कोणास ठाउकें होयेना।
देवेंविण अनुमानेना। कोणास देव ॥ ११ ॥

तो जातो, तेव्हा कुणाला कळू देत नाही. कुणाला माहीतही होत नाही. देवाशिवाय देवाचे रहस्य कुणाला कळणार आहे? (११)

देव पाहावयाकारणें। देउळें लागती पाहाणें।
कोठेंतरी देउळाच्या गुणें। देव प्रगटे ॥ १२ ॥

देव पाहाण्याकरिता देवालयांचा शोध घ्यावा लागतो, तेव्हा कोठेतरी देवळाच्या गुणाने देव प्रगट होतो. (१२)

देउळें म्हणिजे नाना शरीरें। तेथें राहिजे जीवेश्वरें।
नाना शरीरें नाना प्रकारें। अनंत भेदें ॥ १३ ॥

देवळे म्हणजे नाना शरीरे. त्यातच जीवेश्वर राहातो. नाना प्रकारची नाना शरीरे असतात. त्यात अनंत भेद असतात. (१३)

चालतीं बोलतीं देउळें। त्यामधें राहिजे राउळें।
जितुकीं देउळें तितुकीं सकळें। कळलीं पाहिजे ॥ १४ ॥

शरीरे ही चालती–बोलती देवळे असतात. त्यात राया म्हणजे राजा जो अंतरात्मा तो राहात असतो. जितकी म्हणून देवळे आहेत ती सर्व कळली पाहिजेत. (१४)

**मछ कूर्म वाराह देउळें। भूगोळ धरिला सर्वकाळें।**
**कराळें विक्राळें निर्मळें। कितियेक ॥ १५ ॥**

मत्स्य, कूर्म, वराह ही पण देवालयेच आहेत. त्यांनीच हा भूगोल सर्वकाळ सावरून धरला आहे. काही देवळे म्हणजे शरीरे अक्राळ विक्राळ असतात, तर कित्येक निर्मळ असतात. (१५)

**कित्येक देउळीं सौख्य पाहे। भरतां आवघें सिंध आहे।**
**परी तें सर्वकाळ न राहे। अशाश्वत ॥ १६ ॥**

कित्येक देवळांत-शरीरांत अवघे सौख्य भरून राहिलेले असते. पण तेही सर्वकाळ राहात नाही. ते अशाश्वतच असते. (१६)

**अशाश्वताचा मस्तकमणी। जयाची येवढी करणी।**
**दिसेना तरी काये जालें धनी। तयासीच म्हणावें ॥१७॥**

अशाश्वताचा मस्तकमणी जो अंतरात्मा त्याची ही सर्व अगाध करणी असते. तो दिसत नसला म्हणून काय झाले? त्यालाच सर्वांचा धनी म्हणावे लागते. (१७)

**उद्भवोन्मुख होतां अभेद। विमुख होतां उदंड खेद।**
**ऐसा अधोर्ध संवाद। होत जातो ॥ १८ ॥**

अंतरात्म्याकडे लक्ष गेल्याने सर्व भेद मावळतो. त्याच्यापासून विमुख होऊन विषयाकडे लक्ष गेले, तर भेद निर्माण होऊन खेद होतो. याप्रमाणे अध म्हणजे विषयाकडे आणि ऊर्ध्व म्हणजे अंतरात्म्याकडे असा खालीवर होण्याचा संवाद, नित्य चालू असतो. (१८)

**सकळांचें मूळ दिसेना। भव्य भारी आणी भासेना।**
**निमिष्य येक वसेना। येके ठाईं ॥ १९ ॥**

सर्वांचे मूळ असून तो अंतरात्मा दिसत नाही. तो भव्य आणि प्रचंड असून तो भासत नाही. त्याची जाणीव होत नाही. तो क्षणभरही एका ठिकाणी राहात नाही. (१९)

**ऐसा अगाध परमात्मा। कोण जाणे त्याचा महिमा।**
**तुझी लीळा सर्वोत्तमा। तूंच जाणसी ॥ २० ॥**

परमात्मा असा अगाध आहे. त्याचा महिमा कोण जाणू शकेल? हे सर्वोत्तमा, तुझी लीला फक्त तूच जाणतोस. (२०)

**संसारा आलियाचें सार्थक। जेथें नित्यानित्यविवेक।**
**येहलोक आणी परलोक। दोनी साधिले ॥ २१ ॥**

या जगात जन्माला आल्याचे सार्थक करावयाचे असेल तर नित्यानित्यविवेक करणे आवश्यक आहे. जेथे असा विवेक केला जातो, तेथेच इहलोक आणि परलोक दोन्ही साधले जातात. (२१)

**मननसीळ लोकांपासीं। अखंड देव आहिर्निशीं।**
**पाहातां त्यांच्या पूर्वसंचितासी। जोडा नाहीं ॥ २२ ॥**

जे मननशील लोक असतात त्यांच्यापाशी देव रात्रंदिवस अखंड असतो. त्यांच्या पूर्वपुण्याईला तोड नाही, असेच दिसून येते. (२२)

**अखंड योग म्हणोनि योगी। योग नाहीं तो वियोगी।**
**वियोगी तोहि योगी। योगबळें ॥ २३ ॥**

अखंड आत्मानुसंधान असल्यामुळे त्यास योगी म्हणतात. जेथे ते नाही तो वियोगी होय. असा वियोगीही अभ्यासाच्या योगाने किंवा सद्गुरुकृपेच्या योगाने अखंड अनुसंधानाचे सामर्थ्य मिळवून योगी होऊ शकतो. (२३)

**भल्यांची महिमा ऐसी। जे सन्मार्ग लावी लोकांसी।**
**पोहणार असतां बुडतयासी। बुडों नेदावें ॥ २४ ॥**

थोरामोठ्यांचा महिमा असा आहे की, ते अनेक लोकांना सन्मार्गास लावतात. पोहता येणाऱ्याने जो बुडतो आहे, त्यास बुडू देऊ नये. (२४)

**स्थूळसूक्ष्मतत्वझाडा। पिंडब्रह्मांडाचा निवाडा।**
**प्रचित पाहे ऐसा थोडा। भूमंडळीं ॥ २५ ॥**

स्थूल-सूक्ष्मांचा विवेक, तत्त्वझाडा, म्हणजे तत्त्वाने तत्त्वाचे निरसन, पिंडब्रह्मांडाचा निवाडा इत्यादींचे ज्ञान असून ज्यास प्रचीतीही आलेली असते. असा माणूस या पृथ्वीतलावर क्वचितच आढळतो. (२५)

**वेदांतींचें पंचिकर्ण। अखंड तयाचें विवर्ण।**
**माहांवाक्यें अंत:करण। रहस्य पाहे ॥ २६ ॥**

जे वेदांतातील पंचीकरण जाणतात व अखंड त्याचे विवरण करतात, तसेच महावाक्याचे रहस्य अंत:करणाने जाणून घेतात, (२६)

ये पृथ्वीमधें विवेकी असती । धन्य तयांची संगती ।
श्रवणमात्रें पावती गती । प्राणीमात्र ॥ २७ ॥

असे जे जगात विवेकी पुरुष आहेत त्यांची संगती धन्य होय. त्यांच्या अध्यात्मनिरूपणाच्या श्रवणमात्रेच प्राणिमात्रांना सद्गती प्राप्त होते. (२७)

सत्संग आणी सत्शास्त्र श्रवण । अखंड होतसे विवर्ण ।
नाना सत्संग आणी उत्तम गुण । परोपकाराचे ॥ २८ ॥

सत्संग आणि सत्शास्त्रांचे श्रवण घडावे. जेथे अध्यात्माचे अखंड विवरण होत असते, अनेक संतांची संगती लाभते, जेथे उत्तम गुण आणि परोपकार होत असतो, (२८)

जे सद्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश ।
धर्मस्थापनेचा हव्यास । तेथेंचि वसे ॥ २९ ॥

असे जे उत्तम कीर्तीने संपन्न पुरुष असतात, ते परमेश्वराचेच अंश असतात. तेथेच धर्मस्थापनेची उत्कट इच्छा, ध्यास आढळून येतो. (२९)

विशेष सारासारविचार । तेणें होय जग्गोद्धार ।
संगत्यागें निरंतर । होऊन गेले ॥ ३० ॥

विशेष म्हणजे तेथे निरंतर सारासारविचार केला जातो आणि त्यायोगेच जगदुद्धार होत असतो. असे पुरुष निरंतर संगत्याग करून स्वस्वरूप होऊन जातात. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देवबळात्कारनाम' समास पहिला समाप्त.**



## दशक १७ : समास २
## शिवशक्तीनिरूपण

॥ श्रीराम ॥

ब्रह्म निर्मळ निश्चळ । जैसें गगन अंतराळ ।
निराकार केवळ । निर्विकारी ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, ब्रह्म हे अवकाशरूपी आकाशासारखे निर्मल आणि निश्चळ असून निराकार आणि केवळ निर्विकारी आहे. (१)

अंतचि नाहीं तें अनंत । शाश्वत आणी सदोदित ।
असंत नव्हे तें संत । सर्वकाळ ॥ २ ॥

त्याला अंतच नसल्याने ते अनंत आहे. ते सदोदित आणि शाश्वत असून असंत म्हणजे नाहीसे नसून सर्वकाळ आहेच आहे. (२)

परब्रह्म तें अविनाश । जैसें आकाश अवकाश ।
न तुटे न फुटे सावकास । जैसें तैसें ॥ ३ ॥

अवकाशमय आकाशाप्रमाणे ब्रह्म हे अविनाशी आहे. ते फुटत नाही, तुटत नाही, जसेच्या तसे शांत असते. (३)

तेथें ज्ञान ना अज्ञान । तेथें स्मरण ना विस्मरण ।
तेथें अखंड निर्गुण । निरावलंबी ॥ ४ ॥

ब्रह्म हे ज्ञान आणि अज्ञानाच्या पलीकडील असते. त्याच्या ठिकाणी स्मरण नसते आणि विस्मरणही नसते. ते अखंड, निर्गुण असून आणि निरालंबी म्हणजे कशावरही अवलंबून नसणारे आहे. (४)

तेथें चंद्र सूर्य ना पावक । नव्हे काळोखें ना प्रकाशक ।
उपाधीवेगळें येक । निरोपाधी ब्रह्म ॥ ५ ॥

तेथे चंद्र, सूर्य अथवा अग्नीही नाही. काळोख नाही आणि प्रकाशही नाही. असे ते उपाधिरहित आहे. (५)

निश्चळीं स्मरण चेतलें । त्यास चैतन्य ऐसें कल्पिलें ।
गुणसमानत्वें जालें । गुणसाम्य ऐसें ॥ ६ ॥

निश्चळ परब्रह्माच्या ठिकाणी स्मरण स्फुरले, त्यालाच चैतन्य( (मूळमाया) असे कल्पिले. त्या मूळमायेत गुणसाम्य असते म्हणजे गुणांचे समानत्व असते. (६)

गगनीं आली अभ्रछ्याया । तैसी जाणिजे मूळमाया ।
उद्भव आणी विलया । वेळ नाहीं ॥ ७ ॥

आकाशात अभ्रछाया म्हणजे ढग यावेत, तशी ब्रह्माच्या ठिकाणी मूळमाया जाणावी. अभ्रछाया जशी येते आणि जाते, त्यास वेळ लागत नाही, तसेच मायेचे जाणावे. (७)

निर्गुणीं गुणविकारु । तोचि शड्गुणैश्वरु ।
अर्धनारीनटेश्वरु । तयास म्हणिजे ॥ ८ ॥

निर्गुणाच्या ठिकाणी जो स्मरणरूपी गुणविकार निर्माण झाला, तोच षड्गुणेश्वर होय. त्यालाच अर्धनारीनटेश्वर असेही म्हणतात. (८)

आदिशक्ति शिवशक्ति । मुळीं आहे सर्वशक्ति ।
तेथून पुढें नाना वेक्ती । निर्माण जाल्या ॥ ९ ॥

आदिशक्ती, शिवशक्ती, मूळमायेतच सर्व शक्ती आहे. तेथूनच पुढे नाना व्यक्ती निर्माण झाल्या. (९)

तेथून पुढें शुद्धसत्व । रजतमाचें गूढत्व ।
तयासि म्हणिजे महत्तत्त्व । गुणक्षोभिणी ॥ १० ॥

तेथून पुढे शुद्धसत्व, रजतमाचे गुप्तपणे अस्तित्व असते. त्यालाच महत्तत्त्व किंवा गुणक्षोभिणी म्हणतात. (१०)

मुळीं असेचिना वेक्ती । तेथें कैंची शिवशक्ती ।
ऐसें म्हणाल तरी चित्तीं । सावधान असावें ॥ ११ ॥

मूळमायेत व्यक्तीच नसते, पण तेथे शिवशक्ती कशी असेल असे म्हणाल, तर सावध होऊन ऐका. (११)

ब्रह्मांडावरून पिंड । अथवा पिंडावरून ब्रह्मांड ।
अधोर्ध पाहातां निवाड । कळों येतो ॥ १२ ॥

ब्रह्मांडावरून पिंड अथवा पिंडावरून ब्रह्मांडाचा असा अधोर्ध्व म्हणजे विषयाकडून आत्म्याकडे याप्रमाणे विचार केला की निवाडा कळून येतो. (१२)

बीज फोडून आणिलें मना । तेथें फळ तों दिसेना ।
वाढत वाढत पुढें नाना । फळें येती ॥ १३ ॥

फळात बी असते. ते जर फोडून पाहिले तर त्यात फळ दिसून येत नाही. पण पुढे ते बीज अंकुरित होऊन वाढत वाढत वृक्ष झाला की त्याला अनेक फळे लागतात. (१३)

फळ फोडितां बीज दिसे । बीज फोडितां फळ नसे ।
तैसा विचार असे । पिंडब्रह्मांडीं ॥ १४ ॥

फळ फोडून पाहिले तर बीज दिसून येते, पण बीज फोडून त्यात मात्र फळ दिसून येत नाही. पिंड-ब्रह्मांडाचा विचारही असाच आहे. (१४)

नर नारी दोनी भेद । पिंडीं दिसती प्रसिद्ध ।
मुळीं नस्तां विशद । होतील कैसीं ॥ १५ ॥

नर आणि नारी हे दोन्ही भेद पिंडात म्हणजे स्थूल देहात स्पष्टपणे दिसतात. मुळात म्हणजे मूळमायेत जर ते नसतील तर पुढे कसे प्रगट होतील? (१५)

नाना बीजरूप कल्पना । तींत काये येक असेना ।
सूक्ष्म म्हणोनि भासेना । येकायेकी ॥ १६ ॥

मूळमायेच्या ठिकाणी बीजरूपाने नाना कल्पना असतात. तिच्यामध्ये काय असत नाही? कल्पना, वासना, सूक्ष्म असतात, म्हणून सहजासहजी कळून येत नाहीत. (१६)

स्थूळाचें मूळ ते वासना । ते वासना आधीं दिसेना ।
स्थूळावेगळें अनुमानेना । सकळ कांहीं ॥ १७ ॥

स्थूलाचे मूळ ही वासना असते. ती वासना आधी दिसत नाही. म्हणून स्थूलाखेरीज आणखी काही असेल, अशी कल्पनाही येत नाही. (१७)

कल्पनेची सृष्टी केली । ऐसीं वेदशास्त्रें बोलिलीं ।
दिसेना म्हणोन मिथ्या केली । न पाहिजेत कीं ॥ १८ ॥

वेदशास्त्रात कल्पनेने सृष्टी केल्याचे वर्णन येते. ते दिसत नाही, म्हणून मिथ्या केली असे समजता कामा नये. (१८)

पडदा येका येका जन्माचा । तेथें विचार कळे कैंचा ।
परंतु गूढत्व हा नेमाचा । ठाव आहे ॥ १९ ॥

जीवाला अनेक जन्म घ्यावे लागतात. एकेका जन्मामुळे एकेक पडदाच जणू उत्पन्न होतो. मग ब्रह्मासंबंधीचा विचार कसा कळणार? परंतु सिद्धांताच्या गोष्टी नेहमीच गूढ असतात, असा नियमच आहे. (१९)

नाना पुरुषांचे जीव । नाना स्त्रियांचे जीव ।
येकचि परी देहस्वभाव । वेगळाले ॥ २० ॥

नाना पुरुषांचे जीव आणि नाना स्त्रियांचे जीव हे जीवस्वरूपाने एकच असतात. पण देहामुळे देहस्वभाव वेगवेगळे असतात. (२०)

नवरीस नवरी नलगे । ऐसा भेद दिसों लागे ।
पिंडावरून उमगे । ब्रह्मांडबीज ॥ २१ ॥

नवरीला नवरी नको असते. तिला नवरा हवा असतो. असा भेद पिंडावरून दिसू लागतो. त्यावरून ब्रह्मांडातही तो बीजरूपाने असतो हे उमगू लागते. (२१)

नवरीचें मन नवऱ्यावरी । नवऱ्याचें मन नवरीवरी ।
ऐसी वासनेची परी । मुळींहून पाहावी ॥ २२ ॥

नवरीचे मन नवऱ्यावर असते. नवऱ्याचे मन नवरीवर असते. ही वासनेची रीतच आहे. ती मुळापासून समजून घ्यावी. (२२)

वासना मुळींची अभेद । देहसमंधें जाला भेद ।
तुटतां देहाचा समंध । भेद गेला ॥ २३ ॥

वास्तविक मूळ वासनेमध्ये अभेद असतो. पण स्थूलदेहाच्या संबंधामुळे भेद उत्पन्न होतो. देहाचा संबंध सुटला की भेद जातो. (२३)

नरनारींचे बीजकारण। शिवशक्तीमधें जाण।
देह धरितां प्रमाण। कळों आलें ॥ २४॥

नरनारींचे बीजकारण शिवशक्तीमध्ये असते. देह धरला की प्रत्यक्ष प्रमाणावरून हे दिसून येते. (२४)

नाना प्रीतीच्या वासना। येकाचें येकास कळेना।
तिक्षण दृष्टीनें अनुमाना। कांहींसें येतें ॥ २५॥

प्रेमाचे सुद्धा अनेक प्रकार असतात. एकाचा उलगडा दुसऱ्यास होत नाही. सुक्ष्म दृष्टीने पाहिले असता काहीशी कल्पना येऊ शकते. (२५)

बाळकास वाढवी जननी। हें तों नव्हे पुरुषाचेनी।
उपाधी वाढे जयेचेनी। ते हे वनिता ॥ २६॥

आई बालकाला वाढवते. पुरुषाच्याने ही गोष्ट होऊ शकत नाही. स्त्रीमुळेच उपाधी वाढते. (२६)

वीट नाही कंटाळा नाहीं। आलस्य नाहीं त्रास नाहीं।
इतुकी माया कोठेंचि नाहीं। मातेवेगळी ॥ २७॥

मातेला जराही वीट येत नाही, कंटाळा येत नाही, आळस येत नाही अथवा त्रासही वाटत नाही. मातेशिवाय इतके प्रेम कोठेच दिसून येत नाही. (२७)

नाना उपाधी वाढऊं जाणे। नाना मायेनें गोऊं जाणे।
नाना प्रीति लाऊं जाणे। नाना प्रपंचाची ॥ २८॥

स्त्रीमुळेच नाना उपाधी वाढतात. स्त्री प्रेम करून त्या मायेने पुरुषास गुंतवून ठेवते. नाना प्रकारे प्रेम करून प्रपंचाची गोडी लावते. (२८)

पुरुषास स्त्रीचा विश्वास। स्त्रीस पुरुषाचा संतोष।
परस्परें वासनेस। बांधोन टाकिलें ॥ २९॥

पुरुषाला स्त्रीचा विश्वास वाटतो. स्त्रीला पुरुषामुळे संतोष वाटतो. याप्रमाणे परस्परांसंबंधी वासनेने त्यांना बांधून टाकलेले असते. (२९)

ईश्वरें मोठें सूत्र केलें। मनुष्यमात्र गुंतोन राहिलें।
लोभाचें गुंडाळें केलें। उगवेना ऐसें ॥ ३०॥

ईश्वराने ही युक्ती करून मनुष्यमात्रास गुंतवून टाकले आहे. लोभाचा असा गुंता केला आहे की, तो काही केल्या उलगडत नाही. (३०)

ऐसी परस्परें आवडी। स्त्रीपुरुषांची माहां गोडी।
हे मुळींहून चालिली रोकडी। विवेकें पाहावी ॥ ३१॥

अशी स्त्री-पुरुषांना परस्परांची अत्यंत आवड असते. परस्परांबद्दल त्यांना अत्यंत गोडी वाटते. ही गोडी मुळापासूनच चालत आली आहे, हे विवेकाने जाणून घ्यावे. (३१)

मुळीं सूक्ष्म निर्माण जालें। पुढें पष्ट दिसोन आलें।
उत्पतीचें कार्य चाले। उभयतांकरितां ॥ ३२॥

अगदी मुळात सूक्ष्म भेद निर्माण होतो आणि पुढे स्थूल देहात तो स्पष्ट दिसून येतो. स्त्री आणि पुरुष या उभयतांचेमुळेच उत्पत्तीचे कार्य चालते. (३२)

मुळीं शिवशक्ती खरें। पुढें जालीं वधुवरें।
चौऱ्यासि लक्ष विस्तारें। विस्तारली जे ॥ ३३॥

मुळात जी शिवशक्ती असतात, तीच खरी होत. तीच पुढे वधू-वर होतात. त्यांच्या योगेच चौऱ्याऐंशी लक्ष जीव योनींचा अफाट विस्तार होतो. (३३)

येथें शिवशक्तीचें रूप केलें। श्रोतीं मनास पाहिजे आणिलें।
विवरलियांविण बोलिलें। तें वेर्थ जाणावें ॥ ३४॥

याप्रमाणे येथे शिवशक्तीचे रूप वर्णन केले आहे. श्रोत्यांनी ते नीट समजून घेऊन त्याचे मनन करावे. नीट विवरण केल्यावाचून बोलले असता ते व्यर्थच होय, हे जाणून घ्यावे. (३४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'शिवशक्तीनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.



## दशक १७ : समास ३
### श्रवणनिरूपण

॥ श्रीराम ॥

**थांबा थांबा ऐका ऐका। आधींच ग्रंथ सोडूं नका।**
**सांगितलें तें ऐका। सावधपणें ॥१॥**

श्रोते हो! ऐका ऐका! थोडे थांबा, थांबा! मी काय सांगतो ते सावधपणे ऐका! त्यापूर्वीच ग्रंथ बाजूला सारू नका! (१)

**श्रवणामध्ये सार श्रवण। तें हें अध्यात्मनिरूपण।**
**सुचित करून अंत:कर्ण। ग्रन्थामधें विवरावें ॥२॥**

अध्यात्म साधनांत श्रवणाला अग्रक्रम आहे. त्यात अध्यात्मनिरूपणाचे श्रवण हे सारामध्येही सार आहे. म्हणून अंत:करण एकाग्र करून या ग्रंथाचे नीट विवरण करावे. (२)

**श्रवणमननाचा विचार। निजध्यासें साक्षात्कार।**
**रोकडा मोक्षाचा उधार। बोलेंचि नये ॥३॥**

श्रवण, मननाने ब्रह्म विचार ठसवून घेऊन त्याचे निदिध्यासन करण्याने आत्मसाक्षात्कार होतो आणि रोकडा मोक्ष मिळतो. तेथे उधारीचे नाव सुद्धा काढू नका. (३)

**नाना रत्नें परीक्षितां। अथवा वजनें करितां।**
**उत्तम सोनें पुटीं घालितां। सावधान असावें ॥४॥**

नाना रत्नांची परीक्षा करताना अथवा त्यांचे वजन करताना अथवा उत्तम सोने मुशीत घालताना अत्यंत सावधान असावे लागते. (४)

**नाना नाणीं मोजून घेणें। नाना परीक्षा करणें।**
**विवेकी मनुष्यासी बोलणें। सावधपणें ॥५॥**

अनेक नाणी मोजून घेताना, नाना पदार्थांची परीक्षा करताना आणि विवेकी मनुष्याशी बोलताना सावध असावे लागते. (५)

**जैसें लखोलीचें धान्य। निवडून वेंचितां होतें मान्य।**
**सगट मानितां अमान्य। देव क्षोभे ॥६॥**

ज्याप्रमाणे लक्ष धान्य असते, ते निवडून मग अर्पण केले असता ते देवाला मान्य होते. न निवडता एकदम जसेच्या तसे वाहिले तर देव क्षोभतो. (६)

**येकांतीं नाजुक कारबार। तेथें असावें अति तत्पर।**
**त्याच्या कोटिगुणें विचार। अध्यात्मग्रन्थीं ॥७॥**

एकांतात बसून एखाद्या नाजूक गोष्टीबद्दल गुप्तपणे चर्चा किंवा कार्यभाग करणे असेल तर तेथे अति सावध आणि अति तत्पर असावे लागते. त्याच्यापेक्षा अध्यात्मग्रंथाचा विचार करताना कोटिगुणाने सावध आणि तत्पर असावे लागते. (७)

**काहिण्या कथा गोष्टी पवाड। नाना अवतारचरित्रें वाड।**
**त्या समस्तांमध्यें जाड। अध्यात्मविद्या ॥८॥**

नाना कहाण्या, कथा, गोष्टी, पोवाडे, नाना अवतारांची उत्तमोत्तम चरित्रे या सर्वांपेक्षाही अध्यात्मविद्या अधिक गहन आहे. (८)

**गत गोष्टीस ऐकिलें। तेणें काये हातास आलें।**
**म्हणती पुण्य प्राप्त जालें। परी तें दिसेना कीं ॥९॥**

पूर्वी होऊन गेलेल्या गोष्टी ऐकून काय लाभ झाला? तर म्हणतात की पुण्य प्राप्त झाले. पण ते तर दिसून येत नाही. (९)

**तैसें नव्हे अध्यात्मसार। हा प्रचितीचा विचार।**
**कळतां अनुमानाचा संव्हार। होत जातो ॥१०॥**

तशी गोष्ट अध्यात्मसाराची नाही. येथे प्रत्यक्ष अनुभव महत्त्वाचा आहे. अध्यात्मविचार नीट कळला की अनुमानाचा संहार होत जातो. तर्क, कुतर्क, शंका इत्यादी नष्ट होतात. (१०)

**मोठे मोठे येऊन गेले। आत्म्याकरितांच वर्तले।**
**त्या आत्म्याचा महिमा बोले। ऐसा कवणु ॥११॥**

जगात जे थोर थोर पुरुष जन्माला आले, ते आत्म्याच्या प्राप्तीसाठी प्रयत्नशील राहिले. त्या आत्म्याचा महिमा वर्णू शकेल असा जगात कोण आहे? (११)

**युगानयुगें येकटा येक। चालवितो तिनी लोक।**
**त्या आत्म्याचा विवेक। पाहिलाच पाहावा ॥१२॥**

युगानुयुगे जो एकटाच तिन्ही लोक चालवितो, त्या आत्म्याचा विवेक वारंवार करीतच जावा. (१२)

प्राणी आले येऊन गेले। ते जैसे जैसे वर्तले।
ते वर्तणुकेचें कथन केलें। इछेसारिखें ॥ १३ ॥

जे प्राणी जन्माला आले आणि मरून गेले ते जसजसे वागले त्याप्रमाणे त्यांच्या वागणुकीचे वर्णन इच्छेप्रमाणे केले. (१३)

जेथें आत्मा नाहीं दाट। तेथें अवघें सरसपाट।
आत्म्याविण बापुडें काष्ठ। काये जाणे ॥ १४ ॥

जेथे आत्मा प्रगट किंवा जागृत नसतो, तेथे अवघे असून नसल्यासारखेच होते. आत्म्याविरहित असणोर लाकूड बिचारे काय जाणणार? (१४)

ऐसें वरिष्ठ आत्मज्ञान। दुसरें नाहीं यासमान।
सृष्टीमधें विवेकी सज्जन। तेचि हें जाणती ॥ १५ ॥

असे हे आत्मज्ञान सर्वांत वरिष्ठ असून यासारखे श्रेष्ठ दुसरे काहीही नाही. या सृष्टीत जे विवेकी सज्जन असतात तेच ही गोष्ट जाणतात. (१५)

पृथ्वी आणी आप तेज। याचा पृथ्वीमध्यें समज।
अंतरात्मा तत्त्वबीज। तें वेगळेंचि राहिले ॥ १६ ॥

पृथ्वी, पाणी, अग्नी हे स्थूलरूप असल्याने त्यांचा उलगडा पृथ्वीवरच प्रत्यक्षपणे होतो. पण अंतरात्मा जो सर्व तत्त्वांचे आदिकारण आहे, तो वेगळाच राहातो. (१६)

वायोपासून पैलिकडे। जो कोणी विवेकें पवाडे।
जवळीच आत्मा सांपडे। तया पुरुषासी ॥ १७ ॥

वायूपासून पलीकडे जो कोणी विवेकाने अंतरात्म्याचा शोध घेतो, त्या विवेकी पुरुषाला तो आत्मा स्वत:जवळच सापडतो. (१७)

वायो आकाश गुणमाया। प्रकृतिपुरुष मूळमाया।
सूक्ष्मरूपें प्रचित येया। कठिण आहे ॥ १८ ॥

वायू, आकाश, गुणमाया, प्रकृतिपुरुषरूपी मूळमाया ही सर्व अत्यंत सूक्ष्म असल्याने त्यांची प्रचीती येणे फार कठीण आहे. (१८)

मायादेवीच्या धांदली। सूक्ष्मीं कोण मन घाली।
समजला त्याची तुटली। संदेहवृत्ती ॥ १९ ॥

मायादेवीच्या धांदलीत, सूक्ष्मात मन एकाग्र करायला कुणाला जमणार? जो कोणी समजू शकतो, त्याची संदेहवृत्ती नष्ट होते. (१९)

मूळमाया चौथा देहे। जाला पाहिजे विदेहे।
देहातीत होऊन राहे। धन्य तो साधु ॥ २० ॥

मूळमाया हा ब्रह्मांडीचा चौथा देह आहे. तो विदेह झाला पाहिजे, म्हणजेच 'अहं ब्रह्मास्मि' हे स्फुरणही होता कामा नये. अशा रीतीने जो देहातीत होऊन राहातो तो साधू धन्य होय. (२०)

विचारें ऊर्ध चढती। तयासी च ऊर्धगती।
येरां सकळां अधोगती। पदार्थज्ञानें ॥ २१ ॥

विचाराने जे ऊर्ध्व चढतात, म्हणजे अंतरात्म्याचा शोध घेतात त्यांनाच ऊर्ध्वगती प्राप्त होते. इतर जे पदार्थाच्या ज्ञानावर समाधान मानतात त्यांना विषयोन्मुख झाल्याने अधोगती प्राप्त होते. (२१)

पदार्थ चांगले दिसती। परी ते सर्वेंचि नासती।
अतो भ्रष्ट ततो भ्रष्ट होती। लोक तेणें ॥ २२ ॥

पदार्थ वरवर पाहाता चांगले दिसतात, पण ते स्वत:च नष्ट होतात. त्यामुळे त्यांच्या नादी जे लोक लागतात त्यांची धड ना इहलोक, ना परलोक अशी स्थिती होते. (२२)

याकारणें पदार्थज्ञान। नाना जिनसीचा अनुमान।
सर्व सांडून निरंजन। धुंडीत जावें ॥ २३ ॥

म्हणूनच पदार्थज्ञान, तसेच नाना जिनसांचे अनुमानिक ज्ञान इत्यादी सर्व सोडून, निरंजन अशा परमात्म्यास धुंडीत जावे. (२३)

अष्टांग योग पिंडज्ञान। त्याहून थोर तत्वज्ञान।
त्याहून थोर आत्मज्ञान। तें पाहिलें पाहिजे ॥ २४ ॥

अष्टांग योग, पिंडज्ञान यांहून तत्त्वज्ञान श्रेष्ठ आहे खरे, पण त्याहूनही आत्मज्ञान अधिक श्रेष्ठ आहे. म्हणून ते कसे प्राप्त होईल हे प्रथम पाहिले पाहिजे. (२४)

मूळमायेचे सेवटीं। हरिसंकल्प मुळीं उठी।
उपासनायोगें मिठी। तेथें घातली पाहिजे ॥ २५ ॥

मूळमायेच्याही पलीकडे प्रथम जेथे 'एकोऽहं बहु स्याम्' हा हरिसंकल्प उठला, त्या अंतरात्म्याच्या ठिकाणी उपासनेच्या योगे मिठी घातली पाहिजे. (२५)

मग त्यापैलिकडे जाण। निखळ ब्रह्म निर्गुण।
निर्मळ निश्चळ त्याची खूण। गगनासारिखी ॥ २६ ॥

मग त्यापलीकडे निखळ, निर्गुण ब्रह्म असून ते गगनासारखे निर्मळ आणि निश्चळ आहे, हीच त्याची खूण आहे. (२६)

येथून तेथवरी दाटलें। प्राणीमात्रांस भेटलें।
पदार्थमात्रीं लिगटलें। व्यापून आहे ॥ २७ ॥

ते ब्रह्म येथून तेथवर म्हणजे सर्वत्र घनदाट कोंदाटलेले आहे, सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीही ते ओतप्रोत असून पदार्थमात्रास चिकटलेले असून सर्वांस व्यापून राहिले आहे. (२७)

त्याऐसें नाहीं थोर। सूक्ष्माहून सूक्ष्म विचार।
पिंडब्रह्मांडाचा संव्हार। होतां कळे ॥ २८ ॥

त्याच्याहून थोर काही नाही आणि सूक्ष्माहून ते अतिसूक्ष्म आहे. ते कसे हा विचार पिंड-ब्रह्मांडाचा संहार झाला की कळतो. (२८)

अथवा पिंड ब्रह्मांड असतां। विवेकप्रळये पाहों जातां।
शाश्वत कोण हें तत्त्वता। उमजों लागे ॥ २९ ॥

किंवा पिंडब्रह्मांड विद्यमान असताही विवेकप्रलयाने पाहून शाश्वत तत्त्व कोणते, याचा झाडा घेतला असताही ते उमजू लागते. (२९)

करून अवघा तत्त्वझाडा। सारासाराचा निवाडा।
सावधपणें ग्रन्थ सोडा। सुखिनावें ॥ ३० ॥

याप्रमाणे सर्व तत्त्वांचा निरास केला असता आणि सारासार-विवेकाने ठाम निवाडा झाला की मग सावधपणे सुखेनैव ग्रंथ बाजूला ठेवलात तरी चालेल. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रवणनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.

❑ ❑

## दशक १७ : समास ४

## अनुमाननिर्शन

॥ श्रीराम ॥

बहुत जनासी उपाये। वक्तयास पुसतां त्रासों नये।
बोलतां बोलतां अन्वयें। सांडूं नये ॥ १ ॥

अध्यात्माचे निरूपण ऐकल्याने अनेक लोकांचा फायदा होत असतो. मात्र श्रोत्यांनी जर वक्त्याला काही प्रश्न विचारले, शंका विचारल्या तर त्याने त्रासता कामा नये. तसेच वक्त्याने बोलताना विषयानुक्रम सोडूनही कधी बोलू नये. (१)

श्रोत्यानें आशंका घेतली। ते तत्काळ पाहिजे फेडिली।
स्वगोष्टीनें स्वगोष्टी पेंचली। ऐसें न व्हावें ॥ २ ॥

श्रोत्याने जर शंका घेतली तर ती तत्काळ फेडली पाहिजे. तसेच आपल्याच एखाद्या वचनाने आपणच पूर्वी बोललेल्या वचनाला बाधा येत नाही ना, याविषयी वक्त्याने सावध राहिले पाहिजे. (२)

पुढें धरितां मागें पेंचला। मागें धरितां पुढें उडाला।
ऐसा सांपडतचि गेला। ठाईं ठाईं ॥ ३ ॥

नाहीतर पुढे जे बोलतो, त्यामुळे पूर्वी त्यानेच सांगितलेल्या गोष्टीस विरोध होतो आणि पूर्वी बोललेल्याचे समर्थन करू गेल्याने पुढे बोललेल्या वचनास बाधा येते, असे झाले तर तो मग ठायी ठायी चुकतच जातो आणि पेचात सापडतो. (३)

पोहणारचि गुचक्या खातो। जनास कैसा काढूं पाहतो।
आशय लोकांचा राहातो। ठाइं ठाइं ॥ ४ ॥

पोहणाराच जर स्वत:ला सावरू शकत नसेल तर तो बुडणाऱ्या लोकांना कसा बाहेर काढणार? त्यामुळे लोकांच्या शंका तशाच राहून जातात. (४)

आपणचि बोलिला संव्हार। आपणचि बोलिजे सर्वसार।
दुस्तर मायेचा पार। टाकिला पाहिजे ॥५ ॥

एकदा आपणच जर संहारासंबंधी बोललो आणि परत आपणच जर सर्व सार असे म्हणू लागलो, तर श्रोत्याचा निश्चय कसा होईल? अशा निरूपणाने दुस्तर मायेच्या पार कोणीही कसा जाऊ शकेल? (५)

जें जें सूक्ष्म नाम घ्यावें। त्याचें रूप बिंबऊन द्यावें।
तरीच वक्ता म्हणवावें। विचारवंत ॥ ६ ॥

निरूपणात जे जे सूक्ष्म असे विचार वक्ता मांडेल, त्याचे स्वरूप श्रोत्यांच्या ठिकाणी बिंबवता आले पाहिजे. तरच त्यास विचारवंत वक्ता असे म्हणता येईल. (६)

**ब्रह्म कसें मूळमाया कैसी । अष्टधा प्रकृति शिवशक्ति कैसी।**
**शड्गुणेश्वराची स्थिति कैसी । गुणसाम्याची ॥ ७॥**

ब्रह्म कसे आहे, मूळमाया कशी आहे, अष्टधा प्रकृती म्हणजे काय, शिवशक्तीचे स्वरूप काय, षड्गुणेश्वराची आणि गुणसाम्याची स्थिती कशी असते? (७)

**अर्धनारीनटेश्वर । प्रकृतिपुरुषाचा विचार।**
**गुणक्षोभिणी तदनंतर । त्रिगुण कैसे ॥ ८॥**

अर्धनारीनटेश्वर कुणास म्हणतात, प्रकृती म्हणजे काय, पुरुष म्हणजे काय, गुणक्षोभिणी माया कशी असते, त्यानंतर त्रिगुण कसे प्रगट होतात? (८)

**पूर्वपक्ष कोठून कोठवरी । वाच्यांश लक्ष्यांशाची परी।**
**सूक्ष्म नाना विचार करी । धन्य तो साधु ॥ ९॥**

पूर्वपक्ष कोठून कोठेपर्यंत असतो, वाच्यांश म्हणजे काय, लक्ष्यांश म्हणजे काय, याप्रकारे अनेक पारिभाषिक संज्ञांचा, शब्दांचा सूक्ष्म विचार जो जाणतो, तो साधू धन्य होय. (९)

**नाना पाल्हाळीं पडेना । बोलिलेंचि बोलवेना।**
**मौन्यगर्भ अनुमाना । आणून सोडी ॥ १०॥**

असा वक्ता जो असेल तो उगीच नाना पाल्हाळ लावत नाही. एकदा बोललेलेच परत परत बोलत नाही आणि जेथे वाणीला मौन पडते, ते ब्रह्म आपल्या निरूपणाने श्रोत्यांच्या कल्पनेत आणून सोडतो. (१०)

**घडी येक विमळ ब्रह्म । घडी येक म्हणे सर्व ब्रह्म।**
**द्रष्टा साक्षी सत्ता ब्रह्म । क्षण येक ॥ ११॥**

एखादा वक्ता एकदा म्हणतो की, ब्रह्म विमल आहे, तर दुसऱ्याच क्षणी म्हणतो की सर्व ब्रह्मच आहे. तर परत काही वेळाने ब्रह्मच द्रष्टा आहे, साक्षी आहे, त्यालाच सत्ता ब्रह्म असेही म्हणतो. (११)

**निश्चळ तेंचि जालें चंचळ । चंचळ तेंचि ब्रह्म केवळ।**
**नाना प्रसंगीं खळबळ । निवाडा नाहीं ॥ १२॥**

कधी म्हणतो की निश्चळ तेच चंचळ झाले, तर कधी म्हणतो की चंचळही केवळ ब्रह्मच आहे. याप्रमाणे निरनिराळ्या प्रसंगी निरनिराळी विधाने तो करतो. त्याचा स्वत:चाच कुठल्याही बाबतीत निश्चय झालेला नसतो. (१२)

**चळतें आणी निश्चळ । अवघें चैतन्यचि केवळ।**
**रूपें वेगळालीं प्रांजळ । कदापी बोलवेना ॥ १३॥**

चंचळ आणि निश्चळ सर्व केवळ चैतन्यच आहे असे म्हणतो. प्रत्येकाचे स्वरूप स्पष्ट वेगवेगळे करून निश्चितपणे त्याला सांगताच येत नाही. (१३)

**उगीच करी गथागोवी । तो लोकांस कैसें उगवी।**
**नाना निश्चयें नाना गोवी । पडत जाते ॥ १४॥**

अशा प्रकारचा गोंधळ ज्याच्या स्वत:च्या विचारातच आहे, तो लोकांचे समाधान कसे करू शकणार? निरनिराळी मते, निरनिराळी विधाने ऐकल्याने नाना प्रकारचे गोंधळ वाढतच जातात. (१४)

**भ्रमास म्हणें परब्रह्म । परब्रह्मास म्हणे भ्रम।**
**ज्ञातेपणाचा संभ्रम । बोलोन दावी ॥ १५॥**

भ्रमाला तो परब्रह्म म्हणतो आणि परब्रह्माला भ्रम म्हणतो आणि आपल्या ज्ञातेपणाची ऐट बोलून दाखवतो. (१५)

**घाली शास्त्रांची दडपण । प्रचितिविण निरूपण।**
**पुसों जातां उगाच सीण । अत्यंत मानी ॥ १६॥**

असा वक्ता आपल्या बोलण्याला शास्त्राधार देण्याचा प्रयत्न करतो, पण त्याचे निरूपण प्रचीतीचे, स्वानुभवाचे नसते. श्रोत्यांनी प्रश्न विचारले की तो त्याला अत्यंत शीण वाटतो. तो त्रासतो. (१६)

**ज्ञात्यास आणि पदार्थभिडा । तो काय बोलेल बापुडा।**
**सारासाराचा निवाडा । जाला पाहिजे ॥ १७॥**

तो स्वत:ला ज्ञाता समजतो, पण त्याला पदार्थाची चाड असते, बिदागीची अपेक्षा असते. अशी ज्याची वृत्ती तो बापडा अध्यात्मासंबंधी काय बोलणार? सार कोणते आणि असार कोणते याचा निवाडा निदान वक्त्यास तरी झाला पाहिजे. (१७)

**वैद्य मात्रेची स्तुती करी । मात्रा गुण कांहींच न करी।**
**प्रचितिविण तैसी परी । ज्ञानाची जाली ॥ १८॥**

वैद्य आपल्याच मात्रेची स्तुती करीत असावा आणि मात्रेचा गुण मात्र काहीच दिसून येऊ नये. तशी प्रचीतीशिवाय ज्ञान सांगणाराची स्थिती असते. (१८)

जेथें नाहीं सारासार। तेथें अवघा अंधकार।
नाना परीक्षेचा विचार। राहिला तेथें ॥ १९ ॥

जेथे सारासारविवेक नसतो, तेथे अवघा अज्ञानरूपी अंधकार भरून राहिलेला असतो. तेथे नाना परीक्षेचा विचार कसा सुचणार? (१९)

पाप पुण्य स्वर्ग नर्क। विवेक आणि अविवेक।
सर्वब्रह्मीं काये एक। सांपडलें नाहीं ॥ २० ॥

पाप, पुण्य, स्वर्ग, नरक, विवेक आणि अविवेक यांच्यात सर्व ब्रह्मच असे म्हटल्यावर भेदास स्थानच राहात नाही. (२०)

पावन आणि तें पतन। दोनीं मानिलीं तत्समान।
निश्चये आणि अनुमान। ब्रह्मरूप ॥ २१ ॥

पतित आणि पावन या दोन्हींना एकसमान मानावे लागेल. निश्चय आणि अनुमान दोन्ही ब्रह्मरूप ठरतील. (२१)

ब्रह्मरूप जालें आघवें। तेथें काये निवडावें।
आवघी साकरचि टाकावें। काये कोठें ॥ २२ ॥

जर सर्व ब्रह्मरूपच असे म्हटले, तर तेथे चांगले आणि वाईट कसे काय निवडावे? सर्वच साखर असे म्हटल्यावर मग काय टाकावे? (२२)

तैसें सार आणि असार। अवघा जाला येकंकार।
तेथें बळावला अविचार। विचार कैंचा ॥ २३ ॥

याप्रमाणे जेथे सार आणि असार सर्व एकंकार होते, तेथे अविचार बळावतो, मग विचार कसा उरेल? (२३)

वंद्य निंद्य येक जालें। तेथें काये हाता आलें।
उन्मत्त द्रव्यें जें भुललें। तें भलतेंच बोले ॥ २४ ॥

वंद्य, निंद्य सर्व एकच झाले तर हाती काय लागणार? म्हणजे काय लाभ होणार? उन्मत्त द्रव्य सेवन करून जो भुलतो तो भलतेच बोलू लागतो. (२४)

तैसा अज्ञानभ्रमें भुलला। सर्व ब्रह्म म्हणोन बैसला।
माहांपापी आणि भला। येकचि मानी ॥ २५ ॥

त्याप्रमाणे अज्ञानरूपी भ्रमाने जो उन्मत्त होऊन भुलतो तो सर्व ब्रह्म असे भलतेच बोलू लागतो आणि महापापी आणि सज्जन यांना एकसारखेच मानू लागतो. (२५)

सर्वसंगपरित्याग। अव्हासवा विषयेभोग।
दोघे येकचि मानितां मग। काये उरलें ॥ २६ ॥

सर्वसंगपरित्याग म्हणजेच प्रखर वैराग्य आणि मनसोक्त विषयभोग या दोन्हीला जर एकच मानले तर मग काय उरले? (२६)

भेद ईश्वर करून गेला। त्याच्या बाचेन न वचे मोडिला।
मुखामधें घांस घातला। तो अपानीं घालावा ॥ २७ ॥

ईश्वरानेच भेद निर्माण केला आहे. तो कुणाच्या बापालाही मोडता येत नाही. अन्नाचा घास हा मुखातच घालावा लागतो. तो गुदद्वारी घालता येईल का? (२७)

ज्या इंद्रियांस जो भोग। तो तो करी येथासांग।
ईश्वराचें केलें जग। मोडितां उरेना ॥ २८ ॥

ईश्वराने प्रत्येक इंद्रियाचे विषयभोग ठरवून दिले आहेत. ज्या इंद्रियास जो विषयभोग नेमून दिला आहे तोच भोग ते इंद्रिय यथासांग घेऊ शकते. ईश्वराने जगाच्या रहाटीचे जे नियम केलेले आहेत ते मोडून चालावयाचे नाही. तसे केले तर काहीच उरणार नाही. (२८)

अवघी भ्रांतीची भुटाटकी। प्रचितिविण गोष्टी लटकी।
वेड लागलें जे बटकी। ते भलतेंचि बोले ॥ २९ ॥

सर्व ब्रह्म असे म्हणणे ही अवघी भ्रांतीची भुताटकी आहे. प्रचीतीशिवायचे बोलणे हे खोटे असते. एखाद्या बटकीला वेड लागले म्हणजे ती जसे भलतेच बोलते, तसेच ते समजावे. (२९)

प्रत्ययज्ञाता सावधान। त्याचें ऐकावें निरूपण।
आत्मसाक्षात्काराची खूण। तत्काळ बाणे ॥ ३० ॥

जो स्वानुभवसंपन्न ज्ञानी वक्ता असतो, त्याचेच निरूपण ऐकावे म्हणजे आत्मसाक्षात्काराची खूण तत्काळ बाणते. (३०)

वेडें वांकडें जाणावें। आंधळें पाउलीं वोळखावें।
बाश्कळ बोलणें सांडावें। वमक जैसें ॥ ३१ ॥

एखादा माणूस आंधळा आहे की नाही, हे जसे त्याच्या चालण्यावरून कळते, तसे वेडेवाकडे काय ते नीट जाणून घ्यावे आणि असे बाष्कळ बोलणे वांतीप्रमाणे त्याज्य मानावे, ऐकूच नये. (३१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अनुमाननिर्शननाम' समास चौथा समाप्त.

❑❑

## दशक १७ : समास ५
### अजपानिरूपण

॥ श्रीराम ॥

येकवीस सहस्त्र सासें जपा । नेमून गेली ते अजपा ।
विचार पाहातां सोपा । सकळ कांहीं ॥ १ ॥

दिवसरात्र मिळून माणसाचे एकवीस हजार सहाशे श्वास, उच्छ्वास होतात. यालाच अजपा असे म्हणतात. विचार करून पाहिला की, सर्व काही सोपे आहे हे कळून येते. (१)

मुखीं नासिकीं असिजे प्राणें । तयास अखंड येणें जाणें ।
याचा विचार पाहाणें । सूक्ष्मदृष्टीं ॥ २ ॥

मुखात आणि नाकात प्राणवायू असतो. त्याचे येणे-जाणे अखंड चालू असते. सूक्ष्म दृष्टीने याचा विचार पाहिला पाहिजे. (२)

मुळीं पाहातां येक स्वर । त्याचा तार मंद्र घोर ।
त्या घोराहून सूक्ष्म विचार । अजपाचा ॥ ३ ॥

मुळात पाहिले तर स्वर एकच आहे. पण तार स्वर म्हणजे उच्चस्वर टाळूत जाणवणारा, मंद्र म्हणजे मध्य स्वर हृदयात जाणवणारा, घोर म्हणजे खालचा स्वर म्हणजे नाभीजवळ जाणवणारा, असे त्याचे प्रकार आहेत. पण अजपाचा विचार हा घोराहूनही सूक्ष्म आहे. (३)

सरिगमपदनिस । सरिं मात्रुका सायास ।
प्रथम स्वरें मात्रुकांस । म्हणोन पाहावें ॥ ४ ॥

'सारेगमपधनिसा' हे सप्तस्वर आहेत. आरोह व अवरोह यांच्या प्रयत्नाने प्रथम सप्तकातील 'सा' या प्रथम स्वरापासून आरंभ करून दुसऱ्या सप्तकातील 'रे' पर्यंत स्वरमातृका प्रयत्नाने म्हणून पहाव्यात. (४)

परेवाचेहून अर्ते । आणि पश्यंतीखालतें ।
स्वराचें जन्मस्थान तें । तेथून उठे ॥ ५ ॥

परा वाचेपासून वर म्हणजे नाभीपासून वर आणि पश्यंतीच्या खाली म्हणजेच हृदयाच्या खाली स्वरांचे जन्मस्थान आहे. तेथून स्वरांची अजपाजपाची सुरुवात होते. (५)

येकांतीं उगेंच बैसावें । तेथें हें समजोन पाहावें ।
अखंड घ्यावें सांडावें । प्रभंजनासी ॥ ६ ॥

एकांतात अगदी शांत बसावे. तेथे हे सर्व नीट समजून घेऊन प्राणवायू अखंड घ्यावा आणि सोडावा. (६)

येकांतीं मौन्य धरून बैसे । सावध पाहातां कैसें भासे ।
सोहं सोहं ऐसे । शब्द होती ॥ ७ ॥

एकांती मौन धरून सावधपणे श्वासोच्छ्वास होत असता लक्षपूर्वक पाहावे. म्हणजे सोऽहं सोऽहं असा शब्द होत असल्याचा भास होतो. (७)

उच्चारेंविण जे शब्द । ते जाणावे सहजशब्द ।
प्रत्यया येती परंतु नाद । कांहींच नाहीं ॥ ८ ॥

उच्चाराशिवाय जे शब्द त्यांना सहजशब्द म्हणतात. ते अनुभवाला येतात, परंतु नाद, आवाज काहीच नसतो. (८)

ते शब्द सांडून बैसला । तो मौनी म्हणावा भला ।
योगाभ्यासाचा गल्बला । याकारणें ॥ ९ ॥

तो नाद म्हणजे 'सोऽहं' हा शब्द आणि त्याचा लक्ष्यार्थ यांचाही लय होऊन जो बसतो, तो साधक खरा मौनी आहे असे म्हणावे. हे साधावे म्हणूनच लोक योगाभ्यासाची खटपट करतात. (९)

येकांतीं मौन्य धरून बैसला । तेथें कोण शब्द जाला ।
सोहं ऐसा भासला । अंतर्यामीं ॥ १० ॥

एकांतात मौन धरून बसल्यावर जो सहज शब्द ऐकू आला तो अंतर्यामी सोऽहं असाच भासला. (१०)

धरितां सो सांडितां हं । अखंड चाले सोहं सोहं ।
याचा विचार पाहातां बहु । विस्तारला ॥ ११ ॥

श्वास घेताना 'सो' आणि सोडताना 'ऽहं' असा अखंड सोऽहं सोऽहं शब्द ऐकू येतो. याचा विचार करू लागले की त्यात फार खोल अर्थ भरलेला दिसतो. (११)

देहधारक तितुका प्राणी । श्वेतजउद्भिजादिक खाणी ।
स्वासोस्वास नस्तां प्राणी । कैसे जिती ॥ १२ ॥

देहधारक म्हणून जितके प्राणी स्वेदज, उद्भिज्जादिक चारी खाणीत आहेत, ते श्वासोच्छ्वास करूनच जगतात. त्याखेरीज ते जगूच शकत नाहीत. (१२)

ऐसी हे अजपा सकळांसी । परंतु कळे जाणत्यासी ।
सहज सांडून सायासीं । पडोंच नये ॥ १३ ॥

असा हा श्वासाबरोबर चालणारा अजपाजप सर्वांच्याच ठिकाणी चालू असतो. पण जाणत्यालाच तो कळतो. हे सहज साधन सोडून सायासात पडूच नये. (१३)

सहज देव असतचि असे। सायासें देव फुटे नासे।
नासिवंत देवास विश्वासे। ऐसा कवणु ॥ १४॥

अंतरात्मा हा सहज देव असतच असतो. कृत्रिम देव मूर्ती इत्यादी फुटतात, नाश पावतात. नाशिवंत देवावर विश्वास कोण बरे ठेवील? (१४)

जगदांतराचें दर्शन। सहज घडे अखंड ध्यान।
आत्मइछेनें जन। सकळ वर्तती ॥ १५॥

जगाच्या आणि आपल्याही अंतर्यामी जो अंतरात्मा आहे, त्याच्याशी तादात्म्य पावल्याने मग देवाचे ध्यान, दर्शन अखंडच घडत असते. त्याच्या इच्छेप्रमाणेच सर्वही जण इंद्रिये आदी वागत असतात. (१५)

आत्मयाचें समाधान। घडे तैसेंचि आशन।
सांडलें फिटलें समर्पण। तयासीच होये ॥ १६॥

आत्म्याचे समाधान ज्यायोगे घडेल, असेच भोजन इत्यादी भोग घेतले जातात. सांडते, लवंडते, हरवते तेही शेवटी अंतरात्म्यालाच समर्पण होते. (१६)

अग्नपुरुष पोटीं वसती। तयास अवदानें सकळ देती।
लोक आज्ञेमधें असती। आत्मयाचे ॥ १७॥

प्रत्येक प्राण्याच्या पोटात अग्निपुरुष वास करतो. त्यालाच सर्वजण आहुती देत असतात. अशा रीतीने सर्व लोक अंतरात्म्याचे आज्ञेतच राहातात. (१७)

सहज देवजपध्यानें। सहज चाल्णें स्तुति स्तवनें।
सहज घडे तें भगवान्नें। मान्य कीजे ॥ १८॥

एकदा असे तादात्म्य झाले की, प्रत्येक क्रिया ही त्याचीच सेवा होते. येथे देहभाव नसल्याने कृत्रिम उपासनेची गरज नसते अशी ही मीपणाविरहित सहज होत असलेली सेवाच प्रभूला मान्य होते. (१८)

सहज समजायाकारणें। नाना हटयोग करणें।
परंतु येकायेकीं समजणें। घडत नाहीं ॥ १९॥

हे सहज साधण्याकरिताच नाना हठयोगादी साधने केली जातात. परंतु ते सहजासहजी समजले असे घडत नाही. (१९)

द्रव्य चुकतें दरिद्र येतें। तळीं लक्ष्मी वरी वर्ततें।
प्राणी काये करील तें। ठाउकें नाहीं ॥ २०॥

घरात द्रव्य आहे हे माहीत नसल्याने दारिद्र्य भोगावे. एखाद्याच्या घरी तळघरात द्रव्य पुरलेले असते, पण वर तो दरिद्र्यासारखा राहत असतो! तो तरी काय करणार? कारण तळी लक्ष्मी आहे, हे त्याला ठाऊकच नसते. (२०)

तळघरामधें उदंड द्रव्य। भिंतीमधें घातलें द्रव्य।
स्तंभीं तुळवटीं द्रव्य। आपण मधें ॥ २१॥

तळघरात उदंड द्रव्य आहे. भिंतीत, स्तंभात तुळयांमध्ये सर्वत्र उदंड द्रव्य आहे आणि आपण मध्ये आहोत. (२१)

लक्ष्मीमध्यें करंटा नांदे। त्याचें दरिद्र आधीक सांदे।
नवल केलें परमानंदें। परमपुरुषें ॥ २२॥

सर्वत्र लक्ष्मी असून जो असा करंट्यासारखा नांदतो, त्याचे दारिद्र्य अधिकच दु:खदायक होते. परमपुरुष जो परमानंद त्याने केवढे हे नवल केले आहे पहा बरे! (२२)

येक पाहाती येक खाती। ऐसी विवेकाची गती।
प्रवृत्ति अथवा निवृत्ति। येणेंचि न्यायें ॥ २३॥

श्रीमंत माणसे ऐश्वर्य भोगतात, खातात, पितात. दरिद्री, भाग्यहीन माणसे नुसतीच पाहात राहतात. विवेकी पुरुषांची स्थितीही अशीच असते. ते परमानंदाचा उपभोग घेतात आणि अज्ञानी लोक दु:ख भोगत असतात. (२३)

अंतरीं वसतां नारायेणें। लक्ष्मीस काये उणें।
ज्याची लक्ष्मी तो आपणें। बळकट धरावा ॥ २४॥

नारायण ज्याच्या अंतरात वास करतो, त्याच्या ऐश्वर्यात कमीपणा कसा असू शकेल? म्हणून लक्ष्मी ज्याची अंकित आहे, तो नारायण आपण हृदयात बळकट धरावा. (२४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अजपानिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.**

❑❑

## दशक १७ : समास ६

## देहात्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

**आत्मा देहामध्यें असतो। नाना सुखदुखें भोगितो।**
**सेवटीं शरीर सांडून जातो। येकायेकीं ॥ १ ॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, आत्मा देहात राहतो आणि नाना सुख-दुःखे भोगतो आणि शेवटी एकाएकी शरीर सोडून निघून जातो. (१)

**शरीरीं शक्ति तारुण्यपणीं। नाना सुखें भोगी प्राणी।**
**अशक्त होतां वृद्धपणीं। दुःखें भोगी ॥ २ ॥**

तारुण्यात शरीरात शक्ती असते, तेव्हा प्राणी नाना सुखांचा उपभोग घेतो. वृद्धपणी शरीरातील शक्ती नाहीशी होऊन तो अशक्त होतो आणि दुःख भोगतो. (२)

**मरावेना ऐसी आवडी। हातपाये खोडून प्राण सोडी।**
**नाना दुःखें अवघडी। वृद्धपणीं ॥ ३ ॥**

आपण मरूच नये अशी त्याची इच्छा असते, पण हातपाय झाडून तो प्राण सोडतो. वृद्धपणी त्याला अनेक दुःखे सोसावी लागतात आणि तो अवघडून जातो. (३)

**देहआत्मयांची संगती। कांहींयेक सुख भोगिती।**
**चर्फडचर्फडून जाती। देहांतकाळीं ॥ ४ ॥**

देह आणि आत्मा यांची संगत झाली की काही सुख भोगायला मिळते हे खरे, पण देहांतकाळी चरफडून प्राणी मरतो. (४)

**ऐसा आत्मा दुःखदायेक। येकांचे प्राण घेती येक।**
**आणी सेवटीं निरार्थक। कांहींच नाहीं ॥ ५ ॥**

देहाचा आत्म्याशी संयोग असा दुःखदायक आहे. लोक स्वार्थासाठी एकमेकांचा प्राण घेतात. पण शेवटी सर्व निरर्थक ठरते. त्याचा काही उपयोग होत नाही. (५)

**ऐसा दों दिसांचा भ्रम। त्यास म्हणती परब्रह्म।**
**नाना दुःखाचा संभ्रम। मानून घेतला ॥ ६ ॥**

असा हा दोन दिवसांचा भ्रम आहे. पण त्यालाच परब्रह्म म्हणतात. नाना दुःखाच्या पसाऱ्याला ते गोड मानून घेतात. (६)

**दुःखी होऊन चर्फडून गेले। तेथें कोण समाधान जालें।**
**कांहींयेक सुख भोगिलें। तों सर्वेचि दुःख ॥ ७ ॥**

दुःखी होऊन चरफडून मेले, तेथे कोठले समाधान लाभले? काही एक सुख भोगतात की नाही, तोपर्यंत सर्वच दुःख प्राप्त होते. (७)

**जन्मदारभ्य आठवावें। म्हणिजे अवघें पडेल ठावें।**
**नाना दुःख मोजावें। काये म्हणोनी ॥८॥**

जन्मापासूनची आठवण करावी, म्हणजे सर्व काही समजून येईल. जी नाना दुःखे भोगावी लागतात, ती काय म्हणून मोजावीत? (८)

**ऐसी आत्मयाची संगती। नाना दुःखें प्राप्त होती।**
**दैन्यवाणे होऊन जाती। प्राणीमात्र ॥ ९ ॥**

आत्म्याची संगती अशी आहे. त्याच्यायोगे नाना दुःखे प्राप्त होतात आणि प्राणिमात्र शेवटी दैन्यवाणे होऊन मरून जातात. (९)

**कांहीं आनंद कांहीं खेद। जन्मवरी पडिला समंध।**
**नाना प्रकारीं विरुद्ध। तडातोडी ॥ १० ॥**

देह आणि आत्मा यांचा जन्मापासून संबंध येतो. त्यामुळे त्याला काही आनंद, काही खेद सोसावा लागतो. नाना प्रकारे मनाविरुद्ध गोष्टी घडत असतात. तातुटी होत असतात. (१०)

**निद्राकाळीं ढेकुण पिसा। नाना प्रकारीं वळसा।**
**नाना उपायें वळसा। त्यांस होये ॥११॥**

झोपेच्या वेळी ढेकूण आणि पिसवा नाना प्रकारे त्रास देतात. त्यावर उपाय केले की त्यांना त्रास होतो. (११)

**भोजनकाळीं माश्या येती। नाना पदार्थ उंदीर नेती।**
**पुढें त्यांचीहि फजिती। मार्जेरें करिती ॥ १२ ॥**

भोजनाच्या वेळी माशा येऊन त्रास देतात. नाना पदार्थ उंदीर पळवतात. पुढे त्यांचीही फजिती मांजरे करतात. (१२)

**वा चामवा गोंचिड। गांधेलें कानटें उदंड।**
**येकास येक चर्फड। दोहिंकडे ॥ १३ ॥**

डोक्यातील उवा, त्वचेत घुसणाऱ्या उवा, गोचीड, गांधील, कानटे (एक जातीचा सर्प) उदंड असतात आणि एकामुळे दुसरा एखादा चरफडत असतो. अशी दोन्ही बाजूने चरफड चालू असते. त्यांचा त्रास आपल्याला होतो आणि आपला त्रास त्यांना होतो. (१३)

विंचु सर्प वाग रिसें। सुसरी लांडिगे माणसास माणसें।
परस्परें सुखसंतोषें। येकहि नाहीं ॥ १४॥

विंचू, सर्प, वाघ, अस्वले, सुसरी, लांडगे आणि माणसांना माणसे याप्रमाणे सर्व एकमेकांस त्रास देत असतात. परस्परात प्रेम, सुख, संतोष कोठेही दिसून येत नाही. (१४)

चौऱ्यासी लक्ष उत्पत्ती। येकांस येक भक्षिती।
नाना पीडा दुःखणी किती। म्हणौन सांगावें ॥ १५॥

चौऱ्याऐंशी लक्ष योनींमध्ये असंख्य जीवांची उत्पत्ती होत असते. त्यांतील कित्येक एक दुसऱ्यास भक्षण करीत असतात. प्राणिमात्रांना ज्या नाना पीडा आणि दुखणी भोगावी लागतात, त्याचे वर्णन किती म्हणून करावे? (१५)

ऐसी अंतरात्म्याची करणी। नाना जीव दाटले धरणीं।
परस्परें संव्हारणी। येकयेकांची ॥ १६॥

अंतरात्म्याची करणी ही अशी आहे. या पृथ्वीतलावर अनेक प्रकारच्या जीवांची अगदी दाटी झाली आहे. त्यात सतत परस्परांचा संहार करणे सुरूच असते. (१६)

अखंड रडती चर्फडिती। विवळविवळों प्राण देती।
मूर्ख प्राणी त्यास म्हणती। परब्रह्म ॥ १७॥

असे प्राणी अखंड रडतात, चरफडतात, विव्हळून प्राण देतात आणि मूर्ख प्राणी त्यास परब्रह्म म्हणतात. (१७)

परब्रह्म जाणार नाहीं। कोणास दुःख देणार नाहीं।
स्तुति निंदा दोनी नाहीं। परब्रह्मीं ॥ १८॥

परब्रह्म कधी जात नाही. ते कोणास कधी दुःख देत नाही. स्तुती आणि निंदा दोन्हीही परब्रह्माच्या ठिकाणी लागत नाहीत. (१८)

उदंड सिव्या दिधल्या। तितुक्या अंतरात्म्यास लागल्या।
विचार पाहातां प्रत्यया आल्या। येथातथ्य ॥ १९॥

उदंड शिव्या दिल्या, तर त्या अंतरात्म्याला लागतात नाही. विचार करून पाहिले की याचा यथार्थ प्रत्यय येतो. (१९)

धगडीचा बटकीचा लवंडीचा। गधडीचा कुतरीचा वोंगळीचा।
ऐसा हिशेब सिव्यांचा। किती म्हणोनि सांगावा ॥ २०॥

धगडीचा, बटकीचा, लवंडीचा, गधडीचा, कुतरीचा, बोंगळीचा (चांडाळणीचा) अशा शिव्या अनेक आहेत. त्यांचा हिशोब किती म्हणून सांगावा? (२०)

इतुकें परब्रह्मीं लगेना। तेथें कल्पनाचि चालेना।
तडातोडीचें ज्ञान मानेना। कोणीयेकासी ॥ २१॥

यांपैकी काहीच परब्रह्माच्या ठिकाणी लागत नाही. तेथे कुठलीही कल्पना चालू शकत नाही. असंबद्ध ज्ञान कुणालाच मान्य होत नाही. (२१)

सृष्टीमधें सकळ जीव। सकळांस कैंचें वैभव।
याकारणें ठायाठाव। निर्मिला देवें ॥ २२॥

सृष्टीमध्येच सर्व जीव असतात. त्यातील सर्वांनाच वैभव कसे प्राप्त होणार? म्हणूनच देवाने योग्य-अयोग्य निर्माण केले आहे. (२२)

उदंड लोक बाजारीचे। जें जें आलें तें तें वेंचे।
उत्तम तितुके भाग्याचे। लोक घेती ॥ २३॥

बाजारात उदंड लोक येतात. बाजारात जे जे विकायला आले असेल ते ते लोक घेतात. भाग्यवान लोक असतात ते मात्र उत्तम तेच घेतात. (२३)

येणेंचि न्यायें अन्न वसन। येणेंचि न्यायें देवतार्चन।
येणेंचि न्यायें ब्रह्मज्ञान। प्राप्तव्यासारिखें ॥ २४॥

याच न्यायाने अन्न-वस्त्रे, देवदेवतार्चन आणि ब्रह्मज्ञान हेही प्रारब्धानुसार प्राप्त होते. (२४)

अवघेच लोक सुखी असती। संसार गोड करून नेती।
माहाराजे वैभव भोगिती। तें करंट्यास कैंचें ॥ २५॥

सर्वच लोक आपण सुखी आहोत असे मानतात आणि संसार गोड करून घेतात, पण महाराजे जे वैभव भोगतात, ते अभाग्यास कसे प्राप्त होणार? (२५)

परंतु अंतीं नाना दुःखें। तेथें होतें सगट सारिखें।
पूर्वी भोगिलीं नाना सुखें। अंतीं दुःख सोसवेना ॥ २६॥

परंतु अंती मात्र सर्वांनाच नाना दुःखे सोसावी लागतात. ती सर्वांना सरसकट सारखीच असतात. ज्यांनी पूर्वी नाना सुखे भोगलेली असतात, त्यांना शेवटी ती दुःखे सोसवत नाहीत. (२६)

कठिण दुःख सोसवेना। प्राण शरीर सोडिना।
मृत्यदुःख सगट जना। कासाविस करी ॥ २७॥

एकीकडे कठीण दुःख सोसवत नाही आणि एकीकडे वासनेमुळे प्राण शरीर सोडत नाही. याप्रमाणे मृत्युकाळचे दुःख सरसकट सर्व लोकांना कासावीस करून सोडते. (२७)

नाना अवेवहीन जालें। तैसेंचि पाहिजे वर्तलें।
प्राणीं अंतकाळीं गेलें। कासाविस होउनी ॥ २८ ॥

काही जणांचे काही अवयव (रोगाने अथवा अपघाताने) निकामी होतात. त्यांना तसेच काम करीत जगावे लागते आणि शेवटी अंतकाळी कासावीस होऊन प्राणी मरतात. (२८)

रूप लावण्य अवघें जातें। शरीरसामर्थ्य अवघें राहातें।
कोणी नस्तां मरतें। आपद आपदों ॥ २९ ॥

वृद्धपणी रूप आणि लावण्य सर्व जाते, शरीराचे सामर्थ्यही सर्व नष्ट होते आणि जवळ कोणीही नसताना यातना भोगत भोगत माणूस मरतो. (२९)

अंतकाळ दैन्य दीन। सकळिकांस तत्समान।
ऐसें चंचळ अवलक्षण। दुःखकारी ॥ ३० ॥

अंतकाळ हा सर्वांनाच सारखा दैन्यवाणा असतो. असे हे चंचळाचे म्हणजे अंतरात्म्याचे अवलक्षण फार दुःखदायक आहे. (३०)

भोगून अभोक्ता म्हणती। हे तों अवघीच फजिती।
लोक उगेच बोल्ती। पाहिल्याविण ॥ ३१ ॥

आणि तरी लोक त्याला भोगून अभोक्ता असे म्हणतात. खरे तर सर्व फजितीच असते. पण लोक पाहिल्याशिवाय उगीच बोलत असतात. (३१)

अंतकाळ आहे कठिण। शेरीर सोडिना प्राण।
बराड्यासारिखें लक्षण। अंतकाळीं ॥ ३२ ॥

अंतकाळ फार कठीण असतो. प्राण शरीर सोडत नाही आणि अंतकाळी केविलवाणी, असहाय्य भिकाऱ्यासारखी अवस्था होते. (३२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहात्मनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.**

❑ ❑

## दशक १७ : समास ७

## जगज्जीवननिरूपण

॥ श्रीराम ॥

मुळीं उदक निवळ असतें। नाना वल्लीमधें जातें।
संगदोषें तैसें होतें। आंब्ल तिक्षण कडवट॥१ ॥

मुळात पाणी स्वच्छ असते. ते अनेक प्रकारच्या वेलींमध्ये शोषले जाते आणि मग संगदोषामुळे ते आंबट, तिखट किंवा कडवट होते. (१)

आत्मा आत्मपणें असतो। देहसंगें विकारतो।
साभिमानें भरीं भरतो। भल्तिकडे ॥ २ ॥

आत्मा हा मुळात आत्मरूपानेच असतो. देहाच्या संगतीने त्याच्या ठिकाणी विकार उत्पन्न होतात आणि देहाचा अभिमान धरून भलत्याच भरीला पडून भलतीकडेच जातो. (२)

बरी संगती सांपडली। जैसी उंसास गोडी आली।
विषवल्ली फांपावली। घातकी प्राणी ॥ ३ ॥

जर माणसाला उत्तम संगत मिळाली तर उसात पाण्याने गोडी यावी तसे कल्याण होते. पाण्याने विषवल्ली फोफावते, त्याप्रमाणे वाईट संगतीने माणूस घातकी बनतो. (३)

अठराभार वनस्पती। गुण सांगावे ते किती।
नाना देहाचे संगती। आत्मयास होये ॥ ४ ॥

अठराभार वनस्पती आहेत. त्यांतील प्रत्येक वनस्पतीचा गुण वेगवेगळा असतो. त्या गुणांचे वर्णन करणे कसे शक्य आहे? आत्म्यालाही नाना देहांची संगती लाभते व त्यास अनुसरून गुण त्याच्या ठिकाणी प्रकट होतात. (४)

त्यामधें कोणी भले। ते संतसंगें निघाले।
देहाभिमान सांडून गेले। विवेकबळें ॥ ५ ॥

त्यामध्ये काही सज्जनांना संतांची संगती लाभते आणि ते विवेकाच्या बळावर देहाभिमान सोडून या भवसागरातून पार होतात. (५)

उदकाचा नाशचि होतो। आत्मा विवेकें निघतो।
ऐसा आहे प्रत्यय तो। विवेकें पाहा ॥ ६ ॥

उदकाचा तर नाशच होतो, पण विवेकाने अंतरात्मा साऱ्या भ्रमांतून मुक्त होतो. विवेकाने याचा अनुभव घेऊन पहावा. (६)

**ज्यास स्वहितचि करणें। त्यास किती म्हणौन सांगणें।**
**हें ज्याचें त्यानें समजणें। सकळ कांहीं ॥ ७॥**

ज्याला स्वहित करावयाचे असेल, त्याला आणखी किती सांगावे? ज्याचे त्यानेच सर्व काही समजून घेतले पाहिजे. (७)

**आपला आपण करी कुडावा। तो आपला मित्र जाणावा।**
**आपला नाश करी तोसमजावा। वैरी ऐसा ॥ ८॥**

जो आपला आपण कैवार घेतो, तो आपला आपण मित्र जाणावा. जो आपला आपणच नाश करून घेतो, तो स्वत:चाच वैरी बनतो. (८)

**आपलें आपण अन्हित करावें। त्यास आडवें कोणें निघावें।**
**येकांतीं जाऊन जीवें। मारी आपणासी ॥ ९॥**

जो आपले अकल्याण आपणच करून घेतो त्याला कोण अडवू शकणार? एकांतात जाऊन एखाद्याने आत्मघात करून घ्यावा तसेच हे आहे. (९)

**जो आपला आपणघातकी। तो आत्महत्यारा पातकी।**
**याकारणें विवेकी। धन्य साधु ॥ १०॥**

जो आपला घात आपणच करून घेतो, तो आत्महत्यारा अत्यंत पातकी आहे असे समजावे. म्हणून जो विवेक करतो तो साधू धन्य होय. (१०)

**पुण्यवंतां सत्संगती। पापिष्टां असत्संगती।**
**गति आणि अवगती। संगतीयोगें ॥ ११॥**

जो पुण्यवान असतो त्याला सत्संगती मिळते, तर अत्यंत पापी माणसाला दुर्जनांची संगत लाभते. जशी संगती लाभते त्याप्रमाणे सद्गती अथवा अधोगती प्राप्त होते. (११)

**उत्तम संगती धरावी। आपली आपण चिंता करावी।**
**अंतरीं बरी विवरावी। बुद्धि जाणत्याची ॥ १२॥**

उत्तम संगती धरावी आणि आपले स्वत:चे कल्याण कसे होईल याची चिंता करावी. जाणत्या माणसाचा सल्ला घेऊन त्यावर आपण आपल्या अंतर्यामी विचार करावा. (१२)

**इहलोक आणि परलोक। जाणता तो सुखदायेक।**
**नेणत्याकरितां अविवेक। प्राप्त होतो ॥ १३॥**

जाणत्या माणसाच्या संगतीने इहलोक आणि परलोक दोन्ही सुखदायक ठरतात. अज्ञानी माणसाची संगत केली की अविवेक प्राप्त होतो. (१३)

**जाणता देवाचा अंश। नेणता म्हणिजे तो राक्षस।**
**यामधें जें विशेष। तें जाणोन घ्यावें ॥ १४॥**

जाणता हा देवाचा अंश असतो, तर नेणता म्हणजे राक्षसच समजावा. या दोघांत कोण श्रेष्ठ, कनिष्ठ ते जाणून घ्यावे. (१४)

**जाणता तो सकळां मान्य। नेणता होतो अमान्य।**
**जेणेंकरिता होईजे धन्य। तेंचि घ्यावें ॥ १५॥**

जाणता असतो तो सर्वांना मान्य असतो. नेणता असतो तो लोकांना अमान्य असतो. म्हणून ज्याच्या संगतीने धन्यता लाभत असेल, तेच स्वीकारावे.(१५)

**साक्षपी शाहाण्याची संगती। तेणें साक्षपी शाहाणे होती।**
**आळसी मूर्खाची संगती। आळसी मूर्ख ॥ १६॥**

उद्योगी, प्रयत्नशील, शहाण्या माणसाच्या संगतीने लोकही साक्षेपी, शहाणे होतात, तर आळशी आणि मूर्खाची संगती केल्याने करणाराही आळशी आणि मूर्ख बनतो. (१६)

**उत्तम संगतीचें फळ सुख। अद्धम संगतीचें फळ दु:ख।**
**आनंद सांडुनिया शोक। कैसा घ्यावा ॥ १७॥**

उत्तम संगतीचे फळ सुख असते, अधम संगतीने दु:ख प्राप्त होते. मग आनंद सोडून माणसाने शोक कशाला प्राप्त करून घ्यावा? (१७)

**ऐसे हें प्रगट दिसे। जनामधें उदंड भासे।**
**प्राणीमात्र वर्ततसे। उभयेयोगें ॥ १८॥**

जगात ह्या दोन्ही गोष्टी प्रत्यक्ष पहावयास मिळतात. दोन्ही प्रकारची उदंड उदाहरणे आहेत. पण तरी प्राणी मात्र दोन्ही मार्गांचे अवलंबन करताना दिसतात.(१८)

**येका योगें सकळ योग। येका योगें सकळ वियोग।**
**विवेकयोगें सकळ प्रयोग। करीत जावे ॥ १९॥**

विवेकी माणसाच्या संगतीने सर्व लाभ होतो, तर अविवेकी माणसाच्या संगतीने सर्व चांगल्या गोष्टींचा वियोग होतो. म्हणून सर्व काही विवेकी माणसाच्या संगतीत राहून करावे. (१९)

**अवचितें सांकडींत पडिलें। तरी तेथून पाहिजे निघालें।**
**निघोन जातां जालें। परम समाधान ॥ २०॥**

माणूस अचानक जर अडचणीत सापडला, तर तेथून निघणे भागच असते. तसे निघाल्यावर मग परम समाधान प्राप्त होते. (२०)

**नाना दुर्जनांचा संग। क्षणक्षणा मनभंग।**
**याकारणें कांहीं रंग। राखोन जावें ॥ २१ ॥**

अनेक दुर्जनांच्या संगतीत क्षणाक्षणाला मनाविरुद्ध गोष्टी घडतात, मानभंग होतो. म्हणून आपला स्वाभिमान दुखावला जाणार नाही, इतपतच जवळीक करावी. (२१)

**शाहाणा येत्न त्याच्यागुणें। पाहों जातां काये उणें।**
**सुख संतोष भोगणें। नाना श्लाघ्यता ॥ २२ ॥**

विवेकाने केलेल्या योग्य, दीर्घ दृष्टीच्या प्रयत्नामुळे काहीही कमी पडत नाही. तर उलट सुख-संतोष प्राप्त होऊन अनेक प्रकारे प्रशंसा केली जाते. (२२)

**आतां लोकीं ऐसें आहे। सृष्टीमधें वर्तताहे।**
**जो कोणी समजोन पाहे। त्यास घडे ॥ २३ ॥**

लोकात आणि सृष्टीत अशीच राहाटी आहे, जो कोणी समजून विवेकाने वागतो, त्याला सुख-संतोष लाभतो. (२३)

**बहुरत्न वसुंधरा। जाणजाणों विचार करा।**
**समजल्यां प्रत्ययो अंतरा। माजी येतो ॥ २४ ॥**

'बहुरत्ना वसुंधरा' असे म्हटले जाते, ते नीट जाणून घेऊन विचार करावा व त्यातील रहस्य जाणून त्याचा प्रत्यय अंतरात घ्यावा. (२४)

**दुर्बळ आणि संपन्न। वेडें आणि वित्पन्न।**
**हें अखंड दंडायमान। असतचि असे ॥ २५ ॥**

दुर्बल आणि संपन्न, वेडे आणि व्युत्पन्न अशी दोन्ही प्रकारची माणसे जगात असतात. ही जगाची अनुल्लंघनीय राहाटी अशीच चालत आली आहे. (२५)

**येक भाग्यपुरुष मोडती। येक नवे भाग्यवंत होती।**
**तैसीच विद्या वित्पती। होत जाते ॥ २६ ॥**

एखादा भाग्यवान पुरुष निर्धन होतो किंवा नष्ट होतो, तर कुणी एखादा नवीन भाग्यवंत होतो. विद्या आणि व्युत्पत्तीच्या बाबतीतही असेच घडत असते. त्या पण येतात आणि जातात. (२६)

**येक भरे येक रितें। रितें मागुतें भरतें।**
**भरतेंहि रितें होतें। काळांतरीं ॥ २७ ॥**

एक संपन्न तर एक भिकारी दिसतो. प्रयत्नाने भिकारी संपन्न होतात. परंतु ही संपन्नताही कायम टिकणारी नसते. हा चक्रमेनिक्रम, रहाटाच्या गाडग्याप्रमाणे एकदा भरण्याचा आणि एकदा रिकामे होण्याचा क्रम हा या सृष्टीचा नियमच आहे. (२७)

**ऐसी हे सृष्टीची चाली। संपत्ति दुपारची साउली।**
**वयेसा तरी निघोन गेली। हळुहळु ॥ २८ ॥**

अशी या सृष्टीची प्रथाच आहे. दुपारची सावली जशी थोडाच वेळ पायाखाली टिकते, तशीच संपत्तीही थोडा वेळ टिकून नाहीशी होते. आयुष्यातील वर्षेही हळूहळू निघून जात असतात. (२८)

**बाळ तारुण्य आपलें। वृधाप्य प्रचितीस आलें।**
**ऐसें जाणोन सार्थककेलें। पाहिजे कोणियेकें ॥ २९ ॥**

बालपण, तारुण्य निघून गेले, आता वृद्धावस्थेचा अनुभव येऊ लागला आहे हे जाणून तरी माणसाने आपल्या आयुष्याचे सार्थक केले पाहिजे. (२९)

**देह जैसें केलें तैसें होतें। येत्न केल्यां कार्ये साधतें।**
**तरी मग कष्टावें तें। काये निमित्य ॥ ३० ॥**

देहाला जसे वळण लावावे, तसा तो होतो. त्याचे सार्थक करण्याचा प्रयत्न केला तर ते कार्यही साध्य होते. तर मग कष्टी होण्याचे, निराश होण्याचे कारणच काय? (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'जगज्जीवननिरूपणनाम' समास सातवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १७ : समास ८

### तत्त्वनिरूपण

॥ श्रीराम ॥

नाभीपासून उन्मेषवृत्ती। तेचि परा जाणिजे श्रोतीं।
ध्वनिरूप पश्यंती। हृदईं वसे ॥ १ ॥

श्रीसमर्थ म्हणतात की, नाभीपाशी जे मूळ स्फुरण होते ती स्फूर्ती म्हणजे परा वाचा होय, हे श्रोत्यांनी जाणून घ्यावे. हृदयाच्या ठिकाणी ध्वनिरूपाने असणारी ती पश्यंती वाचा होय. (१)

कंठापासून नाद जाला। मध्यमा वाचा बोलिजे त्याला।
उच्चार होतां अक्षराला। वैखरी बोलिजे ॥ २ ॥

कंठस्थानी जो नाद उत्पन्न होतो त्याला मध्यमा वाचा म्हणतात आणि मुखावाटे अक्षराचा जो उच्चार होतो तिला वैखरी वाचा असे म्हणतात. (२)

नाभिस्थानीं परा वाचा। तोचि ठाव अंत:कर्णाचा।
अंत:कर्णपंचकाचा। निवाडा ऐसा ॥ ३ ॥

नाभिस्थानी जेथे परा वाचा असते तेच अंत:करणाचे स्थान समजावे. आता अंत:करणपंचकाचा निवाडा असा आहे. (३)

निर्विकल्प जें स्फुरण। उगेंच असतां आठवण।
तें जाणावें अंत:कर्ण। जाणतीकळा ॥ ४ ॥

निर्विकल्प म्हणजे मनात काही कल्पना नसता सहजच जे स्फुरण होते तेच अंत:करण होय. हे जाणीवमय असते. (४)

अंत:कर्ण आठवलें। पुढें होये नव्हेसें गमलें।
करूं न करूं ऐसें वाटलें। तेंचि मन ॥ ५ ॥

अंत:करणात सहज आठवले तेथे अंत:करणाचा प्रत्यय आला. नंतर एखादी गोष्ट करू की न करू असे वाटले तेच मन होय. (५)

संकल्प विकल्प तेंचि मन। जेणेंकरितां अनुमान।
पुढें निश्चयो तो जाण। रूप बुद्धीचें ॥ ६ ॥

मन हे संकल्प-विकल्पात्मक असते. त्यामुळेच कल्पना केली जाते. पुढे जो निश्चय केला जातो ते बुद्धीचे रूप जाणावे. (६)

करीनचि अथवा न करी। ऐसा निश्चयोचि करी।
तेचि बुद्धि हे अंतरीं। विवेकें जाणावी ॥ ७ ॥

एखादे कार्य करीनच अथवा करणारच नाही असा अंतरात निश्चय जी करते ती बुद्धी होय. ती विवेकाने अंत:करणात जाणून घ्यावी. (७)

जे वस्तुचा निश्चये केला। पुढें तेचि चिंतूं लागला।
तें चित्त बोलिल्या बोला। येथार्थ मानावें ॥ ८ ॥

वस्तूचा जो एकदा निश्चय केला त्याचेच पुढे चिंतन होऊ लागले. चिंतन करणारे ते चित्त होय हे यथार्थ समजून घ्यावे. (८)

पुढें कार्याचा अभिमान धरणें। हें कार्ये तों अगत्य करणें।
ऐस्या कार्यास प्रवर्तणें। तोचि अहंकारु ॥ ९ ॥

पुढे कार्याचा अभिमान धरून हे कार्य अवश्य केलेच पाहिजे या भावनेने कार्यास प्रवर्तणे तोच अहंकार होय. (९)

ऐसें अंत:कर्णपंचक। पंच वृत्ती मिळोन येक।
कार्येभागें प्रकारपंचक। वेगळाले ॥ १० ॥

असे हे अंत:करणपंचक आहे. या पाच वृत्ती मिळून एकच अंत:करण असते, पण वेगवेगळ्या कार्यावरून त्याचे पाच प्रकार वेगवेगळे मानले जातात. (१०)

जैसे पांचहि प्राण। कार्येभागें वेगळाले जाण।
नाहीं तरी वायोचें लक्षण। येकचि असे ॥ ११ ॥

जसे पाच प्राणही वेगवेगळ्या कार्यभागामुळे वेगवेगळे गणले जातात, नाही तर वायूचे लक्षण गती हे एकच असते. (११)

सर्वांगीं व्यान नाभीं समान। कंठीं उदान गुदीं अपान।
मुखीं नासिकीं प्राण। नेमस्त जाणावा ॥ १२ ॥

सर्वांगी व्यान, नाभीस्थानी समान, कंठाच्या ठिकाणी उदान, गुदस्थानी अपान आणि तोंड आणि नाकाच्या ठिकाणी प्राण असे निश्चितपणे जाणावे. (१२)

बोलिलें हें प्राणपंचक। आतां ज्ञानइंद्रियेंपंचक।
श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा नासिक। ऐसीं हें ज्ञानेंद्रियें ॥ १३ ॥

हे प्राणपंचक सांगितले. आता ज्ञानेंद्रियपंचक ऐकावे. कान, त्वचा, डोळे, जीभ आणि नाक असे हे ज्ञानेंद्रियपंचक आहे. (१३)

वाचा पाणी पाद शिस्न गुद। हे कर्मइंद्रियें प्रसिद्ध।
शब्द स्पर्श रूप रस गंध। ऐसें हें विषयपंचक॥१४॥

वाचा, हात, पाय, शिस्न आणि गुद हे कर्मेंद्रियपंचक प्रसिद्धच आहे. आणि शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध असे हे विषयपंचक होय. (१४)

अंत:कर्ण प्राणपंचक। ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें पंचक।
पांचवें विषयपंचक। ऐसीं हे पांच पंचकें॥१५॥

अंत:करणपंचक, प्राणपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक आणि पाचवे विषयपंचक अशी ही पाच पंचके आहेत. (१५)

ऐसे हे पंचविस गुण। मिळोन सूक्ष्म देह जाण।
याचा कर्दम बोलिला श्रवण। केलें पाहिजे॥१६॥

असे हे पंचवीस गुण मिळून सूक्ष्म देह जाणावा. याचे मिश्रण कसे झाले आहे ते सांगितले जात आहे. ते श्रवण केले पाहिजे. (१६)

अंत:कर्ण व्यान श्रवण वाचा। शब्दविषये आकाशाचा।
पुढें विस्तार वायोचा। बोलिला असे॥१७॥

अंत:करण, व्यान, श्रवण, वाचा आणि शब्द हा विषय हे आकाशाचे गुण होत. आता वायूचा विस्तार पुढे सांगितला आहे. (१७)

मन समान त्वचा पाणी। स्पर्श रूप हा पवनीं।
ऐसे हे अडाखे साधुनी। कोठा करावा॥१८॥

मन, समान, त्वचा, हात आणि स्पर्श हा विषय हे वायूचे स्वरूप होय. असे हे आडाखे जाणून घेऊन कोष्टक तयार करावे, म्हणजे हे पंचीकरण नीट समजेल. (१८)

बुद्धि उदान नयेन चरण। रूपविषयाचें दर्शन।
संकेतें बोलिलें मन। घालून पाहिजे॥१९॥

बुद्धी, उदान, डोळे, पाय आणि रूप विषय हे तेजाचे रूप थोडक्यात सांगितले आहे. मन एकाग्र करून हे जाणून घ्यावे. (१९)

चित्त अपान जिव्हा शिस्न। रसविषये आप जाण।
पुढें ऐका सावधान। पृथ्वीचें रूप॥२०॥

चित्त, अपान, जीभ, शिस्न आणि रस हा विषय हा जलतत्त्वाचा विस्तार होय. आता सावधान होऊन पृथ्वीचे रूप ऐकावे. (२०)

अहंकार प्राण घ्राण। गुद गंधविषये जाण।
ऐसें केलें निरूपण। शास्त्रमतें॥२१॥

अहंकार, प्राण, नाक, गुद आणि गंध हा विषय हे पृथ्वीचे रूप होय. याप्रमाणे शास्त्राधारे हे निरूपण केले आहे. (२१)

ऐसा हा सूक्ष्म देहे। पाहातां होईजे निसंदेहे।
येथें मन घालून पाहे। त्यासीच हें उमजे॥२२॥

असा हा सूक्ष्म देह आहे. याचा सूक्ष्म विचार केल्याने साधक नि:संदेह होतो. पण अत्यंत मन लावून जो हे सर्व पाहील त्यालाच हे उमजेल. (२२)

ऐसें सूक्ष्म देहे बोलिलें। पुढें स्थूळ निरोपिलें।
आकाश पंचगुणें वर्तलें। कैसें स्थुळीं॥२३॥

अशा प्रकारे सूक्ष्म देहाचे वर्णन केले. आता पुढे स्थूल देहाचे निरूपण केले आहे. स्थूलाच्या ठिकाणी आकाश पाच गुणांनी कसे वर्तत असते, ते ऐकावे. (२३)

काम क्रोध शोक मोहो भये। हा पंचविध आकाशाचा अन्वये।
पुढें पंचविध वायो। निरोपिला॥२४॥

काम, क्रोध, शोक, मोह आणि भय हा पाच प्रकारचा आकाशाचा अन्वय होय. आता वायूचा पंचविध अन्वय सांगितला आहे. (२४)

चळण वळण प्रासारण। निरोध आणि अकोचन।
हें पंचविध लक्षण। प्रभंजनाचें॥२५॥

चलन, वलन, प्रसरण, निरोध आणि आकुंचन हे पंचविध लक्षण वायूचे जाणावेत. (२५)

क्षुधा त्रुषा आलस्य निद्रा मैथुन। हे तेजाचे पंचविध गुण।
आतां पुढें आपलक्षण। निरोपिलें पाहिजे॥२६॥

क्षुधा, तृषा, आळस, निद्रा आणि मैथुन हे तेजाचे पंचविध गुण जाणावेत. आता पुढे जलतत्त्वाचे लक्षण सांगितले पाहिजे. (२६)

शुक्लीत श्रोणीत लाळ मूत्र स्वेद। हा पंचविध आपाचा भेद।
पुढें पृथ्वी विशद। केली पाहिजे॥२७॥

वीर्य, रेत, लाळ, मूत्र आणि घाम हे आपाचे पंचविध भेद आहेत. आता पुढे पृथ्वीचे रूप स्पष्ट केले पाहिजे (२७)

अस्ति मांष त्वचा नाडी रोम। हे पृथ्वीचे पंचविध धर्म।
ऐसे स्थूळ देहाचें वर्म। बोलिलें असे॥२८॥

अस्थी, मांस, त्वचा, नाडी आणि रोम हे पृथ्वीचे पंचविध धर्म आहेत. याप्रमाणे स्थूल देहाचे रहस्य येथे सांगितले आहे. (२८)

पृथ्वी आप तेज वायो आकाश । हे पांचाचे पंचविस ।
ऐसें मिळोन स्थूळ देहास । बोलिजेतें ॥ २९ ॥

पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पाचांची मिळून पंचवीस तत्त्वे मिळून स्थूलदेह बनतो. (२९)

तिसरा देह कारण अज्ञान । चौथा देह माहांकारण ज्ञान ।
हे च्यारी देह निर्शितां विज्ञान । परब्रह्म तें ॥ ३० ॥

तिसरा देह कारण हा अज्ञानमय आणि चौथा देह महाकारण हा ज्ञानमय असतो. या चारी देहांचे निरसन केल्यावर विज्ञानमय परब्रह्म तेवढे उरते. (३०)

विचारें चौदेहावेगळे केलें । मीपण तत्वांसरिसें गेले ।
अनन्य आत्मनिवेदन जालें । परब्रह्मीं ॥ ३१ ॥

विचाराने चारी देहांचे निरसन केले की मीपणा तत्त्वांच्या निरसनाबरोबरच नाहीसा होतो आणि परब्रह्माच्या ठिकाणी अनन्य अशा प्रकारे आत्मनिवेदन होते. परब्रह्माशी ऐक्य होते. (३१)

विवेकें चुकला जन्म मृत्य । नरदेहीं साधिलें महत्कृत्य ।
भक्तियोगें कृत्यकृत्य । सार्थक जालें ॥ ३२ ॥

विवेकाने जन्ममृत्यूच्या चक्रातून सुटका होते; नरदेहाच्या योगे आयुष्याचे सार्थक होऊन मुख्य कार्य साधले जाते आणि भक्तीच्या योगाने कृतकृत्यता लाभून नरदेहाचे सार्थक होते. (३२)

इति श्री पंचीकर्ण । केलेंचि करावें विवर्ण ।
लोहाचें जालें सुवर्ण । परिसाचेन योगें ॥ ३३ ॥

याप्रमाणे या पंचीकरणाचे विवरण वारंवार करावे. म्हणजे परिसाच्या योगाने लोहाचे सुवर्ण होऊन जाईल. (३३)

हाहि दृष्टांत घडेना । परिसाचेन परीस करवेना ।
शरण जातां साधुजना । साधुच होइजे ॥ ३४ ॥

पण हाही दृष्यन्त बरोबर नाही. परिसामुळे परीस करता येत नाही. पण साधुजनांना शरण गेल्याने आपणही साधूच होतो. (३४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'तत्त्वनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १७ : समास ९

## तनुचतुष्टये

॥ श्रीराम ॥

स्थूळ सूक्ष्म कारण माहाकारण । ऐसे हे चत्वार देह जाण ।
जागृति स्वप्न सुषुप्ति पूर्ण । तुर्या जाणावी ॥ १ ॥

स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण हे पिंडाचे चार देह जाणून घ्यावेत. पिंडाच्या चार अवस्था म्हणजे जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि अवस्थांच्या चार या संख्येला पूर्ण करणारी चौथी अवस्था तुर्या होय. (१)

विश्व तैजस प्राज्ञ । प्रत्यगात्मा हे अभिमान ।
नेत्रस्थान कंठस्थान हृदयस्थान । मूर्धनी ते ॥ २ ॥

विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यगात्मा हे (अनुक्रमे त्या त्या अवस्थांचे) अभिमानी विभू आहेत. नेत्रस्थान, कंठस्थान, हृदयस्थान आणि मूर्धा (टाळू) ही अनुक्रमे त्या विभूंची स्थाने आहेत. (२)

स्थूळभोग प्रविक्तभोग । आनंदभोग आनंदावभासभोग ।
ऐसे हे चत्वार भोग । चौंदेहाचे ॥ ३ ॥

स्थूलभोग, उपाधिरहित भोग, आनंद भोग आणि आनंदावभास भोग हे चार भोग (अनुक्रमे) चार देहांचे आहेत. (३)

अकार उकार मकार । अर्धमात्रा तो ईश्वर ।
ऐस्या मात्रा चत्वार । चौंदेहाच्या ॥ ४ ॥

अकार, उकार, मकार आणि अर्धमात्रा म्हणजे ईश्वर या चार देहांच्या चार मात्रा आहेत. (४)

तमोगुण रजोगुण । सत्वगुण शुद्धसत्वगुण ।
ऐसे हे चत्वार गुण । चौंदेहाचे ॥ ५ ॥

तमोगुण, रजोगुण, सत्त्वगुण आणि शुद्धसत्त्वगुण असे हे चार देहांचे चार गुण आहेत. (५)

क्रियाशक्ति द्रव्याशक्ति। इछाशक्ति ज्ञानशक्ती।
ऐशा चत्वार शक्ती। चौंदेहाच्या ॥ ६॥

क्रियाशक्ती, द्रव्यशक्ती, इच्छाशक्ती आणि ज्ञानशक्ती या चार देहांच्या चार शक्ती आहेत. (६)

ऐसीं हे बत्तिस तत्त्वें। दोहींचीं पन्नास तत्त्वे।
अवघीं मिळोन ब्यासि तत्त्वें। अज्ञान आणी ज्ञान ॥ ७॥

अशी ही बत्तीस तत्त्वे आणि स्थूल आणि सूक्ष्म देहांची दोन्हींची मिळून पन्नास तत्त्वे अशी सर्व मिळून ब्याऐंशी तत्त्वे आणि अज्ञान आणि ज्ञान ही दोन मिळून एकूण ८४ चौऱ्याऐंशी तत्त्वे जाणावीत. (७)

ऐसीं हे तत्वें जाणावीं। जाणोन माइक वोळखावीं।
आपण साक्षी निरसावीं। येणें रितीं ॥ ८॥

अशी ही तत्त्वे जाणल्यावर ती मायिक म्हणून ओळखावीत आणि आपण या तत्त्वांचे साक्षी आहोत, हे जाणून त्यांचे निरसन करावे. (८)

साक्षी म्हणिजे ज्ञान। ज्ञानें वोळखावें अज्ञान।
ज्ञानाज्ञानाचें निर्शन। देहासरिसें ॥ ९॥

साक्षी म्हणजे ज्ञान होय. ज्ञानाने अज्ञान ओळखावे आणि चारी देहांबरोबर ज्ञान आणि अज्ञानाचेही निरसन करावे. (९)

ब्रह्मांडीं देह कल्पिले। विराट हिरण्यगर्भ बोलिले।
ते हे विवेकें निर्शले। आत्मज्ञानें ॥ १०॥

ब्रह्मांडाच्या ठिकाणी ही देहाची कल्पना केली. त्यांना विराट आणि हिरण्यगर्भ असे म्हटले आहे, पण आत्मज्ञानाने, स्वस्वरूपानुभवाने, विवेकाने त्यांचेही निरसन झाले. (१०)

आत्मानात्मविवेक करितां। सारासारविचार पाहातां।
पंचभूतांची माइक वार्ता। प्रचित आली ॥ ११॥

आत्मानात्मविवेक केल्याने आणि सारासारविवेकामुळे सर्व पंचमहाभूते मायिक आहेत, ही प्रचीती आली.(११)

अस्ति मांष त्वचा नाडी रोम। हे पांचहि पृथ्वीचे गुणधर्म।
प्रत्यक्ष शरीरीं हें वर्म। शोधून पाहावें ॥ १२॥

अस्थी, मांस, त्वचा, नाडी आणि रोम हे सर्व पाचही पृथ्वीचे गुणधर्म आहेत, हे प्रत्यक्ष शरीराचे रहस्य शोधून जाणून घ्यावे. (१२)

शुक्लीत श्रोणीत लाळ मूत्र स्वेद। हे आपाचे पंचकभेद।
तत्वें समजोन विशद। करून घ्यावीं ॥ १३॥

वीर्य, रेत, लाळ, मूत्र आणि घाम हे आपाचे पाच भेद, तत्त्वे स्पष्टपणे जाणून घ्यावीत. (१३)

क्षुधा त्रुषा आलस्य निद्रा मैथुन। हे पांचहि तेजाचे गुण।
या तत्त्वांचें निरूपण। केलेंचि करावें ॥ १४॥

भूक, तहान, आळस, निद्रा आणि मैथुन हे तेजाचे पाच गुण आहेत. या तत्त्वांचेही वारंवार विवरण करावे (१४)

चळण वळण प्रासारण। निरोध आणि आकोचन।
हे पांचहि वायोचे गुण। श्रोतीं जाणावे ॥ १५॥

चलन, वलन, प्रसरण, निरोध आणि आकुंचन हे सर्व वायूचे गुण श्रोत्यांनी जाणावेत. (१५)

काम क्रोध शोक मोहो भये। हा आकाशाचा परियाये।
हें विवरल्याविण काये। समजों जाणे ॥ १६॥

काम, क्रोध, शोक, मोह आणि भय हा आकाशाचा परिवार आहे. हे विवरल्याशिवाय समजून येत नाही. (१६)

असो ऐसें हें स्थूळ शरीर। पंचविस तत्वांचा विस्तार।
आतां सूक्ष्मदेहाचा विचार। बोलिजेल ॥ १७॥

असो. असे हे स्थूलशरीर म्हणजे पंचवीस तत्त्वांचाच विस्तार आहे. आता सूक्ष्मदेहाचा विचार सांगितला जाईल. (१७)

अंतःकर्ण मन बुद्धि चित्त अहंकार। आकाशपंचकाचा विचार।
पुढें वायो निरोत्तर। होऊन ऐका ॥ १८॥

अंत:करण, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे आकाशपंचक आहे. आता पुढे वायूचा विचार ऐकावा. (१८)

व्यान समान उदान। प्राण आणी अपान।
ऐसे हे पांचहि गुण। वायोतत्त्वाचे ॥ १९॥

व्यान, समान, उदान, प्राण आणि अपान हे पाचही गुण वायुतत्त्वाचे आहेत. (१९)

श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण। पांचहि तेजाचे गुण।
आतां आप सावधान। होऊन ऐका ॥ २०॥

कान, त्वचा, डोळे, जीभ आणि नाक हे पाचही तेजाचे गुण होत. आता सावधान होऊन आपाचे गुण ऐका. (२०)

वाचा पाणी पाद शिस्न गुद। हे आपाचे गुण प्रसिद्ध।
आतां पृथ्वी विशद। निरोपिली ॥ २१ ॥

वाचा, हात, पाय, शिस्न आणि गुद हे आपाचे प्रसिद्ध गुण आहेत. आता पृथ्वीचे गुण स्पष्ट करून सांगू या. (२१)

शब्द स्पर्श रूप रस गंध। हे पृथ्वीचे गुण विशद।
ऐसे हे पंचवीस तत्वभेद। सूक्ष्म देहाचे ॥ २२ ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे स्पष्टपणे पृथ्वीचे गुण आहेत. असे हे सूक्ष्म देहाचे एकूण पंचवीस तत्त्वभेद आहेत. (२२)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'तनुचतुष्टयेनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक १७ : समास १०

## टोणपसिद्धलक्षण

॥ श्रीराम ॥

आवर्णोदकीं हटकेश्वर। त्यास घडे नमस्कार।
महिमा अत्यंतचि थोर। तया पाताळलिंगाचा ॥ १ ॥

समजा कोणी असे सांगितले की, आवर्णोदकात हाटकेश्वर असून त्या पाताळलिंगाचा महिमा अत्यंत थोर आहे, तरी प्रत्यक्ष तेथे कसे जाता येणार बरे? म्हणून त्यास फक्त दुरून नमस्कारच घडू शकतो. (१)

परंतु तेथें जाववेना। शरीरें दर्शन घडेना।
विवेकें आणावें अनुमाना। तया ईश्वरासी ॥ २ ॥

तेथे आपल्याला जाता येत नाही, शरीराने दर्शन घडत नाही, असे झाले तर विचाराने त्या ईश्वरासंबंधी अनुमान करावे. (२)

सातां समुद्रांचे वेडे। उदंड भूमि पैलिकडे।
सेवटीं तुटले कडे। भूमंडळाचे ॥ ३ ॥

सातासमुद्राच्या वेढ्यापलीकडे उदंड भूमी आहे. शेवटी भूमंडळाचे तुटलेले कडे आहेत. (३)

सात समुद्र वोलांडावे। तेथें जाणें कैसें फावे।
म्हणोन विवेकी असावे। साधुजन ॥ ४ ॥

सात समुद्र ओलांडून तेथे जाणे कसे होईल? म्हणून साधुजनांनी विवेकानेच त्याचे ज्ञान करून घ्यावे. (४)

जें आपणांस नव्हे ठावें। तें जाणतयास पुसावें।
मनोवेगें तनें फिरावें। हें तो घडेना ॥ ५ ॥

जे आपल्याला माहीत नसेल, ते जाणत्याला विचारावे, पण शरीराने मनाच्या गतीने फिरावे हे अशक्यच आहे. (५)

जे चर्मदृष्टीस नव्हे ठावें। तें ज्ञानदृष्टीनें पाहावें।
ब्रह्मांड विवरोन राहावें। समाधानें ॥ ६ ॥

जे चर्मदृष्टीने पाहाता येत नसेल, ते ज्ञानदृष्टीने पहावे. ब्रह्मांडाचे विवरण करून समाधानाने राहावे. (६)

मध्यें आहे भूमीचें चडळ। म्हणौन आकाश आणी पाताळ।
तें चडळ नस्तां अंतराळ। चहुंकडे ॥ ७ ॥

आकाश आणि पाताळ यांमध्ये हा भूगोलाचा गोळा आहे म्हणून त्यांना वेगळे म्हणायचे. मध्ये हा गोळा नसता तर चहूकडे अंतराळच भरलेले दिसले असते. (७)

तयास परब्रह्म म्हणावें। जें उपाधीवेगळें स्वभावें।
जेथें दृश्यमायेच्या नांवें। सुन्याकार ॥ ८ ॥

जे स्वाभाविकपणे उपाधिरहित आहे आणि जेथे दृश्य मायेच्या नावे शून्याकार आहे, म्हणून दृश्यमायेचा मागमूसही नाही, त्याला परब्रह्म म्हणावे. (८)

दृष्टीचें देखणें दृश्य। मनाचें देखणें भास।
मनातीत निराभास। विवेकें जाणावें ॥ ९ ॥

दृष्टीला जे जे दिसते ते दृश्य होय आणि मनाला जे जे दिसते तो भास होय. मनातीत निराभास असे जे ब्रह्म ते विवेकाने जाणून घ्यावे. (९)

दृश्य भास अवघा विघडे। विवेक तेथें पवाडे।
भूमंडळीं ज्ञाते थोडे। सूक्ष्मदृष्टीचे ॥ १० ॥

दृश्य आणि भास दोन्ही जेथे नष्ट होतात, तेथे विवेकाने जो पोहोचतो, असे सूक्ष्मदृष्टीचे ज्ञाते या भूमंडळावर फार थोडे आहेत. (१०)

वाच्यांश वाचेनें बोलावा। न बोलतां लक्ष्यांश जाणावा।
निर्गुण अनुभवासआणावा। गुणाचेन योगें ॥ ११ ॥

वाच्यांश वाचेने बोलावा. न बोलता लक्ष्यांश जाणून घ्यावा आणि अमुक गुण असा असतो हे कळल्यानेच तो गुण जेथे नाही अशा गुणातीताचे आकलन होणे शक्य असते. म्हणून गुणरहित अशा निर्गुणास अनुभवाने जाणावे. (११)

नाना गुणास आहे नाश। निर्गुण तें अविनाश।
ढोबळ्याहून विशेष। सूक्ष्म देखणें ॥ १२ ॥

अनेक गुण असले तरी ते नाश पावतात. जे निर्गुण आहे ते अविनाशी असते. स्थूल दृष्टीच्या पाहण्यापेक्षा विवेकाचे-सूक्ष्म दृष्टीचे पाहाणे हे श्रेष्ठ होय. (१२)

जें दृष्टीस न पडे ठावें। तें ऐकोन जाणावें।
श्रवणमननें पडे ठावें। सकळ कांहीं ॥ १३ ॥

जे दृष्टीला दिसू शकत नाही, ते ऐकून जाणून घ्यावे. श्रवण-मनन केल्याने सर्व काही जाणता येते. (१३)

अष्टधेचे जिनस नाना। उदंड पाहातां कळेना।
अवघें सगट पिटावेना। कोणीयेकें ॥ १४ ॥

अष्टधाप्रकृतीचे असंख्य जिन्नस आहेत. ते पाहून त्याचे ज्ञान होत नाही. म्हणून माणसाने, ऐरणीवर सर्व धातू सारखेच समजून पिटल्या जातात, त्याप्रमाणे हे सर्व पदार्थ सारखेच, असे मानू नये. (१४)

सगट सारिखी स्थिती जाली। तेथें परीक्षाच बुडाली।
चविनटानें काल्रविली। नाना अन्ने ॥ १५ ॥

सर्वांना सरसकट सारखेच मानले तर मग तेथे चांगले-वाईट, विनाशी-अविनाशी, श्रेष्ठ-कनिष्ठ अशा परीक्षेचे काही काम उरतच नाही. आणि ज्याच्या तोंडाला चव नाही, अशाने सर्व अन्नाचा काला करावा तशी स्थिती होते. (१५)

टोणपा नव्हे गुणग्राहिक। मूर्खास कळेना विवेक।
विवेक आणी अविवेक। येकचि म्हणती ॥ १६ ॥

मूर्ख असतो तो गुणग्राहक नसतो, त्याला विवेक कळत नाही. असे लोक विवेक आणि अविवेक एकच असे म्हणतात. (१६)

उंच नीच कळेना ज्याला। तेथें अभ्यासचि बुडाला।
नाना अभ्यासें प्राणीयाला। सुटिका कैंची ॥ १७ ॥

ज्याला उच्च-नीच असा भेद कळत नाही, त्याला परमार्थाचा अभ्यास करताच येत नाही. इतर नाना विद्यांचा अभ्यास केला तरी त्या माणसाची जन्ममरणचक्रातून सुटका होऊ शकत नाही. (१७)

वेड लागोन जालें वोंगळ। त्यास सारिखेंच वाटेसकळ।
तें जाणावें बाश्कळ। विवेकी नव्हेती ॥ १८ ॥

एखाद्या माणसाला वेड लागले की त्याला ओंगळ आणि स्वच्छ वगैरे सर्व काही सारखेच वाटू लागते. असे लोक बाष्कळ आहेत, विवेकी नाहीत हे जाणून घ्यावे. (१८)

ज्यास अखंड होतो नाश। त्यासीच म्हणती अविनाश।
बहुचकीच्या लोकांस। काये म्हणावें ॥ १९ ॥

ज्याचा अखंड नाश होतो, त्यालाच अविनाश म्हणतात. वाचाळ, बहकलेल्या लोकांना काय म्हणावे? (१९)

ईश्वरें नाना भेद केले। भेदें सकळ सृष्टी चाले।
आंधळे परीक्षवंत मिळाले। तेथें परीक्षा कैंची ॥ २० ॥

ईश्वरानेच नाना भेद निर्माण केले. भेदाच्या योगे सर्व सृष्टीतील व्यवहार सुरळितपणे चालतात. पण परीक्षा करणाराच जेथे आंधळा असेल, तेथे परीक्षा कशी होणार? (२०)

जेथें परीक्षेचा अभाव। तो टोणपा समुदाव।
गुणचि नाहीं गौरव। येईल कैंचें ॥ २१ ॥

जेथे परीक्षेचा अभाव असतो, तो समुदाय टोणप्या लोकांचा आहे, असे जाणावे. गुणच नाही तेथे गुणांचा गौरव कोठून असणार? (२१)

खरें खोटें येकचि जालें। विवेकानें काये केलें।
असार सांडून सार घेतलें। साधुजनीं ॥ २२ ॥

जेथे खरे-खोटे यांची सरमिसळ होते, तेथे विवेक काय करतो? तर साधू लोक विवेक करूनच असार सोडून सार ग्रहण करतात. (२२)

उत्तम वस्तूची परीक्षा। कैसी घडे नतद्रक्षा।
दीक्षाहीनापासीं दीक्षा। येईल कैंची ॥ २३ ॥

नतद्रष्ट लोकांना उत्तम वस्तूची पारख कशी होईल? जो दीक्षाहीन आहे, त्याच्यापाशी दीक्षेचे तेज, सामर्थ्य कसे येणार? (२३)

आपलेन वोंगळपणें। दिशा करून शौच्य नेणे।
वेद शास्त्रें पुराणें। त्यास काये करिती ॥२४॥

एखाद्या अस्वच्छ माणसाने स्वत:च्या ओंगळपणामुळे शौचास जाऊनही नंतर शरीरशुद्धी केली नाही, तर तेथे वेद, शास्त्रे, पुराणे काय करणार? (२४)

आधी राखावा आचार। मग पाहावा विचार।
आचारविचारें पैलपार। पाविजेतो ॥ २५ ॥

आधी आचार शुद्ध राखावा आणि मग विचारशुद्धी पहावी. अशा तऱ्हेने शुद्ध आचार-विचार असेल तर भवसागरातून पार जाता येते. (२५)

जें नेमकास न कळे। तें बाष्कळास केवीं कळे।
डोळस ठकती आंधळे। कोण्या कामाचे ॥ २६ ॥

जे नियमनिष्ठ साधक असतात, त्यांनाही परमार्थाचे रहस्य कळत नाही, तेथे बाष्कळ गैरशिस्त लोकांना ते कसे कळणार? जेथे डोळसही ठकतात, तेथे आंधळे काय कामाचे? (२६)

पापपुण्य स्वर्गनर्क। अवघेंच मानिलें येक।
विवेक आणी अविवेक। काये मानावें ॥ २७ ॥

पाप, पुण्य, स्वर्ग आणि नरक या सर्वांना सारखेच मानले तर मग विवेक आणि अविवेकाची गरज ती काय? (२७)

अमृत विष येक म्हणती। परी विष घेतां प्राण जाती।
कुकर्मे होते फजिती। सत्कर्मे कीर्ति वाढे ॥ २८ ॥

अमृत आणि विष एकच म्हटले तरी विष घेतल्याने प्राण जातात, हे सत्य आहे. कुकर्माच्या योगाने फजिती होते आणि सत्कर्माने कीर्ती वाढते. (२८)

इहलोक आणि परलोक। जेथें नाहीं साकल्य विवेक।
तेथें अवघेंच निरर्थक। सकळ कांहीं ॥ २९ ॥

इहलोक असो वा परलोक असो, जेथे सांगोपांग विवेक नसेल, तेथे सर्व काही निरर्थकच ठरते. (२९)

म्हणौन संतसंगेंचि जावें। सत्शास्त्रचि श्रवण करावें।
उत्तम गुणास अभ्यासावें। नाना प्रयेत्नें ॥ ३० ॥

म्हणून माणसाने सत्संगतीतच रहावे. सत्शास्त्रच श्रवण करावे आणि नाना प्रकारे प्रयत्न करून उत्तम गुणांचाच अभ्यास करावा (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे टोणपसिद्धलक्षणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक सतरावा समाप्त.**

❑ ❑

# दशक अठरावा : बहुजिनसी

## दशक १८ : समास १

### बहुदेवस्थाननिरूपण

॥ श्रीराम ॥

तुज नमूं गजवदना। तुझा महिमा कळेना।
विद्या बुद्धी देसी जना। ल्हानथोरांसी ॥ १ ॥

हे गजवदना, तुला मी नमस्कार करतो. तुझा महिमा अगाध असल्याने तो कळत नाही. सर्व लहान-थोर लोकांना तूच विद्या, बुद्धी देतोस. (१)

तुज नमूं सरस्वती। च्यारी वाचा तुझेन स्फूर्ती।
तुझें निजरूप जाणती। ऐसे थोडे ॥ २ ॥

हे सरस्वती, तुला नमस्कार असो. तुझ्यामुळेच चारी वाचा स्फुरतात. तुझे निजरूप जाणणारे लोक फार थोडे आहेत. (२)

धन्य धन्य चतुरानना। तां केली सृष्टिरचना।
वेद शास्त्रें भेद नाना। प्रगट केले ॥ ३ ॥

हे ब्रह्मदेवा, तू खरोखर धन्य आहेस. तूच सर्व सृष्टीची रचना केलीस. वेद, शास्त्रे आणि नाना भेद तूच प्रगट केलेस. (३)

धन्य विष्णु पाळण करिसी। येकांशें सकळ जीवांसी।
वाढविसी वर्तविसी। जाणजाणों ॥ ४ ॥

हे विष्णू तू धन्य आहेस. तूच सर्वांचे पालन करतोस. तुझ्या एका अंशाने तू सर्व जीवांना त्यांचे अंतरंग जाणून वाढवतोस आणि वागवतोस. (४)

धन्य धन्य भोळाशंकर। जयाच्या देण्यास नाहीं पार।
रामनाम निरंतर। जपत आहे ॥ ५ ॥

भोळा शंकर खरोखरच धन्य आहे. त्याच्या देण्याला मर्यादा नाही. तो निरंतर रामनाम जपत असतो. (५)

धन्य धन्य इंद्रदेव। सकळ देवांचाहि देव।
इंद्रलोकींचें वैभव। काये म्हणौनि सांगावें ॥ ६ ॥

सर्व देवांचा जो देव तो इंद्रदेव धन्य आहे. इंद्रलोकीचे वैभव एवढे आहे की, त्याचे वर्णन करता येत नाही. (६)

धन्य धन्य येमधर्म। सकळ जाणती धर्माधर्म।
प्राणीमात्रांचे वर्म। ठाईं पाडिती ॥ ७ ॥

सर्व धर्म-अधर्म यांना जाणणारा यमधर्म धन्य आहे. तो सर्व प्राणिमात्रांचे वर्म जाणतो. (७)

वेंकटेसीं महिमा किती। भले उभ्यां अन्न खाती।
वडे धिरडीं स्वाद घेती। आतळस आपाल्यांचा ॥ ८ ॥

व्यंकटेशाचा महिमा फार आहे. त्याच्या स्थानी भली भली माणसेही उभ्याने अन्न खातात. वडे, धिरडी आणि स्वादिष्ट घारग्यांचा स्वाद घेतात. (८)

धन्य तूं वो बनशंकरी। उदंड शाखांचिया हारी।
विवरविवरों भोजन करी। ऐसा कैंचा ॥ ९ ॥

हे बनशंकरी, तू धन्य आहेस. तुझ्या नैवेद्याला खूप भाज्या लागतात. त्या सर्वांची चव घेऊन भोजन करील असा भेटणे कठीण आहे? (९)

धन्य भीम गोलांगुळा। कोरवड्यांच्या उदंड माळा।
दहि वडे खातां सकळां। समाधान होये ॥ १० ॥

गायीसारखे पुच्छ असणारा बलभीम धन्य आहे. त्याला उडदाच्या वड्यांच्या उदंड माळा घातल्या जातात. दह्याबरोबर वडे खाऊन सर्वांना समाधान वाटते. (१०)

धन्य तूं गा खंडेराया। भंडारें होये पिंवळी काया।
कांदेभरीत रोटगे खाया। सिद्ध होती ॥ ११ ॥

हे खंडेराया, तू धन्य आहेस. तुझा जो भंडारा उधळला जातो, त्यामुळे शरीर हळदीने पिवळे होते. मग कांदे, भरीत आणि रोडगे खायला सर्व सिद्ध असतात. (११)

धन्य तुळजाभोवानी। भक्तां प्रसन्न होते जनीं।
गुणवैभवास गणी। ऐसा कैंचा ॥ १२ ॥

भक्तांना प्रसन्न होणारी तुळजाभवानी धन्य आहे. तिच्या गुणवैभवाची गणना करील असा कोण आहे? (१२)

धन्य धन्य पांडुरंग। अखंड कथेचा होतो धिंग।
तानमानें रागरंग। नाना प्रकारीं ॥ १३ ॥

जेथे अखंड कथेचा गदारोळ चाललेला असतो, नाना प्रकारे तानमान, रागरंग यांसह जेथे नित्य कीर्तन होत असते, तो पांडुरंग खरोखरच धन्य होय. (१३)

धन्य तूं गा क्षत्रपाळा। उदंड जना लाविला चाळा।
भावें भक्ति करितां फळा। वेळ नाहीं ॥ १४॥

हे क्षेत्रपाला, तू धन्य आहेस. अनेक लोकांना तू तुझे प्रेम लावले आहेस. मनापासून तुझी भक्ती केली असता फळ मिळायला वेळ लागत नाही. (१४)

रामकृष्णादिक अवतार। त्यांचा महिमा अपार।
उपासनेस बहुत नर। तत्पर जाले ॥ १५॥

भगवंताचे जे रामकृष्णादिक अवतार झाले त्यांचा महिमा अपार आहे. त्यांची उपासना अनेक लोक अत्यंत तत्परतेने करतात. (१५)

सकळ देवांचें मूळ। तो हा अंतरात्माचि केवळ।
भूमंडळीं भोग सकळ। त्यासीच घडे ॥ १६॥

सर्व देवांचे मूळ केवळ अंतरात्माच आहे. या भूमंडळावर सर्व भोग त्यालाच प्राप्त होतात. (१६)

नाना देव होऊन बैसला। नाना शक्तिरूपें जाला।
भोक्ता सकळ वैभवाला। तोचि येक ॥१७॥

तोच नाना देवांचे रूप घेऊन बसतो. नाना शक्तींच्या रूपाने तोच प्रगटतो. सर्व वैभवाचा भोक्ता तो एकटा आहे. (१७)

याचा पाहावा विचार। उदंड लांबला जोजार।
होती जाती देव नर। किती म्हणोनि ॥ १८॥

याचा नीट विचार करावा. सर्व देवांचे वर्णन करायचे म्हटले तर फारच लांबड लागेल. किती देव आणि किती नर होतात आणि जातात. त्यांचे वर्णन किती करावे? (१८)

कीर्ति आणि अपकीर्ति। उदंड निंदा उदंड स्तुती।
सर्वत्रांची भोगप्राप्ती। अंतरात्म्यासीच घडे ॥ १९॥

कीर्ती आणि अपकीर्ती, उदंड निंदा आणि उदंड स्तुती हे सर्व भोग अंतरात्म्यालाच घडतात. (१९)

कोण देहीं काये करितो। कोण देहीं काये भोगितो।
भोगी त्यागी वीतरागी तो। येकचि आत्मा ॥ २०॥

कोणत्या देहात काय करतो, कोणत्या देहात काय भोगतो हे सांगता येत नाही. पण भोगी, त्यागी आणि वीतरागी सर्वांच्या देही असणारा अंतरात्मा मात्र एकच आहे. (२०)

प्राणी साभिमानें भुल्लें। देह्याकडे पाहात गेले।
मुख्य अंतरात्म्यास चुकले। अंतरी असोनी ॥ २१॥

प्राणी देहाच्या अभिमानाने भुलतात. देहाकडेच पाहात बसतात आणि मुख्य अंतरात्मा त्यांच्या अंतरी असूनही त्याला जाणत नाहीत. (२१)

अरे या आत्मयाची चळवळ पाहे। ऐसा भूमंडळीं कोण आहे।
अगाध पुण्यें अनुसंधान राहे। कांहींयेक ॥ २२॥

अरे, या अंतरात्म्याचे कर्तृत्व जाणेल असा या भूमंडळावर कोण आहे? अगाध पुण्याचा संग्रह असेल, तरच एखाद्या माणसाला त्याचे थोडेफार अनुसंधान राहते. (२२)

त्या अनुसंधानासरिसें। जळोनी जाईजे किल्मिषें।
अंतरनिष्ठ ज्ञानी ऐसे। विवरोन पाहाती ॥ २३॥

ते अनुसंधान राहिले असता त्याच्या योगाने सर्व मलिनत्व, पाप जळून जाते. जे अंतरनिष्ठ ज्ञानी असतात, ते याप्रकारे विवरून पाहातात. (२३)

अंतरनिष्ठ तितुके तरले। अंतरभ्रष्ट तितुके बुडाले।
बाह्याकारें भरंगळले। लोकाचारें ॥ २४॥

अंतरनिष्ठ असतात ते तरतात. अंतरभ्रष्ट असतात ते सर्व बुडतात, कारण ते बहिर्मुख असल्याने लोकाचाराच्या नादी लागून भरकटत जातात. (२४)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'बहुदेवस्थाननिरूपणनाम' समास पहिला समाप्त.

❑ ❑

## दशक १८ : समास २
## सर्वज्ञसंगनिनिरूपण

॥ श्रीराम ॥

नेणपणें जालें तें जालें। जालें तें होऊन गेलें।
जाणतेपणें वर्तलें। पाहिजे नेमस्त ॥ १ ॥

जाणत्याची संगती धरावी। जाणत्याची सेवा करावी।
जाणत्याची सदबुद्धि घ्यावी। हळुहळु ॥ २ ॥

जाणत्यापासीं लेह्नें सिकावें। जाणत्यापासीं वाचूं सिकावें।
जाणत्यापासीं पुसावें। सकळ कांहीं ॥ ३ ॥

जाणत्यास करावा उपकार। जाणत्यास झिजवावें शरीर।
जाणत्याचा पाहावा विचार। कैसा आहे ॥ ४ ॥

जाणत्याचे संगतीनें भजावें। जाणत्याचे संगतीनें झिजावें।
जाणत्याचे संगतीनें रिझावें। विवरविवरों ॥ ५ ॥

जाणत्यापासीं गावें गाणें। जाणत्यापासीं वाजवणें।
नाना आळाप सिकणें। जाणत्यापासीं ॥ ६ ॥

जाणत्याचे कासेसी लागावें। जाणत्याचें औषध घ्यावें।
जाणता सांगेल तें करावें। पथ्य आधीं ॥ ७ ॥

जाणत्यापासीं परीक्षा सिकणें। जाणत्यापासीं तालिम करणें।
जाणत्यापासीं पोहणें। अभ्यासावें ॥ ८ ॥

जाणता बोलेल तैसें बोलावें। जाणता सांगेल तैसें चालावें।
जाणत्याचे ध्यान घ्यावें। नाना प्रकारीं ॥ ९ ॥

जाणत्याच्या कथा सिकाव्या। जाणत्याच्या युक्ति समजाव्या।
जाणत्याच्या गोष्टी विवराव्या। सकळ कांहीं ॥ १० ॥

जाणत्याचे पेंच जाणावे। जाणत्याचे पीळ उकलावे।
जाणता राखेल तैसे राखावे। लोक राजी ॥ ११ ॥

जाणत्याचे जाणावे प्रसंग। जाणत्याचे घ्यावे रंग।
जाणत्याचे स्फूर्तीचे तरंग। अभ्यासावे ॥ १२ ॥

जाणत्याचा साक्षेप घ्यावा। जाणत्याचा तर्क जाणावा।
जाणत्याचा उल्लेख समजावा। न बोलतांचि ॥ १३ ॥

नेणतेपणाने जे झाले ते झाले. झाले-गेले होऊन गेले, पण आता तरी जाणतेपणाने वागले पाहिजे. (१)

जाणत्याची संगत धरावी, जाणत्याची सेवा करावी आणि हळूहळू जाणत्याची सद्बुद्धी घ्यावी. (२)

जाणत्यापाशी लिहायला शिकावे. जाणत्यापाशी वाचायला शिकावे. जाणत्यालाच सर्व काही विचारावे (३)

जाणत्यावर उपकार करावा, त्याच्यासाठी आपले शरीर झिजवावे आणि त्याचा विचार काय आहे हे जाणून घ्यावे. (४)

जाणत्याच्या संगतीने भगवद्भजन करावे. त्याच्या संगतीने कष्ट सोसावेत. जाणत्याच्या संगतीत विवरण करीत संतुष्ट व्हावे. (५)

त्याच्यापाशी गाणे गावे, वाद्य वाजवावे. जाणत्यापाशी संगीत कलेतील विविध आलाप वगैरे शिकावे. (६)

जाणत्याच्या नादी लागावे. जाणत्याचेच औषध घ्यावे आणि तो सांगेल त्याप्रमाणे आधी पथ्यही करावे. (७)

जाणत्यापाशी परीक्षा कशी करावी हे शिकावे. जाणत्यापाशी तालीम करावी आणि जाणत्यापाशीच पोहण्याचा अभ्यास करावा. (८)

जाणता जसे बोलेल तसे आपण बोलावे. जाणता सांगेल तसे चालावे. जाणता करतो तसेच ध्यान करण्यास आपण नाना प्रकारे शिकावे. (९)

जाणत्यापासून कथा सांगण्यास शिकावे. त्याची युक्ती नीट समजून घ्यावी आणि त्याच्या सर्व गोष्टींचे विवरण करावे. (१०)

जाणत्याचे डावपेच जाणून घ्यावेत. जाणत्याचे पीळ उकलावेत आणि तो ज्याप्रमाणे लोकांना राजी राखतो, तसे आपणही लोकांना राजी राखावे. (११)

जाणता माणूस कोणत्या प्रसंगात कसा वागतो, ते जाणून घ्यावे. जाणता रामरंगात जसा रंगून जात असेल, तसे आपण रंगून जावे. जाणत्याच्या स्फूर्तीचे सर्व साहित्य याचा चांगला अभ्यास करावा. (१२)

जाणत्याप्रमाणे आपणही उद्योगी व्हावे. त्याची तर्क करण्याची पद्धती समजून घ्यावी. त्याने न बोलताच त्याच्या अंतरंगातील विचार जाणून घ्यावेत. (१३)

जाणत्याचें धूर्तपण। जाणत्याचें राजकारण।
जाणत्याचें निरूपण। ऐकत जावें ॥ १४॥

जाणत्याचे चातुर्य, त्याचे मुत्सद्देगिरीने वागणे, तसेच त्याचे अध्यात्मनिरूपण या सर्वांचे श्रवण करून ते जाणून घ्यावे. (१४)

जाणत्याचीं कवित्वें सिकावीं। गद्यें पद्यें वोळखावीं।
माधुर्यवचनें समजावीं। अंतर्यामीं ॥ १५॥

जाणत्यांनी केलेल्या काव्याचा अभ्यास करावा. गद्य, पद्य नीट जाणून घ्यावे आणि त्यांची सुमधुर वचने अंतर्यामी समजून घ्यावीत. (१५)

जाणत्याचे पाहावे प्रबंद। जाणत्याचे वचनभेद।
जाणत्याचे नाना संवाद। बरे शोधावे ॥ १६॥

जाणत्याचे प्रबंध पाहावेत, तो नाना लोकांशी सुखसंवाद कशा प्रकारे करतो याचा शोध घ्यावा. (१६)

जाणत्याची तीक्ष्णता। जाणत्याची सहिष्णता।
जाणत्याची उदारता। समजोन घ्यावी ॥ १७॥

जाणत्याची तीक्ष्ण बुद्धी, त्याची सहनशीलता आणि उदारता समजून घ्यावी. (१७)

जाणत्याची नाना कल्पना। जाणत्याची दीर्घ सूचना।
जाणत्याची विवंचना। समजोन घ्यावी ॥ १८॥

जाणत्याच्या नाना कल्पना, त्याची दूरदृष्टी तसेच त्याची विवंचना समजून घ्यावी. (१८)

जाणत्याचा काळ सार्थक। जाणत्याचा अध्यात्मविवेक।
जाणत्याचे गुण अनेक। आवघेच घ्यावे ॥ १९॥

जाणता आपल्या काळाचे सार्थक कसे करतो, त्याची अध्यात्मविवेक समजून देण्याची पद्धती व त्यानुसार त्याचे आचरण आणि आणखीही त्याचे अनेक गुण आपण सर्वच आत्मसात करावेत. (१९)

जाणत्याचा भक्तिमार्ग। जाणत्याचा वैराग्ययोग।
जाणत्याचा अवघा प्रसंग। समजोन घ्यावा ॥ २०॥

जाणत्याचा भक्तिमार्ग, त्याचा वैराग्ययोग, एकूण त्याचे सर्वच चरित्र आपण जाणून घ्यावे. (२०)

जाणत्याचें पाहावें ज्ञान। जाणत्याचें सिकावें ध्यान।
जाणत्याचें सूक्ष्म चिन्ह। समजोन घ्यावें ॥ २१॥

जाणत्याचे ज्ञान पाहावे; त्याच्याकडून ध्यानयोग शिकावा, त्याच्या ठिकाणच्या सूक्ष्म खुणाही समजून घ्याव्या. (२१)

जाणत्याचें अलिप्तपण। जाणत्याचें विदेहलक्षण।
जाणत्याचें ब्रह्मविवरण। समजोन घ्यावें ॥ २२॥

जाणत्याचे अलिप्तपण, विदेहलक्षण आणि ब्रह्मविवरण समजून घ्यावे. (२२)

जाणता येक अंतरात्मा। त्याचा काये सांगावा महिमा।
विद्याकळागुणसीमा। कोणें करावी ॥ २३॥

खरे तर एक अंतरात्मा हा एकच जाणता आहे. त्याचा महिमा किती वर्णन करून सांगणार? त्याच्या ठिकाणी असलेल्या अमर्याद विद्या, कला आणि गुण यांची गणना कोण करू शकेल? (२३)

परमेश्वराचे गुणानुवाद। अखंड करावा संवाद।
तेणेंकरितां आनंद। उदंड होतो ॥ २४॥

परमेश्वराच्या गुणानुवादांचे वर्णन परस्परांमध्ये अखंड करून संवाद साधावा. त्यामुळे उदंड आनंद होतो. (२४)

परमेश्वरें निर्मिलें तें। अखंड दृष्टीस पडतें।
विवरविवरों समजावें तें। विवेकी जनीं ॥ २५॥

जे जे परमेश्वराने निर्माण केले आहे, ते ते सतत आपल्या दृष्टीस पडत असते. विवेकी लोकांनी वारंवार विवरण करून त्याचे खरे स्वरूप जाणून घ्यावे. (२५)

जितुकें कांहीं निर्माणजालें। तितुकें जगदेश्वरें निर्मिलें।
निर्माण वेगळें केलें। पाहिजे आधीं ॥ २६॥

जितके काही निर्माण झालेले आहे ते ते सर्व जगदीश्वरानेच निर्मिलेले आहे. कार्य आणि त्याचा कर्ता हे निराळे असतात हे आधी ओळखले पाहिजे. (२६)

तो निर्माण करितो जना। परी पाहों जातां दिसेना।
विवेकबळें अनुमाना। जाणीत जावा ॥ २७॥

तो सर्व लोकांना निर्माण करतो, पण त्याला पाहावयाचा प्रयत्न केला तर तो दिसत नाही. म्हणून सूक्ष्म दृष्टीने विचार करून अनुमानाने त्याला जाणण्याचा प्रयत्न करावा. (२७)

त्याचें अखंड लगतां ध्यान। कृपाळुपणें देतो आशन।
सर्वकाळ संभाषण। तदांशींच करावें ॥ २८॥

त्याचे अखंड ध्यान लागले की तो कृपाळूपणे खायला, प्यायला देतो. योगक्षेम चालवतो. सर्व काळ साधकाने त्या जगदीश्वरासंबंधीच संभाषण करावे. (२८)

ध्यान धरीना तो अभक्त। ध्यान धरील तो भक्त।
संसारापासुनी मुक्त। भक्तांस करी ॥ २९॥

जो सतत अनुसंधान करतो, ध्यान धरतो तो भक्त जाणावा. जो ध्यान धरीत नाही तो अभक्त जाणावा. त्याचे ध्यान धरले असता तो ध्यान करणाऱ्या, भक्ताला संसारापासून मुक्त करतो. (२९)

उपासनेचे सेवटीं। देवां भक्तां अखंड भेटी।
अनुभवी जाणेल गोष्टी। प्रत्ययाची ॥ ३०॥

उपासनेच्या शेवटी म्हणजे जेव्हा उपासकाचा वेगळेपणाचा भाव नष्ट होतो अर्थात त्याचे आत्म्याशी पूर्ण तादात्म्य होते, तेव्हा देवाची आणि भक्ताची अखंड भेट होते. या अनुभवाच्या गोष्टी अनुभवीच जाणतो. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सर्वज्ञसंगनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**

❑❑

## दशक १८ : समास ३
## निःस्पृहसिकवणनिरूपण

॥ श्रीराम ॥

दुल्लभ शरीरीं दुल्लभ आयुष्य। याचा करूं नये नास।
दास म्हणे सावकास। विवेक पाहावा ॥ १॥

सर्व शरीरात नरदेह हा अत्यंत दुर्लभ आहे. त्यात आयुष्य मिळणे हे आणखीच दुर्लभ आहे. म्हणून याचा नाश करू नये. श्रीरामदास म्हणतात की, म्हणून सावकाश विवेक करावा. (१)

न पाहातां उत्तम विवेक। आवघा होतो अविवेक।
अविवेकें प्राणी रंक। ऐसा दिसे ॥ २॥

जर उत्तम प्रकारे विवेक केला नाही, तर सर्व अविवेक होतो. अविवेकाने प्राणी रंकासारखा म्हणजे भिकाऱ्यासारखा दीन दिसतो. (२)

हे आपलें आपण केलें। आळसें उदास नागविलें।
वाईट संगतीनें बुडविलें। देखत देखतां ॥ ३॥

असे करणे म्हणजे आपले आपणच नुकसान करणे आहे. आळसाने आणि उदासीन वृत्तीमुळे माणूस नागवला जातो आणि वाईट संगत जर मिळाली तर त्याचा बघता बघता नाश होतो. (३)

मूर्खपणाचा अभ्यास जाला। बाष्कळपणें घातला घाला।
काम चांडाळ उठिला। तरुणपणीं ॥ ४॥

मूर्खपणा अंगवळणी पडतो. त्यातच स्वच्छंदपणाने हल्ला चढवला आणि त्यात तरुणपणी कामविकाररूपी चांडाळ बळावला, तर मग काय होणार? (४)

मूर्ख आळसी आणी तरुणा। सर्वांविषीं दैन्यवाणा।
कांहीं मिळेना कोणा। काये म्हणावें ॥ ५॥

एखादा माणूस मूर्ख, आळशी आणि तरुण, पण सर्व बाबतीत दैन्यवाणा असतो आणि तरी कोणाशीही त्याचे पटत नाही. अशाला काय म्हणावे? (५)

जें जें पाहिजे तें तें नाहीं। अन्नवस्त्र तेंहि नाहीं।
उत्तम गुण कांहींच नाहीं। अंतर्यामीं ॥ ६॥

जे जे प्रपंचात आवश्यक असते, ते ते त्याच्याजवळ नसते. कमीत कमी अन्न-वस्त्र असावे तर तेही नाही आणि अंतर्यामी काही उत्तम गुणही नाही. (६)

बोलतां येना बैसतां येना। प्रसंग कांहींच कळेना।
शरीर मन हें वळेना। अभ्यासाकडे ॥ ७॥

त्याला धड बोलता येत नाही, धड बसता येत नाही. कुठल्या प्रसंगी कसे वागावे हेही कळत नाही आणि शरीर आणि मन अभ्यासाकडे वळत नाही. (७)

लिहिणें नाहीं वाचणेंनाहीं। पुसणें नाहीं सांगणें नाहीं।
नेमस्तपणाचा अभ्यास नाहीं। बाष्कळपणें ॥ ८॥

लिहायला येत नाही, वाचायला येत नाही, कुणाला काही विचारायला येत नाही अथवा कुणी काही विचारले तर सांगायला येत नाही. स्वच्छंदपणामुळे नियमितपणाचे वळण नाही. (८)

आपणास कांहींच येना। आणी सिकविलेंही मानेना।
आपण वेडा आणी सज्जना। बोल ठेवी ॥ ९॥

आपल्याला तर काही येत नाही, पण कुणी शिकवू लागले तर तेही त्याला मान्य होत नाही. आपण तर वेडा असतो, पण सज्जनांना नावे ठेवतो. (९)

अंतरी येक बाहेर येक। ऐसा जयाचा विवेक।
परलोकाचें सार्थक। कैसें घडे ॥ १० ॥

आत एक असते, बाहेर दुसरेच काही दाखवतो. असा विवेक ज्याच्या ठिकाणी असतो, त्याचे परलोकी सार्थक कसे होईल? (१०)

आपला संसार नासला। मनामधें प्रस्तावला।
तरी मग अभ्यास केला। पाहिजे विवेकाचा ॥ ११ ॥

अशा माणसाच्या संसाराची दैना, दुर्दशा होते. अशा वेळी जर त्याला मनामध्ये पश्चात्ताप झाला, तर मग त्याने विवेकाचा अभ्यास करणे आवश्यक असते. (११)

येकाग्र करूनियां मन। बळेंचि धरावें साधन।
येत्नीं आळसाचें दर्शन। होऊंच नये ॥ १२ ॥

अशा माणसाने मन एकाग्र करून बळेच साधन करण्यास आरंभ करावा. आळसाचे दर्शनसुद्धा होणार नाही यासाठी त्याने कसून प्रयत्न करावा. (१२)

अवगुण अवघेचि सांडावे। उत्तम गुण अभ्यासावे।
प्रबंद पाठ करीत जावे। जाड अर्थ ॥ १३ ॥

सर्व अवगुणांचा त्याग करावा. उत्तम गुणांचा अभ्यास करावा. अर्थगंभीर असे प्रबंध पाठ करीत जावेत. (१३)

पदप्रबंद श्लोकप्रबंद। नाना धाटी मुद्रा छंद।
प्रसंगज्ञानेंचि आनंद। होत आहे ॥ १४ ॥

पदप्रबंध, श्लोकप्रबंध, नाना धाटी, मुद्रा, छंद वगैरे पाठ करावेत व त्यांचा प्रसंगानुसार उपयोग केल्याने ऐकणाऱ्यांना आनंद होतो. (१४)

कोणे प्रसंगीं काये म्हणावें। ऐसें समजोन जाणावें।
उगेंचि वाउगें सिणावें। कासयासी ॥ १५ ॥

कुठल्या प्रसंगी काय म्हणावे, हे नीट समजून जाणून घ्यावे व त्याप्रमाणे करावे. अन्यथा उगीच व्यर्थ शिणण्यात काय अर्थ आहे? (१५)

दुसऱ्याचें अंतर जाणावें। आदर देखोन म्हणावें।
जें आठवेल तें गावें। हें मूर्खपण ॥ १६ ॥

दुसऱ्याचे मनोगत जाणून घ्यावे. आपल्या म्हणण्याविषयी आदर आहे की नाही, हे पाहून आदर असेल तरच म्हणावे. उगीच जे आठवेल ते कुणी न सांगताच गाणे हे मूर्खपणाचे आहे. (१६)

ज्याची जैसी उपासना। तेंचि गावें चुकावेना।
रागज्ञाना ताळज्ञाना। अभ्यासावें ॥ १७ ॥

ज्याची जी उपासना असेल, त्या देवतेसंबंधीच गावे. तेथे चूक करू नये. रागज्ञान, तालज्ञान यांचाही अभ्यास करावा. (१७)

साहित संगीत प्रसंग मानें। करावीं कथेचीं घमशानें।
अर्थांतर श्रवणमननें। काढीत जावें ॥ १८ ॥

साहित्य, संगीत यांचा प्रसंगानुसार मेळ साधून धडाक्याने कथेची लयलूट करावी. वारंवार श्रवण-मनन करून अर्थांतर काढीत जावे. (१८)

पाठ उदंडचि असावें। सर्वकाळ उजळीत जावें।
सांगितले गोष्टींचें असावें। स्मरण अंतरीं ॥ १९ ॥

पाठांतर भरपूर असावे आणि वारंवार त्याची उजळणी करावी. आपण काय सांगितले याचे अंतरात स्मरण असावे. (१९)

अखंड येकांत सेवावा। ग्रन्थमात्र धांडोळावा।
प्रचित येईल तो घ्यावा। अर्थ मनीं ॥ २० ॥

अखंड एकांत सेवावा आणि सद्ग्रंथांचा सखोल अभ्यास करावा. ज्याचा अनुभव येईल, तोच अर्थ मनात निश्चित करावा. (२०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'निःस्पृहसिकवणनाम' समास तिसरा समाप्त.

❑ ❑

## दशक १८ : समास ४

### देहेदुल्लभनिरूपण

॥ श्रीराम ॥

देह्याकरितां गणेशपूजन। देह्याकरितां शारदावंदन।
देह्याकरितां गुरु सज्जन। संत श्रोते ॥ १॥

या देहात अंतरात्मा असतो, म्हणूनच त्याला उद्देशून गणेशपूजन, शारदावंदन, तसे गुरु, सज्जन, संत, श्रोते यांना वंदन वगैरे केले जाते. (१)

देह्याकरितां कवित्वेंचालती। देह्याकरितां अधेनें करिती।
देह्याकरितां अभ्यासिती। नाना विद्या ॥ २॥

देह आणि देहात राहाणारा जो अंतरात्मा त्याच्यासाठीच कवित्व निर्माण होते. अध्ययन केले जाते. नाना विद्यांचा अभ्यास केला जातो. (२)

देह्याकरितां ग्रंथलेखन। नाना लिपीवोळखण।
नाना पदार्थशोधन। देह्याकरितां ॥ ३॥

याच्याकरिताच ग्रंथलेखन, लिपीचे ज्ञान, नाना पदार्थांचे शोधन घडते. (३)

देह्याकरितां माहाज्ञानी। सिद्ध साधु ऋषी मुनी।
देह्याकरितां तीर्थाटणीं। फिरती प्राणी ॥ ४॥

त्याच्याकरताच महाज्ञानी, सिद्ध, साधू, ऋषी, मुनी साधना करतात. तीर्थाटने करीत हिंडतात. (४)

देह्याकरितां श्रवण घडे। देह्याकरितां मननीं पवाडे।
देह्याकरितां देहीं आतुडे। मुख्य परमात्मा ॥ ५॥

अंतरात्म्यामुळेच श्रवण घडते, मनन केले जाते, आणि याच देहात मुख्य परमात्म्याची प्राप्ती होते. (५)

देह्याकरितां कर्ममार्ग। देह्याकरितां उपासनामार्ग।
देह्याकरितां ज्ञानमार्ग। भूमंडळीं ॥ ६॥

अंतरात्म्यामुळेच या भूमंडळावर कर्ममार्ग, उपासना मार्ग आणि ज्ञानमार्ग प्रचलित झाले आहेत. (६)

योगी वीतरागी तापसी। देह्याकरितां नाना सायासी।
देह्याकरितां आत्मयासी। प्रगटणें घडे ॥ ७॥

अंतरात्म्यामुळेच योगी, तापसी, वैराग्यसंपन्न लोक नाना सायास करतात आणि त्याच्यामुळेच आत्मारामास प्रगट व्हावे लागते. (७)

येहलोक आणी परलोक। देह्याकरितां सकळ सार्थक।
देहेंविण निरार्थक। सकळ कांहीं ॥ ८॥

इहलोक आणि परलोक यांचे सार्थक अंतरात्म्यामुळेच होते. तो नसेल, तर सर्व काही निरर्थक ठरते. (८)

पुन्हश्चर्णें अनुष्ठानें। गोरांजनें धूम्रपानें।
सीतोष्ण पंचाग्नी साधणें। देह्याकरितां ॥ ९॥

अंतरात्म्यामुळेच पुरश्चरणे, अनुष्ठाने, गोरांजने, धूम्रपाने, शीतोष्ण सहन करणे, पंचाग्निसाधन इत्यादी केली जातात. (९)

देह्याकरितां पुण्यसीळ। देह्याकरितां पापी केवळ।
देह्याकरितां अनर्गळ। सुचिस्मंत ॥ १०॥

पुण्यशील अथवा अत्यंत पापी, अनाचारी किंवा सदाचारी या सर्वांत अंतरात्माच वर्तत असतो. (१०)

देह्याकरितां अवतारी। देह्याकरितां वेषधारी।
नाना बंडें पाषांडें करी। देह्याकरितां ॥ ११॥

अवतारी आणि वेषधारी, अनेक प्रकारची बंडे आणि पाखंडे करणारे यांतही अंतरात्माच कर्ता असतो. (११)

देह्याकरितां विषयेभोग। देह्याकरितां सकळ त्याग।
होती जाती नाना रोग। देह्याकरितां ॥ १२॥

अंतरात्माच निरनिराळे विषयभोग करतो. तोच सर्वस्वाचा त्यागही करतो किंवा नाना रोगही त्याच्यामुळेच येतात आणि जातात. (१२)

देह्याकरितां नवविधा भक्ती। देह्याकरिता चतुर्विधा मुक्ती।
देह्याकरितां नाना युक्ती। नाना मतें ॥ १३॥

अंतरात्म्यामुळेच नवविधा भक्ती, चतुर्विधा मुक्ती तसेच नाना मते आणि नाना युक्ती केल्या जातात. (१३)

देह्याकरितां दानधर्म। देह्याकरितां नाना वर्म।
देह्याकरिता पूर्वकर्म। म्हणती जनीं ॥ १४॥

अंतरात्म्यामुळेच दानधर्म केला जातो. त्याच्यामुळेच नाना रहस्ये उलगडतात आणि लोक पूर्वजन्मातील कर्मासंबंधी अनुमान करू लागतात. (१४)

देह्याकरितां नाना स्वार्थ। देह्याकरितां नाना अर्थ।
देह्याकरितां होईजे वेर्थ। आणी धन्य ॥ १५॥

अंतरात्म्यामुळेच नाना प्रकारे स्वार्थ साधला जातो, नाना पदार्थ मिळवले जातात, मनुष्यजन्म व्यर्थही जाऊ शकतो अथवा धन्यही होऊ शकतो. (१५)

देह्याकरितां नाना कळा। देह्याकरितां उणा आगळा।
देह्याकरितां जिव्हाळा। भक्तिमार्गाचा ॥ १६॥

अंतरात्म्यामुळेच नाना कला शिकता येतात, मनुष्य उणा किंवा आगळा ठरतो. त्याच्यामुळेच भक्तिमार्गासंबंधी जिव्हाळा उत्पन्न होतो. (१६)

नाना सन्मार्गसाधनें। देह्याकरितां तुटती बंधनें।
देह्याकरितां निवेदनें। मोक्ष लाभे ॥ १७॥

देह सकळामधें उत्तमु। देही राहिला आत्मारामु।
सकळां घटीं पुरुषोत्तमु। विवेकी जाणती ॥ १८॥

देह्याकरितां नाना कीर्ती। अथवा नाना अपकीर्ती।
देह्याकरितां होती जाती। अवतारमाळिका ॥ १९॥

देह्याकरितां नाना भ्रम। देह्याकरितां नाना संभ्रम।
देह्याचेन उत्तमोत्तम। भोगिती पदें ॥ २०॥

देह्याकरितां सकळ कांहीं। देह्याविण कांहीं नाहीं।
आत्मा विरे ठाईं ठाईं। नव्हताच जैसा ॥ २१॥

देहे परलोकीचें तारूं। नाना गुणांचा गुणागरु।
नाना रत्नांचा विचारु। देह्याचेनी ॥ २२॥

देह्याचेन गायेनकळा। देह्याचेन संगीतकळा।
देह्याचेन अंतर्कळा। ठाईं पडे ॥ २३॥

देहे ब्रह्मांडाचें फळ। देहे दुल्लभचि केवळ।
परी या देह्यास निवळ। उमजवावें ॥ २४॥

देह्याकरितां लहानथोर। करिती आपुलाले व्यापार।
त्याहिमधें लहानथोर। कितीयेक ॥ २५॥

जे जे देहे धरुनी आले। ते ते कांहीं करून गेले।
हरिभजनें पावन जाले। कितीयेक ॥ २६॥

अष्टधा प्रकृतीचें मूळ। संकल्परूपचि केवळ।
नाना संकल्पें देहेफळ। घेऊन आलें ॥ २७॥

हरिसंकल्प मुळीं होता। तोचि फळीं पाहावा आतां।
नाना देह्यांतरीं तत्वतां। शोधितां कळे ॥ २८॥

वेलाचे मुळीं बीज। उदकरूप वेली समज।
पुढें फळामध्यें बीज। मुळींच्या अंशें ॥ २९॥

मुळाकरितां फळ येतें। फळाकरितां मूळ होतें।
येणेंकरितां होत जातें। भूमंडळ ॥ ३०॥

असो कांहीं येक करणें। कैसें घडे देह्याविणें।
देहे सार्थकीं लावणें। म्हणिजे बरें ॥ ३१॥

अंतरात्म्यामुळेच नाना सन्मार्गाची साधने करता येतात, त्यामुळेच बंधने तुटतात आणि अंतरात्म्यामुळेच आत्मनिवेदन घडून मोक्ष लाभतो. (१७)

मानवदेह सर्व देहांत उत्तम आहे. त्यातच आत्माराम राहातो. विवेकी पुरुष असतात ते सर्व प्राणिमात्रांत पुरुषोत्तम आहे, हे जाणतात. (१८)

अंतरात्म्यामुळेच कीर्ती मिळते अथवा अनेक प्रकारे अपकीर्ती होते. त्याच्यामुळेच अवतारांच्या मालिका म्हणजे अनेकानेक अवतार होत असतात. (१९)

अंतरात्म्यामुळेच नाना भ्रम, अथवा नाना संभ्रम उत्पन्न होतात आणि त्याच्यामुळेच उत्तमोत्तम पदांची प्राप्तीही होते. (२०)

देहधारी अंतरात्म्यामुळेच सर्व काही घडते. तो नसेल तर काहीच होऊ शकत नाही. आत्मा जेथल्या तेथे जणू काही नव्हताच अशा प्रकारे विरून जातो. (२१)

मनुष्यदेह हे परलोक प्राप्त करून देणारे तारू आहे. तो नाना गुणांचे आगर आहे. पण अंतरात्म्यामुळेच नाना रत्नांचा विचार केला जातो. (२२)

अंतरात्म्यामुळेच गायनकला, संगीतकला आणि अंतर्कला म्हणजे ज्ञान प्राप्त होते. (२३)

देह (मानव देह) हे ब्रह्मांडाचे फळ आहे. मानवदेह हा केवळ अत्यंत दुर्लभ आहे, पण यात असलेल्या देहीला म्हणजे अंतरात्म्याला हे उमजवावे. (२४)

अंतरात्म्यामुळे सर्व लहान-थोर आपापले व्यवहार करतात. त्या व्यवहारातही लहानथोर असे कित्येक प्रकार असतात. (२५)

जे जे मानवदेह धरून आले ते काही ना काही कार्य करून गेले. कित्येक हरिभजनाने पावन झाले. (२६)

अष्टधा प्रकृतीचे मूळ केवळ संकल्परूपच आहे. तसेच नाना संकल्पच देहरूप फळ घेऊन येतात. (२७)

'एकोऽहं बहु स्याम्' हा हरिसंकल्प मुळात स्फुरला, तीच मूळ माया होय. आपल्या देहातही तोच मूळचा मीपणाचा संकल्प अंशरूपाने आहे. नाना देहांतील तत्त्वांचा शोध घेतला की हे कळून येते. (२८)

एखाद्या वेलाच्या मुळात बीज असते. नंतर ती वेल पाण्यामुळेच वाढते. म्हणून वेल ही उदकरूप समजावी. वेलीला फळ लागले की त्यात मुळाच्या अंशामुळे बीज आढळून येते. (२९)

मूळ असते, म्हणून फळ येते आणि फळामुळे म्हणजे त्यातील बीजामुळे मूळ उत्पन्न होते. याप्रमाणे भूमंडळातील सर्व पदार्थ होत- जात असतात. (३०)

असो. हे राहू दे. काहीही क्रिया देहाशिवाय आणि देहीशिवायही कशी घडणार? म्हणून देह सार्थकी लावावा हे बरे. (३१)

**आत्म्याकरितां देहे जाला। देह्याकरितां आत्मा तगला।**
**उभययोगें उदंड चालिला। कार्यभाग ॥ ३२॥**

आत्म्याकरिता देह उत्पन्न झाला आणि देहामुळेच आत्मा टिकू शकला. याप्रमाणे देह आणि अंतरात्मा या उभयतांच्या एकत्र येण्याने उदंड कार्यभाग चालतो. (३२)

**चोरून गुप्तरूपें करावें। तें आत्मयासी पडे ठावें।**
**कर्तुत्व याचेन स्वभावें। सकळ कांहीं ॥३३॥**

चोरून गुप्तरूपाने काही करू म्हणावे, तर ते अंतरात्म्यास लगेच कळते. अंतरात्म्यामुळेच स्वाभाविकरीत्या सर्व कार्य घडते. (३३)

**देह्यामधें आत्मा असतो। देहे पूजितां आत्मा तोषतो।**
**देहे पिडितां आत्मा क्षोभतो। प्रतक्ष आतां ॥ ३४॥**

देहामध्ये अंतरात्मा असतो. देहाची पूजा केली की तो प्रसन्न होतो. देहाला पीडा केली तर अंतरात्मा क्षोभतो. हे आपल्याला प्रत्यक्ष दिसून येते. (३४)

**देह्यावेगळी पूजा पावेना। देह्याविण पूजा फावेना।**
**जनीं जनार्दन म्हणोनी जना। संतुष्ट करावें ॥ ३५॥**

देहाशिवाय आत्म्याला पूजा पावत नाही. देहाशिवाय पूजा करताही येत नाही. सर्व जनांमध्ये अंतरात्म्याच्या रूपाने जनार्दन राहतो. म्हणून सर्व जनांना संतुष्ट करावे. (३५)

**उदंड प्रगटला विचार। धर्मस्थापना तदनंतर।**
**तेथेंच पूजेस अधिकार। पुण्यशरीरीं ॥ ३६॥**

पुण्यशरीराच्या ठिकाणीच प्रथम उदंड विचार प्रगटतो. त्यानंतर त्यांच्याकडूनच धर्मस्थापना होते. अशा पुरुषांनाच पूजा घेण्याचा अधिकार प्राप्त झालेला असतो. (३६)

**सगट भजन करूं येतें। तरी मूर्खपण आंगीं लागतें।**
**गाढवासी पूजितां कळतें। काये त्याला ॥ ३७॥**

सरसकट सर्वांचे भजन-पूजन करू म्हटले, तर ते मूर्खपणाचे ठरते. गाढवाची पूजा केली, तर त्याला त्यात काहीच कळत नाही. (३७)

**पूज्य पूजेसी अधिकार। उगेचि तोषवावे इतर।**
**दुखऊं नये कोणाचेंअंतर। म्हणिजे बरें ॥ ३८॥**

जे पूज्य आहेत, त्यांनाच पूजा घेण्याचा अधिकार आहे. पण इतरांनाही उगीच मान देऊन संतुष्ट करावे. कोणाचेही मन दुखवू नये म्हणजे बरे. (३८)

**सकळ जगदांतरींचा देव। क्षोभतां राहाव्या कोठें ठाव।**
**जनावेगळा जनास उपाव। आणीक नाहीं ॥ ३९॥**

सर्व जगाचा देव अंतरात्मा व्याप्त आहे. तो जर क्षोभला तर राहण्यास जागाच कोठे मिळणार? माणसांच्यावाचून माणसांचे चालणारच नाही. म्हणून त्यांना संतुष्ट करण्याशिवाय दुसरा उपाय नाही. (३९)

**परमेश्वराचे अनंत गुण। मनुष्यें काये सांगावी खूण।**
**परंतु अध्यात्मग्रंथश्रवण। होतां उमजे ॥ ४०॥**

परमेश्वराचे गुण अनंत आहेत. माणसाला त्याचे गुणवर्णन संपूर्णपणे करताच येणार नाही. पण अध्यात्मग्रंथाचे श्रवण केल्याने त्या परमात्म्याच्या स्वरूपाचे थोडे फार ज्ञान होते. (४०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहेदुल्लभनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.**



## दशक १८ : समास ५
## करंटपरीक्षानिरूपण

॥ श्रीराम ॥

धान्य उदंड मोजिले । परी त्या मापें नाहीं भक्षिलें।
विवरल्याविण तैसें जालें । प्राणीमात्रासी ॥ १ ॥

मापाने उदंड धान्य मोजले जाते, पण माप त्यातील काहीच खाऊ शकत नाही. त्याप्रमाणे जे श्रवण केले जाते, त्याचे माणसाने जर मनन केले नाही, तर त्याचा त्याला काही उपयोग होत नाही. (१)

पाठ म्हणतां आवरेना । पुसतां कांहींच कळेना।
अनुभव पाहातां अनुमाना । मधें पडे ॥ २ ॥

एखाद्याचे पाठांतर इतके असते की, तो म्हणू लागला की आवरतच नाही. पण त्याला अनुभव काहीच नसतो. तो नुसती अनुमाने करीत असतो. (२)

शब्दरत्नें परीक्षावीं । प्रत्ययाचीं पाहोन घ्यावीं।
येर ते अवघीं सांडावीं । येकीकडे ॥ ३ ॥

म्हणून पाठांतर करतानाही शब्दरूपी रत्नांची नीट परीक्षा करावी. जे अनुभवाचे बोल असतील ते निवडून घ्यावेत. इतर सर्व एकीकडे सोडून द्यावे. (३)

नांवरूप आवघें सांडावें । मग अनुभवास मांडावें।
सार असार येकचि करावें । हें मूर्खपण ॥ ४ ॥

नामरूपात्मक सर्व दृश्य मायिक असल्याने ते बाजूस सारावे आणि मग सारासारविवेकाने अनुभव घेण्याचा प्रयत्न करावा. सार आणि असार सर्व एकच करणे हा मूर्खपणा आहे. (४)

लेखकें कुळ समजवावें । किंवा उगेंच वाचावें।
येणें दृष्टांतें समजावें । कोणीतरी ॥ ५ ॥

कुळकर्ण्याने खत, पत्रे वगैरे निरक्षर शेतकरी वगैरेंना नीट समजावून द्यावे हे बरे, की न समजावता उगीच वाचणे बरे? या दृष्टांतावरून माणसाने काय ते समजून घ्यावे. (५)

जेथें नाहीं समजावीस । तेथे आवघी कुसमुस।
पुसों जातां वसवस । वक्ता करी ॥ ६ ॥

जेथे लोकांना नीट समजावून सांगणे वक्त्याला जमत नाही, तेथे लोक नाराज होऊन कुसमुस करू लागतात. आणि ते विचारू लागले की वक्ता मात्र चिडचिड करू लागतो. (६)

नाना शब्द येकवटिले । प्रचीतीवीण उपाव केले।
परी ते अवघेचि वेर्थ गेले । फडप्रसंगीं ॥ ७ ॥

नाना ग्रंथांतील शब्दभांडार एकत्र केले आणि स्वत:ला अनुभव नसताना लोकांपुढे मोठेपणा मिरविण्यासाठी प्रस्तुत केले, तर ते सर्व सभेत व्यर्थ ठरते. (७)

पसेवरी वैरण घातलें । तांतडीनें जातें वोडिलें।
तेणें पीठ बारीक आलें । हें तों घडेना ॥ ८ ॥

जात्यात पशापेक्षाही अधिक धान्य एकाच वेळी घालून तातडीने घाईघाईने जाते ओढले आणि बारीक पीठ दळले गेले, असे तर कधी घडूच शकत नाही. (८)

घांसामागें घांस घातला । आवकाश नाहीं चावायाला।
अवघा बोकणा भरिला । पुढे कैसें ॥ ९ ॥

किंवा जेवताना जर चावायला अवसर न देता घासामागे घास घेऊन तोंड भरले, तर पुढे कशी फजिती होईल! (९)

ऐका फडनिसीचें लक्षण । विरंग जाऊं नेदी क्षण।
समस्तांचें अंत:कर्ण । सांभाळीत जावें ॥ १० ॥

आता फडणीशीचे (हिशेबी कारभाऱ्याचे) लक्षण ऐका! फडणीसाने एक क्षणही व्यर्थ जाऊ देऊ नये. सर्व लोकांचे अंत:करण त्याने सांभाळीत असावे. (१०)

सूक्ष्म नामें सुखें घ्यावीं । तितुकीं रूपें वोळखावीं।
वोळखोन समजवावीं । श्रोतयांसी ॥ ११ ॥

वक्त्याने अध्यात्माचे निरूपण करताना सूक्ष्म तत्त्वांची नावे खुशाल घ्यावीत, पण त्याने त्यांचे रूपही स्वत: नीट ओळखावे आणि नंतर श्रोत्यांनाही ते नीट समजवावे. (११)

समशा पुरतां सुखी होती । श्रोते अवघे आनंदती।
अवघे क्षणक्षणा वंदिती । गोसावियांसी ॥ १२ ॥

आपापल्या शंकांचे किंवा समस्यांचे समाधान झाले की श्रोते सुखी होतात. सर्व श्रोत्यांना आनंद होतो आणि ते सर्व वारंवार वक्त्याला वंदन करू लागतात. (१२)

समशा पुरतां वंदिती । समशा न पुरतां निंदिती ।
गोसांवी चिणचिणकरिती । कोण्या हिशेबें ॥ १३ ॥

समस्यांचे समाधान झाले, तर सर्व वंदन करतात. समस्यांचे समाधान झाले नाही, तर निंदा करू लागतात. मग वक्त्याने उगीच तक्रार का बरे करावी? (१३)

शुध सोनें पाहोन घ्यावें । कसीं लाउनी तावावें ।
श्रवणमननें जाणावें । प्रत्ययासी ॥ १४ ॥

सोने घेताना ते शुद्ध आहे ना, हे पाहून घ्यावे. कसाला लावून, तापवून त्याची परीक्षा करावी. त्याप्रमाणे जे श्रवण-मनन केलेले असेल, ते अनुभवाच्या कसोटीवर पारखून घ्यावे. साक्षात अनुभव घेऊन त्यासंबंधी निश्चय करावा. (१४)

वैद्याची प्रचित येना । वेथा परतीं होयेना ।
आणी रागेजावें जना । कोण्या हिशेबें ॥ १५ ॥

वैद्याने औषध दिले, पण त्याची प्रचीती येत नसेल आणि व्यथा दूर होत नसेल, तर त्या रोग्याने इतर लोकांवर राग काढावा हा कुठला हिशोब? (१५)

खोटें कोठेंचि चालेना । खोटें कोणास मानेना ।
याकारणें अनुमाना । खरें आणावें ॥ १६ ॥

खोटे कोठेच चालत नाही. खोटे कुणालाही मान्य होत नाही. म्हणून अनुमान अनुभवास आणावे. तरच ते खरे म्हणावे. (१६)

लिहिणें न येतां व्यापार केला । कांहीं येक दिवस चालिला ।
पुसता सुरनीस भेटला । तेव्हां खोटें ॥ १७ ॥

एखाद्या माणसाला लिहिणे-वाचणे येत नसता व्यापार केला. तो काही दिवस चालला. पुढे त्यास हिशेबतपासनीस भेटला आणि त्याने चौकशी केली, तेव्हा व्यापार खोटा आहे हे कळले. (१७)

सर्व आवघें हिशेबीं ठावें । प्रत्यय साक्षीनें बोलावें ।
मग सुरनीसें काये करावें । सांगाना कां ॥ १८ ॥

हिशोब पाहिला की व्यापाराबद्दल खरे-खोटे सर्व काही कळून येते. त्यावरून वक्त्याने बोध घ्यावा आणि अनुभवावरून त्याच्या साक्षीने आपले म्हणणे मांडावे. हिशोब जर नीट ठेवलेले नसतील तर हिशेबतपासनीस तरी काय करू शकतो? सांगा ना! (१८)

स्वयें आपणचि गुंते । समजावीस कैसी होते ।
नेणतां कोणीयेक ते । आपदों लागती ॥ १९ ॥

आपल्या स्वत:लाच जर विषय समजलेला नसेल, स्वत:चाच जर गोंधळ होत असेल, तर तो श्रोत्यांना काय समजावू शकणार? असे जे नेणते वक्ते असतात, ते कष्टी होतात. (१९)

बळेंविण युध्यास गेला । तो सर्वस्वें नागवला ।
शब्द ठेवावा कोणाला । कोण कैसा ॥ २० ॥

ज्याच्या ठिकाणी पराक्रम नाही, तो युद्धासाठी गेला, तर सर्वस्वी नागवला जातो. मग लोकांना दोष कोणी आणि कसा द्यावा? (२०)

जें प्रचीतीस आलें खरें । तेंचि घ्यावें अत्यादरें ।
अनुभवेंविण जें उत्तरें । तें फलकटें जाणावीं ॥ २१ ॥

जे आपल्या प्रचीतीला खरे म्हणून ठरते, त्याचा आदराने स्वीकार करावा. अनुभवाशिवायच जे बोलणे, ते फोलपटाप्रमाणे त्याज्य समजावे. (२१)

सिकऊं जातां राग चढे । परंतु पुढें आदळ घडे ।
खोटा निश्चय तात्काळ उडे । लोकामधें ॥ २२ ॥

अशी बिनबुडाची वचने बोलणाऱ्यांना शिकवायला जावे, तर त्यांना राग येतो. परंतु पुढे मात्र त्यांना अद्दल घडते. लोकांमध्ये खोट्या गोष्टी खऱ्या म्हणून कितीही निश्चयपूर्वक मांडल्या, तरी त्या टिकू शकत नाहीत. (२२)

खरें सांडुनी खोटें घेणें । भकाधेस काये उणें ।
त्रिभुवनीं नारायणें । न्याय केला ॥ २३ ॥

जो खरे सोडून खोटे घेतो, त्याच्या फजितीस काय उणे? त्रिभुवनात नारायणानेच हा न्याय केला आहे की, खोटे कधी टिकून राहत नाही. (२३)

तो न्याय सांडिता सेवटीं । अवघें जगचि लागे पाठीं ।
जनीं भांडभांडों हिंपुटी । किती व्हावें ॥ २४ ॥

तो न्याय जाणून घेतला नाही आणि खोटेच उचलून धरले तर शेवटी सर्व लोक त्याच्या पाठीस लागतात आणि लोकांशी भांडता भांडता तो अगदी बेजार होतो. (२४)

अन्यायें बहुतांस पुरवलें। हें देखिलें ना ऐकिलें।
वेडें उगेंचि भरीं भरलें। असत्याचे ॥ २५ ॥

अन्यायाने कुणाचे भले झाले आहे, असे कधी पाहिलेही नाही वा ऐकलेलेही नाही. पण वेडे लोक उगीचच असत्याच्या भरीस लागतात. (२५)

असत्य म्हणिजे तेंचि पाप। सत्य जाणावें स्वरूप।
दोहींमधें साक्षप। कोणाचा करावा ॥ २६ ॥

असत्य हेच पाप होय आणि सत्य हेच स्वस्वरूप जाणावे. या दोन्हीमध्ये कोणाचा साक्षेप करावा? (२६)

मायेमधें बोलणें चालणें साचें। माया नस्तां बोलणें कैंचें।
याकारणें निशब्दाचें। मूळ शोधावें ॥ २७ ॥

आपले बोलणे-चालणे हे सर्व मायेमध्ये खरे असते म्हणजे याला केवळ व्यावहारिक सत्ता आहे. मायाच नाहीशी झाली की बोलणे- चालणे कुठले? पारमार्थिकदृष्ट्या विचार केला की जग झालेलेच नाही हे पारमार्थिक सत्य आहे. मग जे झालेलेच नाही, त्यातील व्यवहार तरी सत्य कसा असणार? म्हणून नि:शब्दाचे म्हणजे शब्दातीत अशा परब्रह्माचे मूळ शोधावे. (२७)

वाच्यांश जाणोनी सांडावा। लक्ष्यांश विवरोन घ्यावा।
याकारणें निशब्द मुळचा गोवा। आडळेना ॥ २८ ॥

अध्यात्मनिरूपणातील वाच्यांश जाणून घ्यावा व मग त्याचा त्याग करावा. लक्ष्यांशाचे विवरण करून तो घ्यावा. म्हणजे मग नि:शब्द जे मूळ परब्रह्म, त्याविषयी काही घोटाळा उरत नाही. (२८)

अष्टधा प्रकृती पूर्वपक्ष। सांडून अलक्षीं लावावें लक्ष।
मननसीळ परम दक्ष। तोचि जाणे ॥ २९ ॥

अष्टधा प्रकृती पूर्वपक्ष म्हणजे लटकी किंवा मिथ्या समजून तिचा निरास करावा आणि अलक्ष जे परब्रह्म त्याच्याकडे लक्ष लावावे. अशा रीतीने जो अत्यंत सावधपणे मनन करतो, तोच स्वानुभवाने त्या परब्रह्मास जाणतो. (२९)

नाना भूस आणि कण। येकचि म्हणणें अप्रमाण।
रसे चोवडिया कोण। शाहाणा सेवी ॥ ३० ॥

अनेक प्रकारचे भूस आणि धान्याचे कण एकच होत हे म्हणणे अप्रमाण आहे. रस सोडून चोयट्या कोणता शहाणा सेवन करील? (३०)

पिंडीं नित्यानित्यविवेक। ब्रह्मांडीं सारासार अनेक।
सकळ शोधूनियां येक। सार घ्यावें ॥ ३१ ॥

माणसाने नित्यानित्यविवेकाने पिंडाचा निरास करावा आणि नाना प्रकारे सारासारविवेक करून ब्रह्मांडाचा निरास करावा. सर्व गोष्टींचा शोध घेऊन एकच सार जे परब्रह्म ते घ्यावे. (३१)

मायेकरितां कोणीयेक। अन्वय आणि वीतरेक।
ते माया नस्तां विवेक। कैसा करावा ॥ ३२ ॥

माया आहे म्हणून अन्वय म्हणजे उभारणी आणि व्यतिरेक म्हणजे संहारणी अशा प्रकारे दोहोंचा विचार करावा लागतो. जेथे मायाच नाहीशी होते तेथे अन्वय-व्यतिरेकाच्या विवेकाचे प्रयोजनच उरत नाही. मायाच नाहीशी होऊन जीवब्रह्मैक्य झाल्यावर विचार करणाराच कुणी राहत नाही. तर विवेक कसा राहणार? (३२)

तत्वें तत्त्व सर्व शोधावें। माहांवाकीं प्रवेशावें।
आत्मनिवेदनें पावावें। समाधान ॥ ३३ ॥

एका तत्त्वाने दुसऱ्या तत्त्वाचा निरास करीत सर्व तत्त्वांचा शोध घ्यावा आणि महावाक्यात प्रवेश करावा म्हणजे 'अहं ब्रह्मास्मि' चे निरंतर अनुसंधान करावे आणि शेवटी अनन्य आत्मनिवेदनाने परब्रह्माशी ऐक्य पावून शाश्वत समाधान प्राप्त करावे. (३३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'करंटपरीक्षानिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.

❑ ❑

## दशक १८ : समास ६

### उत्तमपुरुषनिरूपण

॥ श्रीराम ॥

(अफझलखानाच्या वधानंतर श्री शिवाजीराजे श्री समर्थांच्या दर्शनास आले असता हा समास सांगितला.)

**नाना वस्त्रें नाना भूषणें। येणें शरीर शृंघारणें।**
**विवेकें विचारें राजकारणें। अंतर शृंघारिजे ॥ १॥**

श्रीसमर्थ म्हणतात की, अनेक प्रकारची वस्त्रे, नाना आभूषणे यांनी माणूस शरीर शृंगारतो. तसेच विवेकाने, विचाराने आणि राजकारणाने त्याने आपले अंतरंगही शृंगारले पाहिजे. (१)

**शरीर सुंदर सतेज। वस्त्रें भूषणें केलें सज्ज।**
**अंतरीं नस्तां च्यातुर्यबीज। कदापी शोभा न पवे॥ २॥**

एखाद्याचे शरीर सुंदर, सतेज असेल, ते वस्त्रे, आभूषणे यांनी सजविलेलेही असेल, पण त्याच्या अंतरात चातुर्याचा लेशही नसेल, तर ते शोभून दिसत नाही. (२)

**तुंड हेंकाड कठोरवचनी। अखंड तोले साभिमानी।**
**न्याय नीति अंत:कर्णी। घेणार नाहीं ॥ ३॥**

तोंडाळ, हेकेखोर आणि कठोर शब्द बोलणारा माणूस अखंड अभिमानाने, गर्वाने जणू डोलत असतो. त्याच्या अंत:करणात न्याय, नीती यांना प्रवेश नसतो. (३)

**तऱ्हे सीघ्रकोपी सदा। कदापि न धरी मर्यादा।**
**राजकारण संवादा। मिळोंचि नेणे ॥ ४॥**

तऱ्हेवाईक, सदा शीघ्रकोपी माणूस कुणाचीही मर्यादा ठेवत नाही. राजकारणात तो संवाद जोडूच देत नाही. कुणाशी जुळवून घेतच नाही. (४)

**ऐसे लौंद बेइमानी। कदापि सत्य नाहीं वचनीं।**
**पापी अपस्मार जनीं। राक्षेस जाणावे ॥ ५॥**

असे दुष्ट, बेइमान लोक कधीही खरे बोलत नाहीत. असे पापी आणि पिशाच्चवत दुष्ट म्हणजे भूतलावरील राक्षस जाणावेत. (५)

**समयासारिखा समयो येना। नेम सहसा चालेना।**
**नेम धरितां राजकारणा। अंतर पडे ॥ ६॥**

एका प्रसंगासारखा दुसरा प्रसंग येत नसतो, म्हणून कधी कधी एकच नियम लागू पडत नाही. एकाच नियमाचा हट्ट धरला तर राजकारणात अंतर पडते. (६)

**अति सर्वत्र वर्जावें। प्रसंग पाहोन चालावें।**
**हटनिग्रहीं न पडावें। विवेकी पुरुषें ॥ ७॥**

म्हणून सर्वत्र अति वर्ज्य मानावे. जसा प्रसंग असेल त्याला अनुसरून योग्य त्याप्रमाणे वागावे. विवेकी पुरुषाने कुठल्याही गोष्टीचा हट्ट धरू नये. (७)

**बहुतचि करितां हट। तेथें येऊन पडिले तट।**
**कोणीयेकाचा सेवट। जाला पाहिजे ॥ ८॥**

एखाद्या गोष्टीविषयी फार हट्ट, दुराग्रह धरला तर आपसात फूट पडते. वेगवेगळे पक्ष निर्माण होतात. त्यांतील कोणता तरी एकच निर्णायक होणे आवश्यक असते. (८)

**बरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजाभोवानी।**
**परंतु विचार पाहोनी। कार्ये करणें ॥ ९॥**

एक गोष्ट बरी आहे की ईश्वराची आपल्यावर कृपा आहे, तो आपला कैवारी आहे. शिवाय तुळजाभवानीची आपल्यावर विशेष कृपा आहे, पण तरीही आपण विचारपूर्वक कार्य करणे आवश्यक आहे. (९)

**अखंडचि सावधाना। बहुत काये करावी सूचना।**
**परंतु कांहीं येक अनुमाना। आणिलें पाहिजे ॥ १०॥**

जो अखंडच सावधान असतो, त्याला विशेष सूचना देण्याची, आवश्यकता नसते. परंतु तरीही काही गोष्टीची कल्पना करून त्याप्रमाणे वागणे आवश्यक असते. (१०)

**समर्थापासीं बहुत जन। राहिला पाहिजे साभिमान।**
**निश्चळ करूनियां मन। लोक असती ॥ ११॥**

सामर्थ्यसंपन्न पुरुषाजवळ अनेक लोक गोळा होतात. त्यांचा अभिमान राखला पाहिजे, म्हणजे न डळमळणाऱ्या निष्ठेने ते बरोबर राहातात. (११)

**म्लेच दुर्जन उदंड। बहुतां दिसाचें माजलें बंड।**
**याकारणें अखंड। सावधान असावें ॥ १२॥**

दुर्जन, म्लेंच्छ उदंड झाले आहेत आणि दीर्घकाळ त्यांनी बंड माजवले आहे. म्हणून अखंड सावधान राहणे आवश्यक आहे. (१२)

सकळकर्ता तो ईश्वरु। तेणें केला आंगिकारु।
तया पुरुषाचा विचारु। विरुळा जाणे ॥ १३॥

सर्व गोष्टींचा खरा कर्ता ईश्वरच आहे. त्याने ज्याचा अंगीकार केलेला असतो, त्याने ज्याला आपला असे मानलेले असते, त्या पुरुषाची थोरवी क्वचित एखाद्यालाच कळते. (१३)

न्याय नीति विवेकविचार। नाना प्रसंगप्रकार।
परिक्षिणें परांतर। देणें ईश्वराचें ॥ १४॥

अशा पुरुषाच्या ठिकाणी न्याय, नीती, विवेक, विचार, नाना प्रकारचे प्रसंगावधान आणि लोकांच्या अंतरंगाची अचूक परीक्षा असे गुण असतात. ही ईश्वराची देणगी असते. (१४)

माहायेत्न सावधपणें। समईं धारिष्ट धरणें।
अद्भुतचि कार्य करणें। देणें ईश्वराचें ॥ १५॥

असा पुरुष सावधपणे महान प्रयत्न करीत असतो, कठीण प्रसंगीही त्याचे धैर्य टिकून राहते आणि त्याच्या हातून अद्‌भुतच कार्ये घडतात. हे सर्व ईश्वराच्या कृपेने होत असते. (१५)

येश कीर्ती प्रताप महिमा। उत्तम गुणासी नाहीं सीमा।
नाहीं दुसरी उपमा। देणें ईश्वराचें ॥ १६॥

त्याचे यश, त्याची कीर्ती, त्याचा प्रताप आणि महिमा आणि उत्तम गुण यांना सीमा नसते. त्याला द्यावयास दुसरी उपमा नसते. हे सर्व ईश्वराचे देणे असते. (१६)

देव ब्राह्मण आचारविचार। कितेक जनासी आधार।
सदा घडे परोपकार। देणें ईश्वराचें ॥ १७॥

असा पुरुष देव आणि ब्राह्मण यांचा आदर करतो. आचार, विचार संभाळतो. त्याचा कित्येक लोकांना मोठा आधार असतो. त्याच्या हातून सदैव परोपकार घडत असतो. ही सर्व ईश्वराची कृपा होय. (१७)

येहलोक परलोक पाहाणें। अखंड सावधपणें राहाणें।
बहुत जनाचें साहाणें। देणें ईश्वराचें ॥ १८॥

इहलोक आणि परलोक दोन्हींचा विचार असा पुरुष करतो. तो अखंड सावधपणे राहतो आणि अनेक लोकांचे वागणे, बोलणे सहन करीत असतो. ही ईश्वराची देणगी होय. (१८)

देवाचा कैपक्ष घेणें। ब्राह्मणाची चिंता वाहाणें।
बहु जनासी पाळणें। देणें ईश्वराचें ॥ १९॥

असा पुरुष देवांचा कैवार घेतो. ब्राह्मणांची चिंता वाहतो आणि अनेक लोकांचे पालन-पोषण करतो. कारण तो ईश्वराच्या कृपेस पात्र झालेला असतो. (१९)

धर्मस्थापनेचे नर। ते ईश्वराचे अवतार।
जाले आहेत पुढें होणार। देणें ईश्वराचें ॥ २०॥

असे धर्माची स्थापना करणारे पुण्यपुरुष हे ईश्वराचेच अवतार असतात. आतापर्यंत असे अवतार झालेले आहेत. सांप्रतही आहेत आणि पुढेही होतच राहतील. असे पुरुष उत्पन्न होणे हे ईश्वराचेच देणे आहे. (२०)

उत्तम गुणाचा ग्राहिक। तर्क तीक्षण विवेक।
धर्मवासना पुण्यश्लोक। देणें ईश्वराचें ॥ २१॥

जो पुरुष उत्तम गुणांचा चाहता असतो, जो तर्कनिष्ठ आणि कुशाग्र बुद्धीचा विवेकी असतो आणि ज्याला धर्माविषयी आवड असून जो पुण्यश्लोक असतो, त्याच्यावर ईश्वराची पूर्ण कृपा आहे, असे समजावे. (२१)

सकळ गुणामधें सार। तजविजा विवेक विचार।
जेणें पाविजे पैलपार। अरत्रपरत्रींचा ॥२२॥

ज्या विवेकामुळे आणि विचारपूर्वक आखलेल्या योजनांमुळे इहलोक आणि परलोक दोन्हीतून उत्तम प्रकारे पैलपार होता येते, तो विवेक आणि ते नियोजन जवळ असणे हे सर्व गुणांचे सार आहे. (२२)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उत्तमपुरुषनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक १८ : समास ७
## जनस्वभावनिरूपण

॥ श्रीराम ॥

**जनाचा लालची स्वभाव। आरंभींच म्हणती देव।**
**म्हणिजे मला कांहीं देव। ऐसी वासना ॥ १ ॥**

लोकांचा स्वभावच फार लोभी आणि स्वार्थी असतो. आरंभीच 'देव' असा शब्द उच्चारतात, तेव्हाच 'मला काही देव (द्यावे)' अशीच वासना त्यांच्या मनात असते. (१)

**कांहींच भक्ती केली नस्तां। आणी इछिती प्रसन्नता।**
**जैसें कांहींच सेवा न करितां। स्वामीस मागती ॥ २ ॥**

ते काहीच भक्ती करीत नाहीत आणि त्यांना देवाची प्रसन्नता मात्र हवी असते. जसे एखाद्या नोकराने काहीच सेवा न करता मालकाकडे पगार मागावा, तसे त्यांचे वागणे असते. (२)

**कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं।**
**केल्याविण होत नाहीं। साध्य जनीं ॥ ३ ॥**

जगात कष्ट केल्याशिवाय फळ कधी मिळत नाही. कष्ट केल्याशिवाय राज्यही मिळत नाही. कष्ट केल्याशिवाय जगात कुठलेही कार्य सिद्ध होत नाही. (३)

**आळसें काम नासतें। हें तों प्रत्ययास येतें।**
**कष्टाकडे चुकावितें। हीन जन ॥ ४ ॥**

आळसाने कार्याचा नाश होतो ही गोष्ट तर प्रत्यक्ष अनुभवाला येते. आणि तरी हीन माणसाची कष्ट चुकविण्याकडे प्रवृत्ती असते. (४)

**आधीं कष्टाचे दुःख सोसिती। ते पुढें सुखाचें फळ भोगिती।**
**आधीं आळसें सुखावती। त्यासीं पुढें दुःख ॥ ५ ॥**

जे आधी कष्टाचे दुःख सोसतात, ते पुढे सुखरूपी फळ भोगतात. जे आधी आळसाचे सुख भोगतात, ते पुढे दुःखी होतात. (५)

**येहलोक अथवा परलोक। दोहिंकडे सारिखाचि विवेक।**
**दीर्घ सूचनेचें कौतुक। कळलें पाहिजे ॥ ६ ॥**

इहलोक आणि परलोक दोन्हीकडे हा विचार सारखाच लागू पडतो म्हणून दूरदृष्टीचे महत्त्व जाणून घेतले पाहिजे. (६)

**मेळविती तितुकें भक्षिती। ते कठीण काळीं मरोन जाती।**
**दीर्घ सूचनेनें वर्तती। तेचि भले ॥ ७ ॥**

जे लोक जितके मिळवतात ते सर्व खर्च करून टाकतात. ते कठीण काळ ओढवला असता मरून जातात. जे लोक दूरदृष्टीने वागतात, तेच भले होत. (७)

**येहलोकींचा संचितार्थ। परलोकींचा परमार्थ।**
**संचितेंविण वेर्थ। जीत मेलें ॥ ८ ॥**

इहलोकातील धनधान्याचा संग्रह आणि परलोकीचा पुण्याईचा संग्रह ज्यांच्याजवळ नसतो, ते जिवंत असूनही मेल्यासारखेच होत. (८)

**येकदां मेल्यानें सुटेना। पुन्हा जन्मोजन्मीं यातना।**
**आपणास मारी वांचविना। तो आत्महत्यारा ॥ ९ ॥**

आणि एकदा मेल्यानेही सुटका होत नाही. पुन्हा पुन्हा जन्मास येऊन यातना भोगाव्या लागतात. याप्रमाणे जो स्वतः आपले नुकसान करून घेतो, स्वतःच स्वतःस न वाचवता उलट मारतो तो आत्महत्यारा जाणावा. (९)

**प्रतिजन्मीं आत्मघात। कोणें करावें गणीत।**
**याकारणें जन्ममृत्य। कैंवी चुके ॥ १० ॥**

याप्रमाणे जो प्रत्येक जन्मात आत्मघात करून घेतो, त्याच्या जन्ममरणाचे गणित कोण करणार? म्हणून माणसाने जन्ममृत्यू कसा चुकेल, याबद्दल विचार करावा. (१०)

**देव सकळ कांहीं करितो। ऐसें प्राणिमात्र बोलतो।**
**त्याचे भेटीचा लाभ तो। अकस्मात जाला ॥ ११ ॥**

सर्व प्राणिमात्र असे म्हणतात की, देवच सर्व काही करतो. पण त्याच्या भेटीचा लाभ होण्याची संधी अकस्मात प्राप्त झाली आहे. (म्हणजे मनुष्यदेह लाभला आहे.) (११)

**विवेकाचा लाभ घडे। जेणें परमात्मा ठाईं पडे।**
**विवेक पाहातां सांपडे। विवेकी जनीं ॥ १२ ॥**

नरदेहात विवेकाचा लाभ झाला तर तत्काळ परमात्म्याची प्राप्ती होते. आणि विवेकी लोकांची संगत लाभली तर विवेकाची प्राप्ती होते. (१२)

देव पाहातां आहे येक। परंतु करितो अनेक।
त्या अनेकास येक। म्हणों नये कीं ॥१३॥

वास्तविक देव एकच आहे, पण लोक अनेक देव मानतात. त्या अनेकांना एक म्हणू नये. (१३)

देवाचें कर्तुत्व आणि देव। कळला पाहिजे अभिप्राव।
कळल्याविण कितेकजीव। उगेच बोलती ॥१४॥

देवाचे कर्तृत्व आणि देव याचा अभिप्राय कळला पाहिजे. तसा तो कळला नसताना कित्येक जण उगीचच बोलत असतात. (१४)

उगेच बोलती मूर्खपणें। शाहाणपण वाढायाकारणें।
त्रुप्तिलागीं उपाव करणें। ऐसें जालें ॥१५॥

आपला शहाणपणा दाखविण्यासाठी काही लोक उगीच देवासंबंधी, त्याच्या कर्तृत्वासंबंधी मूर्खपणाने बोलतात. पण तृप्तीसाठी उपाय केले पाहिजेतच. (१५)

जेहीं उदंड कष्ट केले। ते भाग्य भोगून ठेले।
येर ते बोलतचि राहिले। करंटे जन ॥१६॥

ज्यांनी उदंड कष्ट केले त्यांना भाग्याने भोगांची प्राप्ती झाली. इतर जे काही न करता उगीच नुसते बोलतच राहतात ते अभागी असतात. (१६)

करंट्याचें करंट लक्षण। समजोन जाती विचक्षण।
भल्याचे उत्तम लक्षण। करंट्यास कळेना ॥१७॥

विचक्षण म्हणजे विवेकसंपन्न लोक असतात ते करंट्या माणसाचे करंट लक्षण समजून जातात. पण भल्या माणसाचे उत्तम लक्षण करंट्या माणसाला कळत नाही. (१७)

त्याची पैसावली कुबुद्धी। तेथें कैंची असेल शुद्धी।
कुबुद्धीं तेचि सुबुद्धी। ऐसी वाटे ॥१८॥

त्याची कुबुद्धी वाढल्याने त्याला शुद्धी म्हणजे भानच नसते. त्यामुळे कुबुद्धीच त्याला सुबुद्धीसारखी वाटते. (१८)

मनुष्यशुद्धीस सांडावें। त्याचें काये खरें मानावें।
जेथें विचाराच्या नांवें। सुन्याकार ॥१९॥

ज्याची मनुष्यत्वाची जाणीवच नाहीशी झाली आहे, त्याचे बोलणे खरे कसे मानावे? त्याच्या ठिकाणी विचाराच्या नावाने शून्याकार झालेला असतो. (१९)

विचारें येहलोक परलोक। विचारें होतसे सार्थक।
विचारें नित्यानित्यविवेक। पाहिला पाहिजे ॥२०॥

विचारामुळेच इहलोकी, परलोकी कल्याण होते. विचारानेच मनुष्यजन्माचे सार्थक होते. म्हणून माणसाने विचारपूर्वक नित्यानित्यविवेक केला पाहिजे. (२०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'जनस्वभावनिरूपणनाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक १८ : समास ८
## अंतर्देवनिरूपण

॥ श्रीराम ॥

ब्रह्म निराकार निश्चळ। आत्म्यास विकार चंचळ।
तयास म्हणती सकळ। देव ऐसें ॥१॥

ब्रह्म हे निराकार आणि निश्चळ आहे. अंतरात्मा हा चंचळ आणि विकारी आहे. त्यालाच सर्व देव असे म्हणतात. (१)

देवाचा ठावचि लागेना। येक देव नेमस्त कळेना।
बहुत देवीं अनुमानेना। येक देव ॥२॥

देवाचा थांगपत्ताच लागत नाही. एक देव कोणता हे निश्चयपूर्वक कळत नाही. अनेक देवांमध्ये खरा एक देव कोणता, याची कल्पना येत नाही. (२)

म्हणोनी विचार असावा। विचारें देव शोधावा।
बहुत देवांचा गोवा। पडोंचि नये ॥३॥

म्हणून माणसाच्या ठिकाणी विचार असावा. त्याने विचारपूर्वक देवाचा शोध घ्यावा. अनेक देवांच्या गोंधळात पडूच नये. (३)

देव क्षत्रीं पाहिला। त्यासारिखा धातूचा केला।
पृथ्वीमधें दंडक चालिला। येणें रीती ॥४॥

क्षेत्राच्या ठिकाणी देव पाहिला आणि तसाच धातूचा देव केला. याप्रमाणे जगामध्ये रूढी पडली आहे. (४)

नाना प्रतिमादेवांचे मूळ। तो हा क्षत्रदेवचि केवळ।
नाना क्षत्रें भूमंडळ। शोधून पाहावें ॥५॥

नाना प्रतिमारूपी देवांचे मूळ तीर्थक्षेत्रातील देवच असतात. जगात अनेक तीर्थक्षेत्रे आहेत. तेथे शोध घेऊन पाहावा. (५)

क्षत्रदेव पाषाणाचा। विचार पाहातां तयाचा।
तंत लागला मुळाचा। अवताराकडे ॥ ६॥

क्षेत्रातील देव पाषाणाचा असतो. त्याच्यासंबंधी विचार केला की त्याच्या मुळाचा तंतू अवताराकडे आहे, असे दिसून येते. (६)

अवतारी देव संपले। देहे धरुनी वर्तोन गेले।
त्याहून थोर अनुमानले। ब्रह्मा विष्णु महेश ॥ ७॥

अवतारी देव आले, देह धरून त्यांनी कार्य केले आणि ते परत गेले. त्यांच्यापेक्षा ब्रह्मा, विष्णू आणि महेश हे थोर आहेत असे अनुमान केले. (७)

त्या तिहीं देवांस ज्याचीसत्ता। तो अंतरात्माचि पाहातां।
कर्ता भोक्ता तत्वतां। प्रतक्ष आहे ॥८॥

ह्या तिन्ही देवांच्या ठिकाणी ज्याची सत्ता आहे, तो अंतरात्मा हाच तत्त्वत: कर्ता, भोक्ता आहे, हे प्रत्यक्ष दिसून येते. (८)

युगानयुगें तिन्ही लोक। येकचि चालवी अनेक।
हा निश्चयाचा विवेक। वेदशास्त्रीं पाहावा ॥ ९॥

युगानुयुगे तिन्ही लोकांतील अनेक कार्ये तो एकटाच चालवतो असा निश्चयात्मक विवेक वेदांत आणि शास्त्रग्रंथात सांगितला आहे, तो पाहावा. (९)

आत्मा वर्तवितो शरीर। तोचि देव उत्तरोत्तर।
जाणीवरूपें कळिवर। विवेकें वर्तवी ॥ १०॥

अंतरात्माच शरीर चालवितो. तोच उत्तरोत्तर जीवात्मा, शिवात्मा, विश्वात्मा आणि निर्मळात्मा म्हणून ओळखला जातो. तोच जाणीवरूपाने विचारपूर्वक देह चालवतो. (१०)

तो अंतर्देव चुकती। धांवा घेऊन तीर्था जाती।
प्राणी बापुडे कष्टती। देवास नेणतां ॥ ११॥

माणसे त्या अंतर्देवास चुकतात आणि धावाधाव करून तीर्थक्षेत्रास जातात. खरा देव न कळल्याने प्राणी बापडे व्यर्थच कष्ट सोसतात. (११)

मग विचारिती अंत:कर्णीं। जेथें तेथें धोंडा पाणी।
उगेंचि वणवण हिंडोनि। काये होतें ॥ १२॥

अशा रीतीने कष्ट सोसल्यावर ते अंत:करणात विचार करतात की क्षेत्रांच्या ठिकाणी तर सर्वत्र धोंडा आणि पाणी आहे. उगीच वणवण हिंडून काय होणार आहे? (१२)

ऐसा ज्यासी विचार कळला। तेणें सत्संग धरिला।
सत्संगें देव सांपडला। बहुत जनांसी ॥ १३॥

ज्यांच्या मनात असा विचार येतो, ते सत्संग धरतात आणि सत्संगाच्या योगाने अनेक लोकांना देवाची प्राप्ती झाली. (१३)

ऐसीं हे विवेकाचीं कामे। विवेकी जाणतील नेमें।
अविवेकी भुल्ले भ्रमें। त्यांस हें कळेना ॥ १४॥

अशी ही विवेकाची कामे आहेत. ती विवेकी लोकच निश्चयपूर्वक जाणतील. अविवेकी लोक भ्रमाने भुललेले असतात. त्यांना हे कळत नाही. (१४)

अंतरवेधी अंतर जाणे। बाहेरमुद्रा कांहींच नेणे।
म्हणोन विवेकी शाहाणे। अंतर शोधिती ॥ १५॥

अंतरवेधी म्हणजे अंतर्मुखी अंतरात शोध घेणारा असतो. तो अंतरात असलेल्या अंतरात्म्यास जाणू शकतो. वेषधारी किंवा बहिर्मुख वृत्ती असणारा काहीच जाणत नाही. म्हणून जे शहाणे असतात, विवेकी असतात, ते अंतरात देवाचा शोध घेतात. (१५)

विवेकेंविण जो भाव। तो भावचि अभाव।
मूर्खस्य प्रतिमा देव। ऐसें वचन ॥ १६॥

विचाराशिवायचा भाव हा मुळी भावच नाही. म्हणूनच 'मूर्खाला प्रतिमा देव' असे वचन म्हटले जाते. (१६)

पाहात समजत सेवटा गेला। तोचि विवेकी भला।
तत्वें सांडुनी पावला। निरंजनीं ॥ १७॥

देवाचा शोध घेत घेत जो शेवटास जातो, तो विवेकी माणूसच उत्तम होय. तो तत्त्वाने तत्त्वाचे निरसन करीत निरंजन परब्रह्मास प्राप्त होतो. (१७)

आरे जें आकारासी येतें। तें अवघेंच नासोन जातें।
मग गल्बल्यावेगळें तें। परब्रह्म जाणावें ॥ १८॥

समर्थ म्हणतात की, अरे, जे जे आकाराला येते ते सर्व नाश पावते. म्हणून या मायेच्या गलबल्यावेगळे ते परब्रह्म होय, हे जाणून घ्यावे. (१८)

चंचळ देव निश्चळ ब्रह्म। परब्रह्मीं नाहीं भ्रम।
प्रत्ययज्ञानें निभ्रम। होईजेतें ॥ १९ ॥

अंतरात्मा म्हणजेच देव हा चंचळ असतो, तर परब्रह्म हे निश्चळ असते. परब्रह्माच्या ठिकाणी भ्रम नसतो. म्हणून परब्रह्माशी स्वानुभवाने ऐक्य पावून भ्रमरहित व्हावे. (१९)

प्रचीतीविण जें केलें। तें तें अवघें वेर्थ गेलें।
प्राणी कष्टकष्टोंचि मेले। कर्मकचाटें ॥ २० ॥

अनुभवाशिवाय जे जे केले जाते, ते सर्व व्यर्थच जाते. कर्माच्या कचाट्यात सापडून कष्ट करून प्राणी शेवटी मरून जातो. (२०)

कर्मावेगळें न व्हावें। तरी देवास कासया भजावें।
विवेकी जाणती स्वभावें। मूर्ख नेणे ॥ २१ ॥

कर्मावेगळे व्हावयाचे नसेल, तर देवाचे भजन कशासाठी करावे? विवेकी पुरुष स्वाभाविकरीत्या हे जाणतात. मूर्ख लोक जाणत नाहीत. (२१)

कांहीं अनुमानलें विचारें। देव आहे जगदांतरें।
सगुणाकरितां निधारें। निर्गुण पाविजे ॥ २२ ॥

विचाराने काही अनुमान केले, तर देव सर्व जगाच्या अंतर्यामी भरून राहिला आहे हे कळते. त्या अंतरात्म्याला सगुणाला भजल्याने निश्चयाने निर्गुणाची प्राप्ती होते. (२२)

सगुण पाहातां मुळास गेला। सहजचि निर्गुण पावला।
संगत्यागें मोकळा जाला। वस्तुरूप ॥ २३ ॥

सगुणाचे निरंतर अनुसंधान केले तर मूळमायेच्या मुळास पोहोचता येते आणि तेथे वृत्तीचा लय झाला की अगदी सहज निर्गुण प्राप्त होते. त्याच्या संगाचाही त्याग घडला की, तो मुक्त होऊन वस्तुरूप होतो. (२३)

परमेश्वरीं अनुसंधान। लावितां होईजे पावन।
मुख्य ज्ञानेंचि विज्ञान। पाविजेतें ॥ २४ ॥

परमेश्वराच्या ठिकाणी अनुसंधान लावल्याने ज्ञान होते. ज्ञानाग्नीमुळे पापे भस्मसात होऊन साधक पावन होतो आणि मग ज्ञानाच्या योगेच विज्ञानाची प्राप्ती होते. (२४)

ऐसीं हे विवेकाचीं विवर्णे। पाहावीं सुचित अंतःकर्णे।
नित्यानित्यविवेक श्रवणें। जगदोधार ॥ २५ ॥

अंतःकरण एकाग्र करून नित्यानित्यविवेकाच्या श्रवणाने, विवेकाने याप्रकारे विवरण करावे, म्हणजे जगाचा उद्धार होतो. (२५)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'अंतर्देवनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक १८ : समास ९

## निद्रानिरूपण

॥ श्रीराम ॥

वंदूनिया आदिपुरुष। बोलों निद्रेचा विळास।
निद्रा आलियां सावकास। जाणार नाहीं ॥ १ ॥

आदिपुरुषास वंदन करून आता निद्रेच्या विलासाचे वर्णन करू. एकदा झोप आली की, मग ती आवरत नाही. (१)

निद्रेनें व्यापिली काया। आळस आंग मोडे जांभया।
तेणेंकरितां बैसावया। धीर नाहीं ॥ २ ॥

एकदा निद्रेने शरीराचा ताबा घेतला की आळस, सुस्ती येते, अंग मोडून येते, जांभया येऊ लागतात, बसवत नाही, अशी स्थिती होते. (२)

कडकडां जांभया येती। चटचटां चटक्या वाजती।
डकडकां डुकल्या देती। सावकास ॥ ३ ॥

कडकडा जांभया येऊ लागतात. चटचट चुटक्या वाजविल्या जातात. डकडका डुलक्या येऊ लागतात. (३)

येकाचे डोळे झांकती। येकाचे डोळे लागती।
येक ते वचकोन पाहाती। चहुंकडे ॥ ४ ॥

एखाद्याचे डोळे मिटतात, एखाद्याचे डोळे अर्धवट मिटतात, तर कोणी दचकून चहूकडे पाहू लागतो. (४)

येक उलथोन पडिले। तिहीं ब्रह्मविणे फोडिले।
हुडकाचे टुकडे जाले। सुधी नाहीं ॥ ५ ॥

एखादा कीर्तन ऐकायला आलेला श्रोता झोप अनावर झाल्यामुळे एकदम उताणा पडतो. तो बुवांच्या ब्रह्मवीणेवर पडल्यामुळे ब्रह्मवीणा फुटते किंवा वाद्याचे तुकडे होतात, तरी त्याला शुद्धी नसते. (५)

**येक टेंकोन बैसले। तेथेंचि घोरों लागले।**
**येक उताणें पसरले। सावकास ॥ ६ ॥**

एखादा टेकून बसलेला श्रोता तेथेच घोरायला लागतो. एखादा बसल्या जागीच सावकाश उताणा पसरतो. (६)

**कोणी मुर्कुंडी घालिती। कोणी कानवडे निजती।**
**कोणी चक्रीं फिरती। चहुंकडे ॥ ७ ॥**

कुणी मुरकुंडी घालून झोपतो, तर कुणी कुशीवर पाय पोटाशी घेऊन झोपतो, तर कुणी झोपेतच गोल गोल चहूकडे फिरतो, लोळतो. (७)

**येक हात हालविती। येक पाये हालविती।**
**येक दांत खाती। कर्कराटें ॥ ८ ॥**

कुणी झोपेत हात हलवतो, तर कुणी पाय हलवतो, तर कुणी करकरा दात खातो. (८)

**येकाचीं वस्त्रें निघोनि गेलीं। ते नागवींच लोळों लागलीं।**
**येकाचीं मुंडासीं गडबडिलीं। चहुंकडे ॥ ९ ॥**

कुणाच्या अंगावरचे कपडे जाग्यावर राहात नाहीत आणि तो नागवाच लोळू लागतो. एखाद्याचे डोक्याचे मुंडासे सगळीकडे पसरले जाते. (९)

**येक निजेलीं अव्यावेस्तें। येक दिसती जैसीं प्रेतें।**
**दांत पसरुनी जैसीं भूतें। वाईट दिसती ॥ १० ॥**

कुणी अस्ताव्यस्त झोपतात, तर काही जण प्रेतासारखे दिसतात. तर कुणी झोपेतच तोंड उघडे राहिल्याने दात विचकलेल्या भूतासारखे वाईट दिसतात. (१०)

**येक वोसणतचि उठिले। येक अंधारीं फिरों लागले।**
**येक जाऊन निजेले। उकरड्यावरी ॥ ११ ॥**

एखादा बडबडतच उठतो, तर एखादा झोपेत अंधारातच फिरू लागतो. एखादा कुणी उकिरड्यावर जाऊन झोपतो. (११)

**येक मडकी उतरिती। येक भोंई चांचपती।**
**येक उठोन वाटा लागती। भलतीकडे ॥ १२ ॥**

एखादा शिंकाळ्यावरची मडकी-गाडगी उतरवू लागतो, तर एखादा जमीन चाचपू लागतो, तर कुणी झोपेतच उठून रस्त्याने भलतीकडेच चालायला लागतो. (१२)

**येक प्राणी वोसणाती। येक फुंदफुंदों रडती।**
**येक खदखदां हांसती। सावकास ॥ १३ ॥**

कुणी एखादा उगीचच ओरडतो, तर दुसरा एखादा स्फुंदून स्फुंदून रडायला लागतो, तर कुणी हळूच खदखदा हसायलाच लागतो. (१३)

**येक हाका मारूं लागले। येक बोंबलित उठिले।**
**येक वचकोन राहिले। आपुले ठाईं ॥ १४ ॥**

कुणी हाका मारू लागतात, तर कुणी बोंबलत उठतात, तर कुणी जागच्या जागीच दचकतात. (१४)

**येक क्षणक्षणा खुरडती। येक डोई खाजविती।**
**येक कढों लागती। सावकास ॥ १५ ॥**

कुणी एखादा क्षणाक्षणाला खुरडतो, तर कुणी डोकेच खाजवतो, तर कुणी हळूहळू कण्हू लागतो. (१५)

**येकाच्या लाळा गळाल्या। येकाच्या पिका सांडल्या।**
**येकीं लघुशंका केल्या। सावकास ॥ १६ ॥**

कुणाच्या तोंडातून लाळ गळू लागते, तर कुणी थुंकी टाकतो, तर कुणी लघुशंकाही करतो. (१६)

**येक राउत सोडिती। येक कर्पट ढेंकर देती।**
**येक खांकरुनी थुंकिती। भलतीकडे ॥ १७ ॥**

कुणी झोपेत अपानवायू सोडतात, तर कुणी करपट ढेकर देतात, तर कुणी खाकरून भलतीकडेच थुंकतात. (१७)

**येक हागती येक वोकिती। येक खोंकिती येक सिंकिती।**
**येक ते पाणी मागती। निदसुऱ्या स्वरें ॥ १८ ॥**

कुणी हगतात, तर कुणी ओकतात, कुणी खोकतात तर कुणी शिंकतात, तर कुणी अर्धवट झोपेत पाणी प्यायला मागतात. (१८)

**येक दुस्वप्नें निर्बुजले। येक सुस्वप्नें संतोषले।**
**येक ते गाढमुढीं पडिले। सुषुप्तिमध्यें ॥ १९ ॥**

कुणाला दुःस्वप्न पडल्याने ते घाबरतात, तर कुणाला चांगले स्वप्न पडल्याने संतोष वाटतो, तर काही सुषुप्तीमध्ये गाढ झोपेत स्वस्थ पडतात. (१९)

**इकडे उजेडाया जालें। कोणीं पढणें आरंभिलें।**
**कोणीं प्रातस्मरामि मांडिलें। हरिकीर्तन ॥ २० ॥**

इकडे उजाडायला आले की माणसे जागी होतात. मग कुणी नित्यपाठ करायला आरंभ करतो, तर कोणी प्रातःस्मरामि म्हणून प्रातःस्मरण करू लागतो, तर कुणी हरिकीर्तन करू लागतो. (२०)

**कोणी आठविल्या ध्यानमूर्ति। कोणी येकांतीं जप करिती।**
**कोणी पाठांतर उजळिती। नाना प्रकारें ॥ २१ ॥**

कोणी मूर्तीचे ध्यान करू लागतात, तर कुणी एकांतात जप करू लागतात. तर कुणी अनेक प्रकारे पाठांतराची उजळणी करू लागतात. (२१)

नाना विद्या नाना कळा। आपलाल्या सिकती सकळा।
तानमानें गायेनकळा। येक गाती ॥ २२ ॥

आपापल्या आवडीप्रमाणे लोक नाना विद्या, नाना कला शिकायला आरंभ करतात, तर काही तानमान, गायनकला यांचे ज्ञान असणारे गाऊ लागतात. (२२)

मागें निद्रा संपली। पुढें जागृति प्राप्त जाली।
वेवसाईं बुद्धी आपुली। प्रेरिते जाले ॥ २३ ॥

रात्रीची झोप झाली आणि उजाडल्यावर जागृती प्राप्त झाली की प्रत्येकजण आपापल्या व्यवसायाकडे लक्ष देऊ लागतात. (२३)

ज्ञाता तत्वे सांडून पळाला। तुर्येपैलिकडे गेला।
आत्मनिवेदनें जाला। ब्रह्मरूप ॥ २४ ॥

जो ज्ञाता, ज्ञानी पुरुष असतो, तो या दृश्याचा, तत्त्वांचा निरास करून तुर्येपलीकडे जातो, म्हणजे साक्षित्वाची जाणीव सोडून, आत्मनिवेदन करून केवळ सत्स्वरूप, ब्रह्मरूप होतो. (२४)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'निद्रानिरूपणनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक १८ : समास १०

## श्रोताअवलक्षणनिरूपण

॥ श्रीराम ॥

कोणीयेका कार्याचा साक्षप। कांहीं तऱ्ही घडे विक्षेप।
काळ साहें तें आपेंआप। होत जातें ॥ १ ॥

आपण कुठल्याही एखाद्या कार्यासाठी प्रयत्न सुरू केला की, त्यात काही ना काही विघ्न उत्पन्न होते. काळ अनुकूल असेल तर कार्य आपोआप होत जाते. (१)

कार्यभाग होत चालिला। तेणें प्राणी शोक जाला।
विचारहि सुचों लागला। दिवसेंदिवस ॥ २ ॥

कार्यभाग होऊ लागला की, त्यामुळे माणूस उल्हसित होतो. त्याला हौस वाटू लागते आणि दिवसेंदिवस नवीन विचारही सुचू लागतात. (२)

कोणीयेक प्राणी जन्मासी येतो। कांहीं तऱ्ही काळ साहें होतो।
दुःखाउपरी सुख देतो। देव कृपाळुपणें ॥ ३ ॥

कोणीही माणूस जन्माला येतो, तेव्हा काही काळाने त्याला अनुकूलता लाभते, दुःख सोसल्यावर देव त्याला कृपाळूपणे सुख देता. (३)

अवघाचि काळ जरी सजे। तरी अवघेचि होती राजे।
कांहीं सजे कांहीं न सजे। ऐसें आहे ॥ ४ ॥

सर्वच काळ जर अनुकूल होईल, तर सर्वच राजे होतील. पण काही अनुकूल, काही प्रतिकूल असेच होत राहते. (४)

येहलोक अथवा परलोक। साधतां कोणीयेक विवेक।
अद्भुत होये स्वाभाविक। देणें ईश्वराचें ॥ ५ ॥

कुणी एखाद्याने विवेकाने जर इहलोक आणि परलोक साधला तर त्याच्या हातून ईश्वराच्या कृपेने स्वाभाविकच काही अद्भुत कार्य घडते. (५)

ऐकल्याविण कळलें। सिकविल्याविण शहाणपण आलें।
देखिलें ना ऐकिलें। भूमंडळीं ॥ ६ ॥

या जगात ऐकल्याशिवाय कळले आणि शिकविल्याशिवायच शहाणपण आले, असे कधी पाहिलेले वा ऐकलेले नाही. (६)

सकळ कांहीं ऐकतां कळे। कळतां कळतां वृत्ति निवळे।
नेमस्त मनामधें आकळे। सारासार ॥ ७ ॥

ऐकल्याने सर्व काही कळते, कळता कळता वृत्ती निवळते आणि सार काय आणि असार काय हे मनामध्ये निश्चितपणे कळते. (७)

श्रवण म्हणिजे ऐकावें। मनन म्हणिजे मनीं धरावें।
येणें उपायें स्वभावें। त्रयलोक्य चाले ॥ ८ ॥

श्रवण म्हणजे ऐकावे आणि मनन म्हणजे ते मनात उत्तम प्रकारे धारण करावे. याच प्रकारे त्रैलोक्यात स्वाभाविकरीत्या ज्ञानाची देवाणघेवाण होत असते. (८)

**श्रवणाआड विक्षेप येती। नाना जिनस सांगों किती।**
**सावध असतां प्रत्यय येती। सकळ कांहीं ॥ ९॥**

श्रवणाच्या आड नाना विक्षेप येतात. किती म्हणून सांगावेत? सावधपणे पाहिले असता, अनुभवाने सर्व काही कळते. (९)

**श्रवणीं लोक बैसले। बोलतां बोलतां येकाग्र जाले।**
**त्याउपरी जे नूतन आले। ते येकाग्र नव्हेती ॥ १०॥**

लोक श्रवणाला बसलेले असतात. वक्ता बोलत असतो. तो जसजसा बोलतो, तसे श्रोत्यांचे मनही एकाग्र होते. इतक्यात काही नवीन लोक ऐकायला येतात. त्यांच्या येण्यामुळे श्रोत्यांच्या श्रवणात विक्षेप येतो व मग त्यांचे मन एकाग्र होऊ शकत नाही. (१०)

**मनुष्य बाहेर हिंडोनी आलें। नाना प्रकारीचें ऐकिलें।**
**उदंड गलबलूं लागलें। उगें असेना ॥ ११॥**

मनुष्य बाहेरून हिंडून येतो. त्याने नाना प्रकारच्या गोष्टी ऐकलेल्या असतात. त्यामुळे त्याच्या मनात एकच गोंधळ माजतो व त्याला स्वस्थ बसवत नाही. (११)

**प्रसंग पाहोन चालती। ऐसे लोक थोडे असती।**
**श्रवणीं नाना विक्षेप होती। ते हे ऐका ॥ १२॥**

प्रसंग पाहून योग्य प्रकारे वर्तन करणारे लोक फार थोडे असतात. त्यामुळे श्रवणात नाना विक्षेप येतात. ते ऐका. (१२)

**श्रवणीं बैसले ऐकाया। अडों लागलीसें काया।**
**येती कडकडां जांभया। निद्राभरें ॥ १३॥**

ऐकायला म्हणून येऊन बसतात. पण काही लोकांचे अंग अवघडू लागते आणि झोपेच्या भराने कडाकड जांभया येऊ लागतात. (१३)

**बैसले सुचित करूनि मना। परी तें मनचि ऐकेना।**
**मागें होतें ऐकिलें नाना। तेंचि धरुनी बैसलें ॥ १४॥**

काही लोक मन एकाग्र करून श्रवण करायला येतात. पण त्यांचे मनच त्यांना आवरत नाही. पूर्वी जे काही ऐकलेले असते तेच मनात सारखे आठवू लागते. (१४)

**तत्पर केलें शरीर। परी मनामधें आणीक विचार।**
**कल्पना कल्पी तो विस्तार। किती म्हणोनी सांगावा॥ १५॥**

श्रवणास शरीर तत्पर केले, पण मनामध्ये आणखी दुसरेच विचार येतात आणि मन नाना कल्पना करू लागते. त्याचा विस्तार किती म्हणून सांगावा? (१५)

**जें जें कांहीं श्रवणीं पडिलें। तितुकें समजोन विवरलें।**
**तरीच कांहीं सार्थक जालें। निरूपणीं ॥ १६॥**

जे जे काही ऐकले असेल, तितके नीट समजून घेऊन त्याचे विवरण केले, मनन केले, तरच त्या निरूपणाने काही सार्थक होऊ शकते. (१६)

**मन दिसतें मां धरावें। ज्याचें त्यानें आवरावें।**
**आवरून विवेकें धरावें। अर्थांतरीं ॥ १७॥**

मन जर दिसले असते, तर त्याला धरून ठेवता आले असते. पण ते तर दिसत नाही, म्हणून ते ज्याचे त्यानेच आवरायला हवे आणि आवरून धरून विवेकाने अर्थावर मन एकाग्र करावे. (१७)

**निरूपणीं येऊन बैसला। परी तो उदंड जेऊन आला।**
**बैसतांच कासाविस जाला। त्रुषाक्रांत ॥ १८॥**

एखादा माणूस निरूपण श्रवण करायला येऊन बसतो, पण उदंड जेवून आल्याने बसल्याबरोबर तो तहानेने कासावीस होतो. (१८)

**आधीं उदक आणविलें। घळघळां उदंड घेतलें।**
**तेणें मळमळूं लागलें। उठोनी गेला ॥ १९॥**

मग आधी तो पाणी आणायला लावतो आणि ते गटागटा भरपूर पितो. त्यामुळे मग त्याला मळमळू लागते आणि तो उठून जातो. (१९)

**कर्पट ढेंकर उचक्या देती। वारा सरतां मोठी फजिती।**
**क्षणाक्षणा उठोनी जाती। लघुशंकेसी ॥ २०॥**

काही लोक करपट ढेकरा देतात, तर कुणाला उचक्या लागतात, तर कुणाचा वारा सरून त्याची मोठीच फजिती होते, तर काही लोक क्षणाक्षणाला लघुशंकेसाठी उठून जातात. (२०)

**दिशेनें कासावीस केला। आवघेंचि सांडून धांविला।**
**निरूपणप्रसंगीं निघोनी गेला। अखंड ऐसा ॥ २१॥**

काहींना वरचेवर शौचास जावे लागल्याने ते कासावीस होतात आणि सर्व सोडून धावत जातात. अशा प्रकारे निरूपणप्रसंगी सारखे त्याला निघून जावे लागते. (२१)

दृष्टांतीं कांहीं अपूर्व आलें। अंत:कर्ण तेथेंचि राहिलें।
कोठवरी काये वाचिलें। कांहीं कळेना ॥ २२॥

काही लोक श्रवण करीत असता वक्त्याने दृष्टांतात काही अपूर्व सांगितले, तर त्यांचे अंत:करण तेथेच अडकून पडते व पुढील वाचानाकडे त्यांचे दुर्लक्ष होते. (२२)

निरूपणीं येऊन बैसला। तो विंचुवें फणकाविला।
कैंचें निरूपण जाला। कासावीस ॥ २३॥

एखादा निरूपण श्रवण करायला येऊन बसतो आणि तेवढ्यात त्याला विंचू डंख करतो. त्यामुळे तो कासावीस होतो. मग तो कसले निरूपण ऐकणार? (२३)

पोटामधें तिडिक उठिली। पाठीमधें करक भरली।
चालक चिखल्या पुळीजाली। बैसवेना ॥ २४॥

कुणाच्या पोटात कळा येऊ लागतात, तर कुणाच्या पाठीत उसण भरते, तर कुणाला पायाचे सांधे धरणारा रोग असतो. तर आणखी कुणाला चिखल्या होतात, पुळ्या येतात. अशा विविध कारणामुळे त्यांना श्रवणाला बसवत नाही. (२४)

पिसोळा चाऊन पळाला। तेणें प्राणी दुश्चीत जाला।
कोणें नेटें गल्बला केला। तेथेंचि धांवें ॥२५॥

कधी पिसवा चावून पळतात, त्यामुळे माणूस अस्वस्थ होतो, तर बाहेर कुणी गलबला केला की तेथे एखादा धाव घेतो. (२५)

विषई लोक श्रवणीं येती। ते बायेकांकडेच पाहाती।
चोरटे लोक चोरूनजाती। पादरक्षा ॥ २६॥

विषयी लोक श्रवणाला आले की ते स्त्रियांकडेच पाहात बसतात. तर चोरटे लोक लोकांची पादत्राणे चोरून नेतात. (२६)

होये नव्हे वादवेवाद। तेणें उदंड जाला खेद।
सिव्या गाळी अप्रमाद। होतां चुकला ॥ २७॥

कधी कधी निरूपणात 'अस्ति आणि नास्ति' असा वादविवाद होऊन उदंड खेद होतो आणि कधी कधी शिवीगाळ, मारामारी इत्यादी गोंधळ होऊन श्रवण बाजूलाच राहाते. (२७)

कोणी निरूपणीं बैसती। सावकास गोष्टी लाविती।
हरिदास ते रें रेंकरिती। पोटासाठीं ॥ २८॥

कोणी निरूपणाला म्हणून येतात आणि सावकाश आपापसातच गोष्टी करीत बसतात आणि हरिदास पोटासाठी रें रें करीत रटाळपणे कथा करीत राहतो. (२८)

बहुत जाणते मिळाले। येकापुढें येक बोले।
लोकांचे आशये राहिले। कोण जाणे ॥ २९॥

एखाद्या वेळी अनेक विद्वान लोक श्रवणास येतात आणि एकापुढे एक स्वत:चेच मत सांगत राहतात. श्रोत्यांचे आशय कोणी जाणतच नाही. (२९)

माझें होये तुझें नव्हे। ऐसी अखंड जयास सवे।
न्याये नीति सांडून धांवे। अन्यायाकडे ॥ ३०॥

माझेच म्हणणे खरे, तुझे नव्हे; असे करायची अखंड सवय ज्यांना असते म्हणजे जे आपलेच म्हणणे खरे करू पाहतात, लोकांचे ऐकूनच घेत नाहीत, ते न्याय-नीतीचा विचार न करता अन्यायाकडे धावतात. (३०)

आपल्या थोरपणासाठीं। अच्यावाच्या तोंड पिटी।
न्याये नाहीं ते सेवटीं। परम अन्याई ॥ ३१॥

आपला थोरपणा सिद्ध करण्यासाठी ते अवाच्यासवा वाटेल तसे अनिर्बंधपणे बोलत सुटतात. त्यामुळे त्यांचे बोलणे न्यायाचे नसते. अखेर परम अन्यायच होतो. (३१)

येकेकडे अभिमान उठे। दुसरेकडे उदंड पेटे।
ऐसे श्रोते खरे खोटे। कोण जाणे ॥ ३२॥

एखादा गर्वाने बोलत सुटतो, तर दुसरा एखादा भयंकर संतापतो. अशा प्रकारच्या श्रोत्यांत कोण खरा आणि कोण खोटा हे कळत नाहीसे होते. (३२)

म्हणोन जाणते विचक्षण। ते आधींच धरिती नेणपण।
मूर्ख टोणपा आपण। कांहींच नाहीं ॥ ३३॥

म्हणून जाणते विचारवंत श्रोते असतात ते आधीच नेणतेपण धरतात. म्हणजे आपल्याला काही कळत नाही, आपण मूर्ख अडाणी असून आपण म्हणजे काहीच नाही, असे ते दाखवतात. (३३)

आपणाहून देव थोर। ऐसा जयास कळला विचार।
सकळ कांहीं जगदांतर। तेहिं राखावें ॥ ३४॥

आपल्यापेक्षा देव थोर आहे हे त्यांना स्वानुभवाने कळलेले असते आणि तो देवच जगात सर्वांच्या अंतर्यामी आहे हे ते जाणत असतात, म्हणून ते सर्वांचे अंत:करण सांभाळतात. कोणालाही दुखवत नाहीत. (३४)

**सभेमधें कळहो जाला। शब्द येतो जाणत्याला।**
**अंतरें राखों नाहीं सिकला। कैसा योगी ॥ ३५ ॥**

सभेमध्ये जर कलह झाला, तर त्याचा दोष जाणत्याकडे येतो. जो लोकांचे अंत:करण राखू शकत नाही, तो योगी म्हणवून घेण्यास पात्र नसतो. (३५)

**वैर करितां वैरचि वाढे। आपणास दुःख भोगणें घडे।**
**म्हणोनि शाहाण्याचे कुकडे। कळों आलें ॥ ३६ ॥**

वैर केल्याने वैरच वाढते आणि आपल्याला दु:ख भोगावे लागते. यावरून शहाण्या माणसाचे गूढ विचार कळून येतात. (३६)

**अखंड आपणा सांभाळिती। क्षुल्लकपण येऊं नेदिती।**
**थोर लोकांस क्ष्मा शांति। अगत्य करणें ॥ ३७ ॥**

आपला थोरपणा ते अखंड सांभाळतात. स्वत:कडे क्षुल्लकपणा येऊ देत नाहीत. थोर लोक असतात, त्यांच्या ठिकाणी क्षमा आणि शांती हे गुण अवश्य असतातच. (३७)

**अवगुणापासीं बैसला गुणी। आवगुण कळतो ततक्षणीं।**
**विवेकी पुरुषाची करणी। विवेकें होते ॥ ३८ ॥**

अवगुणी माणसाजवळ गुणी माणूस बसला की, तुलनेने त्वरित अवगुण स्पष्ट कळून येतो. विवेकी पुरुष नेहमीच विचाराने वागतो. (३८)

**उपाये परियाये दीर्घ प्रेत्न। विवेकबळें नाना येत्न।**
**करील तयाचें महिमान। तोचि जाणे ॥ ३९ ॥**

जो पुरुष उपाय, त्यांचे पर्याय म्हणजे इतर मार्ग आणि दीर्घ प्रयत्न तसेच विवेकाच्या बळावर अनेक प्रयत्न करणे जाणतो त्याची थोरवी लोकांना कळणे कठीण असते. ती ज्याची त्यालाच कळते. (३९)

**दुर्जनी वेवदरून घेतला। बाश्कळ लोकीं घसरिला।**
**विवेकापासून चेवला। विवेकी कैसा ॥ ४० ॥**

जो दुर्जनांनी वादविवादात बेजार केल्याने, मूर्ख लोकांनी डिचवल्यामुळे विवेकभ्रष्ट होतो, त्याला विवेकी कसे म्हणता येईल? (४०)

**न्याये परियाये उपाये। मूर्खास हें कळे काये।**
**मूर्खाकरितां चिवडा होये। मज्यालसीचा ॥ ४१ ॥**

न्याय म्हणजे काय, पर्याय म्हणजे काय, उपाय कुठला व कसा करावा हे मूर्खाला काय कळणार? मूर्खामुळे सभेचा विचका होतो. (४१)

**मग ते शाहाणे नीट करिती। स्वयें साहोन साहविती।**
**स्वयें करून करविती। लोकांकरवीं ॥ ४२ ॥**

असा प्रसंग आला की, शहाणे लोक स्वत: त्रास सोसून परत सर्व काही सुरळित करतात. ते स्वत: त्रास सोसतात आणि लोकांकडूनही सोसवितात. स्वत: सर्व कार्य सुरळितपणे करतात आणि लोकांकडूनही करवितात. (४२)

**पृथ्वीमधें उदंड जन। जनामधें असती सज्जन।**
**जयांकरितां समाधान। प्राणीमात्रांसी ॥ ४३ ॥**

पृथ्वीवर असंख्य लोक आहेत. त्यांमध्ये सज्जनही असतात. त्यांच्यामुळेच प्राणिमात्रांना समाधान लाभते. (४३)

**तो मनोगतांची आंगें जाणे। मान प्रसंग समये जाणे।**
**संतप्तालागीं निवऊं जाणे। नाना प्रकारें ॥ ४४ ॥**

सज्जन पुरुष लोकांचे अंत:करण बरोबर जाणतो. मान, प्रसंग, काळवेळ याचे त्याला अचूक ज्ञान असते आणि जे लोक संतप्त झालेले असतात, त्यांना नाना प्रकारे कसे निववावे, हेही तो जाणतो. (४४)

**ऐसा तो जाणता लोक। समर्थ तयाचा विवेक।**
**त्याचें करणें कांहीं येक। जनास कळेना ॥ ४५ ॥**

असा जो ज्ञानी पुरुष असतो, त्याचा विवेक सामर्थ्यसंपन्न असतो. त्याच्या वर्तनाचा लोकांना काहीच उलगडा होत नाही. (४५)

**बहुत जनास चालवी। नाना मंडळें हालवी।**
**ऐसी हे समर्थपदवी। विवेकें होते ॥ ४६ ॥**

अनेक लोकांना तो कामास लावतो. नाना लोकांचे समुदाय तो कार्यप्रवण करतो. ही समर्थ पदवी त्याला विवेकामुळे प्राप्त झालेली असते. (४६)

**विवेक एकांतीं करावा। जगदीश धारणेनें धरावा।**
**लोक आपला आणी परावा। म्हणोंचि नये ॥ ४७ ॥**

एकांतात बसून विवेक करावा. भगवंताला, जगदीशाला धारणेच्या बळावर अंत:करणात दृढ धरून ठेवावे लोकांमध्ये आपला आणि परका असे म्हणू नये. (४७)

येकांतीं विवेक ठाईं पडे। येकांती येत्न सांपडे।
येकांती तर्क वावडे। ब्रह्मांडगोळीं ॥ ४८ ॥

एकांतातच विवेक योग्य प्रकारे करता येतो. एकांतातच योग्य दिशेने प्रयत्न करण्यासंबंधी प्रेरणा मिळते. एकांतात आपण तर्काच्या बळावर सर्व ब्रह्मांडाच्या गोलकाचा वेध घेऊ शकतो. (४८)

येकांतीं स्मरण करावें। चुकलें निधान पडे ठावें।
अंतरात्म्यासरिसें फिरावें। कांहीं तरी ॥४९॥

एकांतात स्मरण करण्याने चुकलेले निधान म्हणजे ठेवा जी आत्मवस्तू तिची प्राप्ती होते. एकांतात ज्याप्रमाणे अंत:स्फूर्ती होईल, त्याप्रमाणे कार्य करावे. (४९)

जयास येकांत मानला। अवघ्या आधीं कळें त्याला।
त्यावेगळें वडिलपणाला। ठावचि नाहीं ॥ ५० ॥

ज्याला एकांत मानवतो, त्यालाच सर्वांच्या आधी ज्ञान होते. ज्याला मोठेपणा मिळवायचा असेल, त्याला एकांताशिवाय दुसरा पर्याय नाही. (५०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'श्रोताअवलक्षणनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक अठरावा समाप्त.**



# दशक एकोणिसावा : सिकवणनाम

## दशक १९ : समास १

### लेखनक्रियानिरूपण

॥ श्रीराम ॥

ब्राह्मणें बाळबोध अक्षर। घडसुनी करावें सुंदर।
जें देखतांचि चतुर। समाधान पावती ॥ १॥

वाटोळें सरळें मोकळें। वोतलें मसीचें काळें।
कुळकुळीत वळी चालिल्या ढाळें। मुक्तमाळा जैशा ॥ २॥

अक्षरमात्र तितुकें नीट। नेमस्त पैस काने नीट।
आडव्या मात्रा त्याहि नीट। आर्कुलीं वेलांड्या ॥ ३॥

पहिलें अक्षर जें काढिलें। ग्रंथ संपेतों पाहात गेलें।
येका टांकेंचि लिहिलें। ऐसें वाटे ॥ ४॥

अक्षराचें काळेपण। टांकांचें ठोसरपण।
तैसेंचि वळण वांकाण। सारिखेंचि ॥ ५॥

वोळीस वोळी लागेना। आर्कुली मात्रा भेदीना।
खालीले वोळीस स्पर्शेना। अथवा लंबाक्षर ॥ ६॥

पान शिषानें रेखाटावें। त्यावरी नेमकचि ल्याहावें।
दुरी जवळी न व्हावें। अंतर वोळीचें ॥ ७॥

कोठें शोधासी आडेना। चुकी पाहातां सांपडेना।
गरज केली हें घडेना। लेखकापासुनी ॥ ८॥

ज्याचें वय आहे नूतन। त्यानें ल्याहावें जपोन।
जनासी पडे मोहन। ऐसें करावें ॥ ९॥

बहु बारिक तरुणपणीं। कामा नये म्हातारपणीं।
मध्यस्त लिहिण्याची करणी। केली पाहिजे ॥ १०॥

भोंवतें स्थळ सोडून द्यावें। मधेंचि चमचमित ल्याहावें।
कागद झडतांहि झडावें। नलगेचि अक्षर ॥ ११॥

ऐसा ग्रंथ जपोनि ल्याहावा। प्राणीमात्रांस उपजे हेवा।
ऐसा पुरुष तो पाहावा। म्हणती लोक ॥ १२॥

काया बहुत कष्टवावी। उत्कट कीर्ति उरवावी।
चटक लाउनी सोडावी। कांहीं येक ॥ १३॥

ब्राह्मणाने बाळबोध अक्षर घोटून घोटून इतके सुंदर करावे की, ते पाहिल्यावर चतुर पुरुषांना समाधान व्हावे. (१)

अक्षर वाटोळे, सरळ, मोकळे, काजळाच्या शाईने लिहिलेले असावे. ते काळे कुळकुळीत असावे. ओळीत असे लिहावे की जणू काही मोत्यांच्या माळाच आहेत. (२)

प्रत्येक अक्षर नीटनेटके लिहिलेले असावे. प्रत्येक शब्दात सारखे अंतर असावे. त्याप्रमाणेच काने, आडव्या मात्रा, रफार आणि वेलांट्याही नीट असाव्यात. (३)

ग्रंथाचा आरंभ करताना पहिले अक्षर जे काढलेले असेल तिथपासून ग्रंथसमाप्तीपर्यंत जर पाहात गेले, तर एकाच टाकाने सर्व लिखाण केले आहे, असे वाटावे. (४)

सर्वत्र अक्षराचे काळेपण, टाकाचे ठोसरपण, अक्षराचे वळण आणि वाकण अगदी एकसारखे असावे. (५)

ओळीला ओळ लागू नये. रफाराने मात्रा भेदली जाऊ नये. अक्षरांचा खालच्या ओळीला स्पर्श होऊ नये आणि लांबट अक्षर काढू नये. (६)

पानावर शिशाने रेखा आखून घ्याव्यात. त्यावर मोजकेच शब्द लिहावेत. सर्व ओळींच्यामध्ये सारखे अंतर असावे. ते कमी-जास्त असू नये. (७)

कोठे शोध घालायचा असेल तर अडू नये. शोधूनही चूक सापडणार नाही असे बिनचूक लिहावे. कुणालाही ते वाचता यावे. वाचायलाही लेखकाची आवश्यकता लागू नये असे लिहावे. (८)

ज्याचे वय लहान आहे त्याने जपून लिहावे. अक्षर पाहूनच लोकांना वाचण्याचा मोह व्हावा, अशा प्रकारे लिहावे. (९)

फार बारीक लिहिलेले तरुणपणी वाचता येते, पण म्हातारपणी ते उपयोगी पडत नाही. म्हणून मध्यम आकाराचे अक्षर लिहिण्याची सवय केली पाहिजे. (१०)

आपण लेखन करताना सभोवती मोकळी जागा सोडून मध्ये स्पष्ट आणि ठसठशीत लिहावे. काही काळाने समजा, कागद झडला तरी अक्षर झडू नये. (११)

ग्रंथ असा जपून काळजीपूर्वक लिहावा की, मनुष्यमात्रांना हेवा वाटावा. ज्यांनी हा ग्रंथ लिहिला त्या पुरुषाला पहावे असे लोकांना वाटावे. (१२)

लेखनासाठी भरपूर शरीर कष्टवावे आणि उत्कट कीर्ती मिळवावी. लोकांना चटक लागेल अशाप्रकारे लेखन करावे. (१३)

घट्य कागद आणावे। जपोन नेमस्त खळावे।
लिहिण्याचे सामे असावे। नानापरी ॥ १४॥

घट्ट कागद आणावेत. जपून ते नीट खळावेत. त्यांच्यावर लेखन करण्यासाठी लागणारी नाना प्रकारची सामग्री जवळच असावी. (१४)

सुऱ्या कातऱ्या जागाईत। खळी घोंटाळें तागाईत।
नाना सुरंग मिश्रित। जाणोनि घ्यावें ॥ १५॥

सुऱ्या, कातऱ्या, समासफळी, खळ घोटण्यासाठी चिवट घोटा, खळ लावण्यासाठी ब्रशासारखे साधन, चाकूला आणि सुरीला धार लावण्यासाठी सुरेख रंगाचे दगड या सर्व वस्तू नीट चांगल्या पाहून घ्याव्यात. (१५)

नाना देसीचे बरु आणावे। घटी बारिक सरळे घ्यावे।
नाना रंगाचे आणावे। नाना जिनसी ॥ १६॥

नाना देशांतील बोरू आणावेत. त्यांतील घट्ट, बारीक आणि सरळ असतील ते वापरायला घ्यावेत. अनेक रंगाचे आणि अनेक प्रकारचे बोरू जवळ संग्रही ठेवावेत. (१६)

नाना जिनसी टांकतोडणी। नाना प्रकारें रेखाटणी।
चित्रविचित्र करणी। सिसेंलेळ्या ॥ १७॥

बोरूची टोके तोडण्यासाठी अनेक प्रकारच्या टाक-तोडणी असाव्यात. अनेक प्रकारच्या ओळी आखण्याच्या पट्ट्या किंवा रूळ असावेत. कलाकुसर करावी आणि वजनासाठी शिशाच्या गोळ्या ठेवाव्यात. (१७)

हिंगुळ संग्रहीं असावे। वाळले आळिते पाहोन घ्यावे।
सोपें भिजउनी वाळवावे। संग्रह मसीचे ॥ १८॥

हिंगुळ आपल्या संग्रही असावे. वाळलेला आळता पाहून जवळ ठेवावा. निरनिराळ्या शाईच्या गोळ्या वाळवून संग्रही ठेवाव्या. (१८)

तगटी इतिश्रया कराव्या। बंदरी फळ्या घोटाव्या।
नाना चित्रीं चिताराव्या। उंच चित्रें ॥ १९॥

ग्रंथ लिहून पूर्ण झाल्यावर शेवटी 'इतिश्री' असे लिहावे. सुरत, मलबार इत्यादी बंदरांहून आणलेल्या फळ्या घोटाव्यात आणि उच्च प्रतीच्या त्या फळ्यांवर उत्तम प्रकारची सुंदर चित्रें काढावीत. (१९)

नाना गोप नाना बासनें। मेणकापडें सिंदुरवर्णे।
पेट्या कुलपें जपणें। पुस्तकाकारणें ॥ २०॥

ग्रंथ बांधून ठेवण्यासाठी नाना प्रकारचे गोफ, नाना बासने, शेंदरी रंगाची मेणकापडे आणि ग्रंथ सुरक्षित ठेवण्यासाठी पेट्या, कुलुपे वगैरे आणून ग्रंथ जपून ठेवण्यासाठी काळजीपूर्वक प्रयत्न करावेत. (२०)

हिंगुळ—एक लाल रंगाचा पदार्थ आहे. पारा, गंधक व लाख यांच्या मिश्रणापासून तो तयार करतात. ग्रंथाचा आरंभ, शेवट आणि ग्रंथातील आकडे यावर तो लावतात.

आळिता—कापसाचा वाळवलेला रंगीत बोळा. लाखेपासून तयार केलेल्या तांबड्या रंगामध्ये कापसाचा बोळा भिजवून तो वाळवून ठेवायचा. जरूर लागल्यावर पाण्यात टाकला की तांबडी शाई तयार होते.

सोपा—म्हणजे शाईत बुडवून ठेवलेली चिंधी. पूर्वी निरनिराळ्या रंगांच्या शाईमध्ये चिंध्या भिजवून त्या वाळवून जवळ ठेवीत. हवा तेव्हा उपयोग करीत. निरनिराळ्या रंगांच्या शाईचा संग्रह करण्याची अशी पद्धत होती.

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'लेखनक्रियानिरूपणनाम' समास पहिला समाप्त.

## दशक १९ : समास २

### विवरणनिरूपण

॥ श्रीराम ॥

मागां बोलिले लेखनभेद। आतां ऐका अर्थभेद।
नाना प्रकारीचे संवाद। समजोन घ्यावे ॥ १ ॥

मागील समासात लेखनाच्या भेदाबद्दल सांगितले. आता अर्थभेद ऐका. माणसाने नाना प्रकारचे संवाद समजून घ्यावेत. (१)

शब्दभेद अर्थभेद। मुद्राभेद प्रबंधभेद।
नाना शब्दाचे शब्दभेद। जाणोनी पाहावे ॥ २ ॥

शब्दभेद, अर्थभेद, मुद्राभेद, प्रबंधभेद, नाना शब्दांचे शब्दभेद जाणून घ्यावेत. (२)

नाना आशंका प्रत्योत्तरें। नाना प्रचित साक्षात्कारें।
जेणेंकरितां जगदांतरें। चमत्कारती ॥ ३ ॥

नाना प्रकारच्या शंका आणि त्यांची प्रत्युत्तरे, नाना प्रकारचे अनुभव आणि साक्षात्कार यांच्या घटना त्याने (वक्त्याने) जाणून घ्याव्यात. त्या ऐकून जगातील लोकांना आश्चर्य वाटावे. (३)

नाना पूर्वपक्ष सिद्धांत। प्रत्ययो पाहावा नेमस्त।
अनुमानाचें खस्तवेस्त। बोलोंचि नये ॥ ४ ॥

वक्त्याने नाना पूर्वपक्ष आणि सिद्धान्त यांचा खात्रीपूर्वक अनुभव घेऊन मग बोलावे. अनुमानाने असंबद्ध असे कधीही बोलू नये. (४)

प्रवृत्ति अथवा निवृत्ती। प्रचितीविण अवघी भ्रांती।
गळ्यांमधील जगज्जोति। चेतेल कोठें ॥ ५ ॥

प्रवृत्ती असो वा निवृत्ती, अनुभवाशिवाय सर्व व्यर्थ होय. भ्रांतीच होय. गळाठ्यांतील अग्नी जसा चेतत नाही, त्याप्रमाणे केवळ कल्पनेने अनुभवदीप प्रकाशणार नाही. (५)

हेत समजोन उत्तर देणें। दुसऱ्याचे जीवीचें समजणें।
मुख्य चातुर्याचीं लक्षणें। तें हें ऐसीं ॥ ६ ॥

प्रश्न विचारणाऱ्याच्या मनातील हेतू समजून प्रश्नाचे उत्तर द्यावे. दुसऱ्याच्या अंतरंगातील विचार जाणावेत, ही चातुर्याची लक्षणे आहेत. (६)

चातुर्येविण खटपट। ते विद्याचि फलकट।
सभेमधें आटघाट। समाधान कैंचें ॥ ७ ॥

ज्याच्या अंगी चातुर्य नसते, त्याचे बोलणे, करणे (त्याची खटपट) सर्व व्यर्थ ठरते. त्याची विद्या फोलपटा-सारखी अर्थहीन होय. ज्या सभेमध्ये खंडण-मंडणाचा आटापिटा चालतो, तेथे समाधान कसे असणार? (७)

बहुत बोलणें ऐकावें। तेथें मोन्यचि धरावें।
अल्पचिन्हें समजावें। जगदांतर ॥ ८ ॥

लोकांचे खूप बोलणे ऐकून घ्यावे. आपण तेथे मौनच धरावे. थोड्याशा चिह्नावरून लोकांचे अंतरंग जाणून घ्यावे. (८)

बाष्कळांमधें बैसों नये। उद्धटासीं तंडों नये।
आपणाकरितां खंडों नये। समाधान जनाचें ॥ ९ ॥

स्वच्छंदपणाने वागणाऱ्या लोकांत बसू नये. उद्धट माणसाबरोबर भांडणतंटा करू नये. आपल्या वागण्याने लोकांचे समाधान भंगणार नाही, याची काळजी घ्यावी. (९)

नेणतपण सोडूं नये। जाणपणें फुगों नये।
नाना जनांचें हृदये। मृद शब्दें उकलावें ॥ १० ॥

आपले नेणतेपण सोडू नये. जाणतेपणाने ताठ्याने वागू नये. आपल्या मृदु भाषणाने अनेक लोकांची हृदये उकलावीत. (१०)

प्रसंग जाणावा नेटका। बहुतांसी जाझु घेऊं नका।
खरें असतांचि नासका। फड होतो ॥ ११ ॥

प्रसंग कसा आहे हे नीट समजून घ्यावे. अनेकांशी उगीच झगडा करू नये. त्यामुळे आपले म्हणणे खरे असले तरी सभेच्या रंगाचा बेरंग होतो. (११)

शोध घेतां आळसों नये। भ्रष्ट लोकीं बैसों नये।
बैसलें तरी टाकूं नये। मिथ्या दोष ॥ १२ ॥

कुठल्याही गोष्टीचा शोध घेण्यात आळस करू नये. भ्रष्ट लोकांत बसू नये. समजा, बसावे लागले तरी खोटे दोषारोपण करू नये. (१२)

अंतर आर्ताचें शोधावें। प्रसंगीं थोडेंचि वाचावें।
चटक लाउनी सोडावें। भल्या मनुष्यासी ॥ १३॥

जो कोणी दु:खी असेल त्याच्या अंतरातील दु:ख जाणून घ्यावे व ते दूर करण्याचा प्रयत्न करावा. प्रसंगी थोडेच वाचावे. पण भल्या माणसांना आपली चटक लावून सोडावे. (१३)

मज्यालसींत बैसों नये। समाराधनेसी जाऊं नये।
जातां येळीलवाणें होये। जिणें आपुलें ॥ १४॥

सभेत बसू नये. जेथे मुक्तद्वार अन्नसंतर्पण असते, तेथे भोजन करण्यास जाऊ नये. जर गेलो तर आपले जिणे ओशाळवाणे होते. (१४)

उत्तम गुण प्रगटवावे। मग भलत्यासी बोलतां फावे।
भले पाहोन करावे। शोधून मित्र ॥ १५॥

आपल्या अंगचे उत्तम गुण प्रकट करावेत म्हणजे मग कुणाशीही बोललो तरी आपली किंमत राहाते. उत्तम माणसे पारखून मग त्यांच्याशी मैत्री करावी. (१५)

उपासनेसारिखें बोलावें। सर्व जनासी तोषवावें।
सगट बरेंपण राखावे। कोण्हीयेकासी ॥ १६॥

उपासनेला साजेल असे बोलावे. सर्व लोकांना संतुष्ट करावे. सरसकट सर्व लोकांशी चांगले संबंध राखावेत. (१६)

ठाईं ठाईं शोध घ्यावा। मग ग्रामीं प्रवेश करावा।
प्राणीमात्र बोलवावा। आप्तपणें ॥ १७॥

कुठल्याही गावात प्रवेश करण्यापूर्वी ठिकठिकाणी माहिती गोळा करून मग प्रवेश करावा. तेथे सर्वांशी आपलेपणाने वागावे. (१७)

उंच नीच म्हणों नये। सकळांचें निववावें हृदये।
अस्तमानीं जाऊं नये। कोठें तऱ्हीं ॥ १८॥

त्यात उच्च-नीच भाव ठेवू नये. सर्वांचे हृदय निववावे. सूर्यास्तानंतर उगीच भलतीकडे जाऊ नये. (१८)

जगामधें जगमित्र। जिव्हेपासीं आहे सूत्र।
कोठें तऱ्ही सत्पात्र। शोधून काढावें ॥ १९॥

जगात सर्वांशी मैत्री करायची असेल, तर त्याचे सूत्र आपल्या जिव्हेपाशी आहे. म्हणजे आपण जर गोड बोललो तर सर्वांशी मैत्री जुळते. आपण जेथे जाऊ तेथील उत्तम माणसे शोधून काढावीत. (१९)

कथा होती तेथें जावें। दुरी दीनासारिखें बैसावें।
तेथील सकळ हरद्र घ्यावें। अंतर्यामीं ॥ २०॥

गावात जेथे कथा होत असेल, तेथे आपण जावे, पण दूर दीनांसारखे बसावे आणि अंतर्यामी तेथील सर्व वर्म जाणून घ्यावे. (२०)

तेथें भलें आडळती। व्यापक तेहि कळों येती।
हळुहळु मंदगती। रीग करावा ॥ २१॥

तेथे भले लोकही आढळतात. विशाल अंत:करणाचेही लोक कोणते हेही कळून येते. मग हळूहळू मंदगतीने तिथे शिरकाव करावा. (२१)

सकळामधें विशेष श्रवण। श्रवणाहुनी थोर मनन।
मननें होये समाधान। बहुत जनाचें ॥ २२॥

सर्व साधनांत श्रवणाचे फार महत्त्व आहे. पण श्रवणाहूनही मनन श्रेष्ठ आहे. अनेक लोकांचे समाधान मननानेच होते. (२२)

धूर्तपणें सकळ जाणावें। अंतरीं अंतर बाणावें।
समजल्याविण सिणावें। कासयासी ॥ २३॥

धूर्तपणाने सर्व काही जाणून घ्यावे. आणि आपल्या अंतर्यामी लोकांचे अंतरंग समजून घ्यावे. समजल्याशिवाय उगीच शिणण्यात काय अर्थ आहे? (२३)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विवरणनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.

❑ ❑

## दशक १९ : समास ३
## करंटलक्षण निरूपण

॥ श्रीराम ॥

**सुचित करुनी अंत:कर्ण। ऐका करंटलक्षण।**
**हें त्यागितां सदेवलक्षण। आंगीं बाणे ॥ १॥**

अंत:करण एकाग्र करून आता करंट लक्षण ऐका. या करंटलक्षणाचा त्याग केल्याने सदेवलक्षण अंगी बाणते. (१)

**पापाकरितां दरिद्र प्राप्त। दरिद्रें होये पापसंचित।**
**ऐसेंचि होत जात। क्षणक्षणां ॥ २॥**

पूर्वजन्मीच्या पापामुळे दारिद्र्य प्राप्त होते. दारिद्र्यामुळे आणखी पाप होते. असे हे क्षणोक्षणी होत राहाते. (२)

**याकारणें करंटलक्षणें। ऐकोनी त्यागचि करणें।**
**म्हणिजे कांहीं येक बाणे। सदेवलक्षण ॥ ३॥**

म्हणून अभागी माणसाची लक्षणे ऐकून घेऊन त्यांचा त्यागच करावा, म्हणजे मग भाग्यवान माणसाचे लक्षण थोडेफार अंगी बाणते. (३)

**करंट्यास आळस आवडे। यत्न कदापी नावडे।**
**त्याची वासना वावडे। अधर्मीं सदा ॥ ४॥**

करंट्या माणसाला आळसच आवडतो. त्याला प्रयत्न करणे कधीही आवडत नाही. त्याची वासना सदा अधर्मातच वावरते. (४)

**सदा भ्रमिष्ट निदसुरा। उगेंचि बोले सैरावैरा।**
**कोणीयेकाच्या अंतरा। मानेचिना ॥ ५॥**

तो सदा भ्रमिष्टासारखा आणि जणू अर्धवट झोपेत असल्यासारखाच वागतो. उगीच अवाच्या सवा बोलत राहातो. त्याचे कुणाशी पटतच नाही. (५)

**लेहों नेणे वाचूं नेणे। सवदासुत घेऊं नेणे।**
**हिशेब कितेब राखों नेणे। धारणा नाहीं ॥ ६॥**

त्याला लिहायला येत नाही, वाचायला येत नाही. बाजारहाट करता येत नाही. हिशोब जमाखर्च लिहिता येत नाही. त्याचप्रमाणे त्याच्या लक्षातही काही राहात नाही किंवा कुठल्याही गोष्टीवर तो मन एकाग्र करू शकत नाही. (६)

**हारवी सांडी पाडी फोडी। विसरे चुके नाना खोडी।**
**भल्याचे संगतीचीआवडी। कदापी नाहीं ॥ ७॥**

तो सदा वस्तू हरवतो, सांडतो, पाडतो, फोडतो किंवा विसरतो. नाना प्रकारे चुका करतो. अशा नाना खोडी त्याच्या अंगी असतात. त्याला भल्या माणसाच्या संगतीची आवड कधीही नसते. (७)

**चाट गडी मेळविले। कुकर्मी मित्र केले।**
**खट नट येकवटिले। चोरटे पापी ॥ ८॥**

तो कुकर्मी, चावट लोक गोळा करतो. त्यांच्याशीच मैत्री करतो. दुष्ट आणि नष्ट असे चोरटे आणि पापी लोक एकत्र जमतात. (८)

**ज्यासीं त्यासीं कळकटा। स्वयें सदाचा चोरटा।**
**परघातकी धाटामोटा। वाटा पाडी ॥ ९॥**

तो ज्याच्या-त्याच्याशी भांडणारा असतो. स्वत: सदा चोऱ्या करतो. धष्टपुष्ट, दांडगा असून लोकांचा घात करणारा व वाटमाऱ्या असतो. (९)

**दीर्घ सूचना सुचेचिना। न्याय नीति हे रुचेना।**
**परअभिळासीं वासना। निरंतर ॥ १०॥**

करंट्या माणसाला दूरदृष्टी नसते. न्याय, नीती रुचत नाही. दुसऱ्याचे लुबाडण्याची वासना निरंतर त्याच्या ठिकाणी असते. (१०)

**आळसें शरीर पाळिलें। परंतु पोटेंविण गेलें।**
**सुडकें मिळेनासें जालें। पांघराया ॥ ११॥**

तो प्रथम आळसाने शरीर पाळतो पण पुढे त्याला खायला अन्न मिळत नाही की पांघरायला सुडके, फाटके-तुटके वस्त्रही मिळत नाही, अशी स्थिती होते. (११)

**आळसें शरीर पाळी। अखंड कुंसी कांडोळी।**
**निद्रेचे पाडी सुकाळीं। आपणासी ॥ १२॥**

असा आळसाने शरीर पोसणारा करंटा माणूस अखंड कुशी खाजवत बसतो किंवा आपल्याला खुशाल निद्रेच्या स्वाधीन करतो. (१२)

जनासीं मीत्री करीना। कठीण शब्द बोले नाना।
मूर्खपणें आवरेना। कोणीयेकासी ॥ १३॥

तो कोणाशीही मैत्री करत नाही. ज्याला त्याला नाना प्रकारे कठोर शब्द बोलतो. स्वत:च्या मूर्खपणामुळे तो कोणालाही आवरेनासा होतो. (१३)

पवित्र लोकांमधें भिडावे। वोंगळामधें निशंक धांवे।
सदा मनापासून भावे। जननिंद्य क्रिया ॥ १४॥

पवित्र लोकांमध्ये जायला त्याला भीड, संकोच वाटतो. आणि ओंगळ लोकांकडे तो नि:शंकपणे धाव घेतो. त्याला नेहमी लोकांमध्ये ज्या निंद्य मानल्या जातात त्या गोष्टी करायलाच मनापासून आवडते. (१४)

तेथें कैंचा परोपकार। केला बहुतांचा संव्हार।
पापी अनर्थी अपस्मार। सर्व अबद्धी ॥ १५॥

अशा माणसांकडून परोपकार कसा घडणार? त्याने अनेकांचा संहार केलेला असतो. तो पापी, अनर्थ घडवून आणणारा, पिशाच्चवत् वागणारा, सर्व दृष्टीने असंबद्ध असतो. (१५)

शब्द सांभाळून बोलेना। आवरितां आवरेना।
कोणीयेकासी मानेना। बोलणें त्याचें ॥ १६॥

तो शब्द सांभाळून कधी बोलत नाही. एकदा बोलायला लागला की तो कुणालाही आवरता आवरत नाही. त्याचे बोलणे कुणाला आवडत नाही. (१६)

कोणीयेकासविश्वास नाहीं। कोणीयेकासीं सख्य नाहीं।
विद्या वैभव कांहींच नाहीं। उगाचि ताठा ॥ १७॥

त्याचा कुणावरही विश्वास नसतो. त्याचे कुणाशीही सख्य नसते. त्याच्या अंगी विद्या अथवा वैभव वगैरे काहीच नसते. फक्त उगीचच ताठा मात्र असतो. (१७)

राखावीं बहुतांचीं अंतरें। भाग्य येतें तदनंतरें।
ऐसीं हे विवेकाचीं उत्तरें। ऐकणार नाहीं ॥ १८॥

त्याला जर 'आधी अनेकांची अंतरे राखावीत म्हणजे मग त्यानंतर भाग्य उदयास येते.' यासारखी विवेकाची उत्तरे शिकवू लागावे, तर तो ऐकूनच घेत नाही. (१८)

स्वयें आपणास कळेना। सिकविलें तें ऐकेना।
तयासी उपाय नाना। काये करिती ॥ १९॥

त्याला स्वत:ला तर काही कळत नाहीच, पण शिकविले तरी ते ऐकत नाही. त्याला नाना उपाय केले तरी काय होणार आहे? (१९)

कल्पना करी उदंड कांहीं। प्रा्प्तव्य तों कांहींच नाहीं।
अखंड पडिला संदेहीं। अनुमानाचे ॥ २०॥

तो उदंड नाना कल्पना करीत राहातो, पण त्याने काहीही प्राप्त होत नाही. तो नेहमी अनुमानाच्यामुळे संदेहात पडलेला असतो. (२०)

पुण्यमार्ग सांडिला मनें। पाप झडावें काशानें।
निश्चय नाहीं अनुमानें। नास केला ॥ २१॥

मनाने त्याने पुण्यमार्गाचा त्याग केलेला असतो, तर त्याचे पाप नष्ट तरी कसे होणार? मनात कुठल्याही गोष्टीसंबंधी निश्चय नसल्याने केवळ कल्पना करीत राहिल्याने त्याचा नाश होतो. (२१)

कांहींयेक पुर्तें कळेना। सभेमधें बोलों राहेना।
बाष्कळ लबाड ऐसें जना। कळों आलें ॥ २२॥

त्याला काहीही पुरते कळत नाही. मात्र सभेमध्ये तो बोलल्याशिवाय राहात नाही. त्यामुळे लोकांना तो थापाड्या, लबाड आहे, हे कळून येते. (२२)

कांहीं नेमकपण आपुलें। बहुत जनासी कळों आलें।
तेंचि मनुष्य मान्य जालें। भूमंडळीं ॥ २३॥

ज्या माणसाच्या वागण्यात निश्चितपणा, नियमितपणा आहे असे अनेक लोकांना अनुभवावरून कळून येते, तोच माणूस या जगात मान्य होतो. (२३)

झिजल्यावांचुनी कीर्ति कैंची। मान्यता नव्हे कीं फुकाची।
जिकडे तिकडे होते ची ची। अवलक्षणें ॥ २४॥

माणूस झिजल्याशिवाय त्याला कीर्ती मिळत नाही. लोकांची मान्यता काही फुकटची मिळत नाही. अवलक्षणी माणसाची जिकडे-तिकडे छीथू होते! (२४)

भल्याची संगती धरीना। आपणासी शाहाणे करीना।
तो आपला आपण वैरी जाणा। स्वहित नेणे ॥२५॥

जो माणूस भल्यांची संगती धरीत नाही, आपले आपणास शहाणा करीत नाही, तो आपले स्वहित जाणत नसल्याने स्वत:च स्वत:चा वैरी बनतो. (२५)

| | |
|---|---|
| **लोकांसी बरें करावें। तें उसिणें सर्वेचि घ्यावें।<br>ऐसें जयाच्या जीवें। जाणिजेना ॥ २६ ॥** | आपण लोकांचे बरे केले की, तेही आपले बरे करतात. हे त्या करंट्या जीवाला कळतच नाही. (२६) |
| **जेथें नाहीं उत्तम गुण। तें करंटपणाचें लक्षण।<br>बहुतांसी न मने तें अवलक्षण। सहजचि जालें ॥ २७ ॥** | जेथे उत्तम गुण नाही, ते करंटेपणाचे लक्षण जाणावे. जे पुष्कळांना मान्य होत नाही ते सहजच अवलक्षण असे समजावे. (२७) |
| **कार्याकारण सकळ कांहीं। कार्येविण तों कांहींच नाहीं।<br>निकामी तो दु:खप्रवाहीं। वाहातचि गेला ॥ २८ ॥** | जगातील सर्व व्यवहार सापेक्ष असतात. आपण जर कोणाच्या उपयोगी पडलो, तरच तो आपले कार्य करतो. निरुपयोगी मनुष्य दुर्लक्षित झाल्याने नेहमीच दु:खप्रवाहात वाहातच जातो. (२८) |
| **बहुतांसीं मान्य थोडा। त्याच्या पापासी नाहीं जोडा।<br>निराश्रई पडे उघडा। जेथे तेथें ॥ २९ ॥** | जो पुष्कळांना मान्य नसतो, त्याच्या पापाला जोड नाही. तो पापी जाणावा. त्यास कोणी आश्रय देत नसल्याने जिथे तिथे तो उघडा पडतो. (२९) |
| **याकारणें अवगुण त्यागावे। उत्तम गुण समजोन घ्यावे।<br>तेणें मनासारिखें फावे। सकळ कांहीं ॥ ३० ॥** | म्हणून माणसाने अवगुणांचा त्याग करून, उत्तम गुण कोणते हे जाणून ते घ्यावेत, म्हणजे सर्व काही त्याच्या मनासारखे होते. (३०) |

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'करंटलक्षणनिरूपणनाम' समास तिसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक १९ : समास ४
## सदेवलक्षणनिरूपण

॥ श्रीराम ॥

| | |
|---|---|
| **मागां बोलिलें करंटलक्षण। तें विवेकें सांडावें संपूर्ण।<br>आतां ऐका सदेव लक्षण। परम सौख्यदायेक ॥ १ ॥** | मागील समासात करंट लक्षणाचे वर्णन केले. ते विवेकाने संपूर्ण सोडावे. आता परम सौख्यदायक असे भाग्यवान माणसाचे, लक्षण सांगतो, ते ऐका. (१) |
| **उपजतगुण शरीरीं। परोपकारी नानापरी।<br>आवडे सर्वांचे अंतरीं। सर्वकाळ ॥ २ ॥** | काही माणसांच्या अंगी उपजतच काही गुण असतो. तो अनेक प्रकारे परोपकार करीत असल्याने सर्वकाळ सर्वांना अंत:करणापासून आवडतो. (२) |
| **सुंदर अक्षर लेहों जाणे। चपळ शुद्ध वाचूं जाणे।<br>अर्थांतर सांगों जाणे। सकळ कांहीं ॥ ३ ॥** | सुंदर अक्षर कसे लिहावे, हे तो जाणतो. भराभर आणि शुद्ध कसे वाचावे हे त्याला बरोबर कळते. वाचलेल्या मजकुराचा सर्व अर्थ अगदी स्पष्ट करून कसा सांगावा, हे त्याला माहीत असते. (३) |
| **कोणाचें मनोगत तोडीना। भल्यांची संगती सोडीना।<br>सदेवलक्षण अनुमाना। आणून ठेवी ॥ ४ ॥** | तो कुणाचेही अंत:करण दुखवीत नाही. चांगल्या माणसांची संगत कधी सोडत नाही. भाग्यवंताच्या लक्षणाची त्याला चांगली कल्पना असते. (४) |
| **तो सकळ जनासी व्हावा। जेथें तेथें नित्य नवा।<br>मूर्खपणें अनुमानगोवा। कांहींच नाहीं ॥ ५ ॥** | तो सर्व लोकांना हवाहवासा वाटतो. जेथे जेथे तो जातो तेथील लोकांना दरवेळी तो नवाच वाटतो. मूर्खपणामुळे केल्या जाणाऱ्या कल्पनेला त्याच्या ठिकाणी वावच नसतो. (५) |
| **नाना उत्तम गुण सत्पात्र। तेचि मनुष्य जगमित्र।<br>प्रगट कीर्ती स्वतंत्र। पराधेन नाहीं ॥ ६ ॥** | ज्याच्या ठिकाणी अनेक उत्तम गुण असतात, तोच सत्पात्र माणूस जगमित्र होऊ शकतो. त्याच्या उत्तम गुणांच्या प्रगटीकरणामुळे आपोआपच त्याला कीर्ती मिळते. ती स्वतंत्रपणे सर्वत्र पसरते. तिला दुसऱ्या कशाचा आधार घ्यावा लागत नाही. (६) |

राखे सकळांचें अंतर। उदंड करी पाठांतर।
नेमस्तपणाचा विसर। पडणार नाहीं ॥ ७॥

तो सर्वांचे अंत:करण संभाळतो, उदंड पाठांतर करतो. नियमितपणाचा त्याला कधी विसर पडत नाही. (७)

नम्रपणें पुसों जाणे। नेमस्त अर्थ सांगों जाणे।
बोलऐसें वर्तें जाणे। उत्तम क्रिया ॥ ८॥

लोकांना नम्रपणे कसे विचारावे, हे तो जाणतो. ग्रंथाचा निश्चित अर्थ सांगण्याचे कौशल्य त्याच्याजवळ असते. तो जसे बोलतो त्याप्रमाणेच उत्तम आचरण कसे करावे हेही तो जाणतो. (८)

जो मानला बहुतांसी। कोणी बोलें न शके त्यासी।
धगधगीत पुण्यरासी। माहांपुरुष ॥ ९॥

जो अनेक जणांना मान्य असतो, त्याला कोणी बोलू शकत नाही. तो अत्यंत तेजस्वी आणि पुण्यवान महापुरुष असतो. (९)

तो परोपकार करितांचि गेला। पाहिजे तो ज्याला त्याला।
मग काये उणें तयाला। भूमंडळीं ॥ १०॥

तो नेहमी परोपकारच करीत असतो, त्यामुळे ज्याला-त्याला तो हवासा वाटतो. मग त्याला या जगात काय कमी पडणार आहे? (१०)

बहुत जन वास पाहे। वेळेसी तत्काळ उभा राहे।
उणें कोणाचें न साहे। तया पुरुषासी ॥ ११॥

अनेक लोक त्याची वाट पाहात असतात. कुणाच्याही अडचणीच्या वेळी तो मदतीला तयार असतो. त्या पुरुषाला कुणाचेही उणे सहन होत नाही. (११)

चौदा विद्या चौसष्टी कळा। जाणे संगीत गायेनकळा।
आत्मविद्येचा जिव्हाळा। उदंड तेथें ॥ १२॥

त्याच्याजवळ चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांचे ज्ञान असते. त्याला संगीताची उत्तम जाण असते आणि गायनकलाही अवगत असते. त्याच्यापाशी आत्मविद्येचा उदंड जिव्हाळा असतो. (१२)

सकळांसी नम्र बोलणें। मनोगत राखोन चालणें।
अखंड कोणीयेकाचें उणें। पडोंचि नेदी ॥ १३॥

तो सर्वांशी नम्रतेने बोलतो. त्याचे मनोगत जाणून त्यांना सुख होईल, अशा प्रकारे वागतो. सदैव कुणाचेही उणे तो पडूच देत नाही. (१३)

न्याय नीति भजन मर्यादा। काळ सार्थक करी सदा।
दरिद्रपणाची आपदा। तेथें कैंची ॥ १४॥

न्याय, नीती, भजन आणि मर्यादा यांविषयी तो सावध असतो आणि आपला वेळ सर्वदा सार्थकी लावतो. मग तेथे दारिद्र्याचे संकट कसे असू शकेल? (१४)

उत्तमगुणें शृंघारला। तो बहुतांमधें शोभला।
प्रगट प्रतापें उगवला। मार्तंड जैसा ॥ १५॥

जो उत्तम गुणांनी संपन्न असतो, तो अनेक लोकांत शोभून दिसतो. सूर्य जसा आपल्या तेजाने, प्रतापाने प्रगट होताच जग उजळून टाकतो, तसेच याच्या गुणांमुळे तो त्याच्या तेजाने लोकांना दिपवून टाकतो. (१५)

जाणता पुरुष असेल जेथें। कळहो कैंचा उठेल तेथें।
उत्तम गुणाविषीं रितें। तें प्राणी करंटें ॥ १६॥

जेथे जाणता पुरुष असतो, तेथे कलह उत्पन्न होत नाही. ज्यांच्याजवळ उत्तम गुण नसतात ते प्राणी करंटे, भाग्यहीन असतात. (१६)

प्रपंचीं जाणे राजकारण। परमार्थीं साकल्य विवरण।
सर्वांमधें उत्तम गुण। त्याचा भोक्ता ॥ १७॥

प्रपंचात तो मुत्सद्दीपणे वागतो. परमार्थात साकल्याने अध्यात्माचे विवरण कसे करावे हे तो जाणतो. तो लोकांच्या उत्तम गुणांची कदर करतो. (१७)

मागें येक पुढें येक। ऐसा कदापी नाहीं दंडक।
सर्वत्रांसीं अलोलिक। तया पुरुषाची ॥ १८॥

मागे एक, पुढे एक अशी त्याची वागण्याची रीत कधीही नसते, म्हणून त्या पुरुषाचे सर्वांना खूप कौतुक वाटते. (१८)

अंतरासी लागेल ढका। ऐसी वर्तणूक करूं नका।
जेथें तेथें विवेका। प्रकट करी ॥ १९॥

लोकांचे अंत:करण दुखावेल असे वर्तन तो कधीही करीत नाही. प्रत्येक ठिकाणी तो अत्यंत विचाराने वागतो. (१९)

कर्मविधी उपासनाविधी। ज्ञानविधी वैराग्यविधी।
विशाळ ज्ञात्रुत्वाची बुद्धी। चळेल कैसी ॥ २० ॥

कर्म, उपासना, ज्ञान आणि वैराग्य या सर्वांतच तो पारंगत असतो. अशी विशाल ज्याची प्रज्ञा आहे, त्याची बुद्धी चळेल तरी कशी? (२०)

पाहातां अवघे उत्तम गुण। तयास वाईट म्हणेल कोण।
जैसा आत्मा संपूर्ण। सर्वां घटीं ॥ २१ ॥

त्याचे सर्व उत्तम गुण पाहिल्यावर त्याला वाईट कोण म्हणेल? जसा आत्मा सर्व प्राणिमात्रांच्या अंत:करणात संपूर्णपणे वास करतो, तसे तोही आपल्या प्रेमाने सर्वांच्या अंत:करणात स्थान मिळवतो. (२१)

आपल्या कार्यास तत्पर। लोक असती ल्हानथोर।
तैसाचि करी परोपकार। मनापासुनी ॥ २२ ॥

तो आपल्या कार्यात अत्यंत तत्पर असतो. लहान-थोर कुणीही असो, दुसऱ्याचे कार्य ते आपलेच कार्य असे समजून मनापासून परोपकार करतो. (२२)

दुसऱ्याच्या दुःखें दुखवे। दुसऱ्याच्या सुखें सुखावे।
आवघेचि सुखी असावे। ऐसी वासना ॥ २३ ॥

तो दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होतो आणि दुसऱ्याच्या सुखाने सुखी होतो. सर्वच लोक सुखी असावेत, अशीच त्याची वासना असते. (२३)

उदंड मुलें नानापरी। वडिलांचें मन अवघ्यांवरी।
तैसी अवघ्यांची चिंता करी। माहांपुरुष ॥ २४ ॥

एखाद्या माणसाला खूप मुले असतात आणि वडिलांचे सर्वांवरच प्रेम असते. त्याप्रमाणे असा महापुरुषही सर्वांच्याच कल्याणाची चिंता करतो. (२४)

जयास कोणाचें सोसेना। तयाची निःकांचन वासना।
धीकारिल्यां धीकारेना। तोचि माहांपुरुष ॥ २५ ॥

ज्याला कुणाचेही अकल्याण सोसवत नाही आणि ज्याला चुकूनही पैशाची वासना होत नाही, अशा महापुरुषाचा कुणी धिक्कार केला तरी तो मात्र कुणाचा धिक्कार करीत नाही. (२५)

मिथ्या शरीर निंदलें। तरी याचें काये गेलें।
ज्ञात्यासी आणि जिंतिलें। देहेबुद्धीनें ॥ २६ ॥

एखाद्याने निंदा केली, तरी ती मिथ्या असलेल्या शरीराची असते, मग त्यात आपले काय गेले, अशी त्याची भावना असते. ज्ञाता आहे आणि त्यास देहबुद्धीने जिंकले, असे कधी होईल का? (२६)

हें अवघें अवलक्षण। ज्ञाता देहीं विलक्षण।
कांहीं तऱ्ही उत्तम गुण। जनीं दाखवावे ॥ २७ ॥

देहबुद्धीने जिंकले जाणे हे अवलक्षण आहे. पण ज्ञाता हा देहधारी असूनही स्वार्थरहित आणि आत्मनिष्ठ असा विलक्षण असतो. माणसाने काही ना काही उत्तम गुण लोकांत दाखवावेत. (२७)

उत्तम गुणास मनुष्य वेधे। वाईट गुणासी प्राणी खेदे।
तीक्षण बुद्धि लोक साधे। काये जाणती ॥ २८ ॥

उत्तम गुणांनी मनुष्य आकर्षित होतात. वाईट गुणांमुळे लोकांना खेद होतो. ज्ञात्याची बुद्धी अत्यंत तीक्ष्ण (सूक्ष्म) असते. सर्वसामान्य लोक ती जाणू शकत नाहीत. (२८)

लोकीं अत्यंत क्षमा करिती। आलियां लोकांचे प्रचिती।
मग ते लोक पाठी राखती। नाना प्रकारीं ॥ २९ ॥

लोकांनी अपराध केले तरी तो लोकांना अत्यंत क्षमा करतो. त्याच्या क्षमाशीलतेचा अनुभव लोकांना आला की ते त्याची नाना प्रकारे पाठ राखतात. (२९)

बहुतांसी वाटे मी थोर। सर्वमान्य पाहिजे विचार।
धीर उदार गंभीर। माहांपुरुष ॥ ३० ॥

अनेक लोकांना असे वाटते की, आपण थोर आहोत. पण सर्व लोकांनी तो थोर आहे हे मान्य व्हावयास हवे. जे महापुरुष असतात, ते नेहमी धीर, उदार आणि गंभीर असतात. (३०)

जितुके कांहीं उत्तम गुण। तें समर्थाचें लक्षण।
अवगुण तें करंटलक्षण। सहजचि जालें ॥ ३१ ॥

जेवढे म्हणून उत्तम गुण आहेत, ते समर्थ पुरुषाचे लक्षण समजावे. मग अवगुण हे सहजच करंटेपणाचे लक्षण ठरते. (३१)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सदेवलक्षणनिरूपणनाम' समास चौथा समाप्त.

❑ ❑

## दशक १९ : समास ५
### देहेमान्यनिरूपण

॥ श्रीराम ॥

मातीचे देव धोंड्याचे देव। सोन्याचे देव रुप्याचे देव।
काशाचे देव पितळेचे देव। तांब्याचे देव चित्रलेपें॥ १॥

या जगात देवांचे अनेक प्रकार आहेत. मातीचे देव, धोंड्याचे देव, सोन्याचे देव, रुप्याचे देव, काशाचे देव, पितळेचे देव, तांब्याचे देव आणि गंधाच्या लेपाने काढलेले चित्ररूपी देव. (१)

रुविच्या लांकडाचे देव पोंवळयांचे देव। बाण तांदळे नर्मदे देव।
शालिग्राम काश्मिरी देव। सूर्यकांत सोमकांत ॥ २॥

याशिवाय रुईच्या लाकडाचे देव, पोवळ्याचे देव, बाण, तांदळे, नर्मदे देव, शाळिग्राम, काश्मीरी देव तसेच सूर्यकांत, सोमकांत, (२)

तांब्रनाणीं हेमनाणीं। कोणी पूजिती देवार्चनीं।
चक्रांगीत चक्रतीर्थाहुनी। घेऊन येती ॥ ३॥

याखेरीज तांब्याची नाणी, सोन्याची नाणी यांचीही देव म्हणून पूजा लोक करतात. कुणी चक्रतीर्थाहून चक्रांकित शाळिग्राम घेऊन येतात. (३)

उदंड उपासनेचे भेद। किती करावे विशद।
आपलाले आवडीचा वेध। लागला जनीं ॥ ४॥

उपासनेचे उदंड भेद आहेत. कितींचे स्पष्टीकरण करणार? लोकांना आपापल्या आवडीच्या देवाचा वेध लागलेला असतो. (४)

परी त्या सकळांचेंहि कारण। मुळीं पाहावें स्मरण।
तया स्मरणाचे अंश जाण। नाना देवतें ॥ ५॥

पण त्या सगळ्या देवांचे कारण 'एकोऽहं' हे आद्यस्फुरण म्हणजेच मूळमाया हेच आहे. त्या स्मरणाचे अंश म्हणजे नाना दैवते होत. (५)

मुळीं द्रष्टा देव तो येक। त्याचे जाहाले अनेक।
समजोन पाहातां विवेक। उमजों लागे ॥ ६॥

मूळ द्रष्टा देव एकच आहे. त्याचेच अनेक देव झाले. विवेक करून नीट पाहिले की उमजू लागते. (६)

देह्यावेगळी भक्तिफावेना। देह्यावेगळा देव पावेना।
याकारणें मूळ भजना। देहेचि आहे ॥ ७॥

देहाशिवाय भक्ती करता येत नाही. देहाशिवाय देव पावत नाही. म्हणून भजनाचे मूळ देहच आहे. (७)

देहे मुळींच केला वाव। तरी भजनासी कैंचा ठाव।
म्हणोनी भजनाचा उपाव। देह्यात्मयोगें ॥ ८॥

देह मुळात मिथ्या आहे, असे जर म्हटले, तर भजनाला कुठला वाव मिळणार? म्हणून देह आणि अंतरात्मा यांच्या एकत्रित येण्याने भजनाचा उपाय करता येतो. (८)

देहेंविण देव कैसा भजावा। देहेंविण देव कैसा पुजावा।
देह्याविण मोहछाव कैसा करावा। कोण्या प्रकारें ॥ ९॥

देहाशिवाय देवाचे भजन कसे करावे? देहाविना देव कसा पूजावा? देहाशिवाय महोत्सव कसा आणि कोणत्या प्रकारे करावा? (९)

अत्र गंध पत्र पुष्प। फल तांबोल धूप दीप।
नाना भजनाचा साक्षेप। कोठें करावा ॥ १०॥

अत्तर, गंध, पत्र, पुष्प, फल, तांबूल, धूप, दीप तसेच नाना प्रकारच्या भजनाचा उद्योग देहाशिवाय कोठे करावा? (१०)

देवाचें तीर्थ कैसें घ्यावें। देवासी गंध कोठें लावावें।
मंत्रपुष्प तरी वावें। कोणे ठाईं ॥ ११॥

देवाचे तीर्थ कसे घ्यावे, देवाला गंध कोठे लावावे, मंत्रपुष्प तरी कुठे वहावे? (११)

म्हणोनी देह्याविण आडतें। अवघें सांकडेंचि पडतें।
देह्याकरितां घडतें। भजन कांहीं ॥ १२॥

म्हणून देहाशिवाय अडते. सर्व कोडेच पडते. देहामुळेच काही ना काही भजन घडते. (१२)

देव देवता भूतें देवतें। मुळींचें सामर्थ्य आहे तेथें।
अधिकारें नाना देवतें। भजत जावीं ॥ १३॥

देव, देवता, भूते, दैवते या सर्वांच्या ठिकाणी मूळमायेचे, ईश्वराचे सामर्थ्य आहे. योग्यतेप्रमाणे नाना दैवते भजत जावीत. (१३)

नाना देवीं भजन केलें। तें मूळ पुरुषासी पावलें।
याकारणें सन्मानिलें। पाहिजे सकळ कांहीं॥ १४॥

नाना प्रकारच्या देवांचे भजन केले तरी ते मूळ ईश्वरालाच प्राप्त होते. म्हणून सर्वच देवतांचा सन्मान केला पाहिजे. (१४)

मायावल्ली फांपावली। नाना देहेफळीं लगडली।
मुळींची जाणीव कळें आली। फळामधें ॥ १५॥

मायारूपी वेल फोफावली असून नाना देहरूपी फळांनी लगडली आहे. मूळची जी जाणीव फळांमध्येही दिसून आली. (१५)

म्हणोनी येळील न करावें। पाहाणें तें येथेंचि पाहावें।
ताळ पडतां राहावें। समाधानें ॥ १६॥

म्हणून कंटाळा करू नये. जे काही पाहायचे असेल ते येथेच पाहावे. अनुभव आला की समाधानात रहावे. (१६)

प्राणी संसार टाकिती। देवास धुंडीत फिरती।
नाना अनुमानीं पडती। जेथ तेथें ॥ १७॥

प्राणी संसार सोडतात आणि देवाला धुंडीत फिरतात आणि जेथे-तेथे नाना प्रकारच्या अनुमानात पडतात. (१७)

लोकांची पाहातां रीती। लोक देवार्चनें करिती।
अथवा क्षत्रदेव पाहाती। ठाईं ठाईं ॥ १८॥

लोक एकमेकांची रीत पाहून देवतार्चन करतात अथवा जागोजागी क्षेत्रातील देव पाहतात. (१८)

अथवा नाना अवतार। ऐकोनी धरिती निर्धार।
परी तें अवघें सविस्तर। होऊन गेलें ॥ १९॥

अथवा नाना अवतारांच्या विषयी ऐकून तेथे देवत्वाचा निर्धार करतात. पण ते सर्व अवतार येऊन सविस्तर चरित्र करून होऊन गेले. (१९)

येक ब्रह्मविष्णुमहेश। ऐकोन म्हणती हें विशेष।
गुणातीत जो जगदीश। तो पाहिला पाहिजे ॥ २०॥

कुणी ब्रह्मा, विष्णू, महेश यांच्याबद्दल ऐकून त्यांना विशेष महत्त्व देतात. पण गुणातीत जो जगदीश त्याचा शोध घेऊन त्याला जाणले पाहिजे. (२०)

देवासी नाहीं थानमान। कोठें करावें भजन।
हा विचार पाहातां अनुमान। होत जातो ॥ २१॥

देव निराकार आहे, म्हणून त्याला निश्चित ठावठिकाणा नाही, म्हणून भजनही करता येत नाही, असे समजाल तर घोटाळ्यात पडाल. (२१)

नसतां देवाचें दर्शन। कैसेन होईजे पावन।
धन्य धन्य ते साधुजन। सकळ जाणती ॥ २२॥

लोकांना वाटते की, सगुण-साकार देवाचे दर्शन जर झाले नाही तर आपण पावन कसे होणार? पण खरा देव कोण हे सर्व रहस्य साधुजन जाणतात, म्हणून ते खरोखर धन्य होत. (२२)

भूमंडळीं देव नाना। त्यांची भीड उलंघेना।
मुख्य देव तो कळेना। कांही केल्यां ॥ २३॥

जगात अनेक देव आहेत. त्यांची भीड ओलांडून पलीकडे जाता येत नाही. त्यामुळे मुख्य देव कोण हे काही केल्या कळत नाही. (२३)

कर्तुत्व वेगळें करावें। मग त्या देवासी पाहावें।
तरीच कांहीयेक पडे ठावें। गोप्यगुह्य ॥ २४॥

मीपणाच्या त्यागाने कर्तृत्व वेगळे करावे आणि मग त्या देवाला पाहावे. मग त्यातील गुप्त रहस्य काय आहे, हे थोडे फार कळू लागते. (२४)

तें दिसेना ना भासेना। कल्पांतींहि नासेना।
सुकृतावेगळें विश्वासेना। तेथें मन ॥ २५॥

ते दिसत नाही, भासत नाही आणि कल्पांतीही नाश पावत नाही. पण पूर्वपुण्याई असल्याखेरीज तेथे मनाचा विश्वास बसत नाही. (२५)

उदंड कल्पिते कल्पना। उदंड इछिते वासना।
अभ्यांतरीं तरंग नाना। उदयातें पावती ॥ २६॥

मग मनात नाना कल्पना येतात. उदंड वासना, इच्छा उत्पन्न होतात. अंत:करणात नाना तऱ्हेचे विचारतरंग निर्माण होतात. (२६)

म्हणोनी कल्पनारहित। तेचि वस्तु शाश्वत।
अंत नाहीं म्हणोनी अनंत। बोलिजे तया ॥ २७॥

म्हणून कल्पनारहित जी वस्तू तेच शाश्वत ब्रह्म होय. त्याला अंत नाही, म्हणून त्याला अनंत असे म्हणतात. (२७)

हें ज्ञानदृष्टीनें पाहावें। पाहोनी तेथेंचि राहावें।
निजध्यासें तद्रूप व्हावें। संगत्यागें ॥ २८॥

हे सर्व ज्ञानदृष्टीने पाहावे आणि तेथेच राहावे. आणि मीपणा-विरहित होऊन निदिध्यासाने तद्रूप व्हावे. (२८)

नाना लीळा नाना लाघवें। तें काये जाणिजे बापुड्या जीवें।
संतसंगें स्वानुभवें। स्थिति बाणे ॥ २९॥

अशा आत्मरूपाशी ऐक्य पावलेल्या पुरुषाच्या लीला, त्याचे चरित्र, त्याचे लाघव ते बिचाऱ्या सामान्य जीवांना कसे आणि काय कळणार? संतांच्या संगतीने आत्मानुभव आला की, अशी स्थिती बाणते. (२९)

ऐसी सूक्ष्म स्थिती गती। कळतां चुके अधोगती।
सद्‌गुरुचेनि सद्‌गती। तत्काळ होते ॥ ३० ॥

अशी सूक्ष्म स्थिती आणि गती प्राप्त झाली की अधोगती चुकते. सद्गुरूंच्या कृपेने तात्काळ सद्‌गती प्राप्त होते. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहेमान्यनिरूपणनाम' समास पाचवा समाप्त.



## दशक १९ : समास ६
## बुद्धिवादनिरूपण

॥ श्रीराम ॥

परमार्थी आणि विवेकी। त्याचें करणें माने लोकीं।
कां जे विवरविवरों चुकी। पडोंचि नेदी ॥ १ ॥

जो परमार्थी असून विवेकीही असतो, त्याचे करणे लोकांना मान्य होते. कारण कुठेही काम करण्यापूर्वी तो नाना तऱ्हेने त्यासंबंधी विवरण करून कामात चूक होऊच देत नाही. (१)

जो जो संदेह वाटे जना। तो तो कदापी करीना।
आदिअंत अनुमाना। आणून सोडी ॥ २ ॥

ज्या गोष्टीबद्दल लोकांच्या मनात संदेह असतो, ती गोष्ट तो कधीही करीत नाही. कुठल्याही कार्यास आरंभ करताना तो त्याचा शेवटी काय परिणाम होईल, यासंबंधी अनुमान करून मगच कामास आरंभ करतो आणि ते पार पाडतो. (२)

स्वतां निस्पृह असेना। त्याचें बोलणेंचि मानेना।
कठीण आहे जनार्दना। राजी राखणें ॥ ३ ॥

जो स्वत: नि:स्पृह नसतो, त्याचे बोलणे कुणाला मान्य होत नाही. जनता-जनार्दनाला राजी राखणे फार कठीण आहे. (३)

कोणी दाटून उपदेश देती। कोणी मध्यावर्ती घालिती।
ते सहजचि हळु पडती। लालचीनें ॥ ४ ॥

कोणी जबरदस्तीने उपदेश देतात, तर कुणी मध्यस्थ घालतात. असे गुरू त्यांच्या लालची स्वभावाने पत घालवून बसतात. (४)

जयास सांगावा विवेक। तोचि जाणावा प्रतिकुंचक।
पुढें पुढें नासक। कारबार होतो ॥ ५ ॥

ज्याला विवेक सांगावा तोच प्रतिकूल होतो, अशा वेळी सर्व कारभार बिघडतो. (५)

भावास भाऊ उपदेश देती। पुढें पुढें होते फजीती।
वोळखीच्या लोकांत महंती। मांडूंचि नये ॥ ६ ॥

भाऊच भावाला उपदेश देतो आणि पुढे पुढे फजिती होते. म्हणून ओळखीच्या लोकांत महंती मांडू नये. (६)

पहिलें दिसे परी नासे। विवेकी मान्य करिती कैसे।
अविवेकी ते जैसे तैसे। मिळती तेथें ॥ ७ ॥

पहिला थाट पुढे राहात नाही. नष्ट होतो. विवेकी लोक अशा गोष्टीस मान्यता कसे देतील? त्यांच्यासारखेच अविवेकी असतात तेच तेथे गोळा होतात. (७)

भ्रतार शिष्य स्त्री गुरु। हाहि फटकाळ विचारु।
नाना भ्रष्टाकारी प्रकारु। तैसाचि आहे ॥ ८ ॥

नवरा शिष्य आणि बायको गुरू हाही विचार योग्य नाही. इतर नाना प्रकारच्या भ्रष्टाचारासारखाच हा प्रकार आहे. (८)

प्रगट विवेक बोलेना। झांकातापा करी जनां।
मुख्य निश्चय अनुमाना। आणूंच नेदी ॥ ९ ॥

उघडपणे विवेक बोलत नाही आणि लोकांसमोर वेळ मारून नेतो. मुख्य आत्मज्ञानाचा निश्चय लोकांच्या अनुमानात आणूनच देत नाही. (९)

हुकीसरिसा भरीं भरे। विवेक सांगतां न धरे।
दुरीदृष्टीचे पुरे। साधु नव्हेती ॥ १० ॥

लहरीनुसार भरीला पडतो. आता विवेक शिकवायला गेले तरी ग्रहण करीत नाही. खरे साधू जसे दूरदृष्टीचे असतात, तसे भोंदू लोक असे नसतात. (१०)

कोण्हास कांहींच न मागावें। भगवद्भजन वाढवावें।
विवेकबळें जन लावावे। भजनाकडे ॥ ११ ॥

खरा साधू असेल, त्याने कोणाकडे काहीही मागू नये. लोकांत भगवद्भजन वाढवावे आणि विवेकाच्या बळावर लोकांना भजनाकडे लावावे. (११)

परांतर रक्षायाचीं कामें। बहुत कठिण विवेकवर्मे।
स्वइछेनें स्वधर्में। लोकराहाटी ॥ १२॥

दुसऱ्या लोकांचे अंत:करण राखावयाचे काम फार कठीण आहे. विवेकानेच त्यातील वर्म जाणून घ्यावे लागते. कारण लोक नेहमी स्वत:च्या इच्छेनुसार, त्यांच्या स्वभाव-धर्मानुसार वागत असतात अशी लोकराहाटीच आहे. (१२)

आपण तुरुक गुरु केला। शिष्य चांभार मेळविला।
नीच यातीनें नासला। समुदाव ॥१३॥

एखाद्याने मुसलमान गुरू केला आणि एखाद्या चांभाराला शिष्य केला, तर नीच यातीमुळे सर्व समुदायच भ्रष्ट होतो. (१३)

ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या। भक्तमंडळ्या मानाव्या।
संतमंडळ्या शोधाव्या। भूमंडळीं ॥ १४॥

ब्राह्मण मंडळ्या जमवाव्यात, भक्तांच्या समुदायास मान द्यावा आणि जगात संतमंडळीचा शोध घ्यावा. (१४)

उत्कट भव्य तेंचि घ्यावें। मळमळीत अवघेंचि टाकावें।
निस्पृहपणें विख्यात व्हावें। भूमंडळीं ॥ १५॥

जे जे उत्कट आणि भव्य असेल ते घ्यावे. जे मिळमिळीत असेल ते सर्व टाकावे आणि आपल्या नि:स्पृहपणाने जगात प्रसिद्धी मिळवावी. (१५)

अक्षर बरें वाचणें बरें। अर्थांतर सांगणें बरें।
गाणें नाचणें अवघेंचि बरें। पाठांतर ॥ १६॥

जो परमार्थी आणि विवेकी असतो त्याचे अक्षर चांगले असते. वाचणे चांगले असते. ग्रंथातील अर्थाची फोड करून सांगणे चांगले असते. गाणे, नाचणे, पाठांतर वगैरे सर्वच चांगले असते. (१६)

दीक्षा बरी मीत्री बरी। तीक्ष्ण बुधी राजकारणी बरी।
आपणास राखे नानापरी। अलिप्तपणें ॥ १७॥

त्याची दीक्षा चांगली असते, मैत्री चांगली असते, राजकारणात चालणारी तीक्ष्ण बुद्धी त्याच्याजवळ असते आणि तो नाना प्रकारे स्वत:ला अलिप्त ठेवतो. (१७)

अखंड हरिकथेचा छंदु। सकळांस लागे नामवेदु।
प्रगट जयाचा प्रबोधु। सूर्य जैसा ॥ १८॥

त्याला अखंड हरिकथेचा छंद लागलेला असतो. तो लोकांना नामाचा वेध लावतो. त्याचा प्रबोध, त्याचे ज्ञान सूर्यासारखे प्रगट असते. (१८)

दुर्जनासी राखों जाणे। सज्जनासी निवऊं जाणे।
सकळांचे मनीचें जाणे। ज्याचें त्यापरी ॥ १९॥

दुर्जनांना कसे संभाळावे हे तो जाणतो. सज्जनांना कसे निववावे हेही तो जाणतो. ज्याच्या जे मनात असेल, ते तसेच तो बरोबर जाणतो. (१९)

संगतीचें मनुष्य पालटे। उत्तम गुण तत्काळ उठे।
अखंड अभ्यासीं लगटे। समुदाव ॥ २०॥

त्याच्या संगतीत येणाऱ्या माणसात बदल घडून येतो. त्याच्या ठिकाणी उत्तम गुण उत्पन्न होऊ लागतात आणि लोकसमुदाय अखंड परमार्थाचा अभ्यास करू लागतो. (२०)

जेथें तेथें नित्य नवा। जनासी वाटे हा असावा।
परंतु लालचीचा गोवा। पडोंचि नेदी ॥ २१॥

तो जेथे जेथे जातो तेथे तेथे नित्यनवाच वाटतो. सर्व लोकांना तो असावा असे वाटते. परंतु तेथे लालचीच्या मोहात तो कधीही अडकत नाही. (२१)

उत्कट भक्ति उत्कट ज्ञान। उत्कट चातुर्य उत्कट भजन।
उत्कट योग अनुष्ठान। ठाईं ठाईं ॥ २२॥

त्याच्या ठिकाणची उत्कट भक्ती, उत्कट ज्ञान, उत्कट चातुर्य, उत्कट भजन, उत्कट योग, उत्कट अनुष्ठान ठायी ठायी प्रगट होत असते. (२२)

उत्कट निस्पृहता धरिली। त्याची कीर्ति दिगांतीं फांकली।
उत्कट भक्तीनें निवाली। जनमंडळी ॥ २३॥

त्याच्या उत्कट नि:स्पृहतेमुळे त्याची कीर्ती सर्व दिशांस पसरते आणि त्याच्या उत्कट भक्तीने लोकसमुदाय निवतो. (२३)

कांहीं येक उत्कटेविण। कीर्ति कदापि नव्हे जाण।
उगेंच वणवण हिंडोन। काये होतें ॥ २४॥

कुठलीही गोष्ट उत्कटतेने केल्याशिवाय कधीही कीर्ती मिळत नाही. उगीच वणवण हिंडून काय होणार? (२४)

नाहीं देह्याचा भरंवसा। केव्हां सरेल वयसा।
प्रसंग पडेल कैसा। कोण जाणे ॥ २५॥

आपल्या देहाचा भरवसा नसतो. आयुष्य केव्हा सरेल हे सांगता येत नाही. केव्हा कसा प्रसंग पडेल हे कोण जाणते? (२५)

याकारणे सावधान असावें। जितुकें होईल तितुकें करावें।
भगवत्कीर्तीनें भरावें। भूमंडळ ॥ २६ ॥

म्हणून माणसाने सावध असावे. आपल्या हातून जितके होईल तितके करत राहावे आणि भगवंताच्या कीर्तीने भूमंडळ भरून टाकावे. (२६)

आपणास जें जें अनकूळ। तें तें करावें तात्काळ।
होईना त्यास निवळ। विवेक उमजावा ॥ २७ ॥

आपल्याला अनुकूल असेल ते तत्काळ करावे. जे सहज होण्यासारखे नसेल त्यासंबंधी नीट विवेक करावा. (२७)

विवेकामधें सांपडेना। ऐसें तो कांहींच असेना।
येकांतीं विवेक अनुमाना। आणून सोडी ॥ २८ ॥

विवेकाच्या योगे उमजत नाही असे काहीही नसते. एकांतात बसून विवेक केला की अचूक अनुमान करता येते. (२८)

अखंड तजवीजा चाळणा जेथें। पाहातां काय उणें तेथें।
येकांतेंविण प्राणीयांतें। बुद्धि कैसी ॥ २९ ॥

जेथे अखंड योजना आखणे आणि प्रयत्न करणे चालू असते, तेथे काहीही उणे पडत नाही असे दिसून येते. एकांताशिवाय माणसाची बुद्धी काम करीत नाही. (२९)

येकांती विवेक करावा। आत्माराम वोळखावा।
येथून तेथवरी गोवा। कांहींच नाहीं ॥ ३० ॥

एकांतात विवेक करून आत्माराम ओळखावा. म्हणजे मग येथून तेथवर काहीच घोटाळा उरत नाही. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'बुद्धिवादनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.

❑❑

## दशक १९ : समास ७
## येत्ननिरूपण

॥ श्रीराम ॥

कथेचें घमंड भरून द्यावें। आणी निरूपणीं विवरावें।
उणें पडोंचि नेदावें। कोणीयेकविषीं ॥ १ ॥

महंताने थाटाची रंगतदार कथा करावी आणि अध्यात्म-निरूपण विवरून सांगावे. कोठेही उणेपणा येऊ देऊ नये. (१)

भेजणार खालें पडिला। तो भेजणारीं जाणितला।
नेणता लोक उगाच राहिला। टकमकां पाहात ॥ २ ॥

वक्ता वक्तृत्वात घसरला तर जे त्या विषयाचे ज्ञाते असतील त्यांनाच समजणार. नेणते लोक उगीच टकमका पाहात राहाणार. (२)

उत्तर विलंबी पडिलें। श्रोतयांस कळों आलें।
म्हणिजे महत्व उडालें। वक्तयाचें ॥ ३ ॥

एखाद्याने वक्त्याला प्रश्न विचारला आणि वक्त्याला उत्तर द्यायला विलंब झाला की श्रोते त्याची योग्यता जाणतात आणि मग वक्त्याचे महत्त्व राहात नाही. (३)

थोडें बोलोनी समाधान करणें। रागेजोन तरी मन धरणें।
मनुष्य वेधींच लावणें। कोणी येक ॥ ४ ॥

वक्त्याने थोडेच बोलावे, पण श्रोत्यांचे समाधान करावे. मनात राग आला तरी मन आवरून धरावे. मनुष्यांना आपल्याकडे आकर्षित करून घ्यावे. (४)

सोसवेना चिणचिणकेली। तेथें तामसवृत्ती दिसोन आली।
आवघी आवडी उडाली। श्रोतयाची ॥ ५ ॥

त्याला सहन न झाल्याने जर चिडचिड केली तर त्याची तामसी वृत्ती दिसून येते. मग श्रोत्यांची श्रवणाची सर्व आवडच नष्ट होते. (५)

कोण कोण राजी राखले। कोण कोण मनीं भंगिले।
क्षणक्षणां परीक्षिले। पाहिजे लोक ॥ ६ ॥

कोणकोण लोक संतुष्ट आहेत, कोणाकोणाचे अंत:करण दुखावले गेले आहे याचे वक्त्याने क्षणोक्षणी निरीक्षण, परीक्षण केले पाहिजे. (६)

शिष्य विकल्पें रान घेतो। गुरु मागें मागें धांवतो।
विचार पाहों जातां तो। विकल्पचि अवघा ॥ ७ ॥

एखाद्या शिष्याच्या मनात विकल्प आल्याने तो संदेहाच्या आडरानात शिरतो आणि गुरू त्याला समजाविण्यासाठी त्याच्या मागे मागे धावतो अशी स्थिती असेल तर विचार करून पाहिल्यावर तेथे अवघा विकल्पच भरून राहिला आहे हे कळते. (७)

आशाबद्धि क्रियाहीन। नाहीं च्यातुर्याचें लक्षण।
ते महंतीची भणभण। बंद नाहीं ॥८॥

जो आशाबद्ध, क्रियाहीन आणि अंगी चातुर्याचे एकही लक्षण नसलेला महंत असेल, त्याची महंती कटकटी निर्माण करते. त्याच्या वागण्याला धरबंद, मर्यादा राहात नाही. (८)

ऐसे गोसावी हळु पडती। ठाईं ठाईं कष्टी होती।
तेथें संगतीचे लोक पावती। सुख कैंचें ॥९॥

असे गोसावी, महंत त्यांचे महत्त्व घालवून बसतात आणि ठायी ठायी कष्टी होतात. ते स्वत: कष्टी होतात, तर त्यांच्या संगतीत असणाऱ्या लोकांना सुख कसे लाभणार? (९)

जिकडे तिकडे कीर्ति माजे। सगट लोकांस हव्यास उपजे।
लोक राजी राखोन कीजे। सकळ कांहीं ॥१०॥

जिकडे-तिकडे उत्तम कीर्ती होईल, सरसकट सर्व लोकांना हौस वाटेल, उत्साह वाटेल असे झाले पाहिजे. जे काही सर्व कार्य करायचे असेल ते लोकांना राजी राखून करावे. (१०)

परलोकीं वास करावा। समुदाव उगाच पाहावा।
मागण्याचा तगादा न लवावा। कांहीं येक ॥११॥

आपण परमात्म्याच्या अनुसंधानात राहावे आणि त्या भूमिकेवरून लोकांकडे पहावे. कुणाकडेही काहीही मागण्याचा तगादा लावू नये. (११)

जिकडे जग तिकडे जगन्नायेक। कळला पाहिजे विवेक।
रात्रीदिवस विवेकी लोक। सांभाळीत जाती ॥१२॥

जिकडे जग तिकडे जगन्नायक हा विवेक कळला पाहिजे. विवेकी लोक असतात ते रात्रंदिवस हा विवेक सांभाळत असतात. (१२)

जो जो लोक दृष्टीस पडिला। तो तो नष्ट ऐसा कळला।
अवघेच नष्ट येकला भला। काशावरूनी ॥१३॥

एखाद्याचा स्वभाव असा असतो की, त्याला जे जे लोक दिसतात ते नष्टच वाटतात, कुणीही चांगला वाटत नाही. सर्व लोक नष्ट आणि हा एकटाच भला हे कशावरून? (१३)

वोस मुलकीं काये पाहावें। लोकांवेगळें कोठें राहावें।
तऱ्हे खोटी सांडतें घ्यावें। कांहीं येक ॥१४॥

ओसाड मुलुखात जाऊन काय पाहावे? लोकांशिवाय कोठे राहावे? तऱ्हेवाईकपणा, अभिमान खोटा असतो. थोडे तरी पडते घ्यावे. (१४)

तस्मात लोकिकीं वर्ततां नये। त्यास महंती कामा नये।
परत्र साधनाचा उपाये। श्रवण करून असावें॥१५॥

म्हणून ज्याला चारचौघात नीट वागता येत नाही, त्यास महंती उपयोगी पडत नाही. त्याने अध्यात्माचे श्रवण करून परमार्थ साधण्याचा उपाय करावा.(१५)

आपणासीं बरें पोहतां न ये। लोक बुडवावयाचें कोण कार्य।
गोडी आवडी वायां जाये। विकल्पचि अवघा ॥१६॥

आपल्याला नीट पोहायला येत नसेल, तर लोकांना वाचविण्याचा प्रयत्न करणे म्हणजे त्यांना बुडवून मारण्यासारखेच आहे. अशा महंताच्या नादी जे लागतात, त्यांची परमार्थाची आवड आणि गोडी नाहीशी होऊन त्यांच्या मनातही सर्व विकल्पच उत्पन्न होतो. (१६)

अभ्यासें प्रगट व्हावें। नाहीं तरी झांकोन असावें।
प्रगट होऊन नासावें। हें बरें नव्हे ॥१७॥

महंताने अभ्यासाने (त्याच्या अंगच्या गुणाने) प्रकट व्हावे, नाहीतर एकांतात राहावे. पण प्रकट होऊन नासावे, हे बरे नव्हे. (१७)

मंद हळु हळु चालतो। चपळ कैसा अटोपतो।
अरबी फिरवणार तो। कैसा असावा ॥१८॥

जो मंद घोड्यालाही कसाबसा हळूहळू चालवतो, तो चपळ अरबी घोड्याला कसा आवरू शकेल बरे?(१८)

हे धकाधकीचीं कामें। तिक्षण बुद्धीचीं वर्में।
भोळ्या भावार्थें संभ्रमें। कैसें घडे ॥१९॥

महंती हे धकाधकीचे काम आहे. तीक्ष्ण बुद्धी असल्याशिवाय ते होऊ शकत नाही. त्याशिवाय त्यातील वर्म कळत नाही. तेथे भोळ्या भावार्थाने संभ्रमात पडावे लागते. कार्य होऊ शकत नाही. (१९)

सेत केलें परी वाहेना। जवार केलें परी फिरेना।
जन मेळविलें परी धरेना। अंतर्यामीं ॥ २० ॥

एखाद्याने शेत केले पण निगा राखली नाही, जवाहिराचा व्यापार केला, पण तो फिरला नाही, तर कार्य होऊ शकत नाही.. त्याप्रमाणे एखादा कार्यकर्ता लोकसंग्रह करतो, पण त्यांना तो अंतर्यामी संतुष्ट करू शकत नसेल, तर लोकसंग्रह टिकू शकत नाही. (२०)

जरी चढती वाढती आवडी उठे। तरी परमार्थ प्रगटे।
घसघस करितां विटे। सगट लोकु ॥ २१ ॥

जर लोकांच्या ठिकाणी चढती-वाढती आवड उत्पन्न झाली तरच परमार्थ साधू शकतो, प्रगट होऊ शकतो. घसघस केल्याने सर्व लोक कंटाळतात. (२१)

आपलें लोकांस मानेना। लोकांचें आपणांस मानेना।
अवघा विकल्पची मना। समाधान कैंचें ॥ २२ ॥

आपले लोकांना मान्य होत नाही, लोकांचे आपल्याला मान्य होत नाही, तेथे परस्परांविषयी विकल्पच निर्माण होतो. मग तेथे समाधान कसे असेल? (२२)

नासक दीक्षा सिंतरु लोक। तेथें कैंचा असेल विवेक।
जेथें बळावला अविवेक। तेथें राहणें खोटें ॥ २३ ॥

भोंदूपणाची दीक्षा आणि फसवे ठक लोक, मग तेथे विवेक कसा असेल? आणि जेथे असा अविवेक बळावतो, तेथे राहाणेच खोटे होय. (२३)

बहुत दिवस श्रम केला। सेवटीं अवघाचि वेर्थ गेला।
आपणास ठाकेना गल्बला। कोणें करावा ॥ २४ ॥

अनेक दिवस केलेले कष्ट शेवटी व्यर्थ ठरतात. आपल्याला जर लोकांचा गलबला सोसत नसेल, तर लोकसंग्रह करण्याच्या भानगडीत पडूच नये. (२४)

संगीत चालिला तरी तो व्याप। नाहीं तरी अवघाचि संताप।
क्षणक्षणा विक्षेप। किती म्हणौनि सांगावा॥ २५॥

एखादे कार्य सुरळित व्यवस्थितपणे चालले, तर तो व्याप ठरतो, नाहीतर मग अवघाच संताप ठरतो. त्यात क्षणोक्षणी इतके विक्षेप म्हणजे अडथळे येतात की किती म्हणून सांगावेत? (२५)

मूर्ख मूर्खपणें भरंगळती। ज्ञाते ज्ञातेपणें कळ्हो करिती।
होते दोहींकडे फजीती। लोकांमधें ॥ २६ ॥

समाजातील मूर्ख माणसे असतात ती मूर्खपणाने भरकटतात आणि ज्ञाते, शहाणे असतात ते शहाणपणाच्या अभिमानाने भांडत बसतात आणि मधल्यामध्ये महंताची मात्र लोकांत फजिती होते. (२६)

कारबार आटोपेना करवेना। आणि उगेंहि राहेना।
याकारणें सकळ जना। काये म्हणावें ॥ २७ ॥

त्याला कारभार आटोपत नाही, नीट व्यवस्थित करता येत नाही आणि गप्पही राहावत नाही, स्वस्थही बसवत नाही. अशा या सर्व लोकांना काय म्हणावे? (२७)

नासक उपाधीस सोडावें। वय सार्थकीं घालावें।
परिभ्रमणें कठावें। कोठें तरी ॥ २८ ॥

असली नासकी उपाधी सोडावी आणि आपल्या आयुष्याचे सार्थक करावे, परिभ्रमण करून कोठे तरी आयुष्याचा काळ कंठावा. (२८)

परिभ्रमण करीना। दुसऱ्याचें कांहींच सोसीना।
तरी मग उदंड यातना। विकल्पाची ॥ २९ ॥

परिभ्रमणही करीत नाही आणि दुसऱ्याचे वागणे-बोलणेही सहन करीत नाही. अशा माणसाला विकल्पामुळे उदंड यातना सोसाव्या लागतात. (२९)

आतां हें आपणाचिपासीं। बरें विचारावें आपणासी।
अनकूळ पडेल तैसी। वर्तणूक करावी ॥ ३० ॥

आता हे सर्व आपल्यावरच अवलंबून असते. आपण आपल्याशीच नीट विचार करावा आणि जे काही आपल्याला अनुकूल वाटेल, त्याप्रमाणे वर्तणूक करावी. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'येत्ननिरूपणनाम' समास सातवा समाप्त.

❑❑

## दशक १९ : समास ८
## उपाधीलक्षणनिरूपण

॥ श्रीराम ॥

**सृष्टिमधें बहु लोक। परिभ्रमणें कळे कौतुक।**
**नाना प्रकारीचे विवेक। आडळों लागती ॥ १॥**

सृष्टीमध्ये अनेक लोक आहेत. परिभ्रमण केल्याने त्यांचे कौतुक पाहायला मिळते आणि नाना प्रकारचे विचारही आपल्या नजरेस पडू लागतात. (१)

**किती प्रपंची जन। अखंड वृत्ति उदासीन।**
**सुखदुःखें समाधान। दंडळेना ॥ २॥**

कित्येक प्रापंचिक लोक असे असतात की, त्यांची वृत्ती अखंड उदासीन असते. ते अलिप्तपणे वागत असतात आणि सुख-दुःखामुळे त्यांचे समाधान जराही ढळत नाही. (२)

**स्वभावेंचि नेमक बोलती। सहजचि नेमक चालती।**
**अपूर्व बोलण्याची स्थिती। सकळांसि माने ॥ ३॥**

ते स्वाभाविकच अत्यंत मोजके बोलतात, सहजच नियमितपणाने वागतात आणि त्यांची बोलण्याची पद्धती तर अशी अपूर्व असते की ती सर्वांनाच मान्य होते, आवडते. (३)

**सहजचि ताळज्ञान येतें। स्वभावेंचि रागज्ञान उमटतें।**
**सहजचि कळत जातें। न्यायेनीतिलक्षण ॥ ४॥**

त्यांना सहजच तालाचे ज्ञान असते. स्वाभाविकपणे रागाचे ज्ञान प्रगट होते आणि सहजच त्यांच्या ठिकाणी न्याय आणि नीतीचे लक्षण आढळून येते. (४)

**येखादा आडळे गाजी। सकळ लोक अखंड राजी।**
**सदा सर्वदा आवडी ताजी। प्राणीमात्रांची ॥ ५॥**

एखादा असा पराक्रमी पुरुष आढळतो की सगळे लोक त्याच्यावर अखंड खूष असतात. प्राणिमात्रांना त्याच्याविषयी नित्य नवी आवड वाटत असते. (५)

**चुकोन उदंड आडळतें। भारी मनुष्य दृष्टीसी पडतें।**
**महंताचें लक्षणसें वाटतें। अकस्मात ॥ ६॥**

एखादे वेळी असे चुकून घडते की फार मोठा ठेवा हाती लागतो. एखादी अशी थोर व्यक्ती दृष्टीस पडते की, महंताची सर्व लक्षणे त्याच्या ठिकाणी आहेत असे वाटू लागते. (६)

**ऐसा आडळतां लोक। चमत्कारें गुणग्राहिक।**
**क्रिया बोलणें नेमक। प्रत्ययाचे ॥ ७॥**

अशी व्यक्ती चमत्कार वाटावा अशी गुणग्राहक असते. त्याचे बोलणे अनुभवाचे आणि निश्चयात्मक आणि मोजके असते. (७)

**सकळ अवगुणामधें अवगुण। आपले अवगुण वाटती गुण।**
**मोठें पाप करंटपण। चुकेना कीं ॥ ८॥**

सगळ्या अवगुणांमध्ये मोठा अवगुण कुठला असेल तर आपले अवगुण हेच गुण वाटू लागतात हा होय. हे फार मोठे पाप असून त्यामुळे करंटेपण आल्याशिवाय राहात नाही. (८)

**ढाळेंचि काम होतें सदा। जें जपल्यानें नव्हे सर्वदा।**
**तेथें पीळपेंचाची आपदा। आडळेचिना ॥ ९॥**

जे काम नेहमी तेजस्वीपणाने अथवा तडजोडीने होते ते काम भिडस्तपणाने अथवा जपून काळजीपूर्वक केल्यानेही होईलच असे कधी सांगता येत नाही. सहज जेव्हा काम होते तेव्हा त्यात पेचप्रसंग, अडथळे वगैरे आढळून येतच नाहीत. (९)

**येकासी अभ्यासितां न ये। येकासी स्वभावेंचि ये।**
**ऐसा भगवंताचा महिमा काये। कैसा कळेना ॥ १०॥**

एखाद्याला खूप प्रयत्नानिशी जे काम करता येत नाही ते एखाद्याला अगदी सहजपणे स्वाभाविकरीत्या जमते. असा हा भगवंताचा महिमा असतो. तो कसा आणि का हे कळून येत नाही. (१०)

**मोठीं राजकारणें चुकती। राजकारणीं वेढां लागती।**
**नाना चुकीची फजीती। चहुंकडे ॥ ११॥**

राजकारणात एखादी मोठी चूक झाली, तर त्या राजकारणाने अनेक माणसे वेढली जातात, संकटात सापडतात. या चुकीमुळे चहूकडे नाना प्रकारे फजिती होते. (११)

याकारणें चुकों नये। म्हणिजे उदंड उपाये।
उपायाचा अपाये। चुकतां होये ॥ १२॥

यासाठी चूक होऊ नये म्हणून उदंड उपाय करावेत. चूक झाली तर उपायाचाच अपाय होतो. (१२)

काये चुकलें तें कळेना। मनुष्याचें मनचि वळेना।
खवळला अभिमान गळेना। दोहिंकडे ॥ १३॥

काय चुकले हेच कळत नाही. ज्या माणसाशी राजकारण चालू असते त्याचे मन काही केल्या वळत नाही आणि दोन्ही बाजूचा अभिमान खवळतो तो काही केल्या कमी होत नाही. (१३)

आवघे फडचि नासती। लोकांचीं मनें भंगती।
कोठें चुकते युक्ती। कांहीं कळेना ॥ १४॥

यामुळे सगळे राजकारणच बिघडते. सर्व लोकांची मने दुखावली जातात आणि तरी युक्तीत कोठे चूक होते, हे कळत नाही. (१४)

व्यापेंविण आटोप केला। तो अवघा घसरतचि गेला।
अकलेचा बंद नाहीं घातला। दुरीदृष्टीनें ॥ १५॥

व्याप सांभाळता येत नसताना जो खटाटोप केला, तो सर्व घसरतच गेला. दूरदृष्टीने अकलेला पायबंद घातला नाही. (१५)

येखादें मनुष्य तें सिळें। त्याचें करणेंचि बावळें।
नाना विकल्पाचें जाळें। करून टाकी ॥ १६॥

एखादा माणूसच उत्साहरहित असतो. कर्तृत्वहीन असतो. सर्व करणे बावळटपणाचे असते. त्यामुळे तो कामात घोटाळ्याचे जाळेच निर्माण करतो. (१६)

तें आपणासी उकलेना। दुसऱ्यास कांहींच कळेना।
नाचे विकल्पें कल्पना। ठाईं ठाईं ॥ १७॥

ते त्याचे त्यालाही उकलत नाही. दुसऱ्यालाही ते कळत नाही. आणि विकल्पामुळे नाना कल्पना मात्र थैमान घालतात. (१७)

त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या। कोणें येऊन अटोपाव्या।
ज्याच्या त्यानें कराव्या। बळकट बुद्धि ॥ १८॥

त्याच्या मनातील त्या गुप्त कल्पना कोणाला कशा कळाव्यात? आणि त्यांना कोण कसा आवरणार? बळकट बुद्धी करून ज्याच्या त्यानेच त्या आवरल्या पाहिजेत. (१८)

ज्यासी उपाधी आवरेना। तेणें उपाधी वाढवावीना।
सावचित करूनियां मना। समाधानें असावें ॥ १९॥

ज्याला उपाधी आवरणे जमत नसेल, त्याने उपाधी वाढवूच नयेत. आपले मन स्वस्थ ठेवून त्याने समाधानाने राहावे. (१९)

धांवधावों उपाधी वेष्टी। आपण कष्टी लोकहि कष्टी।
हे कामा नये गोष्टी। कुसमुसेची ॥ २०॥

घाईगर्दीने काम करू लागले की ती उपाधी वेढून टाकते. कामाचा विचका होतो. त्यामुळे तो स्वत: कष्टी होतो आणि इतरांनाही कष्टी करतो. अशा रीतीने चरफडत काम करणे चांगले नाही. (२०)

लोक बहुत कष्टी जाला। आपणहि अत्यंत त्रासला।
वेर्थचि केला गल्बला। कासयासी ॥ २१॥

अनेक लोक कष्टी झाले. स्वत: करणाराही अत्यंत त्रासला. हा सर्व गलबला कशासाठी केला? (२१)

असो उपाधीचे काम ऐसें। कांहीं बरें कांहीं काणोसें।
सकळ समजोन ऐसें। वर्ततां बरें ॥ २२॥

असो. उपाधीचे कामच असे असते. काही बरे असते, काही त्रासदायक असते. हे सर्व आधी समजून घेऊन त्याप्रमाणे वागावे म्हणजे बरे. (२२)

लोकांपासीं भावार्थ कैंचा। आपण जगवावा तयांचा।
सेवट उपंढर कोणाचा। पडोंचि नये ॥ २३॥

लोकांचा भावार्थ कसा आहे, हे जाणून त्यांना त्याप्रमाणे चेतवावे लागते. शेवटी कोणाचाही दंभस्फोट, फजिती होऊ देऊ नये. (२३)

अंतरात्म्याकडे सकळ लगे। निर्गुणीं हें कांहींच न लगे।
नाना प्रकारीचे दगे। चंचळामधें ॥ २४॥

ह्या सर्व गोष्टी अंतरात्म्याकडे लागतात. निर्गुणाकडे हे काहीच लागत नाही. नाना प्रकारचे धोके सर्व चंचळामध्येच असतात. (२४)

शुद्ध विश्रांतीचें स्थळ। तें येक निर्मळ निश्चळ।
तेथें विकारचि सकळ। निर्विकार होती ॥ २५॥

एक निर्मळ, निश्चळ परब्रह्म हेच शुद्ध विश्रांतीचे स्थळ आहे. तेथे सर्व विकार निर्विकार होतात. (२५)

**उद्वेग अवघे तुटोनि जाती । मनासी वाटे विश्रांती ।**
**ऐसी दुल्लभ परब्रह्मस्थिती । विवेकें सांभाळावी ॥ २६ ॥**

त्या ठिकाणी सर्व उद्वेग नष्ट होतात. मनाला विश्रांती लाभते. अशी ही दुर्लभ परब्रह्मस्थिती विवेकाने जतन करावी. (२६)

**आपणास उपाधी मुळींचनाहीं । रुणानबंधें मिळाले सर्वहि ।**
**आल्यागेल्याची क्षितीनाहीं । ऐसें जाले पाहिजे ॥ २७ ॥**

आपल्याला उपाधी मुळातच नाही, ऋणानुबंधाने एकमेकांच्या गाठी पडतात, सर्व भेटतात, कुणी येवो वा जावो त्याची पर्वा नाही, असे व्हायला पाहिजे. (२७)

**जो उपाधीस कंटाळला । तो निवांत होऊन बैसला ।**
**आटोपेना तो गल्बला । कासयासी ॥ २८ ॥**

जो उपाधीला कंटाळतो, तो स्वस्वरूपी निवांत होऊन राहातो. जो आपल्याला आटोपत नाही असा गलबला, व्याप कशासाठी करावा? (२८)

**कांहीं गल्बला कांहीं निवळ । ऐसा कंठीत जावा काळ ।**
**जेणेंकरितां विश्रांती वेळ । आपणासी फावे ॥ २९ ॥**

माणसाने काही गलबला, तर शांत राहून काही काळ कंठीत जावा, यामुळे आपल्याला विश्रांतीसाठी वेळ मिळतो. (२९)

**उपाधी कांहीं राहात नाहीं । समाधानायेवढें थोर नाहीं ।**
**नरदेहे प्राप्त होत नाहीं । क्षणक्षणां ॥ ३० ॥**

उपाधी काही टिकू शकत नाही. ती अशाश्वतच असते. आणि समाधानासारखे श्रेष्ठ दुसरे काही नाही. नरदेह काही वारंवार प्राप्त होत नाही. (म्हणून आयुष्यातील राहिलेला काळ तरी सार्थकी लावावा आणि शाश्वत समाधान प्राप्त करून घ्यावे.) (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'उपाधीलक्षणनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑❑

## दशक १९ : समास ९
## राजकारणनिरूपण

॥ श्रीराम ॥

**ज्ञानी आणी उदास । समुदायाचा हव्यास ।**
**तेणें अखंड सावकाश । येकांत सेवावा ॥ १ ॥**

जो ज्ञानी आणि वैराग्यसंपन्न पुरुष असतो, त्याला जर लोकसंग्रह करण्याचा हव्यास असेल, तर प्रथम त्याने अखंड सावकाश एकांत सेवन करावा. (१)

**जेथें तजवीजा कळती । अखंड चाळणा निघती ।**
**प्राणीमात्रांची स्थिती गती । कळों येते ॥ २ ॥**

एकांतात युक्ती-प्रयुक्ती सुचतात. अखंड चिंतन आणि चर्चा होतात, आणि लोकांची स्थिती-गतीही कळून येते. (२)

**जरी हा चाळणाचि करीना । तरी कांहींच उमजेना ।**
**हिसेबझाडाचि पाहीना । दिवाळखोर ॥ ३ ॥**

जर त्याने चिंतन, चर्चा इत्यादी काहीच केले नाही, तर त्याला काहीच उमजत नाही. दिवाळखोर माणूस जसा हिशेब पाहातच नाही, तसाच हा प्रकार घडतो. (३)

**येक मिरासी साधिती । येक सीध्या गवाविती ।**
**व्यापकपणाची स्थिती । ऐसी आहे ॥ ४ ॥**

एखादा विवेकाने वागून इनामी वतन मिळवतो, तर दुसरा कुणी मूर्खपणामुळे पूर्वीपासून असलेले गमावतो. सर्व गोष्टींचा विचार करून वागण्याची स्थिती अशी आहे. (४)

**जेणें जें जें मनीं धरिलें । तें तें आधींच समजलें ।**
**कृत्रिम अवघेंचि खुंटलें । सहजचि येणें ॥ ५ ॥**

दुसऱ्याच्या मनात जे जे काही असेल ते ते जर आधीच समजले, तर दुसऱ्याला कपट करताच येत नाही. सहजच कृत्रिमपणे वागणेच खुंटते. (५)

**अखंड राहातां सलगी होते । अतिपरिचयें अवज्ञा घडते ।**
**याकारणें विश्रांती ते । घेतां नये ॥ ६ ॥**

अखंड एका ठिकाणी राहिल्याने काही लोकांशी सलगी होते आणि अति परिचयाने अवज्ञा होते. म्हणून एकाच स्थळी फार काळ राहूच नये. (६)

आळसें आळस केला। तरी मग कारबारचि बुडाला।
अंतरहेत चुकत गेला। समुदायाचा ॥ ७॥

आळसाने कामाचा आळस केला, तर सर्व कारभार बुडतो आणि मनातील लोकसंग्रहाचा हेतू राहूनच जातो. (७)

उदंड उपासनेचीं कामें। लावीत जावीं नित्यनेमें।
अवकाश कैंचा कृत्रिमें। करावयासी ॥ ८॥

लोकांच्या मागे उपासनेची उदंड कामे नित्यनेमाने लावून द्यावीत म्हणजे त्यांना लबाडी करायला अवसरच मिळत नाही. (८)

चोर भांडारी करावा। घसरतांच सांभाळावा।
गोवा मूर्खपणाचा काढावा। हळु हळु ॥ ९॥

चोरालाच भांडारी करावे आणि त्याच्या हातून काही चुकले तर त्याला सांभाळून घ्यावे आणि त्याला हळूहळू शिकवून मूर्खपणाच्या गुंत्यातून मोकळे करावे. (९)

या अवघ्या पहिल्याच गोष्टी। प्राणी कोणी नव्हता कष्टी।
राजकारणें मंडळ वेष्टी। चहुंकडे ॥ १०॥

या सर्व पूर्वीच्याच गोष्टी आहेत. कुणाही प्राण्याला कष्टी न होऊ देता मुत्सद्देगिरीने चहूकडील लोकांना आपल्याकडे आकर्षित करून घ्यावे. (१०)

नष्टासी नष्ट योजावे। वाचाळासी वाचाळ आणावे।
आपणावरी विकल्पाचे गोवे। पडोंच नेदी॥ ११॥

नष्ट माणसाची दुसऱ्या नष्ट माणसाशी गाठ घालून द्यावी. वाचाळाची दुसऱ्या वाचाळाशी गाठ घालावी. आपल्याबद्दल संशय निर्माण होईल, असे वागूच नये. (११)

कांटीने कांटी झाडावी। झाडावी परी ते कळों नेदावी।
कळकटेपणाची पदवी। असों द्यावी ॥ १२॥

काट्याने काटा काढावा, पण हे कळू देऊ नये. गबाळेपणाचा किंवा अजाणतेपणाचा आपल्याबद्दल असलेला समज तसाच राहू द्यावा. (१२)

न कळतां करी कार्य जें तें। तें काम तत्काळचि होतें।
गचगचेंत पडतां तें। चमत्कारें नव्हे ॥ १३॥

जे काम गुपचूप कोणाला कळू न देता केले जाते, ते त्वरित होते. गवगवा झाला, तर मग लोकांना त्याचे महत्त्व वाटत नाही. (१३)

ऐकोनी आवडी लागावी। देखोनी बळकटचि व्हावी।
सलगीनें आपली पदवी। सेवकामधें ॥ १४॥

महंत असा असावा की, त्याच्याविषयी ऐकूनच लोकांना त्याला पाहाण्याची आवड उत्पन्न व्हावी आणि प्रत्यक्ष तो दिसल्यावर ती आवड अधिकच बळकट व्हावी. आत्मीयतेमुळे सेवकांना त्याच्याविषयी परकेपणा वाटू नये, असे त्याने वागावे. (१४)

कोणीयेक काम करितां होतें। न करितां तें मागें पडतें।
याकारणें ढिलेपण तें। असोंचि नये ॥ १५॥

कुठलेही काम केल्यानेच ते होते. जर केलेच नाही तर ते मागे पडते अथवा राहून जाते. म्हणून काम करण्यात ढिलेपणा म्हणजे दिरंगाई नसावी. (१५)

जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला।
जो आपणचि कष्टत गेला। तोचि भला ॥ १६॥

जो दुसऱ्यावर जास्त विश्वास टाकतो, त्याचा कार्यभाग बुडतो. जो स्वत: कष्ट करतो तोच भला होय. (१६)

अवघ्यास अवघें कळलें। तेव्हां तें रितें पडिलें।
याकारणें ऐसें घडलें। न पाहिजे कीं ॥ १७॥

जे काम करावयाचे असेल त्याविषयी सर्वांनाच सर्व काही कळले तर ते उघड होते. म्हणून असे घडणार नाही हे पहावे. (१७)

मुख्य सूत्र हातीं घ्यावें। करणें तें लोकांकरवीं करवावें।
कित्तेक खलक उगवावें। राजकारणामधें ॥ १८॥

मुख्य सूत्र महंताने आपल्या हाती ठेवावे आणि लोकांकडून काम करवून घ्यावे. राजकारणामध्ये कित्येक धूर्त लोक एकत्र जमवावेत. (१८)

बोलके पहिलवान कळकटे। तयासीच घ्यावे झटे।
दुर्जनें राजकारण दाटे। ऐसें न करावें ॥ १९॥

जे बोलके वादपटू धूर्त लोक असतील त्यांच्याशी झुंज द्यावी आणि त्यांना नामोहरम करावे. दुर्जनांच्यामुळे राजकारण अडले, असे होऊ देऊ नये. (१९)

ग्रामण्य वर्मी सांपडावें। रगडून पीठचि करावें।
करूनि मागुती सांवरावें। बुडऊं नये ॥ २०॥

गावगुंडांना वर्मी पकडून त्यांची मस्ती जिरवावी. इतरत्र त्यांचा उपयोग करता येण्यासारखा असल्याने त्यांना आपलेसे करून ठेवावे. त्यांना बुडवू नये. (२०)

**खळदुर्जनासी भ्यालें। राजकारण नाहीं राखिलें।**
**तेणें अवघें प्रगट जालें। बरें वाईट ॥ २१ ॥**

दुष्ट आणि दुर्जन यांना भिऊन आपण आपले राजकारण जर सांभाळले नाही, तर बरे-वाईट सर्व प्रगट होऊन कार्याचा नाश होईल. (२१)

**समुदाव पाहिजे मोठा। तरी तनावा असाव्या बळकटा।**
**मठ करुनी ताठा। धरूं नये ॥ २२ ॥**

मोठा लोकसंग्रह करायचा असेल, तर तंबूच्या दोऱ्या अर्थात व्यापाची शक्ती, साह्य करणारी माणसे बळकट, खंबीर असावी लागतात. मठ करून महंतीचा गर्व धरू नये. (२२)

**दुर्जन प्राणी समजावे। परी ते प्रगट न करावे।**
**सज्जनापरीस आळवावे। महत्त्व देउनी ॥ २३ ॥**

दुर्जन लोक कोण आहेत, हे समजून घ्यावे, पण ते प्रगट करू नये. त्यांना महत्त्व देऊन सज्जनांच्या सारखेच आळवावे. (२३)

**जनामधें दुर्जन प्रगट। तरी मग अखंड खटखट।**
**याकारणें ते वाट। बुझून टाकावी ॥ २४ ॥**

जर लोकांत आपण त्यांचा दुर्जनपणा प्रगट केला, तर मग आपल्या कार्यात अखंड कटकट निर्माण होते. म्हणून ती वाटच बुजवून टाकावी. (२४)

**गनीमाच्या देखतां फौजा। रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा।**
**ऐसा पाहिजे कीं राजा। कैपक्षी परमार्थी ॥ २५ ॥**

शत्रूंच्या फौजा पाहिल्या की रणशूर असतात त्याचे बाहू, भुजा स्फुरण पावू लागतात. मात्र राजा परमार्थाचा कैवारी असा असावा. (२५)

**तयास देखतां दुर्जन धाके। बैसवी प्रचीतीचे तडाखे।**
**बंड पाषांडाचे वाखे। सहजचि होती ॥ २६ ॥**

त्याला पाहताच दुर्जनांना त्याचा धाक वाटावा आणि त्याने दुर्जनांना मारलेल्या तडाख्याच्या अनुभवामुळे बंड आणि पाखंड यांची सहज धूळधाण व्हावी. (२६)

**हे धूर्तपणाचीं कामें। राजकारण करावें नेमें।**
**ढिलेपणाच्या संभ्रमें। जाऊं नये ॥ २७ ॥**

ही सर्व चातुर्याची कामे आहेत. राजकारणात अगदी व्यवस्थित नियंत्रितपणाने राजकारण करावे लागते. त्यात ढिलेपणाच्या भ्रमाने वागून चालत नाही. (२७)

**कोठेंच पडेना दृष्टीं। ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी।**
**वाग्विळासें सकळ सृष्टी। वेधिली तेणें ॥ २८ ॥**

असा राजकारणी महंत लोकांच्या सहसा दृष्टीसच पडत नाही. पण ठायी ठायी त्याच्यासंबंधीच गोष्टी चालतात. त्याने आपल्या वक्तृत्वाने सर्व जग (सृष्टी) आपल्याकडे आकर्षित करून घेतलेले असते. (२८)

**हुंब्यासी हुंबा लाऊन द्यावा। टोणप्यास टोणपा आणावा।**
**लौंदास पुढें उभा करावा। दुसरा लौंद ॥ २९ ॥**

गुरगुरणाऱ्यापुढे दुसरा गुरगुरणारा उभा करावा. टोणप्यापुढे म्हणजे मूर्खापुढे दुसरा मूर्ख योजावा. गलेलठ्ठ माणसाची गाठ दुसऱ्या गलेलठ्ठ माणसाशी घालून द्यावी. (२९)

**धटासी आणावा धट। उद्धटासी पाहिजे उद्धट।**
**खटनटासी खटनट। अगत्य करी ॥ ३० ॥**

दांडग्यासाठी दुसरा दांडगा योजावा. उर्मट माणसास दुसरा उर्मटच योजला पाहिजे. लुच्चा असेल त्यास दुसऱ्या लुच्च्या माणसासमोर उभे करावे. याप्रमाणे जशास तसे अगत्य योजावे. (३०)

**जैशास तैसा जेव्हां भेटे। तेव्हां मज्यालसी थाटे।**
**इतुकें होतें परी धनी कोठें। दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥**

जशास तसे भेटले की मग सभेला रंग भरतो. पण इतके झाले तरी मूळ मालक कोठे आहे, हे मात्र लोकांच्या दृष्टीस पडू देऊ नये. (३१)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'राजकारणनिरूपणनाम' समास नववा समाप्त.**

❑ ❑

## दशक १९ : समास १०
## विवेकलक्षणनिरूपण

॥ श्रीराम ॥

जेथें अखंड नानाचाळणा। जेथें अखंड नाना धारणा।
जेथें अखंड राजकारणा। मनासी आणिती ॥ १ ॥

जेथे राजकारणी महंत असतो, त्या ठिकाणी अखंड नाना विषयांवर विचारविनिमय चालू असतो. तेथे अखंड नाना विषयांवर एकाग्रतेने चिंतन केले जाते आणि अखंड राजकारणासंबंधी चर्चा चालते. (१)

सृष्टीमधें उत्तम गुण। तितुकें चाले निरूपण।
निरूपणाविण क्षण। रिकामा नाहीं ॥ २ ॥

सृष्टीमध्ये जितके म्हणून उत्तम गुण आहेत, त्यांच्यावर तेथे निरूपण चालते. निरूपणाशिवाय एक क्षणही रिकामा जात नाही. (२)

चर्चा आशंका प्रत्योत्तरें। कोण खोटें कोण खरें।
नाना वग्त्रुत्वें शास्त्राधारें। नाना चर्चा ॥ ३ ॥

तेथे नित्य चर्चा, शंका आणि त्यांची प्रत्युत्तरे, खरे कोण, खोटे कोण अशा अनेक प्रकारच्या चर्चा शास्त्राधारे केल्या जातात. नाना वक्तृत्वे होतात. (३)

भक्तिमार्ग विशद कळे। उपासनामार्ग आकळे।
ज्ञानविचार निवळे। अंतर्यामीं ॥ ४ ॥

तेथे भक्तिमार्गाचे स्वरूप स्पष्ट केले जाते. उपासना कशी करावी हे कळते आणि श्रोत्यांच्या मनात, ज्ञानाचा विचार दृढपणे बिंबतो. (४)

वैराग्याची बहु आवडी। उदास वृत्तीची गोडी।
उदंड उपाधी तरी सोडी। लागोंच नेदी ॥ ५ ॥

त्याला वैराग्याची अत्यंत आवड असते, अलिप्तता त्याला गोड वाटते आणि उदंड उपाधी त्याच्या मागे असली, तरी तो अलिप्ततेचा वियोग होऊ देत नाही. (५)

प्रबंदाचीं पाठांतरे। उत्तरासी संगीत उत्तरें।
नेमक बोलतां अंतरें। निववी सकळांचीं ॥ ६ ॥

त्या महंताला अनेक प्रबंध पाठ असतात. कुणी प्रश्न विचारले तर त्यांची अत्यंत समर्पक उत्तरे तो देतो. तो मोजके पण नेमस्त बोलतो. त्यामुळे सगळ्यांच्या अंत:करणाला संतोष होतो. (६)

आवडी लागली बहु जना। तेथें कोणाचें कांही चालेना।
दळवट पडिला अनुमाना। येईल कैसा ॥ ७ ॥

अनेक लोकांना त्याच्याविषयी प्रेम वाटू लागते. त्यामुळे त्याच्यापुढे कोणाचे काही चालत नाही. त्याच्याभोवती अनुयायांची गर्दी होते, तरी कोणालाही त्याचे आकलन होत नाही. (७)

उपासना करूनियां पुढें। पुरवलें पाहिजे चहुंकडे।
भूमंडळीं जिकडे तिकडे। जाणती तया ॥ ८ ॥

तो स्वत: उपासना करतो आणि चहूकडे उपासनेचा सर्व लोकांमध्ये प्रचार करतो. त्यामुळे या भूमंडळावरील ठिकठिकाणचे लोक त्याला ओळखतात. (८)

जाणती परी आडळेना। काये करितो तें कळेना।
नाना देसीचे लोक नाना। येऊन जाती ॥ ९ ॥

त्याला जाणतात पण तो त्यांना कुठे आढळतच नाही आणि तो काय करतो, हेही त्यांना कळत नाही. नाना देशातील नाना लोक त्याला भेटण्यासाठी येऊन जातात. (९)

तितुक्यांची अंतरें धरावीं। विवेकें विचारें भरावीं।
कडोविकडीचीं विवरावीं। अंत:कर्णे ॥ १० ॥

जितके लोक येतात तितक्यांची अंत:करणे तो राखतो. ती विवेकाने आणि विचारांनी भरून टाकतो आणि दु:खी-कष्टी झालेल्यांची, आडमार्गाला गेलेल्यांची अंत:करणे जाणून तो त्यांचे दु:ख दूर करतो (१०)

किती लोक तें कळेना। किती समुदाव आकळेना।
सकळ लोक श्रवणमनना। मध्यें घाली ॥ ११ ॥

त्याला भेटायला किती लोक येतात हे कळत नाही. त्याचे किती अनुयायी आहेत हे जाणता येत नाही. पण त्याच्याकडे येणाऱ्या सर्व लोकांना तो श्रवण-मननाकडे लावतो. (११)

फड समजाविसी करणें। गद्यपद्य सांगणें।
परांतरासी राखणें। सर्वकाळ ॥ १२ ॥

सभेतील लोकांना समजावणे, त्यांना गद्य-पद्य सांगणे आणि निरंतर लोकांचे अंत:करण राखणे, (१२)

ऐसा ज्याचा दंडक । अखंड पाहाणें विवेक ।
सावधापुढें अविवेक । येईल कैंचा ॥ १३ ॥

अशी त्याची वागण्याची रीत असते. तो अखंड विवेकाने आणि सावधपणे वागत असल्याने तेथे अविवेक येईलच कसा? (१३)

जितुकें कांहीं आपणासी ठावें । तितुकें हळुहळु सिकवावें ।
शाहाणे करूनि सोडावे । बहुत जन ॥ १४ ॥

आपल्याला जितके काही ज्ञान असेल, तितके हळूहळू लोकांना शिकवावे आणि अनेक लोक शहाणे करून सोडावेत. (१४)

परोपरीं सिकवणें । आडणुका सांगत जाणें ।
निवळ करुनी सोडणें । निस्पृहासी ॥ १५ ॥

नाना तऱ्हेने शिकवावे, त्यांच्या अडचणी दूर कराव्यात आणि जे निःस्पृह असतील त्यांना निःसंदेह करून सोडावे (१५)

होईल तें आपण करावें । न होतां जनाकरवीं करवावें ।
भगवद्भजन राहावें । हा धर्म नव्हे ॥ १६ ॥

आपल्याला जेवढे जमेल ते आपण करावे, आपल्याकडून जे होण्यासारखे नसेल ते लोकांकडून करवावे. पण भगवद्भजन खंडित व्हावे हा धर्म नव्हे. (१६)

आपण करावें करवावें । आपण विवरावें विवरवावें ।
आपण धरावें धरवावें । भजनमार्गासी ॥ १७ ॥

आपण स्वतः अध्यात्माचे विवरण करावे आणि दुसऱ्यांकडूनही विवरण करवावे. आपण स्वतः भजनमार्गाचे अवलंबन करावे आणि लोकांकडूनही करवावे. (१७)

जुन्या लोकांचा कंटाळाआला । तरी नूतन प्रांत पाहिजे धरिला ।
जितुकें होईल तितुक्याला । आळस करूं नये ॥ १८ ॥

जुन्या लोकांचा जर कंटाळा आला असेल, तर नवीन प्रांत शोधून तेथे जाऊन कार्य करावे. जितके होईल तेवढे करीतच असावे. त्यात आळस करू नये. (१८)

देह्याचा अभ्यास बुडाला । म्हणिजे महंत बुडाला ।
लागवेगें नूतन लोकांला । शाहाणें करावें ॥ १९ ॥

महंत जर आळशी आणि ऐषआरामी झाला तर तो बुडाला म्हणून समजावे. म्हणून आळस न करता सतत नवीन नवीन लोकांना शिकवून शहाणे करावे. (१९)

उपाधींत सांपडों नये । उपाधीस कंटाळों नये ।
निसुगपण कामा नये । कोणीयेकविषीं ॥ २० ॥

उपाधींत गुंतू नये, पण उपाधीला कंटाळूही नये. कामचुकारपणा कोठल्याच बाबतीत उपयोगी पडत नाही. (२०)

काम नासणार नासतें । आपण वेडें उगेंच पाहातें ।
आळसी हृदयसुन्य तें । काये करूं जाणे ॥ २१ ॥

जो आळशी आणि हृदयशून्य असतो तो कामाचा नाश होत असता उगीच वेड्यासारखा पाहातच राहातो. काय करावे हे त्याला कळतच नाही. (२१)

धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ।
नाना बुद्धि शक्ताला । म्हणोनी सिकवाव्या ॥ २२ ॥

जो अशक्त, असमर्थ असतो, त्याला धकाधकीचा मामला निभत नाही. म्हणून जे सशक्त असतात, सामर्थ्यसंपन्न असतात त्यांनाच नाना प्रकारच्या बुद्धीच्या गोष्टी शिकवाव्यात. (२२)

व्याप होईल तों राहावें । व्याप राहातां उठोन जावें ।
आनंदरूप फिरावें । कोठें तऱ्हीं ॥ २३ ॥

जोपर्यंत व्याप होत असतो, तोपर्यंत तेथे राहावे. व्याप जर थांबला, तर तेथून उठून जावे आणि कोठेही आनंदरूप होऊन फिरावे. (२३)

उपाधीपासुनी सुटला । तो निस्पृहपणें बळावला ।
जिकडे अनकूळ तिकडे चालिला । सावकास ॥ २४ ॥

जो उपाधीपासून सुटतो त्याचे सामर्थ्य निःस्पृहपणामुळे वाढत असते. जिकडे अनुकूलता असते, तिकडे तो सावकाश जातो. (२४)

कीर्ति पाहातां सुख नाहीं । सुख पाहातां कीर्ति नाहीं ।
केल्याविण कांहींच नाहीं । कोठें तऱ्हीं ॥ २५ ॥

कीर्ती हवी असेल, तर सुखाची अपेक्षा करू नये. सुखाची अपेक्षा ठेवली तर कीर्ती मिळणार नाही. कोठेही काही ना काही केल्याखेरीज, प्रयत्नाशिवाय कार्य घडणारच नाही. (२५)

**येरवीं काय राहातें। होणार तितुकें होऊन जातें।**
**प्राणी मात्र अशक्त तें। पुढें आहे ॥ २६॥**

आपण केल्यावाचून कार्य अडत नाही. जे होणार असते ते होऊनच जाते. पण हा मात्र उगीचच स्वत:ला दुर्बल समजत असतो. (२६)

**आधींच तकवा सोडिला। मधेंचि धीवसा सांडिला।**
**तरी संसार हा सेवटाला। कैसा पावे ॥ २७॥**

आधीच चिवटपणा किंवा प्रयत्न सोडला किंवा मध्येच धैर्य सोडले, तर ह्या संसाराचा शेवट कसा पावेल? (२७)

**संसार मुळींच नासका। विवेकें करावा नेटका।**
**नेटका करितां फिका। होत जातो ॥ २८॥**

संसार हा मुळातच नासका आहे. तो विवेकाने नीटनेटका करावा. नेटका केला तरी तो आपोआप फिका वाटू लागतो. (२८)

**ऐसा याचा जिनसाना। पाहातां कळों येतें मना।**
**परंतु धीर सांडावाना। कोणी येकें ॥ २९॥**

असे याचे स्वरूप आहे. नीट विचार करून पाहिल्यावर आपल्या मनाला ते कळून येते. पण म्हणून माणसाने कधीही धीर सोडू नये. (२९)

**धीर सांडितां काये होतें। अवघें सोसावें लागतें।**
**नाना बुद्धि नाना मतें। शाहाणा जाणे ॥ ३०॥**

धीर सोडून काय होणार? सर्व सोसावे तर लागतेच. नाना प्रकारचे विचार आणि नाना मते असतात. त्यांतील योग्य-अयोग्य शहाणा माणूस जाणतो. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विवेकलक्षणनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.**

**दशक एकोणिसावा समाप्त.**



# दशक विसावा : पूर्णनाम

## दशक २० : समास १

### पूर्णापूर्णनिरूपण

॥ श्रीराम ॥

**प्राणी व्यापक मन व्यापक। पृथ्वी आप तेज व्यापक।**
**वायो आकाश त्रिगुण व्यापक। अंतरात्मा मूळमाया ॥ १॥**

या समासात श्रोत्यांनी सुरुवातीलाच वक्त्याला दोन प्रश्न विचारले आहेत. ते म्हणतात की, प्राणी व्यापक आहे. मन व्यापक आहे. त्याचप्रमाणे पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, त्रिगुण, अंतरात्मा आणि मूळ माया ही सर्वच व्यापक आहेत. (१)

**निर्गुण ब्रह्म तें व्यापक। ऐसें अवघेंच व्यापक।**
**तरी हें सगट किं काये येक। भेद आहे ॥ २॥**

याशिवाय आपण सांगता की निर्गुण ब्रह्म हेही व्यापक आहे. असे सर्वच जर व्यापक असेल, तर ते व्यापकपण सरसकट एकसारखेच आहे की यात काही भेद आहे? (२)

**आत्मा आणि निरंजन। येणेंहि वाटतो अनुमान।**
**आत्मा सगुण किं निर्गुण। आणि निरंजन॥ ३॥**

आत्मा आणि निरंजन हे शब्द ऐकूनही मनात काही संदेह उत्पन्न होतो. तरी आत्मा सगुण आहे की निर्गुण, निरंजन आहे? (३)

**श्रोता संदेहीं पडिला। तेणें संदेह वाढला।**
**अनुमान धरून बैसला। कोण तो कैसा ॥ ४॥**

याप्रमाणे श्रोत्यांच्या मनात संदेह उत्पन्न झाला आणि अनुमानाने तो वाढतच चालला. कोण कसा आहे, याविषयी तो अनुमान करीत बसतो. (४)

**ऐका पहिली आशंका। अवघा गल्बला करूं नका।**
**प्रगट करून विवेका। प्रत्यये पाहावा ॥ ५ ॥**

आता पहिल्या आशंकेचे उत्तर सांगितले जाईल, ते प्रथम ऐका. सगळा एकच गोंधळ करू नका. मनाशी नीट विचार करून अनुभव घेऊन पहावा. (५)

**शरीरपाडें सामर्थ्य पाडें। प्राणी व्याप करी निवाडें।**
**परी पाहातां मनायेवढें। चपळ नाहीं ॥ ६॥**

प्रत्येक प्राण्याचे शरीर भिन्न भिन्न प्रकारचे असते आणि त्याच्या शरीरास अनुसरून त्याच्या सामर्थ्यानुसार लहान-मोठे प्राणी व्याप करीत असतात. पण स्थूल शरीर मनाएवढे चपळ असत नाही. (६)

**चपळपण येकदेसी। पूर्ण व्यापकता नव्हे त्यासी।**
**पाहातां पृथ्वीच्या व्यापासी। सीमा आहे ॥ ७॥**

मनाचे चपळपणही परिपूर्ण नाही. कारण मन एका वेळी एकाच विषयाचा अंगीकार करते, म्हणजेच ते एकदेशी असल्याने त्यास पूर्ण व्यापकता नाही. पृथ्वीचा व्याप पाहिला असता त्यालाही सीमा आहे, हे स्पष्टपणे कळून येते. म्हणजेच प्राणी, मन, पृथ्वी ही संपूर्ण व्यापक नाहीत. (७)

**तैसेंचि आप आणि तेज। अपूर्ण दिसती सहज।**
**वायो चपळ समज। येकदेसी ॥ ८॥**

त्याप्रमाणे आप आणि तेज ही अपूर्ण आहेत, हेही सहज कळून येते आणि वायू तर चपळ असून एकदेशी आहे, हेही जाणून घ्यावे. (८)

**गगन आणि निरंजन। तें पूर्ण व्यापक सघन।**
**कोणीयेक अनुमान। तेथें असेचिना ॥ ९॥**

गगन आणि निरंजन ब्रह्म ही दोन्ही पूर्णपणे व्यापक असून सर्वत्र घनदाट व्याप्त आहेत, यात अनुमान करण्याचे कारणच नाही. (९)

**त्रिगुण गुणक्षोभिणी माया। माईक जाईल विलया।**
**अपूर्ण येकदेसी तया। पूर्ण व्यापकता न घडे ॥ १०॥**

त्रिगुण आणि पंचमहाभूते, गुणक्षोभिणी माया ही सर्व मायिक असून नाश पावतात. जे अपूर्ण आहे आणि एका वेळी एकाच स्थानी असते, त्यास पूर्ण व्यापकपण नसते. (१०)

आत्मा आणि निरंजन। हें दोहिंकडे नामाभिधान।
अर्थान्वये समजोन। बोलणें करावें ॥ ११॥

आत्मा आणि निरंजन या शब्दांचा प्रयोग दोन्हीकडे करतात. आत्मा म्हणजे जीवात्मा आणि आत्मा म्हणजे परब्रह्म अशा अर्थानेही त्या शब्दाचा प्रयोग केला जातो. ज्या संदर्भात प्रयोग केला असेल तसा अर्थ करावा. ही दोन्ही नावे पर्यायी आहेत. (११)

आत्मा मन अत्यंत चपळ। तरी हें व्यापक नव्हेचि केवळ।
सुचित अंत:कर्ण निवळ। करून पाहावें ॥ १२॥

अंतरात्मा आणि मन ही दोन्ही अत्यंत चपळ आहेत हे खरे, पण ते पूर्णपणे व्यापक नसते. एकाग्र अंत:करण करून विचार करून पहावा. (१२)

अंतराळीं पाह्यतां पाताळीं नाहीं। पाताळीं पाह्यतां अंतराळीं नाहीं।
पूर्णपणें वसत नाहीं। चहूंकडे ॥ १३॥

मन ज्यावेळी अंतराळात जाते किंवा जीवात्माही अंतराळात जातो तेव्हा पाताळी नसतो. पाताळी असतो तेव्हा अंतराळात नसतो. चहूकडे पूर्णपणे एकाच वेळी असू शकत नाही. (१३)

पुढें पाहातां मागें नाहीं। मागें पाहातां पुढें नाहीं।
वाम सव्य व्याप नाहीं। दशदिशा ॥ १४॥

ज्या वेळी पुढे असतो, तेव्हा मागे नसतो. मागे असतो तेव्हा पुढे नसतो. डावीकडे असतो तेव्हा उजवीकडे नसतो. दशदिशांना एकाच वेळी व्यापून नसतो. (१४)

चहुंकडे निशाणें मांडावीं। येकसरीं कैसीं सिवावीं।
याकारणें समजोन उगवी। प्रत्ययें आपणासी ॥ १५॥

समजा, चहूबाजूकडे निशाणे लावलेली असली तर एखादा माणूस एकाच वेळी त्या सर्व निशाणांना स्पर्श करू शकत नाही. हा अनुभव लक्षात घेतला की कळून येते की, माणूस हा एकदेशी आहे. तो सर्वव्यापी असू शकत नाही. (१५)

सूर्य आला प्रतिबिंबला। हाहि दृष्टांत न घडे वस्तुला।
वस्तुरूप निर्गुणाला। म्हणिजेत आहे ॥ १६॥

निर्गुण परब्रह्म शाश्वत आहे, तर सूर्याला उदयास्त आहेत. म्हणून सूर्याचे प्रतिबिंब जसे घटात पडते, तसेच परब्रह्माचे बुद्धीत पडलेले प्रतिबिंब म्हणजे जीवात्मा असा दृष्टांत देणे योग्य ठरत नाही. (१६)

घटाकाश मठाकाश। हाहि दृष्टांत विशेष।
तुळूं जातां निर्गुणास। साम्यता येते ॥ १७॥

घटाकाश, मठाकाश हाही दृष्टांत दिला जातो. आकाशाचा हा दृष्टांत पहिल्यापेक्षा जास्त बरोबर आहे. कारण आकाशाचे निर्गुणाशी साम्य आहे. (१७)

ब्रह्मींचा अंश आकाश। आणी आत्म्याचा अंश मानस।
दोहींचा अनुभव प्रत्ययास। येथें घ्यावा ॥ १८॥

आकाश हा परब्रह्मींचा अंश आणि जीवात्म्याचा अंश म्हणजे मन असे जरी आपण म्हटले तरी दोन्हींचा अनुभव आपण घ्यावा. कारण दृष्टांत पूर्णांशाने कधीच साम्यतादर्शक नसतो. योग्य तेवढ्याच भागाचा विचार केला पाहिजे. नाहीतर येथे आकाश आणि मन हे सारखेच म्हणावे लागेल, परंतु ते अशक्य आहे. (१८)

गगन आणी हें मन। कैसें होती समान।
मननसीळ महाजन। सकळहि जाणती ॥ १९॥

आकाश आणि मन ही दोन्ही कधीही समसमान असू शकत नाहीत. जे मननशील महाजन असतात, त्यांना ही गोष्ट कळते. (१९)

मन हें पुढें वावडे। मागें आवघेंचि रितें पडे।
पूर्ण गगनास साम्यता घडे। कोण्या प्रकारें ॥ २०॥

मन जेव्हा पुढे धाव घेते, तेव्हा मागे सर्व मोकळे पडते. अशा एकदेशी मनाची पूर्ण गगनाशी साम्यता कशी असू शकेल? (२०)

परब्रह्महि अचळ। आणि पर्वतासहि म्हणती अचळ।
दोनीही येक केवळ। हें कैसें म्हणावें ॥ २१॥

परब्रह्माला अचल म्हणतात आणि पर्वतालाही अचल म्हणतात, पण म्हणून केवळ एवढ्यावरून दोन्हींना एक कसे म्हणता येईल? (२१)

ज्ञान अज्ञान विपरीतज्ञान। तिनी कैसीं होतीं समान।
याचा प्रत्ययो मनन। करून पाहावा ॥ २२॥

ज्ञान, अज्ञान आणि विपरीत ज्ञान यांना समान कसे म्हणता येईल? याचा मनन करून अनुभव घेऊन पाहावा. (२२)

ज्ञान म्हणिजे जाणणें। अज्ञान म्हणिजे नेणणें।
विपरीत ज्ञान म्हणिजे देखणें। येकाचें येक ॥ २३॥

ज्ञान म्हणजे जाणणे. अज्ञान म्हणजे नेणणे, आणि विपरीत ज्ञान म्हणजे एक असता दुसरेच पाहणे होय. (२३)

जाणणें नेणणें वेगळें केलें। ढोबळें पंचभूतिक उरलें।
विपरीत ज्ञान समजलें। पाहिजे जीवीं ॥ २४॥

जाणणे एका बाजूला केले, नेणणेही दूर सारले की मग स्थूल पांचभौतिकाची जाणीव हेच विपरीत ज्ञान उरते. हाच भ्रम होय हे जाणून घेतले पाहिजे. (२४)

द्रष्टा साक्षी अंतरात्मा। जीवात्माचि होये शिवात्मा।
पुढें शिवात्मा तोचि जीवात्मा। जन्म घेतो ॥ २५॥

वास्तविक अंतरात्मा हा द्रष्टा, साक्षी आहे. तो सर्व पिंडांच्या ठिकाणी जीवात्मा म्हणून ओळखला जातो. देहरूपी उपाधीचा त्याग केला की तो जीवात्माच शिवात्मा होतो. पण जेव्हा शिवात्मा आपले साक्षीत्व विसरतो, तेव्हा तोच जीवात्मा बनून जन्म घेतो.(२५)

आत्मत्वीं जन्ममरण लागे। आत्मत्वीं जन्ममरण न भंगे।
संभवामि युगे युगे। ऐसें हें वचन ॥ २६॥

जोपर्यंत आत्मत्व म्हणजे मी आत्मा ही जाणीव असते, तोपर्यंत जन्ममरण चुकत नाही. ईश्वरालाही युगायुगात जन्म घ्यावे लागतात. हे 'संभवामि युगे युगे' या वचनावरून कळते. (२६)

जीव येकदेसी नर। विचारें जाला विश्वंभर।
विश्वंभरास संसार। चुकेना कीं ॥ २७॥

जीव एका देही नर म्हणून जन्मास येतो. तो विचाराच्या योगाने विश्व व्यापणारा विश्वंभर म्हणजे शिवात्मा बनतो. पण विश्वंभर ईश्वरालाही विद्या मायेची उपाधी असल्याने अवताररूपी संसार चुकत नाही. (२७)

ज्ञान आणि अज्ञान। वृत्तिरूपे हें समान।
निवृत्तिरूपें विज्ञान। जालें पाहिजे ॥ २८॥

ज्ञान आणि अज्ञान दोन्हीची स्थिती मीपणामुळेच असल्याने जाणीवरूपाने ही दोन्ही सारखीच म्हणजे वृत्तिरूपच आहेत. वृत्तीचाही संपूर्ण लय परब्रह्माच्या ठिकाणी होऊन निवृत्ती म्हणजे वृत्तिरहित स्थितीलाच विज्ञान असे म्हटले जाते. याचा साक्षात अनुभव येणे अत्यंत आवश्यक आहे. (२८)

ज्ञानें येवढें ब्रह्मांड केलें। ज्ञानें येवढें वाढविलें।
नाना विकाराचें वळलें। तें हें ज्ञान ॥ २९॥

एका ज्ञानानेच एवढे ब्रह्मांड करून, ते वाढविले आहे. असे हे ज्ञान नाना विकारांनी भरलेले आहे. (२९)

आठवें देह ब्रह्मांडीचें। तें हें ज्ञान साचें।
विज्ञानरूप विदेहाचें। पद पाविजे ॥ ३०॥

मूळमाया हेच ज्ञान होय. ज्ञानाने अज्ञानाचा नाश करून, ते ज्ञानही सोडून मीपणरहित अशा केवळ अनुभवरूप स्थितीला पोहोचले पाहिजे. विज्ञानरूप विदेह स्थितीची प्राप्ती करून घेतली पाहिजे. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'पूर्णापूर्णनिरूपणनाम' समास पहिला समाप्त.**



## दशक २० : समास २
## सृष्टित्रिविधलक्षणनिरूपण

॥ श्रीराम ॥

मूळमाया नस्तां चंचळ। निर्गुण ब्रह्म तें निश्चळ।
जैसें गगन अंतराळ। चहुंकडे ॥ १ ॥

चंचळ मूळमाया नव्हती, त्यावेळी केवळ निर्गुण निश्चळ परब्रह्मच आकाशाप्रमाणे, चहूकडे कोंदाटून राहिले होते. (१)

दृश्य आलें आणि गेलें। परी तें ब्रह्म संचलें।
जैसें गगन कोंदाटलें। चहुंकडे ॥ २ ॥

दृश्य विश्व तर होत असते व परत जात असते म्हणजे विनाश पावते. पण परब्रह्म मात्र गगनाप्रमाणेच सर्वत्र ओतप्रोत कोंदाटून राहिलेले असते. त्याचा कधी नाश होत नाही. (२)

जिकडे पाहावें तिकडे अपार। कोणेकडे नाहीं पार।
येकजिनसी स्वतंत्र। दुसरें नाहीं ॥ ३ ॥

जिकडे पहावे तिकडे अपार परब्रह्मच कोंदाटलेले असते, त्याचा पार लागूच शकत नाही. ते एकटे एकच स्वतंत्र सर्वत्र ओतप्रोत भरलेले असते. त्याच्याखेरीज दुसरे काही नसतेच. (३)

ब्रह्मांडावरतें बैसावें। अवकाश भकास अवलोकावें।
तेथें चंचळ व्यापकाच्या नांवें। सुन्याकार ॥ ४ ॥

विवेकाने दृश्य ब्रह्मांड ओलांडून आकाशाशी तन्मय झाल्याने आपल्या ठिकाणचे चांचल्य जणू नाहीच असा अनुभव येईल. विश्वाला व्यापून असणारा चंचलपणा तेथे जराही शिल्लक राहात नाही. (४)

दृश्य विवेकें काढिलें। मग परब्रह्म कोंदाटलें।
कोणासीच अनुमानलें। नाहीं कदा ॥ ५ ॥

विवेकाने दृश्यास बाजूस सारल्यावर शून्यत्वाचे आकाशाचे आकलन होईल. परंतु सदोदित कोंदाटून असलेल्या परब्रह्माचे मात्र आकलन होत नाही. कारण तेथे पाहाणारा वेगळा राहूच शकत नाही. (५)

अधोर्ध पाहातां चहुंकडे। निर्गुण ब्रह्म जिकडे तिकडे।
मन धांवेल कोणेकडे। अंत पाहावया ॥ ६ ॥

वर-खाली जिकडे पहावे तिकडे निर्गुण ब्रह्मच कोंदाटलेले असते. मन तर एकदेशी असल्याने त्या सर्वव्यापी निर्गुण ब्रह्माचा अंत ते कसा पाहू शकेल? (६)

दृश्य चळे ब्रह्म चळेना। दृश्य कळे ब्रह्म कळेना।
दृश्य आकळे ब्रह्मआकळेना। कल्पनेसी ॥ ७ ॥

दृश्य चळते, ब्रह्म चळत नाही. दृश्य कळू शकते, तर परब्रह्मास जाणता येत नाही. दृश्यास कल्पनेने आकलन करता येते. परब्रह्माचे आकलन कल्पनेच्या योगे होऊ शकत नाही. (७)

कल्पना म्हणिजे कांहींच नाहीं। ब्रह्म दाटलें ठाईंचा ठाईं।
वाक्यार्थ विवरत जाइं। म्हणिजे बरें ॥ ८ ॥

कल्पना म्हणजे काहीच नाही. कारण कल्पनेने जे निर्माण होते ते वास्तविक अस्तित्वात नसते. आणि ब्रह्म तर सत्य वस्तू असून तेच सर्वाठायी ओतप्रोत कोंदटलेले असते. म्हणून मनुष्याने महावाक्याचा जो लक्ष्यार्थ - 'अहं ब्रह्मास्मि' अथवा 'तत्त्वमसि' त्याचे नेहमी चिंतन, करीत असावे, म्हणजे बरे. (८)

परब्रह्मायेवढें थोर नाहीं। श्रवणापरतें साधन नाहीं।
कळल्याविण कांहींच नाहीं। समाधान ॥ ९ ॥

खरे तर परब्रह्माएवढी थोर वस्तू नाही आणि त्याची प्राप्ती करून घेण्यास श्रवणासारखे उत्कृष्ट साधन दुसरे नाही. आणि श्रवण, मनन, निदिध्यासनाने परब्रह्माचा साक्षात अनुभव आल्याखेरीज खरे समाधान लाभणे शक्य नाही. (९)

पिप्लीकामार्गें हळु हळु घडे। विहंगमें फळासी गांठी पडे।
साधक मननीं पवाडे। म्हणिजे बरें ॥ १० ॥

हे ज्ञान पिपीलिका मार्गाने म्हणजे कर्मसाधन-मार्गाने मुंगीसारखे हळूहळू होते. तर पक्ष्यासारख्या झेपेने म्हणजे ज्ञानमार्गाने - लवकर प्राप्त होते. म्हणून साधकाने तत्परतेने निरंतर मनन करीत राहावे म्हणजे बरे. (१०)

परब्रह्मासारिखें दुसरें। कांहींच नाहीं खरें।
निंदा आणी स्तुतिउत्तरें। परब्रह्मीं नाहीं ॥ ११ ॥

परब्रह्मासारखे दुसरे खरे तर काही नाहीच. निंदा अथवा स्तुती यांपैकी काहीही परब्रह्मापर्यंत पोहोचूच शकत नाही. (११)

ऐसें परब्रह्म येकजिनसी। कांहींच तुळेना तयासी।
मानुभव पुण्यरासी। तेथें पवाडती ॥ १२ ॥

असे हे परब्रह्म एकले एकच असल्याने त्याची कुणाशी तुलनाच करता येत नाही. जेथे साक्षात्कारी महानुभाव असतात, तेच त्यास जाणतात. (१२)

चंचळें होते दुःखप्राप्ती। निश्चळाएवढी नाहीं विश्रांती।
निश्चळ प्रत्ययें पाहाती। माहानुभाव ॥ १३ ॥

चंचळाच्या योगे नेहमी दुःखच प्राप्त होते, तर निश्चल अशा परब्रह्माशी ऐक्य पावण्याइतकी विश्रांती दुसऱ्या कशानेही मिळत नाही. महानुभाव असतात, तेच अनुभवाने निश्चलाची प्राप्ती करून घेतात. (१३)

मुळापासून सेवटवरी। विचारणा केलीच करी।
प्रत्ययाचा निश्चयो अंतरीं। तयासीच फावे ॥ १४ ॥

मूळमायेपासून संपूर्ण दृश्य सृष्टीच्या पसाऱ्यासंबंधी म्हणजे उभारणी—ते संहारणीपर्यंत जो कोणी निरंतर विचारणा करीतच राहतो. त्याचा स्वानुभव मनन-निदिध्यासामुळे दृढ निश्चयात परिणमतो. (१४)

कल्पनेची सृष्टी जाली। त्रिविध प्रकारें भासली।
तिक्षण बुद्धीनें आणिली। पाहिजे मना ॥ १५ ॥

सर्व दृश्य सृष्टी ही कल्पनेपासून निर्माण झाली आहे. ती तीन प्रकारे भासते : १) मूळ मायेपासून त्रिगुणांपर्यंत अदृश्य (२) त्रिगुणांपासून पंचमहाभूतातल्या पृथ्वीपर्यंत (दृश्यादृश्य) (३) पृथ्वीपासून चारी खाणी-वाणीपर्यंत दृश्य. या तिन्ही प्रकारांसंबंधी तीव्र बुद्धीने वारंवार मनाशी विचार केला पाहिजे. (१५)

मूळमायेपासून त्रिगुण। अवघें येकदेसी लक्षण।
पांचा भूतांचा ढोबळ गुण। दिसत आहे ॥ १६ ॥

मूळमायेपासून त्रिगुणापर्यंत सर्व अदृश्य असून सूक्ष्म आहेत. ती सर्व एकदेशी आहेत. पंचमहाभूतांच्या मुळे सृष्टी दृश्य-स्थूल रूपाने प्रगट होते. तिचा पसारा आपल्याला प्रत्यक्षच दिसून येतो. (१६)

पृथ्वीपासून च्यारी खाणी। चत्वार वेगळाली करणी।
सकळ सृष्टीची चाली येथुनी। पुढें नाहीं ॥ १७ ॥

पृथ्वीपासूनच चारी खाणीचे जीव उत्पन्न होतात. त्यांचे व्यवहारही चार प्रकारचे असतात. येथे सगळी सृष्टिरचना संपते. यापुढे सृष्टिरचना नाही. (१७)

सृष्टीचें त्रिविध लक्षण। विशद करूं निरूपण।
श्रोतीं सुचित अंतःकर्ण। केलें पाहिजे ॥ १८ ॥

सृष्टीचे जे हे त्रिविध प्रकार सांगितले, त्यांची लक्षणे आता स्पष्ट करून सांगितली जातील. तरी श्रोत्यांनी अंतःकरण स्थिर करून श्रवण करणे आवश्यक आहे. (१८)

मूळमाया जाणीवेची। मुळीं सूक्ष्म कल्पनेची।
जैसी स्थिती परे वाचेची। तद्रूपची ते ॥ १९ ॥

परा वाचा जशी केवळ स्फूर्तिमय असते, त्याप्रमाणेच 'बहु स्याम्' ही आद्यस्फूर्ती म्हणजेच मूळमाया होय. ही केवळ जाणीवरूप असते. (१९)

अष्टधा प्रकृतीचें मूळ। ते हे मूळमायाच केवळ।
सूक्ष्मरूप बीज सकळ। मुळींच आहे ॥ २० ॥

मूळमाया हीच अष्टधा प्रकृतीचे मूळ आहे. मूळमायेतच सृष्टीचे सूक्ष्म बीज आहे. (२०)

जड पदार्थ चेतवितें तें। म्हणौन चैतन्य बोलिजेतें।
सूक्ष्मरूपें संकेतें। समजोन घ्यावीं ॥ २१ ॥

सूक्ष्म रूप हे कधी प्रत्यक्ष दाखविता येत नाही. ते चिह्नांच्यावरून जाणून घ्यावे लागते. त्याप्रमाणेच मूळ माया जड पदार्थांना चेतविते, म्हणून तिला चैतन्य असेही म्हणतात. पण हे संकेताने जाणून घ्यावे. (२१)

प्रकृतिपुरुषाचा विचार। अर्धनारीनटेश्वर।
अष्टधा प्रकृतीचा विचार। सकळ कांहीं ॥ २२ ॥

प्रकृती पुरुषाचा विचार, अर्धनारीनटेश्वर, अष्टधा प्रकृतीचा विचार सर्व काही मूळमायेतच येतो. (२२)

गुप्त त्रिगुणाचें गूढत्व। म्हणौन संकेत महत्तत्त्व।
गुप्तरूपें शुद्धसत्व। तेथेंचि वसे ॥ २३ ॥

त्रिगुणही गुप्तरूपाने मूळमायेतच वास करतात. त्या गूढत्वाला संकेताने महत्तत्त्व म्हणतात. शुद्ध सत्त्वगुण देखील गुप्तरूपाने तेथेच वास करतो. (२३)

जेथून गुण प्रगटती। तीस गुणक्षोभिणी म्हणती।
त्रिगुणाचीं रूपें समजती। धन्य ते साधु ॥ २४॥

जेव्हा गुण व्यक्त दशेला येतात, तेव्हा त्या मायेला गुणक्षोभिणी असे म्हणतात. त्रिगुणांची रूपे ज्यांना समजतात ते साधू धन्य होत. (२४)

गुप्तरूपें गुणसौम्य। म्हणौनि बोलिजे गुणसाम्य।
सूक्ष्म संकेत अगम्य। बहुतांस कैंचा ॥ २५॥

हे त्रिगुण अप्रगट स्थितीत एकसारखेच वाटत असल्याने त्या स्थितीला गुणसाम्य म्हणतात. हा संकेत सूक्ष्म आहे. तो समजण्यास सोपा नाही. त्यामुळे बऱ्याच जणांना तो समजत नाही. (२५)

मूळमायेपासून त्रिगुण। चंचळ येकदेसी लक्षण।
प्रत्ययें पाहातां खूण। अंतरीं येते ॥ २६॥

मूळमायेपासून त्रिगुणापर्यंतची तत्त्वे चंचल आणि एकदेशी आहेत. ती सर्वव्यापी नाहीत. अनुभव घेतला की अंतरात त्याची खूण पटते. (२६)

पुढें पंचभूतांचीं बंडें। वाढलीं विशाळें उदंडें।
सप्तद्वीपें नवखंडें। वसुंधरा हे ॥ २७॥

त्यानंतर पंचमहाभूतांचा विशाल आणि उदंड, अफाट विस्तार झाला आणि सात द्वीपे व नऊ खंड असलेली ही पृथ्वी निर्माण झाली. (२७)

त्रिगुणापासून पृथ्वीवरी। दुसऱ्या जिनसाऱ्याची परी।
दोनी जिनस याउपरी। तिसरा ऐका ॥ २८॥

त्रिगुणापासून पृथ्वीपर्यंत चंचलाचा हा दुसरा विभाग झाला. या दोन्हीची माहिती सांगून झाली. आता तिसऱ्या प्रकाराची माहिती ऐका. (२८)

पृथ्वी नाना जिनसाचें बीज। अंडज जारज श्वेतज उद्बिज।
च्यारी खाणी च्यारी वाणी सहज। निर्माण जाल्या ॥ २९॥

पृथ्वीमध्ये नाना वस्तूंचे बीज असते. अंडज, जारज, स्वेदज आणि उद्भिज्ज असे जीवांचे चार प्रकार आणि चारी वाणी पृथ्वी तत्त्वातून निर्माण झाल्या. (२९)

खाणी वाणी होती जाती। परन्तु तैसीच आहे जगती।
ऐसे होती आणी जाती। उदंड प्राणी ॥ ३०॥

खाणी, वाणी उत्पन्न होतात आणि जातात, नाश पावतात. परंतु पृथ्वी जशीच्या तशीच राहते. याप्रमाणे असंख्य प्राणी उत्पन्न होतात आणि नाश पावतात. परंतु परब्रह्म जसेच्या तसेच असते. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सृष्टित्रिविधलक्षणनिरूपणनाम' समास दुसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक २० : समास ३
## सूक्ष्मनामाभिधान

॥ श्रीराम ॥

मुळींहून सेवटवरी। विस्तार बोलिला नानापरी।
पुन्हा विवरत विरत माघारी। वृत्ति न्यावी ॥ १॥

मूळमायेपासून चारी खाणीच्या जीवमात्रापर्यंतचा सृष्टीचा विस्तार नाना प्रकारे वर्णन केला. त्यासंबंधी मनन करीत करीत आपली वृत्ती परत मूळमायेकडे न्यावी. (१)

च्यारी वाणी च्यारी खाणी। चौऱ्यासि लक्ष जीवयोनी।
नाना प्रकारीचे प्राणी। जन्मास येती ॥ २॥

चारी वाणी, चारी खाणी आणि त्यातील चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी यांमध्ये नाना प्रकारचे असंख्य प्राणी जन्मास येतात. (२)

अवघे होती पृथ्वीपासुनी। पृथ्वीमधें जाती नासोनी।
अनेक येती जाती परी अवनी। तैसीच आहे ॥ ३॥

सर्व पृथ्वीपासून उत्पन्न होतात आणि पृथ्वीवरच नाश पावतात. असे अनेक प्राणी येतात आणि जातात, पण ती पृथ्वी जशीच्या तशीच असते. (३)

ऐसें हें सेंड्याकडील खांड। दुसरें भूतांचे बंड।
तिसरें नामाभिधानें उदंड। सूक्ष्मरूपें ॥ ४॥

असा हा सृष्टिरचनेचा शेंड्याकडील विभाग आहे. तो येथे सांगितला. पंचमहाभूतांचा अफाट विस्तार हा दुसरा विभाग आहे आणि मूळमायेपासून त्रिगुणापर्यंत अत्यंत सूक्ष्म तत्त्वे हा तिसरा विभाग होय. त्यांची नावे सांगितली आहेतच. (४)

स्थूळ अवघें सांडून द्यावें। सूक्ष्मरूपें वोळखावें।
गुणापासून पाहिलेंच पाहावें। सूक्ष्मदृष्टीं ॥ ५॥

जेवढे स्थूल आहे ते सर्व सोडून द्यावे. सूक्ष्म जे आहे त्याचे गुणधर्म जाणून घ्यावेत. गुणांपासून मूळ मायेपर्यंत वारंवार सूक्ष्म दृष्टीने यांचा विचार करणे आवश्यक आहे. (५)

गुणाची रूपें जाणीव नेणीव। पाहिलाच पाह्यवा अभिप्राव।
सूक्ष्मदृष्टीचें लाघव। येथून पुढें ॥ ६॥

जाणीव व नेणीव ही गुणांचीच रूपे आहेत. त्यासंबंधी वारंवार विचार करून त्यांतील रहस्य जाणून घ्यावे. येथून पुढेच सूक्ष्म दृष्टीचे खरे लाघव दिसून येते. (६)

शुद्ध नेणीव तमोगुण। शुद्ध जाणीव सत्वगुण।
जाणीवनेणीव रजोगुण। मिश्रित चालिला ॥ ७॥

शुद्ध नेणीव हा तमोगुण असून शुद्ध जाणीव हा सत्त्वगुण जाणावा. जाणीव-नेणीवमिश्रित तो रजोगुण होय. (७)

त्रिगुणाची रूपें ऐसीं। कळों लागलीं अपैसीं।
गुणापुढील कर्दमासी। गुणक्षोभिणी बोलिजे॥ ८॥

याप्रमाणे त्रिगुणांची रूपे आहेत, हे मननाने आपोआप कळून येते. गुणापूर्वीच्या मिश्रणास गुणक्षोभिणी असे म्हणतात. (८)

रज तम आणि सत्व। तिहींचें जेथें गूढत्व।
तें जाणिजे महत्तत्त्व। कर्दमरूप ॥ ९॥

रज, तम आणि सत्त्व हे त्रिगुण जेथे सूक्ष्म रूपाने गुप्तपणे असतात, त्यालाच महत्तत्त्व असे म्हणतात. ते मिश्रणरूप असते. (९)

प्रकृति पुरुष शिवशक्ति। अर्धनारीनटेश्वर म्हणती।
परी याची स्वरूपस्थिती। कर्दमरूप ॥ १०॥

यालाच प्रकृती-पुरुष, शिव-शक्ती अर्धनारी-नटेश्वर असेही म्हणतात. पण याची स्वरूपस्थिती मिश्रणरूप असते. (१०)

सूक्ष्मरूपें गुणसौम्य। त्यास बोलिजे गुणसाम्य।
तैसेंचि चैतन्य अगम्य। सूक्ष्मरूपी ॥ ११॥

ज्या स्थितीत त्रिगुण अप्रगट म्हणजेच साम्यावस्थेत एकसारखेच वाटत असतात, त्या स्थितीला गुणसाम्य म्हणतात. तसेच जड पदार्थाला चेतविते, म्हणून मूळमायेलाही चैतन्य म्हणतात. पण हे सर्व कळण्यास अवघड असून सूक्ष्म दृष्टीने जाणून घ्यावे लागते. (११)

बहुजिनसी मूळमाया। माहांकारण ब्रह्मांडीची काया।
ऐसिया सूक्ष्म अन्वया। पाहिलेंचि पाहावें ॥ १२॥

मूळमाया अशी अनेक तत्त्वांनी युक्त आहे. ब्रह्मांडाचा महाकारण देह असेही तिला म्हणतात. अशी ही तत्त्वे आणि त्यांचे संबंध अत्यंत सूक्ष्म आहेत. म्हणून त्यांच्यासंबंधी वारंवार विचार करून त्यांचे ज्ञान करून घ्यावे. (१२)

च्यारी खाणी पांच भूतें। चौदा सूक्ष्म संकेतें।
काये पाहाणें तें येथें। शोधून पाहावें ॥ १३॥

चारी खाणी, पंचमहाभूते आणि मूळमायेची चौदा नावे सूक्ष्म संकेताने जाणून घ्यावीत आणि सृष्टिरचनेसंबंधी जे काय जाणण्यासारखे असेल, ते सर्व जाणून घ्यावे. (१३)

आहाच पाहातां कळेना। गरज केल्यां समजेना।
नाना प्रकारीं जनाच्या मना। संदेह पडती ॥ १४॥

नुसते वरवर पाहिल्याने अथवा गरजेपुरते पाहण्याने हे सर्व समजत नाही आणि लोकांच्या मनात नाना प्रकारचे संदेह मात्र उत्पन्न होतात. (१४)

चौदा पांच येकोणीस। येकोणीस च्यारी तेविस।
यांमधें मूळ चतुर्दश। पाहिलेंचि पाहावें ॥ १५॥

मूळमायेची चौदा नावे, पंचमहाभूते मिळून एकोणीस आणि चार खाणी मिळून तेवीस तत्त्वे होतात. त्यांपैकी मूळ मायेची चौदा नामे वारंवार त्यांच्यावर विचार करून जाणून घ्यावीत. (१५)

**जो विवरोन समजला। तेथें संदेह नाहीं उरला।**
**समजल्याविण जो गल्बला। तो निरार्थक ॥ १६॥**

त्यांचे विवरण वारंवार केल्यानेच त्यांचे ज्ञान होते आणि मग सर्व संदेह दूर होतात. ते नीट जर जाणून घेतले नाही, तर निरर्थकच गोंधळ माजतो. (१६)

**सकळ सृष्टीचें बीज। मूळमायेंत असे सहज।**
**अवघें समजतां सज्ज। परमार्थ होतो ॥ १७॥**

सर्व दृश्य सृष्टीचे बीज साहजिकरीत्याच मूळमायेतच आहे. हे सर्व नीट समजून घेऊन मनन केल्याने परमार्थ सहज सिद्ध होतो. (१७)

**समजलें माणुस चावळेना। निश्चइ अनुमान धरीना।**
**सावळगोंदा करीना। परमार्थ कदा ॥ १८॥**

मूळमाया आणि त्रिगुणांचे स्वरूप जो माणूस मननाने जाणून घेतो, त्याच्या मनात काही संदेह राहात नाही. त्यासंबंधीचा त्याचा निश्चय कधी ढळत नाही आणि त्यामुळे उगीच अनुमान करीत राहून तो कधी परमार्थात सावळा गोंधळही उपस्थित करीत नाही (१८)

**शब्दातीत बोलतां आलें। त्यास वाच्यांश बोलिलें।**
**शुद्ध लक्ष्यांश लक्षिलें। पाहिजे विवेकें ॥ १९॥**

जे शब्दातीत आहे, त्याच्यासंबंधी काही बोलता आले, तरी तो वाच्यांशच असणार. पण विवेकाने शुद्ध लक्ष्यांशावर लक्ष केंद्रित करून त्याचे मनन, निदिध्यासन केले पाहिजे. (१९)

**पूर्वपक्ष म्हणिजे माया। सिद्धांतें जाये विलया।**
**माया नस्तां मग तया। काये म्हणावें ॥ २०॥**

ही ज्ञानचर्चा म्हणजे मायेतील पूर्वपक्ष होय. ती माया सिद्धांतरूप परब्रह्मात विलीन होते. साक्षात्काराने ती कधी झालीच नाही हे पटते. जेथे मायाच नाही तेथे वाणी तरी कुठली ? अशा वेळी परब्रह्म हे नाव तरी कुठे राहते ? (२०)

**अन्वये आणी वीतरेक। हा पूर्वपक्षाचा विवेक।**
**सिद्धांत म्हणिजे शुद्ध येक। दुसरें नाहीं ॥ २१॥**

अन्वय म्हणजे उभारणी आणि व्यतिरेक म्हणजे संहारणी हा सर्व पूर्वपक्षाचाच विवेक आहे. म्हणजे तोही मायिकच आहे. सिद्धांत म्हणजे केवळ एक शुद्ध परब्रह्मच होय. त्याच्याशिवाय दुसरे काही अस्तित्वातच नाही. (२१)

**अधोमुखें भेद वाढतो। ऊर्धमुखें भेद तुटतो।**
**नि:संगपणें निर्गुणी तो। महांयोगी ॥ २२॥**

अधोमुखाने म्हणजे विस्ताराचा विचार केल्याने भेद-भाव वाढतो आणि ऊर्ध्वमुखे म्हणजे मुळासंबंधी विवेक केला म्हणजे भेद नष्ट होतो. आणि विवेकविचाराला कारण जे मीपण त्याचाच त्याग केल्याने तो साधक निर्गुणी ऐक्य पावून महायोगी बनतो. (२२)

**माया मिथ्या ऐसी कळली। तरी मग भीड कां लागली।**
**मायेचे भिडेनें घसरली। स्वरूपस्थिती ॥ २३॥**

एकदा माया मिथ्या असे कळल्यानंतर मग मायेची भीड का लागावी ? मायेची भीड धरल्याने स्वरूपस्थिती मात्र घसरते. (२३)

**लटके मायेनें दपटावें। सत्य परब्रह्म सांडावें।**
**मुख्य निश्चयें हिंडावें। कासयासी ॥२४॥**

मिथ्या मायेच्या भिडेने सत्य परब्रह्माकडे दुर्लक्ष करणे जसे अयोग्य आहे, तसेच ब्रह्मस्वरूपाच्या निश्चयानंतर परत मायिकाच्या आशेने इकडे-तिकडे वणवण करीत फिरणे, हेही अयोग्यच आहे. (२४)

**पृथ्वीमधें बहुत जन। त्यामधें असती सज्जन।**
**परी साधूस वोळखतो कोण। साधुवेगळा ॥ २५॥**

पृथ्वीमध्ये अनेक लोक आहेत. त्यांमध्ये कित्येक सज्जनही आहेत. पण जो स्वत: साधू असेल तोच दुसऱ्या साधूला ओळखू शकतो. इतरांना त्याची ओळख पटत नाही. (२५)

**म्हणौन संसार सांडावा। मग साधूचा शोध घ्यावा।**
**फिरफिरों ठाइं पाडावा। साधुजन ॥ २६॥**

म्हणून संसार सोडून प्रथम साधूचा शोध घ्यावा. ठिकठिकाणी फिरून साधूलोकांची माहिती करून घ्यावी. (२६)

**उदंड हुडकावे संत। सांपडे प्रचितीचा महंत।**
**प्रचितिविण स्वहित। होणार नाहीं ॥ २७॥**

उदंड संत शोधावेत, तेव्हा कुठे एखादा - स्वानुभवी महंत सापडतो. अशा स्वानुभवी महंताशिवाय आपले हित होणार नाही. (२७)

**प्रपंच अथवा परमार्थ। प्रचितीविण अवघें वेर्थ।**
**प्रत्ययेज्ञानी तो समर्थ। सकळांमध्यें ॥ २८॥**

प्रपंच असो वा परमार्थ असो, प्रचीतीवीण दोन्हीकडे सर्व व्यर्थच ठरते. जो साक्षात्कारी - स्वानुभवी संत असतो, तोच सर्वांमध्ये श्रेष्ठ होय. (२८)

**रात्रंदिवस पाहावा अर्थ। अर्थ पाहेल तो समर्थ।**
**परलोकींचा निजस्वार्थ। तेथेंचि घडे ॥ २९॥**

रात्रंदिवस परमार्थाचा निदिध्यास असावा. असा जो निरंतर आत्मानुसंधान करीत असतो, तोच श्रेष्ठ जाणावा. त्याच्या संगतीने, त्याच्या कृपेनेच परलोकीचा निजस्वार्थ साधता येतो. (२९)

**म्हणौन पाहिलेंचि पाहावें। आणि शोधिलेंचि शोधावें।**
**अवघें कळतां स्वभावें। संदेह तुटती ॥ ३०॥**

म्हणून साधकाने अध्यात्म ग्रंथाचे वारंवार परिशीलन करावे, पाहिलेलेच पुन्हा पहावे, जे श्रवण केले असेल, त्याचे मनन, निदिध्यासन करून सूक्ष्म विवेकाने त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न करीत राहावे. म्हणजे स्वाभाविकरीत्याच जे रहस्य ते कळून येते, त्या परब्रह्माचा साक्षात अनुभव येऊन सर्व संदेह नष्ट होतात. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूक्ष्मनामाभिधाननाम' समास तिसरा समाप्त.**

❑ ❑

## दशक २० : समास ४
## आत्मानिरूपण

॥ श्रीराम ॥

**सकळ जनास प्रार्थना। उगेंच उदास करावेंना।**
**निरूपण आणावें मना। प्रत्ययाचें ॥ १॥**

सर्व लोकांना माझी अशी प्रार्थना आहे की, त्यांनी उगीच निराश होऊ नये. तसेच उगीच निरूपणामुळे आलेले तात्पुरते वैराग्यही दाखवू नये. तर समर्थ जे निरूपण करतात, ते स्वानुभवाचे आहे, हे जाणून त्याचे मनन करावे. (१)

**प्रत्यये राहिला येकेकडे। आपण धांवतो भलतेकडे।**
**तरी सारासाराचे निवाडे। कैसे होती ॥ २॥**

स्वानुभव राहतो एकीकडे आणि आपण धावतो भलतीकडे अशी परिस्थिती असल्याने सारासारविवेकाने होणारा निश्चय कसा प्राप्त होणार? (२)

**उगिच पाहातां सृष्टी। गल्बला दिसतो दृष्टीं।**
**परी ते राजसत्तेची गोष्टी। वेगळीच ॥ ३॥**

सृष्टीकडे दृष्टी टाकली की, सर्वत्र गोंधळच आढळून येतो. पण राजसत्तेची गोष्टच वेगळी असते. ती प्रत्यक्ष दिसत नसूनही कार्यकारी असते. तसेच ईश्वरी सत्तेचे समजावे. (३)

**पृथ्वीमधें जितुकीं शरीरें। तितुकीं भगवंताचीं घरें।**
**नाना सुखें येणें द्वारें। प्राप्त होती ॥ ४॥**

पृथ्वीमध्ये जितकी म्हणून शरीरे आहेत, ती ती तितकी सर्वच्या सर्व भगवंताची घरे आहेत. या शरीराच्या द्वारेच जीवाला नाना सुखे प्राप्त होत असतात. (४)

**त्याचा महिमा कळेल कोणाला। माता वांटून कृपाळु जाला।**
**प्रत्यक्ष जगदीश जगाला। रक्षितसे ॥ ५॥**

त्या ईश्वराचा महिमा कोणीही यथार्थ जाणू शकत नाही. प्रत्येक जीवमात्राच्या आईच्या रूपाने ईश्वरच सर्वांमध्ये आपली कृपा वाटत असतो आणि तो जगदीशच सर्व जगाचे रक्षण करीत असतो. (५)

**सत्ता पृथ्वीमध्यें वांटली। जेथें तेथें विभागली।**
**कळेनें सृष्टि चालिली। भगवंताचे ॥ ६॥**

ईश्वराचीच सत्ता या पृथ्वीवरील निरनिराळ्या प्राण्यांच्यामध्ये वाटली गेली आहे. गीतेत भगवान सांगतात की माझ्या एका अल्प अशा अंशाने संपूर्ण जग चालले आहे. (६)

**मूळ जाणत्या पुरुषाचीसत्ता। शरीरीं विभागली तत्वतां।**
**सकळ कळा चातुर्यता। तेथें वसे ॥ ७॥**

मूळ जगदीशाची म्हणजे अंतरात्म्याची सत्ता निरनिराळ्या शरीरात तत्त्वता विभागली गेली आहे. सर्व कला, चातुर्य वगैरे अंतरात्म्याच्या ठिकाणी असतात. (७)

**सकळ पुराचा ईश। जगामधें तो जगदीश।**
**नाना शरीरीं सावकास। करूं लगे ॥ ८॥**

सकळ देहरूपी पुरांचा जो ईश आहे, तोच जगामध्ये जगदीश म्हणून ओळखला जातो. नाना शरीरात तो त्या त्या शरीरास अनुसरून सावकाश व्यवहार करत असतो. (८)

**पाहातां सृष्टीची रचना। ते येकाचेन चालेना।**
**येकची चाल्वी नाना। देह धरूनी ॥ ९॥**

सृष्टीची रचना पाहिली की, वाटते, हा व्याप एकटा-दुकटा कुणीही चालवू शकणार नाही. परंतु नाना देह धारण करून एक अंतरात्माच सर्व काही चालवत असतो. (९)

**नाही उंच नीच विचारिलें। नाहीं बरें वाईट पाहिलें।**
**कार्ये चालें ऐसें जालें। भगवंतासी ॥ १०॥**

भगवंताने सृष्टीची रचना केली, तेव्हा त्याने उच्च-नीच पाहिले नाही की, बरे-वाईट हाही विचार केला नाही. कुठून का होईना सृष्टीचे कार्य व्यवस्थित चालले म्हणजे झाले, असेच जणू काय भगवंतास वाटत असावे आणि म्हणून त्याने अनेक देह निर्माण केले. (१०)

**किंवा नेणणें आडवें केलें। किंवा अभ्यासीं घातलें।**
**हें कैसें कैसें केलें। त्याचा तोचि जाणे ॥ ११॥**

त्याने काही लोकांना नेणते केले, तर काही लोकांना साधक बनवून अभ्यासात घातले. हे सर्व कसे कसे आणि का केले हे एक त्याचा तोच जाणू शकतो (११)

**जगदांतरीं अनुसंधान। बरें पाहाणें हेंचि ध्यान।**
**ध्यान आणी तें ज्ञान। येकरूप ॥ १२॥**

जगाच्या अंतरात्म्याचे अनुसंधान ठेवणे हेच ध्यान होय. ज्ञानाशिवाय हे जमणार नाही. म्हणूनच तत्त्वतः ध्यान आणि ज्ञान ही एकरूपच आहेत (१२)

**प्राणी संसारास आला। कांहीं येक शाहाणा जाला।**
**मग तो विवरों लगला। भूमंडळीं ॥ १३॥**

मनुष्य जगात जन्माला येतो. कालांतराने तो थोडाफार शहाणाही होतो आणि मग तो जगाबद्दल विचारही करू लागतो. (१३)

**प्रगट रामाचें निशाण। आत्माराम ज्ञानघन।**
**विश्वंभर विद्यमान। भाग्यें कळे ॥ १४॥**

रामाचे अस्तित्व जगात प्रगट आहे. प्रत्येक प्राणिमात्राच्या अंतर्यामी ज्ञानघन आत्माराम विराजमान असतो. पण या विद्यमान असणाऱ्या विश्वंभराचे ज्ञान एखाद्याला भाग्याने होते. (१४)

**उपासना धुंडून वासना धरिली। तरी ते लंबतचि गेली।**
**महिमा न कळे बोलिली। येथार्थ आहे ॥ १५॥**

माणसाने उपासनेच्या मिषाने स्वर्गादी प्राप्तीची वासना धरली तर पुण्यक्षयानंतर परत जन्म असल्याने जन्ममृत्यूची परंपरा लांबतच राहील. मायेचा महिमा असा अगाध आहे असे जे तिचे वर्णन करतात ते यथार्थच आहे. (१५)

**द्रष्टा म्हणिजे पाहाता। साक्षी म्हणिजे जाणता।**
**अनंतरूपी अनंता। वोळखावें ॥ १६॥**

अंतरात्मा हा द्रष्टा म्हणजे पाहणाराही आहे आणि साक्षी म्हणजे जाणणाराही आहे. तोच सर्व प्राण्यांच्या अंतर्यामी जाणीवरूपाने वास्तव्य करीत असतो. अशा अनंतरूपाने नटलेल्या अनंतास ओळखावे. (१६)

**संगती असावी भल्यांची। धाटी कथा निरूपणाची।**
**कांहीं येक मनाची। विश्रांती आहे ॥ १७॥**

भल्यांची संगत नेहमी असावी आणि कथा आणि अध्यात्मनिरूपण श्रवण, मनन करण्याची सवय असावी. म्हणजे त्यायोगेच मनाला काही एक विश्रांती प्राप्त होते. (१७)

**त्याहिमधें प्रत्ययेज्ञान। जाळून टाकिला अनुमान।**
**प्रचितिविण समाधान। पाविजेल कैंचें ॥ १८॥**

त्यातही अनुभवाचे ज्ञान असणे अत्यंत आवश्यक आहे. असे अनुभवाचे ज्ञान असेल, तरच अनुमानाचे जळून भस्म होते. स्वानुभवाशिवाय शाश्वत समाधान कसे प्राप्त होईल? (१८)

**मूळ संकल्प तो हरिसंकल्प। मूळमायेमधील साक्षेप।**
**जगदांतरीं तेंचि रूप। देखिजेतें ॥ १९ ॥**

मूळ संकल्प तोच हरिसंकल्प होय. मूळमायेचा सर्व खटाटोप या संकल्पानुसार चालतो. त्या संकल्पानुसारच जगातील सर्व घटना घडत असतात. (१९)

**उपासना ज्ञानस्वरूप। ज्ञानीं चौथा देह आरोप।**
**याकारणें सर्व संकल्प। सोडून द्यावा ॥ २० ॥**

मूळमाया-हरिसंकल्प-हा परब्रह्माच्या ठिकाणी केलेला केवळ आरोप आहे. तो मिथ्या असल्याने साधनाने सर्व संकल्पांचा त्याग करावयास हवा. हे ज्ञान उपासनेने होते म्हणूनच उपासना ही ज्ञानस्वरूप होय. म्हणजेच उपासनेची परिपूर्ती या ज्ञानात झाली पाहिजे. (२०)

**पुढें परब्रह्म विशाळ। गगनासारिखें पोकळ।**
**घन पातळ कोमळ। काये म्हणावें ॥ २१ ॥**

सर्व संकल्प सोडून दिले की पुढे गगनासारखे पोकळ, विशाल असे परब्रह्म सर्वत्र अनुभवास येते. त्याला घनदाट म्हणावे, पातळ म्हणावे की कोमल म्हणावे, काय म्हणावे हे खरोखर कळतच नाही. (२१)

**उपासना म्हणिजे ज्ञान। ज्ञानें पाविजे निरंजन।**
**योगियांचें समाधान। येणें रितीं ॥ २२ ॥**

उपासना म्हणजेच ज्ञान होय. या ज्ञानानेच निरंजन परब्रह्माची प्राप्ती होते. पण ज्ञानातील सूक्ष्म मीपणा जेव्हा नष्ट होतो, तेव्हाच परब्रह्मप्राप्ती होते. हेच योग्याचे समाधान होय. (२२)

**विचार नेहटूनसा पाहे। तरी उपासना आपणचि आहे।**
**येक जाये एक राहे। देह धरूनी ॥ २३ ॥**

नीट लक्षपूर्वक नेटाने विचार करून पाहिले की, ज्याची उपासना करावयाची ते उपास्य आपणच असल्याचा प्रत्यय येतो. त्यामुळे उपासक उपास्यात समरसून जातो मग उपासक उरतच नाही, तर उपास्यच त्याच्या देहाच्या आश्रयाने राहाते. (२३)

**अखंड ऐसी घालमेली। पूर्वापार होत गेली।**
**आतांहि तैसीच चालिली। उत्पत्तिस्थिती ॥ २४ ॥**

जगात पूर्वापारच उत्पत्ती, स्थिती, संहार अशी घालमेल चालत आली आहे व आताही ही तशीच चालू आहे. (२४)

**वनावरी वनचरांची सत्ता। जळावरी जळचरांची सत्ता।**
**भूमंडळीं भूपाळां समस्तां। येणेंचि न्यायें ॥ २५ ॥**

वनावर वनचरांची सत्ता असते, जलावर जलचरांची सत्ता असते तर त्याच न्यायाने भूमंडळावर भूपालांची सत्ता असते. (२५)

**सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील तयाचें।**
**परंतु येथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे ॥ २६ ॥**

तशीच सर्व जगावर जगदीश्वराची सत्ता असते. ती सर्वांच्या ठिकाणीच विभागलेली असते. त्यामुळे जो कोणी जे जे कार्य करतो, त्यास त्या कार्यानुसार सामर्थ्य प्राप्त होते. परंतु कुठल्याही कार्याला, चळवळीला भगवंताचा आश्रय असतो, अशी दृढ श्रद्धा पाहिजे. (२६)

**कर्ता जगदीश हें तों खरें। परी विभाग आला पृथकाकारें।**
**तेथें अहंतेचें काविरें। बाधिजेना ॥ २७ ॥**

सर्व कार्याचा कर्ता जगदीश असतो, ही गोष्ट पूर्णपणे सत्य आहे. पण भगवंताच्या सत्तेचे वेगवेगळ्या प्राण्यांच्या ठिकाणी जे अधिष्ठान आहे, त्याच्याकरवीच सर्व कार्य चालत असते, हे जाणून आपण केवळ निमित्त आहोत, कर्ता-करविता भगवंत आहे, अशी भावना करून कार्य केले की, अहंकाराचे वेड बाधत नाही. (२७)

**हरिर्दाता हरिर्भोक्ता। ऐसें चालतें तत्वतां।**
**ये गोष्टीचा आतां। विचार पाहावा ॥ २८ ॥**

देणाऱ्यात आणि घेणाऱ्यात तो भगवंत हरीच असल्याने तोच दाता व तोच भोक्ता अशी वास्तविक स्थिती असते. या गोष्टीचा मनाशी विचार करून पाहावा. (२८)

सकळ कर्ता परमेश्वरु। आपला माइक विचारु।
जैसें कळेल तैसें करूं। जगदांतरें ॥ २९॥

परमेश्वर हाच सकळ कर्ता आहे. आपण मायिक आहोत. आपले कर्तेपणही मायिक आहे, म्हणून ईश्वर आपणाकडून जे काही कार्य करवून घेईल, ते त्याच्या कृपेने जसे यथामती कळेल त्याप्रमाणे या जगासाठी करू. (२९)

देवायेवढें चपळ नाहीं। ब्रह्मायेवढें निश्चळ नाहीं।
पाइरीनें पाइरी चढोन पाहीं। मूळपरियंत ॥ ३०॥

इतके सामर्थ्य जरी असले, तरी हा अंतरात्मा चंचलच आहे. एक परब्रह्म तेवढे निश्चल असून त्याच्यासारखे निश्चल दुसरे कोणीही नाही. पण हे कळण्यासही पायरी-पायरीने मूळमायेपर्यंत जावे आणि नंतर स्वानुभवाने ते परब्रह्म जाणावे. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मानिरूपणनाम' समास चौथा समाप्त.**



## दशक २० : समास ५

## चत्वारजिनस

॥ श्रीराम ॥

येथून पाहातां तेथवरी। चत्वार जीनस अवधारीं।
येक चौदा पांच च्यारी। ऐसें आहे ॥ १॥

या सृष्टीमध्ये येथून तेथवर विचार करून पाहिले असता एकूण चारच जिन्नस आहेत असे दिसून येते. ते कोणते ते ऐका. एक परब्रह्म, मायेची चौदा नावे हा दुसरा जिन्नस, पंचमहाभूते हा तिसरा जिन्नस आणि चारी खाणी हा चौथा जिन्नस होय. (१)

परब्रह्म सकळांहून वेगळें। परब्रह्म सकळांहून आगळें।
नाना कल्पनेनिराळें। परब्रह्म तें ॥ २॥

त्यात परब्रह्म हे या सर्वांहून वेगळे आणि आगळे आहे. अनेक प्रकारच्या कल्पनांहून ते अगदी निराळे आहे. (२)

परब्रह्माचा विचार। नाना कल्पनेहून पर।
निर्मळ निश्चळ निर्विकार। अखंड आहे ॥ ३॥

परब्रह्माचा विचार हा कल्पनेहून अगदी पलीकडचा असून ते निर्मळ, निश्चल, निर्विकार आणि अखंड आहे. (३)

परब्रह्मास कांहींच तुळेना। हा येक मुख्य जिनसाना।
दुसरा जिनस नाना कल्पना। मूळमाया ॥ ४॥

परब्रह्माची तुलना कशाहीबरोबर करता येत नाही आणि चारी जिन्नसांत हे मुख्य आहे, श्रेष्ठ आहे. दुसरा जिन्नस मूळमाया असून ती नाना कल्पनांनी भरलेली आहे. (४)

नाना सूक्ष्मरूप। सूक्ष्म आणी कर्दमरूप।
मुळींच्या संकल्पाचा आरोप। मूळमाया ॥ ५॥

मूळमायेची अनेक सूक्ष्मरूपे आहेत. ती अत्यंत सूक्ष्म असून मिश्रणरूप आहेत. परब्रह्माच्या ठिकाणी जो स्फुरणरूप संकल्पाचा आरोप केला जातो, तो म्हणजेच मूळमाया होय. (५)

हरिसंकल्प मुळींचा। आत्माराम सकळांचा।
संकेत नामाभिधानाचा। येणें प्रकारें ॥ ६॥

या मूळ संकल्पालाच हरिसंकल्प असे म्हणतात. सर्वांच्या अंतर्यामी असणारा आत्माराम अथवा अंतरात्मा तो हाच होय. त्याला जी नावे दिली गेली आहेत, ती पुढीलप्रमाणे आहे. (६)

निश्चळीं चंचळ चेतलें। म्हणौनि चैतन्य बोलिलें।
गुणसमानत्वें जालें। गुणसाम्य ऐसें ॥ ७॥

निश्चल परब्रह्माच्या ठिकाणी जी चंचल चेतना चेतविली गेली तिला चैतन्य असे म्हणतात. तेथे गुणांचे प्रमाण सम असते म्हणून त्याला गुणसाम्य असेही म्हणतात. (७)

अर्धनारीनटेश्वर। तोचि शड्गुणैश्वर।
प्रकृतिपुरुषाचा विचार। शिवशक्ती ॥ ८॥

अर्धनारीनटेश्वर, षड्गुणेश्वर, प्रकृती-पुरुष आणि शिव-शक्ती यांचाही विचार तोच आहे. (८)

शुद्धसत्वगुणाची मांडणी। अर्धमात्रा गुणक्षोभिणी।
पुढें तिही गुणांची करणी। प्रगट जाली ॥ ९॥

शुद्ध सत्त्वगुणाची मांडणी, अर्धमात्रा असलेली गुणक्षोभिणी, सत्त्व, रज आणि तम या गुणांची करणी यातून प्रगट झाली. (९)

मन माया अंतरात्मा। चौदा जिनसांची सीमा।
विद्यमान ज्ञानात्मा। इतुके ठाइं ॥ १०॥

मन, माया, अंतरात्मा इत्यादी सर्व मिळून मूळ मायेची चौदा नामे होतात. सदैव विद्यमान असणारा तो ज्ञानात्मा अथवा आदि संकल्प इतक्या प्रकारे अनुभवास येतो. (१०)

ऐसा दुसरा जिनस। अभिधानें चतुर्दश।
आतां तिसरा जिनस। पंचमाहाभूतें ॥ ११॥

असा हा दुसरा जिन्नस चौदा नावांनी ओळखला जातो. आता तिसरा जिन्नस जो पंचमहाभूते त्यासंबंधी ऐका. (११)

येथें पाहातां जाणीव थोडी। आदिअंत हे रोकडी।
खाणी निरोपिल्या तांतडी। तो चौथा जिनस ॥ १२॥

या पंचमहाभूतामध्ये जाणीव अत्यंत थोडी असते. यांना प्रत्यक्ष उत्पत्ती आणि नाश आहे हा रोकडा अनुभव येतो. चारी खाणींचे जे पूर्वी वर्णन केले आहे, त्या चारी खाणी हा चौथा जिन्नस होय. (१२)

च्यारी खाणी अनंत प्राणी। जाणीवेची जाली दाटणी।
च्यारी जिनस येथुनी। संपूर्ण जाले ॥ १३॥

चारी खाणीत अनंत प्राणी उत्पन्न होत असतात. त्या प्राण्यांच्या अंतर्यामी जाणिवांची एकच दाटी झालेली असते. याप्रमाणे पूर्वी सांगितलेले चारी जिन्नस येथे संपूर्ण सांगून झाले. (१३)

बीज थोडें पेरिजेतें। पुढें त्याचें उदंड होतें।
तैसें जालें आत्मयांतें। खाणी वाणी प्रगटतां ॥ १४॥

थोडे बीज पेरले तरी त्यातून पुढे उदंड पीक उगवून येते. तशीच अवस्था आत्म्याची म्हणजे अंतरात्म्याची चारी खाणी आणि चारी वाणी प्रगट झाल्यावर झाली. (१४)

ऐसी सत्ता प्रबळली। थोडे सत्तेची उदंड जाली।
मनुष्यवेषें सृष्टी भोगिली। नाना प्रकारें ॥ १५॥

अशा प्रकारे सत्तेची वाढ झाली. पूर्वी थोडी सत्ता होती, ती उदंड झाली. अखेर मनुष्यदेहामध्ये ती सत्ता सृष्टीचा नाना प्रकारे उपभोग घेते. (१५)

प्राणी मारून स्वापद पळे। वरकड त्यास काये कळे।
नाना भोग तो निवळे। मनुष्यदेहीं ॥ १६॥

पशू, श्वापदे असतात, ती दुसऱ्या प्राण्यांना मारून स्वसंरक्षणाच्या भीतीने पळून जातात. याशिवाय इतर त्यांना काय कळणार? पण नाना प्रकारचे भोग भोगण्यात मनुष्य मोठा कुशल आहे. (१६)

नाना शब्द नाना स्पर्श। नाना रूप नाना रस।
नाना गंध ते विशेष। नरदेह जाणे ॥ १७॥

नाना शब्द, नाना प्रकारचे स्पर्श, नाना प्रकारची रूपे, नाना प्रकारचे रस तसेच नाना प्रकारचे गंध याप्रमाणे पांची प्रकारचे विषय कसे भोगावे, हे फक्त नरदेह धारण केल्यानेच कळते. (१७)

अमोल्य रत्नें नाना वस्त्रें। नाना यानें नाना शस्त्रें।
नाना विद्या कळा शास्त्रें। नरदेह जाणे ॥ १८॥

अमूल्य रत्ने, नाना प्रकारची वस्त्रे, नाना प्रकारची वाहने आणि नाना शस्त्रे, तसेच नाना विद्या, नाना कला आणि नाना शास्त्रे यांचे ज्ञान फक्त मनुष्यासच असते. (१८)

पृथ्वी सत्तेनें व्यापिली। स्थळोस्थळीं अटोपिली।
नाना विद्या कळा केली। नाना धारणा ॥ १९॥

ईश्वरी सत्तेने सर्व पृथ्वी व्यापली आहे आणि ठिकठिकाणी ती सत्ताच व्यवस्था निर्माण करते. त्या सत्तेच्या प्रभावानेच नाना विद्या, नाना कला, नाना धारणा प्रगट होतात. (१९)

दृश्य अवघेंचि पाहावें। स्थानमान सांभाळावें।
सारासार विचारावें। नरदेहे जालियां ॥ २०॥

म्हणून नरदेह प्राप्त झाला असता हे सगळे दृश्य पाहून घ्यावे. व्यवहारातील आपले स्थान आणि आपला मान यांचे रक्षण करावे, आणि सारासारविचार करावा. (२०)

येहलोक आणी परलोक। नाना प्रकारींचा विवेक।
विवेक आणी अविवेक। मनुष्य जाणे ॥ २१॥

इहलोक आणि परलोक, नाना प्रकारचा विवेक, तसेच विवेक आणि अविवेक इत्यादी गोष्टी फक्त मनुष्यच जाणतो. (२१)

नाना पिंडीं ब्रह्मांडरचना। नाना मुळींची कल्पना।
नाना प्रकारीं धारणा। मनुष्य जाणे ॥ २२॥

या ब्रह्मांडरचनेत नाना तऱ्हेच्या पिंडांचा समावेश आहे. त्या पिंडांची रचना, ब्रह्मांडाची रचना, मूळ मायेतील अनेक कल्पना आणि नाना प्रकारच्या धारणा मनुष्यच जाणतो. (२२)

अष्टभोग नवरस। नाना प्रकारींचा विळास।
वाच्यांश लक्ष्यांश सारांश। मनुष्य जाणे ॥ २३॥

पंचविषय आणि त्रिगुण मिळून अष्टभोग अथवा अन्न, उदक, तांबूल, पुष्प, चंदन, वसन, शय्या आणि अलंकार हे आठ भोग, तसेच नऊ प्रकारच्या कटु, आम्ल आदी चवी; अथवा शृंगार, वीर, करुण, रौद्र, बीभत्स, भयानक, अद्‌भुत, हास्य आणि शांत हे साहित्यातील नऊ रस, तसेच अनेक प्रकारचे विलास आणि वाच्यांश, लक्ष्यांश आणि सारांश या सर्व गोष्टी मनुष्यच जाणतो. (२३)

मनुष्यें सकळांस आळिलें। त्या मनुष्यास देवें पाळिलें।
ऐसें हें अवघें कळलें। नरदेहयोगें ॥ २४॥

मनुष्याने सर्वांना आपल्या ताब्यात ठेवले आहे, पण या मनुष्याचे देव पालन-पोषण करतो. पण हे सर्व काही नरदेहातच कळते. (२४)

नरदेह परम दुल्लभ। येणें घडे अलभ्य लाभ।
दुल्लभ तें सुल्लभ। होत आहे ॥ २५॥

नरदेह हा अत्यंत दुर्लभ आहे. त्याच्या योगेच अलभ्य लाभ घडतो. जी गोष्ट दुर्लभ असते ती सुलभ होऊन जाते. (२५)

वरकड देहे हें काबाड। नरदेह मोठें घबाड।
परंतु पाहिजे जाड। विवेकरचना ॥ २६॥

इतर देह हे काबाड आहेत, तर नरदेह हे फार मोठे घबाड आहे. परंतु त्याचा फायदा होण्यासाठी अतिशय मोठ्या विवेकाची आवश्यकता आहे. (२६)

येथें जेणें आळस केला। तो सर्वस्वें बुडाला।
देव नाहीं वोळखिला। विवेकबळें ॥ २७॥

हा नरदेह प्राप्त झाला असताही जो आळसात आयुष्य घालवतो तो सर्वस्वी बुडतो. कारण त्याने विवेकाच्या बळावर परमात्म्याची प्राप्ती करून घेतलेली नसते. (२७)

नर तोचि नारायेण। जरी प्रत्ययें करी श्रवण।
मननशीळ अंतःकर्ण। सर्वकाळ ॥ २८॥

जो मनुष्य निरंतर मननशील अंतःकरणाने श्रवण करून अध्यात्म्याचा साक्षात अनुभव घेतो, तो नराचा नारायण बनतो. (२८)

जेणें स्वयेंचि पोहावें। त्यास कासेस नलगे लागावें।
स्वतंत्रपणें शोधावें। सकळ कांहीं ॥ २९॥

ज्याला स्वतःला पोहायला येते, त्याला दुसऱ्याची कास धरावी लागत नाही. म्हणून जो मननशील असेल त्याने स्वतः स्वतंत्रपणे सर्व गोष्टींचा शोध घ्यावा. (२९)

सकळ शोधून राहिला। संदेह कैचा तयाला।
पुढें विचार कैसा जाला। त्याचा तोचि जाणे ॥ ३०॥

अशा रीतीने जो सर्व गोष्टींचा स्वतंत्रपणे शोध घेतो, त्यास स्वानुभवामुळे कुठलाही संदेह उरत नाही. अशा रीतीने संदेहरहित झाल्यानंतर पुढे काय स्थिती होते, ती ज्याची तोच जाणतो. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'चत्वारजिनसनाम' समास पाचवा समाप्त.**



# दशक २० : समास ६

## आत्मागुणनिरूपण

॥ श्रीराम ॥

**पाहों जातां भूमंडळ। ठाईं ठाईं आहे जळ।**
**कित्तेक ते निर्मळ माळ। जळेंविण पृथ्वी ॥ १॥**

या भूमंडळावर फिरून पाहिले असता ठिकठिकाणी पाणी आढळून येते. पण कित्येक ठिकाणी मुळीच पाणी नसलेले निर्मळ माळरान आढळून येते. (१)

**तैसें दृश्य विस्तारलें। कांहींयेक जाणीवेनें शोभलें।**
**जाणीवरहित उरलें। कितीयेक दृश्य ॥ २॥**

त्याप्रमाणे ही दृश्य सृष्टी विस्तारलेली दिसते. यातील काही भाग जाणिवेने शोभून दिसतो, तर दृश्याचा काही भाग जाणीवरहित असतो. (२)

**च्यारी खाणी च्यारी वाणी। चौऱ्यासी लक्ष जीवयोनी।**
**शास्त्रीं अवघें नेमुनी। बोलिलें असे ॥ ३॥**

जाणीवसहित भागात चारी खाणी, चारी वाणी आणि चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी येतात. शास्त्रात हे सर्व नीट व्यवस्थितपणे सांगितलेले आहे. (३)

श्लोक

जलजा नवलक्षाश्च दशलक्षाश्च पक्षिणः।
कृमयो रुद्रलक्षाश्च विंशल्लक्षा गवादयः॥
स्थावरास्त्रिंशल्लक्षाश्च चतुर्लक्षाश्च मानवाः।
पापपुण्यं समं कृत्वा नरयोनिषु जायते॥

**अर्थ :** पाण्यात जन्मणारे नऊ लक्ष, पक्षी दहा लाख, कृमीकीटक अकरा लाख, गाई-बैलासारखे पशू वीस लाख, वृक्षादी स्थावर तीस लाख, माणसे चार लाख. पापपुण्य सारख्या प्रमाणात असेल, तेव्हा नरदेहाची प्राप्ती होते.

**मनुष्यें च्यारी लक्ष। पशु वीस लक्ष।**
**क्रिम आक्रा लक्ष। बोलिलें शास्त्रीं ॥ ४॥**

माणसे चार लाख, पशू वीस लाख, कृमी अकरा लाख आहेत, असे शास्त्रात सांगितलेले आहे. (४)

**दहा लक्ष ते खेचर। नव लक्ष जळचर।**
**तीस लक्ष स्थावर। बोलिलें शास्त्रीं ॥ ५॥**

दहा लाख पक्षी, नऊ लाख जलचर, तीस लाख स्थावर वृक्षादी आहेत असे शास्त्र सांगते. (५)

**ऐसी चौऱ्यासी लक्ष योनी। जितुका तितुका जाणता प्राणी।**
**अनंत देह्याची मांडणी। मर्यादा कैंची ॥ ६॥**

याप्रमाणे चौऱ्यांशी लक्ष योनी आहेत. यामध्ये जितके म्हणून प्राणी आहेत त्यांना जाणीव आहे. या असंख्य प्राण्यांच्या देहाची रचना अनंत प्रकारची आहे. त्या प्रकारांना मर्यादा कशी असणार? (६)

**अनंत प्राणी होत जाती। त्यांचें अधिष्ठान जगती।**
**जगतीवेगळी स्थिती। त्यास कैंची ॥ ७॥**

अनंत प्राणी जन्माला येतात आणि मरतात. त्यांना आधार पृथ्वीचाच असतो. पृथ्वीवाचून ते जगू तरी कसे शकतील? (७)

**पुढें पाहातां पंचभूतें। पावलीं पष्टदशेतें।**
**कोणी विद्यमान कोणी तें। उगीच असती ॥ ८॥**

यानंतर विचार करू लागल्यास स्पष्ट दशेला आलेली पंचमहाभूते आढळतात. त्यांच्यापैकी काही प्रत्यक्ष दिसून येतात उदा. पृथ्वी, जल, अग्नी. तर काही अदृश्य असतात. उदा. वायू व आकाश. (८)

**अंतरात्म्याची वोळखण। तेचि जेथें चपळपण।**
**जाणीवेचें अधिष्ठान। सावध ऐका ॥ ९॥**

जेथे चपळपणा म्हणजेच चंचलपणा, हालचाल असते, ती अंतरात्म्याची ओळख होय असे जाणावे. आता जाणिवेचे अधिष्ठान कुठे कुठे असते ते सावधपणे ऐकावे. (९)

**सुखदुख जाणता जीव। तैसाचि जाणावा सदाशिव।**
**अंतःकर्णपंचक अपूर्व। अंश आत्मयाचा ॥ १०॥**

सुखदुःखाची जाणीव जीवाला असते, तशीच ती सदाशिवालाही असते. अपूर्व असे अंतःकरणपंचक म्हणजे मन, बुद्धी, अंतःकरण, चित्त आणि अहंकार हे अंतरात्म्याचेच अंश आहेत. (१०)

स्थुळीं आकाशाचे गुण। अंश आत्मयाचे जाण।
सत्त्व रज तमोगुण। गुण आत्मयाचे ॥ ११ ॥

स्थूल देहातील आकाशाचे गुण म्हणजे काम, क्रोध, शोक, मोह, भय, अज्ञान आणि शून्यत्व हेही अंतरात्म्याचेच अंश आहेत. सत्त्व, रज आणि तम हेही अंतरात्म्याचेच गुण जाणावेत. (११)

नाना चाळणा नाना धृती। नवविधा भक्ति चतुर्विधा मुक्ती।
अलिप्तपण सहजस्थिती। गुण आत्मयाचे ॥ १२ ॥

नाना प्रकारच्या चालना, अनेक प्रकारचे धैर्य, नवविधा भक्ती, चतुर्विध मुक्ती, अलिप्तपण, सहजस्थिती हे अंतरात्म्याचे गुण होत. (१२)

द्रष्टा साक्षी ज्ञानघन। सत्ता चैतन्य पुरातन।
श्रवण मनन विवरण। गुण आत्मयाचे ॥ १३ ॥

द्रष्टा, साक्षी, ज्ञानघन, सत्ता, चैतन्य, पुरातन, श्रवण, मनन, विवरण, (१३)

दृश्य द्रष्टा दर्शन। ध्येय ध्याता ध्यान।
ज्ञेय ज्ञाता ज्ञान। गुण आत्मयाचे ॥ १४ ॥

द्रश्य, द्रष्टा, दर्शन, ध्येय, ध्याता, ध्यान, ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान हे सर्व अंतरात्म्याचे गुण जाणावेत. (१४)

वेदशास्त्रपुराणअर्थ। गुप्त चालिला परमार्थ।
सर्वज्ञपणें समर्थ। गुण आत्मयाचे ॥ १५ ॥

वेदशास्त्रे, पुराणे यांचा अर्थ, गुप्तपणे चाललेला परमार्थ, सर्वज्ञपणे समर्थ, (१५)

बद्ध मुमुक्ष साधक सिद्ध। विचार पाहाणें शुद्ध।
बोध आणी प्रबोध। गुण आत्मयाचे ॥ १६ ॥

बद्ध, मुमुक्षू, साधक, सिद्ध, शुद्ध विचार पाहाणे, बोध आणि प्रबोध म्हणजे अनुभवाचे यथार्थ ज्ञान हे सर्व अंतरात्म्याचेच गुण आहेत. (१६)

जागृति स्वप्न सुषुप्ति तुर्या। प्रकृतिपुरुष मूळमाया।
पिंड ब्रह्मांड अष्टकाया। गुण आत्मयाचे ॥ १७ ॥

जागृती, स्वप्न, सुषुप्ती व तुर्या या चारी अवस्था, तसेच प्रकृतिपुरुष, मूळमाया, पिंड, ब्रह्मांडाचे आठ देह हेही अंतरात्म्याचेच गुण होत. (१७)

परमात्मा आणि परमेश्वरी। जगदात्मा आणी जगदेश्वरी।
महेश आणी माहेश्वरी। गुण आत्मयाचे ॥ १८ ॥

परमात्मा आणि परमेश्वरी जगदात्मा आणि जगदीश्वरी महेश आणि माहेश्वरी हेही अंतरात्म्याचेच गुण आहेत. (१८)

सूक्ष्म जितुकें नामरूप। तितुकें आत्मयाचें स्वरूप।
संकेत नामाभिधानें अमूप। सीमा नाहीं ॥ १९ ॥

जितकी म्हणून सूक्ष्म नामे आणि रूपे आहेत, ते सर्व अंतरात्म्याचेच स्वरूप आहे. खूण पटण्यासाठी अनेक नावे सांगितली आहेत, ती असंख्य आहेत. त्यांना सीमाच नाही. (१९)

आदिशक्ती शिवशक्ती। मुख्य मूळमाया सर्वशक्ती।
नाना जीनस उत्पती स्थिती। तितुके गुण आत्मयाचे॥ २० ॥

आदिशक्ती, शिवशक्ती, मुख्य मूळमाया, सर्वशक्ती, नाना जिनसांची उत्पत्ती आणि स्थिती सर्व अंतरात्म्याचेच गुण आहेत. (२०)

पूर्वपक्ष आणी सिद्धांत। गाणें वाजवणें संगीत।
नाना विद्या अद्भुत। गुण आत्मयाचे ॥ २१ ॥

पूर्वपक्ष आणि सिद्धांत, गाणे, वाद्य वाजवणे, संगीत, नाना अद्‍भुत विद्या, हे सर्वही अंतरात्म्याचेच गुण जाणावेत. (२१)

ज्ञान अज्ञान विपरीतज्ञान। असद्वृत्ति सद्वृत्ति जाण।
ज्ञप्तिमात्र अलिप्तपण। गुण आत्मयाचे ॥ २२ ॥

ज्ञान, अज्ञान, विपरीत ज्ञान, असद् वृत्ती आणि सद्‌वृत्ती तसेच केवळ जाणीव आणि अलिप्तपण हेही अंतरात्म्याचेच गुण आहेत. (२२)

पिंड ब्रह्मांड तत्वझाडा। नाना तत्वांचा निवाडा।
विचार पाहाणें उघडा। गुण आत्मयाचे ॥ २३ ॥

पिंड, ब्रह्मांड, तत्त्वझाडा, नाना तत्त्वांचा निवाडा, प्रगटपणे विचार पाहणे, हेही अंतरात्म्याचे गुण होत. (२३)

नाना ध्यानें अनुसंधानें। नाना स्थिति नाना ज्ञानें।
अनन्य आत्मनिवेदनें। गुण आत्मयाचे ॥ २४ ॥

अनेक प्रकारची ध्याने, अनुसंधाने, नाना स्थिती, नाना ज्ञाने एवढेच नव्हे तर अनन्य आत्मनिवेदने हेही अंतरात्म्याचेच गुण आहेत. (२४)

तेतिस कोटी सुरवर। आठ्यासी सहस्त्र ऋषेश्वर।
भूत खेचर अपार। गुण आत्मयाचे ॥ २५ ॥

तेहतीस कोटी देव, अठ्ठ्याऐंशी हजार ऋषीश्वर, अपार भूते आणि खेचर हेही अंतरात्म्याचे गुण आहेत. (२५)

भूतावळी औट कोटी। च्यामुंडा छपन्न कोटी।
कात्यायेणी नव कोटी। गुण आत्मयाचे ॥ २६ ॥

साडेतीन कोटी भूतावळी, छप्पन्न कोटी चामुंडा, नऊ कोटी कात्यायनी हेही अंतरात्म्याचे गुण होत. (२६)

चंद्र सूर्य तारामंडळें। नाना नक्षत्रें ग्रहमंडळें।
शेष कूर्म मेघमंडळें। गुण आत्मयाचे ॥ २७॥

चंद्र, सूर्य, तारामंडळे, अनेक नक्षत्रे आणि ग्रहमंडळे व शेष, कूर्म आणि मेघमंडळे हेही अंतरात्म्याचेच गुण आहेत. (२७)

देव दानव मानव। नाना प्रकारीचे जीव।
पाहातां सकळ भावाभाव। गुण आत्मयाचे ॥ २८॥

देव, दानव, मानव, अनेक प्रकारचे जीव आणि सर्व प्रकारचे भाव आणि अभाव हेही अंतरात्म्याचे गुण होत. (२८)

आत्मयाचे नाना गुण। ब्रह्म निर्विकार निर्गुण।
जाणणें येकदेसी पूर्ण। गुण आत्मयाचे ॥ २९॥

अंतरात्म्याच्या ठिकाणी नाना गुण असतात. परब्रह्म मात्र निर्विकार आणि निर्गुण आहे. जाणीव परिच्छिन्न असो वा परिपूर्ण असो, ती अंतरात्म्याचेच रूप असते. (२९)

आत्मारामउपासना। तेणें पावले निरंजना।
निसंदेहे अनुमाना। ठावचि नाहीं ॥ ३०॥

या सगुण अंतरात्म्याच्या उपासनेनेच अंती निरंजन परब्रह्माची प्राप्ती होते. परब्रह्मास अनुभवाने जाणले की साधक नि:संदेह होतो मग तेथे अनुमानाला वावच नसतो. (३०)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मागुणनिरूपणनाम' समास सहावा समाप्त.

❑ ❑

## दशक २० : समास ७

## आत्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

अनुर्वाच्य समाधान जालें। तें पाहिजे बोलिलें।
बोलिल्यासाठीं समाधान गेलें। हें तों घडेना ॥ १॥

आत्मसाक्षात्काराने शब्दातीत समाधान झाले, तरी ते शब्दात वर्णन केले पाहिजे. शिवाय ते वर्णन केल्याने समाधान नाहीसे झाले असे तर कधी होत नाही (१)

कांहीं सांडावें लगत नाहीं। कांहीं मांडावें लगत नाहीं।
येक विचार शोधून पाहीं। म्हणिजे कळे ॥ २॥

असे समाधान प्राप्त होण्यासाठी काही सोडावे लागत नाही किंवा नवीन काही मांडावेही लागत नाही. फक्त एक विचार करून सर्वांचा शोध घेतल्याने ते कळून येते.(२)

मुख्य कासीविश्वेश्वर। श्वेतबंद रामेश्वर।
मल्कार्जुन भीमाशंकर। गुण आत्मयाचे ॥ ३॥

मुख्य काशी विश्वेश्वर, शिवाय सेतुबंध रामेश्वर, मल्लिकार्जुन, भीमाशंकर हे सर्व अंतरात्म्याचेच गुण आहेत. (३)

जैसीं मुख्य बारा लिंगें। यावेगळीं अनंत लिंगें।
प्रचित जाणिजेत जगें। गुण आत्मयाचे ॥ ४॥

अशी ही मुख्य बारा ज्योतिर्लिंगे याशिवाय इतर अनंत लिंगे याची जगातील लोकांना प्रचीती येते. हे अंतरात्म्याचेच गुण आहेत. (४)

भूमंडळीं अनंत शक्ति। नाना साक्षात्कार चमत्कार होती।
नाना देवांच्या सामर्थ्यमूर्ती। गुण आत्मयाचे ॥ ५॥

या भूमंडळावर अनंत शक्ती आहेत. नित्य नाना साक्षात्कार आणि चमत्कार होतच असतात. नाना देवतांच्या मूर्तीमध्येही सामर्थ्य असल्याचे जाणवते. हे सर्व गुण अंतरात्म्याचेच जाणावेत. (५)

नाना सिद्धांचीं सामर्थ्यें। नाना मंत्रांचीं सामर्थ्यें।
नाना मोहरेवल्लींत सामर्थ्यें। गुण आत्मयाचे ॥ ६॥

अनेक सिद्धांची सामर्थ्ये, नाना मंत्रांची सामर्थ्ये आणि नाना वनस्पतीत असणारे सामर्थ्य, सर्पाच्या मस्तकावरील मण्याचे सामर्थ्य हे सर्व अंतरात्म्याचे गुण आहेत. (६)

नाना तीर्थांचीं सामर्थ्यें। नाना क्षत्रांची सामर्थ्यें।
नाना भूमंडळीं सामर्थ्यें। गुण आत्मयाचे ॥ ७॥

नाना तीर्थांची सामर्थ्ये, नाना क्षेत्रांची सामर्थ्ये आणि या भूमंडळावरील अनेक प्रकारची सामर्थ्ये अंतरात्म्याचेच गुण आहेत. (७)

जितुके कांहीं उत्तम गुण । तितुकें आत्मयाचें लक्षण ।
बरें वाईट तितुकें जाण । आत्म्याचकरितां ॥ ८ ॥

जितके म्हणून उत्तम गुण असतील, तितके सर्व अंतरात्म्याचे लक्षण होय. बरे-वाईट जे काही असेल, तेही सर्व अंतरात्म्याचेच लक्षण होय. (८)

शुद्ध आत्मा उत्तमगुणी । सबळ आत्मा अवलक्षणी ।
बरी वाईट आवघी करणी । आत्मयाची ॥ ९ ॥

शुद्ध आत्मा उत्तमगुणी असतो, तर शबल (अशुद्ध, विकारी) आत्मा अवलक्षणी असतो. बरी-वाईट सर्व करणी अंतरात्म्याचीच असते. (९)

नाना साभिमान धरणें । नाना प्रतिसृष्टि करणें ।
नाना श्रापउश्रापलक्षणें । आत्मयाचेनी ॥ १० ॥

नाना प्रकारचे अभिमान धारण करणे, नाना प्रकारे प्रतिसृष्टी करणे, नाना प्रकारचे शाप-उश्शाप देणे ही सर्व लक्षणे अंतरात्म्याचीच आहेत. (१०)

पिंडाचा बरा शोध घ्यावा । तत्वांचा पिंड शोधावा ।
तत्वें शोधिता पिंड आघवा । कळों येतो ॥ ११ ॥

माणसाने विवेकाने पिंडाचा चांगल्या प्रकारे शोध घ्यावा. पिंड हा तत्त्वांचा आहे, हे जाणून घ्यावे. तत्त्वाने तत्त्वांचे निरसन केल्याने पिंडासंबंधी सर्व काही कळून येते. (११)

जड देह भूतांचा । चंचळ गुण आत्मयाचा ।
निश्चळ ब्रह्मावेगळा ठाव कैंचा । जेथें तेथें ॥ १२ ॥

स्थूल जड देह हा पंचमहाभूतांचा आहे, चंचलता हा गुण अंतरात्म्याचा आणि निश्चल ब्रह्माशिवाय तर अणुमात्र स्थान रिकामे नाही. ते जेथे तेथे ओतप्रोत कोंदाटलेलेच असते. (१२)

निश्चळ चंचळ आणी जड । पिंडीं करावा निवाड ।
प्रत्ययावेगळें जाड । बोलणें नाहीं ॥ १३ ॥

निश्चल परब्रह्म, चंचल अंतरात्मा आणि जड पांचभौतिक देह याचा अनुभव आपल्या देहातच घ्यावा. अनुभवाशिवायचे ज्ञान व्यर्थ होय. (१३)

पिंडामधून आत्मा जातो । तेव्हां निवाडा कळों येतो ।
देहे जड हा पडतो । देखतदेखतां ॥ १४ ॥

मृत्युसमयी पिंडामधून अंतरात्मा निघून जातो, तेव्हा निवाडा अनुभवाने कळून येतो. हा जड देह पाहता पाहता पडून जातो. (१४)

जड तितुकें पडिलें । चंचळ तितुकें निघोन गेलें ।
जडचंचळाचें रूप आलें । प्रत्ययासी ॥ १५ ॥

जड पांचभौतिक देह जागच्या जागी पडतो. चंचल अंतरात्मा देह सोडून निघून जातो. याप्रमाणे अनुभवाने जड आणि चंचलाचे रूप कळून येते. (१५)

निश्चळ आहे सकळां ठाईं । हें तो पाहाणें नलगे कांहीं ।
गुणविकार तेथें नाहीं । निश्चळासी ॥ १६ ॥

निश्चल तर सर्वत्र सदा व्याप्त असते. ते काही पाहावे लागत नाही. निश्चलाच्या ठायी काहीही गुण, विकार नसतो. (१६)

जैसें पिंड तैसें ब्रह्मांड । विचार दिसतो उघड ।
जड चंचळ जातां जाड । परब्रह्मचि आहे ॥ १७ ॥

जसे पिंडासंबंधी तसेच ब्रह्मांडासंबंधी जाणावे, हे तर सर्व विचाराने स्पष्टपणे कळते. जड आणि चंचल निघून गेल्यावर ओतप्रोत घनदाट परब्रह्मच सर्वत्र संचलेले असते. (१७)

माहांभूतांचा खंबीर केला । आत्मा घालून पुतळा जाला ।
चालिला सृष्टीचा गल्बला । येणें रितीं ॥ १८ ॥

पंचमहाभूतांचा दणकट बाह्य आकार केला, त्यात अंतरात्मा घालून पुतळा तयार केला. याप्रकारे सर्व जीवसृष्टी निर्माण होऊन त्यांचा गलबला या सृष्टीत निरंतर चालू असतो. (१८)

आत्मा माया विकार करी । आळ घालिती ब्रह्मावरी ।
प्रत्ययें सकळ कांहीं विवरी । तोचि भला ॥ १९ ॥

अंतरात्मा म्हणजेच माया विकार उत्पन्न करते, त्याचा आरोप ब्रह्मावर घातला जातो. अनुभव घेऊन जो विवरण करून सर्व जाणून घेतो तोच भला होय. (१९)

ब्रह्म व्यापक अखंड । वरकड व्यापकता खंड ।
शोधून पाहातां जड । कांहींच नाहीं ॥ २० ॥

परब्रह्मच केवळ अखंड व्यापक आहे. इतरांची व्यापकता खंडित, सापेक्ष, मर्यादित असते. नीट विचार करून शोध घेतला असता यात न कळण्यासारखे काहीच नाही. (२०)

| | |
|---|---|
| गगनासी खंडता नये। गगनाचें नासेल काये।<br>जरी जाला माहांप्रळये। सृष्टीसंव्हार ॥ २१ ॥ | गगनाला खंडित करता येत नाही, तसेच त्याचा नाशही करता येत नाही. महाप्रलयाच्या वेळी सर्व सृष्टीचा संहार जरी झाला तरी गगन जसेच्या तसेच असते. (२१) |
| जें संव्हारामध्यें सांपडले। तें सहजचि नासिवंत जालें।<br>जाणते लोकीं उगविलें। पाहिजे कोडें ॥ २२ ॥ | जे जे संहारात सापडते ते नाशिवंत होय हे सहजच स्पष्ट कळून येते. शहाण्या लोकांनी विवेकाच्या योगाने शाश्वत काय हे ठरविले पाहिजे. (२२) |
| न कळतां वाटे कोडें। कळतां आवघें दिसे उघडें।<br>म्हणोनी येकांतीं निवाडे। विचार पाहावा ॥ २३ ॥ | जोपर्यंत ज्ञान होत नाही, तोपर्यंत ते कोडे वाटते. ज्ञान झाले की सर्व काही उघड होते. स्पष्ट कळून येते. म्हणून एकांतात बसून विचाराने शाश्वत-अशाश्वताचा निवाडा करावा. (२३) |
| मिळतां प्रत्ययाचे संत। येकांतापरीस येकांत।<br>केली पाहिजे सावचीत। नाना चर्चा ॥ २४ ॥ | मात्र साक्षात्कारी अनुभवसंपन्न संत जर भेटले, तर त्यांच्याबरोबर चित्त सावध करून एकाग्र करून अध्यात्मविषयक चर्चा अनेक प्रकारे केली पाहिजे. त्यांचा सहवास म्हणजे एकांतापेक्षाही एकांत समजावा. (२४) |
| पाहिल्यावेगळें कळत नाहीं। कळतां कळतां संदेह नाहीं।<br>विवेक पाहातां कोठेंचि नाहीं। मायाजाळ ॥ २५ ॥ | विचाराने सर्व शोधून पाहिल्याखेरीज कळत नाही. कळता कळता अनुभव आला की संदेह उरत नाही. विवेक करून पाहिले असता मायाजाळ कुठेही नाहीच हे कळून येते. (२५) |
| गगनीं अभाळ आलें। मागुती सवेंचि उडालें।<br>आत्म्याकरितां दृश्य जालें। उडेल तैसें ॥ २६ ॥ | आकाशात ढग येतात आणि नंतर लगेच सर्व उडूनही जातात. अंतरात्म्याशी झालेल्या तादात्म्यामुळे दृश्य सत्य वाटते. परंतु निश्चल स्वरूप साक्षात्कार झाल्यानंतर ते दृश्य मिथ्या ठरते. (२६) |
| मुळापासून सेवटवरी। विवेकी विवेकें विवरी।<br>तोचि निश्चय थावरी। चळेना ऐसा ॥ २७ ॥ | आपल्यापासून ते परब्रह्मापर्यंत विवेकी माणूस विवेकाने सर्वांचे विवरण करून आत्मस्वरूपासंबंधी कधीही चळणार नाही, असा दृढ निश्चय करतो. (२७) |
| वरकड निश्चय अनुमानाचें। अनुमानें बोलतां काये वेचे।<br>जाणते पुरुष प्रचितीचे। ते तों मानीतना ॥ २८ ॥ | इतर जे अनुमानाचे निश्चय असतात, ते टिकत नाहीत. लोक अनुमानाने हवे ते बोलतात, त्यात त्यांना काही तोशीस पडत नाही. पण जे अनुभवी पुरुष असतात, त्यांना अनुमानाचे बोलणे मान्य होत नाही. (२८) |
| उगेंच बोलणें अनुमानाचें। अनुमानाचें कोण्या कामाचें।<br>येथें सगट विचाराचें। काम नाहीं ॥ २९ ॥ | अनुमानाचे बोलणे फुकटचे असते. ते कोणाच्या कामी येत नाही. येथे सरसकट तर्क करून चालत नाही. (२९) |
| सगट विचार तोअविचार। कित्येक म्हणती येकंकार।<br>येकंकार भ्रष्टाकार। करूं नये ॥ ३० ॥ | सरसकट विचार हा अविचार होय. कुणी याला एकंकार असेही म्हणतात. निर्विकार स्वरूप सर्वत्र एकच आहे, परंतु विकारी जाणिवेमध्ये अनेकत्व असल्याने व्यवहारात सर्वसारखे एकंकार मानणे हे अयोग्य होय. असा भ्रष्टाचार करू नये. (३०) |
| कृत्रिम अवघें सांडावें। कांहीं येक शुद्ध घ्यावें।<br>जाणजाणों निवडावें। सारासार ॥ ३१ ॥ | जे कृत्रिम आहे ते सर्व सोडावे. जे शुद्ध असेल ते घ्यावे. पुन्हा पुन्हा समजून घेऊन सारासारविचाराने कृत्रिम काय व सत्य काय ते निवडून घ्यावे. (३१) |

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'आत्मनिरूपणनाम' समास सातवा समाप्त.

❑ ❑

## दशक २० : समास ८
## देहेक्षेत्रनिरूपण

॥ श्रीराम ॥

विधीप्रपंचतरु वाढला। वाढतां वाढतां विस्तीर्ण जाला।
फळें येतां विश्रांती पावला। बहुत प्राणी ॥ १ ॥

ब्रह्मदेवाने निर्मिलेला हा प्रपंचवृक्ष खूप वाढला. वाढता वाढता तो अतिशय विस्तीर्ण झाला. त्याला फळे लागली. त्यामुळे अनेक प्राण्यांना समाधान मिळाले. (१)

नाना फळें रसाळें लागलीं। नाना जिनसी गोडीस आलीं।
गोडी पाह्यावया निर्माण केलीं। नाना शरीरें ॥ २ ॥

त्याला अनेक रसाळ फळे लागली आणि ती नाना प्रकारच्या गोडीने संपन्न झाली. ती गोडी चाखावयासाठी ईश्वराने नाना शरीरे निर्माण केली. (२)

निर्माण जाले उत्तम विषये। शरीरेंविण भोगितां नये।
म्हणोनि निर्मिला उपाये। नाना शरीरें ॥ ३ ॥

अनेक उत्तम विषय निर्माण झाले, पण शरीराशिवाय त्यांचा भोग घेता येत नाही, म्हणून यावर उपाय म्हणून नाना शरीरे निर्माण केली. (३)

ज्ञानइंद्रियें निर्माण केलीं। भिन्न भिन्न गुणाचीं निर्मिलीं।
येका शरीरासी लागलीं। परी वेगळालीं ॥ ४ ॥

नंतर ज्ञानेंद्रिये निर्माण केली. ती भिन्न भिन्न गुणांची केली. एकाच शरीरात ती असतात, पण प्रत्येकाचा गुण वेगवेगळा असतो. (४)

श्रोत्रइंद्रिईं शब्द पडिला। त्याचा भेद पाहिजे कळला।
ऐसा उपाये निर्माण केला। इंद्रियांमधें ॥ ५ ॥

श्रोत्रेंद्रिय म्हणजे कान. त्याच्यावर शब्द पडला की तो ग्रहण केला जातो व शब्दाशब्दांतील भेद कळेल असा उपाय, अशी योजनाही इंद्रियामध्ये केली. (५)

त्वचेइंद्रियें सीतोष्ण भासे। चक्षुइंद्रियें सकळ दिसे।
इंद्रियांमधें गुण ऐसे। वेगळाले ॥ ६ ॥

त्वचेंद्रियाने शीत-उष्ण आदी स्पर्शाचे ज्ञान होते, तर चक्षु- इंद्रियाने सर्व काही पाहता येते. याप्रमाणे प्रत्येक इंद्रियामध्ये वेगवेगळा गुण आहे. (६)

जिव्हेमधें रस चाखणें। घ्राणामधें परिमळ घेणें।
इंद्रियांमधें वेगळाल्या गुणें। भेद केले ॥ ७ ॥

जिव्हेने रस चाखला जातो. नाकाने वास घेतला जातो. असे इंद्रियांच्या गुणांमध्ये वेगवेगळे भेद केले आहेत. (७)

वायोपंचकीं अंत:कर्णपंचक। मिसळोनि फिरे निशंक।
ज्ञानइंद्रियें कर्मइंद्रियें सकळिक। सावकास पाहे ॥ ८ ॥

पाच प्रकारच्या वायूंमध्ये अंत:करणपंचक मिसळून नि:शंकपणे शरीरात फिरते आणि ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रियांनी जी कार्ये होतात त्यांचे आपण सावकाश निरीक्षण करावे. (८)

कर्मइंद्रियें लागवेगीं। जीव भोगी विषयांलागीं।
ऐसा हा उपाये जगीं। ईश्वरें केला ॥ ९ ॥

कर्मेंद्रियांच्या द्वाराने जीव निरनिराळे विषय भोगतो. ईश्वराने अशा प्रकारे या जगात हा उपाय केला. (९)

विषय निर्माण जाले बरवे। शरीरेंविण कैसें भोगावे।
नाना शरीराचे गोवे। याकारणें ॥ १० ॥

उत्तम उत्तम विषय निर्माण झाले, पण शरीराशिवाय त्यांचा भोग घेणे शक्यच नाही, म्हणून यासाठीच नाना प्रकारची शरीरे निर्माण केली. (१०)

अस्तीमांशाचे शरीर। त्यामधें गुणप्रकार।
शरीरासारिखें यंत्र। आणीक नाहीं ॥ ११ ॥

खरे तर हे शरीर अस्थी आणि मांस यांचे बनलेले आहे, पण त्यामध्ये अनेक प्रकारचे गुण आहेत. या शरीरासारखे यंत्र जगात दुसरे नाही. (११)

ऐसीं शरीरें निर्माण केलीं। विषयभोगें वाढविलीं।
लाहानथोर निर्माण जालीं। येणें प्रकारें ॥ १२ ॥

अशा प्रकारे अनेक शरीरे निर्माण झाली आणि विषयभोगाने त्यांची वाढ झाली. याच प्रकारे अनेक लहान-मोठी शरीरे निर्माण झाली. (१२)

अस्तिमांशाचीं शरीरें। निर्माण केलीं जगदेश्वरें।
विवेकें गुणविचारें। करूनियां ॥ १३ ॥

अस्थिमांसाची अशी शरीरे जगदीश्वराने निर्माण केली आणि विवेकाने योग्य शरीरात योग्य गुण ठेवून ती निर्माण केली. (१३)

**अस्तिमाँशाचा पुतळा। जेणें ज्ञानें सकळ कळा।**
**शरीरभेद वेगळा। ठाईं ठाईं ॥ १४॥**

वास्तविक शरीर म्हणजे अस्थिमांसाचा पुतळा असतो, पण ज्या ज्ञानाने सर्व कला अवगत होतात, ते शरीरभेदाप्रमाणे वेगवेगळे असते. जाणीव तत्त्वत: एकच असली, तरी शरीरभेदानुसार तिचे अनेक प्रकार होतात. (१४)

**तो भेद कार्याकारण। त्याचा उदंड आहे गुण।**
**सकळ तीक्षण बुद्धीविण। काये कळे ॥ १५॥**

हा भेद कार्यसापेक्ष असतो. कार्याच्या दृष्टीने तो अत्यंत उपयोगी आहे. त्यात उदंड गुण आहेत, पण सूक्ष्म आणि तीक्ष्ण बुद्धीशिवाय त्यातील कार्यकारणभाव कसा कळणार? (१५)

**सकळ करणें ईश्वराला। म्हणोनी भेद निर्माण केला।**
**ऊर्धमुख होतां भेदाला। ठाव कैंचा ॥ १६॥**

सर्व सृष्टीचा व्यवहार करावयाचा असल्याने निरनिराळी कार्ये लक्षात घेऊन हा भेद ईश्वराने निर्माण केला. ब्रह्मत्वदृष्टीने तो खरा नाही. ऊर्ध्वमुख होऊन म्हणजे वृत्ती अंतर्मुख करून विचार केला की भेदाला स्थानच उरत नाही. (१६)

**सृष्टिकर्णीं आगत्य भेद। संव्हारें सहजची अभेद।**
**भेद अभेद हा संवाद। मायागुणें ॥ १७॥**

सृष्टीची उत्पत्ती करताना हा भेद आवश्यक आहे. ज्या वेळी संहार होतो, तेव्हा सहजच अभेद होतो. मायेमुळेच भेद आणि अभेद हे शब्द वापरले जातात. (१७)

**मायेमधें अंतरात्मा। नकळे तयाचा महिमा।**
**जाला चतुर्मुख ब्रह्मा। तोहि संदेहीं पडे ॥ १८॥**

मायेमध्येच अंतरात्मा असतो. त्याचा महिमा कोणाला कळत नाही. प्रत्यक्ष चार तोंडांचा ब्रह्मदेव, तोही महिमा न जाणल्याने संदेहात पडला. (१८)

**पीळ पेंच कडोविकडीं। तर्क तीक्षण घडीनें घडी।**
**मनासी होये तांतडी। विवरण करितां ॥ १९॥**

या अंतरात्म्याचा विचार करताना पदोपदी अनेक प्रकारचे तर्क, पीळ, पेच हे घडीघडीने कडोविकडी वाढतच जातात आणि त्याच्यासंबंधी विवरण करताना मनाची त्रेधातिरपीट उडते. (१९)

**आत्मत्वें लागतें सकळ कांहीं। निरंजनीं हे कांहींच नाहीं।**
**येकांतकाळीं समजोन पाहीं। म्हणिजे बरें ॥ २०॥**

अंतरात्म्याचा विचार करताना या सर्व गोष्टी लागतात, कारण आत्मत्वाने मीपणाचे भान असते. पण निरंजनी म्हणजे परब्रह्मात काहीच कधीच झालेले नसल्याने याची आवश्यकता नसते. फक्त एकांतात जाऊन विवेकाने विवरण करून समजून घ्यावे, म्हणजे बरे. (२०)

**देहेसामर्थ्यानुसार। सकळ करी जगदेश्वर।**
**थोर सामर्थ्यें अवतार। बोलिजेती ॥ २१॥**

ज्या देहाचे जेवढे सामर्थ्य असेल तेवढेच कार्य जगदीश्वर त्या देहाकडून करवून घेतो. ज्याच्या ठिकाणी फार मोठे सामर्थ्य असते त्यांना अवतार असे म्हटले जाते. (२१)

**शेष कूर्म वऱ्हाव जाले। येवढे देहे विशाळ धरिले।**
**तेणेंकरितां रचना चाले। सकळ सृष्टीची ॥ २२॥**

शेष, कूर्म, वराह हे अवतारच होत. त्यांचे देह एवढे विशाल धरलेले आहेत की, त्यांच्या आधारावरच ह्या सर्व सृष्टीची रचना, व्यवहार इत्यादी चालते. (२२)

**ईश्वरें केवढें सूत्र केलें। सूर्यबिंब धांवाया लाविलें।**
**धुकटाकरवीं धरविलें। अगाध पाणी ॥ २३॥**

ईश्वराने केवढे सूत्र केले आहे पहा बरे. त्याने सूर्यबिंबाला धावायला लावले आहे आणि धुक्यांमध्ये प्रचंड पाणी साठविण्याची व्यवस्था केली आहे. (२३)

**पर्वताऐसे ढग उचलती। सूर्यबिंबासी अछ्यादिती।**
**तेथें सवेंचि वायोची गती। प्रगट होये ॥ २४॥**

पर्वतासारखे प्रचंड ढग उत्पन्न होतात आणि वर आकाशात चढून सूर्यबिंबास आच्छादून टाकतात. तेव्हा तेथे आपोआप वायूची गती निर्माण होते. (२४)

**झिडकझिडकुं धांवे वारा। जैसा काळाचा म्हणियारा।**
**ढग मारुनी दिनकरा। मोकळें करी ॥ २५॥**

जोरजोरात वारा वाहू लागतो. जणू काय तो काळाचा सेवकच असतो आणि ढगांना मारून तो दिनकराला मोकळा करतो. (२५)

बैसती विजांचे तडाखे। प्राणीमात्र अवचिता धाके।
गगन कडकडून तडके। स्थळांवरी ॥ २६॥

विजेचा कडकडाट सुरू होऊन ती चमकू लागली की, प्राणिमात्र एकाएकी घाबरून जातात आणि आकाशात कडकडून ती वीज कुठल्या तरी स्थळावर पडते. (२६)

येहलोकांसी येक वर्म केलें। महद्भूतें महद्भूत आळिलें।
सकळ समभागें चालिलें। सृष्टिरचनेसी ॥ २७॥

या लोकात ईश्वराने एक असे वर्म केले आहे की, एका महाभूताने दुसऱ्या महाभूताला मर्यादेत ठेवले आहे. हे नियंत्रण सर्वत्र सारखेच राखल्याने सृष्टिरचनेची स्थिती उत्तम आहे. (२७)

ऐसे अनंत भेद आत्मयाचे। सकळ जाणती ऐसे कैंचें।
विवरतां विवरतां मनाचे। फडके होती ॥ २८॥

असे अंतरात्म्याचे अनंत भेद आहेत. ते सगळे कोण आणि कसे जाणू शकणार आहे? याचे विवरण करता करता मनाच्या चिंधड्या होतात. (२८)

ऐसी माझी उपासना। उपासकीं आणावी मना।
अगाध महिमा चतुरानना। काये कळे ॥ २९॥

माझी उपासना ही अशी आहे. जे उपासक असतील त्यांनी मनात यावर विचार करावा. या उपासनेचा अगाध महिमा चतुराननालाही कळत नाही. (२९)

अवाहन विसर्जन। हेंचि भजनाचें लक्षण।
सकळ जाणती सज्जन। मी काये सांगों ॥ ३०॥

आवाहन आणि विसर्जन हेच भजनाचे म्हणजे उपासनेचे मुख्य लक्षण आहे. म्हणजेच उभारणी आणि संहारणी याचा विवेक करून शाश्वत काय ते ओळखणे हेच खरे भजन होय. संत असतात, ते या सर्व गोष्टी जाणतात. तर मी तरी अधिक काय सांगावे? (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'देहेक्षेत्रनिरूपणनाम' समास आठवा समाप्त.**

❑ ❑

## दशक २० : समास ९

## सूक्ष्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

मृतिकापूजन करावें। आणी सर्वेंचि विसर्जावें।
हें मानेना स्वभावें। अंत:कर्णासी ॥ १॥

मातीची मूर्ती करून तिची पूजा करावी आणि परत स्वत:च तिचे विसर्जन करावे हे साहजिकच अंत:करणाला पटत नाही. (१)

देव पूजावा आणी टाकावा। हें प्रशस्त न वटे जीवा।
याचा विचार पाहावा। अंतर्यामीं ॥ २॥

देवाची पूजा करावी आणि नंतर तो टाकून द्यावा हे जीवाला प्रशस्त वाटत नाही. म्हणून यासंबंधी अंत:करणात विचार करून पहावा. (२)

देव करिजे ऐसा नाहीं। देव टाकिजे ऐसा नाहीं।
म्हणोनि याचा कांहीं। विचार पाहावा ॥ ३॥

देव म्हणजे असा काही पदार्थ नाही की, जो निर्माण करता येतो किंवा देव असाही नाही की, जो टाकून देता येतो. म्हणून या गोष्टीचा नीट विचार करून पाहिला पाहिजे. (३)

देव नाना शरीरें धरितो। धरुनी मागुती सोडितो।
तरी तो देव कैसा आहे तो। विवेकें वोळखावा ॥ ४॥

देव म्हणजेच अंतरात्मा नाना शरीरे धारण करतो आणि नंतर मागाहून ती सोडतो. तरी हे करणारा देव आहे तरी कसा हे विवेकाने ओळखावे. (४)

नाना साधनें निरूपणें। देव शोधायाकारणें।
सकळ आपुले अंत:कर्णें। समजलें पाहिजे ॥ ५॥

देवाचा शोध घेण्यासाठी अनेक साधने आहेत, निरूपणे आहेत, पण आपण आपल्या अंत:करणात सर्व काही समजून घेतले पाहिजे. (५)

ब्रह्मज्ञानाचा उपाये। समजल्याविण देतां नये।
पदार्थ आहे मा घे जाये। ऐसें म्हणावें ॥ ६॥

ब्रह्मज्ञानाचा उपदेश योग्य अधिकारी असल्याशिवाय देता येत नाही. तो काही एखादा पदार्थ नव्हे की, 'ये, घेऊन जा' असे म्हणावे. (६)

सगट लोकांचे अंतरींचाभाव। मज प्रतक्ष भेटवावा देव।
परंतु विवेकाचा उपाव। वेगळाचि आहे ॥ ७॥

सर्वांनाच सरसकट वाटत असते की मला प्रत्यक्ष देव भेटावा. पण नुसता असा भाव अंतरात असून भागत नाही. त्यासाठी विवेकाचाच वेगळा उपाय करावा लागतो. (७)

विचार पाहातां तगेना। त्यास देव ऐसें म्हणावेना।
परंतु जन राहेना। काये करावें ॥ ८॥

विचार करून पाहिला असता जो टिकत नाही, त्याला देव असे म्हणवत नाही. पण लोकांना हे पटत नाही, याला काय करावे? (८)

थोर लोक मरोनि जाती। त्यांच्या सुरता करुनी पाहाती।
तैसीच आहे हेहि गती। उपासनेची ॥ ९॥

थोर महात्मे मरून जातात, तेव्हा सामान्य लोक त्यांच्या समाध्या अथवा मूर्ती वगैरे करून त्यांची पूजा करतात, कारण सामान्यत: उपासकाला प्रतीक लागत असते. उपासनेची गती ही अशीच आहे. (९)

थोर व्यापार ठाकेना जनीं। म्हणोनि केली रखतवानी।
राजसंपदा तयाचेनी। प्राप्त कैची ॥ १०॥

एखाद्याने मोठा व्यापार करणे जमत नाही म्हणून शाईचा व्यापार करावा, तर त्याला राजसंपदा कशी प्राप्त होईल? (१०)

म्हणोनि जितुका भोळाभाव। तितुका अज्ञानाचा स्वभाव।
अज्ञानें तरी देवाधिदेव। पाविजेल कैचा ॥ ११॥

म्हणून भोळा भाव म्हणजे तो अज्ञानाचाच स्वभाव होय आणि अज्ञानाने देवाधिदेवाची प्राप्ती कशी होणार? (११)

अज्ञानासी ज्ञान न माने। ज्ञात्यास अनुमान न माने।
म्हणोनि सिद्धांचीये खुणें। पावलें पाहिजे ॥ १२॥

अज्ञानी माणसाला ज्ञान मानवत नाही आणि ज्ञानी माणसाला अनुमान मान्य होत नाही. म्हणून साधकाने सिद्धांताच्याच मार्गाने गेले पाहिजे. (१२)

माया सांडून मुळास जावें। तरीच समाधान पावावें।
ऐसें न होतां भरंगळावें। भलतीकडे ॥ १३॥

माया सांडून मुळाकडे म्हणजे परब्रह्मापर्यंत गेले तरच शाश्वत समाधान प्राप्त होते. तसे जर केले नाही तर भलतीकडेच भरकटत जावे लागते. (१३)

माया उलंघायाकारणें। देवासी नाना उपाय करणें।
अध्यात्मश्रवणपंथेंचि जाणें। प्रत्ययानें ॥ १४॥

मायेचे उल्लंघन करून देवाच्या प्राप्तीसाठी नाना उपाय करावे लागतात पण अध्यात्म्याच्या श्रवणाच्या मार्गानेच मनन, निदिध्यासन करून अनुभवाच्या मार्गाने गेल्यानेच भगवंताची प्राप्ती होते. (१४)

ऐसें न करितां लोकिकीं। अवघीच होते चुकामुकी।
स्थिती खरी आणि लटकी। ऐसी वोळखावी ॥ १५॥

असे जर केले नाही, तर लौकिक साधनाने देवाची प्राप्ती न होता चुकामूक होते. म्हणून खरी स्थिती आणि खोटी स्थिती नीट ओळखावी. (१५)

खोट्याचे वाटे जाऊं नये। खोट्याची संगती धरूं नये।
खोटें संग्रहीं करूं नये। कांहींयेक ॥ १६॥

खोट्याच्या वाटेला जाऊ नये. खोट्याची संगती करू नये. खोट्याचा संग्रह जरा सुद्धा कधी करू नये. (१६)

खोटें तें खोटेंचि खोटें। खऱ्यासीं तगेनात बाल्टें।
मन अधोमुख उफराटें। केलें पाहिजे ॥ १७॥

खोटे ते अखेर खोटेच असते. ते केसभर सुद्धा खऱ्याची बरोबरी करू शकत नाही. मन हे मायिक असल्याने त्याची स्वाभाविक प्रवृत्ती अधोमुख म्हणजे मायानिर्मित दृश्याकडेच असते. साधकाने ही प्रवृत्ती बदलून त्याला परब्रह्माच्या अभ्यासाकडे, अनुसंधानाकडे वळवले पाहिजे. (१७)

अध्यात्मश्रवणकरीत जावें। म्हणिजे सकळ कांहीं फावे।
नाना प्रकारीचे गोवे। तुटोनी जाती ॥ १८॥

नित्य अध्यात्मश्रवण करीत जावे म्हणजे सर्व काही साध्य होते. नाना प्रकारचा गुंता तुटून जातो. सर्व समस्या नष्ट होतात. (१८)

सूत गुंतलें तें उकलावें। तैसें मन उगवावें।
मानत मानत घालावें। मुळाकडे ॥ १९ ॥

सूत गुंतले की ते जसे हळूहळू उकलावे लागते, त्याप्रमाणे मन उकलावे आणि मायेतून मोकळे करून त्याच्या कलाने घेत घेत त्याला मुळाकडे म्हणजे परब्रह्माकडे लावावे. (१९)

सकळ कांहीं कालवलें। त्या सकळाचें सकळ जालें।
शरीरीं विभागलें। सकळ कांहीं ॥ २० ॥

(पंचवीस) तत्त्वांच्या मिश्रणाने, हे सर्व पिंड, ब्रह्मांडादी झालेले आहेत आणि हे पिंड, ब्रह्मांडही नाना शरीररूपी स्थूल विभागाने नटले आहे. (२०)

काये तें येथेंचि पाहावें। कैसें तें येथेंचि शोधावें।
सूक्ष्माचीं चौदा नांवें। येथेचि समजावीं ॥ २१ ॥

जे जे काही आहे, ते याच शरीरात पाहावे, जे जे काही शोधावयाचे ते येथेच म्हणजे या देहातच शोधावे. सूक्ष्म अशा मूळ मायेची चौदा नावे या देहातच समजून घ्यावीत. (२१)

निर्गुण निर्विकारी येक। तें सर्वां ठाईं व्यापक।
देह्यामधें तें निष्कळंक। आहे कीं नाहीं ॥ २२ ॥

निर्गुण-निर्विकार, सर्वांठायी व्यापक असणारे एकमेव अद्वितीय ब्रह्म निष्कलंक असे या देहामध्ये आहे की नाही हे जाणून घ्यावे. (२२)

मूळमाया संकल्परूप। तें अंत:कर्णाचें स्वरूप।
जड चेतवी चैतन्यरूप। तें हि शरीरीं आहे ॥ २३ ॥

मूळमाया ही संकल्पना असून तेच अंत:करणाचे स्वरूप आहे. जडाला चैतन्य चेतविते ते चैतन्यरूपही शरीरात आहे. (२३)

समानगुण गुणसाम्य। सूक्ष्म विचार तो अगम्य।
सूक्ष्म साधु जाणत प्रणम्य। तया समस्तांसी ॥ २४ ॥

समानगुण गुणसाम्य, सूक्ष्म विचार, त्यासच अगम्यही म्हणतात. पण जे साधू हा सूक्ष्म विचार जाणतात, त्या सर्वांना माझा प्रणाम असो. (२४)

द्विधा भासतें शरीर। वामांग दक्षणांग विचार।
तोचि अर्धनारीनटेश्वर। पिंडीं वोळखावा ॥ २५ ॥

आपल्या शरीरातही डावा, उजवा विभाग असतो, त्यामुळे ते द्विधा भासते. पण वास्तविक ते एकच असते. तोच पिंडात अर्धनारीनटेश्वर होय. (२५)

तोचि प्रकृतिपुरुष जाणिजे। शिवशक्ती वोळखिजे।
शड्गुणईश्वर बोलिजे। तया कर्दमासी ॥ २६ ॥

त्यालाच प्रकृती-पुरुष म्हणून जाणावे, अथवा शिवशक्ती म्हणून ओळखावे आणि त्या मिश्रणालाच षड्गुणेश्वर म्हणावे. (२६)

तयासीच म्हणिजे महत्तत्त्व। जेथें त्रिगुणाचें गूढत्व।
अर्धमात्रा शुद्धसत्व। गुणक्षोभिणी ॥ २७ ॥

त्यालाच महत्तत्त्व असेही म्हणतात आणि तेथेच त्रिगुण गुप्तरूपाने असतात. अर्धमात्रा, शुद्धसत्त्व आणि गुणक्षोभिणी ही नावेही त्यास दिली जातात. (२७)

त्रिगुणें चालतें शरीर। प्रतक्ष दिसतो विचार।
मुळींच्या कर्दमाचें शरीर। ऐसें जाणावें ॥ २८ ॥

त्रिगुणाच्या योगेच, शरीराचा व्यापार चालतो, हे तर प्रत्यक्ष दिसून येते. मूळमायेच्या कर्दमाचेच हे शरीर आहे, हे जाणून घ्यावे. (२८)

मन माया आणि जीव। हाहि दिसतो स्वभाव।
चौदा नामाचा अभिप्राव। पिंडीं पाहावा ॥ २९ ॥

मन, माया आणि जीव असेही याला स्वाभाविकपणे म्हणतात. याप्रमाणे मूळमायेच्या चौदा नावांचा प्रत्यय पिंडाच्या ठिकाणी पाहावा. (२९)

पिंड पडतां अवघेंचि जातें। परंतु परब्रह्म राहातें।
शाश्वत समजोन मग तें। दृढ धरावें ॥ ३० ॥

पिंड पडताच सर्व काही जाते, परंतु फक्त परब्रह्म तेवढे राहते. म्हणून परब्रह्म एकच तेवढे शाश्वत आहे, हे जाणून त्यालाच घट्ट धरून ठेवावे. (३०)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'सूक्ष्मनिरूपणनाम' समास नववा समाप्त.**

❑❑

## दशक २० : समास १०

### विमलब्रह्मनिरूपण

॥ श्रीराम ॥

धरूं जातां धरितां न ये। टाकूं जातां टाकितां न ये।
जेथें तेथें आहेच आहे। परब्रह्म तें ॥ १ ॥

परब्रह्माला धरायला जावे, तर त्यास धरता येत नाही. त्याला टाकावे म्हटले तर त्याला टाकताही येत नाही. जेथे तेथे हे परब्रह्म आहेच आहे. (१)

जिकडे तिकडे जेथें तेथें। विन्मुख होतां सन्मुख होतें।
सन्मुखपण चुकेना तें। कांहीं केल्यां ॥ २ ॥

जिकडे-तिकडे, जेथे-तेथे आपण कुठेही गेलो, तरी आपण त्याच्या विन्मुख होऊ शकतच नाही. ते सदासर्वदा सन्मुखच असते. काहीही उपाय केले तरी त्याचे सन्मुखपण चुकविता येत नाही. (२)

बैसलें माणुस उठोन गेलें। तेथें आकाशचि राहिलें।
आकाश चहुंकडे पाहिलें। तरी सन्मुखचि आहे ॥ ३ ॥

एखादा बसलेला माणूस उठून गेला, तरी तेथील आकाश तेथे जसेच्या तसेच असते. आकाशाला कुठूनही पाहावे, ते चहूकडून सन्मुखच असते. (३)

जिकडे जिकडे प्राणी पळोन जातें। तिकडे आकाशचि भोंवतें।
बळें आकाशाबाहेर तें। कैसें जावें ॥ ४ ॥

जिकडे तिकडे प्राणी पळून जातो. जिकडे तिकडे त्याच्यासभोवती सर्वत्र आकाशच असते. आकाशाबाहेर बळेच जाता कसे येईल? (४)

जिकडे जिकडे प्राणी पाहे। तिकडे तें सन्मुखचि आहे।
समस्तांचे मस्तकीं राहे। माध्यानीं मार्तंड जैसा ॥ ५ ॥

प्राणी जिकडे जिकडे पाहातो, तेथे तेथे त्याला आकाशच सन्मुख दिसते. जसा मध्याह्नकाळी सूर्य सर्वांना त्याच्या मस्तकीच दिसतो, तसेच हे जाणावे. (५)

परी तो आहे येकदेसी। दृष्टांत न घडे वस्तुसी।
कांहीं येक चमत्कारासी। देउनी पाहिलें ॥ ६ ॥

पण तो सूर्य मर्यादित आहे. त्याचा दृष्टांत परब्रह्म वस्तूला देता येत नाही. पण थोडीशी कल्पना यावी म्हणून हा चमत्कार सांगितला आहे. एकच सूर्य एकाच वेळी कोट्यवधी लोकांना आपल्या माथ्यावर दिसतो हा एक चमत्कारच आहे. पण परब्रह्म वस्तू एकदेशीय नसून सर्वव्यापक आहे. (६)

नाना तीर्थें नाना देसीं। कष्टत जावें पाहाव्यासी।
तैसें न लगे परब्रह्मासी। बैसले ठाईं ॥ ७ ॥

नाना तीर्थे पाहण्यासाठी नाना देशांत कष्ट सोसत ती पाहण्यासाठी जावे लागते. पण परब्रह्मास पाहण्यासाठी असे कष्ट करावे लागत नाहीत. बसल्या ठिकाणीच त्याची प्राप्ती होते. (७)

प्राणी बैसोनीच राहातां। अथवा बहुत पळोन जातां।
परब्रह्म तें तत्वतां। समागमें ॥ ८ ॥

प्राणी एका ठिकाणी बसून राहिला अथवा खूप दूरवर पळून गेला तरी परब्रह्म तत्त्वत: त्याच्या समागमेच असते. (८)

पक्षी अंतराळीं गेला। भोंवतें आकाशचि तयाला।
तैसें ब्रह्म प्राणीयांला। व्यापून आहे ॥ ९ ॥

पक्षी आकाशात कितीही उंच गेला, तरी त्याला सभोवती आकाशच दिसते. तसेच सर्व प्राणिमात्रांना ब्रह्मच सर्व बाजूने व्यापून आहे. (९)

परब्रह्म पोकळ घनदाट। ब्रह्म सेवटाचा सेवट।
ज्यासी त्यासी ब्रह्म नीट। सर्वकाळ ॥ १० ॥

परब्रह्म पोकळही आहे आणि घनदाटही आहे. सर्व शेवटांचा शेवट ब्रह्मातच होतो. ज्याला त्याला सर्वकाळ ब्रह्मच प्राप्त आहे. (१०)

दृश्या सबाहे अंतरीं। ब्रह्म दाटलें ब्रह्मांडोदरीं।
आरे त्या विमळाची सरी। कोणास द्यावी ॥ ११ ॥

दृश्यांच्या सबाह्य अंतरी, ब्रह्मांडाच्या उदरात सर्वत्र ब्रह्म ओतप्रोत घनदाट भरलेले आहे. अरे त्या विमल ब्रह्माला कुणाची उपमा द्यावी? त्याची बरोबरी कुणाशी करावी? (११)

वैकुंठकैळासस्वर्गलोकीं । इंद्रलोकीं चौदा लोकीं ।
पन्नगादिकपाताळलोकीं । तेथेंहि आहे ॥ १२ ॥

वैकुंठ, कैलास, स्वर्गलोक, इंद्रलोक, चौदा भुवने, नागादिकांच्या पाताळलोकी सर्वत्र ते परब्रह्म आहेच. (१२)

कासीपासून रामेश्वर । आवघें दाटलें अपार ।
परता परता पारावार । त्यास नाहीं ॥ १३ ॥

काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्वत्र अपार परब्रह्म ओतप्रोत कोंदाटलेले आहे. जी पलीकडेची अन्तिम सीमा मानावी तिच्याही ते पलीकडे आहे. (१३)

परब्रह्म तें येकलें । येकदांचि सकळांसी व्यापिलें ।
सकळांस स्पर्शोन राहिलें । सकळां ठाईं ॥ १४ ॥

परब्रह्म एकले एक असून त्याने एकदाच सर्वांना व्यापले आहे. सर्वांना व्यापून ते सर्वांठायी राहिले आहे. (१४)

परब्रह्म पाउसें भिजेना । अथवा चिखलानें भरेना ।
पुरामधें परी वाहेना । पुरासमागमें ॥ १५ ॥

परब्रह्म पावसाने भिजत नाही अथवा चिखलाने माखले जात नाही. पुरामध्ये व्याप्त असते, पण पुराच्या समागमे ते वाहून जात नाही. (१५)

येकसरें सन्मुख विमुख । वाम सव्य दोहिंकडे येक ।
आर्धऊर्ध प्राणी सकळीक । व्यापून आहे ॥ १६ ॥

एकाच वेळी ते सन्मुख असते, विमुखही असते. डावीकडे असते, उजवीकडेही असते. दोन्हीकडे एकच असते आणि वर-खाली सर्वत्र सर्व प्राण्यांना ते व्यापून आहे. (१६)

आकाशाचा डोहो भरला । कदापी नाहीं उचंबळला ।
असंभाव्य पसरला । जिकडे तिकडे ॥ १७ ॥

परब्रह्माने आकाशाचा डोह जणू भरून गेला आहे. पण त्यात भरती इत्यादी विकार नाहीत. तो जिकडे-तिकडे अवाढव्य पसरलेला आहे. (१७)

येकजिनसी गगन उदास । जेथें नाहीं दृश्यभास ।
भासेंविण निराभास । परब्रह्म जाणावें ॥ १८ ॥

दृश्यभास नसल्यामुळे गगन एकसारखे शून्य वाटते. हा शून्यत्वाचा भासही परब्रह्मात नसतो. (१८)

संतसाधुमाहानुभावां । देवदानवमानवां ।
ब्रह्म सकळांसी विसांवा । विश्रांतिठाव ॥ १९ ॥

संत, साधू, महानुभाव तसेच देव-दानव-मानव सर्वांना फक्त परब्रह्माच्या ठायीच विसावा मिळतो. ते सर्वांच्या विश्रांतीचे एकमेव स्थान आहे. (१९)

कोणेकडे सेवटा जावें । कोणेकडे काये पाहावें ।
असंभाव्य तें नेमावें । काये म्हणोनी ॥ २० ॥

कोणत्या बाजूला परब्रह्माचा शेवट आहे, कोणीकडे त्याला कसे पहावे हे सांगणे शक्य नाही. जे संभाव्य कोणी केलेले नाही, त्याचे मोजमाप तरी कसे सांगावे? (२०)

स्थूळ नव्हे सूक्ष्म नव्हे । कांहीं येकासारिखें नव्हे ।
ज्ञानदृष्टीविण नव्हे । समाधान ॥ २१ ॥

ते परब्रह्म स्थूल नाही, सूक्ष्मही नाही. ते दुसऱ्या कशासारखेही नाही. त्यास जाणण्यास ज्ञानदृष्टीची आवश्यकता आहे आणि ज्ञानदृष्टीने त्याचा साक्षात अनुभव आल्याखेरीज समाधान लाभत नाही. (२१)

पिंडब्रह्मांडनिरास । मग तें ब्रह्म निराभास ।
येथून तेथवरी अवकास । भकासरूप ॥ २२ ॥

सर्व प्रकृतीचा निरास केल्यावरच मग निराभास परब्रह्मस्वरूपाशी तादात्म्य होऊ शकते. मात्र त्याला वेगळेपणाने पाहू गेले तर सर्वत्र उदासवाणे आकाशच दिसेल. (२२)

ब्रह्म व्यापक हें तों खरें । दृश्य आहे तों हें उत्तरें ।
व्यापेंविण कोण्या प्रकारें । व्यापक म्हणावें ॥ २३ ॥

ब्रह्म व्यापक आहे, हे तर खरेच; पण जोवर दृश्य द्वैत आहे तोवरच असे म्हणता येते. त्याच्याशी ऐक्य पावल्यावर व्याप्य-व्यापक असा भेदच राहात नाही. एकले एक ब्रह्म उरते, तर ते कुणाला व्यापणार? (२३)

ब्रह्मासी शब्दचि लागेना । कल्पना कल्पूं शकेना ।
कल्पनेतीत निरंजना । विवेकें वोळखावें ॥ २४ ॥

शब्द ब्रह्मापर्यंत पोहोचू शकत नाही. कल्पनेने त्याला कल्पिता येत नाही. त्या कल्पनेच्या अतीत असलेल्या निरंजनाला विवेकानेच ओळखावे लागते. (२४)

शुद्ध सार श्रवण । शुद्ध प्रत्ययाचें मनन ।
विज्ञानीं पावतां उन्मन । सहजचि होतें ॥ २५ ॥

शुद्ध साराचे श्रवण, शुद्ध प्रत्ययाचे मनन केल्याने म्हणजे सारासारविवेकाने सार निवडून त्याचे निरंतर मनन केले की, मन सहजच उन्मन होते आणि विज्ञानस्वरूप झाले की सहजच मनाचा स्वरूपात लय होतो. (२५)

जालें साधनाचें फळ। संसार जाला सफळ।
निर्गुणब्रह्म तें निश्चळ। अंतरीं बिंबलें ॥ २६ ॥

या साधनाचे फळ आता प्राप्त झाले आहे. या अभ्यासाने संसार सफल झाला असून निर्गुण निश्चल परब्रह्म अंतरी बिंबले आहे (२६)

हिसेब जाला मायेचा। जाला निवाडा तत्वांचा।
साध्य होतां साधनाचा। ठाव नाहीं ॥ २७ ॥

मायेचा हिशोब चुकता झाला आहे, तत्त्वांचा निवाडा झाला असून साध्य जे ब्रह्मसाक्षात्कार तो झाल्यावर साधनाचा ठाव उरला नाही. (२७)

स्वप्नीं जें जें देखिलें। तें तें जागृतीस उडालें।
सहजचि अनुर्वाच्य जालें। बोलतां न ये ॥ २८ ॥

स्वप्नात जे जे दृश्य पाहात होतो, ते जागृती येताच नाहीसे झाले. अज्ञानामुळे जी दृश्यसृष्टी सत्य वाटत होती ती आत्मानुभवामुळे मिथ्या हे कळून आले. त्यामुळे ज्याचे शब्दात वर्णन करता येत नाही, असे अनिर्वाच्य समाधान सहजच प्राप्त झाले. (२८)

ऐसें हें विवेकें जाणावें। प्रत्ययें खुणेसी बाणावें।
जन्ममृत्याच्या नांवें। सुन्याकार ॥ २९ ॥

असे हे सर्व विवेकाने जाणून घ्यावे आणि त्याचा साक्षात अनुभव घेऊन खूण अंतरी बाणावी म्हणजे अनुभव घेणारा जन्ममृत्यूच्या नावे शून्याकार होतो. (२९)

भक्तांचेनि साभिमानें। कृपा केली दाशरथीनें।
समर्थकृपेचीं वचनें। तो हा दासबोध ॥ ३० ॥

भक्तांच्या अभिमानाने दाशरथी रामांनी कृपा केली आणि त्या समर्थांच्या कृपेची वचने म्हणजेच हा दासबोध होय. (३०)

वीस दशक दासबोध। श्रवणद्वारें घेतां शोध।
मननकर्त्यास विशद। परमार्थ होतो ॥ ३१ ॥

हा दासबोध ग्रंथ वीस दशकांचा असून श्रवणद्वारे त्याचा शोध घेतल्यावर मननकर्त्यास स्पष्टपणे परमार्थाचे ज्ञान होते. (३१)

वीस दशक दोनीसें समास। साधकें पाहावें सावकास।
विवरतां विशेषाविशेष। कळों लागे ॥ ३२ ॥

यात वीस दशक असून दोनशे समास आहेत. साधकांनी ते सावकाश वाचावेत आणि त्याचे वारंवार विशेष विवरण करावे म्हणजे यांतील मर्म कळून येईल. (३२)

ग्रंथाचें करावें स्तवन। स्तवनाचें काये प्रयोजन।
येथें प्रत्ययास कारण। प्रत्ययो पाहावा ॥ ३३ ॥

ग्रंथाचे स्तवन करावे म्हणतात. पण स्तवनाचे काय प्रयोजन आहे ? येथे मुख्य जो स्वानुभव कथन केला आहे, त्या प्रत्ययाचा अनुभव स्वत: घेऊन पहावा. (३३)

देहे तंव पांचा भूतांचा। कर्ता आत्मा तेथीचा।
आणी कवित्वप्रकार मनुशाचा। काशावरुनी ॥ ३४ ॥

हा देह तर पंचभौतिक आहे, येथील कर्ता आहे अंतरात्मा. मग कवित्व-प्रकार मात्र मनुष्याचा असे कशावरून ? (३४)

सकळ करणें जगदीशाचें। आणी कवित्वचि काय मानुशाचें।
ऐशा अप्रमाण बोलण्याचें। काये घ्यावें ॥ ३५ ॥

सर्व कर्तृत्व जर जगदीशाचे आहे, तर मग कवित्व तेवढे मनुष्याचे कसे ? अशा अप्रमाण बोलण्याचे काय प्रयोजन ? (३५)

सकळ देह्याचा झाडा केला। तत्त्वसमुदाव उडाला।
तेथें कोणत्या पदार्थाला। आपुलें म्हणावें ॥ ३६ ॥

सर्व देहाचा संपूर्ण निरास केला की तत्त्वांचा समुदाय उडून जातो. मग तेथे कुठल्या पदार्थाला आपले म्हणावे ? (३६)

ऐसीं हें विचाराचीं कामें। उगेंच भ्रमों नये भ्रमें।
जगदेश्वरें अनुक्रमें। सकळ केलें ॥ ३७ ॥

अशा प्रकारे विचार करण्याची आवश्यकता आहे. माणसाने उगीच भ्रमात पडून भटकू नये. यथानुक्रमे जगदीश्वरानेच सर्व काही केले आहे, असे समजावे. (३७)

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे 'विमलब्रह्मनिरूपणनाम' समास दहावा समाप्त.

दशक विसावा समाप्त.

॥ श्री दासबोध ग्रंथ समाप्त ॥

❑ ❑